# सुबोध संपूर्ण वेदान्तप्रस्थानत्रयी.

१. **शांकरभाष्यानुसार सुबोध गीता**—[ अवतरण, मूळ श्लोक, अन्वय, सरळ व सुबोध अर्थ, स्पष्टीकरण व सिंहावलोकन, ] शरीररथ व चतुर्भुज श्रीकृष्ण यांचीं चित्रें. पृष्ठें ३९० किंमत रु. २.

२. **शांकरभाष्यानुसार सुबोध उपनिषत्संग्रह**—[ मूळ श्रुति, अन्वयार्थ, स्पष्टीकरण, प्रत्येक उपनिषदाचें सिंहावलोकन यांसह ] ईश-केन-कठ-प्रश्न-मुंडक-मांडूक्य-तैत्तिरीय-ऐतरेय-छान्दोग्य-बृहदारण्यक-कौषीतकि-श्वेताश्वतर-जाबाल—अर्थात् ब्रह्मसूत्रांत ज्यांचा विचार केला आहे, अशीं महत्त्वाचीं तेरा उपनिषदें, प्रस्तावना, सविस्तर अनुक्रमणिका. किं. रु. ५॥.

३. **शांकरभाष्यानुसार सुबोध ब्रह्मसूत्र**—[ वैयासिक न्यायमालेसह ] प्रत्येक अधिकरणाचें नांव—सूत्रें—सूत्रार्थ—विषय—संशय—पूर्वपक्ष—संगति—सिद्धान्त, वैयासिक-न्यायमालेचे श्लोक—अन्वयार्थ—प्रस्तावना, सविस्तर अनुक्रमणिका यांसह पृ.५३० किं. ३.



४. **सुबोध पंचदशी**—[ मूळ—अन्वयार्थ—स्पष्टीकरण प्रत्येक प्रकरणाचा मथितार्थ प्रस्तावना—सविस्तर अनुक्रमणिका. सर विठ्ठलदास ठाकरसी यांचें चरित्र यांसह ] पृ. ७५० किंमत पातळ प्रत ३॥ रु. जाड प्रत रु. ४.

सर्व पुस्तकांचा टपालखर्च निराळा.

**विष्णुशास्त्री बापट.**

पत्ता—२७० सदाशिवपेठ, पुणें सिटी.

॥ ॐ तत्सत् ॥

# ब्रह्मसूत्रशारीरभाष्यार्थ

[ मूळ सूत्र, सूत्रार्थ, शांकर भाष्य, अवतरणें, स्पष्टीकरण, भामत्यादि टीकाकारांचा अधिक आशय व्यक्त करणाऱ्या टीपा यांसह ]

## भाग तिसरा

### अध्याय ३ रा व ४ था.

संपादक व प्रकाशक

आचार्यभक्त—विष्णु वामन बापटशास्त्री.

एवं मुक्तिफलानियमस्तदवस्थावधृतेः ॥ ३.४.५२. पृ. ६०५

भोगेन त्वितरे क्षपयित्वा संपद्यते ॥ ४.१.१९. पृ. ६८८

अनावृत्तिः शब्दादनावृत्तिः शब्दात् ॥ ४.४.२२. पृ. ८२८

आषाढ कृ. ११ शके १८४७.—सन् १९२५.

किंमत ५॥ रुपये

# प्रस्तावना.

यस्य देवे पराभक्तिर्यथा देवे तथा गुरौ ।
तस्यैते कथिता ह्यर्थाः प्रकाशन्ते महात्मनः ॥
ईश्वरो गुरुरात्मेति मूर्तिभेदविभागिने ।
व्योमवद्व्याप्तदेहाय दक्षिणामूर्तये नमः ॥

श्रीसद्गुरु–विद्यागुरु प. प. प्रज्ञानंदसरस्वती स्वामिमहाराज, परमगुरु श्रीशंकराचार्य, परात्परगुरु श्रीबादरायण व्यास व जगद्गुरु सर्वान्तर्यामी परमात्मा यांच्या कृपाकटाक्षानें आम्हीं इच्छिलेलें हें महत्कार्य आज समाप्त झालें आहे. वेदान्तप्रस्थानत्रय म्ह० उपनिषद्, गीता व ब्रह्मसूत्र, यांचें १ सुबोध व २ सभाष्य-भाष्यार्थ, मराठी भाषान्तर करण्याची जी स्फूर्ति आज एक तपापूर्वी आमच्या मनांत अन्तर्यामीच्या प्रेरणेनें झाली, ज्यासाठीं आम्ही हैदराबाद सिंध येथील गिडुमल पाठशाळेंतील स्वातंत्र्यपूर्ण असलेलीहि मुख्याध्यापकाची वृत्ति सोडून येथें आलों व **ब्रह्मविद्याग्रंथरत्नमाला** व **दर्शनमाला** हें मासिक सुरू केलें, ज्याच्या सिद्धिसाठीं विचित्र सुख-दुःखात्मक अवस्थांचा अनुभव घेतला, तें कार्य आज आमच्या हातून आमच्या इच्छेप्रमाणें पूर्ण झालें. खरोखर, याबद्दल मोठी धन्यता वाटते. **आचार्यांच्या** पूर्ण प्रसादामुळेंच ‘ पंगुं लंघयते गिरिं ’ या न्यायानें सर्वप्रकारें दुर्बल अशा एकाकी जीवाकडून हें पर्वताच्या परिवर्तनाचें कार्य घडलें ! या सर्वांचें श्रेय सर्वथा आचार्यचरणांना आहे. हा सामान्य जीव केवल निमित्तमात्र आहे. असो;

पूर्वी प्रसिद्ध केल्याप्रमाणें आम्ही हा **ब्रह्मसूत्रशारीरभाष्यार्थाचा** तिसरा–शेवटचा भाग आज आमच्या प्रिय वाचकांस सप्रेम व सादर अर्पण करीत आहों. यांत तिसरा व चवथा या दोन्ही अध्यायांचा समावेश केला आहे. भाषांतरादिकांची योजना पूर्वीच्या दोन भागांप्रमाणेंच आहे. म्हणून त्याविषयीं येथें कांहीं अधिक सांगण्यासारखें नाहीं. या भागांत **प्रस्थानत्रयकोश** देण्याचा विचार होता. पण या भागाची पृष्ठसंख्या बरीच वाढल्यामुळें कोशाचीं आणखीं दोन-अडीचशें पृष्ठें यांत घातल्यास पुस्तक फारच मोठें झालें असतें. शिवाय नुस्ता कोशच तयार करावयास आणखी तीन महिने लागले असते. यास्तव आज आम्ही हा मूळ ग्रंथच भाषांतरासह देत आहों. प्रस्थानत्रयोपसंहार, कोश व सूची यांचा चवथा भाग पुढें सवडीनें प्रसिद्ध करूं. अपुरीं राहिलेलीं दर्शनेंहि हळूहळू पूर्ण करण्याचा विचार आहे. पण तूर्त आम्ही

लेखनोद्योग कमी करून प्रस्थानत्रयाच्या अध्ययन-अध्यापनाचा उपक्रम करण्यासाठीं **आचार्यकुल** या नांवाची संस्था लवकरच सुरू करणार आहों. त्याची योजना या सोबत पाठवीत आहों. ती अवश्य पहावी व त्या कामीं शक्य तें साह्य करावें, अशी आमच्या सर्व ग्राहकांस नम्र विनंति आहे.

आमच्या हातून हें महत्कार्य शेवटास गेलें, याचें खरें श्रेय परलोकवासी उदार **शेठ, सर विठ्ठलदास दामोदर ठाकरसी** व त्यांच्या पत्नी श्री.**प्रेमलीलाबाई** यांस आहे. त्याचप्रमाणें आमचे **कायम ग्राहक** व वेळोवेळीं द्रव्य साह्य करणारे इतर **आश्रयदाते** हेहि याचे प्रधान श्रेयोभागी आहेत.

इंदिरा छापखान्याचे मालक श्री. **त्र्यंबक हरी आवटे** यांनीं हें कार्य आम्हांला कोणत्याहि प्रकारची तसदी न देतां वेळोवेळीं आमच्या मनाप्रमाणें करून दिलें. आमचे मित्र श्री. **दत्तात्रेय वामन बेडेकर** हे सद्गृहस्थ गेल्या पंधरा महिन्यापासून निरनिराळ्या प्रांतांत फिरून आमचीं पुस्तकें खपविण्याचा यत्न नेटानें व उत्साहानें करीत आहेत. श्री. **लक्ष्मीबाई प्रधान** यांनीं या भागाच्या कामांत हौसेनें लेखीप्रत लिहिणें, प्रुफ वाचणें या कामीं आम्हांला साह्य केलें. श्री. **माणिकप्रभुमहाराज** व शेठ **नागरमल पोदार** यांजकडून प्रत्येकीं शंभर रुपयांची मदत आली. आम्ही या सर्वांचें आभारी आहोंत.

या भागांत आमचे विद्यागुरु श्री प. प. **प्रज्ञानंदसरस्वतीस्वामी** यांचें श्री. **पु. श्री. काळे** यांनीं तयार करून दिलेलें चित्र संक्षिप्त चरित्रासह दिलें आहे. आम्हीं या ग्रंथाच्या पहिल्या भागाच्या प्रस्तावनेंत ' आचार्यांच्या कालाचा निर्णय होत नाहीं, ' असें म्हटलें आहे, तें पाहून आमच्या एका सन्मान्य मित्रांनीं आम्हांकडे अर्वाचीन कोशांतील आचार्यांच्या कालनिर्णयाचा एक उतारा लिहून पाठविला. त्याचा सारांश परीक्षकांच्या विचारासाठीं आम्ही पुढें देतों—" आनंदगिरींनीं शंकरविजयांत आचार्यांच्या जन्मकालाचा शक, संवत्सर, मिति वगैरे कांहींच लिहिलें नाहीं. ती उणीव त्यांच्या जैन प्रतिस्पर्ध्यांनीं भरून काढिली. जिनविजयग्रंथांत त्याविषयीं असें प्रमाण आहे—

**ऋषिर्बाणस्तथा भूमिर्मर्त्याक्षौ वाममेलनात् ॥**
**एकत्वेन लभेदंकस्ताम्राक्षस्तद्धि वत्सरः ॥**
**विश्वजिच्च पिता यस्य विख्यातश्च चिदंबरे ॥**
**यस्य भार्याम्बिकादेवी शंकरं लोकशंकरं ॥**
**प्रसूता सर्वलोकस्य तारणाय जगद्गुरुं ॥**
**शंकरेण निशीथे हि स्वकीयेन च तेजसा ॥**

ब्रध्नवत्काशितं सर्वं सूत्यागारं स्वलीलया ॥
वामाशायनब्रध्नस्य माघे कृष्णे शुभे दिने ॥
चतुर्दश्यां निशीथे तु पुष्पवंतौ तदा घटे ॥
ग्लौवासरे प्रादुरासीद्वादकृच्छंकरो महान् ॥
पश्चात्पंचदशे वर्षे शंकरस्थगते सति ॥
भट्टाचार्यकुमारस्य दर्शनं कृतवान् शिवः ॥
द्वात्रिंशद्वर्षे विज्ञेया स्थितिरासीद्धिमालये ॥
शंकरस्य शरीरस्यावसानमभवत्तदा ॥
नंदोवसुभूमिर्नेत्रे मेलने शक उत्तमः ॥
ज्ञातव्यः पंडुपुत्रस्य जातो वामेन वै तदा ॥
दुर्मुखे मार्गशीर्षे च शुक्लपक्षे त्रयोदशी ॥
सोमप्रदोषे सायाह्ने कैलासे शंकरो गतः ॥

**भावार्थ**—ऋषि—७, बाण—५, भूमि—१ व मर्त्याक्ष—२ हे अंक 'अंकानां वामतो गतिः' या न्यायानें २१५७ होतात. युधिष्ठिर शकाचीं इतकीं वर्षें गेल्यावर २१५८ व्या वर्षी रक्ताक्षी संवत्सरीं श्रीमच्छंकराचार्यांचें जन्म झालें. यांच्या वडिलाचें नांव विश्वजित्, तो चिदंबर येथें रहात असे, त्याची पत्नी अंबिका देवी, ती सर्व लोकांच्या रक्षणासाठीं लोककल्याणकर—सुखकर शंकरास प्रसवली. उत्तरायण, माघ वद्य १४, सोमवार, या तिथीस मध्यरात्रीं त्यांचा जन्म झाला. त्या वेळीं सूर्य व चंद्र कुंभ राशींत होते. आचार्यांनीं आपल्या स्वाभाविक सहज तेजानें सर्व प्रसूतिगृह सूर्याप्रमाणें प्रकाशित केलें. हा पुरुष मोठा तेजस्वी व पाखंड्यास वादांत जिंकणारा मोठा वादी होता. आपल्या वयाच्या पंधराव्या वर्षी हा कुमारिल भट्टास त्याच्या अंतकाळीं भेटला, बत्तीस वर्षें या लोकीं राहून, युधिष्ठिर शक २१९० मार्गशीर्ष, शुक्लपक्ष, दुर्मुख संवत्सर, सोमप्रदोष या दिवशीं याचें हिमालयावर देहावसान झालें. "अष्टचत्वारिंवर्षाणि जन्मकालाद्गतानि वै । प्रादुर्भवः शंकरस्य ततो जातोऽतिवादिनः ॥" **भावार्थ**—कुमारिल भट्टाच्या वयास अठ्ठेचाळीस वर्षें झालीं असतां अतिवादी शंकराचार्यांचा जन्म झाला. जैन ग्रंथांतीलच आणखी एक प्रमाण—"ऋषिर्वसुर्वसुर्ज्ञेयो पांडवानां महात्मनाम् । गणना शेषकालस्य शकस्य शिवजन्मनि ॥" **भावार्थ**—आचार्यांचा जेव्हां जन्म झाला त्यावेळीं युधिष्ठिर शकाच्या ३०४४ वर्षांपैकीं ८८७ वर्षें भोगून जाण्याचा शेष राहिला होता. यावरूनहि वरील कालाशींच मेळ बसतो. आनंदगिरीप्रभृति वैदिक पंडितांनीं आचार्यांच्या कालाविषयीं केलेली उपेक्षा जैन पंडितांनीं दोन

तीन प्रकारें भरून काढली, हे त्यांचे आचार्यभक्तांवर फारच मोठे उपकार आहेत. यावरून आज शालिवाहन शक १८४७ या वर्षी गतकली ५०२६ असून आचार्यांच्या जन्मास आज २८६९ वर्षें झालीं, असा निर्णय होतो.

या उताऱ्यावरून आचार्यांच्या जन्माच्या दोन तीन निरनिराळ्या तिथी व निरनिराळीं स्थानें जीं लोकांत प्रसिद्ध आहेत, त्याला पुष्टि मिळते व आचार्यांच्या परंपरेंत प्रभावशाली आचार्य दोन तीन झाले असावे, असें जें अनुमान आहे, तेंहि खरें ठरूं पहातें. भाष्यकार आचार्यांचा काळ इतका दूर असणें हें आम्हांलाहि अभीष्टच आहे. परीक्षकांनीं या प्रमाणांचा विचार करावा, असें सुचवून आम्ही ही प्रस्तावना पुरी करितों.

२७० सदाशिव पेठ. पुणें.
आषाढ शु. पौर्णिमा शके १८४७ } वि. बा. बापट.

---

## संक्षिप्त चिह्नांचा खुलासा.

सु. उ.–सुबोध उपनिषत्संग्रह सु. गी.–सुबोध गीता. सु. ब्र.–सुबोध ब्रह्मसूत्र.
सु. पं.–सुबोध पंचदशी. गी. भा. गीताभाष्यार्थ. ब्र.–ब्रह्मसूत्रशारीरभाष्यार्थ.
ई.–ईशोपनिषद्भाष्यार्थ. के.–केनोपनिषद्भाष्यार्थ. का.–काठकभाष्यार्थ.
प्र.–प्रश्नोपनिषद्भाष्यार्थ. बृ.–बृहदारण्यकभाष्यार्थ. छां–छांदोग्यभाष्यार्थ.
मुं.–मुंडकभाष्यार्थ. मां–मांडूक्यभाष्यार्थ तै.–तैत्तिरीयभाष्यार्थ.
ऐ.–ऐतरेयभाष्यार्थ. कौ.–कौषीतकि. श्वे.–श्वेताश्वतर.
जा.–जाबाल. पा.–पाणिनि अष्टाध्यायी —भाष्यार्थाचा आरंभ.
पू. मी.–पूर्वमीमांसा आत्मप्र.–आत्मप्रबोधोपनिषद्.
[ ] स्पष्टीकरण व अवतरणें. -समासांतील व संधींतील पदच्छेद.
—म्हणजे किंवा अवतरणादि आरंभ. =प्याऱ्यांतील इतर भाष्यवाक्यार्थांचा आरंभ.



जन्मशक १७८१]     श्रीप्रज्ञानन्दसरस्वती     [समाधिशक १८२६

अस्मद्गुरून् संततमानतोऽस्मि ॥

[ M. P. W. P.

॥ ॐ तत्सत् ॥

# श्रीमत्परमहंसपरिव्राजकाचार्य श्रीप्रज्ञानंदसरस्वती स्वामीमहाराज यांचें संक्षिप्त इतिवृत्त.

यस्य वेदश्च वेदी च विच्छिद्येते त्रिपूरुषं ।
स वै दुर्ब्राह्मणो ज्ञेयः सर्वधर्मबहिष्कृतः ॥

महाराष्ट्रांतील सुप्रसिद्ध वाईक्षेत्रीं 'परांजप्ये' या आडनांवाचें एक प्रसिद्ध घराणें आहे. त्यांतील प्राचीन पुरुष वेदविद्येंत पारंगत असून त्यांच्याकडे गेल्या चार वर्षांपर्यंत अविच्छिन्न अग्निहोत्रहि चालू होतें. त्या घराण्यांत गौरीशंकर शास्त्री म्हणून एक सदाचारसंपन्न, स्वधर्मनिष्ठ, क्षमाशील, जितेंद्रिय अग्निहोत्री होऊन गेले. त्यांना रामशास्त्री, कृष्णशास्त्री, वासुदेवभट्ट व नारायणभट्ट असे चार पुत्र होते. ते सर्वहि विद्वान् व पितृगुणांनीं संपन्न होते. त्यांतील दुसरे कृष्णशास्त्री हेच पुढें चतुर्थाश्रम घेतल्यानंतर '**श्रीप्रज्ञानंदसरस्वती**' झाले, यांचा जन्म शके १७८१ या वर्षी झाला; उपनयनानंतर कांहीं दिवस वेदाध्ययन करून त्यांनीं काव्य-व्याकरणादिकांचा अभ्यास केला व ते उत्तम व्युत्पन्न झाले. यांचे वडिल बंधु रामशास्त्रीहि अग्निहोत्री व उत्तम व्युत्पन्न होते व कनिष्ठ बंधु वासुदेवभट्ट हे उत्तम वैदिक व श्रौती होते. त्यांनीं यज्ञांतून ऋत्विक्-कर्मे फारच वाखाणण्यासारखीं केलीं आहेत. चवथे नारायणभट्ट उत्तम वैदिक होते. त्यांचा वंश वाईस आहे. कृष्णशास्त्री यांनीं प्रथम भागवतावर फार परिश्रम केले. वडिलांच्या आग्रहामुळें त्यांचा विवाहसंस्कारहि झाला; पण, त्यांची पत्नी अगदीं बाल्यावस्थेंतच मृत झाल्यामुळें कृष्णशास्त्र्यांना खऱ्या गृहस्थाश्रमाचा कांहींच अनुभव आला नाहीं. कृष्णशास्त्री स्वभावतःच विरक्त होते, म्हणून ते पुनः संसारपाशांत पडले नाहींत. ते वेदान्तशास्त्राचा संप्रदायशुद्ध अभ्यास करूं लागले. अष्टोत्तरशत उपनिषदें त्यांनीं पाठ केलीं, वाईक्षेत्रांत श्रीमत्परमहंस श्रीरामानंदसरस्वती ऊर्फ वेणीमाधवस्वामी म्हणून प्रसिद्ध यति होते. त्यांनीं अनेक वर्षे अनेक जिज्ञासूंना प्रस्थानत्रयाचे पाठ सांगून कृतार्थ केलें. हे स्वामीमहाराज महाविद्वान् होते. शके १८०१ चैत्र वद्य ६ या दिवशीं हे स्वामी वाईक्षेत्रीं पट्टाभिषिक्त रामाच्या सन्निध समाधिस्थ झाले. ते समाधिस्थ झाल्यावर भूमानंदसरस्वती या स्वामी महाराजांनीं आपल्या गुरूंचें वेदान्तपाठ सांगण्याचें व्रत देहत्याग होईपर्यंत

अविच्छिन्न चालविलें. कृष्णशास्त्री परांजप्ये यांनीं मुख्यतः या भूमानंदस्वामीपाशींच प्रस्थानत्रयभाष्याचा यथाविधि अभ्यास केला. भाष्याचे दोन-तीन पर्याय ऐकल्यामुळें प्रस्थानत्रयभाष्य यांना करतलामलकवत् अधिगत झालें. श्रवण-मननादिकांच्या योगानें त्यांची मति निश्चित होऊन संन्यासाश्रम केल्यावांचून आपलें हें ज्ञान परिपक्व होणार नाहीं, असा त्यांचा निश्चय झाला, प्रथम ब्रह्मचर्याश्रम स्वीकारून वेदाध्ययन, पुढें केवल जनकाच्या संतोषासाठीं संस्कारमात्र गृहस्थाश्रम, त्यानंतर दहा-पंधरा वर्षें विरक्तावस्था, विद्वान् यतींचा सहवास व प्रस्थानत्रयभाष्यपरिचय यांत घालवून, त्यांनीं वयाच्या एकोणतिसाव्या वर्षी सर्व प्रायश्चित्तपूर्वक संन्यासाश्रम स्वीकारला, ऐन तारुण्यांत असें आश्रमान्तर केल्यामुळें त्यांच्या आप्तांना मोठी काळजी उत्पन्न झाली व हे आरूढ-पतीत होतील कीं काय म्हणून मोठी भीति वाटली. पण श्रीस्वामींनीं वैराग्य व भाष्य-व्यासंग यांच्या बलावर दहा-पांच वर्षांतच आपले शम-दमादिगुण वाईक्षेत्रांतील आबालवृद्धांच्या प्रत्ययास आणून दिले. श्रीमत्परमहंस रामानंदस्वामीमहाराजांचे दुसरे शिष्य श्रीमत्परमहंस ब्रह्मानंदसरस्वती स्वामीमहाराज यांजपासून त्यांनीं संन्यास-दीक्षा घेतली. या योगपदाचें नांव श्री. प्रज्ञानंदसरस्वती असें आहे. योग्य गुरूपासून संन्यास दीक्षा, लोकसंग्रहार्थ कौपीन, आच्छादन व दंडादि यांचा परिग्रह, शास्त्र व शिष्टसंप्रदाय यांस अनुसरून गुरूपसदन व उपदेशादि विधि झाल्यावर श्रीप्रज्ञानंदस्वामीमहाराज मध्याह्नकाळ होईतों मुमुक्षूंना वेदान्ताचा पाठ सांगूं लागले. त्यांचा बाकीचा वेळ ब्रह्मविचारांत व भाष्याच्या चिंतनांत जात असे. सुमारें सतरा वर्षांच्या अवधींत त्यांनीं मुमुक्षूंना समग्र प्रस्थानत्रयभाष्याचे पांच सहा पाठ सांगितले. संन्यासदीक्षा स्वीकारल्यापासून देहत्याग करण्याच्या पूर्वी सहा दिवसपर्यंत त्यांचें हें पाठ प्रवचन सतत चाललें होतें. 'भारत वर्षांत आचार्यांचें भाष्य सांगणारे शेंकडों लोक आहेत व पुढेंहि अनेक विद्वान् भाष्य-प्रवचन करतील, पण श्रीप्रज्ञानंदस्वामी-महाराजांची योग्यता फारच थोड्यांमध्यें असेल असें वाटतें. त्यांची भाष्य-प्रवचनाची शैली फारच प्रशंसनीय होती. त्यांचें भाष्य-व्याख्यान ऐकून सामान्य व्युत्पन्न मनुष्याचाहि थोड्याच अवकाशांत आचार्यभाष्यांत चांगला प्रवेश होत असे. स्वामीमहाराजापाशीं भाष्यश्रवण करण्यासाठीं अनेक लोक येऊन रहात असत. कै. गोविंद-शास्त्री बापट इत्यादि अनेक पंडितांनीं यांच्या भाष्यप्रवचनाचा लाभ घेतलेला आहे, इतकेंच नव्हे, तर त्यांनीं 'आचार्यभाष्यरूप महोदधींत स्वच्छंदानें निर्भय संचार करणारा पुरुष एक श्रीप्रज्ञानंदस्वामीमहाराजच होत' असे उद्गार अनेक वेळां काढलेले आम्हांला आठवतात. त्यांची प्रकृति अशक्त असे, तथापि शांतिपूर्वक प्रथम

व्याख्येय भाष्याचा नुक्ता पाठ करून आपल्या मंद, गंभीर, व खणखणीत स्वरानें ते त्याचें प्रवचन करूं लागले कीं श्रोत्यांची चित्तवृत्ति तल्लीन होत असे. सुमारें दोन तास पाठ चालत असे. पाठामध्यें ते कोणाला फारसें बोलूं देत नसत. आनंदगिरींच्या टीकेंतील किंवा भाष्यांतील एखादी पंक्ति न कळल्यास ती पुनः विचारण्यास त्यांचा प्रतिबंध नसे. पण एखादे वेळीं आपल्याला एखादी पंक्ति न समजल्यास ती विचारण्याचीहि श्रोत्यांना मोठी भीति वाटे. पाठाच्या शेवटीं शेवटीं स्वामीमहाराजांच्या चर्येवर विशेषत: नेत्रांत असें कांहीं एक प्रकारचें तेज चमकूं लागे कीं, त्यांच्या मुखाकडे त्यावेळीं पहावत नसे. प्रवचनाच्या वेळीं कांहीं वेडी वाकडी शंका काढण्याची तर सोयच नसे. खरोखर त्या सत्पुरुषाची मूर्ति प्रत्यक्ष पाहून आज जवळ जवळ चोवीस वर्षें झालीं, पण आज हें त्यांचें संक्षिप्त चरित्र लिहितांना जणुं काय ती मूर्ति समोर बसलीच आहे, असा भास होतो. या लेखकाचें महद्भाग्य, म्हणूनच त्याला अशा सत्पुरुषाचा सहवास घडला! त्यांच्या कृपेनेंच मला या प्रस्थानत्रयमहोदधींत यथेष्ट संचार करितां आला. 'सत्संगति: कथय किं न करोति पुंसाम्' या भर्तृहरीच्या वचनाचा आम्हांला प्रत्यक्ष अनुभव आला. पूर्व सुकृतामुळेंच आम्हांला 'आचार्यांचें प्रस्थानत्रय भाष्य कळावें' अशी वयाच्या तेवीसाव्या वर्षीं उत्कट इच्छा झाली व पूर्व पुण्यामुळेंच या महान् आचार्यनिष्ठाचा सहवास घडला. "ऐक्यपरैः श्रुतिवाक्यैः आत्मा शश्वत् प्रकाशमानोऽपि । दैशिकदयाविहीनैरपरोक्षयितुं न शक्यते पुरुषैः ॥" **भावार्थ**—'ऐक्यामध्यें ज्यांचें तात्पर्य आहे अशा गुरुदयाहीन नुस्त्या श्रुतिवाक्यांनीं निरंतर प्रकाशमान होणाराहि आत्मा साक्षात् ज्ञानाचा विषय होत नाहीं' असें जें वचन आहे, तें अगदीं खरें आहे. श्रीप्रज्ञानंदसरस्वतीस्वामीमहाराजांची जर माझ्यावर कृपा झाली नसती तर माझ्या हातून हें एवढें मोठें काम कधींच तडीस गेलें नसतें. वस्तुतः मी त्यांच्या सहवासास थोडींच वर्षें होतों. प्रस्थानत्रयभाष्याचा एक समग्र पर्यायहि मला त्यांच्या तोंडून ऐकावयास सांपडला नाहीं. तथापि कांहीं महत्त्वाचीं उपनिषदें व ब्रह्मसूत्रभाष्याचा बराचसा भाग यांचें श्रवण मीं त्यांच्यापाशीं केलें. पण शेवटीं मीं जेव्हां त्यांचा निरोप घेतला तेव्हां 'पुढील भाग तुम्हांला कळेल' असें त्यांनीं मला आशीर्वचन दिलें व त्याचाच मला पूर्ण अनुभव आला. माझ्या बरोबर कै. भास्करशास्त्री पावगी, काशीनाथ शास्त्री पारकर, वगैरे बरीच चांगली चांगली मंडळी श्रवणास येत असे. पुढें ब्रह्मसूत्रशारीरभाष्याचा पाठ जेव्हां सुरू झाला तेव्हां नारायणशास्त्री मराठे हेहि श्रवणास येऊं लागले. आमच्या पूर्वीं व नंतरहि पुष्कळ अधिकारी मंडळी स्वामींच्या भाष्य-प्रवचनाचा लाभ घेण्यासाठीं वाईस येऊन राहिली होती.

शके १८२६ भाद्रपद वद्य त्रयोदशीपर्यंत स्वामीमहाराजांचें मुमुक्षूंना प्रस्थानत्रय-भाष्याचा पाठ सांगण्याचें व्रत चालू होतें. पुढें त्यांच्या प्रकृतीचें स्वास्थ्य बरेंच बिघडलें म्हणून आश्विन शुद्ध द्वितीयेपासून पाठ बंद ठेविले. पंचमीपासून त्यांच्या प्रकृतीचें अस्वास्थ्य फारच वाढलें. त्यावेळीं स्वामीपाशीं वे. शा. नारायणशास्त्री मराठे व नारायणबुवा ब्रह्मचारी असे दोघे अंतेवासी होते. त्यांनीं स्वामींची सेवा उत्तम प्रकारें केली. इतक्यांत नारायणशास्त्र्यांस मृताशौच आलें, त्यामुळें स्वामीमहाराजांच्या अखेरच्या सेवेचा भार एकट्या नारायणबुवांवरच पडला. त्यावेळीं वाईस प्लेगचा कहर चालला होता. लोक गांवाबाहेर रहावयास गेले होते. आश्विन शुक्ल सप्तमीस स्वामींनीं ब्रह्मचारीबुवास 'तस्य तावदेव चिरम्'—'आतां शरीरपाताचा काल जवळ आला आहे, मठाजवळच एक खड्डा तयार कर, म्हणजे तुला एकट्याला हें कलेवर दूर न्यावें लागणार नाहीं' असें सांगितलें. तेव्हां ब्रह्मचारीबुवांनींहि 'चार वर्षांपूर्वी विनंति केल्याप्रमाणें आपल्याला आतां संन्यासाश्रम द्यावा' असें म्हटलें. पण "आमचे गुरु-स्वामी माहुलीस आहेत, त्यांच्याकडे जाऊन दीक्षा घे आणि येथेंच येऊन रहा. नारायण-शास्त्री मुमुक्षूंना प्रस्थानत्रयाचा पाठ सांगतील" इत्यादि शेवटचा उपदेश केला. इतक्यांत नारायणशास्त्र्यांनीं मजूराकडून खड्डा करविला. ब्रह्मचारी बुवांनीं ही गोष्ट जेव्हा स्वामींना सांगितली, तेव्हां स्वामी म्हणाले कीं, माझा हात धरून मला उठीव मी हळूहळू खड्ड्यापर्यंत येतों. म्हणजे तुला पुढे त्रास पडणार नाहीं. पण ब्रह्मचाऱ्यांनीं ती गोष्ट कबूल केली नाहीं. पुढें कांहीं तासांनीं स्वामीमहाराज शरीराचा त्याग करून ब्रह्मरूप झाले. पुढील सर्व व्यवस्था त्यांच्या आज्ञेप्रमाणें होऊन ब्रह्मचारीबुवांनीं संन्यास दीक्षा स्वी-कारण्यासाठीं माहूलीस जाण्याची तयारी केली. पण नारायणशास्त्री मराठे यांनीं 'मठांत रहाणारे आपले सहाध्यायी विनायकबुवा पेंडश, मी व तुम्ही उत्तरायणांत एकदमच संन्यास करूं' असें म्हणून त्यावेळीं त्यांना ठेवून घेतलें. पुढें उत्तरायणांत माहूलीस जाऊन ब्रह्मचारीबुवांनीं आश्रमांतर केलें व ब्रह्मानंदस्वामींच्या आज्ञेनें ते म्ह० शिवा-नंदसरस्वती व नारायणशास्त्रीबुवा वाईस परत आले व स्वामींच्या मठांत त्यांनीं वेदा-न्ताचा पाठ सुरू केला. शास्त्रीबुवांच्या इच्छेप्रमाणें वाईचे सुप्रसिद्ध वकील श्री. शंभुराव करंदीकर यांनीं स्वामीमहाराजांच्या समाधीवर सुंदर इमारत बांधून तेथें शिवलिंगाची स्थापना केली. त्या समाधीपुढेंच प्रस्थानत्रयाचे पाठ व्हावे, अशी शंभुरावांची इच्छा होती, पण ती अद्यापि पूर्ण झाली नाहीं. स्वामीमहाराज जेथें पाठ सांगत होते, तेथेंच शास्त्रीबुवांनीं बारा वर्षे अव्याहत मधुकरीवृत्तीनें राहून प्रस्थानत्रयाचें पाठ सांगितले. पूर्वाह्णीं वेदान्तपाठ व अपराह्णीं इतर विद्यार्थ्यांना काव्य, व्याकरण, न्याय इत्यादि

शास्त्रांचे पाठ सांगण्याचा क्रम मोठ्या निश्चयानें अव्याहत चालविला. पुढें श्री. कानडे-दिवेकरप्रभृति नवीन विद्यार्थी श्री. शंभुरावांनीं बांधलेल्या प्राज्ञमठांत येऊन राहिले. त्यांच्या सल्ल्यानें प्राज्ञमठाचें नांव बदलून पूर्वेस घाटावर 'प्राज्ञपाठशाळा' या नांवाची एक संस्था सुरू केली. या संस्थेचा उत्तरोत्तर उत्कर्ष होत आहे. तथापि तिचें ध्येय व श्रीप्रज्ञानंदस्वामीमहाराजांचें ध्येय यांमध्यें बरेंच मोठें अंतर पडलें आहे. प्राज्ञपाठशाळा सुरू होण्यापूर्वींच शिवानंदसरस्वतीस्वामी वाई सोडून श्रीक्षेत्र माहूली येथें श्रीब्रह्मानंदस्वामी महाराजांच्या मठांत येऊन राहिले, ते अजून तेथेंच आहेत. हल्ली श्री. शंभुराव करंदीकर हे प्राज्ञमठांत सहकुटुंब येऊन राहिले आहेत असें ऐकतों !

या संक्षिप्त इतिवृत्तावरून आमचे ब्रह्मविद्यागुरु श्री प. प. प्रज्ञानंदसरस्वतीस्वामी यांचे बऱ्याच ब्रह्मविद्यार्थ्यांवर प्रत्यक्ष व महाराष्ट्रांतील जिज्ञासुवर्गावर परंपरेनें किती उपकार झाले आहेत, याची कल्पना आमच्या वाचकांस येईल. श्रीप्रज्ञानंदस्वामींसारखे संन्यासी हल्लीं कोठें फारसे दृष्टीसहि पडत नाहींत. त्यांची विद्वत्ता व ब्रह्मनिष्ठा तर दूरच राहिली, पण त्यांच्या इतकी विरक्ति व शुद्ध आचरण यांचाहि क्वचित्च प्रत्यय येतो. त्यांची विरक्ति, ब्रह्मनिष्ठा, आचार्यभक्ति, विद्वत्ता व शुद्ध आचरण यांचा एक सहस्रांशहि माझ्यामध्यें नाहीं. तथापि त्यांच्याच कृपेनें जो त्यांचा अत्यल्प लेश उद्भवला आहे तो असाच उत्तरोत्तर वृद्धि पावत जावो व या नाहीं तर निदान पुढील एक-दोन जन्मांत तरी या दुःखद संसाराचा क्षय होवो, अशी त्याच श्रीसद्गुरूंची प्रार्थना करून मी हें संक्षिप्त चरित्र त्यांच्याच चरणीं समर्पण करितों.

॥ ॐ नमो नारायणाय ॥

---

# आचार्यकुलासाठा पुढील संकल्पित ग्रंथ

१ वेदान्तप्रस्थानत्रयोपसंहार–वेदान्तप्रस्थानत्रयकोश–सूची. २ योगदर्शन. ३ सांख्यदर्शन. ४ वैशिषिकदर्शन. ५ न्यायदर्शन. ६ जैमिनीयन्यायमालाविस्तरासह धर्मसूत्र. ७ आत्मपुराण ( अवशिष्ट अध्याय ). ८ अनुभूतिप्रकाश (अवशिष्ट अध्याय) हे ग्रंथ क्रमानें व आमच्या सवडीनें प्रसिद्ध होतील.

वि. वा. बापट.

# विषयानुक्रमणिका.

## अध्याय ३ रा. पाद १ ला. पृ. १–८६.

शिवाय प्राणोपाधीच्या प्रत्याख्यानपक्षीं जीवांचेंहि परलोकगमन संभवत नाहीं, प्राणांवांचून देहान्तरीं जीवाच्या भोगाचा असंभव, जीवाबरोबर प्राणाच्या गमनाचें स्पष्ट श्रवण, इत्यादि कारणांनीं अग्न्यादिकांची वागादिकांवरील उपकाराची निवृत्ति हेंच त्याचें अग्न्यादिगमन ' असें समाधान १५; '**प्रथमे०**' इत्यादि सूत्रानें 'प्रथम आहुतींत आपांचें अश्रवण' अशी शंका व 'प्रथमाहुतींतील श्रद्धा ह्या आपच आहेत' असें सोपपत्तिक व सप्रमाण विवेचन १६–२१; '**अश्रुतत्वात्०**' इत्यादि सूत्रानें 'आपादिकांप्रमाणें जीवाचें अश्रवण, त्यामुळें भूतसूक्ष्मवेष्टित जीवांच्या गमनाची अनुपपत्ति ' अशी शंका व 'इष्टादिकारी जीवांची प्रतीति येते, म्हणून आप त्यांना परिवेष्टित करून परलोकास नेतात ' असें समाधान २२-२३; त्याविषयीं दुसऱ्या श्रुतीचें प्रमाण, चंद्रलोकीं गेलेल्या इष्टादिकाऱ्यांच्या कष्टकर अन्नभावाविषयीं शंका, '**भाक्तं वा०**' या सूत्रानें 'अनात्मज्ञत्वामुळें तो अन्नभाव गौण आहे' असें तिचें सप्रमाण व सयुक्तिक समाधान २४–२९.

—२ **कृतात्ययाधिकरण**—[३०–५२.]'चंद्रमंडलावर आरूढ होऊन कर्मक्षयामुळें तेथून अवरोहण करणारे जीव' हा याचा विषय, 'ते सर्व कर्मांचा भोग घेऊन निरनुशय होत्साते खालीं अवरोहण करितात कीं सानुशय अवरोहण करितात ?' असा संशय, 'यावत्संपातं' असें विशेषण असल्यामुळें सर्व कर्मांचें फल भोगून निरनुशय खालीं येतात, असा सोपपत्तिक पूर्वपक्ष ३०-३३; '**कृतात्यये०**' या सूत्रानें 'ज्या कर्मांचें फल भोगण्यासाठीं ते चंद्रलोकावर आरूढ होतात तें कर्म संपतांच इतर अवशिष्ट पुण्य-पापांसह म्ह० अनुशयासहच ते खालीं येतात, असा श्रुति-स्मृतिप्रमाणें व युक्ति यांनीं सिद्धान्त ३३-३५; अनुशयशब्दाचा अर्थ ३६, पूर्ववाद्याच्या सर्व शंकाचा अनुवाद व सविस्तर समाधान ३७-४७; '**चरणात्०**' या सूत्रानें 'रमणीयचरण-'श्रुतीचें कार्ष्णाजिनि-आचार्यांच्या मतानें आक्षेप-समाधानपूर्वक विवरण, चरणश्रुति अनुशयाच्या उपलक्षणार्थ आहे४८; '**आनर्थक्यं०**' या सूत्रानें त्या मतावर शीलाच्या आनर्थक्याचा आक्षेप, 'आचार व कर्म यांना अंगांगिभाव असल्यामुळें एकफलत्व आहे, त्यामुळें आचारसंज्ञक शीलाला व्यर्थत्व नाहीं' असें कार्ष्णाजिनींच्या मतानेंच समाधान ४९-५०; '**सुकृत-दुष्कृते०**' या सूत्रानें 'चरण'-शब्दानें सुकृत-दुष्कृतच सांगितलें आहे, असा 'बादरि-'आचार्यांच्या मतानें सिद्धान्त ५१-५२.

—३. **अनिष्टादिकार्यधिकरण** [५२–६६.] या अधिकरणाची पहिल्या अधिकरणाशीं संगति, 'अनिष्टादिकारी जीव' हा विषय, 'तेहि चंद्रलोकाला प्राप्त होतात कीं नाहीं ' असा संशय, '**अनिष्टादिकारिणां०**' या सूत्रानें 'त्यांचेंहि चंद्रलोकगमन

श्रुत आहे ' असा सप्रमाण पूर्वपक्ष ५२–५४; '**संयमने०**' या सूत्रानें 'पाप्यांचें यमलोकीं गमन, तेथें पापफलाचा उपभोग व तेथून अवरोह,' असा सप्रमाण व सोपपत्तिक सिद्धान्त ५५–५६; '**स्मरन्ति०**' या सूत्रानें त्याविषयीं स्मृतिप्रमाण, '**अपि च सप्त**' या सूत्रानें पौराणिकांनीं सांगितलेल्या सात पापफलभूमि, पण 'तेथें चित्रगुप्तादि अन्य अधिष्ठाते असतात' असा आक्षेप ५७; '**तत्रापि०**' या सूत्रानें तेथेंहि यमाचा मुख्याधिकार, '**विद्याकर्मणोः०**' या सूत्रानें अनिष्टादिकारी जीवांचें चंद्रलोकगमन होत नाहीं, याविषयीं देवयान-पितृयाणमार्गांचा व तिसऱ्या पाप्यांच्या मार्गाचा उल्लेख व त्यांची व्यवस्था ५८–५९; 'पापींहि चंद्रलोकीं जाऊन तेथून परत येऊन क्षुद्र जंतू होतात,' असा आक्षेप व 'आरोहाचें आनर्थक्य, प्रश्न-प्रतिवचनांची अनुपपत्ति,' इत्यादि दोषकथनपूर्वक त्याचें समाधान ५९–६१; 'देहप्राप्तीसाठीं, पांचव्या आहुतीच्या नियमाला अर्थवत्त्व यावें म्हणून पाप्यांचेंहि चंद्रलोकगमन होतें,' अशी शंका व '**न तृतीये०**' या सूत्रानें तृतीयस्थानीं आहुतिनियम नाहीं, असें समाधान ६२–६३; मनुष्यदेहासाठींहि आहुतिनियम नाहीं, याविषयीं '**स्मर्यते०**' या सूत्रानें स्मृतिप्रमाण ६४; '**दर्शनाच्च०**' या सूत्रानें चतुर्विध भूतग्रामांतील स्वेदज व उद्भिज्ज या देहांची स्त्री-पुरुषसंयोगावांचून उत्पत्ति दिसते, त्यामुळें आहुतिसंख्या-नियम नाहीं, श्रुतीच्या आधारानें भूतग्रामाच्या चतुर्विधत्वाविषयीं शंका ६५; '**तृतीय०**' या सूत्रानें श्रुतींतील 'उद्भिज्ज-'शब्दानें स्वेदजांचा संग्रह, असें समाधान ६६.

—४ **साभाव्यापत्ति-अधिकरण** [ ६६–७१. ] इष्टादिकारी जीवांच्या अवशिष्ट अवरोहप्रकारांचें वर्णन करणारें 'अथैतमेव०' हें श्रुतिवचन, हा याचा विषय ६७; 'अवरोह करणारे अनुशयी आकाशादिकांच्या स्वरूपासच प्राप्त होतात कीं साम्यास,' असा संशय, 'श्रुतिप्रामाण्यामुळें आकाशादि स्वरूपासच प्राप्त होतात.' असा पूर्वपक्ष. ६८; '**साभाव्यापत्तिः०**' या सूत्रानें 'ते आकाशादिकांच्या साम्यास प्राप्त होतात,' असा सप्रमाण व सोपपत्तिक सिद्धान्त ६९–७१.

—५ **नातिचिराधिकरण** [ ७१–७४. ] चंद्रलोकातून अवरोहण करणारे अनुशयी जीव हा याचा विषय, 'ते पूर्वपूर्व पदार्थांच्या सादृश्यानें दीर्घकाल राहून पुढील पदार्थांच्या सादृश्यास प्राप्त होतात कीं अल्प अल्प काल राहून' असा संशय, 'त्याविषयीं शास्त्रप्रामाण्याच्या अभावीं कांहीं नियम नाहीं' असा पर्वपक्ष ७१–७२; '**नातिचिरेण०**' या सूत्रानें 'अल्प अल्प काल आकाशादिभावानें राहून वृष्टीच्या धारांबरोबर भूमीवर येतात, कारण 'अतो वै खलु०' या श्रुतींत व्रीह्यादिभाव-

प्राप्तीनंतर त्यापासून सुटणें फार कष्टकर आहे, असा विशेष सांगितला आहे, इत्यादि सप्रमाण सिद्धान्त ७३–७४.

—६ **अन्याधिष्ठिताधिकरण**–[७४-८६] 'त इह व्रीहियवाः' इत्यादि 'अनुशयी येथें व्रीहि-यवादि होतात' असें सांगणारी श्रुति हा याचा विषय, 'स्थावर जातीस प्राप्त झालेले अनुशयी स्थावरसुखदुःखभाक् होतात कीं, दुसऱ्या क्षेत्रज्ञानें अधिष्ठित असलेल्या स्थावर शरीरांत केवल संश्लेषास प्राप्त होतात' असा संशय ७४; 'स्थावर-जातीस प्राप्त झालेले ते अनुशयी त्यांच्या सुख-दुःखास प्राप्त होतात. कारण श्रुतींतील 'जायन्ते' या पदाच्या मुख्यार्थत्वाची उपपत्ति लागते. इष्टादिकर्मांचाहि पशुहिंसादि-संबंधामुळें अनिष्ट फलसंबंध संभवतो, यास्तव श्वादिजन्माप्रमाणें अनुशयींचा व्रीह्यादि-जन्महि मुख्यच आहे' असा पूर्वपक्ष ७५-७६; **'अन्याधिष्ठितेषु०'** या सूत्रानें व्रीह्या-दिकांमध्यें अनुशयींचा वायु-धूमादिभावाप्रमाणें नुस्ता संसर्ग होतो. ते स्थावरसुख-दुःखास पात्र होत नाहींत, असा सप्रमाण व सोपपत्तिक सिद्धान्त ७७-८०; **'अशुद्धं०'** इत्यादि सूत्रानें 'ज्योतिष्टोमादि कर्म पशुहिंसादि-संबंधामुळें अशुद्ध आहे, त्यामुळें अनुशयींचे व्रीह्यादि जन्म मुख्यच आहेत' या शंकेचा अनुवाद करून 'शास्त्रहेतुत्वा-मुळें यज्ञीय कर्म अशुद्ध नाहीं' असें सप्रमाण व सोपपत्तिक समाधान ८१-८४; **'रेतः-सिग्योगोऽथ'** या सूत्रानें व्रीह्यादिभावप्राप्तीनंतर अनुशयी जीवांचा रेतःसिग्योग ८४; **'योनेः०'** या सूत्रानें त्यानंतर योनीपासून शरीर, अशा सिद्धान्ताचा उपसंहार ८५-८६.

## अध्याय ३ रा. पाद २ रा. पृ. ८७-२१९.

—१ **संध्याधिकरण**–[८७-१०८] गतपादार्थांचा अनुवाद व उत्तर पादाचा संग्र-हार्थ, 'न तत्र रथाः' इत्यादि वाक्य हा याचा विषय, 'जागरिताप्रमाणें स्वप्नांतहि सृष्टि पारमार्थिकी आहे कीं मायामयी' असा संशय, 'संध्य म्हणजे स्वप्नस्थान, त्यांतील सृष्टि तथ्यरूपच–सत्यच आहे. कारण प्रमाणभूत श्रुतीच तसें सांगते' असा **'संध्ये०'** इत्यादि सूत्रानें पूर्वपक्ष ८८–८९; **'निर्मातारं०'** या सूत्रानें पूर्वपक्षाविषयींच सप्रमाण उपपत्ति ९०-९२; **'मायामात्रं०'** या सूत्रानें स्वप्नसृष्टि मायामात्र आहे, कारण ती योग्य देश, काल व अबाध या परमार्थवस्तूच्या धर्मांनीं रहित आहे, असा सप्रमाण सोपपत्तिक सिद्धान्त ९३--९७; त्यावर 'शुभाशुभफलत्वाचा अन्वय-व्यतिरेक व शास्त्र यांच्याशीं विरोध येतो,' अशी शंका घेऊन **'सूचकश्च०'** या सूत्रानें 'स्वप्नांतील प्रत्यय सत्य पदार्थांचा सूचक आहे, कारण श्रुतीवरून तसें अवगत होतें, स्वप्नाध्यायवेत्तेहि तसें सांगतात' इत्यादि सविस्तर समाधान ९८-१०३; 'जीवसंकल्पच स्वप्नाचें निमित्त आहे. त्यामुळें योग्य निमित्ताच्या अभावीं स्वप्न मिथ्या आहे, अशी शंका व **'परा-**

**भिध्यानात्तु०**' या सूत्रानें जीवेश्वरांना अंशांशित्व असलें तरी अविद्यादि दोषामुळें जीवाचें ऐश्वर्य गुप्त झालें आहे, परमात्म्याच्या ध्यानादि-उपायांनीं प्रयत्न करणाऱ्या जीवाचें तें व्यक्त होतें, त्यामुळें ईश्वराच्या निमित्तानेंच जीवाचे बंध-मोक्ष होतात असें समाधान १०३-१०५; '**देहयोगात्०**' या सूत्रानें 'जीवाच्या ऐश्वर्याचा तिरोभावहि देहात्मत्वा-भिमानामुळें होतो!' असें दृष्टान्त व शंकासमाधान-पूर्वक प्रतिपादन १०६-१०८.

—२ **तदभावाधिकरण**–[ १०९-१२४ ] सुषुप्तिस्थानविषय श्रुति हा याचा विषय १०९-११०; 'नाड्या, पुरितत् व ब्रह्म हीं परस्पर निरपेक्ष भिन्न सुषुप्तिस्थानें आहेत कीं, तीं परस्परांच्या अपेक्षेनें एक सुषुप्तिस्थान आहे' असा संशय, 'एकार्थ-त्वामुळें तीं भिन्न सुषुप्तिस्थानें आहेत,' असा सोपपत्तिक शंकासमाधानपूर्वक पूर्वपक्ष १११-१२; '**तदभावः०**' इत्यादि सूत्रव्याख्यानानें सुषुप्त त्या तीन स्थानांमध्यें व मुख्यतः आत्म्यामध्यें होतें, असा समुच्चयपक्षानें सप्रमाण, सोपपत्तिक सिद्धान्त ११३-२३; '**अतःप्रबोधः०**' या सूत्रानें ज्याअर्थीं आत्माच मुख्य सुषुप्तस्थान त्याअर्थीं त्याच्यापासूनच आत्म्याचा प्रबोध स्वापप्रकरणांत उक्त आहे असें व्याख्यान १२४.

—३ **कर्मानुस्मृतिशब्दविध्यधिकरण**–[ १२५-१३१ ] 'जागा होणारा जीव' हा विषय, 'पूर्वी सत्संपन्न झालेला तोच जागा होतो कीं, दुसरा कोणी' असा संशय, 'जलराशींत टाकलेला जलबिंदु जलरूप झाला असतां, पुनः जसा त्याचाच उद्धार करितां येत नाहीं, त्याप्रमाणें परमात्म्याशीं एकरूप झालेला जीव तोच पुनः जागा होतो, असा नियम करितां येत नाहीं, म्हणून तोच किंवा ईश्वर किंवा दुसरा जीव होतो' असा पूर्वपक्ष १२५; '**सः एव०**' या सूत्राच्या व्याख्यानानें पूर्व दिवशीं केलेल्या कर्मांचा अवशेष दुसऱ्या दिवशीं संपविणें, प्रत्यभिज्ञा, स्मरण, शब्दप्रमाण आणि कर्म व उपासना यांचे विधि, इत्यादि कारणांनीं पूर्वी संसपन्न झालेला जीवच जागा होतो, असा सिद्धान्त, अन्यजीवोत्थानपक्षीं दोषप्रदर्शन, पूर्वपक्षाच्या बीजाचें निरसन व दृष्टान्ताचें वैषम्य १२६-३१.

—४ **मुग्धेऽर्धसंपत्त्यधिकरण**–[ १३१-१३९ ] 'मूर्च्छावस्था' हा विषय, 'ती जागरितादि चार अवस्थांमध्यें अंतर्भूत होते कीं नाहीं' असा संशय, 'पांचव्या अव-स्थेच्या अप्रसिद्धीमुळें ती प्रसिद्ध चार अवस्थांतच अंतर्भूत होते' असा पूर्वपक्ष १३१-३२; '**मुग्धे०**' या सूत्रानें मुग्ध जागरितादि प्रसिद्ध अवस्थांमध्यें अंतर्भूत होत नाहीं. म्हणून मूर्च्छावस्था ही अर्धसंपत्ति आहे. भानशून्यतेमुळें मूर्च्छित पुरुष संपन्न झालेला, पण सुषुप्ताहून त्याला वैलक्षण्य असल्यामुळें तो असंपन्न, असा सिद्धान्त, मूर्च्छा ही अवस्था कादाचित्की आहे, त्यामुळें ती प्रसिद्ध जरी नसली तरी वृद्ध व

वैद्यशास्त्र यांमध्यें ती प्रसिद्ध आहे. अर्धसंपत्तित्वामुळेंच ती पांचवी अवस्था म्हणून गणली जात नाहीं, याप्रमाणें चार अधिकरणांनीं त्वंपदार्थाचें शोधन झालें १३३-१३९.

—५ **उभयलिंगाधिकरण**–[ १४०-१७५ ] तत्पदार्थशोधन–सविशेष व निर्विशेष ब्रह्मप्रतिपादक श्रुति हा याचा विषय, त्या उभयविध श्रुतींचा उल्लेख १४०; ‘ त्यामध्यें ब्रह्म उभयलिंग आहे, असें समजावें कीं अन्यतरलिंग समजावें, अन्यतरलिंगपक्षींहि सविशेष कीं निर्विशेष ? ’ असा संशय, ‘ उभयलिंगश्रुतीला व्यर्थत्व प्राप्त होऊं नये म्हणून ब्रह्म उभयस्वरूप आहे ’ असा पूर्वपक्ष १४१; ‘ब्रह्माचें स्वभावतःच उभयलिंगत्व उपपन्न होत नाहीं, उपाधितःहि त्याला उभयरूपत्व नाहीं, ’ असा ‘ **न स्थानतः०** ’ या सूत्रानें सिद्धान्त १४२-४३; ‘ **न भेदात्०** ’ या सूत्रानें ‘ पण प्रत्येक उपासनेंत ब्रह्माचा आकारभेद वर्णिलेला आहे, त्यामुळें तें निर्विशेषच नाहीं,’ असा आक्षेप व प्रत्येक उपाधींत त्याचें अभेदवचन आहे असें सप्रमाण समाधान. १४४-४५; ‘ **अपि च०** ’ या सूत्रानें श्रुतींत भेददर्शनाच्या निंदेनें अभेदकथन केलेलें असल्यामुळेंहि भेद तात्त्विक नाहीं, असें प्रतिपादन, ‘ पण साकार व निराकार ब्रह्माचें प्रतिपादन करणाऱ्या श्रुति असल्यामुळें ब्रह्म एक निराकारच आहे असा निश्चय करतां येत नाहीं ’ अशी शंका व ‘ **अरूपवदेव०**’ या सूत्रानें ‘ अस्थूलं० ’ इत्यादि निषेधशास्त्राला निर्गुणब्रह्मप्रधानत्वच आहे, असा सप्रमाण निर्णय १४६-४८; ‘ **प्रकाशवत्०** ’ या सूत्रानें साकार ब्रह्मविषयश्रुतींची सदृष्टान्त गति १४९-५०; ‘ **आह च०** ’ या सूत्रानें श्रुतींत चैतन्यमात्र स्वयंज्योति निर्विशेष ब्रह्मच सांगितलें आहे. ‘ **दर्शयति च०** ’ या सूत्रानें श्रुति-स्मृतींत पररूप प्रतिषेधानेंच ब्रह्माचें प्रतिपादन केलें आहे, असें सप्रमाण सांगतात १५१-१५३; विशिष्टदृष्टान्ताचें कथनहि ब्रह्माचें निर्विशेषत्व सुचवितें असें ‘ **अत एव०** ’ इत्यादि सूत्रानें कथन ‘**अंबुवत्०**’ या सूत्रानें पूर्वोक्त श्रौत-स्मार्त दृष्टान्तावर आक्षेप, ‘ **वृद्धि-ह्रास०** ’ इत्यादि सूत्रानें दृष्टान्ताची युक्तता १५४-५६; ‘ **दर्शनाच्च०** ’ या सूत्रानें वाद्याच्या अनुमानांतील आगमविरोध हा दुसरा दोष १५७; कित्येक या अधिकरणाचीं दोन अधिकरणें कल्पितात, त्याचें सविस्तर परीक्षण व या सर्व सूत्रांचें मिळून एकच अधिकरण करण्याविषयीं सप्रमाण उपपत्ति १५८-७५.

—६ **प्रकृतैतावत्त्वाधिकरण**–[ १७५–१९७ ] ‘ अथात आदेशः ’ इत्यादि श्रुति हा याचा विषय, त्यांतील ‘ नेति नेति ’ या प्रतिषेधाचा विषय काय, ‘ त्या निषेधानें मूर्त व अमूर्त या दोन रूपांचा व रूपवान् ब्रह्माचा निषेध केला जातो कीं त्यांतील कोणत्यातरी एकाचा निषेध केला जातो आणि एकतरपक्षींहि प्रतिषेधाचा विषय

ब्रह्म आहे कीं दोन रूपें, ' असा संशय १७६–७७; ' हे दोन प्रतिषेध आहेत. कारण दोनदा ' **न** ' अशा शब्दाचा प्रयोग केला आहे, त्यांतील एकानें ब्रह्माच्या सप्रपंच रूपाचा व दुसऱ्यानें रूपवान् ब्रह्माचा निषेध केला आहे, असें वाटतें. अथवा रूपवान् ब्रह्माचाच तो निषेध आहे, प्रत्यक्ष प्रतीत होणाऱ्या रूपप्रपंचाचा तो प्रतिषेध संभवत नाहीं, अभ्यास आदरार्थ आहे ' असा पूर्वपक्ष १७८; रूपवत् ब्रह्म व सप्रपंच रूप या दोहोंचा प्रतिषेध संभवत नाहीं, याविषयीं सविस्तर उपपत्ति १७९–८०; ब्रह्माचा प्रतिषेधहि संभवत नाहीं, ब्रह्माचें वाङ्मनसातीतत्वहि अभावाच्य अभिप्रायानें नाहीं, याविषयीं उपपत्ति, याच अर्थी ' **प्रकृतैतावत्त्वं०**' इत्यादि सूत्राला प्रवृत्त करून त्याची योजना करितात १८१-८२; ' नेति नेति ' हें वाक्य मूर्त व अमूर्त रूपद्वयाचा निषेध करितें आणि त्याचें आधिष्ठान जें ब्रह्म त्याच्या स्वरूपाचें निवेदन करितें १८३-८४;शास्त्र रूपद्वयाचें प्रतिपाद्यत्वानें वर्णन करीत नाहीं, त्यामुळें ' पंक-प्रक्षालन-'दोष येत नाहीं १८५; दोन निषेध दोन मूर्तामूर्तरूपांचा निषेध करितात किंवा एक ' नेति-' शब्द भूतराशीचा निषेध करितो व दुसरा वासनाराशीचा १८६; प्रतिषेध केल्यावर पुन: ब्रह्माचें अस्तित्व प्रतिपादिलेलें असल्यामुळेंहि हाच निर्णय आहे १८७; '**तदव्यक्तं०**' या सूत्रानें ब्रह्माचें सप्रमाण अव्यक्तत्व १८८–८९; योगी ध्यानसमयीं त्याला पाहतात याविषयीं श्रुति-स्मृतिप्रमाण, १९०-९१; ध्याता व ध्येय या भानामुळें जीवेश्वरांच्या भेदाची शंका ' **प्रकाशवत्०** ' इत्यादि सूत्रानें तिचें सदृष्टान्त समाधान १९२; ' **अतोऽनन्तेन०**' या सूत्रानें जीवेश्वरांचें वास्तविक ऐक्य व औपाधिक नानात्व आहे, असें प्रतिपादन, ' **उभयव्यपदेशात्०** ' सूत्रानें भेदाभेदवादाचें उत्थापन, ' अहिकुण्डलवत् '– अहिकुंडलाप्रमाणें तत्त्वव्यवस्था १९३-९४; ' **प्रकाशाश्रयवत्०** ' या सूत्रानें जीव ईश्वरैकदेशभूत आहे असें प्रकारान्तर, ' **पूर्ववद्वा०** ' या सूत्रानें भेद काल्पनिक व अभेद वास्तविक असा सिद्धान्त १९५-९६; '**प्रतिषेधाच्च०**' या सूत्रानें शास्त्रप्रामाण्यामुळें ब्रह्म अद्वितीय आहे, या सिद्धान्ताचें दृढीकरण १९७.

—७ **पराधिकरण**–[ १९७–२११ ] ' निर्विशेष ब्रह्म' हा याचा विषय, 'याहून पृथक् तत्त्व आहे कीं नाहीं ' असा श्रुतिविप्रतिपत्तीमुळें संशय, ' **परमत:०** ' या सूत्रानें सेतु, उन्मान, संबंध व भेद यांच्या व्यपदेशामुळें ब्रह्माहून भिन्न वस्तु आहे, असा सप्रमाण पूर्वपक्ष १९७–२०१; ' **सामान्यात्तु०** ' या सूत्रानें ब्रह्माहून भिन्न वस्तु नाहीं, असा सिद्धान्त, ब्रह्मामध्यें जगन्मर्यादेचें विधारकत्व हें प्रसिद्ध सेतूचें साम्य आहे, म्हणून सेतुव्यपदेशामुळें तद्भिन्न वस्तूची असिद्धि २०२–२०४; ' **बुद्ध्यर्थ:०** ' या सूत्रानें उपासनेसाठीं उन्मानव्यपदेश किंवा नाण्याच्या पादाप्रमाणें व्यवहार-

प्राचुर्यासाठीं ब्रह्माच्या उन्मानाची कल्पना २०५-६; '**स्थानविशेषात्०**' या सूत्रानें 'स्थानविशेषसंबंधामुळें संबंधभेदव्यपदेश प्रकाशादिकांप्रमाणें संभवतो' असें सांगून पूर्ववाद्याच्या संबंधभेदव्यपदेशाचें निरसन २०६-७; '**उपपत्तेश्च**' या सूत्रानें त्याविषयीं उपपत्ति २०८; '**तथा०**' इत्यादि सूत्रानें श्रुतीनें आत्मभिन्न वस्तूचा प्रतिषेध केलेला असल्यामुळेंहि त्याचें सप्रमाण अद्वितीयत्व २०९; '**अनेन०**' या सूत्रानें ब्रह्माचें सर्वगतत्व व सर्वात्मत्व २१०-११.

—८ **फलाधिकरण**–[ २११-१९ ] अधिकरणतात्पर्य, 'संसारविषय कर्मफल' हा विषय, 'तें कर्मापासूनच मिळतें कीं ईश्वरापासून' असा संशय, तें ईश्वरापासूनच प्राप्त होणें युक्त आहे, असा '**फलमत:०**' या सूत्रानें सिद्धान्त २११-१२; त्यावर, 'पुण्यादि संस्कारांपासूनच फलोत्पत्ति' अशी शंका व 'ईश्वरापासूनच फल मिळतें याविषयीं युक्तिकथनपूर्वक समाधान २१३-१४; '**श्रुतत्वाच्च०**' या सूत्रानें ईश्वरच फलदाता आहे, याविषयीं श्रुतिप्रमाण २१५; '**धर्मं जैमिनि:०**' या सूत्रानें धर्मच फलदाता असा सप्रमाण व सोपपत्तिक पूर्वपक्ष २१६-१७; '**पूर्वं तु०**' या सूत्रानें धर्माधर्मांचाहि प्रेरक या रूपानें ईश्वरच फलहेतु, असा श्रुति-स्मृतिप्रमाणांनीं सिद्धान्त २१८-१९.

## अध्याय ३ रा. पाद ३ रा. पृ. २२०–४९५.

—१ **सर्ववेदान्तप्रत्ययाधिकरण**–[ २२०-२४० ] पूर्वोत्तरपादांची संगति, सर्व वेदान्तांतील उपासनें हा विषय, 'तीं प्रतिवेदान्तांत भेद पावतात कीं नाहींत' असा संशय, पण हा विचार संभवत नाहीं, असा आक्षेप, त्याचेंच उपपादन, ब्रह्मविषय व प्राणादिविषय उपासना विचारार्ह आहेत, असें समाधान २२०-२३; 'प्रत्येक वेदान्तांत विद्याभेद' असा पूर्वपक्ष, नाम-रूपादि पूर्वपक्षाचे हेतु, त्यांचें सविस्तर प्रतिपादन २२४-२८; '**सर्ववेदान्त०**' या सूत्राच्या व्याख्यानानें सर्व वेदान्तांतील उपासनांना ऐक्य आहे, असा सप्रमाण व सदृष्टान्त सिद्धान्त २२९-३१; '**भेदात्०**' या सूत्रानें पूर्वतंत्रोक्त न्यायाहून या न्यायांतील विशेषाची आशंका व तिचें सोदाहरण समाधान, येथें रूपभेदाच्या भेदकत्वाचें निरसन केलें आहे २३२-३६; '**स्वाध्यायस्य०**' या सूत्रानें विद्यांच्या धर्मभेदाच्या भेदकत्वाचें सदृष्टान्त निरसन २३७-३८; '**दर्शयति०**'या सूत्रानें वेद्य निर्गुण ब्रह्माला सर्ववेदान्तांत एकत्व,म्हणून विद्येलाहि सर्वत्र एकत्व २३९-४०.

—२ **उपसंहाराधिकरण**–[ २४०-४३ ] '**उपसंहार:०**' या सूत्रानें गुणीनें आकर्षण केलेल्या गुणांचा त्या त्या विद्येंत उपसंहार, हें पूर्वविचाराचें फल, 'समानज्ञानबद्धगुण' हा याचा विषय, 'ते जसे जेथें श्रुत आहेत, तसेच तेथें व्यवस्थित आहेत कीं प्रत्यभिज्ञेनें ज्ञानोपाधींत त्यांचा उपसंहार होतो' असा संशय, 'ते जेथल्या

तेथें व्यवस्थित आहेत ' असा ' पूर्वपक्ष व विधिशेषाप्रमाणें अर्थाच्या अभेदामुळें त्याचा उपसंहार होतो ' असा सिद्धान्त २४१-४३.

— ३ **अन्यथात्वाधिकरण**–[ २४३-५६ ] उद्गीथब्राह्मण व उद्गीथ अध्याय हा विषय, त्यांचा उपन्यास, 'त्यांत विद्याभेद आहे किंवा विद्यैक्य आहे' असा संशय, पूर्वन्यायानें त्यांत विद्यैक्य आहे असा पूर्वपक्ष २४३-४४; प्रक्रमभेदामुळे त्यांत विद्यैक्य अयुक्त असा '**अन्यथा०**' इत्यादि सूत्रव्याख्यानानें त्यावर आक्षेप, पण तेवढ्यानें विद्यैक्याची निवृत्ति होत नाहीं, असें वादिकृत समाधान २४५-४६; '**न वा०**' या सूत्रानें परोवरीयस्त्वादिकांप्रमाणें प्रकरणभेदामुळें प्रस्तुत विद्यांचें ऐक्य नाहीं, असा सप्रमाण, सदृष्टान्त व सोपपत्तिक सिद्धान्त २४७-५४; '**संज्ञातः०**' या सूत्रानें ' उद्गीथविद्या ' या संज्ञैक्यामुळें विद्यैक्य, या पूर्वपक्ष बीजाला उत्थापित करून पूर्वोक्त समाधानाचेंच दृढीकरण २५४-५६.

—४ **व्याप्त्यधिकरण**–[ २५६-६४ ] 'ओं' व 'उद्गीथ' यांचें सामानाधिकरण्य, हा विषय, अध्यासादि चार पक्ष येथें प्रतीत होत असल्यामुळें त्यांतील कोणता पक्ष स्वीकारावा असा संशय, त्यांतील अध्यासपक्षाचें व्युत्पादन २५६; अपवादपक्षाचें व्युत्पादन, एकत्व व विशेषणपक्षाला उत्थापित करून त्यांचें स्पष्टीकरण, या चार पक्षांतील कोणता पक्ष घ्यावा याचा अनिश्चय हा पूर्वपक्ष २५७-५८; '**व्याप्तेश्च०**' या सूत्रानें पहिल्या तीन पक्षांचें सदोषत्वानें निरसन करून विशेषणपक्षच निर्दोष असा सिद्धान्त २५८-६४.

—५ **सर्वाभेदाधिकरण**–[ २६४-२७० ] ' श्रेष्ठादि गुणविशिष्ट प्राण ' हा विषय सांगण्यासाठीं श्रुतींचा निर्देश २६४-६५; ' कांहीं श्रुतींत प्राणाचें श्रैष्ठ्य सांगितलें आहे पण वसिष्ठत्वादि गुण उक्त नाहींत, त्यांचा प्राणोपासनेंत उपसंहार करावा कीं करूं नये ' असा संशय, 'एवं'-शब्दप्रयोगामुळें त्यांचा उपसंहार करूं नये, असा पूर्वपक्ष २६६; '**सर्वाभेदात्०**' या सूत्राच्या व्याख्यानानें त्या क्वचित् उक्त गुणांचाहि सर्वत्र प्राणविज्ञानाचा अभेद असल्यामुळें उपसंहार करावा, असा सिद्धान्त २६८; पूर्वपक्ष-बीजाचें अनुवादपूर्वक निरसन २६८; अनुमानानें शाखान्तरीय गुणांचा उपसंहार, त्यानें श्रुतहान्यादि दोषहि येत नाहीं, गुणीच्या अभेदामुळें एकत्र श्रुत असलेले गुण सर्वत्र प्राप्त होतात, इत्यादि सदृष्टान्त प्रतिपादन २६९-७०.

—६ **आनंदाद्यधिकरण**–[ २७०-७६ ] ' ब्रह्माचे आनंदत्वादिगुण' हा विषय, 'ते जेथें जितके श्रुत आहेत तितकेच तेथें घ्यावे कीं सर्व सर्वत्र उपसंहर्तव्य आहेत ' असा संशय, 'त्यांचा यथाश्रुतिविभाग जाणावा' असा पूर्वपक्ष, '**आनंदादयः०**' या सूत्रानें

वेद्य ब्रह्माच्या अभेदामुळें वस्तुस्वरूपज्ञानप्रकरणांत त्याच्या आनंदादि धर्मांचा उपसंहार, असा सिद्धान्त २७०-७२; पण **'प्रियशिरस्त्वादि०'** या सूत्रानें 'तैत्तिरीयोक्त प्रियशिरस्त्वादिकांचा उपसंहार होत नाहीं, कारण भेद असला तरच त्यांचा उपचय व अपचय संभवतो' इत्यादि प्रतिपादन २७३; त्याविषयींच आणखी सदृष्टान्त कारण २७४-७५; **'इतरे तु०'** या सूत्रानें आनंदादिकांचा विधीच्या अधीन असलेल्या सत्यकामत्वादि धर्मांहून विशेष, त्यामुळें त्यांना उपसंहर्तव्यत्व २७६.

—७ **आध्यानाधिकरण**—[ २७६-२८२ ] 'इंद्रियेभ्यः पराः ह्यर्थाः०' इत्यादि वाक्य हा विषय, 'त्यांतील अर्थादिक हे त्या-त्याहूनहि परत्वानें प्रतिपाद्य आहेत कीं पुरुष त्या सर्वांहून परत्वानें प्रतिपाद्य आहे' असा संशय, 'त्यांतील अर्थादि सर्वांचेंच परत्वानें प्रतिपादन' असा सकारण पूर्वपक्ष २७६-७७; **'आध्यानाय०'** या सूत्रानें 'अर्थादि इतरांच्या परत्वज्ञानाचें प्रयोजन कांहीं नाहीं. म्हणून पुरुषच त्या सर्वांहून पर प्रतिपादिला जातो, येथें आध्यानपूर्वक सम्यग्दर्शनासाठींच ही पूर्वापरप्रवहोक्ति आहे' असा सिद्धान्त २७८-७९; **'आत्मशब्दाच्च'** या सूत्रानें 'येथें पुरुषालाच सर्वांहून परत्वानें प्रतिपाद्यत्व आहे,' याविषयीं हेत्वन्तर २८०-८२.

—८ **आत्मगृहीत्यधिकरण**—[ २८२-२९७ ] 'आत्मा वै०' हें ऐतरेयवाक्य हा विषय, 'त्यांत आत्मशब्दानें पर आत्माच उक्त आहे कीं दुसरा कोणी' असा संशय, 'वाक्यान्वयामुळें येथील आत्म-शब्दाचा वाच्य परमात्मा नव्हे' असा पूर्वपक्ष, त्याचेंच आक्षेपपूर्वक सविस्तर उपपादन व कोणी विशेषवानच आत्मा येथें प्रतिपाद्य आहे, असें पूर्वपक्षाचें दृढीकरण २८३-८६; **'आत्मगृहीतिः०'** या सूत्रानें इतर सृष्टिवाक्यांप्रमाणें येथीलहि 'आत्म-'शब्द मुख्य परमात्मपर आहे, असा वाद्याच्या उपपत्तीचें सप्रमाण व सोपपत्तिक निरसन करून सिद्धान्त २८७; **'वाक्यान्वयात्०'** या सूत्रानें पूर्वपक्षाच्या बीजाचा अनुवाद करून त्याचें निरसन, लोकसृष्टिवचनाची योजना, व्यापारविशेषाची विवक्षितार्थाच्या आनुकूल्यानें व्यवस्था, वाक्याच्या पौर्वापर्य-पर्यालोचनानेंहि त्याचें ब्रह्मपरत्व २८८-९१; सूत्राची दुसरी योजना 'कतम आत्मा' व 'सदेव सोम्य' हीं वाक्यें हा विषय, 'हे दोन आम्नाय तुल्यार्थ आहेत कीं अतुल्यार्थ' असा संशय, 'आम्नानवैषम्यामुळें त्यांना अतुल्यार्थत्व आहे' असा पूर्वपक्ष, 'अतुल्यार्थत्वामुळें विद्याभेद' या पूर्वपक्षाचा अनुवाद करून **'आत्मगृहीतिः०'** या सूत्रानें 'दोन्ही ठिकाणीं आत्मग्रहण' असा सोपपत्तिक, सप्रमाण, सिद्धान्त २९१-९७.

—९ **कार्याख्यानाधिकरण**—[२९७-३०६] विषय प्रदर्शित करण्यासाठीं तीन आम्नानांचा उल्लेख २९७-९८; 'आचमन व प्राणाचें अनग्नताचिंतन' हा विषय, 'तीं दोन्हीं विहित आहेत कीं त्यांतील कांहींतरी एकच' असा संशय 'दोन्हींचें विधान किंवा एका आचमनाचेंच विधान' असा सकारण पूर्वपक्ष २९९; '**कार्याख्यानात्०**' या सूत्राच्या व्याख्यानानें 'स्मृतिप्रामाण्यानें कर्तव्यत्वानें प्राप्त झालेल्या आचमनाचा केवल अनुवाद, त्यामुळें तें विधेय नाहीं, वाक्यभेद होत असल्यामुळें तीं दोन्हीं अविधेय, त्यामुळें अपूर्व अनग्नताचिंतनच विधेय' असा सोपपत्तिक सिद्धान्त ३००-२; अनग्नतावाद आचमनाच्या स्तुत्यर्थ नाहीं, सर्वान्नाभ्यवहार विधेय आहे, असें म्हणतां येणें शक्य नाहीं, विधिशब्दाच्या अभावींहि आचमन विधेय नाहीं, इत्यादि उपपत्ति ३०२-६.

—१० **समानाधिकरण**–[ ३०६-३११ ] 'शाण्डिल्यविद्या' हा याचा विषय, दोन शाखांतील तद्विषय वाक्यांचा उल्लेख, 'दोन्ही ठिकाणीं ती एकच विद्या आहे व त्यांचा परस्पर गुणोपसंहार होतो कीं, त्या दोन्ही भिन्न विद्या आहेत व त्यांचा परस्पर उपसंहार होत नाहीं' असा संशय, 'विद्याभेद आहे व परस्परगुणोपसंहार होत नाहीं' असा सकारण पूर्वपक्ष ३०७ -३०९; '**समाने०**' इत्यादि सूत्रानें 'त्या दोन्ही विद्यांचें ऐक्य व परस्परगुणोपसंहार होतो, असा पूर्वपक्ष हेतूंच्या निरसनपूर्वक सिद्धान्त ३१०-११.

—११ **संबंधाधिकरण**—[३१२-३१८] 'सत्यविद्या' हा याचा विषय, त्याविषयीं श्रुतिवाक्य ३१२; 'त्यांतील विषयभूत दोन नांवें दोन्हीं स्थानीं अविभागानें चिंतनीय आहेत कीं त्यांतील एक आधिदैव व दुसरें आध्यात्म अशीं विभागानें तीं चिंतनीय आहेत' असा संशय, '**संबंधात्०**' या सूत्रानें पूर्वोक्त न्यायानें त्याचा परस्पर उपसंहार होतो, असा सोपपत्तिक पूर्वपक्ष ३१३-१४; '**न वा०**' या सूत्रानें उपासनस्थानविशेषसंबंधामुळें दोन्ही ठिकाणीं त्या दोन नांवांचा उपसंहार होत नाहीं असा पूर्वपक्षनिरसनपूर्वक सिद्धान्त ३१५-१६; '**दर्शयति च**' या सूत्रानें त्या विषयींच हेत्वंतर ३१७.

—१२ **संभृत्यधिकरण**—[३१८-३२२] राणायनीयांच्या खिलांतील व उपनिषदांतील संभृत्यादि ब्रह्मविभूति व ब्रह्मविद्या हा याचा विषय, 'त्यांतील ब्रह्मविद्यांमध्यें ब्रह्मविभूतींचा उपसंहार करावा कीं नाहीं' असा संशय, 'ब्रह्मसंबंधामुळें उपसंहार करावा' असा पूर्वपक्ष, 'संभृत्यादिविभूतींचा शाण्डिल्यविद्यादिकांमध्यें आयतनविशेषयोगामुळेंच उपसंहार होत नाहीं' असा सोदाहरण सिद्धान्त ३१८-२०; 'आध्यात्मिकविद्यांमध्येंहि संभृत्यादि आधिदैविक गुणांचा उपसंहार होईल' अशी शंका व समाधान ३२१-२२.

—१३ **पुरुषविद्याधिकरण**–[ ३२२–२८ ] छान्दोग्य व तैत्तिरीय यांतील पुरुष-विद्या हा विषय, त्यांचें उदाहरण, 'इतरत्र सांगितलेले पुरुषयज्ञाचे धर्म तैत्तिरीयकांत उपसंहर्तव्य आहेत कीं नाहींत ' असा संशय, ' दोन्ही ठिकाणीं पुरुषयज्ञत्वसाम्य असल्यामुळें त्यांचा उपसंहार होतो, ' असा पूर्वपक्ष ३२२–२३; ' **पुरुषविद्यायां०** ' या सूत्रानें 'आम्नानभेदामुळें त्यांचा उपसंहार होत नाहीं ' असा सप्रमाण सोपपत्तिक आक्षेपनिरसनपूर्वक सिद्धान्त ३२४–२८.

—१४ **वेधाद्यधिकरण**–[ ३२८–४१ ] अनेक उपनिषदांतील उपक्रमस्थ अनेक मंत्रांचा व कर्मांचा विषयत्वानें उल्लेख ३२८-२९; प्रविध्यादि मंत्र व प्रवर्ग्यादि कर्में यांचा विद्यांमध्यें उपसंहार होतो कीं नाहीं असा संशय, 'विद्याप्रधान उपनिषद्ग्रंथांच्या समीप पाठ असल्यामुळें विद्यांमध्यें त्यांचा उपसंहार होतो ' असा आक्षेपनिरसनपूर्वक पूर्वपक्ष ३३०–३३; ' **वेधादि०** ' या सूत्राच्या व्याख्यानानें 'पूर्वपक्षोक्त हेतुनिरसन-पूर्वक व सोपपत्तिक त्यांचा उपसंहार होत नाहीं ' असा सिद्धान्त ३३४–३६; लिंगादि-कांनीं संनिधीचा बाध होतो याचें 'श्रुतिलिंगवाक्य०' या पूर्वमीमांसोक्त सूत्रव्याख्या-नानें प्रतिपादन ३३६–३८; प्रवर्ग्यादि कर्मांच्या विद्याशेषत्वाचें निरसन, त्याविषयीं बृहस्पतिसवाचें उदाहरण ३३९–४१.

—१५ **हान्यधिकरण**–[ ३४१–५६ ] निरनिराळ्या शाखांतील विद्वानाच्या पुण्यपापत्यागादिकांचें प्रतिपादन करणाऱ्या वाक्यांचा विषयत्वानें उल्लेख ३४१–४२;'जेथें पुण्यपापांचें हानच श्रुत आहे, उपायन श्रुत नाहीं, तेथें उपायन प्राप्त होतें कीं नाहीं ' असा संशय, ' अश्रवणामुळें त्याची प्राप्ति होत नाहीं ' असा सोपपत्तिक पूर्वपक्ष ३४३–४४; ' **हानौ०** ' इत्यादि सूत्राच्या व्याख्यानानें ' जेथें केवल हान श्रुत असेल तेथें उपायनाचा उपसंहार करावा त्याला हानाचें शेषत्व आहे ' असा वाद्याच्या हेतु-निरसनपूर्वक सिद्धान्त ३४५, विद्येच्या स्तुत्यर्थ त्यांचें संकीर्तन, अर्थवादासाठीं दुसऱ्या अर्थवादाच्या प्रवृत्तीचें उदाहरण, विद्यास्तुत्यर्थत्व असल्यामुळेंच एकाच्या सुकृतादि-कांचें ग्रहण दुसरा कसें करील, हा अभिनिवेश युक्त नाहीं ३४६–४८; शाखान्तरस्थ विशेष शाखान्तरींहि आश्रयणीय आहे, याविषयीं कुशा, छन्द, स्तुति, उपगान इत्यादि उपमांचें सोदाहरण स्पष्टीकरण ३४९–५०; त्याविषयीं द्वादशलक्षणींतील **'अपि तु०'** इत्यादि सूत्राचें व्याख्यान ३५१–५२; याचीच दुसरी योजना–'विधूनन-'श्रुति हा याचा विषय, ' विधूननशब्दानें सुकृत-दुष्कृतांचें हान सांगितलें जातें कीं चालन ? ' असा संशय, ' विधूनन ' म्ह० हान–त्याग नव्हे तर चालन आहे, असा सोपपत्तिक पूर्वपक्ष ३५३–५४; 'हान' या अर्थींच विधूननशब्द आहे, असा सिद्धान्त ३५५-५६.

—१६ **सांपरायाधिकरण**–[३५६–३६०] 'कौषीतकींतील अर्धमार्गांत सुकृतादि-त्यागाचा काल सांगणारें वचन' हा विषय, 'अर्धमार्गांतच त्यांचा त्याग होतो कीं देहांतून निघण्याच्या वेळीं' असा संशय, 'श्रुतिप्रमाण्यामुळें अर्धमार्गांत त्यांचा त्याग' असा पूर्वपक्ष, '**सांपराये०**' या सूत्राच्या व्याख्यानानें 'देहांतून बाहेर पडण्याच्या वेळींच पुण्य-पापत्याग, कारण विद्वानाला देहत्याग व ब्रह्मप्राप्ति यांच्या मध्यें प्राप्तव्य कांहीं नसतें. अन्य शाखाध्यायी तसें सांगतात' असा सिद्धान्त ३५६-५८; '**छंदतः०**' या सूत्रानें स्वेच्छेनें जिवंतपणींच अनुष्ठान, त्यामुळें कर्मक्षयहि त्याचवेळीं, विद्या व कर्मक्षय यांना कार्य-कारणत्व, त्यामुळें उभयश्रुतींचा अविरोध ३५९–६०.

—१७ **गतेरर्थवत्त्वाधिकरण**–[ ३६०–६४ ] पुण्यपापत्यागाच्या संनिध देवयानमार्गाचें श्रवण हा विषय, 'हानामध्यें अविशेषानेंच देवयानमार्ग प्राप्त होतो कीं कांहीं ठिकाणीं तो प्राप्त होतो व कांहीं ठिकाणीं होत नाहीं' असा संशय, 'हानामध्यें अविशेषानेंच उपायनप्राप्ति जशी होते त्याप्रमाणें देवयानमार्गाचीहि होते,' असा पूर्वपक्ष, '**गतेरर्थवत्त्वं०**' इत्यादि सूत्रानें 'गति सगुणविद्येंत अर्थवती निर्गुणविद्येंत नाहीं' असा सोपपत्तिक व सप्रमाण सिद्धान्त ३६०–६२; '**उपपन्नः०**' या सूत्रानें पर्यंकविद्यादिकांमध्यें गतीचें सप्रमाण व सोदाहरण प्रतिपादन ३६३–६४.

—१८ **अनियमाधिकरण**–[ ३६४–७० ] 'सगुणविद्यांपैकीं कांहीं विद्यांतील गतिश्रुति व कांहींतील अश्रुति' हा विषय, 'ती जेथें श्रुत आहे तेथेंच तिचा नियम आहे कीं अश्रुत स्थळींहि तिचा उपसंहार होतो' असा संशय, 'ती जेथें श्रुत आहे तेथेंच नियत आहे' असा पूर्वपक्ष, ३६४–६५; 'ब्रह्मलोकप्राप्ति' हें ज्यांचें फल आहे अशा सर्व सगुणविद्यांमध्यें त्या देवयान गतीची अविशेषानें प्राप्ति होते, असा '**अनियमः०**' या सूत्राच्या व्याख्यानानें आक्षेपनिरसनपूर्वक सिद्धान्त ३६७; त्याविषयीं श्रुतिस्मृतिप्रमाण ३६८–७०.

—१९ **यावदधिकाराधिकरण**–[ ३७०-७९ ] 'विद्वानाचा पुनर्जन्म' हा विषय, 'वर्तमानदेहपातानंतर तो होतो कीं नाहीं' असा संशय, त्यावर 'हा विचार उपपन्न होत नाहीं' अशी शंका, इतिहास-पुराणांत विद्वानाच्या देहान्तरोत्पत्तीचें दर्शन होत असल्यामुळें विचाराची उपपत्ति, त्याविषयीं श्रुतिस्मृत्यादि प्रमाणें ३७०-७१; 'निर्गुण विद्येला मोक्षहेतुत्व नाहीं' असा पूर्वपक्ष, '**यावदधिकारं०**' या सूत्राच्या व्याख्यानानें निर्गुण ब्रह्मज्ञानी असलेल्याहि विद्वानाची अधिकारसमाप्तीपर्यंत अवस्थिति होते, असा सोपपत्तिक सोदाहरण सिद्धान्त ३७२-७५; ज्ञानामुळें कर्मबीजदाह श्रुति-

स्मृतिसिद्ध, त्या श्रुतिस्मृतींचा उल्लेख, ज्ञानफलाला व्यभिचारित्व नाहीं, श्रुति सर्वांनाच ज्ञानानें मोक्ष सांगते, ज्ञानाचें फल प्रत्यक्ष आहे, इत्यादि उपपादन ३७६-७९.

—२० **अक्षरध्यधिकरण**–[ ३८०–३८४ ] 'निषेधमुखानें ब्रह्मप्रतिपादन करणारे भिन्न भिन्न वाक्यांतील अपुनरुक्त शब्द' हा विषय 'त्यांची सर्वत्र प्राप्ति होते कीं जेथल्या तेथें व्यवस्था आहे' असा संशय, 'श्रुतिविभागामुळें त्यांची व्यवस्था आहे' असा पर्वपक्ष ३८०-८१; '**अक्षरधियां०**' या सूत्रानें 'अक्षरविषय सर्वविशेषप्रतिषेधबुद्धि सर्वत्र उपसंहार्य आहेत' असा सकारण सिद्धान्त, त्याविषयीं अनुग्राहक न्याय व मीमांसेंतील औपसदांचा दृष्टान्त ३८२-८४.

—२१ **इयदधिकरण**–[ ३८५–३८९ ] 'द्वा सुपर्णा०' व 'ऋतं पिबंतौ०' हे दोन मंत्र हा विषय, त्यांतील विद्या एक आहे कीं भिन्न आहेत, असा संशय, 'विशेषदर्शनामुळें विद्यानानात्व' हा पूर्वपक्ष ३८५-८६; '**इयत्०**' या सूत्राच्या व्याख्यानानें त्यांतील विद्येला एकत्व आहे असा सोपपत्तिक सिद्धान्त ३८७-८९.

—२२ **अन्तरत्वाधिकरण**–[ ३८९–९४ ] 'यत्साक्षात् अपरोक्षात् ब्रह्म' या वाक्याचा दोनदा पाठ, हा विषय, 'त्यांत विद्यैक्य आहे कीं विद्यानानात्व आहे' असा संशय, 'अभ्याससामर्थ्यामुळें विद्यानानात्व आहे,' असा पूर्वपक्ष ३८९-९०; '**अन्तरा०**' या सूत्राच्या व्याख्यानानें 'स्वात्म्याच्या सर्वान्तरत्वकथनाचें दोन्ही ठिकाणीं साम्य असल्यामुळें विद्येला एकत्व आहे, त्याचें सर्वान्तरत्व आपेक्षिक नसून मुख्य आहे,' असा सोपपत्तिक सप्रमाण सिद्धान्त ३९१; '**अन्यथा०**' या सूत्रानें वाद्याच्या अभ्याससामर्थ्याचें सोदाहरण निरसन ३९२-३९४.

—२३ **व्यतिहाराधिकरण**–[ ३९४–९८ ] 'तद्योहं०' व 'त्वं वा अहं' हीं दोन वाक्यें हा विषय, त्यांत 'व्यतिहारानें उभयरूपमति करावी कीं एकरूप' असा सकारण पूर्वपक्ष ३९४-९५; '**व्यतिहार०**' या सूत्रानें 'ध्यानासाठीं सर्वात्मत्वादि इतर गुणांप्रमाणें हा व्यतिहार आहे, त्यामुळें समान विषयामध्यें त्यांचा उपसंहार होतो म्हणून तो ध्यानास योग्य आहे' असा सिद्धान्त ३९६-९८.

—२४ **सत्यविद्याधिकरण**–[ ३९८–४०३ ] 'आदित्यमंडलस्थ सत्य पुरुष व दाक्षिणाक्षि पुरुष' हा विषय, 'ह्या दोन सत्यविद्या आहेत कीं एकच?' असा संशय, 'ह्या दोन विद्या आहेत' असा सकारण पूर्वपक्ष ३९८-९९; '**सैव हि०**' या सूत्राच्या व्याख्यानानें 'ती एकच विद्या आहे' असा सहेतुक व आक्षेपनिरसनपूर्वक सिद्धान्त, एकविद्यात्वामुळेंच सत्यादि सर्व गुणांचा एकाप्रयोगांत उपसंहार ४००-१; परकीयांची व्याख्या व तिच्यावर दोष ४०२-३.

—२५ **कामाद्यधिकरण**–[ ४०३–७ ] सगुण-निर्गुणविद्याविषय वाक्यें, त्यांतील 'वशित्वादि व सत्यकामादि गुण' हा विषय, ' त्यांतील विद्यांना एकत्व व परस्पर गुणोपसंहार होतो कीं नाहीं ' असा संशय, 'विद्यैकत्व आहे, पण कोठें आकाशाचें ध्येयत्व व कोठें त्याच्या आश्रयाचें ज्ञेयत्व असा विशेष ' हा पूर्वपक्ष ४०३-४; ' **कामादि०** ' या सूत्राच्या व्याख्यानानें ' छान्दोग्यांतील सत्यकामत्वादि गुणजात वाजसनेयकांत व त्यांतील वशित्वादि गुणजात छान्दोग्यांत संबद्ध होतें, बहुतर साम्यदर्शनामुळें परस्पर गुणोपसंहार होतो ' असा सिद्धान्त ४०४; वाद्याच्या विशेषदर्शनाचा अनुवाद व त्याचें निरसन, ' सगुणत्व-निर्गुणत्वामुळें विद्यांचा भेद आहे, म्हणून गुणांचा परस्पर अनुपसंहार ' अशी शंका व तिचें ' हा गुणोपसंहार ब्रह्माच्या विभूतिप्रदर्शनासाठीं आहे, उपासनेसाठीं नाहीं ' असें समाधान ४०५-४०६.

—२६ **आदराधिकरण**–[ ४०७–१६ ] वैश्वानरविद्येंतील ' प्राणाग्निहोत्र ' हा याचा विषय, ' भोजनलोपपक्षीं त्याचा लोप होतो कीं नाहीं ' असा संशय, ' जाबालश्रुतीनें प्राणाग्निहोत्राविषयीं आदर दाखविला असल्यामुळें त्याचा लोप होत नाहीं ' असा ' **आदरात्०** ' या सूत्राच्या व्याख्यानानें सप्रमाण शंकानिरसनपूर्वक पूर्वपक्ष ४०७-९; गुणाचा लोप झाला असतां मुख्याचा लोप होत नाहीं, याविषयीं कौंडपायींच्या अयनाचा दृष्टान्त व त्याचें सविस्तर व्याख्यान ४१०-११; ' **उपस्थिते०** ' या सूत्रानें ' उपस्थित झालेल्या भोजन द्रव्यांतून प्राणाग्निहोत्र करण्याविषयीं विधान असल्यामुळें भोजनलोपपक्षीं त्याचाहि लोप ' असा सिद्धान्त ४१२; ' **तद्यद्भक्तं०** ' हें वाक्य ' भक्तद्रव्यैकतागुणाचें विधान करण्यासाठीं आहे ' या वाद्याच्या म्हणण्याचें निरसन, त्याविषयीं अग्निहोत्रधर्मांची येथें प्राप्ति होत नाही, अशी उपपत्ति, यासाठींच सांपादिक अग्निहोत्रांगांचें प्रदर्शन ४१३-१४; सिद्धान्तसूत्राचा उपसंहार, आदरदर्शनवचनाची व्यवस्था ४१५-१६.

—२७ **तन्निर्धारणाधिकरण**–[ ४१६–२४ ] 'कर्मांगसंबद्ध उपासनें' हा विषय, ' तीं कर्मांमध्यें पर्णमयीत्वादिकांप्रमाणें नित्य आहेत कीं गोदोहनादिकांप्रमाणें अनित्य आहेत ' असा संशय, 'क्रतुसंबंधामुळें अंगांतरांप्रमाणें तीं नित्य आहेत,' असा पूर्वपक्ष ४१६–१७; त्यांना फलान्तरश्रवणामुळें स्वातंत्र्य आहे, या सिद्धान्त्यांच्या म्हणण्याचें निरसन ४१८; ' **तन्निर्धारण०** ' या सूत्राच्या व्याख्यानानें ' श्रुति अशा प्रकारच्या उपासनांचें अनित्यत्व दाखवीत असल्यामुळें तीं कर्मांमध्यें नित्यसंबद्ध होत नाहींत,' असा सिद्धान्त ४१९; उपासनांना कर्मांगत्वाचा नियम नाहीं, याविषयीं लिंगान्तर, पृथक्-फलश्रवणामुळेंहि त्यांना कर्मांगत्व नाहीं, ' तेनोभौ कुरुतः० ' इत्यादि

श्रुतीचें तात्पर्य, विद्येचें कर्मसमृद्धीहून भिन्न फलहि श्रुत आहे, त्यामुळें तिला कर्मफलत्व नाहीं ४२०–२१; पर्णमयीत्व व गोदोहन यांची व्यवस्था ४२२; त्यांहून उद्गीथादि उपासनेचें वैषम्य ४२३-२४.

—२८ **प्रदानाधिकरण**–[४२५–३३] 'संवर्गविद्येतील वायु व प्राण' हा विषय, श्रुतींचा उल्लेख, 'ते दोघे पृथक् ध्येय आहेत कीं अपृथक्' असा संशय, 'स्वरूपाच्या अभेदामुळें ते अपृथक्च ध्येय आहेत' असा सप्रमाण व सोपपत्तिक पूर्वपक्ष४२५-२७; '**प्रदानवत्**' या सूत्रव्याख्यानानें 'ते पृथक्च ध्येय आहेत, कारण त्यांचा अध्यात्म-अधिदैवविभागानें पृथक् उपदेश केला आहे,' असा आक्षेपनिरसनपूर्वक सिद्धान्त ४२८-३०; त्याचेंच पृथक् उपदेशामुळें पृथक् ध्यान' असें विवरण, '**प्रदानवत्**' या सूत्रस्थ उदाहरणाचें व्याख्यान ४३१-३२; त्याविषयीं देवताकांडस्थ अधिकरणाचें उदाहरण ४३३.

—२९ **उभयलिंगत्वाधिकरण**–[४३४–५४] 'मनश्चिदादि सांपादिक अग्नि' हा याचा विषय, 'ते क्रियांगभूत आहेत कीं स्वतंत्र' असा संशय ४३४; 'प्रकरणामुळें ते क्रियांग आहेत' असा पूर्वपक्ष, '**लिंगभूयस्त्वात्**०' या सूत्राच्या व्याख्यानानें 'लिंगाच्या बाहुल्यामुळें ते स्वतंत्र–केवल विद्यात्मक आहेत' असा सिद्धान्त, कांहीं लिंगांचा उल्लेख, प्रकरणाहून लिंग अधिक बलवान् आहे, याविषयीं पूर्वमीमांसासूत्राचें प्रमाण ४३५-३६; '**पूर्वविकल्पः**०' या सूत्रानें 'हे अग्नि स्वतंत्र नाहींत, तर क्रियामय अग्नीचे विकल्पात्मक आहेत, कारण प्रकरण क्रियामय अग्नीचें आहे, म्हणून ते क्रियामयच, मानसग्रहाप्रमाणें' असा सविस्तर व सोपपत्तिक पूर्वपक्ष४३७-३९; त्या अग्नींच्या क्रियानुप्रवेशाविषयीं '**अतिदेशाच्च**०' या सूत्रानें लिंगान्तर, '**विद्यैव**०' या सूत्रानें 'ते विद्यात्मकच आहेत, असा निश्चय केलेला असल्यामुळें हे सांपादिक अग्नि विद्यात्मकच आहेत,' असा पुनः सिद्धान्त ४४०; '**दर्शनाच्च**०' या सूत्रानें लिंगदर्शनामुळेंहि त्यांना स्वातंत्र्य आहे, अर्थात् लिंगामुळेंहि प्रकरण बाध्य आहे, '**श्रुत्यादि**०' या सूत्रानें श्रुत्यादिकांना अधिक बलवत्त्व असल्यामुळें दुर्बलकर्मप्रकरणानें त्यांचा बाध होत नाहीं, असें श्रुतिविवरणपूर्वक प्रतिपादन ४४१-४२; लिंगाचा निर्देश ४३; हें लिंग केवल अर्थवादमात्र नाहीं, याविषयीं उपपत्ति, उक्त न्यायाचा इतरत्र अतिदेश४४४; '**अनुबन्धादिभ्यः**०' या सूत्रानें मन-आदि वृत्तींमध्यें श्रुतीनें कर्मांगांचें संपादन केलेलें असल्यामुळें त्या अग्नींना स्वातंत्र्य आहे ४४५-४७; शांडिल्यादिविद्यांप्रमाणें आपल्या अनुबंधानें युक्त असलेल्या त्यांना कर्माहून व दुसऱ्या उपासनांहून पृथक्त्व आहे, पूर्वमीमांसेतील अवेष्टीच्या दृष्टान्तानें प्रकरणापासून

त्यांच्या उत्कर्षाची सविस्तर उपपत्ति ४४८-५१; '**न सामान्यात्०**' या सूत्रानें पूर्ववाद्यानें दिलेल्या उदाहरणावर दूषण, सूत्राक्षरांचें व्याख्यान, 'मृत्युवत्' या दृष्टान्ताचें व्याख्यान४५२; '**परेण च०**' या सूत्रानें पूर्वोत्तर ब्राह्मणांना विद्याप्रधानत्व असल्यामुळें प्रस्तुत मध्यवर्ती ब्राह्मणालाहि विद्याप्राधान्य आहे, असा सिद्धान्तोपसंहार ४५३-५४.

—३० **ऐकात्म्याधिकरण**–[ ४५४–६५ ] 'देहव्यतिरिक्त आत्म्याच्या अस्तित्वाचें समर्थन' हें या अधिकरणाचें तात्पर्य, 'देहच स्वर्गमोक्षाधिकारी, त्यामुळें आत्म्याचें व्यतिरेकचिंतन व्यर्थ आहे,' अशी शंका, पौनरुक्त्याची शंका, पूर्वतंत्रांत सूत्रानें त्याचें अकथन, शबरस्वामींनीं भाष्यांत येथून आकर्षण करूनच प्रमाणलक्षणांत त्याचें वर्णन केलें आहे, भगवान् उपवर्षांनीं 'शारीरकांत तें सांगूं' असा केलेला उद्धार, येथें चोदनालक्षण उपासनविचारांत सर्व शास्त्रशेषत्वप्रदर्शनासाठीं आत्म्याच्या अस्तित्वाचा विचार ४५४-५६; पूर्वोत्तरसंगति, 'पुरुष' हा याचा विषय, 'तो देहच आहे कीं देहाहून भिन्न आहे' असा संशय, देहात्मदर्शी लोकायतिकांचा 'देहच आत्मा व चैतन्य हा त्याचा गुण, स्वर्गमोक्षगमनास समर्थ असा देहव्यतिरिक्त आत्मा नाहीं,' असा '**एके०**' इत्यादि सूत्राच्या व्याख्यानानें सोपपत्तिक पूर्वपक्ष ४५७-५८; 'देह असतांना चैतन्य असतें व त्याच्या अभावीं तें नसतें, म्हणून चैतन्य, स्मृति, प्राणचेष्टा इत्यादि हे देहधर्मच' असा त्याविषयीं हेतु ४५९; '**व्यतिरेक:०**' या सूत्रानें 'आत्माचा देहाहून व्यतिरेक आहे, कारण देह असतांनाहि चैतन्यादिकांना अभावित्व आहे,' इत्यादि सोपपत्तिक सिद्धान्त ४६०; चार्वाकमताचें युक्तींनीं खंडन ४६१-६२; सूत्रांतील 'उपलब्धिवत्' या दृष्टान्ताचें विवरण, आत्मा उपलब्धिस्वरूप, वाद्याच्या हेतूचें खंडन, 'उपलब्धीमध्यें देहाचें उपकरणत्वहि सिद्ध होत नाहीं' असें सदृष्टान्त प्रतिपादन व देहातिरिक्त आत्म्याची सिद्धि ४६३-६५.

—३१ **अंगावबद्धाधिकरण**–[ ४६५–७१ ] प्रासंगिक कथेची समाप्ति व प्रकृत कथेचें अनुसरण, 'उद्गीथादि अंगाश्रित उपासनें' हा विषय, त्याविषयीं प्रमाणें, 'ते प्रत्यय त्या शाखांतील उद्गीथादिकांमध्येंच आहेत कीं सर्व शाखागत उद्गीथादिकांमध्यें' असा संशय, त्या संशयाचें समर्थन४६५-६६; 'संनिधानामुळें स्वशाखागत उद्गीथादिकांमध्येंच त्यांचें विधान केलें जातें,' असा सकारण पूर्वपक्ष ४६७; '**अंगावबद्धास्तु०**' या सूत्राच्या व्याख्यानानें पूर्वपक्षानुवादपूर्वक 'संनिधानाहून श्रुति अधिक बलवान्, स्वरादि भेद असला तरी उद्गीथादिकांचा अविशेष, त्यामुळें सर्व शाखागतच उद्गीथादिकांमध्यें अशा जातीचे प्रत्यय होतील' असा सिद्धान्त ४६८-६९; '**मंत्रादिवत्०**' या सूत्रानें

उदाहरणानेंहि या अर्थाचें समर्थन, शाखांतरोत्पन्न मंत्र, कर्मे व गुण यांचा शाखांतरोपसंग्रह दिसतो, याविषयीं पूर्वकांडांतील उदाहरणें ४७०-७१.

—३२ **भूमज्यायस्त्वाधिकरण**–[ ४७२–७७ ] 'व्यस्त व समस्त श्रौत वैश्वानर उपासना ' हा याचा विषय, त्याविषयीं श्रुतिप्रमाणनिर्देश ४७२; येथें 'व्यस्त व समस्त असें उभयथा उपासन करावें कीं समस्त वैश्वानराचें उपासन करावें' असा संशय, 'प्रत्येक अवयवामध्यें ' उपास्से ' असें क्रियापदश्रवण व फलभेदश्रवण असल्यामुळें तीं व्यस्त उपासनें आहेत ' असा पूर्वपक्ष ४७३; 'समस्त वैश्वानर उपासनेलाच प्राधान्यानें विवक्षितत्व आहे, अवयवोपासनेला नाहीं, दर्शपूर्णमासादि क्रतूप्रमाणें' असा '**भूम्नः०**' या सूत्राच्या व्याख्यानानें सिद्धान्त ४७४; श्रुति समस्त उपासनेचें श्रेष्ठत्व दाखविते, पूर्वापरसंदर्भाचें आलोचन केल्यानें वैश्वानरविद्याविषय वाक्य एक आहे, असा प्रत्यय येतो, विहित व्यस्त उपासनांचाहि समस्त उपासनांमध्यें अंतर्भाव होत असल्यामुळें व्यस्तोपासनांना पृथक् अनुष्ठेयत्व नाहीं, समस्त उपासनेंत कांहीं फल नसल्यामुळें तिला ज्यायस्त्व नाहीं, या शंकेचें निरसन ४७५-७६; एकदेशीमताचा अनुवाद व त्यांतील दोषप्रदर्शन ४७७.

—३३ **शब्दादिभेदाधिकरण**–[ ४७८-८४ ] 'दहरविद्यादि ब्रह्मोपासनें व प्राणोपासनें ' हा विषय, 'तीं वेद्याच्या अभेदामुळें अभिन्न आहेत कीं शब्दादिभेदामुळें भिन्न आहेत ' असा संशय, 'वेद्याच्या अभेदामुळें भिन्नश्रुतियुक्त असलेलींहि उपासनें अभिन्न आहेत, त्यांची समस्त उपासना करावी ' असा पूर्वपक्ष, श्रुतिनानात्व जरी असलें तरी वेद्य एक ईश्वर आहे, याविषयीं श्रुतिप्रमाणें, यापक्षीं श्रुतिनानात्व गुणान्तरपर असल्यामुळें व्यर्थ नाहीं, म्हणून स्वपरशाखाविहित एकवेद्यविषय गुणजाताचा सर्व विद्यांमध्यें उपसंहार करावा ४७८-७९; '**नाना शब्दादिभेदात्०**' या सूत्राच्या व्याख्यानानें 'वेद्याचा अभेद जरी असला तरी अशा जातीच्या विद्या 'वेद, उपासीत' इत्यादि शब्दभेदामुळें भिन्नच आहेत ' असा सिद्धान्त, पूर्वतंत्रांत शब्दभेद कर्मभेदाचा हेतु ज्ञात झालेला आहे, गुणादिकहि यथासंभव भेदहेतु संभवतात, शब्दभेद या हेतूवर आक्षेप व त्याचें सविस्तर सोपपत्तिक निरसन, श्रुतींचें नानात्व गुणान्तरपर आहे, या वाद्याच्या म्हणण्याचें निरसन ४८०-८२; समस्त उपासनेला ज्यायस्त्व आहे, या म्हणण्याचें निरसन, या अधिकरणाची पादाच्या आरंभींच संगति ४८३.

— ३४ **विकल्पाधिकरण**–[ ४८४–८७ ] 'अहंग्रहोपासना ' हा विषय 'इच्छेनें त्यांचा समुच्चय किंवा विकल्प आहे कीं नियमानें विकल्पच' असा संशय, 'त्यांच्या समुच्चयाचा नियम नाहीं, यास्तव स्वेच्छेनेंच समुच्चय किंवा विकल्प करावा' असा पूर्व-

पक्ष ४८४-८५; '**विकल्पः०**' या सूत्राच्या व्याख्यानानें 'अहंग्रहोपासनांचा विकल्पच आहे, समुच्चय नाहीं, कारण त्यांचें उपास्यविषयसाक्षात्करण हें एकच अविशिष्ट फल आहे, समुच्चय चित्तविक्षेपाला कारण होतो, यास्तव अहंग्रहोपासनेंतील कोणती तरी एकच उपासना घेऊन उपास्यविषयसाक्षात्कार होईपर्यंत तत्पर व्हावें' असा सिद्धान्त ४८६-८७.

—३५ **काम्याधिकरण**–[ ४८७-८८ ] 'अभ्युदय हें फल देणाऱ्या प्रतिकोपासना' हा याचा विषय, 'त्यांत विकल्पाचा नियम आहे कीं याथाकाम्य आहे' असा संशय, 'अहंग्रहोपासनाप्रमाणेंच त्यांनाहि उपासनत्व असल्यामुळें त्यांच्या विकल्पाचा नियम आहे' असा पूर्वपक्ष, '**काम्यास्तु०**' या सूत्रानें 'त्यांचा यथाकाम समुच्चय करावा, कारण त्यांत पूर्वोक्त अविशिष्टफलत्व या विकल्पहेतूचा अभाव आहे' असा सिद्धान्त ४८७-८८.

—३६ **यथाश्रयभावाधिकरण**–[ ४८९–९५ ] 'अंगावबद्धोपासना' हा विषय, 'त्यांचें समुच्चयानें अनुष्ठान करावें कीं यथाकाम' असा संशय आला असतां 'यांचे आश्रय स्तोत्रादिक जसे समुच्चयानें होतात, त्याप्रमाणें त्यांचे प्रत्ययहि समुच्चयानें होतात, कारण त्यांना आश्रयाधीनत्व आहे' असा '**अंगेषु०**' या सूत्रानें पूर्वपक्ष ४८९; **शिष्टेश्च**० ' या सूत्रानें त्यांचें विधान, हा समुच्चयाविषयीं दुसरा हेतु, 'क्षताचें संधान या लिंगावरूनहि त्यांच्या समुच्चयाचा बोध होतो' असा '**समाहारात्०**' या सूत्रानें त्याविषयीं आणखी हेतु, उपास्य ओंकाराला सर्व वेदसाधारण्य असल्यामुळें उपासनांनाहि साधारण्य आहे, असें '**गुणसाधारण्य०**' या सूत्रानें हेत्वंतर ४९०-९२; '**न वा०**' या सूत्रानें अंगांप्रमाणें अंगाश्रित उपासनांच्या समुच्चयाचा नियम नाहीं, कारण त्याविषयीं श्रुति नाहीं, म्हणून आपल्या इच्छेप्रमाणेंच त्यांचें अनुष्ठान करावें, असा सोपपत्तिक सप्रमाण सिद्धान्त ४९२-९४; '**दर्शनाच्च०**' या सूत्रानें श्रुतीहि त्यांचा असमुच्चय दाखविते, असें उपपादन व अर्थात् आपल्या इच्छेप्रमाणें उपसनांचा समुच्चय किंवा उपासन करावें, असा निर्णय ४९५.

## अध्याय ३ रा. पाद ४ था. पृ. ४९६–६१०.

—१ **पुरुषार्थाधिकरण**–[ ४९६–५२० ] 'औपनिषद आत्मज्ञान' हा याचा विषय, 'तें कर्मांमध्यें प्रवेश करितें कीं स्वतंत्र पुरुषार्थाचें साधन आहे,' असा संशय आला असतां '**पुरुषार्थः०**' या सूत्रानें 'वेदान्तविहित स्वतंत्र आत्मज्ञानापासून पुरुषार्थ सिद्ध होतो,' या सिद्धान्तानें आरंभ, त्याविषयीं प्रमाणें ४९६-९७; '**शेषत्वात्०**' या सूत्रानें कर्तृत्वानें आत्म्याला कर्मांगत्व असल्यामुळें ज्ञानपर श्रुतीला अर्थवादत्व आहे. द्रव्य, संस्कार, कर्म यांतील फलश्रुतीच्या अर्थवादाप्रमाणें, असा जैमिनिमतानें पूर्वपक्ष व त्याचें सविस्तर आक्षेपनिरसनपूर्वक उपपादन ४९८-५०२;

**'आचारदर्शनात्०'** या सूत्रानें प्राचीन विद्वानांचें ज्ञानकर्मसमुच्चयानुष्ठान हें विद्येच्या कर्मांगत्वाविषयीं लिंग ५०३; **'तच्छ्रुतेः०'** या सूत्रानें तृतीया श्रुतीवरूनहि विद्येचें कर्मांगत्व, **'समन्वारम्भणात्०'** या सूत्रानें विद्या व कर्म यांचें फलारंभांत सहकारित्व ५०४; **'तद्वतः०'** या सूत्रानें विद्वानाला उद्देशून कर्माचें विधान ५०५; **'नियमाच्च०'** या सूत्रानें यावज्जीव कर्मानुष्ठानाविषयीं नियम, या सर्व हेतूंनीं पूर्वपक्षाची सिद्धि ५०६; **'अधिकोपदेशात्०'** या सूत्रानें त्याचें प्रत्याख्यान, वेदान्तामध्यें कर्मकर्त्या—कर्मांगभूत संसारी जीवाहून अधिक—असंसारी चिन्मात्र आत्म्याचा उपदेश केला आहे, म्हणून तत्त्वज्ञानाच्या श्रुतफलाला अर्थवादत्व नाहीं, हें बादरायणमतच निर्दोष, अधिकोपदेशाच्या असिद्धीची शंका व तिचें निरसन, कर्त्रपेक्षित आत्मरूपच इष्ट या म्हणण्याचें निरसन, आत्म्याचें प्रियसंसूचन आत्मैक्याच्या आशयानें आहे, याविषयीं वाक्यशेष, जीव व ब्रह्म यांचा तात्त्विक विरोध नाहीं ५०८-५०९; **'तुल्यं०'** या सूत्रानें विद्येच्या अकर्मशेषत्वाविषयींहि आचारदर्शन तुल्य आहे, अशा कथनानें वाद्याच्या लिंगदर्शनाचें प्रत्याख्यान, विद्येच्या अशेषत्वाविषयीं हेत्वन्तर, परकीय लिंगाची अन्यथा सिद्धि, **'असार्वत्रिकी०'** या सूत्रानें तृतीयाश्रुति सर्वविद्यांना उद्देशून नाहीं, तर ती केवल उद्गीथविद्येला उद्देशून आहे, या कथनानें वाद्याच्या 'तच्छ्रुतेः' या हेतूचें निरसन ५११; **'विभागः०'** या सूत्रानें समन्वारम्भहेतूचें निरसन, तें समन्वारम्भवचन मुमुक्षुविषय नाहीं ५१२-१३; **'अध्ययन०'** या सूत्रानें 'तद्वतो०' या सूत्रानें सांगितलेल्या हेतूचें निरसन ५१४; **'नाविशेषात्०'** या सूत्रानें कर्मनियमाचा परिहार, **'स्तुतये०'** या सूत्रानें त्याचा दुसरा परिहार ५१५; **'कामकारेण०'** या सूत्रानें विद्वान् स्वेच्छेनेंच धर्मसाधनांचा त्याग करितात, असें स्वपक्षीं सप्रमाण हेत्वन्तर ५१६; **'उपमर्दं०'** या सूत्रानें कर्माधिकारहेतूच्या स्वरूपनाशाचें कथन, त्यामुळेंहि आत्मज्ञानाचें स्वातंत्र्य ५१७; **'ऊर्ध्वरेतस्सु०'** या सूत्रानें यतींच्या आश्रमांत विद्येचें श्रवण, वैदिकशब्दांत त्यांच्या आश्रमांचा अवगम, त्यामुळेंहि विद्या व कर्म यांचा अंगांगिभाव नाहीं ५१९.

—२ **परामर्शाधिकरण**— [ ५२०—५३७ ] 'पारिव्राज्य' हा विषय, 'तें अनुष्ठेय नाहीं कीं अनुष्ठेय आहे' असा संशय, **'त्रयो धर्मस्कंधाः०'** इत्यादि शब्दांत आश्रमान्तराचा नुस्ता अनुवाद आहे, विधि नाहीं, त्यांतील प्रत्येक शब्दाचें अर्थान्तरपरत्व उपलब्ध होतें, ब्रह्मसंस्थतेची स्तुति, स्मृति व आचार यांवरून त्यांची प्रसिद्धि, प्रत्यक्ष श्रुतीशीं विरोध आला असतां तें अनादरणीय किंवा अनधिकृत विषय, गार्हस्थ्याचाहि त्यांत परामर्शच आहे, तथापि अग्निहोत्रादि कर्मांच्या विधानावरून त्याच्या अस्तित्वाची सिद्धि, संन्यासप्रतिपादक इतर वाक्याचेंहि तसेंच अर्थान्तरपरत्व, 'प्रव्रजन्ति' हा लोकसंस्तव, पारिव्राज्य-

विधि नव्हे, 'प्रव्रजेत्' या विधानाची अपेक्षा न करतांच हा विचार आहे, असा '**परामर्श०**' या सूत्रानें पूर्वपक्ष ५२०-२४; '**अनुष्ठेयं०**' या सूत्रानें 'पारिव्राज्य अनुष्ठेय आहे' असा सिद्धान्त, गार्हस्थ्य व पारिव्राज्य यांच्या साम्यश्रुतीमुळें पारिव्राज्य अनुष्ठेय आहे असें बादरायणाचें मत, साम्यश्रुतींचा निर्देश, 'आश्रमान्तर संदिग्ध' या परोक्ताचें निरसन, 'त्रयो धर्मस्कंधा:' या श्रुतींतील आश्रमांचा विभाग, म्हणून तो परामर्श जरी असला तरी पारिव्राज्य अनुष्ठेयच आहे ५२४-२७; '**विधिर्वा०**' या सूत्रानें हा आश्रमान्तराचा विधिच आहे, अनुवाद नव्हे, समिधेच्या अधस्तात् व उपरिधारणाप्रमाणें असा पारिव्राज्याच्या विधीचा दृष्टान्तविवरणपूर्वक व श्रुतीच्या सविस्तर अर्थकथनानें निर्णय ५२८-३४; त्याविषयीं श्रुति-स्मृतिप्रमाणें, ब्रह्मसंस्थशब्दाची पारिव्राजक या अर्थी रुढि, परामर्शश्रुतीच्या आश्रयानें केलेल्या या कृत्वाचिंतेचेंच उद्घाटन, संन्यासाविषयीं स्पष्टविधि, संन्यासश्रुति अनधिकृतविषय आहे असें म्हणतां येत नाहीं, संन्यासाला ब्रह्मज्ञानपरिपाकाचें अंगत्व असल्यामुळेंहि तो अंधादि अनधिकृतविषय नाहीं, म्हणून संन्याश्यांच्या आश्रमांचा सिद्धि, व त्यांत विद्येचें विधान केलेलें असल्यामुळें तिचें स्वातंत्र्य ५३४-३७.

—३ **स्तुतिमात्राधिकरण**–[ ५३८–४२ ] 'या भूतांचा पृथ्वी रस आहे' इत्यादि उद्गीथादि अंगावबद्ध श्रुति हा याचा विषय, 'त्या उद्गीथादिकांच्या स्तुतीसाठीं आहेत कीं उपासनेच्या विधीसाठीं' असा संशय, त्या त्यांच्या स्तुतीसाठीं आहेत, कारण उद्गीथादिकांचें ग्रहण करून त्यांचें श्रवण आहे, त्याविषयीं पूर्वकांडांतील 'ही पृथ्वीच जुहू आहे' या श्रुतीचें उदाहरण, 'ती श्रुति जशी जुह्वादिकांच्या स्तुत्यर्थ त्याच प्रमाणें या श्रुति उद्गीथादिकांच्या स्तुत्यर्थ' असा '**स्तुतिमात्रं०**' या सूत्रांशानें पूर्वपक्ष ५३८-३९; पण अपूर्वत्वामुळें या श्रुतींना स्तुतिमात्रत्व नसून विध्यर्थत्व आहे, अपूर्वार्थच विहित असतो, स्तुत्यर्थपक्षीं त्याला आनर्थक्य येतें, स्तुति विधीच्या प्राशस्त्यानेंच उपयुक्त असते, अन्यत्र विहित असलेल्या उद्गीथादिकांची येथें पठित असलेली ही स्तुति वाक्यशेषभावास प्राप्त होत नाहीं, त्यामुळें ती अनर्थक, जुहूस्तुति विधिसंनिध आहे, म्हणून या अशा प्रकारच्या श्रुति विध्यर्थच आहेत, असा सिद्धान्त ५४०; '**भावशब्दात्०**' या सूत्रानें उद्गीथाची उपासना करावी, इत्यादि विधिशब्दावरून हें वाक्य गुणविधायक आहे, असा निश्चय, फलश्रवण हें त्याविषयीं हेत्वंतर ५४१-४२.

—४ **पारिप्लवाधिकरण**–[ ५४२–४६ ] 'उपनिषदांतील आख्यानें' हा याचा विषय, कांहीं आख्यानांचा निर्देश, 'तीं पारिप्लवार्थ आहेत कीं विद्येच्या स्तुतीसाठीं आहेत' असा संशय, 'आख्यानत्वामुळें त्यांना पारिप्लवार्थत्व आहे, पारिप्लवांत आख्यानप्रयोगाचा विधि आहे, यामुळें मंत्राप्रमाणें वेदान्तांना प्रयोगशेषत्व आहे, विद्याप्रधानत्व

नाहीं ' असा '**पारिप्लवार्थाः०**' या सूत्रांशानें पूर्वपक्ष, 'पण पारिप्लवार्थ-आख्यानांचा विशेष स्पष्ट सांगितलेला असल्यामुळें वेदान्तांतील आख्यानें पारिप्लवार्थ नाहींत ' असा '**न विशेषितत्वात्०**' या सूत्रानें सिद्धान्त ५४४; '**तथा च०**' या सूत्रानें 'आख्यायिकांना पारिप्लवार्थत्व नाहीं ' असें झालें असतां तत्समीप असलेल्या भिन्न भिन्न विद्यांशीं त्यांची एकवाक्यता प्रतीत होत असल्यामुळें त्यांना नियमानें विद्यास्तुत्यर्थत्वच आहे, आख्यानत्व असतांनाहि त्यांना पारिप्लवार्थत्व नसणें व स्तुत्यर्थत्व असणें याविषयीं कर्मश्रुतिगत आख्यानांचें उदाहरण व वेदान्तांतील आख्यानांना त्याच न्यायानें संनिहितविद्यास्तुत्यर्थत्व आहे, या सिद्धान्ताचा उपसंहार ५४५-४६.

—५ **अग्नीन्धनाद्यधिकरण**-[ ५४६-४७ ] ब्रह्मविद्या हा याचा विषय, ' ती मोक्षामध्यें कर्मांची अपेक्षा करिते किंवा नाहीं ' असा संशय, ' ती कर्मांची अपेक्षा करिते ' असा पूर्वपक्ष, व ' ब्रह्मविद्या मोक्षामध्यें कर्मांची अपेक्षा करीत नाहीं ' असा सिद्धान्त, येथें पहिल्या पुरुषार्थाधिकरणाचें फल सांगितलें आहे ५४६-४७.

—६ **सर्वापेक्षाधिकरण**- [५४८–५५ ] 'ब्रह्मविद्या' हाच विषय, 'तिला आश्रमकर्मांची अत्यंतच अनपेक्षा आहे कीं कांहीं अपेक्षा आहे,' असा संशय, ' तिला त्यांची अत्यंतच अनपेक्षा आहे,' असा पूर्वपक्ष, पण ' यज्ञादि श्रुतींमुळें योग्यतावशात् अश्वादिकांप्रमाणें ती स्वफलासाठीं कर्मांची अपेक्षा जरी करीत नसली तरी स्वतःच्या उत्पत्तीसाठीं त्यांची अपेक्षा करिते' असा '**सर्वापेक्षा०**' या सूत्रानें सिद्धान्त५४८-५१; '**शमदमादि०**' इत्यादि सूत्रानें ज्ञानोत्पत्तीचीं अंतरंगसाधनें, शमादिकांचें विधायक वाक्य, यज्ञादिकांचाहि अपूर्वत्वामुळें विधि, त्याविषयीं मीमांसेंतील उदाहरण व '**विधिर्वा०**' या सूत्राचा हवाला ५५२-५५.

—७ **सर्वान्नानुमत्यधिकरण**-[ ५५५–६२ ] ' प्राणसंवादांतील सर्वान्नानुज्ञान' हा विषय, ' शमादिकांप्रमाणें तेंहि विद्यांग म्हणून विहित आहे कीं ती स्तुति आहे ' असा संशय, ' प्राणविद्येच्या संनिधानामुळें तिच्या अंगत्वानें ही नियमनिवृत्ति सांगितली जाते म्हणून हा विधिच आहे,' म्हणून सामान्यविशेषभावामुळें भक्ष्याभक्ष्यविभागशास्त्राचाहि व्याघात होत नाहीं, पशुसंज्ञपनविधीनें प्राणिहिंसाप्रतिषेधशास्त्र व वामदेव्यविद्याविषय सर्वस्त्र्यपरिहारवचनानें गम्यागम्यव्यवहारविभागशास्त्र जसें बाधित होतें त्याप्रमाणें प्राणविद्याविषय सर्वान्नभक्षणवचनानें भक्ष्याभक्ष्यविभागशास्त्र बाधित होईल,' असा सप्रमाण पूर्वपक्ष ५५५-५७; ' हें सर्वान्नानुज्ञान विहित नाहीं. कारण त्यांत विधायक शब्द नाहीं, तो नसतांना विधीची कल्पना करितां येत नाहीं, श्वादि सर्व प्राण्यांचें अन्न मानुषदेहानें भक्षण करणें शक्य नाहीं, पण हें सर्व प्राणाचें अन्न आहे असें चिंतन करितां येणें शक्य आहे, म्हणून प्राणान्न-

विज्ञानप्रशंसेसाठीं हा अर्थवाद आहे, सर्वान्नानुज्ञानविधि नव्हे, ' असा सिद्धान्त, याच अर्थी ' **सर्वान्नानुमतिः०** ' या सूत्राच्या अक्षरांची योजना, चाक्रायणऋषीचें उच्छिष्टादिभक्षण, सर्वान्नानुमतीच्या अर्थवादत्वाविषयीं '**अबाधाच्च०**' या सूत्रानें हेत्वन्तर, '**अपि च०**' या सूत्रानें त्याविषयीं आपत्कालीं सर्वान्नभक्षण सांगणारें स्मृतिवचन,मद्याचा नित्यनिषेध, '**शब्दाच्च०**' या सूत्रानें स्मृतीच्या प्रामाण्यासाठीं तन्मूलक श्रुति ५५-६२.

--८ **आश्रमकर्माधिकरण**-[ ५६२-६९ ] ' आश्रमकर्म ' हा याचा विषय, ' आश्रममात्रनिष्ठ, विद्येची इच्छा न करणाऱ्या अमुमुक्षूलाहि तीं अननुष्ठेय आहेत कीं नाहींत ' असा संशय, ' आश्रमकर्मांचें विद्यासाधनत्वानें विधान असल्यामुळें विद्येची इच्छा न करणारा व फलान्तराची इच्छा करणारा अशा पुरुषाला नित्यकर्में अननुष्ठेय आहेत किंवा त्याला तीं जर अनुष्ठेय असतील तर त्यांना विद्यासाधनत्व नाहीं. कारण नित्यानित्यसंयोगाचा विरोध आहे ' असा पूर्वपक्ष, ' **विहितत्वात्०** ' या सूत्रानें ' अमुमुक्षूनेंहि यावज्जीव विधानामुळें आश्रमकर्म करावें' असा सिद्धान्त ५६२-६३; '**सहकारित्वेन०** ' या सूत्रानें ' कर्मांना विद्यासाधनत्व नाहीं ' या वाद्याच्या म्हणण्याचें निरसन, त्याविषयीं पूर्वकांडांतील व्यतिरेकोदाहरण, नित्यानित्यसंयोगविरोधाचा सदृष्टान्त परिहार, मीमांसेचा संयोगपृथक्त्वन्याय ५६४-६६; ' **सर्वथापि०** ' या सूत्रानें 'नित्यकर्मांहून भिन्न असलेलींच कर्में विद्यासंयुक्तत्वानेंच विहित आहेत' या शंकेचें समाधान, 'सर्वप्रकारें अनुष्ठेय असलेले यज्ञादिक तेच आहेत' याविषयीं श्रुतिस्मृतिलिंग ५६६-६८; ' **अनभिभवं०** ' या सूत्रानें ब्रह्मचर्यादि आश्रमकर्मांना अविद्यादि क्लेशांच्या क्षपणानें विद्योत्पत्तिहेतुत्व आहे, असें सप्रमाण प्रतिपादन ५६८-६९.

--९ **विधुराधिकरण**-[ ५६९-७३ ] ' विधुरादि अनाश्रमी ' हा याचा विषय, ' त्यांना विद्याधिकार आहे कीं नाहीं' असा संशय, ' आश्रमकर्मांच्या विद्याहेतुत्वाचें अवधारण केलेलें असल्यामुळें व अनाश्रम्यांच्या आश्रमकर्मांचा असंभव असल्यामुळें त्यांना विद्याधिकार नाहीं ' असा पूर्वपक्ष ५६९; ' **अन्तरा०** ' या सूत्राच्या व्याख्यानानें 'अनाश्रम्यांनाहि विद्याधिकार आहे,' असा सोदाहरण सिद्धान्त, ' **अपि च०** ' या सूत्रानें त्याविषयीं स्मृतिदर्शन ५७०; ' **विशेषानुग्रहश्च०** ' या सूत्रानें विधुरादिकांच्याहि जप्यादि विशेष धर्मांनीं विद्यानुग्रह, जन्मान्तरानुष्ठित आश्रमकर्मांनींहि विद्यानुग्रहाचा संभव ५७१-७२; ' **अतः०** ' या सूत्रानें 'अनाश्रमित्वाहून आश्रमित्व श्रेष्ठ आहे ' असा श्रौतलिंगप्रदर्शनानें उपसंहार ५७३.

--१० **तद्भूताधिकरण**-[ ५७३-७६ ] ' ऊर्ध्वरेत्यांच्या आश्रमास प्राप्त झालेल्या व त्यापासून बुद्धिपूर्वक भ्रंश पावलेल्या पुरुषाचें कर्म ' हा विषय, ' तें विद्याहेतु आहे कीं नाहीं' असा संशय सिद्धच आहे, असें मानून 'उत्तमाश्रम्याची त्या आश्रमांपासून

रागादिदोषानें प्रच्युति होते कीं नाहीं ' असा संशय, ' यागादि धर्म सु-अनुष्ठेय आहे अशा भावनेनें यति प्रच्युतहि होईल, कारण आरोह व अवरोह यांत विशेष कांहींच नाहीं ' असा पूर्वपक्ष ५७४; ' **तद्भूतस्य०** ' इत्यादि सूत्राच्या व्याख्यानानें '**यतीची उत्तमाश्रमापासून** प्रच्युति होत नाहीं, याविषयीं नियम आहे, नियमाविषयीं प्रमाण आहे, अप्रत्यवरोह या दुसऱ्या हेतूविषयींहि श्रुतिस्मृतिप्रमाण, शिष्टाचाराचा अभाव, न्याय व दोन्ही मीमांसाशास्त्रकारांची संमति ५७४-७५.

—११ **आधिकारिकाधिकरण**–[५७६–८२] 'यतींचें अबुद्धिपूर्वक च्युत झालेलें ब्रह्मचर्य ' हा विषय, 'त्याला प्रायश्चित्त आहे कीं नाहीं' असा सप्रमाण संशय, ' अधिकारलक्षणांतील निर्णीत प्रायश्चित्त नैष्ठिकाला नाहीं ' असा पूर्वपक्ष, त्याविषयीं हेतु ५७७-७८; ' **उपपूर्वं०** ' या सूत्रानें 'कांहीं आचार्य ब्रह्मचर्यच्युतीला उपपातक समजतात, त्यामुळें नैष्ठिकाच्याहि प्रायश्चित्ताचा भाव, मधुमांसाशनामुळें होणाऱ्या व्रतलोपाप्रमाणें ' असा सिद्धान्त, जे प्रायश्चित्ताचा अभाव मानितात त्यांना मूलप्रमाण नाहीं, प्रायश्चित्तभाव मानणारांना मूलप्रमाण आहे, त्याविषयीं प्रमाणलक्षणांतील सूत्रांचा उल्लेख व व्याख्यान, त्याचाच भिक्षु व वानप्रस्थ यांमध्यें अतिदेश ५७९-८२.

—१२ **बहिरधिकरण**–[ ५८२–८३ ] ' प्रायश्चित्त केलेल्या ऊर्ध्वरेत्यांशीं शिष्टाचाररूप कर्म ' हा विषय, ' तें कर्म विद्यांग आहे कीं नाहीं ' असा संशय, ' प्रायश्चित्तानेंच त्याची व्यवहारतासिद्धि होत असल्यामुळें तें विद्यांग आहे ' असा पूर्वपक्ष, ' **बहिस्तु०** ' इत्यादि सूत्रानें ' यतींची प्रच्युति हें कोणतेंहि जरी पातक असलें, व त्यांनीं प्रायश्चित्त केलेलें असलें तरी शिष्टांनीं त्यांना बहिष्कृत करावें ' असा सिद्धान्त, त्याविषयीं स्मृति व शिष्टाचार, हीं प्रमाणें ५८२-८३.

—१३ **स्वाम्यधिकरण**–[ ५८३–८७ ] ' कर्मांगसंबद्ध उपासना ' हा विषय, ' तीं यजमानकर्में आहेत कीं ऋत्विक्कर्में आहेत ' असा संशय, ' यजमानाच्या फलाचें श्रवण असल्यामुळें तीं यजमानकर्में आहेत, क्वचित् ऋत्विजाचेंहि फल दृष्ट आहे, पण तें वाचनिक आहे, म्हणून फलवत् उपासनांमध्यें स्वामीचेंच कर्तृत्व, ' असा ' **स्वामिनः०** ' या सूत्रानें पूर्वपक्ष ५८३-८५; ' **आर्त्विज्यं०** ' या सूत्रानें ' अंगोपासना ऋत्विक्कर्तृकच आहेत, कारण यजमानाकडून ऋत्विक् सांग कर्मासाठीं परिक्रीत असतो, ' असा सिद्धान्त, त्याविषयीं श्रौतलिंग, ' **श्रुतेश्च०** ' या सूत्रानें उपासनांना ऋत्विक्कर्मत्व, व त्यांच्या फलांना यजमानगामित्व आहे, या सूत्रानें हेत्वंतर ५८६-८७.

—१४ **सहकार्यन्तरविध्यधिकरण**–[ ५८७–५९६ ] ' तस्मात् ब्राह्मणः ' या श्रुतींतील 'मौन' हा विषय, ' त्याचें विधान केलें जातें कीं नाहीं' असा संशय, ' विधायक विभक्तीच्या अभावीं तें विहित नाहीं, तो अनुवाद आहे, त्याच्या ज्ञानार्थत्वामुळें

'पांडित्यं निर्विद्य' यानेंच मौनाची प्राप्ति, त्याविषयीं ब्राह्मणत्वाचा दृष्टान्त, त्याच न्यायानें मौनाला अविधेयत्व' असा पूर्वपक्ष ५८७ ५८९; '**सहकार्यन्तरविधिः०**' या सूत्रानें 'मौन विधेय आहे' असा सिद्धान्त, बाल्य व पांडित्य यांप्रमाणें अपूर्वत्वा-मुळें मौनाचा विधिच मानणें उचित, ज्ञानातिशय हा त्याचा अर्थ, विद्वान् संन्याश्याच्या मौनाचें विधान, बाल्य व पांडित्य यांच्या अपेक्षेनें तें तृतीय, संन्यासाधिकारामुळें त्याचेंच तें अनुष्ठेय ५९०-९१; 'पक्षेण' या सूत्रोक्तपदाचें शंकेच्या उत्तरत्वानें व्याख्यान, ५९२; '**कृत्स्नभावात्०**' या सूत्रानें छान्दोग्यांत गृहस्थाश्रमानें केलेल्या उपसंहाराची उपपत्ति, '**मौनवत्०**' या सूत्रानें मौन व गार्हस्थ्य यांप्रमाणें ब्रह्मचर्य व वानप्रस्थ या श्रुत्युक्त आश्रमांची सिद्धि ५९३-९४; प्रत्येक आश्रमाचें चतुर्विधत्व ५९५.

—१५ **अनाविष्काराधिकरण**–[ ५९६–६०० ] येथील 'बाल्य' हा विषय, 'पण त्याचा उपपादमूत्रपुरीषादि बालचरित हा अर्थ आहे किंवा भावशुद्धयादि हा अर्थ आहे' असा संशय, 'कामचारादि या प्रसिद्ध बाल्याचें ग्रहण करावें, वचन-सामर्थ्यानें ज्ञानी संन्याश्याच्या पतितत्वादि-दोषप्राप्तीचा विहित हिंसेप्रमाणें अभाव' असा पूर्वपक्ष५९६-९७; 'पण वचनाचें गत्यंतर संभवतें, म्हणून दुसऱ्या विधीच्या व्याघाताची कल्पना करणें युक्त नाहीं, प्रधानोपकरासाठीं अंगांचें विधान, ज्ञानाभ्यास हें यतींचें प्रधान अनुष्ठेय, प्रसिद्ध बालचर्येचा स्वीकार केल्यास ज्ञानाभ्यासाचा असंभव, म्हणून भावशुद्धयादि हेंच येथील बाल्य आहे,' असा सिद्धान्त, याच अर्थी '**अनाविष्कुर्वन्०**' या सूत्राची योजना ५९८; सूत्रांतील '**अन्वयात्०**' या पदाचें सप्रमाण व्याख्यान ५९९-६००.

—१६ **ऐहिकाधिकरण**–[ ६००–६०५ ] 'ज्ञानोत्पत्ति' हा विषय, 'ती याच जन्मीं होते कीं कदाचित् उत्तर जन्मींहि होते' असा संशय, 'ती याच जन्मीं होते' असा सकारण पूर्वपक्ष ६००-६०१; '**ऐहिकं**' या सूत्रानें 'प्रस्तुत प्रतिबंध नसल्यास याच जन्मीं विद्योत्पत्ति होते व तो असल्यास उत्तर जन्मींहि होते' असा सिद्धान्त, फलोन्मुख झालेलें कर्मान्तर हाच प्रतिबंध, त्याचेंच आक्षेप-समाधानपूर्वक उपपादन, 'या जन्मीं किंवा उत्तर जन्मीं मला ज्ञान व्हावें' असाहि संकल्प संभवतो, श्रव-णादिद्वारा उत्पन्न होणारी विद्या प्रतिबंधक्षयाच्या अपेक्षेनेंच होते, आत्म्याच्या दुर्बोध-त्वाविषयीं श्रुतिप्रमाण ६०२-६०४; ज्ञानाच्या पारलौकिकत्वाविषयीं लिंग, जन्मांतर-संचित साधन जन्मांतरींहि ज्ञान साधितें याविषयीं श्रुतिप्रमाण ६०५.

—१७ **मुक्तिफलानियमाधिकरण**–[ ६०५–१० ] 'विद्येचें फल मुक्ति' हा विषय, 'ती उत्कर्ष-अपकर्षकृत विशेषानें युक्त आहे कीं नाहीं' असा संशय, 'विद्येच्या ऐहिक-आमुष्मिक फलत्वामुळें होणारा विशेष जसा दृष्ट आहे त्याचप्रमाणें मुक्तिलक्षण-फलांतहि उत्कर्ष-अपकर्षकृत विशेष असेल' असा पूर्वपक्ष, पण मुक्तिफलांत तसा

कांहीं नियम नाहीं, कारण सर्व वेदान्तांत मुक्तीचें एकरूपच अवधारण केलेलें आहे, ब्रह्म हीच मुक्त्यवस्था, त्याच्या एकलिंगत्वाचें अवधारण केलेलें असल्यामुळें ब्रह्माला अनेकाकारयोग नाहीं, एकलिंगत्वाविषयीं श्रुतिप्रमाण ६०५-७; ‘मुक्तीला निरतिशयत्व आहे’ याविषयीं हेत्वंतर, मुक्तीमध्यें अतिशयाचा असंभव, विद्याभेदाचा अभाव, त्यामुळें कर्मफलाप्रमाणें तिच्या फलनियमाचा अभाव, सगुणविद्येंत फलभेद संभवतो, निर्गुणविद्येंत नाहीं, त्याविषयीं प्रमाणें, अध्यायसमाप्ति ६०८-१०.

## अध्याय ४ था. पाद १ ला. पृ. ६११–७०८

——१ **आवृत्त्यधिकरण**–[ ६११–२८ ] तृतीयाध्यायाच्या अर्थाचा अनुवाद व चवथ्या अध्यायाच्या अर्थाचा निर्देश, प्रथम या फलाध्यायांत फलार्थापत्तीनें प्राप्त झालेल्या आवृत्त्यादिकांचा विचार, ‘श्रवणादिक’ हा विषय, ‘त्यांचा एकदाच प्रत्यय करावा कीं आवृत्तीनें’ असा संशय, ‘प्रयाजादिकांप्रमाणें एकदाच प्रत्यय करावा, तेवढ्यानेंच शास्त्राचें कृतार्थत्व, अश्रुत आवृत्तिपक्षीं अशास्त्रकरण’ इत्यादि पूर्वपक्ष ६११-१४; ‘असकृदुपदेशामुळें प्रत्ययावृत्तीच करावी’ असा ‘**आवृत्तिः०**’ या सूत्राच्या व्याख्यानानें सिद्धान्त, वाद्यांच्या आक्षेपांचें सोपपत्तिक निरसन ६१५-१६; ‘**लिंगाच्च०**’ या सूत्रानें लिंगदर्शनानें आवृत्तीची सिद्धि, आवृत्तीच्या निर्गुण ब्रह्मविषयत्वावर आक्षेप ६१७; आक्षेपावर प्रतिशंका, शंकाकाराच्या म्हणण्याचा अनुवाद ६१८; आवृत्तीच्या अर्थवत्त्वाचें समर्थन करणाऱ्या वेदान्तपक्षाचा आक्षेप व त्याचें वादीकृत निरसन ६१९-२०; या सर्व विवादाचें सिद्धान्त्यांनीं केलेलें सयुक्तिक व सप्रमाण निरसन, दृष्टफल विद्येला आवृत्तीची अपेक्षा ६२०-२४; त्याविषयीं न्याय, निपुणमतींना आवृत्तीची अपेक्षा नाहीं, पण मंदमतींना प्रतिबंधाच्या निवृत्तीसाठीं तिची अपेक्षा ६२४-२८.

—२ **आत्मत्वोपासनाधिकरण**–[ ६२९–३५ ] ‘निदिध्यासनाची आवृत्ति’ हा विषय, ‘परमात्मा मी आहें अशी निदिध्यासन-आवृत्ति करावी कीं तो मद्भिन्न आहे अशी,’ या संशयावर आक्षेप व त्याचें निरसन ६२९; ‘तो मद्भिन्न आहे असें निदिध्यासन करावें’ असा सहेतुक पूर्वपक्ष ६३०; ‘**आत्मेति०**’ या सूत्राच्या व्याख्यानानें ‘तो मी आहें’ असेंच अनुचिंतन करावें, असा सिद्धान्त, त्याविषयीं प्रमाण, हें आत्मदर्शन प्रतीकदर्शन नव्हे, अभेददर्शन आहे, भेदनिंदेमुळेंहि अभेदालाच प्रतिपाद्यत्व ६३१-३२;‘विरुद्धस्वभावत्वामुळें जीव-ब्रह्मांचा भेद’ या वाद्याच्या आक्षेपाचें निरसन ६३३; अधिकार्यभाव व प्रत्यक्षादिनिरसन, वाद्याची श्रुत्यभावप्रसंगशंका व तिचें निरसन, ‘अप्रबोध कोणाला’ अशी शंका व तिचें निरसन, अद्वैताच्या असंभवाचें निरसन व ‘आत्मा असेंच ईश्वरामध्यें मन धारण करावें’असा सिद्धांतोपसंहार ६३४-३५.

— ३ **प्रतीकाधिकरण**–[६३५-३८]‘प्रतीकोपासना’हा याचा विषय,‘त्यांत आत्मग्रह

करावा कीं नाहीं,' असा संशय, 'त्यांतही आत्मग्रहच करावा, कारण ब्रह्माला आत्मत्व आहे व प्रतीकांनाहि ब्रह्मविकारत्व आहे' असा पूर्वपक्ष ६३६; '**न प्रतीके०**' इत्यादि सूत्राच्या व्याख्यानानें 'प्रतीकामध्यें आत्मबुद्धि करूं नये, कारण उपासक प्रतीकांचें आत्मत्वानें ग्रहण करीत नाहींत,' असा वाद्याच्या हेतुनिरसनपूर्वक सदृष्टान्त सिद्धान्त ६३७-३८.

—४ **ब्रह्मदृष्ट्यधिकरण**–[ ६३९–४५ ] 'प्रतिकोपासना' हाच विषय, 'त्यांत कोणामध्यें कोणाची दृष्टि करावी' असा संशय, संशयाचें सविस्तर कारण, 'त्याविषयीं अनियम' किंवा 'आदित्यादि दृष्टि ब्रह्मामध्यें कराव्या' असा पूर्वपक्ष ६३९-४१; आदित्यादिकांमध्यें ब्रह्मदृष्टिच करावी, कारण ब्रह्माचा उत्कर्ष आहे, असें केल्यानें लौकिकन्यायाचें अनुसरण होतें, ब्रह्मालाच फलदातृत्व, म्हणून त्यालाच उपास्यत्व, शास्त्रप्रामाण्याच्या आधारानें शंका, तिचें समाधान, आदित्यादिकांना प्राथम्यामुळें मुख्यार्थत्व आहे, त्यामुळें व 'ब्रह्म-'शब्दाला 'इति-'परत्व असल्यामुळें आदित्यादिकांत ब्रह्मदृष्टिच करावी' इत्यादि उपपत्तींनीं प्रतीकांत ब्रह्मदृष्टीचा आरोप करणें, हेंच ब्रह्माचें उपास्यत्व आहे, असा सिद्धान्तोपसंहार ६४२-४५.

—५ **आदित्यादिमत्यधिकरण**–[ ६४६-५५ ]–'अंगाश्रित उपासनें' हा विषय, त्यांचें उदाहरण, 'त्यांत आदित्यादिकांमध्यें उद्गीथादिकांचें विधान केलें जातें कीं उद्गीथादिकांत आदित्यादिदृष्टीचें,' असा संशय, 'त्याविषयीं कांहीं नियम नाहीं' किंवा 'आदित्यादिकांत उद्गीथादिमतीच कराव्या' असा सहेतुक सोदाहरण पूर्वपक्ष ६४६-४८; 'विद्येच्या कर्मसमृद्धिहेतुत्वामुळें उद्गीथादि अंगांमध्यें आदित्यादिमतीच कराव्या' असा सिद्धान्त, त्यावर 'कर्मसमृद्धिफल उपासनांमध्यें असा नियम जरी संभवला तरी स्वतंत्रफल उपासनामध्यें तो कसा संभवतो' अशी शंका 'स्वतंत्रफल उपासनांमध्येंहि अधिकृताधिकारामुळें अपूर्व संनिकर्षानेंच गोदोहनादिकांप्रमाणें फलकल्पना,' इत्यादि सविस्तर आक्षेपनिरसनपूर्वक उपपादन ६४९-५५.

—६ **आसीनाधिकरण**–[ ६५५-५८ ] 'स्वतंत्र उपासना' हा विषय, 'त्या बसूनच कराव्या कीं उभ्यानें, निजून वगैरे' असा संशय, 'उपासनेला मानसत्व, त्यामुळें शरीरस्थितीचा नियम नाहीं' असा पूर्वपक्ष ६५५-५६; '**आसीनः०**' या सूत्रानें 'आसनावर बसूनच उपासना करावी' असा इतरपक्षीं दोषप्रदर्शनपूर्वक सिद्धान्त, '**ध्यानाच्च०**' या सूत्रानें त्याविषयींच आणखी एक कारण ६५७; '**अचलत्वं०**' या सूत्रानें त्याविषयीं वैदिकलिंग व '**स्मरन्ति०**' या सूत्रानें शिष्टाचा विधि ६५८.

—७ **एकाग्रताधिकरण**–[ ६५९–६१ ] 'उपासना' हा विषय, 'त्यांत दिग्देशकालादिकांचा नियम आहे कीं नाहीं' असा संशय, 'वैदिकत्वामुळें त्यांचा नियम आहे' असा पूर्वपक्ष, 'दिगादिकांमध्यें अर्थलक्षणच नियम, ज्या दिगादिकांत मनाची

सौकर्यानें एकाग्रता होते, तेथेंच उपासना करावी ' असा आक्षेपनिरसनपूर्वक **'यत्रैकाग्रता०'** या सूत्रव्याख्यानानें सिद्धान्त ६६०.

—८ **आप्रायणाधिकरण**-[ ६६१–६४ ] 'ब्रह्मलोक हें फल देणाऱ्या उपासना' हा विषय, 'त्या कांहीं काल कराव्या कीं यावज्जीव?' 'कांहीं काल कराव्या' असा सकारण पूर्वपक्ष ६६२; 'त्या यावज्जीव कराव्या ' असा **' आप्रायणात्०'** या सूत्रव्याख्यानानें सकारण सिद्धान्त, त्याविषयीं तृणजलूचा दृष्टान्त, स्मार्तदर्शनाश्रयानेंहि सूत्रयोजना ६६४.

—९ **तदधिगमाधिकरण**-[ ६६५–७३ ] ' विद्वानाचीं सर्व पापें ' हा विषय, ' त्यांचा क्षय होतो कीं नाहीं ? ' ' फलभोगावांचून त्यांचा क्षय होत नाहीं, ' असा सप्रमाण आक्षेपनिरसनपूर्वक पूर्वपक्ष ६६५-६७; 'ब्रह्मसाक्षात्कार झाला असतां ज्ञानोत्तर पापाचा असंबंध व ज्ञानपूर्वपापाचा विनाश,' असा **' तदधिगमे० '** या सूत्रानें सप्रमाण सिद्धान्त ६६८; बाह्याच्या आक्षेपांचा अनुवाद व क्रमानें त्यांचें निरसन ६६९-७३.

—१० **इतरासंश्लेषाधिकरण**-[ ६७३-७६ ] ' पुण्यकर्म ' हा विषय 'तें ब्रह्मज्ञानानें क्षीण होत नाहीं कीं होतें?' 'धर्माला शास्त्रीयत्व म्हणून शास्त्रीयज्ञानाशीं त्याचा अविरोध, त्यामुळें तें पुण्यकर्म क्षीण होत नाहीं ' इत्यादि पूर्वपक्ष, **' इतरस्य० '** या सूत्राच्या व्याख्यानानें ज्ञानोत्तर व ज्ञानपूर्व पुण्याचाहि पापाप्रमाणेंच अश्लेष व विनाश, म्हणून देहपात होताच ज्ञानी मुक्त होतो, असा सोपपत्तिक सिद्धान्त.

—११ **अनारब्धाधिकरण**-[ ६७६–८० ] ' ज्ञानाधीन कर्मक्षय ' हा विषय, ' सुकृत-दुष्कृतविनाश आरब्धकार्य व अनारब्धकार्य अशा दोन्ही पुण्य-पापांचा होतो कीं केवल अनारब्धकार्य पुण्यपापांचा?' असा संशय, 'त्या दोहोंचाहि अविशेषानें क्षय ' असा पूर्वपक्ष६७६-७७;**'अनारब्धकार्य०'**या सूत्रानें'जन्मान्तरसंचित व या जन्मीं ज्ञानोत्पत्तीच्या पूर्वी संचित पुण्यपापाचा ज्ञानानें क्षय, पण प्रारब्धकार्य व अर्धभुक्तफल पुण्य-पापांचा ज्ञानानें क्षय नाहीं ' असा सप्रमाण व सदृष्टान्त सिद्धान्त, याविषयीं इतरांनीं विवाद करणेंच युक्त नाहीं ६७८-८०.

—१२ **अग्निहोत्राद्यधिकरण**-[ ६८०–८४ ] ' नित्यनैमित्तिक कर्मे ' हा विषय, 'त्या कर्मांचेहि तसेंच ज्ञानानें अश्लेष-विनाश होतात कीं नाहींत ' असा संशय, 'सुकृतशब्दाला सर्व पुण्यविषयत्व,त्यामुळें अग्निहोत्रादि नित्य-नैमित्तिककर्मांनाहि विनाश्यत्व, म्हणून मुमुक्षूला त्यांचें अननुष्ठेयत्व, ' असा पूर्वपक्ष, **' अग्निहोत्रादि० '** या सूत्रानें ' वैदिक नित्यकर्म हें ज्ञानकार्यासाठींच, म्हणून मुमुक्षूनें त्यांचें अनुष्ठान अवश्य करावें,' असा सिद्धान्त ६८०-८२; ' मोक्ष अनारभ्य, तेव्हां त्याला कर्मकारित्व कसें ' असा संशय व त्याचें समाधान, ' अश्लेष-विनाशवचन व विनियोगवचन यांचा विषय काय?' अशी शंका व ' काम्य पुण्यपाप ' हा त्याचा विषय, इत्यादि **' अतोऽन्यापि० '** या सूत्रानें समाधान ६८३-८४.

—१३ **विद्याज्ञानसाधनत्वाधिकरण**-[ ६८४–८८ ] ' नित्य अग्निहोत्रादि '

हा विषय, 'मुमुक्षूचें विद्यासंयुक्तच कर्म विद्याहेतुत्वानें विद्येशीं एककार्यत्वाला प्राप्त होतें व केवल कर्म होत नाहीं, कीं तीं दोन्हीं एककार्यत्वाला प्राप्त होतात' असा संशय, 'विद्यासंयुक्तच कर्म आत्मविद्याशेषत्वास प्राप्त होतें, विद्याहीन नाहीं' असा श्रुति-स्मृतिप्रमाणांनीं पूर्वपक्ष ६८४-८६; '**यदेव विद्यया०**' या सूत्रानें 'विद्या-संयुक्त कर्म विद्याविहीन कर्माहून श्रेष्ठ, तथापि केवल कर्म अत्यंत अनपेक्ष नाहीं, कारण त्यालाहि वीर्यवत्त्व आहेच,' असा सप्रमाण सोपपत्तिक सिद्धान्त ६८६-८८.

—१४ **इतरक्षपणाधिकरण**-[ ६८८-९० ] 'निर्गुणब्रह्मज्ञानी' हा विषय, 'तो देहपातानंतरहि संसारवान् होतो कीं नाहीं,' असा संशय, 'देहपातानंतरहि संसाराची अनुवृत्ति होईल' असा पूर्वपक्ष, व '**भोगेन०**' या सूत्रानें 'ज्ञानी भोगानें आरब्ध पुण्यपापांचा क्षय करून ब्रह्मरूप होतो,' असा सप्रमाण व सोपपत्तिक सिद्धान्त ६८८-९०.

## अध्याय ४ था. पाद २ रा. पृ. ६९१-७३३.

—१ **वागधिकरण**-[ ६९१-९६ ] या पादाची अध्यायसंगति, उत्क्रांतीचा क्रम, त्यावर आक्षेप, 'वाक् मनामध्यें संपन्न होते,' या वाक्यांतील 'वाक्' हा विषय, 'वृत्तिमती वाक्चीच मनामध्यें संपत्ति, कीं वाग्वृत्तीचीच' असा संशय, 'मनामध्यें वाक्च संपन्न होते' असा सहेतुक पूर्वपक्ष ६९१-९२; 'वाक्-वृत्ति मनामध्यें संपन्न होते' असा '**वाङ्मनसि०**' या सूत्राच्या व्याख्यानानें सिद्धान्त, याविषयीं उपपत्ति, सूत्राच्या अभीष्ट अर्थाचा संक्षेप, पूर्ववाद्याचें सोपपत्तिक खंडन ६९३-९५; '**अत एव०**' या सूत्रानें वाक्च्या न्यायाचाच चक्षुरादिकांमध्यें अतिदेश ६९५-९६.

—२ **मनोधिकरण**-[ ६९६-९९ ] 'मन: प्राणे' हें वाक्य हा विषय, 'त्यांतहि वृत्तिसंपत्तिच विवक्षित आहे कीं वृत्तिमान् मनाची' असा संशय, 'वृत्तिमान् मनाचीच संपत्ति येथें विवक्षित आहे, कारण मनाची प्रकृति प्राण आहे,' असा सोपपत्तिक सप्रमाण पूर्वपक्ष६९६-९७;'**तन्मन:०**'या सूत्रानें 'मन वृत्तिद्वाराच प्राणांत लीन होतें' असा सकारण सिद्धान्त, 'मनाला प्राणप्रकृतिकत्व नाहीं' असें दाखवून पूर्वपक्षाचें खंडन६९८-९९.

—३ **अध्यक्षाधिकरण**-[ ६९९-७०५ ] 'प्राणस्तेजसि' हें वाक्य हा विषय, 'प्राणाचा तेजामध्येंच वृत्त्युपसंहार होतो कीं जीवामध्यें' असा संशय, 'यथाश्रुति प्राणाची तेजामध्यें संपत्ति' असा पूर्वपक्ष ६९९; '**सोऽध्यक्षे०**' या सूत्राच्या व्याख्यानानें 'प्राण सोपाधिक जीवामध्यें वृत्तिरहित होऊन रहातो' असा सिद्धान्त, त्याविषयीं उपगमनादि हेतु व त्यांचें व्याख्यान ७०१; श्रुतिविरोधाची शंका व तिचें समाधान ७००-७०१; '**भूतेषु०**' या सूत्रानें प्राणाची जीवद्वारा तेज:संपत्ति व तिचें उपपादन ७०२; तेज:शब्दानें भूतांतराचा आश्रय, त्याविषयीं '**नैकस्मिन्०**' या सूत्राचें युक्तिपर व्याख्यान, तदनुकूल श्रुति-स्मृतींचा उल्लेख, 'जीवाचें भूताश्रयत्व श्रुत्यंतरविरुद्ध' अशी शंका व कर्माचें बंधप्रयोजकत्वानें व भूतांचें देहोपादानत्वानें आश्रयत्व सांगून विरोधाचा परिहार ७०४-७०५.

—४ **आसृत्युपक्रमाधिकरण**–[ ७०५-७०८ ] ‘ उत्क्रांति ’ हा विषय, ‘ ती विद्वान् व अविद्वान् या दोघांची समान कीं भिन्न ’ असा संशय, ‘ ती भिन्न आहे ’ असा सकारण पूर्वपक्ष७०५-७०६;‘**समाना**०’या सूत्राच्या व्याख्यानानें ‘कर्मी व सगुण उपासक यांची उत्क्रांति एकसारखीच’ असा सकारण व सोपपत्तिक सिद्धान्त७०७-७०८.

—५ **संसारव्यपदेशाधिकरण**–[ ७०८-७१२ ] परादेवतेतील संपत्ति हा विषय ‘ ती नित्य आहे कीं अनित्य आहे ’ असा संशय, ‘ परा देवता प्रकृति असल्यामुळें त्यांतील संपत्ति नित्य आहे ’ असा पूर्वपक्ष, ‘ **तदापीतेः**० ’ या सूत्राच्या व्याख्यानानें ‘ तें तेजादि भूतसूक्ष्म सम्यग्ज्ञानानें संसारमोक्ष होईपर्यंत अवस्थित होतें, त्यामुळें परादेवतासंपत्ति अनित्य आहे ’ असा सप्रमाण, नित्यत्वपक्षीं दोषप्रदर्शनपूर्वक सिद्धान्त, ‘ तर मग तें भूतसूक्ष्म दिसत कां नाहीं ’ इत्यादि शंकेचें ‘**सूक्ष्मं**०’ इत्यादि सूत्रानें सोपपत्तिक निरसन ७०८-७१०; ‘ सूक्ष्मत्वामुळेंच शरीराच्या नाशानें त्याचा नाश होत नाहीं’ असा ‘**नोपमर्देन**०’ या सूत्रानें आणखी एक लाभ७११; ‘**अस्यैव**०’ या सूत्रानें शरीरातील ऊष्मा हा त्या सूक्ष्मदेहाचाच धर्म अशी उपपत्ति ७१२.

—६ **प्रतिषेधाधिकरण**–[ ७१२-७२० ] ‘ निर्गुण ब्रह्मवेत्त्याची उत्क्रांति ’ हा याचा विषय, अधिकरणाचा व्यवहितसंबंध दाखविण्यासाठीं त्याचें तात्पर्य, ‘ ती होते कीं नाहीं ’ अशी शंका, ‘ ज्ञान्याच्या शारीरापासून उत्क्रांतीचा प्रतिषेध, म्हणून त्याचीहि शरीरापासून उत्क्रांति होते’ असा ‘**प्रतिषेधात्**०’ या सूत्रानें पूर्वपक्ष ७१३-१४; ‘**स्पष्टो ह्येकेषां**०’ या सूत्रानें ‘ परब्रह्मवेत्त्याची देहापासून उत्क्रांति होत नाहीं ’ असा सप्रमाण सिद्धान्त ७१५; ‘ तर मग, विद्वानाचें शरीर मरत नाहीं ’ असा आक्षेप घेऊन त्याचें सोपपत्तिक सप्रमाण निरसन ७१६; त्याविषयींच श्रुतीच्या आधारानें आणखी कारण ७१७-१८; ‘ **स्मर्यते**० ’ या सूत्रानें ‘ ब्रह्मवेत्त्याची उत्क्रांति किंवा गति नाहीं’ याविषयीं स्मृतिप्रमाण, शुकाच्या गतीची उपपत्ति ७१९.

—७ **वागादिलयाधिकरण**–[ ७२०–२१ ] ‘ विद्वानांच्या कलांचा प्रविलय ’ हा विषय, ‘ तो पृथिव्यादिकांमध्यें होतो कीं परमात्म्यामध्यें’ असा संशय, तो ‘ पृथिव्यादि प्रकृतींतच होतो ’ असा पूर्वपक्ष, व ‘ **तानि**० ’ या सूत्रानें विद्वानाच्या प्राणाख्य कलांचा परमात्म्यामध्येंच लय होतो ’ असा सप्रमाण सिद्धान्त.

—८ **अविभागाधिकरण**–[ ७२१–२२ ] ‘ विद्वत्कलाविलय ’ हा विषय, ‘ तो सावशेष होतो कीं निर्विशेष ’ असा संशय, ‘ अविद्वानाच्या कलाविलयाप्रमाणेंच तो सावशेष होतो ’ असा पूर्वपक्ष, ‘ **अविभागः**० ’ या सूत्रानें तो निरवशेषच होतो, असा सप्रमाण सिद्धान्त.

—९ **तदोकोऽधिकरण**–[ ७२३–२६ ] ‘ उत्क्रमण करणाऱ्या विज्ञानात्म्याचें हृदयस्थान ’ हा विषय, ‘ उपासक व अनुपासक यांची उत्क्रांति अनियमानें कोणत्याहि द्वारानें होते कीं उपासकाच्या द्वाराचा कांहीं नियम आहे’ असा संशय, ‘श्रुतीच्या

अविशेषामुळें द्वाराचा अनियम आहे ' असा पूर्वपक्ष ७२३-२४; '**तदोक:०**' या सूत्राच्या व्याख्यानानें ' विद्वान् व अविद्वान् या दोघांचें हृदयाग्रप्रद्योतन व त्यानें प्रकाशित झालेलें उत्क्रांतीचें द्वारवत्त्व हीं दोन्हीं जरी समान असलीं तरी विद्यासामर्थ्यामुळें विद्वान् मूर्धस्थानांतूनच उत्क्रमण करितो व इतर अन्यस्थानांतून,'असा सिद्धान्त७२५-२६.

—१० **रश्म्यधिकरण**–[ ७२६-३० ] ' ब्रह्मवेत्याचें रश्म्यनुसारित्व ' हा विषय, ' तें दिवसाच आहे कीं दिवसा व रात्रींहि आहे ' असा संशय, ' अविशेषश्रवणामुळें तें दिवसा व रात्रीं अविशेषानेंच आहे' असा '**रश्म्यनुसारी**' या सूत्रानें सिद्धान्त७२७; त्यावर ' रात्रीं मृत झालेला विद्वान् रश्म्यनुसारी होत नाहीं, कारण त्यावेळीं सूर्याचा अभाव असतो ' असा ' **निशि न०** ' या सूत्रांशानें पूर्वपक्ष आणि 'नाड्या व रश्मि यांचा संबंध देह जीवंत असेपर्यंत असतो, रात्रींहि अल्प किरणानुवृत्ति असते' इत्यादि '**संबंधस्य०**' या सूत्रावयवानें सोपपत्तिक व सप्रमाण सिद्धान्त७२८-२९; 'रात्रीं मरण पावलेल्या विद्वानाचा फलसंबंध नाहीं' अशी शंका व 'मृत्युकालाच्या अनियमामुळें केवल रात्रीं मरणापराधानें विद्या निष्फल होऊं शकत नाहीं' इत्यादि समाधान ७३०.

—११ **दक्षिणायनाधिकरण**–[ ७३०–३३ ] ' दक्षिणायनांत मृत झालेला सगुण-उपासक ' हा विषय, ' तो विद्याफलाला प्राप्त होतो कीं नाहीं ' असा संशय, ' तो विद्याफलाला प्राप्त होत नाहीं ' असा पूर्वपक्ष, ' **अतश्च०** ' या सूत्रानें ' कालांतराची अपेक्षा करणें अनुपपन्न, व विद्येच्या नित्यवत् फलसंबंधाचें श्रवण, या कारणानें दक्षिणायनांतहि मृत झालेला विद्वान् फलास प्राप्त होतो ' असा सिद्धान्त, उत्तरायणाची प्राशस्त्यप्रसिद्धि अविद्वद्विषया, भीष्माचें उत्तरायणपरिपालन आचारपरिपालनार्थ ७३०-३१; 'पण गीतेंत कालप्राधान्यानें उपक्रम' असा संशय व '**योगिन:०**'या सूत्रानें त्याचें समाधान, स्मार्त विद्योपासकांना उद्देशून कालाचें कथन, गीतेंतील सांख्ययोग स्मार्त, त्यांतीलहि अग्न्यादि या आतिवाहिकी देवताच मानल्यास अविरोध७३२-३३.

## अध्याय ४ था. पाद ३ रा. पृ. ७३४–७७९.

—१ **अर्चिराद्यधिकरण**–[ ७३४–४० ] 'उत्तरमार्ग' हा विषय, तो अनेकधा श्रुत, त्याचें उदाहरण, ' या परस्पर भिन्न गति आहेत कीं ती एकच अनेक पर्वयुक्त गति आहे ' असा संशय, भिन्न प्रकरणामुळें व भिन्न उपासनांगत्वामुळें ' ते भिन्न भिन्न मार्ग आहेत' असा पूर्वपक्ष७३४-३६; '**अर्चिरादिना०**' इत्यादि सूत्राच्या व्याख्यानानें 'ब्रह्मलोकाला प्राप्त होण्याची इच्छा करणारे सर्व उपासक अर्चिरादि या एकाच मार्गानें जातात' असा सिद्धान्त, त्यावर आक्षेप व त्याचें सविस्तर सप्रमाण समाधान७३६-४०.

—२ **वाय्वधिकरण**–[ ७४०–४४ ] 'कौषीतकींचा देवयानमार्ग' हा याचा विषय, त्यांतील वायुलोक हा संदिग्ध अंश, ' त्याचा कौषीतकींतील क्रमानेंच अग्निलोकाच्या पुढें संनिवेश करावा कीं संवत्सर व देवलोक आणि आदित्य यांच्यामध्यें करावा' असा संशय, 'पाठक्रमानें त्याचा संनिवेश करावा' असा पूर्वपक्ष७४१; व 'आदित्याच्या पूर्वी

वायूचा संनिवेश करावा असा' '**वायुं०**' या सूत्रानें सप्रमाण सिद्धान्त७४२; त्यावर **पूर्वोक्त** कौषीतकिश्रुतीच्या आधारानें आक्षेप व इतर श्रुतींच्या आधारानें त्याचें निरसन७४३-४४.

—३ **तडिदधिकरण** [ ७४५–४७ ] ' वरुणलोक ' हा विषय, ' तो आर्चिरादिमार्गाच्या पर्वत्वानें संबद्ध होतो कीं नाहीं ' असा संशय, ' विद्युत्‌च्या पुढें अमानव पुरुषाचेंच नेतृत्वश्रवण, वरुणादिकांचा अनुपयोग व त्यांच्या स्थानान्तरांची अनुपलब्धि, या कारणानें वरुणादिकांचा मार्गपर्वत्वानें असंबंध' असा पूर्वपक्ष, '**तडितः०**' या सूत्रानें ' विद्युत्‌च्या पुढें वरुण संबद्ध होतो, कारण विद्युत् व वरुण यांचा अब्द्वारा संबंध आहे, वरुणाच्या पुढें इंद्र-प्रजापतींचा संनिवेश, ' असा सिद्धान्त.

—४ **आतिवाहिकाधिकरण** [ ७४७-५४ ] ' आर्चिरादिक ' हा विषय, ' तीं मार्गचिन्हें, कीं भोगभूमि कीं नेते' असा संशय, 'तीं मार्गचिन्हें आहेत, त्याविषयीं उपपत्ति किंवा लोकशब्दामुळें त्या भोगभूमि आहेत, त्याविषयींहि सप्रमाण उपपत्ति,' असा वैकल्पिक पूर्वपक्ष ७४७-४८; ' **आतिवाहिकाः०** ' या सूत्राच्या व्याख्यानानें ' ते आतिवाहिकच आहेत, ' असा सिद्धान्त, त्याविषयीं लिंग ७४९; ' न्यायाभावीं केवल लिंग असूचक ' अशी शंका व ' **उभयव्यामोहात्०** ' या सूत्रानें आर्चिरादिकांच्या नेतृत्वाची सिद्धि ७५०; त्याचें आक्षेपनिरसनपूर्वक सप्रमाण व सोपपत्तिक उपपादन ७५१-५२; त्यावर ' आतिवाहिकत्वपक्षीं वरुणादिकांच्या आतिवाहिकत्वाचा संभव कसा ' असा आक्षेप, '**वैद्युतेन०**' या सूत्रानें ' वैद्युतच त्यांना ब्रह्मलोकास नेतो व वरुणादिकांना साक्षात् वाहकत्व जरी नसलें तरी त्यांना साह्यकरणानें परंपरेनें तें आहे,' असें समाधान, व 'आर्चिरादिक हे देवतारूप आतिवाहिक आहेत' या सिद्धान्ताचा उपसंहार ७५३-५४.

—५ **कार्याधिकरण**–[ ७५४-७८३ ] ' ब्रह्म ' हा विषय, ' अमानव पुरुष कार्यब्रह्माला पोंचवितो कीं परब्रह्माला' असा संशय, ब्रह्मशब्द व गतिश्रुति हीं संशयाचीं कारणें, ' **कार्यं०** ' या सूत्रानें ' सगुण ब्रह्मालाच पोंचवितो' असा सिद्धान्त, त्याविषयीं ' **विशेषितत्वात्०** ' या सूत्रानें ' ब्रह्मलोकांना ' या बहुवचनानें विशेषितत्व, हें हेत्वंतर ७५४-५६; ' **सामीप्यात्०**' या सूत्रानें ' परब्रह्मसामीप्यामुळें कार्यब्रह्माचा ब्रह्मशब्दानें व्यपदेश ' अशी उपपत्ति ७५७; ' **कार्यात्यये०**' या सूत्रानें ' अनावृत्तिश्रवण, क्रममुक्तीच्या अभिप्रायानें ' असें त्यावरील आक्षेपाचें समाधान, ' **स्मृतेश्च०**' या सूत्रानें क्रममुक्तीविषयीं स्मृतीचें प्रमाण ७५८; '**परं जैमिनिः०**' या सूत्रानें 'ब्रह्मशब्दाच्या मुख्यार्थत्वाचा आश्रय करून परब्रह्माचेंच गंतव्यत्व ' हा पूर्वपक्ष, '**दर्शनाच्च०**' या सूत्रानें ' श्रुति अमृतत्व गतिपूर्वक दाखविते ' असें हेत्वंतर ७६०; ' **न च कार्ये०** ' या सूत्रानें 'स्थानप्राप्तीचा संकल्प कार्यब्रह्माविषयीं नाहीं, तो परब्रह्माविषयींच आहे' असें पूर्वपक्षाचेंच सप्रमाण समर्थन, तथापि ' ती प्राप्ति गतिपूर्वक कशी' अशी शंका घेऊन समाधानपूर्वक पूर्वपक्षाचा उपसंहार ७६२; या अधिकरणांतील ' पुढील सूत्रें हा सिद्धान्त व **पूर्व** सूत्रें हा पूर्वपक्ष' अशी शंका, सूत्रांची व्यवस्था लावण्यासाठीं भूमिका,

प्रकरणसामर्थ्यामुळें गतीला परब्रह्मविषयत्व आहे' असें वाद्याचें म्हणणें, पण 'परविद्या-प्रकरणांतहि तिच्या स्तुतीसाठीं विद्यांतराश्रयगतीचें अनुकीर्तन संभवतें, सगुणब्रह्मामध्येंहि सर्वात्मत्वसंकीर्तन संभवतें म्हणून अपरविषयच गतिश्रुति' असा परिहार ७६३; कित्येक 'परविषयच गतिश्रुति' असें मत प्रस्थापितात, पण तें अयोग्य, कारण सर्वगतादि ब्रह्माच्या गंतव्यत्वाची अनुपपत्ति, त्याविषयीं श्रुतिप्रमाण 'स्वरूपानें प्राप्त ब्रह्माच्याहि गंतव्यत्वाची विकारापत्तित्वानें सिद्धि' अशी दृष्टान्तपूर्वक शंका, दृष्टान्तांतील वैषम्य सप्रमाण दाखवून तिचा परिहार ७६४-६५; 'सर्वशक्तित्वामुळें ब्रह्माचें विशेषवत्त्वानें गंतव्यत्व' या वाद्याच्या म्हणण्याचें निरसन ७६६; 'उत्पत्त्यादिश्रुतींना विशेषनिषेधश्रुतिपरत्व, कारण त्यांना निराकांक्षत्व, त्याविषयीं श्रुतिप्रमाण व विद्वदनुभव, द्वैतनिंदा, त्यामुळेंहि अद्वैताला प्रतिपाद्यत्व, उत्पत्त्यादिश्रुतींना निराकांक्ष ज्ञानोत्पादकत्व नाहीं,' श्रुतीवरून त्यांचें अन्यार्थत्व, म्हणून गति परब्रह्मविषय नाहीं ७६७-६९; गंत्या जीवाच्या स्वरूपाचें आलोचन केलें असतांहि परब्रह्मविषय गति नाहीं, याविषयीं 'जीव ब्रह्माचा अवयव कीं विकार की त्याहून अन्य,' इत्यादि विकल्पपूर्वक सविस्तर विचार ७७०-७२; 'संसाराला कर्मनिमित्तत्व, कर्माच्या अभावीं त्याचा अभाव, त्यामुळें मुक्ति अनायासानें सिद्ध' या मताचें सविस्तर खंडन ७७५; 'नित्य-नैमित्तिक कर्मांचें प्रत्यवायानुत्पत्तीहून भिन्न फल नाहीं,'या म्हणण्याचें आपस्तंबस्मरणानें निरसन,सम्यग्दर्शनावाचून केवल काम्य-निषिद्धकर्मवर्जनानें कैवल्यसिद्धि होत नाहीं, ज्ञानगम्यब्रह्मात्मत्व न मानिल्यास कर्तृ-भोक्तृस्वभाव आत्म्याच्या कैवल्याची आशा नको, केवल शक्ति विद्यमान असतांना तिच्या कार्याचा परिहार संभवत नाहीं ७७६-७८;'जीव परमात्म्याहून अभिन्न असल्यास सर्व व्यवहार-लोपादि दोष व ज्ञानापूर्वी स्वप्नाप्रमाणें व्यवहारादिसिद्धि' असा त्याचा परिहार ७७९; सगुणविद्याविषय गतिश्रुति, या स्वमताचें सोपपत्तिक विवरण ७८०-८१; 'तर मग ब्रह्में दोन कीं काय?' असा आक्षेप, व 'होय,एक कल्पित नामरूपादियुक्त व दुसरें निर्विशेष' असें समाधान, त्यावर 'अद्वैतश्रुतीचा बाधप्रसंग' हा दोष व त्याचें सोपपत्तिक निरसन, सर्वगत आत्म्याचीहि औपाधिक गमनप्रसिद्धि, म्हणून पूर्वसूत्रें हाच सिद्धान्त व पुढील सूत्रें हा बुद्धि विकासनासाठीं पूर्वपक्ष,असा अधिकरणोपसंहार ७८२-८३.

——६ **प्रतीकालंबनाधिकरण**–[ ७८३-८७ ] पूर्वोत्तरअधिकरणसंबंध, 'अमानव पुरुष' हा विषय,'तो सर्व विकारालंबन उपासकांना ब्रह्मलोकीं नेवून पोंचवितो कीं कांहीं उपासकांनाच?' असा संशय, 'अनियमाधिकरणन्यायानें तो सर्वच उपासकांना ब्रह्मलोकीं पोंचवितो,' असा पूर्वपक्ष ७८३-८४; '**अप्रतीकालंबनान्**०' या सूत्राच्या व्याख्यानानें 'अप्रतीकालंबनांनाच तो ब्रह्मलोकीं नेतो' असा सिद्धान्त ७८७.

## अध्याय ४ था. पाद ४ था. पृ. ७८८–८२५.

——१ **संपद्याविर्भावाधिकरण**–[ ७८८–९४ ] 'स्वरूपाभिनिष्पत्ति' हा विषय, 'ज्ञानी अनित्य विशेषानें अभिनिष्पन्न होतो कीं आत्ममात्ररूपानें' असा संशय, 'तो

अनित्य विशेषानें अभिनिष्पन्न होतो ' असा सकारण पूर्वपक्ष, '**संपद्याविर्भावः०**' या सूत्रानें 'स्वप्रकाश आत्म्याला साक्षात् जाणून त्याच आत्ममात्ररूपानें आविर्भाव होतो,' कारण '**स्वेन रूपेण**' असें त्याला विशेषण दिलें आहे, 'पण स्वशब्द आत्मीय या अर्थी आहे' या आक्षेपाचें निरसन ७९०; 'तर मग पूर्वावस्था व ज्ञानोत्तर अवस्था यांमध्यें फरक काय ?' असा आक्षेप व '**मुक्तः०**' या सूत्रानें ' तो ज्ञानी सर्वबंधविनिर्मुक्त होऊन शुद्ध आत्मरूपानें अवस्थित होतो, कारण तसें प्रतिज्ञान आहे, ' त्या प्रतिज्ञानाचेंच सप्रमाण प्रतिपादन ७९२; ' ज्योतीला उपसंपन्न झालेला मुक्त कसा ' अशी शंका, व 'येथील ज्योति आत्माच आहे,' असें '**आत्मा०**' या सूत्रानें सप्रमाण समाधान ७९३-९४.

—२ **अविभागेन दृष्टत्वाधिकरण**–[ ७९४–९६ ] ' स्वरूपानें अभिनिष्पन्न होणारा ज्ञानी ' हा विषय, ' तो परमात्म्याहून पृथकूच आहे कीं अविभागानें अवस्थित होतो ' असा संशय, ' तो परितः संचार करितो, ज्योतीला उपसंपन्न होतो, इत्यादि भेदनिर्देशामुळें पृथक्च आहे ' असा पूर्वपक्ष, '**अविभागेन०**' या सूत्रानें 'मुक्त परमात्मरूपानेंच अवस्थित होतो,' असा सिद्धान्त, त्याविषयीं श्रुति व तत्क्रतुन्याय.

—३ **ब्राह्माधिकरण**–[ ७९६–९९ ] ' मुक्ताचें ब्रह्मरूपानें अवस्थान ' हा विषय, ' तें सप्रपंच आहे कीं निष्प्रपंच, किंवा सप्रपंच व निष्प्रपंचहि ? ' असा संशय, ' दोन प्रकारच्या श्रुतींच्या मुख्यार्थत्वासाठीं तो उभयरूप आहे ' असा पूर्वपक्ष, त्याविषयीं '**ब्राह्मेण०**' या सूत्रानें उपन्यासादि कारणें ७९६-९७; '**चितितन्मात्रेण०**' या सूत्रानें जीवात्म्याला चैतन्यात्मकत्व असल्यामुळें चैतन्यरूपानें अवस्थित असलेल्या मुक्त ब्रह्मामध्यें सर्वज्ञत्वादिशब्द अर्थशून्य योजिले जातात ' असें पूर्वपक्षांतर '**एवं**' इत्यादि सूत्रानें 'पारमार्थिक चैतन्यमात्र स्वरूपाचा स्वीकार जरी केला तरी उपन्यासादिकांमुळें पूर्व ब्रह्मस्वरूपाच्या व्यावहारिक सर्वज्ञत्वादिकांचें अस्तित्व, त्यामुळें मुक्तात्म्या ब्रह्माच्या सप्रपंच-निष्प्रपंचत्वाचा विरोध नाहीं ' असा सिद्धान्त ७९८-९९.

—४ **संकल्पाधिकरण**–[ ८००–८०३ ] तीन अधिकरणांनीं परविद्याफल सांगून अपरविद्याफल कथनास आरंभ–' ब्रह्मोपासकाचा संकल्प ' हा विषय, ' केवल संकल्पच त्याच्या पित्रादिकांच्या समुत्थानाचा हेतु कीं कांहीं निमित्तासह संकल्पच त्याचा हेतु ' असा संशय, ' संकल्पादेव ' असें जरी श्रवण असलें तरी ' लोकव्यवहाराप्रमाणें त्याला अन्य निमित्ताची अपेक्षा असते ' असा सोपपत्तिक पूर्वपक्ष ८००-१; 'केवल संकल्पापासूनच त्यांच्या पित्रादि भोगांचें समुत्थान होतें, कारण तशी श्रुति आहे,' इत्यादि '**संकल्पात्०**' या सूत्रव्याख्यानानें सयुक्तिक सिद्धान्त, '**अत एव०**' या सूत्रानें विद्वानाच्या सत्यसंकल्पामध्यें अनन्याधिपतित्व हें लाभांतर ८०२-३.

—५ **अभावाधिकरण**–[ ८०४–८०९ ] ' शरीरेंद्रियें ' हा विषय, मुक्ताचीं तीं आहेत कीं नाहींत ' इत्यादि संशय, '**अभावं०**' या सूत्रानें ' तीं नाहींत ' असा एक व '**भावं**' या सूत्रानें 'तीं आहेत' असा दुसरा, असे दोन पूर्वपक्ष ८०४-६; '**द्वा-**

**दशाहवत्०** ' या सूत्रानें 'लिंगद्वय असल्यामुळें विद्वानाच्या संकल्पाप्रमाणें त्याला सशरीरत्व व अशरीरत्व आहे,' असा सिद्धान्त ८०७; ' **तन्वभावे०** ' या सूत्रानें शरीरेंद्रियांच्या अभावीं त्यांचा स्वप्नाप्रमाणें मानस विषयभोग, व भावे या सूत्रानें शरीरेंद्रियांच्या भावसमयीं जागरिताप्रमाणें भोग ८०८-९.

—६ **प्रदीपाधिकरण**–[ ८०९–१४ ] ' मुक्तांची उक्त सांकल्पिक शरीरें ' हा विषय, ' तीं सात्मक असतात कीं निरात्मक ' असा संशय, ' निरात्मक असतात ' असा पूर्वपक्ष, ' **प्रदीप०** ' इत्यादि सूत्रानें 'त्या निर्मित शरीरांमध्यें विद्यासामर्थ्यामुळें आत्म्याची अभिव्यक्ति संभवते ' असा सप्रमाण सिद्धान्त, त्या अनेक शरीरांतील मनें एका मुख्य मनाच्या अधीन असतात, त्यामुळें हें संभवतें, याविषयीं योगशास्त्राची प्रक्रिया ८०९-१२; 'मुक्ताचें हें ऐश्वर्य विशेषविज्ञानप्रतिषेधक श्रुतींच्या विरुद्ध आहे ' अशी शंका, ' **स्वाप्यय०** ' या सूत्रानें तिचें सप्रमाण निरसन ८१३-१४.

—७ **जगव्द्यापाराधिकरण**–[ ८१४–८२५ ] 'ब्रह्मसायुज्यास प्राप्त झालेल्या विद्वानाचें ऐश्वर्य' हा विषय, ' तें निष्प्रतिबंध असतें कीं सप्रतिबंध असतें' असा संशय, ' तें निरंकुशच असणें युक्त आहे ' असा पूर्वपक्ष, ' **जगव्द्यापार०**' या सूत्रानें 'त्यांचें ऐश्वर्य जगव्द्यापाररहित आहे, कारण जगव्द्यापार हें परमेश्वराचेंच कार्य आहे, सृष्टिवाक्यांत परमेश्वरच प्रकृत व विद्वान् अप्रकृत ' असा सिद्धान्त ८१४-१७; ' **प्रत्यक्षोपदेशात्** ' या सूत्रानें पूर्वपक्षाच्या बीजाचा अनुवाद व त्याचें निरसन ८१७-१८; 'पण निरतिशय ऐश्वर्यवान् ईश्वराची उपासना करून तदात्मतेस प्राप्त झालेल्या उपासकांचें ऐश्वर्य सातिशय असणें युक्त नाहीं ' अशी शंका, व 'ब्रह्माला ऐक्य जरी असलें तरी सगुणप्राप्तांना निर्गुणप्राप्ताचा जसा अभाव, त्याचप्रमाणें हेंहि युक्त,' असें सांगण्यासाठीं ' **विकारावर्ति०** ' या सूत्रानें ब्रह्माचे द्वैरूप्यकथन ८१९; ' **दर्शयतश्च०** ' या सूत्रानें त्याविषयीं श्रुति-स्मृतिप्रमाण ८२०; ' **भोगमात्र०** ' या सूत्रानें अपरब्रह्मवेत्त्यांच्या जगत्स्रष्टृत्वादि-अभावाविषयीं भोगमात्रसाम्य, हें लिंगान्तर ८२१; 'तर मग तें त्यांचें ऐश्वर्य विनाशी असेल, व त्यामुळें पुनरावृत्तीचा प्रसंग येईल, ' अशी शंका, व ' **अनावृत्तिः०** ' या सूत्रानें 'अर्चिरादि-मार्गानें ब्रह्मलोकाला प्राप्त झालेल्या विद्वानाची अनावृत्तिच,कारण त्याची क्रममुक्ति सांगणारी श्रुति आहे'असा सिद्धान्तोपसंहार८२२-२५.

---

॥ ॐ तत्सत् ॥

# ब्रह्मसूत्रशारीरभाष्यार्थ

[ मूळ सूत्र, सूत्रार्थ, शांकर भाष्य, अवतरणें, स्पष्टीकरण, व भामत्यादि टीकाकारांचा अधिक आशय व्यक्त करणाऱ्या टीपा, यांसह ]

## साधनाख्यतृतीयाध्याये प्रथमः पादः ।

( १. तदन्तरप्रतिपत्त्यधिकरण. सू. १-७)

—जीवाचीं उपकरणभूत भूतें व भौतिक कार्यें यांच्या जन्मादिकांचें निरूपण केल्यानंतर तदुपहित—त्या उपाधीनें युक्त अशा जीवाच्या संसारप्रकाराचें निरूपण करण्यासाठीं सूत्रकार देहान्तराच्या आरंभीं भूतसूक्ष्मांनीं परिवेष्टित अशाच जीवाचें गमन होतें, असें अगोदर 'तदन्तरप्रतिपत्तौ०' इत्यादि सूत्रानें सांगतात—

**सूत्रं -- तदन्तरप्रतिपत्तौ रंहति संपरिष्वक्तः प्रश्ननिरूपणाभ्याम् ॥१**

**सूत्रार्थ** —'तदन्तरप्रतिपत्तौ'—देहान्तरप्राप्तीच्या वेळीं जीव '**संपरिष्वक्तः**'—शरीराचा आरंभ करणाऱ्या भूतसूक्ष्मांनीं परिवेष्टित होऊन 'रंहति'—जातो. कोणत्या कारणानें? 'प्रश्न व त्याचें प्रतिवचन यांवरून'—पंचाग्निविद्येंतील 'आप पांचवी आहुति दिली असतां पुरुषाकार कशा होतात तें तूं जाणतोस का?' असा प्रश्न व 'याप्रमाणें आप पुरुषवचस होतात,' असें उत्तर, यांवरून तो भूतसूक्ष्मपरिवेष्टित होऊन जातो, असा निश्चय होतो. १.—सु.ब्र. २९३—[—दुसरा व तिसरा या दोन—पूर्वोत्तर अध्यायांचा हेतु-हेतुमद्भावसंबंध सांगण्यासाठीं भाष्यकार '**द्वितीये०**' इत्यादि भाष्यानें पूर्वाध्यायाचा अर्थ संक्षेपानें सांगतात—]

**भाष्यं—द्वितीयेऽध्याये स्मृतिन्यायविरोधो वेदान्तविहिते ब्रह्मदर्शने परिहृतः परपक्षाणां चानपेक्षत्वं प्रपंचितम् । श्रुतिविप्रतिषेधश्च परिहृतः । तत्र च जीवव्यतिरिक्तानि तत्त्वानि जीवोपकरणानि ब्रह्मणो जायन्त इत्युक्तम् ॥**

**भाष्यार्थ**—दुसऱ्या अध्यायांत वेदान्तविहित ब्रह्मदर्शनांतील स्मृति-न्यायविरोधाचा परिहार केला व परपक्षांचें अनपेक्षत्व सविस्तर सांगितलें आणि श्रुतींच्या परस्पर विरोधाचाहि परिहार केला. [ सर्ववेदान्तांच्या ब्रह्मांतील निरपवाद समन्वयावर येणाऱ्या स्मृति-न्याय-श्रुतिविरोधाच्या परिहारानें अनिश्चयरूप अप्रामाण्याचा अभाव झाल्यामुळें आतां तिसऱ्या अध्यायांतील साधनांच्या विचाराला अवकाश मिळेल—आतां त्यांचा विचार करणें उचित होईल, याप्रमाणें या दोन पूर्वोत्तर अध्यायांची संगति आहे, असा भावार्थ.—आतां अनन्तर—नुकत्याच संपलेल्या दुसऱ्या अध्यायाच्या चवथ्या पादाशीं याची संगति सांगण्यासाठीं त्यांतील अर्थाचा अनुवाद ' तत्र च० ' या भाष्यानें करितात—]=आणि त्या पूर्वाध्यायाच्या शेवटच्या पादांत जीवाहून व्यतिरिक्त—भिन्न असलेलीं जीवोपकरणभूत तत्त्वें—जीवाचीं इंद्रियादि-उपकरणें ब्रह्मापासून उत्पन्न होतात, असें सांगितलें. [ त्यामुळें आतां त्या उपकरणांनीं—उपाधींनीं युक्त असलेल्या उपहित जीवाच्या संसारप्रकाराचा विचार प्राप्त होतो, असा याला शेष लावावा.—आतां सौकर्यासाठीं तिसऱ्या अध्यायाचा अर्थ—प्रतिपाद्य विषय ' अथ० ' इत्यादि भाष्यानें पादशः विभाग करून दाखवितात—]

**भाष्यं—अथेदानीं उपकरणोपहितस्य जीवस्य संसारगतिप्रकारः, तदवस्थान्तराणि ब्रह्मसतत्त्वं विद्याभेदाभेदौ गुणोपसंहारानुपसंहारौ सम्यग्दर्शनात्पुरुषार्थसिद्धिः सम्यग्दर्शनोपायविधिप्रभेदो मुक्तिफलानियमश्च।इत्येतदर्थजातं तृतीयेऽध्याये निरूपयिष्यते। प्रसंगागतं च किमप्यन्यत् ॥**

**भाष्यार्थ**—त्यानंतर आतां उपकरणोपहित—त्या सर्व उपकरणरूप उपाधींनें युक्त अशा जीवाच्या संसारगतीचा प्रकार, [—याप्रमाणें वैराग्यपादाच्या विषयाचा संग्रह करून **'तदवस्था०'** इत्यादि भाष्यानें दुसऱ्या पादाच्या अर्थाचा संग्रह करितात—]=जीवाच्या निरनिराळ्या स्वप्नादि-अवस्था व ब्रह्मस्वरूप, [ संसारापासून विरक्त झालेल्या मुमुक्षूला मोक्षाचें साधन असें जें अपरोक्ष वाक्यार्थज्ञान, त्याचें साधन असें जें लक्ष्य पदार्थज्ञान तें होण्यासाठीं जीवाच्या निरनिराळ्या अवस्था व ब्रह्मस्वरूप यांचें निरूपण केलें जातें. असा भावार्थ.—**' विद्याभेदाभेदौ० '** इत्यादि भाष्यानें तिसऱ्या पादाचा अर्थ सांगतात—]=विद्येचा म्ह० उपासनेचा भेद व अभेद, त्यांमध्यें गुणांचा उपसंहार व अनुपसंहार; [ निर्गुणब्रह्मवाक्यांतील अपुनरुक्त पदांचा उपसंहार—संग्रह करण्यासाठीं व मंद अधिकाऱ्यांच्या सगुणोपासनेचें एकरूपत्व सांगण्यासाठीं सर्वशाखांमध्यें विद्या भिन्न आहे कीं अभिन्न आणि

त्यांत परस्पर गुणांचा उपसंहार करावा कीं नाहीं, असा विचार केला जातो, असा भावार्थ.–'सम्यग्दर्शनात्०' इत्यादि भाष्यानें चतुर्थपादाचा अर्थ सांगतात–] =सम्यग्दर्शनापासून पुरुषार्थाची सिद्धि होते, सम्यग्दर्शनाचा उपायविधिप्रभेद, व मुक्तिफलाचा अनियम, [विरक्त, 'तत्' व 'त्वं' या पदांच्या लक्ष्य अर्थाला जाणणाऱ्या व सर्वशाखांतील अपुनरुक्त शब्दांच्या उपसंहारानें एकरूपवाक्यज्ञानवान्, अशा पुरुषाचें जें ज्ञान तेवढ्या ज्ञानानेंच पुरुषार्थ होतो, त्या ज्ञानाचे हेतु–निमित्तें–साधनें असे जे यज्ञादिविधि व शमादिविधि त्यांचा बहिरंगत्व व अन्तरंगत्व हा भेद, ज्यांचें चित्त शुद्ध झालें आहे अशा मुमुक्षूंनीं बहिरंग साधनांचा त्याग करून अन्तरंग साधनांचें ग्रहण करावें, म्हणून सांगितला जातो. ज्या जन्मांत ज्ञानसाधनांचें अनुष्ठान केलें जातें त्याच जन्मांत ज्ञानाचा उदय होऊन मुक्ति मिळते, असा नियम नाहीं. कारण जन्मान्तरांतील संस्कारालाहि ज्ञानहेतुत्व आहे, असा भावार्थ.–याप्रमाणें अध्यायार्थाचा संक्षेपानें 'इत्येतद०' इत्यादि भाष्यानें संग्रह करून निगमन–]= असें हें अर्थजात तृतीयाध्यायांत निरूपण केलें जाईल. [–"अहोपण, या अध्यायांत लोकायतिक मताचें निरसनहि यापेक्षां अधिक आहे" अशी आशंका घेऊन 'प्रसंग०' इत्यादि भाष्यानें म्हणतात–]=आणि प्रसंगानें प्राप्त झालेलें असें दुसरेंहि कांहीं या अध्यायांत प्रतिपादिलें जाईल. [–याप्रमाणें अध्यायार्थाचा संक्षेप करून पादार्थाचा संक्षेप 'तत्र प्रथमे०' इत्यादि भाष्यानें करितात––]

**भाष्यं**––तत्र प्रथमे तावत्पादे पंचाग्निविद्यामाश्रित्य संसारगतिप्रभेदः प्रदर्श्यते वैराग्यहेतोः । 'तस्माज्जुगुप्सेत' इति चान्ते श्रवणात् ॥

**भाष्यार्थ**––या अध्यायाच्या पहिल्या पादांत अगोदर पंचाग्निविद्येचा आश्रय करून संसारगतीचा प्रभेद प्रदर्शित केला जातो. [द्युलोक, पर्जन्य, पृथिवी, पुरुष व स्त्री यांच्या ठिकाणीं अग्नीची दृष्टि ठेवून उपासना–चिंतन करणें ही पंचाग्निविद्या आहे. तिचा आश्रय करून संसारांतील पुण्य-पापफलांसाठीं जो गतीचा प्रकार त्याचें येथें निरूपण केलें जातें, असा याचा भावार्थ. 'तो पुण्य-पापफलांच्या गतीचा प्रकारहि येथें केवळ प्रदर्शित केला जातो, त्याचें प्रतिपादन केलें जात नाहीं,' अशा आशयानें भाष्यांत 'प्रदर्श्यते' असें म्हटलें आहे.–"अहोपण, येथें–या साधनाध्यायांत पुरुषार्थाच्या साधनांचेंच निरूपण करणें उचित आहे, असें असतांना संसारगतीचें प्रदर्शन कशासाठीं केलें जात आहे? 'वैराग्यहेतोः०' या भाष्यानें उत्तर–] =वैराग्यासाठीं संसारगतीचें प्रदर्शन केलें जातें. [ज्यांत अनेक आयास आहेत असें कर्म करून सुद्धां स्वातंत्र्य कोठेंच मिळत नाहीं. त्यामुळें कर्म व त्याचें फल हीं

दोन्ही व्यर्थ आहेत, तीं आतां पुरे झालीं, अशा वैराग्यासाठीं असा भावार्थ. —" अहोपण, या प्रकरणांत पंचाग्निविद्योपासनेचें विधान केलें जातें. वैराग्यासाठीं संसारगति सांगितली जात नाहीं. " अशी आशंका घेऊन 'पण या प्रकरणाच्या उपसंहाराचें आलोचन केलें असतां येथें संसारगतिच विवक्षित आहे, असा निश्चय होतो ' असें **'तस्मात्०'** इत्यादि भाष्यानें सांगतात—]=' तस्मात्'—ज्याअर्थी कर्मफलभूत संसार गति-आगतिरूप—परलोकीं जाणें व इहलोकीं येणें, एतद्रूप अनर्थ आहे त्याअर्थी विद्वानानें कर्मफलाविषयीं जुगुप्सा—घृणा करावी, त्याची निंदा करावी—त्याला कंटाळावें, असें पंचाग्निविद्येच्या उपसंहारांत श्रवण असल्यामुळें येथें वैराग्यासाठीं संसारगति सांगितलेली आहे. [ यद्यपि विरक्तालाच वेदान्तशास्त्रविचाराचा अधिकार असल्यामुळें वैराग्य हें अधिकाऱ्याचें विशेषण शास्त्राच्या आरंभींच सिद्ध आहे—अ. १. पृ. ६४—तथापि तेंच युक्तीनें दृढ केलें जातें, असा भावार्थ.—याप्रमाणें आद्य पादाचें तात्पर्य सांगून त्याचा अवयव असें जें आद्य अधिकरण त्याचा विषय ' जीवो मुख्यप्राणसचिवः०' इत्यादि भाष्यानें सांगतात—]

**भाष्यं—जीवो मुख्यप्राणसचिवःसेन्द्रियःसमनस्कोऽविद्याकर्मपूर्वप्रज्ञापरिग्रहः पूर्वदेहं विहाय देहान्तरं प्रतिपद्यत इत्येतदवगतम् । ' अथैनमेते प्राणा अभिसमायन्ति' इत्येवमादेः ' अन्यन्नवतरं कल्याणतरं रूपं कुरुते ' इत्येवमन्तात्संसारप्रकरणस्थाच्छब्दात् । धर्माधर्मफलोपभोगसंभवाच्च ॥**

**भाष्यार्थ**—जीव [—देहान्तरप्राप्तीमध्यें त्याच्या सहायाचें—सहगमनकर्त्याचें अस्तित्व सांगतात—]=' मुख्यप्राणसचिव '—मुख्य प्राण हा ज्याचा सचिव—सहाय—सहगमनकर्ता—साह्यकर्ता आहे असा जीव इंद्रियांसह व मनासह असा होत्साता [—त्याचें प्रधानकारण सांगतात—]=**'अविद्या कर्म-पूर्वप्रज्ञापरिग्रह:'**—अविद्या, कर्म, पूर्वप्रज्ञा हे ज्याचे परिग्रह आहेत, असा तो जीव पूर्व देहाला टाकून दुसऱ्या देहाला प्राप्त होतो, असें अवगत झालें. [ अनादि, अनिर्वाच्य, चित्प्रतिबिंबाच्या निमित्तत्वानें जीवत्वाचें कारण, अशी अविद्या; शुभ, अशुभ व व्यामिश्र असें कर्म व दुसऱ्या जन्मांतील संस्कार ही पूर्वप्रज्ञा, ज्याच्या संसरणांत हे परिग्रह म्ह० प्रधानभूत आहेत तो जीव अविद्या-कर्म-पूर्वप्रज्ञापरिग्रह होय. —'अहोपण, जें प्रमित—प्रमाणानें ज्ञात झालेलें असतें त्यालाच विषयत्व असतें. पण याविषयीं प्रमाण काय आहे?" 'अथ० ' इत्यादि वाक्यानें उत्तर—]=' अथ० '—" देहान्तरप्राप्तीची इच्छा झाली असतां त्यानंतर हे वागादिक प्राण या आत्म्यास आभिमुख्यानें निःशेष प्राप्त होतात "—बृ. ४. ४. १. सु.उ. ६८८—या अशा प्रकारच्या ग्रंथापासून—येथून" दुसरें

अधिक नवें व पहिल्यापेक्षां अधिक चांगलें रूप निर्माण करितो"–बृ. ४. ४. ४. सु. उ. ६९०–येथपर्यंतच्या संसारप्रकरणांतील शब्दावरून, असें अवगत झालें. [–केवळ शब्दावरूनच जीवाचें संसरण अवगत होत नाहीं तर युक्तितःहि तें अवगत होतें, असें 'धर्माधर्म०' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=आणि जीवसंसरणामुळेंच धर्माधर्मफलांच्या उपभोगाचा संभव आहे, त्यावरून हि जीवसंसार अवगत होतो. [ नियत देश व काल यांतील फलाच्या उपभोगाचीहि देहान्तरसंचरणावांचून उपपत्ति लागत नसल्यामुळ त्याची सिद्धि होते–देहान्तरसंचरण सिद्ध होतें, असा भावार्थ.–देहान्तरांत संचार करणाऱ्या जीवाला विषय करून म्ह०जीवाविषयीं वाद्यांची विप्रतिपत्ति असल्यामुळे 'स किं०' इत्यादि भाष्यानें संदेह सांगतात—]

**भाष्यं—स किं देहबीजैर्भूतसूक्ष्मैः असंपरिष्वक्तो गच्छति आहोस्वित्संपरिष्वक्त इति चिन्त्यते । किं तावत्प्राप्तम् । असंपरिष्वक्त इति । कुतः । करणोपादानवद्भूतोपादानस्याश्रुतत्वात् ॥**

**भाष्यार्थ**—तो जीव भावी देहाचीं बीजें अशा भूतसूक्ष्मांनीं असंपरिष्वक्त–अपरिवेष्टित होऊन जातो कीं संपरिष्वक्त–परिवेष्टित होऊन जातो याचा विचार केला जातो. [यांतील पहिल्या पक्षीं म्ह० भावी देहाच्या बीजभूत सूक्ष्मभूतांनीं परिवेष्टित न होतांच तो जातो यापक्षीं निराश्रय–आश्रयरहित प्राणांच्या गतीचा अभाव असल्यामुळें संसाराविषयीं वैराग्य प्राप्त होणार नाहीं. दुसऱ्या म्ह० भूतपरिवेष्टितपक्षीं नरकादिगतीपासून वैराग्य संभवतें, असें या दोन्ही पक्षां फल आहे. या अधिकरणांत जीवाच्या भूतपरिवेष्टितगमनाच्या निरूपणानें वैराग्य दृढ केलेलें असल्यामुळें 'अधिकाऱ्याची सिद्धि झाली असतां त्याची शास्त्रांत प्रवृत्ति' अशी पादादिसंगति आहे, असें स्वीकारून, 'किं तावत्०' इत्यादि भाष्यानें पूर्वपक्ष–]=मग या दोन पक्षांतील प्रथम कोणता पक्ष प्राप्त झाला ? 'असंपरिष्वक्तः'–जीव भूतसूक्ष्मांनीं परिवेष्टित न होतां जातो, हा पक्ष प्राप्त झाला. [–पण इंद्रियांनीं जसें तसेंच भूतसूक्ष्मांनींहि परिवेष्टित झालेल्याच जीवाचें गमन होतें, अशी शंका–]='कुतः'–कोणत्या कारणानें? [–इंद्रियें व भूतें यांतील वैषम्य दाखविणारा वादी 'करणोपादानवत्०' इत्यादि भाष्यानें उत्तर सांगतो–]=कारण त्याच्या करणोपादानाप्रमाणें भूतोपादानाचें श्रवण नाहीं. [–'स एताः०' इत्यादि वाक्यानें इंद्रियोपसंग्रहाविषयीं प्रमाण—]

**भाष्यं—'स एतास्तेजोमात्राः समभ्याददानः' इति ह्यत्र तेजोमात्राशब्देन करणानामुपादानं संकीर्तयति । वाक्यशेषे चक्षुरादिसंकीर्तनात् । नैवं भूतमात्रो-**

**पादानसंकीर्तनमस्ति । सुलभाश्च सर्वत्र भूतमात्राः । यत्रैव देह आरब्धव्यस्तत्रैव सन्ति । ततश्च तासां नयनं निष्प्रयोजनम् । तस्मादसंपरिष्वक्तो यातीति ॥**

**भाष्यार्थ**—कारण "तो ह्या तेजोमात्रांचें चांगल्या प्रकारें सर्वतः ग्रहण–उपसंहार करणारा "–बृ.४.४.१.सु.उ.६८७असें हें येथें तेजोमात्राशब्दानें करणांचें उपादान श्रुति सांगते. [–येथील तेजोमात्राशब्दाला करणविषयत्व आहे–त्याचा करणें–इंद्रियें हा अर्थ आहे, याविषयीं वादी '**वाक्यशेषे०**' इत्यादि भाष्यानें हेतु सांगतो–] =कारण वाक्यशेषांत–त्याच वाक्यांत पुढें ' स यत्रैष चाक्षुषः पुरुषः०'–पृ.६८७ –येथें चक्षुरादि इंद्रियांचें संकीर्तन–कथन केलें आहे. [–" अहोपण, प्रश्न व प्रतिवचन यांवरून आपांचें गमन अवगत होत असतांना भूतमात्रांच्या उपादानाचें असंकीर्तन–अकथन कसें?" '**नैवं०**' इत्यादि भाष्यानें उत्तर–]=पण तसें भूतमात्रांच्या उपादानाचें–ग्रहणाचें संकीर्तन नाहीं. [ ' आपः पुरुषवचसः भवन्ति ' –आप पुरुषसंज्ञक होतात, या वचनांत आपांचा केवळ पुरुषवचनक्रियायोग भासतो. पुरुषाचें उपादानग्रहण भासत नाहीं. शिवाय पांची स्थानांमध्यें आपांचें गमन नाहीं. कारण इतर स्थानीं श्रद्धादिकांचें होम्यत्व अवगत होतें. यद्यपि इंद्रियांना भौतिकत्व असल्यामुळें त्यांच्या–इंद्रियांच्या उपादानश्रुतीनेंच भूतांचें उपादान अर्थात् प्राप्त होतें, तथापि इंद्रियांचें उपादान कारण अशा अपंचीकृत भूतांशांहून अन्य भूतांच्या विवक्षेनें हें अश्रुतत्व आहे, असा भावार्थ.–" अहोपण, भूतांवांचून जीवाच्या दुसऱ्या देहाचा आरंभ उपपन्न होत नाहीं. म्हणून भूतपरिवेष्टित जीवाचेंच गमन होतें, " अशी आशंका घेऊन वादी ' **सुलभाश्च०** ' इत्यादि म्हणतो–]=आणि भूतमात्रा सर्वत्र सुलभ आहेत. जेथें देहाचा आरंभ करावयाचा असतो तेथेंच त्या आहेत. त्यामुळें त्यांचें नयन–त्यांना बरोबर नेणें निष्प्रयोजन–व्यर्थ आहे. [–याप्रमाणें भूतपरिष्वंगाविषयीं–जीव भूतवेष्टित–भूतसूक्ष्मांनीं युक्त होऊन जातो, याविषयीं प्रमाण व फल यांचा अभाव सिद्ध झाला असतां ' **तस्मात्०** ' इत्यादि भाष्यानें फलिताचा उपसंहार–]=' तस्मात् '–भूतपरिष्वंगाविषयीं कांहीं प्रमाण नसल्यामुळें व त्याचें कांहीं फलहि नसल्यामुळें जीव त्यांनीं–देहबीज भूतसूक्ष्मांनीं अपरिष्वक्तच– अपरिवेष्टित होऊनच जातो, '**इति**'–असें प्राप्त होतें. [–'**एवं०**' इत्यादि भाष्यानें पूर्वपक्षाचा अनुवाद करून व सूत्रोक्त प्रतिज्ञेला अवतरण देऊन तिचें व्याख्यान करितात—]

**भाष्यं—एवं प्राप्ते पठत्याचार्यः–'तदन्तरप्रतिपत्तौ रंहति संपरिष्वक्तः' इति । तदन्तरप्रतिपत्तौ देहादेहान्तरप्रतिपत्तौ देहबीजैर्भूतसूक्ष्मैः संपरिष्वक्तो रंहति**

**गच्छतीत्यवगन्तव्यम् । कुतः । प्रश्ननिरूपणाभ्याम् । तथाहि प्रश्नः–'वेत्थ यथा पंचम्यामाहुतावापः पुरुषवचसो भवन्ति ' इति । निरूपणं च प्रतिवचनं । द्युपर्जन्यपृथिवीपुरुषयोषित्सु पंचस्वाग्निषु श्रद्धासोमवृष्ट्यन्नरेतोरूपाः पंचाहुतीर्दर्शयित्वा ' इति तु पंचम्यामाहुतावापः पुरुषवचसो भवन्ति ' इति । तस्मादद्भिः परिवेष्टितो जीवो रंहति व्रजतीति गम्यते ॥**

**भाष्यार्थ**—असा पूर्वपक्ष प्राप्त झाला असतां बादरायणाचार्य ' तदन्तरप्रतिपत्तौ रंहति संपरिष्वक्तः' असें पढतात–असा सिद्धान्त सांगतात–' तदन्तरप्रतिपत्तिप्रसंगीं'–एका देहापासून दुसऱ्या देहाच्या प्राप्तीच्या वेळीं पुढील देहाचीं बीजें, अशा भूतसूक्ष्मांनीं संपरिष्वक्त–संपरिवेष्टित होत्साता जीव 'रंहति'–जातो, असें समजावें. [–" अहोपण, भूतपरिष्वंगाविषयीं कांहीं प्रमाण नसल्यामुळें असें म्हणतां येत नाहीं, असें आम्हीं सांगितलें आहे, " अशी आशंका व सूत्रांतील हेतु घेऊन त्याचें व्याख्यान–]=' कुतः '–कोणत्या कारणानें ? '**प्रश्ननिरूपणाभ्यां**' –प्रश्न व प्रतिवचन यांवरून.'**तथाहि०**'–प्रश्न-प्रतिवचन कसें आहे तें पहा–" पंचम स्थानामध्यें हुत–हवन केलेल्या आप–पांचवी आहुति दिली असतां ज्याप्रकारें पुरुषवचस–पुरुषसंज्ञक–पुरुषाकारानें परिणत होतात तो प्रकार तूं जाणतोस का?" –छां. ५. ३. ३. सु. उ. ४०१.– असा श्वेतकेतूला प्रवाहण राजाचा प्रश्न आहे. [पण त्याचें उत्तर श्वेतकेतु व त्याचा पिता उद्दालक आरुणि या दोघांनाहि माहित नव्हतें. म्हणून राजानेंच ' हे गौतमा, द्युलोक हाच अग्नि आहे '–सु. उ. ४०२–इत्यादि उत्तर श्वेतकेतूच्या पित्याला सांगितलें. आचार्य त्याचाच संक्षेपतः निर्देश करितात–]='**निरूपणं०**'–आणि त्या निरूपण–प्रतिवचन–द्यु-पर्जन्य-पृथिवी-पुरुष-स्त्री, या पांच अग्नींमध्यें श्रद्धा, सोम, वृष्टि, अन्न व रेत या स्वरूपाच्या पांच आहुतिं दाखवून " याप्रमाणें पांचवी आहुति दिली असतां आप पुरुषवचस–पुरुषाकारानें परिणत होतात" असें आहे. [ प्रत्यक्ष अग्नि नसलेल्या द्युप्रभृतींचें अग्नित्व, होमाचें आधारत्व या साम्यामुळें, ध्यानासाठीं संपादित–कल्पित आहे आणि श्रद्धादिकांचें आहुतित्व त्या त्या द्युप्रभृतींशीं केवळ संबद्ध–सांनिध्य एवढ्याच कारणानें उक्त आहे. शिवाय पांचव्या स्थानीं आप गर्भाकारानें परिणत होतात, असें उपक्रम व उपसंहार यांत एकवाक्यत्वाहि अवगत होतें. त्यामुळेंहि त्यांना आहुतित्व आहे. ' इति तु० ' इत्यादि श्रुतिवचनानें त्यांनीं परिवेष्टित होत्साता जीव जातो, असा सिद्धान्त सांगितला आहे.–'**तस्मात्०**' इत्यादि भाष्यानें प्रश्नादिकांच्या फलितार्थाचें निगमन--]=तस्मात्–असें प्रश्न-प्रतिवचन असल्यामुळें आपांनीं परिवेष्टित

झालेला जीव 'रंहति '-जातो, असें अवगत होतें. [-" अहोपण, शरीररहित जीवाची गति जर संभवत असेल तर आपांनीं परिवेष्टित झालेल्या जीवाची गति उपपन्न होईल ! पण शरीररहित जीवाची गतच संभवत नाहीं. तर जशी तृणावरील जळू दुसरें तृण ओढून घेऊन पूर्व तृण सोडिते त्याप्रमाणें जीवहि देहान्तराचें ग्रहण करूनच पूर्वदेहाचा त्याग करितो. अर्थात् श्रुत्यंतरविरोधामुळें भूतपरिष्वक्त जीवाचें रंहण-गमन होत नाहीं, " अशी 'ननु०' इत्यादि भाष्यानें शंका-]

**भाष्यं—नन्वन्या श्रुतिर्जलूकावत्पूर्वदेहं न मुञ्चति यावन्न देहान्तरमाक्रमतीति दर्शयति-'तद्यथा तृणजलायुका' इति । तत्राप्यप्परिवेष्टितस्यैव जीवस्य कर्मोपस्थापितप्रतिपत्तव्यदेहविषयभावनादीर्घीभावमात्रं जलूकयोपमीयत इत्यविरोधः ॥**

**भाष्यार्थ**—" अहोपण, पूर्वोक्त प्रश्न-प्रतिवचनश्रुतीच्या अपेक्षेनें भिन्न असलेली-तिच्याहून निराळी अशी "त्याविषयीं दृष्टान्त-जशी तृणजळू०"-बृ. ४.४.३. सु. उ. ६८९-इत्यादि ही बृहदारण्यक श्रुति गवतावरील जळूप्रमाणें जीव पूर्व देहाचा जोंवर त्याग करीत नाहीं,तोंवर तो दुसऱ्या देहाचें आक्रमण करीत नाहीं असें दाखविते. [ आपानें परिवेष्टित झालेल्या जीवाच्या गतीचें कथन करणाऱ्या श्रुतीची अन्य गति संभवत नसल्यामुळें व या दृष्टान्तश्रुतीचें गत्यंतर संभवत असल्यामुळें त्यांचा विरोध नाहीं, असें आचार्य ' तत्रापि० ' इत्यादि भाष्यानें सांगतात-]=त्या बृहदारण्यक श्रुतींतहि आपानें परिवेष्टित झालेल्याच जीवाची कर्मानें उपस्थापित केलेल्या प्राप्तव्य देहाविषयींची जी भावना तिचा केवल दीर्घीभाव जळूच्या दृष्टान्तानें सांगितला जातो,त्यामुळें त्या दोन श्रुतींत परस्पर विरोध नाहीं. [ कर्मानें फलरूपानें पुढें स्थापिलेल्या-अर्थात् हें शरीर सोडल्यावर प्राप्तव्य असलेल्या देहान्तराविषयीं ' मी देव आहें ' इत्यादि स्वरूपाची जी भावना तिचा दीर्घीभाव-दूर असलेल्या पदार्थाचा आश्रय करणें, एवढाच अर्थ बृहदारण्यकांतील तृणजळूच्या उपमेनें सांगितला जातो, अशी भाष्याची योजना करावी. कारण जीव जन्म-मरणांच्या द्वारा संसार करणारासा होत्साता देहेंद्रियादि-उपाधींनीं युक्त असल्यामुळें स्वतः प्रादेशिक-प्रदेशानें युक्त-मर्यादित असल्यामुळें शरीरांत असतानांच दुसऱ्या देहान्तरास प्राप्त होऊं शकत नाहीं. त्यामुळें सूक्ष्म देहानेंच परिवेष्टित झालेला तो देहान्तरास जातो, असा भावार्थ.-" सांख्यादिक दुसऱ्याप्रकारें देहान्तरप्राप्ति सांगतात. तेव्हां तिंच तसेंच-त्यांच्या प्रक्रियेप्रमाणेंच ग्रहण कां करूं नये ! " अशी आशंका घेऊन 'श्रुतिविरोधामुळें तिचें तसें ग्रहण करितां येत नाहीं ' असें ' एवं० ' इत्यादि भाष्यानें सांगतात—]

**भाष्यं—एवं श्रुत्युक्ते देहान्तरप्रतिपत्तिप्रकारे सति याः पुरुषमतिप्रभवाः कल्पना व्यापिनां करणानामात्मनश्च देहान्तरप्रतिपत्तौ कर्मवशाद् वृत्तिलाभस्तत्र भवति। केवलस्यैव चात्मनो वृत्तिलाभस्तत्र भवति। इंद्रियाणि तु देहवदभिनवान्येव तत्र तत्र भोगस्थाने उत्पद्यन्ते ॥**

**भाष्यार्थ**—श्रुत्युक्त देहान्तरप्राप्तीचा प्रकार असा असतांना पुरुषांच्या केवल बुद्धीपासून उत्पन्न झालेल्या–स्वमतिप्रभव ज्या कल्पना त्या सर्वच अनादरणीय आहेत. [–पुरुषांच्या केवल बुद्धिप्रभव ज्या कल्पना त्या सर्वच अनादरणीय आहेत, असा पुढें संबंध. '**व्यापिनां०**' इत्यादि भाष्यानें त्यांतील सांख्यांची कल्पना सांगतात–]=देहान्तराची प्राप्ति झाली असतां व्यापी असलेलीं इंद्रियें व आत्मा यांचा त्यांत वृत्तिलाभ होतो. [–"अहोपण, इंद्रियांना आहंकारिकत्व आहे –तीं अहंकाराचे विकार आहेत.अहंकाराला व्यापित्व आहे, त्यामुळें त्या इंद्रियांना व आत्म्यांना विभुत्व असतांना 'शरीरांतच वृत्तिलाभ होतो,' असा नियम कां केला जातो?" यावर सांख्य म्हणतात–]='**कर्मवशात्**'–कर्मांच्या सामर्थ्यानें देहान्तरप्राप्ति झाली असतां त्यांत त्यांचा वृत्तिलाभ होतो.[–'**केवलस्यैव०**'इत्यादि भाष्यानें सौगतांची–बौद्धांची कल्पना सांगतात–]=आणि केवल इंद्रियरहित असलेल्या आत्म्याचाच शरीरांत वृत्तिलाभ होतो. [ खरोखर त्यांचा आत्मा म्ह० 'अहं' या आलयविज्ञानाचा प्रवाह, त्याच्या वृत्ती म्हणजे शब्दादि ज्ञानें, त्यांचा लाभ शरीरान्तरांत होतो. 'केवल' हा शब्द आत्म्याच्या इंद्रियसाहित्याचें–सहभावाचें निवारण करितो.–' तर मग दुसऱ्या देहामध्यें त्याचीं इंद्रियें कशीं संभवतात?' अशी आशंका घेऊन 'चक्षुरादि पांच इंद्रियें गोलकमात्र आहेत. म्ह० कान, डोळे, नाक, हींच इंद्रियें. मनाला समनंतरप्रत्ययमात्रत्व आहे अ.२.पृ.२१९–त्यामुळें शरीरान्तरांत त्या अगदीं नवीन इंद्रियांचाच जन्म होतो, असें '**इंद्रियाणि०**' इत्यादि भाष्यानें सौगत सांगतात–]=पण इंद्रियें त्या त्या भोगस्थानामध्यें देहाप्रमाणें अगदीं नवींच उत्पन्न होतात. [–'**मन एव०**' या भाष्यानें वैशेषिकांची कल्पना सांगतात—]

**भाष्यं—मन एव वा केवलं भोगस्थानमभिप्रतिष्ठते। जीव एव वोत्प्लुत्य देहाद्देहान्तरं प्रतिपद्यते शुक इव वृक्षाद् वृक्षान्तरम्। इत्येवमाद्याः। ताः सर्वा एवानादर्तव्याः श्रुतिविरोधात् ॥ १ ॥**

**भाष्यार्थ**—किंवा केवल एक मनच भोगस्थानाप्रत जावयास निघतें–केवल मनच भोगस्थानीं जातें. [–केवल म्ह० इंद्रियें व आत्मा यांनीं रहित, इंद्रियें तेथें

**नवीनच** उत्पन्न होतात, पण आत्मा विभु असल्यामुळें अक्रिय जरी असला तरी भोगस्थानांत वृत्तिमात्रास–केवल वृत्तीला प्राप्त होतो. भोगस्थान–भोगायतन–नूतन शरीर असा भावार्थ.–आतां **'जीव एव०'** या भाष्यानें दिगंबरांची–जैनांची कल्पना सांगतात–]=किंवा जीवच एका वृक्षावरून दुसऱ्या वृक्षावर उडून जाणाऱ्या शुका-प्रमाणें एका देहापासून उडी मारून दुसऱ्या देहास प्राप्त होतो. [–**'इत्येवमाद्याः०'** इत्यादि भाष्यानें वेदबाह्य कल्पनांचा उपसंहार करितात–]=या अशा प्रकारच्या पुरुषबुद्धीपासून उत्पन्न होणाऱ्या ज्या वेदबाह्य कल्पना त्या सर्वच अनादर करण्यास योग्य आहेत. [–' एवमाद्याः ' येथील 'आद्य-'शब्दानें लोकायत कल्पनेचें ग्रहण करितात. कारण ते देहमात्र-आत्मवादी लोकायत–चार्वाक आत्म्याचा भस्मीभावच मानितात. कोणाचेंहि गमन मानीत नाहींत.त्या सर्व कल्पनांच्या अनादरणीयतेचा हेतु स्पष्ट करितात–]=**'श्रुतिविरोधात्'**–श्रुतिविरोधामुळें त्या सर्व अनादरणीय आहेत. १.
[–भूतसूक्ष्मांनीं परिवेष्टित झालेल्या जीवाच्या गमनाविषयीं ' प्रश्नप्रतिवचनाभ्यां ' –हा हेतु सांगितला. पण तो विवक्षित अर्थाचा साधक नाहीं, अशी उत्तर सूत्रानें व्यावर्त्य असलेली शंका ' ननु० ' इत्यादि भाष्यानें सांगतात—]

**भाष्यं—ननु उदाहृताभ्यां प्रश्नप्रतिवचनाभ्यां केवलाभिरद्भिः संपरिष्वक्तो रंहतीति प्राप्नोति । अप्शब्दश्रवणसामर्थ्यात् । तत्र कथं सामान्येन प्रतिज्ञायते सर्वैरेव भूतसूक्ष्मैः संपरिष्वक्तो रंहतीति । अत उत्तरं पठति—**

**भाष्यार्थ**—" अहोपण, वर ज्यांचें उदाहरण दिलें आहे अशा प्रश्न-प्रति-वचनांवरून केवल आपांनीं संपरिष्वक्त–संपरिवेष्टित झालेला जीव शरीरान्तरास जातो, असें प्राप्त होतें. 'अप्-'शब्दाच्या श्रवणसामर्थ्यामुळें जीव केवल आपांनीं परिवेष्टित होऊन हें शरीर सोडून दुसरें शरीर घ्यावयास जातो, असें पूर्वोक्त प्रश्न-प्रतिवचनावरून अवगत होतें. मग असें असतांना सामान्यतः–अविशेषानें सर्व-भूतसूक्ष्मांनीं संपरिष्वक्त झालेला जीव जातो, अशी प्रतिज्ञा कशी केली जाते ! " **'इति'**–अशी शंका येते [–**'अतः उत्तरं पठति'** या भाष्यानें हेतूच्या असाधकत्व-शंकेचा परिहार–]=म्हणून सूत्रकार ' त्र्यात्मकत्वात्तु० ' इत्यादि सूत्रानें उत्तर पठतात–त्या शंकेचें समाधान सांगतात—]

**सूत्रं—त्र्यात्मकत्वात्तु भूयस्त्वात् ॥ २**

**सूत्रार्थ**—आपाला त्र्यात्मकत्व–त्रिवृत्करणश्रुतीवरून भूतत्रयरूपत्व आहे. ' तु ' –पण शरीरांत आपांचें **'भूयस्त्व'**–आधिक्य असल्यामुळें श्रुतींत ' आप-'शब्दच

योजिला आहे. २.–सु. ब्र. २५३. [–' तु-'शब्देन०' इत्यादि भाष्यानें सूत्राक्षरांचें व्याख्यान करितात—]

**भाष्यं—तु-शब्देन चोदितामाशंकामुच्छिनत्ति । त्र्यात्मिका ह्यापः । त्रिवृत्करणश्रुतेः । तास्वारंभिकास्वभ्युपगतासु इतरदपि भूतद्वयमवश्यमभ्युपगंतव्यं भवति । त्र्यात्मकश्च देहस्त्रयाणामपि तेजोबन्नानां तस्मिन्कार्योपलब्धेः ॥**

**भाष्यर्थ—**सूत्रकार ' तु ' या शब्दानें वरील चोदित–आक्षिप्त–प्राप्त शंकेचा उच्छेद–परिहार करितात. कारण त्रिवृत्करणश्रुतीमुळें त्या आप त्र्यात्मिका–त्रिरूप आहेत. [–" आपांना त्रिरूपत्व जरी असलें तरी प्रकृत विषयाशीं त्याचा काय संबंध!" **'तासु०'** इत्यादि भाष्याने उत्तर–]=त्या त्र्यात्मक आप दुसऱ्या शरीराच्या आरंभक आहेत, असा त्यांचा स्वीकार केला असतां इतर भूतद्वयहि म्ह० तेज व पृथिवी हीं दोन भूतेंहि अवश्य स्वीकारावीं लागतात.[–"मग असें जर असेल तर देहान्तराला भूतत्रयारब्धत्वच आहे. तें भूतत्रयानें–तीन भूतांनींच आरब्ध आहे. त्रिवृत्कृत आपांनीं आरभ्य--आरंभ होण्यास योग्य नाहीं, " अशा अपरितोषामुळें **' त्र्यात्मकश्च०'** या भाष्यानें पक्षान्तर सांगतात–]=आणि देह त्र्यात्मक–तीन भूतांचें कार्य आहे. कारण तेज, आप व अन्न या तिन्ही भूतांचें कार्य देहामध्यें उपलब्ध होतें, त्यामुळें देह त्र्यात्मक आहे. [ पण गंध, स्वेद, परिपाक, प्राण, अवकाश देणें, असें पांच भूतांचें कार्य शरीरांत प्रत्यक्ष दिसत असल्यामुळें त्यांतील कार्यत्रयाचीच उपलब्धि असिद्ध आहे, अशा अपरितोषामुळें **' पुनश्च० '** इत्यादि भाष्यानें पक्षान्तर सांगतात—]

**भाष्यं—पुनश्च त्र्यात्मकस्त्रिधातुत्वात्त्रिभिर्वातपित्तश्लेष्मभिः । न स भूतान्तराणि प्रत्याख्याय केवलाभिरद्भिरारब्धुं शक्यते । तस्माद् भूयस्त्वापेक्षोऽयं'आपः पुरुषवचसः ' इति प्रश्नप्रतिवचनयोरप्शब्दो न कैवल्यापेक्षः । सर्वदेहेषु हि रसलोहितादिद्रवभूयस्त्वं दृश्यते ॥**

**भाष्यार्थ—**-आणि पुनः–दुसऱ्या प्रकारें देह त्र्यात्मक आहे.वात, पित्त व श्लेष्म –कफ या तीन धातूंनीं त्याला त्रिधातुत्व असल्यामुळे तो त्र्यात्मक आहे. [ वात-पित्त-कफ या तीन शरीरधारणात्मक धातूंनीं देहाला त्रिधातुत्व असल्यामुळें तो त्र्यात्मक आहे, अशी योजना करावी.–"अहोपण, याप्रमाणें त्याला ' त्र्यात्मकत्व ' जरी असलें तरी आपांहून इतर भूतांनीं त्याला आरंभकत्व कसें ?" अशी आशंका घेऊन **' न सः० '** इत्यादि भाष्यानें म्हणतात–]=तो जीव दुसऱ्या भूतांचें प्रत्याख्यान करून केवळ आपांनीं आरब्ध होण्यास योग्य नाहीं–दुसऱ्या भूतांना सोडून

केवल आपांनीं देहाचा आरंभ होणें शक्य नाहीं. [ कारण वायु व तेज यांपासून झालेल्या वात व पित्त यांची देहांत उपलब्धि होते, असा भावार्थ.–" तर मग प्रश्न व प्रतिवचन यांत नियमानें आपांचेंच ग्रहण कसें केलें आहे!" अशी आशंका घेऊन '**तस्मात्०**' इत्यादि भाष्यानें समाधान–]=म्हणून 'आप पुरुषवचस होतात' असा प्रश्न व प्रतिवचन यांतील 'अप्' हा शब्द भूयस्त्वापेक्ष–आधिक्याच्या अपेक्षेनें आहे. तो कैवल्यापेक्ष–'केवल आप' या अपेक्षेनें–केवल भूतान्तररहित 'आप' या आशयानें नाहीं. [ या शेवटच्या वाक्यांत 'भूयस्त्वात्' या सूत्रावयवाचें उपसंहाराच्या मिषानें व्याख्यान केलें.–आतां '**सर्वदेहेषु०**' इत्यादि भाष्यानें त्या अवयवाचा प्रत्यक्षच आश्रय करून उपपादन करितात–]=सर्व देहांमध्यें रस-रक्तादि द्रवाचें बाहुल्य उपलब्ध होतें. [ अर्थात् द्रवांशाच्या आधिक्यामुळें आपांचें ग्रहण केलें आहे.–" अहोपण, शरीरांत कठिनांशाचें त्याहूनहि बाहुल्य–आधिक्य दिसत असल्यामुळें आपांचें ग्रहण अयुक्त आहे," अशी '**ननु०**' इत्यादि भाष्यानें शंका—]

**भाष्यं—ननु पार्थिवो धातुर्भूयिष्ठो देहेषूपलक्ष्यते । नैष दोषः । इतरापेक्षयापां बाहुल्यं भविष्यति। दृश्यते च शुक्रशोणितलक्षणेऽपि देहबीजे द्रवबाहुल्यम् ॥**

**भाष्यार्थ**—अहोपण, देहामध्यें पार्थिव धातु सर्वापेक्षां अधिक दिसतो. [–पंचभूतात्मक देहांत पार्थिवांशाचें बाहुल्य जरी असलें तरी आपांचें आधिक्य आहे. कारण दुसऱ्या भूतांच्या अपेक्षेनें तें संभवतें. असें '**नैष दोषः०**' या भाष्यानें सांगतात–]=हा दोष येत नाहीं. कारण इतर भूतांच्या अपेक्षेनें आपांचें बाहुल्य त्यांत संभवेल. [ शिवाय देहाचें उपादान कारण असें जें रेत व लोहित त्यांमध्यें आपांचें बाहुल्य असल्यामुळें त्याच्या योगानेंच दुसऱ्या भूतांचें उपलक्षण युक्त आहे, असें '**दृश्यते च०**' या भाष्यानें सांगतात–]=आणि शुक्र-शोणितरूप देहबीजामध्येंहि द्रवाचें बाहुल्य उपलब्ध होतें. [–देहांचीं निमित्तें जीं कर्में त्यांतहि आपांचें बाहुल्य असल्यामुळें त्यांनीं भूतान्तरलक्षणा युक्त आहे, असें '**कर्म च०**' या भाष्यानें सांगतात––]

**भाष्यं—कर्म च निमित्तकारणं देहान्तरारंभे। कर्माणि चाग्निहोत्रादीनि सोमाज्यपयःप्रभृतिद्रवद्रव्यव्यपाश्रयाणि । कर्मसमवायिन्यश्चापः श्रद्धाशब्दोदिताः सह कर्मभिर्द्युलोकाख्येऽग्नौ हूयन्त इति वक्ष्यति । तस्मादप्यपां बाहुल्यप्रसिद्धिः । बाहुल्याच्चाप्शब्देन सर्वेषामेव देहबीजानां भूतसूक्ष्माणामुपादानमिति निरवद्यम् ॥**

**भाष्यार्थ**--आणि देहान्तराच्या आरंभामध्यें कर्म हें निमित्तकारण आहे व अग्निहोत्रादि कर्मे सोम, आज्य–घृत, क्षीर इत्यादि द्रव द्रव्यांचा आश्रय केलेलीं आहेत म्ह० तीं कर्मे द्रव द्रव्यांचा आश्रय करितात. [–"अहोपण, सोमादिकांचा येथल्या येथेंच भस्मीभाव होत असल्यामुळें–तीं द्रव्यें येथल्या येथेंच जळून जात असल्यामुळें त्यांतील आपांचें बाहुल्य देहान्तरारंभाच्या उपयोगी नाहीं" अशी आशंका घेऊन '**कर्म०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=आणि श्रद्धाशब्दानें ज्यांचें कथन केलें आहे, अशा कर्मसमवायिनी–कर्मांशीं नित्य संबंध ठेवणाऱ्या आप कर्मांसह 'द्यु-'लोकसंज्ञक अग्नींत होमिल्या जातात, असें श्रुति पुढें सांगेल. [कारण आप स्थूल कर्मांच्या साधनत्वानें त्यांच्याशीं संबंध ठेवणाऱ्या आहेत. त्याच सूक्ष्म रूपानें पुरुषाचा आश्रय केलेल्या अशा होत्सात्या 'श्रद्धा-'शब्दवाच्य होतात–पुरुषाश्रित असलेल्या त्यांना श्रद्धा असें म्हणतात. कर्मसंस्कारांसह द्युलोकाग्नींत होमिलेल्या त्या–श्रद्धाख्य आप चंद्रलोकांतील देहाचा आरंभ करितात. असें पुढें सांगावयाचें असल्यामुळें देहारंभाला त्यांचा उपयोग आहे, असा भावार्थ.–याप्रमाणें कर्मरूप निमित्तांतील द्रवबाहुल्यहि देहारंभाच्या उपयोगी आहे, असें सिद्ध झालें असतां आपांनीं भूतान्तरांचें उपलक्षण युक्तच आहे, असा '**तस्मात्०**' इत्यादि भाष्यानें उपसंहार–]=त्यामुळेंह आपांच्या बाहुल्याची प्रसिद्धि होते आणि बाहुल्यामुळें 'आप' या शब्दानें सर्वच देहबीजरूप भूतसूक्ष्मांचें ग्रहण होतें. [–याप्रमाणें 'आप-'शब्दानें भूतान्तरोपलक्षण सिद्ध झालें असतां भूतसूक्ष्मपंचकानें परिवेष्टित झालेल्या जीवाची गति युक्तच आहे असें '**इति निरवद्यं**' या भाष्यानें सांगतात–]=म्हणून भूतवेष्टित जीवाची गति होते–तो सूक्ष्म भूतांनीं वेष्टित होऊनच देहान्तरास गमन करतो, हें म्हणणें निर्दोष आहे. २. [–शिवाय भौतिक प्राणांच्या गतीची अनुपपत्ति–असंभव होत असल्यामुळें त्यांच्या कारणरूप भूतांची गति अवश्यंभाविनी आहे आणि भूतांची गति जर इष्ट असेल तर त्यांना देहारंभकत्वहि आहे असें होईल, असें '**प्राणगतेश्च०**' या सूत्रानें सांगतात–]

## सूत्रं--प्राणगतेश्च ॥ ३

**सूत्रार्थ**—आणि 'तं उत्क्रामन्तं' या वचनानें भूतांचा आश्रय केलेल्या प्राणांची गति सांगितली आहे. त्यावरूनहि जीवाच्या भूतवेष्टनाची सिद्धि होते. ३.–सु.ब्र. २९३. ['**प्राणानां च०**' या भाष्यानें सूत्राचें व्याख्यान–]

**भाष्यं—प्राणानां च देहांतरप्रतिपत्तौ गतिः श्राव्यते—'तमुत्क्रामन्तं प्राणोऽनूत्क्रामति प्राणमनूत्क्रामन्तं सर्वे प्राणा अनूत्क्रामन्ति' इत्यादिश्रुतिभिः । सा**

च प्राणानां गतिर्नाश्रयमंतरेण संभवतीत्यत: प्राणगतिप्रयुक्ता तदाश्रयभूतानामपामपि भूतान्तरोपसृष्टानां गतिरवगम्यते। न हि निराश्रया: प्राणा: क्वचिद्गच्छन्ति तिष्ठन्ति वा जीवतो दर्शनात् ॥ ३ ॥

**भाष्यार्थ**—"आणि जाव उत्क्रमण करूं लागला असतां त्याच्या मागून प्राण उत्क्रमण करितो आणि प्राण उत्क्रमण करूं लागला असतां सर्व प्राण त्याच्याबरोबर उत्क्रमण करितात."अ.२पृ ६६७इत्यादि श्रुतींकडून देहान्तरप्राप्तीच्या वेळीं प्राणांची गति सांगितली जाते. [–"अहोपण, प्राणांचें गमन जरी होत असलें तरी त्यावरून देहबीजांचें–भूतांचें गमन कसें सिद्ध होतें?" 'सा च०' या भाष्यानें उत्तर–] =आणि ती प्राणांची गति आश्रयावांचून संभवत नाहीं,म्हणून 'प्राणगति' या कार्यावरून–प्राणगतीमुळें त्यांच्या आश्रयभूत भूतान्तरांनीं संसृष्ट–युक्त अशा आपांचीहि गति अवगत होते. [प्राणांच्या गतीवरून इतर भूतांनीं युक्त अशा आपांच्याहि गतीचें अनुमान होतें, असा भावार्थ.–"अहोपण, स्वतंत्र–आश्रयरहित प्राणांचीच गति कां होणार नाहीं?" 'न हि०' इत्यादि भाष्यानें उत्तर–]=आश्रयरहित प्राण कोठेंहि जात नाहींत व रहात नाहींत हे प्रसिद्ध आहे. कारण जिवंत प्राण्याचे प्राण साश्रयच-आपल्या आश्रयानें युक्त असेच दिसतात. [देहाच्या जीवदवस्थेंत प्राणांची स्थिति साश्रयच दिसत असल्यामुळें उत्क्रमणाचे वेळींहि त्यांचे गमन आश्रयासहवर्तमानच होत असलें पाहिजे असा भावार्थ–] ३.[-"पण प्राणांना साश्रयत्व जरी असलें तरी त्यांची जीवासह गति–जीवाबरोबर गमन असिद्ध आहे" अशी आशंका घेऊन 'अग्न्यादि०' या सूत्रानें तिचें निरसन करितात––]

**सूत्र––अग्न्यादिगतिश्रुतेरिति चेन्न भाक्तत्वात् ॥ ४**

**सूत्रार्थ**––"मृताची वाक् अग्नीमध्यें, प्राण वायूंत" इत्यादि श्रुतींत वागादिकांचें अग्न्यादिकांतील गमन श्रुत असल्यामुळें इंद्रियें जीवाबरोबर जात नाहींत, असें ज म्हणाल तर तें बरोबर नाहीं. कारण अग्न्यादिगतिश्रुतीला गौणत्व आहे. ४. –सु ब्र.२९३. [–'स्यादेतत्०' इत्यादि भाष्यानें सूत्रांतील आक्षेपाचें विवरण––]

**भाष्यं**—**स्यादेतत्। नैव प्राणा देहान्तरप्रतिपत्तौ सह जीवेन गच्छन्ति। अग्न्यादिगतिश्रुते:। तथाहि श्रुतिर्मरणकाले वागादय: प्राणा अग्न्यादीन्देवान्गच्छन्तीति दर्शयति 'यत्रास्य पुरुषस्य मृतस्याग्निं वागप्येति वातं प्राण:' इत्यादिनेति चेत् ॥**

**भाष्यार्थ**––यावर अशी शंका येते–देहान्तरग्रहणाचे वेळीं प्राण जीवासह जातच नाहींत. कारण त्यांच्या 'अग्न्यादिगतिश्रुते:'–अग्न्यादिकांतील गतीचें

श्रवण आहे. [-'तथाहि०' इत्यादि भाष्यानें उक्त हेतुच विशद करितात-]=तें अग्न्यादिगतिश्रवण कसें आहे तें पहा-" ज्या वेळीं या मृत अज्ञ पुरुषाची वाक् अग्नीमध्ये लीन होते, प्राण वायूमध्यें लीन होतो. "-बृ.३.२.१३. सु.उ. ६१८-इत्यादि वचनानें श्रुति मरणसमयीं वागादिक प्राण अग्न्यादि देवांस प्राप्त होतात असें दाखविते. त्यामुळें ते जीवाबरोबर जात नाहींत असें जर म्हणशील तर [-'न०' इत्यादि भाष्यानें सूत्रांतील परिहारभागाचें व्याख्यान--]

**भाष्यं --न । भाक्तत्वात् । वागादीनामग्न्यादिगतिश्रुतिर्गौणी लोमसु केशेषु चादर्शनात् । 'ओषधीर्लोमानि वनस्पतीन्केशाः' इति हि तत्राम्नायते । न हि लोमानि केशाश्च उत्प्लुत्य ओषधीर्वनस्पतींश्च गच्छन्तीति संभवति । न च जीवस्य प्राणोपाधिप्रत्याख्याने गमनमवकल्प्यते ॥**

**भाष्यार्थ**--न बरोबर नाहीं, '**भाक्तत्वात्०**'-भाक्तत्वामुळें.वागादिकांची अग्न्यादिगतिश्रुति गौणी आहे. कारण लोम व केस यांचे ठिकाणीं ओषधि-वनस्पति-गमन उपलब्ध होत नाहीं. त्यामुळें ती श्रुति गौण आहे. [ हेंच विशद करण्या-साठीं '**ओषधीः०**' इत्यादि भाष्यानें प्रथम केस व लोम यांच्या गतीचा प्रसंग दाखवितात-]=' लोम ओषधीस प्राप्त होतात व केस वनस्पतीस ' असें त्या पूर्वोक्त श्रुतींत सांगितलें जातें, हें प्रसिद्ध आहे. [-" पण त्यांतहि मुख्यच गति असेल" अशी आशंका घेऊन '**न हि०**' इत्यादि भाष्यानें सांगतात-]=कारण लोम व केस मृत शरीरावरून उडून ओषधि व वनस्पति यांस प्राप्त होतात, हें संभवत नाहीं. [ अग्न्यादिगतिश्रुति व पूर्व सूत्रांतील उदाहृत उत्क्रमणश्रुति यांचा पर-स्पर विरोध आला असतां अग्न्यादिगतिश्रुति गौण आहे. कारण तो प्रायपाठ आहे -जणुंकाय ते ते अवयव आपापल्या देवतामध्यें गेल्यासारखेच होतात असें त्यांत सांगितलें आहे.-आतां जीवगतिश्रुतीच्या अनुपपत्तीमुळेंहि, प्राणगति प्रत्यक्ष उप-लब्ध होत असल्यामुळें, अग्न्यादिगतिश्रुति औपचारिकी आहे असें '**न च०**' इत्यादि भाष्यानें सांगतात-]=जीवाच्या प्राणोपाधीचें प्रत्याख्यान केलें असतां त्याचें गमन संभवत नाहीं. [-आणि याहि कारणानें प्राणांची जीवासह गति अवश्य असल्या-मुळें अग्न्यादिगतिश्रुति औपचारिकी आहे असें '**नापि०**'इत्यादि भाष्यानें सांगतात--]

**भाष्यं---नापि प्राणैर्विना देहान्तर उपभोग उपपद्यते । विस्पष्टं च प्राणानां सह जीवेन गमनमन्यत्र श्रावितम् । अतो वागाद्यधिष्ठात्रीणां अग्न्यादिदेवतानां वागाद्युपकारिणीनां मरणकाले उपकारनिवृत्तिमात्रमपेक्ष्य वागादयोऽग्न्यादीन्गच्छन्तीत्युपचर्यते ॥ ४ ॥**

**भाष्यार्थ**—प्राणांवांचून देहान्तरीं जीवाचा उपभोगहि संभवत नाहीं. [ ' पण प्राणांची सहगतिश्रुतीच औपचारिकी कां असणार नाहीं ? ' अशी आशंका घेऊन ' निमित्ताच्या अभावामुळें ' असें उत्तर ' **विस्पष्टं च०** ' या भाष्यानें सांगतात—] =आणि प्राणांचें जीवासह गमन दुसऱ्या श्रुतींत अगदीं स्पष्टपणें सांगतलें आहे. [—' तं उत्क्रामन्तं ' ही पूर्वसूत्रांत उदाहरणार्थ दिलेली श्रुतिच येथील दुसरी श्रुति होय. —' **अतः०**' इत्यादि भाष्यानें निमित्तकथनपूर्वक अग्न्यादिगतिश्रुतीच्या औपचारिकत्वाचा उपसंहार करितात—]=वास्तव मरणसमयीं वागादि-इंद्रियांवर उपकार करणाऱ्या वागादिकांच्या अग्न्यादि-अधिष्ठात्री देवतांच्या उपकाराची जी निवृत्ति केवळ तिच्याच अपेक्षेनें वागादिक अग्न्यादिकांस प्राप्त होतात असें उपचारानें—गौणवृत्तीनें सांगितलें जातें. [ मरणसमयीं अग्न्यादि-अधिष्ठात्री देवतांच्या इंद्रियांवरील उपकाराची निवृत्ति होणें हेंच त्या इंद्रियांचें अग्न्यादिगमन आहे, मुख्य गमन नव्हे, असा भावार्थ ] ४. [—याप्रमाणें भूतान्तरयुक्त आपांच्या गमनाचें उपपादन करून पांचव्या आहुतींत त्यांचें जें पुरुषाकारत्व सांगितलें आहे त्यावर ' **प्रथमे०** ' इत्यादि सूत्रानें आक्षेप घेऊन त्याचें समाधान करितात—]

**सूत्रं—प्रथमेऽश्रवणादिति चेन्न ता एव ह्युपपत्तेः ॥ ५**

**सूत्रार्थ**—पण पंचाग्नींतील ' पहिल्या द्युलोकांत श्रद्धेचें आहुतित्व श्रुत आहे, आपांचें आहुतित्व श्रुत नाहीं ' तेव्हां आपांना पुरुषवचस्त्व कसें, असें जर म्हणाल तर तें बरोबर नाहीं. 'कारण' येथील श्रद्धाहि ' त्या आपच आहेत ' आणि तसें मानल्यासच प्रश्न व प्रतिवचन ' उपपन्न होतें ' ५.—सु ब्र. २५४ [—' **स्यादेतत्०** ' इत्यादि भाष्यानें आक्षेपाचें विवरण—]

**भाष्यं—स्यादेतत् । कथं पुनः ' पंचम्यामाहुतावापः पुरुषवचसो भवन्ति ' इत्येतान्निर्धारयितुं पार्यते । यावता नैव प्रथमेऽग्नावपां श्रवणमस्ति । इह हि द्युलोकप्रभृतयः पंचाग्नयः पंचानामाहुतीनां आधारत्वेनाधीताः । तेषां च प्रमुखे ' असौ वाव लोको गौतमाग्निः ' इत्युपन्यस्य ' तस्मिन्नेतस्मिन्नग्नौ देवाः श्रद्धां जुह्वति ' इति श्रद्धा होम्यद्रव्यत्वेन आवेदिता । न तत्रापो होम्यद्रव्यतया श्रुताः ॥**

**भाष्यार्थ**—यावर अशी शंका येण्याचा संभव आहे.—" पण ' पांचव्या आहुतींत आप पुरुषवचस होतात '—पृ. ७ असें हें निर्धारण करितां येणें कसें शक्य आहे ? ' **यावता०**'—कारण पहिल्या अग्नींत आपांचें श्रवण नाहीं. [—श्रवणाचा अभाव दाखविण्यासाठीं अग्नीचा प्रस्ताव—]=' **इह हि०**'—कारण येथें—या पंचाग्निविद्याप्रकरणांत द्युलोकप्रभृति पांच अग्नि पांच आहुतींच्या आधारत्वानें अधीत

–श्रुत आहेत. [द्यु, पर्जन्य,पृथिवी, पुरुष व स्त्री या पांच अग्नींत श्रद्धा,सोम,वृष्टि, अन्न व रेत या स्वरूपाच्या पांच आहुति पठित आहेत.–' तथापि पहिल्या द्युलोकाग्नींत आपांचें अश्रवण कसें?' **'तेषां च०'** इत्यादि भाष्यानें शंकाकाराचें उत्तर–]= आणि त्या पांच अग्नींच्या आरंभीं ' हे गौतमा, हा द्युलोकच अग्नि आहे'–पृ. ७– असा उपन्यास करून ' त्या ह्या द्युलोकाग्नींत देव श्रद्धेला होमितात–श्रद्धेची आहुति देतात '–पृ.७–अशी श्रद्धा हौम्य–होम करण्यास योग्य अशा द्रव्यत्वानें निवेदित–निवेदन केलेली आहे, त्यांत श्रद्धा हवनीय द्रव्यत्वानें श्रुत आहे. त्या पहिल्या अग्नींत आप हौम्य द्रव्यत्वानें श्रुत नाहींत.'' [–''अहोपण, तुम्हीं वर –'प्रथमे अश्रवणात् ' असें म्हणून 'प्रथम' हें जें विशेषण दिलें आहे तें व्यर्थ आहे. कारण अन्यत्र–पुढील अग्नींतहि आपांचें अश्रवण आहे. '' अशी आशंका घेऊन वादी ' पुढील अग्नींत आपांचें साक्षात् श्रवण जरी नसलें तरी कसें–बसें –सोम, वृष्टि इत्यादि रूपानें त्यांचें श्रवण आहे, असें जरी क्षणभर मानिलें तरी तें प्रकृत–प्रथम अग्नींत नाहीं' असें शंकाकार**'यदि नाम०'**इत्यादि भाष्यानें म्हणतो–]

**भाष्यं—यदि नाम पर्जन्यादिषूत्तरेषु चतुर्ष्वग्निष्वपां हौम्यद्रव्यता परिकल्प्येत परिकल्प्यतां नाम । तेषु होतव्यतयोपात्तानां सोमादीनामब्बहुलत्वोपपत्तेः। प्रथमे त्वग्नौ श्रुतां श्रद्धां परित्यज्याश्रुता आपः परिकल्प्यन्त इति साहसमेतत् । श्रद्धा च नाम प्रत्ययविशेषः । प्रसिद्धिसामर्थ्यात् । तस्माद् अयुक्तः पंचम्यामाहुतावपां पुरुषभाव इति चेत् ॥**

**भाष्यार्थ**—जरी कदाचित् पर्जन्यादि पुढील चार अग्नींमध्यें आपांची हौम्यद्रव्यता कल्पिली जात असली तरी ती खुशाल कल्पिली जावी. कारण होतव्य–हवनीय द्रव्य या रूपानें ग्रहण केलेल्या सोमादिकांचें उदकबाहुल्य संभवतें, [–'' तर मग पहिल्या अग्नींतहि आपांचेंच हौम्यत्व कल्पावें. कारण सोमादि व श्रद्धा यांत अविशेष–साम्य आहे. सोमादिक जसें प्रत्यक्ष आप नव्हे तशीच श्रद्धाहि आप नाहीं आणि कल्पनाच जर करावयाची तर ती श्रद्धेमध्येंच तेवढी कां करूं नये ? '' अशी आशंका घेऊन शंकाकार **' प्रथमे०'** इत्यादि भाष्यानें म्हणतो–]=पण प्रथम अग्नींत श्रुत असलेल्या श्रद्धेला सोडून अश्रुत आपांची कल्पना केली जाते हें साहस आहे. [–'' अहोपण, तेथेंहि ' श्रद्धा-'शब्दानें आपांचेंच कथन केलेलें असल्यामुळें आपांचें अश्रवण नाहीं, तर श्रवण आहे '' अशी आशंका घेऊन वादी **' श्रद्धा च० '** इत्यादि भाष्यानें म्हणतो–]=आणि प्रसिद्धिसामर्थ्यानें–रूढीमुळें श्रद्धा म्ह० प्रत्ययविशेष आहे. श्रद्धा हा एकप्रकारचा

बुद्धिप्रत्यय–अन्तःकरणाची वृत्ति आहे. [कारण श्रुति व लक्षणा यांतील श्रुति न्याय्य आहे, श्रुतीचा अंगीकार करणें उचित आहे, असा भावार्थ.–शंकाकार '**तस्मात्०**' इत्यादि भाष्यानें प्रथमाग्नींतील आपांच्या अश्रवणाचें फल सांगतो–] =त्यामुळें पांचव्या आहुतींत आपांचा पुरुषभाव अयुक्त आहे. '**इति चेत्०**'–असें जर म्हणशील तर [तें बरोबर नाहीं, असा पुढें संबंध.–'**नैष दोषः०**' इत्यादि भाष्यानें सूत्रांतील सिद्धान्तभागाचें विवरण–]

भाष्यं —**नैष दोषः। हि यतस्तत्रापि प्रथमेऽग्नौ ता एवापः श्रद्धाशब्देनाभिप्रेयन्ते। कुतः। उपपत्तेः। एवं हि आदिमध्यावसानसंगानाद् अनाकुलमेतदेकवाक्यमुपपद्यते। इतरथा पुनः पंचम्यामाहुतावपां पुरुषवचस्त्वप्रकारे पृष्टे प्रतिवचनावसरे प्रथमाहुतिस्थाने यद्यनपो हौम्यद्रव्यं श्रद्धां नामावतारयेत्ततोऽन्यथा प्रश्नोऽन्यथा प्रतिवचनं इत्येकवाक्यता न स्यात्। 'इति तु पंचम्यामाहुतावापः पुरुषवचसो भवन्ति' इति चोपसंहरन्नेतदेव दर्शयति॥**

**भाष्यार्थ**––हा दोष नाहीं. '**हि**'–कारण त्या प्रथम अग्नींतहि '**ताः एव०**' –त्याच आप 'श्रद्धा-'शब्दानें अभिप्रेत आहेत. [–" पण 'श्रद्धा' हा शब्द अन्य अर्थी रूढ असल्यामुळें त्यानें आपांची उक्ति संभवत नाहीं" अशी आशंका घेऊन अवशिष्ट सूत्रावयवाचें व्याख्यान–]='**कुतः**'–कोणत्या कारणानें 'श्रद्धा-'शब्दानें आपच अभीष्ट आहेत ? '**उपपत्तेः**'–उपपत्तीमुळें. '**एवं हि०**'–'श्रद्धा-'शब्दानें आप अभिप्रेत असलें तरच आदि, मध्य व अन्त यांच्या अविरोधामुळें–संप्रतिपत्तीमुळें हें अनाकुल–अव्याहत एक वाक्य उपपन्न होतें. '**इतरथा पुनः**'–पण याच्या उलट 'श्रद्धा-'शब्दानें आपांचें ग्रहण न केल्यास ['इतरथा पुनः' या शब्दानें सुचविलेला व्यतिरेकच विशद करितात–]='**पंचम्यां आहुतौ०**'–पांचव्या आहुतींत आपांच्या पुरुषवचस्त्वप्रकाराविषयीं प्रश्न केला असतां–'आपांना पुरुषाकार कसा प्राप्त होतो ?' असें विचारलें असतां प्रतिवचनाच्या वेळीं प्रथम आहुतीच्या स्थानीं आप नसलेलें हौम्यद्रव्य श्रद्धा जर प्रवाहण राजा सांगूं लागेल [–'श्रद्धा-'शब्दाच्या आपांहून अर्थान्तरत्वाला दूषित करितात–]='**ततः०**' –तर प्रश्न अन्यथा–एकप्रकारचा व प्रतिवचन अन्यथा–दुसऱ्या प्रकारचें, अशी प्रश्न-प्रतिवचनांची एकवाक्यता होणार नाहीं. [जर पर्जन्यादि पुढील चार स्थानांमध्येंच आपांना होम्यत्व असतें तर 'चवथ्या आहुतींत आप पुरुषभावास कशा प्राप्त होतात, तें तूं जाणतोस का ?' असें विचारावयास पाहिजे होतें. पण '**पंचम्यां**'–पांचव्या आहुतींत असें विशेषण असल्यामुळें पहिल्या आहुतींतहि

त्यांचीच होम्यता सिद्ध झाली, असा भावार्थ.–उपसंहाराचें आलोचन केलें असतांहि आपांनाच 'श्रद्धा-'शब्दत्व आहे, असें ' इति तु० ' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=आणि " पण याप्रमाणें पांचवी आहुति दिली असतां आप· पुरुषसंज्ञक होतात "–छां. ५. ९. १. सु. उ. ४०५–असा उपसंहार करणारा प्रवाहण जवाल हेंच दाखवितो. [–आतां ' श्रद्धाकार्यं च० ' या भाष्यानें ' उपपत्तेः ' या सूत्रावयवाचा दुसरा अर्थ सांगतात—]

**भाष्यं—श्रद्धाकार्यं च सोमवृष्ट्यादि स्थूलीभवदब्बहुलं लक्ष्यते । सा च श्रद्धाया अप्त्वे युक्तिः । कारणानुरूपं हि कार्यं भवति । न च श्रद्धाख्यः प्रत्ययो मनसो जीवस्य वा धर्मः सन्धर्मिणो निष्कृष्य होमायोपादातुं शक्यते पश्वादिभ्य इव हृदयादीनि । इति आप एव श्रद्धाशब्दा भवेयुः ॥**

**भाष्यार्थ**—आणि सोम-वृष्टि इत्यादि त्या श्रद्धेचे कार्य उत्तरोत्तर स्थूल होत्सातें अप्-बहुल–जलप्रचुर झालेलें दिसतें. [–" श्रद्धेचे परिणाम असे जे सोमादिक त्यांना जलप्रचुरत्व जरी दिसलें तरी त्यावरून आपांना 'श्रद्धा-'शब्दत्व आहे, हें कसें सिद्ध होतें ? " ' सा च०' इत्यादि भाष्यानें उत्तर–]=आणि ती श्रद्धेच्या अप्त्वाविषयीं–जलत्वाविषयीं युक्ति आहे. [–"अहोपण, गोमय-वृश्चिकादिकांमध्यें–अ. २ पृ.३९.–विलक्षणत्व प्रत्यक्ष दृष्ट असल्यामुळें श्रद्धेचें कार्य अशी जी वृष्टि वगैरे त्यांत जलप्रचुरत्व जरी असलें तरी त्यांच्या कारणभूत श्रद्धेला जलत्व–अप्त्व नसो " अशी आशंका घेऊन आचार्य ' कारणानुरूपं० ' इत्यादि भाष्यानें म्हणतात–] कारणानुरूप कार्य होतें, हें प्रसिद्ध आहे. [ गोमय-वृश्चिकादि कांहीं ठिकाणीं वैलक्षण्य प्रत्यक्ष उपलब्ध होत असल्यामुळें ते जरी इष्ट असलें तरी श्रद्धेचा परिणाम असें जें सोमादिकार्य त्यांत अब्-बहुलत्व–जलाचें आधिक्य उपलब्ध होत असल्यामुळें श्रद्धेचें अप्त्व कल्पावें. कारण वैलक्षण्याचें ग्रहण करविणारें प्रमाण नसतांना कल्पना जी करावयाची ती दृष्टानुसारच करणें उचित आहे, असा याचा भावार्थ.–आतां प्रसिद्धीनें–रूढीनें ' श्रद्धा म्ह० प्रत्ययविशेष ' असें जें म्हटलें आहे–पृ. १७–त्याविषयीं आचार्य ' न च० ' इत्यादि भाष्यानें सांगतात–] ' श्रद्धा ' या नांवाचा प्रत्यय मनाचा किंवा जीवाचा धर्म असतांना त्याच्या धर्मीपासून–मनापासून किंवा जीवापासून ओढून काढून होमासाठीं तो घेतां येणें शक्य नाहीं. पश्वादिकांपासून त्यांचे हृदयादि अवयव जसे होमासाठीं काढून घेतां येतात तशी श्रद्धा तिच्या धर्मीपासून काढून घेतां येत नाहीं. [–अर्थात् ' जुहोति ' या श्रुतीच्या सामर्थ्यामुळें, 'जुहोत–होम करितो,' या श्रुतिवशात्

मुख्यार्थाचा त्याग केला असतां संनिहित वाक्याच्या अनुरोधानें 'श्रद्धा-'शब्दाची लक्षणा होते, असें ' इति आपः० ' या भाष्यानें सांगतात–]=म्हणून श्रद्धाशब्द –श्रद्धासंज्ञक आपच होऊं शकतील. येथें श्रद्धाशब्दानें आपांचेंच ग्रहण संभवतें. [ धर्मी जो जीव किंवा मन त्यासहवर्तमानच होम संभवत नाहीं. कारण तसें मानलें तरी नियमानें लक्षणाच करावी लागत असल्यामुळें संनिहित वाक्यानुसारी लक्षणा करणें न्याय्य आहे, असा भावार्थ.–' श्रद्धाशब्दश्च० ' इत्यादि भाष्यानें ' उपपत्तेः ' या सूत्रभागाचें दुसऱ्या प्रकारें व्याख्यान करितात––]

**भाष्यं––श्रद्धाशब्दश्चाप्सूपपद्यते । वैदिकप्रयोगदर्शनात् " श्रद्धा वा आपः" इति । तनुत्वं श्रद्धासारूप्यं गच्छन्त्य आपो देहबीजभूता इत्यतः श्रद्धाशब्दाः स्युः । यथा सिंहपराक्रमो नरः सिंहशब्दो भवति ॥**

**भाष्यार्थ**––आणि ' श्रद्धा ' हा शब्द ' आप ' या अर्थी उपपन्न होतो. कारण ' श्रद्धा वा आपः '–श्रद्धाच आप आहे, असा वैदिक प्रयोग दिसतो. [–" अहो-पण, वृद्धांच्या प्रयोगाच्या अभावीं म्ह० रूढीच्या अभावीं वैदिक प्रयोग तरी कसा होऊं शकेल ? " अशी आशंका घेऊन त्याचें औपचारिकत्व ' तनुत्वं० ' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=' तनुत्व ' म्ह० सूक्ष्मत्व, या श्रद्धेच्या सारूप्यास–सादृश्यास प्राप्त होणाऱ्या आप देहबीजभूत आहेत. त्यामुळें त्या श्रद्धाशब्द–श्रद्धा या शब्दाला पात्र होऊं शकतील. [' सूक्ष्मत्व ' या गुणामुळें ' आप ' या अर्थी ' श्रद्धा-'शब्दाचें गौणत्व संभवतें, याविषयीं ' **यथा०** ' इत्यादि दृष्टान्त–] =जसा सिंहाप्रमाणें पराक्रम–शत्रूचें आक्रमण करणारा पुरुष सिंहशब्द होतो तसा आपशब्द सूक्ष्मत्वगुणानें श्रद्धाशब्द होईल. [–याप्रमाणें ' श्रद्धा 'शब्दाचें ' आप ' या अर्थी गौणत्व सांगून लाक्षणिकत्व '**श्रद्धापूर्वक०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]

**भाष्यं––श्रद्धापूर्वककर्मसमवायाच्चाप्सु श्रद्धाशब्द उपपद्यते मंचशब्द इव पुरुषेषु । श्रद्धाहेतुत्वाच्च श्रद्धाशब्दोपपत्तिः । "आपो हास्मै श्रद्धां संनमन्ते पुण्याय कर्मणे " इति श्रुतेः ॥ ५ ॥**

**भाष्यार्थ**––आणि श्रद्धापूर्वक कर्मसमवायामुळें ' आप ' या अर्थी '**श्रद्धा-**' शब्द उपपन्न होतो. जसा 'मंच-'शब्द ' पुरुष ' या अर्थी लक्षणेनें संभवतो त्याप्रमाणें [–मांच्यावर–खाटेवर–पलंगावर बसलेले पुरुष आक्रोश करीत असतांना ' मांचे आक्रोश करीत आहेत ' हा लाक्षणिक प्रयोग जसा होतो त्याप्रमाणें श्रद्धापूर्वक कर्मसंबंधानें ' आप ' या अर्थी श्रद्धाशब्दाची लक्षणा होईल ! जें कर्म श्रद्धापूर्वक केलें जातें त्याच्या उपायत्वानें आपांचा कर्माशीं संबंध असल्यामुळें

परंपरेनें श्रद्धेशीं संबद्ध होणाऱ्या आपांमध्यें श्रद्धाशब्द संभवतो, असा भावार्थ. —' **श्रद्धाहेतुत्वाच्च०** ' इत्यादि भाष्यानें लक्षणेचें निमित्त असा दुसरा संबंध सांगतात—]=आाण श्रद्धाहेतुत्वामुळें म्ह० आपांना श्रद्धेचें हेतुत्व असल्यामुळें श्रद्धाशब्दाची उपपत्ति लागते. [—आपांना श्रद्धाहेतुत्व आहे, याविषयीं प्रमाण—]='**आपो ह्यस्मै०**'—"आप या अधिकारी पुरुषासाठीं—त्याच्या मनांत केवल दर्शनानेंच स्नानादि पुण्यकर्मांच्या सिद्ध्यर्थ श्रद्धा उत्पन्न करितात " अशी श्रुति आहे. [ त्यामुळें त्यांना श्रद्धाहेतुत्व आहे. म्हणून ' आप ' या अर्थीं श्रद्धाशब्द उपपन्न होतो, असा भावार्थ. ] ५. [—प्रथम स्थानांतहि आपांच्याच होम्यत्वाचें ज्ञान होत असल्यामुळें पांचव्या आहुतींत त्यांचा पुरुषाकार परिणाम होईल, असें सांगितलें. आतां या अधिकरणाच्या पहिल्या सूत्रांत 'आपांनी परिवेष्टित झालेला जीव जातो' अशी जी प्रतिज्ञा केली आहे, तिच्या असत्त्वाची आशंका '**अश्रुतत्वात्०**' इत्यादि सूत्रानें घेऊन तिचा परिहार करितात—]

**सूत्रं—अश्रुतत्वादिति चेन्नेष्टादिकारिणां प्रतीतेः ॥ ६**

**सूत्रार्थ**—त्या वाक्यांत आप दिकांप्रमाणें जीवाला ' अश्रुतत्व असल्यामुळें ' जीव त्या वाक्यांत श्रुत नसल्यामुळें, तो भूतवेष्टित होणें युक्त नाहीं, ' असें जर म्हणाल तर तें बरोबर नाहीं. कारण पुढील वाक्यांत ' इष्टादि० '—इष्टापूर्तदत्त कर्म करणाऱ्या गृहस्थांची प्रतीति येते. ६.सु.ब्र. २५४. [—' **अथापि०** ' इत्यादि भाष्यानें चोद्याला—आक्षेपाला विशद करितात—]

**भाष्यं—अथापि स्यात् । प्रश्नप्रतिवचनाभ्यां नामापः श्रद्धादिक्रमेण पंचम्यामाहुतौ पुरुषाकारं प्रतिपद्येरन् । न तु तत्संपरिष्वक्ता जीवा रंहेयुः । अश्रुतत्वात् । न ह्यत्र अपामिव जीवानां श्रावयिता कश्चिच्छब्दोऽस्ति । तस्मात् ' रंहति संपरिष्वक्तः' इत्ययुक्तमिति चेत् ॥**

**भाष्यार्थ**—आतां भूतान्तरांशीं संसर्ग पावलेल्या आपांचा पुरुषाकार परिणाम जरी झाला तरी यावर आक्षेपक असेंहि म्हणेल—प्रश्न व प्रतिवचन यांच्या योगानें कदाचित् आप श्रद्धादिक्रमानें पांचव्या आहुतींत पुरुषाकारास प्राप्त होतील ! [—" तर मग हा उक्तार्थ स्वीकारल्यावर विरोध उरलाच नाहीं " अशी आशंका घेऊन आक्षेपक ' **न तु०** ' इत्यादि भाष्यानें म्हणतो—]=पण त्या भूतान्तरसंसृष्ट आपांनीं परिवेष्टित झालेले जीव देहान्तर घेण्यास जाणार नाहींत. कारण 'अश्रुतत्वात् '—जीवाला अश्रुतत्व आहे, तेथें जीवाचें श्रवण नाहीं. [—'**न हि०**' इत्यादि भाष्यानें या हेतूच्या अर्थाचें विवरण—]=कारण आपांचें श्रवण करविणारा शब्द

जसा आहे तसा जीवांचें श्रवण करविणारा एखादा शब्द येथें–या प्रकरणांत नाहीं. [–'**तस्मात्**०' इत्यादि भाष्यानें अश्रुतत्वाचें फल सांगतात–]=म्हणून–जीवाचें श्रवण नसल्यामुळें 'जीव भूतसूक्ष्मांनीं परिवेष्टित होऊन जातो' हें म्हणणें अयुक्त आहे '**इति चेत्**'–असें जर म्हणाल तर [–'**नैष दोषः**०' इत्यादि भाष्यानें सूत्रांतील समाधानाचा विभाग करितात––]

**भाष्यं––नैष दोषः । कुतः । इष्टादिकारिणां प्रतीतेः । 'अथ य इमे ग्राम इष्टापूर्ते दत्तमित्युपासते ते धूममभिसंभवन्ति' इत्युपक्रम्येष्टादिकारिणां धूमादिना पितृयाणेन पथा चंद्रप्राप्तिं कथयति 'आकाशाच्चंद्रमसमेष सोमो राजा' इति । त एवेहापि प्रतीयन्ते 'तस्मिन्नेतस्मिन्नग्नौ देवाः श्रद्धां जुह्वति तस्या आहुतेः सोमो राजा संभवति' इति श्रुतिसामान्यात् ॥**

**भाष्यार्थ**––'**न**'–हा दोष येत नाहीं. कोणत्या कारणानें? '**इष्टादिकारिणां प्रतीतेः**'–इष्टादि कर्म करणारांची प्रतीति येत असल्यामुळें '**अथ**०'–"आतां कर्मफलोक्तीचा आरंभ झाला असतां जे हे गृहस्थ ग्रामांत इष्टापूर्त, दत्त, यांची उपासना करितात ते धूमास प्राप्त होतात." –छां.५.१०.३.सु.उ.पृ.४०६–असा उपक्रम करून श्रुति इष्टादि कर्म करणारांची धूमादि पितृयाण मार्गानें "आकाशापासून चंद्राला प्राप्त होतात. हा चंद्र सोम राजा आहे" अशी चंद्रप्राप्ति सांगते. [–"अहोपण, इष्टादिकर्म करणाऱ्यांच्या प्रदेशान्तरगमनाची प्रतीति जरी होत असली तरी प्रकृत विषयाशीं त्याचा काय संबंध?" '**त एव**०' इत्यादि भाष्यानें उत्तर–] =ते इष्टादिकारी गृहस्थ जीवच येथें–या पंचाग्निविद्यावाक्यांत प्रतीत होतात. [–'**तस्मिन्नेतस्मिन्**०' या वाक्यानें त्याविषयीं हेतु–]="त्या या अग्नींत देव' श्रद्धेचें हवन करितात–त्या आहुतीपासून सोमराजा उत्पन्न होतो."–छां.५.४.२. सु. उ. ४०३–अशा श्रुतिसादृश्यावरून तेच गृहस्थ येथें प्रतीत होतात. [धूमादिवाक्यांत व पंचाग्निवाक्यांत सोमराजत्वप्राप्तीचें श्रवण एकसारखेंच असल्यामुळें श्रद्धादिशब्दित इष्टादिकारी आपांनीं परिवेष्टित होऊन द्युलोकास जातात, असें भासतें, असा भावार्थ.–"अहोपण, येथें या दोन श्रुतींमध्यें फार मोठें वैलक्षण्य आहे. श्रद्धाशब्दित आपांचा क्वचित् द्युलोकांत होम श्रुत आहे, क्वचित् इष्टादिकारी गृहस्थांची धूमादिक्रमानें आकाशप्राप्ति श्रुत आहे. पण त्यांच्या आप नाहींत कीं ज्यांच्यायोगानें त्यांनीं वेष्टित झालेल्या त्यांची गति होईल' '**तेषां च**०' इत्यादि उत्तर–]

**भाष्यं––तेषां च अग्निहोत्रदर्शपूर्णमासादिकर्मसाधनभूता दधिपयःप्रभृतयो द्रवद्रव्यभूयस्त्वात्प्रत्यक्षमेव आपः सन्ति । ता आहवनीये हुताः सूक्ष्मा आहु-**

**त्योऽपूर्वरूपाः सत्यस्तानिष्टादिकारिण आश्रयन्ति। तेषां च शरीरं नैधनेन विधानेनांत्येऽग्नावृत्विजो जुह्वति " असौ स्वर्गाय लोकाय स्वाहा " इति ॥**

**भाष्यार्थ**—आणि त्या इष्टादिकारी गृहस्थांच्या अग्निहोत्र-दर्श-पूर्णमास इत्यादि कर्मसाधनभूत दधि-पयःप्रभृति—दहीं, दूध, सोम इत्यादि द्रवद्रव्यभूयस्त्वामुळें —द्रवद्रव्याच्या बाहुल्यामुळें प्रत्यक्षच आप आहेत. [—" अहोपण, अशा प्रकारच्या आप जरी असल्या तरी अग्नींत हुत होऊन गेलेल्या—भस्म झालेल्या त्यांचा इष्टादिकारी गृहस्थांशीं संबंध कसा संभवतो ? " ' **ताः आहवनीये०** ' इत्यादि भाष्यानें उत्तर—]=आहवनीय अग्नींत हुत केलेल्या [—" पण आहवनीय अग्नींत हुत केलेल्या दध्यादिकांचें येथेंच भस्म होतें. त्यामुळें त्यांची जीवसंगति—जीवासह गति होत नाहीं" अशी आशंका घेऊन विशेषण देतात—]=त्या सूक्ष्म आहुत्या अपूर्वरूप होत्सात्या त्या इष्टादिकर्म करणाऱ्या गृहस्थांचा आश्रय करितात. [—" तथापि त्यांचें गृहस्थजीवांबरोबर गमन कसें संभवतें ? ' ' **तेषां च०** ' इत्यादि भाष्यानें उत्तर—]=आणि ऋत्विज त्यांचें शरीर नैधनविधानानें—अन्तेष्टिविधानानें अन्त्य अग्नींत 'हा स्वर्ग लोकासाठीं ' स्वाहा '—सुहुत असो. ' अशा अर्थाच्या मंत्रानें होमितात. [—'असौ स्वर्गाय लोकाय स्वाहा ' हा होममंत्र असून ' हा अमुक नांवाचा यजमान स्वर्गासाठीं जावो ' असा त्याचा अर्थ आहे. 'स्वाहा-' शब्द मंत्राची समाप्ति सुचविण्यासाठीं आहे.—" तथापि परिवेष्टित झालेल्या इष्टादिकारी गृहस्थांची गति कशी संभवते ? " ' **ततः०** ' इत्यादि भाष्यानें उत्तर—]

**भाष्यं—ततस्ताः श्रद्धापूर्वककर्मसमवायिन्यः आहुतिमय्य आपोऽपूर्वरूपाः सत्यस्तानिष्टादिकारिणो जीवान्परिवेष्ट्य अमुं लोकं फलदानाय नयन्तीति यत्तदत्र जुहोतिना अभिधीयते—' श्रद्धां जुह्वति ' इति ॥**

**भाष्यार्थ**—त्यामुळें त्या श्रद्धापूर्वक कर्मांशीं संबद्ध असलेल्या आहुतिमय आप अपूर्वरूप होत्सात्या त्या इष्टादिकारी जीवांना परिवेष्टित करून परलोकाला फलदानासाठीं नेतात, असें जें आहे तेंच येथें ' जुहोति ' या शब्दानें '**श्रद्धां जुह्वति**' असें सांगितलें जातें. [ प्रत्यक्षसिद्ध दध्यादिकांचें वैशेष्य—विशिष्टत्व सांगण्यासाठीं ' आहुतिमय्यः ' असें भाष्यांत म्हटलें आहे. ' अपूर्वरूपाः ' या विशेषणानें त्यांचें क्रियातः वैशिष्ट्य सांगितलें आहे. ' **यत्तदत्र०** ' या भाष्यानें त्याअर्थी श्रुतीला प्रवृत्त केलें आहे.—याप्रमाणें श्रुतिसादृश्याचें प्रतिपादन करून आहुतिरूप आपांचें गमन सिद्ध झालें असतां '**तथा च०**' इत्यादि भाष्यानें त्याविषयीं दुसऱ्या श्रुतीचें प्रमाण—]

**भाष्यं—तथाचाग्निहोत्रे षट्प्रश्नीनिर्वचनरूपेण वाक्यशेषेण 'ते वा एते आहुती हुते उत्क्रामतः' इत्येवमादिनाग्निहोत्राहुत्योः फलारंभाय लोकान्तरप्राप्तिः प्रदर्शिता । तस्मादाहुतिमयीभिरद्भिः संपरिष्वक्ता जीवा रंहन्ति स्वकर्मफलोपभोगायेति श्लिष्यते ॥ ६ ॥**

**भाष्यार्थ**--त्याचप्रमाणें अग्निहोत्रप्रकरणांत षट्-प्रश्नीनिर्वचनरूप–सहा प्रश्नांच्या समुच्चयाचें निर्वचन–व्याख्यान करणारा, या स्वरूपाच्या 'त्या ह्या हुत केलेल्या–होमिलेल्या दोन आहुति उत्क्रमण करितात' इत्यादि वाक्यशेषानें अग्निहोत्राच्या दोन आहुत्यांची फलाच्या आरंभासाठीं लोकान्तरप्राप्ति प्रदर्शित केली आहे. [ अग्निहोत्रप्रकरणांत 'तूं या दोन आहुत्यांची उत्क्रांति, गति, प्रतिष्ठा, तृप्ति, पुनरावृत्ति, व या लोकासाठीं पुनरुत्थान जाणत नाहींस,' असें जनकानें याज्ञवल्क्याला जे सहा पदार्थ सांगितले आहेत त्यांचा येथें 'षट्प्रश्नाः' असा निर्देश केला जातो. त्यांचा निर्वचनरूप वाक्यशेष 'त्याच या दोन हुत आहुति उत्क्रमण करितात. त्या अन्तरिक्षांत प्रवेश करितात. त्या अन्तरिक्षाला तृप्त करून द्युलोक, पृथिवी, पुरुष किंवा स्त्री यांत प्रवेश करून पुरुषरूपानें उत्थान करितात' हा अशा स्वरूपाचा आहे. त्या वाक्यशेषानें सायंकालीं व प्रातःकालीं अग्नींत दिल्या जाणाऱ्या दोन अपूर्वरूप आहुत्यांची अनुष्ठात्याला प्राप्त होणाऱ्या फलाच्या सिद्धीसाठीं त्याच्याबरोबर द्युलोकप्राप्ति सांगितली आहे. त्यामुळें वाजसनेयक श्रुतीचें पर्यालोचन केलें असतांहि अप्-परिवेष्टित जीवांची गति सिद्ध होते, असा याचा भावार्थ.–श्रुत्यन्तराच्या आलोचनानें सिद्ध झालेल्या अर्थाचा '**तस्मात्०**' इत्यादि भाष्यानें उपसंहार–]=तस्मात् आहुतिमय आपांनीं संपरिष्वक्त–परिवेष्टित झालेले जीव स्वकर्माचें फल भोगण्यासाठीं जातात, हा सिद्धान्त उपपन्न होतो. ६.[पुढील सूत्राचें व्यावर्त्य '**कथं०**' इत्यादि भाष्यानें सांगतात—]

**भाष्यं—कथं पुनरिदमिष्टादिकारिणां स्वकर्मफलोपभोगाय रंहणं प्रतिज्ञायते यावता तेषां धूमप्रतीकेन वर्त्मना चंद्रमसमधिरूढानामन्नभावं दर्शयति—'एष सोमो राजा तद्देवानामन्नं तं देवा भक्षयन्ति' इति 'ते चन्द्रं प्राप्यान्नं भवन्ति तांस्तत्र देवा यथा सोमं राजानमाप्यायस्वापक्षीयस्वेत्येवमेतांस्तत्र भक्षयन्ति' इति च समानविषयं श्रुत्यन्तरम् । न च व्याघ्रादिभिरिव देवैर्भक्ष्यमाणानामुपभोगः संभवतीति । अत उत्तरं पठति—**

**भाष्यार्थ**--पण तुम्हां सिद्धान्त्यांकडून इष्टादि कर्मकारी गृहस्थांचें स्वकर्मफलभोगासाठीं हें गमन कसें प्रतिज्ञात आहे ? तुम्हांकडून त्याची प्रतिज्ञा कशी

केली जाते ? [-" पण या प्रतिज्ञेंत अनुपपत्ति काय आहे ? " ' **यावता०** ' इत्यादि भाष्यानें उत्तर-]=कारण श्रुति " हा सोम राजा, तें देवांचें अन्न, त्याला देव भक्षितात "-छां. ५. १०. ४. सु. उ. ४०६-असा धूम हें ज्याचें मुख-द्वार आहे, अशा मार्गानें चंद्रावर आरूढ झालेल्या त्या इष्टादिकारींचा अन्नभाव दाखवितें.[-"अहो-पण, या श्रुतींतील ' एषः '-हा, या शब्दानें चंद्राचें ग्रहण केलें जातें. इष्टादिकारी गृहस्थांचें ग्रहण त्या शब्दानें केलें जात नाहीं. त्यामुळें तेहि सोम राजाला भक्षितात. कारण त्यांनाहि इतर देवांप्रमाणें देवत्व प्राप्त झालेलें असतें. " अशी आशंका घेऊन 'श्रुत्यन्तरांत त्यांच्याच भक्ष्यत्वाची सिद्धि झालेली असल्यामुळें असें म्हणतां येत नाहीं,' असें ' **ते चंद्रं०** ' इत्यादि वाक्यानें आक्षेपक सांगतो-]=आणि " ते कर्मकर्ते गृहस्थ चंद्राला प्राप्त होऊन अन्न होतात. यज्ञांत ऋत्विज जसे चमस-पात्रस्थ सोमराजाला पुनः पुनः भरून पुनः पुनः रिकामा करितात-पितात त्या-प्रमाणें तेथें देव त्यांना भक्षण करितात "-बृ. ६. २. १६. सु. उ. ७३६-असें हें समानविषय श्रुत्यन्तर आहे. [ यज्ञांतील ऋत्विज सोमराजाला चमसांत पुनः पुनः भरून पितात, असें आपण प्रत्यक्ष पाहतों. त्याप्रमाणें त्या चंद्रलोकास प्राप्त झालेल्या इष्टादि कर्म करणाऱ्या गृहस्थांना देव भक्षण करितात,असा भावार्थ.श्रुतींतील ' एवं ' इत्यादि भागानें दार्ष्टान्तिकाचें विवरण केलें आहे.-" अहोपण, इष्टादि-कारी देवांकडून जरी भक्षण केले जात असले तरी त्यांच्या उपभोगासाठीं त्यांचें गमन कां होणार नाहीं ? " अशी आशंका घेऊन आक्षेपक ' **न च०** ' इत्यादि भाष्यानें म्हणतो-]=पण व्याघ्रादिकांकडून भक्षण केल्या जाणाऱ्या मृगादिकांप्रमाणें देवांकडून भक्षण केल्या जाणाऱ्या त्या कर्मठांचा भोग संभवत नाहीं, 'इति'-असा आक्षेप यावर येतो.[-त्याच्या उत्तरत्वानें सूत्राला अवतरण देतात-]='**अतः०**'-असा आक्षेप येत असल्यामुळें '**भाक्तं वा०**'इत्यादि सूत्रानें सूत्रकार त्याचें उत्तर सांगतात-

## सूत्रं--भाक्तं वानात्मवित्त्वात्तथाहि दर्शयति ॥ ७ ॥ ( १ )

**सूत्रार्थ**—पण इष्टादि कर्म करणारांचें अन्नत्व ' भाक्तं '-गौण आहे. ' अनात्म-वित्त्वामुळें '-कारण त्यांना आत्मवित्त्व नाहीं. आत्मज्ञानाच्या अभावीं त्यांनीं देवांचें भोगोपकरण होणें, हेंच त्याचें अन्नत्व आहे. ' कारण श्रुति तसें दाखविते. ' ७(१) **सु. ब्र. २९४.** [-इष्टादिकारी जीवांचें भक्ष्यत्व-अन्नत्व जर मुख्य असतें तर चंद्र-लोकांतील त्यांच्या भोगाचा अभाव झाला असता ! पण त्यांना मुख्य अन्नत्व नाहीं, अशी प्रतिज्ञा ' **वाशब्दः०** ' इत्यादि भाष्यानें करितात-]

**भाष्यं—वा-शब्दश्चोदितदोषव्यावर्तनार्थः । भाक्तमेषामन्नत्वं न मुख्यम् । मुख्ये ह्यन्नत्वे ' स्वर्गकामो यजेत ' इत्येवंजातीयकाधिकारश्रुतिरुपरुध्येत । चन्द्र-मण्डले चेद् इष्टादिकारिणामुपभोगो न स्यात्किमर्थमधिकारिण इष्टाद्यायासबहुलं कर्म कुर्युः । अन्नशब्दश्च उपभोगहेतुत्वसामान्यादनन्नेऽप्युपचर्यमाणो दृश्यते । यथा विशोऽन्नं राज्ञां पशवोऽन्नं विशामिति ॥**

**भाष्यार्थ**—वरील आक्षिप्त दोषाच्या व्यावृत्तीसाठीं 'वा' असा हा सूत्रस्थ शब्द आहे.[—"तर मग त्यांचें श्रुत असलेलें अन्नत्व कसे ? " ' **भाक्तं०** ' इत्यादि भाष्यानें सिद्धान्ताची प्रतिज्ञा करितात—]=या इष्टादिकारी गृहस्थांचें अन्नत्व भाक्त–गौण आहे, मुख्य नाहीं. [—" अहोपण, अन्नशब्दश्रुतीनें त्यांचें मुख्य अन्नत्व सिद्ध होत असतांना ' तें भाक्त आहे ' अशी प्रतिज्ञा कां केली जात आहे ? " अशी आशंका घेऊन ' अनन्यथासिद्ध श्रुति व अर्थापत्ति यांच्याशीं विरोध येत असल्यामुळें अन्नत्व-श्रुति औपचारिकी–गौण आहे. ' असें ' **मुख्ये हि०** ' इत्यादि भाष्यानें सांगतात—] =कारण त्यांचें अन्नत्व जर मुख्य असेल तर ' स्वर्गकाम पुरुषानें याग करावा ' इत्यादि प्रकारची अधिकारश्रुति उपरुद्ध होईल ! [ ज्याच्या योगानें पुरुष अधिकृत केला जातो, तो अधिकार–विधि व पुरुप यांच्या संबंधाचें निमित्त–कामादि. म्हणून पूर्वोक्त श्रुति ही अधिकार श्रुति आहे. तिच्या व्यर्थत्वाचा परिहार करण्यासाठीं इष्टादिकारी जीवांचें अन्नत्व भाक्त आहे, असा भावार्थ.—' **चंद्रमंडले०** ' इत्यादि भाष्यानें हा उक्तार्थच विशद करितात—]=इष्टादि कर्म करणारांचा चंद्रमंडलांत जर उपभोग नसेल तर स्वर्गेच्छु अधिकारी ज्यांत आयास पुष्कळ आहेत असें इष्टादि कर्म कशासाठीं करतील ? [—केवल मुख्यार्थाचा बाध होत असल्यामुळेंच अन्नशब्दाला गौणार्थत्व नाहीं तर अन्यत्र तसा प्रयोग केलेला असल्यामुळेंहि त्याला अमुख्यार्थत्व आहे, असें '**अन्नशब्दश्च०** ' या भाष्यानें सांगतात—]=आणि 'अन्न' हा शब्द उपभोगाचें हेतुत्व या सादृश्यामुळें अन्न नसलेल्याहि पदार्थांत उपचारानें योजिलेला दिसतो. जसें—" वैश्य हें राजांचें अन्न आहे, पशु वैश्यांचें अन्न आहे " असा अन्नशब्दाचा उपचार उपलब्ध होतो. [—" अहोपण, 'अन्न-'शब्दाला जर अमुख्यत्व आहे तर ' भक्षण करितात ' हें कसें म्हटलें आहे ?" '**तस्मात्०**'इत्यादि भाष्यानें उत्तर—]

**भाष्यं—तस्मादिष्टस्त्रीपुत्रमित्रभृत्यादिभिरिव गुणभावोपगतैः इष्टादिकारिभिः यत्सुखविहरणं देवानां तदेवैषां भक्षणमभिप्रेतं न मोदकादिवच्चर्वणं निगरणं वा ' न ह वै देवा अश्नन्ति न पिबन्त्येतदेवामृतं दृष्ट्वा तृप्यन्ति ' इति च देवानां**

**चर्वणादिव्यापारं वारयति । तेषां च इष्टादिकारिणां देवान्प्रति गुणभावोपगता-नामप्युपभोग उपपद्यते राजोपजीविनामिव परिजनानाम् ॥**

**भाष्यार्थ**—'तस्मात्'—म्हणून—अन्नशब्दाला गौणत्व असल्यामुळें गुणभावाला—अमुख्यत्वाला प्राप्त झालेल्या—इष्ट स्त्री,पुत्र,मित्र भृत्य इत्यादिकांच्या योगानें गुणभावास प्राप्त झालेल्या इष्टादि कर्में करणाऱ्या जीवांच्या योगानें देवांचें जें सुखानें विहरण-चालणें वगैरे व्यवहार तेंच त्यांचें भक्षण अभिप्रेत—अभीष्ट आहे, मोदकादिकांप्रमाणें चर्वण करणें किंवा गिळणें हें भक्षण येथें विवक्षित नाहीं. [—इष्टादिकारी कर्मठांच्या अन्नत्वाला अमुख्यत्व असल्यामुळेंच त्यांचें भक्षण गौण नाहीं, तर श्रुत्यन्तरावरूनहि तें गौण आहे, असें '**न ह वै०**' या वाक्यानें सांगतात—]="देव भक्षण करीत नाहींत व प्राशन करीत नाहींत—ते खात नाहींत व पीत नाहींत तर अमृताला पाहूनच तृप्त होतात."—छां. ३. ६. १. सु. उ. ३५१- अशी ही श्रुति देवांच्या चर्वणादि व्यापाराचें निवारण करिते.[--"तथापि पारतंत्र्यामुळें इष्टादिकारी जीवांच्या भोगाची सिद्धि होत नाहीं, तेव्हां त्यांचें भोगासाठीं गमन कसें?" '**तेषां च०**' इत्यादि भाष्यानें उत्तर—]=आणि देवांप्रत गुणभावास प्राप्त झालेल्या त्या इष्टादिकारी जीवांचाहि राजावर उपजीविका करणाऱ्या परिजनांप्रमाणें उपभोग उपपन्न होतो. [—"पण त्यांना देवांचें भोग्यत्व—उपभोगसाधनत्व कोणत्या दोषामुळें प्राप्त होतें?" अशी आशंका घेऊन '**अनात्मवित्त्वात्०**'इत्यादि भाष्यानें सूत्रावयवाचें व्याख्यान—]

**भाष्यं**— **अनात्मवित्त्वाच्च इष्टादिकारिणां देवोपभोग्यभाव उपपद्यते । तथाहि श्रुतिरनात्मविदां देवोपभोग्यतां दर्शयति—' अथ योऽन्यां देवतामुपास्तेऽन्योऽसावन्योऽहमस्मीति न स वेद यथा पशुरेवं स देवानाम् ' इति । स चास्मिन्नपि लोके इष्टादिभिः कर्मभिः प्रीणयन्पशुवद्देवानामुपकरोति । अमुष्मिन्नपि लोके तदुपजीवी तदादिष्टं फलमुपभुञ्जानः पशुवदेव देवानामुपकरोतीति गम्यते ॥**

**भाष्यार्थ**—'अनात्मवित्त्वामुळें'—आत्मज्ञान झालेलें नसणें, या दोषामुळें इष्टादि कर्मकर्त्यांचा देवोपभोग्यभाव—त्यांचें देवभोग्यत्व उपपन्न होतें. [—याविषयीं प्रमाण दाखविणारे भाष्यकार अवशिष्ट सूत्रांशाची योजना करितात—]='**तथा हि०**'—कारण तशीच "आतां जो 'मी अन्य व हा अन्य' अशा भेदभावानें अन्य देवतेची उपासना करितो तो आत्मतत्त्व जाणत नाहीं. जसा पशु आमच्या उप-योगाचा असतो तसा तो देवांच्या उपयोगाचा असतो"—बृ.१.४.१०.सु.उ.५९४ —ही श्रुति अनात्मवेत्त्यांची देवोपभोग्यता दाखविते. [श्रुतींतील 'अथ' हा शब्द अविद्याप्रकरणाच्या आरंभासाठीं आहे. 'अन्योऽसौ०' या वाक्यानें भेददृष्टीनें

होणारीच उपासना स्पष्ट केली आहे. ' न स वेद ' यानें त्या भेददृष्टीचें आदिकारण सांगितलें आहे.'यथा पशुः०' यानें देवभोग्यत्वाविषयीं दृष्टान्त दिला आहे.–' स च०' इत्यादि भाष्यानें उक्त श्रुतीचें तात्पर्य सांगतात–]=आणि तो भेददृष्टि अ.ज्ञ या लोकींहि इष्टापूर्तादिकर्मांनीं देवांना संतुष्ट करणारा असा होत्साता पशूप्रमा देवांवर उपकार करितो व परलोकींहि देवांच्या भाग्यावर पजीविका–आपला निर्वाह करणारा तो त्या देवांनीं दिलेलें फल भोगणारा असा होत्साता पशूप्रमाणच देवांवर उपकार करितो, असें या श्रुतीवरून अवगत होतें.[ अनात्म-श्रुतीच्या मुख्यार्थत्वाच्या अनुरोधानें–त्या श्रुतीच्या मुख्यार्थाला अनुसरून सूत्रांशाचा अर्थ सांगून प्रकरणाच्या अनुरोधानें ' **अनात्मवित्त्वात्०** ' इत्यादि भाष्यानें त्याचें अर्थान्तर सांगतात–]

**भाष्यं—अनात्मवित्त्वात्तथाहि दर्शयतीत्यस्यापरा व्याख्या—अनात्मविदो ह्येते केवलकर्मिण इष्टादिकारिणो न ज्ञानकर्मसमुच्चयानुष्ठायिनः । पंचाग्निविद्यामिह आत्मविद्येत्युपचरन्ति । प्रकरणात् । पंचाग्निविद्याविहीनत्वाच्च इदमिष्टादिकारिणां गुणवादेन अन्नत्वमुद्भाव्यते । पंचाग्निविज्ञानप्रशंसार्थं पंचाग्निविद्या हीह विधित्सिता । वाक्यतात्पर्यावगमात् ॥**

**भाष्यार्थ—**' अनात्मवित्त्वात् तथा हि दर्शयति ' या सूत्रावयवाची ही दुसरी व्याख्या–हे प्रसिद्ध केवल कर्मी इष्टादिकारी अनात्मवेत्ते आहेत. ज्ञान–उपासना व कर्म यांचें समुच्चयानें अनुष्ठान करणारे नाहींत. [ " पंचाग्निविद्याविहीनत्व हेंच त्यांचें अनात्मज्ञत्व आहे. पण पंचाग्निविद्येनें युक्त असणें हेंच जर आत्मवित्त्व–आत्मज्ञत्व असेल तर तद्राहित्यानें अनात्मवित्त्व असणार ! पण पंचाग्निविद्यावत्त्वानेंच आत्मवित्त्व कसें ? " ' **पंचाग्निविद्यां०** ' इत्यादि भाष्यानें उत्तर–] =पंचाग्निविद्येचें हें प्रकरण असल्यामुळें पंचाग्निविद्येलाच येथें ' आत्मविद्या ' असें उपचारानें म्हणतात. [–" पण इष्टादि कर्म करणारांना पंचाग्निविद्याशून्यत्व जरी असलें तरी त्यांना देवांचें अन्नत्व कसें ? " " **पंचाग्निविद्याविहीनत्वात्०** ' इत्यादि भाष्यानें उत्तर–]=आणि त्या इष्टादिकारी केवल कर्मठांना पंचाग्निविद्याविहीनत्व असल्यामुळें त्यांचें हें अन्नत्व गुणवादानें म्ह० देवोपभोग्यत्वानें पंचाग्निविज्ञानाच्या प्रशंसेसाठीं उद्भावित–उत्थापित केलें जातें. [–" पण त्याची प्रशंसा तरी कशासाठीं केली जाते ? " ' **पंचाग्निविद्या हि इह०** ' इत्यादि भाष्यानें उत्तर–] =कारण येथें पंचाग्निविद्या विधित्सित–विधान करण्यास इष्ट आहे.[–तिच्या विधित्सितत्वाविषयीं हेतु–]=' **वाक्यतात्पर्यावगमात्** '–गौतम उद्दालक व प्रवाहण जैवलि

यांच्या संवादरूप वाक्याचें पूर्वापरपर्यालोचन केलें असतां त्याचें पंचाग्निविद्या-विधानांत तात्पर्य आहे, असें अवगत होतें, त्यामुळें ती तेथें विधित्सित आहे. [–याप्रमाणें 'अनात्मवित्त्वात्' या सूत्रांशाचें व्याख्यान करून '**तथा हि०**' इत्यादि भाष्यानें 'तथा हि दर्शयति' या भागाचें व्याख्यान करितात–]

**भाष्यं—तथा हि श्रुत्यंतरं चंद्रमंडले भोगसद्भावं दर्शयति—'स सोमलोके विभूतिमनुभूय पुनरावर्तते' इति । तथान्यदपि श्रुत्यंतरम् 'अथ ये शतं पितॄणां जितलोकानामानंदाः स एकः कर्मदेवानामानंदो ये कर्मणा देवत्वमभिसंपद्यन्ते' इति । इष्टादिकारिणां देवैः सह संवसतां भोगप्राप्तिं दर्शयति । एवं भाक्तत्वादन्नभाववचनस्य इष्टादिकारिणोऽत्र जीवा रंहन्तीति प्रतीयते । तस्मात् 'रंहति संपरिष्वक्तः' इति युक्तमेवोक्तम् ॥ ७ ॥**

**भाष्यार्थ**—कारण तसें "तो इष्टादि कर्मकर्ता सोमलोकीं विभूतीचा–तेथील ऐश्वर्याचा अनुभव घेऊन मनुष्य लोकास पुनः परत येतो"–प्र.५.४.सु. उ १२०–हें श्रुत्यन्तर चंद्रमंडलामध्यें भोगाचा सद्भाव–अस्तित्व दाखवितें. '**तथा**'–त्याचप्रमाणें–पूर्वोक्त वाक्यासारखेंच 'अन्यत्'–पंचाग्निविद्याप्रकरणाहून अन्यस्थानीं प्रवृत्त झालेलें 'अथ'–" आतां–पर्यायान्तरारंभीं ज्यांनीं पूर्वसिद्ध भोग्य लोक जिंकला आहे अशा जन्मसिद्ध पितरांचे जे शत आनंद तो कर्मदेवांचा एक आनंद आहे. [ कर्मदेवांचेंच व्युत्पादन–]='ये०'–जे कर्मानें देवत्वास सर्वप्रकारें प्राप्त होतात त्या कर्मदेवांचा तो एक आनंद आहे."–बृ. ४ ३. ३३. सु. उ. ६८३–असें हें श्रुत्यन्तर आहे. [–'**इष्टादि०**' या भाष्यानें या श्रुत्यन्तराचें तात्पर्य सांगतात–]=हें श्रुत्यन्तर देवांबरोबर राहणाऱ्या इष्टादिकारी कर्मठांची भोगप्राप्ति दाखवितें. [–याप्रमाणें त्यांच्या अन्नत्वाचें भाक्तत्व–गौणत्व सिद्ध झालें असतां '**एवं०**' इत्यादि भाष्यानें त्याचें फलित–]=याप्रमाणें अन्नभाववचनाला भाक्तत्व असल्यामुळें या प्रश्न-प्रतिवचनांत इष्टादिकारी जीव जातात, असें प्रतीत होतें. [–याप्रमाणें इष्टादिकारी जीवांचें भोगासाठीं चंद्रलोकाप्रत गमन संभावित–संभवनीय आहे, असें झालें असतां प्रश्न व प्रतिवचन यांतहि त्यांचीच प्रतीति येत असल्यामुळें प्रथमसूत्रांत जें सांगितलें आहे तें युक्तच आहे, असा उपसंहार करितात–]=म्हणून 'जीव भूतसूक्ष्मांनीं परिवेष्टित होऊन जातो' असें हें सर्वथा युक्तच सांगितलें आहे. ७. [ सु. ब्र. २९५-९६. ] ( १ )

**( २. कृतात्ययाधिकरण. सू. ८-११. )**

—कर्मसमवायी आप पांचव्या आहुतींतील पुरुषपरिणामाच्या हेतु आहेत,

असें मानून–त्यांच्या हेतुत्वाचा आश्रय करून त्या आपांनीं परिवेष्टित झालेल्या जीवांची गति सांगितली. आतां स्वर्गांतून अवरोहण करणाऱ्या–खालीं येणाऱ्या-जावांचें कर्मच नाहीं, तेव्हां तत्समवायिनी आप कोठच्या व त्यांच्या अभावीं पुरुषाकार परिणाम तरी कोठचा ? अशी आशंका घेऊन सूत्रकार 'कृतात्यये०' इत्यादि सूत्रानें तिचा परिहार करितात—

**सूत्रं—कृतात्ययेऽनुशयवान्दृष्टस्मृतिभ्यां यथेतमनेवं च ॥ ८**

**सूत्रार्थ**—' कृताचा अत्यय झाला असतां म्ह० स्वर्ग देणारें सर्व कर्म भोगानें क्षय पावलें असतां ' अनुशयवान् '–अवशिष्ट राहिलेल्या कर्मानें युक्त होऊनच जीव खालीं येतो. कारण तशी प्रत्यक्ष–श्रुति व अनुमित–स्मृति आहे. त्यावरून हें अवगत होतें. ' यथा इतं '–तो जसा गेलेला असतो त्या धूमादि मार्गानें ' अनेवं च ' व त्याच्या विपरीत पुढें सांगितल्या जाणाऱ्या मार्गानें परत येतो.–८. सु. ब्र. पृ. २९७. [–पूर्वाधिकरणांत ज्यांचें चंद्रमंडलावर आरोहण सांगितलं तेच परत खालीं येणारे जीव हा या अधिकरणाचा विषय आहे, असें सांगण्यासाठीं '**इष्टादिकारिणां**' इत्यादि भाष्यानें प्रत्यवरोहवाक्य उदाहृत करितात–]

**भाष्यं—इष्टादिकारिणां धूमादिना वर्त्मना चंद्रमंडलमधिरूढानां भुक्तभोगानां ततः प्रत्यवरोह आम्नायते—' तस्मिन्यावत्संपातमुषित्वाथैतमेवाध्वानं पुनर्निवर्तन्ते यथेतम् ' इत्यारभ्य । यावत् ' रमणीयचरणा ब्राह्मणादियोनिमापद्यन्ते कपूयचरणाः श्वादियोनिम् ' इति । तत्रेदं विचार्यते—किं निरनुशया भुक्तकृत्स्नकर्माणोऽवरोहन्ति । आहोस्वित्सानुशया इति ॥**

**भाष्यार्थ**—धूमादि मार्गानें चंद्रमंडलावर आरूढ झालेल्या व तेथील भोग भोगिलेल्या इष्टादिकारी कर्मठांचा प्रत्यवरोह–परत खालीं उतरणें " त्याच चंद्रमंडलीं कर्माचा क्षय होईतोंपर्यंत राहून याच पुढील मार्गास पुनः निवृत्त होतात. जसे गेले होते तसे परत येतात," येथून आरंभ करून " ज्यांचें शील उत्तम असतें ते ब्राह्मणयोनीस प्राप्त होतात व जे अशुभ आचरण करणारे असतात ते श्वादियोनीस प्राप्त होतात. " येथपर्यंत पठित आहे. [ इष्टापूर्तादि कर्में करणारे गृहस्थ धूमादिमार्गानें चंद्रलोकीं जाऊन फलभोगानें कर्माचा क्षय होईपर्यंत तेथें राहून ' अथ '–भोक्तव्य कर्माचा क्षय होतांच चंद्रलोकाहून खालीं उतरतात. या वाक्यांतील ' यावत्संपातं '–कर्मक्षय होईपर्यंत, असें विशेषण व ' रमणीयचरण रमणीययोनीस प्राप्त होतात ' इत्यादि वाक्य असल्यामुळें ' **तत्र**० ' इत्यादि भाष्यानें संशय सांगतात–]=' **तत्र**'–त्या प्रकृत प्रत्यवरोह करणाऱ्या जीवांविषयीं ' निरनु-

शय- ज्यांनीं सर्व कर्मांच्या फलाचा भोग घेतला आहे असे ते खालीं येतात कीं सानुशय-अवशिष्ट कर्मासह खाली उतरतात ' असा विचार केला जातो. [-येथेंहि प्रत्यवरोहण करणाऱ्या जीवांच्या सानुशयत्वाचें समर्थन करून त्याच्या द्वारा वैराग्यासाठीं संसारगतीचेंच निरूपण केलें जातें. म्हणून पूर्वाधिकरणाप्रमाणेंच याच्या पादादिसंगति आहेत, अशा अभिप्रायानें '**किं तावत्०**' या भाष्यानें आकांक्षा-पूर्वक पूर्वपक्षाचें ग्रहण करितात—]

**भाष्यं—किं तावत्प्राप्तम्। निरनुशया इति। कुतः। यावत्संपातमिति विशेषणात्। संपातशब्देनात्र कर्माशय उच्यते। संपतत्यनेनास्माल्लोकादमुं लोकं फलोपभोगायेति। यावत्संपातमुषित्वेति च कृत्स्नस्य तस्य कृतस्य तत्रैव भुक्ततां दर्शयति। 'तेषां यदा तत्पर्यवैति ' इति च श्रुत्यंतरेणैष एवार्थः प्रदर्श्यते॥**

**भाष्यार्थ**--मग त्यांतील अगोदर कोणता पक्ष प्राप्त झाला? निरनुशय-सर्व कर्मांचें फल ज्यांनीं भोगिलें आहे व त्यामुळें ज्यांचें भोक्तव्य कर्म आतां मुळींच अवशिष्ट राहिलेलें नाहीं, असे होत्साते ते प्रत्यवरोह करितात, असें प्राप्त झालें. [येथील पूर्वपक्षांत 'जीवांची केवल गातच कर्मकृत-कर्मामुळें होणारी आहे, आगति कर्मकृत नाहीं ' पण सिद्धान्तांत ' गति व आगति या दोहोंनाहि कर्म-कृतत्व समान आहे ' असा फलभेद आहे.-'**कुतः०**' इत्यादि भाष्यानें या पक्षा-विषयीं श्रुतींतील लिंग हा हेतु सांगतात-]=कोणत्या कारणानें, असें प्राप्त होतें? '**यावत् संपातं०**'-फलभोगानें कर्माचा क्षय होऊन तेथून पतन होईपर्यंत असें विशेषण असल्यामुळें, असा पूर्वपक्ष प्रात होतो. [-"अहोपण, त्या विशेषणांत 'पतन होईपर्यंत ' एवढाच अर्थ प्रतीत होतो. सर्वकर्मांचें भुक्तत्व-सर्वकर्मांचा फलभोग प्रतीत होत नाहीं" अशी आशंका घेऊन वादी '**संपातशब्देन०**' इत्यादि म्हणतो-]='संपात ' या शब्दानें येथें कर्माशय सांगितला जातो. ज्याच्या योगानें फल भोगण्यासाठीं या लोकाहून परलोकास जातो तो संपात, या व्युत्पत्तीनें संपातशब्दानें येथें कर्माशय उक्त आहे. [-'पण जोंवर पतन होई तोंवर त्याचें अपतन असतें, असें हें वचन अनर्थक-व्यर्थ आहे, ' असें मानून '**यावत्सं-पातं०**' इत्यादि भाष्यानें वादी वाक्यार्थ सांगतो-]=आणि ' यावत्संपात-संपात होईपर्यंत राहून ' अशी हीं श्रुति त्या सर्व कृत कर्मांची भुक्तता तेथेंच दाखविते. [-'कर्मी चंद्रमंडलांत सर्वकर्मांच्या फलाचा उपभोग घेतो ' याविषयीं वादी '**तेषां यदा०**' या वाक्यानें दुसऱ्या श्रुतीची संमति दाखवितो-]=आणि "जेव्हां त्यांचें तें कर्म फलोपभोगानें क्षीण होतें (तेव्हां ते कर्मी याच प्रसिद्ध आकाशास प्राप्त

होतात )" बृ. ६. २. १६ सु. उ. ७३६–अशा या श्रुत्यन्तराकडून हाच अर्थ प्रदर्शित केला जातो. [इष्टादिकारी गृहस्थांचें तें भोक्तव्य कर्म जेव्हां सर्वतः क्षीण होतें तेव्हां ते तेथून परत येतात, असा अन्वय.–'यावत्-'शब्दोपबंधाच्या गत्यंतराची म्ह० 'संपात' या शब्दाला 'यावत्' असा जो शब्द जोडिला आहे त्याच्या दुसऱ्या गतीची '**स्यादेतत०**' इत्यादि भाष्यानें शंका––]

**भाष्यं––स्यादेतत्। यावदमुष्मिल्ँलोके उपभोक्तव्यं कर्म तावदुपभुंक्ते इति कल्पयिष्यामीति।नैवं कल्पयितुं शक्यते 'यत्किंच' इत्यन्यत्र परामर्शात्। 'प्राप्यान्तं कर्मणस्तस्य यत्किंचेह करोत्ययम्। तस्माल्लोकात्पुनरैत्यस्मै लोकाय कर्मणे' इति ह्यपरा श्रुतिः 'यत्किंच' इत्यविशेषपरामर्शेन कृत्स्नस्येह कृतस्य कर्मणस्तत्र क्षयितत्तां दर्शयति ॥**

**भाष्यार्थ**––'त्या परलोकीं जेवढें उपभोक्तव्य–उपभोग घेण्यास योग्य असें कर्म असतें तेवढें तो तेथें भोगतो,अशी मी 'यावत्-'शब्दाची कल्पना–योजना करीन'असें यावर शंकाकाराचें म्हणणें येईल ! [–'**नैवं०**' इत्यादि भाष्यानें श्रुत्यन्तरविरोधानें त्याचा परिहार–]=पण असें कल्पितां येणें शक्य नाहीं. कारण अन्यत्र–अन्य श्रुतींत 'यत्किंच'–जें कांहीं कर्म असेल तें सर्व, असा परामर्श केला आहे. [–'**प्राप्यान्तं०**' इत्यादि भाष्यानें वादी याचाच प्रपंच–विस्तार करितो–]=" हा संसारी या लोकीं जें कांहीं कर्म करितो त्याच्या अन्ताला म्ह० फलाला परलोकीं प्राप्त होऊन त्या लोकापासून पुनः या लोकास कर्मानुष्ठानासाठीं येतो. "–बृ.४.४.६. सु. उ. ६९१–[यांत 'पुनः' या शब्दावरून पूर्वींहि हा आला होता, असें अवगत होतें. कारण संसाराला अनादित्व आहे, असा भावार्थ.–'**इति०**' इत्यादि भाष्यानें वादी परामर्शश्रुतीचें तात्पर्य सांगतो–]=अशी ही दुसरी श्रुति 'यत्किंच' अशा अविशेष–सामान्य परामर्शानें इहलोकीं केलेल्या सर्वकर्मांची तेथें क्षयितता–क्षीण होण्याचा स्वभाव दाखविते. [–" अहोपण, उपसंहारांत ब्राह्मण्यादिकाला कारण होणाऱ्या कर्माचा अवबोध होत असल्यामुळें उपक्रमामध्येंहि तसा संकोच करणें उचित आहे. " पण असेंहि म्हणतां येत नाहीं. कारण उपक्रमाच्या अनुसार उपसंहाराचा निर्णय करणें उचित आहे. उपक्रमांत 'यावत्संपातं' असें श्रवण आहे, आणि प्रथम श्रुत असलेल्या त्याला अधिक बलवत्त्व आहे. ब्राह्मण्यादि प्राप्त करून देणाऱ्या चरणाला आचारत्व असल्यामुळें कर्माहून अर्थान्तरत्व आहे. म्ह० तें आचरण कर्माहून भिन्न आहे, कारण 'यथाकारी यथाचारी' इत्यादि श्रुतींत त्यांचा भेदानें निर्देश केला आहे. त्यामुळें कर्मानें ब्राह्मणादियोनिप्राप्ति होत नाहीं,

असा भावार्थ.–आणि हें केवल श्रुतीनेंच अवगत होतें, असें नाहीं तर युक्तीनेंहि सिद्ध होतें, असें 'अपि च०' या भाष्यानें वादी सांगतो––]

**भाष्यं—अपि च प्रायणमनारब्धफलस्य कर्मणोऽभिव्यंजकम् । प्राक्प्रायणादारब्धफलेन कर्मणा प्रतिबद्धस्याभिव्यक्त्यनुपपत्तेः । तच्चाविशेषाद्यावत्किंचिदनारब्धफलं तस्य सर्वस्याभिव्यंजकम् । न हि साधारणे निमित्ते नैमित्तिकमसाधारणं भवितुमर्हति । न ह्यविशिष्टे प्रदीपसंनिधौ घटोऽभिव्यज्यते न पट इत्युपपद्यते । तस्मान्निरनुशया अवरोहन्ति इति ॥**

**भाष्यार्थ—**शिवाय 'प्रायणं'–मरण 'अनारब्धफलस्य'–ज्याच्या फलाचा आरंभ झालेला नाहीं अशा संचित कर्माचें अभिव्यंजक आहे. [ 'विमत–मरण आपल्या समीप असलेल्या सर्वांचें सामान्यतः अभिव्यंजक आहे. कारण त्याला अभिव्यंजकत्व आहे. प्रदीपाप्रमाणें.' अभिव्यक्ति म्ह० कर्माचें फलदानासाठीं उन्मुखत्व–कर्मांनीं आपलें फल देण्यास सज्ज होणें. त्यांतील कांहींचा भोग घेतला जातो व कांहींचा भोग घेतला जात नाहीं, असें म्हणणें अयुक्त आहे, अशा आशयानें वाद्यानें 'प्रायण अनारब्धफल कर्माचें अभिव्यंजक आहे' असें म्हटलें आहे. –मरणाला अनारब्धफल सर्व कर्मांचें अभिव्यंजकत्व आहे,याविषयीं **'प्राक्प्रायणात्०'** इत्यादि भाष्यानें हेतु–]=कारण मरणाच्या पूर्वी–मरणकालापर्यंत ज्याच्या फलाचा आरंभ झाला आहे अशा प्रारब्धफल कर्मानें प्रतिबद्ध झालेल्या अनारब्धफल कर्माच्या अभिव्यक्तीची अनुपपत्ति असल्यामुळें मरणाला त्याचें अभिव्यंजकत्व आहे. [–"तर मग मरण संचित कर्मांतील प्रबल कर्माला अभिव्यक्त–फलोन्मुख करणारें असूं दे ?" यावर '**तच्च०**' इत्यादि भाष्यानें वादी म्हणतो–]=आणि तें मरण अविशेषामुळें जेवढें म्हणून अनारब्धफल कर्म असतें त्या सर्वांचें अभिव्यंजक आहे. [–'**न हि०**' इत्यादि भाष्यानें त्याचेंच उपपादन–]=कारण मरण हें निमित्त साधारण असतांना त्याचें नैमित्तिक असाधारण होणें योग्य नाहीं. [–हा उक्तार्थच दृष्टान्तानें साधितो–]='**न हि अविशिष्टे०**'–प्रदीपाचें सांनिध्य अविशिष्ट–समान असतांना त्याच्याकडून घट अभिव्यक्त केला जातो व पट अभिव्यक्त केला जात नाहीं, असें होऊं शकत नाहीं. [–याप्रमाणें श्रुति व युक्ति या दोन प्रमाणांनीं चंद्रलोकीं सर्व कर्मांचा भोगानें क्षय होतो, असें सिद्ध झालें असतां त्यापासून काय निष्पन्न झालें तें वादी सांगतो–]='**तस्मात्०**'–म्हणून चंद्रलोकांतून अवरोह करणारे जीव निरनुशय–अवशिष्ट कर्मरहित होऊन खालीं अवरोहण करितात–या लोकीं येतात, असें प्राप्त होतें. [–'**एवं०**' इत्यादि भाष्यानें या पूर्वपक्षाचा अनुवाद करून सिद्धान्त सांगतात––]

**भाष्यं—एवं प्राप्ते ब्रूमः—कृतात्ययेऽनुशयवानिति। येन कर्मवृंदेन चंद्रमसमारूढाः फलोपभोगाय तस्मिन्नुपभोगेन क्षयिते तेषां यदम्मयं शरीरं चंद्रमस्युपभोगायारब्धं तदुपभोगक्षयदर्शनशोकाग्निसंपर्कात्प्रविलीयते। सवितृकिरणसंपर्कादिव हिमकरकाः। हुतभुगर्चिःसंपर्कादिव च घृतकाठिन्यम्। ततः कृतात्यये कृतस्येष्टादेः कर्मणः फलोपभोगेनोपक्षये सति सानुशया एवेममवरोहन्ति॥**

**भाष्यार्थ**—असा पूर्वपक्ष प्राप्त झाला असतां आम्ही ' कृतात्यये अनुशयवान्' असा सिद्धान्त सांगतों–[–' येन० ' इत्यादि भाष्यानें या प्रतिज्ञेचा विभाग करितात–]=ज्या कर्मसमूहानें ते कर्मी चंद्रलोकावर फलोपभोगासाठीं आरूढ झाले होते, त्याचा उपभोगानें क्षय झाला असतां त्यांचें जें आपोमय शरीर चंद्रलोकांतील उपभोगासाठीं आरब्ध–निष्पन्न झालें होतें तें उपभोगाचा क्षय झालेला पाहून होणारा जो शोकरूप अग्नि त्याच्या संपर्कानें अत्यंत विलीन होतें. सूर्यकिरणांच्या संपर्कामुळें बर्फ, गारा वगैरे जलाचे विकार जसे वितळतात व अग्निज्वालेच्या संपर्कानें घृताचें काठिन्य जसें वितळतें त्याप्रमाणें तें त्यांचें जलमय शरीर शोकाग्नीनें वितळतें. ' ततः० '–त्यानंतर ' कृतात्यये '–केलेल्या इष्टादि कर्माचा फलोपभोगानें उपक्षय–नाश झाला असतां ते या लोकीं सानुशयच अवरोहण करितात. [–' केन हेतुना० ' इत्यादि भाष्यानें आकांक्षा द्वारा सूत्रोक्त हेतूचें ग्रहण करून त्याचें व्याख्यान करितात—]

**भाष्यं—केन हेतुना। दृष्टस्मृतिभ्यामित्याह। तथाहि प्रत्यक्षा श्रुतिः सानुशयानामवरोहं दर्शयति—' तद्य इह रमणीयचरणा अभ्याशो ह यत्ते रमणीयां योनिमापद्येरन्ब्राह्मणयोनिं वा क्षत्रिययोनिं वा वैश्ययोनिं वाथ य इह कपूयचरणा अभ्याशो ह यत्ते कपूयां योनिमापद्येरञ्श्वयोनिं वा सूकरयोनिं वा चंडालयोनिं वा ' इति। चरणशब्देनानुशयः सूच्यत इति वर्णयिष्यति॥**

**भाष्यार्थ**—कोणत्या हेतूनें–कोणत्या कारणानें? ' दृष्ट-स्मृतिभ्यां '–श्रुति व स्मृति या दोन कारणांनीं, असें सूत्रकार सांगतात. कसें तें पहा–दृष्ट म्ह० प्रत्यक्ष श्रुति सानुशय जीवांचाच अवरोह दाखविते–' तत्० '–" त्यांच्या मध्यें जे कोणी ' इह-'या कर्मभूमींत ' रमणीयचरणाः '–शुभ आचरण करणारे असतात ते रमणीय-शुभ योनीला प्राप्त होतात, असें जें आहे तें ' अभ्याशः ह '–सत्वरच–अप्रतिबंधानें घडतें. [–' ब्राह्मणयोनिं० ' इत्यादि भाष्यानें श्रुति त्या रमणीय योनीचाच विशेष सांगते–]=ब्राह्मणयोनीला किंवा क्षत्रिययोनीला किंवा वैश्ययोनीला सत्वर–अप्रतिबंधानें प्राप्त होतात.[–प्रत्यवरोह करणाऱ्या शुभ कर्मवानांची शुभयोनिप्राप्ति सांगून

'**अथ०**' इत्यादि वाक्यानें त्याच अशुभकर्मवानांची अशुभयोनिप्राप्ति सांगते-] ="आतां जे कोणी त्यांमध्यें निंदित कर्म करणारे असतात ते सत्वर-अप्रतिबंधानें निंदितयोनीला प्राप्त होतात. कुत्र्याच्या योनीला किंवा डुकराच्या योनीला किंवा चांडालाच्या योनीला"-छां.५.१०.७-अशी ही श्रुति सानुशयांचाच अवरोह दाखविते. [-" अहोपण, येथें चरणामुळें-आचारामुळें योनिप्राप्ति सांगितली आहे, अनुशयामुळें नव्हे. आचरण निराळें व अनुशय निराळा" '**चरणशब्देन०**' इत्यादि भाष्यानें उत्तर-]=या श्रुतींतील 'चरण-'शब्दानें अनुशय सुचविला जातो, असें वर्णन पुढें करतील [-' अनुशेते' म्ह० भोक्त्याच्या मागोमाग जातो, म्हणून अनुशय कर्मसमूह, तो 'चरण-'शब्दाचा अर्थ होईल, असा भावार्थ.-सूत्रांतील 'दृष्ट-'शब्दानें प्रत्यक्ष श्रुति सांगितली. आतां '**दृष्टश्च०**' इत्यादि भाष्यानें त्याचें दुसरें व्याख्यान करितात—]

**भाष्यं—दृष्टश्चायं जन्मनैव प्रतिप्राण्युच्चावचरूप उपभोगः प्रविभज्यमान आकस्मिकत्वासंभवादनुशयसद्भावं सूचयति। अभ्युदयप्रत्यवाययोः सुकृतदुष्कृतहेतुत्वस्य सामान्यतः शास्त्रेणावगमितत्वात् ॥**

**भाष्यार्थ**—आणि प्रत्येक प्राण्यामध्यें जन्मानेंच विभाग पावणारा हा उच्चनीचरूप प्रत्यक्ष उपभोग, आकस्मिक-निष्कारण असणें अशक्य असल्यामुळें, अनुशयाचा सद्भाव सुचवितो. [' सर्व प्राण्यांमध्यें जन्मापासून उपलब्ध होणारा हा उत्कृष्ट-अपकृष्टरूप भोग अदृष्टनिमित्त आहे. त्याचें निमित्त अदृष्ट-पूर्वकर्म आहे, त्याला भोगत्व असल्यामुळें, स्वर्गादि भोगांप्रमाणें ' असा याचा भावार्थ.-" पण त्याच्या आकस्मिकत्वाचा-निष्कारणत्वाचा असंभव कसा ?" '**अभ्युदय०**' इत्यादि भाष्यानें उत्तर-]=कारण अभ्युदय व प्रत्यवाय यांच्या सुकृत-दुष्कृतहेतुत्वाचा सामान्यतः शास्त्रानें बोध करविला आहे. [" पुण्यकर्मानें पुण्य होतो व पाप कर्मानें पापी होतो "-बृ. ४. ४. ५. सु. उ. ६९०-या वचनावरून सुख पुण्यामुळें व दुःख पापामुळें होतें-सुख व दुःख हीं पुण्य-पापांचीं कार्यें-फलें आहेत, हें सिद्ध झालेलें असल्यामुळें ' जो भोग तो कर्मनिमित्त ' अशा व्याप्तीवरून अनुशयाची सिद्धि होते, असा भावार्थ.-याप्रमाणें सूत्रांतील दृष्टाचें व्याख्यान करून '**स्मृतिरपि०**' या भाष्यानें स्मृतीचें व्याख्यान करितात—]

**भाष्यं—स्मृतिरपि "वर्णा आश्रमाश्च स्वकर्मनिष्ठाः प्रेत्य कर्मफलमनुभूय ततः शेषेण विशिष्टदेशजातिकुलरूपायुःश्रुतवृत्तवित्तसुखमेधसो जन्म प्रतिपद्यन्ते" इति सानुशयानामेवावरोहं दर्शयति ॥**

**भाष्यार्थ**—स्मृतीसुद्धां " स्वकर्मामध्यें तत्पर झालेले वर्ण व आश्रम 'प्रेत्य'—मरून चंद्रलोकावर आरूढ होऊन कर्मफलाचा अनुभव घेऊन 'ततः शेषेण'—भोगलेल्या कर्माहून अन्य अवशिष्ट कर्मानें विशिष्ट देश,जाति,कुल, रूप, आयुष्य, श्रुत—ज्ञान, वृत्त—आचार, सुख व मेधा—धारणायुक्त बुद्धि ज्यांच्यामध्यें आहे असे होत्साते जन्म घेतात " अशी ( ही स्मृतीसुद्धां ) सानुशयांचाच अवरोह दाखविते. [ यांतील विशिष्ट हें पद जाति, कुल, इत्यादि सर्वांशीं संबद्ध होतें.—पण अनुशय हा शब्द अन्य अर्थी रूढ असल्यामुळें ' कः पुनः० ' इत्यादि भाष्यानें त्याच्या अर्थाचा निश्चय करण्यासाठीं प्रश्न—]

**भाष्यं—कः पुनरनुशयो नामेति । केचित्तावदाहुः—स्वर्गार्थस्य कर्मणो भुक्तफलस्यावशेषः कश्चिदनुशयो नाम । भांडानुसारिस्नेहवत् । यथाहि स्नेहभांडं रिच्यमानं न सर्वात्मना रिच्यते । भांडानुसार्येव कश्चित्स्नेहशेषोऽवतिष्ठते । तथाऽनुशयोऽपीति ॥**

**भाष्यार्थ**—पण हा अनुशय म्ह० काय आहे, असा येथें प्रश्न उद्भवतो. [त्याविषयीं अगोदर एकदेशिमत सांगतात—]=**'केचित् तावत्०'**—त्याविषयीं अगोदर कोणी असें म्हणतात—[ त्यांच्या पक्षीं ' ज्यांचें फल निःशेष भोगिलें आहे अशा इष्टादि कर्मांतील अननुभुक्त-अभुक्त अशा दुसऱ्या संचित कर्मांच्या सामर्थ्यानें आवृत्ति —पुनर्जन्म—प्रत्यवरोह होतो कीं त्याच कर्मांतील कांहीं कर्मे अवशिष्ट राहिल्यामुळें आवृत्ति होते ' असा संशय आला असतां इष्टादि कर्मांचें फल भोगिलेलें असल्यामुळें अभुक्त अशा दुसऱ्या कर्मामुळें त्यांची आवृत्ति होते, असें प्राप्त झालें असतां एकदेशी सूत्रांतील ' कृतात्ययेऽनुशयवान् ' इत्यादि भागाचें व्याख्यान **' स्वर्गार्थस्य० '** इत्यादि भाष्यानें करितो—]=ज्याचें फल भोगिलें आहे, अशा स्वगार्थ—स्वर्गासाठीं केलेल्या कर्माचा कांहीं थोडासा अवशेष—लेश हाच अनुशय आहे. [ स्वर्गार्थ केलेलें जें इष्टादि कर्म त्याचा भोग घेतल्यामुळें विनाश—क्षय झाला असतां त्याचाच राहिलेला कांहीं अवशेष हा अनुशय आहे. त्या अनुशयानें युक्त असलेला कर्मी अवरोहण करितो, असा भावार्थ.—सूत्रांतील ' दृष्ट ' या पदाचा अर्थ सांगतो—]=**' भाण्डानुसारिस्नेहवत्०** '—भांड्याच्या अनुसारी स्नेहाप्रमाणें [—**' यथा० '** इत्यादि भाष्यानें याचेंच व्याख्यान—]=ज्याप्रमाणें रिकामें केलें जाणारें तूप, तेल इत्यादि स्नेहद्रव्याचें भांडें निःशेष रिकामें होत नाहीं, तर त्यांतील कांहीं स्नेहाचा शेष भांड्याला लागून राहतोच, हें प्रसिद्ध आहे. तसाच अनुशयहि—कर्मावशेषहि राहतो, असा भावार्थ. [—" अहोपण, अविरोधामुळें

भांडानुसारी स्नेहाचा अवशेप भांड्यांत राहणें युक्त आहे. पण कर्मफलोदय-विरोधित्वामुळें—कर्माचा फलोदयाशीं विरोध असल्यामुळें फल उत्पन्न होतांच तें नष्ट होतें. त्यामुळें त्याच्या शेपाची सिद्धि होत नाहीं" अशी '**ननु०**' इत्यादि भाष्यानें शंका—]

**भाष्यं—ननु कार्यविरोधित्वाददृष्टस्य न भुक्तफलस्यावशेषावस्थानं न्याय्यम्। नायं दोपः। न हि सर्वात्मना भुक्तफलत्वं कर्मणः प्रतिजानीमहे॥**

**भाष्यार्थ**—" अहोपण, कार्यविरोधित्वामुळें ज्याचें फल भुक्त—भोगलेलें आहे अशा अदृष्टाच्या अवशेपाचें अवस्थान—त्याच्या अवशेपाचें अस्तित्व न्याय्य नाहीं, तें संभवत नाहीं. [—पण सर्व कर्माचें फल जर उत्पन्न झालें तर त्याचा शेष सिद्ध होणार नाहीं, हें खरें आहे: पण सर्व कर्माचें फल उत्पन्न होतच नाहीं, असें समाधान एकदेशी '**नायं दोष:०**' या भाष्यानें सांगतो—]=हा दोष येत नाहीं. कारण कर्माला 'सर्वात्मना'—निःशेप भुक्तफलत्व आहे—कर्माच्या निःशेष फलाचा भोग होतो अशी आम्ही प्रतिज्ञा करीत नाहीं. [—" अहोपण, ' कर्मठ जीव ज्या कर्मानें चंद्रलोकीं आरूढ झालेले असतात तें सर्व कर्म त्यांनीं तेथें भोगिलेलें नसतें ' हें म्हणणें अयुक्त आहे," अशी '**ननु०**' इत्यादि भाष्यानें शंका—]

**भाष्यं—ननु निरवशेषकर्मफलोपभोगाय चंद्रमंडलमारूढाः। बाढम्। तथापि स्वल्पकर्मावशेषमात्रेण तत्रावस्थातुं न लभ्यते। यथा किल कश्चित् सेवकः सकलैः सेवोपकरणै राजकुलमुपसृप्तः चिरप्रवासात्परिक्षीणबहूपकरणश्छत्रपादुकादिमात्रावशेषो न राजकुलेऽवस्थातुं शक्नोति। एवमनुशयमात्रपरिग्रहो न चंद्रमंडलेऽवस्थातुं शक्नोतीति॥**

**भाष्यार्थ**—अहोपण, निःशेष कर्मफलाचा उपभोग घेण्यासाठीं ते चंद्रमंडलावर आरूढ झालले असतात! [— एकदेशी भोगासाठीं चंद्रारोहणाचा अंगीकार करून विरोधाचा परिहार करितो—]='**बाढं**'—हें खरें आहे. '**तथापि०**' —तरी पण केवल स्वल्प कर्माचा अवशेष राहिल्यानें त्यांना तेथें राहतां येत नाहीं. [— या अर्थीहि सूत्रांतलि 'दृष्ट' या पदाचें '**यथा०**' इत्यादि भाष्यानें व्याख्यान—] =व्यवहारांत जसा एखादा सेवक सर्व सेवोपकरणांनीं—सेवासाधनांनीं राजकुलास प्राप्त झाला पण दीर्घ प्रवासामुळें ज्याचें तें बहूपकरण—सेवेचीं तीं अनेक साधनें सर्वथा क्षीण झालीं आहेत व ज्याच्यापाशीं केवल छत्र-पादुकादिकच अवशिष्ट राहिलीं आहेत असा तो राजकुलांत राहण्यास समर्थ होत नाहीं, त्याचप्रमाणें केवल अनुशय हाच ज्याचा परिग्रह आहे असा तो कर्मी चंद्रमंडलीं राहूं

शकत नाहीं. ' इति० ' असें एकदेशी म्हणतो. [ या एकदेशिव्याख्यानांत सूत्रांतील ' स्मृति-'शब्दानें लौकिक स्मृति किंवा पूर्वोक्त दृष्टमूलक ' ततः शेषेण ' इत्यादि स्मृति ग्रहण केलेली आहे.—भाष्यकार ' न च० ' इत्यादि भाष्यानें या एकदेशिमताला दूषित करितात—]

**भाष्यं—न चैतद्युक्तमिव। न हि स्वर्गार्थस्य कर्मणो भुक्तफलस्यावशेषानुवृत्तिरुपपद्यते। कार्यविरोधित्वादित्युक्तम्। नन्वेतदप्ययुक्तम्। न स्वर्गफलस्य कर्मणो निखिलस्य भुक्तफलत्वं भविष्यतीति। तदेतदपेशलम्। स्वर्गार्थं किल कर्म स्वर्गस्थस्यैव स्वर्गफलं निखिलं न जनयति, स्वर्गच्युतस्यापि कंचित्फललेशं जनयतीति। न शब्दप्रमाणकानामीदृशी कल्पना अवकल्पते॥**

**भाष्यार्थ**—पण हें म्हणणें सयुक्तिकसें दिसत नाहीं. [ येथें भाष्यकारांनीं मधुर उक्तीनें 'इव-'कार जरी योजिला आहे तरी वस्तुतः त्यांना येथें 'एव-'कारच विवक्षित आहे. अर्थात् हें एकदेशिमत अयुक्तच आहे, असा याचा भावार्थ. —' न हि० ' इत्यादि भाष्यानें त्याच्या अयुक्तत्वाविषयीं हेतु सांगतात—]=कारण ज्याचें फल भोगिलें आहे अशा स्वर्गार्थ—स्वर्गासाठींच केलेल्या कर्माच्या अवशेषाची अनुवृत्ति होऊं शकत नाहीं, याविषयीं ' कार्यविरोधित्वात् '—कर्माचा त्याच्या फलोत्पत्तीशीं विरोध येत असल्यामुळें असा हेतु आम्हीं वर सांगितला आहे. [ स्वर्गार्थ कर्मानें स्वर्गाचा जर आरंभ केला असेल तर त्याचा शेष संभवत नाहीं व त्या कर्मानें स्वर्ग जर आरब्ध नसेल तर त्या स्वर्गार्थ कर्माचा कांहीं उपयोग नाहीं, असा याचा भावार्थ.—" अहोपण, स्वर्गाला कर्मारब्धत्व जरी असलें तरी सर्व कर्माचा आरंभ झालेला नसल्यामुळें हा उक्त दोष येत नाहीं " अशी ' ननु० ' इत्यादि भाष्यानें शंका—]=अहोपण, हें तुमचें म्हणणेंहि अयुक्तच आहे, कारण स्वर्ग हें ज्याचें फल आहे अशा सर्व कर्माला भुक्तफलत्व नाहीं—त्या सर्व कर्माचें फल भोगलेलें नाहीं. [—" स्वर्गासाठीं विहित असलेल्या कर्माचें स्वर्गार्थत्व संभवत असल्यामुळें असें म्हणूं नको, " असें भाष्यकार ' तदेतत्० ' इत्यादि भाष्यानें म्हणतात—]=हें तुमचें म्हणणें अगदींच दुर्बल आहे. खरोखर स्वर्गासाठीं केलेलें कर्म स्वर्गस्थ असलेल्याच पुरुषाचें सर्व स्वर्गफल उत्पन्न करीत नाहीं, तर तें स्वर्गापासून च्युत झालेल्याहि त्याच्या थोड्याशा फललेशाला उत्पन्न करितें, हें तुमचें म्हणणें अयुक्त आहे. ज्यांना शब्द प्रमाण आहे त्यांची ही असली कल्पना मुळींच उपपन्न होत नाहीं. [—एकदेशीनें वर जो दृष्टान्त दिला आहे त्याला ' स्नेहभांडे० ' इत्यादि भाष्यानें दूषित करितात—]

**भाष्यं—स्नेहभांडे तु स्नेहलेशानुवृत्तिर्दृष्टत्वादुपपद्यते। तथा सेवकस्योपकरणलेशानुवृत्तिश्च दृश्यते। न त्विह तथा स्वर्गफलस्य कर्मणो लेशानुवृत्तिर्दृश्यते। नापि कल्पयितुं शक्यते। स्वर्गफलत्वशास्त्रविरोधात्। अवश्यं चैतदेवं विज्ञेयम्। न स्वर्गफलस्येष्टादेः कर्मणो भांडानुसारिस्नेहवदेकदशोऽनुवर्तमानोऽनुशय इति॥**

**भाष्यार्थ—**पण घृतादि स्नेहाच्या भांड्यांत स्नेहलेशाची अनुवृत्ति प्रत्यक्ष अनुभवाला येत असल्यामुळें ती उपपन्न होते. त्याचप्रमाणें सेवकाच्या उपकरण-लेशाचीहि अनुवृत्ति प्रत्यक्ष दिसते. [–" तर मग दार्ष्टान्तिकांतहि तशीच लेशाची अनुवृत्ति होईल " अशी आशंका घेऊन ' पण ती कर्मलेशानुवृत्ति प्रत्यक्ष दृष्ट आहे कीं कल्पित आहे ? ' असा विकल्प करून त्यांतील पहिल्या दृष्ट पक्षाचें निरसन ' **न तु॰** ' इत्यादि भाष्यानें करितात–]=पण या शास्त्रव्यवहारभूमींत स्वर्ग हें फल देणाऱ्या कर्माच्या लेशाची तशी अनुवृत्ति दिसत नाहीं. [–'**नापि॰**' इत्यादि भाष्यानें दुसऱ्या कल्पनापक्षाचें निरसन–]='स्वर्गार्थ कर्माला स्वर्गफलत्व आहे,' असें सांगणाऱ्या शास्त्राशीं विरोध येत असल्यामुळें लेशानुवृत्तीची कल्पनाहि करितां येणें शक्य नाहीं. [हा अर्थ केवळ शास्त्रगम्य असल्यामुळें तो ' सामान्यतोदृष्ट ' अनुमानाचा विषय होऊं शकत नाहीं, असा भावार्थ.–शिवाय स्वर्गहेतु कर्मांतील अवशेष, एतद्रूप अनुशयामुळें अवरोह होतो असें मानिल्यास कपूययोनिप्राप्ति –श्व-सूकरादि निंदित योनिप्राप्ति सांगणाऱ्या शास्त्राशीं विरोध येतो, असें ' **अवश्यं च॰** ' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=आणि 'स्नेहपात्राला चिकटून राहणाऱ्या स्नेहा-प्रमाणें स्वर्ग हें ज्याचें फल आहे अशा इष्टादि कर्माचा अनुवृत्त होणारा एकदेश –लेश हा अनुशय नव्हे' असें हें अवश्य समजलें पाहिजे–असें समजणें सर्वथा युक्त आहे. [–' **यदि हि॰** ' इत्यादि भाष्यानें हेंच विशद करितात—]

**भाष्यं—यदि हि येन सुकृतेन कर्मणेष्टादिना स्वर्गमन्वभूवंस्तस्यैव कश्चिदेकदेशोऽनुशयः कल्प्येत। ततो रमणीय एवैकोऽनुशयः स्यान्न विपरीतः। तत्रेयमनुशयविभागश्रुतिः उपरुध्येत–' तद्य इह रमणीयचरणाः ' ' अथ य इह कपूयचरणाः ' इति। तस्मादामुष्मिकफले कर्मजाते उपभुक्तेऽवशिष्टमैहिकफलं कर्मान्तरजातमनुशयः तद्वन्तोऽवरोहन्तीति॥**

**भाष्यार्थ—**कारण ज्या सुकृत–पुण्यरूप इष्टादि कर्मानें जीवांनीं स्वर्गाचा अनुभव घेतला त्याचाच एखादा एकदेश हा अनुशय आहे, असें जर कल्पिलें तर रमणीय हाच एक अनुशय असतो, असें होईल. त्याच्या विपरीत–कपूय–अशुभ अनुशय असतो, असें होणार नाहीं. ' **तत्र इयं॰** '–आणि तसें झालें असतां

" त्यांतील जे येथें ' रमणीयचरण '–शुभ कर्म करणारे असतात ते रमणीय योनीस व जे 'कपूयचरण'–अशुभ कर्म करणारे असतात ते अशुभ श्व-सूकरादि योनीस प्राप्त होतात "–पृ. ३९–ही अनुशयाचा विभाग सांगणारी श्रुति उपरुद्ध–बाधित होईल ! [–याप्रमाणें परमताचा–एकदेशिमताचा असंभव आहे, असें सिद्ध झालें असतां ' **तस्मात्०** ' इत्यादि भाष्यानें स्वमताचा उपसंहार करितात–]=म्हणून ज्याचें फल ' आमुष्मिक '–पारलौकिक आहे अशा कर्मजाताचा–निःशेष कर्माचा उपभोग घेतला असतां ज्याचें फल ' ऐहिक '–इहलोकीं भोगण्यास योग्य आहे असें दुसरें सर्व कर्मजात हा अनुशय असून त्यानें युक्त असलेले ते इष्टादि कर्मकर्ते चंद्रलोकापासून अवरोहण करितात–खालीं येतात, ' **इति** '–हाच सिद्धान्त आहे. [–' **यदुक्तं०** ' इत्यादि भाष्यानें पूर्वपक्षाच्या पहिल्या बीजाचा अनुवाद करितात–]

**भाष्यं—यदुक्तं यत्किंच इत्यविशेषपरामर्शात्सर्वस्येह कृतस्य कर्मणः फलोपभोगेनान्तं प्राप्य निरनुशया अवरोहन्तीति । नैतदेवम् । अनुशयसद्भावस्यावगमितत्वात् । यत्किंचिदिह कृतमामुष्मिकफलं कर्म आरब्धभोगं तत्सर्वं फलोपभोगेन क्षपयित्वेति गम्यते ॥**

**भाष्यार्थ**—आतां पूर्ववाद्यानें–' यत्किंच '–"जें कांहीं करितो तें सर्व, असा श्रुतीनें अविशेष–सामान्य परामर्श केलेला असल्यामुळें येथें केलेल्या सर्व कर्माच्या अन्तास फलोपभोगानें प्राप्त होऊन निरनुशय–अनुशयरहित होत्साते अवरोहण करितात " असें जें म्हटलें आहे,–पृ. ३२–[ ' **नैतदेवं** ' याच्याशीं पुढें संबंध. यद्यपि 'यत्किंच' व 'यावत्संपातं' हे दोन शब्द चंद्रलोकांतच सर्व कर्माचें भुक्तत्व प्राप्त करून देणारे असल्यामुळें अनुशयाच्या अभावाविषयीं लिंगभूत आहेत, तथापि ' रमणीयचरणाः ' व ' कपूयचरणाः ' हे दोन शब्द विशिष्ट जाति-देश इत्यादिकांचा आरंभ करणाऱ्या ऐहिक कर्माच्या सद्भावाचें–अस्तित्वाचें ज्ञान करून देणारे असल्यामुळें अशेष भोगविषय सामान्य लिंगाचा ऐहिक कर्मास्तित्वविषय विशेषलिंगानें आमुष्मिक विषयत्वानें संकोच होतो, असें मानून आचार्य '**नैतदेवं०**' इत्यादि भाष्यानें म्हणतात–]=हें असें नाहीं. कारण अनुशयाच्या सद्भावाचा बोध करून दिलेला आहे. '**यत्किंचित्०**'–जें कांहीं इहलोकीं केलेलें आमुष्मिकफल आरब्धभोग कर्म तें सर्व फलोपभोगानें क्षीण करून, असें अवगत होतें. [ ज्याचें फल पारलौकिक–परलोकीं मिळणारें आहे अशा व ज्याच्या भोगास आरंभ झालेला आहे, जें फलोन्मुख झालें आहे अशा इहलोकीं केलेल्या सर्व कर्माचा चंद्रलोकीं राहून फलोपभोगानें क्षय करून त्या चंद्रलोकापासून पुनः या लोकीं परत येतो, असें

'प्राप्यान्तं०'–पृ.३२--या वाक्यानें अवगत होतें, अशी भाष्याची योजना करावी. –'यदप्युक्तं०' इत्यादि भाष्यानें दुसऱ्या पूर्वपक्षबीजाचा अनुवाद करितात---]

**भाष्यं**—**यदप्युक्तं प्रायणमविशेषादनारब्धफलं कृत्स्नमेव कर्माभिव्यनक्ति। तत्र केनचित्कर्मणाऽमुष्मिँल्लोके फलमारभ्यते। केनचिदस्मिन्नित्ययं विभागो न संभवतीति। तदप्यनुशयसद्भावप्रतिपादनेनैव प्रत्युक्तम्॥**

**भाष्यार्थ**--त्याचप्रमाणें 'प्रायण म्ह० मरण अविशेषानें–ज्याच्या फलाला आरंभ झालेला नाहीं अशा सर्वच कर्माला अभिव्यक्त–फलोन्मुख करितें' असेंहि जें म्हटलें आहे.–पृ.३३–[–मरणाला अविशेषानें सर्व अनारब्ध कर्माचें व्यंजकत्व आहे, मरण कांहीं विशेष न ठेवितां सर्व संचित कर्मांना व्यक्त करणारें आहे, असें मानिल्यास कर्माच्या विभागाचा असंभव हें फलित 'तत्र०' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=तें तसेंच मानिल्यास कांहीं कर्माकडून परलोकीं फलाचा आरंभ केला जातो व कांहीं कर्माकडून इहलोकीं फलाचा आरंभ केला जातो, असा हा विभाग संभवत नाहीं. म्हणून [–'रमणीयचरणाः०' इत्यादि अनुशयवादी श्रुति-विरोधामुळें मरण जरी अभिव्यंजक असलें तरी तें सर्वच कर्माचें अभिव्यंजक आहे असें अनुमान करितां येत नाहीं, असें 'तदपि०' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=तें वाद्याचें म्हणणेंहि अनुशयाच्या सद्भावप्रतिपादनानेंच निरस्त आहे–अनुशय आहे, असें प्रतिपादन केल्यानेंच त्याचें निरसन झालें आहे. [–मरणालाहि व्यंजकत्व आहे, असें वर म्हटलें, पण वस्तुतः तेंहि नाहीं, असें'अपि च०'इत्यादि भाष्यानें सांगतात–]

**भाष्यं**—**अपि च केन हेतुना प्रायणमनारब्धफलस्य कर्मणोऽभिव्यंजकं प्रतिज्ञायत इति वक्तव्यम्। आरब्धफलेन कर्मणा प्रतिबद्धस्येतरस्य वृत्त्युद्भवानुपपत्तेस्तदुपशमात्प्रायणकाले वृत्त्युद्भवो भवतीति यद्युच्येत। ततो वक्तव्यम्। यथैव तर्हि प्राक्प्रायणादारब्धफलेन कर्मणा प्रतिबद्धस्येतरस्य वृत्त्युद्भवानुपपत्तिरित्येवं प्रायणकालेऽपि विरुद्धफलस्यानेकस्य कर्मणो युगपत्फलारंभासंभवाद्बलवता प्रतिबद्धस्य दुर्बलस्य वृत्त्युद्भवानुपपत्तिरिति॥**

**भाष्यार्थ**---शिवाय कोणत्या हेतूनें प्रायण–मरण अनारब्धफल कर्माचें अभिव्यंजक आहे, अशी प्रतिज्ञा केली जाते, तें तुम्हीं सांगितलें पाहिजे. [ कारण मरणाला सर्वकर्मव्यंजकत्व आहे, असें म्हणण्यास कांहीं कारण नाहीं, असा भावार्थ. –पण पूर्ववादी 'मला हा प्रश्नच केला आहे,' असें मानून '**आरब्धफलेन०**'इत्यादि भाष्यानें कारण सांगतो–]="ज्याच्या फलाचा आरंभ झालेला आहे, अशा कर्मानें प्रतिबद्ध झालेल्या इतर कर्माच्या वृत्तीचा उद्भव होणें अयोग्य असल्यामुळें त्या

आरब्धफल कर्मांचा उपशम झाल्यामुळें–प्रारब्धकर्म संपल्यामुळें मरणसमयीं इतर म्ह० अनारब्धफल कर्मांच्या वृत्तीचा उद्भव होतो " असें जर तुजकडून सांगितलें जाईल तर मग आतां तुला असेंहि म्हटलें पाहिजे. [ नानाप्रकारचें सुख-दुःख हें ज्याचें फल आहे अशा कर्मांची मरणसमयीं अपर्यायानें–क्रमावांचून–एकदमच जर अभिव्यक्ति होत असेल तर कर्मांच्या अभिव्यक्तीचें फलोन्मुख होणें हेंच लक्षण असल्यामुळें एकाच वेळीं त्या त्या विविध सुख-दुःखोपभोगाचा प्रसंग येतो. पण तसा अनुभव मात्र कोठेंच येत नाहीं. यास्तव त्या त्या प्रबल कर्मांच्या प्रतिबंधाचा क्षय होणें याच्या अपेक्षेनें म्ह० त्या त्या प्रबल कर्मप्रतिबंधध्वंसाची अपेक्षा करून क्रमानेंच त्या त्या कर्मांची अभिव्यक्ति होते,–असा परिहार **'यथैव०'**इत्यादि भाष्यानें करितात–]=तर मग ज्याप्रमाणें मरणाच्या पूर्वी आरब्धफल कर्मानें प्रतिबद्ध झालेल्या इतर अनारब्धफल कर्मांच्या वृत्तीचा उद्भव उपपन्न होत नाहीं,त्याचप्रमाणें प्रायणकालींहि ज्यांचें फल परस्पर विरुद्ध आहे अशा अनेक कर्मांचा एकाच वेळीं फलारंभ संभवत नसल्यामुळें त्यांतील बलवान् कर्मानें प्रतिबद्ध झालेल्या दुर्बल कर्मांच्या वृत्तीच्या उद्भवाचीहि अनुपपत्ति आहे, असेंच तुला म्हटलें पाहिजे. [–" अहोपण, 'एकाच वेळीं फलारंभाचा असंभव असल्यामुळें' असें जें तुम्ही म्हणतां तें असिद्ध आहे. कारण सर्वहि कर्मांचें अनारब्धफलत्व समान–एकसारखेंच असल्यामुळें त्या सर्वांला मिळून एक जन्मारंभकत्व संभवतें–त्या सर्व कर्मांमुळें एका जन्माचा आरंभ होऊं शकतो." अशी आशंका घेऊन 'ज्या कर्मांचें फल विरुद्धजातिनिमित्त असतें म्ह० ज्याच्या फलाचा भोग भिन्न भिन्न विरुद्ध जन्मांतच होणें शक्य आहे, अशा कर्माला एका जन्माचें आरंभक मानणें हें शास्त्र व युक्ति या दोहोंच्याहि विरुद्ध आहे,' असें **'न हि०'** इत्यादि भाष्यानें सांगतात–]

**भाष्यं**—**न ह्यनारब्धफलत्वसामान्येन जात्यंतरोपभोग्यफलमप्यनेकं कर्म एकस्मिन्प्रायणे युगपदभिव्यक्तं सदेकां जातिमारभत इति शक्यं वक्तुं। प्रतिनियतफलत्वविरोधात्। नापि कस्यचित्कर्मणः प्रायणेऽभिव्यक्तिः कस्यचिदुच्छेद इति शक्यते वक्तुम्। ऐकान्तिकफलत्वविरोधात्। न हि प्रायश्चित्तादिभिर्हेतुभिर्विना कर्मणामुच्छेदः संभाव्यते ॥**

**भाष्यार्थ**—कारण अनारब्धफलत्वाचें सादृश्य, या एवढ्याच निमित्तानें म्ह० संचित कर्मानें आरब्धफल नसणें, या एवढ्याच कारणानें भिन्न भिन्न जन्मांतच ज्याचें फल उपभोग्य आहे असेंहि अनेक कर्म एकाच प्रायणांत एकाच वेळीं अभिव्यक्त–फलोन्मुख होऊन एका जन्माचा आरंभ करितें, असें म्हणणें

शक्य नाहीं. कारण तसें मानणें हें प्रतिनियतफलत्वाच्या विरुद्ध आहे. [ विशिष्ट कर्माचें विशिष्ट फल विशिष्ट जन्मांत मिळतें, या नियमाशीं विरोध येत असल्यामुळें तसें म्हणतां येत नाहीं, असा भावार्थ.—"अहोपण, मरणावस्थेमध्यें विरुद्ध कर्म उपस्थित झालें असतां त्यांतील प्रबल कर्मानें दुर्बलाचा उच्छेद—नाश होईल" अशी आशंका घेऊन ' नापि० ' इत्यादि भाष्यानें आचार्य म्हणतात—]=त्याचप्रमाणें मरणावस्थेंत कांहीं—बलवान् कर्माची अभिव्यक्ति होते व कांहीं—दुर्बल कर्माचा उच्छेद होतो, असेंहि म्हणतां येणें शक्य नाहीं. कारण तसें म्हटल्यास ऐकान्तिकफलत्वाशीं विरोध येतो. [ बलवान् कर्माच्या योगानें दुर्बल कर्माचा उच्छेद होतो, असें म्हटल्यास ' कर्म नियमानें आपलें फल दिल्यावांचून कधींहि क्षीण होत नाहीं ' या कर्माच्या नियत फलत्वाशीं विरोध येतो.—" अहोपण, केलेलें कर्म आपलें फल अवश्य देतेंच, असा हा कांहीं अव्यभिचारी नियम नाहीं. कारण प्रायश्चित्तानें व ब्रह्मज्ञानानें त्याचा क्षय होतो, अशी श्रुति असल्यामुळें कर्माचा फलोपभोगावांचूनहि क्षय संभवतो" अशी आशंका घेऊन 'पण प्रकृत—प्रबल कर्मानें दुर्बल कर्माचा नाश होतो याविषयीं तशा वचनाचा अभाव असल्यामुळें कर्माचा उच्छेद होत नाहीं,' असें ' न हि० ' इत्यादि भाष्यानें सांगतात—]=कारण प्रायश्चित्तादि हेतूंवांचून कर्माचा उच्छेद होणें शक्य नाहीं, तो संभवत नाहीं.[—प्रायश्चित्त, ब्रह्मज्ञान किंवा भोग या तीन हेतूंतील कोणत्या तरी एका हेतूवांचून कर्मांचा उच्छेद होऊं शकत नाहीं. याविषयीं '**स्मृतिरपि०**' इत्यादि भाष्यानें प्रमाण सांगतात—]

**भाष्यं—स्मृतिरपि विरुद्धफलेन कर्मणा प्रतिबद्धस्य कर्मान्तरस्य चिरमवस्थानं दर्शयति—" कदाचित्सुकृतं कर्म कूटस्थमिह तिष्ठति । मज्जमानस्य संसारे यावद्दुःखाद्विमुच्यते " इत्येवंजातीयका ॥**

**भाष्यार्थ**—स्मृतीसुद्धां ज्याचें फल विरुद्ध आहे अशा कर्मानें प्रतिबद्ध झालेल्या दुसऱ्या कर्माचें दीर्घकाल अवस्थान दाखविते. '**कदाचित्०**'—" एखादे वेळीं संसारांत निमग्न होत असलेल्या, दुःखोपभोगांत पडलेल्या जीवाचें सुकृत—पुण्यकर्म तो दुःखांतून विमुक्त होईपर्यंत येथें कूटस्थ—निर्विकारावस्थेंत राहतें—तें क्षीण न होतां दीर्घकाल तसेंच संस्काररूपानें राहतें." ही अशा प्रकारची स्मृति विरुद्धफल कर्मानें प्रतिबद्ध झालेल्या दुसऱ्या कर्माचें चिर अवस्थान दाखविते. [—याहि कारणानें ' प्रायणावस्थेंत अभिव्यक्त झालेलें सर्वच कर्म एका जन्माचा आरंभ करितें, ' हें म्हणणें अयुक्त आहे, असें ' '**यदि च०**' इत्यादि भाष्यानें सांगतात—]

**भाष्यं--यदि च कृत्स्नमनारब्धफलं कर्म एकस्मिन्प्रायणेऽभिव्यक्तं सदेकां जातिमारभेत। ततः स्वर्गनरकतिर्यग्योनिषु अधिकारानवगमाद्धर्माधर्मानुत्पत्तौ निमित्ताभावान्नोत्तरा जातिरुपपद्येत । ब्रह्महत्यादीनां चैकैकस्य कर्मणोऽनेकजन्मनिमित्तत्वं स्मर्यमाणमुपरुध्येत ॥**

**भाष्यार्थ**—आणि जर सर्व अनारब्धफल-संचित कर्म एका मरणावस्थेंत अभिव्यक्त-फलोन्मुख होत्सातें एका जन्माचा आरंभ करीत असेल तर मग स्वर्ग-नरक-तिर्यग्योनींमध्यें शास्त्राच्या अधिकाराचा बोध होत नसल्यामुळें धर्म व अधर्म यांची उत्पत्तिच होत नाहीं, असें झालें असतां निमित्ताच्या अभावीं पुढील जन्म उपपन्नच होणार नाहीं. [ एकाच जन्माचा आरंभ करणाऱ्या सर्व पूर्वकर्मांचा भोगानें क्षय झाल्यामुळें आणि शास्त्राचा अधिकार मनुष्यालाच असल्यामुळें, स्वर्गादि योनींमध्यें कर्मांची असिद्धि असल्यामुळें कर्मनिमित्त संसारच होणार नाहीं. ज्ञानाच्या अभावामुळें त्यांना मुक्ति मिळणेंहि शक्य नाहीं, असा भावार्थ.—सर्वकर्माशय एका जन्माचा आरंभ करितो, या पक्षीं " ब्रह्महत्या करणारा कुत्रें, सूकर, गाढव, उंट, बैल, बकरी, हरिण, पक्षी, चंडाल व निषाद यांच्या योनीस प्राप्त होतो " इत्यादि स्मृतींशींहि विरोध येतो, असें ' **ब्रह्महत्यादीनां०** ' इत्यादि भाष्यानें सांगतात—]=त्याचप्रमाणें स्मृतींत सांगितलें जाणारें ब्रह्महत्यादि एकेका कर्माचें अनेक जन्मनिमित्तत्व उपरुद्ध होईल. [ या—सर्वकर्मापासून एका जन्माच्या आरंभपक्षीं स्मृत्युक्त एकेका कर्माचें अनेक जन्मारंभकत्व बाधित होतें. " अहोपण, एकाहि कर्माचें अनेक जन्मारंभकत्व स्मृत असल्यामुळें अनेक कर्मांचें एक जन्मारंभकत्व दूर निरस्त आहे—तो पक्ष तर दूर फेंकून दिल्यासारखाच होतो, तो पक्ष सर्वथा त्याज्य ठरतो, असें जें तुमचें म्हणणें आहे तें अयुक्त आहे. कारण एक कर्म एकच फल देतें, असा अनुभव येतो व या सामान्यतोदृष्ट अनुमानाच्या विरुद्ध असलेलें वचन प्रमाण मानितां येत नाहीं " अशी आशंका घेऊन ' न च० ' इत्यादि भाष्यानें आचार्य म्हणतात—]

**भाष्यं—न च धर्माधर्मयोः स्वरूपफलसाधनादिसमधिगमे शास्त्रादतिरिक्तं कारणं शक्यं संभावयितुम्। न च दृष्टफलस्य कर्मणः कारीर्यादेः प्रायणमभिव्यंजकं संभवतीति अव्यापिकाऽपीयं प्राणस्याभिव्यंजकत्वकल्पना ॥**

**भाष्यार्थ**—आणि धर्म व अधर्म यांचें स्वरूप, फल व साधनें इत्यादिकांचें यथार्थ ज्ञान होण्यास शास्त्राहून निराळें—दुसरें कांहीं कारण—साधन आहे, अशी नुस्ती संभावनाहि करितां येणें शक्य नाहीं. [ शिवाय 'प्रायण सर्व कर्मांचें अभि-

व्यंजक आहे कीं कांहीं एखाद्याच कर्माचें अभिव्यंजक आहे ? ' यांतील पहिला पक्ष संभवत नाहीं,–असें ' न च० ' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=आणि ज्याचें फल दृष्ट–येथेंच मिळणारें आहे, अशा कारीरी–इत्यादि कर्मांचें प्रायण–मरण हें अभिव्यंजक संभवत नाहीं. त्यामुळें ही मरणाच्या अभिव्यंजकत्वाची कल्पना अव्यापिका–व्याप्तिशून्यहि आहे. [ येथेंच अनुष्ठान केलेल्या, वृष्टि हें फल देणाऱ्या कारीरी इष्टि इत्यादि कर्मांचें फल येथेंच भोगिलें जात असल्यामुळें त्याला प्रायणानें अभिव्यंग्यता नाहीं–मरणानें अभिव्यक्त होण्याचें त्याचें शील नाहीं, असा भावार्थ. –पूर्वोक्त विकल्पांतील दुसऱ्या पक्षाचें निरसन करणारे भाष्यकार वाद्यानें दिलेल्या दृष्टान्ताविषयीं ' प्रदीपोपन्यासः० ' इत्यादि भाष्यानें म्हणतात–]

**भाष्यं**—**प्रदीपोपन्यासोऽपि कर्मबलाबलप्रदर्शनेनैव प्रतिनीतः। स्थूलसूक्ष्मरूपाभिव्यक्तिवच्चेदं द्रष्टव्यम्। यथाहि प्रदीपःसमानेऽपि संनिधाने स्थूलं रूपमभिव्यनक्ति। न सूक्ष्मम्। एवं प्रायणं समानेऽप्यनारब्धफलस्य कर्मजातस्य प्राप्तावसरत्वे बलवतः कर्मणो वृत्तिमुद्भावयति। न दुर्बलस्येति ॥**

**भाष्यार्थ**—प्रदीपाचा दृष्टान्तहि कर्माच्या बलाबलप्रदर्शनानेंच निरस्त झाला आहे–त्याचेंहि निरसन झालें आहे. [ वाद्यानें जो प्रदीपाचा दृष्टान्त दिला आहे तोहि प्रायणाला कर्मव्यंजकत्व जर असतें तर अनुकूल झाला असता. पण जेव्हां तें सर्व कर्मांचें अभिव्यंजक नाहीं तर उलट बलवान् कर्मानें दुर्बल कर्म प्रतिबद्ध झालेलें दिसतें असें दाखविलें आहे तेव्हां त्यानेंच तो दृष्टान्तहि निरस्त झाला आहे, असा याचा भावार्थ.–किंवा प्रायणाला कांहीं कर्मांमध्यें व्यंजकत्व असो. या पक्षींहि प्रदीपाचा दृष्टान्त अनुकूलच होतो, असें '**स्थूलसूक्ष्म०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=शिवाय प्रायणाचें हें कर्माभिव्यंजकत्व दीपाच्या स्थूलसूक्ष्मरूपाच्या अभिव्यक्तीप्रमाणें समजावें. [–'**यथा०**' इत्यादि भाष्यानें हा उक्त अर्थच अधिक व्यक्त करितात–]=ज्याप्रमाणें प्रदीप वस्तूंचें सांनिध्य जरी समान–एकसारखेंच असलें तरी त्यांतील स्थूल रूपालाच अभिव्यक्त करितो, सूक्ष्म रूपाला अभिव्यक्त करीत नाहीं, त्याप्रमाणें मरण सर्व अनारब्धफल–संचितकर्मजाताला एकसारखेंच प्राप्तकालत्व जरी असलें तरी त्यांतील प्रबल कर्माच्याच वृत्तीला उत्पन्न करितें, दुर्बल कर्मांच्या वृत्तीला उत्पन्न करीत नाहीं. [ त्यामुळें मरणाच्या सर्व कर्मव्यंजकत्वाची सिद्धि होत नाहीं. कांहीं कर्मांचें अभिव्यंजकत्व आम्हांलाहि इष्टच आहे, असा या वाक्याला शेष लावावा.–'तस्मात्०'इत्यादि भाष्यानें' सर्व कर्माशय एक जन्म उत्पन्न करितो ' या मताच्या निरसनाचें निगमन करितात—]

**भाष्यं—तस्मात् श्रुतिस्मृतिन्यायविरोधाद् अश्लिष्टोऽयमशेषकर्माभिव्यक्त्यभ्युपगमः। शेषकर्मसद्भावेऽनिर्मोक्षप्रसंग इत्ययमप्यस्थाने संभ्रमः। सम्यग्दर्शनादशेषकर्मक्षयश्रुतेः। तस्मात्स्थितमेतदेव अनुशयवन्तोऽवरोहन्तीति ॥**

**भाष्यार्थ**—म्हणून श्रुति, स्मृति व न्याय यांच्या विरोधामुळें मरण सर्वकर्माला अभिव्यक्त करितें हें मत अनुपपन्न आहे. ['रमणीयचरण' ही श्रुति, 'श्व-सूकर' इत्यादि स्मृति व 'केन हेतुना' पृ. ४१–इत्यादि भाष्यानें सांगितलेला न्याय यांच्याशीं विरोध येत असल्यामुळें असा भावार्थ.–"अहोपण, सर्व कर्म एका मुमुक्षुदेहांत जर भोगिलें जात नसेल तर अवशिष्ट राहिलेल्या कर्माला अनंतत्व असल्यामुळें मुमुक्षूला मुक्ति कधींच मिळणार नाहीं आणि याप्रमाणें मुक्तीची अनुपपत्ति होत असल्यामुळें मरणावस्थेंत व्यक्त होणारें सर्व कर्म एका देहाचें आरंभक आहे" अशी आशंका घेऊन '**शेषकर्म०**' इत्यादि भाष्यानें आचार्य समाधान सांगतात–] =' मुमुक्षूच्याहि अवशिष्ट कर्माचा सद्भाव असल्यामुळें अनिर्मोक्षप्रसंग येतो ' असा हाहि अस्थानीं संभ्रम आहे. कारण सम्यग्ज्ञानानें सर्व कर्मांचा क्षय होतो असें सांगणारी श्रुति आहे. [–' **तस्मात्०** ' इत्यादि भाष्यानें सूत्रावयवाच्या व्याख्यानाचा उपसंहार करितात–]=म्हणून अनुशयवान् कर्मठ अवरोहण करितात, असें हेंच सिद्ध झालें.[–' **ते च०**' इत्यादि भाष्यानें अवशिष्ट सूत्रभागाचें व्याख्यान–]

**भाष्यं—ते चावरोहन्तो यथेतमनेवं चावरोहन्ति। यथेतमिति यथागतमित्यर्थः। अनेवमिति तद्विपर्ययेणेत्यर्थः। धूमाकाशयोः पितृयाणेऽध्वन्युपात्तयोः अवरोहे संकीर्तनाद् यथेतंशब्दाच्च यथागतमिति प्रतीयते। रात्र्याद्यसंकीर्तनाद् अभ्राद्युपसंख्यानाच्च विपर्ययोऽपि प्रतीयते ॥ ८ ॥**

**भाष्यार्थ**—आणि ते अवरोहण करणारे कर्मठ ज्या मार्गानें गेले होते त्या मार्गानें व ' अनेवं '– तद्विपरीत मार्गानें चंद्रलोकांतून अवरोहण करितात. ' यथेतं '–जसे गेले होते तसेच, असा भावार्थ व ' अनेवं '–त्याच्या विपर्ययानें–विपरीत मार्गानें, असा भावार्थ. [–" अहोपण, हें असें सांगणें विरुद्ध आहे " अशी आशंका घेऊन ' **धूम०** ' इत्यादि भाष्यानें आचार्य म्हणतात–]=पितृयाण मार्गामध्यें ज्यांचा संग्रह केला आहे असा धूम व आकाश यांचें अवरोहामध्यें संकीर्तन–कथन केलेलें असल्यामुळें व श्रुतींत ' यथेतं ' असा शब्द असल्यामुळें 'जसे गेले होते तसेच,' असें प्रतीत होतें. [ ' यथेतमेवाध्वानं पुनर्निवर्तन्ते ' व ' यथेतं ' पृ. ३०–अशी श्रुति असल्यामुळें, असा याचा भावार्थ.–'**रात्र्यादि०**' इत्यादि भाष्यानें विपर्ययप्रतीतीचेंहि सूचक लिंग सांगतात–]=तसेंच रात्र्यादि-

कांचें संकीर्तन केलेलें नसल्यामुळें व अभ्रादिकांचें उपसंख्यान–गणना केलेली असल्यामुळें त्याचा विपर्ययहि प्रतीत होतो. ८. [–सूत्रकार '**चरणात्०**' इत्यादि सूत्रानें पूर्वोदाहृत श्रुतीचें आक्षेप-समाधानपूर्वक विवरण करितात–]

**सूत्रं – चरणादिति चेन्नोपलक्षणार्थेति कार्ष्णाजिनिः ॥ ९**

**सूत्रार्थ**—'रमणीयचरणाः०' ही श्रुति 'चरणामुळें' योनिप्राप्ति दाखविते, अनुशयामुळें नव्हे, 'असें जर म्हणाल तर तें बरोबर नाहीं. कारण 'कार्ष्णाजिनि-' आचार्य ही 'चरण-'श्रुति अनुशयाच्या उपलक्षणार्थ आहे, असें मानितो.–९. सु. ब्र. २९७. [–'**अथापि०**' इत्यादि भाष्यानें सूत्रांतील आक्षेपाचें विवरण–]

**भाष्यं—अथापि स्यात् । या श्रुतिरनुशयसद्भावप्रतिपादनायोदाहृता—'तद्य इह रमणीयचरणाः' इति सा खलु चरणाद्योन्यापत्तिं दर्शयति । नानुशयात् । अन्यच्चरणमन्योऽनुशयः । चरणं चारित्रमाचारः शीलमित्यनर्थान्तरम् । अनुशयस्तु भुक्तफलात्कर्मणोऽतिरिक्तं कर्माभिप्रेतम् ॥**

**भाष्यार्थ**—आतां श्रुतीनें अनुशयाचें अस्तित्व जरी सांगितलें आहे तरी यावर असा आक्षेप येईल ! तुम्हीं जी श्रुति अनुशयाच्या सद्भावाविषयीं उदाहृत केली आहे–तुम्हीं अनुशयाचें अस्तित्व सांगण्यासाठीं 'त्यांतील जे **रमणीय-चरण** असतात' इत्यादि ज्या श्रुतीचा उल्लेख केला आहे ती श्रुति खरोखर **चरणा-मुळें** योनिप्राप्ति दाखविते. अनुशयामुळें नव्हे.–[ " अहोपण, चरणामुळें जी योनिप्राप्ति सांगितली आहे ती अनुशयामुळेंच आहे. कारण चरण व अनुशय यांचें ऐक्य आहे " अशी आशंका घेऊन आक्षेपक म्हणतो–]='**अन्यत् चरणं०**' चरण निराळें व अनुशय निराळा. [–त्यांचें अन्यत्वच विशद करण्यासाठीं '**चरणं**' इत्यादि भाष्यानें 'चरण' व 'अनुशय' या शब्दांच्या अर्थाचा अनुवाद करितो–] =चरण म्ह० चारित्र्य, आचार, शील, असें यांचें अर्थैक्य आहे. म्ह० या चारी शब्दांचा अर्थ एकच आहे. त्यांना भिन्नार्थत्व नाहीं. पण अनुशय म्ह० ज्याच्या फलाचा भोग घेतला आहे, अशा कर्माहून अतिरिक्त–भिन्न कर्म अभिप्रेत–अभीष्ट आहे. [–'**श्रुतिश्च०**' इत्यादि भाष्यानें त्याविषयीं श्रुतीचें आनुकूल्य दाखवितो–]

**भाष्यं—श्रुतिश्च कर्मचरणे भेदेन व्यपदिशति—'यथाकारी यथाचारी तथा भवति' इति 'यान्यनवद्यानि कर्माणि तानि सेवितव्यानि नो इतराणि । यान्यस्माकं सुचरितानि तानि त्वयोपास्यानि' इति च । तस्माच्चरणाद्योन्यापत्तिश्रुतेः नानुशयसिद्धिरिति चेत् ॥**

**भाष्यार्थ**—" जसें कर्म करणारा व जसें आचरण करणारा असतो तसा होतो "-पृ. ३२-अशी ही श्रुति कर्म व चरण यांचा भेदानें निर्देश करिते. त्याचप्रमाणें " जीं निर्दोष-अनिंदित कर्में असतात त्यांचेंच तूं सेवन करावेंस इतर-निंदित कर्माचें सेवन करूं नयेस. आम्हां आचार्यांचीं जीं शुभ आचरणें असतील त्यांचीच तूं उपासना-अनुष्ठान करावेंस "-तै. १. ११. सु.उ. २०३-ही श्रुतिहि कर्म व चरण यांचा भेदानें निर्देश करिते. [-त्यांचा भेद आहे, असें झालें असतां ' **तस्मात्०** ' इत्यादि भाष्यानें आक्षेपक फलित सांगतो-]=म्हणून चरणामुळें योनिप्राप्ति सांगणारी श्रुति असल्यामुळें अनुशयाची सिद्धि होत नाहीं. ' **इति चेत्** '-असें जर म्हणशील तर [-सूत्रांतील परिहारभागाचें व्याख्यान ' **नैष दोषः०** ' इत्यादि भाष्यानें करितात-]

**भाष्यं—नैष दोषः । यतोऽनुशयोपलक्षणार्थैव एषा चरणश्रुतिरिति कार्ष्णाजिनिराचार्यो मन्यते ॥ ९ ॥**

**भाष्यार्थ**—' न '-हा दोष येत नाहीं. कारण अनुशयाच्या उपलक्षणार्थच ही ' चरण-'श्रुति आहे, असें कार्ष्णाजिनि-आचार्य मानितो. [-" सर्वभूतांमध्यें शरीरानें, मनानें व वाणीनें द्रोह न करणें, तर त्यांच्यावर अनुग्रह करणें व ज्ञान, हें शील आहे, असें ज्ञानी समजतात. " अशा स्मृत असलेल्या-स्मृत्युक्त शीलालाहि कर्मांगत्व असल्यामुळें शीलवाची ' चरण-'शब्दानें कर्मानुशय लक्षित-सूचित होतो, असा याचा भावार्थ. ]९. [-" पण कार्ष्णाजिनीच्या वाक्याला पौरुषेयत्व असल्यामुळें त्याचें मूल सांगणें उचित आहे, असें झालें असतां मुख्य अर्थाच्या त्यागानें लक्षणा करण्यास कांहीं हेतु-कारण नाहीं. म्हणून चरण-शब्दित शीलालाच, त्याच्या आनर्थक्याचा परिहार करण्यासाठीं योनिप्राप्तीचें हेतुत्व आहे " अशी आशंका घेऊन सूत्रकार ' **आनर्थक्यं०** ' इत्यादि सूत्रानें तिचा परिहार करितात-]

## सूत्रं—आनर्थक्यमिति चेन्न तदपेक्षत्वात् ॥ १०

**सूत्रार्थ**—अहोपण, ' चरण-'श्रुतीचा ' आचार ' हा मुख्य अर्थ सोडून ' अनुशय ' हा लाक्षणिक अर्थ घेतल्यास त्या श्रुतीला ' आनर्थक्य प्राप्त होतें'

---

१ **रत्नप्रभा**—अद्रोहादिक व शास्त्रार्थज्ञान एतद्रूप शील हें कर्माचें अंग आहे, असें स्मृतींत सांगितलें आहे. ' चरण ' हें पद त्याचाच बोध करितें. तें शीलबोधक श्रौत ' चरण-'पद आपल्या अंगी श्रौतकर्माचें लक्षक आहे. कर्माचीच उत्तरावस्था हें धर्माधर्मसंज्ञक अपूर्व आहे. यास्तव कर्मलक्षणेनेंच त्याहून अभिन्न असलेल्या अपूर्वाख्य अनुशयाची सिद्धि होते, असें कार्ष्णाजिनीचें मत आहे.

असें जर म्हणाल तर तें बरोबर नाहीं. कारण इष्टादि कर्माला चरणाची अपेक्षा आहे. त्यामुळें ' चरण-'श्रुतीला आनर्थक्य नाहीं. १० [-' **स्यादेतत्०** ' इत्यादि भाष्यानें सूत्रांतील शंकाभागाचें विवरण--]

**भाष्यं--स्यादेतत् । कस्मात्पुनश्चरणशब्देन श्रौतं शीलं विहाय लाक्षणिकोऽनुशयः प्रत्याय्यते । ननु शीलस्यैव श्रौतस्य विहितप्रतिषिद्धस्य साध्वसाधुरूपस्य शुभाशुभयोन्यापत्तिः फलं भविष्यति । अवश्यं च शीलस्यापि किंचित्फलमभ्युपगंतव्यम् । अन्यथा ह्यानर्थक्यमेव शीलस्य प्रसज्येतेति चेत् ॥**

**भाष्यार्थ**--यावर अशी शंका येते-" अहोपण, तुम्ही ' चरण-'शब्दानें श्रौत शीलाचा त्याग करून लाक्षणिक-त्यावरून लक्षित होणाऱ्या अनुशयाचें ग्रहण कां करवितां ? [ मुख्य अर्थ संभवत असतांना लक्षणा ग्राह्य नाहीं, असा याचा भावार्थ.-" अहोपण, कर्मानेंच योनिप्राप्ति संभवत असल्यामुळें ' चरण-'शब्दानें त्याची लक्षणा होते " अशी आशंका घेऊन पूर्ववादी ' शास्त्रप्रामाण्यामुळें कर्माप्रमाणें चरणालाहि योनिप्राप्तीचें हेतुत्व आहे,' असें ' **ननु०**' इत्यादि भाष्यानें सांगतो-]=अहो, विहित व प्रतिषिद्ध असलेल्या शुभ-अशुभरूप श्रौत शीलाचेंच शुभाशुभयोनिप्राप्ति हें फल होईल! [-शिवाय ' चरण-'शब्दानें कर्माची लक्षणा केल्यास त्याचेंच फल श्रुत असल्यामुळें शीलाचें फल कल्पावें लागेल. कारण विहित असलेलें शील निष्फल असणें युक्त नाहीं. यास्तव चरणाचेंच यथाश्रुत-जसें श्रुत आहे तसेंच फल मानावें, असें वादी ' **अवश्यं च०**' इत्यादि भाष्यानें म्हणतो-]=आणि शीलाचेंहि कांहीं फल अवश्य मानिलेंच पाहिजे. [-'**अन्यथा०**' इत्यादि भाष्यानें त्याचा स्वीकार न केल्यास दोष सांगतो-]=कारण ' अन्यथा '-शीलाचें फल न मानिल्यास त्याला ' आनर्थक्यच'-व्यर्थत्वच प्राप्त होईल, ' **इति चेत्** '-असें जर म्हणशील तर [-आचाराला कर्माचें अंगत्व आहे,आचार कर्माचें अंग आहे आणि अंग व अंगी यांचा अधिकार एक असल्यामुळें अंगाच्या पृथक् फलाची कल्पना करावी लागत नाहीं, असें ' **नैष दोषः०**'इत्यादि भाष्यानें सांगतात-]

**भाष्यं-नैष दोषः । कुतः । तदपेक्षत्वात् । इष्टादि हि कर्मजातं चरणापेक्षम् । न हि सदाचारहीनः कश्चिदधिकृतः स्यात्--' आचारहीनं न पुनन्ति वेदाः ' इत्यादिस्मृतिभ्यः । पुरुषार्थत्वेऽप्याचारस्य नानर्थक्यम् ॥**

**भाष्यार्थ**--' **न०**'-हा दोष येत नाहीं. [-' **कुतः०**' इत्यादि भाष्यानें हा उक्त अर्थच प्रश्नपूर्वक सूत्रांतील हेतूचें ग्रहण करून विशद करितात-]=कोणत्या कारणानें ? ' **तदपेक्षत्वात्०**'-त्याची-चरणाची अपेक्षा असल्यामुळें. कारण इष्टादि

कर्मजात चरणाची अपेक्षा करणारें आहे. [–" इष्टादिकर्मसमुदायाला चरणापेक्षत्व कसें ?" 'न हि०' इत्यादि भाष्यानें उत्तर–]=कारण सदाचारहीन असा कोणीहि कर्माधिकारी होत नाहीं. [ सदाचारसंपन्नालाच कर्माधिकार आहे, याविषयीं प्रमाण–]=**'आचारहीनं०'**–आचारहीन पुरुषाला वेद पावन करीत नाहींत. [ येथें 'वेद-'शब्दानें वेदार्थभूत अनुष्ठानाचें उपलक्षण होत असल्यामुळें आचार हें त्याचें अंग आहे, तो स्वतंत्र फल देत नाहीं, असें सांगितलें.–आतां स्नानादिकांप्रमाणें आचाराला पुरुपसंस्कारत्व असल्यामुळें त्याचें भिन्न फल आहे, असें जरी मानिलें तरी विरोध येत नाहीं, असें **'पुरुषार्थत्वेऽपि०'** इत्यादि भाष्यानें सांगतात–]=आचाराला पुरुषार्थत्व जरी असलें तरी आनर्थक्य नाही. [–" तर मग त्याला पृथक्फलत्व कसें ? " **'इष्टादौ हि०'** इत्यादि भाष्यानें उत्तर—]

**भाष्यं—इष्टादौ हि कर्मजाते फलमारभमाणे तदपेक्ष एवाचारस्तत्रैव कंचिदतिशयमारप्स्यते । कर्म च सर्वार्थकारीति श्रुतिस्मृतिप्रसिद्धिः । तस्मात्कर्मैव शीलोपलक्षितमनुशयभूतं योन्यापत्तौ कारणमिति कार्ष्णाजिनेर्मतम । न हि कर्मणि संभवति शीलाद्योन्यापत्तिर्युक्ता । न हि पद्भ्यां पलायितुं पारयमाणो जानुभ्यां रंहितुं अर्हतीति ॥ १० ॥**

**भाष्यार्थ**—कारण इष्टादि सर्वकर्मजात आपल्या फलाचा आरंभ करीत असतांना त्याची अपेक्षा करणाराच आचार त्या फलांतच कांही अतिशय आरंभील–त्या फलांतच थोडेसें आधिक्य उत्पन्न करील. [ 'अंगावबद्ध'–कर्मांगाशीं संबद्ध असलेल्या उपासनेप्रमाणें आचार कर्मफलांत आधिक्य उत्पन्न करील, असा भावार्थ. –" तर मग आचारालाच योनिप्राप्तीचें हेतुत्व असतांनाहि अनुशयाच्या योनिप्राप्तिहेतुत्वाची कल्पना कशासाटीं केली जाते ? " अशी आशंका घेऊन 'कर्माला योनिप्राप्तिहेतुत्वाची प्रसिद्धि असल्यामुळें' असें उत्तर **'कर्म च०'** इत्यादि भाष्यानें देतात–]=आणि कर्म सर्व अर्थकारी–सर्वफल देणारें आहे, अशी श्रुति-स्मृतिप्रसिद्धि असल्यामुळें तेंच योनिप्राप्तीचें निमित्त आहे. [–**'तस्मात्०'** इत्यादि भाष्यानें एकदेशिमताचा उपसंहार करितात–]=म्हणून शीलानें उपलक्षित होणारें अनुशयभूत कर्मच शुभाशुभ जन्मप्राप्तीचें कारण आहे, असें कार्ष्णाजिनि–आचार्यांचें मत आहे. [–याचाच **'न हि कर्मणि०'** इत्यादि भाष्यानें विस्तार–]=कारण कर्म संभवत असतांना शीलामुळें योनिप्राप्ति होणें युक्त नाहीं. [–**'न हि पद्भ्यां०'** इत्यादि भाष्यानें अयुक्तत्वच स्पष्ट करितात–]=दोन पायांनीं पळण्यास समर्थ असलेला कोणीहि गुडघ्यांनीं रांगण्यास योग्य नसतो, हें प्रसिद्ध आहे. **'इति'**– याप्रमाणें

कर्म संभवत असतांना शीलामुळें योनिप्राप्ति युक्त नाहीं, असा भावार्थ. १०[-'**सुकृत-दुष्कृते०**' इत्यादि सूत्रानें प्रत्यक्ष सिद्धान्त सांगतात--]

**सूत्रं--सुकृतदुष्कृते एवेति तु बादरिः ॥११॥ (२)**

**सूत्रार्थ**—पण बादरि-आचार्य 'चरण-'शब्दानें सुकृत-दुष्कृतच सांगितलें जातें, असें मानितो. ११. (२) सु. ब्र. १९८.[-'**बादरिस्तु०**' इत्यादि भाष्यानें सूत्रांचें विवरण--]

**भाष्यं**--बादरिस्त्वाचार्यः **सुकृतदुष्कृते एव चरणशब्देन प्रत्याय्यते इति मन्यते । चरणमनुष्ठानं कर्मेत्यनर्थान्तरम् । तथाहि अविशेषेण कर्ममात्रे चरतिः प्रयुज्यमानो दृश्यते । यो हि इष्टादिलक्षणं पुण्यं कर्म करोति तं लौकिका आचक्षते धर्मं चरत्येष महात्मेति ॥**

**भाष्यार्थ**--पण बादरि-आचार्य 'चरण-'शब्दानें सुकृत व दुष्कृतच प्रत्ययाला आणून दिलीं जातात, असें मानितो. [-" पण 'चरण-'शब्दानें मुख्यवृत्तीनें कर्म कसें सांगितलें जातें ?" '**चरणं अनुष्ठानं०**' इत्यादि भाष्यानें उत्तर-]=चरण, अनुष्ठान, कर्म, यांचा पृथक् अर्थ नाहीं. ते तिन्ही पर्याय शब्द आहेत. [-"पण वृद्धांच्या प्रयोगाच्या अभावीं-रूढीच्या अभावी 'चरण-'शब्दाला कर्मविषयत्व कसें ?" '**तथा हि०**' इत्यादि भाष्यानें उत्तर-]=त्यांचें अर्थैक्य कसें आहे, तें पहा-' अविशेषेण '-कोणत्याहि प्रकारच्या विशेषावांचून 'चरतिः'-चर हा धातु, कर्ममात्र-कोणतेहि कर्म या अर्थी प्रयोग केला जात असलेला दिसतो. '**यो हि०**' -जो इष्टादिरूप पुण्य कर्म करितो त्याला उद्देशून लौकिक 'हा महात्मा धर्म आचरितो' असें म्हणतात. [-" अहोपण, कर्माच्या सर्वार्थकारित्वाची-कर्म सर्व फल देतें, अशी प्रसिद्धि असल्यामुळें व आचाराची तशी प्रसिद्धि नसल्यामुळें कर्म व आचार यांना भिन्नत्व आहे." अशी आशंका घेऊन '**पूर्वोक्त**-पृ. ४८-**स्मृतिवचना**-वरून अद्रोहादि साधारणधर्माच्या शीलत्वाची सिद्धि होते. त्यामुळें असें म्हणूं नको ' असें '**आचारोऽपि०**' इत्यादि भाष्यानें सांगतात—]

**भाष्यं—आचारोऽपि च धर्मविशेष एव । भेदव्यपदेशस्तु कर्मचरणयोः ब्राह्मणपरिव्राजकन्यायेनाप्युपपद्यते। तस्माद्रमणीयचरणाः प्रशस्तकर्माणः। कपूयचरणा निंदितकर्माणः । इति निर्णयः ॥ ११ ॥ ( २ )**

**भाष्यार्थ**---आचार हाहि धर्मविशेषच-तोहि एक धर्माचाच भेद-प्रकार आहे. [-" तर मग 'यथाकारी यथाचारी०' या श्रुतीत त्यांचा भेद कसा सांगितला आहे ?" '**भेदव्यपदेशस्तु०**' इत्यादि भाष्यानें उत्तर-]=पण श्रुतींत कर्म व

आचार यांचा जो भेदनिर्देश आहे, तो ब्राह्मण-परिव्राजकन्यायानेंहि उपपन्न होतो. [ ' चरण-'शब्दाची लक्षणा करण्यास कांहीं कारण नसल्यामुळें ' चरण ' हा शब्द 'अनुशय ' या अर्थी मुख्य आहे, अशा या बादरिमताचा उपसंहार 'तस्मात्०' इत्यादि भाष्यानें करितात–]=तस्मात् ' रमणीयचरण ' म्ह० प्रशस्त कर्मे करणारे –विहितानुष्ठान करणारे व ' कपूयचरण म्ह० निंदित–निषिद्ध कर्मे करणारे, असा निर्णय झाला. ११. [ सु. ब्र. पृ. २५८-६०.] (२)

( ३. अनिष्टादिकार्यधिकरण. सू. १२-२१. )

–अनुशयवान् इष्टादिकारी कर्मठांची आगति–या लोकीं येणें सांगितलें. आतां चंद्रमंडलापासून स्खलन पावलेल्या अनुशयवान् अनिष्टादिकारी जीवांचीहि तशीच आगति होते, अशा आशयानें ' **अनिष्टादि०** ' इत्यादि सूत्रानें आक्षेप—

**सूत्रं—अनिष्टादिकारिणामपि च श्रुतम् ॥ १२**

**सूत्रार्थ**—अनिष्टादि कर्म करणारांचेंहि चंद्रलोकगमन श्रुत आहे, त्यामुळें इष्टादि-कारीच चंद्रलोकीं जातात, हें म्हणणें अयुक्त आहे. १२.–सु.ब्र.२६१. [–'**इष्टादि०**' इत्यादि भाष्यानें प्रथमाधिकरणाशीं याची संगति सांगतात—]

**भाष्यं—इष्टादिकारिणश्चंद्रमसं गच्छन्तीत्युक्तम् । ये त्वितरेऽनिष्टादिकारिणः तेऽपि किं चंद्रमसं गच्छन्त्युत न गच्छन्तीति चिंत्यते । तत्र तावदाह— इष्टादिकारिण एव चंद्रमसं गच्छन्तीतित्येतन्न । कस्मात् । यतोऽनिष्टादिका-रिणामपि चंद्रमण्डलं गंतव्यत्वेन श्रुतम् ॥**

**भाष्यार्थ**—इष्टादिकर्म करणारे चंद्रलोकास प्राप्त होतात, असें सांगितलें. [ व्यवहित म्ह० मधलें एक अधिकरण सोडून त्याच्या मागच्या अधिकरणाच्या अर्थाचा अनुवाद करून अनिष्टादिकारी जीवांना विषय करून ' **ये वै के च०** ' –जे कोणी येथून मरून जातात ते सर्व चंद्राला प्राप्त होतात. –कौ. १.२. सु. उ. ८१७–अशी अविशेष श्रुति असल्यामुळें व ' वैवस्वतं संगमनं जनानां '–मृतांना संगम्य–गमन करण्यास योग्य अशा वैवस्वत यमाला हवीनें संतुष्ट कर, अशी श्रुति असल्यामुळें ' **ये तु इतरे०**' इत्यादि भाष्यानें संशय सांगतात–]=पण जे दुसरे अनिष्टादिकारी असतात तेहि चंद्रलोकाला प्राप्त होतात कीं नाहीं, याचा विचार केला जातो. [या अधिकरणांत 'अनिष्टादिकारी जीवांचें शुभ मार्गानें नुस्तें गमनहि होत नाहीं,' अशा कथनानें वैराग्य दृढ केलेलें असल्यामुळें पूर्वीप्रमाणेंच याच्या पादादिसंगति आहेत. पूर्वपक्षांत ' शुभ कर्म करणारे व अशुभ कर्म करणारे या दोघांनाहि एकसारखीच चंद्रलोकप्राप्ति होत असल्यामुळें शुभ कर्म करणें व्यर्थ

आहे ' असें निष्पन्न होतें. पण सिद्धान्तांत अशुभ कर्म करणारांची दुसरी गति नियत असल्यामुळें इष्टादिकच चंद्रलोकगमनाचें निमित्त आहे, असें मानून **'तत्र०'** इत्यादि भाष्यानें पूर्वपक्षसूत्राची योजना करितात–]=असा संशय आला असतां वादी अगोदर म्हणतो–' इष्टादि कर्म करणारेच चंद्रलोकास जातात ' असें हें नियमानें मानितां येत नाहीं. [–" अहोपण, त्यांचें इष्टादिकर्म चंद्रलोकाला प्राप्त करविणारें आहे. त्यामुळें त्या नियमाचा निषेध सयुक्तिक नाहीं " अशी शंका–] =' **कस्मात्** '–कोणत्या कारणानें ? [–वादी श्रुतीनें परिहार करितो–]=' **यतः०**'– ज्याअर्थी अनिष्टादिकारी जीवांचेंहि चंद्रमंडल गन्तव्यत्वानें श्रुत आहे, त्याअर्थी तसा नियम मानितां येत नाहीं. [–**'तथा हि०'** इत्यादि भाष्यानें त्या श्रुतीचाच उल्लेख–]

**भाष्यं—तथाह्यविशेषेण कौषीतकिनः समामनन्ति—" ये वै के चास्माल्लोकात्प्रयन्ति चंद्रमसमेव ते सर्वे गच्छन्ति " इति । देहारंभोऽपि च पुनर्जायमानानां नान्तरेण चंद्रप्राप्तिमवकल्पते । ' पंचम्यामाहुतौ ' इत्याहुतिसंख्यानियमात् । तस्मात्सर्व एव चंद्रमसमासीदेयुः । इष्टादिकारिणामितरेषां च समानगतित्वं न युक्तमिति चेत् । न । इतरेषां चंद्रमंडले भोगाभावात् ॥ १२ ॥**

**भाष्यार्थ**—ते कसें श्रुत आहे तें पहा–कौषीतकिशाखाध्यायी "जे कोणी या शरीरांतून निघून जातात–मरतात ते सर्व चंद्रालाच प्राप्त होतात. "–पृ.९२–असें अविशेषानें म्ह० इष्टादिकारी व अनिष्टादिकारी असा कांहीं विशेष न ठेवितां सांगतात. [–श्रुतीच्या आधारानें चंद्रलोकगमनाचें उपपादन करून सूत्रांतील **'च-'** कारानें सुचविलेल्या युक्तीनेंहि त्याचें उपपादन करितात–]=' **देहारंभोऽपि०** '– आणि पुनः जन्म घेणारांचा देहारंभहि–त्यांच्या देहाचा आरंभहि चंद्रप्राप्तीवांचून संभवत नाहीं. कारण ' पांचवी आहुति दिली असतां ' असा आहुतीच्या संख्येचा नियम श्रुत आहे. [ देवयान व पितृयाण या दोन मार्गांहून अधिक गमनागमनमार्ग श्रुत नाहीं. ' अथ एतयोः पथोः न कतरेणचन '–या दोन मार्गांतील कोणत्याहि मार्गानें ते जात नाहींत, येथून आरंभ करून ' पुनः पुनः जन्माला येऊन मरणें, हें तिसरें स्थान आहे ' असें तिसरें स्थानमात्रश्रवण आहे. त्यामुळें त्या स्थानाची मार्गत्वानें प्रतीति येत नाहीं. चंद्रमंडलास जाऊन खालीं आलेल्या त्यांच्याहि पुनः पुनः जन्म-मरणांची आवृत्ति संभवते. म्हणून कांहीं इष्टादिकारी कर्मठांचीच चंद्रमंडलगति होत नाहीं ' असें मानून वादी–' **तस्मात्०** ' इत्यादि भाष्यानें उपसंहार करितो–]=म्हणून सर्वच चंद्रमंडलास प्राप्त होतील. [–" अहोपण, सर्वांनाच जर तुल्यगतित्व असेल, सर्वांनाच जर चंद्रलोकप्राप्ति होत असेल तर त्यांच्या

प्राप्तीचें साधन असें जें अनुष्ठान त्याला व्यर्थत्व प्राप्त होईल,'' अशी '**इष्टादि०**' इत्यादि भाष्यानें शंका–]=अहोपण, इष्टादि कर्माचें अनुष्ठान करणारे व इतर–तें न करणारे यांचें समानगतित्व युक्त नाहीं, त्या दोन्ही प्रकारच्या जीवांना तुल्यगति प्राप्त होणें अयोग्य आहे, असें जर म्हणाल तर [–चंद्रमंडलीं अनिष्टादिकारी जीवांना सुखोपभोग जरी मिळत नसला तरी त्यांच्यासाठीं तिसरा मार्गच नसल्यामुळें ' ग्रामाला जाणारा वृक्षाच्या छायेंतूनहि जातो, वृक्षमूलांजवळहि गमन करितो ' याप्रमाणें त्यांचीहि चंद्रलोकगति उपपन्न होते, असें पूर्ववादी ' **न इतरेषां०** ' इत्यादि भाष्यानें समाधान सांगतो–]=तें बरोबर नाहीं. कारण इतरांच्या–अनिष्टादिकारी जीवांच्या भोगांचा चंद्रलोकीं अभाव आहे. त्यामुळें त्यांचीहि तेथें केवल गति संभवते. १२. [–'**संयमने०**' इत्यादि सूत्रानें सिद्धान्त सांगण्यास आरंभ करितात–]

**सूत्रं—संयमने त्वनुभूयेतरेषामारोहावरोहौ तद्गतिदर्शनात्** ॥ १३

**सूत्रार्थ**—' तु '–पण ' संयमने '–यमलोकीं ' अनुभूय '–पापांच्या फलरूप यातना भोगून '**इतरेषां**'–इतरांचे–निषिद्ध आचरण करणारांचे यमलोकीं ' आरोह व अवरोह '–जाणें व परत येणें, होतात. कारण श्रुतींत यमाच्या वश होणें, या स्वरूपाची त्यांची गति उपलब्ध होते १३.–सु. १.२६१. [–'**तु-शब्दः०**' इत्यादि भाष्यानें सूत्राचें व्याख्यान करितात–]

**भाष्यं—तु-शब्दः पक्षं व्यावर्तयति । नैतदस्ति सर्वे चंद्रमसं गच्छन्तीति । कस्मात् । भोगायैव हि चंद्रारोहणं न निष्प्रयोजनम् । नापि प्रत्यवरोहायैव । यथा कश्चिद्वृक्षमारोहति पुष्पफलोपादानायैव न निष्प्रयोजनं नापि पतनायैव । भोगश्चानिष्टादिकारिणां चंद्रमसि नास्तीत्युक्तम् । तस्मादिष्टादिकारिण एव चंद्रमसमारोहन्ति नेतरे ॥**

**भाष्यार्थ**—सूत्रांतील ' तु- ' शब्द पूर्वपक्षाची व्यावृत्ति करितो. [–'**नैतदस्ति०**' इत्यादि भाष्यानें पक्षव्यावृत्तिच व्यक्त करितात–]=सर्व चंद्रलोकीं जातात, हा पूर्ववाद्याचा पक्ष युक्त नाहीं. कोणत्या कारणानें ? त्यांत कोणती अनुपपत्ति आहे ? [–" पाप्यांचें चंद्रलोकगमन निष्फल आहे कीं सफल आहे ? " असा विकल्प करून ' **भोगायैव०** ' इत्यादि भाष्यानें त्यांतील पहिल्या पक्षाचें निरसन–] =कारण चंद्रलोकीं जें आरोहण केलें जातें तें भोगासाठींच केलें जातें, निष्प्रयोजन –उगीच कांहीं प्रयोजनावांचून तें केलें जात नाहीं. [–दुसऱ्या सफलपक्षींहि त्यांच्या गमनाचें फल काय आहे, प्रत्यवरोह–पुनः परत येणें हें एवढेंच कीं भोग ? यांतील पहिल्या पक्षाचें ' **नापि०** ' इत्यादि भाष्यानें निरसन–]=केवल प्रत्यवरोहा-

साठींच त्यांचें चंद्रलोकीं गमन होतें, हेंहि संभवत नाहीं. [–' **यथा०** ' इत्यादि भाष्यानें दोन्ही पक्षांचें निरसन दृष्टान्तानें स्पष्ट करितात–]=जसा कोणीहि झाला तरी वृक्षावर पुष्पें, फलें इत्यादि काढण्यासाठींच चढतो, कांहीं कारणावांचून–निष्प्रयोजन वृक्षावर कोणीच चढत नाहीं. तसेंच, केवळ खालीं पडण्यासाठींहि कोणी वृक्षावर चढत नाहीं. [–' भोग हें त्यांच्या चंद्रलोकगमनाचें फल आहे, ' या पक्षाचें ' **भोगश्च०** ' इत्यादि भाष्यानें निरसन–]=आणि अनिष्टादिकारी पाप्यांचा भोग तर चंद्रलोकीं नाहीं,हें तुम्हींच सांगितलें आहे.[–'**तस्मात्०**' इत्यादि भाष्यानें सूत्रांतील ' तु-'शब्दाच्या अर्थाचा उपसंहार करितात–]= म्हणून इष्टादि कर्म करणारेच चंद्रलोकीं आरोहण करितात. इतर–अनिष्टादिकारी पापी त्यावर आरोहण करीत नाहींत. [–" तर मग त्यांचे आरोह व अवरोह कसे होतात ? " अशी आशंका घेऊन ' संयमने तु अनुभूय ' या सूत्रभागाचें विवरण ' ते तु० ' इत्यादि भाष्यानें करितात—]

**भाष्यं—ते तु संयमनं यमालयमवगाह्य स्वदुष्कृतानुरूपा यामीर्यातना अनुभूय पुनरेवेमं लोकं प्रत्यवरोहन्ति । एवंभूतौ तेषामारोहावरोहौ भवतः । कुतः । तद्गतिदर्शनात् ॥**

**भाष्यार्थ**—पण ते तर संयमनांत म्ह० यमाच्या लोकांत प्रवेश करून आपल्या पापाच्या अनुसार यमानें दिलेल्या यातना भोगून पुनरपि याच लोकीं अवरोहण करितात–याच लोकीं परत येतात. ' **एवं भूतौ०** ' अशा प्रकारचे त्यांचे आरोह व अवरोह होतात. [–त्याविषयीं प्रश्नपूर्वक हेतु सांगतात–]='**कुतः**' –कोणत्या कारणानें ? ' **तद्गतिदर्शनात्** '–त्यांच्या यमालयांतील गतीचें श्रुतींत दर्शन होत असल्यामुळें. [–'**तथा हि०**' इत्यादि भाष्यानें या हेतूचेंच व्याख्यान–]

**भाष्यं—तथाहि यमवचनसरूपा श्रुतिः प्रयतामनिष्टादिकारिणां यमवश्यतां दर्शयति—' न सांपरायः प्रतिभाति बालं प्रमाद्यन्तं वित्तमोहेन मूढम् । अयं लोको नास्ति पर इति मानी पुनः पुनर्वशमापद्यते मे ' इति । " वैवस्वतं संगमनं जनानाम् " इत्येवंजातीयकं च बह्वेव यमवश्यताप्राप्तिलिंगं भवति १३**

**भाष्यार्थ**—कारण तशी यमवचनरूप श्रुति मरून जाणाऱ्या अनिष्टादिकारी पाप्यांची यमाधीनता दाखविते. 'धनामुळें होणाऱ्या मोहानें विशेषतः मूढ–विवेकहीन त्यामुळेंच प्रमादशील–विषयासक्त झालेल्या अविवेकी पुरुषाला सांपराय–परलोकप्राप्तीचें विशेष साधन भासत नाहीं. हाच एक लोक आहे, परलोक नाहीं असें मानणारा तो पुनः पुनः माझ्या अधीन होतो–ताब्यांत येतो '–का. १.२.६.

सु. उ. पृ. ४२–असें हें यमवचन त्या पाप्यांचें यमाधीनत्व दाखवितें. [ संपराय म्ह० मरून जाणाऱ्या जीवांचा परलोक 'सं'–अवश्यंभावानें 'परा'–देहपातानंतर 'अयः'–जेथें गमन केलें जातें, तो 'संपरायः' त्याच्या प्राप्तीसाठीं जें विशेष साधन तो सांपराय, अशी 'सांपराय-'शब्दाची व्युत्पत्ति आहे. वित्तमोहानें ज्याची विवेकदृष्टि आच्छादित झाली आहे व त्यामुळेंच जो पदोपदीं प्रमाद करणारा–विषयासक्त होणारा आहे त्या अविवेक्याला पूर्वोक्त सांपराय भासत नाहीं. त्याची त्याला कधीं कल्पनाहि होत नाही. तो केवल अज्ञच नसतो तर विपरीतदर्शीहि असतो, कारण 'स्त्री, अन्न-पान इत्यादि हा एवढाच काय तो लोक आहे. याहून श्रेष्ठ किंवा अधिक असा दुसरा लोक–फल नाहीं,' असें चिंतन करण्याचें ज्याचें शील आहे असा तो आपल्या चिंतनानुसारच आचरण करणारा असा होत्साता पुनः पुनः जन्म-मरणप्राप्तीनें माझ्या अधीन होतो, असें यमाचें नचिकेताप्रत वचन आहे–असें यमानें नचिकेताला सांगितलें आहे.–'**वैवस्वतं०**' इत्यादि भाष्यानें याविषयीं दुसरी श्रुति सांगतात–] =आणि 'जनानां संयमनं वैवस्वतं'–परलोकीं गेलेल्या लोकांच्या अवश्य प्राप्तव्य अशा यमराजाला हवीनें संतुष्ट करा, अशा प्रकारचें श्रुत्यंतरहि पाप्यांचें यमाधीनत्व दाखवितें. [–"जे कोणी या लोकांतून परलोकीं जातात इत्यादि पूर्वोक्त –पृ.९२–श्रुतीवरून सर्व जीवांची चंद्रगति सिद्ध होते, असें आम्हीं वर सांगितलें आहे" अशी आशंका घेऊन 'पण त्याच्या विरुद्ध अनेक लिंगें उपलब्ध होत असल्यामुळें त्या श्रुतीचा दुसऱ्या प्रकारें निर्णय करावा' असें '**बह्वेव०**' या भाष्यानें सांगतात–]=पापी जीवांना यमवश्यतेची प्राप्ति होते, असें सुचविणारें पुष्कळच लिंग आहे. [ पापी जीव यमाच्या अधीन होतात असें सुचविणारीं किती तरी लिंगें आहेत. 'ये वै के च' व 'वैवस्वतं संगमनं' या सामान्यतः चंद्रलोक व यमलोक गति सांगणाऱ्या दोन वाक्यांच्या विषयविशेषाचा निर्णय विद्या व कर्म या विशेषणांनीं विशिष्ट अशा 'देवयान' व 'पितृयाण' या दोन मार्गापासून भ्रष्ट झालेल्या, अनिष्टादिकारी पाप्यांच्या तृतीयस्थानगति सांगणाऱ्या वाक्यानें व इष्टादिकारी पुण्यवानांच्या चंद्रगतिवाक्यानें विशेषार्थानें विषयविशेषाचा निर्णय करावा, असा भावार्थ.] १३. [–आणि याहि कारणानें 'ये वै के च' इत्यादि वाक्याचा इष्टादिकारी कर्मठ या अर्थीच संकोच करावा, असें सूत्रकार '**स्मरन्ति च०**' या सूत्रानें सांगतात–]

## सूत्रं—स्मरन्ति च ॥ १४

**सूत्रार्थ—**आणि मनु-व्यासादि वैदिक शिष्ट पाप्यांचा नरकभोग सांगतात. त्यामुळें धार्मिकांचेंच चंद्रलोकीं गमन होतें, पाप्यांचें होत नाहीं. १४.-सु. ब्र. २६१. [-'अपि च०' या भाष्यानें सूत्राचें व्याख्यान-]

**भाष्यं—अपि च मनुव्यासप्रभृतयः शिष्टाः संयमने पुरे यमायत्तं कपूयकर्मविपाकं स्मरन्ति नाचिकेतोपाख्यानादिषु ॥ १४ ॥**

**भाष्यार्थ—**आणि मनु, व्यास इत्यादि शिष्टहि नाचिकेतोपाख्यानादिकांमध्यें यमाच्या संयमनपुरांत यमाधीन निषिद्ध कर्माचें फल स्मरतात. [ पापी यमाच्या अधीन होऊन संयमनपुरांत आपल्या निंद्य कर्माचें फल भोगितात असें सांगतात-] १४. [-याहि कारणानें निषिद्ध आचरण करणाऱ्या पाप्यांची चंद्रलोकीं गति होत नाहीं असें 'अपि च०' या सूत्रानें सांगतात—]

## सूत्रं—अपि च सप्त ॥ १५

**सूत्रार्थ—**शिवाय पौराणिक रौरवादि सात पापफलभूमि वर्णितात. १५.-सु.ब्र. २६१. [-'अपि च०' या भाष्यानें भाष्यकार या सूत्राचें व्याख्यान करितात-]

**भाष्यं—अपि च सप्त नरका रौरवप्रमुखा दुष्कृतफलोपभोगभूमित्वेन स्मर्यन्ते पौराणिकैः। ताननिष्टादिकारिणः प्राप्नुवन्ति। कुतस्ते चंद्रं प्राप्नुयुरित्यभिप्रायः॥**

**भाष्यार्थ—**शिवाय पौराणिकांकडून रौरवप्रमुख सात नरक पापफलाच्या उपभोगाच्या भूमित्वानें स्मरले जातात. पौराणिक पाप्यांच्या पापकर्माचें फल भोगण्याचीं स्थानें या रूपानें रौरवादि सात नरक सांगतात. पापाचें अनुष्ठान करणारे लोक त्यांस प्राप्त होतात, तेव्हां ते चंद्राला कोणत्या कारणानें प्राप्त होतील ? असा याचा अभिप्राय. १५. [ अनिष्टादिकारी पापी जीवांच्या चंद्रमंडलांतील भोगाचा अभाव असल्यामुळे व त्यांची यमाधीनता श्रुति-स्मृतिसिद्ध असल्यामुळें त्यांना चंद्रगति नाहीं, असें सांगितलें.-आतां 'ननु०' इत्यादि भाष्यानें त्यांच्या यमवश्यतेविषयीं वादी आक्षेप घेतो-]

**भाष्यं—ननु विरुद्धमिदं यमायत्ता यातनाः पापकर्माणोऽनुभवन्तीति। यावता तेषु रौरवादिष्वन्ये चित्रगुप्तादयो नानाधिष्ठातारः स्मर्यन्त इति। नेत्याह—**

**भाष्यार्थ—**अहोपण, पाप कर्में करणार यमाधीन असलेल्या यातना भोगितात, हें म्हणणें विरुद्ध आहे. [-'**यावता०**' इत्यादि भाष्यानें वादी त्याविषयीं हेतु सांगतो-]=कारण त्या रौरवादि दुःखभोगभूमींमध्यें चित्रगुप्तादि दुसरे अनेक अधिष्ठाते स्मृत आहेत. त्यामुळें वरील म्हणणें अयुक्त आहे. [-'**नेत्याह०**' या

भाष्यानें सूत्राक्षरांनीं या आक्षेपाचा परिहार–]=सूत्रकार तें म्हणणें बरोबर नाहीं, असें ‘ तत्रापि० ’ या सूत्रानें सांगतात–

**सूत्रं—तत्रापि च तद्व्यापारादविरोधः ॥ १६**

**सूत्रार्थ—**‘ तत्रापि च ’–आणि त्या रौरवादिकांतहि ‘ तद्व्यापारात् ’–यमाचा व्यापार होत असल्यामुळें ‘अविरोधः’–त्यांत कांहीं विरोध नाहीं.–१६.सु.ब्र.२६१. [–‘ **तेषु अपि०** ’ इत्यादि भाष्यानें सूत्राचें व्याख्यान–]

**भाष्यं—तेष्वपि सप्तसु नरकेषु तस्यैव यमस्याधिष्ठातृत्वव्यापाराभ्युपगमादविरोधः । यमप्रयुक्ता एव हि ते चित्रगुप्तादयोऽधिष्ठातारः स्मर्यन्ते ॥ १६ ॥**

**भाष्यार्थ—**त्या सात नरकांमध्येंहि त्याच यमाच्या अधिष्ठातृत्वव्यापाराचा स्वीकार केलेला असल्यामुळें पूर्वोक्ताशीं कांहीं विरोध येत नाहीं. [–‘ पण एका स्थानामध्यें दोघांचें अधिष्ठातृत्व संभवत नाहीं ’ अशी आशंका घेऊन ‘ **यमप्रयुक्ताः०** ’ इत्यादि भाष्यानें सांगतात–]=कारण यमाकडून प्रेरित झालेले असेच ते चित्रगुप्तादिक रौरवादि दुःखभोगभूमींचे अधिष्ठाते स्मरले जातात. १६. [–पूर्वोक्त देवयान-पितृयाणसंज्ञक मार्गद्वयापासून भ्रष्ट झालेल्या जीवांचें तृतीय स्थान सांगितलेलें असल्यामुळेंहि अनिष्टादिकारी जीवांची चंद्रगति नाहीं–ते चंद्रलोकीं जात नाहींत, असें ‘ **विद्याकर्मणोः०** ’ इत्यादि सूत्रानें सांगतात–]

**सूत्रं—विद्याकर्मणोरिति तु प्रकृतत्वात् ॥ १७**

**सूत्रार्थ—**‘ **पण** ’ ‘ अथ एतयोः ’–या श्रुतींतील ‘ एतयोः ’ म्ह० ‘ विद्या व कर्म यांतील ’ असा अर्थ विवक्षित आहे. कारण ‘ प्रकृतत्वात् ’–देवयान व पितृयाण या दोन मार्गांच्या साधनत्वानें विद्या व कर्म येथें प्रकृत आहेत. १७. –सु. ब्र. २६२. [–तें हेत्वन्तरच प्रकट करणारे ‘ **पंचाग्निविद्यायां०** ’ इत्यादि भाष्यानें भूमिका कथन करून श्रुतीचें उदाहरण देतात—]

**भाष्यं—पंचाग्निविद्यायां ‘ वेत्थ यथासौ लोको न संपूर्यते ’ इत्यस्य प्रश्नस्य प्रतिवचनावसरे श्रूयते—‘अथैतयोः पथोर्न कतरेणचन तानीमानि क्षुद्राण्यसकृदावर्तीनि भूतानि भवन्ति । जायस्व म्रियस्वेत्येतत्तृतीयं स्थानं तेनासौ लोको न संपूर्यते ’ इति । तत्रैतयोः पथोरिति विद्याकर्मणोरित्येतत । कस्मात् । प्रकृतत्वात् ॥**

**भाष्यार्थ—**पंचाग्निविद्येमध्यें “ तो पितृलोक भरून कसा जात नाहीं तें तूं जाणतोस का? ”–छां. ५. ३. ३. सु. उ. ४०१–या प्रश्नाच्या प्रतिवचनाचे वेळीं

–'अथ'–"आतां तृतीय स्थानाच्या कथनास आरंभ करितों. या पूर्वोक्त दोन देवयान-पितृयाणमार्गांतील एका हि मार्गानें जे जात नाहींत ते हीं अतिशय क्षुद्र वारंवार आवर्तन करणारीं भूतें होतात. 'जन्म घे व मर' असें हें तिसरें स्थान आहे. [ या प्रतिपत्तीचें–ज्ञानाचें फल–]=' **तेन०** ' त्यामुळें तो पितृलोक भरून जात नाहीं, –छां. ५.१०.८. सु. उ. ४०८–असें श्रुत आहे. [–' **तत्र०** ' इत्यादि भाष्यानें सूत्राच्या योजनेनें श्रुत्यर्थ विशद करितात–]=त्या श्रुतींतील ' एतयोः पथोः ' म्ह० विद्या व कर्म त्यांतील, असा भावार्थ. [–" पण 'पथि-'शब्द दुसऱ्या–मार्ग या अर्थी रूढ असल्यामुळ त्याचा विद्या व कर्म असा अर्थ करण्यास कांहीं प्रमाण नाहीं " अशी शंका–]=' **कस्मात्** '–कोणत्या कारणानें ? [–त्याविषयीं प्रकरण हें प्रमाण–]=' **प्रकृतत्वात्** '–कारण हे विद्या व कर्म यांचें प्रकरण आहे.[–' **विद्याकर्मणी०** ' इत्यादि भाष्यानें त्याचेंच विवरण––]

**भाष्यं––विद्याकर्मणी हि देवयानपितृयाणयोः पथोः प्रतिपत्तौ प्रकृते । 'तद्य इत्थं विदुः' इति विद्या. तया प्रतिपत्तव्यो देवयानः पंथाः प्रकीर्तितः । 'इष्टापूर्ते दत्तम्' इति कर्म । तेन प्रतिपत्तव्यः पितृयाणः पंथाः प्रकीर्तितः । तत्प्रक्रियायाम् 'अथैतयोः पथोर्न कतरेणचन' इति श्रुतम् ॥**

**भाष्यार्थ**––देवयान व पितृयाण यांच्या प्राप्तीचीं विद्या व कर्म हीं दोन साधनें प्रकृत आहेत, हें प्रसिद्ध आहे. [–त्यांतील देवयान मार्गाचें विद्याद्वारा प्रकृतत्व ' **तद्ये०** ' या वचनानें प्रकट करितात–]=" त्या गृहस्थांतील जे असें पंचाग्निदर्शन जाणतात–उपासना करितात "–सु. उ. ४०५–अशी विद्या प्रकृत आहे. त्या विद्येनें प्राप्तव्य–प्राप्त होण्यास योग्य असा देवयान मार्ग सांगितला आहे. [ कर्मद्वारा पितृयाणाचेंहि प्रकृतत्व सांगतात–]=' **इष्टापूर्ते दत्तं०** '–इष्ट, पूर्त, दान, असें हें कर्म आहे. त्यानें प्राप्तव्य पितृयाण मार्ग सांगितला आहे. [–" पण विद्या व कर्म यांना असें प्रकृतत्व जरी असले तरी प्रकृत विचाराला त्याचा काय उपयोग ? " ' **तत्प्रक्रियायां०** ' इत्यादि भाष्यानें उत्तर–]=त्या विद्या-कर्मप्रकरणांत " आतां या दोन मार्गांतील कोणत्याच मार्गानें ते जात नाहींत "–पृ. ५८–असें श्रुत आहे. [–" अहोपण, विद्या व कर्म यांनीं हीन असलेल्या जीवांचा क्षुद्रजंतुभाव येथें सांगितलेला आहे. तिसरा मार्ग कांहीं सांगितलेला नाहीं " अशी आशंका घेऊन ' **एतदुक्तं०** ' इत्यादि भाष्यानें सांगतात––]

**भाष्यं––एतदुक्तं भवति––ये न विद्यासाधनेन देवयाने पथ्यधिकृताः, नापि कर्मणा पितृयाणे तेषामेष क्षुद्रजन्तुलक्षणोऽसकृदावर्ती तृतीयः पंथा भवतीति । तस्मादपि नानिष्टादिकारिभिश्चंद्रमाः प्राप्यते ॥**

भाष्यानें सूत्राक्षरांनीं या आक्षेपाचा परिहार–]=सूत्रकार तें म्हणणें बरोबर नाहीं, असें ‘ तत्रापि० ’ या सूत्रानें सांगतात–

**सूत्रं—तत्रापि च तद्व्यापारादविरोधः ॥ १६**

**सूत्रार्थ**—‘ तत्रापि च ’–आणि त्या रौरवादिकांतहि ‘ तद्व्यापारात् ’–यमाचा व्यापार होत असल्यामुळें ‘अविरोधः’–त्यांत कांहीं विरोध नाहीं.–१६.सु.ब्र.२६१. [–‘ तेषु अपि० ’ इत्यादि भाष्यानें सूत्राचें व्याख्यान–]

**भाष्यं—तेष्वपि सप्तसु नरकेषु तस्यैव यमस्याधिष्ठातृत्वव्यापाराभ्युपगमादविरोधः । यमप्रयुक्ता एव हि ते चित्रगुप्तादयोऽधिष्ठातारः स्मर्यन्ते ॥ १६ ॥**

**भाष्यार्थ**—त्या सात नरकांमध्येंहि त्याच यमाच्या अधिष्ठातृत्वव्यापाराचा स्वीकार केलेला असल्यामुळें पूर्वोक्ताशीं कांहीं विरोध येत नाहीं. [–‘ पण एका स्थानामध्यें दोघांचें अधिष्ठातृत्व संभवत नाहीं ’ अशी आशंका घेऊन ‘ **यमप्रयुक्ताः०** ’ इत्यादि भाष्यानें सांगतात–]=कारण यमाकडून प्रेरित झालेले असेच ते चित्रगुप्तादिक रौरवादि दुःखभोगभूमींचे अधिष्ठाते स्मरले जातात. १६. [–पूर्वोक्त देवयान-पितृयाणसंज्ञक मार्गद्वयापासून भ्रष्ट झालेल्या जीवांचें तृतीय स्थान सांगितलेलें असल्यामुळेंहि अनिष्टादिकारी जीवांची चंद्रगति नाहीं–ते चंद्रलोकीं जात नाहींत, असें ‘ **विद्याकर्मणोः०** ’ इत्यादि सूत्रानें सांगतात–]

**सूत्रं—विद्याकर्मणोरिति तु प्रकृतत्वात् ॥ १७**

**सूत्रार्थ**—‘ पण ’ ‘ अथ एतयोः ’–या श्रुतींतील ‘ एतयोः ’ म्ह० ‘ विद्या व कर्म यांतील ’ असा अर्थ विवक्षित आहे. कारण ‘ प्रकृतत्वात् ’–देवयान व पितृयाण या दोन मार्गांच्या साधनत्वानें विद्या व कर्म येथें प्रकृत आहेत. १७. –सु. ब्र. २६२. [–तें हेत्वन्तरच प्रकट करणारें ‘ **पंचाग्निविद्यायां०** ’ इत्यादि भाष्यानें भूमिका कथन करून श्रुतीचें उदाहरण देतात—]

**भाष्यं—पंचाग्निविद्यायां ‘ वेत्थ यथासौ लोको न संपूर्यते ’ इत्यस्य प्रश्नस्य प्रतिवचनावसरे श्रूयते—‘अथैतयोः पथोर्न कतरेणचन तानीमानि क्षुद्राण्यसकृदावर्तीनि भूतानि भवन्ति । जायस्व म्रियस्वेत्येतत्तृतीयं स्थानं तेनासौ लोको न संपूर्यते ’ इति । तत्रैतयोः पथोरिति विद्याकर्मणोरित्येतत् । कस्मात् । प्रकृतत्वात् ॥**

**भाष्यार्थ**—पंचाग्निविद्येमध्यें “ तो पितृलोक भरून कसा जात नाहीं तें तूं जाणतोस का ? ”–छां. ५. ३. ३. सु. उ. ४०१–या प्रश्नाच्या प्रतिवचनाचे वेळीं

-'अथ'-"आतां तृतीय स्थानाच्या कथनास आरंभ करितों. या पूर्वोक्त दोन देवयान-पितृयाणमार्गांतील एका हि मार्गानें जे जात नाहींत ते हीं अतिशय क्षुद्र वारंवार आवर्तन करणारीं भूतें होतात. 'जन्म घे व मर' असें हें तिसरें स्थान आहे. [या प्रतिपत्तीचें-ज्ञानाचें फल-]='**तेन०**' त्यामुळें तो पितृलोक भरून जात नाहीं, -छां. ५.१०.८. सु. उ. ४०८-असें श्रुत आहे. [-'**तत्र०**' इत्यादि भाष्यानें सूत्राच्या योजनेनें श्रुत्यर्थ विशद करितात-]=त्या श्रुतींतील 'एतयोः पथोः' म्ह० विद्या व कर्म त्यांतील, असा भावार्थ. [-"पण 'पथि-'शब्द दुसऱ्या-मार्ग या अर्थी रूढ असल्यामुळें त्याचा विद्या व कर्म असा अर्थ करण्यास कांहीं प्रमाण नाहीं" अशी शंका-]='**कस्मात्**'-कोणत्या कारणानें? [-त्याविषयीं प्रकरण हें प्रमाण-]='**प्रकृतत्वात्**'-कारण हे विद्या व कर्म यांचें प्रकरण आहे.[-'**विद्याकर्मणी०**' इत्यादि भाष्यानें त्याचेंच विवरण--]

**भाष्यं--विद्याकर्मणी हि देवयानपितृयाणयोः पथोः प्रतिपत्तौ प्रकृते। 'तद्य इत्थं विदुः' इति विद्या. तया प्रतिपत्तव्यो देवयानः पंथाः प्रकीर्तितः। 'इष्टापूर्ते दत्तम्' इति कर्म। तेन प्रतिपत्तव्यः पितृयाणः पंथाः प्रकीर्तितः। तत्प्रक्रियायाम् 'अथैतयोः पथोर्न कतरेणचन' इति श्रुतम्॥**

**भाष्यार्थ**--देवयान व पितृयाण यांच्या प्राप्तीचीं विद्या व कर्म हीं दोन साधनें प्रकृत आहेत, हें प्रसिद्ध आहे. [-त्यांतील देवयान मार्गाचें विद्याद्वारा प्रकृतत्व '**तद्य०**' या वचनानें प्रकट करितात-]="त्या गृहस्थांतील जे असें पंचाग्निदर्शन जाणतात-उपासना करितात"-सु. उ. ४०५-अशी विद्या प्रकृत आहे. त्या विद्येनें प्राप्तव्य-प्राप्त होण्यास योग्य असा देवयान मार्ग सांगितला आहे. [कर्मद्वारा पितृयाणाचेंहि प्रकृतत्व सांगतात-]='**इष्टापूर्ते दत्तं०**'-इष्ट, पूर्त, दान, असें हें कर्म आहे. त्यानें प्राप्तव्य पितृयाण मार्ग सांगितला आहे. [-"पण विद्या व कर्म यांना असें प्रकृतत्व जरी असलें तरी प्रकृत विचाराला त्याचा काय उपयोग?" '**तत्प्रक्रियायां०**' इत्यादि भाष्यानें उत्तर-]=त्या विद्या-कर्मप्रकरणांत "आतां या दोन मार्गांतील कोणत्याच मार्गानें ते जात नाहींत"-पृ. ५८-असें श्रुत आहे. [-"अहोपण, विद्या व कर्म यांनीं हीन असलेल्या जीवांचा क्षुद्रजंतुभाव येथें सांगितलेला आहे. तिसरा मार्ग कांहीं सांगितलेला नाहीं" अशी आशंका घेऊन '**एतदुक्तं०**' इत्यादि भाष्यानें सांगतात--]

**भाष्यं--एतदुक्तं भवति--ये न विद्यासाधनेन देवयाने पथ्यधिकृताः, नापि कर्मणा पितृयाणे तेषामेष क्षुद्रजन्तुलक्षणोऽसकृदावर्ती तृतीयः पंथा भवतीति। तस्मादपि नानिष्टादिकारिभिश्चंद्रमाः प्राप्यते॥**

**भाष्यार्थ**—यानें हें असें सांगितलें आहे—जे विद्यासाधनानें देवयान मार्गामध्यें अधिकृत नाहींत व जे कर्मानें पितृयाण मार्गामध्येंहि अधिकृत नाहींत **त्यांचा** हा क्षुद्र-जंतुलक्षण वारंवार आवर्तन करणारा—वारंवार जन्म-मरण देणारा तिसरा मार्ग आहे, **'इति'**—असें यानें उक्त आहे.[—दोन्ही मार्गांपासून भ्रष्ट झालेल्या अनिष्टादिकारी जीवांना तृतीयस्थानप्राप्ति होते, या कथनाचें फल **'तस्मात्०'** इत्यादि भाष्यानें सांगतात—]=त्यामुळेंहि अनिष्टादिकारी जीवांकडून चंद्रमा प्राप्त केला जात नाहीं, त्यामुळेंहि ते चंद्रलोकीं जात नाहींत. [—" अहोपण, हें जें तृतीयस्थानाचें **कथन** आहे, तें चंद्रलोकप्राप्तीचें निवारण करीत नाहीं. कारण चंद्रलोकाहून परत येऊनहि त्या स्थानाच्या प्राप्तीचा संभव आहे." अशी **'स्यादेतत्०'** इत्यादि शंका—]

**भाष्यं—स्यादेतत् । तेऽपि चंद्रविंबमारुह्य ततोऽवरुह्य क्षुद्रजंतुत्वं प्रतिपत्स्यन्त इति । तदपि नास्ति । आरोहानर्थक्यात् ॥**

**भाष्यार्थ**—यावर वादी " ते अनिष्टादिकारी जीवहि चंद्रबिंबावर आरोहण **करून** व तेथून खालीं अवरोहण **करून** क्षुद्रजंतुत्वाला प्राप्त होतील!" असें म्हणेल. [—' प्रमाण व फल यांच्या योगानें कल्पना केली जाते. पण ' पापी चंद्रलोकीं जाऊन खाली येतात व मग क्षुद्र जंतु होतात ' या कल्पनेंत कांहीं प्रमाण नाहीं व फलहि नाहीं. त्यामुळें तशी कल्पना होत नाहीं, ' असें ' **तदपि०** ' या भाष्यानें सांगतात—]=पण तेंहि बरोबर नाहीं, कारण चंद्रबिंबावरील त्यांचें आरोहण निष्फल आहे—त्याचें कांहीं प्रयोजन नाहीं. [—शिवाय पूर्वोक्त पृ. ५८—प्रतिवचन प्रश्नाच्या अननुरूप आहे, असें होण्याचा प्रसंग येत असल्यामुळेंहि ही कल्पना बरोबर नाहीं, असें ' **अपि च०**' इत्यादि भाष्यानें सांगतात——]

**भाष्यं--अपि च सर्वेषु प्रयत्सु चंद्रलोकं प्राप्नुवत्सु असौ लोकः प्रयद्भिः संपूर्येत, इत्यतः प्रश्नविरुद्धं प्रतिवचनं प्रसज्येत । तथाहि प्रतिवचनं दातव्यं यथासौ लोको न संपूर्यते ॥**

**भाष्यार्थ**--शिवाय मरून जाणारे सर्वच जीव जर चंद्रलोकाला प्राप्त होत असले तर त्या जाणाऱ्या जीवांकडून तो लोक भरून जाईल. त्यामुळें प्रश्नाच्या विरुद्ध प्रतिवचन आहे, असें प्राप्त होईल. [—" तर मग प्रश्नानुरूप प्रतिवचन कसें?" ' **तथा हि०** ' इत्यादि भाष्यानें उत्तर—]=कारण तसेंच प्रतिवचन दिलें पाहिजे कीं ज्याप्रकारें चंद्रलोक अगदीं भरून न जाईल! [—" अहोपण, पापी जरी चंद्रलोकीं गमन करीत असले तरी प्रतिवचनाच्या प्रश्नानुरूपत्वाची सिद्धि होते " असें वादी ' **अवरोहाभ्युपगमात्०** ' इत्यादि भाष्यानें म्हणतो—]

**भाष्यं—अवरोहाभ्युपगमाद् असंपूर्णोपपत्तिरिति चेत्। न। अश्रुतत्वात्। सत्यं अवरोहादप्यसंपूरणमुपपद्यते। श्रुतिस्तु तृतीयस्थानसंकीर्तनेन असंपूरणं दर्शयति—' एतत्तृतीयं स्थानं तेनासौ लोको न संपूर्यते ' इति। तेन अनारोहादेवासंपूरणमिति युक्तम्। अवरोहस्येष्टादिकारिष्वपि अविशिष्टत्वे सति तृतीयस्थानोक्त्यानर्थक्यप्रसंगात्॥**

**भाष्यार्थ**—"अहोपण,त्यांच्या तत्काल अवरोहणाचा स्वीकार केलेला असल्यामुळें चंद्रलोकाच्या असंपूर्णत्वाची उपपत्ति लागते" असें जर म्हणशील तर [–'अवरोहामुळें चंद्रलोक भरून जात नाहीं,' अशी श्रुति नसल्यामुळें तसें मानितां येत नाहीं, असें '**न०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=नाहीं, तशी त्याच्या असंपूर्णतेची उपपत्ति लागत नाहीं. कारण त्याला अश्रुतत्व आहे–श्रुतीनें तसें सांगितलेलें नाहीं. [–'**सत्यं०**'इत्यादि भाष्यानें या संक्षिप्त सूत्रभूत वाक्याचाच विस्तार–] =होय, अवरोहामुळेंहि चंद्रलोकाचें असंपूरण उपपन्न होईल, हें खरें; [–" तर मग त्या लोकाचें तसेंच असंपूरण असो; " अशी आशंका घेऊन 'श्रुतिविरोधामुळें तसें मानितां येत नाहीं, असें '**श्रुतिस्तु०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=पण हें तिसरें स्थान आहे, त्यामुळें तो चंद्रलोक संपूर्ण होत नाहीं, भरत नाहीं."–पृ.५९ –ही श्रुति तिसऱ्या स्थानाच्या संकीर्तनानें त्याचें असंपूरण दाखविते.[–'**तेन०**'इत्यादि भाष्यानें श्रुतिसिद्ध असंपूरणाचें निगमन–]=म्हणून पाप्यांच्या अनारोहामुळेंच–ते चंद्रलोकीं जात नसल्यामुळेंच त्याचें असंपूरण युक्त आहे. [–" पण श्रुतींतहि त्यांच्या अवरोहामुळेंच असंपूरण इष्ट कां नाहीं ? " '**अवरोहस्य०**' या भाष्यानें उत्तर–]=कारण अवरोहाला इष्टादिकाऱ्यांमध्येंहि अविशिष्टत्व असल्यामुळें–इष्टादिकारी कर्मठांचेंहि अवरोहण समान असल्यामुळें तृतीय स्थानाची उक्ति–कथन व्यर्थ होण्याचा प्रसंग येतो. [पाप्यांप्रमाणेंच पुण्यवान्हि चंद्रलोकांतून खालीं येत असल्यामुळें–अवरोह दोघांनाहि एकसारखाच असल्यामुळें पाप्यांसाठीं तिसरें स्थान सांगण्याची कांहीं गरज नाहीं,असें होतें,असा भावार्थ.–याप्रमाणें युक्तीनें स्वपक्षाचें उपपादन व परपक्षाचें निरसन करून पूर्ववाद्यानें उत्थापित केलेल्या वाक्याची गति सूत्राक्षरानेंच दाखविण्यास 'तुशब्दस्तु०' इत्यादि भाष्यानें आरंभ करितात—]

**भाष्यं—तुशब्दस्तु शाखान्तरीयवाक्यप्रभवां अशेषगमनाशंकामुच्छिनत्ति। एवं सति अधिकृतापेक्षः शाखान्तरीये वाक्ये सर्वशब्दोऽवतिष्ठते। ये वै केचिदधिकृता अस्माल्लोकात्प्रयन्ति चंद्रमसमेव ते सर्वे गच्छन्तीति॥ १७॥ यत्पुन-**

**रुक्तं देहलाभोपपत्तये सर्वे चंद्रमसं गंतुमर्हन्ति । 'पंचम्यामाहुतौ' इत्याहुति-संख्यानियमादिति । तत्प्रत्युच्यते—**

**भाष्यार्थ**—पण सूत्रांतील 'तु' हा शब्द दुसऱ्या शाखेंतील वाक्यापासून उत्पन्न झालेल्या सर्वांच्या गमनशंकेचा उच्छेद–परिहार करितो. [–'**एवं०**'इत्यादि भाष्यानें तो उच्छेदप्रकारच प्रकट करितात–]='**एवं सति**'–पूर्वोक्त न्यायानें अनिष्टादिकाऱ्यांच्या चंद्रलोकगतीचा असंभव झाला असतां अन्यशाखीय वाक्यांतील 'सर्व-'शब्द– पृ. ९३–अधिकृतांची अपेक्षा करणारा असाच होऊन राहतो–तो इष्टादिकर्मकारी अधिकृतापेक्षच आहे. [–याप्रमाणें 'सर्व' हा शब्द अधिकृतविषय आहे, असें सिद्ध झालें असतां निष्पन्न झालेला वाक्यार्थ '**ये वै केचित्०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]='जे कोणी अधिकारी–इष्टादि कर्मे करणारे गृहस्थ या शरीररूप लोकांतून मरून जातात ते सर्व चंद्रलोकालाच जातात,' असा या वाक्याचा अर्थ सिद्ध झाला. १७. [–वाद्यानें सांगितलेल्या श्रुतीची गति सांगून '**यत्पुनरुक्तं०**' इत्यादि भाष्यानें त्याच्या युक्तीचा अनुवाद करितात–]=आतां पुनः 'पांचव्या आहुतींत' असा आहुतिसंख्येचा नियम असल्यामुळें, 'देहलाभाच्या उपपत्तीसाठीं सर्वच मृत जीवांनीं चंद्रलोकीं जाणें युक्त आहे'– पृ.५३–असें जें वाद्यानें म्हटलें आहे=[–त्याच्या उत्तरत्वानें सूत्राचें ग्रहण करितात–] ='**तत्प्रत्युच्यते**'–'न तृतीये०' इत्यादि सूत्रानें त्याचें निरसन केलें जातें—

## सूत्रं–न तृतीये तथोपलब्धेः ॥ १८

**सूत्रार्थ**—तृतीयस्थानांत प्रविष्ट झालेल्या पाप्यांच्या आहुतिसंख्येचा नियम नाहीं. कारण त्याविषयीं 'उत्पन्न हो व मर' अशा वचनाची उपलब्धि होते. १८. –सु. ब्र. २६२ [–'**न तृतीये०**' इत्यादि भाष्यानें प्रतिज्ञेची पूर्ति करणारे भाष्यकार सूत्राची योजना करितात—]

**भाष्यं— न तृतीये स्थाने देहलाभाय पंचसंख्यानियम आहुतीनामादर्तव्यः । कुतः । तथोपलब्धेः । तथाहि अंतरेणैवाहुतिसंख्यानियमं वर्णितेन प्रकारेण तृतीयस्थानप्राप्तिरुपलभ्यते 'जायस्व म्रियस्वेत्येतत्तृतीयं स्थानम्' इति ॥**

**भाष्यार्थ**—तिसऱ्या क्षुद्रजंतूंच्या स्थानांत देहलाभासाठीं आहुतींच्या पांच या संख्येचा नियम आदरणीय नाहीं. [–त्याविषयीं प्रश्न करून सूत्रोक्त हेतु घेऊन त्याचें व्याख्यान करितात–]='**कुतः**'–कोणत्या कारणानें तो आदरणीय नाहीं ? '**तथोपलब्धेः**'–तशी उपलब्धि होत असल्यामुळें. '**तथाहि०**'–उपलब्धि कशी होते ती पहा–'भोगासाठींच चंद्रलोकारोहण, निष्फल किंवा केवल अवरोहासाठीं

नाहीं '–पृ. ५४–या वर वर्णन केलेल्या प्रकारानें आहुतिसंख्येच्या नियमावांचूनच तिसऱ्या स्थानाची प्राप्ति उपलब्ध होते.[–त्या उपलब्धीचाच अभिनय–] =' जायस्व०'–" पुनः पुनः जन्म घेऊन मरणें, असें हें तृतीय स्थान आहे."–पृ. ५९–असें उपलब्ध होतें. [ ज्ञान व कर्म यांनीं रहित असलेले कृमि-कीटादिभावानें पुनः पुनः उत्पन्न होतात व मरतात हें प्रसिद्ध आहे. त्यांच्या उत्पत्तीमध्यें आहुतिसंख्येची उपलब्धि होत नाही.निरंतर उत्पन्न होऊन मरणाऱ्या त्यांची आहुतिसंख्या उपपन्नहि होत नाहीं.कारण दृष्टाशीं–अनुभवाशीं विरोध आला असतां कल्पनेला अवकाश मिळत नाहीं, असा भावार्थ.–शिवाय ' प्रत्येक देहाच्या हेतुत्वानें आहुतिसंख्या नियत केली जाते कीं मनुष्यदेहाच्या हेतुत्वानें?' यांतील पहिल्या कल्पाचें 'पुरुष-'शब्दविरोधानें ' अपि च०' इत्यादि भाष्यानें निरसन—]

**भाष्यं—अपि च ' पंचम्यामाहुतावापः पुरुषवचसो भवन्ति ' इति मनुष्यशरीरहेतुत्वेन आहुतिसंख्या संकीर्त्यते, न कीटपतंगादिशरीरहेतुत्वेन । पुरुषशब्दस्य मनुष्यजातिवचनत्वात् ॥**

**भाष्यार्थ**—शिवाय ' पांचवी आहुति दिली असतां आप पुरुषाकार परिणत होतात'–पृ. १९–अशी मनुष्यशरीराच्या हेतुत्वानें–कारणत्वानें आहुतीची संख्या सांगितली जाते.'**न कीट०**'–कीट, पतंग इत्यादि क्षुद्र जीवांच्या शरीरांच्या कारणत्वानें आहुतिसंख्या सांगितली जात नाहीं.'**पुरुषशब्दस्य०**'–कारण पुरुषशब्दाला मनुष्यजातिवचनत्व आहे, पुरुषशब्दानें मनुष्यजाति सांगितली जाते. त्यामुळें आहुतिसंख्या क्षुद्रजीवशरीरांच्या कारणत्वानें सांगितलेली नाहीं. [–'**अपि च०**' इत्यादि भाष्यानें पूर्वोक्त विकल्पांतील दुसऱ्या कल्पाचें निरसन—]

**भाष्यं—अपि च पंचम्यामाहुतावपां पुरुषवचस्त्वमुपदिश्यते, नापंचम्यामाहुतौ पुरुषवचस्त्वं प्रतिषिध्यते, वाक्यस्य व्यर्थतादोषात् । तत्र येषामारोहावरोहौ संभवतः तेषां पंचम्यामाहुतौ देह उद्भविष्यति । अन्येषां तु विनैवाहुतिसंख्यया भूतान्तरोपसृष्टाभिरद्भिर्देह आरप्स्यते ॥ १८ ॥**

**भाष्यार्थ**—तसेंच पांचवी आहुति हुत केली असतां पुरुषवचस्त्वाचा–पुरुषाकारत्वाचा उपदेश केला जातो, पण त्याच वाक्यानें अपंचमाहुतींतील म्ह० पांचव्या आहुतीला सोडून इतर तिसऱ्या, चवथ्या इत्यादि आहुतींतील पुरुषवचस्त्वाचा प्रतिषेध केला जात नाहीं. [–त्याविषयीं हेतु–]='**वाक्यस्य०**'–कारण तसें मानिल्यास त्या वाक्यावर व्यर्थता दोष येतो. [ त्याचे दोन अर्थ आहेत–हें वाक्य व्यर्थी आहे, असें होतें आणि विधि व निषेध असे याचे दोन अर्थ आहेत

असें झालें असतां वाक्यभेद होतो. पण वाक्याचें ऐक्य संभवत असतांना वाक्य-भेद संभवत नाहीं, असा भावार्थ. –" अहोपण, पांचव्या आहुतींत आपांचा पुरुषाकार परिणाम जरी होत असला तरी अपंचम-पंचमेतर आहुतींत त्यांच्या पुरुषाकारपरिणामाचा निषेध नाहीं, असें जर म्हटलें तर त्यांचा दोन्ही प्रकारें परिणाम संभवत असल्यामुळें त्याची व्यवस्था कशी ! " अशी आशंका घेऊन **'तत्र येषां०'** इत्यादि भाष्यानें सांगतात–]=त्यांतील ज्या जीवांचे आरोह-अवरोह संभवतात त्यांचा देह पांचवी आहुति दिली असतां उत्पन्न होईल; **'अन्येषां तु०'**– पण ज्यांचा चंद्रमंडलावर आरोह व तेथून अवरोह युक्त नाहीं त्या अन्य जीवांचा देह आहुतिसंख्येवांचूनच दुसऱ्या भूतांशीं उपसृष्ट–संसर्ग पावलेल्या आपांनीं आरब्ध होईल. [ त्यांचा देह दुसऱ्या भूतांशीं संसर्ग पावलेल्या आपांपासून परिणत होईल, असा भावार्थ. ] १८. [–मनुष्यदेहारंभासाठीं आहुतिसंख्येचा नियम नाहीं, याविषयीं **'स्मर्यतेऽपि०'** इत्यादि सूत्रानें स्मृतीचा संवाद–आनुकूल्य–]

## सूत्र–स्मर्यतेऽपि च लोके ॥ १९

**सूत्रार्थ**—शिवाय लोकांत–महाभारतादि इतिहासांत द्रोण-धृष्टद्युम्न-सीता-द्रौपदी इत्यादिकांचें अयोनिसंभवत्व स्मृत आहे. १९.–सु. ब्र. २६२ [–**'अपि च०'** इत्यादि भाष्यानें सूत्राचें व्याख्यान—]

**भाष्यं—अपि च स्मर्यते लोके। द्रोणधृष्टद्युम्नप्रभृतीनां सीताद्रौपदीप्रभृतीनां च अयोनिजत्वम्। तत्र द्रोणादीनां योषिद्विषया एकाहुतिर्नास्ति। धृष्टद्युम्नादीनां तु योषित्पुरुषविषये द्वे अप्याहुती न स्तः। यथा च तत्राहुतिसंख्यानादरो भवति एवमन्यत्रापि भविष्यति। बलाकाप्यंतरेणैव रेतःसेकं गर्भं धत्त इति लोकरूढिः॥**

**भाष्यार्थ**—शिवाय लोकांत–इतिहासांत द्रोण, धृष्टद्युम्न इत्यादिकांचें व सीता द्रौपदी इत्यादिकांचें अयोनिजत्व स्मरलें जातें–सांगितलें जातें. [ भाष्य व सूत्र यांतील **'लोक-'**शब्दानें 'लोक्यते अनेन इति लोकः भारतादिः'–ज्याच्या योगानें भूतकालीन वृत्त जाणलें जातें तो लोक, अशा व्युत्पत्तीनें भारतादि इतिहास सांगितला जातो.–द्रोणादि सर्वांचें अयोनिजत्व जरी एकसारखेंच असलें तरी त्यांतील अवान्तर भेद **'तत्र०'** इत्यादि भाष्यानें सांगतात–]=त्यांतील द्रोणादिकांची स्त्री-संबंधी एक आहुति नाहीं. धृष्टद्युम्नादिकांच्या स्त्री व पुरुष यांच्यासंबंधी दोन्ही आहुती नाहींत. [–त्यांच्या दृष्टान्तानें अनिष्टादिकारी जीवांमध्येंहि आहुतिसंख्यानियम नाहीं, असें ज्ञान होणें हें फलित **'यथा०'** इत्यादि भाष्यानें सांगतात–]=आणि ज्याप्रमाणें पूर्वोक्त दृष्टान्तांत आहुतिसंख्येचा अनादर होतो तसाच तो अन्यत्रहि

–अनिष्टादिकारी जीवांमध्येंहि होईल. [–देहमात्रहेतुत्वानें–प्रत्येक देहाच्या हेतुत्वानें आहुतिसंख्यानियम नाहीं, या अर्थी सूत्राचें तात्पर्य सांगतात–]=**'बलाका०'**–बलाका–बगळी रेतःसेकावांचूनच गर्भ धारण करिते, अशी लोकरूढि आहे.१९. [–आणि याहि कारणानें देहमात्र–प्रत्येक देहाच्या आरंभामध्यें आहुतिसंख्यानियम नाहीं, असें सूत्रकार ' **दर्शनाच्च०** ' या सूत्रानें सांगतात—]

## सूत्र–दर्शनाच्च ॥ २०

**सूत्रार्थ**—आणि जरायुजादि चार प्रकारच्या देहांतील स्वेदज व उद्भिज्ज या देहांची स्त्री-पुरुषसंयोगावांचूनच देहोत्पत्ति होत असलेली प्रत्यक्ष दिसते. त्यामुळें आहुतिसंख्या नियम नाहीं. २०.–सु. ब्र. २६२. [–ऐतरेय श्रुतीच्या आधारानें **'अपि च०'** इत्यादि भाष्यानें सूत्राचें व्याख्यान––]

**भाष्यं—अपि च चतुर्विधे भूतग्रामे जरायुजांडजस्वेदजोद्भिज्जलक्षणे स्वेदजोद्भिज्जयोः अंतरेणैव ग्राम्यधर्मं उत्पत्तिदर्शनादाहुतिसंख्यानादरो भवति। एवमन्यत्रापि भविष्यति ॥ २० ॥**

**भाष्यार्थ**—त्याचप्रमाणें जरायुज, अंडज, स्वेदज व उद्भिज्ज या स्वरूपाच्या चतुर्विध भूतग्रामांतील–देहसमूहांतील स्वेदज व उद्भिज्ज या दोन प्रकारच्या देहांची उत्पत्ति ग्राम्य धर्मावांचूनच होत असलेली दिसते. त्यामुळें आहुतिसंख्येचा अनादर होतो. ' **एवं०** '–याच न्यायानें अनिष्टादिकारी जीवांच्याहि उत्पत्तीमध्यें आहुतिसंख्यानियमाचा अनादर होईल. २०. [–' **ननु तेषां०** ' इत्यादि भाष्यानें श्रुत्यन्तरविरोधाची शंका––]

**भाष्यं–ननु ' तेषां खल्वेषां भूतानां त्रीण्येव बीजानि भवन्ति आंडजं जीवजमुद्भिज्जम् ' इति अत्र त्रिविध एव भूतग्रामः श्रूयते। कथं चतुर्विधत्वं भूतग्रामस्य प्रतिज्ञातमिति। अत्रोच्यते—**

**भाष्यार्थ**––अहोपण, " त्या या प्रसिद्ध पक्ष्यादि भूतांचीं तीनच बीजें आहेत. आंडज, जीवज, उद्भिज्ज "–छां. ६. ३. १. सु. उ. ४२४–या श्रुतिवचनांत तीन प्रकारचाच भूतसमुदाय श्रुत आहे. तेव्हां भूतग्रामाच्या चतुर्विधत्वाची प्रतिज्ञा कशी केली आहे ? [ जें अंडज तेंच आंडज–पक्ष्यादि, जीवज–जरायुज व पृथ्वीचा भेद करून उत्पन्न होतें तें उद्भिज्ज–वृक्षादि.–**'अत्रोच्यते'**–या भाष्यानें छांदोग्यश्रुतिविरोधाचा सूत्रानें परिहार–]=या शंकेचा परिहार ' **तृतीयशब्दावरोधः०** ' इत्यादि सूत्रानें करितात––

**सूत्रं--तृतीयशब्दावरोधः संशोकजस्य ॥ २१ ॥ (३)**

**सूत्रार्थ**—त्या श्रुतींतील तिसऱ्या 'उद्भिज्ज-'शब्दानें संशोकजांचा-स्वेदजांचा 'अवरोध'–संग्रह केला आहे. २१. (३)–सु. ब्र. २६३ [–'**आंडजं०**' इत्यादि भाष्यानें सूत्राचें व्याख्यान--]

**भाष्यं—'आंडजं जीवजमुद्भिज्जम्' इत्यत्र तृतीयेनोद्भिज्जशब्देनैव स्वेदजोपसंग्रहः कृतः प्रत्येतव्यः। उभयोरपि स्वेदजोद्भिज्जयोः भूम्युदकोद्भेदप्रभवत्वस्य तुल्यत्वात्। स्थावरोद्भेदात्तु विलक्षणो जंगमोद्भेद इत्यन्यत्र स्वेदजोद्भिज्जयोः भेदवाद इत्यविरोधः ॥ २१ ॥ (१)**

**भाष्यार्थ**—'आंडज, जीवज व उद्भिज्ज' यांतील तिसऱ्या 'उद्भिज्ज-'शब्दानेंच स्वेदजाचा उपसंग्रह केला आहे, असें जाणावें. [–उद्भिज्जशब्दानें स्वेदजांचा उपसंग्रह करण्याचें कारण '**उभयोरपि०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=कारण स्वेदज व उद्भिज्ज या दोहोंनाहि भूमि-उदकभेदप्रभवत्व तुल्य–समान आहे–दोन्हीं एकसारखींच उदक व भूमि यांचा भेद करून उत्पन्न होतात. [–"तर मग ऐतरेयकांतील भेदनिर्देशाची काय वाट?" '**स्थावरोद्भेदात्तु०**' इत्यादि भाष्यानें उत्तर–]=पण स्थावरोद्भेदाहून जंगमोद्भेद विलक्षण आहे, या अभिप्रायानें ऐतरेयकादि अन्य स्थलीं स्वेदज व उद्भिज्ज असा भेदवाद आहे [–**दोन श्रुतींच्या परिहृत विरोधाचा उपसंहार**–]='**इति अविरोधः**'–याप्रमाणें त्या दोन श्रुतींचा अविरोध आहे. २१.–सु. ब्र. २६२-६४ पहा. (३)

**( ४. साभाव्यापत्त्यधिकरण. सू. २२. )**

—अनिष्टादिकारी जीवांची आरोह-अवरोहरूप गति सांगितली. आतां इष्टादिकारी जीवांच्या अवशिष्ट अवरोहप्रकाराचें '**साभाव्यापत्तिः०**' इत्यादि सूत्रानें निरूपण–

**सूत्रं—सभाव्यापत्तिरुपपत्तेः ॥२२॥ (४)**

**सूत्रार्थ**—चंद्रलोकांतून खालीं येणाऱ्या जीवांना आकाशादिकांच्या 'साभाव्याची'–समान रूपत्वाची प्राप्ति होते. कारण 'उपपत्तेः'–कर्माचा क्षय झालेला पाहून शोकाग्नीनें दग्ध झालेल्या त्यांचें, वितळलेल्या बर्फादिकांप्रमाणें, आकाशसादृश्य उपपन्न होतें. २२ (४)–सु. ब्र. २६५ [–'**इष्टादिकारिणः०**' इत्यादि भाष्यानें या अधिकरणाचा एक सोडून मागच्या अधिकरणाशीं संबंध सांगतात—]

**भाष्यं—इष्टादिकारिणः चन्द्रमसमारुह्य तस्मिन्यावत्संपातमुषित्वा ततः सानुशया अवरोहन्तीत्युक्तम्। अथावरोहप्रकारः परीक्ष्यते। तत्रेयमवरोहश्रुतिः भवति**

**—' अथैतमेवाध्वानं पुनर्निवर्तन्ते यथेतमाकाशमाकाशाद्वायुं वायुर्भूत्वा धूमो भवति धूमो भूत्वाऽभ्रं भवत्यभ्रं भूत्वा मेघो भवति मेघो भूत्वा प्रवर्षति' इति ॥**

**भाष्यार्थ**—इष्टापूर्तादि कर्म करणारे चंद्रावर आरूढ होऊन चंद्रमंडलीं कर्मक्षय होईपर्यंत राहून त्या चंद्रमंडलापासून अनुशयासह अवरोहण करितात, असें सांगितलें. **'अथ०'** आतां त्यांच्या अवरोहाच्या प्रकाराचें परीक्षण केलें जातें. [-**'तत्र०'** इत्यादि भाष्यानें या अधिकरणाचें विषयवाक्य उदाहृत करितात-]='तत्र'-चंद्रमंडलांतील भोग संपवून ज्यांचा अवरोह प्राप्त झाला आहे, असे इष्टादिकारी झाले असतां ही अशी अवरोहश्रुति आहे.-**' अथ '**-चंद्रांतील भोक्तव्य कर्माची समाप्ति झाल्यानंतर **' एतमेव० '** याच पुढें सांगितल्या जाणाऱ्या मार्गास पुन: निवृत्त होतात. [ यांतील 'पुन:-'शब्दावरून या अनादि संसारांत ते पूर्वींहि चंद्रलोकास गेले व तेथून निवृत्त झाले होते, असें अवगत होतें.-"ज्या मार्गाप्रत ते निवृत्त होतात, तो मार्ग कोणता? " **'यथेतं०'** इत्यादि वाक्यानें उत्तर-]-जसें त्यांचें गमन झालें होतें याचप्रमाणें निवर्तन होतें. [गमनाच्या क्रमानेंच निवर्तनक्रम आहे. मासांपासून पितृलोक, पितृलोकापासून आकाश, आकाशापासून चंद्र असा त्यांच्या गमनाचा क्रम होता. आगमनांतहि आकाशाची उक्ति असल्यामुळें ' यथेतं '-गेलेल्या क्रमानेंच असें भासतें. पण त्यांतील पितृलोकादिकांचें संकीर्तन केलेलें नसल्यामुळें व अभ्रादिकांचें संकीर्तन केलेलें असल्यामुळें ' अनेवं '-त्याहून विपरीत मार्गानेंहि त्यांचें आगमन होतें, असें भासतें. म्हणून ' यथेतं ' हें उपलक्षण आहे.-ज्या आपांनीं चंद्रमंडलीं इष्टादिकाऱ्याच्या देहाचा आरंभ केला त्या आप कर्माचा क्षय झाला असतां विरघळून आकाशास प्राप्त होत्सात्या आकाशासारख्या जेव्हां होतात तेव्हां त्याच उपाधीनें युक्त असलेले अनुशयी जीवहि आकाशासारखे होतात, असें **'आकाशं'** या पदानें श्रुति सांगते-]=ते आकाशाच्या सादृश्यास प्राप्त होतात. [-आणि आकाशतुल्यत्वास प्राप्त झालेले ते वायूकडून इकडे-तिकडे उडवून नेले जाणारे असे होत्साते आपांनीं परिवेष्टित झालेले ते अनुशयी वायुसम-वायुतुल्य होतात असें श्रुति सांगते-]=**' आकाशात् वायुं'**-आकाशापासून वायुसादृश्यास प्राप्त होतात. [-त्यानंतर गमनदशेंत जो धूम होता त्याच्यासारखा अनुशयी होतो, असें श्रुति सांगते-]=वायु होऊन धूम होतो. [-त्यानंतर आपांच्या धारणामुळें संभृत-उदक जें अभ्र तत्तुल्य अनुशयी होतो-]=धूम होऊन अभ्र होतो. [-त्यानंतर जलसेचनामुळें मेघ-वर्षणकर्ता, तत्तुल्य तो होतो-]=अभ्र होऊन मेघ होतो. [-मेघाच्या सादृश्यास प्राप्त होऊन अनुशयी मेघवृष्टीच्या धारांबरोबर पृथ्वीस प्राप्त होतो,

असें श्रुति सांगते–]=मेघ होऊन वर्षाव करितो.'–छां.५.१०.५-६–सु.उ.४०७ –अशी ही अवरोहश्रुति आहे. [–अवरोह करणाऱ्या देहधारी जीवांविषयीं 'आकाशं वायुं' अशी कर्मत्व-उक्ति व 'धूमो भवति' अशी 'भवति-'श्रुति असल्यामुळें 'तत्र संशयः०' इत्यादि भाष्यानें संदेह सांगतात—]

**भाष्यं—तत्र संशयः—किमाकाशादिस्वरूपमेव अवरोहन्तः प्रतिपद्यन्ते, किंवाकाशादिसाम्यमिति । तत्र प्राप्तं तावद् आकाशादिस्वरूपमेव प्रतिपद्यन्त इति । कुतः । एवं हि श्रुतिर्भवति । इतरथा लक्षणा स्यात् । श्रुतिलक्षणाविशये च श्रुतिर्न्याय्या, न लक्षणा । तथा च 'वायुर्भूत्वा धूमो भवति' इत्येवमादीन्यक्षराणि तत्स्वरूपापत्तौ अवकल्पन्ते । तस्मादाकाशादिस्वरूपप्रतिपत्तिरिति ॥**

**भाष्यार्थ**—त्याविषयीं अवरोहण करणारे आकाशादिस्वरूपासच प्राप्त होतात किंवा आकाशादिकांच्या साम्यास प्राप्त होतात, असा संशय येतो. [–देवयान व पितृयाण या दोन मार्गांच्या प्रतिपादनास आरंभ करून तृतीयत्व सांगितलें असल्यामुळें 'स्थान-'शब्दाचें मार्गलक्षणत्व युक्त आहे आणि 'भवति' या श्रुतीच्या सादृश्यलक्षणत्वाविषयीं म्ह० त्या शब्दाची सादृश्य या अर्थी लक्षणा करण्याविषयीं कांहीं कारण नसल्यामुळें त्या शब्दाचा तादात्म्य हाच अर्थ आहे, असा पूर्वपक्ष '**तत्र प्राप्तं०**' इत्यादि भाष्यानें करितात–]=असा संशय आला असतां प्रथम 'ते अवरोहण करणारे इष्टादिकारी आकाशादि स्वरूपास प्राप्त होतात' असा पूर्वपक्ष प्राप्त होतो. [या अधिकरणांत अवरोहरूप संसारगतीच्या निरूपणद्वारा वैराग्याला दृढ केलेलें असल्यामुळें पूर्वीप्रमाणेंच याच्या पादादिसंगति आहेत. पूर्वपक्षांत 'भवति-'श्रुतीच्या मुख्यार्थत्वाची सिद्धि पण सिद्धान्तांत उपपत्तीनें लाक्षणिकार्थत्वसिद्धि हे फल आहे. –'गेलेल्या मार्गानेंच आकाशास, आकाशापासून वायूस' येथें तादात्म्य उपलब्ध होत नसल्यामुळें व एका पदार्थाला दुसऱ्या पदार्थाचें तद्रूपत्व–तादात्म्य सिद्ध होत नसल्यामुळें अनुशयींना आकाशादि तादात्म्य नाहीं, अशी पूर्वपक्षावर शंका–]='**कुतः०**'–कोणत्या कारणानें हा पक्ष प्राप्त होतो ? [–'वायु होऊन धूम होतो' इत्यादि श्रुतिवचनांत तादात्म्याची सिद्धि होत असल्यामुळें आणि नहुषादिकांचा अजगरादि भाव उपलब्ध होत असल्यामुळें 'जसे गेले तसे आकाशास प्राप्त होतात' इत्यादि वचनांत तादात्म्यच आहे, असा '**एवं हि०**' इत्यादि भाष्यानें पूर्ववादी शंकेचा परिहार करितो–]=कारण असें मानिल्यासच 'भवति' ही श्रुति उपपन्न होते. [–"अहो-पण, येथील 'भवति' या श्रुतीला–'भवति-'शब्दाला सादृश्यलक्षकत्व आहे, असें

जरी मानिलें तरी कांहीं अनुपपत्ति होत नाहीं " अशी आशंका घेऊन वादी '**इतरथा०**' इत्यादि सांगतो–]=नाहींतर 'भवति-'शब्दाची लक्षणा होईल! [–" अहोपण, 'लक्षणा' ही सुद्धां एक शब्दवृत्तिच असल्यामुळें तिचा आश्रय केलेला आहे," अशी आशंका घेऊन वादी '**श्रुतिलक्षणा०**' इत्यादि म्हणतो–]= आणि 'श्रुति कीं लक्षणा' असा संशय आला असतां श्रुतीचेंच ग्रहण करणें न्याय्य आहे. लक्षणेचें ग्रहण करणें न्याय्य नाहीं. [–श्रुतीला मुख्यार्थत्व आहे, असें मानिल्यास तिच्या अक्षरांचें आनुकूल्य हें फल '**तथा च०**' इत्यादि भाष्यानें सांगतो–]=आणि तसें श्रुतीचें मुख्यार्थत्व मानिल्यास 'वायु होऊन धूम होतो' हीं अशा प्रकारचीं अक्षरें 'तत्स्वरूपप्राप्ति'–तादात्म्य या अर्थी उपपन्न होतात. [ पूर्वोक्त प्रकारें श्रुतीच्या मुख्यार्थत्वाचा आश्रय करून अनुशयींना आकाशस्वरूपाची प्राप्ति होते, असें मानिल्यास इतर अक्षरें उपपन्न होतात, असा भावार्थ. –'**तस्मात्०**' इत्यादि भाष्यानें श्रुतीनें पूर्वपक्षाचा उपसंहार–]=म्हणून अनुशयी जीवांना आकाशाच्या स्वरूपाची प्राप्ति होते, '**इति**'–असें प्राप्त झालें. [–आकाशादिकांच्या तादात्म्याचें प्रत्याख्यान करण्यासाठीं प्रयत्न करणें उचित असल्यामुळें'**एवं०**'इत्यादि भाष्यानें पूर्वपक्षाचा अनुवाद करून सिद्धान्त सांगतात–]

**भाष्यं—एवं प्राप्ते ब्रूमः—आकाशादिसाम्यं प्रतिपद्यन्त इति । चन्द्रमण्डले यदम्मयं शरीरमुपभोगार्थमारब्धं, तदुपभोगक्षये सति प्रविलीयमानं सूक्ष्ममाकाशसमं भवति । ततो वायोर्वशमेति । ततो धूमादिभिः संपृच्यत इति । तदेतदुच्यते—'यथेतमाकाशमाकाशाद्वायुम' इत्येवमादिना । कुत एतत् । उपपत्तेः । एवं ह्येतदुपपद्यते ॥**

**भाष्यार्थ**—असा पूर्वपक्ष प्राप्त झाला असतां आम्ही सिद्धान्त सांगतों–[–'समानभाव हेंच सामान्य म्ह० सादृश्य, त्याची प्राप्ति' अशा योजनेनें '**आकाशादि०**' इत्यादि भाष्यानें सूत्राचें विवरण करितात–]=अनुशयी आकाशादिकांच्या साम्यास प्राप्त होतात, असा आम्ही सिद्धान्त सांगतों. [–" अहोपण, चेतन अनुशयीचें अचेतन आकाशादिकांशीं साम्य कसें ? " अशी आशंका घेऊन प्रतिज्ञात अर्थच '**चंद्रमंडले०**' इत्यादि भाष्यानें प्रकट करितात–]=चंद्रमंडलांत जें उदकमय शरीर उपभोगासाठीं आरंभिलेलें होतें त्याच्या उपभोगाचा क्षय झाला असतां प्रलीन होणारें तें शरीर सूक्ष्म आकाशासारखें होतें. त्यानंतर वायूच्या अधीन होतें. त्यानंतर धूमादिकांशीं संसर्ग पावतें. '**इति**'–हा भाष्यांतील शेवटचा 'इति-'शब्द प्रतिज्ञेच्या समाप्तीसाठीं आहे. [–'**तदेतत्०**' इत्यादि भाष्यानें उक्त अर्थी श्रुति

उदाहृत करितात–]=तेंच हें–' गेल्या मार्गानें ते आकाशाच्या साम्यास प्राप्त होतात. आकाशाच्या साम्यापासून वायूच्या साम्यास '–पृ.६७–इत्यादि वचनानें सांगितलें जातें. [–" अहोपण, 'भवति-'श्रुतीनें त्यांचें तादात्म्यच स्वीकारावें, सादृश्य कल्पूं नये " अशी शंका–]=' कुतः एतत्० '–हें असें सादृश्यच कां कल्पावयाचें ? तादात्म्य कां नाहीं? [–या शंकेच्या समाधानासाठीं सूत्रांतील हेतूला अवतरण देऊन आचार्य त्याचें व्याख्यान करितात–]='उपपत्तेः०'–उपपत्ती-मुळें. ' एवं हि० '–कारण आकाशादिकांचें सादृश्य स्वीकारिलें असतांच ' एतत् '–हें त्यांचें आकाशादिभवन–आकाशादि होणें उपपन्न होतें. [–नहुषा-दिकांच्या देहारंभक भूतांचें अजगरादिभावानें परिणामित्व युक्त आहे. कारण त्यांच्या त्या देहांना एककालत्व नसतें. पण येथें सूक्ष्म शरीर व आकाशादिक यांना अप-र्यायित्व एककालत्व असल्यामुळें त्यांना परस्पर-आत्मता–त्यांचें तादात्म्य संभवत नाहीं, असें हें वर–६८–सांगितलेलेंच समाधान ' न हि० ' इत्यादि भाष्यानें साधितात–]

**भाष्यं—नहि अन्यस्यान्यभावो मुख्य उपपद्यते। आकाशस्वरूपप्रतिपत्तौ च वाय्वादिक्रमेणावरोहो नोपपद्यते। विभुत्वाच्चाकाशेन नित्यसंबंधवत्त्वान्न तत्-सादृश्यापत्तेः अन्यः तत्संबंधो घटते। श्रुत्यसंभवे च लक्षणाश्रयणं न्याय्यमेव। अत आकाशादितुल्यतापत्तिरेवात्र आकाशादिभाव इत्युपचर्यते ॥ २२ ॥** (४)

**भाष्यार्थ**—कारण अन्य पदार्थाचा मुख्य अन्यभाव उपपन्न होत नाहीं. [–" तर मग ' वायु होऊन धूम होतो ' इत्यादि श्रुतीची काय वाट?" '**आकाश-स्वरूप०** ' इत्यादि भाष्यानें उत्तर–]=आणि अनुशयींना आकाशाचें स्वरूप प्राप्त झाल्यास त्यांचा ' वाय्वादि '–वायु, धूम, मेघ इत्यादि क्रमानें अवरोह–खालीं उतरणें उपपन्न होत नाहीं. [ अनुशयींचें आकाशापासून तिल-माषां-पर्यंत स्वतःच स्वरूपानें जें निष्क्रमण त्याची अन्यथा–साम्यप्राप्ति मानिल्यावांचून उपपत्ति लागत नसल्यामुळें अन्याच्या पूर्वसिद्ध अन्यभावाच्या अनुपपत्तीनें अनु-गृहीत अशा त्या अन्यथा-अनुपपत्तिरूप श्रुतार्थापत्तीशीं विरोध येतो. म्हणून ती श्रुति उपचरिततद्भावापत्तिविषय आहे, गौण तद्भाव हा तिचा विषय आहे, असा भावार्थ.–" तर मग ' भवति-'श्रुतीनें आकाशादिकांशीं त्यांचा केवल संयो-गच लक्षित होऊं दे. सादृश्य काय करावयाचें आहे ? " अशी आशंका घेऊन आकाशामध्यें संयोगाचा असंभव असल्यामुळें अवैरूप्यासाठीं–आकाशादिभावाला वैरूप्य प्राप्त होऊं नये–एकरूपत्वच असावें, म्हणून वाय्वादिकांमध्येंहि सादृश्यच आहे, असें ' **विभुत्वाच्च०** ' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=आणि आकाशाला

विभुत्व–सर्वगतत्व असल्यामुळें आकाशाशीं त्यांना नित्यसंबंधत्व आहे–आकाशाशीं अनुशयींचा नित्य संबंध आहे. त्यामुळें आकाशाच्या सादृश्यप्राप्तीहून दुसरा –दुसऱ्या प्रकारचा आकाशसंबंध होऊं शकत नाहीं. [–" असें मानिल्यास श्रुति होते, नाहीं तर लक्षणा होईल "–पृ.६९–असें जें वाद्यानें वर म्हटलें आहे त्याविषयीं आचार्य ' श्रुत्यसंभवे० ' इत्यादि भाष्यानें म्हणतात–]=आणि श्रुतीचा असंभव असतांना लक्षणेचा आश्रय करणें न्याय्यच आहे. [–अनुशयींचें आकाशादिकांशीं तादात्म्य संभवत नसल्यामुळें तत्तुल्यताप्राप्ति हाच श्रुतीचा अर्थ आहे–तत्तुल्यताप्राप्तीलाच श्रुत्यर्थत्व आहे. यास्तव विचारी पुरुषानें त्यांच्या आकाशादितादात्म्याच्या परिहारासाठीं प्रयत्नवान् व्हावें, असा ' अत:० ' इत्यादि भाष्यानें उपसंहार करितात–]=यास्तव आकाशादितुल्यतापत्ति–आकाशादिकांसारखें होणें हाच येथें आकाशादिभाव आहे, असा उपचार केला जातो. २२. (४)

( ५. नातिचिराधिकरण. सू. २३. )

–पूर्व पूर्व पदार्थाच्या सादृश्यास प्राप्त झालेल्या अनुशयींना उत्तरोत्तर पदार्थाची सादृश्यप्राप्ति सत्वर होते, तिला विलंब लागत नाहीं, असें ' **नातिचिरेण०** ' इत्यादि सूत्रानें सांगतात—

## सूत्रं—नातिचिरेण विशेपात् ॥ २३ ॥ (५)

**सूत्रार्थ**—अनुशयी जीव आकाशापासून वृष्टीपर्यंत पदार्थांसारखा होऊन अल्प अल्प कालच राहतो. कारण पुढें ' विशेष सांगितलेला आहे '–व्रीह्यादिभाव प्राप्त झाल्यानंतर त्यांतून सुटणें फार कठिण आहे,असा त्याचा विशेष सांगितला आहे.२३. सु. ब्र. पृ. २६६. [–' **तत्र०** ' इत्यादि भाष्यानें या अधिकरणाचे विषय-संशय–]

**भाष्यं**—तत्र आकाशादिप्रतिपत्तौ प्राग्व्रीह्यादिप्रतिपत्तेर्भवति विशयः । किं दीर्घं दीर्घं कालं पूर्वपूर्वसादृश्येनावस्थाय उत्तरोत्तरसादृश्यं गच्छन्त्युताल्पमल्पमिति । तत्रानियमो नियमकारिणः शास्त्रस्याभावादिति ॥

**भाष्यार्थ**—अवरोहण करणारे अनुशयी त्या त्या पदार्थांच्या सादृश्यास प्राप्त झाले असतां व्रीह्यादिप्राप्ति होईपर्यंत या आकाशादि सादृश्यप्राप्तीविषयीं संशय येतो. [–निरनिराळ्या गमनकर्त्यांची मंद व सत्वर गति दिसत असल्यामुळें तो संशयच ' **किं०** ' इत्यादि भाष्यानें विशद करितात–]=ते दीर्घ दीर्घ काल पूर्व पूर्व पदार्थांच्या सादृश्यानें राहून उत्तर-उत्तर–पुढील पुढील पदार्थांच्या सादृश्यास प्राप्त होतात कीं अल्प अल्प काल राहून, असा संशय येतो. [–अतींद्रिय अर्थी शास्त्र हेंच प्रमाण आहे. पण प्रकृत अर्थी शास्त्र नाहीं. त्यामुळें त्याविषयीं निश्चय होत नाहीं,

असा '**तत्र अनियमः०**' इत्यादि भाष्यानें पूर्वपक्ष-]=त्याविषयीं कांहीं नियम नाहीं. कारण नियमकारी शास्त्राचा अभाव आहे. '**इति**'-असा पूर्वपक्ष प्राप्त होतो. [ 'अतो वै खलु दुर्निष्प्रपतरं'-या व्रीह्यादिभावप्राप्तीपासून सुटणें फार कठिण आहे, असें व्रीह्यादिभावानंतरच विलंबानें गमन अवगत होत असल्यामुळें त्यापूर्वीं अविलंबाची सिद्धि होते, असेंहि म्हणतां येत नाहीं. कारण 'त्यांतून दुःखानें-कष्टानें निःसरण होतें,' हेंच त्यांत विवक्षित असल्यामुळें विलंब इष्ट नाहीं. 'पण देहादिकांच्या अभावामुळें त्यावेळीं दुःखाची असिद्धि आहे, म्हणून हें वचन विलंबाच्या अभिप्रायानेंच आहे,' असें म्हणणेंहि युक्त नाहीं. कारण देहादिकांच्या अभावीं दुःखाची असिद्धि जरी असली तरी प्रकृत असलेल्या आकाशादि सर्व पदार्थांचा परामर्श करणाऱ्या 'अतः' या शब्दावरून पूर्वीच्या पदार्थांपासूनहि विलंबानें गमनाची प्रतीति येत असल्यामुळें सर्व ठिकाणीं प्रयत्नाचें गौरव-प्रयत्नगुरुत्व तुल्य-एकसारखेंच आहे, असा भावार्थ. या अधिकरणांत आकाशादिभावापासून व्रीह्यादिभावापर्यंत तत्तत्सादृश्यात्मक अवरोहरूप संसारगर्तांचें चिरत्व व अचिरत्व यांच्या निरूपणानें वैराग्यालाच दृढ केलेलें असल्यामुळें याच्या पादादिसंगति आहेत. पूर्वपक्षांत 'आकाशादि सर्व पदार्थांच्या तत्तद्भावाचा परिहार करण्यासाठीं अतिशय प्रयत्न करावा' हें फल व सिद्धान्तांत 'त्यासाठीं कर्तव्य असलेल्या प्रयत्नाला कोठें लाघव आहे व कोठें गौरव आहे,' हें फल आहे.-'**एवं०**' इत्यादि भाष्यानें पूर्वपक्षाचा अनुवाद करून सिद्धान्ताला अवतरण देऊन प्रतिज्ञेची पूर्ति करणारे भाष्यकार विवरण करितात—]

**भाष्यं—एवं प्राप्ते इदमाह—नातिचिरेणेति । अल्पमल्पं कालं आकाशादिभावेनावस्थाय वर्षधाराभिः सहेमां भुवमापतन्ति । कुत एतत् । विशेषदर्शनात् । तथाहि व्रीह्यादिभावापत्तेरनन्तरं विशिनष्टि—'अतो वै खलु दुर्निष्प्रपतरं' इति तकार एकश्छांदस्यां प्रक्रियायां लुप्तो मन्तव्यः । दुर्निष्प्रपततरं दुर्निष्क्रमतरं दुःखतरमस्माद्व्रीह्यादिभावान्निःसरणं भवतीत्यर्थः ॥**

**भाष्यार्थ—**असें प्राप्त झालें असतां सूत्रकार '**न अतिचिरेण**' फार विलंबानें नाहीं, असें हें उत्तर सांगतात. अनुशयी अल्प अल्प काल आकाशादिभावानें अवस्थित होऊन वृष्टीच्या धारांबरोबर या पृथ्वीवर येऊन पडतात. [-'पण असा नियम करणारें शास्त्र नसल्यामुळें असें म्हणतां येत नाहीं,' अशी शंका-]='**कुतः०**'-पण हें कशावरून सिद्ध होतें? [-नियामकविषय हेतूला अवतरण देऊन त्याचें व्याख्यान-]='**विशेषदर्शनात्**'-विशेषाचें दर्शन-उपलब्धि होत असल्यामुळें. '**तथा**

हि०'–विशेषदर्शन कसें होतें तें पहा.–व्रीह्यादिभावाची प्राप्ति झाल्यानंतर ' या भावापासून सुटणें–बाहेर पडणें फार कठिण आहे. '–छां.५.१०.६–असें विशेषण दिलें आहे–असा विशेष सांगितला आहे. [–या वाक्याचा विवक्षित अर्थ सांगणारे भाष्यकार ' तकारः एकः० ' इत्यादि भाष्यानें पदाची पूर्ति करितात–]=' दुर्निष्प्रपतरं '–या पदांतील एक 'त-'कार छांदस–वैदिक प्रक्रियेंत लुप्त झाला आहे, असें समजावें. म्ह० ' दुर्निष्प्रपततरं ' असें तें पद आहे. ' दुर्निष्प्रपततरं ' म्ह० 'दुर्निष्क्रमतरं'–या व्रीह्यादिभावापासून निःसरण होणें–बाहेर पडणें अतिशय दुःख –अतिशय कठिण आहे, असा याचा भावार्थ.[–'पण एवढ्यावरून आकाशादिकांपासून विलंबावांचून–विलंब न लागतां निःसरण होतें, हें कसें भासतें?' 'तदत्र०' इत्यादि भाष्यानें उत्तर—]

**भाष्यं**—तदत्र दुःखं निष्प्रपतनं प्रदर्शयन्पूर्वेषु सुखं निष्प्रपतनं दर्शयति । सुखदुःखताविशेषश्चायं निष्प्रपतनस्य कालाल्पत्वदीर्घत्वनिमित्तः । तस्मिन्नवधौ शरीरानिष्पत्तेः उपभोगासंभवात् । तस्माद्व्रीह्यादिभावापत्तेः प्रागल्पेनैव कालेनावरोहः स्यादिति ॥ २३ ॥

**भाष्यार्थ**—त्यामुळें येथें दुःखानें निष्प्रपतन–निःसरण होतें, असें प्रदर्शित करणारा प्रवाहण जैवलि किंवा वेद आकाशादि पूर्व स्थानांतील सुखानें निष्प्रपतन दाखवितो. [–"पण आकाशादिकांतील सुखनिःसरणच या विशेषामुळें आक्षिप्त –सूचित होतें. अविलंबानें निःसरण सूचित होत नाहीं." अशी आशंका घेऊन आचार्य ' सुख-दुःखता० ' इत्यादि भाष्यानें म्हणतात–]=हा सुख-दुःखताविशेष निष्प्रपतनाच्या कालाचें अल्पत्व व दीर्घत्व या निमित्तानें आहे. [–" अहोपण, आकाशादिकांपासून सुखानें–अनायासानें–सत्वर निःसरण होतें व व्रीह्यादिकांपासून दुःखानें–दीर्घकालानें होतें, अशी कां कल्पना केली जाते? यथाश्रुतच म्ह० व्रीह्यादिकांतून दुःख भोगून ते निघतात, असा अर्थ कां स्वीकारला जात नाहीं?" 'तस्मिन्०' इत्यादि भाष्यानें उत्तर–]=त्या अवधींत शरीराची निष्पत्ति होत नसल्यामुळें सुख-दुःखभोगाचा असंभव आहे, त्यामुळें यथाश्रुत अर्थ घेतां येत नाहीं. [–' अतः ' हा शब्द प्रकृताचा परामर्श करणारा जरी असला तरी त्याला एकवाक्यानें प्राप्त झालेल्या–त्याच वाक्यांतील व्रीह्यादिकांचेंच परामर्शित्व असल्यामुळें तो शब्द निराकांक्ष आहे. त्याच्या अर्थाला बाहेरच्या पदार्थाची आकांक्षा नाहीं. त्यामुळें वाक्यान्तरोपात्त–दुसऱ्या वाक्यांतून प्राप्त होणाऱ्या–दुसऱ्या वाक्यांतील आकाशादिकांचें परामर्शित्व नाहीं. त्यामुळें आकाशापासून वर्षणापर्यंत त्यांचें

अविलंबानें निःसरण होतें, असा '**तस्मात्०** ' इत्यादि भाष्यानें उपसंहार करितात–] =म्हणून व्रीह्यादिभाव प्राप्त होईपर्यंत–व्रीह्यादिभाव प्राप्त होण्यापूर्वी अविलंबानेंच अवरोह होतो, '**इति**'–असें सिद्ध झालें. [–आकाशादि व व्रीह्यादि यांतील तद्भावाचा परिहार करण्यासाठीं अवश्य कर्तव्य असलेला जो प्रयत्न त्याच्या लाघव-गौरवाचा उपसंहार करण्याकरितां भाष्यांत शेवटीं 'इति' असें म्हटलें आहे.]२३. [सु. व्र. पृ. २६७] (५)

**( ६. अन्याधिष्ठिताधिकरण. सू. २४-२७. )**

–'अनुशयींचें आकाशादि-प्रवर्षणान्तसादृश्य दीर्घकाल होणारें आहे, **कारण** त्याला त्यांचें सादृश्य आहे. व्रीह्यादिसादृश्याप्रमाणें' अशा या अनुमानाचा विशेषणश्रुतीनें बाध सांगून प्रकृत अवरोहवाक्याच्या अवशिष्ट एकदेशाचा '**अन्याधिष्ठितेषु०** ' इत्यादि सूत्रानें विचार करितात—

## सूत्रं—अन्याधिष्ठितेषु पूर्ववदभिलापात् ॥ २४

**सूत्रार्थ**—' अन्य जीवांकडून अधिष्ठित असलेल्या व्रीह्यादिकांत ' अनुशयी जीवांचा नुस्ता संसर्ग होतो. कारण ' पूर्वीच्या आकाशादिकांमध्यें जसा, तसाच व्रीह्यादिकांमध्येंहि अभिलाप आहे '–कर्माचा परामर्श न करितांच त्यांचा प्रवेश सांगितला आहे. २४. सु. व्र. २६८ [–' **तस्मिन्नेव०** ' इत्यादि भाष्यानें संगति सुचविणारे भाष्यकार अधिकरणाचा विषय सांगतात––]

**भाष्यं—तस्मिन्नेवावरोहे प्रवर्षणानन्तरं पठ्यते–' त इह व्रीहियवा ओषधिवनस्पतयस्तिलमाषा इति जायन्ते' इति । तत्र संशयः–किमस्मिन्नवधौ स्थावरजात्यापन्नाः स्थावरसुखदुःखभाजो अनुशयिनो भवन्ति, आहोस्वित्क्षेत्रज्ञान्तराधिष्ठितेषु स्थावरशरीरेषु संश्लेषमात्रं गच्छन्तीति । किं तावत्प्राप्तम् । स्थावरजात्यापन्नाः तत्सुखदुःखभाजोऽनुशयिनो भवन्तीति ॥**

**भाष्यार्थ**––त्याच अवरोहांत प्रवर्षणानंतर " ते अनुशयी येथें–या व्यवहारभूमींत व्रीहि-यव, ओषधि-वनस्पति, तिल-माष इत्यादि होतात. "–छां.५.१०.६. सु. उ. ४०७–असें पठित आहे. [–' अनुशयी व्रीह्यादिभावास प्राप्त झाले असतां ' जायन्ते '–उत्पन्न होतात अशी श्रुति असल्यामुळें व कर्मपूर्वकत्वश्रुति नसल्यामुळे विचाराचा हेतु–कारण असा संशय ' **तत्र०** ' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=त्याविषयीं या आकाशादि-वर्षणान्त पदार्थांचें त्या अनुशयींना सादृश्य प्राप्त झाल्यानंतर या पुढील अवधींत–त्या अवस्थेंत स्थावरजन्माला प्राप्त झालेले जे अनुशयी ते त्या स्थावरांच्या सुख-दुःखांस पात्र होतात कीं दुसऱ्या क्षेत्रज्ञांनीं

अधिष्ठित असलेल्या त्या स्थावर शरीरांमध्यें ते केवल संश्लेषमात्रास प्राप्त होतात, असा संशय येतो. [ या अधिकरणांत स्थावरभावाच्या संसारगतीच्या आलोचन-द्वारा वैराग्यालाच दृढ केलेलें असल्यामुळें याच्या पादादिसंगति आहेत. पूर्वपक्षांत 'अनुशयींच्या व्रीह्यादिजन्माला मुख्यत्व असल्यामुळें अधिकाऱ्यानें त्याच्या परिहारा-साठीं अधिक प्रयत्न करावा ' व सिद्धान्तांत ' त्याच्या केवल संश्लेषाचा परिहार करण्यासाठीं थोडा प्रयत्न करावा ' असा फलभेद विवक्षित आहे, असें मानून –' किं तावत्० ' इत्यादि भाष्यानें विमर्शपूर्वक पूर्वपक्ष करितात–]=मग यांतील प्रथम कोणता पक्ष प्राप्त होतो? स्थावरजातीस प्राप्त झालेले अनुशयी त्यांच्या सुख-दुःखांस पात्र होतात, असें प्राप्त झालें. [–"पण आकाशादिकांप्रमाणें व्रीह्या-दिकांमध्येंहि त्यांचा केवल संश्लेष होतो, त्यांना तद्देहता नाहीं, त्या स्थावरांचा जो देह तोच यांचा देह, असें होत नाहीं " अशी शंका--]

भाष्यं--कुत एतत् । **जनेर्मुख्यार्थत्वोपपत्तेः । स्थावरभावस्य च श्रुतिस्मृत्योः उपभोगस्थानत्वप्रसिद्धेः । पशुहिंसादियोगाच्च इष्टादेः कर्मजातस्यानिष्टफलत्वोप-पत्तेः । तस्मान्मुख्यमेवेदमनुशयिनां व्रीह्यादिजन्म । श्वादिजन्मवत् । यथा ' श्वयोनिं वा सूकरयोनिं वा चंडालयोनिं वा ' इति मुख्यमेवानुशयिनां श्वादि-जन्म तत्सुखदुःखान्वितं भवति, एवं व्रीह्यादिजन्मापीति ॥**

**भाष्यार्थ**---'**कुतः एतत्** '–पण हें असें कोणत्या कारणानें प्राप्त होतें? [–आकाशभाव व स्थावरभाव यांतील विशेष दाखविणारा पूर्ववादी ' **जनेः०** ' इत्यादि भाष्याने आक्षेपाचा परिहार करितो–]=' जन् ' या धातूच्या मुख्यार्थत्वाची उपपत्ति लागत असल्यामुळें. [ जीवाच्या जन्माचा अभाव जरी असला तरी ' देव झाला, मनुष्य झाला ' इत्यादि प्रयोगांत त्या त्या देहाभिमानाच्या द्वारा ' जन् ' या धातूचें मुख्यार्थत्व दिसत असल्यामुळें देहाभिमानपूर्वक त्यांचें सुख-दुःखभाक्त्व मानावें, असा भावार्थ. –" अहोपण, स्थावरभावामध्यें ' जन्-'धातूला मुख्यत्व कसें? कारण मनुष्यादिदेहाप्रमाणें त्यांत देहाभिमानपूर्वक भोग नाहीं," अशी आशंका घेऊन ' **स्थावरभावस्य च०** ' इत्यादि भाष्यानें म्हणतो–]=आणि श्रुति-स्मृतींमध्यें स्थावरभावाचें उपभोगस्थानत्व प्रसिद्ध आहे. त्यामुळें त्यांत ' जन् ' या क्रियेच्या मुख्यत्वाचा संभव आहे. [ ' दुसरे कित्येक पापी आपल्या कर्माप्रमाणें व विज्ञानाप्रमाणें वृक्षादि स्थावरभावास प्राप्त होतात '–का. २. २. ७.सु. उ. ७०– इत्यादि श्रुति व ' शरीरजैः कर्मदोषैर्याति स्थावरतां नरः '–मनु. १२. ९–शरीरजन्य कर्मदोषांनीं नर स्थावरत्वास प्राप्त होतो, इत्यादि स्मृति येथें घ्यावी. –"अहोपण,

या उदाहृत श्रुति-स्मृतींवरून स्थावरभावाचें पापफलत्व भासतें. तेव्हां चंद्रस्थला-पासून स्खलन पावलेल्या इष्टादिकारी जीवांना स्थावरभावप्राप्ति कशी होईल" अशी आशंका घेऊन '**पशुहिंसादि०**' इत्यादि भाष्यानें पूर्ववादी म्हणतो–]=आणि पशुहिंसादिसंबंधामुळें इष्टादिकर्मजाताचे अनिष्टफलत्व उपपन्न होतें. त्यामुळें त्यांचाहि स्थावरभाव संभवतो. [सोमपानाच्या वेळीं एकमेकांचें उच्छिष्टभक्षण हा 'पशुहिंसादि' येथील 'आदि-'शब्दाचा अर्थ आहे.–" पण 'अग्निषोमीय पशूचें आलभन करावें' असें हें विशेष शास्त्र असल्यामुळें 'कोणत्याच प्राण्याची हिंसा करूं नये' इत्यादि सामान्य शास्त्राचा विशेषविषयामध्यें बाध होतो. त्यामुळें यज्ञीय पशुहिंसेला अनिष्टफलता नाहीं." अशी आशंका घेऊन 'क्रत्वर्थत्वानें व पुरुषार्थत्वानें विधि व निषेध यांना भिन्नार्थत्व आहे. त्यामुळें त्यांचा विरोध नाहीं. म्हणून त्यांच्या बाध्य-बाधकत्वाची असिद्धि होते. त्यामुळें निषेधानें ज्ञात झालेल्या पशुहिंसेच्या अनर्थहेतुत्वाचें निराकरण करणें अशक्य आहे,' अशा आशयानें युक्त असलेला पूर्ववादी '**तस्मात्०**' इत्यादि भाष्यानें पूर्वपक्षाचा उपसंहार करितो–]= तस्मात् अनुशयींचें हें व्रीह्यादिजन्म मुख्यच आहे. [–" अहो पण, पशुहिंसादिकाला अंगत्व असल्यामुळें स्वातंत्र्यानें व्रीह्यादिजन्महेतुत्व नाहीं" अशी आशंका घेऊन वादी 'पापान्तराच्या जन्महेतुत्वाविषयीं'–दुसऱ्या पापाला जन्माचें कारणत्व आहे; याविषयीं '**श्वादिजन्मवत्०**' या भाष्यानें दृष्टान्त देतो–]=अनुशयींच्याच श्वादिजन्माप्रमाणें त्यांचा स्थावरजन्म मुख्यच आहे. [ अवरोहप्रकरणांत त्यांना श्वा–कुत्रा, सूकर–डुक्कर इत्यादि भाव प्राप्त होतो, असें श्रुत आहे.–"पण तो श्रुत नाहीं" अशी आशंका घेऊन वादी श्रुत्यन्तर सांगतो–]='**यथा०**'–ज्याप्रमाणें "श्वयोनीला किंवा सूकरयोनीला किंवा चांडालयोनीला"–पृ. ३४–असें अनुशयींचें मुख्यच श्वादिजन्म त्यांच्या सुख-दुःखांनीं युक्त असेंच होतें, त्याप्रमाणें त्यांचें व्रीह्यादिजन्महि मुख्य व त्यांच्या सुख-दुःखांनीं युक्त असेंच होतें, '**इति**'–याप्रमाणें अनुशयींच्या व्रीह्यादिजन्माला मुख्यत्व असल्यामुळें त्याच्या परिहारासाठीं अधिकृत जीवानें प्रयत्नगौरव करावें.[–'**एवं०**' इत्यादि भाष्यानें पूर्वपक्षाचा अनुवाद करून सिद्धान्ताला अवतरण देऊन प्रतिज्ञेला पूर्ण करून सूत्राची योजना करितात–]

**भाष्यं—एवं प्राप्ते ब्रूमः। अन्यैर्जीवैराधिष्ठितेषु व्रीह्यादिषु संसर्गमात्रमनुशयिनः प्रतिपद्यन्ते, न तत्सुखदुःखभाजो भवन्ति। पूर्ववत्। यथा वायुधूमादिभावोऽनुशयिनां तत्संश्लेषमात्रम्। एवं व्रीह्यादिभावोऽपि जातिस्थावरैः संश्लेषमात्रम्॥**

**भाष्यार्थ**—असा पूर्वपक्ष प्राप्त झाला असतां 'अन्याधिष्ठितेषु'–'अन्य जीवांकडून अधिष्ठित असलेल्या व्रीह्यादिकांमध्यें अनुशयी केवल संसर्गास प्राप्त होतात. ते त्या व्रीह्यादिकांच्या सुख-दुःखांस पात्र होत नाहींत, ते तत्सुख-दुःख-भाक् होत नाहींत,' असें आम्ही सांगतों. [–त्याविषयीं सूत्रांतील हेतु घेऊन त्याचें व्याख्यान करितात ]=' **पूर्ववत्०** '–पूर्वीप्रमाणें. '**यथा०** '–ज्याप्रमाणें अनुशयींचा वायु-धूमादिभाव तत्संश्लेषमात्र आहे त्याप्रमाणें त्यांचा व्रीह्यादिभावहि जातिस्थावरांशीं संश्लेषमात्र आहे. [–" अहोपण, 'जन्' या धातूच्या मुख्यार्थत्वासाठीं अनुशयी व्रीह्यादिकांमध्यें तत्सुख-दुःखभाक्–त्यांच्या सुख-दुःखांस पात्र होतात, असें आम्हीं वर–७६–सांगितलें आहे. त्यामुळें त्यांचा व्रीह्यादिकांशीं नुस्ता संश्लेषच होत नाहीं," अशी शंका—]

**भाष्यं—कुत एतत् । तद्वदेवेहाप्यभिलाभात् । कोऽभिलापस्य तद्वद्भावः । कर्मव्यापारमन्तरेण संकीर्तनम् । यथाकाशादिषु प्रवर्षणान्तेषु न कंचित्कर्मव्यापारं परामृशत्येवं व्रीह्यादिजन्मन्यपि । तस्मान्नास्त्यत्र सुखदुःखभाक्त्वमनुशयिनाम् । यत्र तु सुखदुःखभाक्त्वमभिप्रैति, परामृशति तत्र कर्मव्यापारं 'रमणीयचरणाः...कपूयचरणाः' इति ॥**

**भाष्यार्थ**—पण त्यांचा केवल संश्लेष होतो, हें तुम्ही कोणत्या कारणानें सांगतां ? [–**पूर्ववत्**' या सूत्रभागाचा दोन अर्थांच्या विवक्षेनें प्रयोग केलेला असल्यामुळें पूर्वोक्त अर्थाहून निराळया–दुसऱ्या अर्थाचें प्रदर्शन करणारे भाष्यकार वाद्याच्या शंकेचा परिहार करितात–]=' **तद्वदेव०** '–त्याप्रमाणेंच येथेंहि 'अभिलाप'–कथन केलेलें असल्यामुळें. [–'वायुर्भूत्वा' इत्यादि स्थलीं व 'व्रीह्यादि-'वाक्यांत उक्तिसाम्य जरी असलें तरी पूर्ववाक्यांत किंवा व्रीह्यादिवाक्यांत अनुशयींच्या स्थावरादिभावाच्या विरोधी अशी कोणत्याहि प्रकारची उक्ति नाहीं, अशी शंका–]=' **कोऽभिलापस्य०** '–अभिलापाचा तद्वद्भाव तो कोणता ? [–कर्माचा परिणाम, या निमित्तत्वाच्या कथनावांचूनच स्थावरभावाचें कथन हें तद्देहत्वप्राप्तीच्या अभावाविषयीं लिंग आहे, असें सांगणारे भाष्यकार '**कर्मव्यापार०**' इत्यादि भाष्यानें अभिलापाचा तद्वद्भाव सांगतात–]=कर्मव्यापारावांचून संकीर्तन–कथन करणें हाच अभिलापाचा तद्वद्भाव आहे. [–"पण कर्मव्यापारावांचून त्यांना व्रीह्यादिभाव प्राप्त होतो, असें कथन केलेलें नाहीं" अशी आशंका घेऊन 'कर्मविशेषव्यापाराचें निमित्तत्वानें अकथन इष्ट आहे' असें '**यथा०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=ज्याप्रमाणें श्रुति आकाशादिकां-

पासून प्रवर्षणापर्यंत भावांत कोणत्याहि प्रकारच्या कर्मव्यापाराचा परामर्श करीत नाहीं त्याचप्रमाणें व्रीह्यादिजन्मामध्येंहि कर्मव्यापाराचा परामर्श करीत नाहीं. [–'अनुशयींचा व्रीह्यादिभाव हा त्यांचा जन्म नव्हे. कारण या प्रकरणांत कर्मव्यापारोक्तीवांचून तो भाव सांगितलेला आहे. आकाशादिभावाप्रमाणें' असें फलित 'तस्मात्०' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=तस्मात् व्रीह्यादिभावांत अनुशयींना सुख-दुःखभाक्त्व नाहीं. [–शिवाय ब्राह्मणादिजन्मांतच 'रमणीयचरणाः' इत्यादि कर्माचें जें कथन केलें आहे तें त्या ब्राह्मणादिजन्माच्या पूर्वीहि व्रीह्यादिभावानें त्यांचा जन्म होत असल्यास व्यर्थ होईल. यास्तव त्यांचा ब्राह्मणादिजन्मापूर्वी जन्म होत नाहीं, अशी श्रुतार्थापत्ति 'यत्र तु०' इत्यादि भाष्यानें सांगतात– ]=पण श्रुतीला ज्या जन्मांत सुख-दुःखभाक्त्व अभिप्रेत–अभीष्ट असतें तेथें ती 'रमणीयचरणाः' व 'कपूयचरणाः' असा कर्मव्यापाराचा परामर्श करिते. [–शिवाय 'जो जो अन्न खातो' इत्यादि वाक्यानें पुढें अनुशयींचा पुरुषाहुतिसंबंध श्रुत आहे. पण व्रीह्यादिभावानें त्यांचा जन्म स्वीकारल्यास त्या व्रीह्यादिकांना कापणें, झाडणें, मळणें इत्यादि प्रसंगीं त्यांच्या प्रवासाचा–तो भाव सोडून जाण्याचा–मरणाचा प्रसंग येत असल्यामुळें तो पुरुषाहुतिसंबंध अयुक्त होईल. त्यामुळें त्यांचें तें मुख्य जन्म नव्हे, अशी दुसरी श्रुतार्थापत्ति '**अपि च०**' इत्यादि भाष्यानें सांगतात—]

**भाष्यं—अपि च मुख्येऽनुशयिनां व्रीह्यादिजन्मनि, व्रीह्यादिषु लूयमानेषु कंड्यमानेषु पच्यमानेषु भक्ष्यमाणेषु च तदभिमानिनोऽनुशयिनः प्रवसेयुः। यो हि जीवो यच्छरीरमभिमन्यते स तस्मिन्पीड्यमाने प्रवसतीति प्रसिद्धम्। तत्र व्रीह्यादिभावाद्रेतःसिग्भावोऽनुशयिनां नाभिलप्येत। अतः संसर्गमात्रमनुशयिनां अन्याधिष्ठितेषु व्रीह्यादिषु भवति॥**

**भाष्यार्थ**—शिवाय अनुशयी जीवांचा व्रीह्यादिजन्म मुख्य आहे, असें मानिल्यास त्या व्रीह्यादिकांना कापीत असतांना, कांडीत असतांना, शिजवीत असतांना व भक्षण करीत असतांना त्यांचे अभिमानी अनुशयी प्रवास करतील–तें तें व्रीह्यादिशरीर सोडून जातील–मरतील. [–"पण जीवांना व्रीह्यादिकांहून अन्यत्व असल्यामुळें व्रीह्यादिकांना जरी कापलें, कांडलें, शिजविलें किंवा खाल्लें तरी जीव त्यांना सोडून जात नाहींत, त्यांचा प्रवास होत नाहीं," अशी आशंका घेऊन आचार्य '**यो हि०**' इत्यादि भाष्यानें म्हणतात–]=कारण जो जीव ज्या शरीरावर 'मी' असा अभिमान ठेवितो त्या शरीराला अत्यंत पीडा होऊं लागली असतां

तो त्यांतून निघून जातो, हें प्रसिद्ध आहे. [—"बरें, त्या अनुशयींचा व्रीह्यादिकांतून प्रवास जरी झाला तरी त्यांत काय क्षति–हानि आहे?" 'तत्र०' इत्यादि भाष्यानें उत्तर–]=आणि त्यांचा व्रीह्यादिकांतून जर प्रवास झाला असता तर अनुशयींचा व्रीह्यादिभावापासून रेतःसिक्-भाव–रेतःसेक करणारा जो पुरुष त्याचा भाव श्रुतीकडून सांगितला गेला नसता. [—'अतः०' इत्यादि भाष्यानें पूर्वोक्त हेतूच्या फलाचा उपसंहार करितात–]=यास्तव अन्य भोक्त्या जीवांकडून अधिष्ठित असलेल्या व्रीह्यादिकांमध्यें अनुशयींचा केवल संसर्गच होतो. [ त्यांत त्यांचा मुख्य जन्म होत नाहीं.–आतां 'जन्' या धातूच्या अर्थाचें मुख्यत्व सिद्ध होत असल्यामुळें व स्थावरत्वाला भोगस्थानत्व असल्यामुळें–वृक्षादि स्थावरशरीर हेंहि भोगायतन असल्यामुळें अनुशयींचा व्रीह्यादिजन्म मुख्यच आहे, असें जें म्हटलें आहे–पृ. ७५–त्याविषयीं आचार्य 'एतेन०' इत्यादि भाष्यानें म्हणतात—]

**भाष्यं—एतेन जनेर्मुख्यार्थत्वं प्रतिब्रूयादुपभोगस्थानत्वं च स्थावरभावस्य। न च वयमुपभोगस्थानत्वं स्थावरभावस्यावजानीमहे। भवत्वन्येषां जंतूनां अपुण्यसामर्थ्येन स्थावरभावमुपगतानामेतदुपभोगस्थानम्। चन्द्रमसस्तु अवरोहन्तोऽनुशयिनो न स्थावरभावमुपभुंजत इत्याचक्ष्महे ॥ २४ ॥**

**भाष्यार्थ**—'एतेन'–उक्त युक्तीनें जन्मश्रुतीला उपचरितार्थत्व आहे, या कथनानें 'जन्-'धातूच्या मुख्यार्थत्वाचें प्रत्याख्यान करावें. [—'अनुशयींच्या स्थावरभावाला भोगस्थानत्व आहे कीं स्थावर जीवांच्या स्थावरभावाला भोगस्थानत्व आहे.' असा विकल्प करून त्यांतील पहिल्या कल्पाला उक्त न्यायानेंच दूषित करितात–] **'उपभोगस्थानत्वं च०'**–आणि त्या उक्त युक्तीनेंच अनुशयींच्या स्थावरभावांच्या उपभोगस्थानत्वाचें प्रत्याख्यान करावें. [ जें अनुशयींच्या स्थावरभावाचें भोगस्थानत्व त्याचेंहि उक्त न्यायानेंच निरसन करावें, असा संबंध.–'न च०' इत्यादि भाष्यानें पूर्वोक्त विकल्पांतील दुसऱ्या म्ह० 'स्थावर जीवांच्या स्थावरभावाला उपभोगस्थानत्व आहे' या कल्पाचा अंगीकार करितात–]=आणि आम्ही स्थावरभावाच्या उपभोगस्थानत्वाची अवज्ञा करीत नाहीं. [—"तर मग स्थावरभावाला कोणाचें उपभोगस्थानत्व–भोगायतनत्व–शरीरत्व आहे?" 'भवतु०' इत्यादि भाष्यानें उत्तर–]=अपुण्याच्या–पापाच्या सामर्थ्यानें स्थावरभावाला प्राप्त झालेल्या अन्य जीवांचें तें–स्थावरशरीर उपभोगस्थान असो. [' दुसरे जीवहि त्यांत भोक्ते नाहींत, त्यांना व्रीह्यादिसंश्लिष्टत्व असल्यामुळें, अनुशयींप्रमाणें' अशी शंका घेऊन 'तो देह हा परिणाम करणाऱ्या पापाचें राहित्य–तो स्थावर देह हेंच फल देणाऱ्या

पापाचा अभाव असणें ' ही येथें या अनुमानांत उपाधि आहे, अशा आशयानें भाष्यांत ' अपुण्यसामर्थ्यानें ' असें म्हटलें आहे.—" अहोपण, अनुशयींच्याहि व्रीह्यादिभावाला अनुकूल अशा पापविशेषाचें अस्तित्व कल्पण्यास योग्य आहे—स्थावरभावास योग्य असें त्यांचेंहि पाप मानावें. त्यामुळें वरील उपाधीचा असंभव आहे " अशी आशंका घेऊन ' अत्यंत पुण्य करणाऱ्या स्वर्गेच्छु कर्मठाच्या प्रबल पापाचा असंभव असल्यामुळें व अल्प पापांनीं स्थावरत्वाची सिद्धि होत नसल्यामुळें, असें म्हणतां येत नाहीं,' असें **'चंद्रमसस्तु०'** इत्यादि भाष्यानें सांगतात-] =पण चंद्रलोकापासून अवरोहण करणारे—चंद्रलोकावरून खालीं उतरणारे जे अनुशयी ते स्थावरभावाचा उपभोग घेत नाहींत, असें आम्ही सांगतों२४. [—वाद्याच्या आणखी एका म्हणण्याचा अनुवाद करून **'अशुद्धं०'** या सूत्रानें त्याचें निरसन—]

**सूत्रं—अशुद्धमिति चेन्न शब्दात् ॥ २५**

**सूत्रार्थ**—ज्योतिष्टोमादि कर्म पशुहिंसादिकांनीं युक्त असल्यामुळें ' अशुद्ध ' आहे, असें जर म्हणशील तर तें अशुद्ध नाहीं ' 'शब्दामुळें'—कारण विधिशास्त्ररूप शब्दावरून त्याला धर्मत्व आहे. २५. सु. ब्र. २६८.[—**' यत्पुनरुक्तं० '** इत्यादि भाष्यानें सूत्रांतील अनुवादभागाचें विवरण—]

**भाष्यं—यत्पुनरुक्तं पशुहिंसादियोगादशुद्धमाध्वरिकं कर्म तस्यानिष्टमपि फलं अवकल्पत इत्यतो मुख्यमेवानुशयिनां व्रीह्यादिजन्मास्तु । तत्र गौणी कल्पना अनर्थिकेति । तत्परिह्रियते । न । शास्त्रहेतुत्वाद्धर्माधर्मविज्ञानस्य ॥**

**भाष्यार्थ**—पण वाद्यानें पूर्वपक्षांत " पशुहिंसादियोगामुळें आध्वरिक—यज्ञसंबंधी कर्म अशुद्ध आहे. त्याचें अनिष्ट फलहि संभवतें. [—इष्टादिकाऱ्यांचें अनिष्टफलवत्त्व संभवतें, असें झालें असतां **'इत्यत:०'** इत्यादि भाष्यानें फलित—]=आणि त्यांचें अनिष्ट फल संभवत असल्यामुळें अनुशयींचें व्रीह्यादिजन्म मुख्यच असूं दे. [ यानें 'जन्मश्रुति गौण आहे' या म्हणण्याचेंहि निरसन झालें, असें वादी **' तत्र०'** इत्यादि भाष्यानें सांगतो—]=आणि व्रीह्यादिजन्माला मुख्यत्व आहे, असें झालें असतां जन्मश्रुतीची गौणी कल्पना अनर्थिका—व्यर्थ—निरुपयोगी आहे" असें जें म्हटलें आहे—पृ.७६. [—**' तत्परिह्रियते० '** इत्यादि भाष्यानें सूत्रांतील परिहाराला अवतरण देतात—]=त्याचा परिहार केला जातो—**'न'**—यज्ञीय कर्म अशुद्ध नाहीं, कारण धर्माधर्मविज्ञानाला शास्त्रहेतुत्व आहे. [—वैदिक कर्म अशुद्ध नाहीं, या प्रतिज्ञेच्या सिद्धीसाठीं ' शास्त्रहेतुत्वात् ' असा हेतु सांगितला आहे. त्याचें **'अयं०'** इत्यादि भाष्यानें विवरण—]

**भाष्यं—अयं धर्मोऽयमधर्म इति शास्त्रमेव विज्ञाने कारणम्। अतींद्रियत्वात्तयोः। अनियतदेशकालनिमित्तत्वाच्च। यस्मिन्देशे काले निमित्ते च यो धर्मोऽनुष्ठीयते। स एव देशकालनिमित्तान्तरेष्वधर्मो भवति। तेन न शास्त्रादृते धर्माधर्मविषयं विज्ञानं कस्यचिदस्ति ॥**

**भाष्यार्थ**--हा धर्म आहे व हा अधर्म आहे, असें विज्ञान होण्यास शास्त्र हेंच कारण-साधन-प्रमाण आहे. शास्त्रावरूनच त्यांचें विज्ञान होतें. [-" त्या धर्माधर्मविज्ञानामध्यें अनुमानहि प्रमाण कां नाहीं ? " अशी आशंका घेऊन 'धर्माधर्मविज्ञान या अर्थी कोणतें अनुमान प्रमाण आहे ? दृष्ट कीं सामान्यतोदृष्ट ?' असा विकल्प करून '**अतींद्रियत्वात्०**' इत्यादि भाष्यानें त्यांतील पहिल्या कल्पाचें निरसन-]=कारण धर्म व अधर्म यांना अतींद्रियत्व आहे. [ते इंद्रियांचा विषय होत नाहींत. त्यामुळें त्यांमध्यें दृष्ट अनुमानाची प्रवृत्तिच होऊं शकत नाहीं. -'**अनियतदेश०**' इत्यादि भाष्यानें दुसऱ्या-सामान्यतोदृष्टपक्षाचें निरसन-]=आणि त्यांचा अनियत देश, अनियत काल व अनियत निमित्त आहे. [धर्माधर्मांना अनियत देश-काल-निमित्तत्व असल्यामुळें सामान्यतोदृष्ट अनुमानहि त्याचें प्रमाण नाहीं.-'**यस्मिन्०**' इत्यादि भाष्यानें याचाच विस्तार करितात-]=ज्या देशांत, कालांत किंवा निमित्तप्रसंगीं जो धर्म अनुष्ठिला जातो, तोच धर्म दुसऱ्या देशीं, कालीं किंवा निमित्तप्रसंगीं अधर्म होतो. [-कारण शुद्ध देशांत, सायंकालीं, प्रातःकालीं व जीवनादिनिमित्तानें जो अग्निहोत्रादि धर्म अनुष्ठिला जातो तोच अशुद्ध देश, मध्यरात्रादिकाल व मरणादिनिमित्त यांत केला असतां अधर्म होतो, हें प्रसिद्ध आहे. त्यामुळें धर्माधर्मविषयांत सामान्यतोदृष्ट अनुमान सावकाश नाहीं, असा भावार्थ.-' धर्मादिज्ञान आनुमानिक नाहीं तर शास्त्रमात्रकृत आहे,' असें जें सांगितलें आहे त्याचें '**तेन०**' इत्यादि भाष्यानें निगमन करितात-] =त्यामुळें शास्त्रावांचून धर्माधर्मादिविज्ञान कोणालाहि होत नाहीं. [-" अहोपण, शास्त्र या प्रमाणानेंच धर्मादिज्ञान जरी होत असलें तरी त्यानें प्रकृत वैदिक कर्म अशुद्ध आहे या अर्थी काय झालें ? " '**शास्त्राच्च०**' इत्यादि भाष्यानें उत्तर-]

**भाष्यं—शास्त्राच्च हिंसानुग्रहाद्यात्मको ज्योतिष्टोमो धर्म इत्यवधारितः। स कथमशुद्ध इति शक्यते वक्तुम्। ननु 'न हिंस्यात्सर्वा भूतानि' इति शास्त्रमेव भूतविषयां हिंसामधर्म इत्यवगमयति ॥**

**भाष्यार्थ**—आणि शास्त्रावरून हिंसानुग्रहादिरूप ज्योतिष्टोम धर्म आहे, असा निश्चय झालेला आहे. तेव्हां तो अशुद्ध आहे, असें म्हणणें कसें शक्य आहे ?

[–" अहोपण, ज्योतिष्टोमाचें दुष्टत्वहि–सदोषत्वहि निषेधानें ज्ञात झालेलें आहे " अशी शंका सांख्य ' ननु० ' इत्यादि भाष्यानें घेतो–]=अहोपण, "सर्व भूतांची हिंसा करूं नये " असें शास्त्रच भूतसंबंधी–भूतविषय–भूतांची हिंसा हा अधर्म आहे, असा बोध करून देतें. [–निषेधाच्या सामर्थ्यानें पशुहिंसेंतील अनर्थहेतुत्व औत्सर्गिक–सामान्यतः प्राप्त आहे, असा अंगीकार करितात–]

**भाष्यं—बाढम् । उत्सर्गस्तु सः । अयं चापवादः 'अग्नीषोमीयं पशुमालभेत्' इति । उत्सर्गापवादयोश्च व्यवस्थितविषयत्वम् । तस्माद्विशुद्धं कर्म वैदिकं । शिष्टैरनुष्ठीयमानत्वादनिंद्यमानत्वाच्च । तेन न तस्य प्रतिरूपं फलं जातिस्थावरत्वम् ॥**

**भाष्यार्थ**—' **बाढं०** '–खरें आहे. शास्त्रानें सर्वभूतहिंसेचा निषेध केला आहे. पण तो उत्सर्ग आहे–सामान्य नियम आहे. [–तथापि विधीच्या सामर्थ्यानें क्रतूपकारित्वानें त्याचें श्रेयोहेतुत्व आपवादिक आहे, असें '**अयं चापवादः०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=आणि 'अग्निषोमीय पशूचें आलभन करावें' असा हा अपवाद आहे. [–'पण त्यांना सामान्य-विशेषविषयत्वानें व्यवस्थितविषयत्व आहे. म्हणून अविरुद्धत्वामुळें बाध्य-बाधकता नाहीं, ' असें जें वर वाद्यानें सांगितलें आहे ' –पृ.७६–त्याविषयीं आचार्य ' **उत्सर्गापवादयोः०** ' इत्यादि भाष्यानें म्हणतात–] =आणि उत्सर्ग व अपवाद यांना व्यवस्थितविषयत्व आहे. त्यांचे विषय व्यवस्थित–नियत आहेत. [पशुहिंसेचा निषेध केलेला असल्यामुळें तिला अनर्थहेतुत्व आहे. पण विधीमुळें क्रतूपकार होतो, असा दोन्ही प्रकारें तिच्या अर्थत्वाचा अविरोध जरी असला तरी अनर्थाचा परिहार करून क्रतूपकारानें अर्थबाहुल्यहेतुत्वाच्या अभावानें विधि अनर्थक होईल. 'तर मग श्येनामध्येंहि विधीनेंच प्रवृत्ति होते, त्यामुळें त्यालाहि विशिष्ट अर्थाचें हेतुत्व आहे,' असेंहि म्हणतां येत नाहीं. कारण कामांमध्यें सर्वत्र करणांशामध्यें रागामुळें–आसक्तीनें प्रवृत्ति होते व इतिकर्तव्यतांशामध्यें विधीनें प्रवृत्ति होते, असा स्वीकार केलेला आहे. श्येनाप्रमाणें ज्योतिष्टोमालाहि काम्यत्व जरी असलें तरी ' नाभिचरेत् '–अभिचार कर्म करूं नये, याप्रमाणें त्याला अनिषिद्धत्व असल्यामुळें व इतिकर्तव्यरूप अग्निषोमीय हिंसेंत होणारी जी प्रवृत्ति तिला विधि-अधीनत्व असल्यामुळें विशिष्टार्थसाधनत्वच आहे. यास्तव विधि-निषेधांचा विरोध आला असतां सावकाश-अनवकाशन्यायानें–अ.२. पृ.५–व्यवस्था करावी, असा भावार्थ.–याप्रमाणें विधि-निषेधांचा अविरोध आहे, असें

---

१ **रत्नप्रभा**—काम्यकर्मांमध्यें सर्वत्र करणांशीं रागतः प्रवृत्ति आणि अंगांमध्यें विधितः प्रवृत्ति अशी स्थिति आहे. त्यामुळें श्येनाख्य कर्मामध्यें निषेध जरी असला

झालें असतां '**तस्मात्**०' इत्यादि भाष्यानें फलित सांगतात–]=तस्मात् वैदिक कर्म विशुद्ध आहे. कारण त्याला शिष्टांकडून अनुष्ठीयमानत्व आहे. म्ह० शिष्ट त्याचें अनुष्ठान करितात. [–'अनृत–असत्य भाषण करूं नये' इत्यादि निषेधाप्रमाणें कोणाच्या प्रकरणांत श्रुतत्वाचा अभाव असल्यामुळें, पुरुषार्थत्वानें प्राप्त झालेल्या हननाचाच 'न हिंस्यात्०' असा निषेध असल्यामुळें व विहित क्रत्वर्थ हिंसेला निषेधाचें अविषयत्व असल्यामुळें अनर्थहेतुता नाहीं, तर सुखफलत्वच आहे, असा भावार्थ.–" अहोपण, एखाद्या देशांत शिष्टांकडून केलें जाणारे मांसाशनादिकहि देशान्तरीं–दुसऱ्या देशांत विवादास्पद दिसतें!" '**अनिंद्यमानत्वाच**' या भाष्यानें उत्तर–]=आणि हें क्रत्वर्थ असलेलें पशूचें आलभन कोणाकडून निंदिलेंहि जात नाहीं–तें अनिंद्यहि आहे. त्यामुळें [–वैदिक कर्माला शुद्धत्व आहे असें झालें असतां सिद्ध झालेला अर्थ '**न तस्य**०' इत्यादि भाष्यानें सांगतात–]= म्हणून जातिस्थावरत्व हें त्याचें प्रतिकूल–अनिष्ट फल अनुशयींना प्राप्त होत नाहीं. [–" तर मग दुसऱ्या कांहीं पापकर्मामुळें अनुशयींना व्रीह्यादिभाव प्राप्त होईल!" असें जें वाद्यानें म्हटलें आहे–७६–त्याविषयीं '**न च**०' इत्यादि भाष्यानें सांगतात–]

**भाष्यं**—**न च श्वादिजन्मवदपि व्रीह्यादिजन्म भवितुमर्हति । तद्धि कपूयचरणानधिकृत्य उच्यते । नैवमिह वैशेषिकः कश्चिदधिकारोऽस्ति । अतश्चंद्रमंडलस्खलितानां अनुशयिनां व्रीह्यादिसंश्लेषमात्रे तद्भाव इत्युपचर्यते ॥ २५ ॥**

**भाष्यार्थ**—अनुशयींच्या श्वादिजन्माप्रमाणेंहि–कुत्रा, डुकर इत्यादि जन्मांप्रमाणेंहि त्यांचा हा व्रीह्यादिजन्म होणें योग्य नाहीं. '**तद्धि**०'–कारण तें श्वादिजन्म कपूयचरणांना–पापाचरण करणाऱ्यांना उद्देशून सांगितलें जातें. पण त्यांच्या या व्रीह्यादिभावांत तसा एखादा वैशेषिक अधिकार–असाधारण हेतु सांगितलेला

---

तरी रागाच्या–आसक्तीच्या प्राबल्यामुळें प्रवृत्ति होईल. पण क्रतूच्या अंगभूत हिंसादिकांमध्यें विधितःच प्रवृत्ति होते असें सांगणें उचित आहे आणि तो विधि उत्सर्गतःच प्राप्त झालेल्या हिंसेच्या अनर्थहेतुत्वाचा जर बाध न करील तर तो प्रवर्तक होणार नाहीं. किंवा अनर्थहेतुत्वाचा बाध न करतांहि जर प्रवर्तक होईल तर तो अनर्थालाच कारण होईल. त्यामुळें निरवकाश विधि सावकाश उत्सर्गाला अविहित हिंसादिकांमध्यें स्थापित करितो. पण हें सुद्धां निषेधशास्त्राची हिंसात्वादि सामान्यानें प्रवृत्ति स्वीकारून सांगितलेलें आहे. वस्तुतः त्या शास्त्राचा रागप्राप्त हिंसा हा विषय आहे. म्हणून विधिप्राप्तहिंसेमध्यें त्याची प्रवृत्तिच होत नसल्यामुळें 'वैदिककर्माला अशुद्धत्व आहे,' या शंकेला अवकाशच नाहीं असें समजावें.

नाहीं. [–"तर मग अनुशयींची व्रीह्यादिभावोक्ति कशी आहे?" 'अत:०' इत्यादि भाष्यानें उत्तर–]=यास्तव चंद्रमंडलापासून स्खलन पावलेल्या अनुशयींचा व्रीह्यादिसंश्लेषमात्र हाच तद्भाव उपचारानें सांगितला जातो, त्यांच्या केवल व्रीह्यादि-संश्लेषामध्येंच व्रीह्यादिभावाचा उपचार केला जातो. २५.[–शिवाय त्याच वाक्याच्या शेषवाक्यांत–उपसंहारांत संयोगालाच तद्भाव श्रुत असल्यामुळें उपक्रमांतीलहि तद्भाव संयोगाहून निराळा नाहीं–उपक्रमांतील तद्भावालाहि संयोगाहून अर्थान्तरत्व नाहीं, असें 'रेत:सिक्०' इत्यादि सूत्रानें सांगतात—]

## सूत्रं--रेत:सिग्योगोऽथ ॥ २६

**सूत्रार्थ**—'अथ'–व्रीह्यादिभावाच्या प्राप्तीनंतर अनुशयी जीवांचा रेत:सिग्योग होतो. रेताचा सेक करणाऱ्या पुरुषाशीं योग–संयोग होतो. त्यांना रेत:सिग्भाव प्राप्त होतो. २६.–सु.ब्र.२६८[–'इतश्च०'इत्यादि भाष्यानें सूत्राचें व्याख्यान करितात–]

**भाष्यं—इतश्च व्रीह्यादिसंश्लेषमात्रं तद्भावो। यत्कारणं व्रीह्यादिभावस्यानंतरं अनुशयिनां रेत:सिग्भाव आम्नायते -' यो यो ह्यन्नमत्ति यो रेत: सिंचति तद्भूय एव भवति ' इति ॥**

**भाष्यार्थ**—याहि कारणानें केवल व्रीह्यादिकांशीं संश्लेष–संयोग होणें, हाच तद्भाव आहे. कारण कीं, व्रीह्यादिभावाच्या अनंतर अनुशयींचा रेत:सिग्भाव सांगितला जातो. "जो जो अन्न खातो [–प्रकृत विषयाच्या उपयोगित्वानें श्रुति अन्नभक्षकाला तरुणत्वानें विशेषित करिते–]=' य: रेत:० '–जो रेताचा सेक करितो 'तद्भूय-'च–तत्प्रायच तो अनुशयी होतो."–सु.उ.४०७–ही श्रुति त्याचा रेत:-सिग्भाव सांगते. [–" अहोपण, 'तद्भूयच तो होतो ' या श्रुतीनें ' अन्नानुगत–अन्नामध्यें आलेला अनुशयी त्या रेत:सिग्भावालाच प्राप्त होतो, ' असें सांगितलें आहे, त्याचा नुस्ता संयोग सांगितलेला नाहीं, " अशी आशंका घेऊन 'न च०' इत्यादि भाष्यानें आचार्य म्हणतात—]

**भाष्यं—न चात्र मुख्यो रेत:सिग्भाव संभवति। चिरजातो हि प्राप्तयौवनो रेत:सिग्भवति। कथमिव अनुपचरितं तद्भावमद्यमानान्नानुगतोऽनुशयी प्रतिपद्येत। तत्र तावदवश्यं रेत:सिग्योग एव रेत:सिग्भावोऽभ्युपगंतव्य:। तद्वद्व्रीह्यादिभावोऽपि व्रीह्यादियोग एवेत्यविरोध: ॥२६॥**

**भाष्यार्थ**—'अत्र'–भक्षण केल्या जाणाऱ्या अन्नांत अनुगत झालेल्या अनुशयींमध्यें किंवा या प्रकृत वाक्यांत मुख्य रेत:सिग्भाव संभवत नाहीं. [–रेत:सेक करणाराच्या स्वभावाचें आलोचन केलें असतांहि त्याच्या मुख्य तद्भावाचा असंभव

विशद करितात–]=' **चिरजातो हि०** '–कारण पुष्कळ वर्षांपूर्वी झालेला पुरुष यौवन दशेस प्राप्त झाला असतां रेतःसेक करणारा होतो. [–अनुशयिजीवाच्या स्वभावाच्या आलोचनानें.हि त्याच अर्थाचें समर्थन करितात–]=' **कथं इव०** '–तेव्हां त्या पुरुषाकडून खाल्या जाणाऱ्या अन्नांत अनुगत होणारा अनुशयी अनुपचरित–मुख्य तद्भावास कसा बरें प्राप्त होईल ? [–याप्रमाणें मुख्य तद्भावाचा अयोग–असंभव झाला असतां ' तत्र० ' इत्यादि भाष्यानें फलित सांगतात–]=' **तत्र** '–याप्रमाणें मुख्य रेतःसिग्भावाचा असंभव झाला असतां रेतःसिग्योग–तरुण पुरुषसंयोग हाच रेतःसिग्भाव आहे,असें अवश्य मानावें लागतें.[–"तथापि त्या वरून व्रीह्यादिभावाचें काय झालें ? " ' **तद्वद्०** ' इत्यादि भाष्यानें उत्तर–]=त्याचप्रमाणें व्रीह्यादिभावहि व्रीह्यादियोग–व्रीह्यादिकांशीं संयोगच आहे. [–तसें न मानिल्यास उपक्रम व उपसंहार यांमध्यें विरोध येईल.त्याच्या परिहारासाठीं उपसंहाराप्रमाणें उपक्रमाचा निर्णय करावा, असें सांगतात–]='**इति**'–असा निर्णय केल्यानें'**अविरोधः**'–उपक्रम व उपसंहार यांच्यामध्यें अविरोध होतो–त्यांच्यामध्यें विरोध येत नाहीं.२६.[–तर मग सर्वच ठिकाणीं अनुशयींचा नुस्ता संसर्ग होतो. त्यामुळें ' ब्राह्मणयोनिं वा' इत्यादि श्रुतिहि उपचरितार्थ–गौणार्थ आहे, अशी आशंका घेऊन'**योनेः शरीरं**'हें सूत्र केलें आहे—]

## सूत्रं—योनेः शरीरम् ॥ २७ ॥ ( ६ )

**सूत्रार्थ**—' योनीपासून शरीर होतें. ' ( योनींत रेतःसेक केला असतां त्यापासून सुख-दुःखोपभोगास योग्य असें अनुशयींचें कर्मार्जित शरीर उत्पन्न होतें ) २७. ( ६ ) सु. ब्र. २६९ [–' **अथ०**' इत्यादि भाष्यानें सूत्राचें व्याख्यान करितात—]

**भाष्यं—अथ रेतःसिग्भावस्यानंतरं योनौ निषिक्ते रेतसि योनेरधि शरीरमनुशयिनां अनुशयफलोपभोगाय जायत इत्याह शास्त्रम्–' तद्य इह रमणीयचरणाः ' इत्यादि । तस्मादप्यवगम्यते नावरोहे व्रीह्यादिभावावसरे तच्छरीरमेव सुखदुःखान्वितं भवतीति । तस्माद्व्रीह्यादिसंश्लेषमात्रं अनुशयिनां तज्जन्मेति सिद्धम् ॥ २७ ॥**

इति शारीरकमीमांसाभाष्ये तृतीयाध्यायस्य प्रथमः पादः ॥

**भाष्यार्थ**—' **अथ** '–रेतःसिग्भावाच्या अनंतर–रेतःसेक करण्यास योग्य अशा तरुण पुरुषाशीं अनुशयींचा अन्नाच्या द्वारा संयोग झाल्यानंतर योनींत त्या रेताचा निषेक केला असतां अनुशयींचें शरीर अनुशयाच्या–अवशिष्ट कर्माच्या फलाचा भोग घेण्यासाठीं उत्पन्न होतें, असें " त्यांतील जे येथें रमणीयचरण असतात "–पृ.३४–इत्यादि शास्त्र सांगतें. [–त्यांच्या शरीरवत्त्वाचा–शरीरानें युक्त

होण्याचा विशिष्ट अवसर उपलब्ध होत असल्यामुळें व्रीह्यादिकांमध्यें अनुशयींना शरीरवत्त्व नाहीं. तसेंच सुखादियुक्तत्वहि नाहीं, असें फलित **'तस्मात्०'** इत्यादि भाष्यानें सांगतात–]=त्यावरूनहि अवरोहामध्यें व्रीह्यादिभावप्राप्तीच्या वेळीं सुख-दुःखांनीं युक्त असें त्यांचें शरीरच होत नाहीं, असें अवगत होतें. [–याप्रमाणें अनुशयींच्या व्रीह्यादिजन्माचें अमुख्यत्व सांगून–त्याच्या अमुख्यत्वाचें उपपादन करून **' तस्मात् व्रीह्यादि० '** इत्यादि भाष्यानें अधिकरणार्थाचा उपसंहार करि-तात–]=तस्मात् व्रीह्यादिकांशीं केवळ संश्लेष–संयोग होणें, हेंच अनुशयींचें व्रीह्यादिजन्म आहे, [ तस्मात् याप्रमाणें इष्टादिकारी व अनिष्टादिकारी यांची आरोह-अवरोहरूप गति सिद्ध झाली असतां त्यापासून होणारें वैराग्य हें अधिका-ऱ्याच्या विशेषणत्वानें वाक्यार्थज्ञानाचें साधन येथें दृढ केलें आहे, असा या पादार्थाचा उपसंहार–]=**' इति सिद्धं '**–असें या पादांत सिद्ध झालें. २७. [ सु. ब्र. २६९-७०. ] ( ६ )

इति श्रीशंकराचार्यभक्त विष्णुशर्मकृत, तिसऱ्या अध्यायाचा प्रथम पाद समाप्त झाला.

श्रीकृष्णार्पणमस्तु

॥ ॐ तत्सत् ॥

# साधनाख्यतृतीयाध्याये द्वितीयः पादः ।

(१. संध्याधिकरण. १-६)

—संसारगतीच्या निरूपणानें ज्याचें वैराग्य दृढ केलें आहे अशा अधिकारी पुरुषाला वाक्यार्थज्ञान व्हावें, म्हणून तत्पदार्थ व त्वंपदार्थ यांचें शोधन करण्यासाठीं या पादाचा आरंभ करणारे सूत्रकार 'त्वं-'पदार्थाची—जीवाची जाग्रदवस्था संसाराच्या निरूपणानेंच निरूपित झाली आहे—संसाराच्या निरूपणानेंच तिचें निरूपण झालें आहे, असें मानून त्याच्या स्वयंज्योतिष्ट्वाची सिद्धि होण्यासाठीं स्वप्नदशा सांगण्याच्या उद्देशानें 'संध्ये सृष्टिः०' इत्यादि सूत्रानें पूर्वपक्ष करितात—

**सूत्रं—संध्ये सृष्टिराह हि ॥ १**

**सूत्रार्थ**—'संध्ये'—जाग्रत व सुषुप्ति यांच्या संधीमध्यें होणारी 'सृष्टिः'—स्वप्नसृष्टि व्यावहारिकच आहे. 'हि'—कारण 'आह'—'न तत्र रथाः०' इत्यादि श्रुति तसें सांगते. १.—सु. ब्र. पृ. २७१. [—'**अतिक्रान्ते०**' इत्यादि भाष्यानें गतार्थाचा अनुवाद करून पादसंगति सांगतात—]

**भाष्यं—अतिक्रान्ते पादे पंचाग्निविद्यामुदाहृत्य जीवस्य संसारगतिप्रभेदः प्रपंचितः । इदानीं तु तस्यैवावस्थाभेदः प्रपंच्यते । इदमामनन्ति—'स यत्र प्रस्वपिति' इत्युपक्रम्य 'न तत्र रथा न रथयोगा न पंथानो भवन्त्यथ रथान्रथयोगान्पथः सृजते' इत्यादि । तत्र संशयः—किं प्रबोध इव स्वप्नेऽपि पारमार्थिकी सृष्टिः । आहोस्विन्मायामयीति ॥**

**भाष्यार्थ**—अतिक्रान्त—पूर्वी होऊन गेलेल्या पादांत पंचाग्निविद्येचें उदाहरण देऊन जीवाच्या संसारगतिप्रभेदाचा विस्तार केला. पण आतां त्याच्याच अवस्थाभेदांचा विस्तार केला जातो. [संसाराला पुनः पुनः आरोह-अवरोहरूपत्व असल्यामुळें त्यांत स्वास्थ्य नाहीं, असा निश्चय झाला असतां त्यापासून विरक्त झालेल्या पुरुषाला वाक्यार्थज्ञान होण्यासाठीं पदार्थज्ञानाच्या शोधनार्थ दुसरा पाद आरंभिला जातो. त्यांतहि 'त्वं-'अर्थ जो जीव त्याला उद्देश्यत्व आहे. त्यामुळें 'न स्थानतोऽपि'—सू. ११.—या सूत्राच्या पूर्वीच्या ग्रंथानें त्याच्या अवस्थाराहित्याचें प्रतिपादन करण्यासाठीं यत्न केला जातो. तेथून पुढें या पादाच्या समाप्तीपर्यंत

तत्पदार्थाचें विवेचन केलें जातें. त्यांतहि आरंभीं जीवाचें स्वयंज्योतिष्ट्व स्पष्ट करण्यासाठीं अगोदर स्वप्नदशा निश्चित केली जाते, असा भावार्थ.–आरंभणाधिकरणांत–अ. २ पृ. ७७–स्वप्नाचें मायामयत्व सिद्ध असल्यासारखेंच मानून जाग्रदवस्थेचें मायामयत्व निरूपिलें. आतां तेंच स्वप्नाचें मायामयत्व प्रकट करण्यासाठीं **'इदं आमनन्ति०'** इत्यादि भाष्यानें तद्विषयवाक्याचें उदाहरण देतात–]=वाजसनेयिशाखाध्यायी असें आमनन करितात–असें पढतात–" तो जेव्हां गाढ झोंपीं जातो–निजतो " असा उपक्रम करून " तेथें–त्या अवस्थेंत रथ नाहींत, घोडे नाहींत व मार्ग नाहींत. पण तो रथ, अश्वादिक व मार्ग निर्माणकरितो." बृ.४.३. ९-१० सु. उ. ६७१-७२–इत्यादि आमनन–कथन करितात. [–त्या वाक्यांत स्वप्नांतील सृष्टीला उद्देशून रथादिसृष्टीचें कथन केलेलें असल्यामुळें व रथादिकांच्या अभावाचें कथन केलेलें असल्यामुळें **'तत्र०'** इत्यादि भाष्यानें संशय–]=त्याविषयीं 'प्रबोधांत–जागरावस्थेंत जशी, तशीच स्वप्नांतहि पारमार्थिकी–खरी सृष्टि आहे कीं मायामयी ' असा संशय येतो. [ पारमार्थिक म्ह० अर्थक्रिया–व्यावहारिक कार्य करण्यास समर्थ, अशा आशयानें 'प्रबोधांत जशी' असें म्हटलें आहे. नाहींतर जागरावस्थेंतहि वास्तविक–पारमार्थिक सृष्टि अनिष्ट असल्यामुळें साध्यशून्यत्व हा दोष येतो.मायामयत्व म्ह०केवल प्रातीतिकसत्तायुक्तत्व.या अधिकरणांत 'त्वं-'अर्थाच्या स्वप्नदशेच्या निरूपणानें त्या अवस्थेपासून निष्कृष्ट–पृथक् केलेल्या स्वयंज्योतिःस्वरूप जीवाला शुद्धत्व आहे, त्यामुळें त्याचा वाक्याशीं संबंध होतो. म्हणून त्याला वाक्यार्थहेतुत्व आहे, असें प्रतिपादन केलेलें असल्यामुळें याच्या पादादिसंगति आहेत. पूर्वपक्षांत ' स्वप्नाला सत्यत्व असल्यामुळें त्यापासून जीवाचा निष्कर्ष–विवेक संभवत नाहीं. म्हणून अशुद्ध व अस्वयंज्योति अशा त्याच्या वाक्यार्थसंबंधाची सिद्धि होत नाहीं, ' व सिद्धान्तांत ' स्वप्नाला मिथ्यात्व असल्यामुळें त्यापासून निष्कृष्ट–विविक्त केलेल्या त्याला स्वयंज्योतिष्ट्व आहे. त्यामुळें त्याच्या वाक्यार्थसंबंधानें त्याला वाक्यार्थज्ञानहेतुत्व आहे ' असा फलभेद मानून–**'तत्र तावत्०'** इत्यादि भाष्यानें पूर्वपक्षाचें ग्रहण करितात—]

**भाष्यं—तत्र तावत्प्रतिपद्यते–संध्ये तथ्यरूपा सृष्टिरिति । संध्यमिति स्वप्नस्थानमाचष्टे । वेदे प्रयोगदर्शनात् ' संध्यं तृतीयं स्वप्नस्थानम् ' इति । द्वयोर्लोकस्थानयोः प्रबोधसंप्रसादस्थानयोर्वा संधौ भवतीति संध्यम् । तस्मिन्संध्ये स्थाने तथ्यरूपैव सृष्टिर्भवितुमर्हति । कुतः । यतः प्रमाणभूता श्रुतिरेवमाह ' अथ रथान्रथयोगान्पथः सृजते ' इत्यादि । ' स हि कर्ता ' इति चोपसंहारादेवमेवावगम्यते ॥ १ ॥**

**भाष्यार्थ**—तसा संशय आला असतां प्रथम पूर्ववादी 'स्वप्नांत तथ्यरूप-सत्य सृष्टि आहे, असें समजतो,' अशी प्रतिज्ञा-[-आपल्या प्रतिज्ञेचेंच विवरण करणारा तो '**संध्यं०**' इत्यादि भाष्यानें प्रथम 'संध्य' या शब्दाचा अर्थ सांगतो-]='संध्यं' या शब्दानें श्रुति स्वप्नस्थान सांगते. [-याविषयीं '**वेदे०**' इत्यादि भाष्यानें प्रमाण-]=कारण वेदांत "संध्य हें तिसरें स्वप्नस्थान आहे"-बृ. ४. ३. ९. सु. उ. ६७१-असा प्रयोग उपलब्ध होतो. [-"पण प्रथमप्रयोगाच्या अभावीं वैदिक प्रयोगाची सिद्धि कशी होते?" अशी आशंका घेऊन 'यौगिकत्वामुळें त्याला प्रथम प्रयोगाची अपेक्षा नाहीं,' असें '**द्वयोः०**' इत्यादि भाष्यानें सांगतो-]=इह व पर या दोन लोकस्थानांच्या किंवा जागरित व संप्रसाद-सुषुप्ति या दोन स्थानांच्या संधींत होतें म्हणून संध्य. [ऐहिक जें ऐंद्रियक-इंद्रियजन्य रूपादिज्ञान त्याच्या अभावामुळें व पारलौकिक विषयज्ञानाच्या अनुदयामुळें स्वप्नस्थान हें त्यांचें संध्यस्थान सांगितलें आहे. किंवा स्थूलदर्शनाच्या अभावामुळें व त्यांत वासनामय ज्ञानाचा भाव असल्यामुळें प्रबोध व संप्रसाद यांचें संध्य स्वप्नस्थान आहे, असा त्याचा विभाग जाणावा.-याप्रमाणें 'संध्य' या पदाचा अर्थ सांगून वादी '**तस्मिन्०**' इत्यादि भाष्यानें आपली प्रतिज्ञा पूर्ण करितो-]=त्या संध्यस्थानामध्यें तथ्यरूपच सृष्टि असणें युक्त आहे. [-'पण स्वप्नसृष्टीला तथ्यरूपत्व-सत्यत्व नाहीं. कारण त्याविषयीं कांहीं प्रमाण नाहीं' अशा आशयानें आक्षेप-]='**कुतः**'-कोणत्या कारणानें स्वप्नसृष्टि सत्यच आहे, असें तुम्हीं म्हणतां? [वादी श्रुतिप्रमाण दाखवून आक्षेपाचें उत्तर सांगतो-]='**यतः०**'-कारण '**अथ०**'-"बाह्य रथादिकांचा अभाव असला तरी जीव रथ, घोडे व मार्ग यांस उत्पन्न करितो"-पृ. ८७-इत्यादि प्रमाणभूत श्रुति असें सांगते. [केवल सृष्टिश्रुतीमुळेंच स्वप्नसृष्टीला सत्यत्व नाहीं तर सकर्तृकत्वामुळेंहि तिला सत्यत्व आहे, त्यामुळें जागरित सृष्टीप्रमाणें अर्थक्रियासामर्थ्य हें सत्यत्व मानावें, असें '**स हि०**' इत्यादि भाष्यानें वादी सांगतो-]="आणि तोच कर्ता आहे"-सु. उ. ६७२.-असा उपसंहार केलेला असल्यामुळें असेंच अवगत होतें.१. [-शिवाय 'विमत-रथादिक सत्य आहेत. कारण त्यांना निर्मितत्व आहे. जाग्रतींत निर्मिलेल्या रथादिकांप्रमाणें' असें अनुमान वादी '**निर्मातारं०**' इत्यादि सूत्रानें सांगतो—]

१ **रत्नप्रभा**—मुमूर्षूच्या सर्व इंद्रियांचा उपसंहार झाल्यामुळें या लोकाचा अनुभव येत नाहीं. पण केवल वासनेनें या लोकाला स्मरणाऱ्या त्याच्या हृदयांत कर्मबलानें मनानें पारलौकिकस्फूर्तिरूप स्वप्न होतें. तें दोन लोकांच्या संधींत होत असल्या-

## सूत्रं—निर्मातारं चैके पुत्रादयश्च ॥ २

**सूत्रार्थ**—' च एके '-शिवाय एका-कठ शाखेचे लोक आत्म्याला कामांचा ' निर्माता ' सांगतात. त्या श्रुतींतील 'काम-'शब्दानें 'पुत्रादिक' विवक्षित आहेत. [ सूत्रांतील ' पुत्रादय: ' या पदानें त्या निर्मित कामांनाच विशेषणयुक्त केलें आहे.-भाष्यकार ' अपि च० ' इत्यादि भाष्यानें ' निर्मातरं च ' इत्यादि पूर्वपक्ष सूत्राचें व्याख्यान करितात—]

**भाष्यं—अपि चैके शाखिनोऽस्मिन्नेव संध्ये स्थाने कामानां निर्मातारमात्मानमामनन्ति—'य एष सुप्तेषु जागर्ति कामं कामं पुरुषो निर्मिमाणः' इति । पुत्रादयश्च तत्र कामा अभिप्रेयन्ते काम्यन्त इति ॥**

**भाष्यार्थ**—आणि तसेंच, एका शाखेचे लोक याच संध्य स्थानांत आत्म्याला " जो हा पुरुष प्राणादि निजले असतां निरनिराळ्या इष्ट कामांना निर्माण करणारा असा होत्साता जागतो "-का. २. २. ८. सु. उ. ७१.-असा कामांचा निर्माता-उत्पन्न करणारा म्हणून पढतात. [ सर्व प्राणाख्य इंद्रियें निजलीं असतां —व्यापारशून्य झालीं असतां, असा भावार्थ. ' तो तूं विचारलेला आत्मा आहे ' असा त्या श्रुतिवाक्याचा शेष-अविशिष्ट भाग आहे.-वादी 'पुत्रादयः०' इत्यादि भाष्यानें कामशब्दाचा यौगिक अर्थ सांगतो-]=' काम्यन्ते इति कामाः '-ज्यांची कामना-इच्छा केली जाते ते काम, अशा योगानें-व्युत्पत्तीनें त्या श्रुतिवचनांत ' पुत्रादिक ' हे काम अभिप्रेत-अभीष्ट आहेत. [-' रूढि योगाचा अपहार करिते ' या न्यायानें ' ननु० ' इत्यादि भाष्यानें शंका—]

**भाष्यं—ननु कामशब्देन इच्छाविशेषा एवोच्येरन् । न । ' शतायुषः पुत्रपौत्रान्वृणीष्व ' इति प्रकृत्यान्ते ' कामानां त्वा कामभाजं करोमि ' इति प्रकृतेषु तत्र तत्र पुत्रादिषु कामशब्दस्य प्रयुक्तत्वात् ॥**

---

मुळें संध्य होय. तसें सांगणारी ' त्या संध्यास्थानामध्यें राहणारा तो हें स्थान व परलोकस्थान अशीं दोन्हीं स्थानें पाहतो. '-सु. उ. ६७१-अशी तेथेंच श्रुति आहे. पण हें स्वप्न कादाचित्क-केव्हां केव्हां होणारें आहे, अशा अरुचीनें नित्य स्वप्नाचें प्रबोध-संप्रसादसंधीमध्यें होणें सांगितलें आहे. पण अन्य म्ह० दुसरे व्याख्यानकार-अर्थात् आनंदज्ञान व वाचस्पतिमिश्र "मर्त्य चक्षुरादिकांनीं अजन्यरूपादिसाक्षात्कारवत्त्व हें परलोकाचें लक्षण व दैवचक्षुरादिकांनीं अजन्यरूपादिसाक्षात्कारवत्त्व हें मर्त्यलोकाचें लक्षण आहे, असें लक्षणतः लोकद्वयस्पर्शित्व असल्यामुळें नित्यस्वप्नालाच लोकद्वयसंध्यत्व आहे. दोन ग्रामांना स्पर्श करणाऱ्या मार्गाला जसें ग्रामद्वयसंध्यत्व असतें त्याप्रमाणें " असें व्याख्यान करितात.

**भाष्यार्थ**--अहोपण, 'काम' या शब्दानें इच्छाविशेषच-इच्छेचे भेदच सांगितले जातात. [-'प्रकरणविरोधामुळें येथें रूढि मानितां येत नाहीं,' असें वादी 'न०' इत्यादि भाष्यानें म्हणतो-]=येथें 'काम-'शब्दानें इच्छाविशेष मानितां येत नाहींत. कारण "शत वर्षे ज्यांचें आयुष्य आहे, अशा पुत्र-पौत्रांना मागून घे."-का. १. १. २३. सु. उ. ३८.-असा उपक्रम करून शेवटीं "मी तुला कामांचें कामभाजन करितों"-सु.उ.३८.-असा तेथे तेथें प्रकृत पुत्रादिविषयांमध्यें 'काम-'शब्दाचा प्रयोग केलेला आहे, त्यामुळे येथें 'काम-'शब्दानें इच्छाविशेष घेतां येत नाहींत. ['तत्र' म्ह० 'जो हा पुरुष०' इत्यादि जेथें श्रुत आहे त्याच प्रकरणांत, असा भावार्थ.-'स्वप्नसृष्टीला परमात्मकर्तृकत्व असल्यामुळेंहि ती सत्यच आहे. उभयवादिसंमत जागरितसृष्टीप्रमाणें' असें अनुमान वादी 'प्राज्ञं च०' इत्यादि भाष्यानें सांगतो-]

**भाष्यं**—**प्राज्ञं चैनं निर्मातारं प्रकरणवाक्यशेषाभ्यां प्रतीमः। प्राज्ञस्य हीदं प्रकरणं-'अन्यत्र धर्मादन्यत्राधर्मात्' इत्यादि। तद्विषय एव च वाक्यशेषोऽपि 'तदेव शुक्रं तद्ब्रह्म तदेवामृतमुच्यते। तस्मिँल्लोकाः श्रिताः सर्वे तदु नात्येति कश्चन' इति॥**

**भाष्यार्थ**—आणि प्रकरण व वाक्यशेष यांवरून आम्ही हा निर्माता-निर्माणकर्ता प्राज्ञ-परमात्मा आहे, असें मानितों, असें आम्हांला प्रतीत होते.[-**'प्राज्ञस्य०'** इत्यादि भाष्यानें वादी परमात्म्याचें प्रकरण प्रकट करितो-]=कारण 'धर्माहून अन्य, अधर्माहून अन्य'-का. १. २. १४. सु. उ. ४६-इत्यादि हें प्राज्ञाचें प्रकरण आहे. [-**तद्विषय०**' इत्यादि भाष्यानें परमात्मविषय वाक्यशेषहि प्रकट करितो-]=वाक्यशेषहि-उपसंहारहि "तेंच शुद्ध, ते ब्रह्म व तेंच अमृत म्हटलें जातें. त्याच्यामध्यें सर्व लोक श्रित-आश्रित आहेत, त्याचें उल्लंघन कोणी करीत नाहीं"-सु.उ. ७१-असा प्राज्ञविषयच आहे.[-'वादी '**प्राज्ञकर्तृका०**' इत्यादि भाष्यानें पूर्वोक्त अनुमानांतील दृष्टान्ताच्या साध्यशून्यतेचें निरसन करितो—]

**भाष्यं**—**प्राज्ञकर्तृका च सृष्टिः तथ्यरूपा समधिगता जागरिताश्रया, तथा स्वप्नाश्रयापि सृष्टिर्भवितुमर्हति। तथा च श्रुतिः-'अथो खल्वाहुर्जागरितदेश एवास्यैष इति। यानि ह्येव जाग्रत्पश्यति तानि सुप्तः' इति स्वप्नजागरितयोः समानन्यायतां श्रावयति। तस्मात्तथ्यरूपैव संध्ये सृष्टिरिति॥२॥ एवं प्राप्ते प्रत्याह-**

**भाष्यार्थ**—आणि जागरिताचा आश्रय केलेली प्राज्ञकर्तृक-प्राज्ञ-परमात्मा जिचा कर्ता आहे, अशी सृष्टि तथ्यरूप-सत्य आहे, असें ज्ञात झालेलें आहे.[-हेतूच्या असि-

द्धीची आशंका घेऊन कांहीं ठिकाणीं सृष्टीचें जीवकर्तृकत्व जरी श्रुत असलें तरी जीवाच्या प्राज्ञ-अभेदासाठीं ब्रह्मालाच जीवत्व असल्यामुळें जीवकर्तृक सृष्टीलाहि प्राज्ञकर्तृकत्वच आहे, असें मानून वादी 'तथा०' इत्यादि भाष्यानें दार्ष्टान्तिक सांगतो–]=तशीच स्वप्नाश्रय सृष्टिहि प्राज्ञकर्तृक असणें युक्त आहे.[–स्वप्न व जागरित यांचें तुल्यदेशत्वश्रवण असल्यामुळेंहि स्वप्नाला सत्यत्व आहे, असें 'तथा च श्रुतिः०' इत्यादि भाष्यानें सांगतो–]="पण खरोखर कित्येक म्हणतात–या आत्म्याचें हें स्वप्न जागरितदेशींच होतें." ही श्रुति त्यांचें समानदेशत्व सांगते. [–स्वप्न व जाग्रत् यांतील ज्ञानांचें एकविषयत्व श्रुत असल्यामुळेंहि स्वप्नाला सत्यत्व आहे, असें 'यानि एव०' इत्यादि त्याच्याच पुढील वाक्यानें सांगतो–]="तो जें पदार्थजात जाग्रद्दशेंत पाहतो तेंच तो निजल्यावर पाहतो"–बृ. ४. ३. १४. सु. उ. ६७४–ही श्रुति तसें त्यांचें समानविषयत्व सांगते. [–वादी उक्त श्रुतीचें तात्पर्य 'स्वप्न-जागरितयोः०' इत्यादि भाष्यानें सांगतो–]=ही उक्त श्रुति स्वप्न व जागरित यांची समानन्यायता एकविते–त्या दोन्ही अवस्थांना समानन्याय लागू आहे, असें सांगते. [–'सृष्टीला बाध्यत्व असल्यामुळें मिथ्यात्व आहे.' अशी आशंका घेऊन 'जागरितसृष्टीला श्रुतीनें बाध्यत्व जरी असलें तरी तत्त्वसाक्षात्कार होण्यापूर्वी त्या सृष्टीची अनुवृत्ति होत असल्यामुळें तिला जसें सत्यत्व आहे तसेंच स्वप्नालाहि सत्यत्व आहे,' असें वादी 'तस्मात्०' इत्यादि भाष्यानें सांगतो–]=म्हणून स्वप्नांतील सृष्टि तथ्यरूपच–सत्यच आहे 'इति'–याप्रमाणें स्वप्नसृष्टीला सत्यत्व आहे, असें झालें असतां तद्विशिष्ट आत्म्याला अशुद्धीमुळें वाक्यार्थ-अन्वयित्व नाहीं. २ [–'एवं०' इत्यादि भाष्यानें पूर्वपक्षाचा अनुवाद करून सिद्धान्ताला सूत्रित करितात–]=असा पूर्वपक्ष प्राप्त झाला असतां सूत्रकार 'मायामात्रं तु०' इत्यादि सूत्रानें सिद्धान्त सांगतात––

**सूत्रं––मायामात्रं तु कात्स्न्र्येनानभिव्यक्तस्वरूपत्वात् ॥ ३**

**सूत्रार्थ**––'तु'–पण 'मायामात्रं'–स्वप्नसृष्टि शुक्तिरजताप्रमाणें मायामात्र–मिथ्या आहे. 'कात्स्न्र्येन अनभिव्यक्तस्वरूपत्वात्'–कारण स्वप्नाचें स्वरूप योग्य देश-काल-अबाध इत्यादि परमार्थवस्तूच्या धर्मांनीं पूर्णपणें अभिव्यक्त झालेलें नसतें. ३. [–'तु-शब्दः०' इत्यादि भाष्यानें अक्षरव्याख्या आरंभितात––]

**भाष्यं––तु-शब्दः पक्षं व्यावर्तयति। नैतदस्ति–यदुक्तं संध्ये सृष्टिः पारमार्थिकीति। मायैव संध्ये सृष्टिर्न परमार्थगंधोऽप्यस्ति। कुतः। कात्स्न्र्येनानभिव्यक्तस्वरूपत्वात्। न हि कात्स्न्र्येन परमार्थवस्तुधर्मेण अभिव्यक्तस्वरूपः स्वप्नः। किं पुनरत्र कात्स्न्र्यमभिप्रेतं देशकालनिमित्तसंपत्तिरबाधश्च॥**

**भाष्यार्थ**—सूत्रांतील 'तु-'शब्द पक्षाची व्यावृत्ति करितो. [–'**नैतत्**०' इत्यादि भाष्यानें पक्षव्यावृत्तिच व्यावर्त्य पक्षाच्या अनुवादानें व्यक्त करितात–]=स्वप्नांतील सृष्टि पारमार्थिकी आहे, असें जें सांगितलें आहे तें तसें नाहीं. [–पूर्वपक्षाच्या निषेधाची प्रतिज्ञा करून '**माया एव**०' इत्यादि भाष्यानें उत्तरपक्षाची प्रतिज्ञा करितात–]=स्वप्नांतील सृष्टि ही मायाच आहे. तिच्यामध्यें परमार्थाचा गंधहि–लेशहि नाहीं. [ माया व अविद्या यांचा भेद नाहीं, हें सांगण्यासाठीं सूत्र व भाष्य यांमध्यें 'माया-'शब्द आहे. सूत्रांतील 'मात्र-'शब्दानें सद्रूप प्रमात्यामध्ये बाध्यत्व या नांवाचें भ्रांतिसिद्धत्व हेच स्वप्नाचें जाग्रद्वैलक्षण्य विवक्षित आहे. पण श्रुति व युक्ति यांनीं स्वप्नसृष्टीचें सत्यत्व सांगितलेलें असल्यामुळें ही प्रतिज्ञा संभवत नाहीं, अशी शंका–] =' **कुत:** '–कोणत्या कारणानें स्वप्नसृष्टीला मायाच म्हणतां? [ श्रुति व युक्ति यांचें अन्यथासिद्धत्व पुढें सांगावयाचें आहे, अशा आशयानें सूत्रोक्त हेतूला अवतरण देऊन त्याचें व्याख्यान करितात–]=' **कार्त्स्न्येन**० '–पूर्णपणें अनभिव्यक्त-स्वरूपत्वामुळें.'**न हि**०'–स्वप्न सर्व परमार्थवस्तूच्या धर्मानें अभिव्यक्तस्वरूप नाहीं, हें प्रसिद्ध आहे. त्यामुळें तें मायाच आहे. [योग्य देश, काल व निमित्त, यांचें साहित्य- सहभाव हा परमार्थवस्तूचा धर्म आहे. वस्तुत्व कार्त्स्न्यानें व्याप्त असल्यामुळें कार्त्स्न्यानें व्यक्तीच्या अभावीं तद्व्याप्य–त्याचें व्याप्य वस्तुत्वहि व्यावृत्त–निवृत्त होतें, असा भावार्थ.–एकाचीहि सर्वरूपानें अनभिव्यक्ति झाल्यामुळें सर्वत्र वस्तुत्वाची व्यावृत्ति होते,असा आक्षेप वादी'**किं पुनः**०'इत्यादि भाष्यानें घेतो–]=पण येथें कार्त्स्न्य कोणतें अभिप्रेत आहे ? [–अतिप्रसंगाचें प्रत्याख्यान करण्यासाठीं इष्ट असलेल्या कार्त्स्न्याचें व्याख्यान करितात–]=देश, काल व निमित्त यांची संपत्ति व अबाध हें कार्त्स्न्य येथें विवक्षित आहे. [–" पण स्वप्नांत त्या सर्वांची सिद्धि आहे " अशी आशंका घेऊन ' **न हि**० ' इत्यादि भाष्यानें म्हणतात––

**भाष्यं—न हि परमार्थवस्तुविषयाणि देशकालनिमित्तान्यबाधश्च स्वप्ने संभाव्यन्ते । न तावत्स्वप्ने रथादीनामुचितो देशः संभवति । न हि संवृते देहदेशे रथादयोऽवकाशं लभेरन् ॥**

**भाष्यार्थ**—स्वप्नामध्यें परमार्थवस्तुविषय देश, काल, निमित्त व अबाध हीं संभवत नाहींत, हें प्रसिद्ध आहे. [–त्यांपैकीं स्वप्नांतील योग्यदेशाचा असंभव ' **न तावत्**० ' इत्यादि भाष्यानें विशद करितात–]=स्वप्नांत अगोदर त्यांतील रथादिकांचा उचित देश संभवत नाहीं, [–" जेथें स्वप्न दिसतें तोच रथादिकांचा उचित देश आहे " अशी आशंका घेऊन ' तो देश देहाच्या आंत आहे कीं

बाहेर' असा विकल्प करून त्यांतील पहिल्या पक्षाचें निरसन '**न हि०**' इत्यादि भाष्यानें करितात–]=कारण अतिशय संकुचित देहदेशांत रथादिकांना अवकाश मिळणार नाहीं. [–'**स्यादेतत्०**' इत्यादि भाष्यानें दुसऱ्या पक्षाची शंका––]

भाष्यं –**स्यादेतत् । बहिर्देहात्स्वप्नं द्रक्ष्यति देशान्तरितद्रव्यग्रहणात् । दर्शयति च श्रुतिर्बहिर्देहात्स्वप्नम्—' बहिष्कुलायादमृतश्चरित्वा स ईयतेऽमृतो यत्र कामम् ' इति । स्थितिगतिप्रत्ययभेदश्च नानिष्क्रान्ते जंतौ सामंजस्यमश्नुवीतेति ।।**

**भाष्यार्थ**––यावर वादी असें म्हणेल देहाच्या बाहेर स्वप्नद्रष्टा स्वप्न पाहील, [–'**देशान्तरित०**' इत्यादि भाष्यानें उपपत्ति–]=कारण देशान्तरित–देहाच्या बाहेरील द्रव्याचें ग्रहण करीत असल्यामुळें तो देहाच्या बाहेर स्वप्न पाहील.[–**दर्शयति च०**' इत्यादि भाष्यानें त्याविषयीं वादी श्रुति दाखवितो–]=आणि " स्वतः अमरणधर्मवान् असलेला तो शरीराच्या बाहेर फिरून, तो अमृत जेथें काम असतो तेथें तेथें जातो "–बृ. ४. ३. १२. सु. उ. ६७३–अशी ही श्रुति देहाच्या बाहेर स्वप्न दाखविते. [–देहाच्या बाहेरच स्वप्नज्ञान होतें, याविषयीं '**स्थितिगति०**' इत्यादि भाष्यानें युक्त्यन्तर सांगतो–]=स्थिति, गति व प्रत्यय यांचा भेद जीव शरीरांतून बाहेर पडलेला नसल्यास उपपन्न होत नाहीं. तो समंजसपणास पात्र होत नाहीं, '**इति**'–असें यावर वादी म्हणेल. [–पण आचार्य '**नेत्युच्यते०**' इत्यादि भाष्यानें स्वप्न देहाच्या आंतच होतें, बाहेर नाहीं, असें सांगतात—]

भाष्यं—**नेत्युच्यते । न हि सुप्तस्य जंतोः क्षणमात्रेण योजनशतान्तरितं देशं पर्येतुं विपर्येतुं च ततः सामर्थ्यं संभाव्यते । क्वचिच्च प्रत्यागमनवर्जितं स्वप्नं श्रावयति कुरुष्वहमद्य शयानो निद्रयाऽभिप्लुतः स्वप्ने पंचालानभिगतश्चास्मिन्प्रतिबुद्धश्चेति । देहाच्चेदपेयात्पंचालेषु प्रतिबुध्येत तानसावभिगत इति । कुरुष्वेव तु प्रतिबुध्यते ।।**

**भाष्यार्थ**—याचें 'नाहीं'–स्वप्न देहाच्या बाहेर होत नाहीं, असें सांगितलें जातें. कारण निजलेल्या प्राण्याचें एका क्षणांत योजनशतान्तरित–शत–अनेक योजनें दूर असलेल्या देशास जाऊन पोंचण्यास व तेथून परत येण्यास सामर्थ्य असतें, हें संभवनीय मानितां येत नाहीं. [ एक क्षणमात्र अवकाशांत दूर प्रदेशीं जाऊन पुनः परत येण्याचें सामर्थ्य स्वप्नद्रष्ट्यामध्यें असणें शक्य नाहीं–बाहेर गेलेल्याचें परत येणेंहि नियत असल्यामुळें तो जेथें गेला असेल तेथेंच जागा होण्याचा प्रसंग येत असल्यामुळेंहि स्वप्न देहाच्या बाहेर पहात नाहीं, असें '**क्वचित् च०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=आणि कांहीं प्रसंगीं स्वप्नद्रष्टा जागा झाल्या-

वर आपल्या जवळच्या लोकांस 'मी आज कुरुदेशांत निद्रेनें ग्रस्त होऊन शयन करीत असतांना स्वप्नांत पंचालदेशास गेलों व तेथेंच जागा झालों' असें प्रत्यागमनवर्जित स्वप्न ऐकवितो-सांगतो. [-'**देहाचेत्०**' इत्यादि भाष्यानें व्यतिरेकद्वारा उक्तार्थच विशद करितात-]=तो स्वप्नद्रष्टा देहांतून निघून जर गेला असता तर तो पंचालदेशांतच जागा झाला असता! कारण तो त्या देशास गेला होता. पण पंचालांत जागा न होतां तो कुरुदेशांत, शयन केलेल्या जागीच, जागा होतो.[-आणखी याहि कारणानें तो देहाच्या बहिर्देशीं जाऊन स्वप्न पहात नाहीं, असें '**येन चायं०**' इत्यादि भाष्यानें सांगतात--]

**भाष्यं**—**येन चायं देहेन देशान्तरमश्नुवानो मन्यते तमन्ये पार्श्वस्था: शयनदेश एव पश्यन्ति। यथाभूतानि चायं देशान्तराणि स्वप्ने पश्यति न तानि तथाभूतान्येव भवन्ति । परिधावंश्चेत्पश्येज्जाग्रद्वद्वस्तुभूतमर्थमाकलयेत् ॥**

**भाष्यार्थ**—आणि हा ज्या देहानें देशान्तरास मी प्राप्त झालों आहें, असें समजतो त्या देहाला त्याच्या जवळचे दुसरे लोक शयनप्रदेशींच पाहतात.[-देशान्तरीं गेलेल्या जीवाला स्वप्न दिसत नाहीं, याविषयींच आणखी हेतु-]='**यथाभूतानि०**' -आणि हा जशा प्रकारचीं देशान्तरें-दुसरे देश स्वप्नांत पाहतो तीं देशान्तरें तशा प्रकारचींच नसतात. [-याचेंच व्यतिरेकानें उपपादन-]='**परिधावन्०**'-तो देहांतून निघून दुसऱ्या देशीं जाऊन जर स्वप्न पहात असता तर जाग्रतीप्रमाणेंच वस्तुभूत-खऱ्या पदार्थालाच त्यानें पाहिलें असतें. जाग्रतींत पदार्थ जसा खरोखर असतो तसाच तो त्याला दिसला असता. त्यानें त्याचें खऱ्या रूपानेंच आकलन केलें असतें. [पण तसें होत नाहीं. म्हणून स्वप्नद्रष्टा स्वप्न शरीरांतच पाहतो आणि हें केवळ युक्तित:च सिद्ध होतें असें नाहीं तर श्रुतिहि तसेंच सांगते, असें '**दर्शयति च०**' इत्यादि भाष्यानें सांगतात—]

**भाष्यं**—**दर्शयति च श्रुतिरंतरेव देहे स्वप्नं-'स यत्रैतत्स्वप्न्यया चरति' इत्युपक्रम्य 'स्वे शरीरे यथाकामं परिवर्तते' इति । अतश्च श्रुत्युपपत्तिविरोधाद्बहिष्कुलायश्रुतिर्गौणी व्याख्यातव्या बहिरिव कुलायादमृतश्चरित्वेति । यो हि वसन्नपि शरीरे न तेन प्रयोजनं करोति स बहिरिव शरीराद्भवतीति । स्थितिगतिप्रत्ययभेदोऽप्येवं सति विप्रलंभ एवाभ्युपगंतव्य: ॥**

**भाष्यार्थ**—आणि "तो आत्मा ज्यावेळीं दर्शनरूप स्वप्नवृत्तीनें असतो" असा उपक्रम करून "आपल्या शरीरांत आपल्या वासनेप्रमाणें परिवर्तन-संचार करितो"-**बृ. २. १. १८. सु. उ. ५८९**-अशी ही श्रुति देहाच्या आंतच स्वप्न

दाखवितें. [श्रुतींतील 'एतत्' हें स्वप्नत्राचें क्रियाविशेषण आहे व 'स्वप्नया' या विशेषणानें वृत्ति विशेषित केली जाते म्ह० स्वप्नवृत्तीनें तो शरीरांत स्वप्नानें परिवर्तन करितो, असा भावार्थ.—" अहोपण, स्वप्न जर शरीरांतच होत असेल तर 'बहिष्कुलाय-'श्रुति–पृ. ९४–कशी आहे ?" 'अतश्च०' इत्यादि भाष्यानें उत्तर–]=आणि म्हणून श्रुति व उपपत्ति यांच्या विरोधामुळें 'बहिष्कुलाय-'श्रुति गौणी आहे, असें तिचें व्याख्यान करावें. 'जणुंकाय शरीराच्या बाहेरच तो अमृत आत्मा जाऊन' असें तिचें गौणवृत्तीनें व्याख्यान करावें. [–" पण शरीरांत रहात असलेल्या त्याच्याविषयीं 'जणुंकाय बाहेरच जाऊन' असें कथन कसें संभवतें ?" अशी आशंका घेऊन तशा उपचाराचें निमित्त 'यो हि०' इत्यादि भाष्यानें सांगतात–] =कारण जो शरीरांत रहात असूनहि त्या शरीरानें कांहीं प्रयोजन–कार्य करीत नाहीं तो जणुंकाय शरीरापासून बाहेरच–दूरच असल्यासारखा होतो, 'इति'–म्हणून–त्या निमित्तानें तसा उपचार करावा. [–आतां 'स्थिति-गति-प्रत्ययभेदाच्या सामंजस्यासाठीं स्वप्न बाहेरच होतें,' असें जें–पृ. ९४–म्हटलें आहे त्याचें निरसन–]='स्थितिगति०'–स्थिति, गति, प्रत्यय यांचा भेदहि 'एवं सति'–श्रुतियुक्तींनीं स्वप्न आंतच होतें, असें सिद्ध झालें असतां केवल विप्रलंभच–विभ्रमच आहे, असें मानावें. [–याप्रमाणें स्वप्नाच्या योग्य देशाचा असंभव सांगून 'कालविसंवादो०' इत्यादि भाष्यानें स्वप्नाच्या योग्य कालाचा असंभव स्पष्ट करितात–]

**भाष्यं—कालविसंवादोऽपि च स्वप्ने भवति रजन्यां सुप्तो वासरं भारते वर्षे मन्यते । तथा मुहूर्तमात्रवर्तिनि स्वप्ने कदाचिद्बहुवर्षपूगानतिवाहयति । निमित्तान्यपि च स्वप्ने न बुद्धये कर्मणे वोचितानि विद्यन्ते । करणोपसंहाराद्धि नास्य रथादिग्रहणाय चक्षुरादीनि सन्ति । रथादिनिर्वर्तनेऽपि कुतोऽस्य निमेषमात्रेण सामर्थ्यं दारूणि वा ॥**

**भाष्यार्थ—**आणि स्वप्नामध्यें कालविसंवादहि होतो. रात्रीं निजलेला–झोपीं गेलेला हा स्वप्नद्रष्टा भारतवर्षांत दिवस मानितो. [भारतवर्षांत जेव्हां रात्र असते तेव्हां केतुमालादि इतर वर्षांत दिवस असतो, म्हणून 'भारतवर्षांत दिवस मानितो' असें म्हटलें आहे.–'तथा०' इत्यादि भाष्यानें दुसऱ्या प्रकारें कालाचा विसंवाद सांगतात–]=त्याचप्रमाणें एक मुहूर्तभर असणाऱ्या स्वप्नांत हा स्वप्नद्रष्टा एखादे वेळीं अनेक वर्षांचा समूह घालवितो. ['एक क्षणभर पडलेल्या स्वप्नांत तो दीर्घकालाचा अनुभव घेतो' असा भावार्थ.–याप्रमाणें योग्यकालाचा असंभव दाखवून योग्य निमित्ताचा असंभव '**निमित्तान्यपि०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=

**आणि** स्वप्नांत त्या त्या ज्ञानाला किंवा कर्माला उचित, अशीं निमित्तेंहि असत नाहींत. [–**'करणोपसंहाराद्धि०'** इत्यादि भाष्यानें ज्ञानाच्या योग्य निमित्तांचा अभाव साधितात–]=कारण इंद्रियांच्या उपसंहारामुळें या स्वप्नद्रष्ट्याची रथादिकांच्या ग्रहणासाठीं–रथादिविषयांच्या ज्ञानासाठीं चक्षुरादि इंद्रियें नसतात. [–**'रथादि०'**इत्यादि भाष्यानें कर्मासाठीं योग्यनिमित्तांचा अभाव सांगतात–]=या स्वप्नद्रष्ट्याला एका निमेषमात्र कालांत रथादि निर्माण करण्याविषयींहि सामर्थ्य कोठून असणार? किंवा त्यावेळीं काष्ठें तरी कोठचीं! [–**'बाध्यन्ते०'** इत्यादि भाष्यानें अबाधाच्या असंभवाचें विवरण—]

**भाष्यं—बाध्यन्ते चैते रथादयः स्वप्नदृष्टाः प्रबोधे । स्वप्न एव चैते सुलभबाधा भवन्ति । आद्यंतयोर्व्यभिचारदर्शनात् । रथोऽयमिति हि कदाचित्स्वप्ने निर्धारितः क्षणेन मनुष्यः संपद्यते, मनुष्योऽयमिति निर्धारितः क्षणेन वृक्षः । स्पष्टं चाभावं रथादीनां स्वप्ने श्रावयति शास्त्रम्–' न तत्र रथा न रथयोगा न पंथानो भवन्ति ' इत्यादि । तस्मान्मायामात्रं स्वप्नदर्शनम् ॥ ३ ॥**

**भाष्यार्थ—**आणि हे स्वप्नांत पाहिलेले रथादिक जागृतींत बाधित होतात. [–ते केवळ प्रबोधांतच–जागे झाल्यावरच बाधित होतात, असें नाहीं, तर स्वप्नांतल्या **स्वप्नांत**हि बाधित होतात, असें **'स्वप्न एव०'** इत्यादि भाष्यानें सांगतात –]=आणि ते **स्वप्नांतच** सुलभबाध असतात, म्ह० स्वप्नांतच त्यांचा बाध सुलभ असतो. **'आद्यंतयोः०'**–कारण स्वप्नांचा आदि–आरंभ व अन्त यांमध्यें त्यांचा व्यभिचार झालेला **दिसतो.** [–" अहोपण, आदि व अंत यांतील व्यभिचारबुद्धि जागरांतहि समान **आहे,"** अशी आशंका घेऊन **' रथोऽयं०'** इत्यादि भाष्यानें त्यांतील विशेष सांगतात–]=एखादेवेळीं स्वप्नांत 'हा रथ आहे' असा ज्याचा निर्धार–निश्चय केला आहे **तो** क्षणांत मनुष्य होतो आणि ' हा मनुष्य ' असा निश्चित केलेला पदार्थ क्षणांत **वृक्ष** बनतो. [–स्वप्नांतील रथादिकांचें हे बाध्यत्व केवळ प्रत्यक्षच नाहीं तर तें **श्रुत**हि आहे, असें **' स्पष्टं च०'** इत्यादि भाष्यानें सांगतात–]=आणि " त्या **अवस्थेंत** रथ नाहींत, घोडे नाहींत व मार्ग नाहींत "–पृ.८७–इत्यादि **शास्त्र स्वप्नांतील** रथादिकांचा अभाव स्पष्टपणें श्रवण करवितें–त्यांचा अभाव श्रुत–**श्रुतीनें** सांगितलेला आहे. [–**'तस्मात्०'** इत्यादि भाष्यानें योग्य देशादिकांच्या **अभावानें** सिद्ध झालेल्या अर्थाचा उपसंहार–]='तस्मात्'–योग्य देश, काल व निमित्त **यांचा** अभाव असल्यामुळें व बाध होत असल्यामुळें स्वप्नदर्शन मायामात्र आहे. ३. [–" अहोपण, स्वप्नाला मायामात्रत्व असल्यास शुभाशुभफलत्वाचा अन्वय व

व्यतिरेक यांच्याशीं व शास्त्राशीं विरोध येईल." अशी आशंका घेऊन **सूत्रकार 'सूचकश्च०'** इत्यादि सूत्रानें तिचें समाधान सांगतात—]

**सूत्र—सूचकश्च हि श्रुतेराचक्षते च तद्विदः ॥ ४**

**सूत्रार्थ**—'सूचकः च'—आणि स्वप्नांतील प्रत्यय चांगल्या-वाईट सत्य पदार्थांचा सूचक हेतु आहे. 'हि श्रुतेः'—कारण श्रुतीवरून तसें अवगत होतें. 'च तद्विदः आचक्षते'—आणि स्वप्नाध्यायवेत्ते स्वप्नदर्शनाचें शुभाशुभसूचकत्व सांगतात. ४.—सु.त्र. २७२.[—'मायामात्रत्वात्०' इत्यादि भाष्यानें सूत्रव्यावर्त्य शंका सांगतात—]

**भाष्यं—मायामात्रत्वात्तर्हि न कश्चित्स्वप्ने परमार्थगंधोऽस्तीति । नेत्युच्यते । सूचकश्च हि स्वप्नो भवति भविष्यतोः साध्वसाधुनोः । तथाहि श्रूयते—'यदा कर्मसु काम्येषु स्त्रियं स्वप्नेषु पश्यति । समृद्धिं तत्र जानीयात्तस्मिन्स्वप्ननिदर्शने' इति । तथा 'पुरुषं कृष्णं कृष्णदंतं पश्यति स एनं हन्ति' इत्येवमादिभिः स्वप्नैरचिरजीवित्वमावेद्यत इति श्रावयति ॥**

**भाष्यार्थ**—तर मग स्वप्नाला मायामात्रत्व असल्यामुळें त्यांत परमार्थाचा—सत्यत्वाचा थोडासा लेशहि नाहीं, असें झालें. [—विरोधद्वयाचा परिहार '**नेत्युच्यते०**' इत्यादि भाष्यानें करितात—]=नाहीं, स्वप्नांत परमार्थाचा कांहीं गंधहि नाहीं, असें नाहीं, असें सांगितलें जातें. कारण स्वप्न पुढें होणारें शुभ व अशुभ यांचें सूचक आहे. '**तथा हि०**'—कारण तशी श्रुति आहे. "जेव्हां काम्य कर्मांमध्यें स्वप्नांत स्त्रीला पाहतो तेव्हां त्या स्वप्नाचें उत्तम दर्शन झालें असतां कर्माची समृद्धि जाणावी"—छां. ५. २. ८ सु. उ. ४००.—असें श्रुत आहे. [—स्वप्न पुढें होणाऱ्या शुभाचें सूचक आहे, याविषयीं श्रुति सांगून तसल्या अशुभाचेंहि तें सूचक आहे, याविषयीं '**तथा०**' इत्यादि भाष्यानें श्रुति सांगतात—]=त्याचप्रमाणें "काळ्या वर्णाच्या व काळ्या दांताच्या पुरुषाला हा पाहतो. तो पुरुष याला मारतो" या अशाप्रकारच्या स्वप्नांनीं अल्प जीवित्व सुचविलें जातें, असें श्रुति सांगते. [—'**आचक्षते च०**' इत्यादि भाष्यानें अन्वय-व्यतिरेकविरोधाचें समाधान व्यक्त करितात—]

**भाष्यं—आचक्षते च स्वप्नाध्यायविदः—कुंजरारोहणादीनि स्वप्ने धन्यानि खरयानादीन्यधन्यानि इति । मंत्रदेवताद्रव्यविशेषनिमित्ताश्च केचित्स्वप्नाः सत्यार्थगंधिनो भवन्तीति मन्यन्ते । तत्रापि भवतु नाम सूच्यमानस्य वस्तुनः सत्यत्वं सूचकस्य तु स्त्रीदर्शनादेर्भवत्येव वैतथ्यं बाध्यमानत्वादित्यभिप्रायः । तस्मादुपपन्नं स्वप्नस्य मायामात्रत्वम् ॥**

**भाष्यार्थ**—आणि स्वप्नाध्यायवेत्ते तसें सांगतात–स्वप्नांत हत्तीवर आरोहण करणे इत्यादि हीं धन्य–धनाला हितावह–शुभ व गाढवाच्या वाहनांत बसणें, इत्यादि हीं ' अधन्य '–धनाचा नाश करणारीं–अशुभ चिह्नें आहेत, असें स्वप्नाध्यायज्ञ सांगतात. [–आणि याहि कारणानें उभयविरोधाचा अभाव आहे, असें '**मंत्रदेवता०** ' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=आणि मंत्र, देवता, द्रव्यविशेष इत्यादि निमित्तांनीं युक्त असलेलीं कांहीं स्वप्नें सत्यार्थाच्या गंधानें–लेशानें–अंशानें युक्त असतात, असें मानितात. [–" तर मग स्वप्नाला सत्य मानिल्यावांचून त्यांच्या शुभाशुभसूचकत्वाची उपपत्ति लागत नसल्यामुळें स्वप्नाला सत्यत्व आहे. त्यामुळेच त्याला मायामात्रत्व नाहीं " अशी आशंका घेऊन स्वप्नाला अर्थक्रियाकारित्व–व्यावहारिकत्व जरी असलें तरी परमार्थत्व नाहीं, त्यामुळें त्याला मिथ्यात्वच आहे, असें ' **तत्रापि०** ' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=' तत्रापि '–स्वप्नाला सत्यार्थसूचकत्व जरी असलें तरी सुचविल्या जाणाऱ्या वस्तूला सत्यत्व खुशाल असूं दे. पण त्याचें सूचक जें स्त्रीदर्शन इत्यादि त्याला मिथ्यात्व आहेच. कारण त्याला बाध्यमानत्व आहे. म्ह० बाधित होणें हा धर्म त्याच्या ठिकाणीं आहे, असा याचा भावार्थ. [–' **तस्मात्०** ' इत्यादि भाष्यानें दोन प्रकारच्या विरोधसमाधानाच्या फलाचा उपसंहार करितात–]=म्हणून स्वप्नाचें मायामात्रत्व उपपन्न होतें. [–' **यदुक्तं०** ' इत्यादि भाष्यानें परोक्ताचा अनुवाद करितात–]

**भाष्यं—यदुक्तं ' आह हि ' इति तदेवं सति भाक्तं व्याख्यातव्यम् । यथा लांगलं गवादीनुद्वहतीति निमित्तमात्रत्वादेवमुच्यते । न तु प्रत्यक्षमेव लांगलं गवादीनुद्वहति । एवं निमित्तमात्रत्वात्सुप्तो रथादीन्सृजते 'स हि कर्ता' इति चोच्यते । न तु प्रत्यक्षमेव सुप्तो रथादीन्सृजति । निमित्तत्वं त्वस्य रथादिप्रतिभाननिमित्तमोदत्रासादिदर्शनात्तन्निमित्तभूतयोः सुकृतदुष्कृतयोः कर्तृत्वेनेति वक्तव्यम् ॥**

**भाष्यार्थ**—पहिल्या सूत्रांत व्याने ' **आह हि** '–रथादिकांना उत्पन्न करितो, असें श्रुति सांगते, इत्यादि जें म्हटलें आहे.–पृ ८९–' **तत्** '–सुप्त–निजलेल्या पुरुषाचे तें स्रष्टृत्वादिवचन ' **एवं सति०** '–पूर्वोक्त न्यायानें स्वप्नाचें मायामात्रत्व सिद्ध झालें असतां ' **भाक्तं** '–गौण आहे, असें त्याचें व्याख्यान करावें. [–स्वप्नदृष्ट रथादिस्रष्टृत्वादिवचनाचें गौणत्व दृष्टान्तानें स्पष्ट करितात–]=' **यथा०** '–जसें ' नांगर बैलादिकांना वर उचलून–ओढून नेतो ' 'त्या सर्वांना वाहतो,' असें हें केवळ निमित्तमात्रत्वामुळें म्हटलें जातें. [–" पण लांगलाचेंहि बैलादिकांना वाहून नेणें मुख्यच कां नाहीं ? " ' **न तु०** ' इत्यादि भाष्यानें उत्तर–]=पण

नांगर प्रत्यक्षच कांहीं बैलादिकांना वहात नाहीं, त्याचप्रमाणें केवल निमित्तमात्रत्वामुळें " सुप्त पुरुष रथादिकांना उत्पन्न करितो. तोच कर्ता आहे "–पृ.८९–असें म्हटलें जातें. [–" तथापि दार्ष्टान्तिकांत मुख्यच स्रष्टृत्व आहे. कारण सुप्त पुरुषाचें चेतनत्वामुळें स्रष्टृत्व संभवतें" अशी आशंका घेऊन **'न तु प्रत्यक्षं०'** इत्यादि भाष्यानें आचार्य म्हणतात–]=पण सुप्त पुरुष प्रत्यक्षच रथादिकांना उत्पन्न करीत नाहीं. [ जागत असलेल्या पुरुषाच्या स्रष्टृत्व प्रमाणें सुप्त पुरुषाचें स्रष्टृत्वहि जर मानिलें तर त्यानें उत्पन्न केलेल्या रथादिकांचा नुसत्या जागें होण्यानेंच बाध संभवत नाहीं–नुसत्या सुप्ताच्या प्रबोधानेच त्यांची निवृत्ति होणार नाहीं, असा भावार्थ.–" अहोपण, धर्माधर्मांनाच स्वप्नसृष्टीचें निमित्तत्व असल्यामुळें सुप्ताला तिचें निमित्तत्व कसें ? " अशी आशंका घेऊन ' त्यांच्या फलित्वानें व त्यांच्या कर्तृत्वानें त्याला निमित्तत्व आहे ' असें **' निमित्तत्वं तु० '** इत्यादि भाष्यानें सांगतात–]=पण याला निमित्तत्व आहे. कारण रथादिकांच्या प्रतिभानाच्या–प्रतीतीच्या निमित्तानें याला मोद, भय इत्यादि होत असलेले दिसतात. त्यामुळें त्या मोद-त्रासादिकांच्या निमित्तभूत सुकृत-दुष्कृतांच्या कर्तृत्वानें त्याला निमित्तत्व आहे, असें सांगावें. [ तो सुप्त पुरुष स्वप्नांतील पदार्थ पाहून सुखी व दुःखी होतो. म्ह० तो त्याचा फलभोक्ता आहे व त्या सुख-दुःखांचें कारण असा जो धर्म व अधर्म त्यांचा तो कर्ता आहे. त्यामुळें त्याला निमित्तत्व आहे, असा भावार्थ.–आणि याहि कारणानें स्वप्नसृष्टि वास्तविक अभीष्ट नाहीं, असें **' अपि च० '** या भाष्यानें सांगतात—]

**भाष्यं—अपि च जागरिते विषयेन्द्रियसंयोगाद् आदित्यादिज्योतिर्व्यतिकराच्चात्मनः स्वयंज्योतिष्टवं दुर्विवेचनमिति तद्विवेचनाय स्वप्न उपन्यस्तः । तत्र यदि रथादिसृष्टिवचनं श्रुत्या नीयेत । ततः स्वयंज्योतिष्टवं न निर्णीतं स्यात् । तस्माद्रथाद्यभाववचनं श्रुत्या रथादिसृष्टिवचनं तु भक्त्येति व्याख्येयम् । एतेन निर्माणश्रवणं व्याख्यातम् ॥**

**भाष्यार्थ**—शिवाय याहि कारणानें स्वप्नसृष्टि खरी नव्हे. [–**'जागरिते०'** इत्यादि भाष्यानें तें हेत्वंतरच विशद करितात–]=जागरितांत विषय व इंद्रियें यांच्या संयोगामुळें आणि आदित्यादि-ज्योतींच्या संबंधामुळें–मिश्रणामुळें आत्म्याच्या स्वयंज्योतिष्ट्वाचें विवेचन करणें फार कठिण झालें आहे. म्हणून त्याच्या विवेचनासाठीं श्रुतीनें स्वप्नाचा उपन्यास केला आहे. [–"आत्म्याच्या स्वयंज्योतिष्ट्वाचें विवेचन करण्यासाठीं स्वप्नाची उक्ति असूं दे. तथापि स्वप्नांतील सृष्टिवचन मुख्यच आहे,"

अशी आशंका घेऊन '**तत्र०**' इत्यादि भाष्यानें आचार्य म्हणतात–]=त्यांतील रथादिसृष्टिवचनाचा निर्णय जर श्रुतीच्या आधारानें करूं लागलें तर–जागरिताहून त्यांत विशेष कांहींच नसल्यामुळें त्यापासून आत्म्याचें स्वयंज्योतिष्ट्व निर्णीत होणार नाहीं. [–श्रुतीच्या पौर्वापर्याचा विचार केला असतां श्रुतीला अन्यार्थपरत्व असल्यामुळें रथादिकांचें असत्त्व सिद्ध झालें असतां '**तस्मात्०**' इत्यादि भाष्यानें फलित सांगतात–]=म्हणून स्वप्नांतील रथादिकांचें अभाववचन श्रुतीनें म्ह० मुख्य वृत्तीनें पण रथादिसृष्टिवचन भक्तीनें–गौणवृत्तीनें आहे, असें व्याख्यान करावें. [ आतां पूर्ववाद्यानें ' निर्मातारं च० '–काठकशाखीय आत्म्याला कामाचा निर्माता म्हणतात,–पृ.९०–इत्यादि जें म्हटलें आहे, त्याविषयीं '**एतेन०**' इत्यादि भाष्यानें म्हणतात–]='एतेन'–या रथादिसृष्टिवचनाच्या गौणत्वोपपादनानें निर्माणश्रवणाचेंहि व्याख्यान केलें आहे. [–वाद्यानें सांगितलेल्या अनुमानाचा '**यदपि उक्तं०**' इत्यादि भाष्यानें अनुवाद करून हेतूच्या असिद्धीनें त्याला दूषित करितात–]

**भाष्यं—यदप्युक्तं–" प्राज्ञमेनं निर्मातारमामनन्ति " इति । तदप्यसत् । श्रुत्यंतरे ' स्वयं विहत्य स्वयं निर्माय स्वेन भासा स्वेन ज्योतिषा प्रस्वपिति ' इति जीवव्यापारश्रवणात् । इहापि ' य एष सुप्तेषु जागर्ति ' इति प्रसिद्धानुवादाज्जीव एवायं कामानां निर्माता संकीर्त्यते । तस्य तु वाक्यशेषेण ' तदेव शुक्रं तद्ब्रह्म ' इति जीवभावं व्यावर्त्य ब्रह्मभाव उपदिश्यते–' तत्त्वमसि ' इत्यादिवदिति न ब्रह्मप्रकरणं विरुध्यते ॥**

**भाष्यार्थ**—" या प्राज्ञाला निर्माता सांगतात "–पृ. ९०–असेंहि जें म्हटलें आहे तेंहि बरोबर नाहीं. कारण दुसऱ्या श्रुतींत " आपल्या पूर्व देहाला निश्चेष्ट करून दुसऱ्या अपूर्व वासनामय देहाला उत्पन्न करून आपल्या बुद्धिवृत्तीनें व स्वरूपचैतन्यानें निजतो" असा जीवाचा व्यापार श्रुत आहे. [–केवळ बृहदारण्यकांतच जीवाचें स्वापकर्तृत्व श्रुत नाहीं तर काठकांतहि तें श्रुत आहे, असें '**इहापि०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=येथेंहि ' जो हा इंद्रियें लीन झालीं असतां जागतो '–पृ.९१–असा प्रसिद्धाचा अनुवाद केलेला असल्यामुळें हा जीवच कामांचा निर्माता सांगितला जातो. '**तस्य तु०**'–पण वाक्यशेषानें 'तेंच शुद्ध, तेंच ब्रह्म' अशी त्याच्या जीवभावाची व्यावृत्ति करून 'तत्त्वमसि'–छां ६.८.७.–इत्यादि वाक्याप्रमाणें ब्रह्मभाव उपदेशिला जातो. त्यामुळें ब्रह्मप्रकरण विरुद्ध होत नाहीं. [–" पण प्रकरण व वाक्यशेष यांच्या योगानें परमात्मा निर्माता आहे, असें आम्हीं वर सांगितलें आहे " अशी आशंका घेऊन ' जीवभावास प्राप्त झालेल्या

परमात्म्याला स्वतःच्या अविद्येनें स्वप्नाचें उपादानत्व आहे कीं जीवभावावांचून स्वाविद्येनें त्याला स्वप्नाचें अधिष्ठातृत्व आहे,' असा विकल्प करून त्यांतील पहिल्या पक्षाचा अंगीकार ' **न चास्माभिः०** ' इत्यादि भाष्यानें सांगतात—]

**भाष्यं—न चास्माभिः स्वप्नेऽपि प्राज्ञव्यवहारः प्रतिषिध्यते। तस्य सर्वेश्वरत्वात्सर्वास्ववस्थासु अधिष्ठातृत्वोपपत्तेः। पारमार्थिकस्तु नायं संध्याश्रयः सर्गो वियदादिसर्गवदित्येतावत्प्रतिपाद्यते। न च वियदादिसर्गस्याप्यात्यंतिकं सत्यत्वमस्ति ॥**

**भाष्यार्थ**—आणि आम्हांकडून स्वप्नांतीलहि प्राज्ञाच्या व्यवहाराचा प्रतिषेध केला जात नाहीं. [—दुसऱ्या पक्षाचाहि ' **तस्य०** ' इत्यादि भाष्यानें अंगीकार—] =कारण त्याला सर्वेश्वरत्व असल्यामुळें सर्व अवस्थांमध्यें त्याचें अधिष्ठातृत्व संभवतें. [—" तर मग पूर्वोक्त अनुमानांतील ' प्राज्ञकर्तृत्व ' या हेतूची सिद्धि होत असल्यामुळें तें अनुमान निर्दोष आहे " अशी आशंका घेऊन ' अनुमानांतील साध्य व्यावहारिक सत्यत्व आहे कीं पारमार्थिक सत्यत्व ? ' असा विकल्प करून पहिल्या पक्षीं प्रत्यक्षविरोध हें बाधक सांगतात—]=' **पारमार्थिकस्तु०** '—पण हा संध्याश्रय—स्वप्नाचा आश्रय करून राहणारा सर्ग—प्रपंच आकाशादि प्रपंचाप्रमाणें पारमार्थिक नाहीं. एवढेंच आम्हांकडून प्रतिपादिलें जातें. [ येथील पारमार्थिकत्व म्ह० व्यवहारांतील बाधराहित्य—व्यवहारावस्थेंत त्याचा बाध न होणें.आकाशादि सृष्टीला तसलें पारमार्थिकत्व आहे. स्वप्नसृष्टीला नाहीं, एवढेंच आमचें म्हणणें आहे. —दुसऱ्या पक्षीं दृष्टान्ताची साध्यविकलता ' **न च०** ' इत्यादि भाष्यानें सांगतात—]=आणि आकाशादिसर्गालाहि आत्यंतिक सत्यत्व नाहीं. [—" पण आकाशादिसर्गाचें मिथ्यात्व असिद्ध आहे. तर्‍हां दृष्टान्ताला साध्यविकलता कोठून असणार ? " अशी आशंका घेऊन ' **प्रतिपादितं हि०** ' इत्यादि भाष्यानें सांगतात—]

**भाष्यं—प्रतिपादितं हि ' तदनन्यत्वमारंभणशब्दादिभ्यः ' इत्यत्र समस्तस्य प्रपंचस्य मायामात्रत्वम्। प्राक् ब्रह्मात्मत्वदर्शनाद्वियदादिप्रपंचो व्यवस्थितरूपो भवति। संध्याश्रयस्तु प्रपंचः प्रतिदिनं बाध्यत इति। अतो वैशेषिकमिदं संध्यस्य मायामात्रत्वमुदितम् ॥ ४ ॥**

**भाष्यार्थ**—कारण " त्या कारण ब्रह्माहून कार्यभूत जगाचें अनन्यत्व—पृथक्सत्ताराहित्य आहे. आरंभणशब्दादि कारणांमुळें "—अ. २. १. १४. पृ. ७७.—या सूत्रांत समस्त प्रपंचाच्या मायामात्रत्वाचें प्रतिपादन केलें आहे. [—" तर मग स्वप्नाचा जागरिताहून विशेष कोणता आहे कीं ज्या विशेषामुळें स्वप्नाचें मिथ्यात्व

**पृथक्** सांगितलें जात आहे!" अशी आशंका घेऊन '**प्राक्तु०**' इत्यादि भाष्यानें आचार्य म्हणतात-]=पण ब्रह्मात्मत्वदर्शन-ब्रह्मात्मैक्यज्ञान होण्यापूर्वी आकाशादि प्रपंच निश्चितरूप असतो. परंतु संध्याश्रय-स्वप्नांतील प्रपंच प्रति-दिनीं-प्रतिदिवशीं बाधित होतो. म्हणून स्वप्नाचें हें वैशेषिक-विशिष्ट-सविशेष मायामात्रत्व सांगितलें. [ व्यवहारांतहि स्वप्नाचें मिथ्यात्व सांगण्यासाठीं हें **पृथक्** कथन केलें आहे, असा भावार्थ. ] ४ [-' स्वप्न योग्यनिमित्ताच्या अभावामुळें मिथ्या आहे ' असें जे तुम्ही वर-पृ.९३-म्हटलें आहे तें बरोबर नाहीं. कारण जीव-संकल्पाच्याच निमित्तत्वाची सिद्धि होते, अशी आशंका घेऊन सूत्रकार '**पराभि-ध्यानात्०**' इत्यादि सूत्रानें म्हणतात-]

**सूत्रं—पराभिध्यानात्तु तिरोहितं ततो ह्यस्य बंधविपर्ययौ ॥ ५**

**सूत्रार्थ**—' तु '-पण जीवेश्वरांना अंशांशिभाव जरी असला तरी जीवाचें ऐश्वर्य अविद्यादि-व्यवधानामुळें गुप्त झालें आहे. तें तिरोहित झालेलें ऐश्वर्य परमात्म्या-च्या ध्यानादि उपायांनीं प्रयत्न करणाऱ्या एखाद्या जीवाचें आविर्भूत होतें 'ततः'-त्या ईश्वराच्या निमित्तानें या जीवाचे बंध-मोक्ष होतात.५. सु.ब्र.२७३. [-'**अथापि०**' इत्यादि भाष्यानें सूत्रतात्पर्य सांगतात-]

**भाष्यं—अथापि स्यात्परस्यैव तावदात्मनोंऽशो जीवोऽग्नेरिव विस्फुलिंगः। तत्रैवं सति यथाग्निविस्फुलिंगयोः समाने दहनप्रकाशनशक्ती भवतः। एवं जीवे-श्वरयोरपि ज्ञानैश्वर्यशक्ती। ततश्च जीवैश्वर्यवशात्सांकल्पिकी स्वप्ने रथादिसृष्टि-र्भविष्यतीति ॥**

**भाष्यार्थ**—'**अथापि०**'-पूर्वोक्त प्रकारें स्वप्नाचें मिथ्यात्व जरी सांगितलें आहे तरी कोणी असें म्हणेल-" अग्नीच्या विस्फुलिंगाप्रमाणें जीव तर परमात्म्याचा अंश आहे! [-" पण जीवेश्वरांना अंशांशित्व जरी असलें तरी काय होईल " '**तत्र०**' इत्यादि भाष्यानें उत्तर-]='**तत्र एवं सति**'-तो जीव परमात्म्याचा श्रुति-स्मृतिसिद्ध अंश आहे, असें झालें असतां ज्याप्रकारें अग्नि व विस्फुलिंग यांच्या दहन-प्रकाशनशक्ति समान असतात त्याचप्रमाणें जीव व ईश्वर यांच्याहि ज्ञानैश्वर्यशक्ति समान आहेत. [-' **ततश्च०** ' इत्यादि भाष्यानें ज्ञानैश्वर्यशक्तींचें साम्य आहे, असें झालें असतां त्याचें फलित सांगतात-]=आणि त्यामुळें जीवाच्या ऐश्वर्यवशात् स्वप्नांतील रथादिसृष्टि सांकल्पिकी असेल-ती जीवाच्या संकल्पानेंच होईल. " '**इति**'-असें कोणी म्हणेल. [-" **स्वप्नसृष्टि अविद्यामयी नाहीं तर ती सांक-**

लिपकी सत्य आहे " अशा या आक्षेपाचा अनुवाद करून '**अत्रोच्यते०**'इत्यादि भाष्यानें अगोदर सूत्राला सोडून परिहार सांगतात—]

**भाष्यं**—अत्रोच्यते-सत्यपि जीवेश्वरयोरंशांशिभावे प्रत्यक्षमेव जीवस्येश्वर-**विपरीतधर्मत्वम्** । **किं पुनर्जीवस्येश्वरसमानधर्मत्वं नास्त्येव। न नास्त्येव। विद्यमानमपि** तत्तिरोहितमविद्यादिव्यवधानात् । तत्पुनस्तिरोहितं सत्परमेश्वर-**मभिध्यायतो यतमानस्य** जंतोर्विधूतध्वान्तस्य तिमिरतिरस्कृतेव दृक्शक्तिरौष-**धवीर्यादीश्वरप्रसादात्संसिद्धस्य कस्यचिदेवाविर्भवति । न स्वभावत एव सर्वेषां जंतूनाम्** ॥

**भाष्यार्थ**—असा आक्षेप आला असतां त्याचा परिहार सांगितला जातो. जीव व ईश्वर यांना अंशांशिभाव जरी असला तरी जीवाचें ईश्वरविपरीतधर्मत्व प्रत्य-क्षच आहे. [ असर्वज्ञत्व व अनीश्वरत्व हे जीवाचे धर्म प्रत्यक्ष असल्यामुळें त्याच्या संकल्पानेंच रथादि सृष्टि संभवत नाहीं, असा भावार्थ.—"तर मग विरुद्धत्वामुळेंच त्या दोघांचें ऐक्य नाहीं," अशी '**किं पुनः०**' इत्यादि भाष्यानें शंका—]="तर मग काय जीवाला ईश्वरसमानधर्मत्व नाहींच !" [—त्यांचा प्रातीतिक विरोध जरी असला तरी वस्तुतः त्याचा अभाव असल्यामुळे ऐक्य आहे, असें '**न नास्ति०**' इत्यादि भाष्यानें सांगतात—]=जीवाला ईश्वरसमानधर्मत्व नाहींच असें नाहीं. [—"तर मग जीवांतील सर्वज्ञत्वादिक भासत कां नाहीं ? " अशी आशंका घेऊन '**विद्यमान-मपि०**' इत्यादि भाष्यानें आतां सूत्राची योजना करितात—]=जीवामध्यें असलेलेंहि तें सर्वज्ञत्वादिक अविद्या, तिचें कार्य इत्यादिकांचें व्यवधान—मध्यें प्रतिबंध आल्या-मुळें तिरोहित—गुप्त झालें आहे. [—" अहोपण, जें कधींहि उपलब्ध होत नाहीं त्याला सत्यत्वच कसें ? "अशी आशंका घेऊन '**तत्पुनः०** ' इत्यादि भाष्यानें समा-धान सांगतात—]=पण परमेश्वराचें अभिध्यान करणाऱ्या यतमान व तिमिररोगानें तिरस्कृत—प्रतिबद्ध झालेली दृक्शक्ति औषधाच्या बलानें जशी स्वच्छ होते त्याप्र माणें ईश्वराच्या प्रसादामुळें ज्याचें अविद्याध्वांत—तम सर्वथा नाश पावलें आहे, अशा कोणा एखाद्याच संसिद्ध पुरुषाचें तें पूर्वोक्त प्रकारें गुप्त झालेलें सर्वज्ञत्वादि आविर्भूत—प्रकट होतें. [ ' यतमानस्य ' या विशेषणानें आदर-दीर्घकाल-नैरंतर्य या तीन धर्मांनीं युक्त होऊन ध्यान करणें, हा ध्यानकर्त्याचा धर्म सुचविला आहे. 'विधूतध्वांतस्य ' या विशेषणानें ध्यानाचें कार्य असा जो ईश्वराचा प्रसाद त्याला प्रतिबंध करणाऱ्या पापाचा ध्वंस दाखविला आहे. तर मग ईश्वराचें ध्यान कर-णाऱ्या सर्वांचेंच तें सर्वज्ञत्वादिक आविर्भूत कां होत नाहीं, तें ' **संसिद्धस्य** ' या

विशेषणानें सुचविलें आहे. संसिद्ध म्ह० अणिमादिविशिष्ट, असा भावार्थ–]='**न स्वभावतः०**'–स्वभावतःच सर्व जंतूंचें तें सर्वज्ञत्वादि आविर्भूत होत नाहीं. [–'कुतः०' इत्यादि भाष्यानें त्यामुळें तें स्वतःच व्यक्त होण्याचे कारण विचारतो–]

**भाष्यं**—कुतः । ततो हीश्वराद्धेतोरस्य जीवस्य बंधमोक्षौ भवतः । ईश्वरस्वरूपापरिज्ञानाद्बंधः तत्स्वरूपपरिज्ञानात्तु मोक्षः । तथा च श्रुतिः–"ज्ञात्वा देवं सर्वपाशापहानिः क्षीणैः क्लेशैर्जन्ममृत्युप्रहाणिः । तस्याभिध्यानात्तृतीयं देहभेदे विश्वैश्वर्यं केवल आप्तकामः" इत्येवमाद्या ॥ ५ ॥

**भाष्यार्थ**—कोणत्या कारणानें तें स्वतःच व्यक्त होतें? [–'**ततः हि०**' या सूत्रपदानें उत्तर–]=कारण त्या ईश्वर या हेतूपासून–ईश्वरामुळें 'अस्य'–या जीवाचे '**बंधविपर्ययौ**'–बंध व मोक्ष होतात. [–" पण ईश्वराला विरुद्ध फलाचें हेतुत्व कसे?" '**ईश्वर०**' इत्यादि भाष्यानें उत्तर–]=ईश्वरस्वरूपाच्या अपरिज्ञानामुळें–यथार्थ ज्ञानाच्या अभावामुळें बंध पण त्याच्या स्वरूपाच्या परिज्ञानामुळें मोक्ष होतो. [–'**तथा च०**' इत्यादि भाष्यानें त्याविषयीं प्रमाण–]=आणि तशी "देवाला साक्षात् जाणून सर्व पाशांची अपहानि–अविद्यादि क्लेशांची निवृत्ति होते. क्षीण झालेल्या क्लेशांनीं जन्म-मृत्यूची प्रहाणि–जन्म-मृत्यूचा नाश होतो. [–'परमात्माच मी आहें' असा साक्षात् अनुभव घेऊन सर्वपाशांचा म्ह० अविद्या-रागादि बंधनांचा अपहानि–अपक्षय होतो. 'क्षीण झालेल्या क्लेशांनीं त्यांचें कार्य, अशा जन्म मृत्यूंचा ध्वंस होतो,' असे हें निर्गुण विद्येचें फल सांगितलें आहे.–'**तस्य०**' इत्यादि उत्तरार्धानें सगुणविद्येचें फल सांगितले जातें.–]=त्या परमात्म्याचें अभिमुख्यानें ध्यान केल्यानें बंध व मोक्ष यांच्या अपेक्षेनें तिसरें किंवा या मंत्राच्या पूर्वार्धांत सांगितलेली पाशहानि व जन्म-मृत्युप्रहाण यांच्या अपेक्षेनें तिसरें विश्वैश्वर्य,–अणिमादि-ऐश्वर्य प्राप्त होतें [केव्हां? उत्तर–]'देहभेदे'–देहविशेषांत–लिंद्र देहांत किंवा साधक देहाचा पात–नाश झाला असतां जगत्कारणाच्या सायुज्याची प्राप्ति झाल्याने, तें प्राप्त होतें." श्वे. १. ११. सु.उ.९१९–इत्यादि प्रकारची श्रुति याविषयीं प्रमाण आहे. [आणि त्यानंतर विश्वैश्वर्य–निरतिशय ऐश्वर्य भोगून निर्गुणविद्येचा उदय झाला असतां केवल अद्वितीय होऊन आप्तकाम झालेला तो निरतिशय आनंदरूपानेंच अवस्थित होतो, अशी त्या सगुणोपासकाला क्रममुक्ति प्राप्त होते, असा भावार्थ.]५ [–जीवाला स्वभावतःच अनाविर्भूत ज्ञानैश्वर्यत्व असल्यामुळें –त्याचें ज्ञानैश्वर्य स्वभावतःच लुप्त झालेलें असल्यामुळें त्याला संकल्पमात्रानें स्रष्टृत्व

नाहीं, हें सांगितलें. पण त्यांतील हेतूच्या असिद्धीची शंका घेऊन सूत्रकार 'देहयोगाद्वा०' इत्यादि सूत्रानें तिचें निरसन करितात—]

सूत्र—देहयोगाद्वा सोऽपि ॥ ६॥ ( १ )

**सूत्रार्थ—' सः अपि '**–तो जीवाच्या ऐश्वर्याचा तिरोभावहि **'देहयोगात् वा '**–देहादिकांमध्यें आत्मत्वाभिमानरूप अविवेकमुळेंच होतो. ६ (१) सु. ब्र. पृ. २७३. [–**' कस्मात्० '** इत्यादि भाष्यानें सूत्रव्यावर्त्य सांगतात—]

**भाष्यं—कस्मात्पुनर्जीवः परमात्मांश एव संस्तिरस्कृतज्ञानैश्वर्यो भवति। युक्तं तु ज्ञानैश्वर्ययोरतिरस्कृतत्वं। विस्फुलिंगस्येव दहनप्रकाशनयोरिति। उच्यते सत्यमेवैतत्। सोऽपि तु जीवस्य ज्ञानैश्वर्यतिरोभावो देहयोगाद्देहेंद्रियमनोबुद्धि-विषयवेदनादियोगाद्भवति ॥**

**भाष्यार्थ**—पण जीव परमात्म्याचा अंशच असतांना ज्याचें ज्ञान व ऐश्वर्य तिरस्कृत–लुप्त झालें आहे, असा तो कोणत्या कारणानें होतो ? [–**'युक्तं तु०'** इत्यादि भाष्यानें आक्षेपाचें विवरण करितात–]=पण विस्फुलिंगाचें दहन व प्रकाशन यांचा तिरस्कार जसा होत नाहीं त्याप्रमाणें ईश्वरांश असलेल्या जीवाच्या ज्ञानैश्वर्यांचें अतिरस्कृतत्व–अलोपच युक्त आहे. **'इति'**–असा येथें आक्षेप येतो. [–पण या आक्षेपानें वादी पारमार्थिक प्रतिबंधाचा अभाव साधीत आहे कीं प्रातिभासिक प्रतिबंधाचा असा **' उच्यते '** या भाष्यानें विकल्प करितात–]=याचें समाधान विकल्पपूर्वक सांगितलें जातें. [–**' सत्यं एव एतत् '**–या भाष्यानें त्यांतील पहिल्या पक्षाचा अंगीकार करितात–]=जीवाच्या ज्ञानैश्वर्यांच्या पारमार्थिक प्रतिबंधाचा अभाव आहे, हें खरेंच आहे. [–**' सोऽपि० '** इत्यादि भाष्यानें दुसऱ्या पक्षाला दूषित करितात–]=पण ' तोहि ' जीवाच्या ज्ञानैश्वर्यांचा तिरोभाव ' देह-योगामुळें' होतो. [–सूत्रांतील 'देह-'शब्दानें स्थूल व सूक्ष्म देहांचें ग्रहण करून **' देहेंद्रिय० '** इत्यादि भाष्यानें त्याचें व्याख्यान करितात–]=देह, इंद्रियें, मन, बुद्धि, विषय, सुखादि वेदना इत्यादिकांच्या योगानें होतो. [ 'वेदनादि-' येथील 'आदि-' शब्दानें त्यांचें निमित्त अविद्या घ्यावी.–अन्य वस्तूच्या संपर्कामुळें वस्तूच्या स्वाभाविक धर्माचाहि तिरोभाव होतो, याविषयीं **'अस्ति च०'** इत्यादि भाष्यानें दृष्टान्त–]

**भाष्यं—अस्ति चात्रोपमा–यथाग्नेर्दहनप्रकाशनसंपन्नस्यापि अरणिगतस्य दहनप्रकाशने तिरोहिते भवतो यथा वा भस्मच्छन्नस्य। एवं अविद्याप्रत्युप-स्थापितनामरूपकृतदेहाद्युपाधियोगात् तदविवेकभ्रमकृतो जीवस्य ज्ञानैश्वर्य-तिरोभावः। वाशब्दो जीवस्य ईश्वरादन्यत्वशंकाव्यावृत्त्यर्थः ॥**

**भाष्यार्थ**—आणि याविषयीं उपमा–दृष्टान्तहि आहे. ज्याप्रमाणें दहन व प्रकाशन यांनीं संपन्न असलेल्याहि अरणींतील अग्नीचें दहन व प्रकाशन तिरोहित–गुप्त असतें, [–"पण अगोदर अरणींत अग्नि असतो, याविषयींच संशय आहे," अशी आशंका घेऊन '**यथा वा०**' इत्यादि भाष्यानें आचार्य म्हणतात–]=किंवा ज्याप्रमाणें राखेनें आच्छादित झालेल्या अग्नीच्या दहन-प्रकाशनक्रिया गुप्त होतात '**एवं**'–त्याप्रमाणें अविद्याकाल्पत नाम-रूपांनीं झालेल्या–नाम-रूपकृत देहादि-उपाधींच्या संबंधामुळें त्यांचा अविवेकभ्रम होतो, देहादि आत्म्याहून भिन्न आहेत, हा विवेक नाहींसा होतो. त्या उपाधिसंबंधानें होणाऱ्या अविवेकभ्रमामुळें जीवाच्या ज्ञानैश्वर्याचा तिरोभाव होतो. [–"सूत्रांतील 'वा' हा शब्द पक्षान्तर दाखविणारा आहे," अशी आशंका कोणाला येईल म्हणून आचार्य '**वाशब्दः०**' इत्यादि भाष्यानें म्हणतात–] =सूत्रांतील 'वा' हा शब्द जीवाच्या ईश्वराहून अन्यत्वाची शंका निवृत्त करण्यासाठीं आहे.[–'**ननु०**'इत्यादि भाष्यानें त्याविषयीं येणारी अन्यत्व शंका दाखवितात–]

**भाष्यं—नन्वन्य एव जीव ईश्वरादस्तु, तिरस्कृतज्ञानैश्वर्यत्वात् । किं देहयोगकल्पनया । नेत्युच्यते । न ह्यन्यत्वं जीवस्येश्वरादुपपद्यते 'सेयं देवतैक्षत' इत्युपक्रम्य 'अनेन जीवेनात्मनाऽनुप्रविश्य' इत्यात्मशब्देन जीवस्य परामर्शात् । 'तत्सत्यं स आत्मा तत्त्वमसि श्वेतकेतो' इति च जीवायोपदिशति ईश्वरात्मत्वम् । अतोऽनन्य एवेश्वराज्जीवः सन् देहयोगात्तिरोहितज्ञानैश्वर्यो भवति । अतश्च न सांकल्पिकी जीवस्य स्वप्ने रथादिसृष्टिर्घटते ।**

**भाष्यार्थ**—अहोपण, जीव ईश्वराहून निराळाच असू दे, कारण त्याला तिरस्कृतज्ञानैश्वर्यत्व आहे म्ह० ज्याचें ज्ञान व ऐश्वर्य तिरस्कृत झालें आहे, असा तो आहे. तेव्हां देहयोगकल्पना करून–देहसंबंधकल्पनेनें काय करावयाचें आहे? [–'**नेत्युच्यते०**' इत्यादि भाष्यानें या शंकेची व्यावृत्ति विशद करितात–]=जीव ईश्वराहून भिन्न नाहीं, असें सांगितलें जातें. कारण जीवाचें ईश्वराहून अन्यत्व उपपन्न होत नाहीं. "ती ही देवता ईक्षण करती झाली" छां. ६. ४. ३.–सु. उ. पृ. ४२४–असा उपक्रम करून "या जीवानें–आत्म्यानें अनुप्रवेश करून" असा 'आत्म-'शब्दानें जीवाचा परामर्श केलेला असल्यामुळें जीवाचें ईश्वराहून भिन्नत्व उपपन्न होत नाहीं. [–याहि कारणानें जीवाचें अन्यत्व वास्तविक नाहीं, असें '**तत्सत्यं०**' इत्यादि वाक्यानें सांगतात–]="तें सत्य आहे, तो आत्मा आहे, हे श्वेतकेतो, तें तूं आहेस"–पृ १०१–असें उद्दालक जीवाला ईश्वरात्मत्व उपदेशितो. [–'**अतः०**' इत्यादि भाष्यानें जीवाच्या अभेदाची सिद्धि

झाली असतां त्याचें फलित सांगतात-]=म्हणून जीव ईश्वराहून अनन्यच-अभिन्नच असतांना " देहसंबंधामुळें ज्याचें ज्ञान व ऐश्वर्य तिरोहित-लुप्त झालें आहे असा तो हातो." [-"पण जीवाच्या ज्ञानादिकांचा तिरोभाव जरी झाला तरी काय होणार?" अशी आशंका घेऊन ' अतश्च० ' या भाष्यानें तिचें निरसन करितात-]=आणि जीवाच्या ज्ञानैश्वर्यांचा तिरोभाव झाल्यामुळें स्वप्नांतील रथादि सृष्टि त्याच्या संकल्पापासून झालेली संभवत नाहीं. [-स्वप्नसृष्टीच्या सांकल्पिकत्वाविषयीं 'यदि च०' या भाष्यानें दोषान्तर सांगतात—]

**भाष्य**—यदि च सांकल्पिकी स्वप्ने सृष्टिः स्यान्नैवानिष्टं कश्चित्स्वप्नं पश्येत्। न हि कश्चिदनिष्टं संकल्पयते । यत्पुनरुक्तं जागरितदेशश्रुतिः स्वप्नस्य सत्यत्वं ख्यापयतीति । न तत्साम्यवचनं सत्यत्वाभिप्रायं स्वयंज्योतिष्ट्वविरोधात् । श्रुत्यैव च स्वप्ने रथाद्यभावस्य दर्शितत्वात् । जागरितप्रभववासनानिर्मितत्वात्तु स्वप्नस्य तत्तुल्यनिर्भासत्वाभिप्रायं तत् । तस्मादुपपन्नं स्वप्नस्य मायामात्रत्वम् ॥ ६ ॥ (१)

**भाष्यार्थ**—आणि जर स्वप्नांतील सृष्ट सांकल्पिकी-संकल्पानें उत्पन्न केलेली असेल तर कोणीहि अनिष्ट स्वप्न कधींच पहाणार नाहीं. [-' न हि० ' इत्यादि भाष्यानें त्याविषयीं हेतु-]=कारण कोणीहि आपल्याच अनिष्टाचा संकल्प करीत नाहीं. [-यत्पुनरुक्तं० ' इत्यादि भाष्यानें परोक्ताचा अनुवाद करून त्याचें निरसन करितात-]=पण ' जागरितदेशश्रुति स्वप्नाचें सत्यत्व प्रख्यापित करिते, '-पृ. ९२ -असें जे वाद्यानें म्हटलें आहे तें बरोबर नाहीं. कारण तें साम्यवचन सत्यत्वाच्या अभिप्रायानें नाही. [-स्वप्नांमध्येंहि जागराप्रमाणें विषयेंद्रियांचें अस्तित्व असल्यास दुर्विवेचनत्वामुळें साध्य असलेलें जें आत्म्याचें स्वयंज्योतिष्ट्व तें सिद्ध होणार नाहीं, असें ' स्वयंज्योतिष्ट्व० ' इत्यादि भाष्यानें सांगतात-]=कारण तें साम्यवचन स्वप्नाच्या सत्यत्वाच्या अभिप्रायानें आहे, असें म्हटल्यास आत्म्याच्या स्वयंज्योतिष्ट्वसिद्धीशीं विरोध येतो. त्यामुळें तें वचन सत्यत्व-अभिप्रायानें नाहीं [-आणि याहि कारणानें तें वाक्य स्वप्नाच्या सत्यत्वासाठींच नाहीं, असें ' श्रुत्यैव० ' इत्यादि भाष्यानें सांगतात-]=आणि श्रुतीनेंच स्वप्नांत रथादिकांचा अभाव प्रदर्शित केलेला आहे, त्यामुळेंहि त्या वाक्याला स्वप्नसत्यत्वार्थत्वच नाहीं. [-"तर मग स्वप्न व जागर यांचें साम्य कोणत्या अभिप्रायानें सांगितलें आहे?" ' जागरित० ' इत्यादि भाष्यानें उत्तर-]=पण जागरितापासून उत्पन्न झालेल्या वासनांनीं स्वप्नाला निर्मितत्व असल्यामुळें म्ह०स्वप्न जागरितजन्य वासनांपासून उद्भवलेलें असल्यामुळे जागरिततुल्यनिर्भासत्वाच्या अभिप्रायानें तें वाक्य आहे म्ह० जागरिता-

सारखा स्वप्नाचा आभास होतो, असा त्या साम्यवचनाचा आशय आहे. [-याप्रमाणें स्वप्नाचें सत्यत्व साधणारा हेतु नसून मिथ्यात्व साधणारा हेतु आहे असें सिद्ध झालें असतां '**तस्मात्०**' इत्यादि भाष्यानें त्याच्या फलिताचा उपसंहार करितात-]=म्हणून स्वप्नाचें मायामात्रत्व उपपन्न-युक्त आहे. ६.सु.ब्र.२७४.(१.)

(**२. तदभावाधिकरण. सू. ७-८**)

-ज्यांत बाह्य इंद्रियांचा उपशम होतो अशा स्वप्नाचें आत्म्याच्या स्वयंजोतिष्ट्वासाठीं निरूपण करून ज्यांत अन्तःकरणाचा उपरम होतो अशा सुषुप्तीचें आत्म्याच्या ब्रह्मत्वासाठीं '**तदभावः०**' इत्यादि सूत्रानें निरूपण करितात—

## सूत्रं-तदभावो नाडीषु तच्छ्रुतेरात्मनि च ।। ७

**सूत्रार्थ**—'तदभावः'-स्वप्नाचा अभाव (म्ह० सुषुप्ति) 'नाड्यांमध्यें व आत्म्यामध्यें' होतो. 'तच्छ्रुतेः'-कारण नाड्यादिकांना सुषुप्तस्थानत्व आहे, असें श्रुत आहे.७.-सु.ब्र.२७६.[-'**स्वप्नावस्था०**' इत्यादि भाष्यानें अधिकरणसंगति-]

**भाष्यं-स्वप्नावस्था परीक्षिता । सुषुप्तावस्थेदानीं परीक्ष्यते । तत्रैताः सुषुप्तिविषयाः श्रुतयो भवन्ति । क्वचित् श्रूयते—'तद्यत्रैतत्सुप्तः समस्तः संप्रसन्नः स्वप्नं न विजानात्यासु तदा नाडीषु सृप्तो भवति' इति । अन्यत्र तु नाडीरनुक्रम्य श्रूयते-'ताभिः प्रत्यवसृप्य पुरीतति शेते' इति ।।**

**भाष्यार्थ**—'स्वप्न' या दुसऱ्या अवस्थेचें परीक्षण केलें. आतां सुषुप्तावस्थेचें परीक्षण केलें जातें. [स्वप्नाभावाला त्याचें प्रतियोगी जें स्वप्न तदधीननिरूपणत्व असल्यामुळें या पूर्वोत्तर दोन अधिकरणांना हेतु-हेतुमत्त्व आहे, असा भावार्थ. -विषयवाक्यें उदाहृत करितात-]='**तत्र**'-सुषुप्तिविचाराच्या आरंभीं '**एताः०**'-सुषुप्तीविषयीं या अशा श्रुति आहेत-'**क्वचित्**'-एके ठिकाणीं असें श्रुत आहे. '**तत्**'-"त्या अवस्थांतील सुषुप्ति सांगितली जाते. '**यत्र**'-ज्या अवस्थेंत '**एतत्**'-ज्याप्रकारें गाढ झोंप लागेल अशा प्रकारें '**सुप्तः**'-निजलेला '**समस्तः**'-ज्याचीं सर्व बाह्य इंद्रियें लीन झालीं आहेत असा व '**संप्रसन्नः**'-ज्याचें अन्तःकरणहि लीन झालें आहे असा होत्साता '**स्वप्नं न विजानाति**'-स्वप्नाला जाणत नाहीं '**आसु०**'-त्यावेळीं तो या नाड्यांमध्यें '**सुप्तः०**'-गेलेला-शिरलेला असा होतो." -छां. ८. ६. ३. सु उ. ४७६.[-'**अन्यत्र०**' इत्यादि भाष्यानें नाड्या व पुरीतत् यांच्या समुच्चयाचें वाक्य पढतात-]=पण दुसऱ्या ठिकाणीं "त्या 'हिता-' नांवाच्या नाड्यांच्या द्वारा बुद्धीच्या मागोमाग जाऊन तो पुरिततींत-शरीरांत शयन करितो"-बृ. २. १. १९.सु.उ. ९८९.-असें नाड्यांचा उपक्रम करून श्रुत आहे.

[-नाडी व परमात्मा यांचें समुच्चयवाक्य 'तथा०' इत्यादि भाष्यानें दाखवितात-]

**भाष्यं—तथान्यत्र नाडीरेवानुक्रम्य "तासु तदा भवति यदा सुप्तः स्वप्नं न कंचन पश्यत्यथास्मिन्प्राण एवैकधा भवति" इति। तथान्यत्र 'य एषोऽन्तर्हृदय आकाशस्तस्मिञ्छेते' इति। तथान्यत्र 'सता सोम्य तदा संपन्नो भवति स्वमपीतो भवति' इति। 'प्राज्ञेनात्मना संपरिष्वक्तो न बाह्यं किंचन वेद नान्तरम्' इति च॥**

**भाष्यार्थ**—त्याचप्रमाणें आणखी तिसऱ्या ठिकाणीं "त्यावेळीं त्या नाड्यांमध्यें तो असतो; ज्यावेळीं तो कांहीं स्वप्न पहात नाहीं, तेव्हां या प्राणोपाधिक आनंदात्म्यांतच तो एकरूप होतो."-कौ. ४. १९. सु. उ. ८९६-असें नाड्यांचेंच अनुक्रमण करून श्रवण आहे [-'तथा०' इत्यादि भाष्यानें केवळ परमात्मविषय वाक्यें सांगतात-]=तसेंच आणखीं एका ठिकाणीं "जो हा अन्तर्हृदयांत आकाश-परमात्मा आहे त्यांत शयन करितो"-बृ. २. १. १७. सु. उ. ५८४-असें सांगितलें आहे. [-'तथा०' इत्यादि भाष्यानें परमात्मविषयच आणखी वाक्यांचा उल्लेख-]=तसेंच "हे सोम्य, त्यावेळीं सत्-शीं संपन्न होतो. आत्म्यालाच प्राप्त होतो" असें छांदोग्यांत श्रुत आहे व 'प्राज्ञेन०'-" प्राज्ञ आत्म्याशीं एकरूप झालेला-प्राज्ञाकडून आलिंगिलेला हा पुरुष देहाच्या बाहेरील व आंतील कांहीं जाणत नाहीं" असें बृहदारण्यकांत-सु. उ. पृ. ६७८ -श्रुत आहे. [-याप्रमाणें नाड्या, पुरितत् व ब्रह्म या तिन्ही अर्थीं सप्तमी विभक्ति योजिलेली असल्यामुळें व समुच्चयाचें कथन केलेलें असल्यामुळें 'तत्र०' इत्यादि भाष्यानें संशय सांगतात—]

**भाष्यं--तत्र संशयः—किमेतानि नाड्यादीनि परस्परनिरपेक्षतया भिन्नानि सुषुप्तिस्थानानि। आहोस्वित्परस्परापेक्षतया एकं सुषुप्तिस्थानमिति। किं तावत्प्राप्तं। भिन्नानीति॥**

**भाष्यार्थ**—त्याविषयीं 'हीं नाड्यादिक सुषुप्तिस्थानें परस्परनिरपेक्ष असल्यामुळें भिन्न आहेत कीं तीं परस्परांच्या अपेक्षेनेंच तिन्हीं मिळून एक सुषुप्तिस्थान आहे?' असा संशय येतो. [ या अधिकरणांत स्वापाच्या निरूपणद्वारा ब्रह्माभिन्नत्व अर्थतः सिद्ध होत असल्यामुळें वाक्यार्थज्ञानाचा संभव आहे. म्हणून याच्या पादादिसंगति आहेत. पूर्वपक्षांत 'स्थानांच्या विकल्पामुळें जीवांच्या ब्रह्मैक्याचा अनियम' व सिद्धान्तांत 'नाड्या व पुरितत् यांच्या द्वारा ब्रह्मस्थानत्वाचा नियम व त्यामुळें जीवाच्या ब्रह्मात्मत्वाची नियति' असा फलभेद मानून-'किं तावत्०' इत्यादि भाष्यानें विचारपूर्वक पूर्वपक्ष-]=मग अगोदर या दोन पक्षांतील

कोणता पक्ष प्राप्त झाला ? 'तीं भिन्न भिन्न स्थानें आहेत, ' असें प्राप्त झालें. [—नाड्या, पुरितत् व ब्रह्म यांच्या विकल्पाविषयीं वादी प्रश्नपूर्वक हेतु सांगतो—]

**भाष्यं—कुतः । एकार्थत्वात् । न ह्येकार्थानां क्वचित्परस्परापेक्षत्वं दृश्यते व्रीहियवादीनाम् । नाड्यादीनां त्वेकार्थता सुषुप्तौ दृश्यते—'नाडीषु सुप्तो भवति' 'पुरीतति शेते' इति च तत्र तत्र सप्तमीनिर्देशस्य तुल्यत्वात् ॥**

**भाष्यार्थ**—'**कुतः**'—कोणत्या कारणानें ? '**एकार्थत्वात्**'—एकार्थत्वामुळें, त्यांचें एकच प्रयोजन असल्यामुळें. [—" पण त्यांचें सुषुप्ति हें एकच प्रयोजन जरी असलें तरी त्यांना समुच्चयानें सुषुप्तिस्थानत्व आहे असें म्हणण्यांत कोणती हानि आहे ? " '**न हि०**' इत्यादि भाष्यानें उत्तर—]=कारण ज्यांचा अर्थ—प्रयोजन एक असतें, अशा व्रीहि-यवादिकांचें परस्पर-अपेक्षत्व कोठें दिसत नाहीं. [—" पण नाड्यादिकांमध्यें एकार्थत्वच कसें आहे ? " '**नाड्यादीनां च०**' इत्यादि भाष्यानें उत्तर—]=पण सुषुप्तीमध्यें नाड्यादिकांची एकार्थता—स्वापाची निरपेक्ष आधारता दिसते. " नाड्यांमध्यें गेलेला असा होतो " "पुरीततींत शयन करितो"—पृ. १०९ —असें त्या त्या वचनांत सप्तमीनिर्देशाला तुल्यत्व आहे. [—"अहोपण, 'या प्राणामध्येंच एकधा—एकरूप होतो '—पृ. ११०—या वाक्यांतहि सप्तमीला जर आधारत्व असेल तर ' सता सोम्य० ' या श्रुतींत ' सत्-'शब्दाची तृतीया असल्यामुळें त्याला आधारत्व नाहीं " अशी '**ननु०**' इत्यादि भाष्यानें शंका—]

**भाष्यं—ननु च न सति सप्तमीनिर्देशो दृश्यते—'सता सोम्य तदा संपन्नो भवति' इति । नैष दोषः । तत्रापि सप्तम्यर्थस्य गम्यमानत्वात् । वाक्यशेषो हि तत्र आयतनैषी जीवः सदुपसर्पतीत्याह—'अन्यत्रायतनमलब्ध्वा प्राणमेवोपश्रयते' इति । प्राणशब्देन तत्र प्रकृतस्य सत उपादानात् । आयतनं च सप्तम्यर्थः ॥**

**भाष्यार्थ**—" अहोपण, ' हे सोम्य, त्या वेळीं हा सत्-शीं संपन्न होतो ' पृ. ११०—या वाक्यांत 'सत्-'मध्यें सप्तमीचा निर्देश दिसत नाहीं. " [—साक्षात् सप्तमीचा अभाव जरी असला तरी तिचा अर्थ सिद्ध होत असल्यामुळें 'सत्-'लाहि आधारत्व आहे, असें वादी '**नैष दोषः०**' इत्यादि भाष्यानें सांगतो—]=हा दोष नाहीं. कारण '**तत्रापि**'—नाड्यादिकांमध्यें जसा तसाच सत्-मध्येंहि सप्तमीचा अर्थ अवगत होतो. [—सप्तमीच्या अर्थाला गम्यमानत्व कसें आहे तेंच वादी '**वाक्यशेषः०**' इत्यादि भाष्यानें सांगतो—]=कारण " दुसऱ्या कोठेंहि आधार न मिळून प्राणाचाच आश्रय करितो "—छां. ६. ८. २. सु. उ. ४३१—असा हा वाक्यशेष (त्याच वाक्याचें शेषवाक्य) ' सत् ' या आयतनाची—आधाराची इच्छा करणारा

जीव 'सत्-'जवळ जातो, असें सांगतो. [-" पण प्राणशब्दाला आयतनत्व जरी असलें तरी त्यानें 'सत्-'चें काय होतें?" 'प्राणशब्देन०' इत्यादि उत्तर-]=प्राणशब्दानें 'सता सोम्य०' इत्यादि वाक्यांत प्रकृत असलेल्या सत्-च ग्रहण केलेलें असल्यामुळें त्याचें सप्तम्यर्थत्व अवगत होतें. [-" अहोपण, प्राणशब्दानें सत्-चें ग्रहण जरी केलेलें असलें तरी त्यावरून सप्तम्यर्थत्व कसें अवगत होतें?" 'आयतनं०' या भाष्यानें उत्तर-]=आणि आयतन-आधार हा सप्तमीचा अर्थ आहे. [पण वाद्यानें 'सत्-'शब्दामध्यें सप्तमीचा निर्देश नाहीं, असें मानून हें समाधान सांगितलें. परंतु वस्तुतः सप्तमीचा निर्देश नाहीं, असेंहि नाहीं, असें तो 'सप्तमीनिर्देशः०' इत्यादि भाष्यानें सांगतो-]

**भाष्यं—सप्तमीनिर्देशोऽपि तत्र वाक्यशेषे दृश्यते-'सति संपद्य न विदुः सति संपद्यामहे' इति। सर्वत्र च विशेषविज्ञानोपरमलक्षणं सुषुप्तं न विशिष्यते। तस्मादेकार्थत्वान्नाड्यादीनां विकल्पेन कदाचित्किंचित्स्थानं स्वापायोपसर्पतीति॥**

**भाष्यार्थ**—" त्या सत-मध्यें संपन्न होऊन आम्ही सत्-मध्यें संपन्न होतों, असें हें जाणत नाहींत "-छां. ६.९.२. सु.उ. ४३४-या वाक्यशेषांत असा त्या सत्-मध्यें सप्तमीचा निर्देश केलेलाहि दिसतो. [-" अहोपण, विशेषज्ञानाचा उपरम या स्वरूपाच्या स्वापाचा नाड्या व पुरीतत् यांमध्यें संभव नसल्यामुळें त्यांना सुषुप्तिस्थानत्व नाहीं " अशी आशंका घेऊन वादी शास्त्रप्रामाण्याचा आश्रय करून '**सर्वत्र च०**' इत्यादि भाष्यानें म्हणतो-]=आणि त्या सर्व स्थानांमध्यें विशेषविज्ञानाचा उपरम या स्वरूपाचें सुषुप्त भेद पावत नाहीं, त्यांत कांहीं विशेष सांगितला जात नाहीं. ['नाड्यादिकांचें जीवाधारत्व अयुक्त आहे,' असें म्हणतां येत नाहीं. कारण त्यांना बुद्ध्युपाधिक जीवाचें आधारत्व असणें, यांत कांहीं विरोध नाहीं. " अहोपण, सुषुप्तीच्या स्थानाचा विकल्प मानिल्यास कोणत्या तरी एका स्थानाचा बाध होत असल्यामुळें त्यांचा समुच्चयच मानणें उचित आहे " हें म्हणणेंहि सयुक्तिक नाहीं. कारण समुच्चयपक्षीं त्यांतील प्रत्येकाच्या सप्तमीश्रुतीनें सिद्ध होणाऱ्या त्यांच्या निरपेक्ष आधारत्वाचा अत्यंत बाध होतो. पण 'त्या नाड्यांच्या द्वारा बुद्धीच्या मागोमाग आंत जाऊन'-पृ.१०९-इत्यादि वाक्यांत एखादे वेळीं नाड्याच सुषुप्तीचा आधार आहे असें सांगितलें आहे. केव्हां त्या नाड्यांच्या द्वारा संचार करणाऱ्या जीवाचें 'पुरीतत्' हेंच आयतन सांगितलें आहे व केव्हां त्यांच्या द्वारा संचार करणाऱ्या त्याचा ब्रह्मच आधार सांगितला आहे. त्यामुळें कालभेदानें त्या तिहींनाहि आधार मानणें युक्त नाहीं, नाहींतर निरपेक्ष आधारत्वश्रुतींशीं विरोध

येतो, असें मानून वादी 'तस्मात्०' इत्यादि भाष्यानें पूर्वपक्षाचा उपसंहार करितो–] =म्हणून नाड्यादिकांना एकार्थत्व असल्यामुळें तो विकल्पानें कदाचित् त्यांतील कोणत्या तरी एखाद्या स्थानास स्वापासाठीं प्राप्त होतो, 'इति'–असा सुषुप्तस्थानाचा विकल्प असल्यामुळें जीवाचें ब्रह्मैक्य अनियत आहे, असें सिद्ध झालें. [–'एवं०' इत्यादि भाष्यानें अशा या पूर्वपक्षाचा अनुवाद करून सिद्धान्त सांगतात—]

**भाष्यं—एवं प्राप्ते प्रतिपाद्यते–तदभावो नाडीष्वात्मनि चेति । तदभाव इति तस्य प्रकृतस्य स्वप्नदर्शनस्याभावः। सुषुप्तमित्यर्थः । नाडीष्वात्मनि चेति समुच्चयेनैतानि नाड्यादीनि स्वापायोपसर्पति न विकल्पेनेत्यर्थः । कुतः। तच्छ्रुतेः । तथाहि सर्वेषामेव नाड्यादीनां तत्र तत्र सुषुप्तिस्थानत्वं श्रूयते । तच्च समुच्चये संगृहीतं भवति । विकल्पे ह्येषां पक्षे बाधः स्यात् ॥**

**भाष्यार्थ**—असा पूर्वपक्ष प्राप्त झाला असतां '**तदभावः**'–स्वप्नाचा अभाव –सुषुप्त '**नाडीषु**'–नाड्यांमध्यें '**आत्मनि च**'–व आत्म्यामध्यें होतो,असा सिद्धान्त प्रतिपादिला जातो. 'तदभाव' म्ह० त्या प्रकृत स्वप्नदर्शनाचा अभाव, सुषुप्त असा याचा भावार्थ. नाड्यांमध्यें, आत्म्यामध्यें [–सूत्रांतील 'च-'कारानें 'पुरीतत्-'चें कथन स्वीकारून '**समुच्चयेन०**' इत्यादि भाष्यानें व्याख्यान करितात–]=व पुरीतत्-मध्यें अशा समुच्चयानें या नाड्यादिकांस स्वापासाठीं प्राप्त होतो. विकल्पानें म्ह० केव्हां नाड्यांस, केव्हां पुरीततेस व केव्हां आत्म्यास असा तो स्वापासाठीं प्राप्त होत नाहीं, असा भावार्थ. [–नाड्यादिकांचा समुच्चय, या सिद्धान्तांतील हेतु प्रश्नपूर्वक सांगून त्याचें व्याख्यान–]='**कुतः**'–कोणत्या कारणानें समुच्चयानें त्यांस प्राप्त होतो ? '**तच्छ्रुतेः**'–तशी समुच्चय सुचविणारी श्रुति असल्यामुळें. '**तथा हि०**'–कारण नाड्यादि सर्वांचेंच त्या त्या श्रुतिवचनांत तसें [सुषुप्तिस्थानत्व श्रुत आहे आणि तें सर्वांचें श्रवण समुच्चयपक्षींच संगृहीत होतें. समुच्चयपक्षींच त्या सर्वांचा संग्रह केला आहे, असें होतें. विकल्पपक्षीं सर्वांचा संग्रह होत नाहीं. –" अहोपण, नाड्यादिकांची सुप्तिस्थानत्वश्रुतिविकल्पपक्षांतहि संभवेल" अशी आशंका घेऊन आचार्य म्हणतात–]='**विकल्पे०**'–कारण विकल्पानें त्यांचें सुषुप्तिस्थानत्व मानल्यास पक्षामध्यें त्यांचा बाध होईल. [या तिहींतील कोणा तरी एकाला सुषुप्तिस्थानत्व जेव्हां असेल तेव्हां इतराला तें नाहीं, असा पक्षामध्यें त्याचा बाध होतो. पण तो अयुक्त आहे. कारण बाध मानणें ही अगतिकागति आहे, तो अनिर्वाहपक्ष आहे, असा भावार्थ.–आतां '**ननु०**' इत्यादि भाष्यानें वाद्यानें सांगितलेल्या विकल्पाच्या हेतूचा अनुवाद करितात—]

**भाष्यं—नन्वेकार्थत्वाद्विकल्पो नाड्यादीनां व्रीहियवादिवदित्युक्तम् । नेत्युच्यते । न हि एकविभक्तिनिर्देशमात्रेणैकार्थत्वं विकल्पश्च भवति । नानार्थत्वसमुच्चययोरपि एकविभक्तिनिर्देशदर्शनात्, प्रासादे शेते पर्यंके शेते इत्येवमादिषु । तथेहापि नाडीषु पुरीतति ब्रह्मणि च स्वपितीत्येतदुपपद्यते समुच्चयः ॥**

**भाष्यार्थ**—अहोपण, 'एकार्थत्वामुळें व्रीहि-यवादिकांप्रमाणें नाड्यादिकांचा विकल्प आहे,' असें आम्हीं वर–पृ.१११–सांगितलें आहे. [–'**नेत्युच्यते**'–या भाष्यानें दृष्टान्त व दार्ष्टान्तिक यांतील वैषम्य दाखवितात–]=व्रीहि-यवादिकांप्रमाणें एकार्थत्वामुळें नाड्यादिकांच्या सुषुप्तिस्थानत्वाचा विकल्प होऊं शकत नाहीं, असें आम्हांकडून सांगितलें जातें. [ प्रकृत दर्शादिसाधनीभूत पुरोडाशाची प्रकृति–मूळद्रव्य या रूपानें व्रीहि व यव श्रुत आहेत व ते दोन्ही एकमेकांची अपेक्षा न करितां पुरोडाश करण्यास समर्थ आहेत. त्यांना परस्परांची अपेक्षा आहे, असें म्हटल्यास 'त्यांना अनपेक्षसाधनत्व आहे' अशा अर्थाच्या श्रुतीचा बाध होतो. म्हणून तेथें, अनन्यगतित्वानें, विकल्पाचा आश्रय केला आहे. पण नाड्यादिकांतील प्रत्येकाला स्वापसिद्ध करण्याची शक्ति नाहीं, असें पुढें भाष्यकार सांगतील. त्याविषयीं कांहीं प्रमाण नाहीं, असा भावार्थ. आतां त्यांचें एकार्थत्व जें सांगितलें आहे तें दुसऱ्या प्रमाणानें सिद्ध आहे कीं सप्तमी विभक्तीनें? यांतील पहिला पक्ष संभवत नाहीं. कारण तसें प्रमाण कोठें उपलब्ध होत नाहीं.–'**न हि०**' इत्यादि भाष्यानें दुसऱ्या पक्षाचें निरसन करितात–]=केवल एकाच विभक्तीचा निर्देश केलेला असणें, एवढ्यावरून एकार्थत्व व विकल्प होऊं शकत नाहीं. कारण 'मोठ्या राजमंदिरांत शयन करितो, पर्यंकावर शयन करितो' या व अशाच दुसऱ्याहि उदाहरणांत नानार्थत्व व समुच्चय यांमध्येंहि एका विभक्तीचा निर्देश होत असलेला दिसतो. [ प्रासादाचें पर्यंकधारणार्थत्व, पर्यंकाचें शयनार्थत्व अशा नानार्थत्वामध्येंहि एका विभक्तीचा निर्देश होतो. व्यवधान व अव्यवधान म्ह० परंपरेनें व साक्षात् यांच्या योगानें शयनसाधनत्वाचा समुच्चय आहे व–त्याचप्रमाणें या श्रुतींमध्येंहि नाड्यादिकांत सप्तमीसमुच्चय आहे, असें '**तथा इहापि०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=त्याचप्रमाणें येथेंहि नाड्यांमध्यें, पुरीततींत व ब्रह्मामध्यें निजतो असा यांचा समुच्चय उपपन्न होतो. [–अनेक श्रुतिसामर्थ्याच्या आलोचनानें समुच्चय सांगून '**तथा च०**' इत्यादि भाष्यानें त्याच अर्थी श्रुति सांगतात––]

**भाष्यं—तथा च श्रुतिः–"तासु तदा भवति यदा सुप्तः स्वप्नं न कंचन पश्यत्यथास्मिन्प्राण एवैकधा भवति" इति । समुच्चयं नाडीनां प्राणस्य च**

**सुषुप्तौ श्रावयति एकवाक्योपादानात् । प्राणस्य च ब्रह्मत्वं समधिगतं 'प्राणस्तथानुगमात्' इत्यत्र ॥**

**भाष्यार्थ**—आणि तशीच "त्या नाड्यांमध्यें-त्यांच्या सामीप्यानें तो पुरुष तेव्हां-स्वप्नसमयीं असतो. पण जेव्हां गाढ झोंपीं गेलेला हा कोणतेंहि स्वप्न पहात नाहीं तेव्हां या प्राणोपाधिक आनंदात्म्यांतच एकरूप होतो."-पृ.११०-ही श्रुति आहे. [-'**समुच्चयं०**' इत्यादि भाष्यानें उक्त श्रुतीचें तात्पर्य सांगतात-]= ही श्रुति सुषुप्तींत नाड्यांचा व प्राणाचा समुच्चय ऐकविते-ती त्यांचा समुच्चय सांगते.[-'**एक०**' इत्यादि भाष्यानें त्याविषयीं हेतु-]=कारण नाड्या व प्राण यांचें एका वाक्यानें उपादान-ग्रहण केल्यामुळें त्यांचा परस्पर समुच्चय होतो. [-" अहोपण, प्राणाचा नाडींशीं समुच्चय जरी असला तरी ब्रह्माचा त्यांच्याशीं समुच्चय आहे, हें कसें सिद्ध झालें ?" '**प्राणस्य०**' इत्यादि भाष्यानें उत्तर-]=आणि प्राणाचें ब्रह्मत्व-'प्राणोऽस्मि प्रज्ञात्मा' "या वाक्यांतील प्राण ब्रह्म आहे. कारण त्याविषयीं अनेक लिंगांचें ज्ञान होतें"-अ.१.पृ. ३१९-अशा अर्थाच्या 'प्राणस्तथानुगमात्'-ब्र.सू.१.१.२८ -या सूत्रांत चांगल्या प्रकारें अधिगत झालें आहे. [-"अहोपण, समुच्चयपक्षीं त्यांचें नैरपेक्ष्य द्योतित करणारें श्रुत्यन्तर विरुद्ध होईल" अशी आशंका घेऊन '**यत्रापि०**' इत्यादि भाष्यानें आचार्य तिचें समाधान सांगतात—]

**भाष्यं**—**यत्रापि निरपेक्षा एव नाडीः सुषुप्तिस्थानत्वेन श्रावयति-'आसु तदा नाडीषु सृप्तो भवति' इति तत्रापि प्रदेशान्तरप्रसिद्धस्य ब्रह्मणोऽप्रतिषेधान्नाडीद्वारेणैव ब्रह्मण्येवावतिष्ठत इति प्रतीयते । न चैवमपि नाडीषु सप्तमी विरुध्यते । नाडीद्वारापि ब्रह्मोपसर्पन्सृप्त एव नाडीषु भवति । यो हि गंगया सागरं गच्छति गत एव स गंगायां भवति ॥**

**भाष्यार्थ**—आणि 'तेव्हां या नाड्यांमध्यें तो गेलेला असा होतो'-पृ.१०९-अशी ही श्रुति जेथें निरपेक्ष स्थानान्तराची अपेक्षा न करणाऱ्या नाड्याच सुषुप्तस्थानत्वानें ऐकविते- केवळ नाड्याच सुषुप्तस्थान सांगते तेथेंहि दुसऱ्या श्रुतिप्रदेशांत प्रसिद्ध असलेल्या ब्रह्माचा प्रतिषेध केलेला नसल्यामुळें त्या नाड्यांच्या द्वाराच जीव ब्रह्मामध्येंच जाऊन अवस्थित होतो, असें प्रतीत होतें.[-"अहोपण, नाड्यांना जर द्वारत्व असेल तर त्यांची अधिकरणश्रुति कशी संभवेल" अशी आशंका घेऊन '**न च०**' इत्यादि भाष्यानें समाधान-]=नाड्यांना ब्रह्मगमनाचें द्वारत्व जरी असलें तरी नाड्यांतील सप्तमी विरुद्ध होत नाहीं [नाड्यांदिकांतील सप्तमीचा सामीप्य हा अर्थ स्वीकारून ब्रह्मामध्यें तिला अधिकरणार्थत्व जरी

असलें तरी विभक्तीशीं विरोध येत नाहीं, असा भावार्थ.–'नाडीद्वारा०' इत्यादि भाष्यानें विरोधाभाव साधितात–]=नाडयांच्या द्वाराहि ब्रह्मामध्यें जाणारा जीव नाडयांमध्यें गेला आहे, असेंच होतें. [–'यो हि०' इत्यादि भाष्यानें हेंच दृष्टान्तानें स्पष्ट करितात–]=कारण जो गंगेच्या द्वारा सागराला जातो तो गंगेंत गेलेलाच आहे, असें होतें. [–याहि कारणानें ब्रह्म हेंच एक स्वापाचें अधिकरण आहे, असें 'अपि च०' या भाष्यानें सांगतात—]

**भाष्यं—अपि च। अत्र रश्मिनाडीद्वारात्मकस्य ब्रह्मलोकमार्गस्य विवक्षितत्वान्नाडीस्तुत्यर्थं सृप्तिसंकीर्तनम्। 'नाडीषु सृप्तो भवति' इत्युक्त्वा 'तं न कश्चन पाप्मा स्पृशति, इति ब्रुवन्नाडीः प्रशंसति। ब्रवीति च पाप्मस्पर्शाभावे हेतुं 'तेजसा हि तदा संपन्नो भवति' इति। तेजसा नाडीगतेन पित्ताख्येन अभिव्याप्तकरणो न बाह्यान्विषयानीक्षत इत्यर्थः॥**

**भाष्यार्थ**—शिवाय ब्रह्मच सुषुप्तीचें अधिकरण आहे, याविषयीं आणखींहि एक हेतु आहे. [–" तर मग नाड्यांतील सृप्तीचें–गमनाचें कथन व्यर्थ आहे" अशी आशंका घेऊन तें हेत्वन्तरच 'अत्र०' इत्यादि भाष्यानें स्पष्ट करितात–] =या नाडीप्रकरणांत रश्मि-नाडीद्वारात्मक ब्रह्मलोकमार्ग विवक्षित असल्यामुळें नाड्यांच्या स्तुतीसाठीं नाडीगमनाचें कथन केलेलें आहे. [–मार्गाचा उपदेश करण्यासाठीं सांगितलेल्या नाड्यांच्या स्तुतीकरितां नाडीसृप्तिसंकीर्तन आहे, याविषयीं गमक–लिंग 'नाडीषु०' इत्यादि वाक्यानें सांगतात-]='नाड्यांमध्यें गेलेला असा होतो,' असें सांगून 'त्याला कोणत्याहि प्रकारचें पाप स्पर्श करीत नाहीं' छां. ८, ६. ३. सु. उ. पृ. ४७७–असें सांगणारा वेद नाड्यांची प्रशंसा करितो [–"त्या नाडयांमध्यें प्रवेश केलेल्या जीवाला धर्माधर्मादि पापांचा स्पर्श न होण्याचें कारण काय?" 'ब्रवीति च०' इत्यादि भाष्यानें उत्तर सांगतात–]=आणि पापस्पर्शाच्या अभावाविषयीं "कारण त्या वेळीं तो तेजानेंच व्याप्त होतो."–सु. उ. ४७७–असा हेतु सांगतो. [–'तेजसा०' इत्यादि भाष्यानें हेतूचा विभाग करितात–]= नाडयांतील पित्ताख्य तेजानें ज्याचीं सर्व करणें व्याप्त झालेलीं आहेत असा तो जीव बाह्य विषयांना पहात नाहीं, असा त्या वाक्याचा अर्थ आहे. [विषयदर्शनाच्या अभावीं विषयजन्य सुखाचाहि अभाव होतो. त्यामुळें सुखादिकांचें निमित्त अशा धर्मादिकांचेंहि अनुमान होत नाहीं. म्हणून त्याला पापांचा अस्पर्श आहे, असा याला शेष लावावा.–'अथवा०' इत्यादि भाष्यानें वरील हेतुवाक्याचें दुसऱ्या प्रकारें व्याख्यान करितात—]

**भाष्यं—अथवा तेजसेति ब्रह्मण एवायं निर्देशः। श्रुत्यंतरे 'ब्रह्मैव तेज एव' इति तेजःशब्दस्य ब्रह्मणि प्रयुक्तत्वात्। ब्रह्मणा हि तदा संपन्नो भवति नाडीद्वारेण। अतस्तं न कश्चन पाप्मा स्पृशतीत्यर्थः। ब्रह्मसंपत्तिश्च पाप्मस्पर्शाभावे हेतुः समधिगतः 'सर्वे पाप्मानोऽतो निवर्तन्तेऽपहतपाप्मा ह्येष ब्रह्मलोकः' इत्यादिश्रुतिभ्यः॥**

**भाष्यार्थ**—अथवा 'तेजसा' असा हा ब्रह्माचाच निर्देश आहे. कारण दुसऱ्या श्रुतींत 'ब्रह्मच तेजच'–बृ. ४. ४. ७. सु. उ. ६९२–असा 'तेजः-'शब्दाचा ब्रह्मामध्यें–'ब्रह्म' या अर्थी प्रयोग केलेला आहे. [–"अहोपण, त्याला त्यावेळीं ब्रह्मसंपत्ति–ब्रह्मप्राप्ति जरी होत असली तरी धर्माधर्मादय पापाचा अस्पर्श कसा?" '**ब्रह्मणा०**' इत्यादि भाष्यानें उत्तर–]=कारण त्यावेळीं तो नाड्यांच्या द्वारा ब्रह्मानें संपन्न–व्याप्त होतो–ब्रह्मरूप होतो. त्यामुळें त्याला कोणतेंहि पाप स्पर्श करीत नाहीं, असा भावार्थ. '**ब्रह्मसंपत्तिश्च०**'–आणि ब्रह्मसंपत्ति हा पापस्पर्शाच्या अभावाविषयीं हेतु "सर्व पापें यास प्राप्त न होतांच याच्यापासून निवृत्त होतात. कारण हा ब्रह्मलोक अपहतपाप्माच–सर्वपापरहितच आहे"–छां. ८.४. १. सु.उ.४७२ –इत्यादि श्रुतींवरून चांगल्या प्रकारें ज्ञात झालेला आहे. [–"तर मग या तुमच्या दोन व्याख्यानांतील कोणतें व्याख्यान ग्राह्य आहे" अशी आशंका घेऊन 'त्यांतील दुसरें व्याख्यान ग्राह्य आहे,' असें '**एवं च०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]

**भाष्यं—एवं च सति प्रदेशान्तरप्रसिद्धेन ब्रह्मणा सुषुप्तिस्थानेनानुगतो नाडीनां समुच्चयः समधिगतो भवति॥**

**भाष्यार्थ**—आणि याप्रमाणें नाड्यांना ब्रह्मप्राप्तिद्वारत्व आहे, असें सिद्ध झालें असतां दुसऱ्या श्रुतिप्रदेशीं प्र-सिद्ध–आधिक्यानें सिद्ध झालेल्या ब्रह्म या सुषुप्तिस्थानानें अनुगत असलेला नाड्यांचा समुच्चय समधिगत–सम्यग् ज्ञात होतो. [–"अहोपण, नाड्यांच्या द्वारा ब्रह्माला जर स्वापस्थानत्व असेल तर 'त्या नाड्यांतून गमन करून पुरीततींत शयन करितो' ही पुरीतत्-उक्ति व्यर्थ होईल" अशी आशंका घेऊन 'पुरीतत् व ब्रह्म यांचाहि गुण-प्रधानभावानें समुच्चय' '**तथा पुरीततोऽपि०**' इत्यादि भाष्यानें सांगतात—]

**भाष्यं—तथा पुरीततोऽपि ब्रह्मप्रक्रियायां संकीर्तनात्तदनुगुणमेव सुषुप्तिस्थानत्वं विज्ञायते। 'य एषोऽन्तर्हृदय आकाशस्तस्मिञ्छेते' इति हृदयाकाशे सुप्तिस्थाने प्रकृते इदमुच्यते 'पुरीतति शेते' इति। पुरीतदिति हृदयपरिवेष्टनमुच्यते। तदंतर्वर्तिन्यपि हृदयाकाशे शयानः शक्यते पुरीतति शेत इति वक्तुम्।**

**प्राकारपरिक्षिप्तेऽपि पुरे वर्तमानः प्राकारे वर्तत इत्युच्यते । हृदयाकाशस्य च ब्रह्मत्वं समधिगतं ' दहर उत्तरेभ्यः ' इत्यत्र ॥**

**भाष्यार्थ**--तसेंच पुरीतत्-चेंहि ब्रह्मप्रकरणांत संकीर्तन-कथन केलेलें असल्या- मुळें तदनुगुणच-ब्रह्माचें सुषुप्तस्थानत्व विज्ञात होतें. [-'**यः एषः०**' इत्यादि वाक्यानें उक्तार्थाचेंच विवरण करितात-]=" जो हा अन्तर्हृदयांत आकाश आहे त्यांत शयन करितो. "-पृ. ११०-असें हृदयांतील आकाश-परमात्मा हें सुषुप्ति- स्थान प्रकृत असतांना 'पुरीततींत शयन करितो' पृ.-१०९-असें हें सांगितलें जातें. 'पुरीतत्' या शब्दानें हृदयाचें परिवेष्टन सांगितलेलें आहे. [-" अहोपण, हृदयाकाशांत जर तो शयन करीत असेल तर पुरीततींत कसा शयन करितो ? " '**तदन्तर्वर्तिनि०**' इत्यादि भाष्यानें उत्तर-]=त्या हृदयपरिवेष्ट- नाच्या आंत असलेल्याहि हृदयाकाशांत शयन करणारा जीव 'पुरीततींत शयन करितो' असें म्हणतां येणें शक्य आहे. [-'**प्राकार०**' इत्यादि भाष्यानें तेंच दृष्टान्तानें स्पष्ट करितात-]=प्राकारानें म्ह० तटानें-कोटानें परिवेष्टित असलेल्याहि पुरांत-नगरांत राहणारा प्राकारांत राहतो, असें म्हटलें जातें. [-"अहोपण, याप्रमाणें पुरीतत् व आकाश यांचा समुच्चय जरी असला तरी त्यावरून पुरीतत् व ब्रह्म यांचा समुच्चय कसा सिद्ध होतो !" '**हृदयाकाशस्य०**' इत्यादि भाष्यानें उत्तर-] =आणि हृदयाकाशाचें ब्रह्मत्व 'दहर परमात्मा आहे. पुढील हेतूंवरून' -ब्र. भा. १.३.१४.पृ.५१९-या सूत्रांत चांगल्या प्रकारें सिद्ध-ज्ञात झालें आहे. [-याप्रमाणें नाड्या व ब्रह्म यांच्या समुच्चयाप्रमाणें पुरीतत् व ब्रह्म यांचाहि समुच्चय सांगून आतां '**तथा नाडी०**' इत्यादि भाष्यानें नाड्या व पुरीतत् यांचा समुच्चय सांगतात-]

**भाष्यं**--**तथा नाडीपुरीतत्समुच्चयोऽपि 'ताभिः प्रत्यवसृप्य पुरीतति शेते' इत्येकवाक्योपादानादवगम्यते । सत्प्राज्ञयोश्च प्रसिद्धमेव ब्रह्मत्वम् । एव- मेतासु श्रुतिषु त्रीण्येव सुषुप्तिस्थानानि संकीर्तितानि । नाड्यः पुरीतद्ब्रह्म चेति। तत्रापि द्वारमात्रं नाड्यः पुरीतच्च । ब्रह्मैव त्वेकं सुषुप्तिस्थानम् ॥**

**भाष्यार्थ**--तसाच नाड्या व पुरीतत् यांचा समुच्चयहि "त्या नाड्यांच्या द्वारा आंत प्रवेश करून पुरीतत्-मध्यें शयन करितो "-पृ. १०९अशा एकवाक्योपादा- नानें-एका वाक्यांत त्यांचें ग्रहण केल्यामुळें अवगत होतें. [-"अहोपण, सत् व प्राज्ञ यांच्याहि सुषुप्तिस्थानत्वाची उक्ति आहे. तेव्हां नाड्या, पुरीतत् व ब्रह्म यांचाच समुच्चय कसा सांगतां ? " '**सत्प्राज्ञयोश्च०**' इत्यादि भाष्यानें उत्तर-] =आणि सत् व प्राज्ञ यांचें ब्रह्मत्व प्रसिद्धच आहे. [-'**एवं०**' इत्यादि भाष्यानें

समुच्चयपक्षाचा उपसंहार करितात–]=याप्रमाणें या सर्व श्रुतींमध्यें नाड्या, पुरी- तत् व ब्रह्म अशीं हीं तीनच सुषुप्तिस्थानें सांगितलेलीं आहेत. [–'**तत्रापि०**' इत्यादि भाष्यानें त्या तीन स्थानांतील अवान्तर विभाग सांगतात–]=त्यांतहि नाड्या व पुरीतत् हें केवळ द्वार आहे.पण ब्रह्म हेंच एक सुषुप्तिस्थान आहे.[–'**अपि च०**' इत्यादि भाष्यानें नाड्या व पुरीतत् यांच्या द्वारत्वाविषयीं हेत्वन्तर सांगतात—]

**भाष्यं—अपि च नाड्यः पुरीतद्वा जीवस्योपाध्याधार एव भवति । तत्रास्य करणानि वर्तन्त इति । न हि उपाधिसंबंधमंतरेण स्वत एव जीवस्याधारः कश्चित्संभवति । ब्रह्माव्यतिरेकेण स्वमहिमप्रतिष्ठितत्वात् । ब्रह्माधारत्वमप्यस्य सुषुप्ते नैव आधाराधेयभेदाभिप्रायेणोच्यते । कथं तर्हि । तादात्म्याभिप्रायेण । यत आह—' सता सोम्य तदा संपन्नो भवति स्वमपीतो भवति ' इति । स्वशब्देनात्माभिलप्यते । स्वरूपमापन्नः सुप्तो भवतीत्यर्थः ॥**

**भाष्यार्थ—**शिवाय नाड्या किंवा पुरीतत् हा जीवाच्या उपाधीचा आधारच आहे. [–"पण त्यांना उपाधीचें आधारत्व तरी कसें?" '**तत्र०**' इत्यादि भाष्यानें उत्तर–]=कारण त्यांत या जीवाचीं करणें रहातात. [ नाड्यांत व पुरीततींत जीवाच्या उपाधींत अंतर्भूत होणारीं करणें–कर्मे रहातात,म्हणून त्या दोहोंना उपाधि- आधारत्व सांगितलें आहे. पण जीवाचा आधार ब्रह्मच आहे, असा याचा भावार्थ. –"अहोपण, नाड्या व पुरीतत् या दोहोंचें प्रत्यक्षच जीवाधारत्व कां इष्ट नाहीं!" '**न हि०**' इत्यादि भाष्यानें उत्तर–]=कारण उपाधिसंबंधावांचून जीवाचा स्वतःच –साक्षात्च कोणी आधार संभवत नाहीं. कारण ब्रह्माच्या अव्यतिरेकानें–ब्रह्माच्या अभेदानें जीवाला स्वमहिमप्रतिष्ठितत्व–स्वरूपप्रतिष्ठितत्व आहे. [–" तर मग ब्रह्माला तरी जीवाधारत्व कसें ? कारण त्याचें ऐक्य आहे." अशी आशंका घेऊन '**ब्रह्माधारत्वं०**' इत्यादि भाष्यानें आचार्य म्हणतात–]=सुषुप्तींत जीवाचें ब्रह्माधार- त्वहि आधार व आधेय या भेदाच्या अभिप्रायानें सांगितलें जात नाहींच. तर मग कसें ! त्यांच्या तादात्म्याच्या अभिप्रायानें तें सांगितलें जातें.[–स्वापांत तादात्म्या- भिप्रायानें जीवाची ब्रह्माधारत्वोक्ति आहे याविषयी '**यतः०**' इत्यादि भाष्यानें लिंग सांगतात–]=कारण "हे सोम्य, त्यावेळीं हा जीव सत्-नें संपन्न होतो– सद्रूप होतो. स्वरूपामध्यें लीन झालेला असा होतो"–पृ. ११०–असें श्रुति सांगते. [–" अहोपण, 'स्व-'शब्दाचा स्वकीय–आपला असा अर्थ आहे. त्यामुळें या वाक्यांत त्यांचें तादात्म्य भासत नाहीं," अशी आशंका घेऊन '**स्वशब्देन०**' इत्यादि भाष्यानें पदार्थोक्तिपूर्वक वाक्यार्थ सांगतात–]=येथील 'स्व-'शब्दानें आत्मा सांगि-

तला जातो. स्वरूपास प्राप्त झालेला असा तो सुप्त होतो, असा याचा भावार्थ. [-जीवाला ब्रह्मैक्यच आहे, पण नाडी व पुरीतत् यांना जीवाच्या उपाधि-आधारत्वानें जीवाधारत्व आहे, याप्रमाणें ब्रह्म आणि नाड्या व पुरीतत् यांना तुल्यार्थत्व नसल्यामुळें सुषुप्तिस्थानांचा विकल्प नाहीं, असें सांगितलें.-आतां 'अपि च०' इत्यादि भाष्यानें विकल्पाच्या असंभवाविषयीं हेत्वंतर सांगतात—]

**भाष्यं—अपि च न कदाचिज्जीवस्य ब्रह्मणा संपत्तिर्नास्ति । स्वरूपस्यानपायित्वात् । स्वप्नजागरितयोस्तु उपाधिसंपर्कवशात्पररूपापत्तिमिवापेक्ष्य तदुपशमात्सुषुप्तेः स्वरूपापत्तिर्वक्ष्यते अतश्च सुप्तावस्थायां कदाचित्सता संपद्यते कदाचिन्न संपद्यते इत्ययुक्तम् ॥**

**भाष्यार्थ**—शिवाय जीवाची ब्रह्मानें-ब्रह्मरूपानें संपत्ति-ब्रह्माशीं तादात्म्य केव्हांहि नाहीं, असें नाहीं. कारण स्वरूपाला अनपायित्व आहे. अपाय-नाश पावणें, हा स्वरूपाचा स्वभावच नाहीं. त्यामुळें जीवाचें ब्रह्माशीं तादात्म्य नाहीं, असें कधींच होत नाहीं. [-" अहोपण, जीवाचें ब्रह्मैक्य जर औत्सर्गिक-नियत आहे, तर मग स्वापामध्यें त्याचें-जीवाचें ब्रह्मरूपत्व कां सांगितलें जातें ?" '**स्वप्न-जागरितयोः०**' इत्यादि भाष्यानें उत्तर-]=पण स्वप्न व जागरित यांमध्यें उपाधिसंपर्कामुळें जणुं काय त्याला पररूपाची प्राप्ति होते, असें वाटतें, त्या भ्रामक पररूपापत्तीच्या अपेक्षेनें सुषुप्तींत त्या उपाधिसंपर्काचा उपशम-निवृत्ति होत असल्यामुळें तिची स्वरूपापत्ति सांगितली जाते.[-याप्रमाणें सुषुप्तीच्या अपवादाभावामुळें जीवाचें ब्रह्माशीं तादात्म्य सिद्ध झालें असतां '**अतश्च०**' इत्यादि भाष्यानें फलित सांगतात-]=आणि म्हणून जीव सुषुप्तावस्थेंत कदाचित् सत्नें संपन्न होतो व कदाचित् सत्संपन्न होत नाहीं, असें मानणें अयुक्त आहे, [-आणि याहि कारणानें सुषुप्तस्थानांच्या विकल्पाची असिद्धि '**अपि च०**' या भाष्यानें सांगतात-]

**भाष्यं—अपि च । स्थानविकल्पाभ्युपगमेऽपि विशेषविज्ञानोपशमलक्षणं तावत्सुषुप्तं न क्वचिद्विशिष्यते । तत्र सति संपन्नस्तावत्तदेकत्वान्न विजानातीति युक्तम् । 'तत्केन कं विजानीयात्' इति श्रुतेः । नाडीषु पुरीतति च शयानस्य न किंचिदविज्ञाने कारणं शक्यं विज्ञातुं । भेदविषयत्वात् । 'यत्र वा अन्यदिव स्यात्तत्रान्योऽन्यत्पश्येत्' इति श्रुतेः ॥**

**भाष्यार्थ**—आणि सुषुप्तस्थानांच्या विकल्पाची सिद्धि याहि कारणानें होत नाहीं. [-तें हेत्वन्तरच व्यक्त करणारे भाष्यकार विकल्पवाद्यालाहि संमत असलेला अर्थ '**स्थानविकल्प०**' इत्यादि भाष्यानें सांगतात-]=स्थानांच्या विकल्पाचा

स्वीकार जरी केला तरी विशेषविज्ञानोपशमरूप सुषुप्त तर कोठेंहि सविशेष होत नाहीं. [ विशेष विज्ञानाचा अभाव हें सुषुप्ताचें लक्षण-स्वरूप आहे. त्यामुळें तें सुषुप्त कोठेंहि-नाड्या, पुरीतत् किंवा ब्रह्म यांतील कोणत्याहि एका स्थानांत जरी झालें तरी त्याच्या त्या स्वरूपांत फरक पडत नाहीं. कारण विशेषविज्ञानाचा अभाव, या त्याच्या स्वरूपांत जर फरक-कांहीं विशेष असेल तर जागरादि अवस्थांप्रमाणें सुषुप्तीचा भंग होईल, असा याचा भावार्थ.-" अहोपण, स्वाप अशा स्वरूपाचा जरी असला तरी सुषुप्तस्थानांच्या विकल्पामध्यें काय अनुपपत्ति आहे ? " **'तत्र०'** इत्यादि भाष्यानें उत्तर-]=त्या सुषुप्तांत सत्-मध्यें संपन्न झालेला-ब्रह्मतादात्म्यास प्राप्त झालेला जीव ब्रह्मैकत्वामुळें अनात्मरूप असें दुसरें कांहीं जाणत नाहीं, असेंच समजणें युक्त आहे. [ येथील एकत्व म्ह० अद्वैतावस्थत्व. त्यामुळें तो द्वैत जाणत नाहीं, हेंच युक्त आहे.-सत्-मध्यें संपन्न झालेल्या जीवाच्या विशेष विज्ञानाभावाविषयीं प्रमाण सांगतात-]=कारण **' तत्केन कं विजानीयात् '**- त्या अद्वैतावस्थेंत कोणत्या साधनानें कोणाला जाणील,-सु.उ.५९९-अशी सुषुप्तावस्थ आत्म्याच्या विशेष विज्ञानाचा अभाव सांगणारी श्रुति आहे. [-" बाकी राहिलेल्या दोन स्थानांतीहि यथोक्त-विशेषविज्ञानाभावरूप सुषुप्त युक्तच आहे, " अशी आशंका घेऊन आचार्य **' नाडीपु० '** इत्यादि भाष्यानें म्हणतात-]=पण नाड्यांमध्यें व पुरीततींत झोंपीं गेलेल्या-शयन करणाऱ्या जीवाच्या अविज्ञानाविषयीं कांहीं कारण आहे, असें विशेषतः जाणणें शक्य नाहीं. कारण त्यांत शयन करणाराला भेदविषयत्व आहे. [ नाड्यादि आत्मभिन्न प्रदेशांत असलेल्या पुरुषाला द्वैतावस्थत्व आहे. त्यामुळें त्या द्वैतावस्थेंत असलेल्या जीवाला विशेषाचें-भेदाचें-द्वैताचें अज्ञान होण्यास-त्याला द्वैताचें ज्ञान न होण्यास कांहीं कारण नाहीं, असा भावार्थ.-द्वैतावस्थ जीवाला नियमानें विशेष विज्ञान होतें, याविषयीं **' यत्र वा० '** इत्यादि वाक्यानें प्रमाण सांगतात-]=कारण त्याविषयीं "आणि ज्या अविद्यावस्थेंत द्वैतसें होतें त्या अवस्थेंत तो स्वतः अन्य-द्रष्टा होऊन अन्य द्रष्टव्य पाहतो. "-सु.उ.५९९-अशी श्रुति आहे. [-**'ननु०'** इत्यादि भाष्यानें त्याच्याहि विशेषाज्ञानाविषयीं हेतूची शंका—]

**भाष्यं—ननु भेदविषयस्याप्यतिदूरादिकारणमविज्ञाने स्यात् । बाढं एवं यदि जीवः स्वतःपरिच्छिन्नोऽभ्युपगम्येत । यथा विष्णुमित्रः प्रवासी स्वगृहं न पश्यतीति । न तु जीवस्योपाधिव्यतिरेकेण परिच्छेदो विद्यते । उपाधिगत-**

**मेवातिदूरादिकारणमविज्ञाने इति यद्युच्येत। तथाप्युपाधेः उपशान्तत्वात्सत्येव संपन्नो न विजानातीति युक्तम्॥**

**भाष्यार्थ**--अहोपण, भेद पावणाऱ्याहि--विद्यमान असलेल्याहि विषयाच्या अविज्ञानामध्यें अतिदूरादि हें कारण असेल. [ त्यावेळीं विषय जीवापासून अतिदूर असल्यामुळें त्याला त्यांचें ज्ञान होत नाहीं, असा भावार्थ.--' जीवाचें विषयांपासून अतिदूरत्व स्वाभाविक आहे कीं औपाधिक आहे ' असा विकल्प करून आचार्य त्यांतील पहिल्या पक्षाला '**बाढं एवं०**' इत्यादि भाष्यानें दूषित करितात--]=होय, जर जीव स्वतः--स्वभावतः--स्वरूपतःच परिच्छिन्न आहे, असें मानिलें जाईल तर हें असें होईल--तर विषयांपासून अतिदूर असलेल्या त्याला त्यांचें ज्ञान होणार नाहीं! [--स्वाभाविकहि दूरत्व अज्ञानाचें कारण होतें, याविषयीं '**यथा०**' इत्यादि भाष्यानें दृष्टान्त--]=जसा प्रवास करणारा--प्रवासांत असणारा विष्णुमित्र स्वगृहाला पहात नाहीं, त्याप्रमाणें स्वतःपरिच्छिन्न असलेला जीव दूरच्या विषयांना पहाणार नाहीं. [--" तर मग प्रस्तुत दार्ष्टान्तिकांतहि तसलें अतिदूरत्व जीवाच्या अज्ञानाचें निमित्त असूं दे. " याचें 'नाहीं' असें उत्तर '**न तु०**' इत्यादि भाष्यानें देतात--]=पण जीवाचा उपाधीवांचून--उपाधीच्या अभावीं परिच्छेद होत नाहीं. [--'**उपाधिगतं०**' इत्यादि भाष्यानें पूर्वोक्त विकल्पांतील दुसऱ्या पक्षाचा अनुवाद--]=जीवाच्या अविज्ञानाचें उपाधिगतच--उपाधींतीलच अतिदूरादि कारण आहे, असें जरी म्हटलें जाईल [--तर मग स्थानांच्या विकल्पाची असिद्धि होईल, असें '**तथापि०**' इत्यादि भाष्यानें सांगतात--]=तथापि उपाधींची उपशांति झालेली असल्यामुळें--उपाधीला उपशांतत्व असल्यामुळें सत्-मध्येंच संपन्न झालेला जीव जाणत नाहीं, असें मानणें युक्त आहे. [ आणि सुप्तिदशेंत उपाधि-परिच्छेदाचा अंगीकार केल्यास कांहीं थोड्याशा तरी समीप असलेल्या पदार्थांचें ज्ञान होण्याचा प्रसंग येत असल्यामुळें सर्व विशेषज्ञानाच्या अभावासाठीं निरुपाधित्वानें जीवाचें ब्रह्मरूपानें अवस्थान मानणें उचित आहे, असा भावार्थ.--" अहोपण, उपाधींचा उपशम झाला असतां नाड्यादिकांच्या समुच्चयाचें कथन कसें संभवतें? "'**न च०**' इत्यादि भाष्यानें उत्तर--]

**भाष्यं--न च वयमिह तुल्यवन्नाड्यादिसमुच्चयं प्रतिपादयामः। न हि नाड्यः सुप्तिस्थानं पुरीतद्वेत्यनेन विज्ञानेन किंचित्प्रयोजनमस्ति। न ह्येतद्विज्ञान-प्रतिबद्धं किंचित्फलं श्रूयते। नाप्येतद्विज्ञानं फलवतः कस्यचिदंगं उपदिश्यते। ब्रह्म त्वनपायि सुप्तिस्थानमित्येतत्प्रतिपादयामः। तेन तु विज्ञानेन प्रयोजन-**

**मस्ति जीवस्य ब्रह्मात्मत्वावधारणं स्वप्नजागरितव्यवहारविमुक्तत्वावधारणं च । तस्मादात्मैव सुप्तिस्थानम् ॥ ७ ॥**

**भाष्यार्थ**—आम्ही या स्वापस्थानांत नाडयादिकांचा तुल्यवत्–एकसारखाच–समप्राधान्यानें समुच्चय प्रतिपादीत नाहीं. [ तर गुण-प्रधानभावानें त्यांचा समुच्चय प्रतिपादितों, असा भावार्थ.–शिवाय नाडयादिकांच्या स्वापस्थानोक्तीला अफलत्व असल्यामुळें त्यांचा समुच्चय किंवा विकल्प नाहीं, असें '**न हि०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=नाडया हें सुप्तिस्थान आहे किंवा पुरीतत् सुप्तिस्थान आहे, अशा या विज्ञानानें कांहीं प्रयोजन–फल प्राप्त होत नाहीं. [–" त्या विज्ञानांलां अफलत्व कसें ? " अशी आशंका घेऊन 'त्याला स्वातंत्र्यानें फलवत्त्व आहे कीं फलवत् अंगीच्या अंगत्वानें ?' असा विकल्प करून त्यांतील पहिल्या कल्पाचें निरसन '**न हि एतत्०**' इत्यादि भाष्यानें करितात–]=कारण या नाडयादिकांच्या सुप्तिस्थानविज्ञानानें–त्याच्यासाठीं कांहीं फल प्रतिबद्ध होऊन राहिलें आहे, असें श्रुत नाहीं. [–'**नापि०**' या भाष्यानें दुसऱ्या पक्षाला दूषित करितात–]=तसेंच, हें विज्ञान एखाद्या फलवत्–अंगींचें अंग आहे, असाहि उपदश केला जात नाहीं. [–" अहो पण, विकल्प व समुच्चय या दोहोंनाहि जर अप्रतिपाद्यत्व असेल तर येथें प्रतिपाद्य काय आहे ?" '**ब्रह्म तु०**' इत्यादि भाष्यानें उत्तर–]=पण अविनाशी ब्रह्म हें सुषुप्तिस्थान आहे असें हें आम्ही प्रतिपादन करितों. [–" पण त्या विज्ञानांतहि अफलत्व तुल्य आहे. " अशी आशंका घेऊन '**तेन०**' इत्यादि भाष्यानें अधिकरणत्वज्ञानाचें प्रयोजन सांगतात–]=पण त्या विज्ञानानें जीवाचें ब्रह्मात्मत्वावधारण–जीवाच्या ब्रह्मत्वाचा निश्चय व त्याच्या स्वप्न-जागरितव्यवहारापासून मुक्तत्वाचा निश्चय हें प्रयोजन साध्य आहे. [–याप्रमाणें ब्रह्मच स्वापस्थान आहे, या ज्ञानाला फलवत्त्व आहे, असें सिद्ध झालें असतां त्याचें फलित '**तस्मात्०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=तस्मात् आत्माच सुप्तिस्थान आहे. ७ [–ब्रह्मालाच प्रबोधाचें अपादानत्व आहे, असें सांगितलेलें असल्यामुळेंहि तेंच सुप्तिस्थान आहे, असें सूत्रकार '**अतः प्रबोधो०**' इत्यादि सूत्रानें सांगतात—]

## सूत्रं—अतः प्रबोधोऽस्मात् ॥८॥ ( २ )

**सूत्रार्थ**—'अतः'–म्हणून 'अस्मात्'–या आत्म्यापासून 'प्रबोध'–जागरावस्था सांगितली जाते. ८ ( २ ) सु. ब्र. २७६. [–'**यस्मात्०**' इत्यादि भाष्यानें सूत्राचें व्याख्यान––]

**भाष्यं—यस्माच्चात्मैव सुप्तिस्थानं अत एव च कारणान्नित्यवदेवास्मादात्मनः प्रबोधः स्वापाधिकारे शिष्यते—'कुत एतदागात्' इत्यस्य प्रश्नस्य प्रतिवचनावसरे 'यथाग्नेः क्षुद्रा विस्फुलिंगा व्युच्चरन्त्येवमेवैतस्मादात्मनः सर्वे प्राणाः' इत्यादिना। 'सत आगम्य न विदुः सत आगच्छामहे' इति च॥**

**भाष्यार्थ**—आणि ज्याअर्थी आत्माच सुषुप्तिस्थान आहे, 'अतः'—त्याअर्थीच —त्या कारणास्तवच नित्याप्रमाणेंच 'अस्मात्'—या आत्म्यापासून 'प्रबोधः'—जागरावस्था स्वापाच्या प्रकरणांत 'कोठून हें याचें आगमन झालें आहे?'—बृ.२.१.१६. सु. उ.५८३—अशा या प्रश्नाच्या प्रतिवचनसमयीं "जसे अग्नीपासून क्षुद्र विस्फुलिंग उद्भवतात त्याचप्रमाणें या आत्म्यापासून सर्व प्राण उत्पन्न होतात"—सु.उ.पृ. ५८५—इत्यादि वचनानें सांगितली जाते व "त्या सत्-पासून येऊन 'आम्ही सत्-पासून येतों' हें ते प्रजासंज्ञक जीव जाणत नाहींत."—सु.उ.४३५—असाहि सदाख्य आत्म्यापासून प्रबोध सांगितला जातो. [—"अहोपण, विकल्पपक्षींहि ब्रह्माच्या प्रबोध-अपादानत्वाची उक्ति संभवेल" अशी आशंका घेऊन तिचें 'नाहीं' असें उत्तर '**विकल्प्यमानेषु०**' इत्यादि भाष्यानें देतात—]

**भाष्यं—विकल्प्यमानेषु तु सुषुप्तिस्थानेषु कदाचिन्नाडीभ्यः प्रतिबुध्यते कदाचित्पुरीततः कदाचिदात्मनः इत्यशासिष्यत्। तस्मादप्यात्मैव सुप्तिस्थानमिति॥**

**भाष्यार्थ**—पण सुषुप्तिस्थानें जर विकल्प्यमान—विकल्प पावणारीं असतीं तर कदाचित्—केव्हां तो नाड्यांपासून जागा होतो, कदाचित् पुरीतत्-पासून व कदाचित् आत्म्या-पासून असें श्रुतीनें सांगितलें असतें. [पण नाड्या व पुरीतत् यांना उत्थानाचें अपादानत्व केव्हांहि सांगितलें जात नाहीं, ब्रह्मालाच त्याचें अपादानत्व सांगितलें आहे.—'**तस्मात्०**' इत्यादि भाष्यानें ब्रह्माच्या प्रबोध-अपादानत्व-वचनाचें फलित सांगतात—]=त्यामुळेंहि आत्माच सुप्तिस्थान आहे, '**इति**'—याप्रमाणें आत्म्याचें ब्रह्मात्मत्व सिद्ध झालें.८ [सु. ब्र. २७७-७९.] (२)

## (३. कर्मानुस्मृति-शब्दविध्यधिकरण. सू. ९.)

—पूर्वसूत्रानें स्वापानंतर ब्रह्मापासून प्रबोधकथन केलेलें असल्यामुळें ब्रह्मरूपानेंच सुप्तजीव राहतो, हें सांगितलें. आतां त्याच्यापासून प्रबोध तत्प्राप्ति सुचवितो पण "सुप्ताहून दुसऱ्याच जीवाचा प्रबोध संभवत असल्यामुळें त्याच्या नाड्यादिस्थानत्वाचाहि संभव आहे," अशी आशंका घेऊन सूत्रकार '**स एव०**' इत्यादि सूत्रानें म्हणतात—

## सूत्रं—स एव तु कर्मानुस्मृतिशब्दविधिभ्यः ॥९॥ (३)

**सूत्रार्थ**—जो निजतो 'स एव तु'–तोच जागा होतो. कोणत्या कारणानें? कर्म, अनु, स्मृति, शब्द व विधि, अशा पांच हेतूंवरून–अवशिष्ट कर्म संपविणें, पूर्वानुभूताची स्मृति, प्रत्यभिज्ञा, शब्द व शास्त्रविधि यांवरून निजलेलाच जीव जागा होतो, असें सिद्ध होतें ९.(३)सु.ब्र.२७९.[–स्वापाचें स्थान, अशा ब्रह्मापासून जागा होणाऱ्या जीवाला उद्देशून उपाधिनाश व कर्म-अनुस्मृति इत्यादिकांचें दर्शन या कारणांनीं 'तस्याः०' इत्यादि भाष्यानें संशय सांगतात—]

**भाष्यं—तस्याः पुनः सत्संपत्तेः प्रतिबुध्यमानः किं य एव सत्संपन्नः स एव प्रतिबुध्यते । उत स वाऽन्यो वेति चिंत्यते । तत्र प्राप्तं तावदनियम इति । कुतः । यदा हि जलराशौ कश्चिज्जलबिंदुः प्रक्षिप्यते । जलराशिरेव स तदा भवति । पुनरुद्धरणे च स एव जलबिंदुर्भवतीति दुःसंपादम् । तद्वत्सुप्तः परेणैकत्वमापन्नः संप्रसीदतीति न स एव पुनरुत्थातुमर्हति । तस्मात्स एव ईश्वरो वाऽन्यो वा जीवः प्रतिबुध्यत इति ॥**

**भाष्यार्थ**—आणि पुनः त्या सत्संपत्तीपासून जागा होणारा जीव, जो सत्संपन्न झाला होता तोच जागा होतो कीं तो किंवा दुसराहि कोणी जागा होतो, याचा विचार केला जातो. [ 'तोच पुनः जागा होतो,' असें सांगून त्याचा स्वापाहून भेद साधून 'त्वं-'पदार्थाचें शोधन केल्यामुळें त्याला ब्रह्मैक्याची योग्यता प्राप्त होते. त्यामुळें हें त्वंपदार्थशोधन महावाक्याच्या अर्थज्ञानाच्या उपयोगी आहे. म्हणून याच्या पादादिसंगति आहेत. पूर्वपक्षांत 'ज्ञानाचें वैयर्थ्य' व सिद्धान्तांत 'जो निजतो तोच उठत असल्यामुळें अज्ञात ब्रह्मरूपानें निजलेल्या त्याचें अवस्थान सिद्ध होतें. त्या ब्रह्माच्या ऐक्यज्ञानानेंच मुक्ति होते. त्यामुळें ज्ञानाचा नियमानें उपयोग आहे, तें व्यर्थ नाहीं, '-अशा अभिप्रायानें 'तत्र०' इत्यादि भाष्यानें नियामक हेतूच्या अनुपलब्धीनें पूर्वपक्ष करितात–]=असा संशय आला असतां अगोदर 'तो निजलेला जीवच जागा होतो कीं दुसरा कोणी, याचा कांहीं नियम नाहीं' असा पूर्वपक्ष प्राप्त झाला. [–" अहो पण, नियमाचा संभव असतांना अनियम युक्तिमान्–सयुक्तिक नाहीं, " अशी शंका–]='कुतः'–कोणत्या कारणानें नियम नाहीं, असें म्हणतां? [–वादी नियमाचा असंभव दृष्टान्तानें साधितो–]='यदा हि०'–कारण जेव्हां जलाच्या राशींत एखादा जलबिंदु टाकिला जातो तेव्हां तो जलराशीच होतो. त्यामुळें त्यांतून एखादा जलबिंदु वर काढिल्यास तोच तो जलबिंदु आहे, असें समजणें सर्वथा अशक्य आहे. [–" पण

जलबिंदूला सावयवत्व असल्यामुळें त्याचे अवयव पसरणें, या परंपरेनें त्या जल-राशीशीं एकत्वास प्राप्त झालेल्या त्याचेंच उद्धरण संभवत नाहीं. परंतु जीवाला सोपाधिकत्व असल्यामुळें, आणि उपाधि बंध असेपर्यंत राहणारी असल्यामुळें जीवाच्या उद्धाराची सिद्धि होते" अशी आशंका घेऊन 'उपाधीचा लय न झाल्यास सत्संपत्तीचीहि सिद्धि होत नसल्यामुळें, असें म्हणतां येत नाहीं,' अशा आशयानें वादी 'तद्वत्॰' इत्यादि भाष्यानें दार्ष्टान्तिक सांगतो–]=त्याचप्रमाणें सुप्त व त्यामुळें पर ब्रह्माशीं एकत्वास प्राप्त झालेला जीव संप्रसन्न होतो. म्हणून तोच पुन: उत्थान पावण्यास योग्य नाहीं. [–याप्रमाणें नियामकाच्या अभावीं 'तस्मात्॰' इत्यादि भाष्यानें फलित सांगतो–]=म्हणून तोच किंवा ईश्वर किंवा अन्य जीव जागा होतो. 'इति'–म्हणून अनियमपक्षीं सुप्ताचा मोक्ष होतो. त्यामुळें ज्ञानाला वैयर्थ्य आहे. [येथें केवल संभावनेनें 'किंवा ईश्वर' असें म्हटलें आहे. –'एवं॰' इत्यादि भाष्यानें पूर्वपक्षाचा अनुवाद करून सिद्धान्त सांगतात—]

**भाष्यं—एवं प्राप्त इदमाह–स एव तु जीव: सुप्त: स्वास्थ्यं गत: पुनरुत्तिष्ठति नान्य: । कस्मात् । कर्मानुस्मृतिशब्दविधिभ्य: । विभज्य हेतुं दर्शयिष्यामि ॥**

**भाष्यार्थ—**असा पूर्वपक्ष प्राप्त झाला असतां 'स एव तु'–तोच निजलेला व स्वास्थ्यास प्राप्त झालेला जीव पुन: उत्थान करितो–तोच जागा होतो. दुसरा कोणी जागा होत नाहीं. [–"अहोपण, ऐक्यावस्थेंत अवच्छेदाचा अभाव असल्यामुळें त्याचेंच उत्थान होतें, असा नियम करणें अशक्य आहे," अशी शंका–]='**कस्मात्॰**'–कोणत्या कारणानें तोच जागा होतो ? [–जीवाचा अवच्छेद करणारी अविद्याशक्ति स्थित असल्याप्रमाणेंच मानून त्याच्याच उत्थानाविषयीं प्रमाण सांगतात–]='**कर्मानुस्मृतिशब्दविधिभ्य:**'–कर्म, अनुस्मृति, शब्द व विधि, या प्रमाणांवरून तोच पुन: उत्थित होतो. [–पण षड्-यागांप्रमाणें समुच्चित कर्मादिकांना हेतुत्व नाहीं तर त्यांतील प्रत्येकाला हेतुत्व आहे, असें '**विभज्य॰**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=मी आतां ह्या सूत्रोक्त हेतूंना विभागून दाखवीन. [–त्यांतील कर्मशब्दोक्तहेतूला '**कर्मशेष॰**' इत्यादि भाष्यानें विशद करितात—]

**भाष्यं—कर्मशेषानुष्ठानदर्शनात्तावत्स एवोत्थातुमर्हति नान्य: । तथाहि—पूर्वेद्युरनुष्ठितस्य कर्मणोऽपरेद्यु: शेषं अनुतिष्ठन्दृश्यते । न चान्येन सामिकृतस्य**

**कर्मणोऽन्यः शेषक्रियायां प्रवर्तितुमर्हति । अतिप्रसंगात् । तस्मादेक एव पूर्वेद्यु-रपरेद्युश्चैकस्य कर्मणः कर्तेति गम्यते ॥**

**भाष्यार्थ**--अगोदर तो कर्मशेषाचें अनुष्ठान करीत असलेला दिसत असल्या-मुळें तोच उठण्यास योग्य आहे, दुसरा कोणी नव्हे. ['-तथाहि०' इत्यादि भाष्यानें कर्मशेषानुष्ठानच प्रकट करितात-]=तो कर्मशेषानुष्ठान कसें करितो तें पहा-आदल्या दिवशीं केलेल्या कर्माचा शेष दुसऱ्या दिवशीं तो करीत असलेला दिसतो. [-"पण तेवढ्यावरून त्याचेंच उत्थान कसें सिद्ध होतें?" '**न च०**' इत्यादि भाष्यानें उत्तर-]=एकानें अर्ध्याच केलेल्या कर्माच्या अवशिष्ट क्रियेमध्यें दुसरा प्रवृत्त होण्यास समर्थ होत नाहीं. [-कारण तसें मानिल्यास एकाच ज्योति-ष्टोमादिकर्माचें अनेक यजमानकत्व प्राप्त होतें-त्याचे अनेक यजमान आहेत, असें म्हणण्याचा प्रसंग होतो, असा दोष सांगतात-]=कारण त्यावर अतिप्रसंग हा दोष येतो, त्यामुळें तसें म्हणतां येत नाहीं. [-'**तस्मात्०**' इत्यादि भाष्यानें उक्त हेतूच्या फलाचा उपसंहार-]=तस्मात् आदल्या दिवशीं व दुसऱ्या दिवशीं एका कर्माचा एकच कर्ता आहे, असें अवगत होतें. [त्यामुळें तोच उठतो-जागा होतो असा याला शेष लावावा.-'अनुस्मृति' या दुसऱ्या हेतूचें '**इतश्च०**' इत्यादि भाष्यानें व्याख्यान-]

**भाष्यं**—**इतश्च स एवोत्तिष्ठति यत्कारणमतीतेऽहन्यहमदोऽद्राक्षमिति पूर्वा-नुभूतस्य पश्चात्स्मरणं अन्यस्योत्थाने नोपपद्यते । न ह्यन्यदृष्टमन्योऽनुस्मर्तुम-र्हति । सोऽहमस्मीति च आत्मानुस्मरणमात्मान्तरोत्थाने नावकल्पते ॥**

**भाष्यार्थ**-याहि कारणानें तोच उत्थित होतो. कारण कीं आदल्या दिवशीं मीं हें पाहिलें, असें पूर्वानुभूत पदार्थाचें मागून-दुसऱ्या दिवशीं होणारें स्मरण, निजलेल्या जीवाहून अगदीं निराळा दुसरा जीव जर जागा झाला असता तर, उपपन्न होत नाहीं. [-"पण दुसऱ्याच जीवाच्या उत्थानांत उक्त अनुस्मृतीची अनुपपत्ति काय आहे?" '**न हि अन्यदृष्टं०**' इत्यादि भाष्यानें उत्तर-]=कारण एकानें पाहिलेलें दुसरा स्मरूं शकत नाहीं. [एकानें पाहिलेल्या वस्तूचें दुसऱ्याला स्मरण होऊं शकत नाहीं.-' अनुस्मृति ' यांतील ' अनु ' या शब्दानें प्रत्यभिज्ञाहि सुचविली आहे, असें '**सोऽहं०**' इत्यादि भाष्यानें सांगतात-]=आणि 'तोच मी आहें' असें आत्मानुस्मरण दुसऱ्या आत्म्याचें उत्थान होत असल्यास उपपन्न होत नाहीं. [-आतां '**शब्देभ्यश्च०**' इत्यादि भाष्यानें सूत्रांतील 'शब्द' या शब्दाचा अर्थ सांगतात—]

**भाष्यं-शब्देभ्यश्च तस्यैवोत्थानमवगम्यते। तथाहि-'पुनः प्रतिन्यायं प्रतियोन्या-द्रवति बुद्धान्तायैव' 'इमाः सर्वाः प्रजा अहरहर्गच्छन्त्य एतं ब्रह्मलोकं न विंद॰**

न्ति ' ' त इह व्याघ्रो वा सिंहो वा वृको वा वराहो वा कीटो वा पतंगो वा दंशो वा मशको वा यद्यद्भवन्ति तदाभवन्ति ' इत्येवमादयः शब्दाः स्वापप्रबोधाधिकारे पठिता नात्मान्तरोत्थाने सामंजस्यमीयुः ॥

**भाष्यार्थ**--आणि शब्दांवरूनहि त्याचेंच उत्थान अवगत होतें. '**तथाहि०**'--कसें तें पहा--"पुनः गेल्या मार्गानें व त्या त्या योनींतच--त्या त्या पूर्व स्थानींच जागरितासच परत येतो"-- बृ.४.३.१६.सु.उ.६७५--"सर्व प्रजा प्रत्यहीं त्या ब्रह्मलोकास जात असूनहि त्यास जाणत नाहींत "--छां८.३.२ सु. ४७२--"ते येथें--पूर्व जागरावस्थेंत व्याघ्र,किंवा सिंह,किंवा वृक,किंवा वराह किंवा कीट,किंवा पतंग, किंवा दंश, किंवा मशक यांतील जे जे असतात ते तेच जागरितास परत येतात"--सु.उ.४३५--हे आणि स्वाप व प्रबोध यांच्या अधिकारांत पठित असलेले अशाच प्रकारचे दुसरे शब्द दुसऱ्या आत्म्याचें जर उत्थान होत असेल तर सामंजस्यास प्राप्त होत नाहींत, ते समंजस--उपपन्न होत नाहींत. [--' **कर्मविद्या०**' इत्यादि भाष्यानें सूत्रांतील 'विधि-'पदाचें व्याख्यान करितात---]

**भाष्यं**--कर्मविद्याविधिभ्यश्चैवमेवावगम्यते । अन्यथा हि कर्मविद्याविधयोऽनर्थकाः स्युः । अन्योत्थानपक्षे हि सुप्तमात्रो मुच्यत इत्यापद्येत । एवं चेत्स्याद्वद किं कालान्तरफलेन कर्मणा विद्यया वा कृतं स्यात् ॥

**भाष्यार्थ**--आणि कर्म व विद्या--उपासना यांच्या विधींवरूनहि तोच--पूर्वसुप्तच जीव उठतो--जागा होतो, असेंच हें अवगत होतें. [--'**अन्यथा०**' इत्यादि भाष्यानें तेंच व्यतिरेकाच्या द्वारा विशद करितात--]=कारण तोच जीव जागा होतो, असें जर न मानिलें तर कर्म व विद्या यांचे विधि अनर्थक--व्यर्थ होतील. [--'**अन्योत्थानपक्षे०**' इत्यादि भाष्यानें विद्यानर्थक्य व्यक्त करितात--]=कारण निजलेल्या जीवाहून दुसराच जीव जागा होतो, या पक्षीं जीव निजला कीं मुक्त होतो, असें प्राप्त होतें. [--'**एवं चेत्०**' इत्यादि भाष्यानें कर्मवैयर्थ्य सांगतात--]=आणि असें जर झालें म्ह० जीव केवळ निजल्यानेंच जर मुक्त होऊं लागला तर ज्याचें फल कालान्तरीं मिळणारें आहे, अशा कर्मानें किंवा विद्येनें काय केलें असें होईल ! कांहीं नाहीं. तीं दोन्ही व्यर्थ होतील. [ अनुष्ठानाच्या वेळीं फलाचा अभाव असल्यामुळें कालान्तरीं फल देणाऱ्या कर्माला किंवा ध्यानाला अन्योत्थानपक्षीं व्यर्थत्व प्राप्त होईल, असा भावार्थ. येथील विद्या म्ह० ध्यान.--आणि याहि कारणानें अन्योत्थान होत नाहीं, असें '**अपि च०**' इत्यादि भाष्यानें सांगतात---]

**भाष्यं**—अपि च। अन्योत्थानपक्षे यदि तावच्छरीरान्तरे व्यवहरमाणो जीव उत्तिष्ठेत् तत्रत्यव्यवहारलोपप्रसंगः स्यात्। अथ तत्र सुप्त उत्तिष्ठेत्कल्पनानर्थक्यं स्यात्। यो हि यस्मिञ्शरीरे सुप्तः स तस्मिन्नोत्तिष्ठति, अन्यस्मिञ्शरीरे सुप्तोऽन्यस्मिन्नुत्तिष्ठतीति कोऽस्यां कल्पनायां लाभः स्यात्॥

**भाष्यार्थ**—आणि शिवाय अन्योत्थानपक्षीं असा दोष येतो [–'तो जागा होणारा दुसरा कोण, जीव कीं ईश्वर? जीव असेल तर बद्ध जीव कीं मुक्त जीव? बद्ध जीव जरी असला तरी तो दुसऱ्या देहांत व्यवहार करणारा कीं त्यांत निजलेला?' असा विकल्प करून व त्यांतील पहिल्या पक्षाचा '**अन्योत्थानपक्षे०**' इत्यादि भाष्यानें अनुवाद करून त्याचें निरसन करितात–]=अन्य जीवाचें उत्थान होतें, यापक्षीं जर अगोदर दुसऱ्या शरीरांत व्यवहार करणारा जीव जागा होत असेल तर त्या शरीरांतील व्यवहाराचा लोप होण्याचा प्रसंग येईल. [–'**अथ०**' इत्यादि भाष्यानें दुसऱ्या कल्पाचा अनुवाद करून त्याचें निरसन–]='बरें, त्या दुसऱ्या शरीरांत निजलेला येथें जागा होत असेल तर त्या कल्पनेलाच आनर्थक्य प्राप्त होईल! ती कल्पनाच व्यर्थ होईल![–'**यो हि०**'इत्यादि भाष्यानें निष्फल कल्पनागौरवच व्यक्त करितात-]=कारण जो ज्या शरीरांत निजला तो त्या शरीरांत जागा होत नाहीं तर अन्य शरीरांत निजलेला अन्य शरीरांत जागा होतो, अशा या कल्पनेंत काय लाभ आहे! [–'**अथ मुक्तः०**' इत्यादि भाष्यानें दुसऱ्या कल्पाचा अनुवाद करून त्याचें निरसन–]

**भाष्यं**—अथ मुक्त उत्तिष्ठेत् अन्तवान्मोक्ष आपद्येत। निवृत्ताविद्यस्य च पुनरुत्थानमनुपपन्नम्। एतेनेश्वरस्योत्थानं प्रत्युक्तम्। नित्यनिवृत्ताविद्यत्वात्। अकृताभ्यागमकृतविप्रणाशौ च दुर्निवारौ अन्योत्थानपक्षे स्याताम्। तस्मात्स एवोत्तिष्ठति नान्य इति॥

**भाष्यार्थ**—बरें, मुक्त जीव जागा होईल तर मोक्ष अन्तवान्-विनाशी–अनित्य होईल! [–"पण मोक्ष अन्तवान् झाला तर त्यांत काय क्षति आहे?" '**निवृत्ताविद्यस्य०**' इत्यादि भाष्यानें उत्तर–]=ज्याच्या अविद्येची निवृत्ति झाली आहे त्याचें पुनरुत्थान होणें अयोग्य आहे. [ कारण त्याच्या पुनरुत्थानाचा कांहीं हेतु नाहीं, असा भावार्थ.–मुक्ताचें उत्थान संभवत नाहीं, या उक्त न्यायानें ईश्वरकल्पाचें निरसन–]='**एतेन०**'–या उक्तन्यायानेंच ईश्वराच्या उत्थानाचेंहि निरसन केलें आहे. [–त्याविषयीं ईश्वरस्वरूपाच्या अपेक्षेनें हेतु–]='**नित्यनिवृत्ताविद्यत्वात्०**'–कारण त्याची अविद्या नित्यनिवृत्त आहे. [–याप्रमाणें पूर्वोक्त सर्व पक्षांतील प्रत्येक पक्षीं दोष सांगून सर्वपक्षसाधारण दोष '**अकृत०**' इत्यादि

भाष्यानें सांगतात–]=अकृताभ्यागम व कृतविप्रणाश हे दोन दोष अन्यजीवाच्या उत्थानपक्षीं दुर्निवार–अपरिहार्य होतील. [ सुप्त जीवाहून अन्य जीव जर जागा होत असला तर त्यानंतर होणाऱ्या जाग्रत्कालीन सुखादिकाला पूर्वकर्माचें कार्यत्व असणें शक्य नाहीं. त्यामुळें त्याला अकृताची प्राप्ति होईल आणि सुप्त जीवाचीच मुक्ति झाली असतां त्यानें केलेलें कर्म फल न देतांच नाश पावेल, असें हें दोष-द्वय प्राप्त होईल, असा याचा भावार्थ.–' **तस्मात्०**' इत्यादि भाष्यानें अन्योत्थानाच्या असंभवांतील फलित सांगतात–]=म्हणून सुप्त जीवच पुन: जागा होतो, दुसरा जीव जागा होत नाहीं, हें सिद्ध झालें. [–' **यत्पुनरुक्तं०**' इत्यादि भाष्यानें पूर्वपक्षाच्या बीजाचा अनुवाद करितात—]

**भाष्यं––यत्पुनरुक्तं यथा जलराशौ प्रक्षिप्तो जलबिंदुर्नोद्धर्तुं शक्यत एवं सति संपन्नो जीवो नोत्पतितुमर्हतीति, तत्परिह्रियते । युक्तं तत्र विवेककारणाभावाज्जलबिंदोरनुद्धरणम् । इह तु विद्यते विवेककारणं कर्म चाविद्या चेति वैषम्यम् । दृश्यते च दुर्विवेचनयोरपि अस्मज्जातीयैः क्षीरोदकयोः संसृष्टयोर्हंसेन विवेचनम् ॥**

**भाष्यार्थ**—आतां पूर्ववाद्यानें " जसा जलराशीमध्यें टाकलेला जलबिंदु पुन: वर काढतां येणें शक्य नाहीं तसा ' सत्-'मध्ये संपन्न झालेला जीव पुन: जागा होण्यास योग्य नाहीं" असें जें म्हटलें आहे–पृ.१२५–[–दृष्टान्ताचें वैषम्य सांगून '**तत्०**' इत्यादि भाष्यानें त्याचें निरसन–]=त्याचा परिहार केला जातो. '**युक्तं०**'–दृष्टान्तामध्यें विवेकाच्या कारणाचा अभाव असल्यामुळें–जलराशीपासून जलबिंदूच्या भेदाचें कांहीं कारण नसल्यामुळें जलबिंदूचा उद्धार करितां न येणें युक्त आहे, पण प्रस्तुत दार्ष्टान्तिकांत कर्म व अविद्या हें विवेकाचें कारण विद्यमान आहे, त्यामुळें दृष्टान्त व दार्ष्टान्तिक यांमध्यें वैषम्य आहे. [–" अहोपण केवळ आम्हांलाच नव्हे तर इतरांनाहि जीवाचें दुर्विवेचनत्व तुल्य आहे " अशी आशंका घेऊन ' **दृश्यते च०** ' इत्यादि भाष्यानें समाधान सांगतात–]=आणि आमच्या जातीच्या–आमच्या सारख्या जीवांना ज्यांचें विवेचन करितां येत नाहीं अशा परस्परांत मिसळलेल्या क्षीर-नीरांचें विवेचन हंसाकडून केलें जात असलेलें दिसतें. [–' **अपि च०** ' इत्यादि भाष्यानें दुसऱ्या प्रकारें दृष्टान्ताचें वैषम्य सांगतात–]

**भाष्यं —अपि च न जीवो नाम कश्चित्परस्मादन्यो विद्यते। यो जलबिंदुरिव जलराशेः सतो विविच्येत । सदेव तूपाधिसंपर्काज्जीव इत्युपचर्यत इत्यसकृत्प्रपंचितम् । एवं सति यावदेकोपाधिगता बंधानुवृत्तिः तावदेकजीवव्यवहारः ।**

**उपाध्यंतरगतायां तु बंधानुवृत्तौ जीवान्तरव्यवहारः । स एवायमुपाधिः स्वापप्रबोधयोर्बीजांकुरन्यायेन । इत्यतः स एव जीवः प्रतिबुध्यत इत्युक्तम् ॥९॥ (३)**

**भाष्यार्थ**—शिवाय जीव म्हणून कोणी परमात्म्याहून अन्य पदार्थ नाहीं कीं, जो जलराशीपासून जसा जलबिंदु तसा सत्-पासून विविक्त–पृथक् केला जाईल! [–"तर मग जीव कोण आहे!" '**सदेव०**' इत्यादि भाष्यानें उत्तर–]=पण सत्च उपाधिसंपर्कामुळें 'जीव' आहे असें उपचारानें म्हटलें जातें,हें आम्हीं वारंवार सविस्तर प्रतिपादन केलें आहे. [–सद्रूप ब्रह्मालाच उपाधीमुळें जीवत्व प्राप्त होत असल्यामुळें नानाजीववादाचेंहि प्रत्याख्यान झालें आहे, असें '**एवं०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=आणि असें असल्यामुळें–सद्ब्रह्मालाच उपाधिवशात् जीवत्व प्राप्त होत असल्यामुळें जोंवर एक-उपाधिगत बंधाची अनुवृत्ति होत असते तोंवर एकजीवव्यवहार होतो. [–'**उपाध्यन्तर०**' इत्यादि भाष्यानें या उक्तार्थाचेंच व्यतिरेकानें उपपादन–]=पण बंधानुवृत्ति दुसऱ्या उपाधीमध्यें झाली असतां जीवान्तरव्यवहार होतो. [–"अहोपण, उपाधिभेदाचा अंगीकार करून भिन्नभिन्न शरीरांत उपाधिभेद प्रतीत होवो," अशी आशंका घेऊन 'बीजांकुराप्रमाणें एकच उपाधि व्यक्ताव्यक्तरूपानें स्थित असल्यामुळें उपाधिभेद मानितां येत नाहीं' असें '**स एव०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=तोच हा उपाधि स्वाप व प्रबोध, यांमध्यें बीजांकुरन्यायानें अवस्थित होतो. [–'**इत्यतः०**' इत्यादि भाष्यानें सुप्त जीवाचेंच पुनः प्रबोधांत उत्थान होत असल्यामुळें अज्ञात ब्रह्मरूपानें त्याचें अवस्थान सिद्ध होतें, असा उपसंहार करितात–]=असें असल्यामुळें तोच जीव जागा होतो असें येथें सांगितलें आहे. ९ [सु. ब्र. पृ. २८०-८१] (३)

## ( ४. मुग्धेऽर्धसंपत्त्यधिकरण. सू. १०. )

—याप्रमाणें अवस्थात्रय सांगून '**मुग्धे०**' इत्यादि सूत्रानें मूर्च्छाख्य अवस्थान्तर दाखवितात—

## सूत्रं—मुग्धेऽर्धसंपत्तिः परिशेषात् ॥ १० ॥ (४)

**सूत्रार्थ**—'मूर्च्छावस्थेंत'–त्या अवस्थेस प्राप्त झालेल्या पुरुषाची 'परिशेषन्यायानें अर्धसंपत्ति होते' १० (४) सु. ब्र. २८१. [–'**अस्ति०**' इत्यादि भाष्यानें या अधिकरणाचा विषय सांगतात–]

**भाष्यं—अस्ति मुग्धो नाम । यं मूर्च्छित इति लौकिकाः कथयन्ति । स तु किमवस्थ इति परीक्षायामुच्यते । तिस्रस्तावदवस्थाः शरीरस्थस्य जीवस्य प्रसिद्धाः जागरितं स्वप्नः सुषुप्तमिति । चतुर्थी शरीरादपसृप्तिः । न तु पंचमी**

**काचिदवस्था जीवस्य श्रुतौ स्मृतौ वा प्रसिद्धास्ति । तस्माच्चतसृणामेवावस्थानां अन्यतमावस्था मूर्च्छा इति ॥**

**भाष्यार्थ**—'मुग्ध' म्हणून आहे. [–प्रमाणसिद्ध वस्तूलाच विषयत्व असल्यामुळें '**यं मूर्च्छितः०**' इत्यादि भाष्यानें त्याची लोकसिद्धता सांगतात–]=ज्याला लौकिक 'मूर्च्छित' असें म्हणतात. [ तो मूर्च्छित जागरितादि-अवस्थांतील एका अवस्थेंत अन्तर्गत होतो कीं त्यांहून निराळ्या अवस्थेस प्राप्त झालेला असतो; असा अवस्थाचतुष्टयप्रसिद्धीचा म्ह० चार अवस्था आहेत या प्रसिद्धीचा नियम व अनियम या दोन कारणांनीं संशय आला असतां–'तोच मी' अशा प्रत्यभिज्ञेनें–सुप्तच जागा होतो, असें वर सांगितलेलें असल्यामुळें–विशेष विज्ञानाच्या अभावामुळें व विशेषणाच्या ऐक्याची प्रत्यभिज्ञा होत असल्यामुळें मूर्च्छा ही सुप्तिच आहे, असा पूर्वपक्ष करितात–]='सः तु०'–पण तो मुग्ध, किमवस्थ आहे, त्याची अवस्था कोणती, असा विचार प्राप्त झाला असतां–त्याच्या त्या अवस्थेची प्रमाणपूर्वक परीक्षा करण्याचा प्रसंग आला असतां असा पूर्वपक्ष सांगितला जातो–[ या अधिकरणांत मुग्धि–मूर्च्छा ही प्रसिद्ध चार अवस्थांहून निराळीच अवस्था आहे, असें सांगून त्या अवस्थेपासून विभक्त–अत्यंत भिन्न असलेल्या 'त्वं-' पदार्थाचें शोधन केलें असतां वाक्यार्थाशीं संबद्ध होणाऱ्या त्याला वाक्यार्थज्ञानहेतुत्व असल्यामुळें याच्या पादादिसंगति आहेत. पूर्वपक्षांत 'मूर्च्छा ही अधिक –भिन्न अवस्था आहे, असें सिद्ध करण्यासाठीं पृथक् यत्न करावयास नको' व सिद्धान्तांत 'त्यासाठीं पृथक्-प्रयत्नाला नियतत्व आहे' असें मानून–'**तिस्रस्तावत्०**' इत्यादि भाष्यानें पूर्वपक्षाचें विवरण करितात–]=अगोदर शरीरस्थ जीवाच्या जागरित, स्वप्न व सुषुप्त अशा तीन अवस्था प्रसिद्ध आहेत. [–'शरीरस्थ' या विशेषणानें सिद्ध असें अवस्थान्तर '**चतुर्थी०**' इत्यादि भाष्यानें पूर्ववादी सांगतो–]=शरीरापासून अवसृप्ति–शरीराला सोडून बाहेर निघणें, ही चवथी अवस्था. [–"अहोपण, मूर्च्छाहि चिर-उच्छ्वास, कंप इत्यादि धर्मभेदामुळें अवस्थान्तर आहे," अशी आशंका घेऊन 'मूर्छा हा सुप्तीचाच अवान्तर भेद असल्यामुळें तिचें अशा प्रकारचें स्वरूप सिद्ध होतें, त्यामुळें धर्मभेदकल्पना करितां येत नाहीं' असें '**न तु०**' इत्यादि भाष्यानें वादी सांगतो–]=पण या प्रसिद्ध चार अवस्थांहून निराळी अशी एखादी जीवाची पांचवी अवस्था श्रुतींत किंवा स्मृतींत प्रसिद्ध नाहीं. [–अवस्थान्तर अप्रसिद्ध असल्यामुळें मूर्च्छेचा सुप्तींतच अन्तर्भाव होतो, असें मानून '**तस्मात्०**' इत्यादि भाष्यानें वादी पूर्वपक्षाचें निगमन

करितो–]=तस्मात् चार प्रसिद्ध अवस्थांतीलच मूर्च्छा ही एक अवस्था आहे.'इति' –म्हणून तिच्या व्यतिरेकासाठीं पृथक् यत्न करावयास नको, असें निष्पन्न झालें. [–'एवं०' इत्यादि भाष्यानें या पूर्वपक्षाचा अनुवाद करून सिद्धान्त सांगतात––]

**भाष्यं—एवं प्राप्ते ब्रूमः––न तावन्मुग्धो जागरितावस्थो भवितुमर्हति। न ह्ययमिंद्रियैर्विषयानीक्षते ॥**

**भाष्यार्थ**—असा पूर्वपक्ष प्राप्त झाला असतां आम्ही सिद्धान्त सांगतों. [–'**न तावत्**०' इत्यादि भाष्यानें 'परिशेषात्' या सूत्रावयवाचा अर्थ सांगण्यासाठीं परिशेष दाखविण्यास आरंभ करितात–]=अगोदर मुग्ध जागरितावस्थ असण्यास योग्य नाहीं. [–कारण जागरित या अवस्थेंत असलेला जीव इंद्रियांनीं विषयांचें ग्रहण करितो, मुग्ध तसें विषयग्रहण करीत नाहीं, त्याला बाह्य इंद्रियांनीं बाह्य विषयांचें ज्ञान होत नाहीं, असा वैषम्य हा हेतु '**न हि**०' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=कारण हा मुग्ध जीव इंद्रियांनीं विषयांस पहात–जाणत नाहीं. [–"अहोपण, जाग्रदवस्थच असलेल्या मुग्धाचा विषयानुपलंभ–विषयांचा अननुभव दुःखानुभवानें व्यग्र झाल्यामुळें होऊं शकेल?" अशी '**स्यादेतत्**०' इत्यादि भाष्यानें दृष्टान्तानें शंका––]

**भाष्यं—स्यादेतत्। इषुकारन्यायेन मुग्धो भविष्यति। यथेषुकारो जाग्रदपीष्वासक्तमनस्तया नान्यान्विषयानीक्षते।एवं मुग्धो मुसलसंपातादिजनितदुःखानुभवव्यग्रमनस्तया जाग्रदपि नान्यान्विषयानीक्षत इति ॥**

**भाष्यार्थ**—यावर वादी अशी शंका घेईल–जीव इषुकारन्यायानें मुग्ध होईल. [–'**यथा**०' इत्यादि भाष्यानें इषुकारन्यायाचेंच विवरण–]=जसा तीक्ष्ण बाण तयार करणारा जागा असूनहि त्या बाणामध्येंच त्याचें मन आसक्त झाल्यामुळें अन्य विषयांना पहात नाहीं, त्याप्रमाणें मुग्ध मुसलादिकांचा प्रहार होणें, इत्यादिकांपासून झालेल्या दुःखाचा अनुभव घेण्यांत व्यग्रचित्त झाल्यामुळें–त्याचें मन त्या दुःखानुभवांत व्यग्र झाल्याकारणानें जागा असूनहि अन्य विषयांना पहात नाहीं, अशी शंका यावर वादी घेईल! [–भाष्यकार 'न०' इत्यादि भाष्यानें दृष्टान्त व दार्ष्टान्तिक यांतील वैषम्य सांगून शंकेचें निरसन करितात–]

**भाष्यं—न। अचेतयमानत्वात्। इषुकारो हि व्यापृतमना ब्रवीतीषुमेवाहमेतावन्तं कालमुपलभमानोऽभूवमिति। मुग्धस्तु लब्धसंज्ञो ब्रवीति अंधे तमस्यहमेतावन्तं कालं प्रक्षिप्तोऽभूवं। न किंचिन्मया चेतितमिति। जाग्रतश्चैकविषयविषक्तचेतसोऽपि देहो विध्रियते। मुग्धस्य तु देहो धरण्यां पतति। तस्मान्न जागर्ति ॥**

**भाष्यार्थ**—'**न**'–असें होत नाहीं. कारण मुग्धाला अचेतयमानत्व असतें, त्याला त्यावेळीं कशाचेंच भान नसतें. बाणामध्येंच ज्याचें मन व्यापृत–व्यापारयुक्त आहे असा इषुकार ' मी एवढा वेळ केवळ एका इषूलाच–बाणालाच पाहणारा–त्याचाच अनुभव घेणारा असा होतों ' असें सांगतो. पण मुग्ध ' मी एवढा वेळ अंधतमामध्यें–गाढ अज्ञानांत पडलें होतों, मला कांहींहि कळलें नाहीं' असें देह-भानावर आल्यावर सांगतो. [–मुग्धाच्या जागरितावस्थात्वाच्या अभावाविषयीं म्ह० मुग्ध जागरित अवस्थेमध्यें नसतो, याविषयीं ' **जाग्रतश्च०**' इत्यादि भाष्यानें हेत्व-न्तर सांगतात–]=आणि जागत असलेला–जागरित या अवस्थेंत असलेला जीव ज्याचें चित्त एकाच विषयांत आसक्त झालें आहे, असा जरी असला तरी त्याचा देह विधृत–विशेष प्रकारें धारण केलेला असा असतो. तो पडत नाहीं. तर बस-लेला, किंवा उभा जसा असेल तसाच–त्याच अवस्थेंत राहतो. पण मुग्धाचा–मूर्छिताचा देह भूमीवर पडतो. [–देहधारणाच्या अभावामुळें व कोणत्याच विष-याची उपलब्धि होत नसल्यामुळें मुग्ध जाग्रदवस्थ नसतो असें निगमन–]=**त-स्मात्०** '–म्हणून मुग्ध जागत नाहीं. [–" तर मग त्याला स्वप्नावस्थत्व असूं दे " ' **नापि०** ' इत्यादि भाष्यानें उत्तर—]

**भाष्यं—नापि स्वप्नान्पश्यति निःसंज्ञकत्वात् । नापि मृतः प्राणोष्मणोर्भावात् । मुग्धे हि जंतौ मृतोऽयं स्यान्न वा मृत इति संशयानाः ऊष्मास्ति नास्तीति हृदय-देशमालभन्ते निश्चयार्थं । प्राणोऽस्ति नास्तीति च नासिकादेशम् । यदि प्राणो-ष्मणोरस्तित्वं नावगच्छन्ति ततो मृतोऽयमित्यध्यवसाय दहनायारण्यं नयन्ति॥**

**भाष्यार्थ**—तो मुग्ध स्वप्नांनाहि पहात नाहीं–स्वप्नावस्थहि नव्हे. कारण त्याला निःसंज्ञकत्व असतें, त्याला त्यावेळीं मनोमय विषयविज्ञानहि नसतें. [–"तर मग त्याला मृतावस्थत्व असूं दे. " याचेंहि 'नाहीं' असें उत्तर ' **नापि मृतः०**' इत्यादि भाष्यानें देतात–]=तो मृतहि झालेला नसतो. कारण त्याच्यामध्यें प्राण व ऊष्मा यांचें अस्तित्व असतें. [–" पण मुग्धामध्यें प्राण व ऊष्मा पूर्वीप्रमाणें नसतात. तेव्हां त्याला मृताहून अन्यत्व कसें ? " ' **मुग्धे हि०**' इत्यादि भाष्यानें उत्तर–] =कारण जीव मुग्ध–मूर्छित झाला असतां ' हा मेला आहे कीं मेलेला नाहीं' असा संशय घेणारे लोक ऊष्मा आहे कीं नाहीं, हें पहाण्यासाठीं त्याच्या हृदयप्रदेशाला स्पर्श करितात आणि प्राण आहे कीं नाहीं, याचा निश्चय करण्यासाठीं नासिका-देशाला स्पर्श करितात–नाकाशीं हात धरितात. [ ऊष्मा आहे कीं नाहीं, असा संशय घेऊन त्यांतील एका पक्षाचा निश्चय करण्यासाठीं हृदयदेशाला स्पर्श करि-

तात, व प्राण आहे कीं नाहीं, असा संदेह मनांत आणून यांतील एका पक्षाचा निर्णय करण्यासाठीं नाकापाशीं हात धरितात, असा संबंध.—नास्तित्वनिश्चयाचें फल 'यदि०' इत्यादि भाष्यानें सांगतात—]=जर प्राण व ऊष्मा यांच्या अस्तित्वाचें ज्ञान त्यांना न झालें तर हा मृत झाला आहे, असा निश्चय करून दहनासाठीं त्याला अरण्यास नेतात. [म्ह० त्यांचा निश्चय जरी कोणाच्या प्रत्यक्ष ज्ञानाचा विषय न झाला तरी त्याला जाळण्यासाठीं श्मशानांत नेणें, या कार्यावरून त्यांच्या निश्चयाचें अनुमान होतें.—'अथ तु०' इत्यादि भाष्यानें अस्तित्वनिश्चयाचें फल सांगतात—]

**भाष्यं—अथ तु प्राणमूष्माणं वा प्रतिपद्यन्ते, ततो नायं मृत इत्यध्यवसाय संज्ञालाभाय भिषज्यन्ति। पुनरुत्थानाच्च न दिष्टं गतः। न हि यमं गतो यमराष्ट्रात्प्रत्यागच्छति ॥**

**भाष्यार्थ**—पण याच्या उलट त्याच्या शरीरांत प्राण व ऊष्मा आहे, असा जर त्यांचा निश्चय झाला तर हा मृत झालेला नाहीं, असा निर्णय करून [—त्याविषयींहि कार्यलिंगक अनुमान सांगतात—]='**संज्ञालाभाय०**'—त्याला देहभानावर —शुद्धीवर आणण्यासाठीं चिकित्सा—औषधोपचार करितात. [—मुग्ध जीव हा मृत नव्हे, याविषयीं '**पुनरुत्थानाच्च०**' इत्यादि भाष्यानें हेत्वन्तर—]=आणि मुग्ध झालेला जीव पुनः उठत असल्यामुळें—पुनः देहभानावर येऊन पूर्वीप्रमाणें उत्थान करीत असल्यामुळें तो दिष्टंगत—यमलोकीं गेलेला—मेलेला नाहीं. [—"अहोपण, यमराज्यास प्राप्त झालेल्याचेंहि पुनरुत्थान कां होणार नाहीं?" '**न हि०**' इत्यादि भाष्यानें उत्तर—]=कारण कोणीहि यमराष्ट्रास गेलेला जीव त्या यमराष्ट्रापासून परत येत नाहीं. [—तर मग आतां मुग्धाचें परिशेषसिद्ध स्वापावस्थत्व आहे, असें वादी '**अस्तु०**' इत्यादि भाष्यानें सांगतो—]

**भाष्यं—अस्तु तर्हि सुषुप्तः। निःसंज्ञत्वादमृतत्वाच्च। न। वैलक्षण्यात्। मुग्धः कदाचिच्चिरमपि नोच्छ्वसिति सवेपथुरस्य देहो भवति। भयानकं च वदनं। विस्फारिते नेत्रे। सुषुप्तस्तु प्रसन्नवदनस्तुल्यकालं पुनः पुनरुच्छ्वसिति। निमीलिते अस्य नेत्रे भवतः। न चास्य देहो वेपते। पाणिपेषणमात्रेण च सुषुप्तमुत्थापयन्ति। न तु मुग्धं मुद्गरघातेनापि ॥**

**भाष्यार्थ**—तर मग तो मुग्ध सुषुप्त—निद्रित झालेला असूं दे. [—त्याविषयीं सालक्षण्य—मुग्ध व सुप्त यांचें समानलक्षणत्व हा हेतु '**निःसंज्ञत्वात्०**' इत्यादि भाष्यानें सांगतात—]=कारण त्या मुग्धाला निःसंज्ञत्व—संज्ञाशून्यत्व असतें व तो मृतहि झालेला नसतो. [—असें हें सालक्षण्य—समानलक्षणत्व जरी असलें तरी

लक्षणनिमित्त फलांचा भेद असल्यामुळें मुग्ध व सुप्त या अवस्थांचें ऐक्य नाहीं, असें भाष्यकार '**न०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=नाहीं, त्यांचें ऐक्य नाहीं. कारण त्या दोन अवस्थांमध्यें वैलक्षण्य आहे. [–'**मुग्धः०**' इत्यादि भाष्यानें लक्षण व लक्षणभेद यांचें विवरण–]=मूर्च्छित झालेला जीव केव्हां केव्हां दीर्घकालहि उच्छ्वास सोडीत नाहीं व याचा देह कंपयुक्त असतो आणि मुख भयानक व नेत्र ताठलेले–फिरलेले असतात. '**सुषुप्तस्तु०**'–पण सुषुप्त–गाढ निजलेला जीव प्रसन्नमुख असतो. तुल्यकाल–एकसारख्याच अन्तरानें पुनः पुनः श्वास सोडितो. याचे दोन्ही नेत्र मिटलेले असतात. '**न च०**'–आणि याचा देह कांपत नाहीं '**पाणिपेषण०**' –नुस्त्या हाताच्या स्पर्शानें–किंचित् हालवूनच सुप्ताला लोक जागें करितात–उठवितात. पण मुग्धाला मुद्गराच्या प्रहारानेंहि उठवूं शकत नाहींत. [–'**निमित्तभेदश्च०**' इत्यादि भाष्यानें त्या दोन अवस्थांच्या निमित्तभेदाचें उदाहरण देतात–]

**भाष्यं—निमित्तभेदश्च भवति मोहस्वापयोः । मुसलसंपातादिनिमित्तत्वान्मोहस्य । श्रमनिमित्तत्वाच्च स्वापस्य । न च लोकेऽस्ति प्रसिद्धिर्मुग्धः सुप्त इति । परिशेषादर्धसंपत्तिर्मुग्धता इत्यवगच्छामः । निःसंज्ञत्वात्संपन्न इतरस्माद्वैलक्षण्यादसंपन्न इति ॥**

**भाष्यार्थ**— मोह व स्वाप यांचा निमित्तभेदहि असतो म्ह० त्यांचीं निमित्तेंहि भिन्न भिन्न असतात. '**मुसलसंपातादि०**' – मस्तकावर मुसलादिकांचा मोठा प्रहार होणें इत्यादि हें मोहाचें–मूर्च्छेचें निमित्त आहे व स्वापाला–सुषुप्तीला श्रमनिमित्तत्व आहे म्ह० मोहाचें प्रहार हें निमित्त व स्वापाचें श्रम हें निमित्त आहे. [दोन्ही ठिकाणीं 'आदि-'पदानें ज्वरादिकांचें ग्रहण करावें. श्रम घालविण्यासाठीं ब्रह्मसंपत्ति ही सुषुप्ति आहे आणि देहत्यागासाठीं ब्रह्मसंपत्ति हा मोह आहे. कारण मूर्च्छा आली असतां मरणाचा अभाव जरी असला तरी मूर्च्छेच्या अभावीं मरणाचा अभाव आहे. म्ह० प्रत्येक मूर्च्छेच्या वेळीं मरण नियत जरी नसलें तरी मरण मूर्च्छेवांचून कधींच येत नाहीं, असा फलभेद मानून मोह व स्वाप यांच्या ऐक्याविषयीं प्रमाणाचा अभाव सांगतात–]='**न च०**'–आणि लोकामध्यें–व्यवहारांत मूर्च्छित झालेला सुप्त–निद्रित झाला आहे, अशी प्रसिद्धि नाहीं. [–यास्तव परिशेषानें प्राप्त झालेला अर्थ '**परिशेषात्०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=यास्तव परिशेषामुळें मुग्धता–मूर्च्छा ही अर्धसंपत्ति आहे, असें आम्ही समजतों. [साम्य व वैलक्षण्य यांच्या योगानें त्याची अर्धसंपत्ति साधितात–]='**निःसंज्ञत्वात्०**'–संज्ञारहित्यामुळें–भानशून्यतेमुळें संपन्न झालेला पण सुषुप्ताहून वैलक्षण्य असल्यामुळें

असंपन्न, म्हणून मुग्धता ही अर्धसंपत्ति आहे. [–'कथं०' इत्यादि भाष्यानें त्या अर्ध-संपत्तीवर आक्षेप––]

**भाष्यं—कथं पुनरर्धसंपत्तिर्मुग्धतेति शक्यते वक्तुम्। यावता सुप्तं प्रति तावदुक्तं श्रुत्या—' सता सोम्य तदा संपन्नो भवति ' इति। ' अत्र स्तेनोऽस्तेनो भवति' 'नैतं सेतुमहोरात्रे तरतो न जरा न मृत्युर्न शोको न सुकृतं न दुष्कृतम् ' इत्यादि ॥**

**भाष्यार्थ**—अहोपण, मुग्धता ही अर्धसंपत्ति आहे, असें म्हणणें कसें शक्य आहे? [–" त्यांत काय अनुपपत्ति आहे?" अशी आशंका घेऊन वादी मुग्धाच्या अर्धसंपत्तीचा अभाव साधण्यासाठीं कर्म व त्याच्या फलाचा लेश यांच्या अभावानें सुप्ताशीं त्याचें साम्य, 'यावता०' इत्यादि भाष्यानें सांगतो–]=कारण श्रुतीनें अगोदर सुप्ताला उद्देशून "हे सोम्य, तो त्यावेळीं सत्-नें संपन्न होतो" –११०–असें सांगितलें आहे. तसेंच "या सुप्तावस्थेंत स्तेन–चोर असतो तो अस्तेन होतो."–बृ. ४. ३. २२. सु. उ. ६७९–" या सेतुरूप आत्म्याला अहोरात्र परिच्छिन्न करीत नाहींत, याला जरा प्राप्त होत नाहीं, मृत्यु नाहीं, शोक नाहीं, पुण्य नाहीं, पाप नाहीं, "–छां. ८. ४. १. सु. उ. ४७३–इत्यादि सांगितलें आहे. [सुप्राप्रत जें सत्संपन्नत्व सांगितलें आहे तें उपाधीच्या उपरमाच्या–उपशांतीच्या अभिप्रायानें आहे आणि तो उपाधीचा उपरम मुग्धालाहि समान आहे. त्यामुळें मुग्धता ही कृत्स्नसंपत्तिच आहे.–" अहोपण, जोंवर बंध असतो तोंवर कर्मसंबंध असतो. त्यामुळें सुप्ताचें कर्मराहित्य असिद्ध आहे." अशी आशंका घेऊन ' कर्मांचें कार्य असा जो सुख-दुःखानुभव तो सुप्ताला नसल्यामुळें त्याच्या तद्धेतु कर्मांचें राहित्य कल्पावें' असें वादी 'जीवे हि०' इत्यादि भाष्यानें म्हणतो–]

**भाष्यं—जीवे हि सुकृतदुष्कृतयोः प्राप्तिः सुखित्वदुःखित्वप्रत्ययोत्पादनेन भवति। न च सुखित्वप्रत्ययो दुःखित्वप्रत्ययो वा सुषुप्ते विद्यते। मुग्धेऽपि तौ प्रत्ययौ नैव विद्येते। तस्मादुपाध्युपशमात्सुषुप्तवन्मुग्धेऽपि कृत्स्नसंपत्तिरेव भवितुमर्हति नार्धसंपत्तिरिति ॥**

**भाष्यार्थ**—कारण जीवाचे ठिकाणीं सुकृत व दुष्कृत–पुण्य व पाप यांची प्राप्ति सुखित्व व दुःखित्व यांच्या प्रत्ययोत्पादनानें होते. [–" अहोपण, सुप्ताला सुखाचा अनुभव येत असल्यामुळें त्याच्याशीं नित्यसाहचर्य ठेवणाऱ्या दुःखानुभवाचीहि कल्पना करावी," अशी आशंका घेऊन ' त्या अवस्थेंत स्वप्रकाश स्वरूपसुखानुभवावांचून कर्मजन्य अनुकूल-प्रतिकूल विषयज्ञानापासून होणारे दुसरे

प्रत्यय संभवत नाहींत,' असें वादी 'न च०' इत्यादि भाष्यानें म्हणतो–]=सुषुप्तांत सुखित्वप्रत्यय किंवा दुःखित्वप्रत्यय नाहींत. [–"अहोपण, सुप्ताला कर्मफल जरी नसल तरी त्यावरून मुग्धाचें काय सिद्ध झालें?" 'मुग्धेऽपि०' इत्यादि भाष्यानें उत्तर–]=मुग्धाचे ठिकाणींहि ते प्रत्यय नसतातच. [–याप्रमाणें सुखादिप्रत्ययांच्या अभावावरून कल्पिलेल्या कर्माभावानें मुग्धामध्येंहि संपूर्ण सत्संपत्ति सिद्ध होते, असें वादी 'तस्मात्०' इत्यादि भाष्यानें निगमन करितो–]=तस्मात् उपाधीच्या उपशमामुळें सुषुप्ताप्रमाणें मुग्धामध्येंहि कृत्स्नसंपत्तिच असणें युक्त आहे. मुग्धाची अर्धसंपत्ति युक्त नाहीं, 'इति'–असें सिद्ध झालें. [–सुप्त व मूर्च्छित यांची ब्रह्मसंपत्ति जरी समान असली तरी त्यांच्या त्या दोन अवस्थांमध्यें भेद आहे, असें 'अत्रोच्यते'–या भाष्यानें आचार्य सांगतात—]

**भाष्यं—अत्रोच्यते—न ब्रूमो मुग्धेऽर्धसंपत्तिर्जीवस्य ब्रह्मणा भवतीति । किं तर्हि । अर्धेन सुषुप्तपक्षस्य भवति मुग्धत्वं । अर्धेनावस्थान्तरपक्षस्येति ब्रूमः । दर्शिते च मोहस्य स्वापेन साम्यवैषम्ये । द्वारं चैतन्मरणस्य । यदास्य सावशेषं कर्म भवति तदा वाङ्मनसे प्रत्यागच्छतः । यदा तु निरवशेषं कर्म भवति तदा प्राणोष्माणावपगच्छतः । तस्मादर्धसंपत्तिं ब्रह्मविद इच्छन्ति ॥**

**भाष्यार्थ**—याविषयीं असें सांगितलें जातें–[–मूर्च्छेमध्यें जीवाची ब्रह्माशीं अर्धसंपत्ति होत नाहीं, असें जें वाद्यानें म्हटलें आहे त्याचा 'न ब्रूमः०' इत्यादि भाष्यानें अंगीकार करितात–]=मुग्धावस्थेंत जीवाची ब्रह्माशीं अर्धसंपत्ति होते, असें आम्ही म्हणत नाहीं. [–"तर कशाच्या अपेक्षेनें अर्धसंपत्ति म्हणतां?" 'किं तर्हि०' इत्यादि भाष्यानें उत्तर–]=तर मग काय? मुग्धत्व अर्धानें–कांहीं भागानें–अंशतः सुषुप्तपक्षाचें होतें व अर्धानें दुसऱ्या अवस्थेच्या म्ह० मरणाच्या पक्षाचें होतें, असें आम्ही म्हणतों. [मुग्धाकडून स्वीकारल्या जाणाऱ्या 'निःसंज्ञत्व' या अर्धानें आणि त्याच्याकडूनच परित्याग केल्या जाणाऱ्या प्रसन्नवदनत्वादि अर्धानें असा भावार्थ.–"अहोपण, स्वीकारल्या जाणाऱ्या व परित्याग केल्या जाणाऱ्या दोन अर्धांनीं मुग्धामध्यें उभयपक्षत्व कसें सिद्ध झालें?" 'दर्शिते च०' इत्यादि भाष्यानें उत्तर–]=मोहाचें स्वापाशीं साम्य व वैषम्य प्रदर्शित केलें आहे. –१३९–[–"तथापि त्याला अमरणपक्षत्व कसें?" 'द्वारं च०' इत्यादि भाष्यानें उत्तर–]=मुग्धत्व हें मरणाचें द्वार आहे. [–"मुग्धत्व हें जर मरणाचें द्वार असेल तर मूर्च्छा येतांच मरण अवश्य प्राप्त होईल!" अशी आशंका घेऊन 'यदा अस्य०' इत्यादि भाष्यानें समाधान–]=जेव्हां याचें कर्म सावशेष–अवशेषयुक्त–बाकी–

शिल्लक असतें [–कर्माच्या सावशेषत्वाविषयीं सूचक लिंग–]=‘ **तदा०** ’–तेव्हां याची वाक् व मन हीं दोन्ही परत फिरतात–पुनः स्वस्थानीं येतात. [–“तर मग मोहाला मरणाचें द्वारत्व कोणत्या कारणानें सांगितलें आहे ? ” ‘ **यदा तु०** ’ इत्यादि भाष्यानें उत्तर–]=पण जेव्हां याचें कर्म निरवशेष होतें–त्याचें भोक्तव्य कर्म संपतें [ कर्माच्या निःशेषत्वाचा प्रयोजक-हेतु–]=‘ **तदा०** ’–त्या वेळीं त्याचे प्राण व ऊष्मा हे दोन्ही निघून जातात. [–याप्रमाणें साम्य व वैषम्य यांनीं सिद्ध झालेल्या अर्थाचा उपसंहार–]=‘ **तस्मात्०** ’–म्हणून ब्रह्मवेत्ते मूर्च्छावस्थेमध्यें अर्धसंपत्ति इच्छितात. [–“ अप्रसिद्धीमुळें मूर्च्छा हें अवस्थान्तर नाहीं ” असें जें वाद्यानें वर–पृ. १३२–म्हटलें आहे त्याचा अनुवाद ‘ **यत्तूक्तं०** ’ इत्यादि भाष्यानें करितात—]

**भाष्यं—यत्तूक्तं न पंचमी काचिदवस्था प्रसिद्धास्तीति । नैष दोषः । कादाचित्कीयमवस्थेति न प्रसिद्धा स्यात् । प्रसिद्धा चैषा लोकायुर्वेदयोः । अर्धसंपत्त्यभ्युपगमाच्च न पंचमी गण्यत इत्यनवद्यम् ॥ १० ॥ ( ४ )**

**भाष्यार्थ**—या प्रसिद्ध चार अवस्थांहून निराळी पांचवी एखादी अवस्था प्रसिद्ध नाहीं, असें जें वर म्हटलें आहे, [–‘ जीवदवस्थेंत मूर्च्छेला सर्वजीवसाधारण्य न ह्यामुळें–मूर्च्छा ही सर्व जीवांना साधारण अशी अवस्था नसल्यामुळें तिची अप्रसिद्धि आहे, या चार अवस्थांतील एखाद्या अवस्थेशीं तिचा अभेद असल्यामुळें नव्हे ’ असें त्याचें समाधान ‘ **नैष दोषः०** ’ इत्यादि भाष्यानें सांगतात–]=हा दोष येत नाहीं. कारण ही अवस्था कादाचित्की–केव्हां केव्हांच अनुभवास येणारी आहे, त्यामुळें ती प्रसिद्ध नाहीं. [–‘तिची सर्वथा अप्रसिद्धिहि नाहीं’ असें ‘**प्रसिद्धा०**’ इत्यादि भाष्यानें सांगतात–]=आणि ही अवस्था लोक व आयुर्वेद–वैद्यशास्त्र यांत प्रसिद्ध आहे. [ कारण ती जर प्रसिद्ध नसती तर मुसलप्रहारादिनिमित्तानें आपला बंधु–कोणी संबंधी वगैरे मुग्ध–मूर्च्छित झालेला पाहून त्याला संज्ञालाभ व्हावा, तो शुद्धीवर–देहाभानावर यावा म्हणून त्याचे आई-बाप वगैरे चिकित्साशास्त्रकुशल वैद्याला शोधून आणून उपाय करण्यास कसे तयार झाले असते, असा भावार्थ. –तर मग तिची पांचवी अवस्था म्हणून गणना कां केली जात नाहीं ? ” ‘ **अर्धसंपत्ति०** ’ इत्यादि भाष्यानें उत्तर–]=तिच्या अर्धसंपत्तीचा अभ्युपगम केलेला असल्यामुळें ती पांचवी अवस्था म्हणून निराळी गणली जात नाहीं. [ निःसंज्ञत्व, अप्रसन्नमुखत्व इत्यादि कारणांनीं तिचा सुप्ति व मरण या दोन अवस्थांमध्यें अंतर्भाव होतो, अशा भावनेनें तिची पांचवी अवस्था या रूपानें गणना केलेली नाहीं, असा भावार्थ.–“ अहोपण, पूर्वोक्त वैषम्यामुळें प्रसिद्ध अवस्थांमध्यें तिची

गणना होत नाहीं, अशा बुद्धीनें तिची पृथक् गणनाहि होईल " अशी आशंका घेऊन ' तिचा प्रसिद्ध अवस्थांमध्यें अन्तर्भाव जरी होत नसला तरी तिला सर्वसाधारणत्व नसल्यामुळें तशी शंका घेतां येत नाहीं,' असें मानून '**इति अनवद्यं०**' या भाष्यानें उपसंहार करितात–]=याप्रमाणें हा सिद्धान्त निर्दोष आहे.१०( ४ ).

( ५. **उभयलिंगाधिकरण. सू.** ११-२१ )

—याप्रमाणें स्वप्नादि-अवस्थांच्या कथनानें त्या अवस्थांहून भिन्न,स्वप्रकाश, ब्रह्मात्मक, सदेकरूप व महावाक्यांतील उद्देश्य अशा 'त्वं-'पदार्थाचें शोधन करून आतां महावाक्यांतील विधेय जो तत्पदार्थ त्याचें शोधन आरंभिणारे सूत्रकार '**न स्थानतः०**' इत्यादि सूत्रानें अगोदर त्याचें निर्विशेषत्व सांगतात—

**सूत्रं—न स्थानतोऽपि परस्योभयलिंगं सर्वत्र हि ॥ ११**

**सूत्रार्थ**—' परस्य उभयलिंगं न '–दोन प्रकारच्या श्रुतींच्या अनुरोधानें परमात्म्याचें–सविशेष व निर्विशेष असें उभयरूपत्व संभवत नाहीं. ' स्थानतः अपि न'–उपाधीच्या योगानेंहि परमात्म्याचें उभयरूपत्व नाहीं. ' हि सर्वत्र '–कारण सर्व ब्रह्मप्रतिपादक वेदान्तांमध्यें ब्रह्माच्या सविशेषत्वाचें निरसन करून निर्विशेष एकरूप ब्रह्माचाच उपदेश केला आहे. ११. सु. ब्र. २८४. [–'**येन ब्रह्मणा०**' इत्यादि भाष्यानें संगति सांगतात—]

**भाष्यं—येन ब्रह्मणा सुषुप्त्यादिषु जीव उपाध्युपशमात्संपद्यते । तस्येदानीं स्वरूपं श्रुतिवशेन निर्धार्यते । सन्त्युभयलिंगाः श्रुतयो ब्रह्मविषयाः ' सर्वकर्मा सर्वकामः सर्वगंधः सर्वरसः ' इत्येवमाद्याः सविशेषलिंगाः । ' अस्थूलमनण्वह्रस्वमदीर्घम् ' इत्येवमाद्याश्च निर्विशेषलिंगाः ॥**

**भाष्यार्थ**—जीव सुषुप्त्यादि-अवस्थांमध्यें उपाधीचा उपशम झाल्यामुळें ज्या ब्रह्मानें संपन्न होतो त्या ब्रह्माचें स्वरूप आतां श्रुतिसामर्थ्यानें निश्चित केलें जातें. [–" अहोपण, ब्रह्मस्वरूप वारंवार सांगितलेलें असल्यामुळें या आरंभाचा काय उपयोग आहे ! " अशी आशंका घेऊन ' श्रुतीमध्यें उपलब्ध झालेल्या विवादाचें निरसन करून ब्रह्मस्वरूपाचा निर्णय करण्यासाठीं हा अधिकरणारंभ आहे,' असें भाष्यांतील '**श्रुतिवशेन**'–या पदानें सांगितलें आहे–'**सन्ति०**' इत्यादि भाष्यानें विषयोक्तिपूर्वक संशयबीज सांगतात–]=ब्रह्मविषय श्रुति उभयलिंग आहेत. [सविशेषत्व व निर्विशेषत्व हीं दोन्हीं ज्या श्रुतींकडून लिंगित–प्रकाशित केलीं जातात त्या श्रुति उभयलिंग होत.–त्यांतील '**सर्वकर्मा०**' इत्यादि वाक्यानें सविशेष ब्रह्मश्रुतींचें उदाहरण देतात–]=" सर्वकर्मा, सर्वकाम, सर्वगंध, सर्वरस "–छां.३.१४.२–या व

अशाच प्रकारच्या दुसऱ्याहि सविशेषलिंग श्रुति आहेत.[पुढील 'च-'कारानें जो'सर्वज्ञ व सर्वविद्'–मुं.१.१.९–इत्यादि उक्तार्थाच्याच दुसऱ्या श्रुति समुच्चित केल्या जातात. ज्यांच्याकडून सविशेष ब्रह्म प्रकाशित केलें जातें त्या सविशेषलिंगश्रुति होत. –'अस्थूलं०' इत्यादि भाष्यानें निर्विशेष श्रुतींचें उदाहरण देतात–]=" अस्थूल, अनणु, अऱ्हस्व "–बृ.३.८.८.–या व अशाच प्रकारच्या दुसऱ्या निर्विशेषलिंगश्रुति आहेत. [–"तें जें अदृश्य"–मु.१.१.६–'अदृश्य अनात्म्य'–तै.२.७–'नेति नेति०' –बृ.२.३.६–इत्यादि श्रुति 'च-'कारानें ग्रहण केल्या जातात. पूर्वीप्रमाणेंच निर्विशेष ब्रह्माचें प्रकाशन करणाऱ्या ज्या श्रुति त्या निर्विशेषलिंग श्रुति होत. –याप्रमाणें विषयासह संशयाचें बीज सांगून 'किं आसु०' इत्यादि भाष्यानें संशय सांगतात–]

**भाष्यं**—किमासु श्रुतिषूभयलिंगं ब्रह्म प्रतिपत्तव्यमुतान्यतरलिंगम्। यदाप्यन्यतरलिंगं तदापि किं सविशेषमुत निर्विशेषमिति मीमांस्यते । तत्र उभयलिंगश्रुत्यनुग्रहादुभयलिंगमेव ब्रह्मेति ॥

**भाष्यार्थ**—या श्रुतींमध्यें ब्रह्म उभयलिंग आहे असें समजावें कीं तें अन्यतरलिंग आहे असें समजावें ? [ उभय म्ह० सविशेषत्व व निर्विशेषत्व ज्या ब्रह्मामध्यें लिंगित–प्रकाशित केलें जातें तें ब्रह्म उभयलिंग होय. सविशेषत्व व निर्विशेषत्व या दोन्हींमध्यें श्रुतींचा अनुग्रह असल्यामुळें व एकामध्यें दोहोंचा विरोध असल्यामुळें हा पहिला विकल्प आहे. ज्यांत सविशेषत्व किंवा निर्विशेषत्व यांतील कांहीं तरी एक लिंगित केलें जातें तें अन्यतरलिंग ब्रह्म होय.–आतां परमात्म्याचें परिणामित्व व कूटस्थत्व यांच्यायोगानें 'यदा०' इत्यादि भाष्यानें पूर्व विकल्पांतील दुसऱ्या पक्षीं विकल्प करितात–]=आणि जर अन्यतरलिंग असेल तर त्यापक्षींहि तें सविशेष आहे कीं निर्विशेष आहे, याची मीमांसा केली जाते. [या अधिकरणांत निर्विशेष तत्पदार्थ जें ब्रह्म त्याचें निरूपण केलेलें असल्यामुळें त्या ब्रह्माचें वाक्यार्थअन्वयित्वानें त्याच्या वाक्यार्थज्ञानहेतुत्वाचा लाभ होतो. म्हणून याच्या पादादिसंगति आहेत. पूर्वपक्षांत 'द्विरूप ब्रह्म ध्येय–उपास्य आहे' पण सिद्धान्तांत 'निर्विशेष ब्रह्मच ज्ञेय आहे,' अशा आशयानें पूर्वपक्ष करितात–]='तत्र'–तशा मीमांसेला आरंभ केला असतां [–"पण ब्रह्माचें उभयविधत्व विकृत-अविकृत ब्रह्माच्या अपेक्षेनें किंवा स्थितिकाल व प्रलयकाल यांच्या भेदानें किंवा कार्यब्रह्म व कारणब्रह्म या भेदामुळें किंवा कारणब्रह्म व अकारणब्रह्म यांच्या भेदानेंहि व्यवस्थापित–प्रस्थापित–निश्चित करितां येत नाहीं. कारण ब्रह्मद्वयाचा अभाव आहे म्ह० ब्रह्म एक आहे. तेव्हां एका

ब्रह्माला विरुद्ध उभयरूपता कशी आहे? " अशी आशंका घेऊन पूर्ववादी 'उभय-लिंग०' इत्यादि भाष्यानें म्हणतो-]=उभयलिंगश्रुतींच्या अनुग्रहामुळें ब्रह्म उभयलिंगच आहे, असें प्राप्त होतें. [" निर्विशेष ब्रह्मप्रकरणस्थ शब्दांची निषेध्यसमर्पणानें-निषेधवाक्याशीं एकवाक्यता होणें, या रूपानें त्यांचें सविशेष ब्रह्मामध्यें तात्पर्य नसल्यामुळें त्यांवरून सविशेषब्रह्मज्ञान होत नाहीं, " असें म्हणतां येत नाहीं. कारण उपासनाप्रकरणस्थ स्वशेषिविधिविरोधशून्यत्वानें स्वार्थीं प्रमाण असलेल्या दुसऱ्या सप्रपंच वाक्यांनीं ब्रह्माच्या सप्रपंचत्वाची सिद्धि होत असल्यामुळें त्यांचा निषेधवाक्यांशीं जरी विरोध असला तरी स्वशेषिवाक्यांशीं विरोध नसल्यामुळें त्यांचें प्रामाण्य उपपन्न होतें, असा भावार्थ.-उभयरूप ब्रह्म ध्येय आहे, अशा पूर्वपक्षाचा ' एवं०' इत्यादि भाष्यानें अनुवाद करून सिद्धान्तसूत्र घेतात-]

**भाष्यं**—**एवं प्र ब्रूमः—न तावत्स्वत एव परस्य ब्रह्मण उभयलिंगत्वमुपपद्यते । न ह्येकं वस्तु स्वत एव रूपादिविशेषोपेतं तद्विपरीतं चेत्यभ्युपगंतुं श यं विरोधा । अस्तु तर्हि स्थानतः पृथिव्याद्युपाधियोगादिति । तदपि नोपपद्यते । न हि उपाधियोगादप्यन्यादृशस्य वस्तुनोऽन्यादृशः स्वभावः संभवति । न हि स्वच्छः सन्स्फटिकोऽलक्तकाद्युपाधियोगादस्वच्छो भवति । भ्रममात्रत्वादस्वच्छताभिनिवेशस्य ॥**

**भाष्यार्थ**—असा पूर्वपक्ष प्राप्त झाला असतां आम्ही सिद्धान्त सांगतों-[-'ब्रह्माचें उभयलिंगत्व स्वाभाविक आहे कीं परोपाधिक' असा विकल्प करून त्यांतील पहिल्या पक्षाचें निरसन-]=' **न तावत्**०'-पण अगोदर पर ब्रह्माचें स्वभावतःच उभयलिंगत्व उपपन्न होत नाहीं. [-'**न हि**०' इत्यादि भाष्यानें अनुपपत्तीला स्पष्ट करितात-]=कारण एक वस्तु स्वतःच-स्वरूपतःच रूपादिविशेषांनीं युक्त व तद्विपरीत, अशी विरोधामुळें मानितां येणें शक्य नाहीं. [-'**अस्तु तर्हि**०' इत्यादि भाष्यानें दुसऱ्या कल्पाची शंका-]=तर मग तें ' स्थानतः '-पृथिव्यादि-उपाधि-संबंधामुळें उभयलिंग असूं दे, असें म्हणाल तर [ स्थान म्ह० उपाधि, त्याच्या योगानें, असा भावार्थ. कारण उभयलिंगत्वाला औपाधिकत्व जरी असलें तरी सत्यत्व आहे. अग्निसंपर्कामुळें उत्पन्न झालेल्या लोखंडाच्या रक्तत्वाप्रमाणें, असा भावार्थ.-उपाधिवशात् आविद्यक-भ्रामक उभयलिंगत्वाचा संभव जरी असला तरी तात्त्विक-पारमार्थिक उभयलिंगत्व संभवत नाहीं. कारण कूटस्थ ब्रह्माच्या वास्तव रूपान्तराचा असंभव आहे, असें ' **तदपि**०' इत्यादि भाष्यानें सांगतात-]=तेंहि उपपन्न होत नाहीं. ' **न हि**० '-कारण उपाधियोगानेंहि एकाप्रकारच्या वस्तूचा

अन्यप्रकारचा स्वभाव–स्वरूप संभवत नाहीं. [–'**न हि स्वच्छः०**' इत्यादि भाष्यानें उक्तार्थच दृष्टान्तानें स्पष्ट करितात–]=कारण स्वच्छ असलेला स्फटिक आलक्तकादि-उपाधीच्या संपर्कानें वस्तुतः अस्वच्छ–रक्तवर्ण होत नाहीं. [–" तर मग आलक्तक–अळिता इत्यादि उपाधीनें युक्त असलेल्या स्फटिकादिकांमध्यें अस्वच्छताबुद्धि कशी होते!" '**भ्रममात्र०**' इत्यादि भाष्यानें उत्तर–]=कारण स्फटिकाच्या अस्वच्छताभिनिवेशाला भ्रममात्रत्व आहे. [स्वरसतः–स्वरूपानें धवल–शुभ्र असलेल्या स्फटिकाचा उपाधीमुळें भासलेला रक्तिमा–लालपणा वास्तव–खरा नाहीं. कारण उपाधीशीं संयुक्त झालेल्या त्याचेंच रक्तत्वानें भान होतें, उपाधिविरहिताचें तसें भान होत नाहीं, असा भावार्थ.–उपाधीला मिथ्यात्व जरी नसलें तरी तिच्यामुळें तत्संयुक्त पदार्थामध्यें भासणाऱ्या परिणामाला मिथ्यात्व आहे, असें सांगितलें. आतां उपाधीलाहि मिथ्यात्व असल्यामुळें तत्कृत परिणामाला मिथ्यात्व आहे, हें काय सांगावें? असें '**उपाधीनां०**' इत्यादि भाष्यानें सांगतात—]

**भाष्यं—उपाधीनां च अविद्याप्रत्युपस्थापितत्वात्। अतश्च अन्यतरलिंगपरिग्रहेऽपि समस्तविशेषरहितं निर्विकल्पकमेव ब्रह्म प्रतिपत्तव्यं न तद्विपरीतम्। सर्वत्र हि ब्रह्मस्वरूपप्रतिपादनपरेषु वाक्येषु 'अशब्दमस्पर्शमरूपमव्ययम्' इत्येवमादिषु अपास्तसमस्तविशेषमेव ब्रह्म उपदिश्यते ॥ ११ ॥**

**भाष्यार्थ**—आणि उपाधींना अविद्याप्रत्युपस्थापितत्व–अविद्याकृतत्व असल्यामुळें ब्रह्माचें तत्कृत उभयलिंगत्व आविद्यक–भ्रामक आहे. [–" अहोपण, ब्रह्माचें उभयरूपत्व जर तात्त्विक नसेल तर नानाश्रुतिसामर्थ्यानें त्याचें सविशेषत्वच मानावें," अशी आशंका घेऊन '**अतश्च०**' इत्यादि भाष्यानें आचार्य म्हणतात–]=आणि 'अतः'–सर्व विशेषाला अविद्याकृतत्वच असल्यामुळें कोणत्या तरी एका लिंगानें युक्त असलेल्या ब्रह्माचा स्वीकार जरी केला तरी समस्तविशेषरहित निर्विकल्पकच ब्रह्म मानावें, तें निर्विशेष व निर्विकल्पच समजावें. त्याहून विपरीत म्ह० सविशेष व सविकल्प आहे, असें समजूं नये. [–त्याविषयींच्या हेतुत्वानें '**सर्वत्र हि०**' इत्यादि भाष्यानें त्याच सूत्रावयवाचें व्याख्यान करितात–] =कारण 'सर्वत्र'–"अशब्द, अस्पर्श, अरूप, अव्यय, अरस"–का.भा.१.३.१५. सु. उ. ६१. (नृसिंहोत्तर. ९. मुक्तिक. २.७२.)–या व अशाच दुसऱ्याहि अनेक ब्रह्मस्वरूपप्रतिपादनपर वाक्यांत समस्तविशेषशून्यच ब्रह्म उपदेशिलें जातें. ११. [–'न स्थानतोऽपि'–उपाधितःहि ब्रह्म सविशेष नाहीं, असें जें म्हटलें आहे, त्यावर '**न भेदात्०**' इत्यादि सूत्रानें आक्षेप घेऊन समाधान करितात–]

## सूत्रं--न भेदादिति चेन्न प्रत्येकमतद्वचनात् ॥ १२

**सूत्रार्थ**--' न ' ब्रह्म नुस्तें निर्विशेषच नाहीं. ' भेदात् '–कारण प्रत्येक उपासनेंत त्याचा आकारभेदानें भेद वर्णिला आहे, ' असें जर म्हणाल तर तें बरोबर नाहीं. ' प्रत्येक उपाधींत ' अतद्वचन '–अभेदवचन आहे. १२. सु. ब्र. २८९. [–' **अथापि०** ' इत्यादि भाष्यानें निषेध्याचा अनुवाद करून निषेध करण्यासाठीं सूत्रांतील 'नञ्-'चा–'न-'काराचा अर्थ सांगतात—]

**भाष्यं—अथापि स्यात् । यदुक्तं निर्विकल्पमेकलिंगमेव ब्रह्म नास्य स्वतः स्थानतो वा उभयलिंगत्वमस्तीति । तन्नोपपद्यते । कस्मात् । भेदात् । भिन्ना हि प्रतिविद्यं ब्रह्मण आकारा उपदिश्यन्ते । चतुष्पाद्ब्रह्म । षोडशकलं ब्रह्म । वामनीत्वादिलक्षणं ब्रह्म । त्रैलोक्यशरीरवैश्वानरशब्दोदितं ब्रह्म । इत्येवंजातीयकाः । तस्मात्सविशेषत्वमपि ब्रह्मणोऽभ्युपगंतव्यम् ॥**

**भाष्यार्थ**—'अथापि'–श्रुतींच्या योगानें ब्रह्माचें निर्विशेषत्व जरी ज्ञात झालें आहे तरी ' निर्विकल्पक एकलिंगच ब्रह्म आहे. त्याचें स्वरूपतः किंवा उपाधितःहि उभयलिंगत्व नाहीं, असें जें सांगितलें तें उपपन्न होत नाहीं. ' असा यावर वादी आक्षेप घेईल. [–' श्रौत अर्थाची असिद्धि होत नाहीं ' अशी शंका–]=' **कस्मात्**' –कोणत्या कारणानें तें उपपन्न होत नाहीं ? [–" श्रुत्यन्तरविरोधामुळें त्याची असिद्धि आहे " असें आक्षेपक सूत्रावयवानें सांगतो–]=' **भेदात्** '–भेदामुळें. [–" **भिन्ना हि०** ' इत्यादि भाष्यानें त्याचें विवरण–]=कारण प्रत्येक विद्येमध्यें ब्रह्माचे भिन्न आकार उपदेशिले जातात. ' चतुष्पाद् ब्रह्म ' ' षोडशकलं ब्रह्म ' –छां. ३. १८–' वामनीत्वादिलक्षण ब्रह्म '–छां.४.१५.२–' त्रैलोक्यशरीर–वैश्वानरशब्दानें उक्त ब्रह्म '–छां. ५.१८.२–अशाप्रकारचे भिन्न भिन्न आकार सांगितलें जातात. [–अशा भिन्नाकारोपदेशाचें फल सांगतो–]=' **तस्मात्०** '–म्हणून ब्रह्माचें निर्विशेषत्वाप्रमाणें सविशेषत्वहि स्वीकारावें. [–'ननु०' इत्यादि भाष्यानें उक्त विरोधाचें स्मरण देतात—]

**भाष्यं–ननूक्तं नोभयलिंगत्वं ब्रह्मणः संभवतीति । अयमप्यविरोधः । उपाधिकृतत्वादाकारभेदस्य।अन्यथा हि निर्विषयमेव भेदशास्त्रं प्रसज्येतेति चेत्।नेति ब्रूमः॥**

**भाष्यार्थ**—अहोपण, ब्रह्माचें उभयलिंगत्व संभवत नाहीं, असें वर सांगितलें आहे. [–औपाधिक आकारभेदाचा स्वीकार करून वादी त्या विरोधाचा परिहार करितो–]=**'अयं अपि०'**-उभयरूपत्वस्वीकारानें विरोधसमाधानाप्रमाणें हाहि अविरोध आहे, म्ह० हा विरोधहि येत नाहीं. कारण ब्रह्माच्या आकारभेदाला उपाधिकृतत्व

आहे, तो भेद औपाधिक आहे. [–" पण उपाधितःहि आकारभेद नाहीं, असें वर सांगितलें आहे. "–पृ.१४२–अशी आशंका घेऊन 'अन्यथा०' इत्यादि भाष्यानें वादी म्हणतो–]=कारण तसा औपाधिक भेद जर न मानिला तर भेद-शास्त्र निर्विषयच होण्याचा प्रसंग येईल, 'इति चेत्'–असें जर म्हणशील तर [–'रूपभेद सांगणाऱ्या शास्त्राच्या प्रामाण्यासाठीं ब्रह्माचा औपाधिक भेद सांगावा,' असें जर म्हणशील तर–" उपाधिगतच भेद ब्रह्मामध्यें गौणवृत्तीनें कल्पावा किंवा उपाधीच्या सांनिध्यामुळें तत्त्वतःच ब्रह्माचाहि भेद होतो ? " यांतील पहिल्या पक्षीं ब्रह्माला उभयरूपत्व नाहीं, अशा आशयानें 'नेति ब्रूमः' असें सांगतात–]=नाहीं, उपाधिगत आकारभेद ब्रह्मामध्यें उपचारानें संभवत नाहीं, असें आम्ही म्हणतों. [–'कस्मात्०' इत्यादि भाष्यानें आकांक्षापूर्वक सूत्रोक्त हेतूला अवतरण देऊन त्याचें व्याख्यान करणारे भाष्यकार विकल्पांतील दुसऱ्या पक्षीं श्रुत्यन्तरविरोध सांगतात–]

**भाष्यं**—**कस्मात् । प्रत्येकमतद्वचनात् । प्रत्युपाधिभेदं ह्यभेदमेव ब्रह्मणः श्रावयति शास्त्रम्—'यश्चायमस्यां पृथिव्यां तेजोमयोऽमृतमयः पुरुषो यश्चायमध्यात्मं शारीरस्तेजोमयोऽमृतमयः पुरुषोऽयमेव स योऽयमात्मा' इत्यादि । अतश्च न भिन्नाकारयोगो ब्रह्मणः शास्त्रीय इति शक्यते वक्तुम् । भेदस्योपासनार्थत्वादभेदे तात्पर्यात् ॥ १२ ॥**

**भाष्यार्थ**—कोणत्या कारणानें ? '**प्रत्येकं अतद्वचनात्**'–कारण शास्त्र प्रत्येक उपाधिभेदांत ब्रह्माचा अभेदच ऐकवितें–सांगतें. " जो हा या पृथिवीमध्यें तेजोमय अमृतमय पुरुष आणि जो हा शरीरांत शारीर–शरीरांत असणारा तेजोमय अमृतमय पुरुष हाच तो 'योऽयं' या वाक्यानें प्रकृत असलेला आत्मा आहे. " –बृ. २. ५. १. सु. उ. ६००–इत्यादि शास्त्र मधुविद्येंत ब्रह्माचा अभेदच सांगतें. [–'**अतश्च०**' इत्यादि भाष्यानें दोन्ही कल्पांचें फल सांगतात–]=आणि असें असल्यामुळें ब्रह्माचा भिन्नाकारयोग शास्त्रीय आहे, असें म्हणतां येत नाहीं. कारण भेदाला उपासनार्थत्व आहे, उपासना हें त्याचें प्रयोजन आहे व अभेदामध्यें त्याचें तात्पर्य आहे. १२. [–भेददर्शनाच्या निंदेनें अभेदकथन केलेलें असल्यामुळेंहि तात्त्विकभेद शास्त्रीय नाहीं, असें '**अपि च०**' इत्यादि सूत्रानें सांगतात—]

## सूत्रं—अपि चैवमेके ॥ १३

**सूत्रार्थ**—'अपि च'–शिवाय 'एके'–कठशाखाध्यायी '**नेह नानास्ति किंचन०**' इत्यादि वचनानें भेददर्शी मृत्युपरंपरेंत पडतो'एवं'–अशी भेदाची निंदा करून अभेदच सांगतात. १३. सु. ब्र.२८५[–'**अपि च०**'इत्यादि भाष्यानें सूत्राचें व्याख्यान–]

**भाष्यं—अपि चैवं भेददर्शननिंदापूर्वकं अभेददर्शनमेवैके शाखिनः समामनन्ति—' मनसैवेदमाप्तव्यं नेह नानास्ति किंचन । मृत्योः स मृत्युमाप्नोति य इह नानेव पश्यति ' इति । तथान्येऽपि " भोक्ता भोग्यं प्रेरितारं च मत्वा सर्वं प्रोक्तं त्रिविधं ब्रह्म मे तत् " इति समस्तस्य भोग भोक्तृनियंतृलक्षणस्य प्रपंचस्य ब्रह्मैकस्वभावतामधीयते ॥ १३ ॥**

**भाष्यार्थ**—आणि 'एवं'–भेददर्शननिंदापूर्वक–भेददृष्टीची निंदा करून अभेददर्शनच 'एके'–काठकशाखेचे लोक ' मनसैवेदं० ' इत्यादि वचनांत सांगतात. " मनानेंच हें ब्रह्मतत्त्व व्यापण्यास–जाणण्यास योग्य आहे. या ब्रह्मामध्यें अणुमात्रहि नानात्व नाहीं. जो या ब्रह्मामध्यें नानासें पाहतो–भेदसा पाहतो तो मरणापासून मरणास–मरणपरंपरेंत पडतो. "–सु. उ.पृ. ६७–असें काठकांत भेदनिंदापूर्वक अभेददर्शन सांगितलें आहे. '**तथा अन्येऽपि०**'–तसेच दुसरेहि श्वेताश्वतरशाखीय "भोक्ता–जीव ' भोग्य '–शब्दादि या दोन्ही प्रेर्यांचा व 'प्रेरितारं'–त्यांच्या प्रेरक–नियंत्या ईश्वराचा 'मत्वा'–विचार करून ' तत् सर्वं त्रिविधं '–तें सर्व तीन प्रकारचें 'मे'–माझें 'प्रोक्तं ब्रह्म'–सांगितलेलें ब्रह्मच आहे,असें जाणावें."–श्वे. १.१२. सु.उ.९२०–असें सांगतात. [–'**समस्तस्य०**' इत्यादि भाष्यानें या उक्त वाक्याचा अर्थ सांगतात–]=ते श्वेताश्वतरशाखीय या समस्त भोग्य-भोक्तृ-नियंतृलक्षण प्रपंचाची ब्रह्मैकस्वभावता–ब्रह्मैकरूपत्व पढतात–सांगतात. १३. [–' **कथं०**'इत्यादि भाष्यानें सूत्रानें व्यावर्त्य असलेली शंका सांगतात—]

**भाष्यं—कथं पुनराकारवदुपदेशिनीषु अनाकारोपदेशिनीषु च ब्रह्मविषयासु श्रुतिषु सतीषु अनाकारमेव ब्रह्मावधार्यते न पुनर्विपरीतमिति । अत उत्तरं पठति–**

**भाष्यार्थ**—अहोपण, साकार ब्रह्माचा उपदेश करणाऱ्या व अनाकार ब्रह्माचा उपदेश करणाऱ्या ब्रह्मविषय श्रुति असतांना अनाकारच ब्रह्माचें अवधारण कसें केलें जात आहे? साकार ब्रह्माचें अवधारण कां केलें जात नाहीं? [ श्रुतींना तुल्यत्व असल्यामुळें ब्रह्माच्या निर्विशेषत्वाविषयीं नियामक हेतु नाहीं–त्याच्या निर्विशेषत्वाचाच नियम करण्यास कांहीं विशेष कारण नाहीं]='**इति**'–अशी आशंका येते. [–'तत्पर श्रुति व अतत्पर श्रुति यांचा परस्परविरोध आला असतां तत्पर श्रुति बलवान् असतात,' हा न्याय हाच नियामक हेतु सांगणारे भाष्यकार '**अतः०**' इत्यादि भाष्यानें पुढील सूत्राला अवतरण देतात–]=म्हणून सूत्रकार '**अरूपवत्०**' इत्यादि सूत्रानें उत्तर पढतात—

## सूत्रं—अरूपवदेव हि तत्प्रधानत्वात् ॥ १४

**सूत्रार्थ**—'रूपरहित'-निर्विशेषच ब्रह्म आहे, असा निश्चय करावा. 'तत्प्रधानत्वात्'-कारण 'अस्थूलं०' इत्यादि निषेधशास्त्राला निर्गुण ब्रह्मप्रधानत्व आहे. १४.

[-'**रूपादि०**' इत्यादि भाष्यानें सूत्रांतील प्रतिज्ञेचें विवरण करितात—]

**भाष्यं—रूपाद्याकाररहितमेव हि ब्रह्मावधारयितव्यं । न रूपादिमत् । कस्मात् । तत्प्रधानत्वात् । 'अस्थूलमनण्वह्रस्वमदीर्घम्' 'अशब्दमस्पर्शमरूपमव्ययम्' 'आकाशो वै नाम नामरूपयोर्निर्वहिता ते यदंतरा तद्ब्रह्म' 'दिव्यो ह्यमूर्तः पुरुषः सबाह्याभ्यंतरो ह्यजः' 'तदेतद्ब्रह्मापूर्वमनपरमनंतरमबाह्यमयमात्मा ब्रह्म सर्वानुभूः' इत्येवमादीनि वाक्यानि निष्प्रपंचब्रह्मात्मतत्त्वप्रधानानि । नार्थान्तरप्रधानानि इत्येतत्प्रतिष्ठापितं 'तत्तु समन्वयात्' इत्यत्र । तस्मादेवंजातीयकेषु वाक्येषु यथाश्रुतं निराकारमेव ब्रह्म अवधारयितव्यम् ॥**

**भाष्यार्थ**—रूपादि-आकाररहितच ब्रह्म आहे, असें अवधारण-निश्चय करावा. तें रूपादिकांनीं युक्त आहे, असें अवधारण करूं नये. [-प्रश्नद्वारा त्याचें सूत्रोक्त नियामक-नियमकारण सांगून त्याचें विवरण करितात-]='**कस्मात्**'-कोणत्या कारणानें ? '**तत्प्रधानत्वात्**'-तत्प्रधानत्वामुळें. "अस्थूल, अनणु, अऱ्हस्व, अदीर्घ"-पृ.१४१-"अशब्द, अस्पर्श, अरूप, अव्यय"-पृ.१४३-"आकाशच नाम-रूपांचा निर्वाहक आहे. तीं नाम-रूपें ज्याच्यामध्यें आहेत तें ब्रह्म"-छां. ८. १४.१-"दिव्य, अमूर्त, पुरुष, सबाह्य अभ्यंतर अज आहे"-मु.२.१.२-"तें हें ब्रह्म अपूर्व, अनपर, अनन्तर, अबाह्य, तेंच ब्रह्म हा आत्मा सर्वांचा अनुभव घेणारा आहे"-बृ. २. ५. १९. सु. उ.६०६-हीं व अशाच प्रकारचीं दुसरींहि निष्प्रपंच-सर्वविशेषशून्य-निर्गुण ब्रह्मात्मतत्त्वप्रधान वाक्यें आहेत. तीं अर्थान्तरप्रधान-सविशेषब्रह्मप्रधान नाहींत.[-"अहोपण,या वाक्यांचेंहि निर्गुणब्रह्मात्मतत्त्वप्रधानत्व असिद्ध आहे. कारण त्यांनाहि उपासनाविधिशेषत्व आहे." अशी आशंका घेऊन भाष्यकार '**इत्येतत्०**' इत्यादि भाष्यानें सांगतात-]=असें हें '**तत्तु समन्वयात्**'-"आणि सर्व वेदान्तांचा ब्रह्मामध्यें समन्वय होत असल्यामुळें तें ब्रह्म वेदान्तप्रमाणक आहे."-ब्र. भा. १. १. ४. पृ. १०६-येथें प्रस्थापित केलें आहे. [-समन्वयाधिकरणाच्या आधारानें '**तस्मात्०**' इत्यादि भाष्यानें फलि सांगतात-]=म्हणून अशा प्रकारच्या वाक्यांत जसें श्रुत आहे तसें निराकारच ब्रह्म आहे, असें अवधारण करावें. [-"अहोपण, सप्रपंच वाक्यांनाहि तत्प्रधानत्व तुल्य आहे" अशी आशंका घेऊन '**इतराणि तु०**' इत्यादि भाष्यानें सांगतात-]

**भाष्यं—इतराणि तु आकारवद्ब्रह्मविषयाणि वाक्यानि न तत्प्रधानानि। उपासनाविधिप्रधानानि हि तानि। तेष्वसति विरोधे यथाश्रुतमाश्रयितव्यम्। सति तु विरोधे तत्प्रधानान्यतत्प्रधानेभ्यो बलीयांसि भवन्ति इत्येष विनिगमनायां हेतुः। येनोभयीष्वपि श्रुतिषु सतीष्वनाकारमेव ब्रह्मावधार्यते। न पुनर्विपरीतमिति ॥१४॥ का तर्ह्याकारवद्विषयाणां श्रुतीनां गतिरित्यत आह—**

**भाष्यार्थ**--पण इतर आकारवत्–साकार ब्रह्मविषय वाक्यें तत्प्रधान–साकार ब्रह्मप्रधान नाहींत. [–त्यांना वस्तुपरत्व नाहीं, याविषयीं '**उपासनाविधि०**' इत्यादि भाष्यानें हेतु सांगतात–]=कारण तीं वाक्यें उपासनाविधिप्रधान आहेत, –उपासनांचें विधान करणें, हाच त्यांचा प्रधान–मुख्य विषय आहे. [–" अहो-पण, त्यांचाहि स्वशेषीशीं–उपास्य ब्रह्माशीं अविरोध असल्यामुळें त्यांना स्वार्थीं–आपल्या मुख्य अर्थीं प्रामाण्य आहे, असें आम्हीं वर–पृ. १४२–सांगितलें आहे" अशी आशंका घेऊन 'पर्णमयी वाक्याप्रमाणें त्यांचा प्रमाणान्तराशीं विरोध येत असल्यामुळें असें मानितां येत नाहीं' असें '**तेषु०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=त्या वाक्यांत विरोध नाहीं, असें झालें असतां त्यांच्या यथाश्रुत–जसा श्रुत आहे तशा अर्थाचा आश्रय करणें उचित होईल! [–"पण त्या उभयविध वाक्यांचा परस्पर विरोध तुल्य असल्यामुळें त्यांतील निर्विशेष ब्रह्मपर वाक्येंच स्वार्थीं प्रमाण आहेत, असा निश्चय कोणत्या कारणानें होतो?" अशी आशंका घेऊन '**सति तु०**' इत्यादि भाष्यानें आचार्य म्हणतात–]=पण त्यांत विरोध असतांना तत्प्रधानवाक्यें अतत्प्रधान वाक्यांहून अधिक बलवान् असतात, असा हाच विनिगमनेंतील हेतु–एक पक्ष स्वीकारण्याचें कारण आहे. [–उक्त हेतुकृत विनिगमनेचाच अभिनय करितात–]=कीं ज्या हेतूमुळें दोन्ही प्रकारच्या श्रुति असतांना अनाकार–निर्गुण ब्रह्माचाच निश्चय केला जातो, आणि तद्विपरीत सगुण ब्रह्माचा निश्चय केला जात नाहीं. '**इति**'–याप्रमाणें ब्रह्म निर्गुणच आहे, असें सिद्ध झालें. १४. [–प्रश्नपूर्वक पुढील सूत्राला अवतरण देतात–]='**का तर्हि०**' –तर मग आकारवत्–सगुण ब्रह्मविषय श्रुतींची काय वाट आहे? अशी आकांक्षा झाली असतां '**प्रकाशवच्च०**' इत्यादि सूत्रानें उत्तर सांगतात—

**सूत्रं—प्रकाशवच्चावैयर्थ्यात् ॥ १५**

**सूत्रार्थ**--आणि प्रकाशाप्रमाणें–प्रकाश उपाधि-संबंधानें जसा सरळ, वक्र इत्यादि होतो तसें ब्रह्म पृथिव्यादि-उपाधींमुळें जणुकाय त्या त्या आकाराचें होतें. असा औपाधिक आकार हीच सविशेष श्रुतींची गति आहे, त्यामुळें 'अवैयर्थ्य'

—सविशेष ब्रह्मप्रतिपादक श्रुतींना अव्यर्थत्व आहे. १९. [—'**यथा०**' इत्यादि भाष्यानें सूत्रांतील 'प्रकाशवत्' या दृष्टान्ताचें व्याख्यान—]

**भाष्यं—यथा प्रकाशः सौरश्चान्द्रमसो वा वियद्व्याप्यवतिष्ठमानः, अंगुल्याद्युपाधिसंबंधात्तेष्वृजुवक्रादिभावं प्रतिपद्यमानेषु तद्भावमिव प्रतिपद्यते। एवं ब्रह्मापि पृथिव्याद्युपाधिसंबंधात् तदाकारतामिव प्रतिपद्यते। तदालंबनो ब्रह्मण आकारविशेषोपदेश उपासनार्थो न विरुध्यते। एवमवैयर्थ्यं आकारवद्ब्रह्मविषयाणामपि वाक्यानां भविष्यति। न हि वेदवाक्यानां कस्यचिदर्थवत्त्वं कस्यचिदनर्थवत्त्वमिति युक्तं प्रतिपत्तुं, प्रमाणत्वाविशेषात् ॥**

**भाष्यार्थ—**जसा सूर्याचा किंवा चंद्राचा प्रकाश आकाशाला व्यापून राहणारा असा होत्साता अंगुल्यादि-उपाधिसंबंधामुळें, त्या उपाधि ऋजु-वक्रादिभावास प्राप्त झाल्या असतां जणुकाय तद्भावास—ऋजु-वक्रादिभावास प्राप्त होतो, [—सूत्रांतील 'च-'काराचा अर्थ—दार्ष्टान्तिक '**एवं०**' इत्यादि भाष्यानें सांगतात—]=त्याप्रमाणें ब्रह्महि पृथिव्यादि-उपाधिसंबंधामुळे जणुकाय त्यांच्या आकारत्वास प्राप्त होतें. [—"तर मग निराकार ब्रह्माच्या आकाराचा उपदेश कशासाठीं केला आहे!" याचें उत्तर—]='**तदालंबनः०**'—त्या औपाधिक आकाराचा ज्याला आश्रय आहे, असा ब्रह्माच्या आकारविशेषाचा उपासनेसाठीं उपदेश विरुद्ध होत नाहीं. [—'**अवैयर्थ्यात्**' या सूत्रोक्त पदांतील प्रातिपदिकाचा अर्थ '**एवं०**' इत्यादि भाष्यानें सांगतात—]=याप्रमाणें आकारवत्-ब्रह्मविषय वाक्यांचेंहि अव्यर्थत्व-उपयुक्तत्व होईल [—"अहोपण, निष्प्रपंच वाक्यांच्या विरोधामुळें त्यांना व्यर्थत्वच कां नाहीं?" अशी आशंका घेऊन त्या पदांतील प्रत्ययाचा अर्थ '**न हि०**' इत्यादि भाष्यानें सांगतात—]=कारण वेदवाक्यांतील कांहीं एखाद्या वाक्याला अर्थवत्त्व व एखाद्या वाक्याला अनर्थवत्त्व—व्यर्थत्व आहे, असें समजणें युक्त नाहीं. कारण त्या दोन्ही वाक्यांना प्रमाणत्व एकसारखेंच आहे. [—'**ननु०**' इत्यादि भाष्यानें पूर्वापरविरोधाची शंका—]

**भाष्यं—नन्वेवमपि यत्पुरस्तात्प्रतिज्ञातं नोपाधियोगादप्युभयलिंगत्वं ब्रह्मणोऽस्तीति, तद्विरुध्यते। नेति ब्रूमः। उपाधिनिमित्तस्य वस्तुधर्मत्वानुपपत्तेः। उपाधीनां च अविद्याप्रत्युपस्थापितत्वात्। सत्यामेव च नैसर्गिक्यामविद्यायां लोकवेदव्यवहारावतार इति तत्र तत्रावोचाम ॥ १५ ॥**

**भाष्यार्थ—**'अहोपण, 'एवं अपि'—अशा प्रकारें श्रुतींना व्यवस्थितत्व जरी असलें तरी पूर्वी उपाधिसंबंधानेंहि ब्रह्माला उभयलिंगत्व नाहीं'—पृ. १४२—अशी

जी प्रतिज्ञा तुम्हीं केली आहे तिच्याशीं विरोध येतो. [–' औपाधिक उभयलिंगत्व वास्तव आहे, असें मानून तुम्हांकडून हा विरोध साधिला जात आहे कीं तें–उभय-लिंगत्व अविद्याकृत–कल्पित आहे, असें साधिलें जात आहे' असा विकल्प करून **'नेति०'** इत्यादि भाष्यानें त्यांतील पहिल्या पक्षाचें निरसन करितात–]= नाहीं, पूर्व प्रतिज्ञेशीं विरोध येत नाहीं, असें आम्ही सांगतो. कारण उपाधि-निमित्त धर्माच्या वस्तुधर्मत्वाची अनुपपत्ति आहे. [वस्तूचा धर्म म्ह० सत्यत्व. उपाधीमुळें प्राप्त झालेल्या धर्माला सत्यता असणें शक्य नाहीं, असा भावार्थ. –याहि कारणानें उपाधिकृत नानात्वाला सत्यत्व नाहीं, असें **'उपाधीनां च०'** इत्यादि भाष्यानें सांगतात–]=आणि उपाधींना अविद्याप्रत्युपस्थापितत्व–अविद्याकल्पि-तत्व आहे, त्यामुळेंहि उपाधिकृत नानात्वाला सत्यत्व नाहीं.[–" उपाधींना आवि-द्यत्व–कल्पितत्व नाहीं. कारण शास्त्रतः त्यांचें ज्ञान झाल्यावांचून तद्विशिष्ट–त्या उपाधींनीं युक्त अशा ब्रह्माची उपासना संभवत नाहीं," अशी आशंका घेऊन 'उपाधींना सत्यत्व आहे, असें ज्ञान करून देणारें प्रमाण नाहीं. ब्रह्मज्ञान झालें असतां ब्रह्माच्या अज्ञानाचा ध्वंस होत असल्याकारणानें उपासनादिव्यव-हारालाहि निरवकाशत्व आहे. म्हणून उपाधींना व्यावहारिक सत्त्व–अस्तित्व जरी असलें तरी तात्त्विकता नाहीं' असें **'सत्यां एव०'** इत्यादि भाष्यानें सांगतात–] =आणि स्वाभाविक अविद्या विद्यमान असतांनाच लोकव्यवहार व वेदव्यवहार प्रवृत्त होतो, असें आम्हीं या पूर्वी ठिकाठिकाणीं सांगितलें आहे. [पण आविद्यक–भ्रामक–कल्पित नानात्व विरोधाचें निमित्त होऊं शकत नाहीं, कारण यापूर्वीहि त्या आविद्यक नानात्वरूप सर्वव्यवहारहेतूचा आम्हीं स्वीकार केलेला आहे, असें मानून भाष्यांत 'तत्र तत्र अवोचाम'–ठिकठिकाणीं आम्हीं सांगितलें आहे, असें म्हटलें आहे.] १९. [–" तर मग कशाप्रकारचें निर्विशेष ब्रह्म श्रुतींत सांगितलें आहे." **'आह च'** इत्यादि सूत्रानें उत्तर—]

## सूत्रं—आह च तन्मात्रम् ॥ १६

**सूत्रार्थ**—आणि श्रुति 'ब्रह्म चैतन्यमात्र स्वयंज्योति' इत्यादि आहे, असें सांगते. १६. सु. ब्र. २८६ [– 'आह च०' इत्यादि भाष्यानें सूत्राचें व्याख्यान–]

**भाष्यं—आह च श्रुतिश्चैतन्यमात्रं विलक्षणरूपान्तररहितं निर्विशेषं ब्रह्म 'स यथा सैन्धवघनोऽनंतरोऽबाह्यः कृत्स्नो रसघन एवैवं वा अरेऽयमात्मानंतरोऽ-बाह्यः कृत्स्नः प्रज्ञानघन एव' इति । एतदुक्तं भवति–नास्यात्मनोऽन्तर्बहिर्वा**

**चैतन्यादन्यद्रूपमस्ति, चैतन्यमेव तु निरंतरमस्य स्वरूपम्। यथा सैंधवघनस्यांतर्बहिश्च लवणरस एव निरंतरो भवति न रसान्तरं, तथैवेति ॥ १६ ॥**

**भाष्यार्थ**--आणि श्रुति चैतन्यमात्र ब्रह्म सांगते. [सूत्रांतील 'तन्मात्रं' या शब्दांतील 'मात्र-'प्रत्ययाचा अर्थ सांगतात–]=विलक्षण रूपान्तरानें–चैतन्यविलक्षण दुसऱ्या रूपानें रहित निर्विशेष ब्रह्म श्रुति सांगते. [–"ती श्रुति कोणती ?" उत्तर–]='**स:**'–त्याविषयीं दृष्टान्त–'**यथा सैन्धवघनः०**'–"जसा सैंधवाचा खडा अनन्तर, अबाह्य, सर्व रसघन–क्षारपूर्णच असतो त्याचप्रमाणें हे मैत्रेयि, हा आत्मा अनन्तर, अबाह्य, कृत्स्न, प्रज्ञानघनच आहे"–बृ. ४. ५. १३. सु. उ. ७०६–ही श्रुति निर्विशेष ब्रह्म सांगते. [–ज्याप्रमाणें व्यवहारांत सैंधवाचा घन म्ह० एकप्रकारचा आकार अंतर्बाहिर्भेदशून्य सर्व लवण-एकरस असतो तसाच हा आत्मा अंतर्बहिर्विभागरहित सर्वहि एक प्रज्ञप्तिरूप आहे, असा याचा भावार्थ.–" अहोपण, सविशेष असलेल्याच सैंधवघनाला दृष्टान्तितत्व असल्यामुळें –विशेषानें युक्त असलेल्याच मिठाच्या खड्याचा दृष्टान्त दिलेला असल्यामुळें–दार्ष्टान्तिक ब्रह्माचेंहि सविशेषत्व, दृष्टान्त व दार्ष्टान्तिक यांना एकरूपत्व असल्यामुळें, प्राप्त होतें" अशी आशंका घेऊन '**एतदुक्तं०**' इत्यादि भाष्यानें आचार्य म्हणतात–] =या श्रुतीनें हें असें सांगितलें आहे. प्रस्तुत आत्म्याच्या आंत किंवा बाहेर चैतन्याहून दुसरें कोणतेंहि रूप नाहीं. तर निरंतर–अखंड एक चैतन्यच याचें स्वरूप आहे. जसें सैंधवाच्या खड्याच्या आंत किंवा बाहेर एक निरंतर लवणरसच असतो, रसान्तर नसतें, तसेंच आत्मस्वरूप चैतन्य-एकरस आहे असें जाणावें. १६ [–इतर धर्मांच्या निषेधमुखानें ब्रह्माचा बोध केला जात असल्यामुळेंहि ब्रह्म स्वगतविशेषशून्य आहे. कारण त्याला जर विशेषवत्त्व असेल तर त्या विशेषाच्या कथनानेंहि त्याच्या प्रतिपादनाची सिद्धि होत असल्यामुळें इतरव्यावृत्तीला व्यर्थत्व प्राप्त होईल असें '**दर्शयति च०**' इत्यादि सूत्रानें सांगतात–]

## सूत्रं—दर्शयति चाथो अपि स्मर्यते ॥ १७

**सूत्रार्थ**—'नेति नेति' इत्यादि श्रुति 'दर्शयति च–' प्रपंचाच्या निषेधद्वाराच ब्रह्म प्रदर्शित करिते 'अथो स्मर्यते'–भगवद्गितेंतहि तसेंच–निषेधमुखानेंच तें स्मृत आहे. १७. सु. ब्र. २८६. [–'**दर्शयति च श्रुतिः०**' इत्यादि भाष्यानें सूत्राचें व्याख्यान–]

**भाष्यं—दर्शयति च श्रुतिः पररूपप्रतिषेधेनैव ब्रह्म, निर्विशेषत्वात्–'अथात आदेशो नेति नेति' इति 'अन्यदेव तद्विदितादथो अविदितादधि' 'यतो वाचो निवर्तन्ते अप्राप्य मनसा सह' इत्येवमाद्या ॥**

**भाष्यार्थ**—आणि 'अथ'-"रूपद्वयाच्या व्याख्यानानंतर 'अतः'–त्याला ब्रह्मज्ञानाचें हेतुत्व असल्यामुळें 'नेति नेति'–हें मूर्तहि ब्रह्म नव्हे व अमूर्तहि ब्रह्म नव्हें, असा आदेश-निर्देश आहे."–बृ. २. ३. ६. सु.उ.५९१–" तें विदित–व्यक्त–कार्य व अविदित–अव्यक्त–कारण या दोहोंहूनहि निराळें–विलक्षण आहे" –के. ३. सु. उ. १४–" ज्याच्यापासून वाक् मनासह त्याला प्राप्त न होतां परत येते त्या आनंदाला–ब्रह्मस्वरूपाला जाणणारा कोणत्याहि निमित्तानें भीत नाहीं." तै. २. ४. १. सु. उ. २१६–इत्यादि प्रकारची श्रुति पररूपाच्या–अनात्मरूपाच्या निषेधानेंच ब्रह्म–'दर्शयति'–दाखविते. कारण त्या ब्रह्माला निर्विशेषत्व आहे. [ अन्यनिषेधानेंच ब्रह्मकथनामध्यें 'स्वगतविशेषाचा अभाव' हा हेतु आहे, असा भावार्थ. त्याविषयींच दुसरी श्रुति '**बाष्कलिना०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]

**भाष्यं—बाष्कलिना च बाध्वः पृष्टः सन्नवचनेनैव ब्रह्म प्रोवाचेति श्रूयते– " स होवाचाधीहि भो इति स तूष्णीं बभूव तं ह द्वितीये वा तृतीये वा वचन उवाच–ब्रूमः खलु त्वं तु न विजानासि। उपशान्तोऽयमात्मा " इति ॥**

**भाष्यार्थ**—बाष्कलीकडून विचारला गेलेला बाध्व अवचनानेंच–मौनानेंच ब्रह्म सांगता झाला, असें श्रुत आहे " तो बाष्कलि म्हणाला–'भो भगवन्, मला ब्रह्माचा उपदेश करा' पण तो बाध्व 'तूष्णीं' झाला–मुकाट्यानें बसला, कांहीं बोलला नाहीं. [ब्रह्माविषयीं प्रश्न केला असतां बाध्वाच्या तूष्णींभावाचा आशय न जाणणारा तो बाष्कलि पुनः विचारिता झाला. उत्तर देण्याविषयीं पुनः पुनः फार आग्रह करणाऱ्या त्या बाष्कलीला ]=दुसऱ्या किंवा तिसऱ्या प्रश्नाचे वेळीं बाध्व म्हणाला–अरे, आम्ही तर तुला ब्रह्माचा उपदेश करीत आहों–तुझ्या प्रश्नाचें उत्तर सांगत आहों, [–"तुम्हीं जर उत्तर सांगितलें आहे तर तें मला कसें कळलें नाहीं ?" '**त्वं०**' इत्यादि वाक्यानें बाध्व म्हणतो–]=पण तूं तें जाणत नाहींस, तुला माझ्या मौनरूप उत्तराचा आशय कळला नाहीं. [ 'पण तूष्णींभाव हेंच उत्तर कसें?'–'**उपशान्तः०**' इत्यादि उत्तर–]=हा आत्मा उपशान्त आहे,' 'इति'–असें तो बोलला. [–'**तथा०**' इत्यादि भाष्यानें 'अथो०' इत्यादि सूत्रावयवाचें व्याख्यान–]

**भाष्यं—तथा स्मृतिष्वपि परप्रतिषेधेनैवोपदिश्यते—" ज्ञेयं यत्तत्प्रवक्ष्यामि यज्ज्ञात्वाऽमृतमश्नुते । अनादिमत्परं ब्रह्म न सत्तन्नासदुच्यते " इत्येवमाद्यासु । तथा विश्वरूपधरो नारायणो नारदमुवाचेति स्मर्यते—"माया ह्येषा मया सृष्टा यन्मां पश्यसि नारद । सर्वभूतगुणैर्युक्तं नैवं मां ज्ञातुमर्हसि " इति ॥ १७॥**

**भाष्यार्थ**—'अथो'-त्याचप्रमाणें "जें ज्ञेय तें मी सांगेन [-ज्ञेयाच्या उक्तीचें फल सांगतात-]='यत्०'-जें जाणल्यानें अमृताची प्राप्ति होते. [त्या ज्ञेयाचाच विशेष सांगतात-]='अनादिमत्'-ज्याला आदि-उत्पत्ति आहे तें आदिमत्-कार्य, तें ज्याला नाहीं, तें अनादिमत् पर ब्रह्म [कार्यरहित, असा याचा भावार्थ.-तें स्वत: कार्य नाहीं असें 'न सत्'-या विशेषणानें सांगतात-]=तें स्वत: कार्य नाहीं 'न असत्'-व तें कारणहि नाहीं, असें सांगितलें जातें"-गी. १३. १२.- इत्यादि स्मृतींमध्येंहि ब्रह्माचा पररूपप्रतिषेधानेंच उपदेश केला जातो. 'तथा०'- ब्रह्माच्या वास्तव निर्विशेषत्वबलानें विश्वरूपधर नारायण "हे नारदा, तूं पृथिव्यादि सर्व भूतांचे जे गंधादिक गुण किंवा सर्व प्राण्यांचे जे जनकत्व-पालकत्वादि गुण त्यांनीं युक्त अशा मला जें पहात आहेस ती मीं माया उत्पन्न केली आहे. [-'पण ही मायाच कां! हे तुझें वास्तविक रूपच कां नाहीं!' असें नारदानें विचारलें असतां निर्विशेष श्रुतींच्या आश्रयानें 'नैवं०' इत्यादि उत्तर-]= तूं मला असेंच समजण्यास योग्य नाहींस. माझें हें खरें रूप आहे असें समजणें तुला उचित नाहीं." असें नारदाला सांगता झाला. असें महाभारतांत स्मृत-स्मृतिवचन आहे. १७. [-विशिष्ट दृष्टान्ताचें कथनहि ब्रह्माचें निर्विशेषत्व सुचवितें असें 'अत एव०' इत्यादि सूत्रानें सांगतात-]

## सूत्रं—अत एव चोपमा सूर्यकादिवत् ॥ १८

**सूत्रार्थ**—असें असल्यामुळेंच ब्रह्माचें औपाधिक सविशेषत्व स्वीकारून 'उदकांतील सूर्याच्या प्रतिबिंबादिकांप्रमाणें' अशी उपमा दिलेली आहे. सू. १८. सु. ब्र. २८६. [-'यत:०' इत्यादि भाष्यानें सूत्राक्षरांचें व्याख्यान-]

**भाष्यं**—यत एव चायमात्मा चैतन्यरूपो निर्विशेषो वाङ्मनसातीतः परप्रतिषेधोपदेश्यः। अत एव चास्योपाधिनिमित्तामपारमार्थिकीं विशेषवत्तामभिप्रेत्य जलसूर्यकादिवदित्युपमा उपादीयते मोक्षशास्त्रेषु—

**भाष्यार्थ**—ज्याअर्थींच हा आत्मा चैतन्यरूप, निर्विशेष, वाङ्मनसातीत, परप्रतिषेधोपदेश्य-अनात्मस्वरूपाच्या प्रतिषेधानें उपदेश करण्यास योग्य आहे, -त्याअर्थींच-असें असल्यामुळेंच याचें जें उपाधिनिमित्त अपारमार्थिक विशेषवत्त्व त्याच्या विवक्षेनें 'जलसूर्यकादिकांप्रमाणें' अशी उपमा मोक्षशास्त्रांमध्यें स्वीकारिली जाते. [पूर्वोक्त सर्व रूपांचें ग्रहण करून चैतन्यरूप इत्यादि चार विशेषणें योजिलीं आहेत. "आत्म्याच्या विशेषवत्त्वाला उपाधिनिमित्तत्व जर असेल तर त्याला सत्यत्व आहे" अशी आशंका घेऊन भाष्यांत विशेषवत्त्वाला 'अपारमार्थिक' असें

विशेषण योजिलें आहे. 'जल-सूर्यकादिवत्' येथें प्रतिबिंबाला बिंबाहून भिन्नत्वानें आभासत्व आहे या आशयानें 'क-'प्रत्यय योजिला आहे.–तींच मोक्षशास्त्रें संक्षेपानें सांगतात–]

**भाष्यं**—" यथा ह्ययं ज्योतिरात्मा विवस्वानपो भिन्ना बहुधैकोऽनुगच्छन् । उपाधिना क्रियते भेदरूपो देवः क्षेत्रेष्वेवमजोऽयमात्मा" इति । " एक एव हि भूतात्मा भूते भूते व्यवस्थितः । एकधा बहुधा चैव दृश्यते जलचंद्रवत्" इति चैवमादिषु ॥ १८ ॥ अत्र प्रत्यवस्थीयते—

**भाष्यार्थ**—'यथा०'–"ज्याप्रमाणें हा प्रसिद्ध जोतिःस्वभाव सूर्य स्वतः एक असूनहि भिन्न भिन्न पात्रांतील भिन्न भिन्न जलांमध्यें अनुगत–प्रतिबिंबित होत्साता उपाधीनें अनेक प्रकारचा केला जातो, त्याचप्रमाणें हा आत्मा भिन्नक्षेत्रांमध्यें अनुवृत्त होत्साता कूटस्थ स्वप्रकाश चिद्रूप असूनहि उपाधीनें भेदरूप केला जातो," असा दृष्टान्त दिला आहे. [–'सूर्यकादि' येथील 'आदि-'शब्दानें ग्रहण केलेलें जलचन्द्राचें उपमान 'एक एव०' या वाक्यानें दाखवितात–]="एकच भूतात्मा प्रत्येक भूतामध्यें विशेषरूपानें अवस्थित आहे. जलांतील चन्द्रप्रतिबिंबाप्रमाणें तोच एकधा व बहुधा दिसतो. "–ब्रह्मबिन्दूपनिषद् १२–इत्यादि मोक्षशास्त्रांमध्यें सूर्य-चन्द्रादिदृष्टान्तांचें ग्रहण केलें जातें. १८. [–पुढील सूत्राला 'अत्र०' इत्यादि भाष्यानें अवतरण–]=या श्रौत-स्मार्त दृष्टान्तांविषयीं 'अम्बुवत्०' इत्यादि सूत्रानें प्रत्यवस्थान केलें जातें–त्यावर प्रत्याक्षेप केला जातो–

## सूत्रं—अम्बुवदग्रहणात्तु न तथात्वम् ॥ १९

**सूत्रार्थ**—'तु'–पण 'अम्बुवत्' प्रसिद्ध जलाप्रमाणें उपाधीचें 'अग्रहणात्' –प्रत्यक्ष ग्रहण होत नसल्यामुळें 'तथात्वं न'–आत्म्याला सूर्याचें साम्य नाहीं.१९. सु.ब्र. २८७.[–'न तथात्वं' या सूत्रांशाचें 'न०' इत्यादि भाष्यानें व्याख्यान–]

**भाष्यं**—न जलसूर्यादितुल्यत्वमिहोपपद्यते तद्वदग्रहणात् । सूर्यादिभ्यो हि मूर्तेभ्यः पृथग्भूतं विप्रकृष्टदेशं मूर्तं जलं गृह्यते । तत्र युक्तः सूर्यादिप्रतिबिंबोदयः । न त्वात्मा मूर्तो न चास्मात्पृथग्भूता विप्रकृष्टप्रदेशाश्चोपाधयः, सर्वगतत्वात्सर्वानन्यत्वाच्च । तस्मादयुक्तोऽयं दृष्टान्त इति ॥१९॥ अत्र प्रतिविधीयते–

**भाष्यार्थ**—या आत्म्यामध्यें जलसूर्यादितुल्यत्व उपपन्न होत नाहीं. कारण आत्म्याचें त्याच्याप्रमाणें ग्रहण–ज्ञान होत नाहीं. [–याप्रमाणें हेतूला अवतरण देऊन 'तद्वत् अग्रहण' दाखविण्यासाठीं दृष्टान्ताचें स्वरूप 'सूर्यादिभ्यः०' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=कारण मूर्त–साकार असलेल्या सूर्यादिकांहून पृथक्

असलेलें व ज्याचा देश दूर आहे असें मूर्त-साकार जल प्रत्यक्ष अनुभवास येतें. त्यामुळें त्यांत-मूर्त व दूर असलेल्या जलांत सूर्यादिकांच्या प्रतिबिंबाचा उदय होणें युक्त आहे. [-' न तु० ' इत्यादि भाष्यानें दार्ष्टान्तिकांतील त्याहून वैषम्य सांगतात-]=पण आत्मा सूर्यादिकांप्रमाणें मूर्त-साकार नाहीं व त्याच्या उपाधि त्याहून पृथग्भूत व त्याच्यापासून दूर प्रदेशीं राहणाऱ्या नाहींत. [-उपाधींचा प्रदेश आत्म्यापासून दूर नाहीं, याविषयीं हेतु सांगतात-]=' सर्वगतत्वात् '-कारण आत्म्याला सर्वगतत्व आहे. [ त्यांना आत्म्याहून पृथग्भूतत्व नाहीं, याविषयीं हेतु-]='सर्वानन्यत्वात् च०' आणि आत्म्याला सर्वांशीं अनन्यत्व-अभिन्नत्व आहे. [ '-तस्मात्० '-इत्यादि भाष्यानें वैषम्याचें फल सांगतात-]=त्यामुळें हा दृष्टान्त अयुक्त आहे, ' इति '-असें वादयाकडून प्रत्यवस्थान केलें जातें. १९. [-अशा या आक्षेपाचा अनुवाद करून सिद्धान्त सांगतात-]=' अत्र प्रतिविधीयते० '-असा प्रत्याक्षेप आला असतां त्याचें प्रतिविधान-निरसन ' वृद्धिह्रास० ' इत्यादि सूत्रानें केलें जातें—

**सूत्र--वृद्धिह्रासभाक्त्वमन्तर्भावादुभयसामंजस्यादेवम् ॥ २०**

**सूत्रार्थ**—जलांतील सूर्यप्रतिबिंबाचें जलगत वृद्धि-ह्रासभाक्त्व जसें खरें नव्हे, त्याचप्रमाणें ' अन्तर्भावात् ' कूटस्थ आत्म्याचा देहादि-उपाधींत अन्तर्भाव होत असल्यामुळें उपाधींच्या वृद्धि-क्षयांनीं आत्मा वृद्धि-क्षयवान् आहे, असें वाटतें, पण तें खरें नव्हे. ' एवं '-याप्रमाणें-या अंशानें ' उभयसामंजस्य '-दृष्टान्त व दार्ष्टान्तिक यांना सामंजस्य आहे. २०. सु. ब्र. २८७. [-'दृष्टान्त व दार्ष्टान्तिक यांचें विवक्षित अंशानें साम्य आहे कीं सर्वांशांनीं ?' असा विकल्प करून ' युक्त एव० '-इत्यादि भाष्यानें त्यांतील पहिल्या पक्षाचा अंगीकार करितात-]

**भाष्यं—युक्त एव त्वयं दृष्टान्तो विवक्षितांशसंभवात्। न हि दृष्टान्तदार्ष्टान्तिकयोः कचित्कंचिद्विवक्षितांशं मुक्त्वा सर्वसारूप्यं केनचिद्दर्शयितुं शक्यते। सर्वसारूप्ये हि दृष्टान्तदार्ष्टान्तिकभावोच्छेद एव स्यात्। न चेदं स्वमनीषया जलसूर्यकादिदृष्टांतप्रणयनम्। शास्त्रप्रणीतस्य त्वस्य प्रयोजनमात्रमुपन्यस्यते ॥**

**भाष्यार्थ**—पण त्यांत विवक्षित अंशाचा संभव असल्यामुळें हा दृष्टान्त युक्तच आहे. [ '-न हि० '-इत्यादि भाष्यानें दुसऱ्या पक्षाचें निरसन-]=कारण दृष्टान्त व दार्ष्टान्तिक यांतील कचित् एखादा विवक्षित अंश सोडून सर्वसारूप्य-सर्व अंशांनीं सादृश्य कोणालाहि कधीं दाखवितां येणें शक्य नाहीं. कारण

त्या दोहोंनाहि सर्वांशांनीं सारूप्य असतें, असें झाल्यास त्यांच्या दृष्टान्त-दार्ष्टान्तिकभावाचाच उच्छेद होईल! [—"दृष्टान्तांत उपाधीचें भिन्नत्व व भिन्नदेशत्व उपलब्ध झालेलें आहे. पण दार्ष्टान्तिकांत त्यांचा अभाव असल्यामुळें व रूपशून्यत्वामुळें ब्रह्माचें प्रतिबिंब कल्पितां येत नाहीं," अशी आशंका घेऊन 'न चेदं०'—इत्यादि भाष्यानें म्हणतात—]=हें जलसूर्यकादि-दृष्टान्ताचें प्रणयन सूत्रकारांनीं आपल्याच मनीषेनें—इच्छेनें—कल्पनेनें केलेलें नाहीं. [—"तर मग त्या शास्त्रीय दृष्टान्तांत सूत्रकारांकडून काय केलें जातें?" 'शास्त्रप्रणीतस्य०' इत्यादि भाष्यानें उत्तर—]=तर शास्त्रप्रणीत—शास्त्रानेंच केलेल्या या दृष्टान्ताचें केवल प्रयोजन—आत्म्याचें निर्विशेषत्वज्ञान सूत्राकडून उपन्यस्त केलें जातें—सांगितलें जातें. [—विवक्षितांशानें साम्य जरी असलें तरी सर्वरूपानें साम्य अतिप्रसंगी आहे, असें सांगितलें. आतां 'किं पुनरत्र०' इत्यादि भाष्यानें आकांक्षापूर्वक सूत्र घेऊन त्याचें व्याख्यान करितात—]

**भाष्यं—किं पुनरत्र विवक्षितं सारूप्यमिति। तदुच्यते—वृद्धिह्रासभाक्त्वमिति। जलगतं हि सूर्यप्रतिबिंबं जलवृद्धौ वर्धते। जलह्रासे ह्रसति जलचलने चलति, जलभेदे भिद्यत इत्येवं जलधर्मानुयायि भवति। न तु परमार्थतः सूर्यस्य तथात्वमस्ति। एवं परमार्थतोऽविकृतमेकरूपमपि सद्ब्रह्म देहाद्युपाध्यंतर्भावाद्भजत इवोपाधिधर्मान्वृद्धिह्रासादीन्। एवमुभयोः दृष्टान्तदार्ष्टान्तिकयोः सामंजस्यादविरोधः॥ २०॥**

**भाष्यार्थ**—येथें विवक्षित सारूप्य काय आहे, असें जर विचाराल तर तें सांगितलें जातें. 'वृद्धिह्रासभाक्त्व' हें सारूप्य आहे. कारण जलगत सूर्यप्रतिबिंब जलाची वृद्धि झाली असतां वाढतें व जलाचा ह्रास झाला असतां त्याचा ह्रास होतो—क्षय होतो, जल हालूं लागलें असतां तें हालतें व जलाचा भेद झाला असतां प्रतिबिंबाचा भेद होतो. याप्रमाणें जलांतील प्रतिबिंब जलधर्मानुयायी—जलाच्या धर्मांचें अनुकरण करणारें—जलधर्माला अनुसरणारें असतें. पण सूर्याला परमार्थतः 'तथात्व'—जलधर्मानुयायित्व नसतें. 'एवं०'—याप्रमाणें परमार्थतः अविकृत व एकरूपहि असलेलें ब्रह्म देहादि-उपाधींमध्यें अन्तर्भाव झाल्यामुळें जणुंकाय वृद्धि-ह्रासादि उपाधिधर्मांचें अनुकरण करितें. जणुंकाय तें त्या धर्मांस पात्र होतें. [—याप्रमाणें 'वृद्धि-ह्रास०' इत्यादि सूत्रभागाचें व्याख्यान करून 'एवं०' इत्यादि भाष्यानें अवशिष्ट सूत्रभागाचें व्याख्यान करितात—]=याप्रमाणें 'उभयोः'—दृष्टान्त व दार्ष्टान्तिक या दोहोंचें 'सामंजस्य'—समंजसता—उपपन्नत्व

असल्यामुळें—याप्रमाणें दृष्टान्त व दार्ष्टान्तिक उपपन्न होत असल्यामुळें त्यांच्या दृष्टान्त-दार्ष्टान्तिकभावाचा अविरोध आहे, त्यांत विरोध नाहीं. २०. [—'ब्रह्म अमूर्तत्वामुळें प्रतिबिंबभावाला प्राप्त होण्यास योग्य नाहीं, गंधाप्रमाणें' असें जें वाद्यानें अनुमान केलें होतें त्यांतील अप्रयोजकत्व सांगून आगमविरोध हें दोषान्तर 'दर्शनाच्च०' या सूत्रानें सांगतात—]

**सूत्रं—दर्शनाच्च ॥ २१ ॥ (५)**

**सूत्रार्थ—**'पुरश्चक्रे द्विपदः०' इत्यादि श्रुति पर ब्रह्माचा देहांत प्रतिबिंबरूपानें प्रवेश झालेला दाखविते. त्यामुळें तें ब्रह्म निर्विशेष व चैतन्य-एकरसरूप आहे, हें सिद्ध होतें. २१ (५) सु. ब्र. २८८. [—'दर्शयति च०' इत्यादि भाष्यानें सूत्राचें विवरण करितात—]

**भाष्यं—**दर्शयति च श्रुतिः परस्यैव ब्रह्मणो देहादिषूपाधिषु अंतरनुप्रवेशम्—'पुरश्चक्रे द्विपदः पुरश्चक्रे चतुष्पदः । पुरः स पक्षी भूत्वा पुरः पुरुष आविशत्' इति । 'अनेन जीवेनात्मनानुप्रविश्य' इति च । तस्मात् युक्तमेतत्—'अतएव चोपमा सूर्यकादिवत्' इति । तस्मान्निर्विकल्पकैकलिंगमेव ब्रह्म नोभयलिंगं विपरीतलिंगं चेति सिद्धम् ॥

**भाष्यार्थ—**आणि श्रुति पर ब्रह्माचाच देहादि उपाधींमध्यें अन्तरनुप्रवेश—आंत झालेला अनुप्रवेश दाखविते. 'द्विपदः पुरः चक्रे'—"तो परमेश्वर दोन पायांनीं उपलक्षित होणारीं मनुष्यादिशरीरें करिता झाला. 'चतुष्पदः पुरः चक्रे'—तो चार पायांनीं उपलक्षित होणारीं पश्वादिशरीरें करिता झाला. 'पुरः'—चक्षुरादि इंद्रियांची अभिव्यक्ति होण्यापूर्वींच 'सः पक्षी भूत्वा'—तो स्रष्टा ईश्वर लिंगशरीरी होऊन 'पुरः'—त्याच उत्पन्न केलेल्या शरीरांत 'आविशत्'—प्रवेश करिता झाला. पण वस्तुतः तो 'पुरुषः'—पूर्ण आहे." [कारण त्याहून भिन्न वस्तूचा अभाव आहे. असा भावार्थ.]—बृ. २. ५. १८. सु. उ. ६०६—अशी व "या जीवानें—आत्म्यानें अनुप्रवेश करून"—पृ. १०७—अशी श्रुति परब्रह्माचा देहादि-उपाधींमध्यें त्यांच्या सृष्टीनंतर प्रवेश दाखविते. [—याप्रमाणें प्रतिबिंबपक्ष श्रुतिमूल आहे, असें झालें असतां 'तस्मात्०' इत्यादि भाष्यानें फलित सांगतात—]=तस्मात् "म्हणूनच सूर्याच्या प्रतिबिंबादिकांप्रमाणें अशी उपमा दिलीं आहे"—पृ. १९३—असें जें म्हटलें आहे, तें युक्तच आहे. [—'तस्मात् निर्विकल्पक०' इत्यादि भाष्यानें स्वसिद्धान्ताचा उपसंहार करितात—]=म्हणून निर्विकल्पक एकलिंगच ब्रह्म आहे. तें उभयलिंग किंवा विपरीतलिंग नाहीं, असें सिद्ध झालें. [—याप्रमाणें

स्वमतानें अधिकरण सांगून स्वयूथ्यमताला–आपल्या एकदेशीच्या मताला '**अत्र केचित्०**' इत्यादि भाष्यानें उत्थापित करितात—]

**भाष्यं— अत्र केचिद् द्वे अधिकरणे कल्पयन्ति। प्रथमं तावत्—किं प्रत्यस्तमिताशेषप्रपंचमेकाकारं ब्रह्मोत प्रपंचवद् अनेकाकारोपेतमिति। द्वितीयं तु–स्थिते प्रत्यस्तमितप्रपंचत्वे किं सल्लक्षणं ब्रह्मोत बोधलक्षणमुतोभयलक्षणमिति॥**

**भाष्यार्थ**—'**अत्र**'–या व्याख्यान केलेल्या सूत्रांमध्यें कोणी दोन अधिकरणें कल्पितात. [ 'न स्थानतः'–पृ. १४०–येथपासून 'प्रकाशवच्च०'–पृ. १४८–या सूत्राच्या आरंभापर्यंत एक अधिकरण करितात.–'**प्रथमं०**' इत्यादि भाष्यानें त्यांतील विचार दाखवितात–]=अगोदर सर्व प्रपंचशून्य एकाकार ब्रह्म आहे कीं तें प्रपंचानें युक्त अशा अनेकाकारांनीं युक्त आहे, याचा पहिल्या अधिकरणांत विचार करितात. [–'**प्रकाशवच्च०**' येथून ते दुसरें अधिकरण करितात. त्यांतील विचार '**द्वितीयं तु०**' इत्यादि भाष्यानें सांगतात—]=पण तें सर्वप्रपंचशून्य आहे, असें सिद्ध झालें असतां 'तें ब्रह्म सत्-लक्षण आहे, कीं बोधलक्षण आहे, कीं उभयलक्षण आहे ?' याचा दुसऱ्या अधिकरणांत विचार करितात. [ त्यांतील 'प्रकाशवच्च' हें पूर्वपक्षाचें सूत्र आहे. ब्रह्म केवल सद्रूपच नाहीं तर तें चैतन्य-प्रकाशवत् आहे. कारण 'सत्य, ज्ञान' व 'सदेव' अशी दोन्ही प्रकारची श्रुति आहे. तिला असें द्विरूप ब्रह्म असल्यासच वैयर्थ्य प्राप्त होत नाहीं, असा पूर्वपक्ष प्राप्त झाला असतां 'आह च तन्मात्रं' हें सिद्धान्त सूत्र आहे. 'सदेव' 'विज्ञानं आनन्दं' इत्यादि श्रुति सत्त्व चैतन्यप्रकाशमात्र आहे, असें सांगते. त्यामुळें ब्रह्माच्या नानारसत्वाची शंका येत नाहीं, असा भावार्थ.–या दुसऱ्या अधिकरणाला '**अत्र वयं०**' इत्यादि भाष्यानें दूषित करितात—]

**भाष्यं— अत्र वयं वदामः—सर्वथाप्यानर्थक्यमधिकरणान्तरारंभस्येति। यदि तावदनेकलिंगत्वं परस्य ब्रह्मणो निराकर्तव्यमित्ययं प्रयासः तत्पूर्वेणैव 'न स्थानतोऽपि' इत्यनेनाधिकरणेन निराकृतमित्युत्तरमाधिकरणं 'प्रकाशवच्च' इत्येतद्व्यर्थमेव भवेत्॥**

**भाष्यार्थ**—याविषयीं आम्ही असें म्हणतों–'**सर्वथा अपि**'–फल व संदेह यांचा भाव–अस्तित्व जरी असलें तरी अधिकरणान्तराच्या आरंभाला आनर्थक्य आहे, दुसऱ्या अधिकरणाचा आरंभ करणें व्यर्थ आहे. [–"पण फलाचा भाव–अस्तित्व असतांना अधिकरणान्तरारंभाला व्यर्थत्व कसें ?" अशी आशंका घेऊन 'तें फल काय आहे ? ब्रह्माच्या अनेक रूपत्वाचें निराकरण, कीं त्याचें

सन्मात्रसाधन कीं त्याचें बोधमात्रत्वज्ञान' असा विकल्प करून '**यदि०**' इत्यादि भाष्यानें त्यांतील पहिल्या कल्पाला दूषित करितात–]=अगोदर पर ब्रह्माच्या अनेकालिंगत्वाचें निराकरण करणें उचित आहे, म्हणून जर हा प्रयास असेल तर 'न स्थानतोऽपि०' या पूर्वीच्या अधिकरणानेंच त्याचें निराकरण झालेलें असल्यामुळें पुढचें 'प्रकाशवच्च०' हें अधिकरण व्यर्थच होईल. [–'**न च०**' इत्यादि भाष्यानें दुसऱ्या कल्पाचें निरसन करितात––]

**भाष्यं—न च सल्लक्षणमेव ब्रह्म न बोधलक्षणमिति शक्यं वक्तुम् । विज्ञानघन एवेत्यादिश्रुतिवैयर्थ्यप्रसंगात् । कथं वा निरस्तचैतन्यं ब्रह्म चेतनस्य जीवस्यात्मत्वेनोपदिश्येत । नापि बोधलक्षणमेव ब्रह्म न सल्लक्षणमिति शक्यं वक्तुम् । 'अस्तीत्येवोपलब्धव्यः' इत्यादिश्रुतिवैयर्थ्यप्रसंगात् । कथं वा निरस्तसत्ताको बोधोऽभ्युपगम्येत ॥**

**भाष्यार्थ**—आणि 'ब्रह्म सत्-लक्षणच आहे, बोधलक्षण नाहीं,' असें म्हणतां येणें शक्य नाहीं. कारण तसें म्हटल्यास 'विज्ञानघन एव' इत्यादि श्रुतीला व्यर्थत्व प्राप्त होण्याचा प्रसंग येतो. [–आणि केवल श्रुतिविरोधच नाहीं तर श्रुतार्थापत्तिविरोधहि येतो, असें '**कथं वा०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=किंवा निरस्तचैतन्य–चैतन्यशून्य ब्रह्म चेतन जीवाच्या आत्मत्वानें कसें उपदेशितां येईल–चैतन्यरहित ब्रह्म चेतन जीवाचा आत्मा आहे, असा उपदेश कसा करितां येईल? [ यानें पूर्वपक्षाची असिद्धि सांगितली.–आतां '**नापि०**' इत्यादि भाष्यानें तिसऱ्या कल्पाचा परिहार–]=तसेंच ब्रह्म बोधलक्षणच आहे, सत्-लक्षण नाहीं, असें सांगणें शक्य नाहीं. कारण "तो परमात्मा आहे, असेंच जाणावें"–का. २. ३. १३. सु. उ. ७८–इत्यादि श्रुतींच्या व्यर्थत्वाचा प्रसंग येतो. [–श्रुतिविरोधाप्रमाणें युक्तिविरोध हा दोषहि या पक्षावर येतो, असें '**कथं०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–] =किंवा ज्याच्या सत्तेचें निरसन केलेलें आहे, असा बोध स्वीकारला कसा जाईल ? [ कारण सत्-पासून व्यावृत्त झालेल्या–सद्भिन्न वस्तूला तुच्छत्व–शून्यत्व असतें, असा भावार्थ. या कथनानें सिद्धान्ताची सिद्धि सांगितली.–वाद्याचा दुसरा पूर्वपक्षहि अयुक्त आहे. कारण त्याचा पूर्वाधिकरणाशीं विरोध आहे, असें '**नापि उभय०**' इत्यादि भाष्यानें सांगतात—]

**भाष्यं—नाप्युभयलक्षणमेव ब्रह्मेति शक्यं वक्तुम् । पूर्वाभ्युपगमविरोधप्रसंगात् । सत्ताव्यावृत्तेन च बोधेन बोधव्यावृत्तया च सत्तयोपेतं ब्रह्म प्रति-**

**जानानस्य तदेव पूर्वाधिकरणप्रतिषिद्धं सप्रपंचत्वं ब्रह्मणः प्रसज्येत । श्रुतत्वाद-दोष इति चेत् । न । एकस्य अनेकस्वभावत्वानुपपत्तेः ॥**

**भाष्यार्थ**—ब्रह्म उभयलक्षणच आहे, असेंहि म्हणतां येणें शक्य नाहीं. कारण तसें म्हटल्यास पूर्व-अभ्युपगमाशीं–पूर्वीच्या मताशीं विरोधाचा प्रसंग येतो. [–'**सत्ताव्यावृत्तेन०**' इत्यादि भाष्यानें त्या प्रसंगाचाच विस्तार करितात–]=ब्रह्म सत्ताव्यावृत्त बोधानें व बोधव्यावृत्त सत्तेनें युक्त आहे, अशी प्रतिज्ञा करणाऱ्या वाद्याच्या मतावर तेंच पूर्वाधिकरणानें प्रतिषिद्ध केलेलें सप्रपंचत्व प्रसक्त होईल. [येथें सत्ता-बोधव्यावृत्त म्ह० सत्ताविशेषित बोध व बोधविशेषित सत्ता असा अर्थ आहे.–'**श्रुतत्वात्०**' इत्यादि भाष्यानें श्रुतीच्या आधारानें पूर्वपक्षाच्या सिद्धीची शंका–]=अहोपण, तसें श्रुत असल्यामुळें त्यावर हा दोष येत नाहीं, असें जर म्हणाल तर [–'विरुद्ध अर्थ श्रुतिहि सांगणार नाहीं. यास्तव श्रुतीच्या आधारानें ब्रह्माच्या उभयरूपत्वाची शंका घेऊं नये.' असें 'न०' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=नाहीं, अशी शंका घेतां येत नाहीं. कारण एकाचें अनेकस्वभावत्व उपपन्न होत नाहीं. [–विरोधाचा परिहार करण्यासाठीं वादी वाक्यार्थाच्या अखंड-अर्थत्वावर '**अथ०**' इत्यादि भाष्यानें आक्षेप घेतो–]

**भाष्यं—अथ सत्तैव बोधो बोध एव च सत्ता । नानयोः परस्परव्यावृत्ति-रस्तीति यद्युच्येत । तथापि किं सल्लक्षणं ब्रह्म उत बोधलक्षणमुत उभयलक्षणं । इत्ययं विकल्पो निरालंबन एव स्यात् । सूत्राणि त्वेकाधिकरणत्वेनैव अस्मा-भिर्नीतानि ॥**

**भाष्यार्थ**—आतां सत्ताच बोध व बोधच सत्ता आहे, त्यामुळें त्यांची परस्पर व्यावृत्ति नाहीं, असें जरी म्हटलें जाईल [–वाक्यार्थाच्या अखंडत्वाचा स्वीकार करून वाद्याच्या संशयाची अनुपपत्ति '**तथापि०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]= '**तथापि**'–तरी सुद्धां 'ब्रह्म काय सल्लक्षण आहे, कीं बोधलक्षण आहे कीं उभय-लक्षण आहे,' असा हा विकल्प निरालंबनच-निराधारच आहे. [–"अहोपण, या सर्व सूत्रांना एकाधिकरणत्व जर असेल तर त्या सर्वांची संगति बरोबर लागत नाहीं," अशी आशंका घेऊन भाष्यकार '**सूत्राणि०**' इत्यादि भाष्यानें म्हणतात–]=पण सूत्रें आम्हीं एकाधिकरणत्वानेंच वर सुसंगतपणें योजून दाखविलीं आहेत. [–आणि याहि कारणानें अधिकरणभेद नाहीं, असें '**अपि च०**' इत्यादि सांगतात–]

**भाष्यं—अपि च ब्रह्मविषयासु श्रुतिषु आकारवदनाकारप्रतिपादनेन विप्रति-पन्नास्वनाकारे ब्रह्मणि परिगृहीतेऽवश्यं वक्तव्येतरासां श्रुतीनां गतिः । तादर्थ्येन 'प्रकाशवच्च' इत्यादीनि सूत्राण्यर्थवत्तराणि संपद्यन्ते ॥**

**भाष्यार्थ**—शिवाय येथें अधिकरणाचा भेद करितां येत नाहीं, दोन अधिकरणें करितां येत नाहींत, याविषयीं आणखीं एक कारण आहे. [पुढील सूत्रें पूर्वाधिकरणाला अपेक्षित असलेल्या हेत्वंतराचें कथन करणारीं असल्यामुळें त्यांच्या–उत्तरसूत्रांच्या अधिकरणशेषत्वाची सिद्धि होते. त्यामुळें अधिकरणभेदकल्पना करितां येत नाहीं, असें तें हेत्वंतरच '**ब्रह्मविषयासु०**' इत्यादि भाष्यानें विशद करितात–]=ब्रह्म हा ज्यांचा विषय आहे, अशा श्रुति आकाराच्या प्रतिपादनाप्रमाणें अनाकाराच्या प्रतिपादनानें परस्पर विरुद्ध होत असल्यामुळें त्यांतील अनाकार ब्रह्माचा स्वीकार केला असतां इतर श्रुतींची गति अवश्य सांगितली पाहिजे. ती गति सांगण्यासाठीं 'प्रकाशवच्च' इत्यादि सूत्रें अत्यंत अर्थवत्–उपयोगाचीं होतात, त्यांची गति सांगण्यासाठीं त्या सूत्रांचा अतिशय उपयोग होतो.[–" अहोपण, आकारवत्–साकार ब्रह्मवादिनी श्रुतींची गति दुसऱ्या प्रकारानें सांगतां येते " या मताचा अनुवाद '**यदपि०**' इत्यादि भाष्यानें करितात–]

**भाष्यं—यदप्याहुराकारवादिन्योऽपि श्रुतयः प्रपंचप्रविलयमुखेन अनाकारप्रतिपत्त्यर्था एव । न पृथगर्था इति । तदपि न समीचीनामिव लक्ष्यते । कथम् । ये हि परविद्याधिकारे केचित्प्रपंचा उच्यन्ते यथा–' युक्ता ह्यस्य हरयः शता दशेत्ययं वै हरयोऽयं वै दश च सहस्राणि बहूनि चानंतानि च ' इत्येवमादयस्ते भवन्तु प्रविलयार्थाः । 'तदेतद्ब्रह्मापूर्वमनपरमनंतरमबाह्यम्' इत्युपसंहारात्।**

**भाष्यार्थ**—आतां " आकारवादिनीहि श्रुति प्रपंचप्रविलयद्वारा अनाकार ब्रह्माच्या ज्ञानासाठींच आहेत, त्याहून दुसऱ्या कोणत्याहि प्रयोजनासाठीं नाहींत " असेंहि जें कित्येक म्हणतात–[–प्रपंचविलयपक्षाला '**तदपि०**' इत्यादि भाष्यानें दूषित करितात–]=तेंहि समीचीनसें–उपपन्न आहे, असें दिसत नाहीं. [–" अहोपण, तसें मानिल्यानें सर्व श्रुतींची जर एकवाक्यता संभवत आहे तर त्या म्हणण्याला असमीचीनत्व कसें ? " असा प्रश्न वादी '**कथं०**' इत्यादि भाष्यानें करितो–]=तें असमीचीन कसें ? [–"पण परविद्याप्रकरणांतील आकारवत ब्रह्मवादिनी श्रुतींना एकवाक्यत्व आहे, कीं उपासनाप्रकरणस्थ श्रुतींना एकवाक्यत्व आहे, कीं सर्वच श्रुतींची एकवाक्यता वाद्याला विवक्षित आहे ? " असा विकल्प करून त्यांतील पहिल्या पक्षाचा अंगीकार '**ये हि०**' इत्यादि भाष्यानें करितात–]=कारण परविद्याप्रकरणांत जे कांही प्रपंच–आकार सांगितले जातात– '**यथा०**'–जसें–"रथाला घोडे जोडिले जातात त्याप्रमाणें या आत्म्याच्या संयोगास प्राप्त झालेले–आत्म्याशीं आपल्या विषयांचें प्रकाशन करण्यासाठीं संयुक्त झालेलीं

हरण करीत असल्यामुळें हरि–इंद्रियें दहा, निरनिराळ्या प्राण्यांच्या भेदानें शंभर आहेत, [असा उपक्रम करून आत्मा व इंद्रियें यांच्या भेदाचें निरसन करण्यासाठीं श्रुति म्हणते–]=हाच आत्मा तीं इंद्रियें आहे. हाच दहा, सहस्र, बहु व अनन्त आहे."–बृ. २. ५. १९ सु. उ. ६०६–इत्यादि जे कांहीं प्रपंच–विस्तार सांगितले आहेत ते प्रविलयासाठीं असोत. [–त्यांचें प्रविलयद्वारा ब्रह्मवाक्याशीं एकवाक्यत्व असण्याचें कारण–]=' तदेतत्० '–कारण " तेंच हें ब्रह्म अपूर्व, कारणरहित, अनपर–कार्यरहित, अनन्तर, अबाह्य आहे "–सु. उ. ६०७–असा उपसंहार केलेला आहे. [–विकल्पांतील दुसऱ्या कल्पाला ' ये पुनः० ' इत्यादि भाष्यानें दूषित करितात–]

**भाष्यं—ये पुनरुपासनाविधानाधिकारे प्रपंचा उच्यन्ते यथा ' मनोमयः प्राणशरीरो भारूपः ' इत्येवमादयो न तेषां प्रविलयार्थत्वं न्याय्यम्। ' स क्रतुं कुर्वीत ' इत्येवंजातीयकेन प्रकृतेनैवोपासनविधिना तेषां संबंधात्। श्रुत्या च एवंजातीयकानां गुणानामुपासनार्थत्वेऽवकल्प्यमाने न लक्षणया प्रविलयार्थत्वमवकल्पते ॥**

**भाष्यार्थ**–पण उपासनाविधानाच्या प्रकरणांत जे प्रपंच सांगितले जातात जसे– "मनोमय, प्राणशरीर, भारूप"–छां. ३. १४. २.–इत्यादि, त्यांचें प्रविलयार्थत्व न्याय्य नाहीं, ते प्रविलयासाठीं आहेत, असें मानणें युक्त नाहीं. [–त्यांची लयार्थत्वानें ब्रह्मवाक्याशीं एकवाक्यता होत नाहीं, याविषयीं 'स क्रतुं०' इत्यादि हेतु–]= कारण ' त्यानें क्रतु–निश्चय करावा '–छां. ३. १४. १ पृ. ३६०–या अशा प्रकारच्या प्रकृत असलेल्याच उपासनाविधीशीं त्यांचा संबंध आहे, त्यामुळें त्यांचें प्रविलयार्थत्व न्याय्य नाहीं. [–शिवाय मनोमयादि वाक्यांवरून साक्षात् लय भासत नाहीं, तर तो लक्षणेनेंच जाणणें योग्य आहे. पण श्रुतीचा त्याग करून लक्षणेचा आश्रय करितां येत नाहीं. कारण लक्षणेहून श्रुतीला अधिक बलवत्त्व आहे, असें ' श्रुत्या च० ' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=आणि श्रुति या प्रमाणानें अशा प्रकारच्या गुणांचें उपासनार्थत्व उपपन्न होत असतांना लक्षणेनें त्यांचें प्रविलयार्थत्व उपपन्न होत नाहीं. [–पूर्वोक्त विकल्पांतील तिसऱ्या कल्पाचें 'सर्वेषां च० ' इत्यादि भाष्यानें प्रत्याख्यान–]

**भाष्यं—सर्वेषां च साधारणे प्रविलयार्थत्वे सति ' अरूपवदेव हि तत्प्रधानत्वात् ' इति विनिगमनकारणवचनमनवकाशं स्यात्। फलमप्येषां यथोपदेशं**

**क्वचिद्दुरितक्षयः क्वचिदैश्वर्यप्राप्तिः क्वचित्क्रममुक्तिरित्यवगम्यत एव। इत्यतः पार्थगर्थ्यमेवोपासनावाक्यानां ब्रह्मवाक्यानां च न्याय्यं नैकवाक्यत्वम् ॥**

**भाष्यार्थ**—आणि सर्वच वाक्यांना एकसारखेंच प्रविलयार्थत्व जर असेल तर " ब्रह्म अरूपवत्च–रूपादिरहितच आहे. कारण 'अशब्दं०' इत्यादि वाक्यें निष्प्रपंच ब्रह्मात्मतत्त्वप्रधानच आहेत "–पृ. १४७–असें जें विनिगमनकारण-वचन आहे तें अनवकाश होईल. [ विनिगमन म्ह० दोन पक्षांतील अमुकच एक पक्ष स्वीकारणें, त्याविषयीं जो हेतु–कारण तो विनिगमनहेतु, त्याचें कथन, असा भावार्थ. कारण जर कांहीं थोड्याशा तरी श्रुति अनाकारवादित्वानें उपासना-पर असत्या तर सर्वांचें लयार्थत्वानें निरूपण केल्यामुळें त्यांना ब्रह्मप्रधानत्व तुल्य आहे, असें होऊन त्यांतील या श्रुति ध्यानविधिप्रधान आहेत व या निष्प्रपंच-प्रधान आहेत, असें विनिगमन होणार नाहीं, आणि तसें झाल्यामुळें 'अरूपवत् एव०' हें सूत्र विरुद्ध होईल, असा याचा भावार्थ.–"अहोपण, निष्प्रपंचवाक्यां-तच फलश्रवण असल्यामुळें ' फलवत् वाक्याच्या सांनिध असलेलें अफलवाक्य त्याचें अंग असतें ' या न्यायानें सप्रपंचवाक्यांची निष्प्रपंचवाक्यांशीं एकवाक्यता होते " अशी आशंका घेऊन आचार्य '**फलमपि०**' इत्यादि भाष्यानें म्हणतात–] =आणि यांचें फलहि 'यथोपदेश'–जसा त्याचा उपदेश केला आहे त्याप्रमाणें कोठें पापाचा क्षय, कोठें ऐश्वर्यप्राप्ति, कोठें क्रममुक्ति आहे, असें अवगत होतेंच. [अर्थात् उपासनावाक्यें उपासनेच्या फलानें फलवत्–फलवान् असल्यामुळें आकारवान् वाक्यें उक्त न्यायाच्या विषयत्वास प्राप्त होत नाहींत. –याप्रमाणें सगुण ब्रह्मपर वाक्यें पूर्वोक्त न्यायाचा विषय होत नाहींत, असें सिद्ध झालें असतां '**इत्यतः०**' इत्यादि भा-ष्यानें फलित सांगतात–]=असें असल्यामुळें उपासनावाक्यें व ब्रह्मवाक्यें यांचें पृथक्-अर्थत्वच आहे, त्यांचा अर्थ–प्रयोजन एक नाहीं, पृथक् आहे, असें मानणेंच न्याय्य आहे. त्यांचें एकवाक्यत्व न्याय्य नाहीं. [–त्यांच्या एकवाक्यतेचा कांहीं हेतु–निमित्त उपलब्ध होत नसल्यामुळेंहि त्यांची एकवाक्यता नाहीं, असें '**कथं च०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]

**भाष्यं**—**कथं चैषामेकवाक्यतोत्प्रेक्ष्यत इति वक्तव्यम् । एकनियोगप्रतीतेः प्रयाजदर्शपूर्णमासवाक्यवदिति चेत्। न। ब्रह्मवाक्येषु नियोगाभावात्। वस्तुमात्र-पर्यवसायीनि हि ब्रह्मवाक्यानि न नियोगोपदेशीनि इत्येतद्विस्तरेण प्रतिष्ठा-पितं ' तत्तु समन्वयात् ' इत्यत्र । किं विषयश्चात्र नियोगोऽभिप्रेयत इति वक्त-व्यम् । पुरुषो हि नियुज्यमानः कुर्विति स्वव्यापारे कस्मिंश्चिन्नियुज्यते ॥**

**भाष्यार्थ**—पण तुम्हांकडून या वाक्यांची–उपासनावाक्यें व ब्रह्मवाक्यें यांची एकवाक्यता कशी–कोणत्या कारणानें कल्पिली जाते,तें तुम्हाला सांगितलें पाहिजे. [–हेतुत्वाची अनुपलब्धि असिद्ध आहे, अशी '**एकनियोग०**' इत्यादि भाष्यानें शंका–]=प्रयाज व दर्श-पूर्णमास यांच्या वाक्यांप्रमाणें त्यांच्या एकनियोगाची प्रतीति येत असल्यामुळें उपासनावाक्यें व ब्रह्मवाक्यें यांची एकवाक्यता कल्पिली जाते, असें जर म्हणाल तर [–यद्यपि प्रयाजवाक्य व दर्शपूर्णमासवाक्य यांच्या विषय-प्रयोजनभेदामुळें त्यांच्या नियोगाचाहि भेद आहे तरी एका प्रकरणांतील नियोग हेंच त्यांचें एकनियोगत्व आहे. त्याचप्रमाणें सर्व वाक्यांमध्यें तत्त्वावबोध-काम–तत्त्वज्ञानेच्छु पुरुषाचा एकनियोग आहे, त्यामुळें त्यांची एकवाक्यता आहे, असा भावार्थ. –"पण, तत्त्वमस्यादि वाक्यांत नियोगाचा अभाव असल्यामुळें एकनियोगज्ञान असिद्ध आहे," असा दोष '**न०**' इत्यादि भाष्यानें देतात–]=नाहीं, महावाक्यांत एकनियोगप्रतीतीमुळें एकवाक्यता कल्पितां येत नाहीं.[–"अहोपण, त्या वाक्यांतहि नियोगाची कल्पना करावी. कारण ती न केल्यास त्यांच्या प्रामाण्याचा असंभव होतो" अशी आशंका घेऊन आचार्य '**वस्तुमात्र०**' इत्यादि भाष्यानें म्हणतात–]=कारण ब्रह्मवाक्यें केवल वस्तूमध्यें पर्यवसान पावणारीं आहेत. तीं नियोगाचा उपदेश करणारीं नाहींत, असें हें आम्हीं 'तत्तु समन्वयात्'–अ.१पृ.१०९–या सूत्रांत सविस्तर प्रस्थापित केलें आहे.[–विषयाच्या अभावामुळेंहि येथें नियोग नाहीं, असें '**किंविषयश्च०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=आणि येथील–या ब्रह्मवाक्यांतील नियोग किंविषय अभिप्रेत आहे? त्याचा विषय काय अभीष्ट आहे, हेंहि सांगितलें पाहिजे. [–"अहोपण,नियोग नियोज्यानें अवच्छिन्न असतो, त्याला विषयाची काय आवश्यकता आहे" अशी आशंका घेऊन '**पुरुषो हि०**' इत्यादि म्हणतात–]=कारण नियुक्त केला जाणारा पुरुष 'हें कर' असें म्हणून एखाद्या स्वव्यापारांत नियुक्त केला जातो, हें प्रसिद्ध आहे. [–"तर मग नियोगाच्या अवच्छेदकत्वानें एखाद्या विषयाची कल्पना करावीं" अशी आशंका घेऊन 'तर मग द्वैतलय हा तो विषय आहे, कीं ब्रह्मज्ञान, कीं ब्रह्माज्ञाननिवृत्ति कीं अज्ञान-कार्याची निवृत्ति,' असा विकल्प करून '**ननु०**' इत्यादि भाष्यानें वादी त्यांतील पहिल्या पक्षाचें ग्रहण करितो––]

**भाष्यं—ननु द्वैतप्रपंचप्रविलयो नियोगविषयो भविष्यति। अप्रविलापिते हि द्वैतप्रपंचे ब्रह्मतत्त्वावबोधो न भवतीति। अतो ब्रह्मतत्त्वावबोधप्रत्यनीकभूतो द्वैत-**

**प्रपंचः प्रविलाप्यः । यथा स्वर्गकामस्य यागोऽनुष्ठातव्य उपदिश्यते । एवमपवर्गकामस्य प्रपंचप्रविलयः ॥**

**भाष्यार्थ**—अहो, द्वैतप्रपंचाचा प्रविलय हा नियोगाचा विषय होईल ! [—"तत्त्वज्ञानाची इच्छा करणाऱ्या पुरुषाचा तत्त्वावबोध हें ज्याचें फल आहे अशा किंवा तदुपकारक अशा विषयांत नियोग होणें युक्त आहे. तेव्हां प्रपंचलयांत त्याचा नियोग कसा होऊं शकेल ?" अशी आशंका घेऊन 'तदुपकारकत्वामुळें' असें उत्तर प्रथमपक्षवादी देतो—]='**अप्रविलापिते०**'—कारण द्वैतप्रपंचाचा प्रविलाप केलेला नसतांना—द्वैतप्रपंचाचा सर्वथा विलय जोंवर झालेला नाहीं तोंवर ब्रह्मतत्त्वाचा बोध होत नाहीं. [—याप्रमाणें प्रपंचविलय इच्छा केल्या जाणाऱ्या तत्त्वबोधावर उपकार करणारा आहे, असें झालें असतां '**अतः०**' इत्यादि भाष्यानें वादी फलित सांगतो—]=यास्तव ब्रह्मतत्त्वाववोधाचा प्रतिस्पर्धी असलेला जो द्वैतप्रपंच त्याचा प्रविलाप करणें उचित आहे. [—वादी हा उक्त अर्थच '**यथा०**' इत्यादि भाष्यानें वैदिक उदाहरणानें स्पष्ट करितो—]=ज्याप्रमाणें स्वर्गकाम—स्वर्गेच्छु पुरुषाला याग अनुष्ठेय आहे, असा उपदेश केला जातो त्याप्रमाणें मोक्षकामाला—मुमुक्षूला प्रपंचप्रविलय कर्तव्य आहे. [—"अहोपण, याग हा स्वर्गाचा उपाय—साधन असल्यामुळें त्याविषयीं नियोग जरी असला तरी प्रकृत दार्ष्टान्तिकांत—मोक्षांत कामनाविषयाच्या उपायत्वाचा अभाव असल्यामुळें नियोग कोठून असणार?" अशी आशंका घेऊन 'प्रतिबंधनिवृत्तित्वानें प्रपंचविलयाचें अनुष्ठेयत्व लौकिक दृष्टान्तानें वादी दाखवितो—]

**भाष्यं—यथा च तमसि व्यवस्थितं घटादितत्त्वमवबुभुत्समानेन तत्प्रत्यनीकभूतं तमः प्रविलाप्यते । एवं ब्रह्मतत्त्वमवबुभुत्समानेन तत्प्रत्यनीकभूतः प्रपंचः प्रविलापयितव्यः । ब्रह्मस्वभावो हि प्रपंचो न प्रपंचस्वभावं ब्रह्म । तेन नामरूपप्रपंचप्रविलापनेन ब्रह्मतत्त्वावबोधो भवतीति ॥**

**भाष्यार्थ**—'**यथा च०**'—आणि ज्याप्रमाणें तमांत—अंधकारांत असलेल्या घटादिकांचें स्वरूप जाणण्याची इच्छा करणाऱ्या पुरुषाकडून त्याच्या विरोधी असलेल्या तमाचा प्रविलाप केला जातो त्याप्रमाणें ब्रह्मतत्त्वाला जाणण्याची इच्छा करणाराकडून तत्प्रत्यनीकभूत—त्याच्या विरुद्ध असलेल्या प्रपंचाचा प्रविलाप अवश्य केला जाणें उचित आहे—त्याला त्याचा प्रविलाप—क्षय करणें अवश्य आहे. [—" अहोपण 'तत्त्वज्ञानेच्छूनें द्वैताचा प्रविलाप करावा,' असा नियोग संभवत नाहीं. कारण प्रपंचाचा लय केला असतां ब्रह्माचाहि लय होण्याचा प्रसंग येतो."

अशी आशंका घेऊन वादी म्हणतो–]=कारण प्रपंच ब्रह्मस्वभाव–ब्रह्मस्वरूप आहे, ब्रह्म प्रपंचस्वरूप नाहीं. [ व्यवहारांत कार्याचा नाश जरी झाला तरी कारणाचा नाश होत नाहीं. आरोपिताचा अधिष्ठानांत अन्तर्भाव जरी झाला तरी अधिष्ठानाचा आरोपितांत किंवा कारणाचा कार्यांत अन्तर्भाव होत नाहीं, असा भावार्थ.–याप्रमाणें द्वैताचा लय नियोगसिद्ध आहे, तो नियोगानें प्राप्त आहे, असें झालें असतां 'तेन०' इत्यादि भाष्यानें वादी फलित सांगतात–]=त्यामुळें नाम-रूपप्रपंचप्रविलापनानें–त्याचा प्रलय करूनच ब्रह्मतत्त्वाचा अवबोध–साक्षात्कार होतो, असा पूर्वोक्त विकल्पांतील पहिला पक्ष प्राप्त होतो. [–वेदान्तांना द्वैतलयानियोगनिष्ठत्वानें म्ह० द्वैताच्या प्रलयाचें विधान करणें, एतत्परत्वानें एकवाक्यत्व आहे, अशी जी येथवर सविस्तर शंका घेतली आहे, तिचें निरसन आचार्य 'अत्र वयं०' इत्यादि भाष्यानें करितात–]

**भाष्यं—अत्र वयं पृच्छामः–कोऽयं प्रपंचप्रविलयो नाम। किमग्निप्रतापसंपर्काद् घृतकाठिन्यप्रविलय इव प्रपंचप्रविलयः कर्तव्यः। आहोस्विदेकस्मिंश्चंद्रे तिमिरकृतानेकचंद्रप्रपंचवदविद्याकृतो ब्रह्मणि नामरूपप्रपंचो विद्यया प्रविलापयितव्य इति ॥**

**भाष्यार्थ**—याविषयीं आम्हीं वाद्याला असें विचारितों–[–'कोऽयं०' इत्यादि भाष्यानें प्रश्नच विशद करितात–]=हा प्रपंचविलय म्ह० काय आहे. [–' किं–काय' या शब्दानें ग्रहण केलेलें पक्षद्वय सांगतात–]=अग्नीच्या प्रखर तापाचा संसर्ग झाल्यामुळें घृताच्या काठिन्याचा प्रविलय जसा होतो–उष्णतेच्या सांनिध्यांत थिजलेलें तूप जसें वितळतें तसा हा प्रपंचप्रविलय कर्तव्य आहे कीं एका चंद्रामध्यें तिमिररोगामुळें झालेल्या अनेकचंद्रप्रपंचाप्रमाणें अविद्येमुळें ब्रह्मामध्यें भासणाऱ्या नाम-रूपप्रपंचाचा विद्येनें प्रविलाप कर्तव्य आहे ? [ म्हणजे खऱ्या द्वैताचा लय हा नियोगाचा विषय म्हणून तुम्हांला इष्ट आहे कीं मिथ्या द्वैताचा लय नियोगविषयत्वानें अभीष्ट आहे, असा या विकल्पाचा भावार्थ आहे.–त्यांतील पहिल्या कल्पाचा 'तत्र०' इत्यादि भाष्यानें अनुवाद करून त्याचें निरसन करितात—]

**भाष्यं—तत्र यदि तावद्विद्यमानोऽयं प्रपंचो देहादिलक्षण आध्यात्मिको बाह्यश्च पृथिव्यादिलक्षणः प्रविलापयितव्य इत्युच्येत। स पुरुषमात्रेणाशक्यः प्रविलापयितुमिति तत्प्रविलयोपदेशोऽशक्यविषय एव स्यात्। एकेन च आदिमुक्तेन पृथिव्यादिप्रविलयः कृत इतीदानीं पृथिव्यादिशून्यं जगदभविष्यत् ॥**

**भाष्यार्थ**—'तत्र'—त्यांतील **'यदि०'**—जर अगोदर विद्यमान असलेला हा देहादिरूप आध्यात्मिक प्रपंच व पृथिव्यादिरूप बाह्य प्रपंच प्रविलाप करण्यास योग्य आहे, असें म्हटलें जाईल तर तो कोणत्याहि पुरुषाला कधींच प्रविलापित करितां येणें शक्य नाहीं. त्यामुळें त्याच्या प्रविलयाचा उपदेश अशक्यविषयच आहे, असें होईल. [वस्तूचा—खऱ्या पदार्थाचा ज्ञानानें ध्वंस होत नाहीं. मुसल, खड्ग, इत्यादि प्रहारसाधनानें सर्व द्वैताची निवृत्ति संभवत नाहीं, शस्त्रास्त्रांनीं जगाचा नाश करितां येणें शक्य नाहीं. त्यामुळें आकाशाचा ग्रास—भक्षण करण्याच्या नियोगाप्रमाणें, हा द्वैतप्रलय-नियोग होईल, असा याचा भावार्थ.—शिवाय या अनादि संसारांत यापूर्वी कोणी मुक्त झाला कीं नाहीं ? जर झाला असेल तर आतां—या वर्तमान समयीं येणाऱ्या पृथिव्यादिकांच्या अनुभवाशीं विरोध येईल. बरें, आजपर्यंत कोणी मुक्त झालाच नाहीं, असें म्हणावें तर वामदेव-शुक इत्यादिकांच्या मुक्तिश्रुतीशीं विरोध येतो आणि त्या श्रुतीला अर्थवादत्व जरी असलें तरी ' द्वार ' या अर्थी तिचें तात्पर्य आहे, याच्याशीं विरोध येत नाहीं, असें अनेक जीववादाचा स्वीकार करून आचार्य **' एकेन० '** इत्यादि भाष्यानें म्हणतात—]=आणि एका आदिमुक्तानें पृथिव्यादि प्रपंचाचा प्रविलय केलेला असल्यामुळें आतां जगत् पृथिव्यादिशून्य झालें असतें. [—पूर्वोक्त विकल्पांतील दुसरा कल्प **' अथ अविद्याध्यस्तः० '** इत्यादि भाष्यानें उत्थापित करितात—]

**भाष्यं—अथाविद्याध्यस्तो ब्रह्मण्येकस्मिन्नयं प्रपंचो विद्यया प्रविलाप्यत इति ब्रूयात् । ततो ब्रह्मैव अविद्याध्यस्तप्रपंचप्रत्याख्यानेन आवेदयितव्यम् । 'एकमेवाद्वितीयं ब्रह्म' ' तत्सत्यं स आत्मा तत्त्वमसि ' इति ।**

**भाष्यार्थ**—बरें, आतां ब्रह्मामध्यें अविद्येनें अध्यस्त—आरोपित असलेला हा प्रपंच विद्येनें प्रविलापित केला जातो—विद्येनें आरोपित प्रपंचाचा प्रविलय केला जातो, असें जर म्हणावें [—तर द्वैतलयाविषयीं नियोग व्यर्थ आहे, असें **'ततः०'** इत्यादि भाष्यानें सांगतात—]=तर मग ब्रह्मच अविद्येनें आरोपित प्रपंचाच्या परिहारानें सर्वप्रकारें जाणण्यास योग्य आहे. [ ब्रह्मतत्त्वाच्या ज्ञापनानेंच ब्रह्माविद्याकृत द्वैताचा लय होत असल्यामुळें तेंच वेदान्तांनीं ज्ञापनीय—ज्ञान करून देण्यास योग्य आहे. त्यामुळें नियोग व्यर्थ आहे, असा भावार्थ.—याचें आवेदन कसें होतें तेंच **' एकमेव० '** इत्यादि वाक्यानें सांगतात—]=**'एकच व अद्वितीय ब्रह्म'**—छां. ६.२—**'तेंच सत्य तो आत्मा तें तूं आहेस'**—छां.६.८. असें त्याचें आवेदन—साक्षात् ज्ञान होतें. [—तर मग द्वैताच्या लयाविषयीं नियोग

नसूं दे. तो ब्रह्मज्ञानाविषयीं असेल, अशी दुसऱ्या म्ह० ब्रह्मज्ञान हा नियोगाचा विषय, या पक्षाची आशंका घेऊन आचार्य '**तस्मिन्**०' इत्यादि भाष्यानें म्हणतात–]

**भाष्यं—तस्मिन्नावेदिते विद्या स्वयमेवोत्पद्यते । तया चाविद्या बाध्यते, ततश्चाविद्याध्यस्तः सकलोऽयं नामरूपप्रपंचः स्वप्नप्रपंचवत्प्रविलीयते । अनावेदिते तु ब्रह्मणि ब्रह्मविज्ञानं कुरु प्रपंचविलयं चेति शतकृत्वोऽप्युक्ते। न ब्रह्मविज्ञानं प्रपंचप्रविलयो वा जायेत ॥**

**भाष्यार्थ**—त्या ब्रह्माचें आवेदन–ज्ञान झालें असतां विद्या उत्पन्न होते. [–शब्दानें ब्रह्माचें ज्ञान करून दिलें असतां नियोगाची अपेक्षा न करितांच शब्दशक्तीपासूनच ज्ञानाची उत्पत्ति होत असल्यामुळें ब्रह्मज्ञानविषयहि विधि नाहीं, असा भावार्थ.–आणि ज्ञान उत्पन्न झालें असतां आपोआपच अज्ञानाची निवृत्ति होत असल्यामुळें अज्ञाननिवृत्तीसाठींहि नियोग संभवत नाहीं, असें '**तया च**०' इत्यादि भाष्यानें तिसऱ्या कल्पाचें निरसन करितात–]=आणि त्या उत्पन्न झालेल्या विद्येकडून अविद्या बाधित केली जाते. [–चवथ्या–कार्यनिवृत्ति–या पक्षाचें निरसन–]='**ततश्च**०'–आणि कारण-अविद्येचा बाध–निवृत्ति झाल्यामुळें हा सर्व अविद्येनें आरोपित केलेला नाम-रूपप्रपंच स्वप्नप्रपंचाप्रमाणें पूर्णपणें प्रलीन होतो. [–'शिवाय ब्रह्मज्ञानादिकांविषयींचा जो नियोग तो अज्ञात ब्रह्माविषयीं कीं ज्ञात ब्रह्माविषयीं ? ' असा विकल्प करून त्यांतील पहिल्या कल्पाला '**अनावेदिते तु**० ' इत्यादि भाष्यानें दूषित करितात–]=पण अनावेदित–अज्ञात ब्रह्माविषयीं 'ब्रह्मविज्ञान कर व प्रपंचाचा प्रविलय कर ' असें शंभर वेळां जरी पुनः पुनः सांगितलें तरी ब्रह्मविज्ञान किंवा प्रपंचाचा प्रविलय होत नाहीं. [–वरील विकल्पांतील दुसऱ्या कल्पाचा अवलंब '**ननु**०' इत्यादि भाष्यानें करितात–]

**भाष्यं—नन्वावेदिते ब्रह्मणि तद्विज्ञानविषयः प्रपंचविलयविषयो वा नियोगः स्यात् । न । निष्प्रपंचब्रह्मात्मत्वावेदनेनैवोभयसिद्धेः । रज्जुस्वरूपप्रकाशनेनैव हि तत्स्वरूपविज्ञानं अविद्याध्यस्तसर्पादिप्रपंचप्रविलयश्च भवति । न च कृतमेव पुनः क्रियते ॥**

**भाष्यार्थ**—अहोपण, श्रुतीनें ब्रह्माचें आवेदन–ज्ञान करून दिलें असतां त्याच्या विज्ञानाविषयीं किंवा प्रपंचाच्या प्रविलयाविषयीं नियोग होईल ! [–पण ब्रह्माचें शाब्द–शब्दजन्य ज्ञान झालें असतां त्या शब्दसामर्थ्यानेंच नियोगावांचूनहि ब्रह्मज्ञानादिकांची सिद्धि होत असल्यामुळें नियोग व्यर्थ आहे. असें '**न**०' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=नाहीं, ज्ञात ब्रह्मामध्यें नियोग संभवत नाहीं. कारण

निष्प्रपंच ब्रह्मच आत्मा आहे, असें ब्रह्मात्मतत्त्वाचें ज्ञान झाल्यानेंच ब्रह्माचें विज्ञान-साक्षात्कार व प्रपंचाचा प्रविलय या दोहोंचीहि सिद्धि होते. कारण रज्जूच्या स्वरूपाचें प्रकाशन केल्यानेंच तिच्या स्वरूपाचें विज्ञान होतें व तिच्यावर अज्ञानानें आरोपित सर्पादि प्रपंचाचा प्रविलय होतो, हें प्रसिद्ध आहे. [–" अहोपण, ब्रह्मस्वरूपाच्या ज्ञानानें सिद्ध झालेलेंहि ब्रह्म ज्ञानादिनियोगानें पुन: साध्य आहे," अशी आशंका घेऊन आचार्य ' न च० ' इत्यादि भाष्यानें म्हणतात–]=आणि जें एकदा केलेलें असतें तेंच पुन: केलें जात नाहीं. [कारण मग त्या करण्याचा कधीं कोठें शेवटच होणार नाहीं, असा भावार्थ.–याप्रमाणें विषयाच्या अभावामुळें नियोगाचा अभाव सांगून नियोज्य–ज्याला नियुक्त करावयाचें त्याचा अभाव असल्यामुळेंहि वेदान्तांत नियोगाचा अभाव आहे, असें ' नियोज्योऽपि० ' इत्यादि भाष्यानें सांगतात–]

**भाष्यं—नियोज्योऽपि च प्रपंचावस्थायां योऽवगम्यते जीवो नाम। स प्रपंचपक्षस्यैव वा स्याद्ब्रह्मपक्षस्यैव वा। प्रथमे विकल्पे निष्प्रपंचब्रह्मतत्त्वप्रतिपादनेन पृथिव्यादिवज्जीवस्यापि प्रविलापितत्वात्कस्य प्रपंचविलये नियोग उच्येत। कस्य वा नियोगनिष्ठतया मोक्षोऽवाप्तव्य उच्येत ॥**

**भाष्यार्थ**—आणि प्रपंचावस्थेंत जो जीव म्हणून नियोज्य–नियोगाचा विषयहि अवगत होतो तो प्रपंचपक्षाचाच आहे कीं ब्रह्मपक्षाचाच आहे ? [–यांतील प्रपंचान्तर्भावपक्षाचें निरसन ' प्रथमे० ' इत्यादि भाष्यानें करितात–]=यांतील पहिल्या पक्षीं म्ह० जीव प्रपंचपक्षांत पडणारा आहे, यापक्षीं निष्प्रपंच ब्रह्मतत्त्व-प्रतिपादनानें पृथिव्यादिकांप्रमाणें जीवाचें प्रविलापन केलेलें असल्यामुळें कोणाच्या प्रपंचविलयासाठीं नियोग सांगितला जाईल ? [ पृथिव्यादिकांप्रमाणें जीवाचाहि प्रविलय झाल्यावर प्रपंचविलयाचा विधि कोणाला उद्देशून केला जाईल ! कारण नियोज्याचाच अभाव आहे. येथील प्रपंचविलय ब्रह्मज्ञानादिकांचें उपलक्षण आहे.–मुमुक्षूच्या नियोज्यत्वाची आशंका घेऊन 'कस्य वा०' इत्यादि म्हणतात–] =किंवा नियोगनिष्ठतेनें कोणाला मोक्ष अवाप्तव्य–प्राप्तव्य आहे, असें सांगितलें जाईल. [ कारण प्रपंचाचा प्रविलय झाल्यावर प्रपंचांत अन्तर्भूत होणाऱ्या मुमुक्षूचेंहि अस्तित्व नसल्यामुळें त्या नियोगाचाहि नियोज्य संभवत नाहीं, असा भावार्थ.–आतां त्या नियोज्य जीवाचा ब्रह्मामध्यें अन्तर्भाव होतो, असें म्हटल्या-सहि नियोज्यत्व दुर्वच होतें, तें सांगतां येणें अशक्य आहे, असें 'द्वितीयेऽपि०' इत्यादि भाष्यानें सांगतात–]

**भाष्यं—द्वितीयेऽपि ब्रह्मैव अनियोज्यस्वभावं जीवस्य स्वरूपं, जीवत्वं त्वविद्याकृतमेव, इति प्रतिपादिते ब्रह्मणि नियोज्याभावान्नियोगाभाव एव। द्रष्टव्यादिशब्दा अपि परविद्याधिकारपठितास्तत्त्वाभिमुखीकरणप्रधाना न तत्त्वावबोधविधिप्रधाना भवन्ति ॥**

**भाष्यार्थ**—दुसऱ्यापक्षींहि अनियोज्यस्वभाव ब्रह्मच जीवाचें स्वरूप आहे, [—"जीव ब्रह्माहून अनन्य—अभिन्न जरी असला तरी अविद्येनें त्याला अन्यत्व असल्यामुळें तो नियोज्य होईल," अशी आशंका घेऊन 'ब्रह्म ज्ञात झालें असतां भेदक —भेद उत्पन्न करणाऱ्या अविद्येचा असंभव असल्यामुळें असें होत नाहीं' असें '**जीवत्वं०**' इत्यादि भाष्यानें सांगतात—]=पण जीवत्व तर अविद्याकृतच—कल्पितच आहे, असें ब्रह्माचें प्रतिपादन केलें असतां नियोज्याच्या अभावामुळें नियोगाचा अभावच होतो. [—"अहोपण, ब्रह्मज्ञानाविषयीं श्रुत असलेल्या विधींचें तर्कानें निरसन कसें करितां ?" '**द्रष्टव्यादि०**' इत्यादि भाष्यानें उत्तर—]=परविद्याप्रकरणांत पठित असलेलेहि 'द्रष्टव्यादि-'शब्द तत्त्वाभिमुखीकरणप्रधान आहेत, पुरुषाला तत्त्वाभिमुख करणें हेंच त्यांचें मुख्य प्रयोजन आहे, ते तत्त्वावबोधविधिप्रधान नाहींत, तत्त्वज्ञानाचें विधान करणें यांत त्यांचें प्राधान्य नाहीं. [—"अहोपण, शब्दांना अभिमुखीकरणत्व असतें असें कोठेंहि दृष्ट—अनुभूत नाहीं" अशी आशंका घेऊन '**लोकेऽपि०**' इत्यादि भाष्यानें म्हणतात—]

**भाष्यं—लोकेऽपीदं पश्येदमाकर्णयेति चैवंजातीयकेषु निर्देशेषु प्रणिधानमात्रं कुर्वित्युच्यते। न साक्षाज्ज्ञानमेव कुर्विति। ज्ञेयाभिमुखस्यापि ज्ञानं कदाचिज्जायते कदाचिन्न जायते। तस्मात्तं प्रति ज्ञानविषय एव दर्शयितव्यो ज्ञापयितुकामेन। तस्मिन्दर्शिते स्वयमेव यथाविषयं यथाप्रमाणं च ज्ञानमुत्पद्यते ॥**

**भाष्यार्थ**—व्यवहारांतहि 'हें पहा, हें ऐक,' अशा प्रकारच्या निर्देशांमध्यें केवल 'लक्ष दे, इकडे अवधान ठेव' असेंच सांगितलें जातें. 'प्रत्यक्ष ज्ञानच कर' असें त्यांत सांगितलें जात नाहीं. [—"अहोपण, 'ज्ञा' या प्रकृतीचा अर्थ या रूपानें श्रुत असलेलें ज्ञानच लोकांत किंवा वेदांत विधेय कां नाहीं ?" अशी आशंका घेऊन 'ज्ञान पुरुषतंत्र—पुरुषाच्या अधीन नसल्यामुळें' असें '**ज्ञेयाभिमुखस्य०**' इत्यादि भाष्यानें सांगतात—]=ज्ञेयाच्या अभिमुख झालेल्या पुरुषालाहि एखादे वेळीं ज्ञान होतें व एखादे वेळीं होत नाहीं. [—शिवाय नियोगवाद्यालाहि वेदान्तांचें वस्तुवादित्व अवश्य मानणें भाग आहे. कारण केवल नियोगामुळें तत्त्वज्ञान होण्याचा संभव नाहीं. म्हणून वाक्यापासूनच ज्ञानाची उत्पत्ति होत

असल्याकारणानें नियोगाला आनर्थक्य आहे, असें '**तस्मात्०**' इत्यादि भाष्यानें सांगतात-]='**तस्मात्**'-ज्ञानाच्या अपुरुषतंत्रत्वामुळें-ज्ञान पुरुषाच्या अधीन नसून वस्तूच्या अधीन असल्यामुळें-ब्र.भा.अ.१.पृ.१४१-त्याच्या विधेयत्वाचा असंभव आहे, म्हणून ज्ञान करवून देण्याची इच्छा करणाऱ्या पुरुषानें ज्ञेयाभिमुख झालेल्या पुरुषाला केवल ज्ञानाचा विषयच दाखवावा, हेंच उचित आहे. [-" तथापि नियोगाच्या अभावीं त्याचें ज्ञान कसें होईल ? " '**तस्मिन्०**' इत्यादि भाष्यानें उत्तर-]=त्यानें त्याला तो विषय दाखविला असतां यथाविषय व यथाप्रमाण म्ह० जसा विषय असेल व जसें प्रमाण असेल त्याप्रमाणें ज्ञान आपोआप उत्पन्न होईल. [-शिवाय प्रमाणाची अपेक्षा न करणारा विधि सम्यग्ज्ञान उत्पन्न करीत नाहीं, आणि मिथ्याज्ञान मुमुक्षूच्या कांहीं उपयोगाचें नाहीं, तो प्रमाणानें बाधित झालेल्या वस्तूचें सम्यग्ज्ञान उत्पन्न करूं शकत नाहीं. म्हणून प्रमाणानेंच त्याची सिद्धि होत असल्यामुळें विधि व्यर्थ आहे, असें '**न च०**' इत्यादि भाष्यानें सांगतात-]

**भाष्यं—न च प्रमाणान्तरेण अन्यथाप्रसिद्धेऽर्थे अन्यथाज्ञानं नियुक्तस्याप्युपपद्यते । यदि पुनर्नियुक्तोऽहमिति अन्यथा ज्ञानं कुर्यान्न तु तज्ज्ञानं । किं तर्हि मानसी सा क्रिया । स्वयमेव चेदन्यथोत्पद्येत भ्रान्तिरेव स्यात् ॥**

**भाष्यार्थ**—दुसऱ्या प्रमाणानें अन्यथा प्रसिद्ध असलेल्या अर्थाविषयीं अन्यथाज्ञान नियुक्त केलेल्याहि पुरुषाला होऊं शकत नाहीं. [-" अहोपण, योषितादि-स्त्री-पुरुष इत्यादि पदार्थांतील अग्न्यादिबुद्धीप्रमाणें विधीमुळें प्रमाणविरुद्ध पदार्थांमध्येंहि ज्ञान होणें युक्त आहे," अशी आशंका घेऊन '**यदि०**' इत्यादि भाष्यानें म्हणतात-]=पण असें असतांनाहि ' मी नियुक्त आहें' अशा भावनेनें जर पुरुष अन्यथा ज्ञान करील तर तें ज्ञान होणार नाहीं, ती मानसी क्रिया होईल [-" अहोपण, रज्जूंतील सर्पाच्या ज्ञानाप्रमाणें अन्यथा ज्ञानहि मानसी क्रिया नव्हे" अशी आशंका घेऊन '**स्वयमेव०**' इत्यादि भाष्यानें म्हणतात-]=आणि तें ज्ञान स्वतःच-आपोआप-विधीवांचूनच जर अन्यथा उत्पन्न होईल तर ती भ्रांतिच होईल. [ शास्त्रीय यत्नादिकांची अपेक्षा नसतांना झालेल्या ज्ञानाला अक्रियात्व जरी असलें तरी शास्त्रीय प्रयत्नादिकांनीं झालेलें अन्यवस्तूचें अन्यज्ञान ही मानसी क्रियाच आहे, असा भावार्थ.-" तर मग सम्यग्ज्ञान कसें आहे ? " '**ज्ञानं तु०**' इत्यादि भाष्यानें उत्तर-]

**भाष्यं—ज्ञानं तु प्रमाणजन्यं यथाभूतविषयं च । न तन्नियोगशतेनापि कारयितुं शक्यते । न च प्रतिषेधशतेनापि वारयितुं शक्यते । न हि तत्पुरुषतंत्रं । वस्तुतंत्रमेव हि तत् । अतोऽपि नियोगाभावः ॥**

**भाष्यार्थ**—पण ज्ञान प्रमाणजन्य-प्रमाणानें झालेलें असतें व त्याचा विषय यथाभूत-अबाधित वस्तु असतो. [-' पण तेंहि नियोगाच्या अधीन कां नाहीं ?' ' न तत्० ' इत्यादि भाष्यानें उत्तर-]=तें सम्यग्ज्ञान नियोगशतानेंहि-शंभर विधींनींहि करवितां येणें शक्य नाहीं. [-" अहोपण, ' उदय पावणाऱ्या आदित्याला पाहूं नये' इत्यादि निषेधविषयत्वाप्रमाणें-ब्र.भा.अ.१.पृ.१५५-त्याला-सम्यग्ज्ञानाला विधिविषयत्वहि असेल " अशी आशंका घेऊन ' न च० ' इत्यादि भाष्यानें म्हणतात-]=आणि प्रतिषेधशतानेंहि-शंभर प्रतिषेधांनींहि त्याचें निवारण करितां येत नाहीं. [ कारण वरील निषेधवाक्यांतहि संकल्पविषयक प्रयत्नाचेंच विधान केलें जातें, असा भावार्थ.-सम्यग्ज्ञानाला विधि-निषेधांचें अविषयत्व आहे, याविषयीं ' न हि० ' इत्यादि भाष्यानें हेतु-]=कारण सम्यग्ज्ञान पुरुषतंत्र-पुरुषाच्या अधीन नाहीं, तर तें वस्तुतंत्रच आहे. [-याप्रमाणें सम्यग्ज्ञान पुरुषाच्या प्रयत्नाधीन नाहीं, असें झालें असतां फलित सांगतात-]=' **अतः अपि०** '-ज्ञान पुरुषतंत्र नसून प्रमाण व वस्तु यांच्या अधीन असल्यामुळेंहि त्यामध्यें नियोगाचा अभाव आहे. [-नियोगवाद्याला उद्देशून ' **किं च०** ' इत्यादि भाष्यानें आणखीं कांहीं दूषण सांगितलें जातें-]

**भाष्यं—किं चान्यत् । नियोगनिष्ठतयैव पर्यवस्यत्याम्नाये यदभ्युपगतमनियोज्यब्रह्मात्मत्वं जीवस्य तदप्रमाणकमेव स्यात् । अथ शास्त्रमेव अनियोज्यब्रह्मात्मत्वमप्याचक्षीत । तदवबोधे च पुरुषं नियुंजीत । ततो ब्रह्मशास्त्रस्यैकस्य द्व्यर्थपरता विरुद्धार्थपरता च प्रसज्येयाताम् ॥**

**भाष्यार्थ**—शिवाय नियोगवाद्याच्या पक्षावर आणखीहि दोष येतो [-'**नियोगनिष्ठतया०** ' इत्यादि भाष्यानें तोच दोष विशद करितात-]=आम्नाय-वेदान्तशास्त्र नियोगनिष्ठतेनेंच पर्यवसित होत असतांना नियोगवाद्यानें जीवाचें अनियोज्य ब्रह्मात्मत्व जें स्वीकारलेलें आहे तें अप्रमाणकच-प्रमाणशून्यच होईल. [ कारण शास्त्राला नियोगनिष्ठत्व आहे, असें झालें असतां ' तत् ' व ' त्वं ' या महावाक्यस्थ पदांच्या अर्थाचें ऐक्य जें मानिलें आहे तें भ्रांतिमूलक आहे असें होईल, असा भावार्थ.-शास्त्रसिद्धत्वामुळें नियोगनिष्ठत्व व 'तत्त्वं 'पदार्थांच्या ऐक्याचा अभ्युपगम हीं दोन्हीं प्रामाणिक आहेत, अशा नियोगवाद्याच्या मताचा '**अथ०**' इत्यादि भाष्यानें अनुवाद-]=बरें, शास्त्रच अनियोज्य ब्रह्मात्मत्व सांगेल व पुरुषाला त्याच्या ज्ञानामध्यें नियुक्त करील, [-पण या पक्षीं अनेकार्थत्वानें वाक्यभेद व विरुद्धार्थत्वानें अप्रामाण्य असे दोन दोष '**ततः०**' इत्यादि भाष्यानें देतात-]=तर एका ब्रह्म-

शास्त्राला व्यर्थपरत्व व विरुद्धार्थपरत्व आहे, असे हे दोष प्रसक्त होतील. [–आणि उपक्रमोपसंहारांची एकरूपता, अभ्यास, फल इत्यादिकांनीं सिद्ध झालेली वेदान्तांची ब्रह्मपरताहि त्यांना नियोगपरत्व असल्यास बाधित होईल, असें 'नियोग०' इत्यादि भाष्यानें सांगतात––]

**भाष्यं—नियोगपरतायां च श्रुतहानिरश्रुतकल्पना कर्मफलवन्मोक्षस्यादृष्टफलत्वमनित्यत्वं च, इत्येवमादयो दोषा न केनचित्परिहर्तुं शक्याः । तस्मादवगतिनिष्ठान्येव ब्रह्मवाक्यानि न नियोगनिष्ठानि । अतश्च एकनियोगप्रतीतेरेकवाक्यतेत्ययुक्तम् ॥**

**भाष्यार्थ**—आणि वेदान्तशास्त्राला नियोगपरत्व आहे, असें झालें असतां श्रुतहानि व अश्रुतकल्पना हा दोष येईल. [–शिवाय ज्ञानाला विधेयत्व असल्यास त्याची फलसिद्धि कर्माप्रमाणें अपूर्वाच्या अवान्तर व्यापारापासून होते, असें मानावें लागेल आणि त्यामुळें स्वर्गादिफलाप्रमाणें ज्ञानाच्या फलाला अदृष्टफलत्व, अनित्यत्व व सातिशयत्व आहे, असें होईल, असें '**कर्मफलवत्**०' इत्यादि भाष्यानें सांगतात–] =कर्मफलाप्रमाणें मोक्षाचें अदृष्टफलत्व व अनित्यत्व, इत्यादि दोष कोणालाहि परिहार करितां येणें शक्य नाहीं. [–"तर मग वेदान्तांना नियोगपरत्व नाहीं, असें झालें असतां त्यांना प्रामाण्य कसें?" '**तस्मात्**०' इत्यादि भाष्यानें उत्तर–] =तस्मात् ब्रह्मवाक्यें अवगतिनिष्ठ–ज्ञाननिष्ठच आहेत. तीं नियोगनिष्ठ नाहींत. [–त्यांना अनियोगनिष्ठत्व आहे, असें झालें असतां '**अतश्च**०' इत्यादि भाष्यानें फलित सांगतात–]=आणि म्हणून एकनियोगप्रतीतीमुळें एकवाक्यता आहे, हें म्हणणें अयुक्त आहे. [–वेदान्तांत नियोगाचा अभाव असल्यामुळें एकनियोगविधि असिद्ध आहे, असें सांगितलें. आतां प्रौढवादित्वानें नियोगाचा अंगीकार करून तदेकत्वाचें निरसन '**अभ्युपगम्यमाने**०' इत्यादि भाष्यानें करितात––]

**भाष्यं—अभ्युपगम्यमानेऽपि च ब्रह्मवाक्येषु नियोगसद्भावे । तदेकत्वं निष्प्रपंचोपदेशेषु सप्रपंचोपदेशेषु चासिद्धम् । न हि शब्दान्तरादिभिः प्रमाणैर्नियोगभेदेऽवगम्यमाने सर्वत्रैको नियोग इति शक्यमाश्रयितुम् ॥**

**भाष्यार्थ**—आणि ब्रह्मवाक्यांमध्यें नियोगाचा सद्भाव–अस्तित्व आहे असें जरी मानिलें तरी निष्प्रपंच उपदेशांमध्यें व सप्रपंच उपदेशांमध्यें नियोगाचें एकत्व असिद्ध आहे. [–'**न हि**०' इत्यादि भाष्यानें त्याविषयीं हेतु सांगतात–]=कारण शब्दान्तरादि-प्रमाणांनीं नियोगाचा भेद अवगत होत असतांना सर्वत्र एकच नियोग आहे,असा आश्रय करितां येणें शक्य नाहीं.[भिन्न वाक्यांच्या अर्थाला विषय करणारा

जो शब्द तें शब्दान्तर. जसें–'यजति'–याग करितो, 'ददाति'–दान देतो, 'जुहोति'–हवन करितो, इत्यादि. तसेंच 'उपासीत, वेद'–उपासना करावी, जाणतो, असें शब्दान्तर आहे. भाष्यांतील 'शब्दान्तरादि' या पदांतील 'आदि-' शब्दानें शब्दभेदाप्रमाणेंच रूपभेद, प्रकरणभेद व फलभेद यांचें ग्रहण केलें जातें. या शब्दादि-भेदांनीं नियोगाचा भेद सिद्ध झाला असतां त्याच्या एकत्वाची असिद्धि होते, असा भावार्थ. –"अहोपण, असा अनुबंधभेद जरी असला तरी प्रयाज-दर्शपूर्णमासवाक्यांप्रमाणें येथें नियोगैक्य असेल" अशी आशंका घेऊन 'प्रयाजादि-वाक्यांत अधिकारांशाचा अभेद आहे. त्यांत अधिकारांश एकच आहे, म्हणून तेथें नियोगैक्य आहे. पण येथें ब्रह्मवाक्यांत तसा अधिकारांशाचा अभेद नाहीं, तर भेद आहे, त्यामुळें असें मानितां येत नाहीं,' असें '**प्रयाज०**' इत्यादि भाष्यानें सांगतात—]

**भाष्यं—प्रयाजदर्शपूर्णमासवाक्येषु त्वधिकारांशेनाभेदाद्युक्तमेकत्वम् । न त्विह सगुणनिर्गुणचोदनासु कश्चिदेकत्वाधिकारांशोऽस्ति । न हि भारूपत्वादयो गुणाः प्रपंचप्रविलयोपकारिणः । नापि प्रपंचप्रविलयो भारूपत्वादिगुणोपकारी । परस्परविरोधित्वात् ॥**

**भाष्यार्थ**—पण प्रयाज-दर्शपूर्णमासवाक्यांमध्यें अधिकारांशानें ऐक्य–अभेद असल्यामुळें त्यांचें एकत्व युक्त आहे. [–"प्रयाजादिकांत एकाच स्वर्गकाम पुरुषाला सांगप्रयोगाचा अधिकार जसा आहे तसा एकाच मुमुक्षूचा द्वैतलयादिकांत अधिकार असल्यामुळें दोन्ही विधिवाक्यांत नियोगैक्य असेल" अशी आशंका घेऊन आचार्य '**न तु०**' इत्यादि भाष्यानें तिचें निरसन करितात–]=पण येथें सगुण-निर्गुणचोदनांमध्यें–सविशेष-निर्विशेषविधिवाक्यांमध्यें तसा एखादा एकत्वाधिकारांश नाहीं. [–याविषयीं 'भिन्नाधिकारत्वामुळें व परस्पर उपकाराच्या असंभवामुळें,' असा हेतु सांगतात–]='**न हि०**'–कारण भारूपत्वादि गुण प्रपंचविलयोपकारी नाहींत, ते प्रपंचप्रविलयावर उपकार करणारे नाहींत. '**नापि०**'–प्रपंचविलयहि भारूपत्वादि-गुणोपकारक नाहीं. कारण त्यांना परस्परविरोधित्व आहे. [–"तर मग भारूपत्वादिकांना विशिष्टगुणवादित्व व इतर वाक्यांना त्याच धर्मी ब्रह्मामध्यें द्वैतविलापनार्थत्व आहे, त्यामुळें त्यांची एकवाक्यता आहे," अशी आशंका घेऊन आचार्य '**न हि कृत्स्न०**' इत्यादि भाष्यानें म्हणतात—]

**भाष्यं—न हि कृत्स्नप्रपंचप्रविलापनं प्रपंचैकदेशापेक्षणं च एकस्मिन्धर्मिणि युक्तं समावेशयितुम् । तस्मादस्मदुक्त एव विभाग आकारवदनाकारोपदेशानां युक्ततर इति ॥ २१ ॥**

**भाष्यार्थ**—कारण एकाच धर्मीमध्यें सकल प्रपंचाचें प्रविलापन व प्रपंचाच्या एकदेशाची अपेक्षा या दोहोंचा समावेश करणें युक्त नाहीं. [–याप्रमाणें एकवाक्यत्वाचा असंभव झाला असतां '**तस्मात्**०' इत्यादि भाष्यानें फलित सांगतात–] =म्हणून–एकवाक्यत्वाचा असंभव असल्यामुळें आकारवत्–साकार व अनाकार ब्रह्माचा उपदेश करणाऱ्या वाक्यांचा आम्हीं सांगितलेला विभागच युक्ततर–अधिक युक्त आहे. [ अनिर्वाच्य द्वैताचें आलंबन–आश्रय केलेल्या सविशेष श्रुति आहेत व वास्तविक अद्वैताचा आश्रय केलेल्या निर्विशेष श्रुति आहेत, म्ह० सविशेष श्रुति मिथ्या द्वैताश्रय व निर्विशेष श्रुति सत्य अद्वैताश्रय आहेत, असा आम्हीं केलेला विभागच अतिशय युक्त आहे, असा भावार्थ.]='**इति**'–तस्मात् निष्प्रपंच, अद्वय, चैतन्य-एकरस ब्रह्म आहे, हें सिद्ध झालें. [ अर्थात् अशा या तत्पदलक्ष्याचा उपसंहार करण्यासाठीं हा 'इति-'शब्द आहे.] २१.(५)सु.ब्र.२८८.

( ६. **प्रकृतैतावत्त्वाधिकरण**. सू. २२-३०. )

—"निषेध श्रुतींनीं निर्विशेष ब्रह्माचें निरूपण केलें असतां त्या निषेधश्रुतींना ब्रह्मनिषेधत्व आहे," अशी आशंका घेऊन सूत्रकारांनीं '**प्रकृतैतावत्त्वं**०' इत्यादि सूत्र केलें आहे—

**सूत्रं--प्रकृतैतावत्त्वं हि प्रतिषेधति ततो ब्रवीति च भूयः ॥२२**

**सूत्रार्थ**—' प्रकृत' असलेलें जें ब्रह्माचें ' एतावत्त्व'–इयत्तापरिच्छिन्न मूर्तामूर्त रूपद्वय त्याचा ' नेति ' हा शब्द ' प्रतिषेध करितो ' ' ततः '–कारण प्रपंचाचा निषेध केल्यावर ' भूयः ब्रवीति च'–पुनः त्याहून भिन्न असें कांहीं नाहीं, केवल पर ब्रह्मच आहे, असें श्रुति सांगते.–किंवा ' ततः '–प्रपंचाचा प्रतिषेध केल्यावर '**अथ नामधेयं**'–हें वाक्य ब्रह्म सांगतें. २२ सु. ब्र. २९०. [–"ब्रह्म सन्मात्र आहे. पण तें सामान्यत्वामुळें विशेषांची अपेक्षा करणारें आहे. त्यामुळें त्या विशेषांचा निषेध केला असतां ब्रह्म नाहीं," अशी आशंका येते. म्हणून तिच्या निरसनासाठीं हें अधिकरण केलें आहे. त्याचें विषयवाक्य उपक्रमासह '**द्वे वाव**०' इत्यादि भाष्यानें सांगतात–]

**भाष्यं--' द्वे वाव ब्रह्मणो रूपे मूर्तं चैवामूर्तं च ' इत्युपक्रम्य पंचमहाभूतानि द्वैराश्येन प्रविभज्य । अमूर्तरसस्य च पुरुषशब्दोदितस्य माहारजनादीनि रूपाणि दर्शयित्वा पुनः पठ्यते—' अथात आदेशो नेति नेति न ह्येतस्मादिति नेत्यन्यत्परमस्ति' इति ॥**

**भाष्यार्थ**—" ब्रह्माचीं दोनच रूपें आहेत. " [—त्यांचाच विशेष—]=" मूर्त व अमूर्त. "—बृ. २. ३. १. सु. उ. ५८९. मैत्रे. ६. ३. १९—असा उपक्रम करून [—" तें मूर्त व अमूर्त काय आहे ? "—]=' **पंचमहा०** '—पंचमहाभूतांचा ' **द्वैराश्यानें** '—दोन राशींनीं—समूहांनीं विभाग करून [ पृथिवी-अप्-तेजोरूप भूतत्रय हें मूर्तरूप आणि आकाश व वायु हें अमूर्तरूप, अशा दोन राशींनीं पंचभूतें विभागानें सांगितलीं आहेत, असा भावार्थ.—" अमूर्त भूतद्वयाचा रस म्ह० सार करणात्मा हिरण्यगर्भ, कीं जो हा या तेजोमण्डलांत पुरुष,आणि जो हा या शरीरांत उजव्या नेत्रांतील पुरुष सांगितला आहे त्याचीं ' तद्यथा माहारजनं वासः०'—सु.उ.पृ.५९१—इत्यादि वचनानें विचित्र वासनामय रूपें दाखवून रूपी—त्या रूपानें युक्त असलेल्या ब्रह्माचें स्वरूप सांगण्यासाठीं ' अथ० ' इत्यादि वाक्य आहे, असें ' अमूर्तरसस्य० ' इत्यादि भाष्यानें सांगतात—]=आणि ' पुरुष ' या शब्दानें सांगितलेला जो अमूर्तांचा रस त्याचीं माहारजनादि वासनामय शरीरें दाखवून ' अथात आदेशः० ' इत्यादि पुनः पठित—श्रुत आहे. '**अथ**'—'सत्याचें सत्य ' यांतील षष्ठ्यन्त सत्यशब्दाचा अर्थ सांगितल्यानंतर ' **अतः०** '—त्यांतील प्रथमान्त सत्यशब्द वक्तव्यत्वानें अवशिष्ट असल्यामुळें 'नेति नेति' असा निर्देश करणें, याहून ब्रह्माच्या उपदेशाचा दुसरा श्रेष्ठ निर्देशप्रकार नाहीं.—सु. उ. ५०१. [ ' अथातः ' या पुढील अवशिष्ट श्रुतिभागाचा अर्थ पुढें व्यक्त होईल.—वाक्यकथनाच्या द्वारा तदर्थनिषेध हा अधिकरणाचा विषय सांगून त्यांत विशेषाचा उपलंभ न होणें, एतद्रूप संशय '**तत्र०**'—इत्यादि भाष्यानें सांगतात—]

**भाष्यं—तत्र कोऽस्य प्रतिषेधस्य विषय इति जिज्ञासामहे । न ह्यत्र इदं तदिति विशेषितं किंचित्प्रतिषेध्यमुपलभ्यते । इतिशब्देन त्वत्र प्रतिषेध्यं किमपि समर्प्यते । ' नेति नेति ' इति इतिपरत्वान्नञ्प्रयोगस्य । इतिशब्दश्चायं संनिहितालंबन एवंशब्दसमानवृत्तिः प्रयुज्यमानो दृश्यते ' इति ह स्मोपाध्यायः कथयति ' इत्येवमादिषु ॥**

**भाष्यार्थ**—त्या वाक्यांतील या निषेधाचा विषय काय आहे, हें जाणण्याची, त्याचा विचार करण्याची इच्छा आम्ही करितों. [ वर सांगितलेल्या जिज्ञासाहेतूला '**न हि०**'—इत्यादि भाष्यानें व्यक्त करितात—]=कारण या वाक्यांत ' हें तें ' असें कांहीं विशिष्ट प्रतिषेध्य—निषेध्य उपलब्ध होत नाहीं. [—" अहोपण जें कांहीं सामान्यतः दृष्ट असून विशेषतः दृष्ट नसतें, अशाच स्थाण्वादिकांविषयीं संशय येत असलेला दिसतो. पण येथें त्याचा—सामान्यतः दृष्ट व विशेषतः अदृष्ट याच।

अभाव असल्यामुळें संशय कसा येईल" अशी आशंका घेऊन **'इतिशब्देन०'** इत्यादि भाष्यानें म्हणतात–]=पण येथें 'इति-'शब्दानें कांहीं तरी प्रतिषेध्य –निषेध्य समर्पिलें जातें. कारण 'नेति नेति' अशा या 'नञ्'–न-शब्दाच्या प्रयोगाला 'इति-'परत्व आहे. म्ह० 'न' या शब्दापुढें 'इति' असा शब्द योजिला आहे. [–"तर मग त्या 'इति-'शब्दाच्या अर्थवत्त्वासाठीं–तो शब्द व्यर्थ होऊं नये, म्हणून कांहींतरी येथें निषेध्य असूं दे" अशी आशंका घेऊन **'इतिशब्दश्च०'** इत्यादि भाष्यानें म्हणतात–]=आणि हा संनिहिताचें–समीपवर्ती पदार्थाचें आलंबन करणारा 'इति-'शब्द 'एवं-'शब्दाच्या वृत्तीसारखी ज्याची वृत्ति आहे असा, प्रयोग केला जात असलेला दिसतो. ['एवं-'शब्दासारखाच ज्याचा अर्थ आहे, अशा समीप असलेल्या पदार्थांचा आश्रय करणाऱ्या 'इति-'शब्दाचा प्रयोग केला जातो, असें दिसतें.–'कोठें?' उत्तर–]=' **इति ह०** '–" असें उपाध्याय सांगता झाला." इत्यादि वाक्यांत त्या शब्दाचा तसा प्रयोग केलेला दिसतो. [–" तर मग प्रत्यक्षादि-प्रमाणांनीं समीप असलेल्या घटादि-पदार्थांचा आश्रय करणारा तो–'नेति नेति' हा निषेध आहे म्ह० तो निषेध प्रत्यक्ष, अनुमान इत्यादि प्रमाणांनीं समीप असलेल्या घटादिकांना विषय करितो," अशी आशंका घेऊन 'सजातीयप्रमाणानें समर्पण केलेल्या विषयाला विजातीयप्रमाणानें सिद्ध होणाऱ्या विषयाहून अन्तरंगत्व आहे. त्यामुळें 'नेति नेति' या निषेधाला प्रकृत रूपद्वयालंबनताच आहे. त्याचा आधार–विषय प्रकृत रूपद्वयच आहे.'' असें **'संनिहितं च०'** इत्यादि भाष्यानें सांगतात–]

**भाष्यं—संनिहितं चात्र प्रकरणसामर्थ्याद्रूपद्वयं सप्रपंचं ब्रह्मणः। तच्च ब्रह्म यस्य ते द्वे रूपे। तत्र नः संशय उपजायते—किमयं प्रतिषेधो रूपे रूपवच्चोभयमपि प्रतिषेधति आहोस्विदेकतरम्। यद्यप्येकतरं, तदापि किं ब्रह्म प्रतिषेधति रूपे परिशिनष्टि, आहोस्विद्रूपे प्रतिषेधति ब्रह्म परिशिनष्टीति ॥**

**भाष्यार्थ**—आणि येथें प्रकरणसामर्थ्यामुळें ब्रह्माचें सप्रपंच रूपद्वय संनिहित –समीप आहे. ज्याचीं तीं दोन रूपें आहेत तें ब्रह्म आहे. [–याप्रमाणें प्रकृतत्व व विशेषाची असिद्धि असे हे संशयाचे दोन हेतु सांगून **'तत्र०'** इत्यादि भाष्यानें त्याचें निगमन करितात–]=त्यांविषयीं आम्हांला असा संशय येतो–काय, हा प्रतिषेध तीं दोन रूपें व रूपवान् ब्रह्म या दोहोंचाहि निषेध करितो, [–पण त्यांतील एकाच्या निषेधानेंहि निषेधाची सिद्धि होत असल्यामुळें दुसरा पक्ष सांगतात–]=' **अहोस्विद०** '–किंवा त्यांतील कोणातरी एकाचा निषेध करितो. [–या

दुसऱ्या पक्षींहि ब्रह्माला वाङ्मनसातीतत्व असल्यामुळें व प्रपंचाला प्रत्यक्षादि-सिद्धत्व असल्यामुळें प्रपंचाला व्यावहारिकप्रमाणसिद्धत्व जरी असलें तरी कल्पितत्व आहे. ब्रह्माला त्याच्या कल्पनेचें अधिष्ठानत्व व त्याच्या निषेधाचें अवधित्व आहे. त्यामुळें त्याला–ब्रह्माला परिशेषार्हत्वहि आहे, असें पक्षद्वय ' यदापि० ' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=जर त्यांतील कोणत्या तरी एकाचाच तो निषेध करीत असेल तर काय तो ब्रह्माचा प्रतिषेध करितो व दोन रूपांना अवशिष्ट ठेवितो कीं दोन रूपांचा प्रतिषेध करून ब्रह्माला अवशिष्ट ठेवितो ? [–निषेध प्रतिषेध कोणाचा करितो व परिशेष कोणाचा करितो ? ब्रह्माचा कीं रूपद्वयाचा ? असा भावार्थ. या अधिकरणांत निषेधाचा अर्थ सांगून तत्पदार्थाचेंच शोधन केलेलें असल्यामुळें त्याच शुद्ध तत्पदार्थाला वाक्यार्थ-अन्वयित्वानें वाक्यार्थज्ञानहेतुत्व आहे. म्हणून याच्या पादादिसंगति आहेत, असें मानून ' तत्र० ' इत्यादि भाष्यानें पूर्वपक्ष करितात–]

**भाष्यं—तत्र प्रकृतत्वाविशेषादुभयमपि प्रतिषेधतीत्याशंकामहे । द्वौ चैतौ प्रतिषेधौ, द्विर्नेतिशब्दप्रयोगात् । तयोरेकेन सप्रपंचं ब्रह्मणो रूपं प्रतिषिध्यतेऽपरेण रूपवद्ब्रह्म, इति भवति मतिः । अथवा ब्रह्मैव रूपवत्प्रतिषिध्यते । तद्धि वाङ्मनसातीतत्वादसंभाव्यमानसद्भावं प्रतिषेधार्हम् । न तु रूपप्रपंचः प्रत्यक्षादिगोचरत्वात्प्रतिषेधार्हः । अभ्यासस्त्वादरार्थ इति ॥**

**भाष्यार्थ**—पूर्वोक्त विषयवाक्यांत ब्रह्म व रूपद्वय यांना प्रकृतत्व एकसारखेंच असल्यामुळें ' नेति नेति ' हा निषेध त्या दोहोंचाहि निषेध करितो, अशी आम्हांला आशंका येते, अशी आम्ही शंका घेतों. [पूर्वपक्षांत ' या निषेधाचें शून्यतेमध्ये पर्यवसान होत असल्यामुळें शून्य ब्रह्माला प्रत्यगात्मत्वानें ज्ञानार्हता नाहीं, शून्य ब्रह्मामध्यें प्रत्यगात्मत्वानें ज्ञात होण्याची पात्रता नाहीं, ' व सिद्धान्तांत ' ब्रह्मव्यतिरिक्ताचाच निषेध केलेला असल्यामुळें अप्रपंच ब्रह्माला प्रत्यगात्मत्वानें ज्ञान-योग्यता आहे.'–"अहोपण तसा संभव असतांना प्राप्त झालेल्या सर्वांच्या निषेधाची कल्पना करण्यापेक्षां लाघवामुळें एकदेशाच्याच निषेधाची कल्पना करणें युक्त होय. कारण ' हें रजत नव्हे ' इत्यादि उदाहरणांत तसा अनुभव येतो," अशी आशंका घेऊन ' निषेधद्वयाच्या सामर्थ्यानें प्राप्त झालेल्या सर्वांचा बाध कल्पिणें युक्त आहे. कारण ' हें रजत नव्हे ' या उदाहरणांत दोन निषेधांचा अभाव असल्यामुळें त्यांतील ' रजत ' या एकदेशाचाच बाध होतो. ' इदं ' या अधिष्ठानाचा बाध होत नाहीं.' असें ' द्वौ च० ' इत्यादि भाष्यानें वादी सांगतो–]=आणि ' नेति नेति ' हे दोन प्रतिषेध आहेत. कारण त्यांत दोनदा ' न ' अशा या शब्दाचा

प्रयोग केला आहे. [–वादी त्या दोन निषेधांच्या अपुनरुक्त **अर्थाचा अभिनय** '**तयोरेकेन०**' इत्यादि भाष्यानें करितो–]=त्यांतील एका 'न' या पदानें सप्रपंच ब्रह्माच्या रूपाचा निषेध केला जातो व दुसऱ्या नकारानें रूपवत्–त्या रूपानें युक्त असलेल्या ब्रह्माचा निषेध केला जातो. [–" पण 'नेदं रजतं'–हें रजत नव्हे, इत्यादि उदाहरणांतील निषेधाचा अर्थ वस्त्वन्तराभावविशिष्ट वस्त्वन्तराचें ज्ञान हा आहे. म्ह० रजत या दुसऱ्या वस्तूच्या अभावानें विशिष्ट, अशा रज्जु या वस्तूचें ज्ञान हा त्या निषेधाचा अर्थ आहे. त्यामुळें तसल्या निषेधानें सर्वनिषेध संभवत नाहीं, " अशी आशंका घेऊन '**अथवा०**' इत्यादि भाष्यानें वादी म्हणतो–]= किंवा रूपवत् ब्रह्माचाच निषेध केला जातो. [–'**तद्धि०**' इत्यादि भाष्यानें त्याविषयीं हेतु–]=कारण वाङ्मनसातीत असल्यामुळें ज्याचा सद्भाव–अस्तित्व असंभाव्यमान–न संभवणारा आहे असें तेंच प्रतिषेधास योग्य आहे. [–" पण प्रकृतत्व प्रपंच व ब्रह्म या दोहोंनाहि एकसारखेंच असल्यामुळें ब्रह्माप्रमाणें प्रपंचाचाहि निषेध होतो" अशी आशंका घेऊन 'प्रत्यक्षादिप्रमाणांशीं विरोध येत असल्यामुळें प्रपंचाचा निषेध संभवत नाहीं,' असें वादी '**न तु०**' इत्यादि भाष्यानें सांगतो–]=पण रूपप्रपंच प्रत्यक्षादिकांचा विषय असल्यामुळें प्रतिषेधाला योग्य नाही. [–" अहोपण, केवल ब्रह्माचाच निषेध जर येथें विवक्षित मानला तर दोन निषेधांना व्यर्थत्व प्राप्त होतें. कारण एका निषेधानेंच तो झालेला आहे." अशी आशंका घेऊन '**अभ्यासस्तु०**' इत्यादि भाष्यानें वादी म्हणतो–]='नेति नेति' असा निषेधाचा जो अभ्यास केला आहे तो आदरार्थ आहे, '**इति**'– असें पक्षद्वय प्राप्त होतें. [–'**एवं०**' इत्यादि भाष्यानें पक्षद्वयाचा अनुवाद करून सिद्धान्त सांगतात—]

**भाष्यं—एवं प्राप्ते ब्रूमः–न तावदुभयप्रतिषेध उपपद्यते । शून्यवादप्रसंगात् । किंचिद्धि परमार्थमालम्ब्यापरमार्थः प्रतिषिध्यते । यथा रज्ज्वादिषु सर्पादयः । तच्च परिशिष्यमाणे कस्मिंश्चिद्भावेऽवकल्प्यते । कृत्स्नप्रतिषेधे तु कोऽन्यो भावः परिशिष्येत ॥**

**भाष्यार्थ**—असे दोन पक्ष प्राप्त झाले असतां आम्ही सिद्धान्त सांगतों. [–अगोदर सूत्राला सोडूनच त्यांतील पहिल्या पक्षाचें '**न तावत्०**' इत्यादि भाष्यानें निरसन–]='नेति नेति' या वाक्यानें उभयप्रतिषेध तर संभवतच नाहीं. कारण ब्रह्म व त्याचें रूपद्वय या दोहोंचाहि त्या वाक्यानें प्रतिषेध केला आहे, असें म्हटल्यास शून्यवादाचा प्रसंग येतो. [–'तो प्रसंग तर आम्हां शून्यवाद्यांना

**इष्टच** आहे.' असें वादी म्हणेल म्हणून आचार्य '**किंचिद्धि०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=**कारण** कांहीं थोड्याशा तरी परमार्थाचा आश्रय करून **अपरमार्थाचा प्रतिषेध** केला जातो. [–वास्तव अधिष्ठानाला जाणून आरोप्य निषेध्य–**निरस्य**–निरसन करण्यास योग्य असतें, याविषयीं दृष्टान्त–]='**यथा०**'–जसा रज्ज्वादिकांतील भासमान सर्पादिकांचा प्रतिषेध केला जातो. [–"तर मग शून्य हीच ती वस्तु असो. शून्याला जाणून इतर निषेध्य आहे" '**तच्च०**' इत्यादि भाष्यानें याचें '**नाहीं**' असें उत्तर–]=आणि तें निषेधन–निरसन कोणता तरी एखादा भाव **जर परिशिष्यमाण**–अवशिष्ट राहणारा असेल तर उपपन्न होतें. पण सर्वांचा प्रतिषेध कल्यास कोणता अन्य भाव अवशिष्ट राहणार! सर्वांचाच निषेध केल्यावर **कोणत्याच** भावाचा परिशेष संभवत नाहीं. [–लोकसिद्ध पदार्थाशीं संबद्ध–अन्वित होण्याची योग्यता, या सामर्थ्यानें वाक्यार्थाचा स्वीकार केलेला असल्यामुळें आणि येथें 'न' असाच–एवढाच निषेध दिसत नसल्यामुळें 'हा हा नव्हे' 'येथें हें नाहीं' अशा धर्मिप्रतियोगिघटितच निषेधाचा प्रत्यय येतो. त्यामुळें विशेषणाचा अवशेष अत्यंत आवश्यक आहे. म्हणून शून्यता अयुक्त आहे, असा भावार्थ.–शिवाय व्यवहारांत भ्रमाचें साधिष्ठानत्व उपलब्ध होत असल्यामुळें तात्त्विक अधिष्ठानाच्या अभावीं प्रत्यक्षादिसिद्ध द्वैताच्याच तात्त्विकत्वाचा प्रसंग येतो. त्यामुळेंहि निषेध निरवकाश–निर्विषय होईल, असें '**अपरिशिष्यमाणे**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]

**भाष्यं**–**अपरिशिष्यमाणे चान्यस्मिन्य इतरः प्रतिषेद्धुमारभ्यते प्रतिषेद्धुमशक्यत्वात्तस्यैव परमार्थत्वापत्तेः प्रतिषेधानुपपत्तिः ॥**

**भाष्यार्थ**—आणि निषेध केल्यावर दुसऱ्या कोणाचा परिशेष जर होत **नसेल**–कांहींच जर अवशिष्ट रहात नसेल तर जो इतर पदार्थ निषेध करण्यास आरंभिला जातो त्याचा निषेध होणें अशक्य असल्यामुळें त्याच्याच परमार्थत्वाची प्राप्ति होते आणि त्यामुळें प्रतिषेधाची अनुपपत्ति होते. [ दृष्ट–प्रत्यक्षसिद्ध असलेल्या सर्वांचा निषेध केला असतां तदेकदेशवस्तुज्ञानरूप अपवादाच्या अभावामुळें उत्सर्गाची सिद्धि होते, असा न्याय असल्यामुळें पूर्वदृष्टाच्या वस्तुत्वाचा प्रसंग येतो. निरवधिक–निरधिष्ठान निषेधाचा अयोग–असंभव आहे. शून्याचें भान अवस्तुत्वानें होतें, त्यामुळें शून्याच्या दृष्टीनें पूर्वदृष्टाच्या निषेधाचा असंभव आहे. म्हणून शून्य हा ज्याचा अवधि आहे, असा निषेध नाहीं. म्ह० निषेधाचें पर्यवसान शून्यांत होत नाहीं, असा याचा भावार्थ.–आतां '**नापि०**' इत्यादि भाष्यानें दुसऱ्या पूर्वपक्षाचें निरसन करितात––]

**भाष्यं—नापि ब्रह्मप्रतिषेध उपपद्यते 'ब्रह्म ते ब्रवाणि' इत्याद्युपक्रमविरोधात्। 'असन्नेव स भवति असद्ब्रह्मेति वेद चेत्' इत्यादिनिंदाविरोधात्। अस्तीत्येवोपलब्धव्यः' इत्यवधारणविरोधात्। सर्ववेदान्तव्याकोपप्रसंगाच्च॥**

**भाष्यार्थ**—ब्रह्माचा प्रतिषेधहि उपपन्न होत नाहीं. [ कारण निषेध प्राप्तिपूर्वक होतो. प्राप्ताचा निषेध संभवतो. ब्रह्म द्वैताप्रमाणें अविद्येनें किंवा प्रत्यक्षादिप्रमाणांनीं प्राप्त नाहीं. शब्दानें प्राप्त झालेल्या ब्रह्माचा शब्दानेंच निषेध केल्यास 'पंकप्रक्षालनन्याय'–अंगाला चिखल लावून तो धुवीत बसणें, हा न्याय प्राप्त होतो. त्यामुळें ब्रह्माचा निषेध संभवत नाहीं, असा भावार्थ.–ब्रह्माच्या निषेध्यत्वाच्या अभावाविषयीं '**ब्रह्म ते०**' इत्यादि वाक्यानें हेत्वंतर सांगतात–]=ब्रह्मनिषेध्यपक्षीं 'मी तुला ब्रह्म सांगतों "–कौ. ४. १ सु. उ. ९८४ बृ. २. १. १. सु. उ. ५७७.–इत्यादि अशा या उपक्रमाशीं विरोध येतो. [ येथील 'आदि-'शब्दानें 'ब्रह्मविद् पर ब्रह्माला प्राप्त होतो'–सु. उ. २०७–इत्यादि उपक्रमांचें ग्रहण केलें जातें.–ब्रह्माच्या सत्त्व-असत्त्वज्ञानांमध्यें क्रमानें गुण व दोष सांगितलेला असल्यामुळेंहि ब्रह्म निषेध्य नाहीं, असें '**असन्नेव०**' इत्यादि वाक्यानें सांगतात–]= आणि "जो ब्रह्म असत्–अविद्यमान आहे, असें जाणतो तो स्वतः असत्–अविद्यमानासारखाच–अपुरुषार्थसंबंधी होतो."–तै. २. ६. सु. उ. २१९–इत्यादि निंदावचनाशींहि विरोध येतो. [–ब्रह्माच्या सन्मात्रत्वाची सिद्धि होत असल्यामुळेंहि ब्रह्म निषेध्य नाहीं, असें '**अस्तीत्येव०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]="आत्मा आहे, असेंच जाणावें"–का. २. ३. १३. सु. उ. ७८–अशा या अवधारणाशीं विरोध येत असल्यामुळेंहि ब्रह्म निषेध्य नाहीं. [–शिवाय सर्व वेदान्तांमध्यें साक्षात् किंवा परंपरेनें ब्रह्माचेंच प्रतिपादन केलें जात असल्यामुळें त्याच्याशीं विरोध येतो. त्यामुळेंहि ब्रह्म निषेध्य नाहीं, असें '**सर्ववेदान्त०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]= आणि सर्व वेदान्तांचा बाध होण्याचा प्रसंग येत असल्यामुळेंहि ब्रह्म निषेध्य नाहीं. [–आतां वर–पृ. १७८–वाद्यानें 'ब्रह्म वाङ्मनसातीत असल्यामुळें त्याचा सद्भाव असंभाव्य आहे, त्यामुळें ब्रह्म निषेधार्ह–निषेधास योग्य आहे,' असें जें म्हटलें आहे, त्याविषयीं आचार्य '**वाङ्मनसातीतत्वं०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]

**भाष्यं—वाङ्मनसातीतत्वमपि ब्रह्मणो न अभावाभिप्रायेणाभिधीयते। न हि महता परिकरबंधेन 'ब्रह्मविदाप्नोति परम्' 'सत्यं ज्ञानमनंतं ब्रह्म' इत्येवमादिना वेदान्तेषु ब्रह्म प्रतिपाद्य तस्यैव पुनरभावोऽभिलप्येत। "प्रक्षालनाद्धि पंकस्य दूरादस्पर्शनं वरं" इति हि न्यायः॥**

**भाष्यार्थ**—ब्रह्माचें वाङ्मनसातीतत्वहि अभावाच्या अभिप्रायानें सांगितलें जात नाहीं. [–'**न हि०**' इत्यादि भाष्यानें त्याविषयीं हेतु सांगतात–]=**कारण** फार मोठ्या प्रयत्नानें–अगदीं सज्ज होऊन 'ब्रह्मज्ञ पर ब्रह्माला प्राप्त होतो' 'सत्य ज्ञान अनन्त ब्रह्म' तै.–२.४.—या व अशाच दुसऱ्याहि वाक्यजातानें वेदान्तांमध्यें ब्रह्माचें प्रतिपादन करून त्याचाच पुनरपि अभाव सांगितला जाणार नाहीं. "अगोदर चिखल अंगाला लावून घ्यावयाचा व मग तो धुवीत बसावयाचें, यापेक्षां त्याच्यापासून दूरच राहून त्याला स्पर्श न करणें अधिक चांगलें" असा प्रसिद्ध न्याय आहे. [–" तर मग ब्रह्माचें वाङ्मनसातीतत्व कोणत्या अभिप्रायानें सांगितलें आहे ? " '**प्रतिपादनप्रक्रिया०**' इत्यादि भाष्यानें उत्तर—]

**भाष्यं**—प्रतिपादनप्रक्रिया त्वेषा **'यतो वाचो निवर्तन्ते । अप्राप्य मनसा सह' इति । एतदुक्तं भवति—वाङ्मनसातीतं अविषयान्तःपाति प्रत्यगात्मभूतं नित्यशुद्धबुद्धमुक्तस्वभावं ब्रह्मेति । तस्माद्ब्रह्मणो रूपप्रपंचं प्रतिषेधति । परिशिनष्टि ब्रह्म इत्यवगंतव्यम् ॥**

**भाष्यार्थ**—पण 'ज्याला प्राप्त न होतां मनासह वाणी ज्याच्यापासून परत फिरतात "–तै.२.४.–ही प्रतिपादनाची प्रक्रिया–प्रकार आहे. [–"अहोपण, वागादिअतितत्वानें ब्रह्माचें असत्त्व अवगत होत असतांना ही प्रतिपादनप्रक्रिया काय आहे ? " '**एतदुक्तं०**' इत्यादि भाष्यानें उत्तर–]=" वाङ्मनसातीत, विषयांमध्यें अंतर्भूत न होणारें, प्रत्यगात्मभूत, नित्यशुद्धबुद्धमुक्तस्वभाव ब्रह्म आहे, " असें हें या वाक्यानें सांगितलें आहे. [–याप्रमाणें दोन्ही पक्षांची **अनुपपत्ति आहे, असें** झालें असतां निष्पन्न झालेल्या निषेधाच्या अर्थाचें निगमन करितात–]=**'तस्मात्'** --म्हणून 'नेति नेति' हा निषेध ब्रह्माच्या रूपप्रपंचाचा प्रतिषेध करितो व ब्रह्माचा परिशेष करितो–त्याला अवशिष्ट ठेवितो, असें समजावें. [–**'तदेतत्०'** इत्यादि भाष्यानें या उक्त अर्थीं सूत्राला प्रवृत्त करून त्याची योजना करितात--]

**भाष्यं**—**तदेतदुच्यते—प्रकृतैतावत्त्वं हि प्रतिषेधतीति । प्रकृतं यदेतावदियत्तापरिच्छिन्नं मूर्तामूर्तलक्षणं ब्रह्मणो रूपं तदेष शब्दः प्रतिषेधति । तद्धि प्रकृतं । प्रपंचितं च पूर्वस्मिन्ग्रंथेऽधिदैवतमध्यात्मं च ॥**

**भाष्यार्थ**—'प्रकृतैतावत्त्वं हि प्रतिषेधति'–'नेति नेति' हें वाक्य प्रकृत रूपद्वयाचाच प्रतिषेध करितें, या सूत्रावयवानें हेंच सांगितलें जातें. प्रकृत असलेलें जें ब्रह्माचें 'एतावत्'–इयत्तापरिच्छिन्न मूर्तामूर्तलक्षण रूप त्याचा हा शब्द प्रतिषेध करितो. [–ब्रह्माचें रूपद्वय निषेध्य आहे, याविषयीं **'तद्धि०'** इत्यादि

भाष्यानें हेतु सांगतात–]=कारण तें रूपद्वयच प्रकृत आहे. [–"अहोपण, प्रकृतत्व असणें, एवढ्यानेंच जर रूपद्वय निषेध्य असेल तर ब्रह्माचाहि निषेध होईल. कारण त्यालाहि रूपद्वयाप्रमाणेच प्रकृतत्व आहे," अशी आशंका घेऊन '**प्रपंचितं च०**' इत्यादि भाष्यानें आचार्य म्हणतात–]=आणि पूर्व ग्रंथामध्यें तेंच अधिदैवत व अध्यात्म अशा विभागानें प्रपंचित आहे, त्याचाच विस्तार केला आहे. [ब्रह्माला षष्ठ्यन्तपदवाच्यत्वानें प्रपंचावच्छेदानें अप्रधानत्व असल्यामुळें प्रपंचच प्रधानत्वानें निषेधाशीं संबद्ध होतो, असा भावार्थ.–" अहोपण, 'पुरुष-'शब्दाचें श्रवण असल्यामुळें व त्या शब्दाला ब्रह्मविषयत्व असल्यामुळें ब्रह्माचाहि प्रपंच–विस्तार केलेला आहे, ब्रह्महि पुढील ग्रंथानें प्रपंचित आहे." अशी आशंका घेऊन 'येथें पुरुषशब्दाला लिंगात्मविषयत्व आहे म्ह०लिंगात्मा–सोपाधिक आत्मा हा त्या शब्दाचा विषय आहे. त्यामुळें येथें ब्रह्म प्रपंचित आहे, असें म्हणतां येत नाहीं' असें '**तज्जनितं एव०**' इत्यादि भाष्यानें सांगतात—]

**भाष्यं—तज्जनितमेव च वासनालक्षणमपरं रूपं अमूर्तरसभूतं पुरुषशब्दोदितं लिंगात्मव्यपाश्रयं माहारजनाद्युपमाभिर्दर्शितम्। अमूर्तरसस्य पुरुषस्य चक्षुर्ग्राह्यरूपयोगित्वानुपपत्तेः। तदेतत्सप्रपंचं ब्रह्मणो रूपं संनिहितालंबनेन इतिकरणेन प्रतिषेधकं नञं प्रत्युपनीयत इति गम्यते ॥**

**भाष्यार्थ**—आणि त्याच्यापासून झालेलेंच वासनालक्षण अमूर्तरसभूत पुरुषशब्दोक्त लिंगात्मव्यपाश्रय अपर रूप माहारजनादि-उपमांनीं प्रदर्शित केलें आहे. [–"अहोपण वासनालक्षणच रूप उपमांनी कां सांगितलें जात आहे, पुरुषाचें प्रसिद्धरूपत्वच येथें अभीष्ट कां नाहीं?" '**अमूर्तरसस्य०**' 'इत्यादि भाष्यानें उत्तर–]=कारण अमूर्तरस पुरुषाच्या चक्षुर्ग्राह्यरूपयोगित्वाचा असंभव आहे. [अमूर्तरस पुरुषाचें चक्षूनें दिसणारें रूप संभवत नाहीं, त्याच्या ठिकाणीं चाक्षुष रूपाचा संबंध संभवत नाहीं. म्हणून त्याचें वासनालक्षणरूपच उपमांनी सांगितलें जातें, प्रसिद्धरूप नव्हे, असा भावार्थ.–याप्रमाणें रूपद्वयाला प्राधान्यानें प्रकृतत्व आहे, असें झालें असतां त्याचें फल '**तदेतत्०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=यास्तव हें ब्रह्माचें सप्रपंच रूप संनिहिताचा आश्रय करणाऱ्या 'इति-'करणाकडून प्रतिषेधक 'नञ्-'शब्दाप्रत समीप नेलें जातें, असें अवगत होतें. [–समीपवर्तीवस्तूचा आश्रय करणारा जो 'इति-'शब्द तो ब्रह्माच्या त्या रूपद्वयाचा 'न-'काराशीं संबंध करितो, असें ज्ञात होतें.–" अहोपण,

ब्रह्मालाहि प्राधान्यानें प्रकृतत्व समान आहे. त्यामुळें त्यालाहि निषेध्यत्व आहे" अशी आशंका घेऊन भाष्यकार '**ब्रह्म तु०**' इत्यादि भाष्यानें म्हणतात–]

**भाष्यं—ब्रह्म तु रूपविशेषणत्वेन षष्ठ्या निर्दिष्टं पूर्वस्मिन्ग्रंथे । न स्वप्रधानत्वेन । प्रपंचिते च तदीये रूपद्वये रूपवतः स्वरूपजिज्ञासायां इदमुपक्रान्तम्—'अथात आदेशो नेति नेति' इति ॥**

**भाष्यार्थ**—पण ब्रह्म पूर्व ग्रंथांत रूपविशेषणत्वानें 'ब्रह्मणः' असें षष्ठीनें निर्दिष्ट आहे, तें स्वप्राधान्यानें निर्दिष्ट नाहीं. ['राजपुरुष' इत्यादिकांतील राजाप्रमाणें–अर्थतः त्याला प्राधान्य जरी असलें तरी शब्दतः प्राधान्यानें प्रकृत रूपद्वयच आहे. त्यामुळें प्रकृताचा परामर्श करणाऱ्या 'इति-'शब्दानें अनुवाद करून निषेध करण्यास तेंच योग्य आहे, असा भावार्थ.–"तर मग ब्रह्माला प्राधान्यानें प्रकृतत्व नसल्यामुळें पुढेंहि–उत्तरत्रहि त्याला प्रतिपाद्यत्व नाहीं" अशी आशंका घेऊन '**प्रपंचिते च०**' इत्यादि भाष्यानें म्हणतात–]=आणि त्याच्या रूपद्वयाचा प्रपंच केला असतां–त्याचें सविस्तर प्रतिपादन केलें असतां त्या दोन रूपांनीं रूपवान् झालेल्या ब्रह्माच्या स्वरूपाची जिज्ञासा होते. ती झाली असतां 'अथात आदेशो नेति नेति'–पृ. १७६–असें हें उपक्रान्त आहे, असा याचा उपक्रम केलेला आहे. [–"अहोपण, असा जरी उपक्रम केलेला असला तरी वाक्यार्थाचा निर्णय कसा करावा?" अशी आशंका घेऊन '**तत्र०**' इत्यादि भाष्यानें अध्यारोपापवादन्याय सुचवितात–]

**भाष्यं—तत्र कल्पितरूपप्रत्याख्यानेन ब्रह्मणः स्वरूपावेदनमिदमिति निर्णीयते । तदास्पदं हीदं समस्तं कार्यं नेति नेतीति प्रतिषिद्धम् । युक्तं च कार्यस्य वाचारंभणशब्दादिभ्योऽसत्त्वमिति नेति नेतीति प्रतिषेधनं । न तु ब्रह्मणः । सर्वकल्पनामूलत्वात् ॥**

**भाष्यार्थ**—त्यांतील कल्पित रूपाच्या प्रत्याख्यानानें हें ब्रह्माचें स्वरूप-आवेदन आहे, त्याच्या स्वरूपाचें निवेदन–ज्ञान करून देणें आहे, असा निर्णय केला जातो. [–"अहोपण,'हें भूतल निर्घट–घटरहित आहे 'असें म्हटलें असतां अन्यस्थानीं घटाचें अस्तित्व जसें असतें त्याप्रमाणें ब्रह्मांतील रूपद्वयाचा निषेध जरी केला तरी त्याहून अन्यत्र–ब्रह्मभिन्नस्थानीं तें असेल," अशी आशंका घेऊन '**तदास्पदं०**' इत्यादि भाष्यानें म्हणतात–]=कारण त्या ब्रह्माच्या आश्रयानें राहणाऱ्या या समस्त कार्याचा 'नेति नेति' असा निषेध केला आहे. [ उपादानाहून अन्यत्र कार्याचा असंभव असल्यामुळें त्यांत निषिद्ध केलेल्या पदार्थाची कोठेंहि

सत्ता संभवत नाहीं, असा भावार्थ. पण वाद्यानें वर–पृ. १७८–‘प्रत्यक्षादिप्रमाणांनीं सिद्ध असलेल्या द्वैताचा निषेध प्रत्यक्षादि-विरोधामुळें संभवत नाहीं’ असें जें म्हटलें आहे, त्याविषयीं ‘युक्तं च०’ इत्यादि भाष्यानें सांगतात–]=आणि कार्याला वाचारंभणशब्दादिकांवरून असत्त्व–मिथ्यात्व आहे. त्यामुळें त्याचें ‘नेति नेति’ असें प्रतिषेधन–निषेध करणें युक्त आहे. [तत्त्वावेदनप्रमाणांनीं असिद्ध असल्यामुळें व वाचारंभणादिशब्द असल्यामुळें द्वैताच्या वस्तुसत्तेचा–परमार्थसत्तेचा अभाव आहे. त्यामुळें त्याचें निषेध्यत्व युक्त आहे, असा भावार्थ –“अहोपण, सत्त्वानें–अस्तित्वानें सिद्ध असलेल्या द्वैताचा जर निषेध केला जात असेल तर ब्रह्माचीहि सिद्धि तशीच–सत्त्वानें होत असल्यामुळें म्ह० सत्त्व हा धर्म द्वैत व ब्रह्म या दोहोंमध्यें समान असल्यामुळें ब्रह्माचाहि निषेध स्थिर होतो ” अशी आशंका घेऊन ‘ न तु० ’ इत्यादि भाष्यानें म्हणतात–]=पण ब्रह्माचें प्रतिषेधन युक्त नाहीं. कारण त्याला सर्व कल्पनांचें मूलत्व आहे. [ आरोपाच्या अधिष्ठानत्वानें व निषेधाच्या अवधित्वानें त्याचा अवशेष–परिशेष असल्यामुळें–ब्रह्म अवशिष्ट राहत असल्यामुळें त्याला निषेध्यता नाहीं, असा भावार्थ. –“अहोपण, ‘ द्वे वाव-ब्रह्मणो रूपे’–दोनच ब्रह्माचीं रूपें आहेत, इत्यादि वाक्यानें सांगितलेलें रूपद्वय जर निषेधिलें जात असेल–त्याचा जर निषेध केला जात असेल तर पंकप्रक्षालन-न्यायानें प्रसज्यप्रतिषेधांत–प्राप्त नसलेल्याची प्राप्ति करून निषेध करणें, यांत गौरव होईल !” अशी आशंका घेऊन ‘न च अत्र०’ इत्यादि भाष्यानें सांगतात–]

**भाष्यं**––न चात्र इयमाशंका कर्तव्या––कथं हि शास्त्रं स्वयमेव ब्रह्मणो रूपद्वयं दर्शयित्वा स्वयमेव पुनः प्रतिषेधति––“प्रक्षालनाद्धि पंकस्य दूरादस्पर्शनं वरम्” इति । यतो नेदं शास्त्रं प्रतिपाद्यत्वेन ब्रह्मणो रूपद्वयं निर्दिशति । लोकप्रसिद्धं त्विदं रूपद्वयं ब्रह्मणि कल्पितं परामृशति प्रतिषेध्यत्वाय शुद्धब्रह्म-स्वरूपप्रतिपादनाय चेति निरवद्यम् ॥

**भाष्यार्थ**––आणि येथें–या रूपद्वयनिषेधाविषयीं अशीहि आशंका करूं नये. [–कशी तेंच सांगतात–]=“ शास्त्र स्वतःच ब्रह्माचें रूपद्वय प्रदर्शित करून तें स्वतःच पुनः त्याचा प्रतिषेध कसें करील ? कारण चिखल लावून घेऊन तो धुवीत बसण्यापेक्षां दुरूनच त्याला स्पर्श न करणें चांगलें. ” अशीहि शंका घेऊं नये. [–तशी शंका न करण्याविषयीं ‘यतः०’ इत्यादि भाष्यानें हेतु सांगतात–]=कारण हें शास्त्र ब्रह्माच्या रूपद्वयाचा प्रतिपाद्यत्वानें निर्देश करीत नाहीं, [–“तें रूपद्वय जर प्रतिपाद्य नसेल तर त्याला अनुवाद्यत्व असलें पाहिजे. पण प्रमाणा-

न्तरानें प्राप्ति व फल यांवांचून अनुवाद संभवत नाहीं " अशी आशंका घेऊन '**लोकप्रसिद्धं०**' इत्यादि भाष्यानें उत्तर-]=तर शास्त्र या लोकप्रसिद्ध, ब्रह्मामध्यें कल्पिलेल्या, रूपद्वयाचा प्रतिषेध्यत्वासाठीं परामर्श करितें. [-"असें जरी असलें तरी पंकप्रक्षालनन्याय कसा प्राप्त होणार नाहीं ?" अशी आशंका घेऊन 'निषेधाला फलवत्त्व असल्यामुळें तो न्याय प्राप्त होत नाहीं,' असें '**शुद्धब्रह्म०**' इत्यादि भाष्यानें सांगतात-]=आणि शुद्धब्रह्मस्वरूपाच्या प्रतिपादनासाठीं शास्त्र त्याचा परामर्श करितें. [-याप्रमाणें सांगितलेल्या निषेधाच्या निर्दोषत्वाचें निगमन करितात-]='**इति निरवद्यं**'-याप्रमाणें ब्रह्माच्या रूपद्वयालाच निषेध्यत्व आहे, हें म्हणणें निर्दोष आहे. [-" अहोपण, 'येथें-या विषयवाक्यांत दोन निषेध आहेत. त्यांना व्यर्थत्व प्राप्त होऊं नये, म्हणून सर्व निषेध्य आहे' असें वर-पृ. १७८-म्हटलें आहे." '**द्वौ च०**' इत्यादि भाष्यानें त्याचें निरसन-]

**भाष्यं—द्वौ चैतौ प्रतिषेधौ यथासंख्यन्यायेन द्वे अपि मूर्तामूर्ते प्रतिषेधतः। यद्वा पूर्वः प्रतिषेधो भूतराशिं प्रतिषेधति उत्तरो वासनाराशिम्। अथवा 'नेति नेति' इति वीप्सेयं इतीति यावत्किंचिदुत्प्रेक्ष्यते तत्सर्वं न भवतीत्यर्थः॥**

**भाष्यार्थ**—आणि हे दोन प्रतिषेध यथासंख्यन्यायानें-क्रमानें दोन्ही मूर्तामूर्तांचा प्रतिषेध करितात.[संभावित-संभवनीय असलेलें दुसरें पक्षान्तर सांगतात-] ='**यद्वा०**'किंवा पहिला प्रतिषेध भूतराशीचा प्रतिषेध करितो व दुसरा वासनाराशीचा [किंवा भावाभावविपयत्वानें निषेधद्वय विवक्षित आहे.-'**अथवा०**' इत्यादि भाष्यानें पक्षान्तर सांगतात-]=अथवा 'नेति नेति'-बृ. ३. ९. २६. सु.उ. ६९१.-**ही** वीप्सा-द्विरुक्ति आहे, असें समजावें. [-वीप्सापक्षीं '**इति यावत्०**' इत्यादि भाष्यानें वाक्यार्थ सांगतात-]=त्यामुळें वर सांगितलेल्या पक्षान्तरांहून यांत असा विशेष आहे-जें कांहीं कल्पना केलें जातें तें सर्व ब्रह्म नाहीं, असा त्याचा भावार्थ. [-त्या पूर्व पक्षान्तरांत निराकांक्ष वाक्यार्थ सिद्ध होत नाहीं, असें '**परिगणित०**' इत्यादि भाष्यानें सांगतात-]

**भाष्यं—परिगणितप्रतिषेधे हि क्रियमाणे यदि नैतद्ब्रह्म किमन्यद्ब्रह्म भवेदिति जिज्ञासा स्यात्। वीप्सायां तु सत्यां समस्तस्य विषयजातस्य प्रतिषेधादविषयः प्रत्यगात्मा ब्रह्मेति जिज्ञासा निवर्तते। तस्मात्प्रपंचमेव ब्रह्मणि कल्पितं प्रतिषेधति परिशिनष्टि ब्रह्मेति निर्णयः॥**

**भाष्यार्थ—कारण** वर ज्यांची परिगणना केली आहे त्यांचा प्रतिषेध केला जाऊं लागला असतां 'जर हें ब्रह्म नव्हे तर दुसरें ब्रह्म काय आहे,' अशी

जिज्ञासा होईल. [–पण वीप्सापक्षीं निराकांक्ष वाक्यार्थज्ञान होणें, हा विशेष '**वीप्सायां तु०**' या भाष्यानें सांगतात–]=पण वीप्सा मानिली असतां समस्त विषयजाताचा प्रतिषेध झाल्यामुळें अविषय प्रत्यगात्मा ब्रह्म आहे, असा बोध होतो व त्यामुळें जिज्ञासा निवृत्त होते. [–'**तस्मात्०**' इत्यादि भाष्यानें सूत्रावयवाच्या व्याख्यानाचा उपसंहार करितात–]=तस्मात् हें निषेधद्वय ब्रह्मामध्यें कल्पिलेल्या प्रपंचाचा प्रतिषेध करितें व ब्रह्माचा परिशेष करितें–अनिषेध्य ब्रह्माचा परिशेष सांगतें, असा याचा निर्णय आहे. [–आतां सूत्राचा पुढील दुसरा अवयव घेऊन त्याचें '**इतश्च०**' इत्यादि भाष्यानें व्याख्यान–]

**भाष्यं**—**इतश्चैष एव निर्णयः । यतस्ततः प्रतिषेधादभूयो ब्रह्म ब्रवीति 'अन्यत्परमस्ति' इति । अभावावसाने हि प्रतिषेधे क्रियमाणे किमन्यत्परमस्तीति ब्रूयात् । तत्रैषाक्षरयोजना–नेति नेतीति ब्रह्मादिश्य तमेवादेशं पुनर्निर्वक्ति । नेति नेतीत्यस्य कोऽर्थः । न ह्येतस्माद्ब्रह्मणो व्यतिरिक्तमस्तीत्यतो नेति नेतीत्युच्यते । न पुनः स्वयमेव नास्तीत्यर्थः । तच्च दर्शयति अन्यत्परमप्रतिषिद्धं ब्रह्मास्तीति ॥**

**भाष्यार्थ**—याहि कारणानें हाच निर्णय आहे. ज्याअर्थी 'ततः'–त्या प्रतिषेधाहून 'भूयः'–पुनः पृथक् 'त्याहून निराळें परब्रह्म आहे'–बृ. २. ३. ६–असें श्रुति सांगते, त्याअर्थी हाच निर्णय आहे. [–पण तेवढ्यानें निषेधाला अभावावसानत्व नाहीं, असें कसें होतें? '**अभावावसाने०**' इत्यादि भाष्यानें उत्तर–]=कारण प्रतिषेध जर अभावावसानच केला जात असता तर श्रुतीनें "दुसरें पर आहे असें काय सांगितलें असतें!" [–पण '**नेति नेति**' या प्रतिषेधाहून पर आहे, असें प्रतिपादन करणारें काय आहे? अशी आकांक्षा झाली असतां '**आदेशनिर्वचनवाक्यच**'–आदेशाचें निर्वचन करणारें वाक्यच त्याचें प्रतिपादक आहे, असें '**तत्र०**' इत्यादि भाष्यानें अक्षरयोजनेनें दाखवितात–]=त्यांत ही अशी अक्षरयोजना आहे–'नेति नेति' असा ब्रह्माचा आदेश–उपदेश करून श्रुति त्याच आदेशाचें पुनः निर्वचन करिते. [–'**नेति०**' इत्यादि भाष्यानें तो निर्वचनाचा प्रकारच आकांक्षापूर्वक सांगतात–]=' नेति नेति ' अशा या आदेशाचा अर्थ काय आहे? 'हि' –ज्याअर्थी आदिष्ट–उपदिष्ट अशा या ब्रह्माहून व्यतिरिक्त कांहीं नाहीं, ब्रह्मच पर आहे, त्याअर्थी ' नेति नेति ' असें म्हटलें जातें. पण तें स्वतःच नाहीं, अशा सर्वाभावबुद्धीनें तसें सांगितलें जात नाहीं, असा या निर्वचनाचा अर्थ आहे. [–अशा प्रकारचें हें निर्वचन अनिषिद्ध ब्रह्म सांगतें, असें '**तच्च०**' इत्यादि

भाष्यानें सांगतात–]=आणि तें निर्वचन दुसरें पर अप्रतिषिद्ध ब्रह्म आहे, असें दाखवितें. [–याप्रमाणें हें निर्वचनच अनिषिद्ध ब्रह्म सांगतें असें श्रुतियोजननें सांगितलें. आतां नामधेयच–नामच निषेधावशिष्ट ब्रह्म सांगतें, असें **'यदा पुनः०'** इत्यादि भाष्यानें दुसऱ्या प्रकारें श्रुतियोजना करून दाखवितात–]

**भाष्यं—यदा पुनरेवमक्षराणि योज्यन्ते न ह्येतस्मादिति न इति न इति न हि प्रपंचप्रतिषेधरूपादादेशनादन्यत्परमादेशनं ब्रह्मणोऽस्तीति तदा 'ततो ब्रवीति च भूयः' इत्येतन्नामधेयविषयं योजयितव्यम् । अथ नामधेयम्—'सत्यस्य सत्यमिति प्राणा वै सत्यं तेषामेष सत्यम्' इति हि ब्रवीतीति ॥**

**भाष्यार्थ—**पण जेव्हां 'याच्याहून अन्य नाहीं, म्हणून नेति नेति' अशी अक्षरांची योजना केली जाते म्ह० 'कारण या प्रपंचप्रतिषेधरूप आदेशनाहून दुसरें श्रेष्ठ आदेशन–ब्रह्माचा उपदेशप्रकार नाही,' अशी श्रुत्यक्षरयोजना केली जाते, **'तदा०'** –तेव्हां 'ततो ब्रवीति च भूयः' या सूत्रावयवाची नामधेयविषय योजना करावी, 'नामधेय' या अर्थी त्याची योजना करावी. [–"पण तें नामधेय काय आहे?" **'अथ०'** इत्यादि भाष्यानें उत्तर–]=आतां "सत्याचें सत्य, असें त्याचें नामधेय आहे. प्राणच सत्य आहे त्याचे हा आत्मा सत्य आहे"–बृ. २.१.२० सु. उ. ५८६–असें श्रुति त्याचें नांव सांगते. [येथील 'अथ'–आतां हा शब्द प्रकृत निषेधाच्या अभावान्तत्वाचा निषेध करण्यासाठीं आहे.–"अहोपण, तें नामधेय निषेधाला अभावपर्यवसायित्व असलें तरी त्याविषयी होऊ शकेल." **'तच्च०'** इत्यादि भाष्यानें याचें 'नाही' असें उत्तर–]

**भाष्यं—तच्च ब्रह्मावसाने प्रतिषेधे समंजसं भवति । आभावावसाने तु प्रतिषेधे किं सत्यस्य सत्यमित्युच्येत । तस्माद्ब्रह्मावसानोऽयं प्रतिषेधो नाभावावसानः, इत्यध्यवस्यामः ॥२२॥**

**भाष्यार्थ**–आणि तें नामधेय 'प्रतिषेध ब्रह्मावसान आहे' असें झाल्यासच–ब्रह्मामध्यें त्याचें पर्यवसान–समाप्ति होत असेल तरच उपपन्न होतें. पण याच्या उलटपक्षीं तो प्रतिषेध जर अभावावसान–अभावपर्यवसायी आहे असें मानिलें तर 'सत्याचें सत्य' असें काय सांगितलें जाईल! [–तसें सांगण्यास कांहींच उरतनाहीं, असा भावार्थ. –**'तस्मात्०'** इत्यादि भाष्यानें दोन प्रकारच्या सूत्रावयवव्याख्येचा उपसंहार–]= म्हणून हा प्रतिषेध ब्रह्मावसान आहे, अभावावसान नाहीं, असा आम्ही निश्चय करितों. २२. [–याप्रमाणें अनिषेध्यत्वानें वस्तुसत्य ब्रह्म सांगून आतां अग्राह्यत्वानें त्याच्या असत्त्वाची–अभावाची आशंका घेऊन 'तदव्यक्तं०' इत्यादि सूत्रानें तिचें निरसन–]

## सूत्रं--तदव्यक्तमाह हि ॥ २३

**सूत्रार्थ**--तें ब्रह्म अव्यक्त आहे. कारण श्रुति तसे सांगते. २३सु. ब्र.२९०.- [-सूत्रानें व्यावर्त्य असलेला अंश 'यत्तत्प्रतिषिद्धात्०' इत्यादि भाष्यानें सांगतात-]

**भाष्यं**--यत्तत्प्रतिषिद्धात्प्रपंचजाताद् अन्यत्परं ब्रह्म तदस्ति चेत् कस्मान्न गृह्यत इति । उच्यते--तदव्यक्तमनिंद्रियग्राह्यं सर्वदृश्यसाक्षित्वात् ॥

**भाष्यार्थ**-'ते जें प्रतिषेध केलेल्या प्रपंचजाताहून-समस्त प्रपंचाहून अन्यत् पर ब्रह्म आहे, तें जर वस्तुतः आहे तर त्याचें ग्रहण कां केलें जात नाहीं !' [-पण या आक्षेपानें ' आत्म्याचें ग्रहण केलें जात असल्यास त्याहून अभिन्न-भिन्न नसलेलें ब्रह्महि ग्राह्य आहे, असें येथें प्राप्त केलें जातें कीं ब्रह्माला जर ग्राह्यत्व असेल तर तें घटाप्रमाणें प्रत्यक्ष प्रमाणानें ग्राह्य होईल, असें सिद्ध केलें जातें ' असा विकल्प करून ' त्यांतील पहिला पक्ष संभवत नाहीं. कारण ब्रह्म 'प्रत्यगभिन्न'-प्रत्यगात्म्याहून अभिन्न जरी असलें तरी अविद्येनें आवृत-आच्छादित झालेलें असल्यामुळें प्रत्यगात्म्याचे ग्रहण-ज्ञान जरी होत असलें तरी त्याचें अग्रहण सिद्ध होतें, असें सांगतात-]='**उच्यते**'-तें अविद्येनें आवृत झालेलें असल्यामुळें त्याचें ग्रहण केलें जात नाहीं, असें याचें समाधान सांगितलें जातें. [-विकल्पांतील दुसरा पक्षहि संभवत नाहीं, असें सूत्राक्षरयोजनेनें सांगतात -]='**तत् अव्यक्तं०**' -तें अव्यक्त म्ह० इंद्रियांनी ग्राह्य नाहीं, कारण त्याला सर्व दृश्याचें साक्षित्व आहे. [-"पण ब्रह्माचें इंद्रियाग्राह्यत्व-इंद्रियांनीं अग्राह्यत्व कसें ? " '**आह हि एवं०**' इत्यादि भाष्यानें उत्तर-]

**भाष्यं**--आह ह्येवं श्रुतिः-'न चक्षुषा गृह्यते नापि वाचा नान्यैर्देवैस्तपसा कर्मणा वा' 'स एष नेति नेत्यात्माऽगृह्यो न हि गृह्यते' 'यत्तदद्रेश्यमग्राह्यम्' 'यदा ह्येवैष एतस्मिन्नदृश्येऽनात्म्येऽनिरुक्तेऽनिलयने' इत्याद्या । स्मृतिरपि-- "अव्यक्तोऽयमचिंत्योऽयमविकार्योऽयमुच्यते" इत्याद्या ॥ २३ ॥

**भाष्यार्थ**--कारण श्रुति असें सांगते-" ते चक्षुरिंद्रियानें ग्रहण केलें जात नाहीं, वाक्-इंद्रियानेंहि बोललें जात नाहीं, इतर इंद्रियांनींहि त्याचें ज्ञान होत नाहीं. तपानें किंवा कर्मानेंहि तें ग्राह्य नाहीं."-मुं. ३. १. ८. सु. उ. पृ. १५७ -"तो हा ' नेति नेति ' अशा सर्वप्रपंचप्रतिषेधाचा अवधिभूत असलेला आत्मा अगृह्य-अनिंद्रियविषय आहे. तो इंद्रियांनीं ग्रहण केला जात नाहीं."-बृ.३.९.२६. सु. उ. ६५१-" तें जें अद्दश्य, अग्राह्य "-मुं. १. १. ६. सु. उ. पृ.१३४- "कारण जेव्हां हा साधक या अदृश्य, अनात्म्य, अनिरुक्त, अनिलयन

ब्रह्मामध्यें अभय प्रतिष्ठेस प्राप्त होतो "–तै. ७. १. सु. उ. २२६–इत्यादि श्रुति त्याचें अनिंद्रियग्राह्यत्व सांगते हें प्रसिद्ध आहे.[–'आह हि' या सूत्रावयवाचें श्रुत्युक्तिपरत्वानें व्याख्यान करून 'स्मृतिरपि०' इत्यादि भाष्यानें दुसऱ्या प्रकारें त्याचें व्याख्यान करितात–]–"हा अव्यक्त, हा अचिंत्य व हा अविकार्य म्हटला जातो" –गी. भा.२.२५. पृ.१२० सु. गी. ३०–इत्यादि स्मृतिहि त्याचें इंद्रियविषयराहित्य सांगते. २३. [–"आत्माच ब्रह्म असून तें जर अविद्यावृत असेल तर त्याचें केव्हांच ग्रहण केलें जाणार नाहीं," अशी आशंका घेऊन 'अपि च संराधने०' या सूत्रानें समाधान करितात—]

## सूत्रं—अपि च संराधने प्रत्यक्षानुमानाभ्याम् ॥२४

**सूत्रार्थ**—अशा अविद्यावृत असलेल्याहि आत्म्याला योगी संराधनसमयीं–आत्म्यामध्यें चित्तसमाधानकालीं पाहतात 'प्रत्यक्ष'–श्रुति व 'अनुमान'–स्मृति यां प्रमाणांवरून त्याच्या या दर्शनाचा अवबोध–ज्ञान होतें. २४.–सु. ब्र. २९०–[–'अपि च०' इत्यादि भाष्यानें सूत्राचें व्याख्यान–]

**भाष्यं**—अपि च एनमात्मानं निरस्तसमस्तप्रपंचमव्यक्तं संराधनकाले पश्यन्ति योगिनः । संराधनं च भक्तिध्यानप्रणिधानाद्यनुष्ठानम् । कथं पुनरवगम्यते संराधनकाले पश्यन्तीति । प्रत्यक्षानुमानाभ्यां । श्रुतिस्मृतिभ्यामित्यर्थः ॥

**भाष्यार्थ**—आणि या समस्त प्रपंचशून्य अव्यक्त आत्म्याला योगी संराधनसमयीं पाहतात. [–या आत्म्याला सदाच ग्राह्यत्व किंवा अग्राह्यत्व नाहीं. कारण समाधि-अवस्थेंत तो प्रत्यगात्मरूपानें प्रतीत होतो, असा भावार्थ. ]='**संराधनं च०**'–आणि संराधन म्ह० भक्ति, ध्यान व प्रणिधान–'प्र'–प्रकर्षणानें–आधिक्यानें 'निधान'–आपल्या मनांत प्रत्यगात्म्याचें निधान–स्थापन, हेंच भक्ति-ध्यान-प्रणिधानादि, त्याचें अनुष्ठान. ['आदि-'पदानें ध्यान-भक्ति-प्रणिधानपूर्वक जप-नमस्कारादिकांचें ग्रहण करावें.–त्याविषयीं प्रश्नपूर्वक प्रमाण सांगतात–]='**कथं पुनः०**'–पण संराधनसमयीं योगी त्याला पाहतात, हें कसें अवगत होतें ? 'प्रत्यक्षानुमानाभ्यां'–श्रुति व स्मृति या दोन प्रमाणांवरून तें अवगत होतें, असा भावार्थ. [–'तथा हि०' इत्यादि भाष्यानें श्रुतिप्रमाणांचें उदाहरण—]

**भाष्यं—तथा हि श्रुतिः–'पराँचि खानि व्यतृणत्स्वयंभूस्तस्मात्पराङ् पश्यति नान्तरात्मन् । कश्चिद्धीरः प्रत्यगात्मानमैक्षदावृत्तचक्षुरमृतत्वमिच्छन्' इति । 'ज्ञानप्रसादेन विशुद्धसत्त्वस्ततस्तु तं पश्यते निष्कलं ध्यायमानः' इति चैवमाद्या॥**

**भाष्यार्थ**—त्याविषयीं '**स्वयंभूः**'–" स्रष्टा परमात्मा '**खानि**'–छिद्रांनीं उपलक्षित होणाऱ्या इंद्रियांना '**परांचि**'–अनात्मविषय–बहिर्मुख '**व्यतृणत्**'–मारिता झाला–त्यांची हिंसा करिता झाला. [ असत्-अर्थविषयत्वानें त्यांचें समर्पण, हीच त्यांची हिंसा आहे. तो त्यांची तशीच हिंसा करिता झाला, याविषयीं श्रुति गमक–लिंग सांगते–]=' **तस्मात्०**'–त्यामुळें जीव इंद्रियांनीं बाह्य अर्थच पाहतो. अन्तरात्म्याला पहात नाहीं. [–" जर जीव इंद्रियांनीं बाह्य अर्थाला पाहतो,अन्तरात्म्याला पहात नाहीं तर लोकांना त्याचें ज्ञान कसें होतें ? " अशी आशंका घेऊन ' साधनचतुष्टयसंपन्न पुरुषाला समाधिकालीं शुद्ध मनामध्यें प्रत्यग्रूपानें त्याचें दर्शन होतें,' असें श्रुति सांगते–]=' **कश्चित् धीरः०**'–कोणी एखादा अमृतत्वाची इच्छा करणारा धीर–धीमान् विवेकी ज्यानें आपल्या इंद्रियांना विषयांपासून परतविलें आहे, अन्तर्मुख केलें आहे,असा होत्साता प्रत्यगात्म्याला पाहतो " –का. २. १. १. सु. उ. ६२–अशी श्रुति आहे आणि तशीच ' **ततः**'–" त्या नित्य कर्मादिकांच्या अनुष्ठानामुळें ' **विशुद्धसत्त्वः** '–ज्याची बुद्धि सर्वप्रकारें शुद्ध झाली आहे असा ' **ज्ञानप्रसादेन** '–ज्ञानाच्या म्ह० ज्ञायते अनेन–ज्याच्या योगानें जाणलें जातें तें ज्ञान–अन्तःकरण त्याच्या प्रसादानें–निर्मलतेनें ' **तं निष्कलं** '–त्या निरवयव निष्प्रपंच प्रत्यगात्म्याचें '**ध्यायमानः** '–ध्यान करणारा असा होत्साता त्याला अविषयत्वानें साक्षात् जाणतो "–मुं. ३. १. ८. सु. उ. पृ. १५७–इत्यादि श्रुति आहे. [–'**स्मृतिरपि०** ' इत्यादि भाष्यानें स्मृतिप्रमाण—]

**भाष्यं—स्मृतिरपि–" यं विनिद्रा जितश्वासाः संतुष्टाः संयतेन्द्रियाः । ज्योतिः पश्यन्ति युंजानास्तस्मै योगात्मने नमः ॥ योगिनस्तं प्रपश्यन्ति भगवन्तं सनातनम् "** इति **चैवमाद्याः ॥ २४ ॥ ननु संराध्यसंराधकभावाभ्युपगमात्परेतरात्मनोः अन्यत्वं स्यादिति । नेत्युच्यते—**

**भाष्यार्थ**–' **विनिद्राः** '–"ज्यांच्यापासून निद्रा विगत–विशेषेंकरून गेलेली आहे ते विनिद्र, [ यानें स्वापापासून आत्म्याचा विवेक केला आहे.]='**जितश्वासाः**'–ज्यांनीं श्वासाला जिकलें आहे, [ ही प्राणायामनिष्ठत्वाची उक्ति आहे. ]=' **संतुष्टाः**'–मनोव्याकुलतारहित [ या मनोव्याकुलताव्यावृत्तीनें स्वप्नापासून विवेक केला आहे. ] ='**संयतेन्द्रियाः** '–ज्यांचीं इन्द्रियें चांगल्या प्रकारें नियमित केलेलीं आहेत [यानें जागरितापासून भेद सांगितला आहे.]=असे योगाभ्यासी ज्या ज्योतीला पाहतात, त्या योगात्म्याला नमस्कार असो. योगी त्या सनातन भगवानाला पाहतात. " इत्यादि प्रकारांनीं स्मृतिहि त्याचें दर्शन सांगते. [ योग्याचीं पूर्वोक्त विनिद्रात्वादि

विशेषणें यम-नियमादि सर्व अंगांच्या संग्रहार्थ आहेत. योगात्मत्व म्हणजे योगजन्य ज्ञानाचे विषयत्व. ] २४. [–'ननु०' इत्यादि भाष्यानें पुढील सूत्रानें व्यावर्त्य शंका–]=" आणखी, संराध्य–भक्ति-ध्यानादि करण्यास योग्य परमात्मा व संराधक–संराधना करणारा भक्त, असा भाव स्वीकारल्यामुळें पर आत्मा व अपर आत्मा यांचें अन्योन्य–भेद प्राप्त होईल," असें यावर कोणी म्हणेल [–या व्यावर्त्याच्या व्यावर्तकसूत्राचें अवतरण देतात–]='इति न०'–म्हणून 'नाहीं'–असा भेद प्राप्त होत नाहीं, असें 'प्रकाशादिवत्०' इत्यादि सूत्रानें सांगितलें जातें–

**सूत्रं—प्रकाशादिवच्चावैशेष्यं प्रकाशश्च कर्मण्यभ्यासात् ॥ २५**

**सूत्रार्थ**—ज्याप्रमाणे प्रकाशादिक उपाधींमध्यें भेद पावतात, स्वरूपतः भेद पावत नाहींत, त्याप्रमाणें 'प्रकाशः'–आत्माहि 'कर्मणि'–ध्यानादि कर्मरूप उपाधींत भेद पावतो. स्वतः त्याचें अवैशेष्यच–एकरसत्वच आहे. कारण 'तत्त्वमसि०' इत्यादि अभेदश्रुतीचा अभ्यास–आवृत्ति केलेली आहे. २५. [–सूत्रांतील 'प्रकाशादिवत्-च' या भागाचे 'यथा०' इत्यादि भाष्यानें व्याख्यान–]

**भाष्यं—यथा प्रकाशाकाशसवितृप्रभृतयोऽङ्गुलिकरकोदकप्रभृतिषु कर्मसूपाधिभूतेषु सविशेषा इवावभासन्ते । न च स्वाभाविकीमविशेषात्मतां जहति । एवमुपाधिनिमित्त एवायमात्मभेदः स्वतस्त्वैकात्म्यमेव । तथा हि वेदान्तेषु अभ्यासेन असकृज्जीवप्राज्ञयोरभेदः प्रतिपाद्यते ॥ २५ ॥**

**भाष्यार्थ**—ज्याप्रमाणें प्रकाश, आकाश, सूर्य इत्यादि पदार्थ अंगुलि–बोटें, कमंडलु, जल इत्यादि उपाधिभूत कर्मांमध्यें जणुकाय सविशेष असल्याप्रमाणें भासतात, तथापि ते प्रकाशादिक आपली स्वाभाविक अविशेषात्मता–अविशेषत्व–एकरूपत्व सोडीत नाहींत, [–यद्यपि दृष्टान्तावरून सूत्रांत प्रकाशशब्दित 'प्रकाश-' शब्दानें विवक्षित असलेला आत्मा अज्ञान व अज्ञानकार्य या 'कर्मणि'–कर्मांत –उपाधींत सविशेष होतो, तथापि वस्तुतः त्याला अवैशेष्य–ऐकरस्यच आहे, असा दार्ष्टान्तिक 'एवं०' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=त्याप्रमाणें–या दृष्टान्ताप्रमाणें हा उपाधिनिमित्तच आत्मभेद आहे. पण स्वतः–स्वरूपतः ऐकात्म्यच आहे. [–'अभ्यासात्' या सूत्रावयवाचें 'तथा हि०' इत्यादि भाष्यानें व्याख्यान–] =कारण वेदान्तांत तसा अभ्यासानें–आवृत्तीनें–वारंवार जीव व प्राज्ञ यांचा अभेद प्रतिपादिला जातो. २५. [–जीवाची ब्रह्मत्वप्राप्तिश्रुति असल्यामुळेंहि त्यांचें वास्तविक ऐक्य व औपाधिक नानात्व आहे, असें 'अतोऽनन्तेन०' इत्यादि सांगतात–]

## सूत्रं--अतोऽनन्तेन तथा हि लिंगम् ॥ २६

**सूत्रार्थ**—‘ अत: ’–अभेद स्वाभाविक व भेद औपाधिक असल्यामुळें जीव विद्येनें अविद्येचें निरसन करून ‘ अनन्ताशीं ’–परमात्म्याशीं ऐक्य पावतो. कारण तसें ‘जो ब्रह्माला जाणतो तो ब्रह्मच होतो’ असें लिंग आहे. २६.–सु.ब्र. २९१. [–‘अतोऽनन्तेन’ या सूत्रावयवाचें ‘अतश्च०’ इत्यादि भाष्यानें व्याख्यान–]

**भाष्यं**--अतश्च स्वाभाविकत्वादभेदस्य आविद्याकृतत्वाच्च भेदस्य विद्यया अविद्यां विधूय जीव: परेणानन्तेन प्राज्ञेनात्मनैकतां गच्छति। तथाहि लिंगम्–‘स यो ह वै तत्परमं ब्रह्म वेद ब्रह्मैव भवति’ ‘ब्रह्मैव सन्ब्रह्माप्येति’ इत्यादि ॥२६॥

**भाष्यार्थ**—आणि ‘अत:’–अभेदाला स्वाभाविकत्व व भेदाला अविद्याकृतत्व –अविद्याकल्पितत्व असल्यामुळे विद्येनें अविद्येचा नाश करून जीव पर ‘ अनन्त’ –प्राज्ञ आत्म्याशीं एकत्वास प्राप्त होतो. [–सूत्रावयवाचें व्याख्यान करणारे भाष्यकार ‘ **तथा हि०** ’ इत्यादि भाष्यानें अभेदाच्या स्वाभाविकत्वाविषयीं हेतु सांगतात–]=‘**तथाहि लिंगं०**’–कारण तसें “ तो जो कोणी या पर ब्रह्माला जाणतो तो ब्रह्मच होतो.”–मुं. ३.२.९. सु. उ. १६४.–“ तो ब्रह्मच होऊन ब्रह्माला प्राप्त होतो.”–बृ. ४.४.६. सु. उ. ६९२–इत्यादि लिंग आहे. [ येथील ‘आदि’ पदानें ‘ब्रह्मज्ञ पर ब्रह्माला प्राप्त होतो’–तै.२.१–इत्यादि लिंगांचें ग्रहण करावें.]२६. [–जीव व ब्रह्म यांचें नित्य ऐक्य सांगून ‘ उभयव्यपदेशात्० ’–इत्यादि सूत्रानें भेदाभेदवादाला उत्थापित करितात–]

## सूत्रं--उभयव्यपदेशात्त्वहिकुण्डलवत् ॥ २७

**सूत्रार्थ**--ध्यातृ-ध्येयभावादिकांनीं ‘ उभयव्यपदेश ’–भेदाचा व अभेदाचा निर्देश केलेला असल्यामुळें जीवेश्वरांचा भेदाभेद सिद्ध होतो, असा आक्षेप येतो. ‘ तु ’–पण ‘ अहिकुण्डलाप्रमाणें ’ त्यांचा तो भेद आहे. सर्पाच्या विशिष्ट आकारालाच कुंडल–वेटोळें म्हणतात. त्याचा सर्परूपानें अभेद व कुंडलरूपानें भेद जसा सांगितला जातो तसाच हा जीवेश्वरांचा भेदाभेदव्यपदेश होतो. २७. सु.ब्र.२९१–[–‘तस्मिन्०’–इत्यादि भाष्यानें पूर्वोत्तर सूत्रद्वयाची संगति सांगतात–]

**भाष्यं**—तस्मिन्नेव संराध्यसंराधकभावे मतान्तरमुपन्यस्यति स्वमतविशुद्धये। क्वचिज्जीवप्राज्ञयोर्भेदो व्यपदिश्यते–‘ ततस्तु तं पश्यतेनिष्कलं ध्यायमान: ’ इति ध्यातृध्यातव्यत्वेन द्रष्टृद्रष्टव्यत्वेन च। ‘परात्परं पुरुषमुपैति दिव्यम्’ इति गंतृगंतव्यत्वेन। ‘य: सर्वाणि भूतान्यंतरो यमयति’ इति नियंतृनियंतव्यत्वेन च॥

**भाष्यार्थ**—त्याच संराध्य-संराधक–उपास्य-उपासकभावाविषयीं, स्वमताच्या अत्यंत शुद्धीसाठीं–निर्दोषत्वासाठीं, मतान्तराचा उपन्यास करितात–[' स्वमतविशुद्धये '–स्वमताच्या विशुद्धीसाठीं, या पदानें मतांतराच्या उपन्यासाचें फल सांगितलें आहे.–' तर मग भेदव्यपदेशामुळें जीवेश्वरांना भिन्नत्वच असूं दे ' त्याविषयीं आचार्य '**क्वचित्०**' इत्यादि भाष्यानें म्हणतात–]=कांहीं श्रुतिप्रदेशांत जीव व प्राज्ञ–ईश्वर यांच्या भेदाचा व्यपदेश केला जातो. जसें–" पण त्यामुळें निरवयव आत्म्याचें ध्यान करणारा तो साधक त्याला पाहतो "–पृ. १९१–असा ध्यातृ-ध्येयत्वानें व द्रष्टृ-दृश्यत्वानें, "पराहून पर दिव्य पुरुषास प्राप्त होतो"–मुं.३.२.८–—असा गन्तृ-गंतव्यत्वानें, व " जो अन्तर आत्मा सर्व भूतांचें नियमन करितो " –बृ. ३. ७. १५. सु. उ. ६३१–असा नियन्तृ-नियम्यत्वानें भेदनिर्देश केला जातो. [ ध्यातृ–ध्यान करणारा, द्रष्टृ–पाहणारा, गन्तृ–गमन करणारा व नियन्तृ–नियमन करणारा आणि ध्येय–ध्यानाचा विषय. 'दृश्य'–दर्शनाचा विषय, 'गन्तव्य' –गम्य–गमनाचा विषय व 'नियम्य'–नियमनाचा विषय, असा भावार्थ.–'**क्वचित्तु०**' इत्यादि भाष्यानें अभेदव्यपदेशाचीं उदाहरणें—]

**भाष्यं—क्वचित्तु तयोरेवाभेदो व्यपदिश्यते ' तत्त्वमसि ' ' अहं ब्रह्मास्मि ' ' एष त आत्मा सर्वान्तरः ' ' एष त आत्मान्तर्याम्यमृतः ' इति ॥**

**भाष्यार्थ**—पण कांहीं श्रुतिप्रदेशांत त्यांच्याच अभेदाचा निर्देश केला जातो. जसें–' तें तूं आहेस' 'मी ब्रह्म आहें'–सु.उ.४३३,५५३.–'हा तुझा आत्मा सर्वान्तर आहे '–बृ. ३. ४. २. सु.उ. ६२२–" हा तुझा आत्मा अन्तर्यामी अमृत आहे." –बृ. ३. ७. ३. सु. उ. ६२९–[–" पण त्या दोहोंतील एकाचा निर्देश केलेला असल्यामुळें त्याहून अन्याच्या त्याज्यत्वाचा प्रसंग येतो " अशी आशंका घेऊन '**तत्रैवं०**' इत्यादि भाष्यानें आचार्य म्हणतात—]

**भाष्यं—तत्रैवमुभयव्यपदेशे सति यद्यभेद एवैकान्ततो गृह्यते । भेदव्यपदेशो निरालंबन एव स्यात् । अत उभयव्यपदेशदर्शनाद् अहिकुंडलवदत्र तत्त्वं भवितुमर्हति । यथाहिरित्यभेदः कुंडलाभोगप्रांशुत्वादीनीति च भेदः । एवमिहापीति२७**

**भाष्यार्थ**—श्रुतींत याप्रमाणें उभयनिर्देश असतांना जर नियमानें अभेदाचेंच ग्रहण केलें जाईल तर भेदव्यपदेश निराधारच होईल ! [ त्याचप्रमाणें भेदाचें नियमानें ग्रहण केल्यास अभेदोक्ति निराधार होईल, असेंहि येथें जाणावें.–पण त्यांतील एकाहि निर्देशाला निरालंबनत्व संभवत नाहीं, असें झालें असतां त्याचें फलित ' **अतः०** ' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=यास्तव उभयव्यपदेशांची उप-

लब्धि होत असल्यामुळें 'अहिकुंडलाप्रमाणें' ब्रह्मामध्यें तत्त्व असणें युक्त आहे. [–'अहिकुंडलवत्' असें जें म्हटलें आहे, त्याचेंच 'यथा०' इत्यादि भाष्यानें विवरण-]=ज्याप्रमाणें 'हा सर्प' असा अभेद 'व हें सापाचें कुंडल–वेटोळें, हें शरीर, ही उंची इत्यादि भेद आहे, तसेंच दार्ष्टान्तिक-जीवेश्वरांमध्येंहि समजावें. 'इति'–असें एकदेशिमत आहे. २७. [–अहि-कुंडलन्यायानें परमात्म्याचा जीव हा आकारभूत–आकारविशेष आहे, असें दाखविलें. आतां तो ईश्वर-एकदेशभूत आहे, असें प्रकारान्तर 'प्रकाशाश्रयवत्०' इत्यादि सूत्रानें सांगतात–]

## सूत्रं––प्रकाशाश्रयवद्वा तेजस्त्वात् ॥२८

**सूत्रार्थ**––किंवा प्रकाश व त्याचा आश्रय यांप्रमाणें हा भेदाभेदव्यपदेश जाणावा. कारण प्रकाश व त्याचा आश्रय यांना एकसारखेंच तेजस्त्व आहे. २८.–सु. ब्र. २९१. [–'अथवा०' इत्यादि भाष्यानें सूत्राचें व्याख्यान–]

**भाष्यं––अथवा प्रकाशाश्रयवदेतत्प्रतिपत्तव्यम् । यथा प्रकाशः सावित्रस्तदाश्रयश्च सविता नात्यंतभिन्नौ उभयोरपि तेजस्त्वाविशेषात् । अथ च भेदव्यपदेशभाजौ भवतः । एवमिहापीति ॥ २८ ॥**

**भाष्यार्थ**––किंवा प्रकाश व आश्रय यांप्रमाणें हें ब्रह्मात्मतत्त्व समजावें. [–'यथा०' इत्यादि भाष्यानें दृष्टान्ताचें व्याख्यान–]=जसा सूर्याचा प्रकाश व त्याचा आश्रय सविता, हे दोन अत्यंत भिन्न पदार्थ नाहींत, कारण त्या दोघांच्याहि तेजस्त्वाचा अविशेष आहे. दोघांनाहि एकसारखेंच तेजस्त्व आहे, [–"तर मग त्यांचा अभेदच असूं दे" याचें 'नाहीं' असें उत्तर 'अथ च०' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=पण ते–प्रकाश व सूर्य भेदानें निर्देश करण्यास योग्य होतात–त्यांचा भेदनिर्देश संभवतो. तसेंच या ब्रह्मात्म्यामध्येंहि समजावें. [ प्रकाश व सूर्य यांच्या भेदनिर्देशाप्रमाणें जीव व ब्रह्म यांचा भेदनिर्देश समजावा. ]='इति'–असें याविषयीं एकदेशिमत आहे. [या 'इति-'शब्दानें भेदाभेदमताचा उपसंहार केला आहे. ]२८. [–'पूर्ववद्वा' या सूत्रानें स्वसिद्धान्त सांगतात–]

## सूत्रं––पूर्ववद्वा ॥ २९

**सूत्रार्थ**––पण पूर्वी–पृ. १९२–सांगितल्याप्रमाणें भेद काल्पनिक व अभेद वास्तविक आहे, हाच सिद्धान्त समजावा. २९.–सू. ब्र. २९२. [–'यथा०' इत्यादि भाष्यानें सूत्राचें व्याख्यान–]

**भाष्यं––यथा वा पूर्वमुपन्यस्तं 'प्रकाशादिवच्चावैशेष्यं' इति । तथैवैतद्भवितुमर्हति । तथा हि अविद्याकृतत्वाद्बंधस्य विद्यया मोक्ष उपपद्यते । यदि**

**पुनः परमार्थत एव बद्धः कश्चिदात्मा अहिकुंडलन्यायेन परस्यात्मनः संस्थानभूतः प्रकाशाश्रयन्यायेन चैकदेशभूतोऽभ्युपगम्येत । ततः पारमार्थिकस्य बंधस्य तिरस्कर्तुमशक्यत्वान्मोक्षशास्त्रवैयर्थ्यं प्रसज्येत ॥**

**भाष्यार्थ**—किंवा पूर्वी 'प्रकाशादिकांप्रमाणें उपाधींत भेद आहे, वस्तुतः अभेदच' असें ज्याप्रमाणें सांगितलें आहे, तसेंच हें असणें युक्त आहे. कारण तसेंच मानिल्यानें बंधाला अविद्याकृतत्व असल्यामुळें विद्येनें मोक्ष उपपन्न होतो. '**यदि०**'–पण जर कोणी परमार्थतःच–वस्तुतःच बद्ध आत्मा अहि-कुण्डलन्यायानें परमात्म्याचा संस्थानभूत–आकारविशेषरूप आणि प्रकाश-आश्रयन्यायानें तदेकदेशभूत आहे, असें मानिलें जाईल, 'ततः०'–तर पारमार्थिक–सत्य बंधाचा तिरस्कार–अभाव–उच्छेद करणें अशक्य असल्यामुळें मोक्षशास्त्राला व्यर्थत्व प्राप्त होईल. [–'**न च०**' इत्यादि भाष्यानें दोहोंचें अप्रतिपाद्यत्व सांगतात–]

**भाष्यं**–**न चात्र उभावपि भेदाभेदौ श्रुतिस्तुल्यवद्व्यपदिशति । अभेदमेव हि प्रतिपाद्यत्वेन निर्दिशति । भेदं तु पूर्वप्रसिद्धमेव अनुवदति अर्थान्तरविवक्षया । तस्मात्प्रकाशादिवच्चावैशेष्यं इत्येष एव सिद्धान्तः ॥ २९ ॥**

**भाष्यार्थ**—श्रुति या ब्रह्मात्म्यामध्यें भेद व अभेद या दोहोंचाहि एकसारखाच–ते दोन्ही तुल्य–समान असल्याप्रमाणें व्यपदेश करीत नाहीं. [–"तर मग त्यांतील एका भेदालाच श्रुतिप्रतिपाद्यत्व असू दे!" असें म्हणाल तर तसें नाहीं. कारण प्रसिद्ध भेदाच्या अनुवादानें अप्रसिद्ध अभेदाला प्रतिपाद्यत्व आहे, असें '**अभेदं०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=कारण ती अभेदाचाच प्रतिपाद्यत्वानें निर्देश करिते. पण पूर्वींच–अविद्यावस्थेंतच प्रसिद्ध असलेल्या भेदाचा अन्य अर्थाच्या विवक्षेनें अनुवाद करिते. [–याप्रमाणें परमताचा असंभव आहे, असें झालें असतां स्वमताचा उपसंहार '**तस्मात्०**' इत्यादि भाष्यानें करितात–]=तस्मात् 'प्रकाशादिकांप्रमाणें अवैशेष्य'–पृ. १९२–असा हाच सिद्धान्त आहे. २९. [–'**प्रतिषेधाच्च**' या सूत्रानें स्वमतसंभवाविषयीं हेत्वन्तर सांगतात–]

## सूत्रं—प्रतिषेधाच्च ॥ ३० ॥ ( ६ )

**सूत्रार्थ**—आणि शास्त्रानें प्रपंचाचा प्रतिषेध केलेला असल्यामुळें ब्रह्म अद्वितीय आहे, हा सिद्धान्त होय. ३०. ( ६ )–सु. ब्र. २९२. [ '**इतश्च०**' इत्यादि भाष्यानें सूत्रांतील 'च-'काराचा अर्थ–]

**भाष्यं—इतश्चैष एव सिद्धान्तः । यत्कारणं परस्मादात्मनोऽन्यं चेतनं प्रतिषेधति शास्त्रम् 'नान्योऽतोऽस्ति द्रष्टा' इत्येवमादि । 'अथात आदेशो नेति**

**नेति ' 'तदेतद्ब्रह्मापूर्वमनपरमनंतरमबाह्यम्' इति च ब्रह्मव्यतिरिक्तप्रपंचनिराकरणाद्ब्रह्ममात्रपरिशेषाच्च एष एव सिद्धान्त इति गम्यते ॥३०॥ ( ६ )**

**भाष्यार्थ**—आणि याहि कारणानें हाच सिद्धान्त आहे. [–'इतः-'शब्दाच्या अर्थाचेंच विवरण करणारे भाष्यकार प्रथम चेतनभेदाच्या निषेधाचें उदाहरण देतात-] =कारण कीं 'याहून अन्य द्रष्टा नाहीं, याहून अन्य श्रोता नाहीं,'–बृ. ३.७.२३.– इत्यादि प्रकारचें हें शास्त्र परमात्म्याहून अन्य चेतनाचा निषेध करितें. [–**'अथ॰'** इत्यादि वाक्यानें अचेतनभेदाचा निषेध दाखवितात–]=व "आतां म्हणून ' नेति नेति ' असा आदेश–ब्रह्माचा उपदेश "–पृ. १७६–" तें हें ब्रह्म अपूर्व–कारणरहित, अनपर–कार्यरहित, अनन्तर–अखंड, अबाह्य "–पृ.१६२–असें हें शास्त्र अचेतनभेदाचा–दुसऱ्या अचेतनाचा निषेध करितें. [–**' ब्रह्मव्यतिरिक्त॰ '** इत्यादि भाष्यानें उक्त निषेधद्वयरूप शास्त्राच्या तात्पर्याचा संग्रह करितात–] =ब्रह्माहून व्यतिरिक्त–पृथक् प्रपंचाचें असें निराकरण केलेलें असल्यामुळें व केवल ब्रह्मच अवशिष्ट असल्यामुळें–केवल ब्रह्माचाच परिशेष केलेला असल्यामुळें हाच सिद्धान्त आहे, असें अवगत होतें. [ तस्मात् याप्रमाणें निषेधवाक्याच्या अर्थाच्या आलोचनानें–विचारानें निष्प्रपंच ब्रह्म वाक्यार्थाच्या अन्वयास योग्य असें तत्पदलक्ष्य आहे, हें सिद्ध झालें.–सु. ब्र. २९२.९३ पहा–] ३० ( ६ ).

( ७ **पराधिकरण**. सू. ३१-३७. )

–' नेति नेति ' या प्रतिषेधानें ब्रह्मातिरिक्त सर्व निषेध्य आहे, असें जें सांगितलें आहे तें अयुक्त आहे. कारण ' सेतु ' ' उन्मान ' इत्यादि व्यपदेशांवरून ब्रह्मातिरिक्त वस्तूचें अस्तित्व अवगत होतें 'द्युभ्वाद्यधिकरणांत'–ब्र.भा. १. ३. १. पृ. ४७०–सेतुव्यपदेशाचा निर्णय जरी केला आहे तरी भेदव्यपदेशाची गति न जाणणारा पूर्ववादी **' परमतः॰ '** इत्यादि सूत्रानें शंका घेतो–

## सूत्रं—परमतः सेतून्मानसंबंधभेदव्यपदेशेभ्यः ॥ ३१

**सूत्रार्थ**—' अतः '–ब्रह्माहून ' परं '–भिन्न वस्तु आहे. ' सेतु, उन्मान, संबंध व भेद यांच्या व्यपदेशांमुळें ३१.–सु. ब्र.१९४. [–**' यदेतत्॰ '** इत्यादि भाष्यानें विषयोक्तिपूर्वक सबीज संशय सांगतात–]

**भाष्यं—यदेतन्निरस्तसमस्तप्रपंचं ब्रह्म निर्धारितं । अस्मात्परमन्यत्तत्त्वमस्ति नास्तीति श्रुतिविप्रतिपत्तेः संशयः। कानिचिद्धि वाक्यान्यापातेनैव प्रतिभासमानानि ब्रह्मणोऽपि परमन्यत्तत्त्वं प्रतिपादयन्तीव । तेषां हि परिहारमभिधातुं अयमुपक्रमः क्रियते ॥**

**भाष्यार्थ**—हें जें सर्वप्रपंचशून्य ब्रह्म निर्धारित-निश्चित केलेलें आहे त्याहून निराळें दुसरें तत्त्व आहे कीं नाहीं, असा श्रुतींच्या परस्परविरोधामुळें संशय येतो. [-"अहोपण, सर्व विप्रतिपत्तींचा निरास करून अद्वय ब्रह्म वस्तु-परमार्थ तत्त्व आहे, असें सिद्ध झालें असतां पुनः हा आरंभ कसा संभवतो ?" अशी आशंका घेऊन भाष्यकार आरंभाचें कारण '**कानिचित् हि०**' इत्यादि भाष्यानें सांगतात-] =**कारण** सामान्यतःच भासमान होणारीं कांहीं वाक्यें जणुं काय ब्रह्माहूनहि निराळी **दुसरी** वस्तु आहे, असें प्रतिपादन करितातसें वाटतें. '**तेषां हि०**'-त्या वाक्यांचाच परिहार सांगण्यासाठीं हा उपक्रम केला जातो. [मंदांच्या शंकेचें निरसन करण्यासाठीं तत्पदलक्ष्य ब्रह्माच्या अद्वयत्वाचा विस्तार करण्याच्या उद्देशानें हा आरंभ केलेला आहे. त्यामुळें याच्या पादादिसंगति सुलभ आहेत. पूर्वपक्षांत 'ब्रह्माला सद्वितीयत्व असल्यामुळें द्वितीयनिषेधाची-द्वैताच्या निषेधाची असिद्धि' व सिद्धान्तांत 'त्याला अद्वितीयत्व असल्यामुळें द्वैताच्या निषेधाची सिद्धि.'-पण अन्याचा निषेध केल्यामुळें व ब्रह्माला श्रुतत्व असल्यामुळें जर ब्रह्म आहे तर ब्रह्मातिरिक्त द्वैतप्रपंचालाहि श्रुतत्व असल्यामुळें तो आहे, असें मानून पूर्वपक्षसूत्राची योजना '**परमतः०**' इत्यादि भाष्यानें करितात--]

**भाष्यं—परमतो ब्रह्मणोऽन्यत्तत्त्वं भवितुमर्हति। कुतः। सेतुव्यपदेशादुन्मानव्यपदेशात्संबंधव्यपदेशाद्भेदव्यपदेशाच्चेति। सेतुव्यपदेशस्तावत्-'अथ य आत्मा स सेतुर्विधृतिः' इत्यात्मशब्दाभिहितस्य ब्रह्मणः सेतुत्वं संकीर्तयति। सेतुशब्दश्च** हि लोके जलसंतानविच्छेदकरे **मृदादिप्रचये प्रसिद्धः। इह च सेतुशब्द आत्मनि प्रयुक्त इति लौकिकसेतोरिव आत्मसेतोरन्यस्य वस्तुनोऽस्तित्वं गमयति ॥**

**भाष्यार्थ**--'अतः'-या ब्रह्माहून 'परं'-दुसरें तत्त्व असणें उचित आहे. '**कुतः**'-कोणत्या कारणानें ? '**सेतुव्यपदेशात्०**'-सेतूच्या व्यपदेशामुळें, उन्मानाच्या व्यपदेशामुळें, संबंधव्यपदेशामुळें व भेदव्यपदेशामुळें ['इति-'शब्द सूत्रयोजनेच्या समाप्तीसाठीं आहे.-'**सेतुव्यपदेशः०**'इत्यादि भाष्यानें त्यांतील पहिल्या हेतूचें विवरण-]=त्यांतील अगोदर सेतुव्यपदेश असा आहे-"आतां जो आत्मा तो सेतु विधृति"-छां. ८. ४. १. सु. उ. ४७३-ही श्रुति आत्मशब्दानें सांगितलेल्या ब्रह्माचें सेतुत्व सांगते, [-"पण ब्रह्माला सेतुत्व जरी असलें तरी सद्वितीयत्व कसें?" अशी आशंका घेऊन '**सेतुशब्दश्च०**' इत्यादि भाष्यानें वादी व्याप्ति सांगतो-] =आणि 'सेतु' हा शब्द व्यवहारांत जलप्रवाहाचा विच्छेद करणाऱ्या मृत्तिका,

काष्ठें इत्यादिकांचा ढीग-बांध या अर्थी रूढ आहे, हें प्रसिद्ध आहे. [-'ब्रह्म सद्वितीय आहे, सेतुत्वामुळें, लौकिक सेतूप्रमाणें' असें मानून वादी '**इह च०**' इत्यादि भाष्यानें म्हणतो-]=आणि येथें-या वाक्यांत 'सेतु-'शब्द 'आत्मा' या अर्थी योजिलेला आहे. म्हणून तो लौकिक सेतूप्रमाणें 'आत्म-'सेतूहून भिन्न वस्तूचें अस्तित्व सुचवितो-अवगत करवितो. [-याहि कारणानें ब्रह्मसेतूला सद्वितीयत्व आहे, असें वादी '**सेतुं तीर्त्वा०**' इत्यादि वाक्यानें सांगतो--]

**भाष्यं—'सेतुं तीर्त्वा' इति च तरतिशब्दप्रयोगात्। यथा लौकिकं सेतुं तीर्त्वा जांगलमसेतुं प्राप्नोत्येवमात्मानं सेतुं तीर्त्वाऽनात्मानमसेतुं प्राप्नोतीति गम्यते ॥**

**भाष्यार्थ—**आणि "सेतूला तरून"-सु. उ. ४ ७३-असा येथें 'तरति'-तरणें, या शब्दाचा प्रयोग केला आहे, त्यामुळें: [-"पण एवढ्यानें दुसऱ्या वस्तूचें अस्तित्व कसें सिद्ध होतें?" '**यथा लौकिकं०**' इत्यादि भाष्यानें उत्तर-]=ज्याप्रमाणें लौकिक सेतूला तरून-त्याचें उल्लंघन करून जांगल असेतूला प्राप्त होतो त्याप्रमाणें 'आत्मा' या सेतूला तरून असेतु-सेतु नसलेल्या अनात्म्याला प्राप्त होतो, असें अवगत होतें. [-'जांगलं वातभूयिष्ठं'-जांगल म्ह० ज्यांत वारा पुष्कळ आहे, असें स्थल, असा कोश असल्यामुळें वायुप्रचुर देश हेंच जांगल होय. पण येथें न्यायाच्या साम्यानें केवळ स्थल सांगितलें आहे.-'**उन्मानव्यपदेशश्च०**' इत्यादि भाष्यानें दुसऱ्या हेतूचें व्याख्यान —]

**भाष्यं—उन्मानव्यपदेशश्च भवति "तदेतद्ब्रह्म चतुष्पादष्टाशफं षोडशकलं" इति । यच्च लोके उन्मितमेतावदिदमिति परिच्छिन्नं कार्षापणादि, ततोऽन्यद्वस्त्वस्तीति प्रसिद्धम् । तथा ब्रह्मणोऽप्युन्मानात्ततोऽन्येन वस्तुना भवितव्यमिति गम्यते ॥**

**भाष्यार्थ—**आणि उन्मानव्यपदेशहि 'तें हें ब्रह्म चतुष्पाद, अष्टाशफ, षोडशकल' असा आहे. [पूर्व, पश्चिम, दक्षिण व उत्तर, या चार कला हा प्रकाशवान् पाद; पृथिवी, अन्तरिक्ष, द्यौ व समुद्र हा अनन्तवान् पाद; अग्नि, सूर्य, चंद्र व विद्युत् हा ज्योतिष्मान् पाद व चक्षुः, श्रोत्र, वाक् व मन हा आयतनवान् पाद, असे हे चार पाद ज्याला आहेत तें चतुष्पाद ब्रह्म. पादांचीं अर्धें हीं आठ शफें-खुर ज्याला आहेत तें अष्टाशफ ब्रह्म. एकेका पादाच्या चार चार कला, अशा सोळा कला-अवयव ज्याला आहेत तें षोडशकल ब्रह्म.-छां. ४. ५. सु. उ. ३७९-८३-असा याचा भावार्थ.-'याप्रमाणें ब्रह्माला उन्मानत्व जरी असलें तरी त्यावरून दुसऱ्या वस्तूची सिद्धि कशी होते?' '**यच्च०**' इत्यादि भाष्यानें उत्तर-]=आणि व्यवहारांत जें

उन्मित–हें इतकें, असें प्रमाणानें परिच्छिन्न–निश्चित केलेलें कार्षापणादि असतें त्याहून अन्य वस्तु असतें हें प्रसिद्ध आहे. [कार्षापण म्ह० सोळा तोळे भार वजनाचें एक सुवर्णाचें नाणें, सोळा पणसंज्ञक नाण्यांचें तें एक नांव आहे.–'ब्रह्म सद्वितीय आहे. कारण त्याला उन्मितत्व–प्रमाणानें परिच्छिन्नत्व आहे, उभयसंमत कार्षापणादिकांप्रमाणें' असें '**तथा०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=त्याचप्रमाणें ब्रह्माचेंहि उन्मान–प्रमाणपरिच्छेद असल्यामुळें त्याहून अन्य वस्तु असली पाहिजे, असें अनुमान होतें. [–'**तथा संबंधव्यपदेशः०**' इत्यादि भाष्यानें सूत्रांतील तिसऱ्या हेतूचें व्याख्यान—]

**भाष्यं—तथा संबंधव्यपदेशोऽपि भवति– 'सता सोम्य तदा संपन्नो भवति' इति । 'शारीर आत्मा' 'प्राज्ञेनात्मना संपरिष्वक्तः' इति च । मितानां च मितेन संबंधो दृष्टो यथा नराणां नगरेण । जीवानां च ब्रह्मणा संबंधं व्यपदिशति सुषुप्तौ । अतस्ततः परमन्यदमितमस्तीति गम्यते ॥**

**भाष्यार्थ**—तसाच संबंधव्यपदेशहि आहे. "हे सोम्य, त्यावेळीं सद्रूप ब्रह्माशीं तद्रूप होतो"–छां. ६. ८. १.–असा, 'शारीर आत्मा'–तै. २. ३.१– असा व "प्राज्ञ आत्म्याकडून दृढ आलिंगिलेला"–बृ. ४. ३. २१.–असा संबंधव्यपदेश आहे. [–'तथापि सद्वितीयत्व कसें ?' '**मितानां च०**' इत्यादि भाष्यानें उत्तर–]=मित–परिमित–परिच्छिन्न पदार्थांचा मित पदार्थांशीं संबंध झालेला दिसतो. जसा–मनुष्यांचा नगराशीं. [–या व्याप्त–व्याप्तिविशिष्ट हेतूची पक्षधर्मता '**जीवानां च०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=आणि वरील श्रुति सुषुप्तींत जीवांचा ब्रह्माशीं संबंध होतो,असा व्यपदेश करिते. [–'विमत–ब्रह्म सद्वितीय आहे, संबंधवत्त्वामुळें, नगराप्रमाणें' असें '**अतः०**' इत्यादि भाष्यानें वादी सांगतो–]=म्हणून त्या ब्रह्माहून 'परं'–भिन्न अमित वस्तु आहे, असें अनुमान होतें. [–'**भेदव्यपदेशश्च०**' इत्यादि भाष्यानें सूत्रोक्त चवथ्या हेतूचें विवरण—]

**भाष्यं–भेदव्यपदेशश्च एतमेवार्थं गमयति । तथा हि–'अथ य एषोऽन्तरादित्ये हिरण्मयः पुरुषो दृश्यते' इत्यादित्याधारमीश्वरं व्यपदिश्य, ततो भेदेन अक्ष्याधारमीश्वरं व्यपदिशति—'अथ य एषोऽक्षिणि पुरुषो दृश्यते' इति । अतिदेशं चास्यामुना रूपादिषु करोति—'तस्यैतस्य तदेव रूपं यदमुष्य रूपं यावमुष्य गेष्णौ तौ गेष्णौ यन्नाम तन्नाम' इति ॥**

**भाष्यार्थ**—आणि भेदव्यपदेशहि हाच अर्थ अवगत करवितो.[–'**तथा हि०**' यानें त्यांतील आधारतः भेदव्यपदेशाचें उदाहरण–]=कसा तो पहा–"आतां जो

हा आदित्यांत हिरण्मय पुरुष दिसतो."–छां.१.६.६.–असा श्रुति आदित्याधार ईश्वराचा व्यपदेश करून "आतां जो हा अक्षीमध्यें पुरुष दिसतो." –छां.७.१.५.–असा त्याहून भेदानें अक्ष्याधार ईश्वराचा व्यपदेश करिते. [ आदित्य ज्याचा आधार आहे, तो आदित्याधार व अक्षि–नेत्र ज्याचा आधार आहे तो अक्ष्याधार.–'**अतिदेशं च०**' इत्यादि भाष्यानें अतिदेशतःहि भेद दाखवितो–] =आणि "जें आदित्यपुरुषाचें रूप तेंच या अक्षिपुरुषाचें रूप, जे त्याचे दोन गेष्ण–पेरें तेच याचे गेष्ण, जें त्याचें नांव तेंच याचें नांव."–छां.१.७.५.–असा श्रुति या आक्षिपुरुषाचा आदित्यपुरुषाशी रूपादिकांत अतिदेश करिते. [–'**सावधिकं च०**' इत्यादि भाष्यानें अवधितःहि भेदोक्ति साधितो–]

**भाष्यं**––**सावधिकं चेश्वरत्वमुभयोर्व्यपदिशति–'ये चामुष्मात्पराञ्चो लोकास्तेषां चेष्टे देवकामानां च' इत्येकस्य । 'ये चैतस्मादर्वाञ्चो लोकास्तेषां चेष्टे मनुष्यकामानां च' इत्येकस्य । यथेदं मागधस्य राज्यं इदं वैदेहस्येति । एवमेतेभ्यः सेत्वादिव्यपदेशेभ्यो ब्रह्मणः परमस्तीति ॥३१॥ एवं प्राप्ते प्रतिपाद्यते––**

**भाष्यार्थ**––"आणि जे आदित्याहून ऊर्ध्व लोक आहेत त्यांचें ईशन व धारण करितो आणि त्यांतील देवांच्या इष्ट फलांचेंहि ईशन करितो"–सु.उ.३१० –असें एकाचें–आधिदैविक पुरुषाचें व "जे या अध्यात्म आत्म्याहून अलीकडचे लोक आहेत त्यांचें व मनुष्यांच्या इष्ट फलांचेंहि ईशन करितो."–सु.उ.३११– असें दुसऱ्याचें–आध्यात्मिक पुरुषाचें, याप्रमाणें त्या दोघांचेंहि सावधिक–मर्यादित ईश्वरत्व श्रुति सांगते–त्याचा व्यपदेश करिते. [–ऐश्वर्याच्या सावधित्वाविषयीं '**यथेदं०**' इत्यादि भाष्यानें दृष्टान्त–]=जसें हें मागधाचें राज्य व हें वैदेहाचें, असें म्हणतात त्याप्रमाणें. ['विमत–ब्रह्म सद्वितीय आहे, भेदव्यपदेशाला पात्र असल्यामुळें, घटाप्रमाणें' असा याचा भावार्थ. –'**एवं एतेभ्यः०**' इत्यादि भाष्यानें पूर्वपक्षाचा उपसंहार–]=याप्रमाणें या सेतु-आदिव्यपदेशामुळें ब्रह्माहून पर–भिन्न वस्तु आहे, '**इति**'–याप्रमाणें ब्रह्माला सद्वितीयत्व असतांना त्याहून भिन्न असलेल्या प्रपंचाचें निषेध्यत्व सांगणें, अयुक्त आहे, असा भावार्थ. ३१. [–'**एवं प्राप्ते०**' इत्यादि भाष्यानें पूर्वपक्षाचा अनुवाद करून सिद्धान्त सांगतात–]=असा पूर्वपक्ष प्राप्त झाला असतां '**सामान्यात्तु**' या सूत्रानें सूत्रकार सिद्धान्त सांगतात–

## सूत्रं––सामान्यात्तु ॥ ३२

**सूत्रार्थ**––'पण सामान्यामुळें'–ब्रह्माला प्रसिद्ध सेतूचें सामान्य–साम्य असल्यामुळें सेतुत्वव्यपदेश आहे. ३२. सु. ब्र. २९४. [–'**तुशब्देन०**' इत्यादि भाष्यानें सूत्राचें व्याख्यान––]

**भाष्यं**—तु-शब्देन प्रदर्शितां प्राप्तिं निरुणद्धि । न ब्रह्मणोऽन्यत्किंचिद्भवितुमर्हति । प्रमाणाभावात् । न ह्यन्यस्यास्तित्वे किंचित्प्रमाणमुपलभामहे । सर्वस्य हि जनिमतो वस्तुजातस्य जन्मादि ब्रह्मणो भवतीति निर्धारितम् । अनन्यत्वं च कारणात्कार्यस्य । न च ब्रह्मव्यतिरिक्तं किंचिदजं संभवति 'सदेव सोम्येदमग्र आसीदेकमेवाद्वितीयम्' इत्यवधारणात् । एकविज्ञानेन च सर्वविज्ञानान्न ब्रह्मव्यतिरिक्तवस्त्वस्तित्वमवकल्पते ॥

**भाष्यार्थ**—सूत्रकार 'तु' या शब्दानें वर प्रदर्शित केलेल्या प्राप्तीला निरोध—प्रतिबंध करितात. [–'**न ब्रह्मणो०**' इत्यादि भाष्यानें निरोधप्रकाराचा अभिनय–] =ब्रह्माहून भिन्न कांहीं असणें युक्त नाहीं. [–'तें ब्रह्मभिन्न वस्तुजात सादि आहे कीं अनादि ?' '**प्रमाणाभावात्**' यानें पहिल्या कल्पाचें निरसन–]=कारण त्याविषयीं कांहीं प्रमाण नाहीं.' [–'**न हि अन्यस्य०**' इत्यादि भाष्यानें तेंच स्पष्ट करितात–]=कारण ब्रह्माहून भिन्न असें कांहीं आहे, याविषयीं एकहि प्रमाण आम्हांला उपलब्ध होत नाहीं. [–"अहोपण, अभेदाविषयींहि प्रमाणाचें अदर्शन तुल्य आहे," अशी आशंका घेऊन 'जन्मादि-'सूत्रापासून–ब्र.भा.१.१.२.पृ.७९–आरंभ करून ठिकठिकाणीं सिद्ध केलेल्या अर्थाचें '**सर्वस्य०**' इत्यादि भाष्यानें स्मरण करून देतात–]=कारण सर्व उत्पत्तिमान् पदार्थजाताचे जन्मादि—जन्म-स्थिति-नाश ब्रह्मापासून होतात, हा अर्थ निश्चित केला आहे. [–'**अनन्यत्वं च०**' इत्यादि भाष्यानें 'आरंभणाधिकरणानें'–ब्र.भा. २.१.१४ पृ.७७–सिद्ध झालेल्या अर्थाचें कथन–] =आणि कारणाहून कार्याचें अनन्यत्व–अभेद निश्चित केला आहे. [–'**न च०**' इत्यादि भाष्यानें दुसऱ्या पक्षाचें निरसन–]=ब्रह्मव्यतिरिक्त–ब्रह्माहून भिन्न असें कांहींहि अज संभवत नाहीं. कारण 'हे सोम्य, हें सर्व जगत् उत्पत्तीच्या पूर्वी सत्-च एकच अद्वितीय होतें' –छां.६. २. १.–असें अवधारण केलेलें आहे. [–ब्रह्मव्यतिरिक्तवस्तूच्या अभावाविषयीं श्रुतीप्रमाणें अर्थापत्ति सांगतात–]='**एकविज्ञानेन०**'–आणि एकाच्या विज्ञानानें सर्वविज्ञान होत असल्यामुळें ब्रह्मव्यतिरिक्त वस्तूचें अस्तित्व उपपन्न होत नाहीं. [–"अहोपण, ब्रह्माच्या सद्वितीयत्वाविषयीं प्रमाणें सांगितलीं आहेत," अशी '**ननु०**' इत्यादि भाष्यानें शंका—]

**भाष्यं**—ननु सेत्वादिव्यपदेशा ब्रह्मव्यतिरिक्तं तत्त्वं सूचयन्तीत्युक्तम् । नेत्युच्यते । सेतुव्यपदेशस्तावन्न ब्रह्मणो बाह्यस्य सद्भावं प्रतिपादयितुं क्षमते । सेतुरात्मेति ह्याह न ततः परमस्तीति । तत्र परस्मिन्नसति सेतुत्वं नावकल्पत इति परं किमपि कल्प्येत । न चैतन्न्याय्यम् । हठो ह्यप्रसिद्धकल्पना ॥

**भाष्यार्थ**—अहोपण, सेतु, उन्मान इत्यादि व्यपदेश ब्रह्मव्यतिरिक्त तत्त्व सुचवितात, असें वर–१९८–सांगितलें आहे! [–पण त्यांतील 'सेतु-'व्यपदेशाला द्वितीयवस्तूचें साधकत्व नाहीं, असें आचार्य '**नेत्युच्यते**' या भाष्यानें सांगतात–]= याचें 'नाहीं, ते व्यपदेश ब्रह्मव्यतिरिक्त वस्तु सुचवीत नाहींत,' असें आम्हां-कडून सांगितलें जातें. [–'तो व्यपदेश श्रुतितः वस्त्वन्तर–ब्रह्मभिन्नवस्तु साधितो कीं अर्थतः' असा विकल्प करून '**सेतुव्यपदेशः०**' इत्यादि भाष्यानें त्यांतील पहिल्या कल्पाला दूषण करितात–]=त्यांतील अगोदर 'सेतु आत्मा आहे, असें सांगतो, त्याहून भिन्न नाहीं' असा हा सेतुव्यपदेश ब्रह्माहून बाह्य पदार्थाचा सद्भाव–अस्तित्व प्रतिपादन करण्यास समर्थ नाहीं. [–दुसऱ्या कल्पाची '**तत्र०**' इत्यादि भाष्यानें शंका–]=अहोपण, त्या आत्म्याहून पर–भिन्न कांहीं नाहीं, असें असल्यास त्याचें सेतुत्व उपपन्न होत नाहीं. म्हणून सेतुत्वाच्या उपपत्तीसाठीं आत्म्याहून भिन्न कांहीं तरी कल्पिणें भाग आहे. [–पण श्रौत अर्थाशीं विरोध येत असल्यामुळें आर्थिक अर्थ युक्त नाहीं, कारण श्रुतीहून लिंग दुर्बल आहे, असें '**न च एतत्०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=पण तशी भिन्न वस्तूची कल्पना करणें न्याय्य नाहीं. कारण अप्रसिद्ध–प्रसिद्ध नसलेल्या वस्तूची कल्पना करणें हा हठ–आग्रह आहे. [–आणि याहि कारणानें त्याला वस्त्वन्तरसाधकत्व नाहीं, असें '**अपि च०**' इत्यादि भाष्यानें सांगतात—]

**भाष्यं**—**अपि च सेतुव्यपदेशादात्मनो लौकिकसेतुनिदर्शनेन सतुबाह्यवस्तुतां प्रसंजयता मृद्दारुमयतापि प्रासंजयेत। न चैतन्न्याय्यम्। अजत्वादिश्रुतिविरोधात्॥**

**भाष्यार्थ**—शिवाय आणखी याहि कारणानें सेतुव्यपदेश वस्त्वन्तरसाधक नाहीं. [–विवक्षित सेतुसाम्याची उपेक्षा करून त्याच्याशीं नित्य साहचर्य ठेव-णाऱ्या दुसऱ्या अर्थाची कल्पना करूं लागल्यास अतिप्रसंगहि प्राप्त होतो, असें तें हेत्वंतरच स्पष्ट करितात–]=सेतूचा व्यपदेश केलेला असल्यामुळें लौकिक सेतूच्या उदाहरणानें सेतुबाह्यवस्तुत्वाची प्राप्ति करविणाऱ्या वाद्याच्या मतानें आत्म्याच्या मृद्दारुमयत्वाचीहि प्राप्ति होईल–तो मृत्तिका-काष्ठमय आहे, असें म्हणण्याचाहि प्रसंग येईल! [–दृष्टान्तांतील जेवढ्या अंशाचा स्वीकार केला असतां श्रुतीशीं विरोध येणार नाहीं तेवढ्याचाच स्वीकार करणें उचित आहे. कारण निर्दोषत्वामुळें तिला प्रबलत्व आहे, असें '**न च०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–] =पण आत्म्याच्या मृद्दारुमयत्वाचा प्रसंग येणें न्याय्य नाहीं. कारण तसें झाल्यास

अजत्वादि श्रुतींशीं विरोध येतो. [-" तर मग 'सेतु-'शब्दाची काय गति आहे?" 'सेतुसामान्यात्तु०' इत्यादि भाष्यानें सूत्रयोजनेनें त्याची गति सांगतात—]

**भाष्यं--सेतुसामान्यात्तु सेतुशब्द आत्मनि प्रयुक्त इति श्लिष्यते । जगतस्तन्मर्यादानां च विधारकत्वं सेतुसामान्यमात्मनः । अतः सेतुरिव सेतुरिति प्रकृत आत्मा स्तूयते । 'सेतुं तीर्त्वा' इत्यपि तरतेरतिक्रमासंभवात्प्राप्नोत्यर्थ एव वर्तते । यथा व्याकरणं तीर्ण इति प्राप्त इत्युच्यते । नातिक्रान्तः । तद्वत् ॥ ३२ ॥**

**भाष्यार्थ**—पण सेतूच्या सामान्यामुळें-सादृश्यामुळें 'सेतु' हा शब्द आत्म्यामध्यें योजिलेला आहे, हें म्हणणें उपपन्न होतें. [-" तर मग आत्म्यामध्यें सेतुशब्दप्रयोगाचें निमित्त, असें प्रसिद्ध सेतूशीं आत्म्याचें सादृश्य कोणतें आहे?" '**जगतः०**' इत्यादि भाष्यानें उत्तर-]=जगाचें व जगाच्या मर्यादांचें विधारकत्व हें आत्म्याचें सेतुसादृश्य आहे. [त्या त्या नियत कार्यामध्यें व्यवस्थितत्व, एतद्रूप जगाच्या मर्यादा व त्यांचा आश्रय जगत् यांच्या अन्तर्यामित्वानें आत्म्याचें जें विधारकत्व त्याला सेतुसाम्य आहे, असा भावार्थ.-त्या साम्यानें आत्म्यामध्यें सेतुशब्दाचा प्रयोग केला आहे, असें झालें असतां काय सिद्ध होतें,तें '**अतः सेतुः०**' इत्यादि भाष्यानें सांगतात-]=त्या साम्यामुळें 'सेतूसारखा सेतु-जणुंकाय सेतूच' अशी प्रकृत आत्म्याची स्तुति केली जाते. [-आतां 'तरति'-तरतो, या शब्दामुळें आत्मसेतूला सद्वितीयत्व आहे, असें जें नें वर-पृ.१९९-म्हटलें आहे त्याविषयीं '**सेतुं तीर्त्वा०**' इत्यादि भाष्यानें सांगतात-]='**सेतूला तरून**' असा हाहि निर्देश 'तरति-'शब्दाच्या 'अतिक्रम' या मुख्य अर्थाचा असंभव असल्यामुळें 'प्राप्त होतो,' याच अर्थाचा आहे. [स्वतःच्याच स्वातिक्रमाचा असंभव असल्यामुळें 'तरति' हा धातु येथें 'प्राप्नोति'-प्राप्त होतो, या अर्थी आहे. -" अहोपण, स्वरूपामध्यें प्राप्तीचाहि असंभव असल्यामुळें 'तरति' म्ह० प्राप्त होतो, हा अर्थहि अयुक्त आहे, 'ब्रह्मविद् परब्रह्माला प्राप्त होतो' याप्रमाणें त्याची उपपत्ति जरी संभवत असली तरी येथील 'तरति' त्या अर्थी नाहीं,कारण वृद्धांचा तसा प्रयोग उपलब्ध होत नाही" अशी आशंका घेऊन '**यथा०**' इत्यादि भाष्यानें आचार्य वृद्धांचा प्रयोग दाखवितात-]=ज्याप्रमाणें '**व्याकरणं तीर्णः**' -हा व्याकरणशास्त्रास तीर्ण आहे, म्ह० प्राप्त झालेला आहे, असें म्हटलें जातें, यानें व्याकरणाचें अतिक्रमण-उल्लंघन केलें आहे, असें म्हटलें जात नाहीं,तसेंच येथें समजावें. ३२. [-सेतुव्यपदेशाप्रमाणें '**बुद्ध्यर्थः०**' या सूत्रानें दुसऱ्या उन्मानहेतूचें निरसन करितात—]

## सूत्रं--बुद्ध्यर्थः पादवत् ॥ ३३

**सूत्रार्थ**—पूर्वोक्त–पृ.१९९–उन्मानव्यपदेश 'बुद्ध्यर्थ'–उपासनेसाठीं आहे. 'पादांप्रमाणें'–ब्रह्मप्रतीक जे मन त्याच्या वागादि पादांप्रमाणें.३३.–सु. ब्र. २९५. [–'**यदपि०**'इत्यादि भाष्यानें व्यावर्त्याचा अनुवाद करून व्यावर्तकसूत्र घेऊन त्याचें व्याख्यान करितात--]

**भाष्यं—यदप्युक्तं उन्मानव्यपदेशादस्ति परमिति । तत्राभिधीयते—उन्मानव्यपदेशोऽपि न ब्रह्मव्यतिरिक्तवस्त्वस्तित्वप्रतिपत्त्यर्थः । किमर्थस्तर्हि । बुद्ध्यर्थः । उपासनार्थ इति यावत् । चतुष्पादष्टाशफं षोडशकलमित्येवंरूपा बुद्धिः कथं नु नाम ब्रह्मणि स्थिरा स्यादिति विकारद्वारेण ब्रह्मण उन्मानकल्पनैव क्रियते । न ह्यविकारेऽनंते ब्रह्मणि सर्वैः पुंभिः शक्या बुद्धिः स्थापयितुं मंदमध्यमोत्तमबुद्धित्वात्पुंसामिति ॥**

**भाष्यार्थ**—'उन्मानव्यपदेशामुळें ब्रह्माहून अन्य वस्तु आहे' असेंहि जें–१९९–म्हटलें आहे, त्याविषयीं असें सांगितलें जातें–'**उन्मान०**'–उन्मान–परिच्छेदव्यपदेशहि ब्रह्मव्यतिरिक्त वस्तूचें अस्तित्व जाणण्यासाठीं नाहीं. '**किमर्थः०**'–तर मग तो कशासाटीं आहे ? '**बुद्ध्यर्थः**'–उपासनेसाठी, असा भावार्थ. ['सेतु-'व्यपदेशाप्रमाणें उन्मानव्यपदेशाहि, असा 'अपि-'शब्दानें सेतुव्यपदेशाचा **दृष्टान्त** दिला जातो.–उन्मानव्यपदेशाचें उपासनार्थत्व '**चतुष्पाद०**' इत्यादि **भाष्यानें** विशद करितात–]='चतुष्पाद्, अष्टाशफ, षोडशकल,ही अशा स्वरूपाची बुद्धि ब्रह्मामध्यें कशी बरें स्थिर होईल, म्हणून विकारद्वारा ब्रह्माची उन्मानकल्पनाच केली जाते. [–" पण शुद्ध ब्रह्माला सोडून सोपाधिक ब्रह्मामध्यें बुद्धि कां बरें स्थिर केली जाते ? " '**न हि०**' इत्यादि भाष्यानें उत्तर–]=कारण सर्व पुरुषांकडून अविकार अनंत ब्रह्मामध्यें बुद्धि स्थापिली जाणें शक्य नाहीं, कारण पुरुषांना मंद-मध्यम-उत्तमबुद्धित्व आहे, त्यामुळें सर्वांनाच शुद्ध ब्रह्मामध्यें बुद्धि स्थिर स्थापितां येत नाहीं. [जे उत्तमबुद्धि–मुख्य अधिकारी असतात त्यांच्या बुद्धींचा निरुपाधिक ब्रह्मामध्यें झटकन प्रवेश जरी होत असला तरी इतर मंद व मध्यम अधिकाऱ्यांच्या बुद्धीचा प्रवेश त्यांत एकाएकीं होत नाहीं. म्हणून त्यांच्याहि संग्रहासाठीं सोपाधिक ब्रह्मामध्यें त्यांच्या बुद्धीचें स्थैर्य केलें जातें, असें फलित सांगण्यासाठीं भाष्यांत शेवटीं 'इति' असें म्हटलें आहे.–'**पादवत्०**' इत्यादि भाष्यानें सत्राचा भाग घेऊन त्याचें वैदिक उदाहरणत्वानें व्याख्यान करितात–]

**भाष्यं--पादवत्। यथा मनआकाशयोः अध्यात्ममधिदैवतं च ब्रह्मप्रतीकयोराम्नातयोश्चत्वारो वागादयो मनःसंबंधिनः पादाः कल्प्यन्ते, चत्वारश्चाग्न्यादय आकाशसंबंधिन आध्यानाय तद्वत्। अथवा पादवदिति। यथा कार्षापणे पादविभागो व्यवहारप्राचुर्याय कल्प्यते। न हि सकलेनैव कार्षापणेन सर्वदा सर्वे जना व्यवहर्तुमीशते। क्रयविक्रये परिमाणानियमात्। तद्वादित्यर्थः ३३**

**भाष्यार्थ**—'पादांप्रमाणें'-ब्रह्माचीं अध्यात्म व अधिदैवत दोन प्रतीकें, अशारूपानें सांगितलेलें मन व आकाश यांचे ध्यानासाठीं वागादि चार पाद मनःसंबंधी कल्पिले जातात व अग्न्यादि चार पाद आकाशसंबंधी कल्पिले जातात, त्याप्रमाणें. ['वागादि' येथील 'आदि-'शब्दानें प्राण, चक्षुः, श्रोत्र व 'अग्न्यादि' येथील 'आदि-' शब्दानें वायु, आदित्य, दिशा यांचें ग्रहण केले जातें –आतां '**अथवा०**' इत्यादि भाष्यानें त्याच सूत्रावयवाची लौकिकत्वानें योजना करितात–]=किंवा 'पादाप्रमाणें म्ह० ज्याप्रमाणें कार्षापणादि–रुपया, पावली इत्यादि नाण्यांमध्यें व्यवहाराच्या प्राचुर्यासाठीं पादांचा विभाग कल्पिला जातो [–"अहोपण, पादविभागावांचूनहि व्यवहारबाहुल्य होऊं शकेल" अशा आशंका घेऊन '**न हि०**' इत्यादि म्हणतात–] =कारण सकल–सर्व पूर्ण कार्षापणानेंच सर्व लोक सर्वदा व्यवहार करूं शकत नाहींत. कारण क्रय व विक्रय यांचें परिमाण सर्वदा नियत नसते. [रुपया याच एका नाण्यानें सर्वदा सर्वव्यवहार संभवत नाहीं, कारण घ्यावयाच्या व द्यावयाच्या वस्तूंची किंमत नियत नसते, असा भावार्थ.–या उक्त दृष्टान्तानें मंद-मध्यमबुद्धि पुरुषांच्या ध्यानव्यवहारासाठीं ब्रह्मामध्यें उन्मानकल्पना आहे, असा दार्ष्टान्तिक सांगतात–]='**तद्वत्०**'–त्याप्रमाणें मंद व मध्यम अधिकाऱ्यांच्या ध्यानासाठीं ब्रह्मामध्यें परिच्छेदाची कल्पना केली आहे, असा भावार्थ. ३३. [–**स्थानविशेषात्०** 'इत्यादि सूत्रानें अवशिष्ट दोन हेतूंचें निरसन—]

## सूत्रं—स्थानविशेषात्प्रकाशादिवत् ॥ ३४

**सूत्रार्थ**—'स्थानविशेषामुळें'–बुद्ध्यादि-उपाधिस्थानविशेषाच्या संबंधामुळें संबंधव्यपदेश व भेदव्यपदेश आहेत. 'प्रकाशादिकांप्रमाणें' ३४.–सु.ब्र. २९९. [–' इह सूत्रे० ' इत्यादि भाष्यानें सूत्राचें तात्पर्य–]

**भाष्यं--इह सूत्रे द्वयोरपि संबंधभेदव्यपदेशयोः परिहाराऽभिधीयते। यदप्युक्तं--संबंधव्यपदेशाद्भेदव्यपदेशाच्च परमतः स्यादिति। तदप्यसत्। यत एकस्यापि स्थानविशेषापेक्षयैतौ व्यपदेशावुपपद्येते। संबंधव्यपदेशे तावदयमर्थः।**

**बुद्ध्याद्युपाधिस्थानविशेषयोगाद् उद्भूतस्य विशेषविज्ञानस्योपाध्युपशमे य उपशमः स परमात्मना संबंध इत्युपाध्यपेक्षया उपचर्यते । न परिमितत्वापेक्षया ॥**

**भाष्यार्थ**—या सूत्रांत ' संबंधव्यपदेश व भेदव्यपदेश ' या दोहोंचाहि परिहार सांगितला जातो. [—'**यदपि०**' इत्यादि भाष्यानें तोच परिहार सांगून अनुवादद्वारा स्पष्ट करितात—]=' संबंधव्यपदेशामुळें व भेदव्यपदेशामुळें या आत्म्याहून अन्य वस्तु आहे ' असे जे—२००—वर म्हटलें आहे तेंहि असत्—बाधित होणारें आहे. [—त्या अर्थी सूत्रावयवाला प्रवृत्त करून हेतुत्वानें त्याची योजना—]='**यतः०**'—कारण एकाचेंहि स्थानविशेषाच्या अपेक्षेनें हे दोन्ही व्यपदेश उपपन्न होतात. [ स्थानविशेष म्ह० बुद्धि, आदित्य, चक्षु इत्यादि.—याप्रमाणें दोन्ही परिहारांचा संक्षेप करून आतां त्यांचें विभागानें प्रदर्शन करणारे भाष्यकार ' **संबंधव्यपदेश०**' इत्यादि भाष्यानें प्रथम त्यांतील संबंधव्यपदेशाचा परिहार करितात—]=त्यांतील प्रथम संबंधव्यपदेशामध्यें ' स्थानविशेषात्' याचा हा असा अर्थ आहे—बुद्ध्यादिउपाधिस्थानविशेषाच्या संबंधामुळें उत्पन्न झालेल्या ' मी मनुष्य ' इत्यादि विशेषविज्ञानाचा उपाधीच्या उपशमामुळें होणारा जो उपशम—शांति—निवृत्ति तोच परमात्म्याशीं संबंध, असा उपाधीच्या अपेक्षेनें उपचार केला जातो. त्याला परिमितत्व आहे, या अपेक्षेनें—वि क्षेनें तो परमात्मसंबंध सांगितला जात नाहीं. [—भेदव्यपदेशांतहि ' स्थानविशेषात् ' या सूत्रपदाची ' **तथा०** ' इत्यादि भाष्यानें योजना—]

**भाष्यं—तथा भेदव्यपदेशोऽपि ब्रह्मण उपाधिभेदापेक्षयैव उपचर्यते । न स्वरूपभेदापेक्षया । प्रकाशादिवदित्युपमोपादानम् । यथैकस्य प्रकाशस्य सौर्यस्य चांद्रमसस्य वोपाधियोगादुपजातविशेषस्य उपाध्युपशमात्संबंधव्यपदेशो भवति, उपाधिभेदाच्च भेदव्यपदेशः । यथा वा सूचीपाशाकाशादिषु उपाध्यपेक्षयैवैतौ संबंधभेदव्यपदेशौ भवतः । तद्वत्** ॥ ३४ ॥

**भाष्यार्थ**—त्याचप्रमाणें ब्रह्माचा भेदव्यपदेशहि उपाधिभेदाच्या अपेक्षेनेंच गौणवृत्तीनें केला जातो. स्वरूपभेदाच्या अपेक्षेनें नाहीं. [—दोन्ही व्यपदेशांच्या औपाधिकत्वाविषयीं प्रकाशदृष्टान्ताचें व्याख्यान—]='**प्रकाशादिवत्**'—प्रकाशादिकांप्रमाणें, हें उपमानाचें—दृष्टान्ताचें ग्रहण आहे. '**यथा एकस्य०**'—ज्याप्रमाणें उपाधिसंबंधामुळें ज्यांत भेद उत्पन्न झाला आहे अशा सूर्याच्या किंवा चंद्राच्या एका प्रकाशाचा उपाधि-उपशमामुळें संबंधव्यपदेश होतो व उपाधिभेदामुळें भेदव्यपदेश होतो, [—' प्रकाशादि ' येथील ' आदि-'शब्दानें सांगितलेलें उदाहरणान्तर सांगतात—]='**यथा वा०**'—किंवा ज्याप्रमाणें सुईचें नेढें, पाश, आकाश इत्यादि-

कांमध्यें उपाधीच्या अपेक्षनेंच हे संबंध-भेदव्यपदेश होतात त्याप्रमाणें ब्रह्मामध्यें ते उपाधीच्या अपेक्षेनें होतात. ३४. [-"अहोपण, हे व्यपदेशद्वय मुख्य संभवत असतांना त्याचें औपचारिकत्व कां मानितां" '**उपपत्तेश्च०**' या सूत्रानें उत्तर-]

## सूत्रं—उपपत्तेश्च ॥ ३५

**सूत्रार्थ**—आणि सुषुप्तींत जीवेश्वरांचा औपचारिक भेद व संबंधच उपपन्न होतो त्यामुळें तो मुख्य नाहीं.३५.-सु.ब्र. २९५.-[-त्यांतील संबंधव्यपदेशांत '**उपपद्यते च०**' इत्यादि भाष्यानें सूत्राची योजना—]

**भाष्यं—उपपद्यते चात्र ईदृश एव संबंधो नान्यादृशः 'स्वमपीतो भवति' इति हि स्वरूपसंबंधमेनमामनन्ति । स्वरूपस्य चानपायित्वात् । न नरनगरन्यायेन संबंधो घटते ।** उपाधिकृतस्वरूपतिरोभावात्तु **'स्वमपीतो भवति' इत्युपपद्यते॥**

**भाष्यार्थ**—आणि ब्रह्म व आत्मा यांमध्यें असलाच-औपचारिकच संबंध संभवतो. याहून अन्य प्रकारचा-मुख्य संबंध संभवत नाहीं. [-औपचारिकच संबंधाच्या उपपत्तीचें '**स्वं०**'-इत्यादि वाक्यानें उपपादन करितात- ]="स्वरूपांत लीन होतो"-छा. ६. ८. १.-असा स्वरूपसंबंधच सांगतात-छंदोग या स्वरूपसंबंधाचेंच कथन करितात. [-'**स्वरूपस्य०**' इत्यादि भाष्यानें मुख्य संबंधाचा असंभव साधितात-]=कारण स्वरूपाला अविनाशित्व-नित्यत्व आहे. ब्रह्म व आत्मा यांचा संबंध नर व नगर यांच्या न्यायानें संभवत नाहीं. [-"अहोपण, संबंध हा धर्म द्विनिष्ठ- दोन पदार्थांत रहाणारा असल्यामुळें एकाच वस्तूंत तो संभवत नाहीं" अशी आशंका घेऊन '**उपाधि०**' इत्यादि भाष्यानें म्हणतात-] =पण उपाधीमुळें झालेला जो स्वरूपाचा तिरोभाव-लोप त्या कारणानें '**स्वरूपांत** लीन होतो-स्वरूपास प्राप्त होतो' असा व्यापदेश संभवतो. [-आतां '**तथा०**' इत्यादि भाष्यानें औपचारिक भेदाचा स्वीकार करून सूत्राची योजना करितात-]

**भाष्यं—तथा भेदोऽपि नान्यादृशः संभवति । बहुतरश्रुतिप्रसिद्धैकेश्वरत्वविरोधात् । तथाच श्रुतिरेकस्याप्याकाशस्य स्थानकृतं भेदव्यपदेशमुपपादयति— 'योऽयं बहिर्धा पुरुषादाकाशः' 'योऽयमंतः पुरुष आकाशः' 'योऽयमंतर्हृदय आकाशः' इति ॥ ३५ ॥**

**भाष्यार्थ**—तसाच ब्रह्म व आत्मा यांचा दुसऱ्या प्रकारचा-मुख्य भेदहि संभवत नाहीं. कारण अनेक श्रुतींमध्यें प्रसिद्ध असलेल्या एकेश्वरत्वाशीं विरोध येतो. [-" अहोपण, श्रौत व्यपदेशाला मुख्यत्वच आहे. औपचारिकत्व नाहीं. कारण दुसऱ्या कोठेंहि तें उपलब्ध होत नाहीं," अशी आशंका घेऊन '**तथा च०**'

इत्यादि भाष्यानें म्हणतात–]=आणि श्रुति एकाहि आकाशाच्या तशा–उपाधिकृत भेदव्यपदेशाचें उपपादन करिते. " जो हा शरीराच्या बाहेरील आकाश " "जो हा पुरुषाच्या आंत असलेला आकाश " " जो हा हृदयांत असलेला आकाश" –छां ३. १२.७-९–असें श्रुति भेदव्यपदेशाचें उपपादन करिते. ३५–[–'तथा०' इत्यादि सूत्रानें स्वपक्षीं हेत्वन्तर सांगतात–]

## सूत्रं—तथान्यप्रतिषेधात् ॥ ३६

**सूत्रार्थ**–त्याचप्रमाणे श्रुतीनें आत्मभिन्नवस्तूचा प्रतिषेध केलेला असल्यामुळें ब्रह्म अद्वितीयच आहे. ३६.–सु.अ.२९५.–[–'एवं०' इत्यादि भाष्यानें सूत्राचें तात्पर्य–]

**भाष्यं—एवं सेत्वादिव्यपदेशान्परपक्षहेतूनुन्मथ्य संप्रति स्वपक्षं हेत्वंतरेण उपसंहरति । तथान्यप्रतिषेधादपि न ब्रह्मणः परं वस्त्वंतरमस्तीति गम्यते ॥**

**भाष्यार्थ**—त्याचप्रमाणें पर–पूर्वपक्षाचे हेतु असे जे सेत्वादिव्यपदेश त्यांचें उन्मथन करून–त्यांचा परिहार करून आतां 'ब्रह्माचें अद्वितीयत्व' या स्वपक्षाचा दुसऱ्या हेतूनें उपसंहार करितात. [–' **तथा०** ' इत्यादि भाष्यानें सूत्रयोजनेनें तें हेत्वन्तरच विशद करितात–]=त्याचप्रमाणें आत्मभिन्नवस्तूच्या प्रतिषेधामुळेंहि ब्रह्माहून भिन्न वस्त्वन्तर नाहीं, असें ज्ञात होतें. ['ज्याप्रमाणें सेत्वादि-व्यपदेशाच्या परिहारामुळें वस्त्वन्तरबुद्धि होत नाहीं त्याचप्रमाणें,' असा सूत्रांतील 'तथा-'शब्दाचा अर्थ आहे.–' **तथाहि०** ' इत्यादि भाष्यानें अन्यप्रतिषेधाचेंच उदाहरण देतात–]

**भाष्यं—तथाहि— 'स एवाधस्तात्...अहमेवाधस्तात्' 'आत्मैवाधस्तात्' 'सर्वं तं परादाद्योऽन्यत्रात्मनः सर्वं वेद' 'ब्रह्मैवेदं सर्वम्' 'आत्मैवेदं सर्वम्' 'नेह नानास्ति किंचन' "यस्मात्परं नापरमस्ति किंचित्" 'तदेतद्ब्रह्मापूर्वमनपरमनंतरमबाह्यम्' इत्येवमादीनि वाक्यानि स्वप्रकरणस्थान्यन्यार्थत्वेन परिणेतुमशक्यानि ब्रह्मव्यतिरिक्तं वस्त्वंतरं वारयन्ति । सर्वान्तरश्रुतेश्च न परमात्मनोऽन्योऽन्तरात्मास्तीत्यवगम्यते ॥ ३६ ॥**

**भाष्यार्थ**—अन्यप्रतिषेध कसा आहे तो पहा–" तो आत्माच खालीं, तोच वर० " [–' **अहमेव०** ' या वाक्यानें आत्म्याचें तटस्थत्व निवृत्त करितात–]= " मीच खालीं, मीच वर०"[–अहंकाराच्या सर्वात्मत्वप्राप्तीचें निरसन–]="आत्माच खालीं, आत्माच वर० "–छां. ७.२५. [–निरेच्या अनुपपत्तीनेंहि भेदनिषेध '**सर्वं तं०**' या वाक्यानें दाखवितात–]=" जो सर्वाला आत्म्याहून भिन्न समजतो त्याला तें सर्व पुरुषार्थापासून दूर करितें"–बृ.२.४.६–[–बाधसामानाधिकरण्यामुळेंहि भेदनिषेधाची सिद्धि होते,असें '**ब्रह्मैवेदं०**' इत्यादि वाक्यानें सांगतात–]="**हें सर्व ब्रह्मच**

आहे," "हें सर्व आत्माच आहे," [–याप्रमाणें अर्थतः सिद्ध होणारी निषेध-बुद्धि सांगून आतां साक्षात्च त्याची प्रतीति होते असें 'नेह०' इत्यादि वाक्यानें सांगतात–]=" या ब्रह्मांत यत्किंचित्‌हि भेद नाहीं. "–बृ ४. ४. १९.–"ज्याहून पर किंवा अपर कांहीं नाहीं त्या पुरुषानें हें सर्व पूर्ण आहे "–श्वे. ३.९. " तें हें ब्रह्म अपूर्व, अनपर, अनन्तर, अबाह्य० "–बृ. २. ५. १९.–हीं व अशींच दुसरींहि स्वप्रकरणस्थ–ब्रह्मात्मप्रकरणस्थ अन्यार्थत्वानें परिणत करितां येण्यास अशक्य, अशीं वाक्यें ब्रह्मव्यतिरिक्त वस्त्वन्तराचें निवारण करितात. [भेदव्यप-देशाहून या प्रदर्शित वाक्यांचा विशेष 'स्वप्रकरणस्थ' या विशेषणानें सांगि-तला आहे.–'सर्वान्तर०' इत्यादि भाष्यानें ब्रह्माच्या अद्वयत्वाविषयीं हेत्वन्तर सांगतात–]=आणि 'सर्वान्तर-'श्रुतीमुळें अन्तरात्मा परमात्म्याहून भिन्न नाहीं असें अवगत होतें. ३६–[–'ब्रह्माला अद्वैतत्व जरी असलें तरी सर्वगतत्व व सर्वा-त्मत्व कसें ?' 'अनेन०' या सूत्रानें उत्तर–]

## सूत्रं—अनेन सर्वगतत्वमायामशब्दादिभ्यः ॥३७॥ (७)

**सूत्रार्थ**—या सेतुत्वव्यपदेशाच्या मुख्यत्वाचा व अन्य वस्तूचा प्रतिषेध केल्या-नेंच ब्रह्माचें सर्वगतत्व सिद्ध होतें. त्याचें व्यापकत्व सांगणाऱ्या शब्दावरूनहि सर्वगतत्वाची सिद्धि होते. ३७–(७)–सु. ब्र. २९६. [–'अनेन०' इत्यादि भाष्यानें सूत्राचें व्याख्यान–]

**भाष्यं—अनेन सेत्वादिव्यपदेशनिराकरणेन अन्यप्रतिषेधसमाश्रयणेन च सर्वगतत्वमप्यात्मनः सिद्धं भवति । अन्यथा हि तन्न सिध्येत् । सेत्वादिव्य-पदेशेषु हि मुख्येष्वंगीक्रियमाणेषु परिच्छेद आत्मनः प्रसज्येत । सेत्वादीनामेवं-मात्मकत्वात् । तथान्यप्रतिषेधेऽप्यसति वस्तु वस्त्वंतराद्व्यावर्तत इति परिच्छेद एवात्मनः प्रसज्येत ॥**

**भाष्यार्थ**—या सेत्वादिव्यपदेशाच्या निराकरणानें व अन्यप्रतिषेधसमा-श्रयणानें आत्म्याचें सर्वगतत्वहि सिद्ध होतें. [–"सेत्वादि-व्यपदेशांचा निरास न केल्यास व अन्यप्रतिषेधाचा आश्रय न केल्यास ब्रह्माचें सर्वगतत्व आकाशाप्रमाणें होईल" अशी आशंका घेऊन '**अन्यथा०**' इत्यादि भाष्यानें म्हणतात–]=कारण त्यावांचून त्याची सिद्धि होणार नाहीं. [–'**सेत्वादि०**' इत्यादि भाष्यानें त्यांतील सेत्वादि-व्यपदेशाच्या अनिरासपक्षीं सर्वगतत्वाची असिद्धि स्पष्ट करितात–] =कारण सेत्वादिव्यपदेश मुख्य आहेत, असें स्वीकारल्यास आत्म्याचा परिच्छेद प्रसक्त –प्राप्त होईल. कारण सेत्वादिकांना 'एवंरूपत्व'–मुख्यत्व आहे. [त्यामुळें आत्मपरि-

च्छेद प्राप्त होतो.–आतां ‘तथा०’ इत्यादि भाष्यानें परनिषेधाच्या अनाश्रय-पक्षींहि सर्वगतत्वाची असिद्धि साधितात–]=त्याचप्रमाणें अन्यप्रतिषेधहि न केल्यास एक वस्तु दुसऱ्या वस्तूहून व्यावृत्त होते. त्यामुळें आत्म्याचा परिच्छेदच प्राप्त होईल. [–“अहोपण, आत्म्याच्या परिच्छेदाची प्राप्ति आम्हांला इष्टच आहे” अशी आशंका घेऊन ‘सर्वगतत्वं०’ इत्यादि भाष्यानें अवशिष्ट सूत्रभागाचें व्याख्यान–]

**भाष्यं—सर्वगतत्वं चास्य आयामशब्दादिभ्योऽवम्यते । आयामशब्दो व्याप्तिवचनः शब्दः ‘यावान्वा अयमाकाशस्तावानेषोऽन्तर्हृदय आकाशः’ ‘आकाशवत्सर्वगतश्च नित्यः’ ‘ज्यायान्दिवः’ ‘ज्यायानाकाशात्’ “नित्यः सर्वगतः स्थाणुरचलोऽयं सनातनः” इत्येवमादयो हि श्रुतिस्मृतिन्यायाः सर्वगतत्वमात्मनोऽवबोधयन्ति ॥ ३७ ॥**

**भाष्यार्थ**—आणि या आत्म्याचें सर्वगतत्व ‘आयाम-’ शब्दादिकांवरून अवगत होतें. ‘आयाम-’शब्द म्ह० व्याप्ति सांगणारा शब्द. “जेवढा हा बाहेरील प्रसिद्ध आकाश आहे तेवढाच हा हृदयांत आकाश आहे.”–छां. ८.१.३.–“आकाशाप्रमाणें सर्वगत व नित्य” “आकाशाहून मोठा, द्युलोकाहून मोठा”–छां.३.१४.३.–“हा नित्य, सर्वगत, स्थाणु, अचल, सनातन”–गी. २. २४.–हे व अशाच प्रकारचे प्रसिद्ध श्रुति-स्मृति-न्याय आत्म्याच्या सर्वगतत्वाचा बोध करितात. [सूत्रांतील आदि शब्द स्मृति व न्याय यांच्या अपेक्षेनें योजिलेला आहे. भाष्यांत श्रुतीसह स्मृति सांगितली. पण ‘परिच्छिन्नत्व असून अनित्यत्वादिलक्षण सर्व विकार’ असा हा सूत्रोक्त न्याय आहे.–ब्र.भा.२.पा.३.सू.७.पृ.४४५–‘द्वैताचें अस्तित्व असतांनाच सर्व मूर्तसंयोगित्व हेंच सर्वगतत्व आहे’ असें म्हणणें युक्त नाहीं, कारण द्वैत-कल्पनेच्या अधिष्ठानत्वानें ब्रह्माचें सर्वगतत्व स्वीकारलेलें आहे, वास्तव ‘ब्रह्म अद्वितीय अनवच्छिन्न आहे’ हें सिद्ध झालें.–सु.ब्र.२९६-९८.] ३७.(७)

### (८. फलाधिकरण. सू. ३८-४१.)

—‘ब्रह्मातिरिक्त अर्थाचा निषेध केला असतां ब्रह्माला निर्विशेषत्व असल्यामुळें त्याला फलदातृत्वहि नाहीं’ अशी आशंका घेऊन व्यवहारतः त्याचें उपपादन करण्यास ‘फलमतः०’ इत्यादि सूत्रानें आरंभ करितात—

### सूत्रं—फलमत उपपत्तेः ॥ ३८

**सूत्रार्थ**—‘परमेश्वरापासून’ प्राण्यांना कर्माचें ‘फल’ प्राप्त होतें. ‘कारण त्याच्यापासूनच तें प्राप्त होणें युक्त आहे.’ ३८. सु. ब्र. २९८. [–या पूर्वीच्या

दोन अधिकरणांत तत्पदलक्ष्य ब्रह्म सांगितलें. आतां तत्पदवाच्य ईश्वर दाखवितात, असें अधिकरणाचें तात्पर्य '**तस्यैव०**' या भाष्यानें सांगतात–]

**भाष्यं—तस्यैव ब्रह्मणो व्यावहारिक्यां ईशित्रीशितव्यविभागावस्थायां अयमन्यः स्वभावो वर्ण्यते । यदेतदिष्टानिष्टव्यामिश्रलक्षणं कर्मफलं संसारगोचरं त्रिविधं प्रसिद्धं जंतूनां किमेतत्कर्मणो भवत्याहोस्विदीश्वरादिति भवति विचारणा । तत्र तावत्प्रतिपद्यते फलमत ईश्वराद्भवितुमर्हति ॥**

**भाष्यार्थ—**त्याच ब्रह्माचा व्यावहारिक ईशातृ-ईशितव्यविभागावस्थेंतील हा दुसरा स्वभाव वर्णिला जातो. [ "निर्विशेषत्वानें वर्णिलेल्या ब्रह्माला फलहेतुत्व कोणत्या कारणानें ?" या आशंकेचें निवारण 'व्यावहारिक ईशातृ-ईशितव्यविभागावस्थेंतील' या पदांनीं केलें आहे. ईश्वर ईशिता–नियामक, जीव व जगत् ईशितव्य–नियम्य अशा विभागानें युक्त असलेली जी व्यवहार-अवस्था, त्या अवस्थेंत त्याला फलहेतुत्व आहे, परमार्थावस्थेंत नाहीं. निर्विशेष, सत्य, अद्वितीय व पूर्ण स्वरूपाहून 'अन्य'–फलहेतुत्वसंज्ञक 'स्वभाव.'–याप्रमाणें तात्पर्य सांगून अधिकरणाचा विषय–]='**यदेतत्०**'–हें जें देवत्वादि इष्ट, तिर्यक्त्वादि अनिष्ट व मनुष्यत्व हें व्यामिश्र, या स्वरूपाचें त्रिविध संसारगोचर सर्व लोकांच्या अनुभवानें प्रसिद्ध असलेलें जीवांचें कर्मफल तें काय कर्मापासूनच होतें कीं ईश्वरापासून, अशी विचारणा–जिज्ञासा होते, असा संशय येतो. [ 'संसारगोचर' या विशेषणानें इष्ट-अनिष्ट-व्यामिश्र जन्मांचें कर्मफलत्व साधण्यासाठीं त्याचें संसारावस्थगतत्व–सांसारिकत्व सांगितलें आहे. 'त्रिविधं' या विशेषणानें त्रिविधकर्मफलविषयीं लोकानुभवाचें प्रमाण दिलें आहे. कर्म व ईश्वर या दोहोंचेंहि कर्मफलहेतुत्व श्रुत असल्यामुळें 'किमेतत्०' इत्यादि भाष्यानें येणारा संशय सांगितला आहे. फलदातृत्वाला सर्वगतत्वानें समानन्यायत्व जरी असलें म्ह० सर्वगतत्वन्यायानें त्याची सिद्धि जरी होत असली तरी कर्मपक्षाचें निराकरण करण्याची इच्छा करणारे भाष्यकार '**तत्र०**' इत्यादि भाष्यानें प्रथम सिद्धान्ताचा उपक्रम करितात–] =असा संशय आला असतां अगोदर सूत्रकार "फल '**अतः**'–ईश्वरापासून प्राप्त होणें योग्य आहे," असा सिद्धान्त सांगतात. [ वाच्यार्थकथनाला लक्ष्यार्थकथनाचें विशेषत्व असल्यामुळें म्ह० वाच्यार्थाचें कथन करणें हा लक्ष्यार्थकथनाचाच एक प्रकार असल्यामुळें व लक्ष्यार्थोक्तीला वाक्यार्थज्ञानहेतुत्व असल्यामुळें या अधिकरणाच्या पादादिसंगति आहेत. पूर्वपक्षांत 'कर्मालाच फलदानाचें सामर्थ्य असल्यामुळें ईश्वराला अकिंचित्करत्व–व्यर्थत्व आहे' व सिद्धान्तांत '**स्वतंत्र कर्माला**

तें सामर्थ्य नसल्यामुळें कर्मद्वारा परमेश्वरालाच फलदातृत्व आहे, त्यामुळें ईश्वराला व्यर्थत्व नाहीं.'–अहोपण, गुंडाळलेली चटई जरी उघडली तरी तिच्यामध्यें पुनः आपोआप गुंडाळण्याचा संस्कार–स्थितिस्थापकत्व जसें असतें तशी पुण्यादि-संस्कारापासून फलाची उत्पत्ति होते. म्हणून त्यासाठीं प्रदात्याची अपेक्षा नाहीं, अशा आशयानें वादी शंका घेतो–]

**भाष्यं—कुतः । उपपत्तेः । स हि सर्वाध्यक्षः सृष्टिस्थितिसंहारान्विचित्रान्विदधद् देशकालविशेषाभिज्ञत्वात्कर्मिणां कर्मानुरूपं फलं संपादयतीत्युपपद्यते । कर्मणस्त्वनुक्षणविनाशिनः कालान्तरभावि फलं भवतीत्यनुपपन्नम् । अभावाद्भावानुत्पत्तेः ॥**

**भाष्यार्थ**—कोणत्या कारणानें ईश्वरापासूनच फल मिळणें युक्त आहे? [–त्या-विषयीं सूत्रोक्त हेतु घेऊन त्याचें व्याख्यान–]=**'उपपत्तेः'**–उपपत्तीमुळें. कारण तोच ईश्वर सर्वाध्यक्ष, विचित्र उत्पत्ति-स्थिति-लय करणारा व देश-कालविशेषांचा अभिज्ञ–ज्ञाता असल्यामुळें कर्मकर्त्यांना कर्माच्या अनुरूप फल देतो, हें उपपन्न होतें. [ 'सर्वाध्यक्ष' या विशेषणानें देश-कालविशेषाभिज्ञत्वाची योग्यता सांगितली आहे. **'सृष्टि-स्थिति०'** इत्यादि विशेषणानें कर्मानुरूप फलदातृत्वाविषयीं हेतु सांगितला आहे. ' विमत–कर्मफल विशिष्टज्ञानवद्दातृक आहे–ज्याचा दाता विशिष्ट-ज्ञानानें युक्त आहे, असें आहे. कारण त्याला कर्मफलत्व आहे, सेवादिकर्मफला-प्रमाणें ' असा याचा भावार्थ.–कर्मपक्षीं ' क्रियेपासूनच फल कीं कर्मजन्य अपूर्वापासून ?' असा विकल्प करून ' **कर्मणस्तु०** ' इत्यादि भाष्यानें त्यांतील पहिल्या पक्षाला दूषित करितात–]=पण प्रत्येक क्षणीं विनाश पावणाऱ्या कर्मा-पासून कालांतरीं होणार फल उत्पन्न होतें, असें मानणें अयोग्य आहे. [–क्रिया-रूप कर्म क्षणिक आहे. तेव्हां ' नष्ट झालेलें तें फल उत्पन्न करील कीं फल उत्पन्न करून तें विनाश पावेल ? ' असा विकल्प करून त्यांतील पहिला पक्ष संभवत नाहीं, असें ' **अभावात्०** ' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=कारण अभावापासून भावाची उत्पत्ति होत नाहीं.[–**'स्यादेतत्०'**इत्यादि भाष्यानें दुसऱ्या पक्षाची शंका–]

**भाष्यं—स्यादेतत् कर्म विनश्यत्स्वकालमेव स्वानुरूपं फलं जनयित्वा विनश्यति । तत्फलं कालान्तरितं कर्त्रा भोक्ष्यत इति । तदपि न परिशुध्यति प्राग्भोक्तृसंबंधात्फलत्वानुपपत्तेः । यत्कालं हि यत्सुखं दुःखं वा आत्मना भुज्यते तस्यैव लोके फलत्वं प्रसिद्धम् । न ह्यसंबद्धस्यात्मना सुखस्य दुःखस्य वा फलत्वं प्रतियन्ति लौकिकाः ॥**

**भाष्यार्थ**—यावर वादी असें म्हणेल–विनाश पावणारें कर्म स्वकालींच–आपल्या अस्तित्व-अवस्थेंतच स्वानुरूप–स्वतःला अनुरूप असें फल उत्पन्न करून विनाश पावतें, [–" तर मग त्याच वेळीं त्या फलाचा भोग घडेल–कर्मकर्त्याला त्याच क्षणीं त्याचा अनुभव येईल," अशी आशंका घेऊन 'दुसऱ्या कर्माच्या प्रतिबंधामुळें किंवा त्या वेळींच तें भोगण्यास योग्य नसल्यामुळें तसें होत नाहीं, असें वादी 'तत्फलं०' इत्यादि भाष्यानें म्हणतो–]=तें त्याच वेळीं उत्पन्न झालेलें फल कालान्तरित होत्सातें–अन्य कालीं कर्त्याकडून भोगिलें जातें, 'इति'–असें वादी म्हणेल, [–पण, स्वर्गादिभोगालाच अर्थ्यमानत्व आहे, स्वर्गादिभोगच कर्मकर्त्याकडून इच्छिला जातो, त्यामुळें त्यालाच फलत्व आहे. म्हणून अभुज्यमानहि –न अनुभाविलें जाणारेंहि फल स्वरूपतः असतें, असें म्हणणें अयुक्त आहे असें सिद्धान्ती 'तदपि०' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=पण तें म्हणणेंहि परिशुद्ध–निर्दोष होत नाहीं. कारण भोक्त्याशीं संबंध होण्यापूर्वी त्याच्या फलत्वाचीच अनुपपत्ति आहे–भोक्ता अनुभव घेईपर्यंत तें फल आहे, असेंच ठरत नाहीं, [–शिवाय स्वर्गाला अतितीव्र सुखत्व व नरकाला–अतितीव्र दुःखत्व असल्यामुळें अनुभव न घेतल्या जाणाऱ्या त्या दोहोंच्याहि फलत्वाची असिद्धि आहे. त्यामुळें स्वरूपानें फलास्तित्वकथन अयुक्त आहे, असें आचार्य 'यत्कालं०' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=कारण ज्यावेळीं जें सुख किंवा दुःख स्वतः कर्त्याकडून भोगिलें जातें त्यावेळीं त्याचेंच फलत्व व्यवहारांत प्रसिद्ध–आधिक्यानें सिद्ध झालेलें आहे [–प्रसिद्धत्वच 'न हि०' इत्यादि भाष्यानें व्यतिरेकद्वारा विशद करितात–] =कारण लौकिक स्वतःशीं संबद्ध न झालेल्या सुखाचें किंवा दुःखाचें फलत्व मानीत नाहींत. [स्वसंबद्ध सुख-दुःखालाच फल समजतात, असा भावार्थ.–'अथ०' इत्यादि भाष्यानें दुसऱ्या कल्पाला उत्थापित करितात––]

**भाष्यं—अथोच्येत कर्मकार्यादपूर्वात्फलमुत्पत्स्यत इति। तदपि नोपपद्यते। अपूर्वस्याचेतनस्य काष्ठलोष्टसमस्य चेतनेनाप्रवर्तितस्य प्रवृत्त्यनुपपत्तेः। तदस्तित्वे एव प्रमाणाभावात्। अर्थापत्तिः प्रमाणमिति चेत्। न। ईश्वरसिद्धेरर्थापत्तिक्षयात् ३८**

**भाष्यार्थ**––आतां कर्माचें कार्य असें जें अपूर्व त्यापासून फल उत्पन्न होईल, असें म्हटलें जाईल, [–'तर स्वतंत्र अपूर्वाला फलदातृत्व आहे कीं चेतनाधिष्ठित अपूर्वाला?' असा विकल्प करून 'तदपि०' इत्यादि भाष्यानें त्यांतील पहिल्या कल्पाचें निरसन–]=तर तेंहि उपपन्न होत नाहीं. कारण काष्ठ किंवा लोष्ट–मातीचें ढेंकुळ, यांप्रमाणें अचेतन असलेल्या चेतनानें अप्रवर्तित–चेतनाकडून

प्रवृत्त न झालेल्या अपूर्वाच्या प्रवृत्तीची अनुपपत्ति आहे. [-दुसरा पक्षहि संभवत नाहीं, कारण त्यालाच अप्रामाणिकत्व आहे, असें '**तदस्तित्वे एव०**' इत्यादि भाष्यानें सांगतात-]=कारण त्याच्या अस्तित्वाविषयींच प्रमाणाचा अभाव आहे. [-"अहोपण, क्षणांत विनाश पावणाऱ्या यागाला कालान्तरभावी फलाचें हेतुत्व श्रुत आहे. तें स्थायि-स्थिर वस्तूवांचून अनुपपन्न होतें. त्यामुळें तें श्रुत फलहेतुत्वच अपूर्वाची कल्पना करवितें, अशी अर्थापत्ति याविषयीं प्रमाण आहे," अशी शंका-]='**अर्थापत्तिः०**'-अर्थापत्ति हेंच त्याविषयीं प्रमाण आहे, असें जर म्हणाल तर [-कर्मांनीं आराधना केला गेलेला जो स्थिर ईश्वर त्याच्यापासून यथोक्त फलाची सिद्धि होत असल्यामुळें असें मानितां येत नाहीं, असें '**न ईश्वर०**' इत्यादि भाष्यानें सांगतात-]=नाहीं. अर्थापत्तिप्रमाणानें अपूर्वाची सिद्धि होत नाहीं. कारण नित्य ईश्वरापासून कर्मफलाची सिद्धि होत असल्यामुळें अर्थापत्तीचा क्षय होतो. ३८. [-आणि श्रुतिविरुद्धत्वामुळें फलहेतुत्वानें नियोगाची कल्पना संभवत नाहीं, असें '**श्रुतत्वाच्च**' या सूत्रानें सांगतात-]

## सूत्रं--श्रुतत्वाच्च ॥ ३९

**सूत्रार्थ**--आणि ईश्वराचे फलहेतुत्व श्रुत असल्यामुळें ईश्वरच फलदाता आहे. ३९. सु.ब्र. २९८ [-'**न केवलं०**' इत्यादि भाष्यानें सूत्राचें व्याख्यान-]

**भाष्यं**—न केवलमुपपत्तेरेवेश्वरं फलहेतुं कल्पयामः । किं तर्हि श्रुतत्वादपि ईश्वरमेव फलहेतुं मन्यामहे । तथा च श्रुतिर्भवति— 'स वा एष महानज आत्मान्नादो वसुदानः' इत्येवंजातीयका ॥ ३९ ॥

**भाष्यार्थ**—आम्ही केवल कर्मफलत्वादिलक्षण पूर्वोक्त उपपत्तीमुळेंच ईश्वराला फलहेतु-फलदाता कल्पीत नाहीं, तर मग काय '**श्रुतत्वामुळेंहि**' ईश्वरालाच फलहेतु मानितों. '**तथा च०**'- ती श्रुतिच कशी आहे तें पहा-"तोच हा महान् अज आत्मा अन्नाला आसमंतात् प्राण्यांना देतो, म्हणून 'अन्न-आदः'-अन्नाद, वसु-धन, धनार्थी लोकांना धन देतो, म्हणून वसुदान"-बृ. ४. ४. २४.-ही अशा प्रकारची श्रुति आहे. [-येथील अन्न व धन हीं दोन्हीं कर्मफलें आहेत.]३९. [-'**धर्मं०**' इत्यादि सूत्रानें पूर्वपक्ष-]

## सूत्रं--धर्मं जैमिनिरत एव ॥ ४०

**सूत्रार्थ**—'म्हणूनच'-श्रुति व उपपत्ति या दोन कारणांनीं-हीं दोन प्रमाणें असल्यामुळेंच जैमिनि-आचार्य 'धर्म' फलदाता आहे, असें मानितो ४०.-सु.ब्र. २९९.[-'**जैमिनिस्तु०**' इत्यादि भाष्यानें सूत्राचें व्याख्यान-]

**भाष्यं—जैमिनिस्त्वाचार्यो धर्मं फलस्य दातारं मन्यते । अत एव हेतोः श्रुतेरुपपत्तेश्च । श्रूयते तावदयमर्थः 'स्वर्गकामो यजेत' इत्येवमादिषु वाक्येषु । तत्र च विधिश्रुतेर्विषयभावोपगमाद्यागः स्वर्गस्योत्पादक इति गम्यते । अन्यथा ह्यननुष्ठातृको याग आपद्येत । तत्रास्य उपदेशवैयर्थ्यं स्यात् ॥**

**भाष्यार्थ**—पण जैमिनि-आचार्य धर्माला फलाचा दाता मानितो. **'अत एव'**—याच हेतूमुळें-श्रुतीमुळें व उपपत्तीमुळें [—' श्रुतेः '—असे जें म्हटलें आहे तेंच विशद करितात—]=**' श्रूयते० '**—अगोदर धर्म फलदाता आहे, हा अर्थ 'ज्याला स्वर्गाची इच्छा असते त्यानें याग करावा' या अशा प्रकारच्या वाक्यांमध्यें श्रुत आहे. [—' पण एवढ्यावरून कर्माचें फलहेतुत्व कसें सिद्ध होतें ?' **'तत्र च०'** इत्यादि भाष्यानें उत्तर—]=आणि त्या वाक्यांतील विधिश्रुतीच्या विषयभावाचा अवगम होत असल्यामुळें-विधिश्रुति म्ह० विधीचा अर्थ, त्या प्रेरणारूप लिङादि-अर्थाचा याग हा विषय, त्याच्या भावाचा—विषयभावाचा बोध होत असल्यामुळें याग स्वर्गाचा उत्पादक—साधन आहे, असें अवगत होतें. [ " पण पुरुषप्रवृत्तीला—अर्थभावनेला भाव्याची आकांक्षा असते. एकपदोपात्तत्वानें यागाला संनिहितत्व आहे, त्यामुळें यागाचा पुरुषाच्या प्रवृत्तीशीं भाव्यत्वानें संबंध आहे, विषत्वानें नाहीं. " अशी आशंका घेऊन पूर्ववादी **' अन्यथा० '** इत्यादि भाष्यानें म्हणतो—]=कारण तसें न मानिल्यास अननुष्ठातृक—ज्याचा अनुष्ठानकर्ता नाहीं, असा याग आहे, असें म्हणण्याचा प्रसंग येईल! आणि याग अनुष्ठातृरहित आहे, असें झालें असतां त्याच्या उपदेशाला—विधीला व्यर्थत्व प्राप्त होईल. [ संनिधीपेक्षां योग्यतेला अन्तरंगत्व आहे, संनिधीपेक्षां योग्यता अन्तरंग आहे व यागाला क्लेशात्मकत्व असल्यानें त्याला फलासाठीं प्रवृत्त झालेल्या भावनेचें भाव्यत्व संभवत नसल्यामुळें पुरुषाच्या विशेषणत्वानें श्रुत असलेल्या स्वर्गादिकांच्याच भावनोद्देशरूप भाव्यत्वाची सिद्धि होते. अपुरुषार्थामध्यें—दुःखामध्यें पुरुषाची प्रवृत्ति होत नाहीं, म्हणून स्वर्गादिकालाच भाव्यत्व आणि यागाला साधनत्वानें साध्यत्व आहे, असा याचा भावार्थ.—पण 'कर्म कालान्तरीय फल देणार नाहीं. कारण त्याला क्षणिकत्व आहे,' असें जें वर—पृ. २१३—म्हटलें आहे त्याचें मध्यस्थ ' ननु० ' इत्यादि भाष्यानें स्मरण देतो—]

**भाष्यं—ननु अनुक्षणविनाशिनः कर्मणः फलं नोपपद्यत इति परित्यक्तोऽयं पक्षः । नैष दोषः । श्रुतिप्रामाण्यात् । श्रुतिश्चेत्प्रमाणं यथायं कर्मफलसंबंधः श्रुत उपपद्यते । तथा कल्पयितव्यः । न चानुत्पाद्य किमप्यपूर्वं कर्म**

**विनश्यत्कालान्तरितं फलं दातुं शक्नोति । अतः कर्मणो वा सूक्ष्मा काचिदुत्तरावस्था फलस्य वा पूर्वावस्थापूर्वं नामास्तीति तर्क्यते ॥**

**भाष्यार्थ**--" अहोपण, प्रतिक्षणीं विनाश पावण्याचाच ज्याचा स्वभाव आहे, अशा कर्मापासून कालान्तरीय फल उत्पन्न होऊं शकत नाहीं, असें म्हणून आम्हीं हा पक्ष पूर्वीं सर्वथा सोडिलेला आहे." [-' **नैष दोषः०** ' या भाष्यानें वादी श्रुतीच्या आधारानें त्याचें निरसन करितो-]=श्रुतिप्रामाण्यामुळें हा दोष येत नाहीं. [-तेंच ' श्रुतिश्चेत्० ' इत्यादि भाष्यानें व्यक्त करितो-]=श्रुति जर प्रमाण असेल तर जसा हा श्रुत असलेला कर्मफलसंबंध उपपन्न होईल तशीच त्याची कल्पना करणें युक्त आहे. [-वादी ती उपपत्तिच ' **न च०** ' इत्यादि भाष्यानें व्यतिरेकद्वारा दाखवितो-]=कांहींएक अपूर्व उत्पन्न न करितां विनाश पावणारें कर्म कालान्तरित-मध्यें बराच काल निघून गेल्यावर मिळणारें फल देण्यास समर्थ होत नाहीं. म्हणून कर्माची एखादी सूक्ष्म उत्तरावस्था किंवा फलाची पूर्वावस्था, अशा अपूर्वाचें अनुमान केलें जातें-' अपूर्व ' या नांवाच्या कर्माच्या उत्तरावस्थेची किंवा फलाच्या पूर्वावस्थेची कल्पना करावी लागते. [कर्माच्या अवान्तर व्यापाराचा स्वीकार करून ' कर्मणः वा०' असें म्हटलें आहे व अशा अपूर्वाची कल्पना केल्यावांचून फलोत्पत्तीची अनुपपत्ति होत असल्यामुळें त्याची अवश्य कल्पना करावी लागणें,या कारणानें 'फलस्य वा०' इत्यादि म्हटलें आहे.-आतां वर ' उपपत्तेश्च० ' असा जो वाद्यानें दुसरा हेतु सांगितला आहे, त्याचें ' **उपपद्यते च०** ' इत्यादि भाष्यानें विवरण-]

**भाष्यं—उपपद्यते चायमर्थ उक्तेन प्रकारेण । ईश्वरस्तु फलं ददातीत्यनुपपन्नम् । अविचित्रस्य कारणस्य विचित्रकार्यानुपपत्तेः । वैषम्यनैर्घृण्यप्रसंगात् । अनुष्ठानवैयर्थ्यापत्तेश्च । तस्माद्धर्मादेव फलमिति ॥ ४०**

**भाष्यार्थ**-आणि हा अर्थ 'तत्र विधिश्रुतेः०'-पृ.२१६-इत्यादि भाष्यानें सांगितलेल्या प्रकारानें उपपन्न होतो.[-याप्रमाणें श्रुति व युक्ति यांनीं स्वपक्ष सांगून '**ईश्वरस्तु०**' इत्यादि भाष्यानें पूर्ववादी सिद्धान्ताचें प्रत्याख्यान करितो-]=पण ईश्वर फल देतो, हें म्हणणें अनुपपन्न आहे. कारण अविचित्र कारणाच्या विचित्र कार्याची अनुपपत्ति आहे. [ एकरूप कारणापासून अनेकरूप कार्य होत नाहीं. कारण तसें मानिल्यास इतर कार्यांना आकस्मिकत्व-निष्कारणत्व प्राप्त होतें, असा भावार्थ आणि ईश्वराला शुभाशुभ-फलदातृत्व मानिल्यास त्याच्या ठिकाणीं राग-द्वेषादि-मत्त्वाची प्राप्ति होते, त्यामुळेंहि ईश्वरापासून फल नाहीं, असें पूर्ववादी ' **वैषम्य०** ' इत्यादि भाष्यानें सांगतो-]=ईश्वराच्या वैषम्य-नैर्घृण्याचा प्रसंग-अ.२.१.३४-येत

असल्यामुळेंहि ईश्वर फलदाता नाहीं. [–ईश्वराला फलदातृत्व असल्यास कर्मानुष्ठानाचें व्यर्थत्व हें दोषान्तर–]=आणि कर्मानुष्ठानाला व्यर्थत्व प्राप्त होतें, कर्मानुष्ठान निरर्थक–व्यर्थ आहे असेंहि होतें. [–या सर्व उक्त दोषांच्या निवृत्तीसाठीं अपूर्वापासूनच फल ईश्वरापासून नाहीं, या पक्षाचा 'तस्मात्०' इत्यादि भाष्यानें उपसंहार–]=तस्मात् धर्मापासूनच फल, असें सिद्ध होतें. ४०. [–'पूर्वं तु०' या सूत्रानें सिद्धान्त—]

**सूत्रं—पूर्वं तु बादरायणो हेतुव्यपदेशात् ॥४१॥ (८)**

**सूत्रार्थ**—'पण बादरायण-'आचार्य 'पूर्वोक्त ईश्वरालाच' फलहेतु–फलदाता मानितो. कारण तो धर्माधर्मांचाहि कारयितृत्वानें हेतु सांगितला जातो. ४१. (८) सु.ब्र.२९९.[–'बादरायणस्तु०' इत्यादि भाष्यानें उत्तरपक्षाच्या प्रतिज्ञेचें विवरण–]

**भाष्यं—बादरायणस्त्वाचार्यः पूर्वोक्तमेवेश्वरं फलहेतुं मन्यते । केवलात्कर्मणोऽपूर्वाद्वा केवलात्फलमित्ययं पक्षः तुशब्देन व्यावर्त्यते । कर्मापेक्षादपूर्वापेक्षाद्वा यथा तथास्त्वीश्वरात्फलमिति सिद्धान्तः ॥**

**भाष्यार्थ**—पण बादरायण-आचार्य पूर्वोक्तच ईश्वराला फलहेतु मानितो. [–परपक्षनिषेधाची प्रतिज्ञा प्रकट करितात–]='केवलात्०'–केवल–ईश्वरानपेक्ष कर्मापासून किंवा केवल–ईश्वरानपेक्ष अपूर्वापासून फल मिळतें, असा हा पक्ष सूत्रांतील 'तु-'शब्दानें व्यावृत्त केला जातो. [–"तर मग, केवल ईश्वराला तरी फलहेतुत्व कसें?" 'कर्मापेक्षात्०' इत्यादि भाष्यानें उत्तर–]=ज्याप्रमाणें परपक्षांत –जैमिनिमतांत कर्मापेक्ष किंवा अपूर्वापेक्ष कर्मापासून फल प्राप्त होणें युक्त आहे, असें मानिलें आहे, तसेंच कर्म किंवा अपूर्व यांतील कोणातरी एकाची ज्याला अपेक्षा आहे, अशा ईश्वरापासूनच फल प्राप्त होतें,असा सिद्धान्त असो. [त्यामुळें पूर्वोक्त वैषम्यादि दोष संभवत नाहींत.–'कुतः०'–इत्यादि भाष्यानें त्याविषयीं प्रश्नपूर्वक प्रमाण सांगतात—]

**भाष्यं—कुतः । हेतुव्यपदेशात् । धर्माधर्मयोरपि हि कारयितृत्वेनेश्वरो हेतुर्व्यपदिश्यते । फलस्य च दातृत्वेन 'एष ह्येव साधु कर्म कारयति तं यमेभ्यो लोकेभ्य उन्निनीषते । एष उ एवासाधु कर्म कारयति तं यमधो निनीषते' इति॥**

**भाष्यार्थ**—कोणत्या कारणानें? 'हेतुव्यपदेशामुळें'[–ईश्वरनिरपेक्ष अचेतन अपूर्वाची प्रवृत्ति होत नसल्यामुळें त्याच्याच फलदातृत्वाची कल्पना केल्यास प्रत्यक्षविरोध येतो. यागाला देवतापूजात्मकत्व आहे, याग देवतापूजारूप आहे. त्यामुळें पूजा केल्या जाणाऱ्या देवतेच्या प्रसादद्वारा कर्माला फलवत्त्व आहे. त्यामुळें वाद्यानें वर सांगितलेल्या अर्थापत्तीचा ईश्वरानें उपक्षय होतो. म्हणून अपूर्व अप्रमाण आहे,

असें मानून भाष्यकार 'धर्माधर्मयोरपि०' इत्यादि भाष्यानें वरील सूत्रोक्त हेतूचें व्याख्यान करितात–]=कारण धर्म व अधर्म यांच्याहि कारयितृत्वानें–प्रयोजकत्वानें व फलाच्या दातृत्वानें ईश्वर हेतु सांगितला जातो. "ज्याला या लोकाहून ऊर्ध्वलोकीं नेण्याची इच्छा करितो त्याच्याकडून हा ईश्वरच शुभ कर्म करवितो व ज्याला या लोकाहून अधोलोकीं नेण्याची इच्छा करितो त्याच्याकडून हाच अशुभ कर्म करवितो"–कौ. ३. ८.–असा श्रुति ईश्वराच्या हेतुत्वाचा व्यपदेश करिते. [–याप्रमाणें श्रौत हेतुव्यपदेश सांगून 'स्मर्यते च०' इत्यादि भाष्यानें स्मार्त हेतुव्यपदेश सांगतात––]

**भाष्यं**—**स्मर्यते चायमर्थो भगवद्गीतासु–"यो यो यां यां तनुं भक्तः श्रद्धयार्चितुमिच्छति । तस्य तस्याचलां श्रद्धां तामेव विदधाम्यहम् । स तया श्रद्धया युक्तस्तस्याराधनमीहते । लभते च ततः कामान्मयैव विहितान्हि तान्" इति ॥**

**भाष्यार्थ**—आणि हा अर्थ भगवद्गीतेमध्यें स्मृत आहे. "जो जो भक्त ज्या ज्या देवतातनूची श्रद्धेनें पूजा करण्याची इच्छा करितो त्याच्या त्याच्या त्याच श्रद्धेला मी अचल–दृढ करितों. त्या श्रद्धेनें युक्त झालेला तो त्याचें–त्या त्या देवतास्वभाव माझें आराधन करितो आणि त्या आराधितापासून–अनुष्ठित पूजेपासून मींच दिलेल्या त्या प्रसिद्ध कामांस–सुखरूप विषयांस तो प्राप्त होतो." –गी. ७. २१-२२. असें स्मृत आहे. [–'सर्ववेदान्तेषु०' इत्यादि भाष्यानें 'हेतुव्यपदेशात्' या सूत्रावयवाचें व्याख्यान्तर–]

**भाष्यं**—**सर्ववेदान्तेषु चेश्वरहेतुका एव सृष्टयो व्यपदिश्यन्ते । तदेव चेश्वरस्य फलहेतुत्वं यत्स्वकर्मानुरूपाः प्रजाः सृजतीति । विचित्रकार्यानुपपत्त्यादयोऽपि दोषाः कृतप्रयत्नापेक्षत्वादीश्वरस्य न प्रसज्यन्ते ॥ ४१ ॥ (८)**

इति श्रीमच्छंकरभगवतः कृतौ शारीरकमीमांसाभाष्ये तृतीयाध्यायस्य द्वितीयः पादः ॥

**भाष्यार्थ**—आणि सर्ववेदान्तांमध्यें ईश्वरहेतुकच सृष्टि सांगितल्या जातात. [–"अहोपण, ईश्वराला सृष्ट्यादिकांचे हेतुत्व जरी असलें तरी फलहेतुत्व कसें?" 'तदेव०' इत्यादि भाष्यानें उत्तर–]=ईश्वर स्वकर्मानुरूप प्रजा उत्पन्न करितो, असें जें उक्त आहे तेंच ईश्वराचें फलहेतुत्व आहे. [–आतां वर–पृ. २१७–'अविचित्र कारणाच्या०' इत्यादि जें म्हटलें आहे त्याचें निरसन 'विचित्रकार्या०' इत्यादि भाष्यानें करितात–] अविचित्र कारणापासून विचित्रकार्याची उत्पत्ति होऊं शकत नाहीं, इत्यादि दोषहि ईश्वराच्या कृतप्रयत्नापेक्षत्वामुळेंच प्राप्त होत नाहींत. [–सु. ब्र. २९९-३००. ] ४१ ( ८ )

**इति ब्रह्मसूत्रशारीरभाष्यार्थाच्या तिसऱ्या अध्यायाचा दुसरा पाद समाप्त झाला.**

---

ॐतत्सत्

# साधनाख्यतृतीयाध्याये तृतीयः पादः ।

( १ सर्ववेदान्तप्रत्ययाधिकरण. सू. १-४. )

**–ब्रह्माचें** तात्त्विक व अतात्त्विक रूप सांगून प्रत्येक वेदान्तांत प्रतीत होणाऱ्या **त्याच्या** उपासनांचा नामादिकांच्या अभेदामुळें अभेद 'सर्ववेदान्तप्रत्ययं०' इत्यादि **सूत्रानें** सांगतात—

**सूत्रं—सर्ववेदान्तप्रत्ययं चोदनाद्यविशेषात् ॥ १**

**सूत्रार्थ**—सर्व वेदान्तांनीं प्रतीत होणाऱ्या उपासना भिन्न नाहींत. कोणत्या **कारणानें** चोदना-संयोग-रूप-समाख्या इत्यादिकांच्या अविशेषामुळें—सादृश्यामुळें—साम्यामुळें १.–मु. ब्र. ३०१. [–'व्याख्यातं०' इत्यादि भाष्यानें पूर्वोत्तरपादांची संगति सांगण्यासाठीं गतार्थाचा अनुवाद–]

**भाष्यं—व्याख्यातं विज्ञेयस्य ब्रह्मणस्तत्त्वम् । इदानीं तु प्रतिवेदान्तं विज्ञानानि भिद्यन्ते न वेति विचार्यते । ननु विज्ञेयं ब्रह्म पूर्वापरादिभेदरहितं एकरसं सैन्धवघनवदवधारितं । तत्र कुतो विज्ञानभेदाभेदचिन्तावसरः ॥**

**भाष्यार्थ**—विज्ञेय ब्रह्माच्या स्वरूपाचे व्याख्यान केलें. [–ज्ञेय ब्रह्म सांगितलें असतां आतां त्याचें ज्ञान 'किंरूप'–कोणत्या स्वरूपाचें आहे, अशी अपेक्षा होते. म्हणून त्याचा विचार करण्यासाठीं पुढील दोन पादांची प्रवृत्ति झाली आहे, असें '**इदानीं०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=पण आतां प्रत्येक वेदान्तांतील–उपनिषदांतील विज्ञानें–उपासनें भेद पावतात कीं नाहींत, याचा विचार केला जातो. [ '**तत्**' व '**त्वं**' या पदांच्या अर्थाचें शोधन केल्यानंतर अपुनरुक्त अपेक्षित पदें व पदांचा अर्थ यांच्या उपसंहारानें सगुण-निर्गुणवाक्यांचा अर्थ निश्चित केला जातो. त्यांतील सगुणविद्यांचा चित्तशुद्धीच्या द्वारा निर्गुण विद्येला उपयोग असल्यामुळें व त्यांना पदार्थांच्या उपसंहारानें वाक्यार्थज्ञानोपयोगित्व असल्यामुळें सगुणवाक्यार्थांचा विचार अर्थवान् आहे–व्यर्थ नाहीं, पण निर्गुणचिन्ता–निर्गुणवाक्यविचार वाक्यार्थज्ञानद्वारा मुक्तिहेतु आहे असा भावार्थ.–निरुपाधिक ब्रह्मज्ञान विचार्यत्वानें सांगितलें आहे, असें मानून '**ननु०**' इत्यादि भाष्यानें प्रस्तुत

पादारंभावर आक्षेप-]=अहोपण, विज्ञेय ब्रह्म पूर्व-अपर इत्यादि भेदरहित **आहे.** [-स्वरूपभेदाच्या अभावामुळें स्वरूपकृत ज्ञानभेदहि नाहीं, असें ' **एकरसं०** ' इत्यादि भाष्यानें आक्षेपक म्हणतो-]=तें सैन्धवघनवत् एकरस निश्चित **केलें आहे.** [-विज्ञेय ब्रह्माच्या सर्व प्रकारच्या भेदाचा अभाव आहे, असें सिद्ध झालें **असतां** वादी ' तत्र० ' इत्यादि भाष्यानें त्याचें फलित सांगतो-]=तेव्हां विज्ञानभेद **व** अभेद यांच्या विचाराला अवसर कोठचा ? [ वेदान्तांच्या शक्तितात्पर्याचें **आलो-चन** केलें असतांहि ही चिन्ता संभवत नाहीं, असें आक्षेपक **'न हि०'** **इत्यादि** भाष्यानें म्हणतो-]

**भाष्यं—न हि कर्मबहुत्ववद्ब्रह्मबहुत्वमपि वेदान्तेषु प्रतिपिपादयिषितमिति शक्यं वक्तुम् । ब्रह्मण एकत्वादेकरूपत्वाच्च । न चैकरूपे ब्रह्मण्यनेकरूपाणि विज्ञानानि संभवन्ति । न हि अन्यथार्थोऽन्यथा ज्ञानं । इत्यभ्रान्तं भवति । यदि पुनरेकस्मिन्ब्रह्मणि बहूनि विज्ञानानि वेदान्तान्तरेषु प्रतिपिपादयिषितानि । तेषामेकमभ्रान्तं भ्रान्तानीतराणीत्यनाश्वासप्रसंगो वेदान्तेषु । तस्मान्न तावत्प्रति-वेदान्तं ब्रह्मविज्ञानभेद आशंकितुं शक्यते ॥**

**भाष्यार्थ**—कारण कर्माच्या बहुत्वाप्रमाणें ब्रह्माचेंहि बहुत्व वेदान्तांमध्यें प्रति-पिपादयिषित-प्रतिपादन करण्यास इष्ट आहे, असें म्हणतां येणें **शक्य नाहीं.** कारण ब्रह्माला एकत्व आहे. [-"अहोपण, एकाला ' पिता, पुत्र, भ्राता ' इत्यादि अनेक विज्ञानांचें विषयत्व जसें असतें त्याप्रमाणेंच ब्रह्मालाहि असेल " अशी आशंका घेऊन वादी म्हणतो-]=' **एकरूपत्वाच्च०** '-आणि एकरूपत्वामुळेंहि तसें म्हणतां येणें शक्य नाहीं. [-" पण एकरूप एकाविषयींच्याहि स्मृत्यादि अनेक ज्ञानांप्रमाणें अनेक ज्ञानांची सिद्धि होईल ? " अशी आशंका घेऊन ' **न च०** ' इत्यादि भाष्यानें वादी म्हणतो-]=आणि एकरूप ब्रह्मामध्यें अनेक रूप विज्ञानें संभवत नाहींत. [ दृष्टान्तांत पूर्वकालविशिष्टाहून एतत्कालविशिष्ट वस्तु निराळी असते त्यामुळें त्यांत ज्ञानभेद संभवतो. पण निरुपाधिक ब्रह्मामध्यें तो संभवत नाहीं, असा भावार्थ.-" अहोपण, अर्थाला एकरूपत्व जरी असलें तरी ज्ञान अनेकरूप संभवतें. कारण अर्थ व ज्ञान यांचा भेद आहे" अशी आशंका घेऊन वादी म्हणतो-]=' **न हि०** '-कारण अर्थ-पदार्थ-विषय एक प्रकारचा व ज्ञान दुसऱ्या प्रकारचें असें हें अभ्रान्त होत नाहीं, तर तसलें ज्ञान भ्रान्तच असतें. [-वादी याचाच अधिक विस्तार करितो-]=' **यदि पुनः०** '-परंतु जर वेदान्तान्तरांमध्यें-निरनिराळ्या उपनिषदांत एका ब्रह्मामध्यें बहु-अनेक विज्ञानें

प्रतिपिपादयिषित–प्रतिपादन करण्यास इष्ट असतील तर त्या ज्ञानांतील एकच ज्ञान अभ्रान्त–सम्यक् व इतर विज्ञानें भ्रान्त–मिथ्या आहेत, असें होऊन वेदान्तांवर अनाश्वास–अश्रद्धा हा दोष येईल. [–'**तस्मात्०**' इत्यादि भाष्यानें पूर्वपक्षांतील ज्ञानभेदशंकेच्या असंभवाचें निगमन–]=म्हणून अगोदर प्रत्येक वेदान्तांत ब्रह्मविज्ञानाचा भेद आहे, अशी आशंका मनांत येणेंहि शक्य नाहीं. [–आतां वादी सिद्धान्तांतहि चोदनादिकांच्या अभेदामुळें ज्ञानाचा अभेद सिद्ध होत नाहीं, असें '**नापि०**' इत्यादि भाष्यानें म्हणतो–]

**भाष्यं—नाप्यस्य चोदनाद्यविशेषादभेद उच्येत । ब्रह्मविज्ञानस्याचोदनालक्षणत्वात् । अविधिप्रधानैर्हि वस्तुपर्यवसायिभिर्ब्रह्मवाक्यैः ब्रह्मविज्ञानं जन्यते इत्यवोचदाचार्यः 'तत्तु समन्वयात्' इत्यत्र । तत्कथमिमां भेदाभेदचिंतामारभत इति ॥**

**भाष्यार्थ**—शिवाय चोदनादिकांच्या अविशेषामुळें ज्ञानाचा अभेद आहे, असेंहि म्हणतां येत नाहीं. कारण ब्रह्मविज्ञानाला चोदनालक्षणत्व नाहीं, ते ज्ञान विधीचा विषय होत नाहीं, म्हणून चोदनाभेदामुळें ज्ञानाभेद सांगतां येत नाहीं. [–"तर मग प्रस्तुत सूत्रांशीं विरोध येतो," अशी आशंका घेऊन वादी 'पूर्वापरविरोधामुळें हें सूत्र त्याज्य आहे,' अशा अभिप्रायानें '**अविधि०**' इत्यादि भाष्यानें म्हणतो–]=कारण बादरायणाचार्यांनीं 'तत्तु समन्वयात्'–१.१.४.पृ.१०९ –या सूत्रांत अविधिप्रधान वस्तुपर्यवसायी–ब्रह्मामध्यें पर्यवसान पावणाऱ्या ब्रह्मवाक्यांकडून ब्रह्मविज्ञान उत्पन्न केलें जातें, असेंच सांगितलें आहे.[–'**तत्कथं०**' इत्यादि भाष्यानें आक्षेपाचा उपसंहार–]=तेव्हां आतां त्याच्या विरुद्ध ही भेदाभेदचिंता–हा ज्ञानाचा भेदाभेदविचार कसा आरंभीत आहेत ? '**इति**'–असा आक्षेप येतो. [–त्या त्या निरनिराळ्या अनेक उपाधींनीं अवच्छिन्न झालेल्या ब्रह्माला विषय करून–ब्रह्मविषय व प्राणादिविषय उपासना विचाराला योग्य आहेत, असें सिद्धान्ती '**तदुच्यते०**' इत्यादि भाष्यानें सांगतात––]

**भाष्यं—तदुच्यते–सगुणब्रह्मविषया प्राणादिविषया चेयं विज्ञानभेदाभेदचिंतेत्यदोषः। अत्र हि कर्मवदुपासनानां भेदाभेदौ संभवतः।कर्मवदेव चोपासनानि दृष्टफलान्यदृष्टफलानि चोच्यन्ते । क्रममुक्तिफलानि च कानिचित्सम्यग्ज्ञानोत्पत्तिद्वारेण । तेष्वेषा चिंता संभवति–किं प्रतिवेदान्तं विज्ञानभेदः, आहोस्विन्नेति ॥**

**भाष्यार्थ**––म्हणून–असा आक्षेप येत असल्यामुळें त्याचा परिहार सांगितला जातो–विज्ञानभेद व विज्ञानाचा अभेद यांची ही चिंता–हा विचार सगुणब्रह्मविषय व प्राणादिविषय आहे, सगुण ब्रह्म व प्राणादि यांविषयीं हा विचार आहे,

[-निरुपाधि ब्रह्मज्ञानामध्यें ज्ञेयाच्या ऐक्यामुळें ज्ञानाचें ऐक्य सिद्ध झालें आहे. म्हणून त्याविषयीं ही भेदाभेदचिंता नाहीं. पण त्या ज्ञानांतहि लक्ष्य अखंड वाक्यार्थाच्या सिद्धीसाठीं वाच्यार्थ व तद्वाचक पदें यांचा उपसंहाररूप गुणोपसंहार पुढें याच पादांत प्रवृत्त होईल. त्या कारणानें उक्त विचाराच्या आरंभाची सिद्धि होते, असें '**इत्यदोषः०**' या भाष्यानें सांगतात-]=म्हणून हा विचार आरंभिण्यांत कांहीं दोष नाहीं. [-"पण विचार केलें जाणारें सगुण ब्रह्महि अद्वय ब्रह्मच आहे, तेव्हां त्यांतील उपासनाभेदाभेदांची चिंता कशी संभवते?" अशी आशंका घेऊन आचार्य '**अत्र हि०**' इत्यादि भाष्यानें म्हणतात-]=कारण सोपाधिक ब्रह्मामध्यें, कर्मांप्रमाणेंच, उपासनांचा भेद व अभेद संभवतात. [-केवल विषयभेदामुळेंच भेद नाहीं, तर फलभेदामुळेंहि तो आहे, असें '**कर्मवत्०**' इत्यादि भाष्यानें सांगतात-]=कर्मांप्रमाणेंच उपासनेंहि दृष्टफल-याचजन्मीं फल देणारीं व अदृष्टफल -परलोकीं कालान्तरीं फल देणारीं अशीं दोन प्रकारचीं सांगितलीं जातात. [-"तर मग विरक्त मुमुक्षूला या विचाराचा कांहीं उपयोग नाहीं," अशी आशंका घेऊन '**क्रममुक्तिफलानि०**' इत्यादि सांगतात-]=आणि कांहीं उपासनें सम्यग्दर्शनाच्या उत्पत्तिद्वारा क्रममुक्ति हें फल देणारीं उक्त आहेत. [म्हणून विरक्त मुमुक्षूलाहि हा विचार हेय-त्याज्य व उपादेय-ग्राह्य, यांचा विवेक करण्यास उपयोगी-विवेकोपकारक आहे, त्या विवेकाला त्याचें साह्य होतें असा भावार्थ.-निर्गुणविद्येमध्यें क्वचित् -कोठें भेदभ्रमाचें निरसन करून अभेदाचें निरूपण केलें जातें व साधारणस्वरूपाच्या लक्षणेसाठीं अपुनरुक्त शब्दांचा किंवा सत्यादिधर्मांचा उपसंहार वर्णिला जातो. पण सगुणविद्यांमध्यें क्वचित् अभेद, क्वचित् भेद, कोठें गुणांचा उपसंहार व कोठें अनुपसंहार, असा '**तेषु०**' इत्यादि भाष्यानें उपसंहार करितात-] =त्या उपासनांविषयीं ही चिंता-हा विचार संभवतो. [-याप्रमाणें पादाच्या आरंभाचें समर्थन करून प्रत्येक शाखेंत प्रतीत होणाऱ्या ज्ञानांना विषय करून नामादिकांचा भेद व चोदनादिकांचा अविशेष-अभेद असल्यामुळें आद्य अधिकरणाचा संशय हा अवयव '**किं प्रतिवेदान्तं०**' इत्यादि भाष्यानें सांगतात-]=काय, प्रत्येक वेदान्तांत विज्ञानाचा भेद आहे किंवा तो नाहीं? '**इति**'-असा संशय येतो. [-या अधिकरणांत सामान्यतः सर्वशाखांतील विद्यांचें ऐक्य सिद्ध झालें असतां पूर्वोक्त न्यायानें विद्येपासून मुक्तीचा संभव असल्यामुळें पादादिसंगति आहेत, असें मानून '**तत्र०**' इत्यादि भाष्यानें पूर्वपक्ष करितात--]

**भाष्यं**—तत्र पूर्वपक्षहेतवस्तावदुपन्यस्यन्ते । नाम्नस्तावद्भेदप्रतिपत्तिहेतुत्वं प्रसिद्धं ज्योतिरादिषु । अस्ति चात्र वेदान्तान्तरविहितेषु विज्ञानेष्वन्यदन्यन्नाम । तैत्तिरीयकं वाजसनेयकं कौथुमकं शाट्यायनकमित्येवमादि ॥

**भाष्यार्थ**—याप्रमाणें संशय आला असतां अगोदर पूर्वपक्षाच्या हेतूचा उपन्यास केला जातो. [ पूर्वपक्षांत 'प्रत्येक वेदान्तामध्यें विद्याभेद असल्यामुळें गुणांचा अनुपसंहार' व सिद्धान्तांत 'सर्ववेदान्तांत विद्यैक्य असल्यामुळें गुणांचा उपसंहार' असें फल पुढील अधिकरणांत सांगतील. पूर्वमीमांसेच्या शाखान्तराधिकरणांत 'नाम-रूप-धर्मविशेष-पुनरुक्ति-निंदा-शक्ति-समाप्तिवचन-प्रायश्चित्त-अन्यार्थदर्शन-शब्दान्तर-संख्या-प्रक्रिया, या कारणांमुळेंहि कर्मभेद होतो'–पू. मी. २. ४. ८–अशा अर्थाच्या पूर्वपक्षसूत्रानें पूर्वपक्षांत कर्मभेदाविषयीं जे नामादि हेतु प्रदर्शित केले आहेत ते विद्याभेदलक्षण पूर्वपक्षाच्या उपयोगी असल्यामुळें त्याचा येथें अनुवाद केला जातो, असा भावार्थ.–त्यांतील नामाच्या भेदकत्वाचें 'नाम्ना०' इत्यादि भाष्यानें उदाहरण देतात–]=त्यांतील पहिल्या नामाचें भेदज्ञानकारणत्व ज्योतिरादिकांमध्यें प्रसिद्ध आहे.[–'ज्योतिरादिषु' येथील 'आदि-' पदानें एकप्रकरणस्थ अग्निहोत्र-दर्शपूर्णमास इत्यादिकांचें ग्रहण करावें. 'अथैषज्योतिः' 'अथैष सर्वज्योतिः' 'एतेन सहस्रदक्षिणेन यजेत' या विधिवाक्यांत प्रकृत ज्योतिष्टोमाच्या अनुवादानें सहस्रदक्षिणा हा गुणविधि आहे कीं तो गुण ज्यांत आहे अशा दुसऱ्या कर्माचा विधि आहे, असा संदेह आला असतां 'प्रकृत ज्योतिष्टोमाचेंच तदेकदेशवाची ज्योतिःशब्दानें भामायादिशब्दांप्रमाणें कथन केलेलें असल्यामुळें व कर्मान्तरविधीहून गुणमात्रविधानाला लघुत्व असल्यामुळें आणि बाराशें गायी या दक्षिणेचा सहस्रगायी या दक्षिणेनें विकल्प होत असल्यामुळें हा प्रकृतानुवादानें गुणविधि आहे' असा पूर्वपक्ष प्राप्त होतो. पण 'दुसरी गति–वाट असतांना एका संज्ञीला अनेक संज्ञा उपपन्न होत नाहींत. त्यामुळें शब्द एका अर्थी अनुपपन्न झाल्यास तो लाक्षणिक होतो, पण एवढ्यावरून ज्योतिःशब्दाची अनुपपत्ति नसतांना त्याला ज्योतिष्टोमाचें लक्षकत्व आहे, असें सिद्ध होत नाहीं. शिवाय 'अथ' या शब्दानें प्रकरणाचा विच्छेद केला आहे. त्यामुळें हा प्रकृत ज्योतिष्टोमाचाच गुणविधि संभवत नाहीं. म्हणून 'अथैष ज्योतिः' हा सहस्रदक्षिणागुणविशिष्ट कर्मान्तरविधि आहे,' असा सिद्धान्त केला आहे. अग्निहोत्र-दर्श-पूर्णमास इत्यादि उदाहरणांत संज्ञेच्या भेदानें संज्ञीचा भेद, या निमित्तानें विप्रतिपत्ति–परस्पर विरोध आहे, असा भावार्थ.–"अहोपण, संज्ञा-

न्तरामुळें म्ह० दुसऱ्या नांवामुळें असा कर्मभेद जरी होत असला तरी त्यावरून प्रकृत विषयांत काय निष्पन्न झालें ? " अशी आशंका घेऊन **'अस्ति च०'** इत्यादि भाष्यानें आचार्य म्हणतात–]=येथें–या प्रकृत विद्याप्रकरणांतहि दुसऱ्या वेदान्तांनी विहित अशा विज्ञानांमध्यें निरनिराळें नांव आहे. जसें–तैत्तिरीयक, वाजसनेयक, कौथुमक, शाट्यायनक इत्यादि. [तैत्तिरीयकादिशब्दांना शाखा-नामत्व जरी असलें– तीं शाखांचीं नांवें जरी असलीं तरी तीं विज्ञानांचींहि नांवें आहेत. कारण त्या दोन्हीं अर्थी त्यांचा प्रयोग एकसारखाच होतो. त्याचप्रमाणें त्या नांवांच्या प्रवृत्तीचें निमित्त जें प्रवचन तें ग्रंथ व ज्ञान या दोहोंनाहि अविशिष्ट –समान आहे. त्यामुळें नाम कोठें मुख्य व दुसऱ्या ठिकाणीं गौण नाहीं. कारण त्याच्या अप्रसिद्ध विभागाचा असंभव आहे, असा भावार्थ.–याप्रमाणें नामभेदामुळें विद्याभेद सांगून 'तथा०' इत्यादि भाष्यानें रूपभेदामुळेंहि विद्याभेदाचें उदाहरण देतात–]

भाष्य—**तथा रूपभेदोऽपि कर्मभेदस्य प्रतिपादकः प्रसिद्धो " वैश्वदेव्या-मिक्षा वाजिभ्यो वाजिनं " इत्येवमादिषु । अस्ति चात्र रूपभेदः । तद्यथा– केचिच्छाखिनः पंचाग्निविद्यायां षष्ठमपरमग्निमामनन्त्यपरे पुनः पंचैव पठन्ति । तथा प्राणसंवादादिषु केचिदूनान् वागादीनामनन्ति । केचिदधिकान् ॥**

भाष्यार्थ—त्याचप्रमाणें 'वैश्वदेव्यामिक्षा वाजिभ्यो वाजिनं' इत्यादि उदाहर-णांत कर्मभेदाचा प्रतिपादक प्रसिद्ध रूपभेदहि आहे. ['आदि-'शब्दानें आग्नेय, अग्नीषोमीय इत्यादिकांचा संग्रह करावा. ' तप्ते पयसि दधि आनयति सा वैश्व-देव्यामिक्षा वाजिभ्यो वाजिनं '–तापलेल्या दुधांत दहीं आणतो–घालतो. ती वैश्वदेवी–विश्वेदेव ही जिची देवता आहे, अशी आमिक्षा होते. वाजींना उद्दे-शून वाजिन आहे, या वाक्यांतील वाजिनवाक्यानें पूर्वीच्याच वैश्वदेवकर्मामध्यें वाजिनगुणविधि केला आहे कीं द्रव्य-देवतान्तरयुक्त–ज्याचें द्रव्य व देवता भिन्न आहेत अशा दुसऱ्या कर्माचा विधि आहे ? असा संशय आला असतां 'विश्वेदेवांना आमिक्षेप्रत उपसर्जनत्व आहे म्ह० विश्वेदेव हें आमिक्षेचें विशेषण आहे. त्यामुळें त्यांना प्राधान्यानें अप्रकृतत्व आहे. म्हणून ' वाजिभ्यः ' या वाजिपदानें त्यांचा परामर्श संभवत नाहीं. ' वाजिनं ' या गुणाचा अप्रकृत देवतेच्या नांवाशीं संबंध

---

१ **रत्नप्रभा**—तापलेलें दूध दहीं घातल्यानें कठिण होतें, ती आमिक्षा व त्यांत जें द्रवरूप जल असतें तें वाजिन आहे. कढत दुधांत दहीं घातल्यास तें नासून त्याच्या गुठळ्या व पाणी होतें, हें प्रसिद्ध आहे. त्यांतील गुठळ्या ही आमिक्षा व पाणी हें वाजिन होय.

आहे. त्यावरून दुसऱ्या कर्माची उपलब्धि होते. ' वैश्वदेवी ' ही तद्धितप्रत्यय-श्रुति आमिक्षेनें अवरुद्ध–प्रतिबद्ध झालेली आहे. त्यामुळें वाजिनाला त्यांत अवकाश नाहीं. म्हणून वाजिनाला पूर्वकर्मापासून स्वसंबंधिकर्माचें भेदकत्व आहे, वाजिनशब्द पूर्वप्रकृत वैश्वदेवकर्मापासून स्वसंबद्ध कर्माचा भेद करितो. त्यामुळें तद्धितश्रुतीशीं विरोध आला असतां वाक्याला दुर्बलत्व प्राप्त होतें. म्हणून वाजिन-वाक्यानें द्रव्य-देवतान्तरयुक्त दुसऱ्या कर्माचा विधि आहे, असें पूर्वमीमांसेच्या दुसऱ्या अध्यायांतच निश्चित केलें आहे. पण आग्नेयादिकांत रूपभेदामुळें भेद आहे, या अर्थी कांहीं विरोध नाहीं, असा भावार्थ.–" बरें, रूपभेदामुळें कर्मभेद असूं दे. पण त्यामुळें प्रकृत उपासना या अर्थी काय निष्पन्न झालें ?" **'अस्ति च०'** इत्यादि उत्तर–]=आणि या विद्यांमध्यें रूपभेद आहे. [–रूपभेदाचेंच उदाहरण–]=**'तद्यथा०'**–रूपभेद कसा आहे, तो पहा–कांहीं शाखाध्यायी पंचाग्नि-विद्येमध्यें आणखी एक सहावा अग्नि पढतात–सांगतात. पण दुसरे शाखा-ध्यायी पांचच अग्नि पढतात. त्याचप्रमाणें प्राणसंवादादिकांमध्यें कोणी वागादि प्राण कमी सांगतात कोणी अधिक सांगतात. [जसें यागाचें द्रव्य व देवता हें रूप आहे, तसें विद्येचें वेद्य हें रूप आहे. म्हणून वेद्याचा भेद असतां विद्येचा भेद होईल, असा भावार्थ.–आतां धर्मभेदामुळें विद्याभेद सांगण्यासाठीं ' **तथा०** ' इत्यादि भाष्यानें धर्माचें कर्मभेदकत्व सांगतात–]

**भाष्यं–तथा धर्मविशेषोऽपि कर्मभेदस्य प्रतिपादक आशंकितः कारीर्यादिषु । अस्ति चात्र धर्मविशेषः । यथाथर्वणिकानां शिरोव्रतमिति । एवं पुनरुक्त्यादयोऽपि भेदहेतवो यथासंभवं वेदान्तान्तरेषु योजयितव्याः । तस्मात्प्रतिवेदान्तं विज्ञानभेद इति ॥**

**भाष्यार्थ**—त्याचप्रमाणें कारीरीप्रभृति कर्मामध्यें कर्मभेदाचा प्रतिपादक, धर्मविशेषहि ' आशंकित '–आशंका घेतलेला आहे. [ कारीरीवाक्यांचें अध्ययन करणारे तैत्तिरीय भूमीवर भोजन करितात. पण दुसरे तसें करीत नाहींत. अग्नीचें अध्ययन करणारे कांहीं उपाध्यायाच्या उदकुंभाचें आहरण करितात, कांहीं करीत नाहींत; तींच कर्में भूमिभोजनादि धर्मापासून उत्पन्न होणाऱ्या उपकारानें युक्त आहेत व तींच त्या उपकारानें रहित आहेत, असें म्हणणें युक्त नाहीं. त्यामुळें धर्मभेदामुळें कर्मांच्या भेदाची बुद्धि होते, असा भावार्थ.–"पण असें जरी असलें तरी प्रकृत विषयांत त्यावरून काय निष्पन्न झालें ?" **' अस्ति चात्र० '** या भाष्यानें उत्तर–]=या विद्येमध्येंहि धर्मविशेष आहे. जसें–आथर्वणिकांचें शिरो-

व्रत.–मुं. ३. २. १०. सु. उ. १६४–[ पण अन्य शाखांच्या लोकांना मस्तकावर अग्निधारण–अग्निपात्रधारण हें व्रत नाहीं. त्यामुळें धर्मभेदामुळें विद्याभेद आशंकिला जातो, असा भावार्थ.–' एवं० ' इत्यादि भाष्यानें इतर भेदकहेतूंचा अतिदेश–]=याचप्रमाणें पुनरुक्ति, निंदा इत्यादि भेदहेतूंचीहि वेदान्तान्तरांमध्यें –प्रत्येक शाखेंतील भिन्न भिन्न उपनिषदामध्यें यथासंभव योजना करावी. [–'आदि-'शब्दानें अशक्ति-समाप्तिवचन-प्रायश्चित्त-अन्यार्थदर्शन-शब्दान्तर-संख्या-प्रक्रिया यांचें ग्रहण[१] केलें जातें.–पूर्वमीमांसेंत सांगितलेल्या हेतूंनीं सिद्ध झालेल्या

---

१ **न्यायनिर्णय–रत्नप्रभा**—त्यांतील 'समिधो-यजति, तनूनपातं यजति' इत्यादि वाक्यांत ' यजति ' या शब्दाचा पांच वेळां अभ्यास–पुनरुक्ति आहे. त्याविषयीं ' हें एक अपूर्व कर्म आहे कीं तीं पांचच कर्में आहेत,' असा संशय आला असतां ' धात्वर्थाच्या अनुबंधाचा भेद असल्यावांचून अपूर्वाचा भेद संभवत नाहीं. प्रकृत उदाहरणांत धात्वर्थानुबंधाचा भेद नाहीं. म्हणून हें एक कर्म अपूर्व आहे.' असा पूर्वपक्ष व ' समिदादिवाक्यांना स्वभावतःच सिद्ध असें अप्राप्तकर्मविधिपरत्व आहे. त्यामुळें कांहीं विशेष नसतांना पुनःश्रुतीला आनर्थक्य प्राप्त होतें. म्हणून प्रत्येक अभ्यासांत अपूर्वभेद आहे. त्यामुळें पुनरुक्तीला कर्मभेदकत्व आहे,' असें सिद्ध केलें आहे. त्याच न्यायानें दुसऱ्या शाखांमध्यें सांगितलेल्या विद्या पुनरुक्तीमुळें शाखान्तरोक्त विद्यांहून भिन्न आहेत, असा पुनरुक्तितः विद्याभेद; निंदा–' जे सूर्याचा उदय होण्यापूर्वी अग्निहोत्राचें हवन करितात ते रोज प्रातःकालीं मिथ्या भाषण करितात. कारण ' सूर्यो ज्योतिः । ' असें जें दिवसा म्हणणेंच उचित आहे, तें ते दिवस नसतांना म्हणतात. पण त्यावेळीं त्यांची ज्योति नसते ' अशी अनुदित होमाची निंदा व ' जे सूर्याचा उदय झाल्यावर होम देतात त्यांचें तें हवन जेवून तृप्त झालेल्या अतिथीपुढें जसें अन्न वाढून न्यावें तसें होतें ' अशी उदित होमाची निंदा केलेली आहे. त्यामुळें एकाच कर्माचें क्रमानें उदितकालीं व अनुदितकालीं अनुष्ठान करितां येणें शक्य नसल्यामुळें कर्मभेद आहे. उदित व अनुदित होमाचा अतिक्रम झाल्यास प्रायश्चित्त सांगितलेलें असल्यामुळेंहि कर्माच्या भेदाची बुद्धि होते. वेदान्तविद्यांमध्यें निंदा व प्रायश्चित्त नाहीं. त्यामुळें त्यांचें उदाहरण दिलें जात नाहीं. आतां " पण जो अन्य देवतेची उपासना करितो...तो पशु "–बृ.१.४.१०.–अशी जी निंदा श्रुत आहे तिचा विषय भेदबुद्धि हा आहे, ती भेदबुद्धीची निंदा आहे. विद्येची नव्हे. त्यामुळें तिच्या योगानें विद्येचा भेद होत नाहीं. पण " त्याहून अधिकच तमांत ते प्रवेश करितात." –ई.९.सु.उ.५.–इत्यादि जी निंदा उपलब्ध होते त्या केवल देवताज्ञानाच्या निंदेचें देवताज्ञान व कर्म यांच्या समुच्चयामध्यें तात्पर्य आहे. अशक्ति कर्माप्रमाणें विद्येचा भेद करणारी

आहे. कारण सर्वशाखांमध्ये विहित असलेलें कर्म एकालाच अनुष्ठितां येणें शक्य नाहीं. तशींच नानाशास्त्रोक्त उपासनेंहि एकालाच अनुष्ठिता येणार नाहीत, म्हणून त्यांचा भेद आहे. कांहीं शाखाध्यायी लोकांची क्वचित् समाप्तिहि झालेली दिसते. म्ह० सर्वशाखांची एकरूपच समाप्ति सांगितली जात नाही. तर एखाद्या शाखेची एखाद्या कर्मातच समाप्ति सांगितलेली असते. म्हणून समाप्तिवचनभेदामुळे कर्माचा भेद होतो. त्याचप्रमाणे वेदान्तांतहि एखाद्या उपनिषदाची ॐकाराच्या सर्वात्मत्ववचनानें समाप्ति व एखाद्याची दुसऱ्याच वचनानें, म्हणून उपासनाभेद: अन्यार्थदर्शन म्ह० अर्थवाद, " वायु ही अतिशय त्वर गमन करणारी देवता आहे." " तो जें रडला तेंच रुद्राचें रुद्रत्व आहे " इत्यादि हें अर्थावादरूप कर्मभेदक आहे. कारण स्तुति व निंदा यांचा एकत्र संबंध होत नाहीं. त्याचप्रमाणें वेदान्तांतहि नानाविध अर्थवादांची ठिकठिकाणी उपलब्धि होत असल्या- मुळें विद्याभेद होतो. शब्दान्तरामुळेंहि कर्मभेद होतो. जसें–'ज्योतिष्टोमे सोमेन यजेत' ' दाक्षिणानि जुहोति ' ' हिरण्यमात्रेयाय ददाति ' या उदाहरणांत ' यजति-ददाति- जुहोति एकत्र संघात पावून समुच्चयानें कार्य करितात कीं संघात न पावतां, स्वातंत्र्यानें ?' असा संदेह आला असतां ' लाघवामुळे संघात पावलेल्या त्यांना एक अपूर्वसाधकत्व आहे,' असा पूर्वपक्ष प्राप्त होतो. 'शब्दान्तरे कर्मभेद: कृतानुबन्धत्वात् '–पू.मी.२.२.१. –असें सिद्धान्त सूत्र आहे. त्यात शब्दभेद असताना भावार्थानुबंधाचा भेद होऊन भावना- भेद होतो, असें सिद्ध झालें आहे. त्याचप्रमाणे येथें 'ब्रह्मविद् आप्नोति परं'–तै.२.१.–व 'तरति शोकमात्मविद् '–छां.७.१.३.–अशा शब्दान्तरामुळे ज्ञानाचा भेद होतो. संख्याहि कर्माचा भेद करणारी आहे. ' सप्तदश प्राजापत्यान्पशून् आलभते ' येथे सतरा पशूंनीं एक याग करावा कीं सतरा, असा संशय आला असतां ' जो बहूंची कल्पना करितो तो एकाची कल्पना करितोच ' अशा लाघवामुळे सतरा पशूंनी एक याग केला जातो, असा पूर्वपक्ष व पशूंना पृथक्त्व असल्यासच सतरा या संख्येचा संभव असल्यामुळें व त्यांचें पृथक्त्व यागभेदाच्या अधीन असल्यामुळे हे सतरा याग आहेत, असा सिद्धान्त केला आहे. त्याचप्रमाणें येथें 'तेच हे दोन संवर्ग आहेत'–छां.४.३.४.मु.उ.३७५–असा संख्येमुळें विद्याभेद आहे. प्रक्रियाहि कर्माचा भेद करणारी आहे. नित्य अग्निहोत्र- प्रकरणाहून भिन्न प्रकरणस्थ कुंडपायांच्या अयनांतील ' मासं अग्निहोत्रं जुहोति' ' मासं दर्श-पूर्णमासाभ्यां यजेत ' या वाक्यांविषयीं नित्य अग्निहोत्रादिकांत हा मासगुणविधि आहे कीं कर्मान्तरविधि आहे, असा संदेह आला असतां " अग्निहोत्रादिशब्दाला प्रसिद्ध अग्निहोत्रादिकांचें अनुवादकत्व असल्यामुळें व ' मासं ' हें एवढेंच त्यांत अप्र-

आहे, ' इति '-असा पूर्वपक्ष प्राप्त होतो. [-' एवं० ' इत्यादि भाष्यानें पूर्वपक्षाचा अनुवाद करून 'विद्यैक्य-'सिद्धान्त सांगतात-]

**भाष्यं— एवं प्राप्ते ब्रूमः— सर्ववेदान्तप्रत्ययानि विज्ञानानि तस्मिंस्तस्मिन्वेदान्ते तानि तान्येव भवितुमर्हन्ति । कुतः । चोदनाद्यविशेषात् । आदिग्रहणेन शाखान्तराधिकरणसिद्धान्तसूत्रोदिता अभेदहेतव इहाकृष्यन्ते । संयोगरूपचोदनाख्याविशेषादित्यर्थः ॥**

भाष्यार्थ --असा पूर्वपक्ष प्राप्त झाला असतां आम्ही सिद्धान्त सांगतों. 'सर्ववेदान्तप्रत्य०'-सर्व वेदान्तांत ज्यांचा प्रत्यय येतो तीं सर्ववेदान्तप्रत्यय विज्ञानें-[सर्व उपनिषदांत प्रतीत होतात म्हणून सर्ववेदान्तप्रत्यय-सर्ववेदान्त हेच ज्यांविषयीं प्रमाण आहे तीं, त्यांत ठिकठिकाणीं विहित असलेलीं, असा भावार्थ. -जीं एका वेदान्तांत तींच अन्यवेदान्तांतहि विहित आहेत, असें '**तस्मिन०**' इत्यादि भाष्यानें सांगतात-]=त्या त्या वेदान्तांत तीं तींच असणें युक्त आहे. [-सूत्रांतील 'सर्ववेदान्तप्रत्ययं' या एकवचनानें कर्तव्यतेनें प्रतीत होणाऱ्या ज्ञानाचें एकत्व ग्रहाच्या एकत्वाप्रमाणें अविवक्षित आहे. त्या साधारणनिर्देशानें विधान केलीं जाणारीं सर्व उपासनज्ञानें विवक्षित आहेत असें प्रतिज्ञेचें व्याख्यान करून आकांक्षाद्वारा हेतूचें ग्रहण करितात-]='**कुतः**'-कोणत्या कारणानें ? '-चोदनाद्यविशेषात्'-विधिवाक्यादिकांच्या अविशेषामुळें-अभेदामुळें-साम्यामुळें. [-चोदनाशब्दाच्या साहचर्यामुळें 'आदि-'शब्दानें अर्थवादाचें ग्रहण केलें आहे, असें कोणाला वाटेल म्हणून आचार्य म्हणतात-]='-**आदिग्रहणेन०**'-येथील

---

सिद्ध असल्यामुळें प्रसिद्धाच्या अनुवादानें अप्रसिद्धाचा गुणविधि संभवतो व प्रकरणाला वाक्याहून दुर्बलत्व आहे. म्हणून हा गुणविधि आहे." असा पूर्वपक्ष प्राप्त होतो. पण 'ज्याच्या प्रकरणांत जें वाक्य श्रुत असतें तें त्याचें बाधक होत नाहीं,' असा उत्सर्ग -सामान्य नियम आहे. 'उपसद्भिश्चरित्वा '-उपसद् इष्टींनीं आचरण-अनुष्ठान करून, असें सांगून 'मासं अग्निहोत्रं '-इत्यादि श्रुति असल्यामुळें व नित्य अग्निहोत्रादिकांत उपसदांचा अभाव असल्यामुळें, त्यांच्या अनुवादानें गुणविधीचा असंभव आहे. उपसदांचेंहि तेथेंच विधान आहे, असें म्हटल्यास वाक्यभेद होतो. अग्निहोत्रादिशब्द आख्यताच्या परतंत्र आहेत व अधिकाराचें आलोचन केलें असतां आख्याताच्या अर्थाला वैलक्षण्य आहे. त्यामुळें त्यावरून प्रसिद्ध अग्निहोत्राची प्रत्यभिज्ञा होत नाहीं. म्हणून हें कर्मान्तर आहे, असा सिद्धान्त सांगितला आहे. त्याचप्रमाणें येथेंहि वैश्वानर-अश्वमेध-उपासनादिकांमध्यें प्रकरणभेदामुळें विद्याभेद आहे, असा याचा भावार्थ.

आदिशब्दानें दुसऱ्या शाखेंतील अधिकरणाच्या सिद्धान्तसूत्रानें सांगितलेल्या अभेदहेतूंचें येथें आकर्षण केलें जातें. [–'एकं वा संयोगरूपचोदनाख्याविशेषात्' –पू. मी. २.४.९–हें शाखान्तराधिकरणांतील सिद्धान्तसूत्र आहे. त्यांत सांगितलेल्या कर्मभेदहेतूंचें येथेंहि ज्ञानभेदहेतुत्वानें आकर्षण केलें आहे, असें सांगतात–] ='**संयोगरूप०**'–कारण संयोग, रूप, चोदना व आख्या यांचा अविशेष–साम्य आहे, म्हणून त्यांचें येथें आकर्षण केलें जातें. [–त्यांतील चोदना म्ह० विधायक पद किंवा 'चोद्यते इति चोदना' या व्युत्पत्तीनें चोदना म्ह० पुरुषप्रयत्न या धात्वर्थावच्छिन्न पदाचा अविशेष '**यथा०**' इत्यादि भाष्यानें सदृष्टान्त सांगतात–]

**भाष्यं––यथैकस्मिन्नग्निहोत्रे शाखाभेदेऽपि पुरुषप्रयत्नस्तादृश एव चोद्यते जुहुयादिति । एवं 'यो ह वै ज्येष्ठं च श्रेष्ठंच वेद' इति वाजसनेयिनां छंदोगानां च तादृश्येव चोदना । प्रयोजनसंयोगोऽप्यविशिष्ट एव 'ज्येष्ठश्च श्रेष्ठश्च स्वानां भवति' इति ॥**

**भाष्यार्थ**––ज्याप्रमाणें एका अग्निहोत्रांत शाखाभेद जरी असला तरी 'जुहुयात्'–हवन करावें, अशा प्रकारचा पुरुषप्रयत्न तसाच–एकसारखाच विहित असतो त्याप्रमाणें 'जो ज्येष्ठ व श्रेष्ठ प्राणाला जाणतो'–छां.५.१.१. बृ.६.१.१. –अशी छंदोग व वाजसनेयी यांची तशाच प्रकारची–एकसारखीच–अविशेष चोदना आहे. [ प्रत्येक शाखेंतील होमाद्यवच्छिन्न प्रयत्नाप्रमाणें या ज्ञानप्रकरणांतहि प्राणज्येष्ठत्वादिधीविषय प्रयत्नाचा दोन्ही शाखांमध्यें अविशेष आहे, असा भावार्थ.–'**प्रयोजन०**' इत्यादि भाष्यानें संयोगाचा अविशेष–]='स्वकीयांमध्यें ज्येष्ठ व श्रेष्ठ होतो'–बृ. ६.१.१.–असा प्रयोजनसंयोगहि अविशिष्ट आहे. [–'**रूपं०**' इत्यादि भाष्यानें रूपाचा अविशेष सांगतात–]

**भाष्यं––रूपमप्युभयत्र तदेव विज्ञानस्य यदुत ज्येष्ठश्रेष्ठादिविशेषणान्वितं प्राणतत्त्वम् । यथा च द्रव्यदेवते यागस्य रूपं । एवं विज्ञेयं विज्ञानस्य । तेन हि तद्रूप्यते । समाख्याऽपि सैव प्राणविद्येति । तस्मात्सर्ववेदान्तप्रत्ययत्वं विज्ञानस्य॥**

**भाष्यार्थ**—दोन्ही शाखांमध्यें विज्ञानाचें रूपहि तेंच आहे कीं जें ज्येष्ठ-श्रेष्ठादि-विशेषणांनीं युक्त असें प्राणतत्त्व. [–'पण ज्ञानाचें प्राणतत्त्व हेंच रूप कसें?' उत्तर–]='**यथा च द्रव्यदेवते०**'–ज्याप्रमाणें द्रव्य व देवता हें यागाचें रूप तसें विज्ञेय विज्ञानाचें रूप आहे. [–'द्रव्य व देवता यांच्या योगानें यागाला रूपप्रमाणत्व असल्यामुळें त्यांना यागरूपत्व आहे. पण प्रकृत उपासनाख्य विज्ञानांत प्राणतत्त्वाला तें कसें संभवतें?' उत्तर–]=कारण प्राणतत्त्व त्या विज्ञानानें

निरूपित केलें जातें [–समाख्येचा अविशेष–]=समाख्याहि 'प्राणविद्या' अशी तीच. [–सर्वशाखांतील 'प्राणज्ञान' या नांवाच्या समाख्यादिकांच्या अविशेषामुळें '**तस्मात्०**' इत्यादि भाष्यानें ऐक्याचें निगमन करितात–]=म्हणून विज्ञानाला सर्व वेदान्तप्रत्ययत्व आहे. [–'**एवं०**' इत्यादि भाष्यानें उक्त न्यायाचा सर्व शाखास्थ पंचाग्निविद्यादिकांत अतिदेश करितात—]

**भाष्यं—एवं पंचाग्निविद्या वैश्वानरविद्या शांडिल्यविद्येत्येवमादिषु योजयितव्यम् । ये तु नामरूपादयो भेदहेत्वाभासाः, ते प्रथम एव कांडे 'न नाम्ना स्यादचोदनाभिधानत्वात्' इत्यारभ्य परिहृताः ॥१॥ इहापि कंचिद्विशेषमाशंक्य परिहरति–**

**भाष्यार्थ**–याच न्यायानें पंचाग्निविद्या, वैश्वानरविद्या, शांडिल्यविद्या, या व अशाच दुसऱ्याहि विद्यांमध्यें चोदनादिकांची योजना करावी. [–आतां '**ये तु०**' इत्यादि भाष्यानें वाद्यानें जें वर म्हटलें आहे –पृ.२२४–त्याचा अनुवाद करून प्रत्याख्यान करितात–]=पण वाद्यानें वर सांगितलेले जे नाम-रूपादिभेदहेत्वाभास त्यांचा परिहार प्रथमकांडांतच 'न नाम्ना स्यादचोदनाभिधानात्[१]' या सूत्रापासून आरंभ

---

१ **न्यायनिर्णय-रत्नप्रभा**–याचा अर्थ असा–काटक, कालाप इत्यादि नामभेदामुळें कर्मभेद नाहीं. कोणत्या कारणानें 'अचोदनाभिधानत्वामुळें.–अविधिकथनामुळें. काटकादि हीं ग्रंथांचीं नांवें आहेत. कर्मांचीं नांवें नव्हेत. ग्रंथसंबंधामुळेंच ग्रंथद्वारा कर्मनामत्वाची सिद्धि होण्यासाटीं त्यांतहि शक्तीची कल्पना केली असतां गौरवदोष येतो. कर्माला एकत्व जरी असलें तरी त्या त्या ग्रंथसंदर्भाच्या संयोगामुळें 'काटक प्रायश्चित' इत्यादि नांवें उपलब्ध होतात. त्यामुळें नामानें कर्मभेद होत नाहीं. त्याचप्रमाणें नामभेदामुळेंहि विद्याभेद होत नाहीं. कारण विद्येचें ऐक्य असतांनाहि त्या त्या ग्रंथसंयोगामुळें त्या त्या नामत्वाची सिद्धि होते. रूपभेदहि भेद उत्पन्न करीत नाहीं. कारण अग्नीषोमीयाला एककर्मत्व जरी असलें तरी एकादशकपालत्ववत् द्वादशकपालत्वभेद वाचनिक–वचनानेंच सिद्ध होणारा आहे. त्याचप्रमाणें अग्न्यादिकांमध्यें रूपभेद जरी असला तरी विद्येच्या ऐक्याशीं विरोध येत नाहीं. धर्मविशेषहि भेदक नाहीं. कारण तो विद्याग्रहणासाटीं आहे. त्यामुळें कर्मोपकारी–कर्मोपयोगी नाहीं. म्हणून त्याला कर्मभेदकत्व नाहीं. कारण तेथें 'विद्यायां कर्मशास्त्रं'–विद्येमध्यें तें कर्मशास्त्र, असें सांगितलें आहे. तसाच येथेंहि धर्मविशेष हा विद्येसाठीं नाहीं, असें पुढें सांगतील. पुनरुक्तिहि कर्मभेदिका नाहीं. एकच अर्थ अनेक शाखीयांकडून सांगितला जाणें, हें द्विर्वचन–पुनरुक्ति नव्हे. कारण तसें मानिल्यास बहुतांकडून सांगितल्या जाणाऱ्या एकावेदावरहि पुनरुक्तीचा प्रसंग येईल. म्हणून अध्येतृभेदानें पुनरुक्तीचा अभाव असल्या-

करून केला आहे. १. [–' तर मग पूर्वतंत्रोक्तन्यायानेंच प्रत्येक शाखेंतील विद्येचें एकत्व सिद्ध होत असतांना हें अधिकरण कशाला' अशी आशंका घेऊन '**इहापि०**' इत्यादि म्हणतात–]=येथेंहि कांहीं विशेषाची आशंका घेऊन '**भेदात्०**' इत्यादि सूत्रानें तिचा परिहार करितात—

## सूत्रं–भेदान्नेति चेन्नैकस्यामपि ॥ २

**सूत्रार्थ**—'भेदात्'–वाजसनेयि-शाखाध्यायी व छंदोग यांच्या पंचाग्निविद्येंतील पंचाग्नींच्या रूपामध्यें भेद असल्यामुळें कर्मभेदाप्रमाणें त्यांचा भेद आहे, '**न**'–ऐक्य नाहीं, 'इति०'–असें जर म्हणाल तर '**न**'–तें बरोबर नाहीं. **कारण** 'एकस्यां अपि'–एका विद्येंतहि रूपभेद उपपन्न होतो. २–मु. ब्र. ३०२. [शाखान्तराधिकरणांत–कर्ममीमांसेंत एका शाखेंतील अग्नीषोमीयाचें एकादशकपालत्व व दुसऱ्या शाखेंतील त्याचें द्वादशकपालत्व, असा रूपभेद असल्यामुळें कर्मभेदाची शंका घेऊन संख्येचा विकल्प आहे, असें जें सांगितलें आहे. तें युक्त आहे. कारण उत्पन्नशिष्ट–उत्पत्तिवाक्यानें सांगितलेल्या दोन कपालसंख्यांना उत्पत्तींतील ऐकरूप्यानें ज्ञात झालेल्या कर्माच्या प्रत्यभिज्ञानाचें अबाधकत्व आहे, म्ह० दोन कपालसंख्या प्रत्यभिज्ञेचा बाध करीत नाहीत. त्यामुळें त्यांना कर्माचें भेदकत्व **नाहीं**. पण अग्न्यादिकांतील पंचसंख्यादिकाला उत्पत्तिविशिष्टत्व असल्यामुळें वाजिनाप्रमाणें भेदकत्व आहे, अशी शंका उत्थापित करून तिचा या अधिकरणांत परिहार केलेला असल्यामुळें याचा उपयोग आहे, हें अधिकरण व्यर्थ नाहीं, असा भावार्थ.–'**स्यादेतत्०**' इत्यादि भाष्यानें शंकेचा विभाग–विवरण करितात–]

---

मुळें कर्माचें ऐक्य आहे. 'अद्विर्वचनं श्रुतिसंयोगाविशेषात्'–पू. मी. २.४.१६–या सूत्रानें हेंच सांगितलें आहे. याच न्यायानें येथेंहि प्रत्येक शाखेंत विद्यैक्य जाणावें. अशक्तिहि भेदाचा हेतु नाहीं. कारण एकाहि वेदांत असमर्थ असलेल्यांना सर्वांगोपसंहाराची योग्यताच नसते. पण जे समर्थ असतात त्यांच्या शाखेच्या भेदामुळें जरी त्यांच्या अध्ययनाचा अभाव असला तरी विश्वास ठेवून त्या शाखेच्या अध्येत्यांपासून तत्तद्रूपाचा उपसंहार करितां येणें शक्य आहे. समाप्तिवचनहि भेदक नाहीं. कारण एकत्व असतांनाहि एखाद्या अन्यांगाची समाप्ति झाली असता समाप्तिवचन संभवतें. अन्यार्थदर्शनाला अन्यपरत्व असल्यामुळें प्रमाणानें ज्ञात झालेलें कर्मैक्य किंवा विद्यैक्य यांचा तें निषेध करूं शकत नाहीं. शब्दान्तर, संख्या व प्रक्रिया यांचेंहि भेदकत्व प्रबल अभेदकानें त्याज्य–निरसनीय आहे. त्यामुळें विद्याभेदाची शंका नाहीं.

**भाष्यं**—स्यादेतत् । सर्ववेदान्तप्रत्ययत्वं विज्ञानानां गुणभेदान्नोपपद्यते । तथाहि वाजसनेयिनः पंचाग्निविद्यां प्रस्तुत्य षष्ठमपरमग्निमामनन्ति–'तस्याग्निरेवाग्निर्भवति' इत्यादिना । छंदोगास्तु तं नामनन्ति । पंचसंख्ययैव च त उपसंहरन्ति 'अथ ह य एतानेवं पंचाग्नीन्वेद' इति । येषां च स गुणोऽस्ति । येषां च नास्ति । कथमुभयेषामेका विद्या उपपद्येत । न चात्र गुणोपसंहारः शक्यते प्रत्येतुं । पंचसंख्याविरोधात् ॥

**भाष्यार्थ**–यावर अशी शंका येते–गुणांच्या भेदामुळें विज्ञानांना सर्ववेदान्तप्रत्ययत्व उपपन्न होत नाहीं. [–'**तथाहि०**' इत्यादि भाष्यानें वादी गुणभेदच साधितो–]= गुणभेद कसा आहे तो पहा–वाजसनेयिशाखाध्यायी पंचाग्निविद्येचा प्रस्ताव–उपक्रम करून "त्याचा प्रसिद्ध अग्नि हाच अग्नि आहे"–बृ.६.२.१४सु.उ.७३५–इत्यादि वाक्यानें आणखी एक सहावा अग्नि पढतात. पण छंदोग तो सहावा अग्नि सांगत नाहींत. [–"पण छंदोग सहावा अग्नि सांगत नाहींत हें कसें सिद्ध होतें?" अशी आशंका घेऊन 'उपसंहारावरून तें सिद्ध होतें' असें '**पञ्चसंख्ययैव०**'इत्यादि भाष्यानें सांगतो–]=आणि "पण जो या पांच अग्नींस असें जाणतो"–छां.५.१०.१०. सु. उ. ४०८–असा पांच संख्येनेंच त्यांचा उपसंहार करितात. [–याप्रमाणें गुणभेद सांगून वादी त्याचें फल–विद्याभेद सांगतो–]='**येषां च०**'–आणि ज्यांचा तो गुण आहे व ज्यांचा तो नाहीं, त्या दोन्ही शाखियांची एक विद्या कशी उपपन्न होईल ? [–"वाजसनेयकांतील जो अन्त्येष्टिनिविष्ट सहावा अग्नि, प्रसिद्ध असल्याप्रमाणेंच सांगितलेला आहे त्याचा छांदोग्यांत उपसंहार केल्यामुळें गुणभेद नाहीं," अशी आशंका घेऊन '**न च०**'इत्यादि भाष्यानें शंकाकार समाधान सांगतो–]=आणि या पंचाग्निविद्येंत 'पांच' या संख्येच्या विरोधामुळें गुणोपसंहार प्रतीत होणेंहि शक्य नाहीं, गुणोपसंहाराचा प्रत्यय येणेंहि शक्य नाहीं. [–याप्रमाणें पंचाग्नि-विद्येमध्ये गुणभेदामुळें भेद सांगून '**तथा०**' इत्यादि भाष्यानें प्राणविद्येंत गुणभेदामुळें भेद सांगतो–]

**भाष्यं**—तथा प्राणसंवादे श्रेष्ठादन्यांश्चतुरः प्राणान्वाक्चक्षुःश्रोत्रमनांसि छंदोगा आमनन्ति । वाजसनेयिनस्तु पंचममप्यामनन्ति 'रेतो वै प्रजातिः प्रजायते ह प्रजया पशुभिर्य एवं वेद' इति । आवापोद्वापभेदाच्च वेद्यभेदो भवति । वेद्यभेदाच्च विद्याभेदो । द्रव्यदेवताभेदादिव यागस्येति चेत् ॥

**भाष्यार्थ**—त्याचप्रमाणें प्राणसंवादांत छंदोग श्रेष्ठ प्राणांहून अन्य–दुसरे वाक्, चक्षु, श्रोत्र व मन असे चार प्राण सांगतात. पण वाजसनेयिशाखा-

ध्यायी "रेतच प्रजाति–प्रजा आहे. जो असें जाणतो तो प्रजा व पशु यांनीं संपन्न होतो"–बृ. ६. १. ६. सु. उ. ७२६–असा पांचवा प्राणहि पढतात. [–"प्रजनन, या गुणानें युक्त असलेल्या रेताचा वाजसनेयकांना आवाप–ग्रहण असू दे, ते त्याचें ग्रहण करू देत, व छंदोगांना त्यांचा उद्वाप–त्याग–उद्धार असू दे. ते त्यांचें ग्रहण न करू देत, तथापि त्यामुळें विद्याभेद कसा होतो?" 'आवाप०' इत्यादि भाष्यानें उत्तर–]=आणि आवाप व उद्वाप यांच्या भेदामुळें वेद्यभेद होतो, आणि द्रव्य व देवता यांच्या भेदामुळें यागाचा जसा भेद होतो त्याप्रमाणें वेद्याच्या भेदामुळें विद्येचा भेद होतो, असें जर म्हणाल, अशी जर शंका घ्याल तर [–'न०' याच्याशीं पुढें संबंध–'नैष दोषः०' इत्यादि भाष्यानें 'न' या सूत्रावयवाचें परिहारत्वानें व्याख्यान करितात––]

**भाष्यं—नैष दोषः। यत एकस्यामपि विद्यायां एवंजातीयको गुणभेद उपपद्यते। यद्यपि षष्ठस्याग्नेरुपसंहारो न संभवति। तथापि द्युप्रभृतीनां पंचानामग्नीनामुभयत्र प्रत्यभिज्ञायमानत्वान्न विद्याभेदो भवितुमर्हति। न हि षोडशिग्रहणाग्रहणयोरतिरात्रो भिद्यते। पठ्यतेऽपि च षष्ठोऽग्निश्छंदोगैः–'तं प्रेतं दिष्टमितोऽग्नय एव हरन्ति' इति॥**

**भाष्यार्थ**—हा दोष येत नाहीं. कारण एका विद्येमध्येंहि अशा प्रकारचा गुणभेद उपपन्न होतो. [–"अहोपण, गुणाचा भेद आहे, असें झालें असतां वेद्याचा भेद होतो व त्यामुळें विद्याभेद होतो. 'पंच' या संख्येशीं विरोध येत असल्यामुळें सहाव्या अग्नीचा उपसंहारहि करितां येत नाहीं," '**यद्यपि०**' इत्यादि भाष्यानें उत्तर–]=जरी सहाव्या अग्नीचा उपसंहार संभवत नाहीं तरी द्युप्रभृति पांच अग्नींची दोन्ही ठिकाणीं प्रत्यभिज्ञा होत असल्यामुळें विद्येचा भेद होणें उचित नाहीं, तो होऊं शकत नाहीं. [–"अहोपण, एकच विद्या सहाव्या अग्नीनें युक्त व तद्रहित, हें विरुद्ध आहे," अशी आशंका घेऊन '**न हि०**' इत्यादि भाष्यानें म्हणतात–]=कारण षोडशीचें ग्रहण करणें व न करणें, या निमित्तानें अतिरात्राचा भेद होत नाहीं. [शिवाय वाजसनेयकांत सहाव्या अग्नीचेंहि ध्येयत्व स्वीकारून हें सांगितलें आहे. पण वस्तुतः त्याला ध्येयत्व नाहीं. तेथेंहि पांचच अग्नि ध्येयत्वानें सांगितले जातात.–अनुपास्यत्वानें सहाव्या अग्नीचें कथन छांदोग्यांतहि समान आहे, असें '**पठ्यतेऽपि०**' या भाष्यानें सांगतात–]=छंदोगांकडून "या लोकाहून त्या परलोकास गेलेल्या जंतूस त्याचें पुत्रादि येथून अग्नीसाठीं–दहनार्थ नेतात"–छां. ५. ९. २. सु. उ. ४०५–असा सहावा अग्नि पढलाहि जातो.

[–" पण अनुपास्यत्व असतांना पूर्वाग्नीप्रमाणेंच सहावा अग्नि कशासाठीं पठित आहे ?" '**वाजसनेयिनस्तु०**' या भाष्यानें उत्तर––]

**भाष्यं—वाजसनेयिनस्तु सांपादिकेषु पंचस्वग्निष्वनुवृत्ताया: समिद्धूमादि-कल्पनाया निवृत्तये 'तस्याग्निरेवाग्निर्भवति समित्समित्' इत्यादि समामनन्ति। स नित्यानुवाद: ॥**

**भाष्यार्थ**—पण वाजसनेयिशाखाध्यायी सांपादिक–कल्पित पांच अग्नींमध्यें अनुवृत्त झालेल्या समिध्, धूम इत्यादि कल्पनेची निवृत्ति करण्यासाठीं "त्याचा अग्नि हाच अग्नि, समिध् हीच समिध्"–बृ.६.२.१४–इत्यादि कथन करितात. तो नित्यानुवाद आहे. [त्या मृत उपासकाच्या दहनासाठीं 'अग्नि हाच अग्नि' असा हा प्रसिद्धानुवाद आहे. तो उपासनाविधि नाहीं. पण उपास्य–ध्येय असलेले अग्नि दोन्ही ठिकाणीं पांचच आहेत आणि प्रसिद्ध अग्नीचा अनुवाद कल्पनेच्या निवृत्तीसाठीं असल्यामुळें अर्थवान्–उपयुक्तहि आहे, असा भावार्थ.–याप्रमाणें उत्पत्तीत गुणान्तरविधीचा अभाव असल्यामुळें विद्याभेद नाहीं. पण उत्पत्तींतच विशिष्ट गुणाचें कथन केलेलें असल्यामुळें वैश्वदेवीचा भेद आहे, असें सांगितलें. आतां वाजींच्या षष्ठाग्निविधानपक्षींहि विद्याभेद नाहीं, असें '**अथापि०**' इत्यादि सांगतात–]

**भाष्यं—अथाप्युपासनार्थ एष वादस्तथापि स गुण: शक्यते छंदोगैरप्युप-संहर्तुम् । न चात्र पंचसंख्याविरोध आशंक्य: । सांपादिकाग्न्यभिप्राया ह्येषा पंचसंख्या नित्यानुवादभूता । न विधिसमवायिनीत्यदोष: ॥**

**भाष्यार्थ**—आतां हा षष्ठाग्निवाद उपासनेसाठीं आहे, असें जरी म्हटलें तरी तो गुण छंदोगांकडूनहि उपसंहार करितां येणें शक्य आहे, त्यांनाहि त्याचा आपल्या विद्येंत संग्रह करितां येईल. [–"अहोपण, 'पंचाग्नींना जो जाणतो'–पृ.२३३–अशा या श्रुतसंख्येशीं विरोध येत असल्यामुळें सहाव्या अग्नीच्या उपसंहाराची सिद्धि होत नाहीं," अशी आशंका घेऊन 'पंचसंख्येला विधेयत्व नसल्या-मुळें, सांपादिक अग्नींच्या अवच्छेदकत्वानेंच अनुवादकत्व असल्यामुळें, उत्पत्ति-शिष्टत्व असल्यामुळें व उत्पन्न झालेल्या त्यांचें प्रत्यभिज्ञान होत असल्यामुळें विद्या-भेद नाहीं,' असें '**न च०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=आणि येथें–छांदोग्यांत 'पंच' या संख्येशीं विरोध आहे, अशीहि शंका घेतां येत नाहीं. कारण ही पंच संख्या सांपादिक अग्नींच्या आशयानें नित्यानुवादभूत आहे. ती विधीशीं संबंध ठेवणारी नाहीं. त्यामुळें त्यांत कांहीं दोष नाहीं. [–पंचाग्निविद्येंत सांगितलेल्या न्यायाचाच प्राणविद्यादिकांमध्यें '**एवं०**' इत्यादि भाष्यानें अतिदेश करितात––]

**भाष्यं**–एवं प्राणसंवादादिष्वप्यधिकस्य गुणस्येतरत्रोपसंहारो न विरुध्यते। न च आवापोद्वापभेदाद्वेद्यभेदो विद्याभेदश्चाशंक्यः। कस्यचिद्वेद्यांशस्य आवापोद्वापयोरपि भूयसो वेद्यराशेः अभेदावगमात्। तस्मादैकविद्यमेव ॥ २ ॥

**भाष्यार्थ**--याच न्यायानें प्राणसंवादिकांमध्येंहि अधिक गुणांचा इतरत्र–दुसऱ्या प्राणसंवादादिकांत उपसंहार करणें विरुद्ध नाहीं. [–" आतां आवाप व उद्वाप यांच्या योगानें वेद्यभेदामुळें विद्याभेद होतो " असें जें वर–२३४–म्हटलें आहे, त्याविषयीं आचार्य ' न च० ' इत्यादि भाष्यानें म्हणतात–]=आवाप व उद्वाप यांच्या योगानें वेद्यभेद व विद्याभेद होतो, अशीहि शंका घेतां येत नाहीं. कारण कांहीं एखाद्या वेद्यांशाचा आवाप व उद्वाप जरी असला तरी फार मोठ्या वेद्यराशीचा अभेद अवगत होतो, फार मोठा वेद्यसमूह एकरूप असल्याचा प्रत्यय येतो, त्यामुळें पूर्वोक्त शंका घेतां येत नाहीं. [ बहुतर अंशाच्या अभेद-प्रत्यभिज्ञानामुळें अल्पतर अंशाचा भेद जरी असला तरी प्रत्यभिज्ञेशीं विरोध येत नाहीं. त्यामुळें विद्याभेद नाहीं, असा भावार्थ.–रूपभेद या निमित्तानें शंकित अभेदाचें निरसन करून ' तस्मात्० ' इत्यादि भाष्यानें त्याचाच उपसंहार–] =म्हणून सर्ववेदान्तप्रत्यय विद्यांना एकविद्यात्वच आहे. २. [–रूपभेदाच्या भेदकत्वाचें निरसन करून धर्मभेदाच्या भेदकत्वाचें 'स्वाध्यायस्य०' इत्यादि सूत्रानें निरसन–]

## सूत्रं—स्वाध्यायस्य तथात्वेन हि समाचारेऽधिकाराच्च सववच्च तन्नियमः ॥ ३

**सूत्रार्थ**—आथर्वणिकांचें शिरोव्रत हा 'स्वाध्यायाचा' धर्म आहे. ' **हि तथात्वेन समाचरे** '–कारण स्वाध्यायाच्या धर्मत्वानें त्याचें वेदव्रतोपदेशपर ग्रंथांत कथन केलें आहे, आणि ' न एतत् अचीर्णव्रतः अधीते ' यांतील ' अधिकृत-विषय ' ' एतत् ' व ' अध्ययन ' या शब्दांवरून तें अध्ययनाचेंच अंग आहे आणि सात ' सवांच्या ' नियमाप्रमाणें या शिरोव्रताचा ' नियम आहे. ' ३.–सु. ब्र. ३०३. [–'यदप्युक्तं०' इत्यादि भाष्यानें व्यावर्त्य आक्षेपाचा अनुवाद–]

**भाष्यं**—यदप्युक्तं–आथर्वणिकानां विद्यां प्रति शिरोव्रताद्यपेक्षणादन्येषां च तदनपेक्षणाद्विद्याभेद इति। तत्प्रत्युच्यते। स्वाध्यायस्यैष धर्मो। न विद्यायाः। कथमिदमवगम्यते। यतस्तथात्वेन स्वाध्यायधर्मत्वेन समाचारे वेदव्रतोपदेशपरे ग्रंथे आथर्वणिका 'इदमपि वेदव्रतत्वेन व्याख्यातं' इति समामनन्ति। ' नैतदचीर्णव्रतोऽधीते ' इति चाधिकृतविषयादेतच्छब्दादध्ययनशब्दाच्च स्वोपनिषदध्ययनधर्म एवैष इति निर्धार्यते ॥

**भाष्यार्थ**—तसेंच 'आथर्वणिकांच्या विद्येप्रत शिरोव्रतादिकांची अपेक्षा असल्यामुळें व इतर शाखियांना त्यांची अपेक्षा नसल्यामुळें विद्येचा भेद आहे' असेंहि जें वर–पृ.२२६–म्हटलें आहे, [ शिरोव्रत म्ह० मस्तकावर अग्निधारण करणें, 'आदि-'शब्दानें उन्हांत बसणें–उभें राहणें इत्यादिकांचें ग्रहण करावें.–या चोद्याच्या उत्तरत्वानें सूत्राला प्रवृत्त करून त्याचें व्याख्यान करितात–]=त्याचें प्रत्याख्यान केलें जातें. हा ' स्वाध्यायस्य '–स्वाध्यायाचा–आपल्या शाखाध्ययनाचा धर्म आहे. विद्येचा धर्म नव्हे. [–" पण स्वाध्यायाच्या अंगत्वानें श्रुत्यादिकांनीं विनियोग केलेला नसतांना त्याला त्याची अंगता संभवत नाहीं," अशी शंका–] =' **कथं०** '–शिरोव्रताला स्वाध्यायाचें अंगत्व आहे, हें कसें अवगत होतें ? [–' तथात्वेन ' या सूत्रांशानें त्याचें उत्तर–]=' **यतः०**'–ज्या अर्थी आथर्वणिक ' तथात्वानें '–स्वाध्यायधर्मत्वानें ' समाचरे '–वेदव्रतोपदेशपर ग्रंथांत ' हेंहि वेदव्रतत्वानें व्याख्यात–व्याख्यान केलेलें–सांगितलें आहे, ' असें सांगतात, त्याअर्थी त्याला स्वाध्यायांगत्व आहे, असें अवगत होतें. [ गोदानादिक हीं वेदाध्ययनाच्या अंगत्वानें अनुष्ठेय व्रतें आहेत. शिरोव्रतहि वेदव्रतांमध्यें अंतर्गतत्वानें सांगितलेलें आहे. त्यामुळें गोदानादि जसें अध्ययनाचें अंग तसेंच हेंहि अध्ययनांग, आहे, असा भावार्थ.–आतां ' अधिकाराच्च ' या सूत्रांशाचें व्याख्यान ' **नैतत्०** ' इत्यादि भाष्यानें करितात–]=आणि " ज्यानें शिरोव्रत केलेलें नसतें तो याचें अध्ययन करीत नाहीं."–मुं.३.२.११.–अशा अधिकृतविषय 'एतत्'–हें, या शब्दावरून व 'अध्ययन-'शब्दावरून हा आपल्या उपनिषदाचा अध्ययनधर्मच आहे, असा निर्धार–निश्चय केला जातो. [ हा सर्व ग्रंथ शिरोव्रताचें अनुष्ठान न केलेला पुरुष शिकत नाहीं, ज्यानें या व्रताचें अनुष्ठान केलेलें नसतें तो याच्या अध्ययनाचा अधिकारी नाहीं, अशा प्रकृत मुंडकोपनिषदाचा परामर्श करणाऱ्या 'एतत्-'शब्दावरून हा मुंडकाच्या अध्ययनाचाच धर्म आहे, विद्याधर्म नाहीं, असें ज्ञात होतें, असा भावार्थ.–' अधिकारात् ' म्ह० अधिकृताविषयीं असलेल्या 'एतत्-'शब्दावरून व सूत्रांतील 'च-'कारामुळें ' अधीते ' अशा या 'अध्ययन-'शब्दावरून असें भाष्यांत व्याख्यान केलें आहे.–आतां शंकेच्या उत्तरत्वानें याचें व्याख्यान करण्यासाठीं 'ननु०' इत्यादि भाष्यानें शंका–]

**भाष्यं—ननु च ' तेषामेवैतां ब्रह्मविद्यां वदेत शिरोव्रतं विधिवद्यैस्तु चीर्णं' इति ब्रह्मविद्यासंयोगश्रवणादेकैव सर्वत्र ब्रह्मविद्येति संकीर्येतैष धर्मः । न ।**

**तत्राप्येतामिति प्रकृतप्रत्यवमर्शात् । प्रकृतत्वं च ब्रह्मविद्याया ग्रंथविशेषापेक्षत्व-मिति ग्रंथविशेषसंयोग्येवैष धर्मः ॥**

**भाष्यार्थ**—'अहोपण, "ज्यांनीं यथाविधि शिरोव्रत आचरिलेलें असतें त्यांनाच ही ब्रह्मविद्या सांगावी "–मुं. ३.२.१०. सु. उ. १६९.–असें ब्रह्मविद्येच्या संयो-गाचें श्रवण असल्यामुळें सर्वत्र ब्रह्मविद्या जर एकच आहे, तर हा धर्म तिच्याशीं संकर पावेल–सर्व उपनिषदांतील ब्रह्मविद्येंत त्याचा संसर्ग–संबंध होईल!' [ सर्वत्र ब्रह्मविद्या जर एकच असेल तर तिच्याशीं शिरोव्रताचा संयोग असल्या-मुळें धर्मसंकर होईल. पण तो होत नाहीं. त्यामुळें विद्येचा भेद आहे, असा भावार्थ.–मुंडकवाक्यांतील 'एतां ब्रह्मविद्यां' या पदांची ' ब्रह्मविद्याप्रकाशक अशा या ग्रंथाला ' अशी योजना करावी. कारण तशी योजना न केल्यास प्रकृतविषय ' एतत्-' शब्दाशीं विरोध येतो, असें ' **न०** ' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=नाहीं, असा विद्याभेद होत नाहीं. कारण त्या मुंडकवाक्यांतहि 'एतां–ह्या' असा प्रकृत ब्रह्मविद्याप्रतिपादक मुंडकोपनिषदाचा प्रत्यवमर्श केला आहे. [–"पण येथें ब्रह्म-विद्याच प्रकृत आहे. त्यामुळें ' एतां ' या शब्दानें तिचाच परामर्श मानणें उचित आहे." अशी आशंका घेऊन 'ब्रह्मविद्येचें सर्वत्र ऐक्य असल्यामुळें अथर्वविहित विद्याच येथें परामर्श करण्यास योग्य आहे,' असें ' **प्रकृतत्वं च०** ' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=आणि ब्रह्मविद्येचें प्रकृतत्व म्ह० ग्रंथविशेषाचें अपेक्षत्व, त्यामुळें हा धर्म ग्रंथविशेषसंयोगीच आहे. [–' **सववच्च०** ' इत्यादि भाष्यानें अवशिष्ट सूत्रावयवाला अवतरण देतात–]

**भाष्यं—सववच्च तन्नियम इति निदर्शननिर्देशः। यथा च सवाः सप्त सौर्या-दयः शतौदनपर्यंता वेदान्तरोदितत्रेताग्न्यनभिसंबंधाद् आथर्वणोदितैकाग्न्य-भिसंबंधाच्च आथर्वणिकानामेव नियम्यन्ते। तथैवायमपि धर्मः स्वाध्यायविशेष-संबंधात्तत्रैव नियम्यते । तस्मादप्यनवद्यं विद्यैकत्वम् ॥ ३ ॥**

**भाष्यार्थ**—आणि ' सववत् तन्नियमः '–सवांप्रमाणें त्या शिरोव्रताचा मुंडका-ध्ययनांत नियम आहे, तें मुंडकाध्ययनांत नियत आहे, असा हा दृष्टान्ताचा निर्देश आहे. 'च '–आणि त्यामुळें शिरोव्रताचा ब्रह्मविद्येंत संकर होत नाहीं. [–' **यथा०** ' इत्यादि भाष्यानें त्याचेच विवरण–]=आणि ज्याप्रमाणें सौर्यापासून शतौदना-पर्यंत जे सात सव–होम, त्यांचा दुसऱ्या वेदानें सांगितलेल्या त्रेताग्नींशीं संबंध नसल्यामुळें व आथर्वणांनीं सांगितलेल्या 'एक ऋषि' या नांवानें प्रसिद्ध असलेल्या एका अग्नींशींच संबंध असल्यामुळें आथर्वणिकांनाच ते जसे नियत केले जातात

–ते त्यांच्या त्याच अग्नींत जसे केले जातात त्याचप्रमाणें हाहि धर्म स्वाध्याय-विशेषसंबंधामुळें म्ह० 'एतत्' व 'अधीते' या शब्दांवरून मुंडकाध्ययनाचा संबंध ज्ञात होत असल्यामुळें मुंडकाध्ययनांतच नियत केला जातो. [–याप्रमाणें धर्मभेद धर्मींचा भेद करीत नाहीं, असें सिद्ध झालें असतां फलित सांगतात–]= '**तस्मात्**०'–नामादिकांप्रमाणे धर्मभेदाला भेदकत्व संभवत नसल्यामुळेंहि विद्येचें एकत्व निर्दोष आहे–त्याचा बाध होत नाहीं. ३. [–शिवाय वेद्य ब्रह्माच्या एकत्व-कथनानें ब्रह्मविद्येचें एकत्व तर वेद सर्वत्र प्रदर्शित करितो. त्याच न्यायानें इतरत्रहि वेद्याच्या अभेदामुळें विद्येचे ऐक्य आहे, असें '**दर्शयति च**०' या सूत्रानें सांगतात–]

## सूत्रं—दर्शयति च ॥ ४ ॥ (१)

**सूत्रार्थ**—आणि 'सर्वे वेदाः०' इत्यादि वाक्य वेद्य निर्गुण ब्रह्माला सर्व वेदान्तांत एकत्व असल्यामुळें विद्येचेंहि सर्वत्र एकत्व दाखवितें. ४. (१)-सु. ब्र. २०३. [–'**दर्शयति**०' इत्यादि भाष्यानें सूत्राचें व्याख्यान–]

**भाष्यं—दर्शयति च वेदोऽपि विद्यैकत्वं सर्ववेदान्तेषु वेद्यैकत्वोपदेशात् 'सर्वे वेदा यत्पदमामनन्ति' इति। तथा 'एतं ह्येव बह्वृचा महत्युक्थे मीमांसन्त एतमग्नावध्वर्यव एतं महाव्रते छन्दोगाः' इति च। तथा 'महद्भयं वज्रमुद्यतम्' इति काठके उक्तस्येश्वरगुणस्य भयहेतुत्वस्य तैत्तिरीयके भेददर्शननिन्दार्थे परामर्शो दृश्यते 'यदा ह्येवैष एतस्मिन्नुदरमन्तरं कुरुते। अथ तस्य भयं भवति। तत्त्वेव भयं विदुषोऽमन्वानस्य' इति॥**

**भाष्यार्थ**—आणि वेदहि "सर्व वेद जें पद सांगतात"–का. १.२.१५–असा सर्व वेदान्तांत वेद्याच्या एकत्वाचा उपदेश केलेला असल्यामुळें विद्येचें एकत्व दाखवितो, [–वेदत्रयांतहि विद्यैक्यविषय उपदेशान्तर–]='**तथा**०'–व त्याचप्रमाणें "बह्वृच याचीच महदुक्थांत मीमांसा करितात, अध्वर्यव याचीच अग्नींत व छंदोग महाव्रतांत मीमांसा करितात" असा तिन्ही वेदांत विद्यैक्यविषय –विद्येच्या एकत्वाचा उपदेश आहे. [–शिवाय शाखान्तरोक्त पदार्थाचा शाखान्तरांत सिद्धवत् परामर्श केलेला असल्यामुळेंहि विद्येच्या एकत्वाचें ज्ञान होतें, असें '**तथा महद्भयं**०' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=त्याचप्रमाणें 'तें ब्रह्म फार मोठें भय, वर उचललेलें जणुं काय वज्रच आहे'–का. ३. ३. २.–असा काठकांत सांगितलेल्या 'भयहेतुत्व' या ईश्वरगुणाचा तैत्तिरीयकांत भेददर्शनाच्या निंदेसाठीं परामर्श केलेला दिसतो. 'एष पुरुषः'–"हा पुरुष 'यदा'–ज्या अविद्यावस्थेंत 'एतस्मिन्'–अद्वयत्वानें सर्ववेदान्तप्रसिद्ध अशा या आत्म्यामध्यें आत्माज्ञान-

वशात् ' उत् अरं अन्तरं कुरुते '–अत्यल्पहि अन्तर–भेददृष्टि करितो ' अथ '–त्या अवस्थेंत ' तस्य '–त्या भेददर्शनवानाला 'भयं भवति'–भय अवश्य होतें." [ कारण ' दुसऱ्या वस्तूपासूनच भय होतें '–बृ. १. ४. २. सु.उ. ५४६.–अशी दुसरी श्रुति आहे.–भेददर्शनवानाच्या–भेददृष्टिपुरुषाच्या भयाचें कारण श्रुति सांगते–]='तु तत् एव०'–"पण तें ब्रह्मच तत्त्वाचा विचार न करणाऱ्या भेददृष्टि विद्वानाचें भय आहे. "–तै. २. ७. १. सु. उ. २२६.–' इति '–असा सिद्धवत् परामर्श केला आहे. [ ब्रह्मच त्याच्या भयाचें कारण आहे, असा याचा भावार्थ. –"अहोपण, निर्गुणविद्येंत वेद्याच्या एकत्वामुळें विद्येला एकत्व जरी असलें तरी सगुणविद्येंत एकत्व कसें ?" ' तथा० ' इत्यादि भाष्यानें उत्तर–]

**भाष्यं—तथा वाजसनेयके प्रादेशमात्रसंपादितस्य वैश्वानरस्य छान्दोग्ये सिद्धवदुपादानं ' यस्त्वेतमेवं प्रादेशमात्रमभिविमानमात्मानं वैश्वानरमुपास्ते ' इति । तथा सर्ववेदान्तप्रत्ययत्वेनान्यत्र विहितानामुक्थादीनां अन्यत्रोपासनविधानायोपादानात्प्रायदर्शनन्यायेन उपासनानामपि सर्ववेदान्तप्रत्ययत्वसिद्धिः॥**

**भाष्यार्थ**—त्याचप्रमाणें वाजसनेयकांत प्रादेशमात्र संपादिलेल्या वैश्वानराचें छान्दोग्यांत " पण जो याप्रमाणें प्रादेशमात्र, ' हाच मी ' अशा अभिमानाचा विषय होणाऱ्या वैश्वानर आत्म्याला उपासितो"–छां. ५. १८. १.–असें सिद्धवत ग्रहण केलें आहे. ज्याप्रमाणें निर्गुण व सगुण ब्रह्म सर्वत्र एकच आहे, त्यामुळें त्याचा द्विधा भेद होत नाहीं, त्याप्रमाणें सर्ववेदान्तप्रत्ययत्वानें अन्यत्र विहित असलेल्या उक्थादिकांचें अन्यत्र उपासन सांगण्यासाठीं ग्रहण केलेलें असल्यामुळें प्रायदर्शनन्यायानें म्ह० बाहुल्यदर्शनानें उपासनांच्याहि सर्ववेदान्तप्रत्ययत्वाची सिद्धि होते. [ जसें सगुण-निर्गुण ब्रह्म सर्वत्र एक म्हणून त्याची विद्याहि भिन्न नाहीं, त्याप्रमाणें उक्थादिकांना सर्ववेदान्तप्रत्ययत्वामुळें ' अन्यत्र सांगितलेल्या त्यांचें अन्यत्र उपासनेसाठीं ग्रहण केलें जातें' हें अवगत होतें. त्यामुळें त्यांच्या उपासनांचेंहि सर्ववेदान्तप्रमाणकत्वानें बाहुल्यानें ऐक्य सिद्ध होतें,असा भावार्थ.] ४(१)

**( २. उपसंहाराधिकरण. सू. ५ )**

——सर्व शाखांमध्यें विद्येचें ऐक्य आहे, असें झालें असतां ' गुणीनें आकर्षण केलेल्या गुणांचा त्या त्या विद्येंत उपसंहार' हें मागील विचाराचें फल **'उपसंहारः०'** इत्यादि सूत्रानें सांगतात——

**सूत्रं——उपसंहारोऽर्थाभेदाद्विधिशेषवत्समाने च ॥५॥ (२)**

**सूत्रार्थ**—' समाने च उपसंहारः'–समान उपासनेंत गुणांचा उपसंहार करणें युक्त आहे. ' **अर्थाभेदात्** '–कारण त्या **गुणांच्या** विशिष्ट **विज्ञानोपकारक अर्थाचा**

अभेद आहे. 'विधिशेषाप्रमाणें'–सर्वत्र एक असलेल्या अग्निहोत्राच्या अंगांचा जसा उपसंहार केला जातो त्याप्रमाणें. ५. (२)–सु. ब्र. ३०५–['इदं०' इत्यादि भाष्यानें संक्षेपतः अधिकरणाचें तात्पर्य सांगतात–]

**भाष्यं—इदं प्रयोजनसूत्रम्। स्थिते चैवं सर्ववेदान्तप्रत्ययत्वे सर्वविज्ञानानां अन्यत्रोदितानां विज्ञानगुणानामन्यत्रापि समाने विज्ञाने उपसंहारो भवति। अर्थाभेदात्। य एव हि तेषां गुणानामेकत्रार्थो विशिष्टविज्ञानोपकारकः स एवान्यत्रापि। उभयत्रापि हि तदेवैकं विज्ञानम्। तस्मादुपसंहारः॥**

**भाष्यार्थ**—हें प्रयोजनसूत्र आहे. [पूर्वविचाराचें फल या सूत्रानें सांगितलें जातें. त्यामुळें त्या अधिकरणाप्रमाणेंच याच्या पादादिसंगति जाणाव्या. पूर्वपक्षांत 'पूर्वाधिकरणाच्या विवक्षित फलाची असिद्धि' व सिद्धान्तांत 'त्याची सिद्धि', असा फलभेद आहे. समानज्ञानबद्ध गुण हा याचा विषय, ते जसे श्रुत आहेत तसेच व्यवस्थित होतात कीं प्रत्यभिज्ञेनें ज्ञानोपाधींत त्यांचा उपसंहार केला जातो–ते ज्या विद्येंत उक्त आहेत त्याच विद्येंत ग्राह्य आहेत कीं दुसऱ्याहि समान विद्येंत त्यांचा उपसंहार होतो! असा विचार प्राप्त झाला असतां व इच्छाभेदामुळें अतिरात्रांत षोडशीच्या ग्रहणाप्रमाणें उपसंहाराची कांहीं आवश्यकता नाहीं, त्यामुळें त्यांची यथाश्रुति व्यवस्था जाणावी–ते जेथें श्रुत आहेत तेथेंच नियत आहेत, असें समजावें, असा पूर्वपक्ष प्राप्त झाला असतां–सिद्धान्त सांगणारे भाष्यकार सूत्रांतील 'उपसंहारः समाने च' या भागाचें व्याख्यान करितात–]='**स्थिते चैवं०**'–'आणि' याप्रमाणें सर्व विज्ञानांचें सर्ववेदान्तप्रत्ययत्व सिद्ध झालें असतां अन्यत्र–दुसऱ्या वेदान्तांत सांगितलेल्या विज्ञानगुणांचा दुसऱ्या ठिकाणींहि 'समान विज्ञानांत उपसंहार होतो.' [–त्याविषयीं सूत्रोक्त हेतु सांगून त्याचें व्याख्यान–]= '**अर्थाभेदात्**'–अर्थाच्या अभेदामुळें–कारण त्या गुणांचा जो एकत्र–एकेठिकाणीं विशिष्ट विज्ञानोपकारक अर्थ आहे तोच अन्यत्राहि आहे. [–"अहोपण, व्यवस्थेनें श्रुत असलेल्या गुणांचें उपकारैक्य कसें?" '**उभयत्र०**' इत्यादि भाष्यानें उत्तर–] =कारण दोन्ही ठिकाणीं तेंच एक विज्ञान आहे. [–गुणी विज्ञानाच्या द्वारा गुणांचेंहि प्रत्यभिज्ञान होत असल्यामुळें त्याचें फलित सांगतात–]='**तस्मात्०**'– त्यामुळें उपसंहार होतो. [–अर्थाच्या अभेदामुळें उपसंहाराविषयीं '**विधिशेषवत्०**' इत्यादि सूत्रोक्त दृष्टान्त व त्याचें व्याख्यान–]

**भाष्यं—विधिशेषवत्। यथा विधिशेषाणामग्निहोत्रादिधर्माणां तदेवैकमग्निहोत्रादि कर्म सर्वत्रेत्यर्थाभेदादुपसंहरणं, एवमिहापि। यदि हि विज्ञानभेदो**

**भवेत्ततो विज्ञानान्तरनिबद्धत्वाद्गुणानां प्रकृतिविकृतिभावाभावाच्च न स्यादुपसंहारः । विज्ञानैकत्वे तु नैवमिति । अस्यैव तु प्रयोजनसूत्रस्य प्रपंचः 'सर्वाभेदात्०' इत्यारभ्य भविष्यति ॥ ५ ॥ (२)**

**भाष्यार्थ**—'विधिशेषाप्रमाणें' ज्याप्रमाणें–विधिशेषांचें म्ह० अग्निहोत्रादि धर्मांचें सर्वत्र तेंच एक अग्निहोत्रादि कर्म आहे, म्हणून अर्थाच्या अभेदामुळें उपसंहरण —त्या धर्मांचा उपसंहार केला जातो, [–प्रधानाचें प्रत्यभिज्ञान झालें असतां त्याच्या सर्व धर्मांचें प्रत्यभिज्ञान होत असल्यामुळें व फलाचा अभेद–ऐक्य असल्यामुळें व्यवस्थेनें श्रुत असलेल्याहि गुणांचा एक-ज्ञानोपाधींत उपसंहार होतो, असा दार्ष्टान्तिक सांगतात–]='एवं०'–याप्रमाणें येथें–या ज्ञानांतहि गुणांचा उपसंहार होतो. [–हा उक्त अर्थच व्यतिरेकानें स्पष्ट करितात–]='यदि हि०'–कारण जर विज्ञानाचा भेद असता तर गुण दुसऱ्या विज्ञानाशीं निबद्ध–नित्य संबद्ध असल्यामुळें, [–" पण आग्नेय व सौर्य यांचा जरी भेद असला तरी आग्नेयांतील सर्व इतिकर्तव्यतेची सौर्यामध्यें जशी प्राप्ति होते त्याप्रमाणें ज्ञानान्तरस्थ गुणांचीहि दुसऱ्या ज्ञानांत प्राप्ति होईल," अशी आशंका घेऊन 'प्रकृति०' इत्यादि म्हणतात–]=आणि प्रकृति-विकृतिभावाचा अभाव असल्यामुळें उपसंहार झाला नसता. [–" अहोपण, विज्ञानैक्य जरी असलें तरी शाखान्तरोक्त गुणांचा शाखान्तरांत उपसंहार होत नाहीं. कारण तेथें–त्या शाखेंत सांगितलेल्या गुणांनींच त्या ज्ञानाच्या उपकाराची सिद्धि होते. त्यामुळें तें अधिक गुणांची अपेक्षा करीत नाहीं. नाहीं तर तेथेंच–त्या ज्ञानांतच त्या गुणांच्याहि विधीचा प्रसंग येतो. म्हणून अक्षि व आदित्य या स्थानभेदानें सांगितलेल्या 'अहर्' व 'अहं' या दोन गुणांच्या व्यवस्थानाप्रमाणें–नियमाप्रमाणें उपास्याचा जरी अभेद असला तरी शाखाभेदानें सांगितलेल्या गुणांची व्यवस्थाच–नियमच आहे" अशी आशंका घेऊन 'शाखाभेदाला उक्त स्थानाप्रमाणें उपास्याचें विशेषणत्व असल्यामुळें गुणव्यवस्थापकत्वाचा अभाव आहे–शाखाभेद गुणांचा नियम करीत नाहीं. त्यामुळें धर्मि-उपाधींत सांगितलेल्या गुणांचा सर्वत्र श्रुत धर्मीनें नियम होतो, त्यावरून अनुमानानें त्यांच्या सार्वत्रिकत्वाची सिद्धि होते. यास्तव विद्येच्या ऐक्यांतील म्ह० एकाच विद्येंतील गुणांच्या उपसंहाराचें निवारण करितां येणें शक्य नाहीं. कारण त्याचा बाध करणारें असें कांहीं एक सबल कारण नाहीं. शाखान्तरीं जे कांहीं थोडे गुण सांगितलेले असतात, त्यांना त्या विधीचें अर्थत्व असल्यामुळें तो गुणवाद गुणांतराचें निवारण करीत नाहीं, असें 'विज्ञानैकत्वे तु०' इत्यादि भाष्यानें

सांगतात –]=पण विज्ञानाचें एकत्व असतांना असा उपसंहाराचा अभाव होत नाहीं, 'इति'–असा येथें सिद्धान्त समाप्त झाला. [–'अस्यैव तु०' या भाष्यानें पुढील ग्रंथाच्या पुनरुक्तींचें निरसन करितात–]=पण याच प्रयोजनसूत्राचा अधिक विस्तार 'सर्वाभेदात्०'–सू. १०.–येथून आरंभ करून पुढें होईल. ५. (२)

( ३. अन्यथात्वाधिकरण. सू. ६-८. )

–संज्ञेच्या–नांवाच्या अभेदामुळें ज्ञानाचें ऐक्य आहे व त्याच्या गुणांचा अन्यत्र उपसंहार होतो, असें सांगितलें. आतां छांदोग्य व बृहदारण्यक यांत सांगितलेल्या उद्गीथविद्यांच्याहि संज्ञाभेदाची आशंका घेऊन तिचें 'अन्यथात्वं०'इत्यादि निरसन–

**सूत्रं––अन्यथात्वं शब्दादिति चेन्नाविशेषात् ॥ ६**

**सूत्रार्थ**––छांदोग्य व बृहदारण्यक यांतील उद्गीथविद्यांना 'अन्यथात्व'–भिन्न प्रकारत्व आहे. त्या दोन्ही एक नाहींत. कारण 'तूं आमच्या साठीं उद्गान कर' व 'त्या उद्गीथाची उपासना करिते झाले' असा 'शब्द' आहे असें जर म्हणाल तर तें बरोबर नाहीं. कारण देवासुरांच्या संग्रामाचा उपक्रम, असुरांच्या अतिक्रमाचा आशय इत्यादि दोन्हीं ठिकाणीं अविशेष–समान आहे. ६.–सु. ब्र. ३०७–[–'चोदनादि-अविशेषात्'–पृ. २२०–याच्या अपवादासाठीं हें अधिकरण आहे. त्याचा बृहदारण्यकस्थ उद्गीथ ब्राह्मण व छांदोग्यस्थ उद्गीथ अध्याय हा विषय 'वाजसनेयके०' इत्यादि भाष्यानें सांगतात––]

**भाष्यं**––वाजसनेयके 'ते ह देवा ऊचुर्हन्तासुरान्यज्ञ उद्गीथेनात्ययामेति' 'ते ह वाचमूचुस्त्वं न उद्गाय' इति प्रक्रम्य, वागादीन्प्राणानसुरपाप्मविद्धत्वेन निंदित्वा। मुख्यप्राणपरिग्रहः पठ्यते––'अथ हेममासन्यं प्राणमूचुस्त्वं न उद्गायेति तथेति तेभ्य एष प्राण उदगायत्' इति ॥

**भाष्यार्थ**––वाजसनेयकांत "ते देव 'आतां आम्ही यज्ञांत उद्गीथाच्या योगानें असुरांचें अतिक्रमण करूं' असें म्हणाले. ते वाक्-ला म्हणाले 'तूं आमच्यासाठीं उद्गान कर"–बृ. १. ३. १-२.–असा उपक्रम करून वागादि इतर प्राणांची असुरपाप्मविद्धत्वानें निंदा करून–"त्यानंतर या मुखांतील मुख्य प्राणास ते म्हणाले, तूं आमच्या साठीं उद्गान कर. तेव्हां ठीक आहे, असें म्हणून त्यांच्यासाठीं प्राण उद्गान करिता झाला."–बृ. १. ३.७–असा मुख्य प्राणाचा परिग्रह पठित आहे. [ते प्रकृत वागादि प्राण–सात्त्विकवृत्तिप्रधान देव एकत्र जमून परस्परांस म्हणाले "जर आपणां सर्वांची संमति असेल तर या आभिचारिक यज्ञांत आपण उद्गीथ-संज्ञक भक्तीनें लक्षित होणाऱ्या औद्गात्र कर्मानें तमोवृत्तिप्रधान असुरांचें अति-

क्रमण करून आपल्या अग्न्यादिभावास प्राप्त होऊं." याप्रमाणें ज्यांनीं आपसांत परस्पर संवाद केला आहे, असे ते वाकूला 'औद्गात्र कर्मांत प्रधान असलेली तूं आमच्यासाठीं औद्गात्र कर' असें म्हणून तिला नियुक्त करिते झाले, असा उपक्रम करून वाक्, प्राण, चक्षुः, श्रोत्र व मन, या वागादिकांची 'कारण ती पापानें विद्ध झाली' अशी पापविद्धत्वानें निंदा करून, त्यांचा अध्येयत्वानें–अनुपास्यत्वानें निर्धार करून व मुख्य प्राणाचें उपास्यत्व निश्चित करून त्याचा परिग्रह श्रुत आहे, असा याचा भावार्थ. 'अथ'–वागादिकांच्या अनुपास्यत्वाचा निश्चय केल्यानंतर मुखांत असलेल्या प्राणाला–मुख्य प्राणाभिमानिनी देवतेला, असा भावार्थ.–याप्रमाणें उद्गीथ ब्राह्मण सांगून 'तथा०' इत्यादि भाष्यानें उद्गीथ अध्याय सांगतात—]

**भाष्यं—तथा छांदोग्येऽपि— 'तद्ध देवा उद्गीथमाजह्रुरनेनैनानभिभविष्यामः' इति प्रक्रम्य इतरान्प्राणानसुरपाप्मविद्धत्वेन निंदित्वा । तथैव मुख्यप्राणपरिग्रहः पठ्यते—'अथ ह य एवायं मुख्यः प्राणस्तमुद्गीथमुपासांचक्रिरे' इति । उभयत्रापि च प्राणप्रशंसया प्राणविद्याविधिरध्यवसीयते ॥**

**भाष्यार्थ**—त्याचप्रमाणें छांदोग्यांतहि "त्या परस्परपराभवात्मक संग्रामांत देव उद्गीथाचें आहरण–उद्गात्याचें कर्म करिते झाले. या कर्मानें या स्वाभाविक इंद्रियरूप असुरांस आम्ही पराभूत करूं अशा अभिप्रायानें त्यांनीं त्या कर्माला आरंभ केला"–छां.१.२.१–असा उपक्रम करून इतर प्राणांची असुरपापविद्धत्वानें निंदा करून '**तथैव**'–उद्गीथ ब्राह्मणाप्रमाणेंच "नंतर हा जो मुख्य प्राण त्याच्या दृष्टीनें देव उद्गीथाची उपासना करिते झाले."–छां.१.२.७–असा मुख्य प्राणाचा परिग्रह पठित आहे. [–"अहोपण, त्यांत आख्यायिकाच श्रुत आहे. विद्याविधि श्रुत नाहीं," अशी आशंका घेऊन ब्राह्मण व अध्याय यांचा विवक्षित अर्थ '**उभयत्रापि०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]= ब्राह्मण व अध्याय या दोहोंमध्येंहि प्राणाच्या प्रशंसेनें प्राणविद्येचा विधि निश्चित केला जातो. [–याप्रमाणें शाखाद्वयस्थ उद्गीथविद्या हा विषय सांगून '**तत्र०**' इत्यादि भाष्यानें विचाराचें बीज–संशय सांगतात–]

**भाष्यं—तत्र संशयः— किमत्र विद्याभेदः स्यादाहोस्विद्विद्यैकत्वमिति । किं तावत्प्राप्तं । पूर्वेण न्यायेन विद्यैकत्वमिति ॥**

**भाष्यार्थ**—त्याविषयीं संशय येतो. [–भेदप्रमाण व अभेदप्रमाण यांच्या योगानें तो संशयच '**किमत्र०**' इत्यादि भाष्यानें विशद करितात–]=काय, येथें विद्याभेद

आहे कीं विद्येचें एकत्व आहे बरें ? [–'किं तावत्०' इत्यादि भाष्यानें विमर्शपूर्वक पूर्वपक्ष–]=त्यांतील अगोदर कोणता पक्ष प्राप्त झाला ? पूर्वन्यायानें विद्येचें एकत्व आहे, असें प्राप्त झालें. [पूर्वी संज्ञेच्या अविशेषामुळें–अभेदामुळें विद्येचें एकत्व सांगितलें. त्या न्यायानें येथेंहि 'उद्गीथविद्या' अशा आख्येचा–संज्ञेचा अविशेष–अभेद असल्यामुळें ऐक्य आहे, असा याचा भावार्थ. येथें उपासनेच्या भेदकथनानें वाक्यार्थज्ञानाच्या हेतूचेंच निरूपण केलेलें असल्यामुळें याच्या पादादिसंगति आहेत. पूर्वपक्षांत 'गुणांचा उपसंहार' व सिद्धान्तांत 'त्याचा अभाव,' असा फलभेद आहे.–या पूर्वपक्षावर 'अन्यथात्वं' या सिद्धान्तसंबंधी शंकेचें व्याख्यान करणारे भाष्यकार 'ननु०' इत्यादि भाष्यानें आक्षेप घेतात–]

**भाष्यं—ननु न युक्तं विद्यैकत्वं प्रक्रमभेदात् । अन्यथा हि प्रक्रमन्ते वाजसनेयिनोऽन्यथा छंदोगाः । 'त्वं न उद्गाय' इति वाजसनेयिन उद्गीथस्य कर्तृत्वेन प्राणं आमनन्ति । छंदोगास्तु उद्गीथत्वेन 'तमुद्गीथमुपासांचक्रिरे' इति । तत्कथं विद्यैकत्वं स्यादिति चेत् ॥**

**भाष्यार्थ**—'अहोपण, प्रक्रमभेदामुळें–आरंभाच्या भेदामुळें विद्येचें एकत्व युक्त नाहीं. [–'प्रक्रमभेदामुळें' असें जें भाष्यांत म्हटलें आहे तेंच विशद करितात–]='**अन्यथा** हि०'–कारण वाजसनेयिशाखाध्यायी दुसऱ्याच प्रकारें आरंभ करितात व छंदोग अन्य प्रकारें आरंभ करितात.[–"दोन्ही ठिकाणीं प्रक्रमाचें अन्यथात्व कसें ?" उत्तर–]='तूं आम्हांसाठीं उद्गान कर'–पृ. २४३–असें वाजसनेयी उद्गीथाच्या म्ह० सर्व भक्तीच्या कर्तृत्वानें प्राणाचें आमनन–कथन करितात. पण छंदोग 'त्या उद्गीथाची उपासना करिते झाले'–पृ. २४४–असें उद्गीथत्वानें म्ह० त्या भक्तीचा अवयव जो ओंकार, तद्रूपानें त्याचें कथन करितात. [–वाजयनेयकांत उद्गानकर्ता प्राण ध्येयत्वानें सांगितला जातो. पण छांदोग्यांत ओंकार प्राणदृष्ट्या उपास्य अभीष्ट आहे,अर्थात् कर्तृ-कर्मभेदामुळें विद्येचें ऐक्य नाहीं, असें फलित सांगतात–]='**तत्कथं**०'–तेव्हां त्या विद्यांचें ऐक्य कसें असेल,असें जर म्हणाल तर [–बहुतर रूपप्रत्यभिज्ञानामुळें–त्यांच्या एकरूपत्वाची पुष्कळशी प्रत्यभिज्ञा होत असल्यामुळें थोडेंसें अप्रत्यभिज्ञान लक्षणेनें नेतां येणें शक्य आहे, त्याची लक्षणेनें व्यवस्था लावितां येते, असें मानून पूर्ववादी '**नैष दोषः**०' इत्यादि भाष्यानें समाधान करितो–]

**भाष्यं—नैष दोषः । न ह्येतावता विशेषेण विद्यैकत्वमपगच्छति । अविशेषस्यापि बहुतरस्य प्रतीयमानत्वात् । तथाहि–देवासुरसंग्रामोपक्रमत्वं ।**

**असुरात्ययाभिप्रायः । उद्गीथोपन्यासः । वागादिसंकीर्तनं । तन्निंदया मुख्यप्राणव्यपाश्रयः, तद्वीर्याच्चासुरविध्वंसनमश्मलोष्टनिदर्शनेन, इत्येवं बहवोऽर्था उभयत्राप्यविशिष्टाः प्रतीयन्ते ॥**

**भाष्यार्थ**—हा दोष येत नाहीं. [–' न हि०' इत्यादि भाष्यानें सूत्रांतील ' अविशेषात् ' या भागाचें व्याख्यान–]=कारण ' एतावता '–क्वचित् कर्मरूपत्वानें उपास्यत्व व दुसऱ्या ठिकाणीं कर्तृत्वानें, या एवढ्याशाच विशेषानें विद्येचें एकत्व जात नाहीं. कारण ' बहुतर '–त्याहून पुष्कळशा अधिक अविशेषाचीहि प्रतीति येते–त्यांत पुष्कळसा अभेदहि प्रतीत होतो. [–बहुतर अविशेष प्रतीतीच वादी प्रकट करितो–]='तथाहि०'–कशी ती पहा–देवासुरसंग्रामाचें उपक्रमत्व,असुरांच्या अत्ययाचा–अतिक्रमणाचा उद्देश, उद्गीथाचा उपन्यास,वागादिकांचें संकीर्तन, [–पाषणावर पडून मातीचें ढेकुळ जसें नाश पावतें त्याप्रमाणें विध्वंस पावणारे असुर सर्वतः विनाश पावले, असें श्रुत आहे, असें वादी सांगतो–]=' तन्निंदया०' –त्या वागादिकांच्या निंदेनें मुख्य प्राणाचा विशेष आश्रय व पाषाण आणि ढेकुळ यांच्या दृष्टान्तानें प्राणाच्या वीर्यानें असुरांचा विध्वंस [अविशेष ज्ञानाचें निगमन–] ='इत्येवं०'–हे अशा प्रकारचे पुष्कळ अर्थ दोन्ही ठिकाणीं अविशिष्ट–समान–एकसारखेंच प्रतीत होतात. [–केवळ शाखान्तरांतच असा रूपभेद उपलब्ध होत नाहीं, तर एका शाखेंतहि तो उपलब्ध होतो, तथापि तेथें विद्याभेद नाहीं. तसाच तो दोन्ही शाखांतहि नसेल असें वादी 'वाजसनेयके०' इत्यादि भाष्यानें सांगतो–]

**भाष्यं—वाजसनेयकेऽपि च उद्गीथसामानाधिकरण्यं प्राणस्य श्रुतम्—'एष उ वा उद्गीथः' इति । तस्माच्छांदोग्येऽपि कर्तृत्वं लक्षयितव्यम् । तस्माच्च विद्यैकत्वमिति ॥ ६ ॥**

**भाष्यार्थ**—वाजसनेयकांतहि ' हा प्राण उद्गीथहि आहे '–बृ.१.३.२३–असें प्राणाचें उद्गीथसामानाधिकरण्य श्रुत आहे. [–" प्राणाचें उद्गीथत्व जर येथेंहि श्रुत आहे तर त्याची उपासना कशी ? " ' तस्मात्०' इत्यादि उत्तर–]=म्हणून छांदोग्यांतहि कर्तृत्व लक्षणीय आहे, त्याची लक्षणा करणें उचित आहे. [उद्गीथत्वानें श्रुतीचा दोन्ही ठिकाणीं अविशेष असल्यामुळें जें एकत्र श्रुत असलेलें कर्तृत्व तें इतरत्रहि–दुसऱ्या श्रुतींतहि लक्ष्य आहे. त्यामुळें शास्त्राच्या आधारानें प्राणाचें कर्तृत्वानें व कर्मत्वानें ध्यान करावें.–याप्रमाणें दोन्ही ठिकाणीं वेद्यरूपाचा अविशेष–अभेद आहे, असें झालें असतां ' तस्माच्च०' इत्यादि भाष्यानें वादी फलित सांगतो–]=आणि त्यामुळें विद्येला एकत्व आहे, असें प्राप्त झालें. ६.

[–विद्यैक्य, हा पूर्वपक्ष प्राप्त झाला असतां त्यांचा भेद आहे, असा सिद्धान्त 'न वा०' इत्यादि सूत्रानें सांगतात–]

**सूत्रं—न वा प्रकरणभेदात्परोवरीयस्त्वादिवत् ॥ ७**

**सूत्रार्थ—'न वा'**–प्रस्तुत विद्यांचें ऐक्य युक्त नाहीं. 'प्रकरणभेदामुळें'–कारण त्यांच्या उपक्रमाचा भेद आहे. 'परोवरीयस्त्वाप्रमाणें'–परोवरीयस्त्वादिविशिष्ट अक्षिगत उद्गीथोपासन आदित्यगत हिरण्यश्मश्रुत्वादिविशिष्ट उद्गीथोपासनेहून जसें भिन्न आहे त्याप्रमाणें, असा भावार्थ.७.–सु.ब्र.३०८. [–सूत्रांतील 'वा-'शब्दाचा अवधारण हा अर्थ आहे, असें मानून'न वा०' इत्यादि भाष्यानें प्रतिज्ञेचें व्याख्यान–]

**भाष्यं—न वा विद्यैकत्वमत्र न्याय्यं । विद्याभेद एवात्र न्याय्यः । कस्मात् । प्रकरणभेदात् । प्रक्रमभेदादित्यर्थः । तथाहि–इह प्रक्रमभेदो दृश्यते । छांदोग्ये तावत्—'ओमित्येतदक्षरमुद्गीथमुपासीत' इत्येवमुद्गीथावयवस्योंकारस्योपास्यत्वं प्रस्तुत्य । रसतमत्वादिगुणोपव्याख्यानं तत्र कृत्वा । 'अथ खल्वेतस्यैवाक्षरस्योपव्याख्यानं भवति' इति पुनरपि तमेवोद्गीथावयवमोंकारमनुवर्त्य । देवासुराख्यायिकाद्वारेण तं 'प्राणमुद्गीथमुपासांचक्रिरे' इत्याह ॥**

**भाष्यार्थ—**येथें–या प्रकृतशाखाद्वयांत विद्येचें एकत्व न्याय्य नाहींच. येथें विद्याभेदच न्याय्य आहे.–**'कस्मात्'**–पण दोन्ही शाखांमध्यें प्राणाचें उद्गीथत्व व तत्कर्तृत्व यांच्या अविशेषाचें कथन केलेलें असल्यामुळें वेद्याच्या अभेदानें विद्येचा अभेद संभवत असतांना त्यांच्या भेदाचें कथन कोणत्या कारणानें करितां ? [–त्याविषयीं हेतु–]=प्रकरणभेदामुळें.[–"अहोपण, शाखाभेदामुळेंच प्रकरणभेदाची सिद्धि होत असल्याकारणानें प्रकरणभेद हें विद्याभेदाचें निमित्त होऊं शकत नाहीं," अशी आशंका घेऊन **'प्रक्रम०'** इत्यादि भाष्यानें त्याचा अभीष्ट अर्थ सांगतात–]=प्रक्रमभेदामुळें–उपक्रमाच्या भेदामुळें असा याचा भावार्थ. [–दोन्ही शाखांतील प्रक्रमभेदाचें विवरण–]=**'तथाहि०'**–कारण येथें तसा प्रक्रमभेद स्पष्ट दिसतो. [–छांदोग्यांतील उपक्रमाचा प्रकार दाखवितात–]=**'छांदोग्ये०'**–त्यांतील अगोदर छांदोग्यांत "ओं, अशा या अक्षराचें–उद्गीथाचें उपासन करावें." हा अशा प्रकारें [–उपक्रमवाक्याचा अर्थ–]=उद्गीथाचा अवयव जो ओंकार त्याच्या उपास्यत्वाचा प्रस्ताव–आरंभ करून, [–प्रकरणविच्छेदाचा अभाव सांगण्यासाठीं त्याचें अनुसंधान–]=त्यांत रसतमत्वादिगुणांचें उपव्याख्यान करून "त्यानंतर–हें खरोखर त्याच अक्षराचें उपव्याख्यान आहे"–छां. १. १. १०– अशी पुनरपि त्याच उद्गीथावयव ओंकाराची अनुवृत्ति करून देव व असुर

यांच्या आख्यायिकेच्या द्वारा "देव प्राणाच्या दृष्टीनें त्या उद्‌गीथाची उपासना करिते झाले."–छां.२.२.७–असें श्रुति सांगते. [भूत, पृथिवी, आप्, ओषधि, पुरुष, वाक्, ऋक् व साम यांतील पूर्व पूर्व पदार्थ हें उत्तरोत्तर पदार्थांचें सार आहे, असें सांगून ओंकाराचा त्या सर्वांच्या सारतमत्वानें निर्देश करून, त्याचाच पुनरपि आप्ति, समृद्धि, इत्यादि गुणत्वानें उपदेश करून, ध्येयाचा आख्यायिकेनें निर्धार करून उद्‌गीथोपासना प्रवृत्त केली आहे, असा याचा भावार्थ.–"अहो-पण, ज्याप्रमाणें वाजसनेयकांत 'आम्ही उद्‌गीथानें यांचें अतिक्रमण करूं या' येथें उद्गीथशब्दानें सकल भक्ति सांगितली आहे, 'तूं आमच्यासाठीं उद्गान कर' या वाक्यानेंहि प्राणत्वानें उद्गाता सांगितला जातो, त्याचप्रमाणें 'ओं, अशा या अक्षराचें उद्गीथाचें उपासन करावें' या उपक्रमवाक्यस्थ उद्गीथशब्दानें सकल भक्ति व तिचा कर्ता उद्गाता प्राणत्वानें सांगितला जावो. अर्थात् प्रक्रमाच्या अभेदा-मुळें विद्येचें ऐक्य आहे" असें वादी म्हणेल म्हणून भाष्यकार 'तत्र०' इत्यादि भाष्यानें म्हणतात–]

**भाष्यं—तत्र यदि उद्गीथशब्देन सकला भक्तिरभिप्रेयेत । तस्याश्च कर्तोद्गाता र्त्विक् । तत उपक्रमश्चोपरुध्येत । लक्षणा च प्रसज्येत । उपक्रमानुरोधेन चैकस्मिन्वाक्ये उपसंहारेण भवितव्यम् । तस्मादत्र तावदुद्गीथावयवे ओंकारे प्राणदृष्टिरुपदिश्यते ॥**

**भाष्यार्थ**—या छांदोग्यवाक्यांत जर उद्‌गीथशब्दानें सकल भक्ति अभिप्रेत असेल व तिचा कर्ता उद्गाता ऋत्विक् असेल (व ऋत्विक् प्राणत्वानें सांगितलेला असेल) तर उपक्रमाचा उपरोध–बाध होईल व लक्षणा प्रसक्त–प्राप्त होईल. [त्यापक्षीं जें उद्गीथावयवभूत ओंकाराख्य अक्षर त्यामध्यें प्राणदृष्टि करावी, हा उपक्रम बाधित होईल, असा याचा भावार्थ. 'उपक्रमश्च' या भाष्यांतील चकार पुढील दोषाच्या समुच्चयासाठीं आहे. जें उद्‌गीथाच्या अवयवभूत ओंकाराख्य अक्षर, तद्विषय उद्‌गीथशब्दाला उद्‌गातृवाचित्वाचा अभाव असल्यामुळें–त्याला उद्‌गातृवाचित्व नसल्यामुळें तुझ्यापक्षीं त्या शब्दानें उद्‌गात्याला लक्ष्यत्वहि प्राप्त होईल, असें 'व लक्षणा प्रसक्त होईल' या भाष्यानें सांगितलें आहे.–'अक्ताः'–"भिजलेल्या 'शर्कराः'–सच्छिद्र खडे 'उपदधाति'–समीप ठेवितो–त्याचें उप-धान करितो," या वाक्याचा 'तेजच घृत आहे' या शेषवाक्यावरून जसा निर्णय केला जातो त्याप्रमाणें 'प्राणाची–उद्‌गीथाची उपासना करिते झाले' असा सकलभक्तिविषय–सकल उद्‌गीथभक्तीचा उपसंहार केलेला असल्यामुळें त्याच्या

**अनुरोधानें** उपक्रमाचा निर्णय करावा,'' अशी आशंका घेऊन आचार्य **'उपक्रमानुरोधेन०'** इत्यादि भाष्यानें म्हणतात–]=आणि एका वाक्यांत उपक्रमाच्या **तन्त्रानें उपसंहारानें** असावें, हें उचित आहे. [ शंकेतील वाक्याला संदिग्धार्थत्व **असल्यामुळें**–त्याचा अर्थ संदिग्ध असल्यामुळें त्याला उपसंहाराची अपेक्षा आहे. **पण प्रकृत वाक्यांत** उपक्रम अतिशय स्पष्ट असल्यामुळें त्याला उपसंहाराची अपेक्षा **नाहीं, असा** भावार्थ.–"तरमग 'ओं इत्येतदक्षरं०' इत्यादि वाक्यांत काय अर्थ आहे?" **'तस्मात्०'** इत्यादि भाष्यानें उत्तर–]=म्हणून या वाक्यांत उद्गीथाचा **अवयव जो ओंकार** त्यांत प्राणदृष्टीचा उपदेश केला जातो. [–"अहोपण, **'उद्गीथानें आम्ही अतिक्रमण करूं'** येथेंहि त्याच्या अवयवाला उद्गीथशब्दत्व असल्यामुळें **व** उद्गात्याचें अश्रवण असल्यामुळें प्रक्रमभेद नाहीं,'' अशी आशंका घेऊन भाष्यकार **'वाजसनेयके तु०'** इत्यादि भाष्यानें म्हणतात–]

**भाष्यं–वाजसनेयके तु उद्गीथशब्देनावयवग्रहणे कारणाभावात्सकलैव भक्तिरावेद्यते । 'त्वं न उद्गाय' इत्यपि तस्याः कर्तोद्गातर्त्विक्प्राणत्वेन निरूप्यत इति प्रस्थानान्तरम् । यदपि तत्रोद्गीथसामानाधिकरण्यं प्राणस्य तदपि उद्गातृत्वेनैव दिदर्शयिषितस्य प्राणस्य सर्वात्मत्वप्रतिपादनार्थमिति न विद्यैकत्वमावहति । सकलभक्तिविषय एव च तत्राप्युद्गीथशब्द इति वैषम्यम् ॥**

**भाष्यार्थ**—पण वाजसनेयकांत उद्गीथशब्दानें अवयवाचें ग्रहण **करण्यास कांहीं कारण** नाहीं, त्यामुळें सकल उद्गीथभक्तीच ज्ञापित होते–**सकलभक्तीचेंच ज्ञान करून** दिलें जातें. [ 'ओं इत्येतदक्षरं' या उपक्रमाला अवयवार्थत्व **आहे. त्यामुळें** तेथील 'उद्गीथं' या उद्गीथशब्दानें अवयवाचें ग्रहण केलें आहे. **पण** 'उद्गीथानें अतिक्रमण करूं' येथें तसा कांहीं हेतु उपलब्ध होत **नसल्यामुळें त्याला** सकलभक्तिविषयत्वच आहे, असा याचा भावार्थ.–आतां 'येथेंहि उद्गात्याचें **ज्ञान** होत नाहीं,' असें जें वाद्यानें वर–पृ. २४५–म्हटलें आहे त्याविषयीं **'त्वं नः०'** इत्यादि भाष्यानें आचार्य म्हणतात–]="तूं आमच्यासाठीं उद्गान कर"–**येथेंहि त्या भक्तीचा** कर्ता उद्गाता ऋत्विक् प्राणत्वानें निरूपित केला जातो. **त्यामुळें हें प्रस्थानान्तर** आहे. [–"**पण** प्राणाला उद्गीथकर्तृत्व कसें ? **कारण** त्याचें **उद्गीथाशीं** सामानाधिकरण्य श्रुत आहे. त्यामुळें वेद्याच्या एकत्वामुळें विद्येचें **एकत्व आहे**" असें जें म्हटलें आहे–पृ. २४६–त्याविषयीं **'यदपि०'** इत्यादि **भाष्यानें म्हणतात**–]=आणि वाजसनेयकांत **प्राणाचें** उद्गीथाशीं जें **सामानाधिकरण्य आहे** तेंहि **उद्गातृत्वानेंच प्रदर्शित** करण्यास अभीष्ट **असलेल्या प्राणाचें सर्वात्मत्व प्रति-**

पादन करण्यासाठीं आहे. त्यामुळें तें विधैकत्व प्राप्त करवीत नाहीं. [–या हि कार-णानें हें सामानाधिकरण्य विधैक्य सिद्ध करण्यास समर्थ नाहीं, असें ' सकल० ' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=शिवाय ' तत्र अपि० '–' उद्गीथानें अतिक्रमण करू ' या वाक्याप्रमाणेंच त्या सामानाधिकरण्यवाक्यांतहि 'उद्गीथ' हा शब्द सकल भक्तिविषयच आहे, असें वैषम्य आहे. [ 'वैषम्य' म्ह० दोन्ही ठिकाणीं विधेचें अनेकत्व.–" पण प्राणाला अचेतनत्व असल्यामुळें उद्गातृत्व नाहीं, " अशी आशंका घेऊन ' न च० ' इत्यादि भाष्यानें म्हणतात–]

**भाष्यं—न च प्राणस्योद्गातृत्वं असंभवेन हेतुना परित्यज्यते । उद्गीथभाव-वदुद्गातृभावस्याप्युपासनार्थत्वेन उपदिश्यमानत्वात् । प्राणवीर्येणैव चोद्गातौद्गात्रं करोतीति नास्त्यसंभवः । तथा च तत्रैव श्रावितम्–वाचा च ह्येव स प्राणेन चोद्गायत् ' इति ॥**

**भाष्यार्थ**—प्राणाचें उद्गातृत्व असंभव या हेतूनें सर्वथा टाकिलें जात नाहीं, त्याचा परित्याग करितां येत नाहीं. कारण त्याच्या उद्गीथभावाप्रमाणें उद्गातृभावहि उपासनेसाठीं उपदेशिला जातो. [ उपासना या प्रयोजनासाठीं प्राणाचा उद्गीथ-भाव जसा सांगितला जातो तसाच उपासनार्थत्वानेंच त्याचा उद्गातृभाव सांगि-तला जातो, त्यामुळें ' प्राण अचेतन आहे, यास्तव तो उद्गाता होऊं शकत नाहीं ' असें म्हणून त्याचा परित्याग केला जात नाहीं, असा भावार्थ.–याप्रमाणें प्राणाच्या उद्गातृत्वाचा असंभव मानून त्याचें उद्गातृत्व वाचनिक–वचनानें प्राप्त आहे, असें सांगितलें. आतां त्याचा असंभवहि नाहीं, असें ' प्राणवीर्येण० ' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=आणि उद्गाता प्राणाच्या वीर्यानें–सामर्थ्यानें औद्गात्र कर्म करितो. त्यामुळें प्राणाच्या उद्गातृत्वाचा असंभवहि नाहीं. [–"पण उद्गाता औद्गात्र प्राणाच्या वीर्यानें करितो, हेंच कसें सिद्ध होतें ? " ' तथा च० ' इत्यादि भाष्यानें उत्तर–]=आणि तसें त्या उद्गीथप्रकरणांतच " तो अयास्य वाक् व प्राण यांच्या योगानेंच उद्गान करिता झाला. "–बृ.१.३.२४. सु. उ. ५४२–असें श्रवण करविलें आहे. [ उद्गाता प्राणप्रधान वाक्नें औद्गात्र करिता झाला, असा श्रुतीचा अर्थ आहे.–आतां ' बहुतर अर्थाच्या अविशेषामुळें विधैक्य आहे ' असें जें वाद्याचें म्हणणें आहे,–पृ. २४६–त्याविषयीं आचार्य ' न च० ' इत्यादि म्हणतात–]

**भाष्यं—न च विवक्षितार्थभेदेऽवगम्यमाने वाक्यच्छायानुकारमात्रेण समा-नार्थत्वमध्यवसातुं युक्तम् । यथाहि अभ्युदयवाक्ये पशुकामवाक्ये च–' त्रेधा**

तंडुलान्विभजेद्ये मध्यमाः स्युस्तानग्नये दात्रे पुरोडाशमष्टाकपालं कुर्यात्' इत्यादिनिर्देशसाम्येऽपि उपक्रमभेदादभ्युदयवाक्ये देवतापनयोऽध्यवसितः। पशुकामवाक्ये तु यागविधिः। तथेहाप्युक्रमभेदाद्विद्याभेदः॥

भाष्यार्थ—आणि विवक्षित अर्थाचा भेद अवगत होत असतांना केवळ वाक्यांच्या छायेच्या सादृश्यानेंच त्यांना समानार्थत्व आहे–त्यांचा विषय एक आहे, असा निश्चय करणें युक्त नाहीं [ वाजसनेयकांत तर उद्गीथ व उद्गाता हे दोन्ही ध्येयत्वानें सांगितले जातात. पण छान्दोग्यांत उद्गीथाचा अवयव ओंकार प्राणदृष्ट्या उपास्य सांगितला आहे. याप्रमाणें विवक्षित अर्थ असें जें अन्तरंग उपास्यस्वरूप त्याचा भेद अवगत झाला असतां बहिरंगभूत अर्थवादविशेषावरून एकार्थत्वानें विद्यैक्य सिद्ध होत नाहीं, असा भावार्थ.–वाक्याच्या केवळ सादृश्यावरूनच अर्थैक्य सिद्ध होत नाहीं, याविषयीं 'तथाहि०' इत्यादि भाष्यानें दृष्टान्त–] =कसें तें पहा–अभ्युदयवाक्यांत व पशुकामवाक्यांत "तांदुळांचा तीन प्रकारें

१ न्यायनिर्णय—कृष्णचतुर्दशीच्या दिवशींच अमावास्येच्या भ्रांतीनें दर्श करावयास प्रवृत्त झालेल्या यजमानाचा चंद्र मागून, त्यानें हवि दिल्यावर उदय पावतो. त्याविषयींचें जें वाक्य तें अभ्युदय वाक्य, त्या वाक्यांत व ज्याला पशूचा काम आहे त्याच्या इष्टीचें विधान करणाऱ्या वाक्यांत 'त्रेधा तंडुलान् विभजेत्'–तांदुळांचा तीन प्रकारें विभाग करावा, इत्यादि निर्देश एकसारखाच आहे. तथापि 'त्रिवा एतं प्रजया पशुभिरर्धयति वर्धयति अस्य भ्रातृव्यं यस्य हविर्निरुप्तं पुरस्ताच्चन्द्रमा अभ्युदेति' असा 'कालातिक्रम' या अपराधानें उपक्रम केलेला असल्यामुळें अभ्युदयवाक्यांत नित्य दर्शकर्मांतीलच पूर्वदेवतांना उद्देशून हवींच्या अपनयनानें दातृत्वादिगुणविशिष्ट दुसऱ्या देवतांचा अंगीकार केला आहे आणि पशुकामवाक्यांत 'जो पशुकाम असेल त्यानें अमावास्येस इष्टि करून वत्सापकरण करावें' असें नित्य दर्शकर्म संपवून पुनरपि दोहासाठीं वत्सापकरणविधीचा उपक्रम केलेला असल्यामुळें पशुकामाच्या दुसऱ्या इष्टीचें विधान स्वीकारलें आहे. पण दोन्ही वाक्यांतील निर्देशाच्या नुसत्या सादृश्यानेंच त्यांचें अर्थैक्य सिद्ध होत नाहीं. कारण प्रक्रमभेदामुळें त्यांच्या अर्थभेदाचा निश्चय होतो. त्याचप्रमाणें प्रकृत दोन शाखांमध्यें पुष्कळशा अर्थवादाचें सादृश्य जरी असलें तरी पूर्वोक्त प्रक्रमभेदामुळें विद्याभेद आहे, असा याचा अक्षरार्थ आहे. यावरून असा अर्थ निष्पन्न होतो. "त्रिवा एतं प्रजया पशुभिरर्धयति वर्धयत्यस्य भ्रातृव्यं यस्य हविर्निरुप्तं पुरस्ताच्चन्द्रमा अभ्युदेति त्रेधा तंडुलान्विभजेत् ये मध्यमास्तानग्नये दात्रे पुरोडाशमष्टाकपालं कुर्याद्ये ये स्थविष्ठास्तानिन्द्राय प्रदात्रे दधंश्चरुं

विभाग करावा. त्यांत जे मध्यम असतील त्यांचा दात्या अग्नीला उद्देशून अष्टाकपाल पुरोडाश करावा " इत्यादि निर्देशाचें साम्य जरी असलें तरी उपक्रमाच्या

---

येऽभिष्ठास्तान्विष्णवे शिपिविष्टाय शृते चरुम् "–"ज्या यजमानाचा हवि पूर्वी देवतांसाठीं संकल्पित झाला–त्यानें देवतोद्देशानें त्याचा संकल्प केला व त्यानंतर चंद्र त्याच्या सन्मुख उदय पावला तर तो निरुप्त–संकल्पित हवि या यजमानाचा प्रजादिकांच्या द्वारा विनाश करितो व याच्या शत्रूला वाढवितो. त्यामुळें चतुर्दशीच्या दिवशीं ज्याला अमावस्येची भ्रांति झाली आहे त्यानें मध्यमादि विभागानें त्रिधा विभक्त केलेल्या तांदुळांचा अग्न्यादि दर्शदेवतांना उद्देशून विभाग करावा, आणि तसा विभाग करून दातृत्वादि-गुणविशिष्ट अग्न्यादि देवतांना उद्देशून त्यांचा निर्वाप–संकल्प करावा, " अशा अर्थाच्या या श्रुतींत "वर सांगितल्याप्रमाणें चंद्राचा अभ्युदय झाला असतां दर्शाहून भिन्न असें हे नैमित्तिक कर्मान्तर सांगितलें जात आहे कीं, दर्शकर्मांतच पूर्व देवतांच्या त्यागानें देवतान्तराचें विधान केलें जात आहे," असा संदेह आला असतां पूर्वपक्ष—'त्रेधा तण्डुलान् विभजेत्'-तीन प्रकारें तंडुलांचा विभाग करावा, असा हवींचाच मध्यमादि क्रमानें विभाग सांगितलेला असल्यामुळें व 'पूर्वदेवतांनाच उद्देशून हवींचा विभाग करावा' असें श्रवण नसल्यामुळें 'हवींमध्यें पूर्वदेवता अपनीत आहे' म्हणून त्या देवतांनीं अवरुद्ध झालेल्या त्या हवींमध्यें ज्याला अवकाशच नाहीं, असें श्रुत असलेलें देवतान्तर कर्मान्तरालाच विषय करितें. यास्तव हा देवतान्तरयुक्त कर्मान्तराविषयीं विधि आहे, असा पूर्वपक्ष प्राप्त होतो. पण 'त्रेधा तण्डुलान् विभजेत्' या वाक्यांत 'जे मध्यम असतील' अशा वाक्यान्तरप्राप्त त्रेधाभावाचा अनुवाद करून 'विभजेत्'–विभाग करावा, याचेंच विधान केलेलें असल्यामुळें 'कोणत्या कारणानें विभाग करावा ?' अशी आकांक्षा झाली असतां 'मध्यमादिवाक्यांनीं देवतान्तरें सांगितलीं असतां बुद्धिस्थ तत्प्रतियोगिनी देवतांचेंच विभागप्रतियोगित्व सिद्ध होतें. तण्डुल हा शब्द सर्व हवींमध्यें प्रवृत्त होणारा आहे–त्याला हविर्मात्रविषयत्व आहे. दधि व पय–दहीं व दूध यांच्याहि पूर्वदेवतांहून विभागाचा लाभ होतो. पूर्वदेवताक हवीचा अपनय केला असतां–तो काढून ठेविला असतां दुसऱ्या देवतांना अवकाश मिळतो. पूर्वद्रव्याच्या द्वारा प्रकृत कर्माचें प्रत्यभिज्ञान होत असल्यामुळें देवतान्तरसंबंध जरी असला तरी तेवढ्यावरून कर्मान्तरकल्पनेला अवकाश नाहीं. म्हणून नैमित्तिकाधिकार संपला असतां नित्याधिकारासाठीं त्याच कर्माचें अनुष्ठान करावें. याप्रमाणें येथें कर्मभेद नाहीं, असें सिद्ध झालें. "जो पशुकाम–पशूंची इच्छा करणारा असतो त्यानें

भेदामुळें अभ्युदयवाक्यांत देवाचा अपनय निश्चित केला आहे. पण पशुकाम-वाक्यांत यागाचा विधि आहे. त्याचप्रमाणें येथेंहि उपक्रमभेदामुळें विद्याभेद आहे. [-याप्रमाणें पूर्वतंत्रानें सिद्ध असलेला सूत्राच्या बाहेरचाच दृष्टान्त सांगून '**परोवरीयस्त्वादिवत्**' इत्यादि भाष्यानें सूत्रोक्त हेतु घेऊन त्याचें व्याख्यान करितात-]

**भाष्यं—परोवरीयस्त्वादिवत्। यथा परमात्मदृष्ट्यध्याससाम्येऽपि 'आकाशो ह्येवैभ्यो ज्यायानाकाशः परायणम्' 'स एष परोवरीयानुद्गीथः स एषोऽनंतः' इति परोवरीयस्त्वगुणविशिष्टं उद्गीथोपासनं अक्ष्यादित्यादिगतहिरण्यश्मश्रुत्वादिगुणविशिष्टोद्गीथोपासनाद्भिन्नम् । न च इतरेतरगुणोपसंहार एकस्यामपि शाखायां तद्वच्छाखान्तरस्थेष्वपि एवंजातीयकेषूपासनेष्विति ॥ ७ ॥**

**भाष्यार्थ**—'परोवरीयस्त्वादिकांप्रमाणें'-ज्याप्रमाणें परामात्मदृष्टीच्या आरोपाचें साम्य जरी असलें तरी "आकाशच या सर्व भूतांहून अधिक मोठा आहे. म्हणून आकाश परायण आहे"-छां. १. ९. १-"तो हा परोवरीय-श्रेष्ठ व वरिष्ठ उद्गीथ. तो हा अनन्त"-छां. १. ९. २. सु. उ. ३१९-असें हें परोवरीयस्त्वगुणविशिष्ट उद्गीथोपासन अक्षि-आदित्यादिगत हिरण्यश्मश्रुत्वादिगुणविशिष्ट उद्गीथोपासनेहून भिन्न आहे. [पर असलेल्या वर प्राणादिकांहून पर व त्याच वराहून अधिक वर, असा हा परोवरीय उद्गीथ आहे आणि तो परमात्मदृष्टिसंपत्तीमुळें अनंत आहे, असें पहावें. आकाशामध्यें व आदित्यादिकांमध्यें परमात्मदृष्टीचा आरोप केलेला असल्यामुळें उद्गीथोपासनेचें साम्य जरी असलें तरी परोवरीयस्त्वादिगुणक उद्गीथोपासना निराळी व हिरण्यश्मश्रुत्वादिगुणविशिष्ट उद्गीथोपासना निराळी. तसेंच येथेंहि समजावें, असा याचा भावार्थ.-"अहोपण, या दृष्टान्तांतहि अधिक गुणांचा परस्पर उपसंहार केल्यामुळें त्या दोन्ही विद्यांचें ऐक्य

---

अमावास्येस इष्टि करून वत्सांचें अपाकरण करावें. जे स्थविष्ठ--अतिशय स्थूल तण्डुल त्यांचा संनिमत् अग्नीला उद्देशून निर्वाप करावा. जे मध्यम तण्डुल त्यांच्या चरूचा शृत शिपिविष्ट विष्णूला उद्देशून निर्वाप करावा व जे अतिशय क्षुद्र तण्डुल असतील त्यांचा चरु प्रदात्या इंद्राला उद्देशून धारण करावा." या विधींत समान श्रुति असल्यामुळें दर्शाच्या-समाप्तीनंतर वत्साच्या अपाकरणानें गोदोहन करून पूर्वीप्रमाणें देवतांना हविर्विभाग करून देवतान्तरविशिष्ट पशुकामेष्टीचें विधान केलेलें असल्यामुळें पूर्वकर्माची अनुवृत्ति होत नाहीं. त्यामुळें हें वाक्य वरील अभ्युदयवाक्यासारखेंच-तत्स्वरूप-तत्सदृश जरी असलें तरी तो दुसऱ्या यागाचा विधि आहे. येथेंहि तसेंच होईल, असा येथें पूर्वमीमांसासिद्ध दृष्टान्त दिला आहे.

आहे," अशी आशंका घेऊन सांगतात-]='न च०'-आणि एकाच शाखेंतहि त्यांच्या परस्पर गुणांचा उपसंहार होत नाहीं. [कारण पुनरुक्तीनें विद्यांचा भेद अतिशय स्पष्ट आहे, वास्तव पुनरुक्तीनें विद्याभेदाचें अतिस्पष्टत्व हाच हेतु मानून 'एकाहि शाखेंत' असें भाष्यांत म्हटलें आहे.-शाखाभेदामुळें ज्ञातृभेदानें पुनरुक्तीच्या अभावींहि तात्पर्य, प्रमेय, गुणभेद यांनीं विशिष्ट अशा उपासनांमध्यें नानात्व आहे, असें 'तद्वत्०' इत्यादि भाष्यानें सांगतात-]=त्याचप्रमाणें अशा जातीच्या अन्य अन्य शाखांतील उपासनांमध्येंहि विद्येचा नानात्व आहे, विद्येचा भेद आहे. ७. [-पूर्वपक्षाच्या बीजाला उत्थापित करून 'संज्ञातश्चेत्०' इत्यादि सूत्रानें त्याला दूषित करितात--]

## सूत्रं--संज्ञातश्चेत्तदुक्तमस्ति तु तदपि ॥ ८ ॥ ( ३ )

**सूत्रार्थ**—उद्गीथविद्या या एका संज्ञेमुळे विद्येला एकत्व आहे, असें जर म्हणाल तर त्याचें उत्तर मागच्याच सूत्रांत 'प्रकरणभेदामुळे' असें सांगितलें आहे. काठकांत सांगितलेल्या भिन्न भिन्न कर्मांचेंहि 'काठक' असें एकच नांव असतें ८.(३) सु.ब्र.३०८.[-'अथोच्येत०' इत्यादि भाष्यानें सूत्रस्थ अनुवादाचें व्याख्यान-]

**भाष्यं**—अथोच्येत संज्ञैकत्वाद्विद्यैकत्वमत्र न्याय्यं, उद्गीथविद्येत्युभयत्राप्येका संज्ञेति । तदपि नोपपद्यते । उक्तं ह्येतत्— 'न वा प्रकरणभेदात्परोवरीयस्त्वादिवत्' इति । तदेव चात्र न्याय्यतरं श्रुत्यक्षरानुगतं हि । तत् । संज्ञैकत्वं तु श्रुत्यक्षरबाह्यं उद्गीथशब्दमात्रप्रयोगाल्लौकिकैर्व्यवहर्तृभिरुपचर्यते ॥

**भाष्यार्थ**—आतां 'संज्ञेच्या-नांवाच्या एकत्वामुळ येथें-या दोन शाखांत विद्येचें एकत्व न्याय्य आहे, [-संज्ञैकत्वाचेंच विवरण-]=कारण 'उद्गीथविद्या' अशी दोन्ही शाखांत एक संज्ञा आहे' असें जर म्हटलें जाईल [-पूर्व सूत्रांतील 'न-'काराचा या सूत्रांतील 'तत्-'शीं संयोग करून 'तदपि०' इत्यादि भाष्यानें त्याचा परिहार-]=तर तेंहि उपपन्न होत नाहीं. [-पूर्वसूत्रोक्त परिहाराला या आक्षेपाचें बाधकत्व असल्यामुळें म्ह० पूर्व सूत्रांत सांगितलेला परिहारच त्याला बाधित करीत असल्यामुळे वाद्याचा हा आक्षेप नसून आक्षेपाभास आहे असें 'उक्तं हि०' इत्यादि भाष्यानें सांगतात-]=हें-या आक्षेपाचें समाधान 'न वा प्रकरणभेदात् परोवरीयस्त्वादिवत्' असें-पृ.२४७-सांगितलेंच आहे. [-"पण समाख्येच्या म्ह० संज्ञेच्या अविशेषामुळें-ऐक्यामुळें-त्या विद्यांचा अभेद व रूपभेदामुळें भेद प्रतीत होतो. तेव्हां त्यांतील युक्त काय ?" 'तदेव०' इत्यादि भाष्यानें उत्तर-] =आणि येथें तेंच न्याय्यतर-अधिक न्याय्य आहे. कारण तें विद्येचें नानात्व श्रुत्य-

क्षरानुगत आहे, रूपभेद श्रुतीच्या अक्षरांना अनुसरलेला आहे. पण संज्ञेचें एकत्व श्रुत्यक्षरांच्या बाहेरचे आहे, तें श्रुत्यक्षरबाह्य आहे. [ रूपभेदाला अन्तरंगत्व असल्यानें तो बलवत्तर–अधिक बलवान् आहे व संज्ञेचा श्रुतिबाह्यत्वामुळें बहिरंगत्व आहे आणि पौरुषेयत्वामुळें सापेक्षत्वानें दुर्बलत्व आहे. म्हणून रूपभेदामुळें वर सांगितलेलें विद्येचें नानात्वच युक्त आहे असा भावार्थ. –" पण संज्ञैकत्व श्रुत्यक्षरबाह्य कसें ? " 'उद्गीथ०' इत्यादि भाष्यानें उत्तर–]=केवळ 'उद्गीथ' अशा शब्दाचा प्रयोग केलेला असल्यामुळें लौकिक शब्दव्यवहार करणारांकडून विद्येमध्यें तसा उपचार केला जातो. [–संज्ञेच्या ऐक्यामुळें विद्येचें ऐक्य मानूं लागल्यास अतिप्रसंग–अतिव्याप्ति होते, अशा आशयानें 'अस्ति०' इत्यादि भाष्यानें 'अस्ति तु०' इत्यादि सूत्रावयवाचें व्याख्यान–]

**भाष्यं—अस्ति चैतत्संज्ञैकत्वं प्रसिद्धभेदेष्वपि परोवरीयस्त्वाद्युपासनेषूद्गीथविद्येति । तथा प्रसिद्धभेदानामपि अग्निहोत्रदर्शपूर्णमासादीनां काठकैकग्रंथपरिपठितानां काठकसंज्ञैकत्वं दृश्यते, तथेहापि भविष्यति । यत्र तु नास्ति कश्चिदेवंजातीयको भेदहेतुः । तत्र भवतु संज्ञैकत्वाद्विद्यैकत्वं यथा संवर्गविद्यादिषु ॥८॥**

**भाष्यार्थ—**आणि ज्यांचा भेद प्रसिद्ध आहे, अशाहि परोवरीयस्त्वादि-उपासनांमध्यें 'उद्गीथविद्या' असे हें संज्ञेचे एकत्व आहे. [–'तथा०' इत्यादि भाष्यानें 'प्रसिद्धभेदेषु अपि' येथील 'अपि-'शब्दानें ग्रहण केलेलें उदाहरणान्तर सांगतात–]=त्याचप्रमाणें ज्यांचा भेद प्रसिद्ध आहे अशाहि काठक याच एका ग्रंथांत पठित असलेल्या अग्निहोत्र-दर्श-पूर्णमासादिकांचें 'काठक' असें संज्ञैकत्व दिसतें. [–संज्ञेचें ऐक्य असतांनाहि जर तेथें कर्माचें ऐक्य नसेल तर संज्ञेचें ऐक्य उद्गीथज्ञानामध्येंहि अप्रयोजक आहे, असें सांगतात–]='तथा इह०'–त्याचप्रमाणें येथेंहि उद्गीथ असें संज्ञैक्य असूनहि विद्याभेद असेल. [–" संज्ञेच्या ऐक्याला जर असें व्यभिचारित्व आहे तर प्रथमसूत्रांत त्याला ऐक्याचें हेतुत्व कसें सांगितलें आहे ?" अशी आशंका घेऊन सूत्रांतील 'तु-'शब्दानें सुचविलेला अर्थ 'यत्र तु०' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=पण जेथें अशा जातीचा भेदहेतु नसतो तेथें संज्ञेच्या ऐक्यामुळें विद्येचें एकत्व असूं दे. ['एवंजातीयकः'–अशा जातीचा म्ह० प्रक्रमभेद किंवा त्याच्या सारखाच दुसरा भेद असा भावार्थ.–बलवान् बाधक नसल्यास संज्ञैक्यहि साधक आहे, याविषयीं 'यथा०' इत्यादि भाष्यानें दृष्टान्त सांगतात–]=ज्याप्रमाणें संवर्गविद्या इत्यादिकांमध्यें भेदाचें निमित्त नसल्यामुळें विद्येचें

एकत्व आहे. [ ' आदि-'शब्दानें पंचाग्निविद्या, वैश्वानरविद्या इत्यादिकांचें ग्रहण केलें जातें.-सु.ब्र. ३०८-९] ८ (३)

( ४. व्याप्त्यधिकरण. सू. ९ )

—याप्रमाणें ' ओमित्येतदक्षरमुद्गीथं उपासीत' येथें ओंकाराचेंहि उद्गीथविशिष्टत्व सिद्धवत् करून–तें सिद्ध असल्याप्रमाणेंच मानून प्रक्रमभेदामुळें विद्याभेद सांगून आतां 'व्याप्तेश्च०' या सूत्रानें त्याच विशेषण-विशेष्यभावाचें निरूपण—

**सूत्रं--व्याप्तेश्च समंजसम् ॥ ९ ॥ (४)**

**सूत्रार्थ**—आणि ओंकाराची तिन्ही वेदांत ' व्याप्ति असल्यामुळें ' त्यांतील कोणता ओंकार उपास्य आहे? अशी आकांक्षा झाली असतां 'ओमित्येतत्०' या वाक्यानें तो उद्गीथावयवत्वानें विशेषित केला जातो, यास्तव उद्गीथ हें त्याचें विशेषण आहे, हेंच म्हणणें ' समंजस '-सयुक्तिक आहे. ९. (४)-सु.ब्र.३१०-[-' ओं ' व ' उद्गीथ ' यांचें सामानाधिकरण्य-एकविभक्तित्व हा या अधिकरणाचा विषय ' ओमित्येतत्०' इत्यादि भाष्यानें सांगतात-]

**भाष्यं**—' ओमित्येतदक्षरमुद्गीथमुपासीत ' इत्यत्र अक्षरोद्गीथशब्दयोः सामानाधिकरण्ये श्रूयमाणेऽध्यासापवादैकत्वविशेषणपक्षाणां प्रतिभासनात्कतमोऽत्र पक्षो न्याय्यः स्यादिति विचारः ॥

**भाष्यार्थ**—'ओमित्येतदक्षरमुद्गीथमुपासीत'-छां.१.१.१-अशा या वाक्यांत अक्षर व उद्गीथ यांचें सामानाधिकरण्य श्रुत झालें असतां-त्यांचें एकविभक्तित्व प्रतीत होत असल्यामुळें [-विशेषणाच्या अनवधारणामुळें येणारा संशय सांगतात-]=' **अध्यास-अपवाद०**'-अध्यास-आरोप, अपवाद-बाध, एकत्व व विशेषण अशा चार पक्षांचा प्रतिभास होतो, त्यांत असे चार पक्ष प्रतीत होतात, त्यामुळें येथें त्यांतील कोणता पक्ष न्याय्य आहे, असा विचार-संदेह प्राप्त होतो. [ या अधिकरणांत उद्गीथ व ओंकार यांच्या विशेषण-विशेष्यभावाचें निरूपण करून विचाराला वाक्यार्थज्ञानसाधनांत अन्तर्भूत केल्यामुळें याच्या पादादिसंगति आहेत. पूर्वपक्षांत 'समानाधिकरणवाक्याला अनिश्चितार्थत्व असल्यामुळें अप्रामाण्य आहे' व सिद्धान्तांत ' त्याच्या अर्थाचा निश्चय होत असल्यामुळें प्रामाण्य आहे.'-" पण या चार पक्षांचें प्रतिभान-प्रतीति किंवा भेद कसा आहे " अशी आशंका घेऊन 'तत्र०' इत्यादि भाष्यानें त्यांतील अध्यासाचें व्युत्पादन करितात-]

**भाष्यं**—तत्राध्यासो नाम द्वयोर्वस्तुनोरनिवर्तितायामेव अन्यतरबुद्धौ अन्यतरबुद्धिरध्यस्यते। यस्मिन्नितरबुद्धिरध्यस्यतेऽनुवर्तत एव तस्मिंस्तद्बुद्धिः, अध्य-

**स्तेतरबुद्धावपि । यथा नाम्नि ब्रह्मबुद्धौ अध्यस्यमानायामप्यनुवर्तत एव नामबुद्धिः । न ब्रह्मबुद्ध्या निवर्तते । यथा वा प्रतिमादिषु विष्णवादिबुद्ध्यध्यासः । एवमिहाप्यक्षरे उद्गीथबुद्धिरध्यस्येत । उद्गीथे वाऽक्षरबुद्धिरिति ॥**

**भाष्यार्थ**—त्यांतील अध्यास म्हणून जो प्रसिद्ध आहे त्याचें व्युत्पादन केलें जातें. [–गौणी बुद्धि हाच अध्यास आहे, असें मानून **'द्वयोः वस्तुनोः०'** इत्यादि भाष्यानें त्याच्या व्युत्पादनाचा अभिनय करितात–]=दोन वस्तूंतील एकावस्तूच्या बुद्धीची निवृत्ति न करितांच तिच्यामध्यें दुसऱ्या वस्तूच्या बुद्धीचा आरोप केला जातो, तो अध्यास होय. [–"पण एका वस्तूची बुद्धि निवृत्त झालेली नसतांनाच तिच्या ठिकाणीं दुसऱ्या वस्तूच्या बुद्धीचा अध्यास कसा होईल?" **'यस्मिन्०'** इत्यादि भाष्यानें उत्तर–]=ज्यामध्यें इतर बुद्धीचा अध्यास केला जातो त्यामध्यें–त्या अध्यस्ताहून इतर बुद्धींतहि त्या वस्तूची बुद्धि अनुवृत्त होतेच. [–"आरोपित बुद्धीनें इतर बुद्धीला निवर्त्यत्व आहे." अशी आशंका घेऊन **'यथा०'** इत्यादि भाष्यानें दृष्टान्त–]=ज्याप्रमाणें नामामध्यें ब्रह्मबुद्धीचा अध्यास केला जात असतांहि 'नाम-'बुद्धि अनुवृत्त होतेच, ब्रह्मबुद्धीनें ती निवृत्त होत नाहीं. [–याप्रमाणें वैदिक दृष्टांत सांगून लौकिक दृष्टान्त सांगतात–]=**'यथा वा०'**–किंवा ज्याप्रमाणें प्रतिमादिकांमध्यें विष्णवादिबुद्धीचा अध्यास होतो. [–विशेषाचें अनवधारण दाखविणारे भाष्यकार दार्ष्टान्तिक सांगतात–]=**'एवं०'**–त्याचप्रमाणें येथेंहि अक्षरांत उद्गीथबुद्धीचा अध्यास केला जाईल किंवा उद्गीथांत अक्षरबुद्धीचा अध्यास केला जाईल.' [**'इति०'** हा शब्द अध्यासपक्षाची समाप्ति या अर्थी आहे.–आतां **'अपवादः०'** या भाष्यानें अपवादाच्या व्युत्पादनाची प्रतिज्ञा करून **'यत्र०'** इत्यादि भाष्यानें त्याचें व्युत्पादन करितात–]

**भाष्यं**—**अपवादो नाम यत्र कस्मिंश्चिद्वस्तुनि पूर्वनिविष्टायां मिथ्याबुद्धौ निश्चितायां पश्चादुपजायमाना यथार्था बुद्धिः पूर्वनिविष्टाया मिथ्याबुद्धेर्निवर्तिका भवति । यथा देहेन्द्रियसंघात आत्मबुद्धिः आत्मन्येवात्मबुद्ध्या पश्चाद्भाविन्या 'तत्त्वमसि' इत्यनया यथार्थबुद्ध्या निवर्तते । यथा वा दिग्भ्रान्तिबुद्धिर्दिग्याथात्म्यबुद्ध्या निवर्तते । एवमिहाप्यक्षरबुद्ध्योद्गीथबुद्धिर्निवर्तत उद्गीथबुद्ध्या वाक्षरबुद्धिरिति ॥**

**भाष्यार्थ**—अपवाद म्हणजे काय तें सांगितलें जातें–ज्या कोणत्याहि एखाद्या वस्तूंत पूर्वनिविष्ट मिथ्याबुद्धि निश्चित असतांनाच मागून उत्पन्न होणारी यथार्थ बुद्धि पूर्वनिविष्ट मिथ्याबुद्धीची निवर्तिका होते.[–त्याविषयींहि लौकिक व वैदिक

उदाहरण सांगतात–]=‘यथा देहें०’–ज्याप्रमाणें देहेंद्रियादिसंघातामध्यें पूर्वीच दृढ झालेली आत्मबुद्धि मागून होणाऱ्या आत्म्यांतीलच आत्मबुद्धीनें–‘तत्त्वमसि’ इत्यादि या असल्या यथार्थबुद्धीनें निवृत्त होते. किंवा ज्याप्रमाणें दिग्भ्रांतिबुद्धि दिशेच्या यथार्थबुद्धीनें निवृत्त होते [–‘एवं०’ इत्यादि भाष्यानें पूर्वीप्रमाणेच दार्ष्टान्तिक सांगतात–]=त्याप्रमाणें येथेंहि अक्षरबुद्धीनें उद्गीथबुद्धि निवृत्त होते किंवा उद्गीथबुद्धीनें अक्षरबुद्धि निवृत्त होते. [येथीलहि ‘इति’ हा शब्द पूर्वीप्रमाणें अपवादपक्षाच्या समाप्तीसाठीं आहे.–एकत्वपक्षाला सदृष्टान्त स्पष्ट करितात–]

**भाष्यं—एकत्वं त्वक्षरोद्गीथशब्दयोरनतिरिक्तार्थवृत्तित्वम् । यथा द्विजोत्तमो ब्राह्मणो भूमिदेव इति । विशेषणं पुनः सर्ववेदव्यापिन ओमित्येतस्याक्षरस्य ग्रहणप्रसंगे उद्गीथविषयस्य समर्पणम् । यथा नीलं यदुत्पलं तदानयेति । एवमिहाप्युद्गीथोऽयं ॐकारस्तमुपासीतेति । एवमेतस्मिन्सामानाधिकरण्यवाक्ये विमृश्यमान एते पक्षाः प्रतिभान्ति ॥**

**भाष्यार्थ**—पण अक्षर व उद्गीथ या शब्दांना अतिरिक्त अर्थवृत्तित्व नसणें–त्यांचा अर्थ पृथक् नसणें हेंच एकत्व आहे. जसें–द्विजोत्तम, ब्राह्मण, भूमिदेव या शब्दांना पृथक्-अर्थवृत्तित्व नसतें. [‘इति-’शब्द एकत्वपक्षाची समाप्ति सुचवितो. –‘**विशेषणं०**’ इत्यादि भाष्यानें विशेषणपक्षाला प्रकट करितात–]=परंतु सर्ववेदव्यापी ‘ओं’ अशा या अक्षराचें ग्रहण करण्याचा म्ह० ध्येयत्वानें त्याचा स्वीकार करण्याचा प्रसंग आला असतां उद्गीथविषय ओंकाराचें समर्पण करणें हें विशेषण आहे. [–हें उक्त विशेषणच दृष्टान्तानें स्पष्ट करितात–]=‘**यथा०**’–जसें जें नील कमळ आहे तें आण, ‘**इति**’–असें म्हणतात, ‘**एवं०**’–त्याप्रमाणें येथेंहि उद्गीथ असा जो हा ओंकार त्याची उपासना करावी. [‘इति-’शब्द विशेषणपक्षाची समाप्ति सुचवितो–याप्रमाणें ज्यांचें व्युत्पादन केलें आहे अशा या पक्षचतुष्टयाचा उपसंहार–]=‘**एवं**’–याप्रमाणें या सामानाधिकरण्यवाक्याचा विचार करूं लागलें असतां असे हे चार पक्ष प्रतीत होतात. [–असें अध्यासादि चार पक्ष उपलब्ध झाले असतां त्यांतील अनध्यवसायपक्षाला–अनिश्चयपक्षाला पूर्वपक्ष करून ‘**तत्र०**’ इत्यादि भाष्यानें सिद्धान्त सांगतात—]

**भाष्यं—तत्र अन्यतमनिर्धारणकारणाभावादनिर्धारणप्राप्तौ इदमुच्यते—व्याप्तेश्च समंजसमिति । चशब्दोऽयं तु-शब्दस्थाननिवेशी पक्षत्रयव्यावर्तनप्रयोजनः । तदिह त्रयः पक्षाः सावद्या इति पर्युदस्यन्ते । विशेषणपक्ष एवैको निरवद्य इत्युपादीयते ॥**

**भाष्यार्थ**—त्या चार पक्षांतील कोणता तरी एक पक्ष निश्चित करण्यास कांहीं कारण नसल्यामुळें त्याचा निश्चय होत नाहीं, असा अनिर्धारणपक्ष–अनिर्णयपक्ष प्राप्त झाला असतां 'व्याप्तेश्च समंजसं' असें हें सांगितलें जातें.[–"पण सूत्रस्थ 'च-'शब्दाचा समुच्चयादि अर्थ येथें उपपन्न होत नसल्यामुळें त्याला आनर्थक्य आहे," अशी आशंका घेऊन '**चशब्दः०**' इत्यादि भाष्यानें त्याचें व्याख्यान करितात–]='तु' या शब्दाच्या स्थानीं निवेश–प्रवेश करणारा हा सूत्रस्थ 'च-'शब्द पूर्वोक्त चार पक्षांतील पहिल्या तीन पक्षांची व्यावृत्ति करणारा आहे –पक्षत्रयव्यावृत्ति करणें हें त्याचें प्रयोजन आहे. [–पक्षव्यावृत्तिच प्रकट करितात–] ='**तदिह०**'–त्या सामानाधिकरण्यवाक्यांत उपलब्ध झालेल्या चार पक्षांतील तीन पक्ष सदोप असल्यामुळें येथें पर्युदस्त–निषिद्ध केले जातात, त्यांची प्राप्ति दाखवून निषेध केला जातो. [–पण व्यावर्त्य तीन पक्षांत विशेषणपक्षाचा प्रवेश होत नाहीं, असें दाखविणारे भाष्यकार त्याचें ग्राह्यत्व सांगतात–]='**विशेषणपक्षः एव०**'–त्यांतील एक विशेषणपक्षच निरवद्य–निर्दोष असल्यामुळें स्वीकारला जातो. [–"पण पहिल्या तीन पक्षांना सावद्यत्व कसें?" अशी आशंका घेऊन त्यांतील पहिल्या अध्यासाचें सदोषत्व '**तत्र०**'इत्यादि भाष्यानें साधितात–]

**भाष्यं**—**तत्राध्यासे तावद्या बुद्धिरितरत्राध्यस्यते। तच्छब्दस्य लक्षणावृत्तित्वं प्रसज्येत। तत्फलं च कल्प्येत। श्रूयत एव फलं 'आपयिता ह वै कामानां भवति' इत्यादीति चेत्। न। तस्यान्यफलत्वात्। आप्त्यादिदृष्टिफलं हि तत्। नोद्गीथाध्यासफलम्॥**

**भाष्यार्थ**—त्यांतील अगोदर अध्यासांत जी बुद्धि इतरत्र आरोपिली जाते त्या शब्दाच्या लक्षणावृत्तित्वाचा प्रसंग येईल [उद्गीथबुद्धीचा अक्षरामध्यें अध्यास केला असतां अक्षरशब्दाची उद्गीथांत किंवा अक्षरबुद्धीचा उद्गीमध्यें अध्यास केला असतां उद्गीथशब्दाची अक्षरांत लक्षणा होईल, आणि श्रुति व लक्षणा यांविषयीं संशय आला असतां श्रुति न्याय्य आहे. त्यामुळें अध्यास होत नाहीं, असा भावार्थ.–या पक्षींच दोषान्तर सांगतात––]='**तत्फलं च०**'–आणि त्याचें फलहि कल्पावें लागेल. [–पण फलाची कल्पना सहन न करणारा वादी '**श्रूयते०**' इत्यादि भाष्यानें म्हणतो–]=" अहोपण, 'तो कामांचा प्राप्त करविणारा होतो' –छां.१.१. ७.–इत्यादि फल श्रुतच आहे," असें जर म्हणशील तर [–'त्याला अध्यासफलत्व नाहीं–ते अध्यासफल नव्हे,' असें सांगतात–]='**न०**'–तें बरोबर नाहीं. कारण त्याला अन्यफलत्व आहे, तें अन्यदृष्टीचें फल आहे. [–श्रुत फलाचें

अन्यफलत्वच व्यक्त करितात–]=' आप्त्यादि०'- आप्त्यादिदृष्टीचेंच तें फल आहे. उद्गीथाच्या अध्यासाचें फल नव्हे. [ त्याला उभयफलत्व आहे म्ह० तें आप्त्यादिदृष्टीचें व अध्यासाचें फल आहे, असें म्हणतां येत नाहीं. कारण आप्त्यादिदृष्टीचें विधान करण्यासाठीं विशिष्ट प्रणव हा त्याचा अर्थ आहे अशा ' ओमित्येतदक्षरं ' इत्यादि वाक्यानें पृथक् उपासनाविधीचा स्वीकार केलेला आहे, असा भावार्थ. –'अपवादेऽपि०' इत्यादि भाष्यानें दुसऱ्या अपवादपक्षाचें निरसन––]

**भाष्यं—अपवादेऽपि समानः फलाभावः । मिथ्याज्ञाननिवृत्तिः फलमिति चेत् । न । पुरुषार्थोपयोगानवगमात् । न च कदाचिदप्योंकारादोंकारबुद्धिर्निवर्तत उद्गीथाद्वोद्गीथबुद्धिः । न चेदं वाक्यं वस्तुतत्त्वप्रतिपादनपरम् । उपासनाविधिपरत्वात् ॥**

**भाष्यार्थ**—अध्यासपक्षाप्रमाणें अपवादपक्षींहि फलाभाव समान आहे ['अपि' हा शब्द अध्यासाचा दृष्टान्त देण्यासाठीं आहे. पण वाक्यशेषस्थ फल अध्यासाचें नव्हे व तसेंच अपवादाचेंहि नव्हे. कारण त्याचा विशिष्ट उपासनेशीं संबंध आहे, असा भावार्थ.–' **मिथ्याज्ञान०**' इत्यादि भाष्यानें फलाभावाच्या असिद्धीची शंका–] =मिथ्याज्ञानाची निवृत्ति हेंच अपवादाचें फल आहे, असें जर म्हणशील तर [' न'–नाहीं, असा पुढें संबंध.–मिथ्याज्ञानाची निवृत्ति झाली असतां आत्म्यांतील कर्तृत्वादि-अनर्थाची निवृत्ति व आनंदाची अभिव्यक्ती दृष्ट–प्रत्यक्ष अनुभूत आहे. पण ओंकारबुद्धीनें उद्गीथबुद्धीचा किंवा उद्गीथबुद्धीनें ओंकारबुद्धीचा ध्वंस झाला असतां कोणत्याहि प्रकारचा पुरुषार्थ दृष्ट नाहीं,त्यामुळें हें फल नाहीं, असें ' न० ' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=नाहीं, तें अपवादाचें फल नाहीं. कारण त्याचा पुरुषार्थोपयोग अवगत होत नाहीं. अपवाद पुरुषार्थोपयोगी आहे, असें अवगत होत नाहीं. [–याप्रमाणें अपवादाचा अंगीकार करून त्यावर वैफल्य–फलराहित्य हा दोष दिला. आतां ' न च० ' इत्यादि भाष्यानें त्या अंगीकाराचा त्याग करितात–]=शिवाय ओंकारापासून ओंकारबुद्धि व उद्गीथापासून उद्गीथबुद्धि केव्हांहि निवृत्त होत नाहीं. [ उद्गीथबुद्धि ओंकारबुद्धीची अपवादिका–निवृत्ति करणारी जर असती तर ओंकारबुद्धि आपला विषय जो ओंकार त्याच्यापासून निवृत्त झाली असती, कारण बाध्य–बाधित होण्यास योग्य अशी जी ओंकारबुद्धि तिला मिथ्याबुद्धित्व असल्यामुळें तिचा स्वार्थाशीं व्यभिचार झाला असता. त्यामुळें ती ओंकारापासून निवृत्त झाली असती. ओंकारबुद्धि उद्गीथबुद्धीची अपवादिका आहे, असें जरी म्हटलें तरी सुद्धां तिला मिथ्या-

बुद्धित्व असल्यामुळें उद्गीथबुद्धि स्वार्थापासून निवृत्त होईल. पण असा अनुभव येत नाहीं. त्यामुळें अपवादपक्षहि उपपन्न होत नाहीं.-शिवाय या वाक्याचें अपवादामध्यें तात्पर्य नाहीं. कारण त्याला उपासनापरत्व आहे, असें **'न च०'** इत्यादि भाष्यानें सांगतात-]=शिवाय हें वाक्य वस्तुतत्त्वप्रतिपादनपर नाहीं, तर उपासनाविधिपर आहे, त्याला उपासनाविधिपरत्व आहे. [-**'नापि०'** इत्यादि भाष्यानें एकत्वपक्षाचें निरसन-]

**भाष्यं—नाप्येकत्वपक्षः संगच्छते । निष्प्रयोजनं हि तदा शब्दद्वयोच्चारणं स्यात् । एकेनैव विवक्षितार्थसमर्पणात । न च हौत्रविषय आध्वर्यवविषये वाऽक्षर ओंकारशब्दवाच्ये उद्गीथशब्दप्रसिद्धिरस्ति । नापि सकलायां साम्नो द्वितीयायां भक्तौ उद्गीथशब्दवाच्यायामोंकारशब्दप्रसिद्धिः येनानतिरिक्तार्थता स्यात् ॥**

**भाष्यार्थ**—एकत्वपक्षहि सुसंगत होत नाहीं. कारण त्या एकत्वपक्षीं दोन शब्दांचें उच्चारण व्यर्थ होतें. [-'पिक'-शब्दाचें 'कोकिल-'शब्दानें जसें व्युत्पादन करावें तसेंच एका अर्थीं असलेल्या दोन शब्दांतील एका शब्दाचें दुसऱ्या रूढ शब्दानें व्युत्पादन करणें व्यर्थ नाहीं, तें फलवत्-सफल-उपयोगीच आहे, अशी आशंका घेऊन 'संदिग्ध अर्थ-वादिकांचा अभाव असल्यामुळें म्ह० ओंकार व उद्गीथ या शब्दांचा अर्थ संदिग्ध नसल्यामुळें तसें म्हणतां येत नाहीं,' असें **'एकेन०'** इत्यादि भाष्यानें सांगतात-]=कारण त्यांतील कोणत्या तरी एकाच शब्दानें विवक्षित अर्थाचें समर्पण होतें.-एका अर्थाचें ज्ञान होतें. [ ओंकार व उद्गीथ या दोन शब्दांचा उद्गीथ हा एकच अर्थ असल्यामुळें त्यांतील कोणत्या तरी एका शब्दानेंच त्याची सिद्धि होते. म्हणून शब्दान्तर अर्थवत् नाहीं, असा भावार्थ.-शिवाय एकत्वपक्षीं 'उद्गीथाचा अक्षरांत अन्तर्भाव होतो कीं अक्षराचा उद्गीथांत' असा विकल्प करून त्यांतील पहिल्या पक्षाचा परिहार-]=**' न च०'** -आणि हौत्रविषयांत किंवा आध्वर्यवविषयांत ओंकारशब्दवाच्य अक्षर या अर्थीं 'उद्गीथ-'शब्दाची प्रसिद्धि-रूढि नाहीं. तर औद्गात्रविषयांतच त्याची 'ओं' या अर्थीं प्रसिद्धि आहे. [-**'नापि०'** इत्यादि भाष्यानें पूर्वोक्त विकल्पांतील दुसऱ्या पक्षाचें निरसन-]=त्याचप्रमाणें सामाच्या 'उद्गीथ-'शब्दवाच्य दुसऱ्या सकल भक्तींत ओंकारशब्दाची प्रसिद्धि नाहीं, तर 'उद्गीथ' या नांवाच्या दुसऱ्या भक्तीचा एक अवयव या अर्थीं ओंकारशब्द रूढ आहे,[-'उद्गीथ'-शब्दाच्या अक्षर या अर्थीं व 'अक्षर-'शब्दाच्या उद्गीथ या अर्थीं प्रसिद्धीचा अभाव आहे, असें झालें असतां त्यांचें एकार्थत्व नाहीं, हेंच निष्पन्न होतें, असें **'येन०'** इत्यादि भाष्यानें सांगतात-]=

कीं ज्या कारणानें त्या शब्दांना अभिन्न-अर्थत्व आहे, असें होईल! [-ऋग्वेद व यजुर्वेद यांतील ओंकार उद्गीथ या अर्थी जर रूढ असता किंवा सामवेदाच्या दुसऱ्या सर्व उद्गीथभक्तींत जर तो रूढ असता तर त्यांचा भिन्न अर्थ नाहीं, एकच अर्थ आहे असें झालें असतें. पण तो तसा रूढ नाहीं कीं ज्याकारणानें त्यांना अभिन्नार्थत्व आहे, असें म्हणतां येईल, असा याचा अक्षरार्थ आहे.-याप्रमाणें पक्षत्रयाचें सावद्यत्वानें-सदोषत्वानें निरसन करून '**परिशेषात्०**' इत्यादि भाष्यानें निर्दोषपक्षाचें ग्रहण-]

**भाष्यं---परिशेषाद्विशेषणपक्षः परिगृह्यते । व्याप्तेः सर्ववेदसाधारण्यात् । सर्वव्याप्यक्षरमिह मा प्रसंजि इत्यत उद्गीथशब्देनाक्षरं विशेष्यते कथं नामोद्गीथावयवभूत ओंकारो गृह्येतेति ॥**

**भाष्यार्थ**---परिशेषामुळें-पूर्वोक्त चार पक्षांतील पहिले तीन पक्ष सदोष असल्यामुळें शेवटचा अवशिष्ट राहिलेला निर्दोष विशेषणपक्षच स्वीकारला जातो. [-त्या पक्षीं सूत्रांतील पदाचें ग्रहण करून '**व्याप्तेः०**' इत्यादि भाष्यानें त्याचें विवरण-]='व्याप्तेः'-सर्ववेदसाधारण्यामुळें विशेषणपक्ष स्वीकारला जातो. [-"तथापि सर्ववेदसाधारण्य, या व्याप्तीमुळें विशेषणपक्षाची सिद्धि कशी होते?" '**सर्वव्यापि०**' इत्यादि भाष्यानें उत्तर-]=सर्ववेदव्यापि अक्षर या उपासनेत प्रसक्त -प्राप्त न व्हावें, '**इति अतः**'-म्हणून उद्गीथशब्दानें तें अक्षर विशेषित केलें जातें-त्याला 'उद्गीथ' असें विशेषण दिलें जातें. [ सर्वव्यापी अक्षराचा येथें प्रसंग आला असतां वाक्यशेषविरोध येईल, असें मानून भाष्यांत 'इत्यतः' इत्यादि म्हटलें आहे.-" अहोपण, संभव व व्यभिचार असतांना विशेषण अर्थवत् होत असतें, असा स्वीकार केलेला आहे म्हणून विशेष्य जो ओंकार त्याला सर्ववेदव्यापित्व असल्यामुळें 'उद्गीथ' या विशेषणानें त्याच्या व्यभिचाराचें निवारण जरी होत असलें तरी उद्गीथसंज्ञक दुसऱ्या सर्व भक्तीचा तिच्या अवयवामध्यें संभव नसल्यामुळें उद्गीथाचें ओंकारविशेषणत्व अयुक्त आहे," अशी आशंका घेऊन उद्गीथशब्दाचें अवयवलक्षणार्थत्व मानून '**कथं०**' इत्यादि भाष्यानें म्हणतात-]='उद्गीथाचा अवयवभूत जो ओंकार त्याचें ग्रहण कसें बरें केलें जाईल?' अशा अभिप्रायानें अक्षराला उद्गीथ हें विशेषण दिलें जातें. [ अवयवी जो सर्व उद्गीथ त्याचीच ओंकार या अवयवानें लक्षणा होईल, हें म्हणणें युक्त नाहीं, कारण पुढें ओंकाराचें विस्तारानें व्याख्यान केलें जाणार असल्यामुळें त्याला प्राधान्य आहे म्हणून भक्तिलक्षणेमध्यें उद्गीथपदानें भक्तिविशेषाचेंच अर्पण करण्यांत व्यभिचार नाहीं. त्यामुळें विशेषणाला व्यर्थत्व प्राप्त होतें, असा भावार्थ.

–"अहोपण, लक्षणाप्रसंगानें वर अध्यासाचें निरसन केलेलें आहे. म्हणून दोषसाम्यामुळें हाहि पक्ष ग्राह्य नाहीं" अशी 'ननु०' इत्यादि भाष्यानें शंका–]

**भाष्यं**—**ननु अस्मिन्नपि पक्षे समाना लक्षणा। उद्गीथशब्दस्यावयवलक्षणार्थत्वात्। सत्यमेवमेतत्। लक्षणायामपि तु संनिकर्षविप्रकर्षौ भवत एव। अध्यासपक्षे ह्यर्थान्तरबुद्धिरर्थान्तरे निक्षिप्यत इति विप्रकृष्टा लक्षणा। विशेषणपक्षे त्ववयविवचनेन शब्देनावयवः समर्प्यत इति संनिकृष्टा। समुदायेषु हि प्रवृत्ताः शब्दा अवयवेष्वपि प्रवर्तमाना दृष्टाः पटग्रामादिषु। अतश्च व्याप्तेर्हेतोः 'ओमित्येतदक्षरं' इत्येतस्य 'उद्गीथं' इत्येतद्विशेषणमिति समंजसमेतन्निरवद्यमित्यर्थः॥ ९॥ (४)**

**भाष्यार्थ**—अहोपण, याहि पक्षीं लक्षणा समान आहे. कारण 'उद्गीथ-' शब्दाला अवयवलक्षणार्थत्व आहे. [–'उद्गीथशब्दाच्या अवयवांतील लक्षणेचा अंगीकार करितात–]=**'सत्यमेवं०'**–हें तर खरेंच आहे. [–"तर मग अध्यासपक्षाप्रमाणें हा विशेषणपक्षहि ग्राह्य नाहीं, असें होईल!" अशी आशंका घेऊन आचार्य '**लक्षणायां०**' इत्यादि म्हणतात–]=पण लक्षणेंतहि संनिकर्ष व विप्रकर्ष आहेतच. [दोन्ही पक्षांत लक्षणा जरी तुल्य असली तरी अध्यासपक्षाची उपेक्षा करून आम्ही विशेषणपक्षाचा आदर करितों. कारण त्या पक्षांत लक्षणार्थाला वाक्यार्थ-अन्वयित्व आहे, लक्षणार्थाचा वाक्यार्थाशीं संबंध आहे. म्हणून लक्षणेला संनिकृष्टविषयत्वानें अधिक बलवत्त्व आहे. पण अध्यासांत ही गौणीबुद्धि आहे, असें सांगितलेलें असल्यामुळें लक्षित होणाऱ्या गुणानें युक्त अशा एकाशब्दामध्यें दुसऱ्या शब्दाचें पर्यवसान–परिसमाप्ति होते. म्हणून लक्षणेला विप्रकृष्टविषयत्व आहे. तिचा विषय दूर आहे. त्यामुळें तिला दुर्बलत्व आहे, असा याचा भावार्थ.–अध्यासपक्षीं लक्षणेचें विप्रकृष्टविषयत्व स्पष्ट करितात–]=**'अध्यासपक्षे०'**–अध्यासपक्षीं अर्थान्तरबुद्धि अर्थान्तरांत निक्षिप्त केली जाते–एका वस्तूच्या ज्ञानाचा दुसऱ्या वस्तूमध्यें आरोप केला जातो, हें प्रसिद्ध आहे. त्यामुळें त्या पक्षांतील लक्षणा विप्रकृष्ट आहे–तिचा विषय दूर आहे. [–सिद्धान्तांत लक्षणेला संनिकृष्टविषयत्व असल्यामुळें–तिचा विषय समीप असल्यामुळें तिचें प्रबलत्व '**विशेषणपक्षे०**' इत्यादि भाष्यानें प्रकट करितात–]=पण विशेषणपक्षीं अवयविवचन–उद्गीथवाचक शब्दानें अवयव समर्पिला जातो, म्हणून त्या पक्षांतील लक्षणा संनिकृष्ट आहे. [–अवयविवचन शब्दानें अवयवाची लक्षणा रूढ नाहीं, असें कोणी म्हणेल म्हणून आचार्य म्हणतात–]=**'समुदायेषु०'**–कारण

पट, ग्राम इत्यादि समुदायांमध्यें प्रवृत्त झालेले शब्द अवयवांमध्येंहि प्रवृत्त होत असलेले दिसतात. [ 'पट–वस्त्र दग्ध झालें, ग्राम दग्ध झाला, ' असा वस्त्राचा व गांवाचा कांहीं भाग जरी दग्ध झालेला असला तरी पट, ग्राम इत्यादि समुदायशब्द लक्षणेनें अवयव या अर्थी योजिला जातो, हें प्रसिद्ध आहे. त्याच न्यायानें उद्गीथ-शब्दहि द्वितीयभक्तीचा अवयव जें अक्षर–ओं त्याअर्थी लक्षणेनें प्रवृत्त होईल. 'पण अक्षराचें उद्गीथावयवत्व व त्याचें उपासन हीं दोन्हीं विधेय असल्यामुळें वाक्य-भेद होतो' असेंहि म्हणतां येत नाहीं. कारण विशिष्ट अक्षराच्या अनुवादानें त्या त्या गुणानें युक्त व त्या त्या फलानें विशिष्ट अशा उपासनेचेंच समस्तवाक्यानें विधान केलें आहे, असा भावार्थ.–' व्याप्तेः ' या उक्तहेतूचा अनुवाद करून अवशिष्ट सूत्रपदाचें व्याख्यान करणारे आचार्य विशेषणपक्षाच्या निर्दोषत्वाचा उपसंहार करितात–]=' **अतश्च०**'–आणि असें असल्यामुळें व्याप्ति या हेतूमध्यें 'ओं ' असें हें अक्षर, अशा याचें ' उद्गीथ ' असें हें विशेषण आहे, असें मानणेंच समंजस–हेंच निर्दोष आहे, असा भावार्थ. ९. सु. ब्र. ३११-१२ (४)

( ५. **सर्वाभेदाधिकरण. सू.** १०.)

–"उद्गीथ या गुणानें युक्त अशा ओंकारालाच उपास्यत्व आहे, असें सांगितलें असतां त्या त्या उक्त गुणानें युक्त अशाच प्राणालाहि ठिकठिकाणीं उपास्यता आहे, " अशी आशंका घेऊन सूत्रकार '**सर्वाभेदात्०**' इत्यादि म्हणतात––

## सूत्रं––सर्वाभेदादन्यत्रेमे ॥१० ॥ (५)

**सूत्रार्थ**—वाजसनेयी व छांदोग्य या दोन शाखांच्या उपनिषदांतील प्राणविद्येंत वागादिक प्राण वसिष्ठत्वादि-गुणयुक्त श्रुत आहेत. कौषीतक्यादिशाखांत तसे श्रुत नाहींत. तथापि ' अन्यत्र '–त्या अश्रुतस्थानींहि ते वसिष्ठत्वादि गुण घ्यावे, त्यांचा इतरत्र उपसंहार करावा. '**सर्वाभेदात्**'–कारण सर्वशाखांतील प्राणसंवादस्थ प्राणविद्येला अभिन्नत्व आहे. १०.–सु. ब्र. ३१३. [–अधिकरणाचा विषय सांगण्यासाठीं ' **वाजिनां०**' इत्यादि भाष्यानें अविगीत अर्थ सांगतात––]

**भाष्यं—वाजिनां छंदोगानां च प्राणसंवादे श्रैष्ठ्यगुणान्वितस्य प्राणस्योपा-स्यत्वमुक्तम् । वागादयोऽपि हि तत्र वसिष्ठत्वादिगुणान्विता उक्ताः । ते च गुणाः प्राणे पुनः प्रत्यर्पिताः ' यद्वा अहं वसिष्ठाऽस्मि त्वं तद्वसिष्ठोऽसि ' इत्यादिना ॥**

**भाष्यार्थ**—वाजींच्या व छन्दोगांच्या प्राणसंवादांत श्रैष्ठ्य या गुणानें युक्त अशा प्राणाचें उपास्यत्व सांगितलें आहे. [–' **वागादयः०** ' इत्यादि भाष्यानें

दोन्ही शाखांत संमत असलेला दुसरा अर्थ सांगतात-]=त्या शाखाद्वयांत वागादिकहि वसिष्ठत्वादि गुणयुक्त सांगितलेले आहेत. [ ती वाक वसिष्ठत्वगुणविशिष्ट आहे. कारण उत्तम भाषण करणारेच लोकांत सुखी होऊन राहतात. चक्षु प्रतिष्ठागुण आहे. कारण प्रशस्त चक्षूंनीं युक्त असलेल्यांचीच पादप्रतिष्ठा उपलब्ध होते. अंधांची पादप्रतिष्ठा दिसत नाही. श्रोत्र संपद्गुण आहे. कारण श्रोत्रेंद्रियांनीं युक्त असलेल्या पुरुषाच्याच शब्दश्रवण, अर्थनिश्चय इत्यादि कर्मांच्या संपत्तीचा अनुभव येतो. मन आयतनगुण आहे. कारण त्या मनांत वृत्तोंच्या द्वारा भोग्य विषयांचें स्थापन केलें जातें, असें हें त्या दोन्ही शाखांत एकसारखेंच श्रुत आहे, असा भावार्थ. "-तर मग त्यांत अनेकांचें उपास्यत्व अभीष्ट आहे," अशी आशंका घेऊन 'ते च०' इत्यादि भाष्यानें म्हणतात-]=आणि 'जो मी वसिष्ट आहें तो तूंच वसिष्ट आहेस.'-बृ.६.१.१४.-इत्यादि वाक्यानें ते गुण वागादिकांकडून प्राणाला पुनः परत समर्पण केले गेले आहेत. [अन्वय-व्यतिरेकन्यायानें वागादिकांच्या स्थितीला प्राणाधीनत्व आहे, त्यांची स्थिति प्राणाच्या अधीन आहे, असें सिद्ध झालें असतां वागादिकांनीं आपले वसिष्ठत्वादिगुण प्राणामध्यें समर्पण केले-ते प्राणाला समर्पिले, असा भावार्थ.-शाखान्तरींहि संमत असलेला अर्थ 'अन्येषामपि०' इत्यादि भाष्यानें सांगतात-]

**भाष्यं—अन्येषामपि तु शाखिनां कौषीतकिप्रभृतीनां प्राणसंवादेषु "अथातो निःश्रेयसादानम्" "एता ह वै देवता अहंश्रेयसे विवदमानाः" इत्येवंजातीयकेषु प्राणस्य श्रैष्ठ्यमुक्तं न त्विमे वसिष्ठत्वादयोऽपि गुणा उक्ताः। तत्र संशयः–किमिमे वसिष्ठत्वादयो गुणाः क्वचिदुक्ता अन्यत्राप्यस्येरन्नुत नास्येरन्निति ॥**

**भाष्यार्थ**—पण कौषीतकिप्रभृति अन्यशाखियांच्याहि प्राणसंवादांमध्यें "परिमरगुणोपासनेनंतर निःश्रेयसादान "-[ निःश्रेयस म्ह० श्रेष्ठत्व, त्याचें आदान म्ह० निर्धारण-निश्चय, श्रेष्ठत्वाविषयींच्या निर्धारणावांचून उपासनेचा असंभव असल्यामुळें श्रेष्ठत्वावधारणेचा आतां आरंभ केला जातो-]='एताः०'-"याच वागादिइंद्रियांच्या अभिमानिनी देवता 'अहंश्रेयसे'-आपापल्या श्रेष्ठत्वासाठीं विवाद करूं लागल्या "-कौ. २. १४. सु.उ. ८५८-इत्यादि प्रकारच्या प्राणसंवादांमध्यें प्राणाचें श्रेष्ठत्व सांगितलें आहे. [-याप्रमाणें दुसऱ्या शाखांतील अविरुद्ध अर्थ सांगून विरुद्ध अर्थ सांगतात-]='न तु०'-पण त्यांत हे वसिष्ठत्वादिगुणहि सांगितलेले नाहींत. [-'एवं-'शब्दामुळें व ज्येष्ठत्वादिगुणविशिष्ट प्राणाचें प्रत्यभिज्ञान होत असल्यामुळें 'तत्र०' इत्यादि भाष्यानें वसिष्ठत्वादिगुणांविषयीं संशय-]

=त्याविषयीं 'कांहीं शाखांमध्यें सांगितलेले हे वसिष्ठत्वादिगुण दुसऱ्या शाखांतील प्राणविद्येमध्यें उपक्षिप्त करावे–त्यांचा उपसंहार करावा कीं त्यांचा उपक्षेप –उपसंहार करूं नये' असा संशय येतो. [भाष्यांतील 'क्वचित्-'शब्दानें वाजसनेयक व छान्दोग्य या शाखा सांगितल्या आहेत व 'अन्यत्र' या शब्दानें कौषीतकिप्रभृति शाखा सांगितल्या आहेत. या अधिकरणांत वसिष्ठत्वादि-गुणोपसंहाराच्या द्वारा वाक्यार्थज्ञानहेतूचेंच निरूपण केलेलें असल्यामुळें याच्या पादादिसंगति आहेत. पूर्वपक्षांत 'यथाश्रुति गुणांची व्यवस्था' व सिद्धान्तांत 'गुणी उपास्याच्या अनुरोधानें गुणांची अव्यवस्था' असा फलभेद मानून–'तत्र०' इत्यादि भाष्यानें पूर्वपक्ष—]

**भाष्यं**—तत्र प्राप्तं तावन् नास्येरन्निति । कुतः । एवंशब्दप्रयोगात् । 'अथो य एवं विद्वान्प्राणे निःश्रेयसं विदित्वा' इति हि तत्र तत्र एवंशब्देन वेद्यं वस्तु निवेद्यते । एवं शब्दश्च संनिहितावलंबनो न शाखान्तरपरिपठितमेवंजातीयकं गुणजातं शक्नोति निवेदयितुम् । तस्मात्स्वप्रकरणस्थैरेव गुणैर्निराकांक्षत्वमिति ॥

**भाष्यार्थ**—असा संशय आला असतां 'त्या गुणांचा उपसंहार केला जात नाहीं,' असें प्राप्त झालें. [–"पण विद्येच्या एकत्वामुळें अनुमानानें त्यांचा उपसंहार होत असतांना अनुपसंहार कसा ?" अशी शंका–]=' कुतः'–कोणत्या कारणानें ? [–ओंकाराची सर्वत्र प्राप्ति झाली असतां 'उद्गीथ' या विशेषणानें अन्य ओंकाराची व्यावृत्ति जशी होते त्याचप्रमाणें 'एवं विद्वान्' यांतील संनिहित वस्तु हें ज्याचें आलंबन–आधार असतो अशा 'एवं'-शब्दामुळें विद्यैक्यावरून अनुमानानें ज्ञात झालेल्या असंनिहित वसिष्ठत्वादिकांची व्यावृत्ति होणें युक्त आहे, असें पूर्ववादी 'एवंशब्द०' इत्यादि भाष्यानें सांगतो–]=कारण एवंशब्दाचा प्रयोग केलेला आहे त्यामुळें एका शाखेंत सांगितलेल्या विद्येंतील गुणांचा अन्य शाखेंतील त्याच विद्येंत उपसंहार करितां येत नाहीं. '**अथो य एवं०**'–"जसा प्राण वागादिकांहून श्रेष्ठ सिद्ध झाला आहे त्याचप्रमाणें श्रैष्ठ्य या गुणानें विशिष्ट असलेल्या प्राणाला जो जाणतो–जो कोणी अधिकृत असून त्याची उपासना करितो तोहि प्राणांतील श्रैष्ठ्याची उपासना करून प्राणरूपत्वप्राप्तीनें श्रैष्ठ्यादिकांनीं युक्त होतो."–कौ. २. ९. सु. उ. ८५८–अशा प्रकारें 'एवं-'शब्दाचा प्रयोग केलेला असल्यामुळें अन्यत्र श्रुत गुणांचा अन्यत्र उपसंहार होत नाहीं. [–"अहोपण, असा 'एवं-'शब्दाचा संयोग जरी असला तरी विद्येला वसिष्ठादि-गुणत्व कां नाहीं ?"

पूर्ववादी '**तत्र तत्र०**' इत्यादि भाष्यानें उत्तर सांगतो-]=त्या त्या विद्याप्रकरणांतील 'एवं-'शब्दानें वेद्य-उपास्य वस्तूचें निवेदन केलें जातें. [-"पण विद्येला एकत्व असल्यामुळें वेद्याचें अर्पण करणाऱ्या 'एवं-'शब्दानें अन्य शाखेंत सांगितलेल्याहि वसिष्ठत्वादिकांचा परामर्श होईल" अशी आशंका घेऊन वादी '**एवं-शब्दश्च०**' इत्यादि भाष्यानें म्हणतो-]=आणि 'एवं' हा शब्द संनिहिताचें आलंबन करणारा-समीप असलेल्या वस्तूचा परामर्श करणारा आहे. त्यामुळें तो अशा जातीच्या शाखान्तरपठित गुणजाताचें निवेदन करूं शकत नाहीं. [शब्दाला अनुमानानें होणाऱ्या ज्ञानाहून शब्दजन्य ज्ञान संनिहित-समीप असतें. तेव्हां 'एवं-'शब्दावरून शाखान्तरीय गुणाचें ज्ञान कोणत्या कारणानें होणार, असा याचा भावार्थ.-"विद्येचें निराकांक्षत्व व्हावें, तिला कोणत्याहि गुणाची आकांक्षा राहूं नये, म्हणून शाखान्तरीय गुणजातहि येथें परामृष्ट आहे-त्याचा परामर्श केलेला आहे." अशी आशंका घेऊन '**तस्मात्०**' इत्यादि भाष्यानें म्हणतात-] =म्हणून स्वप्रकरणस्थ गुणांनींच या विद्येला निराकांक्षत्व आहे, '**इति**'-असा पूर्वपक्ष प्राप्त होतो. [-'एवं०' इत्यादि भाष्यानें पूर्वपक्षाचा अनुवाद करून व सिद्धान्तसूत्राला अवतरण देऊन प्रतिज्ञेचें व्याख्यान करितात-]

**भाष्यं--एवं प्राप्ते प्रत्याह--अस्येरन्निमे गुणाः क्वचिदुक्ता वसिष्ठत्वादयोऽन्यत्रापि । कुतः । सर्वाभेदात् । सर्वत्रैव तदेवैकं प्राणविज्ञानमभिन्नं प्रत्यभिज्ञायते । प्राणसंवादादिसारूप्यात् । अभेदे च विज्ञानस्य कथमिमे गुणाः क्वचिदुक्ता अन्यत्र नास्येरन् ॥**

**भाष्यार्थ**--असा पूर्वपक्ष प्राप्त झाला असतां सूत्रकार त्याचें प्रत्याख्यान करितात-'**अस्येरन्०**'-वाजसनेयक व छांदोग्य यांत सांगितलेले हे वसिष्ठादि गुण अन्यत्र-कौषीतक्यादिकांतहि उपसंहृत करावे-त्यांचा अन्यत्र-इतर शाखास्थ विद्यांतहि उपसंहार करावा. [-पण क्वचित् सांगितलेल्या गुणांचा त्या गुणांचें कथन न करणाऱ्या शाखांमध्यें उपसंहार केल्यास सर्वत्र त्यांच्या उपसंहाराचा प्रसंग येत असल्यामुळें वादी कांहीं शाखांतच त्यांचा उपसंहार करण्याचें निमित्त विचारितो-]='**कुतः**'-कोणत्या कारणानें? [-भाष्यकार सूत्रोक्त हेतु घेऊन त्याचें व्याख्यान करितात-]='**सर्वाभेदात्०**'-सर्वाभेदामुळें. कारण सर्वच ठिकाणीं तेंच एक प्राणविज्ञान अभिन्न प्रत्यभिज्ञात होतें. ['अभिन्न प्रत्यभिज्ञात होतें' या वाक्यानें सर्व शाखांतील प्राणविज्ञानाच्या ऐक्याविषयीं प्रमाण सांगितलें आहे. प्राणविज्ञानाचें एकरूप प्रत्यभिज्ञान हेंच त्याविषयीं प्रमाण आहे.-'**प्राणसंवा-**

दादि०' इत्यादि भाष्यानें प्रत्यभिज्ञापक दाखवितात–]=कारण प्राणसंवादादिकांचें सारूप्य–सादृश्य असल्यामुळें प्राणविज्ञानाचें एकरूप प्रत्यभिज्ञान होतें. [–'संवादादि' येथील 'आदि-'शब्द श्रेष्ठत्वादि-गुणांचें ग्रहण करवितो.–"पण ज्ञानाचें ऐक्य जरी असलें तरी यथाश्रुति गुणव्यवस्था करावी" अशी आशंका घेऊन आचार्य म्हणतात–]=आणि विज्ञानाचा अभेद–ऐक्य आहे असें झालें असतां हे कांहीं शाखांत सांगितलेले गुण अन्यत्र कसे घेतले जाणार नाहींत? [–त्यांचा उपसंहार अन्यत्र अवश्य केला जाईल, असा संबंध. गुणी विज्ञानानें आकर्षण केलेल्या गुणांची यथाश्रुति व्यवस्था सांगणें अनुमानाच्या विरुद्ध आहे, असा भावार्थ.–'ननु०' इत्यादि भाष्यानें पूर्वपक्षाच्या बीजाचा अनुवाद करितात–]

**भाष्यं—नन्वेवं-शब्दः तत्र तत्र भेदेनैवंजातीयकं गुणजातं वेद्यत्वाय समर्पयतीत्युक्तम् । अत्रोच्यते—यद्यपि कौषीतकिब्राह्मणगतेन एवं-शब्देन वाजसनेयिब्राह्मणगतं गुणजातमसंशब्दितं असंनिहितत्वात् तथापि तस्मिन्नेव विज्ञाने वाजसनेयिब्राह्मणगतेन एवं-शब्देन तत्संशब्दितम् । इति न परशाखागतमप्यभिन्नविज्ञानावबद्धं गुणजातं स्वशाखागताद्विशिष्यते ॥**

**भाष्यार्थ**—"अहोपण, 'एवं' हा शब्द त्या त्या विद्याप्रकरणांत वेद्यत्वासाठीं–उपास्यत्वासाठीं भेदानें अशा जातीच्या गुणजाताचें समर्पण करितो, असें आम्हीं वर सांगितलें आहे."–२६६–[–अनुमानाच्या शब्दविरोधाचा परिहार करणारे भाष्यकार '**अत्रोच्यते**' अशी प्रतिज्ञा करितात–]=याविषयीं असें सांगितलें जातें–[–"असांनिध्यामुळें 'एवं-'शब्दानें वसिष्ठत्वादिकांचें ग्रहण करितां येत नाहीं, त्यामुळें अनुमानश्रुति अविरुद्ध आहे," अशी आशंका घेऊन '**यद्यपि०**' इत्यादि भाष्यानें म्हणतात–]=यद्यपि कौषीतकिब्राह्मणांतील 'एवं-'शब्दानें वाजसनेयिब्राह्मणांतील गुणजात असंशब्दित–अकथित आहे, कारण तें त्याच्याशीं संनिहित–समीप स्थित नाहीं. तथापि त्याच विज्ञानांत वाजसनेयिब्राह्मणगत 'एवं-' शब्दानें तें संशब्दित–कथित आहे. [अगोदर वाजसनेयिब्राह्मणस्थ 'एवं-' शब्दानें प्राणविज्ञानाशीं वसिष्ठत्वादि सर्व गुणांचा संबंध सिद्ध झाला आहे. तेंच प्राणविज्ञान कौषीतकिब्राह्मणांतहि प्रत्यभिज्ञात झालें आहे. त्यामुळें कौषीतकिब्राह्मणस्थ 'एवं-'शब्दानेंहि वसिष्ठत्वादिकांचा परामर्श करणें शक्य आहे, असा भावार्थ.–"अहोपण, शब्दोक्तच शब्दाच्या संनिहित असतें. विजातीय अनुमानानें सिद्ध झालेलें शब्दाचें संनिहित होऊं शकत नाहीं," अशी आशंका घेऊन 'इति न०' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=असें असल्यामुळें अभिन्न विज्ञानानें

अवरुद्ध–आकृष्ट–संबद्ध झालेलें परशाखास्थहि गुणजात स्वशाखास्थ गुणजाता-हून विशिष्ट–पृथक्–भिन्न नाहीं. [ शब्दाचें शब्दच संनिहित असतें, असा नियम नाहीं, तर शब्दोक्त अर्थाच्या साहचर्यानें प्राप्त झालेलेंहि बुद्धिस्थ गुणजात पर्णमयीत्वाच्या जुहूपस्थापित क्रतूप्रमाणें शब्दाच्या संनिहितच आहे. यास्तव संनिधीच्या साम्यामुळें ‘ एवं-’शब्दानें त्याच्याहि संग्रहाची सिद्धि होते, असा भावार्थ.–“ अहोपण, अनुमानानें शाखान्तरीय गुणांचा उपसंहार केल्यास श्रुत असलेल्या परिगणितत्वाचा त्याग केला आहे असें होईल, श्रुतीनें नामनिर्देश-पूर्वक गणना केलेल्या गुणांचा त्याग केला आहे, असें होतें, ” अशी आशंका घेऊन ‘ अनुमानाला श्रुत्यविरुद्धत्व असल्यामुळें–अनुमान श्रुतीशीं अविरुद्ध असल्यामुळें श्रुत परिगणितत्वाचा त्याग होत नाहीं, असें ‘ **न चैवं०** ’ इत्यादि भाष्यानें सांगतात–]

**भाष्यं—न चैवं सति श्रुतहानिरश्रुतकल्पना वा भवति । एकस्यामपि हि शाखायां श्रुता गुणाः श्रुता एव सर्वत्र भवन्ति । गुणवतो भेदाभावात् । न हि देवदत्तः शौर्यादिगुणत्वेन स्वदेशे प्रसिद्धो देशान्तरं गतः तद्देश्यैरविभावित-शौर्यादिगुणोऽप्यतद्गुणो भवति ॥**

**भाष्यार्थ**—आणि असें झालें असतां म्ह० अभिन्न विज्ञानानें अवरुद्ध झालेलें परशाखास्थ गुणजात स्वशाखास्थ गुणजाताहून पृथक् नाहीं, असें झालें असतां श्रुताचा त्याग किंवा अश्रुताची कल्पना केली आहे, असें होत नाहीं. [ **‘एकस्यां०’** इत्यादि भाष्यानें हेंच व्यक्त करितात–]=कारण एका शाखेंतहि श्रुत असलेले गुण सर्वत्र–सर्व शाखांतील त्या त्या प्रकरणांत श्रुतच आहेत. कारण गुणवानाच्या –त्या गुणांनीं युक्त असलेल्या उपास्याच्या भेदाचा अभाव आहे. [–‘ **न हि०** ’ इत्यादि भाष्यानें हा उक्त अर्थच दृष्टान्तानें स्पष्ट करितात–]=कारण स्वदेशांत शौर्यादि गुणत्वानें प्रसिद्ध असलेला देवदत्त देशान्तरीं गेला असतां त्या देशांतील लोकांना त्याच्या शौर्यादि गुणांचा प्रत्यय जरी आलेला नसला तरी तो ‘ अत-

---

१ **भामती**—जसा ‘ यस्य पर्णमयी जहूर्भवति ’–ज्याची पलाशकाष्ठमय जुहू–होमपात्र असतें, अशा अव्यभिचरित–नित्य क्रतुसंबद्ध जुहूनें उपस्थापित केलेला क्रतु, त्याप्रमाणें.

२ **रत्नप्रभा**—‘कौषीतकिश्रुतिस्थ प्राण वसिष्ठत्वादि गुणांनीं युक्त आहे. कारण त्याला श्रेष्ठप्राणत्व आहे. वाजिश्रुतिस्थ प्राणाप्रमाणें,’ असें अश्रुत गुणांचें अनुमान होतें. त्यामुळें श्रुतिहानि हा दोष येत नाहीं.

द्गुण'–त्या गुणांनीं युक्त नाहीं, असें होत नाहीं. [–शब्दोक्त अर्थाशीं ज्याचें साह-चर्य असतें तेंहि शब्दसंनिहितच असतें, असें जें वर म्हटलें आहे, तेंच '**यथ च०**' इत्यादि भाष्यानें स्पष्ट करितात–]

**भाष्यं—यथा च तत्र परिचयविशेषाद्देशान्तरेऽपि देवदत्तगुणा विभाव्यन्ते। एवमभियोगविशेषाच्छाखान्तरेऽप्युपास्या गुणाः शाखान्तरेऽप्यस्येरन्। तस्मा-देकप्रधानसंबद्धा धर्मा एकत्राप्युच्यमानाः सर्वत्रैवोपसंहर्तव्या इति ॥१०॥ (५)**

**भाष्यार्थ—**आणि ज्याप्रमाणें त्या परदेशांतहि परिचयविशेषामुळें देवदत्ताचे गुण प्रकट–प्रत्यक्ष प्रतीत होतात [म्ह० देवदत्ताचें ऐक्य असल्यामुळें तो बुद्धीमध्यें स्थित झाला असतां त्याच्या गुणांनाहि जसें बुद्धिस्थत्व असतें त्याप्रमाणें ज्ञानाच्या ऐक्यामुळें तें बुद्धिस्थ झालें असतां त्याचे गुणहि बुद्धिसंनिहित होतात, असें–'**एवं०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=याच न्यायानें अभियोग-विधिविशेषामुळें शाखान्तरांतीलहि उपास्य गुण शाखान्तरांतहि घेतले जातील–त्यांचाहि त्यांत उपसंहार होईल. [–याप्रमाणें अनुमानाचा अविरोध सिद्ध झाला असतां '**तस्मात्०**' इत्यादि भाष्यानें फलित सांगतात–]=म्हणून एका प्रधानाशीं संबद्ध असलेले धर्म एकाच ठिकाणीं जरी सांगितले जात असले तरी त्यांचा सर्वत्र उपसंहार करावा, '**इति**'–असें सिद्ध झालें. १०.–सु.ब्र. ३१३–(५)

**( ६. आनन्दाद्यधिकरण. सू.११-१३. )**

—"प्राणाला सविशेषत्व असल्यामुळें प्राणविद्येंत शाखान्तरीय वसिष्ठत्वादि गुणांचा उपसंहार करणें युक्त आहे. पण ब्रह्माला निर्विशेषत्व आहे. म्हणून स्वशाखागत ब्रह्मधर्मांनींच ब्रह्मज्ञानाची सिद्धि होत असल्यामुळें त्यांत आनंदादिकांचा उपसंहार होत नाहीं," अशी आशंका घेऊन सूत्रकार '**आनन्दादयः०**' इत्यादि म्हणतात–

## सूत्रं—आनन्दादयः प्रधानस्य ॥ ११

**सूत्रार्थ—**प्रधान ब्रह्माचे आनंदादिक गुण सर्वत्र घ्यावे–त्यांचा सर्वशाखास्थ निर्गुण ब्रह्मज्ञानांत उपसंहार करावा. ११–सु.ब्र.३१४. [–'**ब्रह्मस्वरूप०**' इत्यादि भाष्यानें अधिकरणाचा विषय दाखवितात–]

**भाष्यं—ब्रह्मस्वरूपप्रतिपादनपरासु श्रुतिषु आनंदरूपत्वं विज्ञानघनत्वं सर्व-गतत्वं सर्वात्मत्वं इत्येवंजातीयका ब्रह्मणो धर्माः क्वचित्कोचित् श्रूयन्ते। तेषु संशयः–किमानंदादयो ब्रह्मधर्मा यत्र यावन्तः श्रूयन्ते तावन्त एव तत्र प्रतिप-त्तव्याः। किंवा सर्वे सर्वत्रेति। तत्र यथाश्रुतिविभागं धर्मप्रतिपत्तौ प्राप्तायाम्–**

**भाष्यार्थ**--ब्रह्मस्वरूपप्रतिपादनपर श्रुतींमध्यें आनंदरूपत्व, विज्ञानघनत्व, सर्वगतत्व, सर्वात्मत्व अशा प्रकारचे ब्रह्माचे कित्येक धर्म कांहीं उपनिषदांत श्रुत आहेत. [-ब्रह्माचें ऐक्य व निर्विशेषत्व यांच्या योगानें येणारा संशय-]='**तेषु०**' -त्या धर्मांविषयीं 'काय, ब्रह्माचे आनंदादिक धर्म जेथें जितके श्रुत आहेत तितकेच तेथें जाणणें योग्य आहे, कीं सर्व धर्म सर्वत्र-सर्व शाखांमध्यें उपसंहर्तव्य आहेत' असा संशय येतो. [-"वेद्य ब्रह्माला ऐक्य असल्यामुळें व 'एवं-'शब्दा-प्रमाणें अपवादक निमित्त कांहींच उपलब्ध होत नसल्यामुळें ब्रह्मविद्येंतहि सामान्यत: गुणोपसंहार होईल" अशी आशंका घेऊन "अहोपण, ब्रह्माच्या ऐक्यामुळें आनंदादिकांचा सर्वत्र उपसंहार केल्यास संयद्वामत्वादिकांचाहि उप-संहार कां केला जाणार नाहीं, त्यांचाहि सर्वत्र उपसंहार होईल" अशा अभि-प्रायानें '**तत्र०**' इत्यादि भाष्यानें पूर्वपक्ष-]=असा संशय आला असतां '**यथा-श्रुतिविभाग**'-श्रुतीनें जसा त्यांचा विभाग केला आहे तसेच धर्म ब्रह्मविद्येंत जाणावे, असा पूर्वपक्ष प्राप्त होतो. याप्रमाणें यथाश्रुतिविभागधर्मप्रतिपत्ति प्राप्त झाली असतां [ असें सांगितलें जातें, असा पुढें संबंध. उपासनेसाठीं सांगित-लेल्या संयद्वामत्वादिकांची यथाश्रुति व्यवस्था लावावी. पण सत्यादिधर्म वस्तुस्वरू-पाच्या ज्ञानासाठीं आहेत. यास्तव जेथें जेथें वस्तुस्वरूपज्ञान असेल त्यांत त्यांत त्यांचा उपसंहार केला जाईल, असें सांगून वाक्यार्थज्ञानहेतूंचेंच प्रतिपादन केलेलें असल्यामुळें या अधिकरणाच्या पादादिसंगति आहेत. पूर्वपक्षांत 'सत्यादिकांचा उपसंहार करितां येत नाहीं, असें झालें असतां स्वरूपाचें ज्ञान होत नाहीं' व सिद्धान्तांत 'त्यांचा उपसंहार केला जातो, असें झाले असतां ब्रह्मज्ञानाची सिद्धि होते' असा फलभेद मानून-'**इदं उच्यते०**' इत्यादि भाष्यानें सिद्धान्त सांगतात-]

**भाष्यं—इदमुच्यते—आनंदादयः प्रधानस्य ब्रह्मणो धर्माः सर्वे सर्वत्र प्रतिपत्तव्याः । कस्मात् । सर्वाभेदादेव । सर्वत्र हि तदेवैकं प्रधानं विशेष्यं ब्रह्म न भिद्यते । तस्मात्सार्वत्रिकत्वं ब्रह्मधर्माणां तेनैव पूर्वाधिकरणोदितेन देव-दत्तशौर्यादिनिदर्शनेन ॥ ११ ॥**

**भाष्यार्थ**—असा पूर्वपक्ष प्राप्त झाला असतां हें सांगितलें जाते-'**प्रधानाचे**'-ब्रह्माचे आनंदादिक सर्व धर्म सर्वत्र जाणावे, असा सिद्धान्त सांगितला जातो. [-"अहोपण, उदित होमकर्तव्यता व अनुदित होमकर्तव्यता यांची व्यवस्था-निर्णय शाखाभेदानें जसा केला आहे त्याप्रमाणें येथेंहि शब्दभेदानें व्यवस्था-निर्णय होईल" अशी शंका-]='**कस्मात्**'-कोणत्या कारणानें ते आनंदादिक

सर्व ब्रह्मधर्म सर्वत्र जाणण्यास योग्य आहेत? [–पूर्वसूत्रोक्त हेतूचें आकर्षण करून येथें त्याचें उदाहरण देतात–]=**'सर्वाभेदात् एव'**–सर्वत्र त्याचा अभेद असल्यामुळेच. [–'**सर्वत्र०**' इत्यादि भाष्यानें या हेतूचेंच विवरण–]=कारण सर्वत्र–सर्व ब्रह्मविद्येंत तेंच एक 'प्रधान'–विशेष्य ब्रह्म भेद पावत नाहीं. [–ब्रह्माला सर्वत्र ऐक्य आहे, असें झालें असतां त्याचें फलित–]=**'तस्मात्०'**–ब्रह्म सर्वत्र एक असल्यामुळें ब्रह्माच्या धर्मांनाहि सार्वत्रिकत्व आहे. [–" अहोपण, धर्मीला सार्वत्रिकत्व जरी असलें तरी त्याच्या धर्मांची यथाश्रुति व्यवस्था होईल" अशी आशंका घेऊन '**तेनैव०**' इत्यादि भाष्यानें म्हणतात–]=त्याच पूर्वाधिकरणांत सांगितलेल्या देवदत्ताच्या शौर्यादि गुणांच्या दृष्टान्तानें ब्रह्मधर्मांना सार्वत्रिकत्व आहे.[परस्पर विशेषण-विशेष्यभूत व अनृत, जड इत्यादि विरुद्ध धर्मांच्या भ्रांतीचें निवारण करणारे असे जे सत्य-ज्ञानादि धर्म ते सत्त्वादि पर व अपर सामान्याच्या आधारभूत एका आनंदव्यक्तीला लक्षित करितात–सर्वाधार आनंदाचा लक्षणावृत्तीनें बोध करितात. एकाच पदापासून अशा प्रकारचें ब्रह्म सिद्ध होत नाहीं. कारण केवळ एकाच पदाचा प्रयोग केला असतां विरोधाच्या अभावामुळें लक्षणेचें उत्थान होत नाहीं. त्यामुळें दुसऱ्या पदाचा प्रयोग करणें उचित झालें असतां संभावित–संभवनीय असलेल्या समस्त भ्रांतींचें निरसन करण्यास समर्थ असें पदजात योजावें लागतें. म्हणून आरोपित भ्रांतीच्या निवृत्तीसाठीं परशाखीय पदसमूहाचा येथें उपसंहार करावा, असा भावार्थ.] ११. [–"अहोपण, आनंदमय ब्रह्माचा सर्वत्र अभेद असल्यामुळें त्याच्या धर्मत्वानें आनंदादिकांप्रमाणें प्रियशिरस्त्वादि धर्महि त्या त्या विद्येंत प्राप्त होतील, कारण ते प्राप्त होत नाहीत, असें जर म्हटलें तर आनंदादिकहि सार्वत्रिक नाहींत असें म्हणावें लागेल," अशी **'नन्वेवं०'** इत्यादि शंका–]

**भाष्यं—नन्वेवं सति प्रियशिरस्त्वाद्योऽपि धर्माः सर्वे सर्वत्र संकीर्येरन्। तथाहि तैत्तिरीयके आनंदमयमात्मानं प्रक्रम्याम्नायते—' तस्य प्रियमेव शिरः। मोदो दक्षिणः पक्षः। प्रमोद उत्तरः पक्षः। आनंद आत्मा। ब्रह्म पुच्छं प्रतिष्ठा' इति। अत उत्तरं पठति—**

**भाष्यार्थ**—" अहोपण, '**एवं सति**'–ब्रह्माच्या धर्मांचा सर्वत्र संकर होतो, असें झालें असतां प्रियशिरस्त्वादि सर्व धर्महि सर्वत्र–सर्व ब्रह्मविद्येंत संकर पावतील! [–'पण त्यांची ब्रह्मधर्मताच असिद्ध आहे' अशी आशंका घेऊन **'तथाहि०'** इत्यादि भाष्यानें शंकाकार म्हणतो–]=प्रियशिरस्त्वादिकांना ब्रह्मधर्मता कशी आहे ती पहा–तैत्तिरीयकांत आनंदमय आत्म्याचा उपक्रम करून " त्याचें प्रिय हेंच शिर

आहे, मोद दक्षिण पक्ष आहे, प्रमोद उत्तर पक्ष आहे, आनंद आत्मा आहे व ब्रह्म पुच्छ प्रतिष्ठा आहे "-तै.२.५.-असें आनंदमयाचें प्रिय-शिरस्त्वादि धर्मत्व सांगितलें जातें [ सूत्रानें उत्तर-]='अत उत्तरं आह'-अशी शंका येत असल्यामुळें सूत्रकार 'प्रियशिरस्त्वादि०' इत्यादि सूत्रानें उत्तर सांगतात--

सूत्रं--प्रियशिरस्त्वाद्यप्राप्तिरुपचयापचयौ हि भेदे ॥१२

**सूत्रार्थ**—प्रियशिरस्त्वादि धर्मांची सर्वत्र प्राप्ति होत नाहीं. कारण भेद असेल तरच प्रतीत होणारे त्याचे उपचय व अपचय संभवतात. भेदावांचून ते संभवत नाहींत. १२.-सु. ब्र. ३१४. [-'प्रिय०' इत्यादि भाष्यानें सूत्रांतील 'प्रियशिरस्त्वादि-अप्राप्तिः' या प्रतिज्ञेचें विवरण-]

**भाष्यं**--प्रियशिरस्त्वादीनां धर्माणां तैत्तिरीयके आम्नातानां नास्त्यन्यत्र प्राप्तिः । यत्कारणं प्रियं मोदः प्रमोद आनंद इत्येते परस्परापेक्षया भोक्त्रंतरापेक्षया चोपचितापचितरूपा उपलभ्यन्ते । उपचयापचयौ च सति भेदे संभवतः । निर्भेदं तु ब्रह्म 'एकमेवाद्वितीयम' इत्यादिश्रुतिभ्यः । न चैते प्रियशिरस्त्वादयो ब्रह्मधर्माः । कोशधर्मास्त्वेते इत्युपदिष्टमस्माभिः 'आनंदमयोऽभ्यासात्' इत्यत्र ॥

**भाष्यार्थ**—तैत्तिरीयकांत श्रुत असलेल्या प्रियशिरस्त्वादि धर्मांची अन्यत्र-सर्व निर्गुणब्रह्मविद्येंत प्राप्ति नाहीं. [-सूत्रांतील 'हि उपचय-अपचयौ भेदे' या हेतूचें व्याख्यान-]=कारण कीं, इष्टवस्तूच्या सामान्यप्राप्तीमुळें होणारी केवल प्रीति हें प्रिय, पुत्रादिविशेषाच्या प्राप्तीमुळें होणारा हर्षविशेष हा मोद, तोच प्रकृष्ट-अधिक झाला असतां प्रमोद व सुखसामान्य हा आनंद, असे हे प्रिय, मोद, प्रमोद व आनंद परस्परांच्या अपेक्षेनें उपचित-अपचितरूप-वृद्धि पावलेले व क्षय पावलेले या स्वरूपाचे व भिन्न भिन्न भोक्त्यांच्या अपेक्षेनेंहि उपचित-अपचितरूप उपलब्ध होतात. [जीवांमध्यें सुखादिवैचित्र्य उपलब्ध होतें, असा भावार्थ. -" अहोपण त्यांचें असें उपचित-अपचितरूपत्व जरी उपलब्ध होत असलें तरी काय झालें ? " 'उपचय०' इत्यादि भाष्यानें उत्तर-]=आणि जर भेद असला तरच उपचय व अपचय संभवतात, अभेद असतांना ते संभवत नाहींत. [-" तर मग ब्रह्मामध्येंहि भेद असूं दे." याचें 'नाहीं' असें उत्तर-]='निर्भेदं तु०'-पण 'एकच व अद्वितीय'-छां. ६. २. १.-इत्यादि श्रुतींवरून ब्रह्म निर्भेद-भेदशून्य आहे. [ त्यामुळें जेथें जेथें ब्रह्म प्रतिपाद्य असतें तेथें तेथें प्रियशिरस्त्वादिकांची प्राप्ति होत नाहीं, असा या वाक्याला शेष लावावा. पण प्रियशिरस्त्वादिकांना ब्रह्मधर्मत्व आहे, असें मानून हें सांगितलें; परंतु वस्तुतः ते

ब्रह्माचे धर्मच नव्हेत, असें ' न च० ' इत्यादि भाष्यानें सांगतात-]=आणि हे प्रियशिरस्त्वादि ब्रह्मधर्म नव्हेत. [-" अहोपण, आनंदमयाला ब्रह्मत्व असतांना त्याच्या या धर्मांना अब्रह्मधर्मत्व कसें ? " अशी आशंका घेऊन आनंदमयाधिकरणांत सिद्ध झालेल्या अर्थाची आठवण देतात-]=' कोशधर्माः० '-हे कोशधर्म आहेत, असा आम्हीं ' आनन्दमयोऽभ्यासात् '-ब्र. सू. १. १. १२. भाग १. पृ.२४८-५०-येथें उपदेश केलेला आहे. [-आणखी याहि कारणानें ब्रह्मवाक्यांत प्रियशिरस्त्वादिकांची प्राप्ति नाहीं, असें 'अपि च०' इत्यादि भाष्यानें सांगतात-]

भाष्यं--अपि च परस्मिन्ब्रह्मणि चित्तावतारोपायमात्रत्वेनैते परिकल्प्यन्ते न द्रष्टव्यत्वेन । एवमपि सुतरामन्यत्राप्राप्तिः प्रियशिरस्त्वादीनाम् । ब्रह्मधर्मांस्त्वेतान्कृत्वा न्यायमात्रमिदमाचार्येण प्रदर्शितं प्रियशिरस्त्वाद्यप्राप्तिरिति । स च न्यायोऽन्येषु निश्चितेषु ब्रह्मधर्मेषूपासनायोपदिश्यमानेषु नेतव्यः । संयद्वामत्वादिषु सत्यकामत्वादिषु च । तेषु हि सत्यप्युपास्यस्य ब्रह्मण एकत्वे प्रक्रमभेदादुपासनाभेदे सति नान्योन्यधर्माणामन्योन्यत्र प्राप्तिः ॥

भाष्यार्थ—शिवाय हे प्रियशिरस्त्वादि धर्म परब्रह्मामध्यें चित्ताच्या अवताराचा-प्रवेशाचा उपाय एवढ्याच रूपानें सर्वथा कल्पिले जातात. द्रष्टव्यत्वानें-ज्ञेयत्वानें त्यांचा उपदेश केला जात नाहीं. [-" तर मग चित्तावताराच्या उपायत्वानें सर्वत्र ब्रह्मवाक्यांत त्यांची प्राप्ति असू दे " 'एवमपि०' इत्यादि भाष्यानें उत्तर-]=पण असें जरी मानिलें तरी प्रियशिरस्त्वादिकांची अन्यत्र सर्वथा अप्राप्ति आहे.[त्या धर्मांना ब्रह्मांतील चित्तावताराचें उपायत्व जरी असलें तरी ब्रह्मवाक्यांत त्यांची सर्वत्र प्राप्ति होत नाहीं. कारण ब्रह्मामध्यें ते धर्म आहेत, असें जाणण्यासाठीं त्यांचा उपदेश केलेला नाहीं. शिवाय त्यांना ब्रह्मधर्मत्व नाहीं. चित्ताचा ब्रह्मामध्यें अवतार त्या त्या ब्रह्मप्रकरणांत सांगितलेल्या धर्मांनींच होऊं शकत असल्यामुळें तो या धर्मांच्या उपसंहाराची आकांक्षा करीत नाहीं, असा भावार्थ.-"तर मग यांना ब्रह्मधर्मत्वच नसल्यामुळें त्यांच्या उपसंहाराची शंकाच येत नाहीं. त्यामुळें हें सूत्र व्यर्थ आहे," अशी आशंका घेऊन ' ब्रह्मधर्मान्० ' इत्यादि भाष्यानें आचार्य म्हणतात-] =परंतु या प्रियशिरस्त्वादिकांना ब्रह्माचे धर्म करून-ते ब्रह्मधर्म आहेत, असें गृहीत धरून बादरायणाचार्यांनीं ' प्रियशिरस्त्वादिकांची अप्राप्ति-अनुपसंहार आहे ' असा हा केवळ न्यायच सांगितला आहे. [-' स च० ' इत्यादि भाष्यानें या कृत्वाचिंतेचें फल सांगतात-]=आणि तो न्याय उपासनेसाठीं सांगितल्या जाणाऱ्या संयद्वामत्वादि व सत्यकामत्वादि दुसऱ्या निश्चित ब्रह्मधर्मांमध्यें ल्यावा-

त्यांत तो संचारित करावा-त्यांत त्याची योजना करावी. [-" अहोपण, त्यांतहि ब्रह्माला एकत्व असल्यामुळें परस्परांमध्यें त्यांचा उपसंहार कां होणार नाहीं?" अशी आशंका घेऊन आचार्य 'तेपु हि॰' इत्यादि भाष्यानें म्हणतात-]=कारण त्या धर्मांमध्यें उपास्य ब्रह्माला एकत्व जरी असलें तरी प्रकरणभेदामुळें उपासनेचा भेद झाला असतां अन्योन्यधर्मांची अन्योन्य उपासनांमध्यें प्राप्ति होत नाहीं. [ ध्यानासाठीं सांगितलेले जे धर्म ते विधीच्या अधीन असल्यामुळें जेथें जितक्या गुणांनीं विशिष्ट अशी उपासना सांगितली जाते तेथें तेवढ्याच गुणांना ध्येयत्व असतें. इतर अनुक्त धर्मांना तेथें ध्येयत्व नसतें, त्यामुळें परस्परांमध्यें त्यांचा उपसंहार होत नाहीं, असा भावार्थ.-" पण उपास्य एक असतांना उपासनाभेद किंवा धर्मभेद कसा संभवतो ?" 'यथा च॰' इत्यादि भाष्यानें उत्तर-]

**भाष्यं—यथा च द्वे नार्यावेकं नृपतिमुपासाते छत्रेणान्या चामरेणान्या । तत्रोपास्यैकत्वेऽप्युपासनाभेदो धर्मव्यवस्था च भवति । एवमिहापीति । उपचितापचितगुणत्वं हि सति भेदव्यवहारे सगुणे ब्रह्मण्युपपद्यते न निर्गुणे परस्मिन्ब्रह्मणि । अतो न सत्यकामत्वादीनां धर्माणां क्वचिच्छ्रुतानां सर्वत्र प्राप्तिरित्यर्थः ॥१२॥**

**भाष्यार्थ**—ज्याप्रमाणें " दोन स्त्रिया एका राजाची उपासना करितात. एक छत्रानें व दुसरी चामरानें " या उदाहरणांत उपास्य राजाला जरी एकत्व असलें तरी उपासनाभेद व धर्मव्यवस्था आहे, तसेंच येथेंहि होतें, असें समजावें. [ या भाष्यांतील शेवटचा 'इति' हा शब्द विधीच्या अधीन असलेल्या धर्मांमध्यें विधीचें उल्लंघन करून संकर होत नाहीं, असा उपसंहार करण्यासाठीं आहे.-" सगुणाप्रमाणें निर्गुणामध्येंहि ब्रह्मत्व समान असल्यामुळें उपसंहार व अनुपसंहार अशी व्यवस्था कां नसावी ?" 'उपचितापचित॰' इत्यादि भाष्यानें उत्तर-]=कारण उपचितगुणत्व व अपचितगुणत्व भेदव्यवहार असतांना सगुण ब्रह्मामध्यें उपपन्न होतें. निर्गुण पर ब्रह्मामध्यें तें उपपन्न होत नाहीं. [-याप्रमाणें सगुण व निर्गुण यांतील वैषम्य सांगून सूत्रांतील विवक्षित अर्थ सांगणारे आचार्य 'अतो न॰'

---

१ **रत्नप्रभा**—प्रियशिरस्त्वादिकांना ज्ञेयत्व नसल्यामुळें ज्ञेय ब्रह्मामध्यें त्यांची प्राप्ति नाहीं. 'ज्ञेय ब्रह्मामध्यें बाह्य धर्मांचा कांहीं उपयोग नाहीं, त्यामुळें त्यांत त्यांची अप्राप्ति आहे' असा न्याय असल्यामुळें संयद्वामादिकांची त्यांत अप्राप्ति आहे, असें सूत्राचें व्याख्यान करावें. ज्ञानामध्यें त्या धर्मांचा कांहीं उपयोग जरी नसला तरी ध्यानांत त्याचा उपयोग आहे व उपास्य ब्रह्माला एकत्व आहे. त्यामुळें त्यांची अन्योन्य विद्यांमध्यें प्राप्ति होईल, अशी शंका.

इत्यादि भाष्यानें उपसंहार करितात-]=यास्तव क्वचित्-एखाद्या शाखेंत श्रुत असलेल्या सत्यकामत्वादिधर्मांची सर्वत्र प्राप्ति होत नाहीं, असा भावार्थ. १२.[-आनंदादि वस्तुधर्मांना ब्रह्मतत्त्वज्ञानोपयोगित्व असल्यामुळे जेथें जेथें ज्ञेय ब्रह्म सांगितलें जातें तेथें तेथें आनंदादिकांची प्राप्ति होते, असा विधीच्या अधीन असलेल्या सत्यकामत्वादिकांहून त्यांचा विशेष 'इतरे तु०' इत्यादि सूत्रानें सांगतात--]

**सूत्रं--इतरे त्वर्थसामान्यात् ॥१३॥(६)**

**सूत्रार्थ**—पण आनंदादि 'इतर' धर्म अर्थाच्या-प्रतिपाद्य विषयाच्या सामान्यामुळें-एकत्वामुळें सर्वत्र उपसंहर्तव्य आहेत. १३. (६)-सु. ब्र. ३१५. [-'**इतरे तु०**'-इत्यादि भाष्यानें सूत्रोक्त विशेष व्यक्त करितात-]

**भाष्यं—इतरे त्वानंदादयो धर्मा ब्रह्मस्वरूपप्रतिपादनायैव उच्यमाना अर्थसामान्यात्प्रतिपाद्यस्य ब्रह्मणो धर्मिण एकत्वात्सर्वे सर्वत्र प्रतीयेरन्निति वैषम्यं। प्रतिपत्तिमात्रप्रयोजना हि ते इति ॥१३॥ (६)**

**भाष्यार्थ**—'पण' ब्रह्मस्वरूपाचें प्रतिपादन करण्यासाठींच सांगितले जाणारे आनंदादि 'इतर' सर्व धर्म 'अर्थसामान्यामुळें'-प्रतिपाद्य जें धर्मी ब्रह्म त्याला एकत्व असल्यामुळें सर्वत्र प्रतीत होतील, असें आनंदादिकांत सत्यकामत्वादिकांहून वैषम्य-असाम्य आहे. [-'**प्रतिपत्तिमात्र०**' इत्यादि भाष्यानें ब्रह्मस्वरूपाच्या सिद्धीसाठीं सांगितले जाणें, हाच आनंदादिकांचा वैषम्यार्थ सांगतात-]= **कारण** ते प्रतिपत्तिमात्रप्रयोजन आहेत. ब्रह्मज्ञान हेंच त्यांचें प्रयोजन आहे,'**इति**'-सत्यत्व,ज्ञानत्व,आनंदत्व,आत्मत्व व पूर्णत्व या स्वरूपाच्या पांच पदार्थांचा ज्ञानाधिकारांत सर्वत्र उपसंहार करावा, असें सांगण्यासाठीं हा 'इति-'शब्द आहे. १३. (६)

**( ७. आध्यानाधिकरण. सू. १४-१५ )**

-ब्रह्मस्वभावभूत उपसंहार्य धर्म सांगितल्यानंतर अनुपसंहार्य असलेल्याहि अर्थादिपरत्वरूप धर्मांचें ब्रह्मज्ञानोपायत्व '**आध्यानाय०**' इत्यादि सूत्रानें सांगतात-

**सूत्रं--आध्यानाय प्रयोजनाभावात् ॥१४**

**सूत्रार्थ**—'इन्द्रियेभ्यः परा ह्यर्थाः०' इत्यादि काठकवाक्यांत पुरुषच अर्थादि सर्वांहून पर आहे असें ध्यानासाठीं प्रतिपादन केलें जातें. त्यांतील प्रत्येकाचें परत्व प्रतिपादिलें जात नाहीं. कारण 'इतरांच्या परत्वज्ञानामध्यें प्रयोजनाचा अभाव आहे.' १४.-सु.ब्र.३१७. [-'**काठके हि०**' इत्यादि भाष्यानें विषयवाक्य पढतात-]

**भाष्यं—काठके हि पठ्यते—' इंद्रियेभ्यः परा ह्यर्था अर्थेभ्यश्च परं मनः। मनसस्तु परा बुद्धिः' इत्यारभ्य 'पुरुषान्न परं किंचित्सा काष्ठा सा परा गतिः'**

इति। तत्र संशयः–किमिमे सर्व एवार्थादयः ततस्ततः परत्वेन प्रतिपाद्यन्ते उत पुरुष एवैभ्यः सर्वेभ्यः परः प्रतिपाद्यत इति॥

भाष्यार्थ—सुप्रसिद्ध काठकांत " इन्द्रियांहून अर्थ पर, अर्थांहून मन पर, मनाहून बुद्धि पर " असा आरंभ करून " पुरुषाहून पर कांहीं नाहीं. पुरुष ही काष्ठा–सीमा व ती परा गति आहे "–का. ३. १०. ११–असें पठित आहे. [–वाक्यभेद व अभेद यांच्या अनिश्चयानें अर्थादिकांविषयीं संशय–]=' तत्र० ' त्याविषयीं ' काय, हे सर्वच अर्थादिक पूर्व पूर्व पदार्थांहून परत्वानें प्रतिपादिले जातात कीं एक पुरुषच त्या सर्वांहून परत्वानें प्रतिपादिला जातो ' असा संशय येतो. [विद्येचा भेद व अभेद यांच्या प्रसंगानें वाक्यभेद व अभेद यांच्या किंवा तन्मूलक विद्याभेद व अभेद यांच्या विचारानें वाक्यार्थज्ञानहेतूचेंच येथें प्रतिपादन केलेलें असल्यामुळें या अधिकरणाच्या पादादिसंगति आहेत.–पूर्वपक्षांत 'वाक्यभेदामुळें विद्याभेद' व सिद्धान्तांत 'वाक्याच्या ऐक्यामुळें विद्येचा अभेद ' मानून –' तत्र तावत्० ' इत्यादि पूर्वपक्ष–]

भाष्यं—तत्र तावत्सर्वेषामेवैषां परत्वेन प्रतिपादनमिति भवति मतिः। तथा हि श्रूयते—' इदमस्मात्परमिदमस्मात्परम्' इति। ननु बहुष्वर्थेषु परत्वेन प्रतिपिपादयिषितेषु वाक्यभेदः स्यात्। नैष दोषः। वाक्यबहुत्वोपपत्तेः। बहून्येव ह्येतानि वाक्यानि प्रभवन्ति बहूनर्थान्परत्वोपेतान्प्रतिपादयितुम्। तस्मात्प्रत्येकमेषां परत्वप्रतिपादनमिति॥

भाष्यार्थ—असा संशय आला असतां अगोदर या वाक्यांतील अर्थादि सर्वांचेंच परत्वानें प्रतिपादन केलें जातें, अशी बुद्धि होते. [–त्याविषयीं हेतु सांगतात–] ='तथा०'–कारण त्यांत तसें–'हें याहून पर, हें याहून पर' असें श्रुत आहे.[–या पूर्वपक्षावर ' ननु०' इत्यादि भाष्यानें आक्षेप–]='अहोपण, अनेक पदार्थ जर येथें परत्वानें प्रतिपादन करण्यास इष्ट असतील तर वाक्यभेद होईल–तीं तितकीं भिन्न भिन्न वाक्यें होतील!' [पण जेथें एकवाक्यत्व संभवत असेल तेथें वाक्यभेद हा दोष होतो.–पण येथें वाक्यभेदच आहे, असें पूर्ववादी समाधान करितो–] =' नैष दोषः०'–हा दोष येत नाहीं, कारण या प्रस्तुतवाक्यांत वाक्यबहुत्वच उपपन्न होतें. [–वादी 'बहूनि०' इत्यादि भाष्यानें उपपत्तिच सांगतो–]=कारण हीं वाक्यें बहु–अनेकच आहेत. तीं परत्व या धर्मानें युक्त असलेल्या अनेक अर्थांचें प्रतिपादन करण्यास समर्थ आहेत. [–" अहोपण, त्या सर्वांतील प्रत्येकाची परत्वोक्ति–प्रत्येकाचें परत्वकथन निष्फल आहे " अशी आशंका घेऊन

'दश मन्वन्तराणीह तिष्ठन्तीन्द्रियचिन्तकाः'–"इंद्रियांचें ध्यान–चिंतन–उपासन करणारे येथें दहा मन्वन्तरें राहतात" अशी स्मृति असल्यामुळें, ध्यानद्वारा प्रत्येकाच्या परत्वकथनाच्या सफलत्वाची सिद्धि होत असल्यामुळें व अपूर्वत्वानें प्रमाणसिद्ध असलेल्या वाक्यभेदाला इष्टत्व असल्यामुळें–तो अभीष्ट असल्यामुळें अर्थादिकांतील प्रत्येकाचें परत्व प्रतिपाद्य आहे, असा '**तस्मात्०**' इत्यादि भाष्यानें पूर्वपक्षाचा उपसंहार–]=म्हणून येथें यांतील प्रत्येकाचें परत्व प्रतिपादन केलें आहे, '**इति**'–असें प्राप्त होतें. [–'**एवं०**' इत्यादि भाष्यानें पूर्वपक्षाचा अनुवाद करून सूत्राच्या बाहेरच सिद्धान्ताची प्रतिज्ञा करितात–]

**भाष्यं—एवं प्राप्ते ब्रूमः—पुरुष एव ह्येभ्यः सर्वेभ्यः परः प्रतिपाद्यत इति युक्तं। न प्रत्येकमेषां परत्वप्रतिपादनम्। कस्मात्। प्रयोजनाभावात्। न हीतरेषु परत्वेन प्रतिपन्नेषु किंचित्प्रयोजनं दृश्यते श्रूयते वा। पुरुषे त्विंद्रियादिभ्यः परस्मिन्सर्वानर्थव्रातातीते प्रतिपन्ने दृश्यते प्रयोजनं मोक्षसिद्धिः। तथा च श्रुतिः–'निचाय्य तं मृत्युमुखात्प्रमुच्यते' इति॥**

**भाष्यार्थ**—असा पूर्वपक्ष प्राप्त झाला असतां आम्ही सिद्धान्त सांगतों–पुरुषच या सर्वांहून पर प्रतिपादिला जातो, असें समजणें युक्त आहे. यांतील प्रत्येकाचें परत्वप्रतिपादन युक्त नाहीं. [–"अहोपण शब्दशक्तीचा विषय असें जें पुरुषाचें परत्व त्याला जसें तात्पर्यगम्यत्व आहे त्याचप्रमाणें अर्थादिपरत्वांनाहि शक्तिविषयत्व व अपूर्वत्व असल्यामुळें तात्पर्यमेयत्व कां नसेल?" अशी शंका–] '**कस्मात्**'–कोणत्या कारणानें? [–तात्पर्यमेयत्वनिमित्त फलाच्या अभावामुळें अर्थादिपरत्वांना तात्पर्यमेयत्व नाहीं, असें मानून आचार्य म्हणतात–]='**प्रयोजनाभावात्०**'–प्रयोजनाच्या अभावामुळें. [–"पण प्रयोजनाचा–फलाचा अभाव कसा सांगतां?" अशी आशंका घेऊन 'त्याचें फल अन्वय-व्यतिरेकसिद्ध आहे कीं शास्त्रसिद्ध आहे?' असा विकल्प करून त्यांतील पहिल्या पक्षाचें निराकरण–]='**न हि इतरेषु०**'–कारण पुरुषाहून इतर असे जे अर्थ, मन, बुद्धि इत्यादि पदार्थ त्यांना परत्वानें जाणलें असतां कांहीं प्रयोजन–फल दृष्ट नाहीं. [–दुसऱ्या पक्षाचें निरसन–]='**श्रूयते वा**'–किंवा श्रुत नाहीं. [या प्रकरणाला वस्तुपरत्व असलेलें दिसतें. त्यामुळें त्याचें उपासनाविधिपरत्व संभवत नाहीं, त्याचप्रमाणें त्याला परमपुरुषार्थाचें साधन जें तत्त्वज्ञान तत्परत्व संभवतें म्हणून इंद्रियादिकांच्या उपासनेच्या अधीन असलेल्या स्मृतिसिद्ध अवान्तर पुरुषार्थपरत्वाचा संभव असल्यामुळें या वाक्याच्या अर्थादि प्रत्येक पदार्थपरत्वाची

सिद्धि होत नाहीं, असा भावार्थ.—" पण 'पुरुषाचें सर्वपरत्वज्ञानहि सफल नाहीं. कारण तेंहि परत्वज्ञान आहे. अर्थादिपरत्वज्ञानाप्रमाणे' असें अनुमान होत असल्यामुळें तुझ्या मतींहि पुरुषार्थहेतुपरत्व कसें ?" अशी आशंका घेऊन 'पुरुषपरत्वदृष्टीचा अर्थशून्यतेनें उपलक्षित होणारा अनवच्छिन्न-अखंड चिद्धातु हा विषय असल्यामुळें पुरुषपरत्वदृष्टीचें अनर्थध्वंस हें फल अनुभवसिद्ध आहे,' असें 'पुरुषे तु०' इत्यादि भाष्यानें सांगतात-]=पण इंद्रियादिकांहून पर सर्व अनर्थसमूहातीत पुरुषाचें ज्ञान झालें असतां मोक्षसिद्धि हें फल साक्षात् अनुभवास येतें. [अज्ञान व मिथ्याज्ञान यांची शांति हें दृष्टफल प्रत्यक्ष असल्यामुळें अदृष्टफलाची कल्पना करणें अयुक्त आहे, असें मानून भाष्यांत 'दृश्यते' असें म्हटलें आहे.—पण विद्वदनुभवाविषयीं साशंक असलेल्या वादाला उद्देशून पुरुषपरत्वदृष्टीच्या दृष्टफलत्वाविषयीं 'तथा च०' इत्यादि भाष्यानें श्रुति सांगतात-]=आणि तशी "त्या आत्मतत्त्वाला-ब्रह्माला साक्षात् जाणून मृत्युमुखापासून पूर्णपणें मुक्त होतो."—का. १.३.१५-अशी श्रुति आहे. [-आणि याहि कारणानें या प्रकृत श्रुतिसंदर्भाला सर्वांहून परत्वानें पुरुषज्ञानपरत्व आहे, असें 'अपि च०' इत्यादि भाष्यानें सांगतात-]

**भाष्यं—अपि च परप्रतिषेधेन काष्ठाशब्देन च पुरुषविषयमादरं दर्शयन्पुरुषप्रतिपत्त्यर्थैव पूर्वापरप्रवाहोक्तिरिति दर्शयति—आध्यानायेति। आध्यानपूर्वकाय सम्यग्दर्शनायेत्यर्थः। सम्यग्दर्शनार्थमेव हीह आध्यानमुपदिश्यते न त्वाध्यानमेव स्वप्रधानम् ॥१४॥**

**भाष्यार्थ—**शिवाय 'पुरुषाहून पर कांहीं नाहीं' अशा परप्रतिषेधानें-परप्रतिषेध या लिंगानें व 'ती काष्ठा व तीच परा गति' असें काष्ठाशब्दानें बाधाच्या अवधित्वानें परत्वकथन करणें, या लिंगानें पुरुषविषय आदर-पुरुषांतच या ग्रंथाचें तात्पर्य आहे, असें दाखविणारा वेद पुरुषाच्या ज्ञानासाठींच 'आध्यानाकरितां' ही पूर्वापरप्रवाहोक्ति-पूर्व पूर्व पदार्थाहून पुढील पदार्थाचें परत्वकथन आहे, असें दाखवितो. [-" अहोपण, येथें ध्यानाचा विधि नाहीं. तेव्हां परपुरुषज्ञानाचें ध्यानार्थत्व कसें सूत्रित केलें आहे!" अशी आशंका घेऊन 'आध्यानाय' या सूत्रावयवाचें व्याख्यान-]='आध्यानपूर्वकाय०'-ध्यानपूर्वक सम्यग्दर्शनासाठीं, असा भावार्थ. [आध्यान म्ह० आसमंतात् ध्यान, आध्यानपूर्वक तत्त्वज्ञान व्हावें, यासाठीं येथील पूर्वापरप्रवाहोक्ति आहे,-" अहोपण, 'निर्गुणब्रह्मज्ञानहि ध्यानासाठींच आहे,'कारण त्याला ब्रह्मज्ञानत्व आहे, सगुणब्रह्मज्ञानाप्रमाणें" अशी शंका घेऊन 'ततस्तु तं०' इत्यादि श्रुतीशीं विरोध सांगतात-]='सम्यग्दर्शनार्थं

एव '–कारण सम्यग्ज्ञानासाठींच–तत्त्वज्ञानासाठींच येथें आध्यानाचा उपदेश केला जातो. पण आध्यानच स्वप्राधान्यानें येथे उपदेशिलें जात नाहीं.[‘ततस्तु तं०’– “ त्याअर्थी सत्यादिसाधनसंपन्न व ज्यानें आपल्या इंद्रियांचा उपसंहार केला आहे, असा साधक एकाग्रमनानें चिंतन करूं लागला असतां त्या निष्कल–सर्व अवयव-भेदरहित आत्म्यास पाहतो, ”–मुं. ३.२.८–इत्यादि श्रुतिप्रामाण्यामुळे तत्त्वज्ञानार्थच ध्यानाचा उपदेश केला जातो. ध्यानच स्वप्रधान नाहीं, त्याला स्वतःचें प्राधान्य नाहीं, तें अंगी नव्हे, अंग आहे, असा भावार्थ.]१४.[–सर्वांहून परत्वानें येथें पुरुषालाच प्रतिपाद्यत्व आहे, याविषयी **‘आत्मशब्दाच’** या सूत्रानें हेत्वन्तर–]

**सूत्रं—आत्मशब्दाच्च ॥१५॥(७)**

**सूत्रार्थ**—‘एष गुढोत्मा’ असा प्रकृत पुरुषाला उद्देशून ‘आत्म-’शब्द श्रुत आहे. त्यामुळें हें वाक्य आत्मपरच आहे १५. (७) सु. ब्र. ३१७. [–सूत्रस्थ ‘च-’शब्दाचें **‘इतश्च०’** इत्यादि भाष्यानें व्याख्यान–]

**भाष्यं—इतश्च पुरुषप्रतिपत्त्यर्थैव इयं इंद्रियादिप्रवाहोक्तिः । यत्कारणं ‘एष सर्वेषु भूतेषु गूढोत्मा न प्रकाशते । दृश्यते त्वग्र्यया बुद्ध्या सूक्ष्मया सूक्ष्मदर्शिभिः’ इति प्रकृतं पुरुषमात्मेत्याह । अतश्चानात्मत्वमितरेषां विवक्षितमिति गम्यते । तस्यैव च दुर्विज्ञानतां संस्कृतमतिगम्यतां च दर्शयति ॥**

**भाष्यार्थ**—आणि याहि कारणानें पुरुषाच्या प्रतिपत्तीसाठींच–ब्रह्मज्ञानासाठींच ही इंद्रियादिप्रवाहोक्ति आहे. [–तेंच स्पष्ट करणारे भाष्यकार ‘आत्म-’शब्दाचें व्याख्यान करितात–]=**‘यत्कारणं०’**–कारण कीं, “ हा सर्वभूतांमध्यें गूढ असलेला आत्मा प्रकाश पावत नाहीं, व्यक्त होत नाहीं.” [–“आत्म्याचें अप्रकाशमानत्व स्वाभाविक आहे” अशी आशंका घेऊन **‘दृश्यते०’** इत्यादि वाक्यानें तिचें निवारण करितात–]=“ पण सूक्ष्मदर्शी लोकांकडून सूक्ष्म व अग्र्य बुद्धीनें तो पाहिला जातो ”–का. १. ३. १२–हीं श्रुति [–या श्रुतींतील ‘एष आत्मा’ याचा अर्थ सांगतात–]=**‘प्रकृतं०’**–प्रकृत पुरुषाला आत्मा असें म्हणते. [–सूत्रांतील पंचमीचा विवक्षित अर्थ सांगतात–]=**‘अतश्च०’**–आणि याप्रमाणें पुरुष आत्मा असल्यामुळें अर्थ, मन, बुद्धि इत्यादि इतरांचें अनात्मत्व श्रुतीला विवक्षित आहे, असें ज्ञात होतें [–श्रुतींतील अवशिष्ट राहिलेल्या पूर्वार्धाचा अर्थ सांगतात–]=**‘तस्य एव०’**–आणि त्या आत्म्याचेंच दुर्ज्ञानत्व [–उत्तरार्धाचें तात्पर्य–]=**‘संस्कृतमति०’** –व संस्कृतबुद्धीचें विषयत्व श्रुति दाखविते. [–‘च-’शब्दानें सुचविलेलें हेत्वंतर **‘तद्विज्ञानायैव०’** इत्यादि भाष्यानें सांगतात—]

**भाष्यं—तद्विज्ञानायैव च 'यच्छेद्वाङ्मनसी प्राज्ञः' इत्याध्यानं विदधाति । तद्व्याख्यातं 'आनुमानिकमप्येकेषाम्' इत्यत्र । एवमनेकप्रकार आशयातिशयः श्रुतेः पुरुषे लक्ष्यते नेतरेषु ॥**

**भाष्यार्थ**—आणि त्या पुरुषाख्य आत्म्याच्या विज्ञानासाठींच श्रुति "प्राज्ञानें वाक्-इन्द्रियाचें मनांत नियमन करावें"—का. १. ३. १३—असें आध्यानाचें विधान करिते. [—"अहोपण, या मंत्रांत वागादिकांचें केवळ नियमनच प्रतीत होतें. ध्यानविधि प्रतीत होत नाहीं," अशी आशंका घेऊन आचार्य म्हणतात—]='**तद्व्याख्यातं०**'—'आनुमानिकं०' इत्यादि सूत्रांत—ब्र. सू. भा. १. ४. १. पृ. ६८२—त्याचें व्याख्यान केलें आहे. [ अज्ञात अर्थाचें ज्ञान करून देणें, हा आगमाचा स्वभाव आहे, आत्म्याचें दुर्ज्ञानत्व श्रुतीनेंच सांगितलें आहे, आत्मा वस्तुतः दुर्ज्ञेय आहे व अर्थादिकांना सुगमत्व आहे. म्हणून अर्थादिकांची परत्वोक्तिहि आत्मज्ञानपरच आहे, अशा आशयानें '**एवं०**' इत्यादि भाष्यानें उपसंहार करितात—] =याप्रमाणें श्रुतीचा अनेक प्रकारचा आशयातिशय—आशयाचें आधिक्य पुरुषामध्यें प्रतीत होतें. अर्थादि पुरुषेतर पदार्थांमध्यें श्रुतीचा अभिप्राय प्रतीत होत नाहीं. [—उपक्रम व उपसंहार यांच्या एकरूपत्वावरूनहि पुरुषाच्या परत्वामध्येंच ग्रंथाचें तात्पर्य सिद्ध झालें आहे, असें '**अपि च०**' इत्यादि भाष्यानें सांगतात—]

**भाष्यं—अपि च 'सोऽध्वनः पारमाप्नोति तद्विष्णोः परमं पदम्' इत्युक्ते किं तदध्वनः पारं विष्णोः परमं पदमित्यस्यामाकांक्षायां इंद्रियाद्यनुक्रमणात्परमपदप्रतिपत्त्यर्थ एवायमाम्नाय इत्यवसीयते ॥ १५ ॥ (७)**

**भाष्यार्थ**—शिवाय उपक्रमोपसंहारांच्या एकरूपत्वावरूनहि हेंच सिद्ध होतें. [—'तें विष्णूचें परम पद,' 'पुरुषाहून पर कांहीं नाहीं' अशा उपक्रमोपसंहारांच्या ऐकरूप्यावरून पुरुषाचें सर्वांहून सफल परत्व प्रतिपाद्य आहे, असें सिद्ध झालें असतां अवान्तर वाक्यांची त्यांच्याशीं एकवाक्यता होणें शक्य नाहीं. वाक्यभेदादिकांची कल्पना केल्यास गौरव दोष येतो. त्यामुळें या संदर्भाला परपुरुषपरत्वच आहे असें हेत्वंतरच '**सोऽध्वनः०**' इत्यादि वाक्यानें विशद करितात—] ="तो या संसारमार्गाच्या पार असलेल्या त्या व्यापक परमात्म्याच्या परम पदास प्राप्त होतो"—का. १. ३. ९—असें सांगितलें असतां [—पुरुषालाच जिज्ञासितत्व असल्यामुळें प्रमेयत्व—ज्ञेयत्व आहे, असें '**किं तत्०**' इत्यादि भाष्यानें सांगतात—] =व तें मार्गाच्या पार असलेलें विष्णूचें परम पद काय आहे, अशी ही आकांक्षा —जिज्ञासा झाली असतां [—विषयांना इंद्रियाकर्षकत्व आहे, ते इन्द्रियांचें आक-

र्षण करणारे आहेत, त्यामुळें त्यांना जसें परत्व आहे, त्याप्रमाणें आत्म्यामध्यें सर्व नियम्य पदार्थांच्या आकर्षकत्वानें परत्व निश्चित आहे, असें मानून आचार्य 'इंद्रियादि०' इत्यादि म्हणतात–]=इन्द्रियादिकांपासून उपक्रम केलेला असल्यामुळें परमपदाच्या ज्ञानासाठींच हा आम्नाय–ग्रंथ आहे, असा निश्चय होतो. १५.(७)

( ८. आत्मगृहीत्यधिकरण. सू. १६-१७. )

–वाक्यभेदाच्या भयानें अर्थादिकांच्या पृथक् प्रतिपाद्यत्वाचें प्रत्याख्यान केलें असतां देवादिकर्तृत्वानें प्रकृत असलेल्या अपर ब्रह्माहून अन्य लोकस्रष्टा मानणें वाक्यभेदप्रसंगामुळेंच उचित नाहीं, अशी आशंका घेऊन सूत्रकार '**आत्म-गृहीतिः०**' इत्यादि म्हणतात–

## सूत्रं—आत्मगृहीतिरितरवदुत्तरात् ॥ १६

**सूत्रार्थ**—'आत्मा वै०' इत्यादि ऐतरेयगत सृष्टिवाक्यांतील 'आत्म-'शब्दानें परमात्म्याचेंच ग्रहण करावें. इतर वाक्यांतील आत्मशब्दाप्रमाणें. 'उत्तरात्'– 'स ईक्षत' इत्यादि पुढील विशेषणावरून. १६.–सु. ब्र. ३१९. [–'**ऐतरे-यके०**' इत्यादि भाष्यानें विषयवाक्य सांगतात–]

**भाष्यं**—ऐतरेयके श्रूयते–'**आत्मा वा इदमेक एवाग्र आसीन्नान्यत्किंचिन मिषत्स ईक्षत लोकान्नु सृजा इति स इमाँल्लोकानसृजतांभो मरीचीर्मरमापः**' **इत्यादि। तत्र संशयः–किं पर एवात्मा इहात्मशब्देनाभिलिप्यते उतान्यः कश्चिदिति**

**भाष्यार्थ**—ऐतरेयकांत "सृष्टीच्या पूर्वी हें सर्व एकच आत्माच होतें. सव्यापार किंवा निर्व्यापार असें दुसरें कांहींहि नव्हतें. तो आत्मा 'मी आतां लोकांना उत्पन्न करितों' असें ईक्षण करिता झाला. तो अंभ, मरीची, मर व आप् या लोकांस उत्पन्न करिता झाला."–ऐ. १. सु. उ. पृ. २६०-६१–इत्यादि श्रुत आहे. [–'आत्म-'शब्दाचा पर ब्रह्म व हिरण्यगर्भ–सूत्रात्मा या दोन्हीं अर्थी प्रयोग होत असल्यामुळें त्या शब्दाला विषय करून म्ह० त्याविषयीं संशय–] =' **तत्र०**'–त्याविषयीं येथें पर आत्माच आत्मशब्दानें सांगितला जातो किंवा दुसरा कोणी ? असा संशय येतो. [–वाक्यार्थज्ञानाला उपयुक्त असलेल्या आत्म-शब्दाच्या परमात्मविषयत्वकथनानें आत्मज्ञानाच्या उपयोगी असलेल्या सत्यत्वा-दिकांच्या उपसंहाराची सिद्धि होत असल्यामुळें या अधिकरणाच्या पादादिसंगति आहेत. पूर्वपक्षांत 'आत्मशब्दाला अपर ब्रह्मविषयत्व आहे. त्यामुळें त्याच्या अर्थाच्या ज्ञानासाठीं सत्यादिकांचा अनुपसंहार' व सिद्धान्तांत 'त्या शब्दाला

परविषयत्व आहे. म्हणून त्याच्या ज्ञानासाठीं सत्यादिकांचा उपसंहार ' अशा आशयानें विमर्शपूर्वक पूर्वपक्ष-]

**भाष्यं—किं तावत्प्राप्तं । न परमात्मेहात्मशब्दाभिलप्यो भवितुमर्हतीति । कस्मात् । वाक्यान्वयदर्शनात् । ननु वाक्यान्वयः सुतरां परमात्मविषयो दृश्यते। प्रागुत्पत्तेरात्मैकत्वावधारणात्। ईक्षणपूर्वकस्रष्टृत्ववचनाच्च। नेत्युच्यते। लोकसृष्टिवचनात्। परमात्मनि हि स्रष्टरि परिगृह्यमाणे महाभूतसृष्टिरादौ वक्तव्या। लोकसृष्टिस्त्विह आदावुच्यते। लोकाश्च महाभूतसंनिवेशविशेषाः ॥**

**भाष्यार्थ**—या दोन पक्षांतील प्रथम कोणता बरें पक्ष प्राप्त होतो? 'येथें परमात्मा 'आत्म-'शब्दानें अभिलप्य—वाच्य होण्यास योग्य नाहीं' असें प्राप्त होतें. [—"अहोपण परमात्मा परशब्दवाच्य जसा आहे तसाच आत्मशब्दवाच्यहि होईल" अशी शंका—]=**'कस्मात्'**—कोणत्या कारणानें परमात्मा आत्मशब्दवाच्य नाहीं ? [—आत्मविषयवाक्याचें सूत्रांत—हिरण्यगर्भाख्य सूत्रात्म्यांत तात्पर्य असल्यामुळें येथें सूत्रात्मविद्या अभीष्ट आहे.त्यामुळें गुणोपसंहार नाहीं, असें वादी म्हणतो—] **'वाक्यान्वयदर्शनात्'**—वाक्यान्वयाच्या दर्शनामुळें. [—**'ननु०'** इत्यादि भाष्यानें पूर्वपक्षावर आक्षेप—]=अहोपण, वाक्यान्वय परमात्मविषय असल्याचा अनुभव फारच चांगल्या प्रकारें येतो. [—भाष्यांत 'सुतरां' असें जें म्हटलें आहे तेंच आक्षेपक हेतुद्वयकथनानें प्रकट करितो—]=**'प्रागुत्पत्तेः०'**—उत्पत्तीच्या पूर्वी आत्म्याच्या एकत्वाचें अवधारण केलेलें असल्यामुळें व ईक्षणपूर्वक स्रष्टृत्व कथन केलेलें असल्यामुळें परमात्मविषय वाक्यान्वय चांगल्याप्रकारें उपलब्ध होतो. [—पण लोकस्रष्टृत्व या लिंगावरून वाक्यान्वय सूत्रविषय आहे, परमात्मविषय नाहीं, असें पूर्ववादी **'न०'** इत्यादि भाष्यानें सांगतो—]=याचें 'नाहीं' असें उत्तर सांगितलें जातें. कारण 'त्या आत्म्यानें लोकांना उत्पन्न केलें' असें लोकसृष्टिवचन आहे. [—" अहोपण, सर्वकारणत्वामुळें परमात्म्यालाहि लोकस्रष्टृत्व आहे" अशी लिंगाच्या अन्यथासिद्धीची आशंका घेऊन वादी **'परमात्मनि०'** इत्यादि भाष्यानें सांगतो—]=कारण येथें परमात्मा जर स्रष्टा स्वीकारलेला असता तर महाभूतांची सृष्टि आरंभीं सांगितली असती. [ कारण परमात्मा या स्रष्ट्याचें ग्रहण केल्यावर प्रथम महाभूतसृष्टि सांगणेंच उचित आहे.]=**' लोकसृष्टिः० '**—पण येथें—या प्रकृत विषयवाक्यांत आरंभीं लोकसृष्टि सांगितली जाते. [ परमात्मकर्तृक सृष्टीला आकाशादि महाभूतादित्व आहे, परमात्म्यानें केलेल्या सृष्टीचा आरंभ आकाशादि महाभूतांपासून होतो. पण ऐतरेयवाक्यांत सांगितलेली सृष्टि तशी नाहीं. म्हणजे तिचा

आरंभ महाभूतांपासून झालेला दिसत नाहीं व हिरण्यगर्भाख्य सूत्रात्म्याचें लोक-कर्तृत्व श्रुति-स्मृतिसिद्ध आहे. त्यामुळें येथें परमात्म्याचें ग्रहण करितां येत नाहीं, असा भावार्थ.–" अहोपण, या ऐतरेयवाक्यांत 'लोक-'शब्दानें महाभूतांचेंच कथन केलेलें असल्यामुळें येथील सृष्टीचेंहि महाभूतादित्व इष्ट आहे." अशी आशंका घेऊन वादी 'लोकाश्च०' इत्यादि भाष्यानें म्हणतो–]=आणि लोक हे महाभूतांचे रचनाविशेष-आकारभेद आहेत. [–" अहोपण, 'लोक' हा शब्द महाभूतसंनिवेशविशेष या अर्थी जरी रूढ असला तरी प्रकरणावरून येथें ते लोक म्ह० महाभूतेंच ग्रहण केलीं जातील!" अशी आशंका घेऊन वादी 'तथा च०' इत्यादि भाष्यानें म्हणतो–]

**भाष्यं—तथा च अंभःप्रभृतीँल्लोकत्वेनैव निर्ब्रवीति–'अदोऽम्भः परेण दिवम्' इत्यादिना। लोकसृष्टिश्च परमेश्वराधिष्ठितेनापरेण केनचिदीश्वरेण क्रियते इति श्रुतिस्मृत्योरुपलभ्यते। तथा हि श्रुतिर्भवति–'आत्मैवेदमग्र आसीत्पुरुषविधः' इत्याद्या। स्मृतिरपि "स वै शरीरी प्रथमः स वै पुरुष उच्यते। आदिकर्ता स भूतानां ब्रह्माग्रे समवर्तत" इति॥**

**भाष्यार्थ**—आणि श्रुति तसा 'अदः अंभः परेण दिवं'–इत्यादि वाक्यानें अंभःप्रभृतींचा लोकत्वानेंच निर्वचन–निर्देश करिते. ['अंभः मरीचीः मरं आपः' असें सूत्रित करून श्रुति स्वतःच त्याचें विवरण करिते–'अदः अंभः'–हा तो अंभोलोक की जो 'परेण दिवं'–द्युलोकाच्या पलीकडे 'द्यौः'–द्युप्रतिष्ठ आहे. द्युलोकापासून पुढील–वरचे वरचे लोक चन्द्रसंबंधी जलांनीं अभितः व्याप्त असल्यामुळें ते 'अंभः-'शब्दित आहेत असा भावार्थ. अन्तरिक्षलोक सूर्याच्या किरणांनीं व्याप्त असल्यामुळें मरीची लोक आहे. स्थानभेदामुळें श्रुतींत त्याचा बहुवचनी प्रयोग केला आहे. ज्यांत भूतें मरतात तो पृथिवीलोक 'मर' आहे. जे पृथिवीच्या खालीं असलेले पातालादि लोक तेच 'आप' होत. कारण त्या लोकांमध्यें जल-बाहुल्य आहे. 'आप-'शब्द स्त्रीलिंगी आहे. म्हणून विधेय जे आपलोक त्यांच्या अपेक्षेनें 'याः ताः आपः' असें पातालादि लोकांना येथें स्त्रीलिंगत्व आहे. भाष्यांतील 'इत्यादिना' येथील 'आदि-'पदानें 'द्यौः प्रतिष्ठा०' इत्यादि पुढील वाक्याचें ग्रहण केलें आहे.–'असें जरी असलें तरी परमात्माच त्यांचा स्रष्टा कां नाहीं?' वादी 'लोकसृष्टिश्च०' इत्यादि भाष्यानें उत्तर देतो–]=आणि लोकांची सृष्टि–उत्पत्ति परमेश्वरानें अधिष्ठित अशा दुसऱ्या कोणा ईश्वराकडून केली जाते, असें श्रुति-स्मृतींमध्यें उपलब्ध होतें. 'तथा हि श्रुतिः०'–कारण त्याविषयीं 'आत्मा

एव '–"हिरण्यगर्भच ' पुरुषविधः'–पुरुषाकार–मस्तक-हस्तादिमान् उत्पत्तीच्या पूर्वी हें सर्व जगत् होता," इत्यादि श्रुति व " तोच पहिला शरीरी व तोच पुरुष म्हटला जातो. तो भूतांचा–चराचर-स्थूल-सूक्ष्मकार्यांचा आदिकर्ता ब्रह्मा उत्पत्तीच्या पूर्वी होता " अशी स्मृतिहि आहे. [–लोकसृष्टि प्रजापतिकर्तृकच आहे, असें हें प्रकरणावरूनहि अवगत होतें, असें वादी ' ऐतरेयिणः० ' इत्यादि भाष्यानें सांगतो–]

**भाष्यं**––ऐतरेयिणोऽपि ' अथातो रेतसः सृष्टिः प्रजापते रेतो देवाः' इत्यत्र पूर्वस्मिन्प्रकरणे प्रजापतिकर्तृकां विचित्रां सृष्टिमामनन्ति । आत्मशब्दोऽपि तस्मिन्प्रयुज्यमानो दृश्यते– ' आत्मैवेदमग्र आसीत्पुरुषविधः ' इत्यत्र । एकत्वावधारणमपि प्रागुत्पत्तेः स्वविकारापेक्षमुपपद्यते । ईक्षणमपि तस्य चेतनत्वाभ्युपगमादुपपन्नम् ॥

**भाष्यार्थ**––ऐतरेयशाखाध्यायीहि ' अथ '–" नियम्य–निगमन करण्यास योग्य अशा जीव-जडसृष्टीच्या अनन्तर ' अतः '–नियन्तृसृष्टीवांचून नियम्यसृष्टि अकिंचित्कर असल्यामुळें रेताची सृष्टि [–' पण तें रेत काय आहे कीं ज्याची सृष्टि आतां इष्ट आहे ? ' अशी आशंका घेऊन श्रुति म्हणते–]=प्रजापतीचें रेत देव आहेत." [रेत म्ह० वीर्य, देव हें त्याचें कार्य असल्यामुळें त्यांना प्रजापतीचें रेत म्हटलें आहे.–' इत्यत्र० ' इत्यादि भाष्यानें वादी वाक्याचें तात्पर्य सांगतो–] =अशा या पूर्वप्रकरणांत ऐतरेयशाखीय प्रजापतिकर्तृक विचित्र सृष्टि सांगतात. [–" उपक्रम व उपसंहार यांतील ' आत्मा ' व ' ब्रह्म ' या दोन श्रुतींनीं परमात्म्याचें ज्ञान होत असतांना लोकस्रष्टृत्वलिंगानें अपर ब्रह्माची सिद्धि कशी होईल ? कारण दोन श्रुतींहून लिंगाला दुर्बलत्व आहे," अशी आशंका घेऊन लिंगालाच प्राधान्य आहे, असें सांगण्यासाठीं वादी त्या दोन श्रुतींची अन्यथासिद्धि सांगतो–]=' आत्म-'शब्दहि ' पुरुषविध आत्माच हें सर्व पूर्वी होता ' या वचनांत अपर ब्रह्मामध्यें योजिला जात असलेला–त्या शब्दाचा त्या अर्थी प्रयोग केलेला दिसतो. [–' ब्रह्मलोकः ' इत्यादि प्रयोगांत ब्रह्मशब्दाचाहि ' हिरण्यगर्भ ' या अर्थी प्रयोग केलेला दिसतो, असें सांगण्यासाठीं 'आत्मशब्दोऽपि ' येथील ' अपि ' हा शब्द आहे.–" पण ' एक एव ' अशा या एकत्वनिश्चयाचा प्रजापतीमध्यें संभव नसल्यामुळें येथील 'आत्म-'शब्द परमात्मवाचकच आहे " अशी आशंका घेऊन वादी ' एकत्व० ' इत्यादि भाष्यानें म्हणतो–]=हिरण्यगर्भाख्य अपर आत्म्याचें एकत्वावधारणहि उत्पत्तीच्या पूर्वी स्ववि-

कारांच्या अपेक्षेनें उपपन्न होतें. [-"अशा युक्तीनें अवधारणाचा संभव जरी असला तरी त्या अपर ब्रह्यामध्यें ईक्षणकर्तृत्वाचा असंभव असल्यामुळें येथील उक्ति परमात्म्याचीच आहे." अशी आशंका घेऊन वादी '**ईक्षणमपि०**' इत्यादि म्हणतो-]=अपर ब्रह्माच्या-हिरण्यगर्भाच्या चेतनत्वाचा अभ्युपगम केलेला असल्यामुळें त्याचें ईक्षणहि संभवतें. [-या प्रकरणांत परमात्म्यामध्यें असंभावित विशेषाची उपलब्धि होत असल्यामुळेंहि सूत्रात्म्यालाच येथें आत्मशब्दत्व आहे, असें वादी '**अपि च०**' इत्यादि भाष्यानें सांगतो-]

**भाष्यं—अपि च 'ताभ्यो गामानयत्ताभ्योऽश्वमानयत्ताभ्यः पुरुषमानयत्ता अब्रुवन्' इत्येवंजातीयको भूयान्व्यापारविशेषो लौकिकेषु विशेषवत्स्वात्मसु प्रसिद्ध इहानुगम्यते । तस्माद्विशेषवानेव कश्चिदिहात्मा स्यादिति ॥**

**भाष्यार्थ**—शिवाय याहि कारणानें येथील आत्मा हिरण्यगर्भ आहे. [-ईश्वर इंद्रियांच्या अग्न्यादि अधिष्ठात्री देवतांना वागादि-इंद्रियांसह उत्पन्न करिता झाला. त्या देवता त्या ईश्वरापाशीं भोगासाठीं शरीराची याचना करूं लागल्या. म्हणून तो स्रष्टा त्याच्यासाठीं यथाकर्म व यथाश्रुत-पूर्वकर्म व ज्ञान यांच्या अनुरोधानें गोशरीर, अश्वशरीर, पुरुषशरीर आणता झाला व त्यानंतर तो त्या देवतांस म्हणाला "तुम्ही या शरीरांतील आपापल्या नियत चक्षुरादि स्थानांत प्रवेश करा." वादी हेंच आतां '**ताभ्यः०**' इत्यादि श्रुतिवचनानें सांगतो-]="त्या देवतांसाठीं तो ईश्वर गायीचें शरीर आणता झाला, अश्वाचें शरीर आणता झाला, त्यांच्यासाठीं पुरुषाचें शरीर आणता झाला. तेव्हां त्या असें म्हणाल्या"-ऐ. २ सु. उ. २६४- [-वादी उक्त श्रुतीच्या अर्थाचें तात्पर्य सांगतो-]='**इत्येवं०**'-हा अशा प्रकारचा लौकिक विशेषवान् आत्म्यांमध्यें प्रसिद्ध असलेलाच पुष्कळसा व्यापारविशेष या स्रष्ट्या आत्म्यामध्यें अनुगत-ज्ञात होतो. [-याप्रमाणें लिंग व प्रकरण यांवरून सिद्ध झालेल्या अर्थाचा उपसंहार-]='**तस्मात्०**'-असें लिंग व प्रकरण असल्यामुळें विशेषानें युक्त असाच कोणी आत्मा येथील लोकस्रष्टा आहे,'**इति**'-असें प्राप्त होतें. [-'**एवं०**'इत्यादि भाष्यानें सिद्धान्तसूत्राला अवरण देऊन प्रतिज्ञेला व्यक्त करितात-]

**भाष्यं—एवं प्राप्ते ब्रूमः-पर एवात्मेह आत्मशब्देन गृह्यते । इतरवत् । यथेतरेषु सृष्टिश्रवणेषु 'तस्माद्वा एतस्मादात्मन आकाशः संभूतः' इत्येवमादिषु परस्यात्मनो ग्रहणम् । यथा चेतरस्मिँल्लौकिकात्मशब्दप्रयोगे प्रत्यगात्मैव मुख्य आत्मशब्देन गृह्यते । तथेहापि भवितुमर्हति ॥**

**भाष्यार्थ**—असा पूर्वपक्ष प्राप्त झाला असतां या उदाहृत वाक्यांतील आत्म-शब्दानें पर आत्म्याचेंच ग्रहण केलें जातें, असें आम्ही सांगतो. [-सूत्रांतील दृष्टान्त घेऊन त्याचें व्याख्यान करितात-]=**'इतरवत्'**-"त्या या सत्य-ज्ञानादि-लक्षण आत्म्यापासून आकाश उत्पन्न झालें"-तै. २. १.-इत्यादि इतर सृष्टि-श्रवणांमध्यें पर आत्म्याचें ग्रहण जसें केलें जातें [-त्या सूत्रोक्त दृष्टान्ताचीच दुसरी व्याख्या-]=**'यथा च०'**-आणि ज्याप्रमाणें इतर लौकिक आत्मशब्दप्रयोगा-मध्यें मुख्य प्रत्यगात्माच 'आत्म-'शब्दानें ग्रहण केला जातो, [परमात्म्याचेंच विश्व-स्रष्टृत्व, उत्पत्तीच्या पूर्वी एकत्व व आत्मत्व मुख्य आहे. त्याची अनुपपत्ति नस-तांना दुसऱ्या अपर ब्रह्माच्या मुख्य स्रष्टृत्वादिकांचें अनुमान करणें उचित नाहीं. कारण लोकसृष्टिवचनांतहि पूर्वसिद्धत्वानें महाभूतसृष्टीचें कथन करितां येणें शक्य आहे म्ह० तो महाभूतसृष्टिपूर्वक लोकांना उत्पन्न करिता झाला, असें श्रुतीचें व्याख्यान करावें, असें मानून आचार्य-**'तथा०'** इत्यादि भाष्यानें दार्ष्टान्तिक सांगतात-]=त्याचप्रमाणें येथें-या प्रकृतवाक्यांतहि आत्मशब्दानें परमात्मग्रहण करणें उचित आहे. [-'आत्मा' व 'ब्रह्म' या शब्दांच्या पूर्वोक्त अन्यथासिद्धीचें प्रत्याख्यान **'यत्र०'** इत्यादि भाष्यानें करितात—]

**भाष्यं—यत्र तु 'आत्मैवेदमग्र आसीत्' इत्येवमादौ 'पुरुषविधः' इत्येव-मादि विशेषणान्तरं श्रूयते। भवेत्तत्र विशेषवत आत्मनो ग्रहणम्। अत्र पुनः परमात्मग्रहणानुगुणमेव विशेषणमप्युत्तरमुपलभ्यते 'स ईक्षत लोकान्नु सृजा इति' 'स इमाँल्लोकानसृजत' इत्येवमादि। तस्मात्तस्यैव ग्रहणमिति न्याय्यम्॥१६**

**भाष्यार्थ**—पण 'हें सर्व पूर्वी आत्माच होतें'-बृ. १. ४. १-इत्यादि ज्या कांहीं प्रकरणांत **'पुरुषविधः'**-पुरुषाकार-शरीराकार, इत्यादि विशेषणान्तर श्रुत आहे तेथें विशेषवान् आत्म्याचें ग्रहण होईल. [-जेथें बाधक निमित्त असतें तेथें वाक्याला अन्यार्थत्व जरी प्राप्त होत असलें तरी प्रकृतवाक्यांत त्याचा-बाधकाचा अभाव आहे, इतकेंच नव्हे तर उलट साधक हेतुच विद्यमान आहे. म्ह० प्रस्तुत वाक्याला परमात्मविषयत्वच आहे, असें **'अत्र०'** इत्यादि भाष्यानें सांगतात-]=पण येथें परमात्म्याच्या ग्रहणाला अनुकूल असेंच "तो 'मी या सर्वाला उत्पन्न करितों' असा संकल्प-ईक्षण करून तो या लोकांना उत्पन्न करिता झाला" -ऐ.१.१.२-इत्यादि पुढें विशेषणहि उपलब्ध होतें. [-ईक्षणपूर्वक सृष्टि परमा-त्म्यामध्यें प्रसिद्ध आहे, असें झालें असतां **'तस्मात्०'** इत्यादि भाष्यानें फलित सांगतात-]=म्हणून येथें त्या परमात्म्याचेंच ग्रहण करणें, हें न्याय्य आहे. १६.

[–'**अन्वयात्०**' इत्यादि सूत्रानें पूर्वपक्षाच्या बीजाचा अनुवाद करून सूत्रकार त्याला दूषित करितात––]

**सूत्रं—अन्वयादिति चेत्स्यादवधारणात् ॥ १७ ॥ (८)**

**सूत्रार्थ**—पण हिरण्यगर्भामध्यें लोकसृष्टिवाक्याचा अन्वय होत असलेला दिसतो, त्यामुळें येथें परमात्मग्रहण नाहीं, असें जर म्हणशील तर 'आत्माच एकच' असें अवधारण–निर्धार–निश्चय केलेला असल्यामुळे येथें परमात्म्याचेंच ग्रहण करणें युक्त आहे. १७ (८)–सु. ब्र. पृ. ३१९.[–'**वाक्यान्वयदर्शनात्०**' इत्यादि भाष्यानें सूत्रांतील अनुवादभागाचा विभाग करितात––]

**भाष्यं—वाक्यान्वयदर्शनान्न परमात्मग्रहणमिति पुनर्यदुक्तं तत्परिहर्तव्यमिति । अत्रोच्यते–स्यादवधारणादिति । भवेदुपपन्नं परमात्मनो ग्रहणम् । कस्मात् । अवधारणात् । परमात्मग्रहणे हि प्रागुत्पत्तेः आत्मैकत्वावधारणमाञ्जसमवकल्पते । अन्यथा ह्यनाञ्जसं तत्परिकल्प्येत ॥**

**भाष्यार्थ**—पण वाक्यान्वयदर्शनामुळें येथें परमात्मग्रहण संभवत नाहीं, असें जें वर–पृ. २८३–म्हटलें आहे तें परिहार करण्यास योग्य आहे. म्हणून [–परिहाराला अवतरण देतात–]=**अत्र उच्यते०**'–या पूर्वपक्षबीजाचा 'स्यात् अवधारणात्' असा परिहार सांगितला जातो–[–'स्यात्' या सूत्रोक्तपदाला पूर्ण करून त्याचें व्याख्यान–]='**भवेत्०**'–परमात्म्याचें ग्रहण उपपन्न होईल. [–त्या विषयीं प्रश्नपूर्वक हेतु–]=कोणत्या कारणानें? 'अवधारणामुळें' [–अवधारणाचेंच विवरण–]='**परमात्मग्रहणे हि०**'–कारण परमात्म्याचें परिग्रहण–स्वीकार केला असतां उत्पत्तीच्या पूर्वीं आत्मैकत्वाचें जें 'एक एव' या शब्दानें अवधारण केलें आहे तें मुख्यवृत्तीनें उपपन्न होतें. [–'सूत्राचें–सूत्रात्म्या हिरण्यगर्भाचें जरी ग्रहण केलें तरी स्वविकाराच्या अपेक्षेनें तें अवधारण संभवेल' अशी आशंका घेऊन 'आंजसं'–साक्षात्–मुख्यवृत्तीनें, असें म्हटलें आहे. तेंच व्यतिरेकानें विशद करितात–] ='**अन्यथा हि०**'–'आत्म-'शब्दानें परमात्मपरिग्रह न करितां सूत्रात्मपरिग्रह केल्यास तें अवधारण अनांजस–अमुख्य कल्पिलें जाईल. [–'लोकस्रष्टृत्व' या लिंगावरून अपर ब्रह्माचें ग्रहण करणें युक्त आहे, असें जें वर–पृ. २८३–म्हटलें आहे, त्या विषयीं आचार्य '**लोकसृष्टिवचनं तु०**' या भाष्यानें म्हणतात–]

**भाष्यं—लोकसृष्टिवचनं तु श्रुत्यंतरप्रसिद्धमहाभूतसृष्ट्यनंतरमिति योजयिष्यामि । यथा 'तत्तेजोऽसृजत' इत्येतच्छ्रुत्यंतरप्रसिद्धवियद्वायुसृष्ट्यनंतरमिति अयूयुजं । एवमिहापि । श्रुत्यंतरप्रसिद्धो हि समानविषयो विशेषः श्रुत्यंतरेषूपसंहर्तव्यो भवति ॥**

**भाष्यार्थ**—पण या ऐतरेयवाक्यांत जें लोकसृष्टिवचन आहे त्याची मी "तैत्तिरीयादि श्रुत्यन्तरप्रसिद्ध महाभूतांच्या सृष्टीनंतर तो आत्मा 'अंभः, मरीचीः०' इत्यादि लोकांस उत्पन्न करिता झाला" अशी योजना करीन. [–त्याविषयीं दृष्टान्त–]='**यथा०**'–ज्याप्रमाणें 'तें सत् तेजाला उत्पन्न करितें झालें'–छां.६.२.३.अ. २ पृ. ४३८–असें हें वाक्य 'श्रुत्यन्तरप्रसिद्ध आकाश व वायु यांच्या सृष्टीनंतर तें सत् तेजाला उत्पन्न करितें झालें' असें मीं योजिलें त्याचप्रमाणें या ऐतरेयांतहि मी योजीन. [–" पण श्रुत्यन्तरप्रसिद्ध महाभूतसृष्टीचा उपसंहार करितां येणें अशक्य आहे. कारण त्यामुळें वाक्याची एकवाक्यता न होतां वाक्यभेद होतो," अशी आशंका घेऊन आचार्य '**श्रुत्यन्तर०**' इत्यादि भाष्यानें समाधान करितात–]=कारण श्रुत्यन्तरप्रसिद्ध समानविषय विशेष श्रुत्यन्तरांत उपसंहार करण्यास योग्य होतो. [ज्याचा विषय अभिन्न आहे असा एका श्रुतींतील विशेष दुसऱ्या श्रुतींत उपसंहार करण्यास योग्य असतो. कारण तैत्तिरीयादिवाक्य व ऐतरेयवाक्य हीं भिन्न वाक्यें नाहींत. सृष्टीच्या अनुवादानें त्या दोन्हीं वाक्यांना अविकृत ब्रह्मविषयत्व एकसारखेंच आहे, असा भावार्थ. –आतां व्यापारवान् आत्म्यांतील प्रसिद्ध व्यापारविशेषाचा येथें अनुगम–अनुवृत्ति होत असल्यामुळें "हा आत्मा विशेषवान्-च आहे" असें जें वर–पृ.२८६-म्हटलें आहे त्याविषयीं '**योऽप्ययं०**' इत्यादि भाष्यानें म्हणतात–]

**भाष्यं- योऽप्ययं व्यापारविशेषानुगमः'ताभ्यो गामानयत्'इत्येवमादिः सोऽपि विवक्षितार्थावधारणानुगुण्येनैव ग्रहीतव्यः। न ह्ययं सकलः कथाप्रबंधो विवक्षित इति शक्यते वक्तुं। तत्प्रतिपत्तौ पुरुषार्थाभावात्। ब्रह्मात्मत्वं त्विह विवक्षितम्॥**

**भाष्यार्थ**—'त्यांच्यासाठीं गोशरीर आणता झाला' इत्यादि प्रकारचा जो हा व्यापारविशेषाचा अनुगम होतो तोहि विवक्षित अर्थाच्या अवधारणानुकूल्यानेंच-अभीष्ट असलेल्या अर्थनिश्चयाच्या आनुकूल्यानेंच ग्रहण करण्यास योग्य आहे. [–शिवाय अफल–फलरहित भेद मानला असतां वेदाला अप्रामाण्य प्राप्त होत असल्यामुळें आणि त्याला ब्रह्मपरत्व आहे, असें मानिलें असतां फल संभवत असल्यामुळें तेंच येथें विवक्षित आहे, असें '**न हि०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–] =कारण हा सर्वच कथासंदर्भ विवक्षित आहे, असें म्हणतां येणें शक्य नाहीं. कारण त्याचें ज्ञान झालें असतां कांहीं पुरुषार्थ नाहीं. [–त्यानें देवतांसाठीं भिन्न भिन्न शरीरें आणलीं, इत्यादि जें वर्णन त्या कथाप्रबंधांत केलें आहे त्याच्या ज्ञानानें कांहीं पुरुषार्थसिद्धि होत नाहीं.]='**ब्रह्मात्मत्वं०**'–पण ब्रह्मात्मत्व येथें

विवक्षित आहे. [–या ऐतरेय संदर्भाच्या पौर्वापर्याचा विचार केला असतांहि त्याचें ब्रह्मपरत्वच सिद्ध होतें, असें '**तथाहि०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]

**भाष्यं–तथाहि अंभःप्रभृतीनां लोकानां लोकपालानां चाग्न्यादीनां सृष्टिं शिष्ट्वा करणानि करणायतनं च शरीरमुपदिश्य स एव स्रष्टा 'कथं न्विदं मदृते स्यात्' इति वीक्ष्य । इदं शरीरं प्रविवेशेति दर्शयति– 'स एतमेव सीमानं विदार्यैतया द्वारा प्रापद्यत' इति ॥**

**भाष्यार्थ**—ऐतरेयांतील या कथासंदर्भात त्याचा वाच्यार्थ विवक्षित नसून ब्रह्मात्मत्वच कसें विवक्षित आहे तें पहा–त्या कथासंदर्भात अंभःप्रभृति लोकांची व अग्न्यादि लोकपालांची सृष्टि सांगून इंद्रियें व इंद्रियांचें आयतन–अधिष्ठान शरीर यांचा उपदेश करून तोच स्रष्टा परमेश्वर 'हें शरीरेंद्रियसंघातरूप कार्यजात माझ्यावांचून कसें बरें राहूं शकेल?'–ऐ.३.सु.उ.२७०–असें आलोचन करून 'तो परमेश्वर याच सीमाला–मस्तकावरील केंसाच्या विभागावसानाला–डोक्यावरील केंसाचा भांग जेथें संपतो त्या प्रदेशाला विदीर्ण करून–तेथें छिद्र करून त्याच ब्रह्मरंध्रसंज्ञकद्वारानें शरीरास प्राप्त झाला, या शरीरांत प्रवेश करिता झाला, असें हें वाक्य दाखवितें. [–याहि कारणानें याला ब्रह्मपरत्वच आहे, असें '**पुनश्च०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]

**भाष्यं—पुनश्च 'यदि वाचाभिव्याहृतं यदि प्राणेनाभिप्राणितम्' इत्येवमादिना करणव्यापारविवेचनपूर्वकम् 'अथ कोऽहम्' इति वीक्ष्य 'स एतमेव पुरुषं ब्रह्म ततममपश्यत्' इति ब्रह्मात्मत्वदर्शनमवधारयति ॥**

**भाष्यार्थ**—आणि पुनरपि "जरी वाक्-नें संभाषणव्यापार केला, प्राणानें अभिप्राणन–प्राणव्यापार केला" इत्यादि वाक्यानें इंद्रियव्यापाराच्या विवेचनपूर्वक 'पण मग मी कोण?' असें आलोचन करून "तो शरीरांत प्रविष्ट झालेला परमात्मा त्याच शरीरान्तर्गत परमात्म्याला ब्रह्म '**ततमं**–तततमं'–पहाता झाला" –ऐ. ३. सु. उ. २७३–[अतिव्याप्त असलेलें जें ब्रह्म त्या रूपानें आत्म्याला पाहता झाला असा भावार्थ.]='इति०'–असें श्रुति ब्रह्मात्मत्वदर्शनाचें अवधारण करिते. [–याहि कारणानें वाक्याला ब्रह्मपरत्व आहे, असें '**तथोपरिष्टात्०**' इत्यादि भाष्यानें सांगतात—]

**भाष्यं—तथोपरिष्टात् 'एष ब्रह्मैष इंद्रः' इत्यादिना समस्तं भेदजातं सह महाभूतैरनुक्रम्य 'सर्वं तत्प्रज्ञानेत्रं प्रज्ञाने प्रतिष्ठितं प्रज्ञानेत्रो लोकः प्रज्ञा**

**प्रतिष्ठा प्रज्ञानं ब्रह्म ' इति ब्रह्मात्मत्वदर्शनमेवावधारयति । तस्मादिहात्मगृहीतिरित्यनपवादम् ॥**

**भाष्यार्थ**--त्याचप्रमाणें पुढें " जो शरीरांत प्रविष्ट झालेला परमेश्वर हाच परब्रह्म–परमात्मा प्रजापति, सूत्रात्माहि हाच, हा इंद्र, "–ऐ. ५. सु. उ. २८३–इत्यादि वाक्यानें महाभूतांसह समस्त भेदजाताचा अनुक्रम–उपक्रम करून तें सर्व प्रज्ञानेत्र आहे. [प्रज्ञा म्ह० ब्रह्मचैतन्य, तेंच ज्याचें नेत्र–नेण्याचें साधन नियंतृ–नियमन करणारें आहे तें प्रज्ञानेत्र. ]=' प्रज्ञाने '–त्याच अधिष्ठानांत प्रतिष्ठित आहे. भूरादि लोकहि प्रज्ञानेत्र–प्रज्ञा ज्याचा नियंता आहे, असा आहे. '**प्रज्ञा प्रतिष्ठा**'–तीच प्रज्ञा सर्व लोकाची प्रतिष्ठा–अधिष्ठान आहे. '**प्रज्ञानं ब्रह्म**'–आणि तें प्रज्ञान ब्रह्म आहे. "–ऐ. ५. सु. उ. २८३–असें ऐतरेय श्रुति ब्रह्मात्मत्वाचें अवधारणच करिते. [–याप्रकारें अवधारणेचें अनेक प्रकारें व्याख्यान करून '**तस्मात्**०' इत्यादि भाष्यानें प्रकृताचा उपसंहार करितात–]=तस्मात् येथें 'आत्मगृहीतिः '–आत्म्याचें ग्रहण करावें, हा सिद्धान्त अनपवाद–अबाधित आहे. [ येथें या अधिकरणाचें प्रथम वर्णक संपलें.–या वर्णकांत विधैक्य व त्यामुळें गुणोपसंहार, यांचें निरूपण अस्पष्ट असल्यामुळें याची साक्षात पादसंगति नाहीं, म्हणून त्यासाठीं '**अपरा**० ' इत्यादि भाष्यानें दुसरें वर्णक सांगतात––]

**भाष्यं**—**अपरा योजना—आत्मगृहीतिरितरवदुत्तरात् । वाजसनेयके 'कतम आत्मेति योऽयं विज्ञानमयः प्राणेषु हृद्यंतर्ज्योतिः पुरुषः' इत्यात्मशब्देनोपक्रम्य तस्यैव सर्वसंगविनिर्मुक्तत्वप्रतिपादनेन ब्रह्मात्मतामवधारयति । तथाह्युपसंहरति – ' स वा एष महानज आत्माजरोऽमरोऽमृतोऽभयो ब्रह्म ' इति ॥**

**भाष्यार्थ**—आतां याची दुसरी योजना–[ आध्यानाधिकरणांत–पृ. २७६–वाक्यैक्याच्या बलानें अर्थादिपरत्वाचा परित्याग करून विधैक्य सांगितलें.–आतां भिन्नार्थाच्या उपक्रमानें वाक्यभेदाची शंका '**आत्म**०' इत्यादि सूत्रानें सांगतात–] ='आत्मगृहीतिः'–'सदेव सोम्य०' या छांदोग्यवाक्यस्थ सत्-शब्दानें आत्मग्रहण करावें ' इतरवत् '–बृहदारण्यकांतील ' कतम आत्मा ' येथील आत्मग्रहणाप्रमाणें. कोणत्या कारणानें ' उत्तरात् '–पुढील तादात्म्योपदेशामुळें [–दोन श्रुतींतील वाक्यांचा उल्लेख–]=' **वाजसनेयके**० '–बृहदारण्यकांत " आत्मा कोणता ? जो हा प्राणांतील विज्ञानमय हृदयस्थ अन्तर्ज्योति पुरुष "–बृ.४.३.७.सु.उ.६७०–असा आत्मशब्दानें उपक्रम करून त्याच्याच सर्वसंगराहित्यप्रतिपादनानें श्रुति ब्रह्मात्मत्वाचें अवधारण करिते. [–हें उदाहृत वाक्य त्वमर्थाला तदर्थापर्यंत लक्षित करितें,

याविषयीं सूचक लिंग सांगतात-]=' **तथाहि०** ' -कसें तें पहा-" तोच हा महान् अज आत्मा अजर, अमर, अमृत, अभय ब्रह्म आहे. "-बृ ४. ४. २५. सु. उ. ७००-असा ती श्रुति उपसंहार करिते. [-आतां तदर्थाला त्वमर्थापर्यंत लक्षित करणारें दुसरें वाक्य ' छान्दोग्ये तु० ' इत्यादि भाष्यानें सांगतात-]

**भाष्यं--छांदोग्ये तु ' सदेव सोम्येदमग्र आसीदेकमेवाद्वितीयम् ' इति अन्तरेणैवात्मशब्दमुपक्रम्य उदर्के 'स आत्मा तत्त्वमसि' इति तादात्म्यमुपदिशति। तत्र संशयः-तुल्यार्थत्वं किमनयोराम्नानयोः स्यादस्तुल्यार्थत्वं वेति। अतुल्यार्थत्वमिति तावत्प्राप्तमतुल्यत्वादाम्नानयोः। न हि आम्नानवैषम्ये सति अर्थसाम्यं युक्तं प्रतिपत्तुं, आम्नानतंत्रत्वादर्थपरिग्रहस्य। वाजसनेयके चात्मशब्दोपक्रमादात्मतत्त्वोपदेश इति गम्यते। छांदोग्ये तु उपक्रमविपर्ययादुपदेशविपर्ययः ॥**

**भाष्यार्थ**—पण छान्दोग्यांत "हे सोम्य, उत्पत्तीच्या पूर्वी हे सर्व जगत् सत्च होतें, एकच अद्वितीय "-छां. ६. २. १-असा आत्मशब्दाचा प्रयोग न करितांच -आत्मशब्दावांचूनच उपक्रम करून उपसंहारांत " तो आत्मा तें तूं आहेस"- छां. ६. ८. ७.-असा श्रुति तादात्म्याचा उपदेश करिते. [ त्यांतील ' सत् ' या शब्दाचा अर्थ आत्मा कीं अनात्मा, याचा निर्णय होत नसल्यामुळें संशय सांगतात-]=' **तत्र०** '-त्याविषयीं " काय, या दोन्ही आम्नानांना-श्रुतिवचनांना तुल्यार्थत्व आहे कीं अतुल्यार्थत्व ? त्यांचा अर्थ एकच आहे कीं भिन्न आहे ? " असा संशय येतो. [ अर्थाच्या अभेदामुळें विद्येचा अभेद सांगून वाक्यार्थज्ञानहेतूत्वेंच येथें कथन केलें आहे. त्यामुळें याच्या पादादिसंगति आहेत.-पूर्वपक्षांत 'विद्यांच्या भेदामुळें गुणांचा अनुपसंहार ' व सिद्धान्तांत ' विद्यांच्या अभेदामुळें गुणांचा उपसंहार' असा फलभेद मानून 'अर्थभेदामुळें विद्याभेद' हा पूर्वपक्ष '**अतुल्यार्थत्वं०**' इत्यादि भाष्यानें सांगतात-]=या दोन आम्नानांना अतुल्यत्व आहे, त्यामुळें त्यांचा एक-अभिन्न अर्थ नाहीं, हा पक्ष प्रथम प्राप्त झाला. [-" अहोपण, आम्नान जरी विषम-अतुल्य असलें तरी अर्थैक्यामुळें विद्यैक्य कां नसावें" '**न हि०**' इत्यादि भाष्यानें वाद्याचें उत्तर-]=कारण आम्नानांचें वैषम्य असतांना त्यांचें अर्थसाम्य आहे, असें समजणें युक्त नाहीं. कारण अर्थाचा परिग्रह-स्वीकार आम्नानाच्या अधीन असतो. [ अर्थज्ञान शब्दाच्या अधीन असतें. -'**वाजसनेयके च०**' इत्यादि भाष्यानें तेंच विशद करितात-]=आणि वाजसनेयकांत आत्मशब्दानें उपक्रम केलेला असल्यामुळें आत्मस्वरूपाचा उपदेश केलेला आहे, असें अवगत होतें. पण छांदोग्यांत उपक्रमाच्या विपर्ययामुळें उपदेशाचा विपर्यय प्रतीत

होतो. [विपर्यय म्ह० वैषम्य–असाम्य.–"अहोपण, छांदोग्यांतहि वाक्यशेषावरून आत्मार्थत्वाची सिद्धि होत असतांना आम्नानवैषम्य कसें? त्याच्या अभावीं अर्थभेद कसा? आणि अर्थभेदाच्या अभावीं विद्येला नानात्व तरी कसें?" अशी 'ननु०' इत्यादि भाष्यानें शंका—]

भाष्यं——ननु छंदोगानामप्यस्त्युदर्के तादात्म्योपदेश इत्युक्तम् । सत्यमुक्तम्। उपक्रमतंत्रत्वादुपसंहारस्य तादात्म्यसंपत्तिः सेति मन्यते ॥

**भाष्यार्थ** —"अहोपण, छंदोगांच्याहि उपसंहारांत तादात्म्याचा उपदेश आहे, असें आम्हीं वर–२९२–सांगितलें आहे. [–वादी 'तो आत्मा, तें तूं आहेस' अशा या तादात्म्योपदेशाचा अंगीकार करितो–]='**सत्यं उक्तं**'–होय, तुम्हीं तसें सांगितलें आहे, हें खरें; [–"तर मग त्याच्या अनुरोधानें उपक्रमाचा निर्णय करणें उचित आहे!" वादी '**उपक्रम०**' इत्यादि म्हणतो–]=उपसंहाराला उपक्रमतंत्रत्व असल्यामुळें–उपसंहार उपक्रमाच्या अधीन असल्यामुळें ती तादात्म्यसंपत्ति आहे. [ उपक्रमाचा अर्थ जर संदिग्ध असला तर त्याच्या अर्थाचा निश्चय उपसंहारावरून केला जातो.पण प्रकृत छांदोग्यवाक्याचा उपक्रम संदिग्धार्थ नाहीं. तो निश्चितार्थ आहे. त्यामुळें तदनुसारी उपसंहारांत प्रतिमेंतील विष्णुदृष्टीप्रमाणें आत्म्यामध्यें ब्रह्मदृष्टि मानावी, असा याचा भावार्थ.–यास्तव वाजसनेयिवाक्य ब्रह्मात्मज्ञानासाठीं आहे, पण छांदोग्यवाक्य आत्म्यामध्यें ब्रह्मदृष्टि करण्यासाठीं आहे, असा विद्याभेदाचा उपसंहार–]='**इति मन्यते**'–असें पूर्ववादी मानितो. [–अतुल्यार्थत्वानें विद्याभेदाचा '**तथा०**' इत्यादि भाष्यानें अनुवाद करून सिद्धान्त सांगतात–]

भाष्यं— तथा प्राप्तेऽभिधीयते——आत्मगृहीतिः 'सदेव सोम्येदमग्र आसीत्' इत्यत्र छंदोगानामपि भवितुमर्हतीतरवत् । यथा 'कतम आत्मा' इत्यत्र वाजसनेयिनामात्मगृहीतिः तथैव । कस्मात् । उत्तरात्तादात्म्योपदेशात् ॥

**भाष्यार्थ**——असा पूर्वपक्ष प्राप्त झाला असतां सिद्धान्त सांगितला जातो– '**आत्मगृहीतिः**'–'हे सोम्य, पूर्वी हें सत्च होतें.' पृ.२९२–या छांदोग्यवाक्यांत छंदोगांचेंहि आत्मग्रहणच उचित आहे '**इतरवत्**'–वाजसनेयकांप्रमाणें, ज्याप्रमाणें 'आत्मा कोणता' या बृहदारण्यकांत वाजसनेयींचें आत्मग्रहण आहे –त्यांनीं आत्म्याचें ग्रहण केलें आहे त्याचप्रमाणें छंदोगांचेंहि आत्मग्रहण असणेंच उचित आहे.'**कस्मात्**'–कोणत्या कारणानें?'**उत्तरात्**'–पुढील तादात्म्योपदेशामुळें. [ उपसंहारांत 'स आत्मा०' इत्यादि तादात्म्याचा उपदेश केलेला असल्यामुळें उपक्रमांतील 'सत्-'शब्दानें आत्मग्रहणच करणें उचित आहे, असा भावार्थ.

–'**अन्वयात्**०' इत्यादि दुसऱ्या सूत्रानें–तादात्म्योपदेशाच्या गत्यन्तराचा अनुवाद करून त्याला दूषित करितात–]

**भाष्यं—अन्वयादिति चेत्स्यादवधारणात्। यदुक्तमुपक्रमान्वयादुपक्रमे च आत्मशब्दश्रवणाभावान्नात्मगृहीतिरिति। तस्य कः परिहार इति चेत्सोऽभिधीयते स्यादवधारणादिति। भवेदुपपन्नेहात्मगृहीतिः। अवधारणात्॥**

**भाष्यार्थ**—'अन्वयात्'–उपक्रमाच्या अन्वयामुळें व उपक्रमांत आत्मशब्दाचें श्रवण नसल्यामुळें आत्मग्रहण नाहीं, 'इति चेत्'–असें जर म्हणशील तर 'अवधारणात् स्यात्'–अवधारणामुळें आत्मग्रहणच होईल. [–'**यदुक्तं**०' इत्यादि भाष्यानें या सूत्रांतील 'अन्वयात् इति चेत्' या अनुवादभागाचें विवरण–]=उपक्रमाच्या अन्वयामुळें म्ह० उपसंहार उपक्रमाच्या अधीन असल्यामुळें, [–"तर मग उपक्रमहि 'सदेव' अशा अवधारणामुळें आत्म्यालाच विषय करितो" अशी आशंका घेऊन '**उपक्रमे च**०' इत्यादि म्हणतात–]=आणि उपक्रमामध्यें आत्मशब्दाचें श्रवण नसल्यामुळें [उपसंहारांतहि आत्म्याचें परमात्मतादात्म्यग्रहण केलें जात नाहीं. उपक्रमस्थ 'सत्-'शब्दानें आत्मा उक्त नाहीं. कारण 'सत्' हा शब्द आत्मा या अर्थी रूढ नाहीं. त्यामुळें 'तत्त्वमसि' या वाक्यानें अनात्मा जें सत् त्याची आत्म्यामध्यें तादात्म्यसंपत्ति विवक्षित नाहीं, असें–'**नात्म**०' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=आत्म्याचें ग्रहण होत नाहीं. 'इति'–असें जें वाद्यानें म्हटलें आहे, त्याचा काय परिहार आहे? '**इति चेत्**'–असें जर म्हणाल तर [–सूत्रांतील परिहाराचें ग्रहण करितात–]='**सः**०'–तो परिहार 'स्यात् अवधारणात्' असा सांगितला जातो. [–त्यांतील 'स्यात्' या प्रतिज्ञेचा विभाग–] ='**भवेत्**०'–येथें आत्मग्रहण उपपन्न होतें. [–कोणत्या कारणानें?–]='अवधारणामुळें' [–'अवधारणात्' या हेतूचें विवरण–]

**भाष्यं—तथाहि–'येनाश्रुतं श्रुतं भवत्यमतं मतमविज्ञातं विज्ञातम्' इत्येकविज्ञानेन सर्वविज्ञानमवधार्य। तत्संपिपादयिषया 'सदेव' इत्याह॥**

**भाष्यार्थ**—'**तथाहि**०'–अवधारण कसें तें पहा–"ज्याच्या श्रवणानें अश्रुत असलेलें श्रुत होतें, अमत मत होतें व अविज्ञात विज्ञात होतें"–छा.६.१.३. –असें एकविज्ञानानें सर्वविज्ञानाचें अवधारण करून त्याचें संपादन करण्याच्या इच्छेनें श्रुति 'सदेव' असें म्हणते. [–"अहोपण, सत्-ला सर्वात्मत्व असल्यामुळें 'सत्-'शब्दानें अनात्म्याचें ग्रहण जरी केलें तरी एकविज्ञानानें सर्वविज्ञान अविरुद्ध आहे" अशी आशंका घेऊन '**तच्च**०' इत्यादि म्हणतात–]

**भाष्यं—तच्चात्मगृहीतौ सत्यां संपद्यते । अन्यथा हि योऽयं मुख्य आत्मा स न विज्ञात इति । नैव सर्वविज्ञानं संपद्येत । तथा प्रागुत्पत्तेरेकत्वावधारणं । जीवस्य चात्मशब्देन परामर्शः, स्वापावस्थायां च तत्स्वभावसंपत्तिकथनं । परिचोदनापूर्वकं च पुनः पुनः ' तत्त्वमसि ' इत्यवधारणं । इति च सर्वमेतत्तादात्म्यप्रतिपादनायामेव अवकल्पते न तादात्म्यसंपादनायाम् ॥**

**भाष्यार्थ**—आणि तें सर्वविज्ञान आत्म्याचें ग्रहण केलें असतांच संपन्न होतें. [-हा उक्त अर्थच व्यतिरेकानें साधितात-]=**'अन्यथा०'**-कारण 'सत्-'शब्दानें आत्मग्रहण न केल्यास जो हा मुख्य आत्मा तो विज्ञात झालेला नाहीं. त्यामुळें 'सत्-'च्या विज्ञानानें सर्वविज्ञान संपन्न होणारच नाहीं. त्याचप्रमाणें उत्पत्तीच्या पूर्वी ' एकं एव अद्वितीयं ' हें एकत्वावधारण, ' अनेन जीवेन आत्मना '-या जीवानें-आत्म्यानें असा जीवाचा 'आत्म-'शब्दानें परामर्श 'सति संपद्य'-या सर्व प्रजा सत्संपन्न होऊन आम्ही सत्संपन्न होतों, असें जाणत नाहींत, असें स्वापावस्थेंतील-सुषुप्तींतील सत्स्वरूपसंपत्तिकथन ' भूय एव मा भगवान् विज्ञापयतु'-आपण मला हेंच पुनः विशेषेंकरून सांगा, अशा परिचोदनापूर्वक-प्रार्थनापूर्वक पुनः पुनः 'तत्त्वमसि' असें अवधारण, [-या उक्त सर्व हेतूंचें फल-]=**'इतिच०'**-असें हें सर्व तादात्म्यप्रतिपत्तीमध्येंच उपपन्न होतें, तादात्म्यसंपत्तींत उपपन्न होत नाहीं. [-'उपसंहारानें उपक्रमाच्या तंत्रानेंच असणें उचित आहे,'-२९३-असें जें वाद्यानें वर म्हटलें आहे त्याविषयीं आचार्य **'न च०'** इत्यादि भाष्यानें म्हणतात-]

**भाष्यं—न चात्र उपक्रमतंत्रत्वोपन्यासो न्याय्यः । न ह्युपक्रमे आत्मत्वसंकीर्तनं अनात्मत्वसंकीर्तनं वास्ति । सामान्योपक्रमश्च न वाक्यशेषगतेन विशेषेण विरुध्यते । विशेषाकांक्षित्वात्सामान्यस्य । सच्छब्दार्थोऽपि च पर्यालोच्यमानो न मुख्यादात्मनोऽन्यः संभवति । अतोऽन्यस्य वस्तुजातस्यारंभणशब्दादिभ्योऽनृतत्वोपपत्तेः ॥**

**भाष्यार्थ**--या छान्दोग्यांत ' स आत्मा ' इत्यादि उपसंहाराच्या उपक्रमतंत्रत्वाचा उपन्यास न्याय्य नाहीं. [-त्याविषयीं हेतु-]=**' न हि० '**-कारण उपक्रमांत आत्मत्वसंकीर्तन किंवा अनात्मत्वसंकीर्तन नाहीं. [-"तर मग उपसंहाराच्या अनुरोधानेंहि उपक्रमाचा निर्णय करणें योग्य नाहीं. कारण त्यांना भिन्नविषयत्व आहे-उपक्रम व उपसंहार यांचा विषय भिन्न आहे," अशी आशंका घेऊन आचार्य म्हणतात-]=**' सामान्योपक्रमश्च० '**-आणि सामान्य उपक्रम वाक्यशेषांतील-उपसंहारांतील विशेषाशीं विरोध करीत नाहीं. कारण सामान्याला

विशेषाची आकांक्षा असते–सामान्य नेहमीं विशेषाची आकांक्षा करणारें असतें. [ ‘ सत् ’ हा शब्द सामान्यसत्तेचा वाचक आहे. त्यामुळें तो आत्मा व अनात्मा या दोन्ही अर्थी साधारण आहे. म्हणून त्याच्या विशेषाची आकांक्षा झाली असतां उपसंहाराच्या अनुसार ‘ आत्मा ’ हाच अर्थ आहे, असा निर्णय केला जातो. कारण ज्याचा अर्थ संदिग्ध आहे अशा उपक्रमानें उपसंहाराचा निर्णय होत नाहीं. ‘ उपक्रमाच्या अनुसार उपसंहाराचा निर्णय करावा ’ ह्या न्यायाचा विषय असंदिग्धार्थ उपक्रम आहे. म्ह० तो न्याय ज्याचा अर्थ संदिग्ध नाहीं, अशा उपक्रमामध्येंच प्रवृत्त होतो, तोच त्याचा विषय आहे, असा याचा भावार्थ.–याप्रमाणें उपक्रमाच्या भेदाचा अंगीकार करून दोन्ही श्रुतींमध्यें वेद्याच्या ऐक्यानें विद्येचें ऐक्य सांगितलें. आतां वस्तुतः उपक्रमाचा भेदहि नाहीं, असें **‘ सच्छब्दार्थोऽपि० ’** इत्यादि भाष्यानें सांगतात–]=पण ‘ सत् ’ या शब्दाच्या अर्थाचा विचार करूं लागलें असतांहि तो–सच्छब्दार्थ मुख्य आत्म्याहून भिन्न संभवत नाहीं. कारण त्या सत् हून भिन्न असलेल्या सर्व अर्थजाताला ‘आरंभण-’ शब्दादिकांवरून अनृतत्व उपपन्न होतें. [ आत्म्याहून भिन्न असलेल्या सर्वाला अनिर्वाच्यत्व असल्यामुळें अनात्मा हा ‘सत्-’शब्दाचा अर्थ आहे, असें सिद्ध होत नाहीं. तर ‘ आत्मा ’ हाच त्याचा अर्थ आहे, असें सिद्ध होतें. त्यामुळें वस्तुतः येथें उपक्रमभेदहि नाहीं, असा याचा भावार्थ.–आतां ‘ आम्नानवैषम्य असतांना अर्थसाम्य युक्त नाहीं ’–पृ.२९२–असें जें म्हटलें आहे, त्याविषयीं **‘ आम्नान-वैषम्यं० ’** इत्यादि भाष्यानें म्हणतात–]

**भाष्यं—आम्नानवैषम्यमपि नावश्यमर्थवैषम्यमावहति । आहर पात्रं पात्रमाहर इत्येवमादिष्वर्थसाम्येऽपि तद्दर्शनात् । तस्मादेवंजातीयकेषु वाक्येषु प्रतिपादनप्रकारभेदेऽपि प्रतिपाद्यार्थाभेद इति सिद्धम् ॥ १७ ॥ (८)**

**भाष्यार्थ**—आम्नानाचें–श्रुतिवचनाचें वैषम्यहि अवश्य अर्थवैषम्य प्राप्त करून देतेंच, असें नाहीं. [ दोन श्रुतींतील शब्द समान–एकसारखेच नसल्यास त्यांचा अर्थहि समान नसतोच, असा नियम करितां येत नाहीं–]=कारण ‘आहर पात्रं’ –आण पात्र व ‘ पात्रं आहर ’–पात्र आण, इत्यादि उदाहरणांत अर्थाचें साम्य असूनहि शब्दांचें वैषम्य प्रतीत होतें. [–याप्रमाणें शब्दवैषम्य असल्यास अर्थ-भेद अवश्य असलाच पाहिजे असा नियम नाहीं, असें सिद्ध झालें असतां आतां फलित सांगतात–]=**‘ तस्मात्० ’**–म्हणून ‘ योऽयं विज्ञानमयः ’ ‘सदेव सोम्य’ इत्यादि प्रकारच्या वाक्यांमध्यें प्रतिपादनाच्या प्रकाराचा भेद म्ह० समाम्नान-

विशेष जरी असला तरी प्रतिपाद्य अर्थाचा अभेद आहे, हें सिद्ध झालें. [ वाजसनेयकांत तदर्थपर्यंत वाक्यार्थ-अन्वयित्वमर्थाला व छांदोग्यांत त्वमर्थपर्यंत तदर्थाला लक्ष्यत्व असल्यामुळें वाक्यार्थभेदाचा अभाव आहे. त्यामुळें दोन्ही ठिकाणीं एकच विद्या आहे, असें '**प्रतिपाद्य-अर्थभेदः०**' इत्यादि भाष्यानें सांगितलें आहे.]१७(८).

(९. **कार्याख्यानाधिकरण. सू. १८.**)

—"संदिग्ध असलेल्या सत्-उपक्रमाचा उपसंहारावरून जसा निर्णय केला त्याप्रमाणें 'आचामन्ति'—आचमन करितात या वर्तमानप्रयोगाच्या विधित्वाचा संदेह आला असतां 'अशिष्यन् आचामेत्'—भोजन करणारानें आचमन करावें, या शेषवाक्यावरून त्याच्या विधिपरत्वाचा निर्णय करावा," अशी आशंका घेऊन सूत्रकार '**कार्याख्यानात्०**' इत्यादि म्हणतात—

**सूत्रं—कार्याख्यानादपूर्वम् ॥ १८॥ (९)**

**सूत्रार्थ**—'कार्याख्यानामुळें'—कर्तव्यत्वानें प्राप्त असलेल्या स्मृतिप्रसिद्ध आचमनाचें अन्वाख्यान—अनुवाद केलेला असल्यामुळें 'अपूर्व'—प्राणाच्या अप्राप्त अनग्नतेचेंच विधान आहे, प्राप्त आचमनाचें नाहीं. १८. (९)—सु. ब्र. ३२३—

[—अधिकरणाचा विषय सांगण्यासाठीं 'छन्दोगाः०' इत्यादि भाष्यानें अविरुद्ध आम्नान दाखवितात—]

**भाष्यं— छंदोगा वाजसनेयिनश्च प्राणसंवादे श्वादिमर्यादं प्राणस्यान्नमाम्नाय तस्यैवापो वास आमनन्ति । अनंतरं च छंदोगा आमनन्ति— 'तस्माद्वा एतदाशिष्यन्तः पुरस्ताच्चोपरिष्टाच्चाद्भिः परिदधाति' इति । वाजसनेयिनश्चामनन्ति— 'तद्विद्वांसः श्रोत्रिया अशिष्यन्त आचामन्त्यशित्वाचामन्त्येतमेव तदनमनग्नं कुर्वन्तो मन्यन्ते' 'तस्मादेवंविदशिष्यन्नाचामेदशित्वा चाचामेदेतमेव तदनमनग्नं कुरुते' इति ॥**

**भाष्यार्थ**—छंदोग व वाजसनेयी प्राणसंवादांत श्वादिमर्याद—कुत्रे, कृमी इत्यादिकांपर्यंत प्राणाचें अन्न सांगून त्या प्राणाचेंच 'आप' हें वस्त्र सांगतात. ['हें जें कांहीं कुत्र्यांपर्यंत, कृमींपर्यंत, कीटपतंगांपर्यंत प्राण्यांचें अन्न आहे तें तुझें अन्न आहे' असें सांगून 'त्याच प्राणाचें आप वस्त्र सांगतात'—बृ.६. १. १४—असा याचा भावार्थ.—छंदोगांचें अविशेष-समान आम्नान—कथन सांगून विशेष आम्नान सांगतात—]='**अनन्तरं च०**'—त्यानंतर छंदोग "तस्मात्—आपांना प्राणांचें वस्त्ररूपत्व असल्यामुळें हे भोजन करणारे भोजनापूर्वी व नंतर आपांनीं प्राणाला आच्छादित करितात"—छां. ५. २.२—असें आमनन करितात. [—शाखान्तरांतीलहि

विशेषाम्नान सांगतात-]= 'वाजसनेयिनः०'-वाजसनेयिशाखाध्यायी-' तत् '- "ज्या अर्थी आप प्राणाचें वस्त्र आहे त्या अर्थी ' विद्वांसः '-प्राणोपासक 'श्रोत्रियाः '-सदाचारसंपन्न सन्त ' अशिष्यन्तः '-भोजन करण्याच्यापूर्वी आचमन करितात व भोजन करून आचमन करितात. ' एतं एव अनं '-याच प्राणास ' तत् '-त्या आचमनानें ' अनग्नं कुर्वन्तः मन्यन्ते '-आम्ही अनग्न-वस्त्राच्छादित करीत आहों, असें मानितात-असें चिंतन करितात."-बृ. ६. १. १४. सु. उ. ७२९-असें कथन करितात. [-याप्रमाणें काण्वांचें विशेष आम्नान सांगून माध्यंदिनांचा आम्नानविशेष सांगतात-]=' तस्मादेवंविद्०'-ज्याअर्थी पूर्वींचे प्राणोपासक स्वतः आचमन करीत होत्साते आम्ही प्राणाला अनग्न-वस्त्राच्छादित करीत आहों, असें चिंतन करीत होते त्याअर्थी वर्तमान समयींच्या प्राणोपासकानेंहि भोजनापूर्वी आचमन करावें व भोजनोत्तर आचमन करावें. त्या आचमनानें तो या प्राणालाच अनग्न करितो." असा माध्यंदिनांचा पाठ आहे. [-या तिन्ही पाठांतील सामान्य अर्थ ' तत्र० ' इत्यादि भाष्यानें सांगतात--]

**भाष्यं—तत्र चाचमनमनग्नताचिंतनं च प्राणस्य प्रतीयते । तत्किमुभयमपि विधीयते । उताचमनमेव उतानग्नताचिंतनमेवेति विचार्यते । किं तावत्प्राप्तम् । उभयमपि विधीयत इति । कुतः । उभयस्याप्यवगम्यमानत्वात् । उभयमपि चैतदपूर्वत्वाद्विध्यर्हम् । अथवाचमनमेव विधीयते विस्पष्टा हि तस्मिन्विधिविभक्तिः ' तस्मादेवंविदशिष्यन्नाचामेदशित्वा चाचामेत् ' इति । तस्यैव स्तुत्यर्थमनग्नतासंकीर्तनमिति ॥**

**भाष्यार्थ**—आणि त्या तिन्ही आम्नानांत-पाठांत आचमन व प्राणाचें अनग्नताचिंतन प्रतीत होतें. [-त्या दोहोंनाहि अपूर्वत्व आहे, असें मानून म्हणतात-] =' तत् किं० '-त्यांत आचमन व प्राणाचें अनग्नताचिंतन हें दोन्ही विहित आहे, या दोहोंचेंहि त्यांत विधान केलें जातें [ कीं दोहोंचें विधान मानिल्यास वाक्यभेद होतो, या भीतीनें त्यांतील कांहीं तरी एक विधेय आहे, असा येथें दुसरा कल्प जाणावा.-पण या दुसऱ्या कल्पामध्येंहि त्याच्या विशेषाचा निश्चय होत नसल्यामुळें पुनः त्याचा दोन प्रकारें विकल्प करितात-]=' उत० '-किंवा एक आचमनच विहित आहे कीं केवल अनग्नताचिंतनच विहित आहे, याचा विचार केला जातो. [ आचमन प्रथम श्रुत आहे, हें पाहून यांतील प्रथम कल्प व आचमनाला दृष्टीचा विषय करून अनग्नताचिंतनाचें अंगत्व मानून द्वितीय कल्प आहे, असा या विकल्पांचा विशेष आहे. या तिन्ही पाठांत प्राणविद्येचें अंग अनग्नताचिंतन हें एकच

विधेय आहे, या विचाराला वाक्यार्थज्ञानसाधनगामित्व असल्यामुळें याच्या पादादि-संगति आहेत.पूर्वपक्षांत–' दोहोंनाहि विधेयत्व असल्यामुळें वाक्यभेद,त्यांतील एका-चाच विधि जरी मानिला तरी आचमनालाच विधेयत्व असल्यामुळें विशेषविषय असलेल्या त्याचा अन्यत्र–दुसऱ्या विद्यांमध्यें उपसंहार' पण सिद्धान्तांत–'अनग्नताचिंतनालाच विधेयत्व असल्यामुळें वाक्याला एकत्व आहे. म्हणून अविधेय आचमनाचा अन्यत्र उपसंहार करितां येत नाहीं' असें मानून ' किं तावत्०' अशा विमर्शपूर्वक पूर्वपक्ष सांगतात–]=पण या दोन पक्षांतील प्रथम कोणता पक्ष प्राप्त झाला ? ' आचमन व प्राणाचें अनग्नत्वचिंतन' हें दोन्ही विधेय आहे, असें प्राप्त झालें. [–" पण गौरवामुळें दोहोंचें विधान अयुक्त आहे " अशी शंका–]='कुतः' –कोणत्या कारणानें? [–'कर्तव्यत्वानें त्या दोहोंमध्येंहि वाक्याचें तात्पर्य ज्ञात होत असल्यामुळें गौरवदोष येत नाहीं, असें पूर्ववादी ' उभयस्य० ' इत्यादि भाष्यानें सांगतो–]=कारण आचमन व प्राणाचें अनग्नताचिन्तन या दोहोंचाहि त्या वाक्यावरून अवगम–बोध होतो. त्यामुळें तीं दोन्हीं विहित आहेत. [–"अहो-पण, वाक्यावरून त्यांचा बोध होतो, एवढ्यानेंच त्याला तात्पर्यगम्यत्वानें विधेयत्व आहे असें म्हटल्यास त्याची अतिव्याप्ति होते" अशी आशंका घेऊन पूर्ववादी ' उभयमपि० ' इत्यादि म्हणतो–]=आणि तीं दोन्ही अपूर्वत्वामुळें विधीला योग्य आहेत. [ ' आचमन स्मृति व आचार यांनीं सिद्ध असल्यामुळें त्याला अपूर्वत्व नाहीं ' असेंहि म्हणतां येत नाहीं. कारण हें वाक्यच आचमनाचें विधान करणारी ती स्मृति व शिष्टांचा आचार यांचें मूळ आहे. सामान्य व विशेष या भावानें श्रुति, स्मृति व आचार यांना मूल-मूलित्व नाहीं, म्ह० आचमनविशेष सांगणारी श्रुति मूळ व आचमनसामान्याचें विधान करणारी स्मृति –आचार मूली–मुलवान् असा त्यांचा संबंध नाहीं, असेंहि म्हणतां येत नाहीं. कारण सामान्यतः सिद्ध असलेला जो मिथ्या भाषणाचा निषेध त्याचा क्रतुविषयत्वानें जसा विधि आहे त्याप्रमाणें प्रसिद्ध असलेल्याच आचमनाचेंहि प्राणविद्यासंबंधित्वानें विधान केलेलें आहे व उपरिधारणविधिप्रमाणें ( अ. ३.४.२०. यावरील भाष्य किंवा सु. ब्र. पृ. ३९३ पहा ) वाक्यभेदप्रसंगाला अदोषत्व आहे, असा भावार्थ.–" पण गत्यन्तर असतांना वाक्यभेद युक्त नाहीं. " अशी आशंका घेऊन 'अथवा०' इत्यादि भाष्यानें वादी पक्षान्तर सांगतो–]=किंवा आचमनाचेंच विधान केलें जातें. [–त्याविषयीं हेतु–]='विस्पष्टा०' कारण त्या आचमनामध्यें " म्हणून प्राणोपासकानें भोजन करितांना प्रथम आचमन करावें व भोजन करून

आचमन करावें "-पृ.२९८-अशी विधिविभक्ति अगदीं स्पष्ट आहे. [-'तर मग अनग्नतेचें कथन कशासाठीं केलें आहे ?' **'तस्यैव०'**इत्यादि भाष्यानें उत्तर-]=त्या आचमनाच्याच स्तुतीसाठीं प्राणाच्या अनग्नतेचें संकीर्तन-कथन केलें आहे. [खरोखर हें आचमन अतिशय पूज्य आहे. कारण याच्या योगानें प्राण अनग्न होतो, अशी त्याची स्तुति करण्यासाठीं तें अनग्नतासंकीर्तन आहे. ]=**'इति०'**-तस्मात् विशेषविषय आचमन विधेय आहे व तें अन्यत्र उपसंहार करण्यास योग्य आहे, असा याचा भावार्थ.[-' **एवं०** ' इत्यादि भाष्यानें सिद्धान्त सांगतात-]

**भाष्यं—एवं प्राप्ते ब्रूमः—नाचमनस्य विधेयत्वमुपपद्यते । कार्याख्यानात् । प्राप्तमेव हीदं कार्यत्वेनाचमनं प्रायत्यार्थं स्मृतिप्रसिद्धमन्वाख्यायते । नन्वियं श्रुतिस्तस्याः स्मृतेर्मूलं स्यात् । नेत्युच्यते । विषयनानात्वात् ॥**

**भाष्यार्थ—**असा पूर्वपक्ष प्राप्त झाला असतां ' आचमनाचें विधेयत्व उपपन्न होत नाहीं,' असें आम्ही म्हणतों. [-त्याविषयीं सूत्रोक्त हेतु घेऊन त्याचें व्याख्यान करितात-]=' **कार्याख्यानात्०** '-कार्याच्या-कर्तव्याच्या आख्यानामुळें. कारण हें स्मृतिप्रसिद्ध, शुद्धीसाठीं कर्तव्यत्वानें प्राप्तच असलेलें आचमन अनुवादिलें जातें-त्या प्राप्त असलेल्याच आचमनाचा अनुवाद केला जातो. [**'प्रायत्यार्थं'**-प्रयताचा-प्रयत्नवानाचा जो भाव तें प्रायत्य, म्ह० शुद्धत्व. त्यासाठीं स्मार्त आचमनाचा अनुवाद केला जातो, असें जें म्हटलें आहे, त्यावर ' **ननु०** ' इत्यादि भाष्यानें आक्षेप-]=अहोपण, ही श्रुति त्या स्मृतीचें मूळ होईल. [ स्मृतीला श्रुतिमूलत्वानें प्रामाण्य असल्यामुळें ती स्मृति उक्त श्रुतिमूलच आहे. स्मृतिसिद्ध अर्थाचा श्रुतीकडून अनुवाद केला जात नाहीं. कारण तसें झाल्यास वैपरीत्य -विपरीतता प्राप्त होते, असा भावार्थ.-भिन्नविषयत्वामुळें या श्रुति-स्मृतींना मूलमूलित्व नाहीं, असें ' न० '-इत्यादि भाष्यानें सांगतात-]=नाहीं, ही श्रुति स्मृतीचें मूळ होऊं शकत नाहीं, असें याचें उत्तर सांगितलें जातें. कारण ही श्रुति व आचमनाचें विधान करणारी स्मृति यांच्या विषयाला नानात्व आहे, त्यांचे विषय भिन्न आहेत. [-**'सामान्यविषया०'** इत्यादि भाष्यानें विषयभेदच विशद करितात-]

**भाष्यं—सामान्यविषया हि स्मृतिः पुरुषमात्रसंबद्धं प्रायत्यार्थमाचमनं प्रापयति । श्रुतिस्तु प्राणविद्याप्रकरणपठिता तद्विषयमेवाचमनं विदधती विदध्यात् । न च भिन्नविषययोः श्रुतिस्मृत्योः मूलमूलिभावोऽवकल्पते । न चेयं श्रुतिः प्राणविद्यासंयोगि अपूर्वमाचमनं विधास्यतीति शक्यमाश्रयितुम् । पूर्वस्यैव पुरुषमात्रसंयोगिन आचमनस्येह प्रत्यभिज्ञायमानत्वात् ॥**

**भाष्यार्थ**—कारण सामान्यविषय असलेली स्मृति केवल पुरुषसंबद्ध शुद्धी-साठीं आचमनाची प्राप्ति करविते. पण प्राणविद्याप्रकरणांत पठित असलेली आच-मनाचें विधान करणारी श्रुति प्राणविषयच आचमनाचें विधान करील. [ आणि अर्थैकत्वाचा अभाव असतांनाहि विधिभाव मानिल्यास अतिप्रसंग म्ह० त्याची अतिव्याप्ति होते, असा भावार्थ.—ही श्रुति दुसऱ्या आचमनाचें विधान करिते, असें मानून त्यांच्या मूल-मूलिभावाचें निरसन केलें. पण आतां वस्तुतः तेंहि नाहीं, असें 'न च०' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=आणि ज्यांचे विषय भिन्न आहेत अशा श्रुति-स्मृतींचा मूल-मूलिभाव उपपन्न होत नाहीं. ही श्रुति प्राणविद्यासंयोगी अपूर्व–अप्राप्त आचमनाचें विधान करील, असें स्वीकारणें शक्य नाहीं. [–स्मार्त आचमनाचा श्रुतीनें अनुवाद केल्यास वैपरीत्य प्राप्त होते, असेंहि नाहीं. 'त्रिः आचामेत्' –तीन वेळ आचमन करावें, इत्यादि श्रुतिसिद्धच सामान्य आचमनाचा येथें–या श्रुतींत अनुवाद केला आहे, असें मानून '**पूर्वस्य०**' इत्यादि भाष्यानें हेतु सांग-तात–]=कारण पूर्वीच–दुसऱ्या श्रुतीनें प्राप्त असलेल्याच पुरुषमात्रसंयोगी–प्रत्येक पुरुषाशीं संबद्ध असलेल्या आचमनाचें येथें प्रत्यभिज्ञान होतें. [क्रत्वर्थत्वानें अप्राप्त, अशा पुरुषार्थत्वानें विहित असलेल्याहि मिथ्याभाषणाच्या निषेधाचें विधान अविरुद्ध आहे. पण आचमन सर्व कर्मांच्या अंगत्वानें विहित आहे. त्यामुळें तें प्राणोपासनेच्या अंगत्वानेंहि सिद्ध–प्राप्त आहे. म्हणून त्याचें पुनः विधान करणें व्यर्थ आहे, असा भावार्थ.–प्रकृत प्राणविद्येंत आचमनविधानाच्या असंभवाला हेतु करून आचार्य पहिल्या पूर्वपक्षाचें प्रत्याख्यान '**अत एव०**' इत्यादि भाष्यानें करितात-]

**भाष्यं—अत एव च नोभयविधानम् । उभयविधाने च वाक्यं भिद्येत । तस्मात्प्राप्तमेवाशिशिषतामशितवतां चोभयत आचमनं अनूद्य 'एतमेव तदन-मनग्नं कुर्वन्तो मन्यन्ते' इति प्राणस्यानग्नताकरणसंकल्पोऽनेन वाक्येनाचम-नीयास्वप्सु प्राणविद्यासंबंधित्वेनापूर्व उपदिश्यते ॥**

**भाष्यार्थ**—आणि म्हणूनच–येथें आचमनविधानाचा असंभव असल्यामुळेंच आचमन व प्राणाचें अनग्नताचिंतन या दोहोंचें विधान नाहीं. [–'**उभय०**' इत्यादि भाष्यानें त्याविषयींच दुसरी युक्ति--]=आणि यांत त्या दोहोंचेंहि विधान आहे, असें मानिल्यास वाक्यभेद होईल, त्याची एकवाक्यता होणार नाहीं. ['उपरि-धारणाप्रमाणें वाक्यभेद हा कांहीं दोष नाहीं' असेंहि म्हणतां येत नाहीं. कारण एकवाक्यत्व संभवत असतांना वाक्यभेद मानणें अनिष्ट आहे, असा भावार्थ.–'तर मग येथें विधेय काय आहे?' '**तस्मात् प्राप्तमेव०**' इत्यादि भाष्यानें

सहेतुक उत्तर-]=म्हणून भोजन करणाऱ्या व तें केलेल्या पुरुषांना पूर्वी व नंतर अशा उभयत: प्राप्त असलेल्याच आचमनाचा अनुवाद करून 'या प्राणालाच त्या आचमनानें आम्ही अनग्न करीत आहों, असें समजतात'-पृ. २९८-असा अनग्नताकरणसंकल्प या वाक्यानें आचमनीय आपांमध्यें प्राणविद्यासंबंधित्वानें अपूर्व असाच उपदेशिला जातो. [" अहोपण, प्राणविद्याप्रकरणांत अनग्नता-संकल्पाचें जर विधान केलें जात असेल तर वाक्यभेद कसा होणार नाहीं ? तो तर अवश्य होईलच !" अशी आशंका घेऊन भाष्यांत 'प्राणविद्यासंबंधित्वानें' असें म्हटलें आहे. 'अपूर्व:' या विशेषणानें त्यानें विधियोग्यत्व सुचविलें आहे. या विशेषणानें सूत्रांतील 'अपूर्व' या पदाचें व्याख्यान झालें.-आतां वाद्यानें 'अनग्नतासंकीर्तन आचमनाच्या स्तुत्यर्थ आहे' असें जें सांगितलें आहे.-पृ. ३००-त्याविषयीं 'न च०' इत्यादि भाष्यानें म्हणतात-]

**भाष्यं—न चायमनग्नतावाद आचमनस्तुत्यर्थ इति न्याय्यम्। आचमनस्या-विधेयत्वात्। स्वयं च अनग्नतासंकल्पस्य विधेयत्वप्रतीतेः। न चैवं सत्येकस्याच-मनस्योभयार्थताभ्युपगता भवति प्रायत्यार्थता परिधानार्थता चेति। क्रियान्तर-त्वाभ्युपगमात्। क्रियान्तरमेव ह्याचमनं नाम प्रायत्यार्थं पुरुषस्याभ्युपगम्यते। तदीयासु त्वप्सु वास:संकल्पनं नाम क्रियान्तरमेव परिधानार्थं प्राणस्याभ्युप-गम्यत इत्यनवद्यम्॥**

**भाष्यार्थ**—आणि अनग्नतावाद आचमनाच्या स्तुतीसाठीं आहे, हें म्हणणें न्याय्य नाहीं. कारण आचमनाला अविधेयत्व आहे. [स्तोतव्य-स्तुति करण्यास योग्य असलेल्या विधेयाच्या अभावीं स्तुति अयुक्त आहे. कारण विधेयच स्तुतीला पात्र असतें, असा भावार्थ.-शिवाय अप्राप्त विधेयाची प्राप्तानें स्तुति केली जाते. पण अनग्नतासंकल्प दुसऱ्या प्रमाणानें प्राप्त नाहीं कीं ज्यामुळें तो आचमनाचा स्तावक-स्तुति करणारा होईल ! आचमन अन्य प्रमाणानें अप्राप्त आहे, असेंहि नाहीं, कीं ज्यामुळें तें विधेयत्वानें स्तोतव्य-स्तुतीस पात्र होईल, असें '**स्वयं च०**' इत्यादि भाष्यानें सांगतात-]=आणि अनग्नतासंकल्पाला **स्वत:च**-स्वभाव-त:च विधेयत्व आहे अशी प्रतीति येते. त्यामुळें त्याला आचमनस्तुत्यर्थत्व असणें न्याय्य नाहीं. [-" अहोपण, शुद्धीसाठीं विनियुक्त असलेल्या-विनियोग केलेल्या आचमनाला प्राणपरिधानार्थत्व आहे, असें म्हटल्यास विनियुक्तविनियोग हा विरोध येईल, म्ह० ज्याचा विनियोग केला आहे त्याचाच पुनः विनियोग करणें हा दोष येईल." अशी आशंका घेऊन आचार्य '**न च एवं०**' इत्यादि म्हणतात-]

आणि असें असल्यामुळेंच एका आचमनाची शुद्ध्यर्थत्व व परिधानार्थत्व अशी उभयार्थता स्वीकारिली आहे, असें होत नाहीं. [–एका कर्माला एकार्थता असते असा उत्सर्ग–सामान्य नियम असल्यामुळें त्याचा बाध करणारें कांहीं विशेष कारण असल्यावांचून त्याच्या अनेकार्थत्वाची सिद्धि होत नाहीं, म्हणून या वाक्याला संकल्पविधिपरत्वच आहे असें सांगतात–]=' **क्रियान्तरत्व०**'–कारण आचमन हें क्रियान्तर आहे असा स्वीकार केलेला आहे. [–' **क्रियान्तरमेव०** '–इत्यादि भाष्यानें हा हेतूच साधितात–]=कारण आचमन हें पुरुषाच्या शुद्धीसाठीं क्रियान्तरच स्वीकरिलें जातें. पण त्या आचमनाच्या जलामध्यें वस्त्राचा संकल्प करणें या स्वरूपाचें क्रियान्तरच प्राणाच्या आच्छादनासाठीं स्वीकरिलें जातें. [–वस्त्राची कल्पना करणें या क्रियेहून आचमन भिन्न आहे म्हणून त्याला क्रियान्तरत्व आहे. आच्छादनार्थ केलेल्या संकल्पालाहि आचमनाहून भिन्नत्व असल्यामुळें त्यालाहि आचमनाहून क्रियान्तरत्व आहे. असा क्रियाभेद असतांना वरील उत्सर्गाचा भंग होत नाहीं असें ' **इत्यनवद्यम्** ' या भाष्यानें सांगतात–]=म्हणून ' एका आचमनाची उभयार्थता स्वीकारली आहे ' हा पूर्वोक्त दोष येत नाहीं. [–शिवाय दृष्टिविधीच्या साहचर्यामुळें येथेंहि तो दृष्टिविधीच युक्त आहे. आचमनविधि युक्त नाहीं, असें ' **अपि च०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]

**भाष्य–अपि च 'यदिदं किंचाश्वभ्य आकृमिभ्य आकीटपतंगेभ्यस्तत्तेऽन्नम्' इत्यत्र तावन्न सर्वान्नाभ्यवहारश्चोद्यत इति शक्यं वक्तुम् । अशब्दत्वादशक्यत्वाच्च । सर्वं तु प्राणस्यान्नमितीयमन्नदृष्टिश्चोद्यते । तत्साहचर्याच्च 'आपो वासः' इत्यत्रापि नापामाचमनं चोद्यते । प्रसिद्धास्वेव त्वाचमनीयास्वप्सु परिधानदृष्टिश्चोद्यत इति युक्तम् । न ह्यर्धवैशसं संभवति ॥**

**भाष्यार्थ**—शिवाय ' हें जें कांहीं कुत्र्यांपर्यंत, कृमीपर्यंत, कीट-पतंगांपर्यंत प्राण्यांचें अन्न आहे तें तुझें अन्न आहे'–पृ.२९७–या वाक्यांत त्या सर्व प्राण्यांच्या अन्नाचें भक्षण विहित आहे, असें म्हणतां येणें शक्य नाहीं. [–" या वाक्यांतहि सर्वान्नभक्षणच विहित आहे दृष्टि विहित नाहीं " अशी आशंका घेऊन भाष्यकारांनीं हें जें येथें सांगितलें आहे त्याविषयीं विधिवाचकाचा अभाव हा हेतु– ' **अशब्दत्वात्०**' या भाष्यानें सांगतात–]=कारण सर्वान्नभक्षणविधीचा वाचकशब्द प्रस्तुत वाक्यांत नाहीं. [–" अहोपण, ' अन्न ' या शब्दाच्या सामर्थ्यानेंच भक्षण प्रतीत होतें " अशी आशंका घेऊन '**अशक्यत्वाच्च०**' असें म्हणतात–] =शिवाय प्राणोपासकाचें सर्वान्नभक्षण अशक्य आहे. [–भक्ष्याभक्ष्यविधिविरोधा-

मुळें श्वादिकांपर्यंत प्राण्यांचें सर्वान्न एकालाच खातां येणें शक्य नाहीं. प्राणोपासनेच्या सामर्थ्यामुळें असामर्थ्यविरोधाचें जें समाधान केलें जातें तें 'सर्वान्नानुमित्यधिकरणांत'–सु.ब्र. पृ.४०९–निरसन करण्यास योग्य आहे असा याचा भावार्थ. –"अहोपण, वाचकशब्दाचा अभाव दृष्टिपक्षींहि समान आहे. त्यामुळें त्या दृष्टीलाहि भक्षणाप्रमाणेंच अविधेयत्व आहे," अशी आशंका घेऊन 'शब्दाकडून दृष्टि नित्य साहचर्यानेंच केली जाते. भक्षणाला शब्दजन्यत्व व शब्दज्ञाप्यत्व नाहीं. म्हणून दृष्टिविधीमुळेंच त्याची शांति झाली असतां अनुपपत्तिक ज्ञानाचे उत्थान होत नाहीं. यास्तव हें दृष्टिविधानच आहे,'असें 'सर्वं तु०'इत्यादि भाष्यानें सांगतात–]= =पण 'हें सर्व प्राणाचें अन्न आहे,' अशी ही अन्नदृष्टि सांगितली जाते. [–"तथापि प्रकृत संकल्पविधींत तिचा काय उपयोग? 'तत्साहचर्यात्०' इत्यादि भाष्यानें उत्तर–]=व तिच्या साहचर्यामुळें 'आप वस्त्र आहे' अशा या वाक्यांतहि आपांचें आचमन विहित नाहीं, आपांच्या आचमनाचें विधान केलें जात नाहीं [–"प्रकरणविरोधामुळें वाक्याला क्रियाविधिपरत्व जर नसेल तर त्याला किंपरत्व आहे, त्याचें तात्पर्य कशांत आहे?" 'प्रसिद्धासु०' इत्यादि भाष्यानें उत्तर–]=तर या प्रसिद्ध आचमनीय आपामध्यें परिधानदृष्टीचें विधान केलें जातें, असें समजणेंच युक्त आहे. [–"बरें, सर्वान्नवाक्यांत दृष्टिविधि असू दे, पण आचमनवाक्यांत क्रियाच विहित आहे." 'न हि०' इत्यादि भाष्यानें उत्तर–]=कारण अर्धवैशस संभवत नाहीं.–अ.१.पृ.३७२–[–याहि कारणानें येथें आचमनविधि नाहीं, असें 'अपि च०' इत्यादि भाष्यानें सांगतात–]

**भाष्यं**—अपि चाचामन्तीति वर्तमानापदेशित्वान्नायं शब्दो विधिक्षमः। **ननु मन्यन्त इत्यपि समानं वर्तमानापदेशित्वम्। सत्यमेव तत्। अवश्यविधेये त्वन्यतरस्मिन्वासःकार्याख्यानादपां वासःसंकल्पनमेवापूर्वं विधीयते। नाचमनं। पूर्ववद्धि तद् इत्युपपादितम्॥**

**भाष्यार्थ**—शिवाय 'आचमन करितात,' असा वर्तमानकालाचा प्रयोग केलेला असल्यामुळें हा शब्द विधीला क्षम–समर्थ नाहीं. [–"तर मग त्याच दोषामुळें चिंतनहि विधेय नाहीं!" अशी 'ननु०' इत्यादि भाष्यानें शंका–]= "अहोपण, 'मन्यन्ते'–आम्ही प्राणाला अनग्न करणारे आहोंत, असें समजतात, चिंतन करितात, असें हेंहि वर्तमानापदेशित्व–वर्तमानप्रयोगित्व समान आहे!" [आचमन व चिंतन यांचा वर्तमानापदेश–वर्तमानकालनिर्देश स्वीकारितात–] =होय, तें खरेंच आहे. [–"तर मग त्या दोहोंनाहि अविधेयत्व आहे," अशी

आशंका घेऊन 'नुस्ता अनुवाद अकिंचित्कर–व्यर्थ आहे व त्या दोहोंतील कोणा तरी एकाचा विधि तर अवश्य आहे. यास्तव संकल्पनच–चिंतनच विधेय आहे,' अशी दुसऱ्या प्रकारें सूत्राची योजना 'अवश्यविधेये०' इत्यादि भाष्यानें करितात–]=पण त्या दोहोंतील कोणत्या तरी एकाला विधेयत्व असणें अत्यंत अवश्य झालें असतां 'वासःकार्याचें अन्वाख्यान केलेलें असल्यामुळे–वस्त्राच्या कार्याचें कथन केलेलें असल्यामुळें आपांचें अपूर्व–दुसऱ्या प्रमाणानें अप्राप्त वस्त्र-चिंतनच विहित आहे, त्याचेच विधान केलें जातें, आचमनाचें विधान केलें जात नाहीं.' [–त्याविषयीं हेतुत्वानें सांगितलेल्या आचमनाच्या अन्यतः प्राप्तीचें स्मरण देतात–]=कारण तें पूर्ववत्–पूर्वप्राप्तच आहे, असें वर पृ. ३००–उपपादन केलें आहे. [–'यदपि०' इत्यादि भाष्यानें पूर्वपक्षाच्या बीजाचा अनुवाद करून त्याला दूषित करितात–]

**भाष्यं—यदप्युक्तं विस्पष्टा चाचमने विधिविभक्तिरिति । तदपि पूर्ववत्त्वेनैवाचमनस्य प्रत्युक्तम् । अत एव आचमनस्याविधित्सितत्वात् 'एतमेव तदनमनग्नं कुर्वन्तो मन्यन्ते' इत्यत्रैव काण्वाः पर्यवस्यन्ति नामनन्ति 'तस्मादेवंवित्' इत्यादि । तस्मान्माध्यंदिनानामपि पाठे आचमनानुवादेनैवंवित्त्वमेव प्रकृतप्राणवासोवित्त्वं विधीयते इति प्रतिपत्तव्यम् ॥**

**भाष्यार्थ**—आतां 'आचमनामध्यें विधिविभक्ति अत्यंत स्पष्ट आहे' असेंहि जें म्हटलें आहे त्याचेंहि प्रत्याख्यान आचमनाच्या पूर्ववत्त्वानेंच–अपूर्वत्वाच्या अभावानें–पूर्वसिद्धित्व या हेतूनेंच केलें आहे.[त्यांतील श्रुतिविधिविभक्ति अनग्नता-संकल्पपरत्वानें न्यावी, ती तत्पर आहे, असा निर्णय करावा. किंवा 'जर्तिलयवाग्वा जुहुयात्' याप्रमाणें आचमनाचें विधित्व अविवक्षित आहे,–असा भावार्थ. –आचमनाच्या अविधेयत्वाविषयीं 'अत एव०' इत्यादि भाष्यानें लिंगान्तर सांगतात–]=म्हणूनच–आचमनाला अविधित्सितत्व असल्यामुळें–त्याचें विधान विवक्षित नसल्यामुळें 'याच प्राणाला त्या आचमनानें आम्ही अनग्न करीत आहों, असें मानितात–असें चिंतन करितात'–पृ. २९७–अशा या कथनांतच काण्व पर्यवसान पावतात–ते एवढेंच सांगून तेथें थांबतात. पुढें 'म्हणून प्राणोपासकानें भोजन करितांना पूर्वी व तें केल्यानंतर आचमन करावें' असें आमनन करीत नाहींत. [–"तरमग 'आचामेत्' हा माध्यंदिनांचा पाठ व्यर्थ होऊं नये, म्हणून त्यांच्या आचमनांत विधि मानावा" अशी आशंका घेऊन, दुसऱ्या श्रुतीच्या अनुसार त्यांतहि चिंतनच विधेय आहे असें 'तस्मात्०' इत्यादि भाष्यानें सांगतात–]

=म्हणून माध्यंदिनांच्याहि पाठांत आचमनाच्या अनुवादानें 'एवंवित्त्वच' म्ह० त्यांत प्रकृत प्राणाच्या वस्त्राचें चिंतनच विहित आहे–आचमनीय जलांत प्राणाच्या आच्छादनाचें चिंतनच सांगितलें असें समजणें युक्त आहे. [ 'यत् आचामेत तत् एवंविद्' असें त्यांत वेदनाचेंच विधान केलें जातें, असा याचा भावार्थ. –"अहोपण, शाखाभेदानें उदित-अनुदितहोमाप्रमाणें–पृ.२७१–तें दोन्हीं म्ह० आचमन व अनग्नताचिंतन विधेय आहे" या एकदेशिमताची आशंका घेऊन 'योऽप्ययं०' इत्यादि भाष्यानें म्हणतात–]

**भाष्यं—योऽप्ययमभ्युपगमः क्वचिदाचमनं विधीयतां क्वचिद्वासोविज्ञानमिति सोऽपि न साधुः। 'आपो वास' इत्यादिकाया वाक्यप्रवृत्तेः सर्वत्रैकरूप्यात्। तस्माद्वासोविज्ञानमेवेह विधीयते नाचमनमिति न्याय्यम्॥१८॥(९)**

**भाष्यार्थ**—आतां 'कोठें आचमनाचें विधान केलें जावो व कोठें वस्त्रचिंतनाचें विधान केलें जावो' असाहि जो अभ्युपगम आहे, तोहि साधु–निर्दोष नाहीं. कारण 'आप वस्त्र आहे' इत्यादि ही वाक्यप्रवृत्ति सर्वत्र–पूर्वोक्त तिन्ही वाक्यांत एकरूप–एकसारखीच आहे. [–याप्रमाणें एकदेशीच्या व्यवस्थेचा असंभव झाला असतां याचें फलित सांगतात–]='**तस्मात्०**' म्हणून वासोविज्ञानाचेंच–वस्त्रचिंतनानेंच येथें विधान केलें जातें. आचमनाचें विधान केलें जात नाहीं, हेंच न्याय्य आहे. १८. सु. ब्र. ३२३-२४. (९)

## ( १० समानाधिकरण. सू. १९. )

–पूर्वाधिकरणांत प्राप्त आचमनाच्या अनुवादानें प्राणाचें अनग्नताचिंतन विधेय आहे, असें सांगितलें. पण या अधिकरणांत "दोन वाक्यांतील कोणत्या वाक्याला विधित्व आहे व कोणत्या वाक्याला अनुवादित्व आहे, याचा निश्चय होत नसल्यामुळें दोन्ही वाक्यांना विध्यविधित्व आहे," अशी आशंका घेऊन '**समाने०**' इत्यादि सूत्रानें सूत्रकार सिद्धान्त सांगतात–

## सूत्रं—समान एवं चाभेदात्॥१९॥ (१०)

**सूत्रार्थ**—भिन्न शाखांतील विद्येला जसें एकत्व व गुणोपसंहार आहे त्याचप्रमाणें 'समान-'शाखेंतील विद्येला एकत्व व गुणोपसंहार असणेंच युक्त आहे. कारण दोन्ही ठिकाणीं मनोमयत्वादि-गुणविशिष्ट उपास्याला एकत्व आहे.१९.(१०) सु.ब्र.३२५–[शांडिल्यवाक्याचा उल्लेख '**वाजसनेयि०**' इत्यादि भाष्यानें करितात–]

**भाष्यं—वाजसनेयिशाखायामग्निरहस्ये शांडिल्यनामांकिता विद्या विज्ञाता। तत्र च गुणाः श्रूयन्ते– 'स आत्मानमुपासीत मनोमयं प्राणशरीरं भारूपम्'**

**इत्येवमादय: । तस्यामेव शाखायां बृहदारण्यके पुन: पठ्यते—'मनोमयोऽयं पुरुषो भा:सत्यस्तस्मिन्नंतर्हृदये यथा व्रीहिर्वा यवो वा स एष सर्वस्येशान: सर्वस्याधिपति: सर्वमिदं प्रशास्ति यदिदं किं च ' इति ॥**

**भाष्यार्थ**—वाजसनेयि-शाखेंतील अग्निरहस्यांत 'शांडिल्य' या नांवानें अंकित–चिह्नित अशी विद्या विज्ञात झाली आहे. [ शांडिल्यानें पाहिलेली, म्हणून त्याच्या नांवानें अंकित–चिह्नित–विशेषित विद्या आहे, असा भावार्थ.]='**तत्र०**'–त्या विद्येंत "त्यानें मनोमय, भारूप–प्रकाशरूप, प्राणशरीर–प्राणच ज्याचें शरीर आहे अशा आत्म्याची उपासना करावी." इत्यादि गुण श्रुत आहेत. त्याच वाजसनेयिशाखेच्या बृहदारण्यकोपनिषदांत पुन: "हा पुरुष मनोमय आहे. 'भा: '–प्रकाश हेंच ज्याचें स्वरूप आहे तो 'भा:सत्य: '–भास्वर प्रकाशमान होणारा, तो त्या अंत-र्हृदयांत जसा व्रीहि किंवा यव असतो तेवढ्या प्रमाणाचा आहे. तो हा सर्वांचा स्वामी, सर्वांचा अधिष्ठाता, हें जें कांहीं सर्व जगत् आहे त्याचा प्रशास्ता आहे." –बृ. ५. ६. १. सु.उ. ७१४–असें पठित आहे. [–या शाखेंत देशभेदानें केलेल्या विद्येला विषय करून–त्याविषयीं अभ्यास व प्रत्यभिज्ञान या दोन कारणांनीं येणारा संशय '**तत्र संशय:०** ' इत्यादि भाष्यानें सांगतात–]

**भाष्यं**—**तत्र संशय:—किमियमेका विद्या अग्निरहस्यबृहदारण्यकयोर्गुणोप-संहारश्च । उत द्वे इमे विद्ये गुणानुपसंहारश्चेति । किं तावत्प्राप्तम् । विद्याभेदो गुणव्यवस्था चेति । कुत: । पौनरुक्त्यप्रसंगात् । भिन्नासु हि शाखास्वध्येतृ-वेदितृभेदात्पौनरुक्त्यपरिहारमालोच्य विद्यैकत्वमध्यवसाय एकत्रातिरिक्ता गुणा इतरत्रोपसंह्रियन्ते प्राणसंवादादिषु इत्युक्तम् ॥**

**भाष्यार्थ**—त्याविषयीं 'काय, अग्निरहस्य व बृहदारण्यक यांतील ही एक विद्या आहे व तिच्यामध्यें परस्परगुणांचा उपसंहार होतो, कीं त्या दोन विद्या आहेत व त्यामुळें त्यांच्या गुणांचा परस्पर गुणोपसंहार होत नाहीं ?' असा संशय येतो. [यांत विद्याभेदादिनिरूपणाच्याद्वारा वाक्यार्थज्ञानसाधनाचेंच निरूपण केलेलें असल्यामुळें याच्या पादादिसंगति आहेत. पूर्वपक्षांत 'पुनरुक्ततादोषाच्या परि-हारासाठीं विद्याभेद व विद्येच्या भेदामुळें गुणांचा परस्पर अनुपसंहार ' आणि सिद्धान्तांत 'विद्येचें ऐक्य जरी असलें तरी अपुनरुक्ततेमुळें गुणांचा उपसंहार' असें मानून विमर्शपूर्वक–' **किं तावत्०** ' इत्यादि भाष्यानें पूर्वपक्ष करितात–] =मग त्या दोन पक्षांतील प्रथम कोणता पक्ष प्राप्त झाला ? 'विद्येचा भेद व गुणांची व्यवस्था–त्या विद्येचे गुण त्याच विद्येंत घ्यावे ' हा पक्ष प्राप्त झाला.

[ पण 'गौरव' या दोषानें दूषित झालेलें विद्येचें नानात्व अयुक्त आहे–]='**कुतः**'–कोणत्या कारणानें विद्याभेद व गुणांची व्यवस्था प्राप्त होते?[–पण प्रमाणसिद्धगौरव हा दोष नव्हे, असें मानून पूर्ववादी म्हणतो–]='**पौनरुक्त्यप्रसंगात्**'–पुनरुक्ततेचा प्रसंग येत असल्यामुळें. [–" भिन्न शाखांतील विद्येला एकत्व जरी असलें तरी पुनरुक्ततेची उपलब्धि होत असल्यामुळें 'जेथे विद्येचा भेद असतो तेथें पुनरुक्तत्व असतें ' अशी व्याप्ति मानितां येत नाहीं " अशी आशंका घेऊन वादी '**भिन्नासु हि०**' इत्यादि भाष्यानें म्हणतो–]=कारण भिन्न भिन्न शाखांमध्यें अध्येतृ–अध्ययन करणारे व वेदितृ–उपासक यांचा भेद असल्यामुळें पुनरुक्ततेच्या परिहाराचें आलोचन करून, विद्येच्या एकत्वाचा निश्चय करून, एका विद्येत अधिक असलेल्या गुणांचा दुसऱ्या प्राणसंवादादिविद्यांमध्यें उपसंहार केला जातो, असें सांगितलें आहे. [ अध्येतृभेदानें शब्दांच्या पौनरुक्त्याचा व वेदितृभेदानें अर्थपौनरुक्त्याचा परिहार केला जातो, असा भावार्थ.–" अहोपण, शाखेचा अभेद जरी असला म्हणजे शाखा जरी एकच असली तरी भिन्न प्रदेशीं सांगितलेल्या विद्येच्या फलाची इच्छा करणारांना ज्ञातृत्व असल्यामुळें व त्या त्या वाक्याचें अध्येतृत्व असल्यामुळें अपुनरुक्तत्वच आहे, " अशी आशंका घेऊन ' शाखेचें अध्ययन नित्य विधित्वानेंच प्राप्त असल्यामुळें असें म्हणतां येत नाहीं ' असें पूर्ववादी ' **एकस्यां पुनः०** ' इत्यादि भाष्यानें सांगतो–]

**भाष्यं—एकस्यां पुनः शाखायां अध्येतृवेदितृभेदाभावादशक्यपरिहारे पौनरुक्त्ये न विप्रकृष्टदेशस्थैका विद्या भवितुमर्हति । न चात्रैकमाम्नानं विद्याविधानार्थं अपरं गुणविधानार्थमिति विभागः संभवति । तदा ह्यतिरिक्ता एव गुणा इतरत्रेतरत्र चाम्नायेरन्न समानाः। समाना अपि तूभयत्राम्नायन्ते मनोमयत्वादयः । तस्मान्नान्योन्यगुणोपसंहार इति ॥**

**भाष्यार्थ**–पण याच्या उलट एका शाखेंतील अध्ययन करणारे व वेदितृ–अर्थज्ञाते यांचा भेद नसल्यामुळें ज्याचा परिहार करणें अशक्य आहे, असें पौनरुक्त्य असतांना दूर–भिन्न प्रदेशांतील विद्या एक असणे युक्त नाहीं. [–" पण 'अग्निहोत्रं जुहोति'–अग्निहोत्राचें हवन करितो, येथें सिद्ध असलेल्या ' जुहोति-' अर्थाचा अनुवाद करून 'दध्ना जुहोति'–दह्यानें होम करितो, अशा या गुणविधीप्रमाणें येथेंहि होऊं शकेल. त्यामुळें पौनरुक्त्य नाहीं" अशी आशंका घेऊन वादी **' न च० '** इत्यादि भाष्यानें म्हणतो–]=आणि येथें एक आम्नान विद्याविधानासाठीं व दुसरें गुणविधानासाठीं आहे, असा विभागहि संभवत नाहीं.[दोन्ही वाक्यांमध्यें

कांहीं विशेषत्व दिसत नाहीं. त्यामुळें त्यांतील अमुक एक वाक्याला विधित्व आहे व अमक्याला अनुवादत्व आहे, असा निश्चय होत नाहीं व समान गुणकथनाला व्यर्थत्व आहे, म्हणून अशी व्यवस्था संभवत नाहीं, असें ' **तदा०** ' इत्यादि भाष्यानें वादी म्हणतो–]=कारण तसा विभाग जर संभवत असता तर एका ठिकाणीं सांगितलेल्या गुणांहून निराळेच गुण दुसऱ्या दुसऱ्या ठिकाणीं सांगितले असते, दोन्ही ठिकाणीं समान–एकसारखेच गुण पठित नसते. पण दोन्ही ठिकाणीं मनोमयत्वादि समान गुणहि पठित आहेत. [–म्हणून पौनरुक्त्य दोष येऊं नये, यासाठीं येथें विद्याभेद आहे व विद्येच्या भेदामुळें गुणांचा अनुपसंहार आहे, असा वादी पूर्वपक्षाचा उपसंहार करितो–]=' **तस्मात्०** '–त्यामुळें अन्योन्य गुणोपसंहार होत नाहीं. [–'**एवं०**' इत्यादि भाष्यानें उक्त पूर्वपक्षाचा अनुवाद करून सिद्धान्त–]

**भाष्यं— एवं प्राप्ते ब्रूमहे— यथा भिन्नासु शाखासु विद्यैकत्वं गुणोपसंहारश्च भवति । एवमेकस्यामपि शाखायां भवितुमर्हति । उपास्याभेदात् । तदेव हि ब्रह्म मनोमयत्वादिगुणकमुभयत्राप्युपास्यमभिन्नं प्रत्यभिजानीमः । उपास्यं च रूपं विद्यायाः । न च विद्यमाने रूपाभेदे विद्याभेदमध्यवसातुं शक्नुमः । नापि विद्याऽभेदे गुणव्यवस्थानम् ॥**

**भाष्यार्थ**—असा पूर्वपक्ष प्राप्त झाला असतां आम्ही असें सांगतों–ज्याप्रमाणें भिन्न शाखांतील विद्येला एकत्व असतें व त्यामुळें तिच्या गुणांचा–परस्पर उपसंहार होतो, ' एवं च समाने '–त्याचप्रमाणें एक शाखेंतहि होणें योग्य आहे. [–' अभेदात् ' या सूत्रोक्त हेतूचा अनुवाद करून त्याचें व्याख्यान–]=' **उपास्याभेदात्** '–उपास्याचा अभेद असल्यामुळें. कारण तेंच ब्रह्म मनोमयत्वादिगुणयुक्त असेंच दोन्ही ठिकाणीं एक उपास्य आहे, असें आम्ही ओळखितों, आम्हांला दोन्ही ठिकाणीं अभिन्न उपास्याचीच प्रत्यभिज्ञा होते. [–"उपास्याचें ऐक्य जरी प्रत्यभिज्ञात होत असलें तरी विद्येला ऐक्य नाहीं. कारण विद्येच्या ऐक्याविषयीं कांहीं हेतु नाहीं," अशी आशंका घेऊन 'रूपाचा अभेद हा हेतु आहे,' असें '**उपास्यं च०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=आणि उपास्य हेंच विद्येचें रूप आहे. [–त्याचें हेतुत्वच विशद करितात–]='**न च०**'–आणि रूपाचा अभेद असतांना आम्ही विद्येचा भेदनिश्चित करण्यास समर्थ नाहीं. [ कारण तसा निश्चय करूं लागल्यास प्रत्यभिज्ञेशीं विरोध येतो.–' **नापि०** ' इत्यादि भाष्यानें विद्येचें ऐक्य सिद्ध झालें असतां त्याचें फलित सांगतात–]=तसेंच विद्येचा अभेद असतांना गुणांची व्यवस्था–पर-

स्पर अनुपसंहार मानण्यासहि आम्ही समर्थ नाहीं. [–वादी 'ननु०' इत्यादि भाष्यानें अध्येतृ-वेदितृभेदाच्या अभावामुळें वर सांगितलेल्या पौनरुक्त्याची आठवण देतो–]

**भाष्यं**––ननु पौनरुक्त्यप्रसंगाद्विद्याभेदोऽध्यवसितः । नेत्युच्यते । अर्थविभागोपपत्तेः । एकं ह्याम्नानं विद्याविधानार्थमपरं गुणविधानार्थमिति न किंचिन्नोपपद्यते । नन्वेवं सति यदपठितमग्निरहस्ये तदेव बृहदारण्यके पठितव्यम् 'स एष सर्वस्येशानः' इत्यादि । यत्तु पठितमेव 'मनोमयः' इत्यादि तन्न पठितव्यम् ॥

**भाष्यार्थ**—अहोपण, आम्हीं पूर्वपक्षांत पौनरुक्त्यप्रसंगामुळें विद्याभेद निश्चित केला आहे ! [–पण अर्थभेदाच्या संभवामुळें पौनरुक्त्य होत नाहीं, असें 'नेत्युच्यते०' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=पण तसें होत नाहीं, असें आम्हांकडून सांगितलें जातें. कारण त्या दोन प्रदेशीं भिन्न अर्थ उपपन्न होतो, अर्थाचा विभाग संभवतो. [–" अहोपण, त्या दोन वाक्यांत विशेष कांहींच दिसत नाहीं. तेव्हां त्यांतील कोणत्या वाक्याचा कोणतें वाक्य अनुवाद आहे, याचा निश्चय होत नाहीं. त्यामुळें अर्थविभागाची सिद्धि होत नाहीं," अशी आशंका घेऊन 'ज्यांत पुष्कळ–अधिक गुणांचें विधान केलें जातें त्यांत प्रधानविधि व अन्यत्र त्याच्या अनुवादानें गुणविधि,' असा विभाग मानून आचार्य 'एकं हि०' इत्यादि भाष्यानें म्हणतात–]=कारण त्यांतील एक आम्नान–एक पाठ विद्याविधानासाठीं व दुसरें आम्नान गुणविधानासाठीं असल्यामुळें त्यांत अनुपपन्न असें कांहींच नाहीं. [–वादी आपल्या पूर्वोक्त समानगुणकथनाच्या व्यर्थत्वाचें स्मरण देतो–] =' ननु० '–अहोपण, बृहदारण्यकांत प्रधानविधि व अग्निरहस्यांत गुणविधि, असा विभाग जर असेल तर अग्निरहस्यामध्यें जें अपठित असेल तेवढेंच बृहदारण्यकांत पठन करणें–सांगणें उचित होय. जसें–'तो हा सर्वांचा ईशान' इत्यादि, पण जें अग्निरहस्यांत पठित असलेलेंच 'मनोमयः' इत्यादि त्याचें पुनः पठन करणें योग्य नाहीं. [–प्रत्यभिज्ञेच्या दृढतेसाठीं समानगुणांचें कथन अर्थवान्–उपयोगी आहे, असें 'नैष दोषः०' इत्यादि भाष्यानें सांगतात–]

**भाष्यं**––नैष दोषः । तद्बलेनैव प्रदेशान्तरपठितविद्याप्रत्यभिज्ञानात् । समानगुणाम्नानेन हि विप्रकृष्टदेशां शांडिल्यविद्यां प्रत्यभिज्ञाप्य तस्यामीशानत्वाद्युपदिश्यते । अन्यथा हि कथं तस्यामयं गुणविधिरभिधीयते ॥

**भाष्यार्थ**––पण हा दोष येत नाहीं. कारण त्या समानगुणांच्या पाठसामर्थ्यानेंच प्रदेशान्तरीं पठित असलेल्या विद्येचें प्रत्यभिज्ञान होतें. त्यामुळें तो दोष येत नाहीं.

[-' **समान०** ' इत्यादि भाष्यानें हेंच स्पष्ट करितात-]=कारण समानगुणांच्या आम्नानानेंच दूर-भिन्न प्रदेशीं असलेल्या शांडिल्यविद्येची प्रत्यभिज्ञा-ओळख करून देऊन तिच्यामध्यें ईशानत्वादिकांचा उपदेश केला जातो. [-" पण प्रत्यभिज्ञान आकिंचित्कर-व्यर्थ-निरुपयोगी आहे," अशी आशंका घेऊन '**अन्यथा०**' इत्यादि भाष्यानें सांगतात-]=कारण तसें जर नसतें-शांडिल्यविद्येची ओळख करून देऊन तिच्या ठिकाणीं ईशानत्वादिकांचा उपदेश जर केला गेला नसता तर बृहदारण्यकांतील गुणविधानासाठीं अग्निरहस्योक्त शांडिल्य विद्येमध्यें हा गुणविधि-ईशानत्वादि गुणकथन कसें केलें असतें, त्याचा उपदेश कसा केला असता ! [ अग्निरहस्योत्पन्न विद्येचा अनुवाद करून विशिष्टगुणत्वानें बृहदारण्यकांत तिच्यांतील गुणांचें विधान केलें आहे, असें सांगितलें.-आतां याहि कारणानें समान गुणोक्तीनें प्राप्त झालेल्या प्रत्यभिज्ञेची उपेक्षा करणें उचित नाहीं, असें ' **अपि च०** ' इत्यादि भाष्यानें सांगतात-]

**भाष्यं--अपि च अप्राप्तांशोपदेशेनार्थवति वाक्ये संजाते प्राप्तांशपरामर्शस्य नित्यानुवादतयाप्युपपद्यमानत्वान्न तद्बलेन प्रत्यभिज्ञा उपेक्षितुं शक्यते । तस्मादत्र समानायामपि शाखायां विद्यैकत्वं गुणोपसंहारश्च इत्युपपन्नम्।।१९।। (१०)**

**भाष्यार्थ**—शिवाय याहि कारणानें तुल्यगुणकथनानें होणाऱ्या प्रत्यभिज्ञेची उपेक्षा करितां येत नाहीं. [-हेंच अनुपेक्षितव्यत्व स्पष्ट करितात-]=अप्राप्त अंशाच्या उपदेशानें वाक्य अर्थवान्-सफल झालें असतां प्राप्त अंशाचा परामर्श नित्यानुवादत्वानेंहि उपपन्न होत असल्यामुळें त्याच्या बलानें प्रत्यभिज्ञेची उपेक्षा करितां येणें शक्य नाहीं.['अन्तरिक्षांत अग्निचयन करूं नये' 'आकाशांत करूं नये,'इत्यादि उदाहरणांत निष्फल अनुवादालाहि निर्दोषत्व असल्यामुळें, प्रकृत उदाहरणांत तुल्यगुणानुवादाला प्रत्यभिज्ञानार्थत्वानें अर्थवत्त्व असल्यामुळें, समान गुणोक्तीमुळें झालेल्या प्रत्यभिज्ञेची उपेक्षा करितां येत नाहीं. त्यामुळें ईशानत्वादि गुणयुक्त विद्याकथनानें समानार्थ बृहदारण्यकवाक्यांत मनोमयत्वादि तुल्यगुणानुवादाचा यथाकथंचित् संभव जरी असला तरी त्याला प्रधान प्रत्यभिज्ञापकत्वानें सफलत्व असल्यामुळें व तदधीन प्रत्यभिज्ञेला विशिष्ट विधिशेषत्व असल्यामुळें बृहदारण्यकांत गुणविधि व अन्यत्र-अग्निरहस्यांत प्रधानविधि आहे, असा भावार्थ.-याप्रमाणें पुनरुक्तीचा परिहार सिद्ध झाला असतां '**तस्मात्०**' इत्यादि भाष्यानें फलित सांगतात-]=म्हणून येथें समान शाखेंतहि विद्यैकत्व व गुणोपसंहार आहे, असें हें उपपन्न होतें. १९(१०).

(११. संबंधाधिकरण. सू.२०-२२.)

–विद्येचें ऐक्य असतां गुणोपसंहार सांगून तिचें ऐक्य असलें तरी गुणांच्या अनुपसंहाराचें स्थल सांगणारे सूत्रकार अगोदर 'संबंधात्०' इत्यादि सूत्रानें पूर्वपक्ष करितात–

## सूत्रं—संबंधादेवमन्यत्रापि ॥ २०

**सूत्रार्थ**—शांडिल्य विद्येंत 'एक विद्यात्वसंबंधामुळें' परस्पर गुणोपसंहार जसा सांगितला 'त्याप्रमाणें' 'अन्यत्रहि'–दुसऱ्या सत्यविद्येंतहि एकविद्यात्वसंबंधामुळें परस्पर नांवांचा उपसंहार होणें युक्त आहे. २०–सु. ब्र. ३२६–[–'बृहदारण्यके०' इत्यादि भाष्यानें विषय सांगतात–]

**भाष्यं**—बृहदारण्यके 'सत्यं ब्रह्म' इत्युपक्रम्य 'तद्यत्तत्सत्यमसौ स आदित्यो य एष एतस्मिन्मंडले पुरुषो यश्चायं दक्षिणेऽक्षन्पुरुषः' इति तस्यैव सत्यस्य ब्रह्मणोऽधिदैवतमध्यात्मं चायतनविशेषमुपदिश्य व्याहृतिशरीरत्वं च संपाद्य द्वे उपनिषदावुपदिश्येते। तस्योपनिषदहरित्यधिदैवतं।तस्योपनिषदहमित्यध्यात्मम्॥

**भाष्यार्थ**—बृहदारण्यांत 'सत्यं ब्रह्म' असा उपक्रम करून ['पूर्वी हें सर्व जगत् आपच होतें. त्या आपानें सत्याला उत्पन्न केलें.' या वाक्यांतील 'सत्य' हा शब्द हिरण्यगर्भवाची आहे. "तें हिरण्यगर्भाख्य सत्य ब्रह्म–महत् आहे" असा उपक्रम करून,असा याचा भावार्थ. ]='तत्'–असें असतांना'यत् तत् सत्यं' –तें जें सत्य ब्रह्म 'सः असौ आदित्यः'–तो हा आदित्य आहे. [ येथें ब्रह्म उद्देश्य व आदित्य विधेय आहे. त्या विधेय आदित्याच्या अपेक्षेनें पुल्लिंग प्रयोग केला आहे.–' तर मग काय, मंडल हाच का आदित्य?' याचें 'य एषः०' इत्यादि वाक्यानें 'नाहीं' असें उत्तर–]="हा जो या मंडलांत पुरुष आहे व जो हा या दक्षिण नेत्रांत पुरुष आहे," असें [ त्याचें स्थानभेदानें आदित्य-चाक्षुष-पुरुष-रूपानें अवस्थान सांगून ते हे दोघे परस्परांत प्रतिष्ठित आहेत. किरणांच्या योगानें हा आदित्य या चाक्षुषपुरुषांत प्रतिष्ठित आहे. प्राणांच्या योगानें हा चाक्षुषपुरुष त्या आदित्यपुरुषांत प्रतिष्ठित आहे, असा परस्पर संबंध सांगून आदित्यपुरुषाचें "हा जो या मंडलांत पुरुष आहे त्याचें 'भूः' हें शिर, 'भुवः' हे दोन बाहू, 'स्वर्' ही प्रतिष्ठा," असें व्याहृतिदेहत्व संपादन करून "त्याचें 'अहर्' असें उपनिषद्–रहस्यनाम" असें अहर्नामत्व सांगितलें आहे आणि त्यानंतर "जो हा दक्षिणनेत्रांतील पुरुष त्याचें 'भूः' हें शिर," इत्यादि वाक्यानें व्याहृतिदेहत्व संपादन करून "त्याचें 'अहं' असें उपनिषद्" असें 'अहं-'नामत्व सांगितलें

आहे. 'उपनिषद्' म्ह० देवतेजवळ घेऊन जाणारें–पोंचविणारें, या अर्थयोगानें देवताप्रकाशक रहस्यनाम सांगितलें जातें.'अहर्'हा शब्द प्रकाशवचन–प्रकाशवाचक व'अहं-'शब्द प्रत्यगात्मवाची आहे.–'तस्य०'इत्यादि भाष्यानें हेंच सांगतात-]=त्याच सत्यब्रह्माचा अधिदैवत व अध्यात्म आयतनविशेष–देवांतील व शरीरांतील विशेष स्थान सांगून–स्थानाचा उपदेश करून व त्यांचें व्याहृतिशरीरत्व संपादन करून –कल्पून दोन उपनिषदें–रहस्य नांवें सांगितलीं जातात–"त्याचें उपनिषद् 'अहर्' असें अधिदैवत व त्याचें उपनिषद् ' अहं ' असें अध्यात्म "–बृ. ५. ५.२-४ सु. उ. ७१३-१४–[ यांतील उपनिषद्द्वयाला विषय करून म्ह० त्या दोन नांवांविषयीं सत्य ब्रह्मैक्य व स्थानभेद यांच्या योगानें ' तत्र०' इत्यादि भाष्यानें संशय–]

**भाष्यं—तत्र संशयः—किमविभागेनैवोभे अप्युपनिषदावुभयत्रानुसंधातव्ये उत विभागेन एकाधिदैवमेकाध्यात्ममिति। तत्र सूत्रेणैवोपक्रमते—यथा शांडिल्यविद्यायां विभागेनाप्यधीतायां गुणोसंहार उक्तः। एवमन्यत्राप्येवंजातीयके विषये भवितुमर्हति ॥**

**भाष्यार्थ**—त्याविषयीं–"काय, दोन्ही उपनिषदांचें दोन्ही ठिकाणीं अविभागानेंच–अभेदानेंच अनुसंधान करावें कीं एक-अधिदैव व एक-अध्यात्म असें विभागानें अनुसंधान करावें ?" असा संशय येतो. [ या अधिकरणांत सत्यविद्येंतील उपनिषदांच्या व्यवस्थाकथनानें वाक्यार्थज्ञानहेतूचें चिंतन केलेलें असल्यामुळें याच्या पादादिसंगति आहेत. पूर्वपक्षांत 'विद्यैक्यामुळें गुणोपसंहार नियत आहे, असें झालें असतां दोन उपनिषदांचा संकर होतो. त्यामुळे अतिदेशाची असिद्धि होते.' पण सिद्धान्तांत 'विद्येला ऐक्य जरी असलें तरी स्थानभेदानें उपलब्ध झालेल्या गुणांच्या अनुपसंहारामुळें दोन उपनिषदांचा संकर होत नाहीं. म्हणून अतिदेश होतो'असें मानून पूर्वपक्षसूत्राचें ग्रहण करितात–]=**'तत्र०'**–असा संशय आला असतां सूत्रकार सूत्रानेंच पूर्वपक्षाला आरंभ करितात–[सूत्राक्षरांची योजना–]=**'यथा०'**–ज्याप्रमाणें विभागानेंहि–भेदानेंहि अधित असलेल्या शांडिल्यविद्येमध्यें गुणोपसंहार सांगितला आहे त्याचप्रमाणें दुसऱ्याहि अशा जातीच्या विषयांत तो होणें योग्य आहे, अशा प्रकारच्या दुसऱ्याहि विद्येंत गुणोपसंहार होणें उचित आहे. [–" अहोपण, विद्येचें जर ऐक्य असेल तर दोन उपनिषदांच्या संकराची शंका संभवेल. पण अगोदर सत्य विद्येला ऐक्य कसें आहे ?" **'एकविद्या०'** इत्यादि भाष्यानें उत्तर–]

**भाष्यं—एकविद्याभिसंबंधात्। एका ह्ययं सत्यविद्याधिदैवमध्यात्मं चाधीता। उपक्रमाभेदाद्व्यतिषक्तपाठाच्च। कथं तस्यां उदितो धर्मस्तस्यामेव न स्यात्। यो ह्याचार्ये कश्चिदनुगमनादिराचारश्चोदितः स ग्रामगतेऽरण्यगते च तुल्यवदेव भवति। तस्मादुभयोरप्युपनिषदोरुभयत्र प्राप्तिरिति॥२०॥ एवं प्राप्ते प्रतिविधत्ते—**

**भाष्यार्थ**—एक विद्याभिसंबंधामुळें कारण अधिदैव व अध्यात्म पठित असलेली ही सत्यविद्या एक आहे. [—विद्यैक्याविषयीं हेतु—]= **उपक्रमाभेदात्॰**'— 'सत्यं ब्रह्म' असा उपक्रम अभिन्न—एकच असल्यामुळें व 'ते दोघे परस्परांत प्रतिष्ठित आहेत' अशा व्यतिषिक्त—परस्पर संबद्ध पाठामुळें विद्येचें ऐक्य सिद्ध होतें. [—विद्येचें असें ऐक्य जरी असलें तरी त्यामुळें काय झालें? '**कथं॰**' इत्यादि भाष्यानें पूर्ववाद्याचें उत्तर—]=त्याच विद्येमध्यें सांगितलेला धर्म त्याच विद्येंत संग्राह्य नाहीं, असें कसें होईल? [—"आतांपण, विद्येचें ऐक्य जरी असलें तरी स्थानभेदामुळें दोन उपनिषदांचा असंकर होईल," अशी आशंका घेऊन '**यो हि॰**' इत्यादि भाष्यानें वादी दृष्टान्तानें परिहार करितो—]=कारण जो एखादा आचार्यामध्यें अनुगमनादि आचार विहित असतो तो ग्रामांत असलेल्या व अरण्यांत असलेल्या आचार्यामध्यें एकसारखाच होतो. [ 'त्याचें उपनिषद्' असा प्रकृत सत्याचा परामर्श केलेला असल्यामुळें त्या प्रधानाचा अभेद आहे. विशेषणत्वानें स्थानाला गौणत्व आहे. गुण व प्रधान यांतील प्रधानाचा संप्रत्यय येतो. त्याच्याशीं गुणांची व्याप्ति असल्यामुळें त्यांत त्यांचा उपसंहार होतो, असा भावार्थ.—याप्रमाणे विद्येचें ऐक्य असल्यामुळें गुणांचा उपसंहार नियत आहे, असे झालें असता वादी **तस्मात्॰**' इत्यादि भाष्यानें फलित सांगतो—]=म्हणून दोन्ही उपनिषदांची—रहस्यनांवांची दोन्हीं—आदित्य व चाक्षुष पुरुषांमध्यें प्राप्ति होते, असें प्राप्त झालें २०. [—सिद्धान्त—]='**एवं॰**' -असें प्राप्त झालें असतां '**न वा॰**' इत्यादि सूत्रानें सिद्धान्त—

## सूत्रं—न वा विशेषात् ॥ २१

**सूत्रार्थ**—'अहर्'व 'अहं' असा नांवांमध्यें 'विशेष असल्यामुळें दोन्हीं नांवांचा दोन्ही ठिकाणीं उपसंहार होतच नाहीं' २१.—सु.ब्र.३२६—[—सूत्रांतील 'वा' या शब्दाचा 'अवधारण' हा अर्थ मानून '**न वा॰**' इत्यादि भाष्यानें प्रतिज्ञेचा विभाग—]

**भाष्यं—नैव उभयोरुभयत्र प्राप्तिः। कस्मात्। विशेषात्। उपासनस्थानविशेषोपनिबंधादित्यर्थः। कथं स्थानविशेषोपनिबंध इत्युच्यते—'य एष एत-**

**स्मिन्मंडले पुरुषः' इति ह्याधिदैविकं पुरुषं प्रकृत्य तस्योपनिषदहरिति श्रावयति । 'योऽयं दक्षिणेऽक्षन्पुरुषः' इति चाध्यात्मिकं पुरुषं प्रकृत्य तस्योपनिषदहमिति ॥**

**भाष्यार्थ**—दोन उपनिषदांची दोन पुरुषांमध्यें प्राप्ति होतच नाहीं. [—"पण ध्येयाचा अभेद असला तरी ध्यानाचा भेद आहे. तेव्हां त्या दोहोंची दोन पुरुषांत प्राप्ति कशी नाहीं ?" असा आक्षेप—]=कोणत्या कारणानें ? [—'**विशेषात्**०' या सूत्रोक्त हेतूचें ग्रहण करून त्याचें व्याख्यान—]='विशेषामुळें'—उपासनेच्या स्थानविशेषाच्या उपनिबंधामुळें, असा भावार्थ. [ध्यान-ध्येय-उपसर्जनभूत जे दोन स्थानविशेष, त्यांच्याशीं दोन नांवांचा संबंध असल्यामुळें त्याची व्यवस्था युक्त आहे, असा भावार्थ.—'तस्य' या शब्दानें ज्याचा परामर्श केला आहे अशा ब्रह्माच्या दोन नांवांचें विधान करावयाचें असतांना त्यांचा स्थानविशेषसंबंध असिद्ध आहे, अशी शंका—]='**कथं**०'—नांवांचा स्थानविशेषोपनिबंध—स्थानविशेषयोग कसा ? '**इति**'—असें जर विचाराल तर [—दोन उपनिषदांचा स्थानविशेषयोग साधितात—]=तो स्थानविशेषयोग सांगितला जातो—"जो हा या मंडलांत पुरुष आहे"—पृ. ३१२—अशा आधिदैविक पुरुषाच्या प्रकरणास आरंभ करून त्याचें 'अहर्' असें उपनिषद—रहस्यनाम श्रुति सांगते व "जो हा दक्षिण नेत्रांतील पुरुष"—पृ. ३१२—अशा आध्यात्मिक पुरुषाच्या प्रकरणास आरंभ करून त्याचें 'अहं' असें उपनिषद सांगते. [—'तत्' या शब्दानें परामृष्ट—परामर्श केलेलें निष्कृष्ट—शुद्ध ब्रह्मच दोन उपनिषदांशीं संबद्ध होतें, अशी आशंका घेऊन '**तस्येति**०' इत्यादि भाष्यानें उत्तर—]

**भाष्यं**—**तस्येति चैतत्संनिहितावलंबनं सर्वनाम । तस्मादायतनविशेषव्यपाश्रयेणैवैते उपनिषदावुपदिश्येते । कुत उभयोरुभयत्र प्राप्तिः । नन्वेक एवायमधिदैवतमध्यात्मं च पुरुषः । एकस्यैव सत्यस्य ब्रह्मणः आयतनद्वयप्रतिपादनात् । सत्यमेवमेतत् । एकस्यापि त्ववस्थाविशेषोपादानेनैव उपनिषद्विशेषोपदेशात् तदवस्थस्यैव सा भवितुमर्हति ॥**

**भाष्यार्थ**—ज्याचें आलंबन—आधार संनिहित आहे असें 'तस्य' हें सर्वनाम आहे. [दोन्ही वाक्यांतील 'तस्य उपनिषद्' या 'तत्'-शब्दानें अधिदैवादि-विशिष्टाचाच परामर्श केला आहे. दोन्ही नांवांचा त्याच्याशींच संबंध आहे. केवल शुद्ध स्वरूपाशीं त्यांचा संबंध नाहीं. म्हणून त्या दोन नांवांचें व्यवस्थेनें—जेथल्या तेथेंच अनुसंधान करावें. कारण सर्वनाम समीपवर्ती वस्तूला सोडून व्यवहित—दूरच्या वस्तूला स्पर्श करीत नाहीं, असा भावार्थ.—याप्रमाणें 'तत्' या

शब्दाचा विशिष्ट ब्रह्म हा अर्थ आहे, असें झालें असतां 'तस्मात्०' इत्यादि भाष्यानें फलित सांगतात–]=म्हणून स्थानविशेषाच्या आश्रयानेंच हीं दोन नांवें उपदेशिलीं जातात. तेव्हां दोन्ही नांवांची दोन्ही पुरुषांमध्यें प्राप्ति कोणत्या कारणानें होणार ? [–"अहोपण, विशेषणांचा भेद जरी असला तरी विशेष्याचा अभेद असल्यामुळें त्या दोन नांवांचा दोन पुरुषांमध्यें परस्पर उपसंहार होईल," अशी आशंका–] ='ननु०'–अहोपण, हा आधिदैवत व अध्यात्म पुरुष एकच आहे. कारण एकाच सत्य ब्रह्माच्या स्थानद्वयाचें प्रतिपादन केलें आहे! [–आचार्य 'सत्यमेवैतत्' इत्यादि भाष्यानें विशेष्याच्या अभेदाचा अंगीकार करितात–]=हें खरेंच आहे. [–" तर मग उपनिषदांची व्यवस्था कशी ? नांवांचा परस्पर उपसंहार कसा होत नाहीं?" अशी आशंका घेऊन 'कारण विशिष्ट पुरुषांचा भेद आहे व 'अहर्' आणि 'अहं' हीं दोन उपनिषदें विशिष्ट पुरुषनिष्ठ आहेत,' असें 'एकस्यापि तु०' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=पण त्या एका सत्य ब्रह्माच्याहि अवस्थाविशेषाच्या ग्रहणानेंच उपनिषद्विशेषाचा उपदेश केलेला असल्यामुळें त्या विशेष अवस्थेंतील ब्रह्माचेंच तें तें विशेष नाम असणें युक्त आहे. [–'अस्ति च०' इत्यादि भाष्यानें या उक्त अर्थी दृष्टान्त सांगतात–]

**भाष्यं—अस्ति चायं दृष्टान्तः–सत्यप्याचार्यस्वरूपानपाये यदाचार्यस्यासीनस्यानुवर्तनमुक्तं न तत्तिष्ठतो भवति। यच्च तिष्ठत उक्तं न तदासीनस्येति। ग्रामारण्ययोस्तु आचार्यस्वरूपानपायात्तत्स्वरूपानुबद्धस्य च धर्मस्य ग्रामारण्यकृतविशेषाभावादुभयत्र तुल्यवद्भाव इत्यदृष्टान्तः सः। तस्माद्व्यवस्था अनयोरुपनिषदोः॥**

**भाष्यार्थ—**आणि याविषयीं हा असा दृष्टान्तहि आहे–आचार्याच्या स्वरूपाला अपाय झालेला नसतांनाहि आसनावर बसलेल्या आचार्याचें जें अनुवर्तन सांगितलें आहे तें उभ्या राहिलेल्या आचार्याचें होऊं शकत नाहीं आणि उभ्या राहिलेल्या आचार्याचें जें अनुवर्तन विहित असतें तें बसलेल्या आचार्याचें संभवत नाहीं. [–" पण याविषयीं वर–पृ. ३१४–प्रतिदृष्टान्तहि सांगितला आहे," अशी आशंका घेऊन 'ग्रामारण्ययोः०' इत्यादि भाष्यानें म्हणतात–]=पण ग्राम व अरण्य यांतील आचार्याच्या स्वरूपाला अपाय झालेला नसल्यामुळें व त्याच्या स्वरूपाशीं संबद्ध असलेल्या धर्माचा ग्राम व अरण्य या स्थानांमुळें भेद होत नसल्याकारणानें दोन्ही स्थानीं समान–एकसारखाच अनुवर्तनभाव असतो, त्यामुळें तो प्रस्तुतविषयांत दृष्टान्त होऊं शकत नाहीं. [ आचार्यदृष्टान्तांत स्वरूपोपाधीमध्यें अनुवर्तन सांगितलेलें असल्यामुळें ग्राम व अरण्य यांमध्यें अनुवर्तनाचें तुल्यत्व

असणें युक्त आहे. पण विशिष्टोपाधींत उक्तीची व्यवस्था आहे, असा भावार्थ. –' तस्मात्० ' इत्यादि भाष्यानें विशिष्टोपाधिकथनाचें फल सांगतात–]=म्हणून या दोन उपनिषदांची–रहस्यनांवांची व्यवस्था आहे. [ त्यांचा परस्पर संकर–परस्पर उपसंहार होत नाहीं, असा भावार्थ.]२१. [–या दोन उपनिषदांच्या व्यवस्थितत्वाविषयीं ' **दर्शयति**० ' इत्यादि सूत्रानें हेत्वंतर सांगतात–]

## सूत्रं—दर्शयति च ॥२२॥ (११)

**सूत्रार्थ**—' आणि ' दुसऱ्या विद्येंतील 'हिरण्यश्मश्रुः' इत्यादि आदित्यरूपाचा अक्षिपुरुषाचे ठिकाणीं केलेला अतिदेश विद्यास्थलीं स्थानभेदामुळें उपसंहार होत नाहीं, असें दाखवितो. २२. (११.) सु. ब्र. ३२७–[–' **अपि च**०' इत्यादि भाष्यानें याचेंच व्याख्यान करितात–]

**भाष्यं—अपि च एवं जातीयकानां धर्माणां व्यवस्थेति लिंगदर्शनं भवति– ' तस्यैतस्य तदेव रूपं यदमुष्य रूपं यावमुष्य गेष्णौ तौ गेष्णौ यन्नाम तन्नाम' इति। कथमस्य लिंगत्वमिति। तदुच्यते–अक्ष्यादित्यस्थानभेदभिन्नान्धर्मान् अन्योन्यस्मिन्ननुपसंहार्यान्पश्यन्निहातिदेशेनादित्यपुरुषगतान्रूपादीनाक्षिपुरुष उपसंहरति–' तस्यैतस्य तदेव रूपम् ' इत्यादिना । तस्माद्व्यवतिष्ठेते एवैते उपनिषदाविति निर्णयः ॥ २२ ॥** (११)

**भाष्यार्थ**—शिवाय अशा प्रकारच्या धर्मांची व्यवस्था आहे, त्यांचा परस्पर उपसंहार होत नाहीं, याविषयीं " त्या या चाक्षुष पुरुषाचें तेंच रूप कीं जें या आदित्यपुरुषाचें रूप, जीं आदित्य पुरुषाच्या बोटाचीं दोन पेरें तींच याचीं दोन पेरें, जें त्याचें नाम तेंच याचें "–छां. १. ७. ५–असें हें लिंगदर्शन आहे. [–"अहोपण, हें वाक्य तर धर्मांचा संकरच दाखवितें" अशी शंका–]='**कथं**०'– "या वाक्याला परस्पर अनुपसंहाराचें लिंगत्व कसें!" असें विचाराल तर[–त्यांचा अत्यंत संकर जर झाला असतां तर अभेदच असल्यामुळें अतिदेश झाला नसता. त्यामुळें त्या अतिदेशाच्या सामर्थ्यानें विद्येचें ऐक्य जरी असले तरी स्वतः धर्मांचा अत्यंत संकर होत नाहीं, असें ' **तदुच्यते**० ' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=तें सांगितलें जातें –अक्षि व आदित्य या स्थानभेदानें भिन्न झालेले धर्म परस्परांमध्यें अनुपसंहार्य आहेत असें पाहणारा वेद येथें ' त्या या चाक्षुष पुरुषाचें तेंच रूप० ' इत्यादि अतिदेशानें आदित्यपुरुषांतील रूपादिकांचा अक्षिपुरुषांत उपसंहार करितो. [–पण अशा अतिदेशाच्या अभावामुळें ' अहर् ' व ' अहं' या दोन उपनिषदांची व्यवस्थाच आहे, म्ह० त्यांचा परस्पर पुरुषामध्यें उपसंहार होतच नाहीं, असा

'तस्मात्०' इत्यादि भाष्यानें उपसंहार–]=तस्मात हीं दोन रहस्य नांवें त्या त्या पुरुषामध्यें व्यवस्थेनेंच अवस्थित होतात, असा हा निर्णय आहे. २२.

( १२. संभृत्यधिकरण. सू. २३. )

–स्थानभेदामुळें गुणांचा अनुपसंहार सांगून त्याच हेतूनें संभृतिप्रभृति गुणांचा विद्यान्तरांत अनुपसंहार 'संभृति०' इत्यादि सूत्रानें सांगतात–

**सूत्रं—संभृतिद्युव्याप्त्यपि चातः ॥ २३ ॥ (१२)**

**सूत्रार्थ**—राणायनीयांच्या खिलांत 'वीर्यसंभृति, द्युव्याप्ति' इत्यादि जी सांगितली आहे, तिचाहि उपसंहार करावयास नको. कोणत्या कारणानें ? 'अतः च'–पूर्वाधिकरणोक्त दोन नांवांप्रमाणें व्यवस्थापक स्थानभेदामुळें. २३. ( १२ ) –सु. ब्र. ३२८. [–पूर्वन्यायानेंच वाक्यान्तराचें व्याख्यान करण्यासाठीं '**ब्रह्मज्येष्ठा०**' इत्यादि भाष्यानें त्या वाक्याचा उल्लेख करितात–]

**भाष्यं—'ब्रह्मज्येष्ठा वीर्या संभृतानि ब्रह्माग्रे ज्येष्ठं दिवमाततान' इत्येवं राणायनीयानां खिलेषु वीर्यसंभृतिद्युनिवेशप्रभृतयो ब्रह्मणो विभूतयः पठ्यन्ते। तेषामेव चोपनिषदि शांडिल्यविद्याप्रभृतयो ब्रह्मविद्याः पठ्यन्ते। तासु ब्रह्मविद्यासु ता ब्रह्मविभूतयः उपसंह्रियेरन्न वेति विचारणायां ब्रह्मसंबंधादुपसंहारप्राप्तावेवं पठति। संभृतिद्युव्याप्तिप्रभृतयो विभूतयः शांडिल्यविद्याप्रभृतिषु नोपसंहर्तव्याः। अत एव चायतनविशेषयोगात् ॥**

**भाष्यार्थ—'ब्रह्मज्येष्ठा वीर्या'**–ब्रह्मच ज्यांचें ज्येष्ठ म्ह० कारण आहे तीं ब्रह्मज्येष्ठ वीर्यें–आकाशोत्पादनादि पराक्रमविशेष, तीं वीर्यें '**संभृतानि**'–निर्विघ्नपणें संभृत–संचित–चांगल्या प्रकारें धारण केलेलीं आहेत. [ 'ज्येष्ठानि' व 'वीर्याणि' येथील 'नि' व 'णि' या प्रत्ययांचा छान्दस लोप झाला आहे. सर्वनियंत्याच्या कार्यांत विघ्नकर्त्यांचा अभाव असल्यामुळें त्याचीं वीर्यें निर्विघ्नपणें संभृत आहेत. इतर पुरुष सहायकर्त्यांची अपेक्षा करून विक्रमास धारण करितात. त्यामुळें त्यांच्या पराक्रमांना सापेक्षत्व असतें.म्हणून ते नियतपूर्वत्वरूप कारणत्वानें युक्त असतात. त्यामुळें ते पराक्रम ज्येष्ठ नव्हेत, तर त्यांचे सहकारी पराक्रमहि ज्येष्ठ आहेत. पण ब्रह्मवीर्याचें ब्रह्मच ज्येष्ठ आहे. म्हणून ब्रह्म ज्यांचें ज्येष्ठ आहे तीं वीर्यें ब्रह्मज्येष्ठ आहेत. ब्रह्म कोणाचीहि अपेक्षा न करितां जगदुत्पत्त्यादि पराक्रम करितें. शिवाय इतर पराक्रमी पराक्रम करीत असतांना इतर बलवानांकडून त्यांच्या पराक्रमांचा मध्येंच भंग संभवतो. त्यामुळें ते स्ववीर्यांना धारण करीत नाहींत. पण ब्रह्मवीर्यें ब्रह्माकडून निर्विघ्नपणें धारण केलेलीं असतात, असा याचा भावार्थ. ]=तें ज्येष्ठ

'ब्रह्म' 'अग्रे'–देवादिकांच्या जन्मापूर्वीच 'दिवं'–स्वर्गाला 'आततान'–व्यापितें झालें. [ तें नित्यच विश्वव्यापक आहे, असा भावार्थ.–"तें ब्रह्म भूतांच्या पूर्वी–प्रथम उत्पन्न झालें. तेव्हां त्या ब्रह्माशीं स्पर्धा करण्यास कोण समर्थ आहे ?" असा या श्रुतीचा पुढील भाग आहे–]='इत्येवं०'–या अशा प्रकारच्या वीर्य-संभृति–द्युनिवेश–स्वर्गप्राप्ति इत्यादि ब्रह्माच्या विभूति राणायनीयांच्या खिलांमध्यें म्ह० विधि-निषेधशून्य परिशिष्ट उपदेशरूप ग्रंथांमध्यें पठित आहेत. [–याप्रमाणें विषय सांगून संशय सांगण्यासाठीं भूमिका करितात–]='**तेषामेव**०'–आणि त्यांच्याच उपनिषदांत शांडिल्यविद्याप्रभृति ब्रह्मविद्या सांगितल्या जातात.[ब्रह्मसंबंधामुळें विद्याभेद-दर्शनें संशय सांगतात–]='**तासु**०'–त्या ब्रह्मविद्यांमध्यें–ब्रह्मोपासनांमध्यें त्या पूर्वोक्त ब्रह्मविभूतींचा उपसंहार केला जातो कीं नाहीं, असा विचार प्राप्त झाला असतां [ येथें विद्येच्या भेदामुळें गुणांच्या अनुपसंहारकथनानें वाक्यार्थज्ञानहेतूचाच विचार केलेला असल्यामुळें याच्या पादादिसंगति आहेत. पूर्वपक्षांत 'विद्याभेदाच्या गुणव्यवस्थापकत्वाची असिद्धि' व सिद्धान्तांत 'त्याची सिद्धि' असा फलभेद मानून पूर्वपक्ष–] ='**ब्रह्म**०'–ब्रह्मसंबंधामुळें वीर्यसंभृत्यादिकांच्या उपसंहाराची प्राप्ति झाली असतां [ आधिदैविक गुणांचा आध्यात्मिक विद्यांमध्यें उपसंहार होत नाहीं, असेंहि नाहीं. 'कारण हा सर्व लोकांमध्यें भासतो–प्रकाशमान होतो' इत्यादिकांमध्यें व्यभिचार होत असल्यामुळें त्यांचा अनुपसंहार मानतां येत नाहीं. शिवाय अनुपसंहारपक्षीं पृथक् उपासन व पृथक् फल कल्पावें लागतें. त्यामुळें गौरव दोष प्राप्त होतो. म्हणून द्युनिवेशादिकांची ब्रह्मसंबंधानें सर्वत्र प्रत्यभिज्ञा होत असल्यामुळें त्यांचा उपसंहार करावा, असा भावार्थ. –'**एवं**०' इत्यादि भाष्यानें सिद्धान्ताला अवतरण देऊन त्याची योजना करितात–]=सूत्रकार 'संभृति०' इत्यादि सूत्रानें असा सिद्धान्त सांगतात–[–'**संभृति**०' इत्यादि भाष्यानें त्याचेंच व्याख्यान–] =संभृति-द्युव्याप्ति इत्यादि विभूति शांडिल्यविद्याप्रभृति उपासनांमध्यें उपसंहार करण्यास योग्य नाहींत.–[ कोणत्या कारणानें ?–]='**अतः एव**०'–म्हणूनच म्ह० आयतनविशेषसंबंधामुळें. [ जी संभृति व द्युव्याप्ति ती संभृति-द्युव्याप्ति सर्वत्र उपसंहर्तव्य नाहीं. कारण पूर्वाधिकरणांतील दोन उपनिषदांप्रमाणें तिची विशेषयोगव्यवस्था आहे,अशा अर्थपरत्वानें सूत्राचें व्याख्यान केलें आहे,असा भावार्थ.–आतां'च-' काराचा अवधारण हा अर्थ मानून '**तथाहि**०' इत्यादि भाष्यानें हेतूचें विवरण–]

**भाष्यं––तथाहि शांडिल्यविद्यायां हृदयायतनत्वं ब्रह्मण उक्तम्––एष म आत्माऽन्तर्हृदये' इति । तद्वदेव दहरविद्यायामपि 'दहरं पुंडरीकं वेश्म दहरो-**

ऽस्मिन्नंतराकाशः' इति। उपकोसलविद्यायां तु अक्ष्यायतनत्वम् 'य एषोऽक्षणि पुरुषो दृश्यते' इति। एवं तत्र तत्र तत्तदाध्यात्मिकमायतनमेतासु विद्यासु प्रतीयते। आधिदैविक्यस्त्वेता विभूतयः संभृतिद्युव्याप्तिप्रभृतयस्तासां कुत एतासु प्राप्तिः॥

**भाष्यार्थ**—आयतनविशेषसंबंध कसा आहे तो पहा—शांडिल्यविद्येमध्यें ब्रह्माचें हृदयायतनत्व 'हा माझा आत्मा हृदयांत आहे'—छा. ३. १४. ३—असें सांगतलें आहे. तसेंच दहरविद्येमध्येंहि 'अल्पहृदयकमलरूप गृह, त्यांत अल्प अन्तराकाश'—छां. ८. १. १.—असें ब्रह्माचें हृदयायतनत्व उक्त आहे. पण उपकोसलविद्येमध्यें 'जो हा अक्षीमध्यें पुरुष दिसतो'—छां. ४. १५. १—असें अक्ष्यायतनत्व सांगितलें आहे. [—याप्रमाणें उक्त असलेल्या आयतनभेदयोगाचा उपसंहार—]='एवं०'—याप्रमाणें या विद्यांमध्यें ठिकठिकाणीं तें तें—भिन्न भिन्न आध्यात्मिक आयतन प्रतीत होतें. [—"पण तेवढ्यावरून या विद्यांमध्यें संभृत्यादि विभूतींचा अनुपसंहार कसा?" 'आधिदैविक्यः०' इत्यादि भाष्यानें उत्तर—] =पण संभृति-द्युव्याप्ति इत्यादि या विभूति आधिदैविक आहेत. त्यांची या आध्यात्मिक विद्यांमध्यें प्राप्ति कोणत्या कारणानें होणार? [—आध्यात्मिक विद्यांमध्येंहि संभृत्यादि-आधिदैविक गुणांचा उपसंहार होईल, अशी 'ननु०' इत्यादि भाष्यानें लिंगानें शंका-]

**भाष्यं**—ननु एतास्वपि आधिदैविक्यो विभूतयः श्रूयन्ते—'ज्यायान्दिवो ज्यायानेभ्यो लोकेभ्यः' 'एष उ एव भामनीरेष हि सर्वेषु लोकेषु भाति' 'यावान्वा अयमाकाशस्तावानेषोऽन्तर्हृदय आकाश उभे अस्मिन्द्यावापृथिवी अंतरेव समाहिते' इत्यवेमाद्याः। सन्ति चान्या आयतनविशेषहीना अपीह ब्रह्मविद्याः षोडशकलाद्याः॥

**भाष्यार्थ**—अहोपण, या आध्यात्मिक विद्यांमध्येंहि आधिदैविक विभूति श्रुत आहेत. "द्युलोकाहून अधिक मोठा, या सर्व लोकांहून अधिक मोठा"—छां. ३.१४.३—अशी शांडिल्यविद्येमध्यें, "हाच भामनी, कारण हाच सर्व लोकांमध्यें भासतो—प्रकाशमान होतो"—छां.४.१५.४.सु.उ. ३८८—अशी उपकोसलविद्येमध्यें "जेवढा हा भौतिक बाह्य आकाश आहे तेवढा हा अन्तर्हृदयांतील आकाश आहे. द्यौ व पृथिवी हे दोन्ही लोक यांत—आंतच समाहित—उत्तम प्रकारें स्थित आहेत." —छां. ८. १. ३—अशी दहरविद्येंत इत्यादि आधिदैविक विभूति श्रुत आहेत. [—अध्यात्म-अधिदैवभेदामुळें जर यांचा अनुपसंहार असेल तर त्या भेदानें रहित

अशा उपासनांमध्यें त्यांचा उपसंहार होईल, असें वादी ' सन्ति च० ' इत्यादि भाष्यानें म्हणतो–]=आणि दुसऱ्या आयतनभेदशून्य अशाहि या प्रकरणांत षोडशकलादि ब्रह्मविद्या–छां. ४. १५.–आहेत. [–या प्रकरणांत आध्यात्मिक विद्यांमध्यें आधिदैविक विभूतींचें सत्त्व व आयतनभेदशून्य ब्रह्मविद्यांचें सत्त्व 'सत्यं०' इत्यादि भाष्यानें स्वीकारितात–]

**भाष्यं**––सत्यमेवमेतत् । तथाप्यत्र विद्यते विशेषः संभृत्याद्यनुपसंहारहेतुः । समानगुणाम्नानेन हि प्रत्युपस्थापितासु विप्रकृष्टदेशास्वपि विद्यासु विप्रकृष्टदेश गुणा उपसंह्रियेरन्निति युक्तम् । संभृत्यादयस्तु शांडिल्यादिवाक्यगोचराश्च गुणाः परस्परव्यावृत्तस्वरूपत्वान्न प्रदेशान्तरवर्तिविद्याप्रत्युपस्थापनक्षमाः ॥

**भाष्यार्थ**—होय, हें खरेंच आहे. [–" तर मग षोडशकलादि ब्रह्मविद्यांमध्यें संभृत्यादि-गुणांचा उपसंहार कोणत्या कारणानें होणार नाहीं ?" अशी आशंका घेऊन ' **तथापि०** ' इत्यादि भाष्यानें म्हणतात–]=पण असें जरी असलें म्ह० आध्यात्मिक विद्यांमध्यें आधिदैविक विभूतींचें व आयतनभेदशून्य ब्रह्मविद्यांचें अस्तित्व जरी असलें तरी येथें संभृत्यादिविभूतींच्या अनुपसंहाराचा विशेष हेतु आहे. [–' **समान०** ' इत्यादि भाष्यानें त्या विशेष हेतूचेंच विवरण–]=कारण समानगुणांच्या कथनानें प्रत्युस्थापित केलेल्या दूर प्रदेशीं असलेल्याहि विद्यांमध्यें दूर प्रदेशांतील गुणांचा उपसंहार केला जाईल, हें युक्त आहे. [–"पण प्रकृतस्थानींहि विद्येच्या प्रत्यभिज्ञेनें गुणोपसंहार होईल" अशी आशंका घेऊन ' **संभृत्यादयस्तु०** ' इत्यादि भाष्यानें म्हणतात–]=पण संभृत्यादिक व शांडिल्यादिवाक्यांत उपलब्ध होणारे गुण, यांचें स्वरूप परस्पर व्यावृत्त होणारें असल्यामुळें ते दुसऱ्या प्रदेशीं असलेल्या विद्येचें प्रत्युपस्थापन करण्यास समर्थ नाहींत. [संभृत्यादि धर्मविशिष्ट ब्रह्म व शांडिल्यादि विद्यामध्यें श्रुत असलेलें मनोमयत्वादि धर्मविशिष्ट ब्रह्म यांचा भेद असल्यामुळें प्रत्यभिज्ञा होत नाहीं, त्यामुळें उपसंहार नाहीं, असा भावार्थ.–" अहोपण, विशिष्टाचा भेद जरी असला तरी स्वरूपाचा अभेद असल्यामुळं प्रत्यभिज्ञा होऊन उपसंहाराची सिद्धि होते," अशी आशंका घेऊन ' **न च०** ' इत्यादि भाष्यानें म्हणतात–]

**भाष्यं**—न च ब्रह्मसंबंधमात्रेण प्रदेशान्तरवर्तिविद्याप्रत्युपस्थानमित्युच्यते । विद्याभेदेऽपि तदुपपत्तेः । एकमपि हि ब्रह्म विभूतिभेदैरनेकधा उपास्यत इति स्थितिः । परोवरीयस्त्वादिवद्भेददर्शनात् । तस्माद्वीर्यसंभृत्यादीनां शांडिल्यविद्याविष्वनुपसंहार इति ॥ २३ ॥ ( १२ )

**भाष्यार्थ**—आणि केवल ब्रह्मसंबंधानेंच दुसऱ्या प्रदेशीं असलेल्या विद्येचें प्रत्युपस्थान होतें, असें म्हटलें जाणार नाहीं—असें म्हणतां येणार नाहीं. कारण विद्येचा भेद असला तरीहि ब्रह्माचा संबंध उपपन्न होतो. [ दोन्ही ठिकाणीं कांहीं थोडयाशा गुणांनीं तरी विशिष्टत्वकथन असल्यावांचून केवल स्वरूपाच्याच प्रत्यभिज्ञेला ज्ञानाचें अभेदकत्व आहे, केवळ स्वरूपप्रत्यभिज्ञाच ज्ञानाचें ऐक्य–अभेद करूं शकते, असें म्हटल्यास अतिप्रसंग होतो, असा भावार्थ.–' **एकमपि०** ' इत्यादि भाष्यानें त्या अतिप्रसंगालाच व्यक्त करितात–]=कारण एकच असलेलेंहि ब्रह्म विभूतिभेदांनीं अनेकप्रकारें उपासिलें जातें, अशी स्थिति आहे. [–एकाच्या गुणवत्त्वानें अनेकधा उपास्यत्वाविषयीं ' **परोवरीयस्त्वादिवत्०** ' इत्यादि भाष्यानें दृष्टान्त–]=कारण परोवरीयस्त्वादिकांप्रमाणें भेददर्शन होतें.[–ज्याप्रमाणें एकच असलेल्या उद्गीथाचें परोवरीयस्त्वादिगुणवत्त्वानें व हिरण्यश्मश्रुत्वादि गुणवत्त्वानें बहुधा उपासन उपलब्ध होतें. पृ. २९९–त्याप्रमाणें ब्रह्माचेंहि त्या त्या गुणवत्त्वानें अनेकधा उपासन होत असल्यामुळें केवल ब्रह्मसंबंधानेंच प्रत्यभिज्ञान होतें, असें म्हटल्यास अतिप्रसंग होतो, असा भावार्थ.–याप्रमाणें संभृत्यादिकांना व मनोमयत्वादिकांना विद्याप्रत्यभिज्ञापकत्व संभवत नाहीं, असें झालें असतां त्याचें फलित सांगतात–]=' **तस्मात्०** '–म्हणून वीर्यसंभृत्यादिकांचा शांडिल्यविद्यादिकांमध्यें उपसंहार होत नाहीं, '**इति**'–असें सिद्ध झालें.२३.–सु.श्र.३२९.(१२)

( १३ **पुरुषविद्याधिकरण. सू. २४.** )

–त्या त्या प्रदेशभेदामुळें अत्यंत भिन्न झालेल्या विद्यांमध्यें गुणांच्या अनुपसंहारोक्तिकथनप्रसंगानें कालभेदानें युक्त असलेल्या विद्येमध्येंहि गुणांचा अनुपसंहार ' **पुरुषविद्यायां०** ' इत्यादि सूत्रानें सांगतात–

**सूत्रं—पुरुषविद्यायामिव चेतरेषामनाम्नानात् ॥ २४ ॥ (१३)**

**सूत्रार्थ**—पैंगिरहस्यांतील पुरुषविद्येंत पुरुषाची यज्ञत्वानें, त्याच्या आयुष्याच्या तीन भागांत तीन सवनरूपानें व भक्षणेच्छादिकांची दीक्षादिभावानें कल्पना जशी केली आहे तशी इतर–तैत्तिरीयांच्या पुरुषविद्येंत सवनत्वादिकांची कल्पना केलेली नाहीं. त्यामुळें विद्यैक्याची प्रत्यभिज्ञा होत नाहीं. म्हणून ती विद्या एक नाहीं. अर्थात् परस्पर गुणोपसंहार होत नाहीं. २४.–सु.श्र.३३०. [–'**अस्ति०** ' इत्यादि भाष्यानें या अधिकरणाचा विषय सांगतात–]

**भाष्यं—अस्ति तांडिनां पैंगिनां च रहस्यब्राह्मणे पुरुषविद्या । तत्र पुरुषो यज्ञः कल्पितः । तदीयमायुस्त्रेधा विभज्य सवनत्रयं कल्पितम् । अशिशिषादीनि च दीक्षादिभावेन कल्पितानि । अन्ये च धर्मास्तत्र समधिगता आशीर्मंत्रप्रयोगादयः॥**

**भाष्यार्थ**—तांडींच्या व पैंगींच्या रहस्यब्राह्मणामध्यें पुरुषविद्या आहे. [—'**पुरुषो वाव यज्ञः**'—पुरुष हाच यज्ञ आहे, या सामानाधिकरण्यश्रुतीचा अर्थ सांगतात—] '**तत्र०**'—त्या छांदोग्याच्या शाखाभेदांमध्यें पुरुष यज्ञ कल्पिला आहे. [—'पुरुष हाच यज्ञ आहे' अशी कल्पना केली आहे.'त्याचीं जीं पहिलीं चोवीस वर्षे तें प्रातःसवन,त्यानंतरचीं जीं चोवीस वर्षे तें माध्यंदिन सवन, त्यानंतरचीं जीं अठ्ठेचाळीस वर्षे तें तिसरें सवन,' असें प्रसिद्ध यज्ञाच्या साम्यासाठीं सवनत्रय कल्पिलें आहे, असें '**तदीयं०**' इत्यादि भाष्यानें सांगतात—]=त्याच्या आयुष्याचा तीन प्रकारें विभाग करून त्यांत सवनत्रयाची कल्पना केली आहे. [—'तो अन्नभक्षण करण्याची जी इच्छा करितो, जलप्राशनाची जी इच्छा करितो व तो जो रममाण होत नाहीं त्या याच्या दीक्षा, नंतर तो जें भक्षण करितो, जें जलप्राशन करितो व जो रममाण होतो त्या उपसद, तो जो हंसतो, भक्षण करितो व मैथुनाचरण करितो ती शब्दवत्त्वसाम्यामुळें स्तुतशस्त्रें, जें तपोदानादि ती दक्षिणा, मरणच अवभृथ, असें '**अशिशिषादीनि०**' इत्यादि भाष्यानें सांगतात—]=आणि भक्षणेच्छादिकांची दीक्षादिभावानें कल्पना केली आहे. [—"त्याला या वयांत कांहीं व्याधी—रोग वगैरे जर ताप देऊं लागला तर त्यानें म्हणावें 'हे प्राणांनो, रुद्रांनो, मज यज्ञाचे हें प्रातः सवन आहे तें माध्यंदिन सवनाशीं एकरूप करा.' असा हा आशीर्वाद किंवा आशा आहे. त्यानें अंत्यसमयीं 'अक्षितं असि' इत्यादि मंत्राचा जप करावा. 'तूं अक्षित—अक्षीण—अक्षत आहेस.' 'अच्युत आहेस' व 'सूक्ष्म प्राण आहेस' असा त्या मंत्राचा अर्थ आहे, हा मंत्रप्रयोग—छां.३.१६ सु.उ.पृ. २६३-६७ येथें पहा. भाष्यकार आतां हेच '**अन्ये च०**' इत्यादि भाष्यानें सांगतात—]=आणि त्यांत आशीर्मंत्रप्रयोगादिक दुसरे धर्म चांगल्याप्रकारें ज्ञात झालेले आहेत. [—आतां संशयासाठीं दुसऱ्या शाखेंतील पुरुषविद्येचें उदाहरण देतात—]

**भाष्यं—तैत्तिरीयका अपि कंचित्पुरुषयज्ञं कल्पयन्ति—"तस्यैवं विदुषो यज्ञस्यात्मा यजमानः श्रद्धा पत्नी" इत्येतेनानुवाकेन । तत्र संशयः— किं य इतरत्रोक्ताः पुरुषयज्ञस्य धर्मास्ते तैत्तिरीयकेषूपसंहर्तव्याः । किंवा नोपसंहर्तव्या इति । पुरुषयज्ञत्वाविशेषादुपसंहारप्राप्तौ आचक्ष्महे—नोपसंहर्तव्या इति॥**

**भाष्यार्थ**—तैत्तिरीयकहि "त्या असें जाणणाऱ्या विद्वान् पुरुषाच्या यज्ञाचा आत्मा यजमान, श्रद्धा पत्नी"—सार्थ नारा. ८० पृ.८३—अशा या अनुवाकानें एक पुरुषयज्ञ कल्पितात. [—त्यांतील 'विदुषः'—विद्वानाचा व 'यज्ञस्य'—यज्ञाचा या दोन षष्ठी विभक्तींचें सामानाधिकरण्य आहे कीं वैयधिकरण्य आहे याचा

निश्चय होत नसल्यामुळें पुरुषविद्येला उद्देशून संशय सांगतात–]=‘तत्र०’ त्या पुरुषविद्येविषयीं ‘काय, जे इतरत्र–छांदोग्यभेदांत सांगितलेले पुरुषयज्ञाचे धर्म तैत्तिरीयकांत उपसंहार करण्यास योग्य आहेत की ते उपसंहार करण्यास योग्य नाहींत’ असा संशय येतो. [–येथें भेद व अनुपसंहार यांच्या कथनानें वाक्यार्थज्ञानहेतूचा विचार केलेला असल्यामुळें याच्या पादादिसंगति आहेत. पूर्वपक्षांत विद्येच्या अभेदामुळें गुणांचा उपसंहार’ व सिद्धान्तांत ‘विद्येच्या भेदामुळें अनुपसंहार’ अशा अभिप्रायानें ‘मरण हेंच अवभृथ, त्यानें विशिष्ट अशा सांपादिक–काल्पनिक पुरुषयज्ञत्वलक्षण रूपाचें ऐक्य असल्यामुळें ‘विद्येचें ऐक्य व गुणांचा उपसंहार’असा पूर्वपक्ष ‘पुरुषयज्ञत्व०’ इत्यादि भाष्यानें करितात–]=पुरुषयज्ञत्वाच्या अविशेषामुळें –पुरुषयज्ञत्व समान असल्यामुळें उपसंहाराची प्राप्ति झाली असतां [निषाद-स्थपतिन्यायानें–अ. १.पृ.९३४–‘विदुषः’ व ‘यज्ञस्य’ या दोन षष्ठींचे सामानाधिकरण्य असल्यामुळें, पुरुषयज्ञाचा दोन्ही ठिकाणीं अविशेष–साम्य असल्यामुळें विद्येचा अभेद आहे व गुणांचा उपसंहार होतो, असा भावार्थ.–‘आचक्ष्महे०’ इत्यादि भाष्यानें सिद्धान्त सांगतात–]=गुण उपसंहर्तव्य–उपसंहार करण्यास योग्य नाहींत, असें आम्ही सांगतो. [–“ अहोपण, पूर्वोक्त आयतनविशेषाचा योग नसल्यामुळें उपसंहाराची सिद्धि होते,” अशा शंका–]

**भाष्यं**––कस्मात् । तद्रूपप्रत्यभिज्ञानाभावात् । तदाहाचार्यः पुरुषविद्यायामिवेति । यथैकेषां शाखिनां तांडिनां पैंगिनां च पुरुषविद्यायामाम्नानं, नैवमितरेषां तैत्तिरीयाणामाम्नानमस्ति । तेषां ह्मितरविलक्षणमेव यज्ञसंपादनं दृश्यते । पत्नीयजमानवेदिवेदबर्हिर्यूपाज्यपश्वृत्विगाद्यनुक्रमणात् । यदपि सवनसंपादनं तदपीतरविलक्षणमेव “यत्प्रातर्मध्यंदिनं सायं च तानि” इति ॥

**भाष्यार्थ**––‘कस्मात्०’–कोणत्या कारणानें गुण अनुपसंहर्तव्य आहेत, असें म्हणतां ? [–विद्येच्या ऐक्याचें साधक असें जें वेद्याचें ऐक्य त्याच्या अभावामुळें विद्यांचा भेद आहे. त्यामुळें उपसंहार नाहीं, असें उत्तर–]=‘तद्रूप०’–तद्रूपप्रत्यभिज्ञानाच्या अभावामुळें–छांदोग्यभेदगत पुरुषविद्या तैत्तिरीयगत पुरुषविद्यारूप आहे, असें प्रत्यभिज्ञान होत नसल्यामुळें. [–या उक्त अर्थी सूत्राला प्रवृत्त करितात–] =‘तदाह०’–तेंच सूत्रकार आचार्य ‘पुरुषविद्यायां इव’–पुरुषविद्येमध्यें जसें, तसें इत्यादि सांगतात. [–सूत्रांतील अक्षरांचें व्याख्यान करितात–]=‘यथा०’–ज्याप्रमाणें एका शाखियांच्या म्ह० तांडी व पैंगी यांच्या पुरुषविद्येमध्यें आम्नान–पाठ आहे तसें इतरांच्या म्हणजे तैत्तिरीयांच्या पुरुषविद्येत आम्नान नाहीं. [–म्हणून विद्यांचा

भेद. त्यामुळें गुणांचा अनुपसंहार, असा या वाक्याला शेष लावावा. आतां वाद्यानें 'रूपाच्या ऐक्यामुळें विद्येचें ऐक्य व गुणोपसंहार' असें जें म्हटलें आहे, त्याविषयीं 'तेषां हि०' इत्यादि भाष्यानें सांगतात-]=कारण छांदोग्यभेदगत यज्ञसंपादनाहून तैत्तिरीयांचें यज्ञसंपादन विलक्षणच दिसतें. [-त्याविषयीं हेतु-] =कारण तैत्तिरीयांच्या पुरुषसंपादनांत पत्नी, यजमान, वेदि, वेद, बर्हि, यूप, आज्य, पशु, ऋत्विक् इत्यादिकांचें अनुक्रमण केलें आहे. [ "आत्मा यजमान, श्रद्धा पत्नी, शरीर इध्म, उर वेदि, लोम बर्हि-दर्भ, वेद शिखा, हृदय हा यूप, काम आज्य, मन्यु-क्रोध हा पशु, तप हा अग्नि, सर्व इंद्रियांचें दमन करणारा दम ही दक्षिणा, वाक् होता, प्राण उद्गाता, चक्षु अध्वर्यु, मन ब्रह्मा, श्रोत्र अग्नीत्"-सा.ना.८३-असें पुष्कळच वैलक्षण्य असल्यामुळें त्यांच्या रूपाचें ऐक्य नाही, असा भावार्थ.-' यदपि० ' इत्यादि भाष्यानें दुसरें वैलक्षण्य सांगतात-] =तैत्तिरीयांच्या पुरुषविद्येंत जें सवनसंपादन आहे तेंहि " जो प्रातःकाल, मध्यंदिन काल व सायंकाल तीं सवनें " असें छान्दोग्यभेदगत सवनसंपादनाहून विलक्षणच आहे. [ कारण छान्दोग्यांत पुरुषाच्या आयुष्याचा तीन प्रकारें विभाग करून सवनत्रय सांगितलें आहे. पण तैत्तिरीयकांतील सायं, प्रातर् व व मध्यंदिन असें हें सवनसंपादन त्याहून विलक्षण प्रतीत होतें. त्यामुळें त्या पुरुषविद्यांचा भेद आहे, असा भावार्थ.-" पण ' मरणच अवभृथ ' असें छान्दोग्यांत व ' जें मरण तें अवभृथ ' असें तैत्तिरीयांत ' जें रममाण होणें तेंच उपसद ' असें दोन्ही ठिकाणीं तुल्य आहे. यास्तव रूपैक्यामुळें विद्येचें ऐक्य आहे" अशा या चोद्याचा ' यदपि० ' इत्यादि भाष्यानें अनुवाद-]

**भाष्यं—यदपि किंचिन्मरणावभृथत्वादिसाम्यं तदप्यल्पीयस्त्वाद् भूयसा वैलक्षण्येनाभिभूयमानं न प्रत्यभिज्ञापनक्षमम् । न च तैत्तिरीयके पुरुषस्य यज्ञत्वं श्रूयते । विदुषो यज्ञस्येति हि न चैते समानाधिकरणे षष्ठ्यौ विद्वानेव यो यज्ञस्तस्येति । न हि पुरुषस्य मुख्यं यज्ञत्वमस्ति । व्यधिकरणे त्वेते षष्ठ्यौ विदुषो यो यज्ञः तस्येति ॥**

**भाष्यार्थ**—त्या दोन विद्यांचें जें कांहीं थोडेसें मरण-अवभृथादि सादृश्य उपलब्ध होतें, [-बहुतर वैलक्षण्य असतांना थोड्याशा सालक्षण्यामुळें विद्यांचें ऐक्य होऊं शकत नाहीं, कारण तेवढ्यावरून विद्यैक्य मानूं लागल्यास अतिप्रसंग होतो, असें 'तदपि०' इत्यादि भाष्यानें सांगतात-]=तेंहि फारच थोडें असल्यामुळें-त्या सादृश्यालाहि अत्यंत अल्पत्व असल्यामुळें तें पुष्कळशा वैलक्षण्यानें पराभूत होत्सातें

प्रत्यभिज्ञा करून देण्यास समर्थ नाहीं. [–'पण पुरुषयज्ञत्व समान असल्यामुळें' असें जें वाद्यानें वर–पृ. ३२४–म्हटलें आहे त्याविषयीं '**न च०**' इत्यादि भाष्यानें म्हणतात–]=तैत्तिरीयकांत पुरुषाचें यज्ञत्व श्रुत नाहीं. [–" अहोपण, निषाद-स्थपतिन्यायानें दोन षष्ठीविभक्तींच्या सामानाधिकरण्यामुळें पुरुषाचें यज्ञत्व आम्हीं वर –पृ. ३२४–सांगितलें आहे " अशी आशंका घेऊन '**विदुष:०**' इत्यादि भाष्यानें म्हणतात–]=' विदुष: यज्ञस्य ' असें श्रुत आहे. पण ' विद्वान् जो यज्ञ त्याचा ' अशा या दोन समानाधिकरण षष्ठी विभक्ति नाहींत. [–त्याच्या सामानाधिकरण्याच्या अभावाविषयीं '**न हि०**' इत्यादि भाष्यानें हेतु सांगतात–]=कारण पुरुषाला मुख्य यज्ञत्व नाहीं. [अर्थाच्या अनुपपत्तीच्या अभावीं न्याय प्रवृत्त होतो. पण प्रकृत उदाहरणांत पुरुषाला कर्तृत्व आणि यज्ञाला क्रियात्व व अचैतन्यत्व असल्यामुळें पुरुषैक्याचा असंभव आहे. त्यामुळें न्यायाची प्रवृत्ति होत नाहीं, असा भावार्थ.–" तर मग त्या दोन षष्ठीचा अन्वय कसा ?" '**व्यधिकरणे तु०**' इत्यादि भाष्यानें उत्तर–]=पण ' विद्वानाचा जो यज्ञ त्याचा ' अशा या दोन व्यधिकरण षष्ठी आहेत. [–" पण या व्यधिकरण षष्ठीपक्षींहि अर्थाची अनुपपत्ति समान आहे. " अशी आशंका घेऊन '**भवति हि०**' इत्यादि भाष्यानें उत्तर–]

**भाष्यं—भवति हि पुरुषस्य मुख्यो यज्ञसंबंधः । सत्यां च गतौ मुख्य एवार्थ आश्रयितव्यो न भाक्तः । 'आत्मा यजमानः' इति च यजमानत्वं पुरुषस्य निब्रुवन्वैयधिकरण्येनैवास्य यज्ञसंबंधं दर्शयति ॥**

**भाष्यार्थ**—पुरुषाचा मुख्य यज्ञसंबंध असतो, हें प्रसिद्ध आहे. [–"अहोपण, दुसऱ्या उदाहरणांत ' तथाभाव '–पुरुषाचा मुख्य यज्ञसंबंध जरी असला तरी प्रकृत पुरुषविद्येमध्यें पुरुषाला यज्ञत्वच आहे" अशी आशंका घेऊन '**सत्यां०**' इत्यादि म्हटलें आहे–]=आणि जेथें गति असते तेथें मुख्यच अर्थ आश्रय करण्यास योग्य असतो. गौण अर्थ आश्रयितव्य नसतो. [ यज्ञाचें ज्ञानवानाशीं संबंधित्व दुसऱ्या प्रमाणानें सिद्ध आहे. तें अपूर्वसंबंधकल्पनेनें टाकितां येत नाहीं. कारण त्याच्या अनुवादानें विद्येच्या प्रशंसेसाठीं पत्न्यादिकांचें संपादन संभवतें, असा भावार्थ.–यजमानत्वानें पुरुषाचें यज्ञसंबंधित्व सांगितलेलें असल्यामुळेंहि पुरुषाला यज्ञरूपत्व नाहीं, असें '**आत्मा०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]='त्याचा आत्मा हा यजमान आहे ' असें पुरुषाचें यजमानत्व सांगणारा वेद–त्याचें यजमानत्वानें निर्वचन करणारा वेद वैयधिकरण्यानेंच याचा यज्ञसंबंध दाखवितो.

[–याहि कारणानें तैत्तिरीयकांत पुरुषयज्ञत्व इष्ट नाहीं, असें '**अपि च०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]

**भाष्यं—अपि च 'तस्यैवंविदुषः' इति सिद्धवदनुवादश्रुतौ सत्यां, पुरुषस्य यज्ञभावमात्मादीनां च यजमानादिभावं प्रतिपित्समानस्य वाक्यभेदः स्यात् ॥**

**भाष्यार्थ**—शिवाय 'त्या असें जाणणाऱ्या पुरुषाचा जो यज्ञ' अशा अर्थाची 'तस्यैवं विदुषः०' अशी सिद्धवदनुवादश्रुति असतांना पुरुषाचा यज्ञभाव व आत्मादिकांचा यजमानादिभाव समजणाऱ्याचा वाक्यभेद होईल ! [ज्याप्रमाणें प्रमित म्ह० प्रमाणानें ज्ञात झालेलें अर्थात् प्रवृत्त झालेलें प्रमाण अनुवादक असतें त्याप्रमाणें यज्ञाच्या दुसऱ्या प्रमाणानें सिद्ध झालेल्या विद्वत्संबंधित्वानुवादानें विशेषणविधिश्रुतींत प्रमित विशेषणांच्या अनुवादित विशेष्यगामित्वानें एकवाक्यत्व संभवत असतांना विशेष्य व विशेषणें यांचे पृथक् प्रतिपादन केल्यास वाक्यभेद होईल, असा भावार्थ.–याहि कारणानें दोन्ही ठिकाणीं पुरुषविद्या भिन्न आहे, असें '**अपि च०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]

**भाष्यं–अपि च ससंन्यासामात्मविद्यां पुरस्तादुपदिश्यानंतरं 'तस्यैवंविदुषः' इत्याद्यनुक्रमणं पश्यन्तः पूर्वशेष एवैष आम्नायो न स्वतंत्र इति प्रतीमः । तथा चैकमेव फलमुभयोरप्यनुवाकयोरुपलभामहे "ब्रह्मणो महिमानमाप्नोति" इति॥**

**भाष्यार्थ**—शिवाय [–संन्यास या अंगानें सहित–अंगित्वानें स्थित अशी आत्मविद्या पूर्वी 'प्राजापत्यो हारुणिः०' इत्यादि–सा. ना. ७९. पृ. ७६–अनुवाकांत 'न्यास इति ब्रह्मा'–संन्यास हाच हिरण्यगर्भ आहे, इत्यादि वाक्यानें सांगून 'तस्य एवं विदुषः'–त्या असें जाणणाऱ्या विद्वानाच्या यज्ञाचा आत्मा यजमान आहे, असा पूर्वोक्ताचा परामर्श केलेला असल्यामुळें याला त्याचें शेषत्व आहे, असें भासतें, असें '**ससंन्यासां०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=पूर्वी संन्याससहवर्तमान आत्मविद्येचा उपदेश करून त्यानंतर 'तस्यैवं विदुषः०' इत्यादि अनुक्रमण केलेलें पाहणारे आम्ही 'हा आम्नाय पूर्वशेषच आहे, स्वतंत्र नाहीं,' असें समजतों, आम्हांला त्याचा असा प्रत्यय येतो. [–आणि याहि कारणानें 'हा पूर्वशेषच आम्नाय आहे, स्वतंत्र नाहीं, 'असें '**तथा च०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=आणि त्याचप्रमाणें 'ब्रह्माच्या महिम्यास प्राप्त होतो'–सा. ना. अ. ७९. पृ. ८२ व अ. ८० पृ. ८४–असें त्या दोन्हीं अनुवाकांचें एकच फल आम्हांला उपलब्ध होतें. [–याप्रमाणें तैत्तिरीयांच्या पुरुषविद्याम्नायाचें पारतंत्र्य सांगून पैंगी व तांडी यांच्या पुरुषविद्याम्नायाचें स्वातंत्र्य '**इतरेषां तु०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]

**भाष्यं—इतरेषां त्वनन्यशेषः पुरुषविद्याम्नायः । आयुरभिवृद्धिफलो ह्यसौ ‘ स ह षोडशं वर्षशतं जीवति य एवं वेद ’ इति समभिव्याहारात् । तस्माच्छाखान्तराधीतानां पुरुषविद्याधर्माणां आशीर्मंत्रादीनामप्राप्तिस्तैत्तिरीयके ।।२४**

**भाष्यार्थ**—पण इतरांचा पुरुषविद्याम्नाय अनन्यशेष आहे. तो कोणाचाहि शेष नाहीं. [–त्याविषयीं ‘ आयुः० ’ इत्यादि भाष्यानें हेतु सांगतात–]=कारण “ जो असें जाणतो तो एकशें सोळा वर्षें जगतो ”–छां. ३. १६. ७. सु. उ. ३६५–असें संकीर्तन–कथन केलेलें असल्यामुळें हा पुरुषविद्याम्नाय आयुष्याची अभिवृद्धि हें फल देणारा आहे. [ ‘ वर सांगितलेल्या प्रकारानें जो आत्म्याला –आपल्याला यज्ञादिरूप जाणतो तो व्याध्यादिकांच्या योगानें उपद्रव न पावलेला असा होत्साता एकशें सोळा वर्षें जिवंत राहतो ’ असें विद्येसह आयुरभिवृद्धि हें फल कथन केलेलें असल्यामुळें तत्फलत्वानें पुरुषविद्येचें स्वातंत्र्य सिद्ध झालें, असा भावार्थ.–याप्रमाणें स्वतंत्र विद्या व परतंत्र विद्या यांच्या ऐक्याचा असंभव सिद्ध झाला असतां त्याचें फलित सांगतात–]=‘ **तस्मात्**० ’–याप्रमाणें या दोन पुरुषविद्यांच्या ऐक्याचा असंभव असल्यामुळें शाखान्तरार्धीत–पैंगी व तांडी यांच्या रहस्यब्राह्मणांत पठित असलेल्या पुरुषविद्याधर्मांची व आशीर्मंत्रादिकांची तैत्तिरीयकांत अप्राप्ति आहे,तैत्तिरीयकांतील पुरुषविद्येत त्यांची प्राप्ति नाहीं.२४.(१३)

## ( १४. वेधाद्यधिकरण. सू. २५. )

–पूर्वाधिकरणांत आत्मविद्येच्या संनिधींत श्रवण असल्यामुळें तैत्तिरीयगत पुरुषयज्ञ ज्ञानाचें अंग आहे, असा अंगीकार करून त्याचा आयुरभिवृद्धि हें फल देणाऱ्या विद्येहून भेद प्रदर्शित केला. आतां “ प्रवर्ग्यादिकांनाहि विद्येचें सांनिध्य तसेंच समान असल्यामुळें त्यांना विद्यांगत्व आहे ” अशी आशंका घेऊन अन्यत्र अनुपसंहारासाठीं त्यांच्या अंगत्वाचें निरसन ‘वेधादि०’ इत्यादि सूत्रानें करितात–

## सूत्रं—वेधाद्यर्थभेदात् ॥ २५ ॥ ( १४ )

**सूत्रार्थ—**‘ सर्वं प्रविध्य ’ इत्यादि मंत्रप्रकाशित अर्थाचा भेद असल्यामुळें आभिचारिक कर्मादिकांशीं संबंध ठेवणाऱ्या त्यांचा विद्येशीं संबंध संभवत नाहीं. २५ (१४)–सु.ब्र.३२२.–[–त्या त्या उपनिषदाच्या आरंभीं ते ते मंत्र व तीं तीं कर्में श्रुत आहेत. तोच या अधिकरणाचा विषय आहे, असें सांगण्यास ‘ **अस्ति०** ’ इत्यादि भाष्यानें आरंभ करितात–]

**भाष्यं—अस्त्याथर्वणिकानामुपनिषदारंभे मंत्रसमाम्नायः—“ सर्वं प्रविध्य हृदयं प्रविध्य धमनीः प्रवृज्य शिरोऽभिप्रवृज्य त्रिधा विपृक्तः” इत्यादिः । तांडि-**

**नाम्–"देव सवितः प्रसुव यज्ञम्" इत्यादिः। शाट्यायनिनाम्–" श्वेताश्वो हरितनीलोऽसि" इत्यादिः। कठानां तैत्तिरीयाणां च–'शं नो मित्रः शं वरुणः' इत्यादिः॥**

**भाष्यार्थ**—आथर्वणिकांच्या उपनिषदारंभीं असा मंत्राम्नाय आहे. [–'**सर्वं०**' इत्यादि मंत्रानें अभिचारकर्ता अभिचारदेवतेची प्रार्थना करितो–]=" हे देवते, माझ्या शत्रूच्या ' सर्वं '–सर्व अंगाला ' प्रविध्य '–अत्यंत वेध करून विदारण कर –आणि विशेषत: ' हृदयं प्रवृज्य '–हृदयाला प्रवेध करून त्याचा भेद कर. 'धमनीः प्रविध्य'–शिरांचा विभाग करून त्या तोड. 'शिरः अभिप्रवृज्य'–त्याच्या मस्तकाचें सर्वत: विदारण कर. याप्रमाणें माझा रिपु 'त्रिधा विपृक्तः'–तीन प्रकारें –अनेक प्रकार छिन्न-भिन्न होवो," इत्यादि मंत्राम्नाय आहे. तांडींच्या उपनिषदारंभीं " हे विश्वप्रकाशक देवा, हे उत्पत्तिहेतुभूत सूर्या, तूं यज्ञ संपादन कर" इत्यादि आम्नाय आहे. [–आदित्य विश्वप्रकाशक व विश्वोत्पत्तिहेतु असल्यामुळें ' देव सवितः' असें संबोधिला जातो आणि तो आदित्य यज्ञ व यज्ञपति यजमान यांना संपादन करणें, या कर्मांत 'प्रसुव' या पदानें नियुक्त केला जातो.]=शाट्यायनींच्या उपनिषदारंभीं " हे इंद्रा, तूं श्वेताश्व आहेस [' उच्चैश्रवाः ' हा श्वेताश्व. तो ज्या तुझा आहे, तो तूं श्वेताश्व–]=तूं हरितनील आहेस " [हरित म्ह० इंद्रनील मणि, त्याप्रमाणें तूं नीलवर्ण आहेस–]=कठ व तैत्तिरीय यांच्या उपनिषदारंभीं " आम्हांला मित्र–आदित्य सुखकर होवो, वरुण सुखकर होवो " असा हा मंत्राम्नाय आहे. [–त्यांत विद्यार्थी ही अशी प्रार्थना करीत आहे. '**वाजसनेयिनां०**' इत्यादि भाष्यानें आणखी दोन उदाहरणें– ]

**भाष्यं—वाजसनेयिनां तूपनिषदारंभे प्रवर्ग्यब्राह्मणं पठ्यते—'देवा ह वै सत्रं निषेदुः' इत्यादि। कौषीतकिनामप्यग्निष्टोमब्राह्मणम्–ब्रह्म वा अग्निष्टोमो ब्रह्मैव तदहर्ब्रह्मणैव ते ब्रह्मोपयन्ति तेऽमृतत्वमाप्नुवन्ति य एतदहरुपयन्ति" इति॥**

**भाष्यार्थ**—पण वाजसनेयिशाखेच्या उपनिषदारंभीं ' देव पूर्वी सत्र आरंभिते झाले ' इत्यादि प्रवर्ग्य ब्राह्मण पठित आहे. [ इंद्रादिक देव पूर्वी सत्र करावयास बसले, असा उपक्रम करून ' प्रवर्ग्य ' या नांवाचें कर्म श्रुत आहे, असा याचा भावार्थ. ]=' **कौषीतकिनामपि०** '–कौषीतकींच्याहि उपनिषदारंभीं अग्निष्टोम ब्राह्मण असें पठित आहे–' **ब्रह्म वा०** '–"अग्निष्टोम ब्रह्मच आहे. तो ज्या दिवशीं केला जातो तो दिवसाहि ब्रह्मच आहे. म्हणून प्रत्यहीं करण्यास योग्य असलेलें हें कर्म जे कोणी करितात, ते ब्रह्म याच साधनानें अपर ब्रह्मास प्राप्त होतात आणि ते अमृतत्वास–पर ब्रह्माला क्रमानें प्राप्त होतात. " असें अग्निष्टोम ब्राह्मण

पठित आहे. ·[–याप्रमाणें विषय सांगून उपकाराचा–अंगत्वप्रमाणाचा भाव व अभाव यांनीं ·' किमिमे० ' इत्यादि भाष्यानें संशय सांगतात–]

**भाष्यं**––**किमिमे सर्वे प्रविध्यादयो मंत्राः प्रवर्ग्यादीनि च कर्माणि विद्यासूपसंह्रियेरन्किंवा नोपसंह्रियेरन्निति मीमांसामहे । किं तावन्नः प्रतिभाति । उपसंहार एवैषां विद्यास्विति । कुतः। विद्याप्रधानानां उपनिषद्ग्रंथानां समीपे पाठात्।।**

**भाष्यार्थ**—काय, हे सर्व प्रविध्यादिमंत्र व प्रवर्ग्यादिकर्में यांचा विद्यांमध्यें उपसंहार करावा कीं त्यांचा त्यांत उपसंहार करूं नये, अशी आम्ही मीमांसा करितों,असा याचा आम्ही पूजित विचार करितों.[या अधिकरणांत विद्यासांनिध्यांत पठित असलेल्याहि मंत्रादिकांना विद्योपकारकत्व नसल्यामुळे तदंगत्व नाहीं. म्हणून त्यांचा अन्यत्र उपसंहार होत नाहीं, अशा या उक्तीच्या द्वारा विचाराला ज्ञानहेतुत्व असल्यामुळे याच्या पादादिसंगति आहेत. पूर्वपक्षांत 'मंत्रादिकांचा विद्योपाधींत उपसंहार ' व सिद्धान्तांत 'अनुपसंहार' अशा अभिप्रायानें–'**किं तावत्०**' इत्यादि भाष्यानें विमर्शपूर्वक पूर्वपक्ष–]=तर मग त्यांतील प्रथम आपल्याला कोणता पक्ष प्रतीत होतो ? " या मंत्रादिकांचा विद्यांमध्यें उपसंहारच होतो, " हा पक्ष प्रथम स्फुरतो. [–"अहोपण, त्याचा विनियोग करणाऱ्या प्रमाणाच्या अभावीं त्यांना विद्यांगत्व कसें ?" अशी शंका–]='कुतः०'–कोणत्या कारणानें विद्यांमध्यें त्यांचा उपसंहार होतो ? [–'फलवत् विधीच्या संनिधीमध्यें पठित असलेलें अफल कर्म त्याचें अंग असतें,' असा न्याय असल्यामुळें फलवत् विद्येच्या सांनिध्यांत पठित असलेल्या त्या मंत्रादिकांना तिचें अंगत्व आहे, असें '**विद्याप्रधानानां०**' इत्यादि भाष्यानें पूर्ववादी सांगतो–]=विद्याप्रधान असलेल्या उपनिषद्ग्रंथांच्या समीप त्यांचा पाठ असल्यामुळें त्यांना विद्यांगत्व आहे.[–"अहोपण,श्रुत्यादि विनियोजक प्रमाणांतील एकहि प्रमाणाची उपलब्धि होत नसल्यामुळें, एखाद्या विद्येचा आरंभ करून तिच्या अंगत्वानें त्यांचें आम्नान नसल्यामुळें व आम्नात–पठित असलेल्या अंगांनीं पूर्ण होणाऱ्या विद्येला अधिक अंगांची आकांक्षा नसल्यामुळें या मंत्रादिकांना विद्याशेषत्व नाहीं," अशी ' ननु० ' इत्यादि भाष्यानें शंका–]

**भाष्यं**––**नन्वेषां विद्यार्थतया विधानं नोपलभामहे। बाढम्। अनुपलभमाना अपि त्वनुमास्यामहे संनिधिसामर्थ्यात् । न हि संनिधेरर्थवत्त्वे संभवत्यकस्मादसावनाश्रयितुं युक्तः ।।**

**भाष्यार्थ**—अहोपण, या मंत्रादिकांचें विद्यार्थत्वानें विधान आम्हांला उपलब्ध होत नाहीं. [–विद्येला निराकांक्षत्व जरी असलें तरी मंत्रादिकांच्या फलवत्त्वासाठीं

त्यांना फलवत् नियोगाचें साकांक्षत्व असल्यामुळें फलवत् विद्येच्या समीप असलेल्या त्या मंत्रादिकांना विद्याशेषत्वानें फलवत्त्व असतांना त्यांच्या फलान्तराची कल्पना संभवत नाहीं. त्यामुळें त्यांतील एकाची आकांक्षा झाली असतां विद्याकांक्षेचें संपादन करून प्रकरणादिकांच्या अनुमानानें त्यांना तच्छेषता आहे, असें 'बाढं०' इत्यादि भाष्यानें वादी समाधान सांगतो-]=खरें आहे. पण आम्हांला त्या मंत्रादिकांचें विद्यार्थत्वानें विधान जरी उपलब्ध होत नसलें तरी संनिधीच्या सामर्थ्यानें आम्ही त्याचें-विधानाचें अनुमान करितों. [-" अहोपण, धर्मसाम्य असलें तरी संनिधि संभवतो. म्हणून नुसत्या संनिधीमुळें त्यांना विद्यांगत्व नाहीं, " अशी आशंका घेऊन वादी ' न हि० ' इत्यादि भाष्यानें म्हणतो-]=कारण संनिधीला अर्थवत्त्व संभवत असतांना अकस्मात्-कांहीं फलावांचून त्याचा आश्रय न करणें युक्त नाहीं. [-"मंत्रांना अनुष्ठेयप्रकाशित्व असल्यामुळें विद्याशेष अर्थ प्रकाशित न करणाऱ्या त्यांना विद्याशेषत्व नाहीं," अशी ' ननु० ' इत्यादि भाष्यानें शंका-]

**भाष्यं-ननु नैषां मंत्राणां विद्याविषयं किंचित्सामर्थ्यं पश्यामः। कथं च प्रवर्ग्यादीनि कर्माण्यन्यार्थत्वेनैव विनियुक्तानि सन्ति विद्यार्थत्वेनापि प्रतिपद्येमहीति ॥**

**भाष्यार्थ**—" अहोपण, या मंत्रांचें विद्याविषय कांहींच सामर्थ्य आम्ही पहात नाहीं. [-वाद्यानें संनिधीमुळें सांगितलेल्या कर्मांच्या विद्याशेषत्वाचें **' कथं च०'** इत्यादि भाष्यानें निरसन-]=अन्यार्थत्वानेंच ज्यांचा विनियोग केला आहे अशीं प्रवर्ग्यादिकर्में विद्यार्थत्वानेंहि विनियुक्त आहेत, हें आम्ही कसें जाणावें?" **'इति०'** -अशी शंका येते. [ ' पुरस्तात् उपसदां प्रवर्ग्येण प्रचरन्ति '-उपसदांच्या पूर्वी प्रवर्ग्यानें प्रचार करितात, या वाक्यानें प्रवर्ग्याच्या क्रतुशेषत्वाची सिद्ध होत नाहीं. त्यामुळें नुसत्या संनिधीवरून विद्याशेषत्व सिद्ध होत नाहीं. कारण संनिधीला वाक्याहून दुर्बलत्व आहे आणि ज्योतिष्टोमादिवाक्यानें अग्निष्टोमादिकांच्या स्वर्गादिफलत्वाचें ज्ञान होत असल्यामुळें त्यांना विद्याशेषत्व नाहीं, असा भावार्थ.-वादी मंत्रांच्या व कर्मांच्या विद्याशेषत्वाभावास ' **नैषः०** ' इत्यादि भाष्यानें दूषित करितो-]

**भाष्यं--नैष दोषः । सामर्थ्यं तावन्मंत्राणां विद्याविषयमपि किंचिच्छक्यं कल्पयितुं हृदयादिसंकीर्तनात् । हृदयादीनि हि प्रायेणोपासनेष्वायतनादिभावेनोपदिष्टानि । तद्द्वारेण च "हृदयं प्रविध्य " इत्येवंजातीयकानां मंत्राणामुपपन्नमुपासनांगत्वम् । दृष्टश्चोपासनेष्वपि मंत्रविनियोगः 'भूः प्रपद्येऽमुनामुनामुना'**

---

१ **रत्नप्रभा**—' मंत्रादिक त्या त्या विद्येचे शेष आहेत. कारण ते फलवत् विद्येच्या समीप आहेत. तैत्तिरीयांतील पुरुषयज्ञाप्रमाणें' अशा अनुमानानें वादी समाधान करितो.

**इत्येवमादिः । तथा प्रवर्ग्यादीनां कर्मणामन्यत्रापि विनियुक्तानां सतामविरुद्धो विद्यासु विनियोगो वाजपेय इव बृहस्पतिसवस्येति ॥**

**भाष्यार्थ**—हा दोष येत नाहीं. [—वादी त्यांतील मंत्रांचें विद्यासंबद्ध अर्थप्रकाशनानें विद्याशेषत्व साधितो—]=‘**सामर्थ्यं०** ’—त्यांतील अगोदर मंत्रांचें विद्याविषयहि किंचित् सामर्थ्य कल्पितां येणें शक्य आहे. कारण त्यांत हृदयादिकांचें संकीर्तन केलें आहे. [ ‘ **हृदयादि** ’ येथील ‘आदि-’पदानें नाड्यांचा व आदित्यादिकांचा संग्रह केला जातो. —“तथापि मंत्रांना विद्याविषय सामर्थ्य कसें ? ” ‘ **हृदयादीनि०** ’ इत्यादि भाष्यानें वादी उत्तर सांगतो -]=कारण उपासनांमध्यें प्रायः हृदयादिक आयतनादिभावानें उपदेशिलेलीं आहेत. [हृदयादिकांशीं असंबद्ध अशींहि कांहीं उपासनें आहेत. म्हणून ‘ प्रायेण ’—प्रायः असें म्हटलें आहे. —“ अहोपण, हृदयादिपदाला विद्यासंबद्धार्थत्व जरी असलें तरी इतर मंत्रपदांना विद्याविशेषत्व कसें ? ” अशी आशंका घेऊन ‘ हृदयादि पदांच्या अनुसार तदेकवाक्यतेनें पदान्तरांनाहि गौणवृत्तीनें उपासनार्थत्व आहे,’ असें वादी ‘**तद्द्वारेण०**’ इत्यादि भाष्यानें सांगतो—]=आणि त्या हृदयादिपदांच्या द्वारा ‘ हृदयं प्रविध्य ’ या अशा प्रकारच्या मंत्रांचें उपासनांगत्व उपपन्न होतें. [—“अहोपण, उपासनांमध्यें मंत्रांचा विनियोग केलेला कोठेंहि उपलब्ध होत नाहीं. त्यामुळें ही तुमची कल्पना अयोग्य आहे. ” अशी आशंका घेऊन वादी ‘ **दृष्टश्च०** ’ इत्यादि भाष्यानें म्हणतो—]=आणि “मी ‘भू-’ला शरण आहें, या नांवाच्या पुत्रानें ”—छां. ३. १५. ३ —सु. उ. ३६२—या व अशाच दुसऱ्या मंत्रांचा विनियोग उपासनांमध्येंहि उपलब्ध होतो. [ छांदोग्यांत पुत्राच्या दीर्घायुष्यासाठीं त्रैलोक्याची कोशत्वानें परिकल्पना करून उपासना सांगितली आहे. त्यांत ‘ भूः० ’ इत्यादि हा पित्याचा प्रार्थनामंत्र आहे. ‘ अमुना ’ असें पुत्राचें तीनदा नांव घेतो. या देवदत्तनामक पुत्रासह ‘ भूः ’ अशा या लोकास मी शरण आहें, असा त्या मंत्राचा अर्थ आहे.—आतां आक्षेपकानें ‘प्रवर्ग्यादिकांचा अन्यत्र विनियोग केलेला असल्यामुळें त्यांना विद्याशेषत्व नाहीं ’ असें जें वर—पृ. ३३१—म्हटलें आहे, त्याविषयीं पूर्ववादी ‘ **तथा०** ’ इत्यादि भाष्यानें म्हणतो—]=त्याचप्रमाणें अन्यत्र विनियुक्त असलेल्याहि प्रवर्ग्यादिकर्मांचा विद्यांमध्यें विनियोग अविरुद्ध आहे. [ यद्यपि ‘पुरस्तादुपसदां०’ इत्यादि वाक्य प्रवर्ग्यादिकांच्या अन्यशेषत्ववादी विद्याशेषत्वसाधकसंनिधीहून अधिक बलवान् आहे, तथापि अविरोधामुळें संनिधिवाक्यानें बाध्य नाहीं, वाक्यानें संनिधि बाधित होण्यास योग्य नाहीं. कारण वाक्यानें अन्यत्र

विनियोग केलेल्याहि प्रवर्ग्यादिकांचा संनिधीनें विद्यांमध्येंहि विनियोग होतो, असा भावार्थ.–' **वाजपेय०** ' इत्यादि भाष्यानें वादी त्याविषयीं दृष्टान्त देतो–]=वाजपेयांत जसा बृहस्पतिसवाचा विनियोग केला आहे त्याप्रमाणें ' **इति** ' असा–पूर्वपक्ष प्राप्त होतो. [–'ब्रह्मवर्चसकामो बृहस्पतिसवेन यजेत'-ज्याला **ब्रह्मवर्चस** तेजाची इच्छा असते त्यानें बृहस्पतिसवानें याग करावा, हा ब्रह्मवर्चस हें ज्याचें फल आहे, असाहि असलेला बृहस्पतिसव ' वाजपेयेन इष्ट्वा बृहस्पतिसवेन यजेत '–वाजपेयानें याग करून बृहस्पतिसवानें याग करावा, या वाक्यानें वाजपेयाच्या अंगत्वानें विहित आहे. कारण ' इष्ट्वा '–याग करून या 'क्त्वा'–ऊन-प्रत्ययावरून त्यांच्या एककर्तृकत्वाची सिद्धि होते. एक प्रयोगतेवांचून त्या एककर्तृकत्वाचा संभव नाहीं व एकप्रयोगतेला गुण-प्रधानत्वाची अपेक्षा असते. यास्तव वाजपेयप्रकरणांत त्याचें आम्नान–कथन केलेलें असल्यामुळें वाजपेयाला अंगित्व व बृहस्पतिसवाला त्याचें अंगत्व आहे. –" अहोपण, तुम्हीं ' बृहस्पतिसववाक्य प्रकरणान्तरस्थ बृहस्पतिसवाच्या विपरिवृत्तीसाठीं आहे,' असें म्हणून मीमांसकांचा असा मुद्राभेद जरी केला आहे तरी वाजपेयाचा अंगविधि कोणता ? 'हाच विधि आहे' म्हणून म्हणाल तर प्रकरणान्तरस्थ बृहस्पतिसवाचा येथें संनिधि कसा? कारण एकच वाक्य दूरस्थ कर्माला संनिध स्थापून त्याचें विधान करूं शकत नाहीं. यास्तव ' कौंडपायिनवत् ' दुसऱ्या प्रकरणांतील बृहस्पतिसव हें कर्मान्तर आहे. पण त्याचें नाम प्रसिद्ध बृहस्पतिसवाच्या धर्मांचा अतिदेश करण्यासाठीं आहे. अर्थात् कर्मान्तरच वाजपेयाच्या अंगत्वानें विहित आहे. असें मतद्वय स्थिर झालें असतां विनियुक्ताच्या विनियोगाची शंका कशी ?" असें म्हणाल तर तें खरें आहे. पण हा अभ्युपेत्यवाद आहे, गृहीत धरून केलेला वाद आहे. खादिरत्वादि हे यांचें व्यवस्थित–निश्चित उदाहरण आहे. साधिकार –एका अधिकारांतील दोन कर्मांनाहि अंगांगित्व नाहीं. ' दर्श-पूर्णमासौ इष्ट्वा सोमेन यजेत '-दर्श-पूर्णमास याग करून सोमानें याग करावा, येथेंहि दर्शपूर्णमासांच्या किंवा सोमाच्या प्रकरणांत तद्वचनाचें अकथन असल्यामुळें विशेषत्वाचें ग्रहण होत नाहीं. म्हणून त्यांच्या गुण-प्रधानत्वाची सिद्धि होत नाहीं. पण भिन्नप्रयोगत्व जरी असलें तरी दोन क्रियांच्या कर्तृत्वाधिष्ठान पुरुषाला ऐक्य असल्यामुळें प्रत्ययसिद्धि होते आणि अंगांगित्वाचा बोध करून देणाऱ्या प्रमाणाच्या अभावीं अधिष्ठानलक्षणेशीं विरोध येत नाहीं. त्यामुळें सोमाला दर्श-पूर्णमासांची उत्तरकालता आहे, असा कालासाठीं हा संयोग आहे. पण प्रकृत

उदाहरणांत प्रकरणांतील अध्ययनाच्या सिद्धीसाठीं प्रत्ययानें ज्ञात झालेलें अंगांगित्व आहे. म्हणून अन्यत्र–दुसऱ्या कर्मांत विनियुक्त असलेल्याच बृहस्पतिसवाचा वाजपेयांत 'त्वा'–ऊनप्रत्ययानें विनियोग जसा केला आहे त्याप्रमाणें विनियुक्त असलेल्याच प्रवर्ग्यादिकांचाहि संनिधीनें विद्यांमध्यें विनियोग आहे, असा भावार्थ.–'एवं०' इत्यादि भाष्यानें अशा या पूर्वपक्षाचा अनुवाद करून सूत्राच्या बाहेरच आचार्य अनुपसंहाराची प्रतिज्ञा करितात–]

**भाष्यं—एवं प्राप्ते ब्रूमः–नैषामुपसंहारो विद्यास्विति । कस्मात् । वेधाद्यर्थभेदात् । "हृदयं प्रविध्य" इत्येवंजातीयकानां हि मंत्राणां येऽर्था हृदयवेधादयो भिन्ना अनभिसंबद्धास्त उपनिषदुदिताभिर्विद्याभिः । न तेषां ताभिः संगन्तुं सामर्थ्यमस्ति ॥**

**भाष्यार्थ**—असा पूर्वपक्ष प्राप्त झाला असतां 'या मंत्रादिकांचा विद्यांमध्यें उपसंहार होत नाहीं' असा सिद्धान्त आम्ही सांगतों. [–"अहोपण, संनिधीमुळें मंत्रांचा व कर्मांचा विद्यांमध्यें उपसंहार आम्हीं सांगितला आहे. त्याचा निषेध कोणत्या कारणानें करितां ?" असें वादी '**कस्मात्**' या भाष्यानें विचारितो–] =कोणत्या कारणानें त्यांचा उपसंहार होत नाहीं ? [–त्याविषयीं हेतुत्वानें सूत्राला प्रवृत्त करितात–]='**वेधाद्यर्थभेदात्**'–वेधादि-अर्थभेदामुळें. [–आथर्वणिकांच्या मंत्राम्नायाच्या अक्षरांची विद्याशेषत्वाभावपरत्वानें योजना–]='**हृदयं०**'–कारण '**हृदयाला अत्यंत वेध करून**'–या अशा प्रकारच्या मंत्रांचे जे हृदयवेधादि अर्थ ते भिन्न म्ह० उपनिषदांत सांगितलेल्या विद्यांशीं अनभिसंबद्ध–सर्व प्रकारें **संबद्ध नसलेले** असे आहेत. [–'अनभिसंबद्ध' इत्यादि पदांनीं 'भिन्न-'शब्दाचा अभीष्ट अर्थ सांगून '**न तेषां०**' इत्यादि भाष्यानें त्यांचा अनभिसंबंधच स्पष्ट करितात–] =त्या मंत्रांचें त्या विद्यांशीं संगत–संबद्ध होण्यास सामर्थ्य नाहीं–त्या मंत्रांत उपनिषद्गत विद्यांशीं संबद्ध होण्याचें सामर्थ्य नाहीं. [–'हृदय या पदाला उपासनासंबंधार्थत्व असल्यामुळें तद्द्वारा–हृदयद्वारा मंत्राला उपासनाशेषत्व आहे' असें जें पूर्ववाद्यानें वर म्हटलें आहे त्याचें तो '**ननु०**' इत्यादि भाष्यानें स्मरण देतो–]

**भाष्यं–ननु हृदयस्योपासनेष्वप्युपयोगात्तद्द्वारक उपासनासंबंध उपन्यस्तः। नेत्युच्यते । हृदयमात्रसंकीर्तनस्य ह्येवमुपयोगः कथंचिदुत्प्रेक्ष्येत । न च हृदयमात्रमत्र मंत्रार्थः । "हृदयं प्रविध्य धमनीः प्रवृज्य" इत्येवंजातीयको हि न सकलो मंत्रार्थो विद्याभिरभिसंबध्यते । अभिचारविषयो ह्येषोऽर्थः । तस्मादाभिचारिकेण कर्मणा "सर्वं प्रविध्य" इत्येतस्य मंत्रस्याभिसंबंधः ॥**

**भाष्यार्थ**--अहोपण, हृदयाचा उपासनांमध्येंहि उपयोग असल्यामुळें त्याच्या द्वारा मंत्रांचा उपासनासंबंध वर सांगितला आहे-तद्द्वारक उपासनासंबंधाचा वर उपन्यास केला आहे. [-'**नेत्युच्यते०**' इत्यादि भाष्यानें मंत्राच्या उपासनाशेषत्वाचें प्रत्याख्यान-]=पण असल्या हृदयाचा उपासनासंबंध नाहीं, असें आम्हांकडून सांगितलें जातें. कारण केवल हृदयाच्याच कथनाचा असा उपयोग 'कथंचित्'-कसा-बसा कल्पितां येईल ! [-दुसऱ्या पदांबरोबर ज्याचा पाठ केलेला आहे अशाहि हृदयाचा वस्तुत: उपासनेला उपयोग नाहीं, असें मानून ' कथंचित्' असें म्हटलें आहे. -"हृदयाचा विद्येला उपयोग आहे,असें झालें असतां मंत्रार्थालाहि तद्भाव आहे असें होत असल्यामुळें मंत्राला विद्याशेषत्व आहे," अशी आशंका घेऊन आचार्य '**न च०**' इत्यादि म्हणतात-]=आणि हृदयमात्र-केवल हृदय, हा येथील -आथर्वण श्रुतींतील मंत्राचा अर्थ नाहीं. [-" अहोपण, हृदयातिरिक्त-हृदयाहून पृथक् असलेल्याहि मंत्रार्थाचा विद्यायोग-विद्यासंबंध होईल" अशी आशंका घेऊन 'हृदयातिरिक्त मंत्रार्थाचा साक्षात् विद्यायोग आहे कीं परंपरेनें ?' असा विकल्प करून ' **हृदयं०** ' इत्यादि भाष्यानें त्यांतील पहिल्या पक्षाला दूषित करितात-] =' हृदयाला प्रवेध करून, शिरा तोडून '-पृ.३२९-हा अशा प्रकारचा सकल मंत्रार्थ विद्यांशीं अभित:-साक्षात् संबद्ध होत नाहीं. [-' हृदयाच्या द्वारा-परंपरेनें दुसऱ्या पदांचाहि विद्यायोग होईल' या दुसऱ्या कल्पाची आशंका घेऊन आचार्य ' **अभिचारविषय:०**' इत्यादि भाष्यानें म्हणतात-]=कारण हा अर्थ अभिचार-विषय आहे. त्यामुळें ' सर्वं प्रविध्य० ' अशा या मंत्राचा आभिचारिक कर्माशीं अभिसंबंध-साक्षात् संबंध आहे. [सर्वच पदांनीं हा मंत्र स्वत: अभिचारगत अर्थाचा प्रकाशक असलेला दिसतो. त्यामुळें सामर्थ्यलक्षण लिंग संनिधीचा बाध करून याचें कर्मशेषत्व प्राप्त करवितें आणि सर्व पदांचा अर्थ अभिचारामध्यें संबद्ध आहे, असें झालें असतां केवल एकपदसंबद्धार्थत्वानेंच विद्याशेषत्व नाहीं. कारण हृदयपदाला अभिचारामध्येंहि संबद्धार्थत्व आहे. म्ह० तें पद अभि-चाराशींहि संबद्ध आहे, असा भावार्थ.-आथर्वणिकांच्या उपनिषदुपक्रमाच्या लिंग-वशात् कर्मसंबंध जसा आहे त्याचप्रमाणें तांडींच्याहि उपनिषदुपक्रमाची लिंगा-मुळेंच कर्मसंगति आहे, असें ' **तथा०** ' इत्यादि भाष्यानें सांगतात-]

**भाष्यं--तथा "देव सवित: प्रसुव यज्ञम्" इत्यस्य यज्ञप्रसवलिंगत्वाद्यज्ञेन कर्मणा संबंध: । तद्विशेषसंबंधस्तु प्रमाणान्तरादनुसर्तव्य: । एवमन्येषामपि**

**मंत्राणां केषांचिल्लिंगेन केषांचिद्वचनेन केषांचित्प्रमाणान्तरेण। इत्येवमर्थान्तरेषु विनियुक्तानां रहस्यपठितानामपि सतां न संनिधिमात्रेण विद्याशेषत्वोपपत्तिः ॥**

**भाष्यार्थ**—त्याचप्रमाणें 'हे देव, हे सवित्या, यज्ञ संपादन कर'–पृ.३२९–अशा या मंत्राचा यज्ञप्रसवलिंगत्वावरून यज्ञ या कर्माशीं संबंध आहे. [–"अहोपण, त्याचा केवल कर्मामध्यें प्रयोग जरी होत असला तरी कोणत्या विशेष कर्माशीं त्याची संगति आहे, हें लिंगावरून ज्ञात होत नाहीं. त्यामुळें त्यासाठीं दुसऱ्या प्रमाणाचा शोध करणें उचित आहे" अशी आशंका घेऊन '**तद्विशेषसंबंधस्तु०**' इत्यादि भाष्यानें म्हणतात–]=पण त्याचा विशेषसंबंध दुसऱ्या प्रमाणावरून अनुसरावा. ['सावित्रं जुहोति'–सवितादेवताक चरूचा होम करितो, 'कर्मणः कर्मणः पुरस्तात् सवने सवने जुहोति'–प्रत्येक कर्माच्या पूर्वी प्रत्येक सवनांत होम करितो, या वाक्यांवरून याचा वाजपेयसंबंध सिद्ध होतो, असा भावार्थ.–'**एवं०**' इत्यादि भाष्यानें उक्त न्यायाचा मंत्रान्तरांत अतिदेश करितात–]=याच न्यायानें 'श्वेताश्वो०'–पृ. ३२९–इत्यादि अन्य मंत्रांतीलहि कांहीं मंत्रांचा लिंगानें, कांहीं मंत्रांचा वचनानें म्ह० श्रुतीनें किंवा वाक्यानें, कांहीं मंत्रांचा प्रमाणान्तरानें–प्रकरणानें कर्मसंबंध अनुसरावा. [–याप्रमाणें लिंगादिकांनीं मंत्रांचा अन्यत्र विनियोग सिद्ध झाला असतां '**इत्येवं०**' इत्यादि भाष्यानें फलित सांगतात–]=याप्रमाणें अर्थान्तरांमध्यें विनियुक्त असलेल्या व रहस्यपठित–उपनिषत्पठित असलेल्याहि मंत्रांच्या केवळ संनिधीनेंच विद्याशेषत्वाची उपपत्ति लागत नाहीं. [–"पण लिंगादिकांनीं संनिधीचा बाध कशासाठीं केला जातो!" '**दुर्बलो हि०**' इत्यादि भाष्यानें उत्तर–]

**भाष्यं—दुर्बलो हि संनिधिः श्रुत्यादिभ्य इत्युक्तं प्रथमे तंत्रे "श्रुतिलिंगवाक्यप्रकरणस्थानसमाख्यानां समवाये पारदौर्बल्यमर्थविप्रकर्षात्" इत्यत्र ॥**

**भाष्यार्थ**—कारण संनिधि श्रुत्यादिकांहून दुर्बल आहे [–"पण संनिधीलाहि जर श्रुत्यादिकांसारखेंच प्रमाणत्व आहे तर संनिधीला दुर्बलत्व कसें?" '**इत्युक्तं०**' इत्यादि भाष्यानें उत्तर–]=असें प्रथम तंत्रांत म्ह० पूर्वमीमांसेंत 'श्रुति, लिंग, वाक्य, प्रकरण, स्थान व समाख्या यांचा समवाय–समान विषयत्वानें दोहोंचा विरोध आला असतां पुढील पुढील प्रमाणाला अर्थविप्रकर्षामुळें–स्वार्थाचा बोध करितांना पराची पूर्वव्यवधानानें प्रवृत्ति होत असल्यामुळें दुर्बलत्व आहे' –पू. मी. ३. ३. १३–या सूत्रांत सांगितलें आहे. [आपला मुख्य अर्थ सांगण्यासाठीं दुसऱ्या पदाची अपेक्षा न करणारें जें पद ती श्रुति, श्रुत पदार्थांतील शक्ति हें

लिंग, परस्पर संबंधानें एक अर्थ सांगणारा जो पदसमूह तें वाक्य, अंगत्वकथनाची आकांक्षा करणारें जें प्रधानवाक्य तें प्रकरण, समानदेशत्व हें स्थान, यौगिक शब्द ही समाख्या, अशा या उक्तलक्षण सहा प्रमाणांचा समवाय–समानविषयत्व-विरोध आला असतां पुढील प्रमाणाला दुर्बलत्व आहे. म्ह० श्रुतीशीं लिंगाचा

---

१ न्यायनिर्णय—त्यांतील श्रुति व लिंग यांच्या विरोधाचें उदाहरण–'ऐंद्र्या गार्हपत्यं उपतिष्ठते'–ऐंद्रीनें गार्हपत्यास उपस्थित होतो, हें आहे. यांतील 'गार्हपत्यं' ही द्वितीया आहे. म्हणून गार्हपत्याचें क्रियेप्रत कर्मत्वानें शेषित्व सिद्ध झालें. 'ऐंद्र्या' या तृतीयाश्रुतीला 'कदाचनस्तरीरसि०' इत्यादि ऐंद्राख्य ऋचेला करणत्वानें उपस्थान-क्रियेची शेषता आहे. तो हा शेषशेषिभाव 'कदाचन०' अशा या ऋचेच्या इंद्रदेव-तोक्तिसामर्थ्यलिंगाशीं विरुद्ध आहे. त्यांतील लिंगाच्या अनुरोधानें 'गार्हपत्यं' या श्रुतीचें सप्तमी-अर्थी 'गार्हपत्याच्या समीप इंद्र उपस्थेय–उपस्थान करण्यास योग्य आहे,' असें व्याख्यान करावें, की श्रुतीच्या अनुरोधानें लिंगाचें 'इंद्र म्ह० ईश्वर, तो स्वोचित क्रियेमुळें गार्हपत्य आहे' असें व्याख्यान करावें, असा संदेह आला असतां "श्रुतीला विनियोगासाठीं सामर्थ्याची अपेक्षा जरी असली तरी तिच्या ज्ञानाला त्याची अपेक्षा नसल्यामुळें अवगत झालेल्या श्रौत विनियोगाच्या अनुरोधानेंच लिंगाची स्थिति होते. यास्तव तें लिंगच श्रुतीच्या अनुरोधानें न्यावें, श्रुतीच्या अनुसार त्याची व्यवस्था लावावी" असा निर्णय केला आहे. लिंग व वाक्य यांच्या विरोधाचें 'स्योनं ते सदनं करोमि घृतस्य धारया सुशेवं कल्पयामि तस्मिन् सीद अमृते प्रतितिष्ठ व्रीहीणां मेध सुमनस्यमानः' असें हें उदाहरण आहे. 'मी घृताच्या धारेनें तुझें सुंदर घर करितों. 'हे व्रीहींच्या पुरोडाशा, त्या अमृत घरांत तूं प्रसन्न होऊन रहा, प्रतिष्ठित हो,' असा या मंत्राचा भावार्थ आहे. त्याविषयीं 'या सर्व मंत्राचा उपस्तरण व पुरोडाशासादन या दोहोंमध्यें प्रयोग करावा कीं 'कल्पयामि' येथपर्यंतच्या मंत्रभागाचा उपस्तरणांत व बाकीच्या मंत्रभागाचा पुरोडाशासादनांत प्रयोग करावा' असा संदेह आला असतां 'सामर्थ्य एकवाक्यताज्ञानपूर्वक होणारें नाहीं, म्ह० तें एकवाक्यताज्ञानानंतर होणारें नाहीं. तर सदनकरण व पुरोडाशाचें आसादन–स्थापन या दोन अनुष्ठेयांचें विभागानेंच प्रका-शन करण्याचें सामर्थ्य त्या दोन मंत्रांमध्यें असल्यामुळें व एकवाक्यताबलानें सामर्थ्याचें अनुमान होत असल्यामुळें पूर्वीच प्रतीत झालेलें सामर्थ्य एकेका भागाचें एकेका अर्थांत विनियोजक श्रुतीची कल्पना करवितें. त्यामुळें वाक्याहून लिंगच बलवान् आहे' असा सिद्धान्त केला आहे. 'सूक्तवाक' हें वाक्य व प्रकरण यांच्या विरोधाचें उदा-हरण आहे. त्यांत पौर्णमासी देवता व अमावास्या देवता सांगितलेल्या आहेत, त्या

विरोध आला असतां लिंगाला दुर्बलत्व आहे. लिंगाशीं वाक्याचा विरोध आला असतां वाक्याला दुर्बलत्व, वाक्याशीं विरोध आला असतां प्रकरणाला दुर्बलत्व, प्रकरणाशीं विरोध आला असतां स्थानाला व स्थानाशीं विरोध आला असतां समाख्येला दुर्बलत्व आहे, त्याविषयीं 'अर्थविप्रकर्षामुळें' असा हेतु सांगितला

---

परस्पर एकवाक्यतेस प्राप्त होत नाहींत. म्हणून लिंगाच्या सामर्थ्यामुळें पौर्णमासी प्रयोगापासून इंद्र व अग्नि या शब्दांचा उत्कर्ष केला असतां त्यांना समवेतार्थत्व आहे, असें होतें आणि अमावास्येमध्यें त्याचा प्रयोग केला असतां त्याच्या एकवाक्यतेनें प्रतीत झालेल्या 'अवीवृधेतां महो ज्यायोऽक्राताम्' अशा याचा उत्कर्ष करून प्रयोग करूं नये कीं जेथें इंद्राग्निशब्द उत्कर्ष करून नेलेला असतो तेथेंच याचाहि पौर्णमासीपासून उत्कर्ष करून प्रयोग करावा' असा संशय आला असतां "प्रकरणाला विनियोज्यरूप सामर्थ्याची अपेक्षा न करितां विनियोजकत्वच नसल्यामुळें आणि त्याच्या रूपाचें आलोचन करूं लागलें असतां ज्याची प्रथम भावना होते त्यालाच विनियोजकत्व असल्यामुळें प्रकरणाहून शीघ्र प्रवृत्त होणाऱ्या वाक्याचें प्रथम विनियोजकत्व संभवत असल्यामुळें प्रकृताचें साकांक्षत्व जाणून 'त्याच्याशीं याचें एकवाक्यत्व आहे,' असें अनुमानाच्या पूर्वींच वचनसामर्थ्यानें पदांचें एकवाक्यत्व प्रत्यक्ष असल्यामुळें, त्याच्याशीं विरोध आला असतां अनुमानाचें उत्थानच होत नसल्यामुळें देवतापनयांत त्यांच्या शेषांचा वाक्यापासून अपकर्षच होतो." क्रम व प्रकरण यांच्या विरोधाचें उदाहरण—राजसूयसंनिधींतील अभिषेचनीयाच्या समीप शुनःशेपाचें आख्यान पठित आहे. नाना इष्टि, पशु व सोम यांचा समुदाय हाच राजसूय, त्यांत अभिषेचनीय सोमयाग आहे. त्याच्या संनिध "शुनःशेप या नांवाचा कोणी ऋषिपुत्र हरिश्चंद्रपुत्रानें पुरुषमेधासाठीं पशुत्वानें विकत घेतला. तो ऋषिपुत्र ऋत्विजांनीं आपलें आलभन करावयास आरंभ केला असतां वरुणाची स्तुति करूं लागला. तेव्हां वरुण संतुष्ट झाला व त्यानें त्याचें रक्षण केलें," असें आख्यान व अक्षद्यूतादि श्रुत आहे. 'तें समस्त राजसूयाचें अंग आहे कीं एकट्या अभिषेचनीय सोमाचेंच,' असा संशय आला असतां "प्रकरणाच्या साकांक्षतेला प्रत्यक्षत्व असल्यामुळें स्ववाक्योपात्त—स्ववाक्यानें ग्रहण केलेल्या पदार्थाविषयीं निराकांक्ष असलेल्याहि अभिषेचनीयाची आकांक्षा संनिधिपाठानें उत्थापित होण्यापूर्वीच ज्याची आकांक्षा उत्थित—उत्पन्न झालेली आहे असें प्रकरण एकवाक्यतादिकल्पनापरंपरेनें विनियोगाची कल्पना करवितें. त्यामुळें प्रकरणाशीं विरोध आला असतां संनिधि बाधित होतो." क्रम व समाख्या यांच्या विरोधाचें उदाहरण—पुरोडाशिकाख्यानकांडांत आग्नेयादि कर्मांचे मंत्र

आहे. स्वार्थकथनाला पूर्व पूर्व प्रमाणाची अपेक्षा असल्यामुळें लिंगादिकांना विलंबानें अर्थज्ञानहेतुत्व आहे, असा याचा भावार्थ.–याप्रमाणें मंत्राच्या विद्याशेषत्वाचें निरसन करून प्रवर्ग्यादि कर्मांच्या विद्याशेषत्वाचें निरसन 'तथा०' इत्यादि भाष्यानें करितात–]

**भाष्यं—तथा कर्मणामपि प्रवर्ग्यादीनामन्यत्र विनियुक्तानां न विद्याशेषत्वोपपत्तिः। न ह्येषां विद्याभिः सहैकार्थ्यं किंचिदस्ति। वाजपेये तु बृहस्पतिसवस्य स्पष्टं विनियोगान्तरम्—"वाजपेयेनेष्ट्वा बृहस्पतिसवेन यजेत" इति ॥**

**भाष्यार्थ**—त्याचप्रमाणें अन्यत्र विनियुक्त असलेल्या प्रवर्ग्यादि कर्मांचेंहि विद्याविशेषत्व उपपन्न होत नाहीं. [–त्याविषयीं हेतु–]=**'न ह्येषां०'**–कारण यांचें विद्यांशीं थोडेंसेंहि एकार्थत्व नाहीं. [जें प्रधानावर उपकार करणारें नसतें त्याला त्या प्रधानाचें शेषत्व–अंगत्वहि नसतें आणि प्रवर्ग्यादिकांनीं केलेल्या उपकाराचा विद्येमध्यें मुळींच प्रत्यय येत नाहीं. म्हणून, प्रवर्ग्यादिकांना विद्याशेषत्व नाहीं, असा भावार्थ.–आतां विनियुक्तविनियोग म्ह० ज्याचा एका कर्मांत विनियोग केला आहे त्याचाच अन्य कर्मांत विनियोग करणें, हे विरोधाला कारण होत नाहीं, याविषयीं उपेत्यवाद्यानें-तसें गृहीत धरून वाद करणारानें जें वर–पृ. ३३३–म्हटलें आहे, त्याविषयीं आचार्य **'वाजपेये तु०'** इत्यादि भाष्यानें म्हणतात–]=पण वाजपेयामध्यें 'वाजपेयानें

---

क्रमानें श्रुत आहेत. त्यांत अमावास्यकर्मसंबंधी सांनाय्यक्रमांत 'शुंदध्वं दैव्याय कर्मणे' असा शुंधनार्थ मंत्र पठित आहे. 'त्यांतील पुरोडाशपात्रांच्या शुन्धनामध्यें या मंत्राचा प्रयोग करावा कीं सांनाय्यपात्रांच्या शुंधनामध्यें' असा संदेह आला असतां "समाख्या–संज्ञा संबंध या कारणानें होणारी असल्यामुळें त्या संबंधासाठीं जो संनिधीची कल्पना करीत आहे तोंच वैदिक प्रत्यक्ष संनिधीनें आकांक्षाद्वारा परंपरेनें श्रुतीची परिकल्पना करून विनियोग केलेला असल्यामुळें व पुरोडाशवादी मंत्रांना बाहुल्य असल्यामुळें त्याची समाख्या–संज्ञा सिद्ध होत असल्यामुळें स्थानाशीं विरोध आला असतां समाख्या विनियोगकर्त्री होत नाहीं," असें सिद्ध केलें आहे. याप्रमाणें लिंगाचें एका श्रुतीनें श्रुत्यर्थविनियोगामध्यें व्यवधान आहे, वाक्याचें लिंग व श्रुति या दोहोंनीं, प्रकरणाचें वाक्य, लिंग व श्रुति या तिहींनीं, स्थानाचें प्रकरण, वाक्य, लिंग व श्रुति अशा चारींनीं व समाख्येचें स्थान, प्रकरण, वाक्य, लिंग व श्रुति अशा पांचांनीं व्यवधान आहे आणि असा अवांतरभेद असल्यामुळें त्यांचा परस्पर विरोध आला असतां श्रुतीला केवल बाधकत्वच आहे. लिंग, वाक्य, प्रकरण व स्थान यांना पूर्व-पूर्वांच्या अपेक्षेनें बाध्यत्व व उत्तरोत्तराच्या अपेक्षेनें बाधकत्व असें उभयार्थत्व आहे, व समाख्येला केवल बाध्यत्व आहे, असा याचा विवेक–विभाग जाणावा.

याग करून बृहस्पतिसवानें याग करावा ' असें बृहस्पतिसवाचें स्पष्ट विनियोगान्तर आहे.[यांतील 'इष्ट्वा'–याग करून, ही समानकर्तृत्वामध्यें–पृ.३३३–विहित असलेली'क्त्वा'-ऊनप्रत्ययश्रुति संयोगपृथक्त्वानें विनियुक्ताचाहि विनियोग करिते.त्यामुळें त्या उदाहरणांत समानबल असलेल्या दोन श्रुतींचा परस्पर बाध होत नाहीं. म्हणून बृहस्पतिसवाचें उभयथात्व इष्ट आहे, असा भावार्थ.–पण प्रकृत उदाहरणांतील दोन विनियोजक प्रमाणांना तुल्यबलत्व नाहीं,असें'अपि च०'इत्यादि भाष्यानें सांगतात–]

**भाष्यं––अपि चैकोऽयं प्रवर्ग्यः सकृदुत्पन्नो बलीयसा प्रमाणेनान्यत्र विनियुक्तो न दुर्बलेन प्रमाणेनान्यत्रापि विनियोगमर्हति । अगृह्यमाणविशेषत्वे हि प्रमाणयोरेतदेवं स्यात् । न तु बलवदबलवतोः प्रमाणयोरगृह्यमाणविशेषता संभवति । बलवदबलवत्त्वविशेषादेव ॥**

**भाष्यार्थ**––शिवाय[1] 'पुरस्तात् उपसदां' या अधिक बलवान् प्रमाणानें 'अन्यत्र' –ज्योतिष्टोमादिकांत विनियुक्त असलेला एकदाच उत्पन्न झालेला हा एक प्रवर्ग्य संनिधि या दुर्बल प्रमाणानें अन्य विद्येमध्येंहि विनियोगास पात्र होत नाहीं. [–"अहो-पण विरोधाचा अभाव असल्यामुळें व विरोध नसतांना बाधाचा अभाव असल्यामुळें दोन्ही ठिकाणीं दोन प्रमाणांनीं विनियोग होईल " अशी आशंका घेऊन '**अगृह्यमाण०**' इत्यादि भाष्यानें म्हणतात–]=कारण दोन प्रमाणांच्या विशेषाचें जर ग्रहण केलें गेलें नसतें–त्यांचा विशेष जर अज्ञात असता तर '**एवं**'–दोन प्रमाणांनीं '**एतत्**'–हें उभयत्र विनियुक्तत्व सिद्ध झालें असतें. [–" अहोपण, वाक्यादि व संनिधि यांचा विशेष निश्चित नाहीं," अशी आशंका घेऊन '**न तु०**' इत्यादि भाष्यानें म्हणतात–]=पण बलवान् व अबलवान् अशा दोन प्रमाणांची अगृह्यमाणविशेषता संभवत नाहीं. म्ह० त्यांच्या विशेषतेचें ग्रहण–ज्ञान होत नाहीं, असें म्हणतां येत नाहीं. कारण बलवत्त्व व अबलवत्त्व हाच त्यांचा विशेष आहे. [–याप्रमाणें प्रमाणांचा विशेष ज्ञात होतो, असें सिद्ध झालें असतां '**तस्मात्०**' इत्यादि भाष्यानें फलित सांगतात–]

**भाष्यं––तस्मादेवंजातीयकानां मंत्राणां कर्मणां वा न संनिधिपाठमात्रेण विद्याशेषत्वं आशंकितव्यम् । अरण्यानुवचनादिधर्मसामान्यात्तु संनिधिपाठ इति संतोष्टव्यम् ॥ २५ ॥ ( १४ )**

---

१ **न्यायनिर्णय**–तुल्यबलत्वशंकेच्या निरसनद्वारा विनियुक्ताच्या विनियोगाचा असंभव **आहे**, याविषयींच्या हेत्वन्तराचा समुच्चय करण्यासाठीं ' अपि च '–शिवाय, असें येथें म्हटलें आहे.

**भाष्यार्थ**--यास्तव अशा जातीच्या मंत्रांना किंवा कर्मांना केवल **संनिधिपाठ,** या एवढ्याच कारणानें विद्याशेषत्व आहे, अशी आशंका घेऊं नये, असें मनांतहि आणूं नये. [ प्रकरणपाठाच्या सिद्धीसाठीं मंत्रादिकांचा विनियोग कल्पिला जातो. पण त्याहून अधिक बलवान् असलेल्या प्रमाणानें त्याचा अन्यत्र विनियोग केला असतां प्रकरणपाठसिद्धीसाठीं क्रम विनियोजक होऊं शकत नाहीं. कारण त्याला दुर्बलत्व आहे, असा भावार्थ.-" तर मग संनिधिपाठाची काय वाट ?" '**अरण्य०**' इत्यादि भाष्यानें उत्तर-]=अरण्यांत त्याचें अनुवचन-अध्ययनादि करणें या धर्माच्या सामान्यामुळें-सादृश्यामुळें तो संनिधिपाठ आहे, असें समजून वाद्यानें संतुष्ट व्हावें. २५ -सु.ब्र.३३३. (१४)

**( १५. हान्यधिकरण. सू. २६. )**

—" विद्येच्या संनिधींत म्ह० विद्याप्रकरणांत श्रुत असलेल्याहि मंत्रादिकांचा विद्येमध्यें सामर्थ्याच्या अभावामुळें जसा अनुपसंहार आहे-त्यांचा जसा उपसंहार होत नाहीं, त्याप्रमाणें कोठें कोठेंच हानाच्या-त्यागाच्या सांनिध्यांत श्रुत असलेल्या उपायनाचा-ग्रहणाचा अनुपसंहार आहे. कारण उपायनावांचूनहि हानाचा संभव आहे. त्यामुळें त्याला त्याच्या उपपादनाचें सामर्थ्य नाहीं." अशी आशंका घेऊन सूत्रकार '**हानौ तु०**' इत्यादि सूत्रानें म्हणतात—

**सूत्रं—हानौ तूपायनशब्दशेषत्वात्कुशाछंदस्तुत्युपगानवत्तदुक्तम् ॥२६॥**

**सूत्रार्थ**—जेथें केवल हान-त्याग श्रुत असेल तेथें उपायनाचा उपसंहार करावा. 'कारण उपायनशब्दाला हानाचें शेषत्व आहे.' 'कुशा, छंद, स्तुति व उपगान यांप्रमाणें' 'तदुक्तं'-जैमिनीनें द्वादशलक्षणींत 'विप्रतिषेधे विकल्पः स्यात्' या सूत्रांशानें 'दीक्षितो न जुहोति' व 'यावज्जीवं अग्निहोत्रं जुहुयात्' यांचा विकल्प मानणें अन्याय्य आहे, असें म्हटलें आहे. २६.(१५)-सु. ब्र. पृ. ३३४-
[-या अधिकरणाचा विषय सांगण्यासाठीं निरनिराळ्या शाखास्थ वाक्यांचा '**अस्ति०**' इत्यादि भाष्यानें उल्लेख करितात-]

**भाष्यं—अस्ति तांडिनां** श्रुतिः- '**अश्व इव रोमाणि विधूय पापं चंद्र इव राहोर्मुखात्प्रमुच्य धूत्वा शरीरमकृतं कृतात्मा ब्रह्मलोकमभिसंभवामि' इति । तथाथर्वणिकानाम् 'तथा विद्वान्नामरूपाद्विमुक्तः परात्परं पुरुषमुपैति दिव्यम्' इति ॥**

**भाष्यार्थ**--तांडींची " अश्व जसा रोम-अंग झाडून निर्मल होतो त्याप्रमाणें पाप झाडून टाकून व चन्द्र जसा राहूच्या मुखांतून मुक्त होतो त्याप्रमाणें शरीराचा **त्याग करून मी कृतकृत्य** होत्साता नित्य ब्रह्मलोकास प्राप्त होतों"-**छां.८.१३.१.**

सु. उ. ४९०–अशी श्रुति आहे. [ जसा अश्व जीर्ण रोमांना रजांसह अंग हालवून टाकितो व स्वच्छ होतो तसा मीहि सर्व पाप टाकून निर्मल होऊन ब्रह्मलोकास प्राप्त होतों, असा श्रुतींतील पदांचा संबंध आणि जसा राहुग्रस्त चन्द्र राहूच्या मुखांतून प्रमुक्त होऊन प्रकाशमान होतो त्याप्रमाणें अकृत–अशुद्ध किंवा प्रवाहरूपानें अनादिसिद्ध शरीराला टाकून स्वच्छ होऊन ज्याचा आत्मा कृत–सिद्ध आहे म्ह० पुन: अपूर्व पुण्योपचयानें साध्य नाहीं, असा तो मी कृतकृत्य होत्साता ब्रह्मलक्षणरूपास प्रत्यग्रूपानें प्राप्त होतों, असा भावार्थ. ]=' तथा०'–तांडींप्रमाणें आथर्वणिकांची " जशा वाहणाऱ्या नद्या नाम-रूपांचा त्याग करून समुद्रांत अस्त पावतात त्याप्रमाणें विद्वान् नाम-रूपांपासून विमुक्त होऊन परात्पर दिव्य पुरुषास प्राप्त होतो. "–मुं.३.२.८.सु.१६३–अशी श्रुति आहे. [–'तथा०' इत्यादि भाष्यानें अन्य शाखांतील श्रुतींचा निर्देश–]

**भाष्यं**––तथा शाट्यायनिन: पठन्ति " तस्य पुत्रा दायमुपयन्ति सुहृद: साधुकृत्यां द्विषन्त: पापकृत्याम् " इति । तथैव कौषीतकिन: " तत्सुकृतदुष्कृते विधूनुते तस्य प्रिया ज्ञातय: सुकृतमुपयन्त्यप्रिया दुष्कृतम् " इति ॥

**भाष्यार्थ**—तांडी व आथर्वण यांप्रमाणें शाट्यायनशाखाध्यायी " त्या मृत विद्वानाचे पुत्र त्याचें धन घेतात, सुहृद् पुण्यकर्म घेतात व त्याचा द्वेष करणारे पापकर्म घेतात" असें पठतात.–' तथा०'–शाट्यायनींप्रमाणेंच कौषीतकिशाखाध्यायीहि "त्या वेळीं–शरीरत्यागाचे वेळीं तो पुण्य-पापांचा त्याग करितो. [विद्वान् विद्याबलानें सुकृत-दुष्कृतांचे निरसन करितो, असा याचा भावार्थ.–' तस्य०' इत्यादि वाक्यानें श्रुति त्या टाकिलेल्या पुण्य-पापांचा विनियोग दाखविते–]=त्याचे प्रिय ज्ञातिबांधव–सुहृद् सुकृत घेतात व अप्रिय दुष्कृत घेतात "–कौ. १. ४. सु. उ. ८२६–असें सांगतात. [–' तदिह० ' इत्यादि भाष्यानें विषयपरिशोधासाठीं आपातत:–सामान्यत: वाक्यार्थ सांगतात–]

**भाष्यं**––तदिह क्वचित्सुकृतदुष्कृतयोर्हानं श्रूयते । क्वचित्तयोरेव विभागेन प्रियैरप्रियैश्चोपायनम् । क्वचित्तूभयमपि हानमुपायनं च । तद्यत्रोभयं श्रूयते तत्र तावन्न किंचिद्वक्तव्यमस्ति । यत्राप्युपायनमेव श्रूयते न हानं, तत्राप्यर्थादेव हानं संनिपतति। अन्यैरात्मीययो: सुकृतदुष्कृतयोरुपेयमानयोरावश्यकत्वात्तद्धानस्य॥

**भाष्यार्थ**–त्या श्रुतींतील या उदाहृत वाक्यांमध्यें कोठें–तांडी व आथर्वण यांच्या श्रुतींत सुकृत व दुष्कृत यांचें हान श्रुत आहे. कोठें–शाट्यायनिश्रुतींत त्यांचेंच विभागानें प्रिय व अप्रिय यांच्याकडून उपायन–ग्रहण श्रुत आहे. पण कोठें–कौषी-

तकिश्रुतींत हान व उपायन असें दोन्ही श्रुत आहे. [–त्यांतील कौषीतकिश्रुतीला विचाराची अपेक्षा नाहीं, असें '**तद्यत्र०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=त्यांतील ज्या वाक्यांत हान व उपायन ही दोन्हीं श्रुत आहेत त्याविषयीं तर कांहींच वक्तव्य नाहीं. [–शाटयायनश्रुतिहि विचाराची अपेक्षा करीत नाहीं, असें '**यत्रापि०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=जेथें केवळ उपायनच श्रुत आहे, हान श्रुत नाहीं तेथेंहि अर्थात्च हानाची प्राप्ति होते, अर्थात् हानसंबंध होतो. [–'**अन्यः०**'इत्यादि भाष्यानें आर्थिक हानसंनिपातच साधितात–]=कारण दुसऱ्यांकडून ग्रहण केल्या जाणाऱ्या आत्मसंबंधी–स्वसंबंधी सुकृत-दुष्कृतांना त्यांच्या हानाची-त्यागाची अत्यंत आवश्यकता आहे. [–'**यत्र तु०**' इत्यादि भाष्यानें परिशिष्ट विषय सांगतात–]

**भाष्यं––यत्र तु हानमेव श्रूयते नोपायनं । तत्रोपायनं संनिपतेद्वा न वेति विचिकित्सायां । अश्रवणादसंनिपातः । विद्यान्तरगोचरत्वाच्च शाखान्तरीयस्य श्रवणस्य । अपि चात्मकर्तृकं सुकृतदुष्कृतयोर्हानं । परकर्तृकं तूपायनम् । तयोः असत्यावश्यकभावे कथं हानेनोपायनमाक्षिप्येत । तस्मादसंनिपातो हानौ उपायनस्येति ॥**

**भाष्यार्थ––**पण जेथें नुस्तें हानच श्रुत आहे, उपायन–ग्रहण श्रुत नाहीं, [–हान व उपायन यांच्या सहभावाचें–साहचर्याचें आवश्यकत्व व अनावश्यकत्व यांच्या योगानें संशय सांगतात–]=तेथें उपायन प्राप्त–संबद्ध होतें कीं नाहीं, असा संशय आला असतां [पूर्वपक्ष सांगतात, असा शेष लावावा. या अधिकरणांत विद्यास्तुतीचा प्रकर्ष–आधिक्य, हें ज्याचें प्रयोजन आहे अशा उपायनोपसंहाराच्या कथनानें वाक्यार्थज्ञानाच्या हेतूचें वर्णन केलेलें असल्यामुळें याच्या पादादिसंगति आहेत. –पूर्वपक्षांत 'स्तुतिप्रकर्षाची असिद्धि' व सिद्धान्तांत 'त्याची सिद्धि' असा फलभेद मानून–'**अश्रवणात्०**' इत्यादि भाष्यानें पूर्वपक्षाचें ग्रहण करितात–]=अश्रवणामुळें असंनिपात–असंबंध आहे. [–"अहोपण, क्वचित् अश्रवण जरी असलें तरी दुसऱ्या ठिकाणीं श्रवण असल्यामुळें येथें उपसंहार होतो," अशी आशंका घेऊन '**विद्यान्तर०**' इत्यादि भाष्यानें वादी म्हणतो–]=आणि शाखान्तरीय श्रवणाला–दुसऱ्या शाखेंतील उपायनश्रवणाला विद्यान्तरविषयत्व असल्यामुळेंहि उपायनाचा अनुपसंहार–असंनिपात आहे. [विद्येचें ऐक्य असलें तर उपसंहार होईल. पण येथें विद्यैक्य नाहीं. कारण कौषीतकिब्राह्मणोपनिषदांतील पर्यंकविद्येला–सु.उ.८२१-३२-सगुणत्व आहे आणि तांडी व आथर्वणिक श्रुतींत पुण्य-पापत्यागाच्या हेतुत्वानें श्रुत असलेल्या विद्येला निर्गुणत्व आहे. त्यामुळें जेथें नुस्तें हानच श्रुत आहे

येथें उपायन प्राप्त होत नाहीं, असा भावार्थ.–केवल अश्रवणामुळेंच अननुवृत्ति आहे, असें नाहीं तर युक्तिविरोधामुळेंहि उपायनाची हानांत अनुवृत्ति होत नाहीं, असें पूर्ववादी '**अपि च**०' इत्यादि भाष्यानें म्हणतो–]=शिवाय सुकृत व दुष्कृत यांचें हान आत्मकर्तृक आहे म्ह० त्यांचा कर्ता स्वतः विद्वान् आहे. पण त्यांचें उपायन –ग्रहण परकर्तृक आहे, सुकृत-दुष्कृतांचें ग्रहण करणारे दुसरे आहेत. [–"पण ज्याप्रमाणें शाट्यायनिश्रुतींत उपायन श्रुत असतांना हानाची अनुवृत्ति होते त्याप्रमाणें तांड्यादिश्रुतींतहि हान श्रुत असल्यामुळें उपायनाची अनुवृत्ति होईल" अशी आशंका घेऊन 'शाट्यायनश्रुतींत श्रुत असलेल्या उपायनांत त्याच्या अनुपपत्तीमुळें हानाचा संबंध जरी असला तरी प्रकृत उदाहरणांत तो संभवत नाहीं,' असें वादी '**तयोः**०' इत्यादि भाष्यानें सांगतो–]=हान व उपायन यांना आवश्यकत्व नसतांना हानानें उपायनाचा आक्षेप कसा केला जाईल? [–'**तस्मात्**०' इत्यादि भाष्यानें अश्रवणादिफलाचा उपसंहार–]=म्हणून हानामध्यें उपायनाचा असंनिपात–अप्राप्ति–अननुवृत्ति–अनुपसंहार आहे. '**इति**०'–अर्थात् अनुपसंहारामुळें स्तुतिप्रकर्षाची असिद्धि होते. [–'**अस्यां**०' इत्यादि भाष्यानें सिद्धान्त–]

**भाष्यं**––**अस्यां प्राप्तौ पठति–हानाविति हानौ त्वेतस्यां केवलायामपि श्रूयमाणायामुपायनं संनिपतितुमर्हति। तच्छेषत्वात्। हानशब्दशेषो ह्युपायनशब्दः समधिगतः कौषीतकिरहस्ये। तस्मादन्यत्र केवलहानशब्दश्रवणेऽप्युपायनानुवृत्तिः॥**

**भाष्यार्थ**––अशी प्राप्ति झाली असतां बादरायणाचार्य '**हानौ**०' इत्यादि सिद्धान्त सांगतात–[–अश्वरोमादिदृष्टान्त दिलेला असल्यामुळें झाडून टाकलेल्या पुण्य-पापांना अन्यत्र अवस्थानाची अपेक्षा आहे. म्हणून येथें त्यागाच्या संनिध श्रुत असलेलें उपायन केवल हानश्रवण जेथें असतें तेथेंहि अपेक्षित असतें, असें प्राप्त होतें, असें '**हानौ तु**०' इत्यादि भाष्यानें व्याख्यान करितात–]=पण या हानीमध्यें [–सूत्रांतील 'तु-'शब्दाचा अर्थच सांगतात–]=म्ह० केवल हानि जरी श्रुत असली तरी तिच्यामध्यें उपायन प्राप्त होण्यास योग्य आहे. कारण त्याला–उपायनाला तच्छेषत्व–हानीचें शेषत्व आहे. [–'तच्छेषत्वात्' याचेंच विवरण–]='**हानशब्दशेषः**०'-कारण कौषीतकिरहस्यांत उपायनशब्द हानशब्दाचा शेष असलेला चांगल्या प्रकारें ज्ञात झालेला आहे. [–या हेतूचें फल–]='**तस्मात्**०'–म्हणून '**अन्यत्र**' म्ह० तांड्यादि श्रुतींत केवल हानशब्दश्रवण जरी असलें तरी उपायनाची अनुवृत्ति होते. [–'**यदुक्तं**०' इत्यादि भाष्यानें पूर्वपक्षाच्या बीजाचा अनुवाद–]

**भाष्यं —यदुक्तं अश्रवणाद्विद्यान्तरगोचरत्वादनावश्यकत्वाच्चासंनिपात इति। तदुच्यते। भवेदेषा व्यवस्थोक्तिः, यद्यनुष्ठेयं किंचिदन्यत्र श्रुतमन्यत्र निनीष्येत। न त्विह हानमुपायनं वा अनुष्ठेयत्वेन संकीर्त्यते॥**

**भाष्यार्थ**—आतां 'अश्रवणामुळें, विद्यान्तरविषयत्वामुळें व अनावश्यकत्वामुळें उपायनाचा असंनिपात–अनुपसंहार आहे.' असें जें वर म्हटलें आहे.–पृ.३४३–[–जेथें अनुष्ठेयत्वानें श्रवण असतें तेथें उपसंहार करावयाचा झाल्यास विद्येच्या ऐक्याची अपेक्षा असते. पण येथे अनुष्ठेयत्वानें सांगितलेल्याचा उपसंहार करावयाचा नाहीं. तर स्तुतीसाठीं सांगितलेल्या सिद्धाचाच उपसंहार करावयाचा आहे. त्यामुळें कांहीं बाधक नाहीं, असें झालें असतां स्तुतिप्रकर्षासाठीं त्याचा उपसंहार होतो, असें '**तदुच्यते०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=त्याचें समाधान सांगितलें जातें. जर अन्यत्र श्रुत असलेलें कांहीं अनुष्ठेय अन्यत्र नेण्याची इच्छा केली जात असेल तर ही व्यवस्थोक्ति होईल. पण येथें हान किंवा उपायन अनुष्ठेयत्वानें सांगितलें जात नाहीं. [ 'व्यवस्थोक्ति' म्ह० विद्याभेद असल्यास गुणांचा जेथल्या तेथें नियम व विद्यांचा अभेद असल्यास त्यांचा परस्पर उपसंहार, असा निर्देश, असा भावार्थ.–"तर मग हान व उपायन यांचें संकीर्तन कशासाठीं केलें आहे ?" '**विद्यास्तुत्यर्थं०**' इत्यादि भाष्यानें उत्तर–]

---

१ **रत्नप्रभा**—"अहोपण, अमूर्त पुण्य-पापांचें ग्रहण संभवत नाहीं. त्यामुळें त्यांचा अनुपसंहार आहे." असें वादी म्हणेल म्हणून भाष्यकार 'विद्यास्तुत्यर्थत्वात्०'इत्यादि सांगतात–विद्वानामध्यें स्थित असलेल्या पुण्य-पापांचें फल विद्यासामर्थ्यामुळें दुसऱ्यांना प्राप्त होतें, असें 'उपयन्ति' या पदानें सांगितलें जातें, असा याचा भावार्थ. "अहोपण, अन्यनिष्ठ पुण्य-पापांच्या फलाचा संचार अन्यत्र कसा होतो ? 'वचनसामर्थ्यानें' म्हणून म्हणाल तर तें बरोबर नाहीं. कारण 'फल उपयन्ति'–त्यांच्या फलास प्राप्त होतात, अशी श्रुति नाहीं. 'ज्याप्रमाणें पुत्रानें केलेल्या श्राद्धाचें फल पितरांमध्यें संचार करितें तसेंच विद्वानाच्या सुकृत-दुष्कृतांचें फल त्याच्या सुहृद्-दुर्हृदांमध्यें संचार करील' असेंहि म्हणतां येत नाहीं. कारण 'ज्याच्या फलोद्देशानें जें कर्म विहित असतें त्याला त्याचें फल मिळतें' या न्यायानें पितरांच्या तृतीच्या उद्देशानें केलेल्या कर्माला व्यधिकरणफलत्व जरी असलें–त्याचें फल कर्त्याहून भिन्न जीवाला जरी मिळत असलें तरी विद्वानाचें कर्मफल दुसऱ्यांस मिळणें योग्य नाहीं. कारण कर्म करितांना त्यानें त्याच्या तशा व्यधिकरणफलत्वाचा उद्देश–संकल्प केलेला नव्हता. त्यामुळें त्याचें अनुद्दिष्ट व्यधिकरणफलत्व संभवत नाहीं. शिवाय विद्वानाचा देहपात झाला असतां–त्याचें

**भाष्यं--विद्यास्तुत्यर्थं त्वनयोः संकीर्तनम् । इत्थं महाभागा विद्या यत्सामर्थ्यादस्य विदुषः सुकृतदुष्कृते संसारकारणभूते विधूयेते, ते चास्य सुहृद्दुर्हृत्सु निविशेते इति । स्तुत्यर्थे चास्मिन्संकीर्तने हानानंतरभावित्वेनोपायनस्य क्वचिच्छ्रुतत्वादन्यत्रापि हानश्रुतावुपायनानुवृत्तिं मन्यते स्तुतिप्रकर्षलाभाय ॥**

**भाष्यार्थ**—पण विद्येच्या स्तुतीसाठीं यांचें संकीर्तन–कथन केलेलें आहे. [–संकीर्तनाच्या स्तुत्यर्थत्वाचा अभिनय–]=‘ **इत्थं०** ’–ही विद्या अशी महाभागा–श्रेष्ठ–महाभाग्यवती आहे कीं जिच्या सामर्थ्यानें या विद्वानाचीं संसारकारणभूत पुण्य-पापें झाडून टाकिलीं जातात–याच्यापासून दूर होतात व त्याचे सुहृद् व दुर्हृद् यांच्यामध्यें त्यांचा निवेश होतो, त्यांना तीं प्राप्त होतात, अशा स्तुतीसाठीं त्यांचें संकीर्तन आहे. [–“बरें, स्तुतीसाठीं यांचें संकीर्तन असो; तरीपण हानीमध्यें उपायनाची अनुवृत्ति कशासाठीं ” ‘ **स्तुत्यर्थे च०** ’ इत्यादि भाष्यानें उत्तर–]=आणि हें संकीर्तन स्तुतीसाठीं आहे, असें झालें असतां उपायनाला हानानंतरभावित्व असल्यामुळें–ग्रहण त्यागानंतर होणारें असल्यामुळें व तें कांहीं ठिकाणींच श्रुत असल्यामुळें अन्यत्रहि हानश्रुतींत उपायनाची अनुवृत्ति सूत्रकार मानितात. [–“ सूत्रकार हानामध्यें उपायनाची अनुवृत्ति जर मानीत असतील तर स्तुतिप्रकर्षाला उपायनोपसंहाराचें कल्पकत्व कसें ? ” ‘ **स्तुतिप्रकर्षलाभाय** ’ असें उत्तर–]=स्तुतीच्या प्रकर्षाचा–आधिक्याचा लाभ व्हावा, म्हणून सूत्रकार त्याची अनुवृत्ति मानितात. [ कारण विद्येची स्तुति कर्तव्य आहे. पण ती केवल श्रुत असलेल्या हानानेंहि संभवते. जर अप्रकर्षानें स्तुति होत नसेल तरच प्रकर्ष अपेक्षित असतो. पण येथें तसें नाहीं. तस्मात् स्तुतिप्रकर्षसिद्धि हें प्रमाणसिद्ध उपायनोपसंहाराचें फल आहे, असा भावार्थ.–“ अहोपण, उपायनवादाला जर अर्थवादत्व असेल तर त्याला विधिशेषत्व आहे. पण त्याला तच्छेषत्व असल्यामुळें

---

शरीर मृत झालें असतां कर्माचें असत्त्व होतें. त्यामुळें यावज्जीव–तो जिवंत असेपर्यंतच विद्वानाची सेवा करणाराला व त्याचा द्वेष करणाराला त्याच्या पुण्य-पापांचें फल मिळेल, मेल्यावर मिळणार नाहीं,” अशी आशंका घेऊन ‘ विद्वत्सेवा व विद्वद्द्वेष यांच्या योगानें त्याच्या ठिकाणीं विद्वन्निष्ठ पुण्य-पापांसारखें पुण्य-पाप उत्पन्न होतें व उत्पन्न झालेल्या त्यांचा फलतः स्वीकार, हेंच उपायन आहे, ’ असा तिचा परिहार सुलभ असल्यामुळें ‘एकाचें पुण्य-पाप दुसऱ्याला प्राप्त कसें होईल ’ असा आग्रह करणें उचित नाहीं, असा भावार्थ.

हानवाद या अर्थवादाचें शेषत्व नाहीं " अशी आशंका घेऊन **' प्रसिद्धा च० '** इत्यादि भाष्यानें उत्तर-]

**भाष्यं—प्रसिद्धा चार्थवादान्तरापेक्षार्थवादान्तरप्रवृत्तिः–' एकविंशो वा इतोऽसावादित्यः ' इत्येवमादिषु । कथं हीहैकविंशता आदित्यस्याभिधीयेत, अनपेक्ष्यमाणेऽर्थवादान्तरे 'द्वादश मासाः पंचर्तवस्त्रय इमे लोका असावादित्य एकविंशः ' इत्येतस्मिन् । तथा 'त्रिष्टुभौ भवतः । सेन्द्रियत्वाय' इत्येवमादिवादेषु ' इंद्रियं वै त्रिष्टुप् ' इत्येवमाद्यर्थवादान्तरापेक्षा दृश्यते ॥**

**भाष्यार्थ**—आणि "या पृथ्वीरूप लोकापासून हा आदित्य एकविसावा आहे" या व अशाच दुसऱ्याहि अर्थवादांत दुसऱ्या अर्थवादाच्या अपेक्षेनें दुसऱ्या अर्थवादाची प्रवृत्ति प्रसिद्ध आहे. [–"पण या उदाहृत अर्थवादांतहि दुसऱ्या अर्थवादाची अपेक्षा कशी आहे ? " **' कथं हि० '** इत्यादि भाष्यानें उत्तर–]=कारण "बारा मास, पांच ऋतु, हे तीन लोक आणि हा आदित्य एकविसावा " असा हा दुसरा अर्थवाद जर अपेक्षित नसेल तर या पूर्वोक्त अर्थवादांत आदित्याची एकविंशता कशी सांगितली जाईल ! [ या वाक्यांत हेमन्त व शिशिर यांचें ऐक्य मानून ' पांच ऋतु ' असें म्हटलें आहे.–अश्रुत असलेलेंहि श्रुत्यन्तराच्या अनुसार ग्राह्य असते, याविषयीं दृष्टान्त–]=त्याचप्रमाणें ' सेंद्रियत्वासाठीं दोन त्रिष्टुभ् आहेत ' इत्यादि अर्थवादांमध्यें 'इंद्रियच त्रिष्टुभ् आहे' इत्यादि दुसऱ्या अर्थवादाची अपेक्षा दिसते. [यज्ञाच्या पुरुषाकार कल्पनेमध्यें 'सेंद्रियत्वासाठीं दोन त्रिष्टुभ् आहेत' असें बह्वृचब्राह्मणांत सांगितलें आहे. त्यांतील त्रिष्टुप्शब्दानें केवल छंदाचें कथन केलेलें असल्यामुळें त्याला सेंद्रियत्व कसें ? अशी आकांक्षा झाली असतां वाजसनेयकांत त्रिष्टुभाचें तत्त्व-स्वरूप इंद्रियत्वानें गृहीत आहे, असा भावार्थ.–" अहोपण, श्रुत्यन्तरांत श्रुत असलेलेंहि उपायन हानीमध्यें उपसंहर्तव्य नाहीं. कारण एकाच्या सुकृत-दुष्कृतांचें ग्रहण दुसऱ्याला करितां येणें शक्य नाहीं " अशी आशंका घेऊन **' विद्या० '** इत्यादि भाष्यानें म्हणतात–]

**भाष्यं—विद्यास्तुत्यर्थत्वाच्च अस्योपायनवादस्य, कथमन्यदीये सुकृतदुष्कृते अन्यैरुपेयेते इति नातीवाभिनिवेष्टव्यम् । उपायनशब्दशेषत्वादिति च शब्दशब्दं समुच्चारयन्स्तुत्यर्थामेव हानावुपायनानुवृत्तिं सूचयति । गुणोपसंहारविवक्षायां हि उपायनार्थस्यैव हानावनुवृत्तिं ब्रूयात् । तस्माद् गुणोपसंहारविचारप्रसंगेन स्तुत्युपसंहारप्रदर्शनार्थमिदं सूत्रम् ॥**

**भाष्यार्थ**—आणि या उपायनवादाला विद्यास्तुत्यर्थत्व आहे. त्यामुळें 'दुसऱ्याचें सुकृत व दुष्कृत, यांचें दुसऱ्यांकडून ग्रहण कसें केलें जातें?' असा अतिशय अभिनिवेश करूं नये. [ विद्यासामर्थ्यानें दुसऱ्यांमध्यें सुकृत-दुष्कृतांच्या फलाचा संचार सांगितलेला असल्यामुळें येथें विद्येची स्तुति अभीष्ट आहे. त्यामुळें पूर्वोक्त अभिनिवेशाला अवकाश नाहीं, असा भावार्थ.—"पण उपायनवादाला स्तुत्यर्थत्व कसें!" अशी आशंका घेऊन 'सूत्रकारोक्तिसामर्थ्यामुळें' असें सांगतात—] ='**उपायनशब्दशेषत्वात्**'—उपायनशब्दाला शेषत्व—ज्ञानाचें अंगत्व असल्यामुळें, असा 'शब्द' हा शब्द उच्चारणारे सूत्रकार हानीमध्यें उपायनाची अनुवृत्ति स्तुतीसाठींच आहे, असें सुचवितात. [—'**गुणोपसंहार०**' इत्यादि भाष्यानें याचेंच उपपादन—]=कारण गुणोपसंहाराची जर विवक्षा असती तर त्यांनीं हानीमध्यें उपायनार्थाचीच अनुवृत्ति सांगितली असती. [ येथें 'उपायनार्थ' या शब्दानें सुकृतादिस्वरूपाचें उपायन हा अर्थ विवक्षित आहे. कारण उपायन फलतः इष्ट आहे. फलोपसंहारावांचून अर्थोपसंहार जर अभीष्ट असता तर 'उपायनशेषत्वात्' असें म्हटलें असतें. पण सूत्रकार 'उपायनशब्दशेषत्वात्' असें म्हणत आहेत. अर्थात् तसें सांगणारे ते अर्थाचा उपसंहार इच्छीत नाहीत, असा भावार्थ.—"अहो-पण, विद्येमध्यें गुणांच्या उपसंहाराचे प्रकरण चालू असतांना स्तुत्यर्थाचा विचार युक्त नाहीं" अशी आशंका घेऊन 'प्रासंगिकत्वामुळें हा दोष येत नाहीं,' असें '**तस्मात्०**' इत्यादि भाष्यानें सांगतात—]=म्हणून गुणोपसंहाराच्या विचारप्रसंगानें स्तुत्युपसंहार प्रदर्शित करण्यासाठीं हें सूत्र आहे. [ 'स्तुत्युपसंहार' म्ह० स्तुतीच्या उपयोगी असलेल्या गुणांचा—सुकृत-दुष्कृतांच्या अन्यत्र फलसंचाराचा उपसंहार. उपास्य नसलेल्याहि त्याच्या—उपसंहाराच्या प्रकाराचें प्रदर्शन करण्यासाठीं हें सूत्र आहे, असा भावार्थ.—शाखान्तरस्थ विशेष शाखान्तरींहि आश्रयणीय आहे, याविषयीं '**कुशा०**' इत्यादि सूत्रोक्त दृष्टान्ताचें व्याख्यान करितात—]

**भाष्यं—कुशाछंदस्तुत्युपगानवदित्युपमोपादानम् । तद्यथा भाल्लविनाम्—'कुशा वानस्पत्याः स्थ ता मा पात' इत्येतस्मिन्निगमे कुशानां अविशेषेण वनस्पतियोनित्वश्रवणे, शाट्यायनिनां 'औदुंबराः कुशाः' इति विशेषवचनादौदुंबर्यः कुशा आश्रीयन्ते । यथा च क्वचिद्देवासुरच्छंदसामविशेषेण पौर्वापर्यप्रसंगे 'देवच्छंदांसि पूर्वाणि' इति पैंग्याम्नानात्प्रतीयते ॥**

**भाष्यार्थ**—'कुशा, छन्द, स्तुति व उपगान यांप्रमाणें' असें हें उपमेचें उपादान—ग्रहण केलें आहे. '**तद्यथा०**'—तें हें उपमान कसें आहे तें पहा—[ त्याचें

उपमानत्वानें व्याख्यान करावें, अशी प्रतिज्ञा करून त्यांतील कुशादृष्टान्ताचें व्याख्यान-]=भाल्लवींच्या 'हे कुशांनो, शंकूंनो, तुम्ही वानस्पत्य-वनस्पतीपासून उत्पन्न होणारे असे व्हा व ते तुम्ही माझें रक्षण करा' अशा या निगमामध्यें कुशांचें अविशेषानें वनस्पतियोनित्वश्रवणांत शाट्यायनींच्या 'औदुंबराः' अशा विशेष-वचनामुळें औदुंबरी कुशांचा आश्रय केला जातो. [यजमानानें केलेली ही कुशांची प्रार्थना आहे. 'ताः' व 'औदुंबराः' अशी श्रुति असल्यामुळें दर्भ या अर्थी असलेल्या 'कुश-'शब्दाला अस्त्रीत्व आहे. म्हणूनच अमरसिंहानें 'अस्त्री कुशः' असें अनुशासन केलें आहे. पण 'औदुंबर्यः' अशा भाष्यप्रयोगामुळें 'शंकु' या अर्थी असलेल्या 'कुश-'शब्दाला स्त्रीत्वहि आहे, असें समजावें.-' **यथा च॰** ' इत्यादि भाष्यानें छन्दोदृष्टान्ताचें व्याख्यान-]=आणि ज्याप्रमाणें-कांहीं ठिकाणीं देवासुरछन्दांच्या पौर्वापर्यप्रसंगीं 'देवछन्द पूर्वी' असें पैंगींच्या पाठावरून प्रतीत होतें. [दशाक्षरादिक हे देवछन्द व नवाक्षर हे असुरछन्द. 'छन्दोभिः स्तुवते' इत्यादि कांहीं ठिकाणीं त्यांचा अविशेषानें पूर्वापरप्रसंग आला असतां पैंगिश्रुति-वशात् त्यांतील 'देवछन्द पूर्वी' असा विशेष सिद्ध होतो, असा भावार्थ.-' **यथा च षोडशि॰** ' इत्यादि भाष्यानें स्तुतिदृष्टान्ताचें विवरण-]

**भाष्यं—यथा च षोडशिस्तोत्रे केषांचित्कालाविशेषप्राप्तौ 'समयाध्युषिते सूर्ये' इत्यार्चादिश्रुतेः कालविशेषप्रतिपत्तिः। यथैव चाविशेषेणोपगानं केचित्समामनन्ति विशेषेण भाल्लविनः। यथैतेषु कुशादिषु श्रुत्यंतरगतविशेषान्वयः। एवं हाना-वप्युपायनान्वय इत्यर्थः॥**

**भाष्यार्थ**—आणि ज्याप्रमाणें अतिरात्रांत षोडशी या पात्रविशेषाचें ग्रहण करितांना जें अंगभूत स्तोत्र तें केव्हां गावें हें कांहीं-छन्दोगांच्या कालविशेषाचें श्रवण नसल्यामुळें कालाच्या अविशेषाची प्राप्ति झाली असतां 'सूर्ये समयाध्युषिते' म्ह॰ सूर्याच्या उदयाचे सांनिध-सूर्योदयसमयीं षोडशिस्तोत्र म्हणावें, असें कालविशे-षाचें ज्ञान आर्चादिश्रुतीवरून होतें. [जे ऋचांचें अध्ययन करितात ते आर्च.

---

१ **रत्नप्रभा**—कुशा म्हणजे उद्गात्यांच्या स्तोत्रगणनेसाठीं काष्ठाच्या शलाका -काटक्या. 'वानस्पत्य म्ह॰ वनस्थ महावृक्ष हाच वनस्पति, त्याच्यापासून झालेल्या अशा होत्सात्या तुम्ही माझें रक्षण करा' अशी ही यजमानाची प्रार्थना आहे.

२ **रत्नप्रभा**—नऊ अक्षरांचे जे छन्द ते आसुर व बाकीचे सर्व दैवछन्द. 'छन्दोभिः स्तुवते' असा कांहीं ठिकाणीं अविशेष प्राप्त झाला असतां पैंगिवाक्यावरून 'देवछन्द पूर्वी' **या विशेषाचें ग्रहण केलें जातें, असा भावार्थ.**

त्यांच्या श्रुतीवरून षोडशिस्तोत्रोपाकरणाचें ज्ञान होतें. किंवा ‘ समयाध्युषिते सूर्ये षोडशिनः स्तोत्रं उपाकरोति ’ अशा या तैत्तिरीयश्रुतीवरून–अर्धास्तमित कालविशेषाची सिद्धि होते, असा भावार्थ. –‘ **यथैव०** ’ इत्यादि भाष्यानें उपगानाचें व्याख्यान–]=आणि ज्याप्रमाणेच ‘ ऋत्विजः उपगायन्ति ’–ऋत्विक् उपगान करितात, असें कित्येक अविशेषानें उपगानाचें आम्नान करितात. पण भाल्लवी ‘ नाध्वर्युरुपगायति ’–अध्वर्यु उपगान करीत नाहीं, असें म्हणून अध्वर्युवर्जित ऋत्विक् उपगान करितात असा त्याचा विशेष सांगतात, विशेषानें त्याचें आम्नान करितात. [–याप्रमाणें दृष्टान्तांतील अभीष्ट अंशाचा अनुवाद करून दार्ष्टान्तिक सांगतात–]=‘**यथा०**’–ज्याप्रमाणें या कुशादिकांमध्यें श्रुत्यंतरांतील विशेषाचा अन्वय होतो त्याप्रमाणेंच हानीमध्येंहि–सुकृतादित्यागामध्येंहि उपायनाचा अन्वय होतो, असा याचा भावार्थ. [–“अहोपण, दृष्टान्तामध्येंहि श्रुत्यन्तराचा श्रुत्यन्तराशीं अन्वय न होवो. हीं स्वतंत्रच वाक्यें असोत, ” अशी आशंका घेऊन ‘ **श्रुत्यन्तरकृतं०** ’ इत्यादि भाष्यानें आचार्य म्हणतात–]

**भाष्यं—श्रुत्यंतरकृतं हि विशेषं श्रुत्यंतरेऽनभ्युपगच्छतः सर्वत्रैव विकल्पः स्यात् । स चान्याय्यः सत्यां गतौ । तदुक्तं द्वादशलक्षण्याम्–“ अपि तु वाक्यशेषत्वादितरपर्युदासः स्यात्प्रतिषेधे विकल्पः स्यात् ” इति ॥**

**भाष्यार्थ**—कारण श्रुत्यन्तरांतील विशेष श्रुत्यन्तरांत न मानणाऱ्या वाद्याच्या मतीं सर्वत्र विकल्प प्राप्त होईल ! [–“ अहोपण, व्रीहि-यवांप्रमाणें विकल्पहि असूं दे ” अशी आशंका घेऊन ‘ **स च०** ’ इत्यादि भाष्यानें ‘नाहीं’ असें उत्तर देतात–]=आणि तो विकल्प दुसरी गति असतांना अन्याय्य आहे. [विकल्पाचा आश्रय करणें ही अगतिका गति आहे. कारण विकल्प आठ दोषांनीं दुष्ट झालेला आहे. कसा तो पहा–‘ व्रीहिभिर्यजेत’– व्रीहींनीं याग करावा ‘ **यवैर्वा०** ’ किंवा यवांनीं याग करावा, हें वाक्यद्वयहि प्रमाण आहे. पण त्यांतील व्रीहिवाक्याचा आश्रय केला असतां यववाक्य अनाश्रयणीय होतें. कारण श्रुत असलेल्या निरपेक्षतेशीं विरोध येतो व एकाच वेळीं यव व व्रीहि या दोहोंचें अनुष्ठान–दोहोंचा

---

१ **रत्नप्रभा**—सामान्य व विशेष यांची एकवाक्यतारूप गति असतांना वाक्यभेद करून ‘ नाध्वर्युरुपगायति ’ असा निषेध असल्यामुळें व अविशेष श्रुति असल्यामुळें ‘ अध्वर्यु उपगान करितो व तो उपगान करीत नाहीं ’ असा सर्वत्र विकल्प करणें युक्त नाहीं. पण व्रीहि व यव यांमध्यें तशी एकवाक्यतारूप गतिच नसल्यामुळें विकल्पाचा आश्रय केला आहे, असा भावार्थ.

याग करणें अशक्य आहे. यास्तव व्रीहियागपक्षीं यववाक्यांतील प्रामाण्य हेतू-वांचून टाकावें लागतें. अर्थात् ज्याचें मानत्व टाकिलें आहे त्याचें अमानत्व मानावें लागतें. तसेंच कोणत्याहि हेतूनें प्रयोगाच्या अंगत्वानें यवाचा अंगीकार केला असतां टाकलेल्या प्रमाणत्वाचा पुन: आश्रय करणें व त्याचें निरसन करून स्वीकृत मानत्वाचा पुन: त्याग करणें, असे एका वाक्यांत चार दोष येतात. दुसऱ्या वाक्यांतहि प्राप्तत्याग, अप्राप्त-आश्रयण, त्यक्ताचा स्वीकार व स्वीकृताचा त्याग असे तेच दोष येतात. तथापि तुल्यबलत्वामुळें व गत्यन्तराच्या अभावामुळें व्रीहि-यववाक्यांचा विकल्प स्वीकारिला आहे. याविषयीं मीमांसकांनीं असें म्हटलें आहे. –' एवमेषोऽष्टदोषोऽपि यद्व्रीहियववाक्ययोः । विकल्प आश्रितस्तत्र गतिरन्या न विद्यते ॥ '–'याप्रमाणें हा विकल्प आठ दोषांनीं युक्त जरी असला तरी व्रीहि-यववाक्यामध्यें विकल्पाचा आश्रय केला आहे. कारण तेथें विकल्पावांचून दुसरी गतिच नाहीं ' असें म्हटलें आहे. पण येथें दुसरी गति असतांना विकल्पाचा आश्रय करितां येत नाहीं, असा भावार्थ.–या अष्टदोषयुक्त विकल्पाचा परिहार करण्यासाठीं वाक्यान्तराचें वाक्यान्तरशेषत्व जैमिनीलाहि संमत आहे, असें –' तदुक्तं०' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=द्वादशलक्षणींत–बारा अध्यायांनीं युक्त असलेल्या मीमांसेंत तसें सांगितलें आहे. [–पूर्वमीमांसेच्या दहाव्या अध्यायांतील ' अपि तु०' इत्यादि सूत्राचें उदाहरण देतात–]='वाक्यशेषत्वामुळें येथें इतर दानादिकांचा पर्युदासच आहे. कारण प्रतिषेध मानिल्यास विकल्प होईल ' असें द्वादशाध्यायी–पूर्वमीमांसेंत म्हटलें आहे. [ यांतील ' दीक्षित देत नाहीं, होम करीत नाहीं, पाक करीत नाहीं,' असें ज्योतिष्टोमाधिकारांत–ज्योतिष्टोमप्रकरणांत श्रुत आहे, त्यांत "काय, सर्व दान, होम व पाक यांचा निषेध आहे कीं अक्रतु-प्रयुक्त–क्रतूनें प्राप्त न झालेल्या दानादिकांचा निषेध आहे, कीं क्रतुप्रयुक्त अस-लेल्याहि विधिप्राप्त दानादिकांचा निषेध आहे, कीं पर्युदास आहे," असा संशय आला असतां ' सर्व होमादिकांचा निषेध मानिल्यास प्रत्यक्ष विधीशीं विरोध येत असल्यामुळें, अक्रतुप्रयुक्त असलेल्या किंवा विधिप्राप्त क्रतुप्रयुक्त असलेल्याहि त्यांच्या निषेधाचा आनुमानिकत्वानें प्रत्यक्षाच्या अविरुद्धत्वानें निषेध करणें शक्य असल्यामुळें त्यांचा निषेध आहे,' असा पूर्वपक्ष प्राप्त होतो. म्हणून ' अपि तु०' हें सिद्धान्तसूत्र आहे. ' तु ' हा शब्द अवधारण या अर्थी आहे. हा निषेध नाहीं, तर ' जो दीक्षित नव्हे तो अदीक्षित ' असें म्हणून सांगितलेल्या इतरांच्या अविशेषानें होमादिकांतील कोणाचा ज्योतिष्टोमांत पर्युदास होईल ?

'**वाक्यशेषत्वात्०**' या भागानें हेतु सांगतात–'वाक्यशेषत्वामुळें इतर पर्युदास होईल.' कारण 'प्रत्यहीं दान द्यावें' असा विशेष आहे. पर्युदासाचा आश्रय न करितां निषेधच अभीष्ट मानिल्यास ज्योतिष्टोमांत दानादिकांचा विकल्प होईल, पण तो तर अन्याय्य आहे, असें '**प्रतिषेधे०**' या अंशानें सांगतात–] 'कारण प्रतिषेधाचा आश्रय केल्यास विकल्प होईल' असें द्वादशलक्षणींत सांगितलें आहे.–'**अथवा०**' इत्यादि भाष्यानें वर्णकान्तर सांगतात–]

---

१ **रत्नप्रभा**—ज्योतिष्टोमप्रकरणांत 'दीक्षित होम करीत नाहीं,' असें श्रुत आहे व 'यावज्जीव अग्निहोत्र हवन करावें' असें दुसऱ्या ठिकाणीं श्रुत आहे. त्यांतील 'नदीक्षित-'वाक्य जर होमाचें प्रतिषेधक असेल तर 'क्रत्वर्थामुळें निषेध अनुष्ठेय आहे, कीं यावज्जीवविधीनें होम अनुष्ठेय आहे,' असा विकल्प प्राप्त होईल. पण तो तर अन्याय्य आहे. शिवाय 'नदीक्षित-'वाक्य 'यावज्जीव-'वाक्याचा शेष आहे.त्यामुळें त्यांतील नकाराचा'इतराचा पर्युदास'हा अर्थ आहे.म्ह०तो दीक्षिताहून भिन्न पुरुषाचा लक्षक आहे. होमाचा प्रतिषेध करणारा नाहीं. यास्तव अदीक्षितानें यावज्जीव होम करावा, अशी वरील दोन वाक्यांची एकवाक्यता आहे. हा 'नदीक्षिताधिकरणाच्या' सिद्धान्तसूत्राचा अर्थ आहे. येथें भगवत्पादांनीं सूत्रच पढलें आहे. पण वाचस्पतिमिश्रांनीं "पर्युदासाधिकरणसिद्धान्तसूत्र 'अपि तु वाक्यशेषःस्यादन्याय्यत्वाद्विकल्पस्य विधीनामेकदेशः स्यात्' असें आहे, तेंच येथें अर्थतः पठित आहे," असें जें म्हटलें आहे तें चिंत्य आहे. पण या सूत्राचा अर्थ असा–कोणत्याहि यज्ञात 'ये यजामहे०' याचा प्रयोग करावा, असें श्रुत आहे. अनुयाजांमध्यें 'ये यजामहे' याचा प्रयोग करीत नाहींत, असेंहि श्रुत आहे. त्यातील नकाराला निषेधकत्व जरी असलें तरी अतिरात्रांतील षोडशिग्रहण व अग्रहण यांप्रमाणें अनुयाजांमध्यें यज्ञत्वसामान्यामुळें त्याचा प्रयोग करावा व निषेधामुळें प्रयोग करूं नये, असा विकल्प होतो. पण त्याला अन्याय्यत्व असल्यामुळें 'ये यजामहे-'विधीचाच नानुयाजवाक्य एकदेश होईल. म्ह० पर्युदासवृत्तीनें विधिवाक्यशेष होईल, असा भावार्थ. अर्थात् अनुयाजभिन्न यागांमध्यें 'ये यजामहे०' याचा प्रयोग करावा, अशी त्या दोन वाक्यांची एकवाक्यता आहे.

**न्यायनिर्णय**—'अपि तु वाक्यशेषः स्यात् अन्याय्यत्वाद्विकल्पस्य विधीनामेकदेशः स्यात्' असें हें दशमाध्यायांतील सूत्र भाष्यकार 'अपि तु०' इत्यादि भाष्यानें अर्थतः पढतात–'एष वै सप्तदशः प्रजापतिः यज्ञमन्वायत्तः'–हा सतरावा प्रजापति यज्ञांत अनुगत आहे, असा उपक्रम करून 'आश्रावय' हा चतुरक्षर–चार अक्षरांचा '**अस्तु श्रौषट्**' असा हा चतुरक्षर, '**यज**' हा द्व्यक्षर, '**ये यजामहे**' हा पंचाक्षर,

**भाष्यं**—अथवा एतास्वेव विधूननश्रुतिष्वेतेन सूत्रेणैतच्चिंतयितव्यम् । किमनेन विधूननवचनेन सुकृतदुष्कृतयोर्हानमभिधीयते, किंवाऽर्थान्तरमिति । तत्र चैवं प्रापयितव्यम् । न हानं विधूननमभिधीयते "धूञ् कंपने" इति स्मरणात् । "दोधूयन्ते ध्वजाग्राणि" इति च वायुना चाल्यमानेषु ध्वजाग्रेषु प्रयोगदर्शनात् । तस्माच्चालनं विधूननमभिधीयते । चालनं तु सुकृतदुष्कृतयोः कंचित्कालं फलप्रतिबंधनादिति ॥

**भाष्यार्थ**—किंवा याच 'विधूनन-'श्रुतींविषयीं या सूत्रानें याचा विचार करावा. [–'सुकृत-दुष्कृते विधूनुते'–पृ.३४२–इत्यादि वचनांतील 'विधूनन' या शब्दाला विषय करून धात्वर्थाची मुख्यता व उपायनशब्दाची संनिधि यांच्या योगानें संशय सांगतात–]='किमनेन०'–काय, या विधूननशब्दानें सुकृत व दुष्कृत यांचें हान–त्याग सांगितला जातो किंवा अर्थान्तर–चालन सांगितलें जातें! [–पूर्वोक्त मंत्रादिकांच्या विद्यासंनिधीला जसें अकिंचित्करत्व–व्यर्थत्व आहे त्याचप्रमाणें येथेंहि विधूननशब्दाचा उपायनशब्दसंनिधि अप्रयोजक आहे, अशा आशयानें 'तत्र०' इत्यादि भाष्यानें पूर्वपक्ष करितात–]='तत्र'–असा संशय आला

---

व 'वषट्' हा द्व्यक्षर असा हा सप्तदशाक्षर मंत्रगण आहे. त्याची सप्तदशक लिंगदेहसमष्टिरूप प्रजापतित्वानें स्तुति करून तो 'यज्ञे यज्ञे अन्वायत्तः'–प्रत्येक यज्ञांत अनुगत आहे, अशा अनारभ्यवादानें सर्वयज्ञांमध्यें विनियुक्त आहे. त्यांत यज्ञांमध्यें 'ये यजामहे-'करण सांगून 'नानुयाजेषु'–पण अनुयाजांत नाहीं, असें श्रुत आहे. त्यांत 'नानुयाजेषु'–अनुयाजांमध्यें 'ये यजामहे-'करण नाहीं, असा निषेध असल्यामुळें विधि व निषेध यांची एकत्र प्राप्ति होते. तेव्हां त्यांचा विकल्प मानावा कीं पर्युदासानें अनुयाजाला सोडून इतर यागांमध्यें 'ये यजामहे' याचा प्रयोग करावा असा, किंवा हा वाक्यशेष नसून विधिच आहे असा संदेह आला असतां 'विधि व निषेध या दोहोंनाहि शास्त्रीयता असल्यामुळें तुल्यबलत्वानें षोडशिग्रहणाग्रहणाप्रमाणें त्यांचा विकल्प आहे' असा पूर्वपक्ष प्राप्त होतो. म्हणून 'अपि तु०' या सूत्रानें सिद्धान्त सांगितला आहे. 'नानुयाजेषु' हा निषेध नव्हे. तर 'ये यजामहे-'करणविधीचा वाक्यशेष असून पर्युदास–अपवाद आहे. कारण निषेधपक्षीं विकल्प होईल. पण तो अन्याय्य आहे. 'ये यजामहे-'करणविधीचा 'नानुयाजेषु' हा पर्युदास होऊन एकदेश होईल. यास्तव षोडशिग्रहणाग्रहणाचा अगतीमुळें विकल्प जरी असला तरी प्रकृत उदाहरणांत पर्युदासानें उपपत्ति लागत असल्यामुळें विकल्पाचा अभाव आहे. यास्तव अनुयाजवर्जित यागांमध्यें 'ये यजामहे करावा,' असा हा विधिच आहे.

असतां ' हान म्ह० विधूनन–त्याग सांगितला जात नाहीं, ' असें पूर्वपक्षाचें मत प्राप्त करावें. [ पूर्वपक्षांत ' विद्यावशात् सुकृतादिनिवृत्ति होत नाहीं ' व सिद्धान्तांत ' विद्यासामर्थ्यानें त्यांच्या निवृत्तीची सिद्धि ' असा फलभेद आहे.–पाणिनिस्मरणाला पूर्वपक्षाचा हेतु करितात–]=' धूञ्–कम्पने '–धू म्ह० कांपणें, असें पाणिनीचें स्मरण आहे. [–आणि लोकांच्या प्रयोगसामर्थ्यामुळेंहि विधूननाला चालनत्व आहे, असें ' दोधूयन्ते० ' इत्यादि भाष्यानें वादी सांगतो–]='ध्वजाचीं अग्रें फडफडतात–वारंवार हालतात ' असा वायूकडून हालविल्या जाणाऱ्या ध्वजाग्रांमध्यें प्रयोग होत असलेला दिसतो. [–स्मृति व लोकप्रसिद्धि यांवरून सिद्ध झालेल्या अर्थाचें ' **तस्मात्०** ' इत्यादि भाष्यानें निगमन–]=म्हणून चालनच विधूनन म्हटलें जातें–विधूननशब्दानें चालन सांगितलें जातें. [–"अहोपण, कंपन हा धर्म मूर्तीच्या अनुरोधानें–साकार पदार्थाच्या आश्रयानें राहतो. त्यामुळें अमूर्त –निराकार सुकृत-दुष्कृतांचें कंपन संभवत नाहीं," अशी आशंका घेऊन वादी 'विशिष्ट अर्थक्रियाकारित्वाचा–कार्यकारित्वाचा अभाव हा सुकृत-दुष्कृतचालनाचा अर्थ येथें लक्षणीय–लक्षणेनें जाणणें उचित आहे, ' असें '**चालनं तु०**' इत्यादि भाष्यानें सांगतो–]=पण सुकृत व दुष्कृत यांच्या कांहीं काल फलप्रतिबंधनामुळें त्यांचें चालन विवक्षित आहे,'**इति**'–याप्रमाणें चालनाला विधूननत्व आहे, असें झालें असतां विद्येनें सुकृतादिकांचा विनाश होत नाहीं, हें फल निष्पन्न होतें. [–'**एवं०**' इत्यादि भाष्यानें पूर्वपक्षाचा अनुवाद करून सूत्राक्षरांनीं सिद्धान्त सांगतात–]

**भाष्य—एवं प्राप्यय प्रतिवक्तव्यम्। हानावेवैष विधूननशब्दो वर्तितुमर्हति। उपायनशब्दशेषत्वात्। न हि परपरिग्रहभूतयोः सुकृतदुष्कृतयोरप्रहीणयोः परैरुपायनं संभवति। यद्यपीदं परकीययोः सुकृतदुष्कृतयोः परैरुपायनं नांजसं संभाव्यते, तथापि तत्संकीर्तनात्तावत्तदानुगुण्येन हानमेव विधूननं नामेति निर्णेतुं शक्यते। क्वचिदपि चेदं विधूननसंनिधावुपायनं श्रूयमाणं कुशाछंदस्तुत्युपगानवद्विधूननश्रुत्या सर्वत्रापेक्ष्यमाणं सार्वत्रिकं निर्णयकारणं संपद्यते॥**

**भाष्यार्थ**—असा पूर्वपक्ष प्राप्त करवून त्याचें प्रत्याख्यान करावें. ' **हानौ०** ' –हानि–त्याग या अर्थींच हा ' विधूनन-'शब्द असणें योग्य आहे. कारण त्याला उपायनशब्दशेषत्व आहे. म्ह० ' उपायन ' या शब्दाच्या संनिधींत ' विधूनन-' शब्द श्रुत आहे.[–'**न हि०**' इत्यादि भाष्यानें त्याचाच प्रपंच–विस्तार करितात–] =कारण अत्यक्त–न टाकलेल्या दुसऱ्याच्या परिग्रहभूत असलेल्या सुकृत-दुष्कृतांचें दुसऱ्यांनीं ग्रहण करणें संभवत नाहीं. [ पूर्वपक्षांतहि लक्षणा नियमानें

करावी लागत असल्यामुळें 'विधूनन-'शब्दाच्या समीप असलेल्या 'उपायन-' शब्दाच्या अनुसार हानच—त्यागच लक्ष्य—लक्षणीय आहे, असा भावार्थ.—"अहो-पण, मुख्य उपायनाचा—ग्रहणाचाहि असंभव असतांना त्याच्या शेषत्वानें—अंग-त्वानें हान—त्याग कसा संभवतो ?" अशी आशंका घेऊन '**यद्यपि०**' इत्यादि भाष्यानें आचार्य म्हणतात—]=दुसऱ्याच्या सुकृत-दुष्कृतांचें दुसऱ्यांनीं हें साक्षात् ग्रहण करणें जरी संभवत नाहीं, तथापि त्याचें संकीर्तन—कथन केलेलें असल्यामुळें त्याच्या अनुरोधानें अगोदर हानच विधूनन आहे, असा निर्णय करितां येणें शक्य आहे. [—"अहोपण 'उपायन' हा शब्द 'विधू-नन' या शब्दाच्या संनिध क्वचित्च पठित आहे. सर्वत्र त्याचा भाव नाहीं. तेव्हां त्याच्या सामर्थ्यानें निर्णय कसा संभवतो ?" '**क्वचिदपि०**' इत्यादि भाष्यानें उत्तर—]=आणि कांहीं ठिकाणींहि विधूननाच्या सांनिध्यांत श्रुत असलेलें हें उपायन 'कुशा-छंद-स्तुति-उपगान' यांप्रमाणें—पृ.३४८—विधूननश्रुतीकडून सर्वत्र अपेक्षा केलें जाणारें असें होत्सातें सार्वत्रिक निर्णयाचें कारण होतें. [ज्या-प्रमाणें कांहीं शाखांमध्यें सांगितलेल्या संदिग्ध कुशादिकांमध्यें श्रुत्यन्तरवशात् निर्णय स्वीकारलेला आहे त्याप्रमाणें विधूननाच्या संनिधींत क्वचित्च श्रुत असलेलेंहि हें उपायन जेथें जेथें विधूनन श्रुत आहे तेथें तेथें सर्वत्र त्याच्या संदिग्धा-र्थाच्या निर्णायकत्वानें अपेक्षित—निर्णायक आहे, असा भावार्थ.—आतां 'लौकिक प्रयोगामुळें विधूनन कंपनच आहे,' असें जें वाद्याचें म्हणणें आहे, त्याविषयीं आचार्य '**न च०**' इत्यादि भाष्यानें म्हणतात—]

**भाष्यं—न च चालनं ध्वजाग्रवत्सुकृतदुष्कृतयोर्मुख्यं संभवति। अद्रव्यत्वात्। अश्वश्च रोमाणि विधून्वानस्त्यजन्रजः सहैव तेन रोमाण्यपि जीर्णानि शातयति "अश्व इव रोमाणि विधूय पापं" इति च ब्राह्मणम्। अनेकार्थत्वाभ्युपगमाच्च धातूनां न स्मरणविरोधः। तदुक्तमिति व्याख्यातम्॥ २६॥ (१५)**

**भाष्यार्थ**—ध्वजाच्या अग्रांप्रमाणें पुण्य व पाप यांचें मुख्य चालन संभवत नाहीं. कारण त्यांना—सुकृत-दुष्कृतांना अद्रव्यत्व आहे. [—"अहोपण, दृष्टान्तांत कंपनच उपलब्ध होत असल्यामुळें दार्ष्टान्तिकांतहि तेच ग्राह्य आहे," अशी शंका घेऊन '**अश्वश्च०**' इत्यादि म्हणतात—]=आणि रोमांना हालविणारा अश्व रजाला—अंगावरील धूळीला काढून टाकणारा असा होत्साता त्या रजाबरोबर जीर्ण रोमांचाहि त्याग करितो. [दृष्टान्तांत हान—त्यागहि प्रतीत होतो, असा याचा भावार्थ.—"तथापि दार्ष्टान्तिकांत विधूनन हें चालनच आहे," अशी आशंका

घेऊन 'त्या दोहोंनाहि तुल्यत्व असल्यामुळें असें म्हणूं नको' असें '**अश्व इव०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=आणि 'अश्व जसा रोमांचा त्याप्रमाणें पापाचा त्याग करून '–पृ.३४१–असें छांदोग्य ब्राह्मण आहे. [–" पाणिनिस्मरणामुळें विधूनन कंपनच आहे " असें जें म्हटलें आहे त्याविषयीं आचार्य '**अनेक०**' इत्यादि भाष्यानें म्हणतात–]=आणि धातूंच्या अनेकार्थत्वाचा स्वीकार केलेला असल्यामुळें पाणिनिस्मरणाशीं विरोध नाहीं. [–श्रुत्यन्तरस्थ विशेष श्रुत्यंतरांत जर न स्वीकारला तर सर्वत्र विकल्प प्राप्त होईल, पण अन्य गति असतांना तो अयुक्त आहे, असें पर्युदासाधिकरणांत व्युत्पादन केलें आहे, असें '**तदुक्तं०**' या सूत्रांशानें सांगतात–]='तदुक्तं' या सूत्रांशाचें व्याख्यान वर केलेंच आहे. २६सु.ब्र.३३७.(१५)

### ( १६. सांपरायाधिकरण. २७-२८. )

—विद्येचें कर्मक्षयहेतुत्व सिद्धच आहे, असें गृहीत धरून हानाच्या संनिधींत उपायनाचा उपसंहार प्रदर्शित केला. आतां " विद्येचें कर्मक्षयहेतुत्वच असिद्ध आहे, कारण मार्गामध्यें श्रुत असलेल्या कर्माच्या क्षयाला विद्याहेतुकत्व नाहीं. " अशी आशंका घेऊन सूत्रकार '**सांपराये०**' इत्यादि सूत्रानें म्हणतात—

### सूत्रं—सांपराये तर्तव्याभावात्तथा ह्यन्ये ॥ २७

**सूत्रार्थ**—'सांपराये'–देहांतून बाहेर पडण्याच्या–गमनाच्या वेळींच हा पुण्यपापांचा त्याग होतो. कारण विद्वानाला मध्यें–देहत्याग व ब्रह्मप्राप्ति यांच्या अंतरालीं 'प्राप्तव्य असें कांहीं नसतें. अन्य शाखाध्यायी तसें सांगतात.'२७सु.ब्र.३४० [–किंवा पूर्वाधिकरणाच्या दुसऱ्या वर्णकांत सांगितलेल्या विधूननाख्य हानाचा काल या अधिकरणानें निरूपिला जातो. अर्थात् विधूनन म्ह० हान असें सांगून कांहीं श्रुतींत अर्धमार्गांत श्रुत असलेल्या त्याचाच विचार करण्यासाठीं विचाराचा विषय '**देवयानेन०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]

**भाष्यं**—**देवयानेन पथा पर्यंकस्थं ब्रह्माभिप्रस्थितस्य व्यध्वनि सुकृतदुष्कृतयोः वियोगं कौषीतकिनः पर्यंकविद्यायामामनन्ति " स एतं देवयानं पंथानमासाद्याग्निलोकमागच्छति " इत्युपक्रम्य " स आगच्छति विरजां नदीं तां मनसैवात्येति तत्सुकृतदुष्कृते विधूनुते " इति । तत्किं यथाश्रुतं व्यध्वन्येव वियोगवचनं प्रतिपत्तव्यं, आहोस्विदादावेव देहादपसर्पणे । इति विचारणायां श्रुतिप्रामाण्याद्यथाश्रुति प्रतिपत्तिप्रसक्तौ ॥**

**भाष्यार्थ**—देवयान मार्गानें पर्यंकस्थ ब्रह्माकडे जावयास निघालेल्या पर्यंक ब्रह्मोपासकाच्या सुकृत-दुष्कृतांचा अर्धमार्गांतील वियोग कौषीतकि-शाखाध्यायी

पर्यंकविद्येंत सांगतात "तो या देवयान मार्गास प्राप्त होऊन अग्निलोकास येतो" असा उपक्रम करून "तो विरजानदीस प्राप्त होतो. तिचें मनानेंच उल्लंघन करितो. तो तेथें पुण्य-पापांचा त्याग करितो." कौ. १. ३-४. सु. उ. पृ. ८२१-८२६- असें आमनन-कथन करितात. [-या उक्त विभागवचनाला विषय करून श्रुति-विरोधामुळें संशय सांगतात-]='**तत्किं०**'-त्यांत काय, जसें श्रुत आहे त्याप्रमाणें अर्धमार्गांतच हें विभागवचन आहे असें समजावें कीं अगोदरच-आरंभींच देहांतून बाहेर पडण्याच्या वेळीं हें विभागवचन आहे, अशी विचारणा-असा संशय प्राप्त झाला असतां ["अश्व जसा रोमांचा त्याग करितो त्याप्रमाणें पापाचा त्याग करून"-पृ.३४१-असा आरंभ करून 'धूत्वा शरीरं'-शरीराला सोडून, असें सांगून 'मी ब्रह्मलोकास सर्वतः प्राप्तः होतों' या श्रुतीनें देहत्यागाच्या पूर्वींच सुकृतादिकांच्या हानाचें-त्यागाचें कथन केलेलें असल्यामुळें व विद्येच्या सामर्थ्यामुळें जिवंत असलेल्याच विद्वानाच्या पुण्य-पापत्यागसिद्धीची संपूर्ण सामग्री असतांना कार्याचा क्षेप-कार्याला उशीर लागणें अशक्य असल्यामुळें आणि विद्येला कर्मक्षयाचें पुष्कलकारणत्व असल्यामुळें 'सुकृत-दुष्कृते विधूनुते'-पुण्य-पापत्याग करितो, या वाक्यांतील पाठक्रमावरून अर्धमार्गांतील सुकृतादित्यागाचें केवल अनुमान होत असल्यामुळें, पाठक्रमाहून अर्थक्रमाला बलवत्त्व असल्यामुळें पूर्वपक्षाच्या अभावाची आशंका घेऊन त्याची प्राप्ति '**श्रुतिप्रामाण्यात्०**' इत्यादि भाष्यानें सांगतात-]=श्रुतिप्रामाण्यामुळें 'यथाश्रुति प्रतिपत्ति'-जसें श्रुत आहे तसेंच अर्धमार्गांतील हान मानणें प्राप्त झालें असतां [-'पठति'-आचार्य सिद्धान्त सांगतात, असा पुढें संबंध. 'तत्सुकृत-दुष्कृते विधूनुते' हें केवल पाठमात्र नाहीं. तर 'तस्मात्' अशा हेतु-अर्थी असलेल्या 'तत्' या सर्वनामशब्दानें ही श्रुति विरजानदीच्या अतिक्रमणाचें त्यागाप्रत कारणत्व सांगते-विरजानदीचें अतिक्रमण हें पुण्य-पापत्यागाचें कारण आहे, असें सांगते. श्रुत्यन्तरविरोधहि येत नाहीं. कारण अर्धमार्गांतीलहि कर्मक्षयाच्या ब्रह्मलोकसंभवनाहून पूर्वकालत्वाची सिद्धि होते. म्ह० अर्ध मार्गांतहि होणारा कर्मक्षय ब्रह्मलोकप्राप्तीच्या पूर्वींच होतो, त्यामुळें श्रुत्यन्तरविरोध नाहीं, असा याचा भावार्थ. 'विधूनन-'शब्दाप्रमाणेंच सुकृतादित्यागालाहि कालोक्तीच्या द्वारा वाक्यार्थज्ञानहेतुत्व आहे, असें सांगितलेलें असल्यामुळें याच्या पादादिसंगति आहेत. पूर्वपक्षांत 'विद्यासामर्थ्याचा अनादर' व सिद्धान्तांत 'त्याचा आदर' केला जातो, अशा अभिप्रायानें पूर्वपक्षप्राप्ति सांगून सिद्धान्त-**सूत्राची 'पठति०' इत्यादि भाष्यानें योजना**-]

**भाष्यं—पठति–सांपराय इति। सांपराये गमन एव देहादपसर्पणे इदं विद्यासामर्थ्यात्सुकृतदुष्कृतहानं भवतीति प्रतिजानीते। हेतुं चाचष्टे तर्तव्याभावादिति। न हि विदुषः संपरेतस्य विद्यया ब्रह्म संप्रेप्सतोऽन्तराले सुकृतदुष्कृताभ्यां किंचित्प्राप्तव्यमस्ति यदर्थं कतिचित्क्षणानक्षीणे ते कल्पेयाताम्। विद्याविरुद्धफलत्वाच्च विद्यासामर्थ्येन तयोः क्षयः। स च यदैव विद्या फलाभिमुखी तदैव भवितुमर्हति। तस्मात्प्रागेव सन्नयं सुकृतदुष्कृतक्षयः पश्चात्पठ्यते॥**

**भाष्यार्थ**—श्रुतिप्रामाण्यामुळे 'यथाश्रुति प्रतिपत्ति' प्राप्त झाली असतां बादरायणाचार्य 'सांपराये॰' इत्यादि पढतात–'सांपराये' म्ह॰ गमनाच्या–देहांतून बाहेर पडण्याच्या वेळींच विद्येच्या सामर्थ्यामुळे हें सुकृत-दुष्कृतांचें हान होतें, अशी सूत्रकार प्रतिज्ञा करितात व 'तर्तव्याभावात्' असा हेतु सांगतात. [–'फलवशात् अर्धमार्गामध्यें दुष्कृतादिकांचें हान कल्पनीय आहे कीं तेथेंच त्यागाच्या हेतूचें अस्तित्व असल्यामुळें' असा विकल्प करून '**न हि॰**' इत्यादि भाष्यानें त्यांतील पहिल्या पक्षाचें निरसन–]=कारण शरीर सोडून गेलेल्या–परलोकास निघालेल्या विद्येनें ब्रह्माला पूर्णपणें प्राप्त होण्याची इच्छा करणाऱ्या विद्वानाला अंतरालीं–देहत्याग व ब्रह्मप्राप्ति यांच्यामध्यें सुकृत-दुष्कृतांनीं प्राप्तव्य असें कांहीं फल नाहीं, कीं ज्यासाठीं तीं–पुण्यपापें कांहीं क्षण क्षीण न होतांच राहतात अशी कल्पना करावी लागेल [–'**विद्या॰**'इत्यादि भाष्यानें दुसऱ्या कल्पाचें निरसन–]=आणि विद्याविरुद्धफलत्वामुळें–पुण्य-पापांचें फल विद्येच्या विरुद्ध असल्यामुळें विद्यासामर्थ्यानें त्या दोहोंचा क्षय होतो, आणि तो क्षय जेव्हां विद्या फलाभिमुख होते तेव्हांच होणें उचित आहे. [ज्यानें पापाचें निराकरण केलें नाहीं त्याचें देवयानमार्गानें गमन संभवत नसल्यामुळें जीवदवस्थेंतच विद्वानाच्या पापाचा त्याग विद्यासामर्थ्यानें होतो, असा भावार्थ. –'तर मग कौषीतकिश्रुतीची वाट काय?' '**तस्मात्॰**' इत्यादि उत्तर–] =म्हणून देहत्यागाच्या पूर्वींच होणारा हा सुकृत-दुष्कृतांचा त्याग देहत्यागानंतर पठित आहे. [प्रकरणपठित विद्येला प्राधान्य असल्यामुळें 'तत्' या सर्वनामश्रुतीनें तिचाच परामर्श केला आहे व अनन्तर–मागून प्रकृत असलेल्याहि विरजानदीच्या अतिक्रमाला अप्राधान्य असल्यामुळें त्या शब्दानें त्याचा परामर्श होत नाहीं, म्हणून पाठक्रमाचा बाध करून अर्थक्रम स्वीकारावा, असा याचा भावार्थ. –शिवाय पुष्कल हेतु–समर्थ सामग्री असली कीं कार्य अवश्य होतेंच, या न्यायानें अनुगृहीत असलेले श्रुत्यन्तरच अधिक बलवान् आहे, असें मानून '**तथा हि॰**' इत्यादि भाष्यानें श्रुत्यन्तराचें उदाहरण देतात–]

**भाष्यं—तथा ह्यन्येऽपि शाखिनस्तांडिनः शाट्यायनिनश्च प्रागवस्थायामेव सुकृतदुष्कृतहानमामनन्ति ' अश्व इव रोमाणि विधूय पापम् ' इति । ' तस्य पुत्रा दायमुपयन्ति सुहृदः साधुकृत्यां द्विषन्तः पापकृत्याम् ' इति च ॥ २७ ॥**

**भाष्यार्थ**—'**तथा हि अन्ये**'–कारण अन्य शाखाध्यायीहि–तांडी व शाट्यायनिन तसें–प्रागवस्थेंतच–देहत्यागाच्या पूर्वींच सुकृत-दुष्कृतांचें हान सांगतात. [–पूर्वपक्षांत त्याचा अविरोधानें निर्णय करणें युक्त नाहीं. कारण ' विधूय पापं ' असें विधूननामध्यें त्याचें स्वातंत्र्य दृष्ट आहे, अशा आशयानें ' **अश्वः इव०** ' इत्यादि म्हणतात–]=' अश्व ज्याप्रमाणें रोमांचा त्याग करितो त्याप्रमाणें पापाचा त्याग करून '–पृ.३४१–असें [–शिवाय पूर्वावस्थेंतच सुकृतादिकांचें ग्रहण श्रुत आहे. पण त्यांच्या त्यागावांचूनच त्यांचें ग्रहण संभवत नाहीं. त्यामुळें अर्ध-मार्गांत कर्मनिवृत्ति होत नाहीं, असें ' **तस्य०** ' इत्यादि वाक्यानें सांगतात–]=व 'त्याचे पुत्र त्याच्या दायाला–धनाला स्वीकारितात–धनाचें ग्रहण करितात, सुहृद पुण्यकर्माचें व द्वेष करणारे पापकर्माचें ग्रहण करितात ' असें आमनन–कथन करितात. २७. [–"विद्याफलत्वामुळें ब्रह्मलोकप्राप्तीप्रमाणें कर्मक्षयहि देहत्यागानंतरच होईल " अशी आशंका घेऊन सूत्रकार 'छन्दतः०' इत्यादि म्हणतात–]

**सूत्रं—छंदत उभयाविरोधात् ॥ २८ ॥ ( १६ )**

**सूत्रार्थ**—' **छन्दतः** '–स्वेच्छेनें अनुष्ठान जीवंतपणींच संभवतें. त्यामुळें कर्मक्षयहि जिवंत असतांनाच होतो. याप्रमाणें विद्या व कर्मक्षय यांना कार्य-कारणभाव असल्यामुळें ' उभय श्रुतींचा अविरोध आहे.' २८ (१६)–सु.ब्र.३४० [–' **यदि च०** ' इत्यादि भाष्यानें सूत्राचें व्याख्यान करितात–]

**भाष्यं—यदि च देहादपसृप्तस्य देवयानेन पथा प्रस्थितस्यार्धपथे सुकृतदुष्कृतक्षयोऽभ्युपगम्येत ततः पतिते देहे यमनियमविद्याभ्यासात्मकस्य सुकृतदुष्कृतक्षयहेतोः पुरुषप्रयत्नस्येच्छातोऽनुष्ठानानुपपत्तेः अनुपपत्तिरेव तद्धेतुकस्य सुकृतदुष्कृतक्षयस्य स्यात् । तस्मात्पूर्वमेव साधकावस्थायां छंदतोऽनुष्ठानं तस्य स्यात् । तत्पूर्वकं च सुकृतदुष्कृतहानमिति द्रष्टव्यम् । एवं निमित्तनैमित्तिकयोरुपपत्तिः । तांडिशाट्यायनिश्रुत्योश्च संगतिरिति ॥ २८ ॥ (१६)**

**भाष्यार्थ**—आणि जर देहापासून निघून गेलेल्या–देहत्याग केलेल्या, देवयान-मार्गानें प्रस्थान–गमन केलेल्या विद्वानाचा अर्ध्या मार्गांत पुण्य-पापक्षय मानिला तर देह पडला असतां यम-नियमविद्याभ्यासात्मक पुण्य-पापक्षयहेतुभूत पुरुष-प्रयत्नाचें ' **छन्दतः** '–इच्छेनें अनुष्ठान होणें शक्य नसल्यामुळें त्या पुरुषप्रयत्ना-

नुष्ठानामुळें होणाऱ्या सुकृत-दुष्कृतक्षयाची अनुपपत्तिच होईल. [ जिवंत असतांना ब्रह्मलोकाची प्राप्ति संभवत नाहीं. म्हणून ब्रह्मलोकप्राप्तीला देहपाताची अपेक्षा आहे. पण कर्माचा त्याग देहवानाचाच संभवतो–देहवानाच्याच कर्मत्यागाची सिद्धि होते, त्यामुळें ब्रह्मलोकप्राप्तीप्रमाणें कर्मक्षयालाहि देहत्यागाची अपेक्षा नाहीं, असा भावार्थ. ' छन्दतः ' म्हणजे स्वच्छन्दानें, स्वेच्छेनें, हेंच भाष्यांतील ' इच्छातः ' या पदानें सांगितलें आहे.–अर्धमार्गांत हेतूच्या अनुष्ठानाची असिद्धि असल्यामुळें साध्याची असिद्धि होते, असें झालें असतां ' **तस्मात्०** ' इत्यादि भाष्यानें फलित सांगतात–]=म्हणून पूर्वीच साधकावस्थेंत त्याचें स्वेच्छेनें अनुष्ठान होतें व त्या उक्त प्रयत्नानुष्ठानपूर्वकच सुकृत-दुष्कृतांचें हान होतें, असें समजावें. [–सूत्रांतील ' उभयाविरोधात् ' या भागाचा विभाग करितात–]='**एवं०**' –याप्रमाणें निमित्त व नैमित्तिक यांची उपपत्ति लागते. [ समर्थ कारणाच्या कार्याला उशीर लागणें युक्त नाहीं. त्यामुळें हेतु–कारणसामग्री पूर्ण झाली असतां उत्तरक्षणींच कार्योत्पत्ति होते. कारण असें न झाल्यास त्याचें निमित्त-नैमित्तिकत्वच नाहींसें होईल, असा भावार्थ.–' **ताण्डि०** ' इत्यादि भाष्यानें ' उभयाविरोधात् ' या सूत्रपदाचें व्याख्यान्तर–]=आणि ताण्डि-शाट्यायनिश्रुतींची संगति लागते. '**इति०**'–याप्रमाणें विद्यासामर्थ्यामुळें देहपाताच्या पूर्वीच सुकृतादिकांची निवृत्ति होते, हे सिद्ध झालें. २८.–सु. ब्र. पृ. ३४१ ( १६ ).

( १७. **गतेरर्थवत्त्वाधिकरण.** सू. २९-३०. )

–सुकृतादिहानाच्या संनिधानांत–समीप सांगितलेल्या देवयानगतीला उपायनाप्रमाणेंच सार्वत्रिकत्व प्राप्त झालें असतां सूत्रकार '**गतेरर्थवत्त्वं०**' इत्यादि सूत्रानें असें सांगतात—

**सूत्रं—गतेरर्थवत्त्वमुभयथाऽन्यथा हि विरोधः ॥ २९**

**सूत्रार्थ**—देवयानगतीचें अर्थवत्त्व उभयथा–विभागानेंच असणें युक्त आहे. ' हि '–कारण 'अन्यथा'–सर्वच विद्यांमध्यें तिचें अर्थवत्त्व–उपसंहार कल्पिल्यास ' विरोधः '–श्रुतिविरोध हा दोष येतो २९.–सु. ब्र. ३४२. [–'**कचित्०**' इत्यादि भाष्यानें विचाराचा विषय सांगतात–]

**भाष्यं**—**कचित्पुण्यपापहानसंनिधौ देवयानः पंथाः श्रूयते, कचिन्न । तत्र संशयः–किं हानावविशेषेणैव देवयानः पंथा संनिपतेदुत विभागेन कचित्संनिपतेत् कचिन्नेति । यथा तावद्धानावविशेषेणैव उपायनानुवृत्तिरुक्तैवं देवयानानुवृत्तिरपि भवितुमर्हतीति ॥**

**भाष्यार्थ**—कांहीं श्रुतींत पुण्य-पापहानाच्या संनिधींत देवयानमार्ग श्रुत आहे व कांहींत तो श्रुत नाहीं. [संशयासाठीं ही दुसरी कोटी सांगितली आहे.–हानाच्या संनिध मार्गश्रुति असल्यामुळें व त्याच्या विशेषाचें अज्ञान असल्यामुळें '**तत्र०**' इत्यादि भाष्यानें संशय सांगतात–]=त्याविषयीं 'काय, हानीमध्यें–त्यागामध्यें अविशेषानेंच देवयान मार्ग प्राप्त होतो–त्याचा उपसंहार होतो कीं विभागानें कांहीं ठिकाणीं त्याचा उपसंहार होतो व कांहीं ठिकाणीं होत नाहीं' असा संशय येतो. [–हानाच्या समीप क्वचितच श्रुत असलेल्या उपायनाला जसें सार्वत्रिकत्व आहे, त्याप्रमाणें क्वचित्च–कर्मक्षयाच्या संनिध उक्त असलेल्या देवयान मार्गाची अनुवृत्ति केवल क्षयश्रवणांतहि होणें युक्त आहे, असा संगतिगर्भ पूर्वपक्ष '**यथा०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=पूर्वाधिकरणांत ज्याप्रमाणें हानीमध्यें अविशेषानेंच उपायनाची अनुवृत्ति सांगितली त्याप्रमाणें देवयानमार्गाचीहि अनुवृत्ति अविशेषानेंच होणें युक्त आहे. ['निर्गुण ब्रह्मविद्या गतीनें युक्त आहे. कारण तिला ब्रह्मविद्यात्व आहे. सगुण ब्रह्मविद्येप्रमाणें' असा याचा भावार्थ.–प्रासंगिक विधूननसमयकथनानें प्रस्तुत गुणोपसंहारोक्तीच्या अपवादकथनद्वारा विचाराला वाक्यार्थज्ञानोपायगामित्व असल्यामुळें याच्या पादादिसंगति आहेत. पूर्वपक्षांत 'निर्गुण ब्रह्मज्ञानालाहि नियमानें गतीची अपेक्षा' व सिद्धान्तांत 'सगुण विद्यावानालाच मार्गाची अपेक्षा' अशा विवक्षेनें '**अस्यां०**' इत्यादि भाष्यानें सिद्धान्त सांगतात–]

**भाष्यं—अस्यां प्राप्तौ आचक्ष्महे । गतेर्देवयानस्य पथोऽर्थवत्त्वमुभयथा विभागेन भवितुमर्हति, क्वचिदर्थवती गतिः क्वचिन्नेति । नाविशेषेण । अन्यथा ह्यविशेषेणैवैतस्यां गतावंगीक्रियमाणायां विरोधः स्यात् । 'पुण्यपापे विधूय निरंजनः परमं साम्यमुपैति' इत्यस्यां श्रुतौ देशान्तरप्रापणी गतिर्विरुध्येत । कथं हि निरंजनोऽगन्ता देशान्तरं गच्छेत् । गंतव्यं च परमं साम्यं न देशान्तरप्राप्त्यायत्तं, इति आनर्थक्यमेवात्र गतेर्मन्यामहे ॥ २९ ॥**

**भाष्यार्थ**—अशी पूर्वपक्षाची प्राप्ति झाली असतां आम्ही सिद्धान्त सांगतों–'गतेः'–देवयान मार्गाचें 'अर्थवत्त्वं'–उपयोगित्व 'उभयथा'–विभागानें होण्यास योग्य आहे. 'कांहीं विद्येंत गति अर्थवती आहे व कांहीं विद्येंत अर्थवती नाहीं' असें. त्यामुळें ती अविशेषानें–सामान्यतः सर्वविद्यांमध्यें अर्थवती नाहीं. [–प्रतिज्ञेचें व्याख्यान करून '**अन्यथा०**' इत्यादि भाष्यानें सूत्रांतील हेतूचें व्याख्यान करितात–]='**हि**'–कारण असें न मानितां ह्या गतीचा अविशेषानेंच अंगीकार केल्यास विरोध येईल. 'विद्वान् पुण्य व पाप यांचा समूल नाश करून निर्लेप-

क्लेशशून्य होत्साता निरतिशय साम्यास प्राप्त होतो '–मुं. ३. १.३.–सु. उ.१५९ –अशा या श्रुतीमध्यें देशान्तराला प्राप्त करविणारी गति विरुद्ध होते. [ श्रुति-विरोधच 'कथं०' इत्यादि भाष्यानें साधितात–]=कारण निरंजन व गमन न करणारा देशान्तरास कसा जाईल ? [ सर्वगत, असंग आत्म्याची उपाधीवांचून गति उपपन्न होत नाहीं, असा भावार्थ.–गमन करणाराच्या स्वरूपाचें आलोचन करून गतीचा असंभव सांगून गंतव्यरूपाच्या आलोचनानेंहि गतीची अनुपपत्ति '**गन्तव्यं च०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=आणि ब्रह्मज्ञाचे गन्तव्य परम साम्य आहे. तें देशान्तरप्राप्तीच्या अधीन नाहीं. [ स्वरूपतः भिन्न असलेल्या दोन पदार्थांच्या ऐक्याचा असंभव आहे. अविद्याकृत–कल्पित भेदाची निवृत्ति विद्येनेंच होते आणि विद्येला स्वोत्पत्तीमध्यें किंवा स्वफलामध्यें देशभेदाच्या अपेक्षेचा अभाव आहे –तिला त्यांसाठीं देशभेदाची अपेक्षा नाहीं. त्यामुळें ब्रह्मज्ञानांत गति निरुपयोगी आहे, असा '**इति०**' इत्यादि भाष्यानें उपसंहार–]=म्हणून निर्गुण ब्रह्मज्ञानामध्यें गतीला आनर्थक्यच आहे, असें आम्ही मानितों. २९. [–याप्रमाणें निर्गुण विद्येमध्यें गति व्यर्थ आहे, असें प्राधान्यानें सांगून पर्यंकविद्यादिकांमध्यें प्राधान्यानें तिचें अर्थवत्त्व '**उपपन्नः०**' इत्यादि सूत्रानें सांगतात–]

**सूत्रं—उपपन्नस्तल्लक्षणार्थोपलब्धेर्लोकवत् ॥ ३० ॥ (१७)**

**सूत्रार्थ**—गतीचा हा असा उभयथा भाव 'उपपन्नच' आहे. 'कारण गति-लक्षणभूत–गतिकारणभूत अर्थ पर्यंकविद्यादिकांमध्यें उपलब्ध होतो.' 'लोका-प्रमाणें'–व्यवहारांत ग्रामप्राप्तीमध्यें देशान्तरास पोंचविणाऱ्या मार्गाची अपेक्षा असते, आरोग्यप्राप्तीला मार्गाची अपेक्षा नसते. ३० (१७) सु.ब्र.३४२. [–सूत्रांतील प्रतिज्ञेचें '**उपपन्नश्च०**' इत्यादि भाष्यानें व्याख्यान–]

**भाष्यं—उपपन्नश्चायमुभयथाभावः क्वचिदर्थवती गतिः क्वचिन्नेति। तल्लक्षणार्थोपलब्धेः। गतिकारणभूतो ह्यर्थः पर्यंकविद्यादिषु सगुणेषूपासनेषूपलभ्यते। तत्र हि पर्यंकारोहणं पर्यंकस्थेन ब्रह्मणा संवदनं, विशिष्टगंधादिप्राप्तिश्च, इत्येवमादि बहु देशान्तरप्राप्त्यायत्तं फलं श्रूयते। तत्रार्थवती गतिः ॥**

**भाष्यार्थ**—आणि 'गति क्वचित्–सगुणविद्येंत अर्थवती आहे व निर्गुणविद्येंत अर्थवती नाहीं' असा हा उभयथाभाव उपपन्न आहे. [–'क्वचित् अर्थवती' याविषयीं हेतूला अवतरण देऊन त्यांतील लक्षणशब्दाचें लक्षणेनें कारणार्थत्व स्वीकारून त्याचें व्याख्यान करितात–]='**तल्लक्षणार्थोपलब्धेः०**'–त्याच्या लक्षणार्थाची –कारणार्थाची उपलब्धि होत असल्यामुळें; गतिकारणभूत–गतीचा कारणभूत

जो अर्थ तो पर्यंकविद्यादि सगुण उपासनांमध्यें उपलब्ध होतो. [–'तत्र०' इत्यादि भाष्यानें उपलब्धीचाच अभिनय करितात–]=कारण त्या विद्येमध्यें पर्यंकावर आरोहण, पर्यंकस्थ ब्रह्माशीं संभाषण, विशिष्ट गंधादिकांची प्राप्ति, हें व अशाच प्रकारचें दुसरेंहि देशान्तरप्राप्तीच्या अधीन असलेले पुष्कळ फल श्रुत आहे. [–याप्रमाणें एका देशापासून देशान्तरप्राप्तीच्या अधीन असलेलें फल श्रुत आहे, असें झालें असतां 'तत्र०' इत्यादि भाष्यानें त्याचें फलित सांगतात–]='तत्र'–त्या पर्यंकविद्यादि सगुणोपासनांमध्यें गति अर्थवती–उपयोगी आहे. [–'निर्गुणविद्येमध्येंहि हेतु आहे' अशी आशंका घेऊन 'न तु०' इत्यादि भाष्यानें म्हणतात–]

**भाष्यं— न हि सम्यग्दर्शने तल्लक्षणार्थोपलब्धिरस्ति । न ह्यात्मैकत्वदर्शिनां आप्तकामानां इहैव दग्धाशेषक्लेशबीजानां आरब्धभोगकर्माशयक्षपणव्यतिरेकेण अपेक्षितव्यं किंचिदस्ति । तत्रानर्थिका गतिः ॥**

**भाष्यार्थ**—पण सम्यग्दर्शनामध्यें गतिकारणभूत अर्थाची उपलब्धि होत नाहीं. [–न हि०' इत्यादि भाष्यानें त्याचेंच उपपादन–]=कारण आत्मैकत्वदर्शी विद्वानांना [–त्यांचें प्राप्तपरानंदत्व सांगतात–]=' **आत्मकामानां०**'–या जीवदवस्थेंतच ज्यांना सर्व काम–सर्व विषय प्राप्त झाले आहेत, [–त्यांचें समस्त अनर्थराहित्य सांगतात–]=ज्यांनीं सर्व क्लेशांच्या बीजाला दग्ध करून सोडलें आहे, अशा विद्वानांना [–"तर मग त्यांचा तत्काल देहपात होईल" अशी आशंका घेऊन '**आरब्ध०**' इत्यादि भाष्यानें तिचें 'नाहीं' असें उत्तर–]=ज्याच्या भोगाचा प्रारंभ झाला आहे अशा कर्माशयाला क्षीण करणें–त्याचा उपभोगानें क्षय करणें, यावांचून दुसरें कांहीं अपेक्षितव्य नसतें. [–याप्रमाणें हेतूच्या व्यभिचाराचें निरसन करून 'क्वचित् न' असें जें वर म्हटलें आहे त्याचें निगमन करितात–] =' **तत्र०**'–त्या सम्यग्ज्ञानामध्यें गति व्यर्थ आहे. [ 'निर्गुण ब्रह्मवेत्ता आर्चिरादिगतिमान् नाहीं. कारण तो मुक्ति या फलाला पात्र आहे. मुक्त होणाऱ्या हिरण्यगर्भाप्रमाणें' असा याचा भावार्थ.–' गति क्वचित् अर्थवती आहे व क्वचित नाहीं' असें जें म्हटलें आहे तें '**लोकवत्०**' या सूत्रोक्त दृष्टान्तानें स्पष्ट करितात–]

**भाष्यं—लोकवच्चैष विभागो द्रष्टव्यो यथा लोके ग्रामप्राप्तौ देशान्तरप्रापणः पंथा अपेक्ष्यते, नारोग्यप्राप्तौ, एवमिहापीति । भूयश्चैनं विभागं चतुर्थाध्याये निपुणतरमुपपादयिष्यामः ॥ ३० ॥** ( १७)

**भाष्यार्थ**—आणि लोकाप्रमाणें हा विभाग जाणावा. ज्याप्रमाणें व्यवहारांत ग्रामप्राप्तीमध्यें–दुसऱ्या गांवास जावयाचें झाल्यास त्या दुसऱ्या देशास जाणारा

मार्ग अपेक्षित असतो पण आरोग्य प्राप्तीमध्यें तसल्या मार्गाची अपेक्षा नसते, त्याचप्रमाणें येथें म्ह० या सगुण-निर्गुणविद्येमध्यें जाणावें–सगुणविद्येंत मार्गाची अपेक्षा आहे, निर्गुण विद्येंत नाहीं, असें जाणावें [ भाष्यांतील 'इति' हा शब्द सूत्रव्याख्येच्या समाप्तीसाठीं आहे.–" अहोपण, 'त्यांतील एका सुषुम्नानाडीनें जाणारा अमृतत्वास प्राप्त होतो व बाकीच्या नाना गतिमान् शंभर नाड्या उत्क्रमणास–पुनर्जन्मास कारण होतात '–का.२.३.१६. सु. उ. ८०–अशी श्रुति असल्यामुळें देवयानमार्गानें गेलेल्या उपासकालाच मुक्ति मिळते," अशी आशंका घेऊन 'भूयश्चैनं०' इत्यादि भाष्यानें म्हणतात–]=आणि पुनरपि चवथ्या अध्यायांत याच विभागाचें अधिक चांगल्याप्रकारें उपपादन करूं.३० सु.ब्र.३४३.(१७)

## ( १८. अनियमाधिकरण. सू. ३१. )

–सगुण-निर्गुणविद्यांमध्यें गतीचा भाव व अभाव यांच्या व्यवस्थेप्रमाणें सगुणविद्यांमध्येंहि व्यवस्थेची आशंका घेऊन ' अनियमः० ' इत्यादि सूत्रानें सांगतात–

**सूत्रं—अनियमः सर्वासामविरोधः शब्दानुमानाभ्याम्॥३१॥ (१८)**

**सूत्रार्थ**—' सर्वांचा अनियम '–सर्व सगुणोपासनांच्या मार्गाचा अनियम आहे. ' अविरोधः'–प्रकरणविरोधहि येत नाहीं. ' श्रुति व स्मृति यांवरून. ' ३१ (१८) सु. ब्र. ३४४. [–' सगुणासु० ' इत्यादि भाष्यानें गतार्थाचा अनुवाद–]

**भाष्यं—सगुणासु विद्यासु गतिरर्थवती । न निर्गुणायां परमात्मविद्यायां । इत्युक्तम् । सगुणास्वपि विद्यासु कासुचिद्गतिः श्रूयते यथा पर्यंकविद्यायामुपकोसलविद्यायां पंचाग्निविद्यायां दहरविद्यायामिति । नान्यासु यथा मधुविद्यायां शांडिल्यविद्यायां षोडशकलविद्यायां वैश्वानरविद्यायामिति ॥**

**भाष्यार्थ**—सगुण विद्यांमध्यें गति अर्थवती आहे. निर्गुण परमात्मविद्येमध्यें ती अर्थवती नाहीं, असें सांगितलें. [–" अहोपण, गतीचे दोन प्रकारें अर्थवत्त्व सिद्ध झालें असतां आतां हें अधिकरण काय करावयाचें आहे ?" अशी आशंका घेऊन ' **सगुणासु अपि०** ' इत्यादि भाष्यानें याचा विषय सांगतात–]=सगुण विद्यांतीलहि कांहीं विद्यांमध्यें गति श्रुत आहे. जशी–पर्यंकविद्येमध्यें–कौ. १.–उपकोसलविद्येमध्यें–छां. ४.१०–पंचाग्निविद्येमध्यें–छां. ५.४ बृ.६.२–दहरविद्येमध्यें –छां.८.१.यांमध्यें ती श्रुत आहे. [–विचाराचें बीज असा जो संशय तो सांगण्यासाठीं कोट्यन्तर सांगतात–]='नान्यासु०'–अन्य विद्यांमध्यें गति श्रुत नाहीं. जशी–मधुविद्येमध्यें–बृ. २.५.–शांडिल्यविद्येमध्यें–छां. ३.१४.–षोडशकलविद्येमध्यें–छां. ४.५.–वैश्वानरविद्येमध्यें–छां.५.११-१८–इत्यादि इतर विद्यांमध्यें ती श्रुत नाहीं.

[ अर्चिरादि पर्वांनीं युक्त असलेल्या मार्गाला उद्देशून विद्याविशेषाधिकारवाक्या-वरून व अविशेष दृष्टीवरून येणारा संशय 'तत्र०' इत्यादि भाष्यानें सांगतात-]

**भाष्यं—तत्र संशयः-किं यास्वेवैषा गतिः श्रूयते तास्वेव नियम्येत, उतानियमेन सर्वाभिरेवैवंजातीयकाभिर्विद्याभिरभिसंबध्येतेति ॥**

**भाष्यार्थ**—त्याविषयीं 'ज्या सगुण विद्यांमध्यें ही गति श्रुत आहे त्यांतच ती नियत केली जाते, कीं अनियमानें अशा जातीच्या सर्व विद्यांशीं ती अभिसंबद्ध होते, असा संशय येतो. [येथें सगुण विद्यांमध्यें गतीचें सार्वत्रिकत्व सांगून वाक्यार्थ-ज्ञानाच्या हेतूचेंच चिंतन केलेलें असल्यामुळें याच्या पादादिसंगति आहेत.-पूर्व-पक्षांत 'त्या त्या विद्येंत नियत असलेल्या गतीच्या उपसंहाराची असिद्धि' व सिद्धान्तांत 'अनियत असलेल्या तिचें सार्वत्रिकत्व' स्वीकारून विमर्शपूर्वक 'किं०' इत्यादि भाष्यानें पूर्वपक्ष-]

**भाष्यं--किं तावत्प्राप्तं । नियम इति । यत्रैव श्रूयते तत्रैव भवितुमर्हति । प्रकरणस्य नियामकत्वात् । यद्यन्यत्र अश्रूयमाणापि गतिर्विद्यान्तरं गच्छेत् श्रुत्यादीनां प्रामाण्यं हीयेत, सर्वस्य सर्वार्थत्वप्रसंगात् । अपि चार्चिरादिकैकैव गतिरुपकोसलविद्यायां पंचाग्निविद्यायां च तुल्यवत्पठ्यते । तत्सर्वार्थत्वेऽनर्थकं पुनर्वचनं स्यात् । तस्मान्नियम इति ॥**

**भाष्यार्थ**—त्या दोन पक्षांतील प्रथम कोणता पक्ष प्राप्त झाला ? 'गतीचा नियम आहे' हा पक्ष प्राप्त झाला. [-'**यत्रैव०**' इत्यादि भाष्यानें नियमाचेंच व्याख्यान-]=ज्या विद्येमध्यें गति श्रुत आहे,तेथेंच ती असणें युक्त आहे. [-'**प्रकरणस्य०**' इत्यादि हेतु-]=कारण प्रकरणाला नियामकत्व आहे. [-'**यदि०**' इत्यादि भाष्यानें हेतूचें व्यतिरेकानें विवरण-]=जर अन्यत्र-अन्य विद्यांमध्यें श्रुत नसलेलीहि गति दुसऱ्या विद्यांमध्यें जाऊं लागेल तर श्रुत्यादिकांचें प्रामाण्य हीन होईल-तें टाकिलें आहे, असें होईल ? कारण त्यामुळें सर्वाला सर्वार्थत्वाचा प्रसंग येईल. [प्रकरणावरून सामान्यसंबंध सिद्ध झाला असतां श्रुत्यादिकांवरून विशेष विनियोगाचें ज्ञान होतें. पण जेथें श्रुत्यादिकच विनियोग करणाऱ्या असतात, सामान्यसंबंधबोधक प्रकरण नसतें तेथेंहि त्याच्या, निर्वाहासाठीं प्रकरण कल्प्य-कल्पना करण्यास योग्य आहे. कारण प्रकरणाच्या अभावीं दर्श, पूर्णमास, ज्योतिष्टोम इत्यादिकांच्या धर्मांचा संकर होतो. म्हणून विनियोग व त्याचा निर्वाह यांसाठीं प्रकरण नियत आहे. नाहींतर श्रुत्यादिकांना अप्रामाण्य प्राप्त होतें, म्हणून त्याच्याशीं प्रकरणाची विशेषसंगति आहे, असा भावार्थ.-गतीच्या नियमाविषयीं

केवल प्रकरण हेंच एक प्रमाण नाहीं, पुनरुक्ति हें लिंगहि प्रमाण आहे, असें वादी '**अपि च०**' इत्यादि भाष्यानें सांगतो–]=शिवाय उपकोसलविद्येमध्यें व पंचाग्निविद्येमध्यें अर्चिरादि एकच गति 'तुल्यवत्'–एकसारखीच पठित आहे. तिला जर सर्वार्थत्व असेल तर पुनर्वचन अनर्थक होईल! [–एका ठिकाणीं सांगितलेल्या गतीचा सर्वत्र संबंध जर सिद्ध होत असेल तर त्या गतीचें पुनः कथन करणें व्यर्थ होईल, असा भावार्थ.–याप्रमाणें लिंग व प्रकरण यांच्या योगानें वाक्याचा बाध मानून पूर्ववादी '**तस्मात्०**' इत्यादि भाष्यानें उपसंहार करितो–]=म्हणून गतीचा त्या त्या विद्येतच नियम आहे. तिचा सर्व विद्यांमध्यें उपसंहार होत नाहीं, '**इति०**'–असा पूर्वपक्ष प्राप्त होतो. [–'गति नियत आहे. ती उपसंहारास योग्य नाहीं' अशा प्राप्त पूर्वपक्षाचा '**एवं०**' इत्यादि भाष्यानें अनुवाद करून सिद्धान्त–]

**भाष्यं—एवं प्राप्ते पठति–अनियम इति । सर्वासामेवाभ्युदयप्राप्तिफलानां सगुणानां विद्यानामविशेषेणैषा देवयानाख्या गतिर्भवितुमर्हति । नन्वनियमाभ्युपगमे प्रकरणविरोध उक्तः । नैषोऽस्ति विरोधः । शब्दानुमानाभ्यां श्रुतिस्मृतिभ्यां इत्यर्थः ॥**

**भाष्यार्थ**—असा पूर्वपक्ष प्राप्त झाला असतां सूत्रकार '**अनियमः०**' इत्यादि सिद्धान्त सांगतात– [–'**सर्वासां०**' इत्यादि भाष्यानें अनियमाचें व्याख्यान करितात–]=अभ्युदय म्ह० ब्रह्मलोक त्याची प्राप्ति हें ज्यांचे फल आहे, अशा सर्वच सगुण विद्यांची ही 'देवयान' या नांवाची गति असणें योग्य आहे. [ येथील 'अभ्युदयप्राप्तिफलानां' या विशेषणानें कर्मसमृद्ध्यादि फल देणाऱ्या उपासनांचा व्यवच्छेद–व्यावृत्ति केली आहे.–पण वादी '**ननु०**' इत्यादि भाष्यानें अनियमपक्षीं पूर्वोक्त प्रकरणविरोधाचें स्मरण देतो–]="अहोपण, गतीचा अनियम मानिल्यास प्रकरणविरोध हा दोष येतो, असें आम्हीं वर–पृ.३६५–सांगितलें आहे." [–सूत्रावयवानें '**नैषः०**' इत्यादि उत्तर–]=प्रकरणविरोध हा दोष येत नाहीं. 'कारण शब्द व अनुमान यांच्या योगानें,'–त्याविषयीं श्रुति व स्मृति अशीं दोन प्रमाणें असल्यामुळें प्रकरणविरोध येत नाहीं, असा भावार्थ. [–गतीच्या वाक्यान्वयाला सार्वत्रिकत्व असल्यामुळें–गतीचा संबंध सर्व सगुणविद्यावाक्याशीं होत असल्यामुळें वाक्याहून दुर्बल असलेलें प्रकरण बाध्य आहे, अशा अभिप्रायानें '**तथाहि०**' इत्यादि वाक्यानें श्रुति सांगतात–]

**भाष्यं—तथाहि श्रुतिः–' तद्य इत्थं विदुः ' इति पंचाग्निविद्यावतां देवयानं पंथानमवतारयन्ती ' ये चेमेऽरण्ये श्रद्धातप इत्युपासते' इति विद्यान्तरशीलिनामपि पंचाग्निविद्याविद्भिः समानमार्गतां गमयति ॥**

**भाष्यार्थ**—श्रुति व स्मृति या दोन प्रमाणांतील अगोदर त्याविषयीं श्रुति कशी आहे ती पहा–' **तत्०** '–" त्या अधिकाऱ्यांतील जे कोणी गृहस्थ द्युलोकादिकांना अग्नित्वानें उपासितात ते अर्चीला प्राप्त होतात "–छां. ५. १०. १–अशी पंचाग्निविद्यावानांच्या–पंचाग्न्युपासकांच्या देवयानमार्गाला प्रवृत्त करणारी–देवयानमार्ग सांगणारी श्रुति ' आणि जे हे अरण्यांत राहणारे श्रद्धा, तप, यांची उपासना करितात ' ( ते अर्चीला प्राप्त होतात, असाच संबंध ) असें म्हणून दुसऱ्या विद्येचें परिशीलन करणाऱ्याहि उपासकांचें पंचाग्निविद्योपासकांशीं तुल्यमार्गत्व सुचविते. [ ही श्रुति पंचाग्न्युपासक व इतर सगुणोपासक यांची एकच देवयानगति सांगते, असा भावार्थ.–याप्रमाणें अविशेषानें विद्यान्तरशीलींच्या देवयानमार्गाची प्राप्ति करविणाऱ्या वाक्यानें प्रकरण बाध्य आहे, असें सांगितलें. पण आतां वादी ' **कथं०** ' इत्यादि भाष्यानें ' वाक्य विद्यान्तरशीलींच्याहि देवयानमार्गाचें प्रापक नाहीं, ' अशी आशंका घेतो–]

**भाष्यं—कथं पुनरवगम्यते विद्यान्तरशीलिनामियं गतिरिति । ननु श्रद्धातपःपरायणानामेव स्यात्तन्मात्रश्रवणात् । नैष दोषः । न हि केवलाभ्यां श्रद्धातपोभ्यां अन्तरेण विद्याबलं एषा गतिर्लभ्यते "विद्यया तदारोहन्ति यत्र कामाः परागताः । न तत्र दक्षिणा यन्ति नाविद्वांसस्तपस्विनः " इति श्रुत्यन्तरात् । तस्मादिह श्रद्धातपोभ्यां विद्यान्तरोपलक्षणम् ॥**

**भाष्यार्थ**—विद्यान्तरशीलींची–दुसऱ्या विद्येचें परिशीलन करणारांची–इतर सगुणोपासकांची ही गति आहे, हें कसें बरें अवगत होतें ? [–' तर मग त्या वाक्याचा काय अर्थ आहे ' अशी आशंका घेऊन आक्षेपाच ' **ननु०** ' इत्यादि भाष्यानें म्हणतो–]=पण श्रद्धा व तप यांमध्यें परायण असलेल्या अरण्यवासींनाच ती गति प्राप्त होईल. कारण श्रुतींत श्रद्धा व तप एवढ्यांचेंच–या दोन साधनांचेंच श्रवण आहे. [ केवल श्रद्धा व तप यांचेंच अनुष्ठान श्रुत असल्यामुळें श्रद्धातपोनिष्ठांचीच गति वाक्यानें सांगितली आहे, असा भावार्थ.–आचार्य ' **नैषः०** ' इत्यादि भाष्यानें वाक्याच्या अन्यथासिद्धीला दूषित करितात–]=हा दोष येत नाहीं. कारण विद्येच्या–उपासनेच्या बलावांचून केवल श्रद्धा व तप यांच्या योगानेंच ही देवयानगति प्राप्त होत नाहीं. [–अविद्वानांना ही गति प्राप्त होत नाहीं, याविषयीं 'श्रुति' हाच हेतु सांगतात–]=कारण "विद्येच्या योगानें त्या ब्रह्मलोकस्थानावर आरोहण करितात. [–' तत् ' या शब्दानें सांगितलेल्या ब्रह्मलोकाख्य स्थानाचा विशेष श्रुति '**यत्र०**' इत्यादि भागानें सांगते–]=ज्या ब्रह्मलोकाची प्राप्ति

झाली असतां काम-क्षुद्र विषय परागत-व्यावृत्त होतात. [ तें प्राप्य ब्रह्मलोक-स्थान काम-क्रोधादिस्पर्शरहित आहे, असा भावार्थ ]='दक्षिणाः'-दक्षिणमार्गानें गमन करण्याचें ज्यांचें शील आहे ते केवळ कर्मी, तपस्वी असलेलेहि अविद्वान् तेथें-त्या ब्रह्मलोकस्थानीं जात नाहींत." अशी दुसरी श्रुति आहे. त्यामुळें केवळ श्रद्धा-तपांनीं देवयानमार्ग प्राप्त होत नाहीं. [ या श्रुतींत 'नाविद्वांसस्तपस्विनः अपि' असा 'अपि'शब्द आहे, असें जाणावें.-" तर मग 'ये चेमे०'-३६६-इत्यादि वाक्याची काय गति ?" 'तस्मात्०' इत्यादि भाष्यानें उत्तर-]=म्हणून या पूर्वोक्त छान्दोग्यवाक्यांतील श्रद्धा व तप यांवरून विद्यान्तराचें उपलक्षण होतें. [-'वाजसनेयिनस्तु०' इत्यादि भाष्यानें उपलक्षणावांचूनहि विद्यान्तरशीलींची ही गति अवगत झालेली आहे, असें सांगतात-]

**भाष्यं—वाजसनेयिनस्तु पंचाग्निविद्याधिकारेऽधीयते-'य एवमेतद्विदुर्ये चामी अरण्ये श्रद्धां सत्यमुपासते' इति। तत्र श्रद्धालवो ये सत्यं ब्रह्मोपासत इति व्याख्येयम्। सत्यशब्दस्य ब्रह्मण्यसकृत्प्रयुक्तत्वात्। पंचाग्निविद्याविदां चेत्थंवित्तयैव उपात्तत्वाद्विद्यान्तरपरायणानामेवैतदुपादानं न्याय्यम्॥**

**भाष्यार्थ**—पण वाजसनेयिशाखाध्यायी पंचाग्निविद्याप्रकरणांत "जे हें असें जाणतात व जे हे अरण्यांत श्रद्धा व सत्य यांची उपासना करितात"-बृ. ६. २. १५. सु. उ.७३९-असें पढतात. [-" अहोपण, त्यांतहि सत्यशब्दानें सत्यार्थकथनाचा संग्रह केलेला असल्यामुळें त्यावरून विद्यान्तरयुक्तांच्या गतीचें ज्ञान कोठून होणार ?" 'तत्र०' इत्यादि भाष्यानें उत्तर-]=त्यांतील "जे श्रद्धालु सत्याची-ब्रह्माची उपासना करितात ( ते अर्चीला प्राप्त होतात, असा संबंध.)" असें व्याख्यान करावें. [-सत्यशब्दानें ब्रह्मकथनाविषयीं 'सत्यशब्दस्य०' इत्यादि भाष्यानें हेतु सांगतात-]=कारण 'सत्य' या शब्दाचा 'ब्रह्म' या अर्थी वारंवार प्रयोग केलेला आहे. ['सत्यं ज्ञानं अनन्तं ब्रह्म'-तै.२.१.-'तें सत्य, तो आत्मा'-छां. ६.८.७-'सत्याचें सत्य'-बृ.२.३.६.-इत्यादि वाक्यांत सत्यशब्दाचा ब्रह्मामध्यें प्रयोग केलेला आहे, असा भावार्थ.-याप्रमाणें सत्यार्थवचनाचें ग्रहण करण्यापेक्षां सत्य पदार्थाचें ग्रहण करण्यांत लाघव आहे, असें सांगितलें. आतां 'पंचाग्निविद्च-पंचाग्न्युपासकच सत्याची उपासना करितात, असें कां ग्रहण केलें जात नाहीं' अशी आशंका घेऊन 'त्यांचें पृथक् ग्रहण केलेलें असल्यामुळें तेच सत्योपासक आहेत, असें मानितां येत नाहीं' असें 'पंचाग्निविद्या०' इत्यादि भाष्यानें सांगतात-]=आणि पंचाग्निविद्यावेत्यांचें 'ये इत्थं विदुः०' या वाक्यानें

इत्थंवित्त्वानेंच ग्रहण केलेलें असल्यामुळें विद्यान्तरपरायण असलेल्यांचेंच हें ग्रहण न्याय्य आहे. [ जे दुसऱ्या विद्येमध्यें तत्पर असलेले इतर उपासक त्यांचेच 'सत्यं उपासते ' या वाक्यानें ग्रहण करणें युक्त आहे, असा भावार्थ.-याहि कारणानें विद्यान्तरोपासकांचीच देवयान गति आहे, अशा आशयानें ' **अथ ये०** ' इत्यादि वाक्यानें लिंगाचा समुच्चय करितात-]

**भाष्यं—' अथ य एतौ पंथानौ न विदुस्ते कीटाः पतंगा यदिदं दंदशूकम् ' इति च मार्गद्वयभ्रष्टानां कष्टामधोगतिं गमयन्ती श्रुतिर्देवयानपितृयाणयोरेव एनानंतर्भावयति । तत्रापि विद्याविशेषादेषां देवयानप्रतिपत्तिः ॥**

**भाष्यार्थ**—आणि "आतां जे या दोन मार्गांची उपासना करीत नाहींत-देवयान व पितृयाण या दोन मार्गांच्या साधनभूत उपासनेचें व केवल कर्माचें अनुष्ठान करीत नाहींत ते कीट, पतंग, दंश होतात. "-बृ. ६. २. १६-अशा या वचनानें दोन्ही मार्गांपासून भ्रष्ट झालेल्या जीवांची कष्टकर अधोगति सुचविणारी श्रुति देवयान व पितृयाण यांतच विद्यान्तरपरायणांचा अन्तर्भाव करिते. [-"तथापि त्यांचा देवयानसंबंध कसा ? " अशी आशंका घेऊन ' योग्यतेमुळें ' असें समाधान ' **तत्रापि०** ' इत्यादि भाष्यानें सांगतात-]=विद्याविशेषामुळें यांच्या त्या दोन मार्गांतीलहि देवयानमार्गाचीच प्रतिपत्ति होते, यांच्या देवयानमार्गाचेंच ज्ञान होतें. [-श्रुति व स्मृति यांनीं प्रकरणविरोधाच्या समाधानाची प्रतिज्ञा करून त्यांतील श्रुति सांगितली. आतां ' **स्मृतिरपि०** ' इत्यादि भाष्यानें स्मृति सांगतात-]

**भाष्यं—स्मृतिरपि— " शुक्लकृष्णे गती ह्येते जगतः शाश्वते मते । एकया यात्यनावृत्तिमन्ययाऽऽवर्तते पुनः" इति । यत्पुनर्देवयानस्य पथो द्विराम्नानं उपकोसलविद्यायां पंचाग्निविद्यायां च, तदुभयत्राप्यनुचिंतनार्थम् । तस्मादनियमः ॥**

**भाष्यार्थ**-"या जगाच्या-ज्ञान-कर्माधिकारी जनांच्या या दोन प्रकाश-अप्रकाशरूप गती-मार्ग नित्य मानलेले आहेत. त्यांतील एका गतीनें योगी क्रममुक्तीला प्राप्त होतो व दुसऱ्या गतीनें कर्मी पुनः संसारांत परत येतो. "-भ. गी.८.२६. -अशी स्मृतिहि आहे. [--आतां वाद्यानें सांगितलेल्या लिंगाचा अनुवाद करून ' **यत्पुनः०** ' इत्यादि भाष्यानें लिंगाची अन्यथासिद्धि सांगतात-]=पण उपकोसलविद्येंत व पंचाग्निविद्येंत देवयान मार्गाचें जें दोनदा आम्नान-कथन-पाठ आहे तें आम्नान दोन्ही विद्यांमध्येंहि अनुचिंतनासाठीं-ध्यानासाठीं आहे. [-याप्रमाणें लिंग व वाक्य यांच्या योगानें प्रकरणाचा भंग करून सगुणविद्यांमध्यें गतीच्या

सार्वत्रिकत्वाचा उपसंहार करितात-]='तस्मात्०'-म्हणून गतीचा अनियम आहे. [देवयानगति ज्या विद्येंत श्रुत आहे त्याच विद्येंत नियत नाहीं.] ३१.सु.ब्र.३४५(१८)

( १९. यावदधिकाराधिकरण. सू. ३२. )

—ज्यांचें फल मरणानें व्यवहित–अन्तरित आहे अशा सर्वेहि सगुणविद्यांमध्यें गति अर्थवती आहे, असें सांगितलें. आतां " निर्गुणविद्येमध्येंहि सद्योमुक्तिफलत्वाचें ज्ञान होत नसल्यामुळें तिलाहि कालान्तरभाविफलत्व समान आहे. त्यामुळें निर्गुणविद्येमध्येंहि गतीची अर्थवत्ता समान आहे, " अशी आशंका घेऊन सूत्रकार ' यावत्० ' इत्यादि म्हणतात—

**सूत्रं—यावदधिकारमवस्थितिराधिकारिकाणाम् ॥ ३२ ॥ ( १९ )**

**सूत्रार्थ—**' आधिकारिकांची '–परमेश्वरानें लोकव्यवस्थेला कारण होणाऱ्या अधिकारांत ज्यांना नियुक्त केलें आहे, अशा तत्त्वज्ञानानें कर्मशून्य झालेल्या अधिकाऱ्यांची ' यावदधिकार '–तो अधिकार–प्रारब्धकर्म क्षीण होईतों ' अवस्थिति '–अवस्थान होतें. ३२ ( १९ )–सु. ब्र. ३४६–[–' **विदुषः०** ' इत्यादि भाष्यानें या अधिकरणाचे विषय-संशय दाखवितात–]

**भाष्यं—विदुषो वर्तमानदेहपातानंतरं देहान्तरमुत्पद्यते न वेति चिंत्यते । ननु विद्यायाः साधनभूतायाः संपत्तौ कैवल्यनिर्वृतिः स्यान्न वेति नेयं चिंतोपपद्यते । न हि पाकसाधनसंपत्तौ ओदनो भवेन्न वेति चिंता संभवति । नापि भुंजानस्तृप्येन्न वेति चिंत्यते । उपपन्ना त्वियं चिंता ब्रह्मविदामपि केषांचिदितिहासपुराणयोः देहान्तरोत्पत्तिदर्शनात् ॥**

**भाष्यार्थ—**विद्वानाच्या वर्तमान देहाचा पात झाल्यावर दुसरा देह उत्पन्न होतो कीं नाहीं, याचा विचार केला जातो. [–पण कारणावांचून संशयाचा अयोग–असंभव मानणारा आक्षेपक ' **ननु०** ' इत्यादि भाष्यानें विचारावर आक्षेप घेतो–]=अहोपण, साधनभूत विद्येची संपत्ति–प्राप्ति झाली असतां कैवल्याची –केवलभावाची–मोक्षाची प्राप्ति होईल कीं नाहीं, ही चिंता–हा विचार उपपन्न होत नाहीं. [–आक्षेपक ' **न हि०** ' इत्यादि भाष्यानें हेंच दृष्टान्तानें स्पष्ट करितो–]=कारण पाकाच्या साधनाची संपत्ति झाली असतां–स्वयंपाकाचीं साधनें मिळालीं असतां आतां भात होईल कीं नाहीं, अशी चिंता संभवत नाहीं. [–" सामग्री असून प्रतिबंध नसल्यास कार्योत्पत्तीचा निश्चय जरी असला तरी विद्येनें सद्योमुक्ति कोणत्या कारणानें होते " अशी आशंका घेऊन ' **नापि०** ' इत्यादि भाष्यानें आक्षेपक म्हणतो–]=आणि भोजन करणारा तृप्त होईल कीं

नाहीं, याचाहि विचार केला जात नाहीं. [–याप्रमाणें संशयाच्या अभावामुळें प्राप्त झालेल्या अधिकरणाच्या अनारंभाचा परिहार ' **उपपन्ना तु०** ' इत्यादि भाष्यानें करितात–]=पण ही चिंता–हा विचार उपपन्न होतो. [–कांहीं विद्वानांचीहि मुक्ति होत नसल्यामुळें संशयाची सिद्धि होते, अशी उपपत्तिच ' **ब्रह्मविदामपि०** ' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=कारण इतिहास-पुराणांमध्यें कांहीं ब्रह्मवेत्त्यांचीहि देहान्तरोत्पत्ति उपलब्ध होते. [–ती उपलब्धिच विशद करितात–]

**भाष्यं––तथाह्यपांतरतमा नाम वेदाचार्यः पुराणर्षिः विष्णुनियोगात्कलिद्वापरयोः संधौ कृष्णद्वैपायनः संबभूवेति स्मरन्ति । वसिष्ठश्च ब्रह्मणो मानसः पुत्रः सन्निमिशापादपगतपूर्वदेहःपुनर्ब्रह्मादेशान्मित्रावरुणाभ्यां संबभूवेति।भृग्वादीनामपि ब्रह्मण एव मानसपुत्राणां वारुणे यज्ञे पुनरुत्पत्तिः श्रूयते। सनत्कुमारोऽपि ब्रह्मण एव मानसः पुत्रः स्वयं रुद्राय वरप्रदानात्स्कंदत्वेन प्रादुर्बभूव। एवमेव दक्षनारदप्रभृतीनां भूयसी देहान्तरोत्पत्तिः कथ्यते तेन तेन निमित्तेन स्मृतौ ॥**

**भाष्यार्थ––' तथाहि०'**–विद्वानांच्याहि देहान्तरोत्पत्तीचें दर्शन कसें होतें, तें पहा–' अपान्तरतमाः ' या नांवाचा वेदाचार्य पुराण ऋषि विष्णूच्या आज्ञेनें कलि व द्वापर यांच्या संधींत ' कृष्णद्वैपायन ' या नांवानें उत्पन्न झाला, असें स्मरतात –सांगतात आणि वसिष्ठ ब्रह्मदेवाचा मानसपुत्र असतांना निमीच्या शापानें ज्याचा पूर्वदेह निवृत्त झाला आहे असा होत्साता पुनः ब्रह्मदेवाच्या आज्ञेनें मित्रावरुणापासून उत्पन्न झाला, असें शिष्ट सांगतात. ब्रह्मदेवाचेच मानसपुत्र असलेले जे भृग्वादिक त्यांचीहि वरुणाच्या यज्ञांत पुनरुत्पत्ति श्रुत आहे. सनत्कुमारहि ब्रह्मदेवाचाच मानसपुत्र असून त्यानें स्वतःच रुद्राला वरदान दिल्यामुळें तो स्कंदत्वानें प्रादुर्भूत झाला. [या सर्वांच्या कर्मनिष्ठतेची आशंका घेऊन ' सनत्कुमारोऽपि '–सनत्कुमारहि, असें भाष्यांत म्हटलें आहे.–'**एवं०**' इत्यादि भाष्यानें याच न्यायाचा अन्यत्र अतिदेश करितात–]=याचप्रमाणें दक्ष, नारद, इत्यादिकांची पुष्कळ देहान्तरोत्पत्ति त्या त्या–निरनिराळ्या निमित्तानें स्मृतीमध्यें सांगितली जाते. [–" पण त्या स्मृतीला मूळ प्रमाणाचा आधार नसल्यामुळें अप्रामाण्य आहे " अशी आशंका घेऊन ' **श्रुतौ०** ' इत्यादि भाष्यानें म्हणतात–]

**भाष्यं––श्रुतावपि मंत्रार्थवादयोः प्रायेणोपलभ्यते। ते च केचित्पतिते पूर्वदेहे देहान्तरमाददते,केचित्तु स्थित एव तस्मिन्योगैश्वर्यवशादनेकदेहादानन्यायेन। सर्वे चैते समधिगतसकलवेदार्थाः स्मर्यन्ते । तदेतेषां देहान्तरोत्पत्तिदर्शनात्प्राप्तं ब्रह्मविद्यायाः पाक्षिकं मोक्षहेतुत्वं अहेतुत्वं वेति ॥**

**भाष्यार्थ**--श्रुतींतहि मंत्र व अर्थवाद यांमध्यें पूर्वोक्त कथा प्रायः उपलब्ध होते. [-" पण सनत्कुमारादिकांची पूर्वदेहाच्या अत्यागामुळें देहान्तरोत्पत्ति श्रुत नाहीं " अशी आशंका घेऊन '**ते च०**' इत्यादि म्हणतात-]=आणि त्या सनत्कुमारादिकांतील कांहीं तत्त्ववेत्ते पूर्वदेहाचा पात झाला असतां देहान्तराचें ग्रहण करितात. पण दुसरे कित्येक पूर्वदेह स्थित असतांनाच योगैश्वर्याच्या सामर्थ्यानें 'अनेक देहांचें ग्रहण करणें,' या न्यायानें अन्य देहाचा स्वीकार करितात. ['एकाच मायाव्याचें एकाच वेळीं अनेक देहग्रहण,' हा दृष्टान्तच 'अनेकदेहादानन्याय' आहे.-" तर मग ते ब्रह्मविद् नव्हेत!" '**सर्वे च०**' या भाष्यानें याचें उत्तर-]=आणि हे सर्व अधिगतसर्ववेदार्थ-ज्यांना सकल वेदार्थ ज्ञात आहे, असे स्मृत आहेत. [-याप्रमाणें अनुपलब्धि या निमित्तानें येणाऱ्या संशयाचा उपसंहार करणारे भाष्यकार विचाराच्या उपपत्तीचें निगमन करितात-]='**तत् एतेषां०**'-म्हणून या विद्वानांची देहान्तरोत्पत्ति उपलब्ध होत असल्यामुळें ब्रह्मविद्येचें पाक्षिक-वैकल्पिक मोक्षहेतुत्व प्राप्त झालें. [ब्रह्मविद्या मोक्षाचें नियत साधन नाहीं, तर कोणाची ब्रह्मविद्या क्वचित् मोक्षाचें साधन होते व कोणाची होत नाहीं, असा विकल्प प्राप्त होतो, असा भावार्थ.-निर्गुणविद्येंतील गतीचा प्रतिषेध करून सगुणविद्येंत गतिनिमित्तभूत ऐश्वर्यविशेषाची उपलब्धि होत असल्यामुळें सगुणविद्यांमध्यें सर्वत्र गति अर्थवती आहे, असें सांगितलें असतां निर्गुणविद्येमध्येंहि मोक्षाची असिद्धि होत असल्यामुळें-ऐश्वर्य हेच तिचें फल आहे, असें सांगणें उचित असल्यामुळें निर्गुणविद्येंतहि गतीचा उपसंहार करावा, असा पूर्वपक्ष सांगतात-]='**अहेतुत्वं वा०**'-निर्गुणविद्येला मोक्षाचें अहेतुत्वच आहे, असें प्राप्त झालें. [येथील 'वा' हा शब्द अवधारण-'एव' या अर्थी आहे. 'ब्रह्मविद्या संसारविरोधिनी नाहीं. कारण तिला ब्रह्मविद्यात्व आहे. वसिष्ठादिनिष्ठ ब्रह्मविद्येप्रमाणें.' 'त्याच्या सत्संपत्तीला देहपात होईपर्यंतच अवधि असतो'-छां.६.१४.२.-या श्रुतीशीं विरोध येतो, असेंहि म्हणतां येत नाहीं. कारण त्या श्रुतीची प्रशंसार्थत्वानें उपपत्ति लागते, असा भावार्थ. 'त्याला साक्षात् जाणून मृत्युमुखापासून प्रमुक्त होतो'-का.१.३.१५-इत्यादि श्रुतींचें 'ब्रह्मविद्येला मोक्षाचें साधनत्व आहे,' हें सांगण्यांत तात्पर्य आहे, असें सिद्ध होतें. त्यामुळें 'देहपात होईतोंच विद्वानाच्या सत्संपत्तीला अवधि असतो' या श्रुतीला केवल स्तुतिमात्रत्व संभवत नाहीं. ब्रह्मज्ञ वसिष्ठादिकांच्या मुक्तीचा अभाव अधिकारप्रतिबंधामुळें आहे. त्यामुळें तो त्यांचा मुक्त्यभाव अन्यथासिद्ध आहे. अप्रतिबद्ध विद्येला मोक्षाचें

अहेतुत्व नाहीं. तेव्हां गतीचा उपसंहार कोणत्या कारणानें होणार? असें सांगून या अधिकरणांत वाक्यार्थज्ञानहेतुत्वाचें निरूपण केलेलें असल्यामुळें याच्या पादादिसंगति आहेत. पूर्वपक्षांत 'ज्ञानाला मोक्षाचें हेतुत्व नसल्यामुळें गतीचा उपसंहार' व सिद्धान्तांत 'ज्ञानाला मोक्षाचे हेतुत्व नियत असल्यामुळें गतीचा अनुपसंहार' अशा अभिप्रायानें 'अत:०' इत्यादि भाष्यानें सिद्धान्त-]

**भाष्यं—अत उत्तरमुच्यते। न। तेषामपान्तरतम:प्रभृतीनां वेदप्रवर्तनादिषु लोकस्थितिहेतुष्वधिकारेषु नियुक्तानामधिकारतंत्रत्वात्स्थिते:। यथासौ भगवान्सविता सहस्रयुगपर्यंतं जगतोऽधिकारं चरित्वा तदवसाने उदयास्तमयवर्जितं कैवल्यमनुभवति 'अथ तत ऊर्ध्व उदेत्य नैवोदेता नास्तमेतैकल एव मध्ये स्थाता' इति श्रुते:॥**

**भाष्यार्थ**—म्हणून उत्तर सांगितलें जातें—'न'—ब्रह्मविद्या मोक्षाचें साधन-हेतु नाहीं, हें म्हणणें बरोबर नाहीं. [—"अहोपण, कांहीं ब्रह्मज्ञांमध्येंच मोक्षाची उपलब्धि होत नसतांना तिच्या अहेतुत्वाचा निषेध कसा केला जात आहे?" अशी आशंका घेऊन 'प्रतिबंधाच्या अभावाची अपेक्षा करून विद्या मोक्षहेतु आहे' असें मानून आचार्य '**तेषां०**' इत्यादि भाष्यानें म्हणतात—]='वेदाची प्रवृत्ति करणें' इत्यादि लोकस्थितीला कारण होणाऱ्या अधिकारांमध्यें नियुक्त केलेल्या त्या अपान्तरतम:प्रभृति विद्वानांची स्थिति अधिकाराच्या अधीन असल्यामुळें ब्रह्मविद्या मोक्षाचें साधन नाहीं, असें म्हणतां येत नाहीं. [—जोंवर अधिकार असतो तोंवर ब्रह्मविद्वानांचीहि अवस्थिति होते, याविषयीं '**यथा०**' इत्यादि भाष्यानें दृष्टान्त—]=जसा हा भगवान् आदित्य सहस्रयुगांपर्यंत जगाचा अधिकार चालवून त्याची समाप्ति झाली असतां उदयास्तमयरहित कैवल्याचा अनुभव घेतो.[—'**अथ०**' इत्यादि वाक्यानें त्याविषयीं प्रमाण—]=कारण '**अथ०**'—"अधिकारसंबंधी ऐश्वर्याला कारण होणाऱ्या कर्मांचा क्षय झाल्यानंतर '**तत:०**'—त्याच्या मागून—पश्चात् '**ऊर्ध्व:**'—विलक्षण होऊन '**उदेत्य**'—वर जाऊन पुनरपि '**नैव उदेता**'—आदित्य उदय पावत नाहींच. '**न अस्तं एता**'—व अस्त पावत नाहीं. तर '**एकल: एव मध्ये स्थाता**'—एकटाच—अद्वितीय स्वात्म्यामध्यें राहणारा असा होईल"—छां. ३.११.१. —अशी श्रुति आहे. [—'**यथा च०**' इत्यादि भाष्यानें त्याविषयींच दुसरें उदाहरण—]

**भाष्यं—यथा च वर्तमाना ब्रह्मविद: आरब्धभोगक्षये कैवल्यमनुभवन्ति। 'तस्य तावदेव चिरं यावन्न विमोक्ष्येऽथ संपत्स्ये' इति श्रुते:। एवमपान्तरतम:प्रभृतयोऽपीश्वरा: परमेश्वरेण तेषु तेष्वधिकारेषु नियुक्ता: सन्त: सत्यपि**

**सम्यग्दर्शने कैवल्यहेतौ अक्षीणकर्माणो यावदधिकारमवतिष्ठन्ते। तदवसाने चापवृज्यन्ते इत्यविरुद्धम् ॥**

**भाष्यार्थ**—आणि ज्याप्रमाणें वर्तमानकालीन ब्रह्मवेत्ते प्रारब्धभोगाचा क्षय झाला असतां कैवल्याचा अनुभव घेतात, [–‘ **तस्य०** ’ इत्यादि वाक्यानें त्याविषयींहि प्रमाण–]=कारण “ त्या विद्वानाच्या सत्संपत्तीला जोंवर त्याच्या देहाचा पात होत नाहीं तोंवरच अवधि असतो. देहपात होतांच तो सत्संपन्न होतो.” –पृ. ३७२–अशी त्याविषयीं प्रमाणभूत श्रुति आहे. [–वरील दोन दृष्टान्तांतील अर्थाची दार्ष्टान्तिकांत योजना–]=‘ **एवं०** ’–या दृष्टान्तांप्रमाणेंच अपान्तरतमः-प्रभृति ईश्वरहि परमेश्वराकडून त्या त्या अधिकारांत नियुक्त केलेले असे होत्साते कैवल्याचा हेतु असें सम्यग्दर्शन–आत्मसाक्षात्कार झालेला असतांनाहि ज्यांचें कर्म क्षीण झालेलें नाहीं, असे ‘ यावदधिकार ’–अधिकार समाप्त होईपर्यंत अवस्थित होतात व त्या अधिकाराची समाप्ति झाली असतां मुक्त होतात, असें हें अविरुद्ध आहे. [ त्यांत कांहीं विरोध नाहीं, असा भावार्थ.–“ पण ब्रह्मवेत्त्याचीहि देहान्तरप्राप्ति प्रारब्धकर्माहून भिन्न म्ह० संचित-क्रियमाण कर्मामुळें होणारी आहे. कारण तिला देहान्तरप्राप्तित्व आहे. अविद्वानाच्या देहान्तरप्राप्तीप्रमाणें ” असें कोणी म्हणेल म्हणून ‘**सकृत्प्रवृत्तमेव०**’ इत्यादि भाष्यानें आचार्य म्हणतात–]

**भाष्यं—सकृत्प्रवृत्तमेव हि ते फलदानाय कर्माशयमतिवाहयन्तः स्वातंत्र्येणैव गृहादिव गृहान्तरमन्यमन्यं देहं संचरन्तः स्वाधिकारनिर्वर्तनाय अपरिमुषितस्मृतय एव देहेन्द्रियप्रकृतिवशित्वान्निर्माय देहान्युगपत्क्रमेण वा अधितिष्ठन्ति। न चैते जातिस्मरा इत्युच्यन्ते “त एवैते” इति स्मृतिप्रसिद्धेः ॥**

**भाष्यार्थ**—कारण फलदानासाठीं आपलें फल देण्यासाठीं एकवार प्रवृत्त झालेल्याच कर्माशयास भोगणारे–भोगानें त्याला घालविणारे–त्याचें अतिक्रमण करणारे ते आधिकारिक विद्वान् [ देहान्तर कर्मान्तराच्या अधीन असतें, अशी व्याप्ति नाहीं. कारण एकाहि ब्राह्मणवधादि कर्माचें श्व-सूकरादि अनेक देहप्राप्ति हें फल स्मृत आहे, असा भावार्थ.–“तर मग आमच्यासारख्यांहून त्यांच्यामध्यें वैषम्य–फरक –अधिकता काय आहे ? ” ‘**स्वातंत्र्येण०**’ इत्यादि भाष्यानें सांगतात–]=स्वातंत्र्यानेंच, एका गृहांतून दुसऱ्या गृहांत जसें जावें त्याप्रमाणें, अन्य अन्य देहांत संचार करणारे, असे होत्साते [–“ पण ते जर स्वतंत्र आहेत तर देहान्तर कां घेतात ? ” अशी आशंका घेऊन ‘ ज्याचें अधिकार हें फल आरब्ध आहे अशा फलोन्मुख कर्माचा क्षय करण्यासाठीं ’ असें समाधान ‘ **स्वाधिकार०** ’ इत्यादि

भाष्यानें सांगतात–]=आपल्या अधिकाराच्या निर्वर्तनार्थ– आपला अधिकार संपविण्यासाठीं–तो चालविण्यासाठीं [–" पण देहान्तरीं त्यांच्या स्मृतीचा भ्रंश होईल, " अशी आशंका घेऊन आचार्य म्हणतात–]=' **अपरिमुषितस्मृतयः०** ' –ज्यांच्या स्मरणाचा–मी अमुक व अमुक ज्ञानानें संपन्न आहे, या स्मृतीचा भ्रंश झालेला नाहीं, असेच होत्साते [–तथापि त्यांच्या देहादिपारतंत्र्याची आशंका घेऊन म्हणतात–]=देह, इन्द्रियें इत्यादि प्रकृतीला स्ववश–स्वाधीन ठेवणारे, असे असल्यामुळें [–" तथापि त्यांना अनेक देहांमध्यें अधिष्ठातृत्व कसें ? " उत्तर–] =' **निर्माय०** '–एकाच वेळीं किंवा क्रमानें अनेक देहांना निर्माण करून त्यांत अधिष्ठित होतात. [–" अहोपण, उत्पन्न होणाऱ्याहि त्यांच्या स्मृतीचा भ्रंश जरी होत नसला तरी त्यांना जातिस्मरत्वच आहे, पूर्वजन्माचें स्मरण असणें, या सिद्धीनें ते युक्त असतात. त्यांना वसिष्ठादिनामत्व नसतें" अशी आशंका घेऊन '**न च०**' इत्यादि म्हणतात–]=आणि ते जातिस्मर–पूर्वजन्माला स्मरणारे, म्हणून सांगितले जात नाहींत, कारण ' तेच हे ' अशी त्यांची स्मृतींत प्रसिद्धि आहे. [–ब्रह्मवेत्त्यांच्या स्वातंत्र्यानें देहान्तरसंचाराविषयीं '**यथा०**'इत्यादि भाष्यानें दृष्टान्त–]

**भाष्यं--यथा हि सुलभा नाम ब्रह्मवादिनी जनकेन विवदितुकामा व्युदस्य स्वं देहं जानकं देहमाविश्य । व्युद्य तेन । पश्चात्स्वमेव देहमाविवेशेति स्मर्यते । यदि ह्युपयुक्ते सकृत्प्रवृत्ते कर्मणि कर्मान्तरं देहान्तरारंभकारणमाविर्भवेत्ततोऽन्यदप्यदग्धबीजं कर्मान्तरं तद्वदेव प्रसज्येतेति ब्रह्मविद्यायाः पाक्षिकं मोक्षहेतुत्वमहेतुत्वं वा शंक्येत । न त्वियमाशंका युक्ता । ज्ञानात्कर्मबीजदाहस्य श्रुतिस्मृतिप्रसिद्धत्वात् ॥**

**भाष्यार्थ**—कारण ज्याप्रमाणें जनकाशीं विवाद करण्याची इच्छा करणारी सुलभा या नांवाची एक ब्रह्मवादिनी स्वदेहाचा परित्याग करून, जनकाच्या देहांत आवेश करून त्याच्याशीं विवाद करून त्यानंतर आपल्याच देहांत प्रविष्ट झाली, असें स्मृत–स्मृतींत सांगितलें आहे, त्याप्रमाणें हें जाणावें. [–" पण एवढ्यावरून ज्ञानाचें नियतफलत्व कसें ? " अशी आशंका घेऊन '**यदि०**' इत्यादि भाष्यानें व्यतिरेकानें याचें उपपादन करितात–]=कारण जर एकदा प्रवृत्त झालेल्या कर्माचा उपयोग केला असतां–फलाचा उपभोग घेऊन त्याचा क्षय केला असतां वर्तमानदेहातिरिक्त दुसऱ्या भावि-देहारंभाला कारण होणारें दुसरें कर्म आविर्भूत–फलदानासाठीं व्यक्त होईल–फलोन्मुख होईल तर 'अदग्धबीज कर्मान्तर'–ज्याच्या बीजाचा दाह झालेला नाहीं, असे दुसरेंहि कर्मान्तर–प्रारब्धकर्माहून भिन्न असें कर्म तसेंच

प्राप्त होईल, आणि दुसऱ्याहि अदग्धबीज कर्मान्तराच्या फलोन्मुखतेची प्राप्ति झाल्यामुळें ब्रह्मविद्येच पाक्षिक–अनियत–वैकल्पिक मोक्षहेतुत्व किंवा अहेतुत्व–असाधनत्व, यांची शंका येईल.–'न तु०'–पण ही अशी शंका येणे युक्त नाहीं. कारण ज्ञानामुळे कर्मबीजाचा दाह श्रुति व स्मृति या प्रमाणांनीं प्रसिद्ध आहे. [–याप्रमाणें ज्ञानाचें नियतफलत्व व्यतिरेकानें श्रुति-स्मृतींनीं सांगून आतां 'तथाहि०' इत्यादि भाष्यानें क्रमानें त्या श्रुति-स्मृतिच दाखवितात–]

**भाष्यं—तथाहि श्रुतिः–'भिद्यते हृदयग्रन्थिश्छिद्यन्ते सर्वसंशयाः। क्षीयन्ते चास्य कर्माणि तस्मिन्दृष्टे परावरे' इति। 'स्मृतिलंभे सर्वग्रन्थीनां विप्रमोक्षः' इति चैवमाद्या। स्मृतिरपि–"यथैधांसि समिद्धोऽग्निर्भस्मसात्कुरुतेऽर्जुन। ज्ञानाग्निः सर्वकर्माणि भस्मसात्कुरुते तथा" "बीजान्यग्न्युपदग्धानि न रोहन्ति यथा पुनः। ज्ञानदग्धैस्तथा क्लेशैर्नात्मा संपद्यते पुनः" इति चैवमाद्या॥**

**भाष्यार्थ**—ज्ञानानें कर्मबीजाचा दाह श्रुति-स्मृतींनीं प्रसिद्ध कसा आहे तो पहा–"त्या परावर–कारण-कार्यरूप पर ब्रह्माला साक्षात् जाणलें असतां हृदय-ग्रंथि भेद पावते. सर्व संशय तुटतात व याचीं सर्व कर्मे क्षीण होतात."–मुं. २. २. ८–अशी व "स्मृतीचा लाभ झाला असतां सर्वहृदयग्रन्थींचा सर्वप्रकारें नाश होतो."–छां. ७. २६. २–इत्यादि श्रुति आहे. "हे अर्जुना, जसा चांगला पेटलेला अग्नि काष्ठांना भस्मसात् करितो तसा ज्ञानाग्नि सर्वकर्मांना भस्मसात् करितो."–गी. ४.३७–अशी स्मृतिहि आहे. "जशीं अग्नीनें भाजलेलीं–उप-दग्ध झालेलीं बीज पुनः उगवत नाहींत, त्यांना अंकुर फुटत नाहीं, त्याप्रमाणें ज्ञानानें दग्ध झालेल्या अविद्यादि क्लेशांनीं पुनः शरीर संपादन–उत्पन्न होत नाहीं." इत्यादि आणखीहि स्मृति आहे. [–"अहोपण, अनादि जन्मपरंपरेनें संचित केलेल्या व ज्यांच्या फलाचा काल नियत नाहीं, अशा कर्मांची गणनाच करितां येत नसल्यामुळें म्ह० असल्या कर्माला असंख्यत्व असल्यामुळें निःशेष-कर्मक्षय कसा होऊं शकेल?" अशी आशंका घेऊन आचार्य 'न च०' इत्यादि भाष्यानें म्हणतात—]

**भाष्यं–न चाविद्यादिक्लेशदाहे सति क्लेशबीजस्यकर्माशयस्यैकदेशदाहः एकदेश-प्ररोहश्चेत्युपपद्यते। न ह्यग्निदग्धस्य शालिबीजस्यैकदेशप्ररोहो दृश्यते।प्रवृत्तफलस्य तु कर्माशयस्य मुक्तेषोरिव वेगक्षयान्निवृत्तिः। 'तस्य तावदेव चिरम्' इति शरीरपा-तावधिक्षेपकरणात्। तस्मादुपपन्ना यावदधिकारं आधिकारिकाणामवस्थितिः। न च ज्ञानफलस्यानैकान्तिकता॥**

**भाष्यार्थ**—आणि अविद्यादि क्लेशांचा दाह झाला असतां क्लेशबीजभूत कर्माशयाचा एकदेश दग्ध होतो, म्ह० त्याच्या कांहीं भागाचा दाह होतो व एकदेश फलरूपानें उगवतो–उदय पावतो, असें हें उपपन्न होत नाहीं. [–नाशाच्या समग्र कारणाचा संबंध झाला असतां–त्याचें सांनिध्य असतांना नाश्य–नाश पावण्यास योग्य असलेल्या वस्तूच्या एकदेशीं कार्याचा अभाव होतो, याविषयीं '**न हि०**' इत्यादि भाष्यानें दृष्टान्त–]=कारण अग्नीनें दग्ध झालेल्या–शालिबीजाचा एकदेशप्ररोह व्यवहारांत उपलब्ध होत नाहीं. [–" तर मग नाशहेतूच्या सांनिध्यामुळें प्रारब्धकर्महि नाश पावेल, मग वसिष्ठादिकांचें देहधारण कोठून होणार ? " अशी आशंका घेऊन '**प्रवृत्तफलस्य०**' इत्यादि भाष्यानें म्हणतात–]=पण ज्याचें फल प्रवृत्त झालें आहे अशा कर्माशयाची, धनुष्यापासून सोडलेल्या बाणांप्रमाणें, वेगाचा क्षय झाल्यामुळें निवृत्ति होते. कारण त्याच्या सत्संपत्तीला "शरीरपात होईपर्यंतच अवधि असतो "–पृ. ३७२–या श्रुतिवचनानें शरीरपातापर्यंत कालावधि सांगितलेला आहे. [ ज्याप्रमाणें धनुष्यापासून सोडलेल्या बाणाचा अतिशय बलवान् प्रतिबंध नसल्यास मध्येंच क्षय होत नाहीं, त्याप्रमाणें फलोन्मुख झालेल्या कर्माचा मध्यें क्षय होत नाहीं. ज्ञान जरी झालें तरी मोक्षाला देहपातापर्यंत कालावधि नियत केलेला असल्यामुळें त्या ज्ञानामध्यें प्रारब्धकर्माच्या उपादानभूत अज्ञानाचें निवर्तन करण्याचें सामर्थ्य नसतें. यास्तव श्रुति-स्मृतिप्रामाण्यामुळें अनारब्ध–संचित-क्रियमाण कर्मच ज्ञानानें नाश पावतें, आरब्ध कर्म नाश पावत नाहीं, असा भावार्थ.–ज्याचें फल प्रवृत्त झालेलें नाहीं, अशा कर्माची निवृत्ति जरी झाली तरी प्रवृत्तफल–फलोन्मुख झालेल्या कर्माची भोगावांचून निवृत्ति होत नाहीं, असें सिद्ध झालें असल्यामुळ ज्ञानी पुरुषाचेंहि देहान्तर व ज्ञानाचें नियतफलत्व हीं दोन्ही अविरुद्ध आहेत, असें जें सांगितलें आहे त्याचा '**तस्मात्०**' इत्यादि भाष्यानें उपसंहार–]=म्हणून आधिकारिकांची–परमेश्वरानें लोकाधिकारावर नियुक्त केलेल्या वसिष्ठादि ज्ञानी पुरुषांची तो अधिकार असेपर्यंत अवस्थिति–अवस्थान उपपन्न होतें, आणि ज्ञानाच्या फलाला अनैकान्तिकत्व–अनियतत्व-व्यभिचारित्वहि नाहीं. [–" तर मग, कर्म व ज्ञान यांमध्यें अधिकृत असलेल्या मनुष्यांनाच मोक्ष मिळतो. मनुष्येतर–ऋषि, देव इत्यादिकांना ज्ञान-कर्माधिकाराच्या अभावीं मोक्ष मिळत नाहीं" अशी आशंका घेऊन '**तथा च०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]

**भाष्यं—तथा च श्रुतिरविशेषेणैव सर्वेषां ज्ञानान्मोक्षं दर्शयति 'तद्यो यो देवानां प्रत्यबुध्यत स एव तदभवत्तथर्षीणां तथा मनुष्याणाम्' इति । ज्ञाना-**

**न्तरेषु च ऐश्वर्यादिफलेष्वासक्ताः स्युर्महर्षयः। ते पश्चादैश्वर्यक्षयदर्शनेन निर्विण्णाः परमात्मज्ञाने परिनिष्ठाः कैवल्यं प्रापुरित्युपपद्यते । "ब्रह्मणा सह ते सर्वे संप्राप्ते प्रतिसंचरे। परस्यान्ते कृतात्मानः प्रविशन्ति परं पदम्" इति स्मरणात्॥**

**भाष्यार्थ**—आणि तसेंच "त्या देवांतील जो जो ज्ञानवान् झाला तो तो आत्मा तें ब्रह्म झाला. त्याचप्रमाणें ऋषींतील व मनुष्यांतील जो जो कोणी ज्ञानी झाला तो तो तें ब्रह्म झाला"–बृ. १.४.१०–ही श्रुति अविशेषानें–सर्वांचा एकसारखाच ज्ञानानें मोक्ष दाखविते. [–"शिवाय अधिकारिकांतील कांहीं थोड्यांमध्येंच अमुक्तीमुळें ज्ञानाचें व्यभिचारिफलत्व आहे कीं सर्वच अधिकारिकांमध्यें ज्ञानाला अनियतफलत्व आहे?" असा विकल्प करून त्यांतील पहिल्या पक्षीं पूर्वोक्त समाधान सिद्धच असल्याप्रमाणें मानून दुसऱ्या कल्पाचें निरसन '**ज्ञानान्तरेषु**॰' इत्यादि भाष्यानें करितात–]=आणि ऐश्वर्यादिक हें ज्यांचें फल आहे अशा ज्ञानान्तरांमध्यें महर्षि आसक्त होतील. [त्यांना ज्ञानाच्या अभावामुळेंच मुक्ति मिळणार नाहीं, असा भावार्थ. 'ऐश्वर्यादि' येथील 'आदि-'शब्दाचा ऐश्वर्याचे प्रकार–विशेष हा अर्थ आहे.–"तर मग ऐश्वर्यामध्यें आसक्त झालेल्या त्यांना कधींच मुक्ति मिळणार नाहीं" अशी आशंका घेऊन '**ते पश्चात्**॰' इत्यादि भाष्यानें आचार्य म्हणतात–]=पण तेच मागून ऐश्वर्याचा क्षय झालेला पाहून–ऐश्वर्यक्षयदर्शनानें निर्विण्ण–विरक्त होऊन परामात्मज्ञानामध्यें परिनिष्ट होत्साते कैवल्यास प्राप्त झाले, असें उपपन्न होतें. [–त्यांच्या क्रममुक्तीविषयीं '**ब्रह्मणा**॰' इत्यादि प्रमाण–]=कारण "महाप्रलय उपस्थित झाला असतां ते कृतात्मे–संस्कृतचित्त–ज्ञानी होत्साते कल्पाच्या शेवटीं हिरण्यगर्भासह ब्रह्मलोकाच्या अधिपतीबरोबर परपदांत प्रवेश करितात." असें स्मरण–स्मृतिवचन आहे.[–ज्ञानाच्या नियतफलत्वाविषयीं '**प्रत्यक्ष**॰' इत्यादि भाष्यानें हेत्वन्तर सांगतात–]

**भाष्यं**—**प्रत्यक्षफलत्वाच्च ज्ञानस्य फलविरहाशंकानुपपत्तिः । कर्मफले हि स्वर्गादौ अनुभवानारूढे स्यादाशंका भवेद्वा न वेति। अनुभवारूढं तु ज्ञानफलम्। 'यत्साक्षादपरोक्षाद्ब्रह्म' इति श्रुतेः । 'तत्त्वमसि' इति च सिद्धवदुपदेशात्॥**

**भाष्यार्थ**—आणि ज्ञानाला प्रत्यक्षफलत्व असल्यामुळे–त्याचें फल भोजनाच्या फलाप्रमाणें प्रत्यक्ष–अन्वय-व्यतिरेकसिद्ध असल्यामुळें त्याच्या फलाच्या अभावाची शंका उपपन्न होत नाहीं. [–हाच उक्त अर्थ व्यतिरेकानें विशद करितात–]='**कर्मफले**॰'–कारण अनुभवावर आरूढ न झालेल्या–येथेंच अनुभवाचा विषय न होणाऱ्या स्वर्गादि कर्मफलाविषयीं 'तें मिळेल कीं नाहीं,' अशी शंका

येऊं शकेल. [–" ज्ञानफलामध्येंहि 'अनुभवानारूढत्व'–अनुभवावर आरूढ न होणें, हें तुल्य आहे" अशी आशंका घेऊन आचार्य म्हणतात–]=**'अनुभवारूढं०'** –पण ज्ञानाचें फल अनुभवारूढ–अनुभवाचा विषय झालेलें आहे,[–'तें कसें?' अशी आकांक्षा झाली असतां 'प्रत्यक्षवस्तुविषयत्वामुळें' असें उत्तर श्रुतिवचनानें देतात–] =**' यत्साक्षात्० '**–कारण " जें साक्षात् अपरोक्ष ब्रह्म "–बृ. ३.४.१–अशी श्रुति आहे. [–सिद्धवस्तु हा त्या ज्ञानाचा विषय असल्यामुळेंहि ज्ञानाला प्रत्यक्षफलत्व आहे, असें **'तत्त्वमसि०'** इत्यादि भाष्यानें सांगतात–]='तू तें ब्रह्म–सत् आहेस' –छां.६.८.७–असा सिद्धवत्–तें सिद्ध असल्याप्रमाणेंच त्याचा उपदेश केलेला आहे. त्यामुळेंहि ज्ञानाला प्रत्यक्षफलत्व आहे. [–" अहोपण, ब्रह्मभाव उपासनेनें साध्य होणारा असल्यामुळें ज्ञानाचें सिद्धवस्तुविषयत्व असिद्ध आहे, " अशी आशंका घेऊन **' न हि० '** इत्यादि भाष्यानें म्हणतात–]

**भाष्यं—न हि ' तत्त्वमसि ' इत्यस्य वाक्यस्यार्थः तत्त्वं मृतो भविष्यसीत्येवं परिणेतुं शक्यः । 'तद्धैतत्पश्यन्नृषिर्वामदेवः प्रतिपेदेऽहं मनुरभवं सूर्यश्च' इति च सम्यग्दर्शनकालमेव तत्फलं सर्वात्मत्वं दर्शयति । तस्मादैकान्तिकी विदुषः कैवल्यसिद्धिः ॥ ३२ ॥ (१९)**

**भाष्यार्थ**—कारण ' तत्त्वमसि ' अशा या वाक्याचा अर्थ ' तें सत् ब्रह्म तूं मृत होऊन–मेल्यावर होशील. ' असा परिणत करितां येणें शक्य नाहीं. [ कारण ' असि '–आहेस, या वर्तमानप्रयोगाचा भविष्यत् अर्थ करणें व ' मृत-'शब्दाचा अध्याहार करणें अयुक्त आहे, असा याचा भावार्थ.–याहि कारणानें ज्ञानाला नियतफलत्व आहे, असें **' तद्धैतत्० '** इत्यादि वचनानें सांगतात–]="तेंच हें ब्रह्म पाहणारा ऋषि वामदेव ' मी मनु झालों व सूर्य झालों ' असें समजला." –बृ.१.४.१०–असें हें वचन सम्यग्दर्शन जेव्हां होतें त्याचक्षणीं त्याचें सर्वात्मत्व हें फल दाखवितें. [ साक्षात् क्रियाहेतूमध्यें ' शतृ '–अत्, या प्रत्ययाचें विधान केलेलें असल्यामुळें व येथें–या श्रुतींत ' पश्यन् ' हा शतृ-प्रत्यय असल्यामुळें सम्यग्ज्ञानाला सर्वात्मत्वाचें पुष्कलकारणत्व आहे असें सिद्ध होतें, असा याचा भावार्थ.–आतां **'तस्मात्०'** इत्यादि भाष्यानें श्रुति-स्मृति-न्यायसिद्ध अर्थाचा उपसंहार करितात–]=म्हणून विद्वानाची कैवल्यसिद्धि ऐकान्तिकी–नित्य आहे. ३२ (१९).

**(२०. अक्षरध्यधिकरण. सू. ३३.)**

—प्रारब्धकर्मामुळें आधिकारिकांच्या देहान्तरारंभाची सिद्धि होते. ती कर्मान्तरनिमित्तानें होत नाहीं,–त्यांच्या देहान्तराचा आरंभ कर्मान्तर या निमित्तानें

होत नाहीं, असें पूर्वाधिकरणांत सांगितलें. त्याचप्रमाणें आतां येथेंहि " त्या त्या प्रकरणांत पठित असलेल्या निषेधांनींच उपलक्षणत्वानें सर्वद्वैतनिषेधाची सिद्धि होत असल्यामुळें तेथें शाखान्तरीय निषेधांना ब्रह्मज्ञानहेतुत्व नाहीं, " अशी आशंका घेऊन 'अक्षरधियां तु०' इत्यादि सूत्रानें समाधान करितात—

**सूत्रं—अक्षरधियां त्ववरोधः सामान्यतद्भावाभ्यामौपसदवत्तदुक्तम्॥**

**सूत्रार्थ**—'तु'—पण अक्षर ब्रह्माविषयींच्या ज्या द्वैतनिषेधबुद्धि त्या अक्षरधींचा 'अवरोध'—सर्व निषेध-श्रुतींत उपसंहार करावा. 'सामान्य व तद्भाव या दोन कारणांनीं'—द्वैतनिरसनपूर्वक ब्रह्मप्रतिपादन सर्वत्र समान आहे व ब्रह्मभावाचें सर्वत्र प्रत्यभिज्ञान होतें, त्यामुळें. 'औपसदांप्रमाणें'—अध्वर्युकर्तृक पुरोडाशशेष मंत्राप्रमाणें.जैमिनीनें 'गौण व मुख्य विधींचा विरोध आला असतां मुख्याशीं वेदसंयोग करावा. कारण गौणविधि मुख्य विधीसाठीं असतो' असें सांगितलें आहे. ३४.

( २० ) सु. ब्र.३४८–[–या अधिकरणाचा विषय सांगण्यासाठीं 'वाजसनेयके०' इत्यादि भाष्यानें वाक्याचें उदाहरण देतात–]

**भाष्यं**—वाजसनेयके श्रूयते—'एतद्वै तदक्षरं गार्गि ब्राह्मणा अभिवदन्त्यस्थूलमनण्वह्रस्वमदीर्घमलोहितमस्नेहम्' इत्यादि । तथा आथर्वणे श्रूयते—'अथ परा यया तदक्षरमधिगम्यते यत्तदद्रेश्यमग्राह्यमगोत्रमवर्णम्' इत्यादि । तथैवान्यत्रापि विशेषनिराकरणद्वारेणाक्षरं परं ब्रह्म श्राव्यते ॥

**भाष्यार्थ**—वाजसनेयकांत "हे गार्गि, तूं जें विचारलेंस तें हेंच आहे. ब्राह्मण त्याला अक्षर असें म्हणतात. तें अक्षर अस्थूल, अनणु, अह्रस्व, अदीर्घ, अलोहित, अस्नेह०"–बृ.३.८.८–इत्यादि श्रुत आहे. त्याचप्रमाणें आथर्वणांत "आणि जिच्या योगानें तें अक्षर ब्रह्म ज्ञात होतें ती परा विद्या. तें अक्षर अदृश्य, अग्राह्य, अगोत्र, अवर्ण,"–मुं. १. १. ५-६–इत्यादि श्रुत आहे. त्याचप्रमाणें अन्यत्र म्ह० तैत्तिरीयांतील 'अदृश्य, अनात्म्य' इत्यादि वचनांतहि विशेष निराकरणद्वारा अक्षर परब्रह्म श्रुत करविलें जातें. [–निषेधमुखानें ब्रह्मवादी भिन्न भिन्न वाक्यांतील अपुनरुक्त शब्दांना विषयत्वानें परिशिष्ट करितात –'तत्र०' इत्यादि भाष्यानें त्यांना त्यांपासून पृथक् करितात–]

**भाष्यं**—तत्र च कचित्केचिदतिरिक्ता विशेषाः प्रतिषिध्यन्ते। तासां विशेषप्रतिषेधबुद्धीनां किं सर्वासां सर्वत्र प्राप्तिः उत व्यवस्थेति संशये श्रुतिविभागाद्व्यवस्थाप्राप्तौ उच्यते—

**भाष्यार्थ**—आणि त्यांत कांहीं ठिकाणीं कित्येक अतिरिक्त—अधिक विशेष प्रतिषिद्ध केले जातात. [—त्या विशेषांना विषय करून—त्यांविषयीं न्यायाचा संभव व उपकाराचा असंभव, या दोन कारणांनीं संशय सांगतात—]=**'तासां०'**—"काय, त्या सर्व विशेषप्रतिषेधबुद्धींची सर्वत्र प्राप्ति होते कीं त्यांची त्या त्या विद्येत व्यवस्था आहे, त्या बुद्धि उक्त विद्येतच ग्राह्य आहेत ?" असा संशय आला असतां [येथील 'बुद्धि-'शब्दाचें ग्रहण तत्पूर्वक शब्दोपलक्षणार्थ आहे.—"अहोपण, विद्यैक्य-जरी असलें तरी शरीराच्या अनुपसंहाराप्रमाणें निषेधशब्दांचा अनुपसंहार आहे" असा पूर्वपक्ष—]=' **श्रुतिविभागात्०** '—श्रुतींच्या विभागामुळें—भेदामुळें निषेधशब्दांची त्या त्या श्रुतींत व्यवस्था आहे, असा पूर्वपक्ष प्राप्त झाला असतां [ त्या त्या श्रुतींत श्रुत असलेल्याच निषेधशब्दांना उपलक्षणत्वानें सर्व द्वैतनिषेधाच्या द्वारा निर्विशेष ब्रह्मकथनाचें सामर्थ्य असल्यामुळें त्या शब्दांची व्यवस्था आहे, असा भावार्थ. येथें अपुनरुक्त निषेधशब्दांच्या उपसंहारोक्तिद्वारा वाक्यार्थ-ज्ञानहेतुत्व सांगितलेलें असल्यामुळें याच्या पादादिसंगति आहेत. पूर्वपक्षांत 'श्रुत असलेल्याच निषेधांनीं उपलक्षणत्वानें सर्व निषेध झाला असतां निर्विशेष ब्रह्मप्रमितीला लाघव आहे ' व सिद्धान्तांत 'लक्षणैकदेश व परिशेष यांचा परिहार करून निर्विशेष ब्रह्मज्ञानाला निराकांक्षत्व आहे ' असें मानून सिद्धान्ताची प्रतिज्ञा—] =**'उच्यते'**—असा पूर्वपक्ष प्राप्त झाला असतां सिद्धान्त सांगितला जातो—[—'अक्षर या धर्मीमध्यें ज्या द्वैतनिषेधधी—बुद्धि त्या अक्षरधी' अशा अर्थाच्या ' **अक्षरधियां** ' या सूत्रपदाचें ' **अक्षरविषयास्तु०** ' इत्यादि भाष्यानें व्याख्यान—]

**भाष्यं—अक्षरविषयास्तु विशेषप्रतिषेधबुद्धयः सर्वाः सर्वत्रावरोद्धव्याः सामान्यतद्भावाभ्याम्—समानो हि सर्वत्र विशेषनिराकरणरूपो ब्रह्मप्रतिपादनप्रकारः। तदेव च सर्वत्र प्रतिपाद्यं ब्रह्म अभिन्नं प्रत्यभिज्ञायते । तत्र किमित्यन्यत्र कृता बुद्धयोऽन्यत्र न स्युः ॥**

**भाष्यार्थ**—पण अक्षरविषय ज्या विशेषप्रतिषेधबुद्धि त्या सर्वांचा सर्वत्र उपसंहार करावा, त्या सर्व सर्वत्र उपसंहर्तव्य आहेत. [—त्याविषयीं सूत्रोक्त हेतूला अवतरण देऊन त्याचें विवरण करितात—]=' **सामान्यतद्भावाभ्याम्** '—सामान्य व तद्भाव यांमुळें. कारण विशेषनिराकरणरूप—विशेषांचें निराकरण करणें, एतद्रूप जो ब्रह्मप्रतिपादनाचा प्रकार तो सर्वत्र समान आहे. ' **तदेव च०** '—आणि सर्वत्र तेंच एक प्रतिपाद्य ब्रह्म प्रत्यभिज्ञात होतें. [आरोपित विशेषांच्या निरासानें ब्रह्मकथन सर्वत्र तुल्य असल्यामुळें व प्रतिपाद्य ब्रह्माचें सर्वत्र एकत्वानें प्रत्यभि-

ज्ञान होत असल्यामुळें तत्संबंधी शब्दांचा व प्रत्ययांचा उपसंहार करावा, असा भावार्थ.–" अहोपण, त्या त्या श्रुतींत श्रुत असलेल्या कांहीं थोडया-फार निषेधांनींच सर्वविशेषांच्या निषेधांची उपलक्षणानें सिद्धि होत असतांना उपसंहाराची काय आवश्यकता आहे ?" अशी आशंका घेऊन 'तत्र०' इत्यादि भाष्यानें म्हणतात–]=' तत्र '–मग असें असतांना एका शाखेंत–शाखाभेदांत केलेल्या बुद्धि अन्यत्र–दुसऱ्या शाखेंत कां बरें प्राप्त होणार नाहींत ? त्यांचा अन्यत्र उपसंहार न करण्यास कोणतें विशेष कारण आहे. [ जर उपसंहार केला नाहीं तर अश्रुतद्वैताच्या निषेधासाठीं त्या त्या श्रुतींतील कांहीं थोड्याशा निषेधशब्दांची लक्षणा करावी लागेल किंवा द्वैताच्या एकदेशाचा शेष राहील–कांहीं द्वैत अनिषिद्धच राहील. म्हणून द्वैतनिषेधापेक्षां सर्वशब्दांच्या उपसंहारानें एकवाक्यता करणें अधिक चांगलें, असा भावार्थ.–' तथा च० ' इत्यादि भाष्यानें त्याविषयीं अनुग्राहक न्याय प्रदर्शित करितात–]

**भाष्यं—तथा च 'आनन्दादयः प्रधानस्य' इत्यत्र व्याख्यातम् । तत्र विधिरूपाणि विशेषणानि चिंतितानि । इह प्रतिषेधरूपाणीति विशेषः । प्रपंचार्थश्चायं चिन्ताभेदः ॥**

**भाष्यार्थ**—आणि तसेंच आम्हीं ' प्रधान ब्रह्माच्या आनंदादि गुणांचा सर्वत्र उपसंहार करावा '–ब्र.सू.३. ३. ११. पृ.२७०–अशा या सूत्रांत व्याख्यान केलें आहे. [–" तर मग या अधिकरणावर पुनरुक्ति दोष येतो " अशी आशंका घेऊन भाव-अभावधर्मविषयत्वानें ' तत्र० ' इत्यादि भाष्यानें तिचा परिहार करितात–]=त्या आनंदाधिकरणांत विधिरूप विशेषणांचा विचार केला व येथें प्रतिषेधरूप विशेषणांचा विचार केला जात आहे, असा या दोन अधिकरणांत विशेष आहे. [–" तथापि दोन्ही अधिकरणांत न्यायाचें साम्य असल्यामुळें पुनरुक्तिदोष जशाचा तसाच राहतो–त्याचा परिहार होत नाहीं," 'प्रपंचार्थश्च०' इत्यादि भाष्यानें उत्तर–]=आणि हा चिंताभेद–पुनः केला जाणारा विचार त्याच्याच प्रपंचासाठीं–विस्तारासाठीं आहे [ " आनंदादिकांना ब्रह्मस्वरूपत्व असल्यामुळें त्यांचा उपसंहार जरी होत असला तरी निषेधांना अनात्मत्व आहे व निषेध्य द्वैताला अनन्तत्व आहे आणि त्याला अनन्तत्व असल्यामुळेंच त्या सर्वांचा एकत्र उपसंहार करितां येणें शक्य नाहीं.'कांहीं एकदेशाच्या निषेधानें बाकीच्या सर्व द्वैताच्या निषेधाची लक्षणा करावी,' असें म्हटल्यास त्या त्या श्रुतींत श्रुत असलेल्या निषेधांनींच लक्षणेची सिद्धि होत असल्यामुळें उपसंहार करणें व्यर्थ आहे. त्यामुळें

निषेधांच्या उपसंहाराची सिद्धि होत नाहीं, " अशी आशंका घेऊन 'निषेधांना अनात्मत्व जरी असलें तरी आत्मलक्षणत्व आहे. त्यामुळें आत्मज्ञानासाठीं त्यांना सार्वत्रिकत्व आहे. भूत-भौतिकत्वादिरूप निषेध्यद्वैताला परिमितत्व आहे. त्यामुळें निषेधांच्याहि परिमितत्वाची सिद्धि होते. म्हणून निषेधांचा उपसंहारहि सिद्ध होतो, ' अशा आशयानें भाष्यकारांनीं '**प्रपंचार्थश्च०**' इत्यादि म्हटलें आहे. –प्रधानाशीं संबंध ठेवणाऱ्या शाखान्तरोक्त धर्मांचाहि उपसंहार होतो, याविषयीं '**औपसदवत्०**' इत्यादि दृष्टान्त–]

**भाष्यं—औपसदवदिति निदर्शनम् । यथा जामदग्न्येऽहीने पुरोडाशिनीषूपसत्सु चोदितासु, पुरोडाशप्रदानमंत्राणाम् 'अग्नेर्वेहोत्रं वेरध्वरम्' इत्येवमादीनामुद्गातृवेदोत्पन्नानामपि अध्वर्युभिरभिसंबंधो भवति, अध्वर्युकर्तृकत्वात्पुरोडाशप्रदानस्य, प्रधानतंत्रत्वाच्चांगानाम् । एवमिहाप्यक्षरतंत्रत्वात्तद्विशेषणानां यत्र क्वचिदप्युत्पन्नानामक्षरेण सर्वत्राभिसंबंध इत्यर्थः । तदुक्तं प्रथमे कांडे– "गुणमुख्यव्यतिक्रमे तदर्थत्वान्मुख्येन वेदसंयोगः" इत्यत्र ॥३३॥ (२०)**

**भाष्यार्थ—**'औपसदाप्रमाणें' हा दृष्टान्त आहे. [–'**यथा०**' इत्यादि भाष्यानें त्याचेंच विवरण–]='जमदग्निः पुष्टिकामः चतूरात्रेण यजेत'–पुष्टीची इच्छा करणाऱ्या जमदग्नीनें चतूरात्रक्रतूनें याग करावा, असा उपक्रम करून विहित असलेल्या–'**जामदग्न्य**'–जमदग्नीनें केलेला तो जामदग्न्य 'अहीन'– चतूरात्रक्रतु–अशा त्या जामदग्न्य चतूरात्र क्रतूंत विहित असलेल्या पुरोडाशिनी उपसदांमध्यें 'अग्नेर्वेहोत्रं वेरध्वरम्' इत्यादि उद्गातृवेदांत उत्पन्न झालेल्याहि पुरोडाशप्रदानमंत्रांचा अध्वर्यूशीं अभिसंबंध होतो. कारण पुरोडाशप्रदानाला अध्वर्युकर्तृकत्व आहे, पुरोडाशप्रदानाचा कर्ता अध्वर्यु असतो व अंगांना प्रधानतंत्रत्व असतें. [पूर्वोक्त जामदग्न्य अहीनांत–जमदग्नीनें केलेल्या चतूरात्रक्रतूंत पुरोडाशिनी उपसद असतात. म्हणून तैत्तिरीयांत पुरोडाशानें युक्त असलेल्या उपसद-इष्टींचा उपदेश केला असतां पुरोडाशप्रदानमंत्र उद्गातृवेदांत–सामवेदांत उत्पन्न झालेले असल्यामुळें उद्गात्यानेंच त्यांचा प्रयोग करावा असें प्राप्त होतें. पण अध्वर्यूकडून प्रदान केल्या जाणाऱ्या पुरोडाशांत त्या मंत्रांचा विनियोग केलेला असल्यामुळें व त्याला उत्पत्तीच्या अपेक्षेनें प्राधान्य असल्यामुळें त्याच्या अनुरोधानें अध्वर्यूनेंच त्यांचा प्रयोग करावा. उद्गात्यानें करूं नये, असा याचा भावार्थ. –'**एवं०**' इत्यादि भाष्यानें हा उक्त अर्थच दार्ष्टान्तिकांत योजितात–]=याच न्यायानें या प्रकृत दार्ष्टान्तिकांतहि अक्षर ब्रह्माच्या विशेषणांना अक्षराधीनत्व

असल्यामुळें ज्या कोणत्याहि एखाद्या शाखेंत जरी त्यांची उत्पत्ति झालेली असली तरी अक्षराशीं सर्वत्र अभिसंबंध होतो, असा भावार्थ. [-याच अर्थी दुसऱ्या उदाहरणाच्या विवक्षेनें पूर्वमीमांसेच्या तिसऱ्या अध्यायांतील सूत्राचें उदाहरण देतात-]=' तदुक्तं० '-प्रथम कांडांत ' गुण-मुख्यव्यतिक्रमे तदर्थत्वान्मुख्येन वेदसंयोगः '-जै. सू. ३. ३. ८-अशा या सूत्रांत तें सांगितलें आहे. [ यजुर्वेदाच्या अग्न्याधानांत ' य एवं विद्वानग्निमाधत्ते '-जो असें जाणणारा अग्नीचें आधान करितो, अशी श्रुति असल्यामुळें त्याच्या अंगत्वानें ' जो असें जाणणारा ' वारवन्तीयं गायति '-वारवन्तीय गातो, ' जो असें जाणणारा यज्ञायज्ञीय गातो ' ' जो असें जाणणारा वामदेव्य गातो ' असें तेथेंच सामगान श्रुत आहे. त्याविषयीं " हीं वारवंतीयादिक सामें, सामवेदांत उत्पन्न झालेलीं असल्यामुळें, त्यांतच उत्पन्न झालेल्या उच्चैस्त्व स्वरानें आधानांत प्रयोक्तव्य आहेत कीं जेथें त्यांचा विनियोग केला जातो तेथें उत्पन्न झालेल्या उपांशुत्वानें तीं प्रयोग करण्यास योग्य आहेत. " असा संदेह आला असतां व पूर्वपक्षानें उत्पत्तिविधीनेंच अपेक्षित-उपायत्वरूपानें अंगांना विहितत्व असल्यामुळें, त्या उत्पत्तिविधीलाच प्राथम्य असल्यामुळें तन्निमित्त उच्चैस्त्वाची प्राप्ति झाली असतां ' गुणमुख्य० ' इत्यादि सिद्धांतसूत्र केलें आहे. " उत्पत्तिविधि हा गुण, विनियोगविधि मुख्य, त्यांचा व्यतिक्रम-विरोध म्ह० उत्पत्तिविधीच्या आलोचनानें उच्चैस्त्व व विनियोगविधीच्या आलोचनानें उपांशुत्व, असा त्यांचा व्यतिक्रम-विरोध आला असतां 'मुख्येन'-प्रधानाशीं विनियुज्यमानरूपानें वारवन्तीयादि वेदाचा संयोग ग्राह्य आहे. उत्पद्यमानत्व या गुणाशीं वेदसंयोग ग्राह्य नाहीं, अशा या प्रतिज्ञेंतील ' तदर्थत्वात् ' हा हेतु आहे. उत्पद्यमानाला विनियोज्यमानार्थत्व असल्यामुळें म्ह० उत्पन्न केलें जाणारें वाक्य विनियोगासाठींच असल्यामुळें सामें सामवेदांत जरी विहित असलीं तरी त्या वाक्यांना तदुत्पत्तिमात्रपरत्व आहे. विनियोगाची प्राप्ति यजुर्वेदाच्या वाक्यांनींच होते. कारण त्या विनियोगापासूनच इष्ट कर्तव्यार्थाचा लाभ होतो. उत्पत्तिवाक्यें त्यासाठींच असतात. यास्तव अनुष्ठानाशीं संस्पर्श -संबंध असलेल्या त्याच स्वराचें ग्रहण करावें, असा भावार्थ. पण हें उदाहरण समानन्यायत्वानें प्रदर्शित केलें आहे. त्यामुळें शाबरविरोध नाहीं. ] ३३ (२०)

( २१. इयदधिकरण सू. ३४. )

—" प्रतिपाद्य ब्रह्माच्या प्रत्यभिज्ञानामुळें ज्ञानैक्यामध्यें अक्षरबुद्धींचा जसा उपसंहार केला जातो त्याप्रमाणें प्रतिपाद्याच्या भेदामुळें विद्याभेद होईल " अशी आशंका घेऊन ' इयदामननात् ' या सूत्रानें समाधान—

## सूत्रं—इयदामननात् ॥ ३४ ॥ (२१)

सूत्रार्थ—'द्वा सुपर्णा०' व 'ऋतं पिबन्तौ०' या दोन मंत्रांतील विद्येचा अभेदच आहे. कारण 'इयत्'-इयत्तेचें आमनन-कथन केलेलें आहे, द्वित्वावच्छिन्नवस्तूचें दोन्ही ठिकाणीं अभिन्नत्वानें कथन केलें आहे. ३४ (२१)-सु. ब्र. ३५० [-'गुहां प्रविष्टौ०'-अ. १. पृ. ३७९-या सूत्रांत ज्याचा अर्थ सिद्ध झाला आहे असें 'द्वा सुपर्णा०' इत्यादि वाक्यहि उपसंहार-अनुपसंहारप्रसंगानें पुनः उदाहृत करितात-]

**भाष्यं—'द्वा सुपर्णा सयुजा सखाया समानं वृक्षं परिषस्वजाते। तयोरन्यः पिप्पलं स्वाद्वत्त्यनश्नन्न्यो अभिचाकशीति' इत्यध्यात्माधिकारे मंत्रमाथर्वणिकाः श्वेताश्वतराश्च पठन्ति। तथा कठाः 'ऋतं पिबन्तौ सुकृतस्य लोके गुहां प्रविष्टौ परमे परार्ध्ये। छायातपौ ब्रह्मविदो वदन्ति पंचाग्नयो ये च त्रिणाचिकेताः' इति॥**

भाष्यार्थ—"उचित भावास प्राप्त होणारे, सदा एकत्र राहणारे-परस्परसंबंध ठेवणारे, समान आख्यानाचे असे दोन सुपर्ण-पक्षी शरीराख्य समान वृक्षास आलिंगन देतात, त्याच्या आश्रयानें राहतात. त्यांतील एक गोड कर्मफल भोगितो व दुसरा ते न खातां जीवाख्य पक्ष्याला तें खाण्याची प्रेरणा करितो."-मुं. ३. १. १ श्वे. ४. ६-असा मंत्र अध्यात्माधिकारांत आथर्वणिक व श्वेताश्वतर पढतात. [तशाच प्रकारचें काठकवाक्यहि पढतात-]='तथा०'-त्याचप्रमाणें "या शरीरांत स्वतः केलेल्या कर्माचें फल भोगणारे दोघे बुद्धिरूप गुहेंतील परम ब्रह्मस्थानांत प्रविष्ट झाले आहेत. ते छाया व आतप यांप्रमाणें परस्पर विलक्षण आहेत, असें ब्रह्मवेत्ते व त्रिणाचिकेत आणि पंचाग्निमान् गृहस्थहि सांगतात."-का. १. ३. १.-असें कठशाखीय पढतात. [या दोन मंत्रांना विषय करून प्रतिपादनप्रकाराच्या भेदामुळें विद्याभेदाचें भान होतें. प्रतिपाद्य असंसारी आत्म्याची उपलब्धि होते व त्याच्या ऐक्याचीहि प्रतीति येते. त्यामुळें-'किमत्र०' इत्यादि भाष्यानें संशय-]

**भाष्यं—किमत्र विद्यैकत्वं। उत विद्यानानात्वमिति संशयः। किं तावत्प्राप्तं। विद्यानानात्वमिति। कुतः। विशेषदर्शनात्। द्वा सुपर्णेत्यत्र ह्येकस्य भोक्तृत्वं दृश्यते। एकस्य चाभोक्तृत्वं दृश्यते। ऋतं पिबन्तावित्यत्रोभयोरपि भोक्तृत्वमेव दृश्यते। तद्वेद्यरूपं भिद्यमानं विद्यां भिंद्यादिति॥**

**भाष्यार्थ**—"काय, या मंत्रांत विद्यैक्य आहे कीं विद्यानानात्व आहे," असा संशय येतो. [ या अधिकरणांत दोन्ही मंत्रांतील विद्येचें ऐक्य सांगून वाक्यार्थ-ज्ञानाच्या हेतूचेंच कथन केलेलें असल्यामुळें याच्या पादादिसंगति आहेत. पूर्व-पक्षांत 'गुणांचा अनुपसंहार' व सिद्धान्तांत 'त्यांचा उपसंहार' स्वीकारून विमर्श-पूर्वक–' **किं तावत्०** ' इत्यादि भाष्यानें पूर्वपक्ष सांगतात–]=पण त्या दोन पक्षांतील प्रथम कोणता पक्ष प्राप्त झाला? ' विद्येचें नानात्व आहे ' असें प्राप्त झालें. [–" पण अर्थैक्य उपलब्ध होत असल्यामुळें विद्येला नानात्व नाहीं, " अशी शंका–]='कुतः'–कोणत्या कारणानें विद्येला नानात्व आहे, असें म्हणतां ? [–' रूपभेदाच्या दृष्टीमुळें अर्थैक्यज्ञान असिद्ध आहे ' असें पूर्ववादी सांगतो–] =' **विशेषदर्शनात्** '–विशेषदर्शनामुळें. [ त्याचेंच विवरण–]=' द्वा सुपर्णा० ' या मंत्रांत एकाचें भोक्तृत्व उपलब्ध होतें व एकाचें अभोक्तृत्व दिसतें आणि ' ऋतं पिबन्तौ० ' या मंत्रांत दोघांचेंहि भोक्तृत्वच उपलब्ध होतें. [–' द्वा सुपर्णा०' या मंत्रांत भोक्ता व अभोक्ता या दोघांना वेद्यत्व आहे व 'ऋतं पिबन्तौ०' यांत दोघां भोक्त्यांनाच वेद्यत्व आहे. याप्रमाणें वेद्यांचा भेद असल्यामुळें विद्येचा भेद आहे. छत्रिन्यायानें–अ. १ पृ. ३८२–'पिबन्तौ' येथें लक्षणा करितां येत नाहीं. कारण मुख्याचा संभव असतांना लक्षणा प्रवृत्त होत नाहीं. 'वाक्यशेषावरून लक्षणा होते ' असेंहि म्हणतां येत नाहीं. कारण मुख्य व लाक्षणिक यांच्या ग्रहणविषया-मध्यें तुल्यबलत्वाचा अभाव आहे. त्यामुळेंच संशयाची अनुपपत्ति होते. प्रक-रण हें लक्षणेचें बीज आहे, असेंहि म्हणतां येत नाहीं. कारण त्याचा–प्रकर-णाचा वाक्यानें बाध होतो, असें मानून वादी ' **तद्वेद्यरूपं०** ' इत्यादि भाष्यानें पूर्वपक्षाचा उपसंहार करितो–]=तें भेद पावणारें वेद्यरूप विद्येला भिन्न करील, असें प्राप्त होतें. [–याप्रमाणें दोन मंत्रांतील विद्यांना नानात्व आहे व गुणांचा अनुपसंहार आहे, अशा या पूर्वपक्षाचा ' **एवं०** ' इत्यादि भाष्यानें अनुवाद करून सूत्राच्या बाहेरच सिद्धान्त सांगतात–]

**भाष्य—एवं प्राप्ते ब्रवीति विद्यैकत्वमिति । कुतः । यतः उभयोरप्यनयोर्मं-त्रयोरियत्तापरिच्छिन्नं द्वित्वोपेतं वेद्यं रूपमभिन्नमामनन्ति । ननु दर्शितो रूप-भेदः । नेत्युच्यते । उभावप्येतौ मंत्रौ जीवद्वितीयमीश्वरं प्रतिपादयतो नार्था-न्तरम् । ' द्वा सुपर्णा ' इत्यत्र तावत् ' अनश्नन्नन्यो अभिचाकशीति' इत्यश-नायाद्यतीतः परमात्मा प्रतिपाद्यते । वाक्यशेषेऽपि च स एव प्रतिपाद्यमानो दृश्यते । " जुष्टं यदा पश्यत्यन्यमीशमस्य महिमानम्" इति ॥**

**भाष्यार्थ**—असा पूर्वपक्ष प्राप्त झाला असतां सिद्धान्ती '**विद्यैकत्वं**'–विद्येला एकत्व आहे, असा सिद्धान्त सांगतो. [–त्या अर्थी प्रश्नपूर्वक हेतुत्वानें सूत्रार्थाची योजना करितात–]='**कुतः**'–कोणत्या कारणानें '**यतः०**'–ज्याअर्थी या दोन्ही मंत्रांमध्यें इयत्तापरिच्छिन्न म्ह० द्वैतानें युक्त असें वेद्य रूप अभिन्न–एकरूप सांगतात, त्याअर्थी.[–'**ननु०**' इत्यादि भाष्यानें '**रूपभेदामुळे विद्याभेद**' या पूर्वोक्त अर्थाचें स्मरण–]=अहोपण, आम्हीं रूपभेद दाखविला आहे. [–रूपभेदाच्या असिद्धीनें त्याचें प्रत्याख्यान–]='**न इति उच्यते**'–नाहीं, रूपभेदाच्या असिद्धीमुळें विद्येचा भेद होत नाहीं, असें सांगितलें जातें. हे दोन्ही मंत्र जीवद्वितीय–जीवविशिष्ट ईश्वराचें प्रतिपादन करितात.अर्थान्तराचें–दुसऱ्या अर्थाचें–जीवाचे प्रतिपादन करीत नाहींत. [–जीवाच्या अनुवादानें त्याचें वास्तविक स्वरूप असें जें परमात्मतत्त्व तें येथील प्रतिपाद्य आहे, असें '**द्वा सुपर्णा०**' इत्यादि भाष्यानें आथर्वणादि मंत्रांत साधितात–]=त्यांतील अगोदर 'द्वा सुपर्णा०' अशा या मंत्रांत 'कर्मफल न खाणारा दुसरा त्याला प्रेरणा करितो'–पृ. ३८५–असा अशनायादिसंसारधर्मांनीं रहित परमात्मा प्रतिपादिला जातो. [–त्याविषयीं वाक्यशेषाचें आनुकूल्य दाखवितात–]='**वाक्यशेषे०**'–वाक्यशेषांतहि–त्याच वाक्यांतील पुढील उपसंहार वाक्यांतहि "जेव्हां शमादिकांनीं युक्त होऊन अनेक योगमार्गांनीं व कर्मांनीं सेवा केलेल्या अन्य–स्वविलक्षण ईश्वराला तो पाहतो, परमेश्वररूप अशा माझी ही सर्व विभूति आहे, असें जाणतो, तेव्हां तो शोकरहित होतो"–मुं. ३.१.२. सु. उ. १५४–श्वे. ४. ७. सु. उ. ९४३–असा तोच परमात्मा प्रतिपादन केला जात असलेला दिसतो. [–"तथापि काठकांत दोन भोक्त्यांचेंच कथन केलेलें असल्यामुळें त्या मंत्राला ईश्वरार्थत्व नाहीं" अशी आशंका घेऊन '**ऋतं०**' इत्यादि सांगतात–]

**भाष्यं**—'**ऋतं पिबन्तौ' इत्यत्र तु जीवे पिबति अशनायाद्यतीतः परमात्मापि साहचर्याच्छत्रिन्यायेन पिबतीत्युपचर्यते । परमात्मप्रकरणं ह्येतत् 'अन्यत्र धर्मादन्यत्राधर्मात्' इत्युपक्रमात् । तद्विषय एव चात्रापि वाक्यशेषो भवति 'यः सेतुरीजानानामक्षरं ब्रह्म यत्परम्' इति । 'गुहां प्रविष्टावात्मानौ हि' इत्यत्र चैतत्प्रपंचितम् । तस्मान्नास्ति वेद्यभेदः । तस्माच्च विद्यैकत्वम् ॥**

**भाष्यार्थ**—पण 'ऋतं पिबन्तौ'–कर्मफल भोगणारे, इत्यादि काठकमंत्रांत जीव प्राशन करीत असतांना–स्वकर्माचें फल भोगीत असतांना अशनायादि–क्षुधातृषादि-संसारधर्मांनीं रहित असलेला परमात्माहि साहचर्यामुळें '**छत्रि-**'न्यायानें 'पिबति'–प्राशन करितो–कर्मफल भोगितो असें उपचारानें–गौणवृत्तीनें म्हटलें

जातें. [ दोन्ही मंत्रांमध्यें द्वित्वसंख्या उपलब्ध होते. त्या दोघांनाहि तुल्यत्व असल्यावांचून ती द्वित्वसंख्या उपपन्न होत नाहीं. चेतन जीवाचा परमात्माच चेतनत्वामुळें तुल्य आहे. चेतन ईश्वरच चेतन जीवासारिखा संभवतो. त्याचेंच त्याच्याशीं तुल्यत्व –साम्य संभवतें. त्यामुळें 'पिबन्तौ' अशा या शब्दाची लक्षणा बलानेंच–इच्छा नसतांनाहि प्राप्त होते, असा याचा भावार्थ.–शिवाय प्रकरणावरूनहि परमात्माच येथें प्रतीत होतो, असें सांगतात–]=' **परमात्मप्रकरणं०** '–हें परमात्म्याचेंच प्रकरण आहे. कारण 'धर्माहून अन्य, अधर्माहून अन्य'–का. १.२.१४–असा उपक्रम केलेला आहे. [–उपक्रमाप्रमाणें उपसंहारहि परमात्मविषयक आहे, असें सांगतात–]=' **तद्विषयः०**'–आणि आथर्वणिकादि वाक्याप्रमाणें येथेंहि 'जो कर्मठ यजमानांचा सेतु, जें अक्षर पर ब्रह्म'–का. १. ३. २–असा हा वाक्यशेषहि तद्विषयच–परमात्मविषयच आहे. [ उपक्रम व उपसंहार यांच्या एकरूपत्वामुळें त्यांच्या मधील भागहि परमात्मपरच आहे, असा निर्णय करावा, असा भावार्थ. –आणि हा अर्थ पूर्वी सिद्ध झालेला असल्यामुळें दोन्ही मंत्रांना परमात्मविषयत्व आहे, असें सांगतात–]=आणि ' गुहां प्रविष्टौ०'–" गुहेंत प्रविष्ट झालेले हे दोघे आत्मे आहेत "–ब्र.भा.१.२.११.पृ.३७९–अशा या सूत्रांत या विषयाचा सविस्तर विचार केला आहे. [–याप्रमाणें या मंत्रद्वयाला-परमात्म-एकार्थत्व असल्यामुळें रूपाचा अभेद आहे व रूपाभेदामुळें त्यांतील विद्येचाहि अभेद आहे, असें ' **तस्मात्०**' इत्यादि भाष्यानें निगमन करितात–]=म्हणून या मंत्रद्वयांत वेद्याचा भेद नाहीं आणि वेद्याचा भेद नसल्यामुळें विद्येला एकत्व आहे. [–केवल हें मंत्रद्वयच परमात्मविषय आहे, असें नाहीं तर त्याच्या संनिध पठित असलेलें सर्वहि मंत्रजात परमात्मविषयच आहे, असें ' अपि च० ' इत्यादि भाष्यानें सांगतात–]

**भाष्यं—अपि च त्रिष्वप्येतेषु वेदान्तेषु पौर्वापर्यालोचने परमात्मविद्यैवावगम्यते । तादात्म्यविवक्षयैव जीवोपादानं नार्थान्तरविवक्षया । न च परमात्मविद्यायां भेदाभेदविचारावतारोऽस्तीत्युक्तम् । तस्मात्प्रपंचार्थ एवैष योगः । तस्माच्चाधिकधर्मोपसंहार इति ॥ ३४ ॥** ( २१ )

**भाष्यार्थ**—शिवाय या तिन्ही म्ह० आथर्वण, श्वेताश्वतर व काठक वेदान्तांतील–उपनिषदांतील पूर्वोत्तर ग्रंथांचें पर्यालोचन केलें असतां परमात्मविद्याच अवगत होते. [–" तर मग त्यांत जीवाचें ग्रहण कशासाठीं केलें आहे ? " उत्तर–]=' **तादात्म्यविवक्षया०** '–तादात्म्याच्या विवक्षेनेंच जीवाचें ग्रहण केलें आहे, दुसऱ्या अर्थाच्या विवक्षेनें त्याचें ग्रहण केलेलें नाहीं. [जीवपरैक्य सांगण्या-

साठीं जीवाचा अनुवाद केला जातो, असा भावार्थ.–" जीवाचा अनुवाद करून परमात्म्याचें प्रतिपादन जरी केलें असलें तरी विद्येचें ऐक्य कोणत्या कारणानें आहे ? " ' न च० ' इत्यादि उत्तर–]=आणि परमात्मविद्येमध्यें भेदाभेद- विचाराला अवतार–अवकाश नाहीं, त्या विद्येमध्यें भेदाभेदविचाराची प्रवृत्ति होत नाहीं, असें सांगितलें आहे. [–" अहोपण, या मंत्रद्वयाचा अर्थ जर पूर्वींच सिद्ध झालेला आहे तर या अधिकरणाचा काय उपयोग आहे ? " 'तस्मात्०' इत्यादि भाष्यानें उत्तर–]=यास्तव प्रपंचासाठींच–विवरणासाठींच हा योग–हा अधिकरण- संबंध आहे. [–"पण गुणोपसंहारप्रकरणांत हें मंत्रद्वयविवरण कोठें उपयुक्त आहे?" ' तस्माच्च० ' इत्यादि उत्तर–]=आणि त्यामुळेंच अधिक धर्मांचा उपसंहार होतो, असें सिद्ध झालें. ३४.–सु. ब्र. ३५१. ( २१ ).

( २२. अन्तरत्वाधिकरण. सू. ३५-३६. )

–दोन मंत्रांच्या अर्थाभेदोक्तीच्या प्रसंगानें दोन ब्राह्मणांचेंहि तुल्यार्थत्व 'अन्तरा०' इत्यादि सूत्रानें सांगतात––

## सूत्रं––अन्तरा भूतग्रामवत्स्वात्मनः ॥ ३५

सूत्रार्थ—बृहदारण्यकस्थ उपस्त व कहोल ब्राह्मणांत ' स्वात्म्याचें सर्वान्तरत्व सांगितलेलें असल्यामुळे ' त्यांतील विद्येला एकत्व आहे. 'भूतग्रामाप्रमाणें' –( पंचभूतसमूहरूप देहांत पृथ्वीच्या आंत आप, आपांच्या आंत तेज, असें आपेक्षिक अन्तरत्व असतें, मुख्य अन्तरत्व नसतें, तसें एका देहांत दोन आत्म्यांचें मुख्य सर्वान्तरत्व संभवत नाहीं. किंवा ' भूतग्रामवत् ' यानें ' एको देवः० ' इत्यादि श्रुत्यन्तराचा दृष्टान्त देतात. ) ३५.–सु. ब्र. ३५२. [–बृहदारण्यकाच्या–आरण्यकाच्या क्रमानें पांचव्या व उपनिषदाच्या क्रमानें तिसऱ्या अध्यायांतील दोन ब्राह्मणांचा उल्लेख 'यत्साक्षात्०' इत्यादि भाष्यानें करितात–]

**भाष्यं**—' यत्साक्षादपरोक्षाद्ब्रह्म य आत्मा सर्वान्तरः ' इत्येवं द्विरुषस्तकहोलप्रश्नयोर्नैरंतर्येण वाजसनेयिनः समामनन्ति । तत्र संशयः–विद्यैकत्वं वा स्याद्विद्यानानात्वं वेति । विद्यानानात्वमिति तावत्प्राप्तम् । अभ्याससामर्थ्यात् । अन्यथा ह्यनूनानतिरिक्तार्थे द्विराम्नानमनर्थकमेव स्यात् । तस्माद्यथाभ्यासात्कर्मभेदः । एवमभ्यासाद्विद्याभेदः इति ॥

**भाष्यार्थ**—" जें साक्षात् अपरोक्ष ब्रह्म [–घटादिक ज्ञानाच्या कर्मत्वानें अपरोक्ष–प्रत्यक्ष पण ब्रह्म साक्षात् अपरोक्ष आहे. तेंच प्रत्यगात्मा आहे, असें ' य आत्मा० ' इत्यादि वाक्यानें सांगतात–]=व जो आत्मा सर्वान्तर आहे "–बृ.

३. ४. १.–हें अशा प्रकारें दोनदा उषस्त व कहोल यांच्या प्रश्नांत नैरंतर्यानें वाजसनेयी पठतात. [ नैरंतर्यानें म्ह० चवथ्या व पांचव्या ब्राह्मणांत ब्रह्मामध्यें सिद्ध असलेल्या सर्वान्तरत्वाचें आत्म्यामध्यें व आत्म्यामध्यें स्थित असलेल्या अपरोक्षत्वाचें ब्रह्मामध्यें संकीर्तन–कथन केलेलें असल्यामुळें दोन्ही ब्राह्मणांचें ऐक्य आहे, असा भावार्थ. " जें साक्षात् अपरोक्ष ब्रह्म आहे व जो आत्मा सर्वान्तर आहे तें ब्रह्म मला स्पष्टपणें सांग " असा संबंध.–या दोन ब्राह्मणांना विषय करून अभ्यास व सर्वान्तरत्वाचे प्रत्यभिज्ञान,या दोन कारणांनीं संशय सांगतात–]='तत्र०' –ह्याविषयीं 'या दोन ब्राह्मणांतील विद्येचें एकत्व आहे कीं विद्याभेद आहे' असा संशय येतो. [–पूर्वाधिकरणांत 'पिबन्तौ०' अशा या पदाचें लाक्षणिकत्व स्वीकारून दोन्ही मंत्रांत भोक्तृ-अभोक्तृत्वानें आत्मैक्यामुळें विद्यैक्य सांगितलें.–पण येथें अर्थैक्य जरी असलें तरी अभ्यासामुळें विद्यैक्य नाहीं, असा पूर्वपक्ष सांगतात–]= '**विद्यानानात्वं०** '–त्यांतील विद्येला नानात्व आहे, त्या दोन ब्राह्मणांतील विद्या भिन्न आहेत, असें अगोदर प्राप्त होतें. अभ्यासाच्या सामर्थ्यामुळें. [–'अभ्याससामर्थ्यात्' हा हेतुच व्यतिरेकानें विशद करितात–]='**अन्यथा हि०** '–कारण विद्येला नानात्व जर नसतें तर अनून व अनतिरिक्त अर्थी म्ह० यत्किंचित्‌हि न्यून किंवा अधिक नसलेल्या अर्थी दोनदा कथन–द्विरुक्ति व्यर्थच होतें. [–एकाचीच पुनःश्रुति अविशेषामुळें अनर्थकच–व्यर्थच असते, या न्यायानें 'यजति' या क्रियेचा अभ्यास केला असतां जसा कर्मभेद होतो त्याप्रमाणें येथें विद्याभेद आहे, असा पूर्ववादी पूर्वपक्षाचा उपसंहार करितो–]='**तस्मात्०** '–म्हणून ज्याप्रमाणें 'यजति-'पदाच्या अभ्याससामर्थ्यामुळें यागकर्माचा भेद होतो त्याप्रमाणें येथें अभ्यासामुळें विद्याभेद आहे '**इति०** '–असा पूर्वपक्ष प्राप्त झाला. [ त्या दोन्ही ब्राह्मणांना एकार्थत्व असल्यामळें, विद्यैक्यकथनानें येथें वाक्यार्थज्ञानहेतूचेंच चिंतन केलेलें असल्यामुळें याच्या पादादिसंगति आहेत.–पूर्वपक्षांत 'विद्याभेदामुळें गुणांचा अनुपसंहार ' व सिद्धान्तांत 'विद्येच्या ऐक्यामळें त्यांच्या उपसंहाराची सिद्धि ' असा फलभेद सिद्धवत् मानून–गृहीत धरून 'एवं०' इत्यादि सिद्धान्त–]

**भाष्यं—एवं प्राप्ते प्रत्याह—अंतरा आम्नानाविशेषात्स्वात्मनो विद्यैकत्वमिति । सर्वान्तरो हि स्वात्मा उभयत्राप्यविशिष्टः पृच्छयते च प्रत्युच्यते च । न हि द्वावात्मानौ एकस्मिन्देहे सर्वान्तरौ संभवतः । तदा ह्येकस्यांजसं सर्वान्तरत्वमवकल्प्येत । एकस्य तु भूतग्रामवन्नैवं सर्वान्तरत्वं स्यात् ॥**

**भाष्यार्थ**—असा पूर्वपक्ष प्राप्त झाला असतां त्याचें प्रत्याख्यान करितात–स्वात्म्याच्या ' अन्तरा '–सर्वांच्या आंत आम्नानाचा अविशेष असल्यामुळें विद्येला एकत्व आहे, असे पूर्वपक्षाचें निरसन करितात. [–पूर्वसूत्रांतील ' आमननात् ' हें पद येथें संबद्ध होतें, असें स्वीकारून ' स्वात्म्याचें अंतरा–आंत आम्नान समान असल्यामुळें, असें जें भाष्यांत म्हटलें आहे तेंच '**सर्वान्तरो हि०**' इत्यादि भाष्यानें विशद करितात–]=कारण दोन्ही ब्राह्मणांमध्ये सर्वान्तर स्वात्मा अविशिष्ट–एकसारखाच विचारिला जातो व प्रतिवचनरूपानें सांगितला जातो. [–" तथापि त्या दोन ब्राह्मणांना एकार्थत्व कसें ? " ' **न हि०** ' इत्यादि भाष्यानें उत्तर–]=कारण एका देहांत दोन आत्मे सर्वान्तर असणें शक्य नाहीं–एकादेहांत दोन सर्वान्तर आत्मे संभवत नाहींत. [ दोघांचें सर्वान्तरत्व अयुक्त आहे. त्यामुळें रूपैक्यसिद्धीनें विद्यैक्यसिद्धि होते, असा भावार्थ.–" अहोपण दोघांच्या सर्वान्तरत्वाची अनुपपत्ति कशी ? मनोमयत्वादिकांप्रमाणें त्याची उपपत्ति लागते, " अशी आशंका घेऊन '**तदा हि०**' इत्यादि म्हणतात–]=कारण तेव्हां–एका शरीरांत दोघांना सर्वान्तरत्व आहे, असें म्हटल्यास एकाला साक्षात् सर्वान्तरत्व आहे असें उपपन्न होईल. पण दुसऱ्याचें भूतग्रामाप्रमाणें असें–साक्षात् सर्वान्तरत्व कधींच संभवणार नाहीं. [–'**यथा०**' इत्यादि भाष्यानें सूत्रोक्त भूतग्रामदृष्टान्ताचें व्याख्यान–]

**भाष्यं—यथा च पंचभूतसमूहे देहे, पृथिव्या आपोऽन्तरा अद्भ्यस्तेजोऽन्तरमिति सत्यप्यापेक्षिकेऽन्तरत्वे, नैव मुख्यं सर्वान्तरत्वं भवति, तथेहापीत्यर्थः। अथवा भूतग्रामवदिति श्रुत्यंतरं निदर्शयति। यथा–" एको देवः सर्वभूतेषु गूढः सर्वव्यापी सर्वभूतान्तरात्मा " इत्यस्मिन्मंत्रे समस्तेषु भूतग्रामेष्वेक एव सर्वान्तर आत्माम्नायते। एवमनयोरपि ब्राह्मणयोरित्यर्थः। तस्माद्विद्यैकत्वमिति ॥**

**भाष्यार्थ**—आणि ज्याप्रमाणें पंचभूतसमूहरूप देहांत पृथिवीहून आप अन्तरा, आपांहून तेज अन्तर, असें आपेक्षिक–एक-दुसऱ्याच्या अपेक्षेनें अन्तरत्व जरी असलें तरी मुख्य सर्वान्तरत्व नाहींच, तसेंच येथेंहि होईल, असा भावार्थ. [–त्याचाच अनुवाद करून ' **अथवा०**' इत्यादि भाष्यानें दुसऱ्या प्रकारें व्याख्यान करितात–]=किंवा सूत्रकार ' भूतग्रामवत् ' असें म्हणून श्रुत्यन्तराचें निदर्शन करितात–दुसऱ्या श्रुतीचा दृष्टान्त देतात. ' **यथा०** '–जसा " एक देव सर्वभूतांमध्यें गूढ आहे. तो सर्वव्यापी, सर्व भूतांचा अन्तरात्मा आहे. "–श्वे. ६. ११. –**अशा या मंत्रामध्यें सर्व भूतग्रामांमध्यें–सर्व भूतसमुदायामध्यें एकच सर्वान्तर आत्मा**

कथन केला जातो, तसाच तो या दोन ब्राह्मणांमध्येंहि सांगितलेला आहे, असा भावार्थ. [-दोन आत्म्यांचें सर्वान्तरत्व संभवत नाहीं, यावरून प्राप्त झालेल्या अर्थाचा उपसंहार-]=' **तस्मात्**०'-दोन आत्म्यांचें सर्वान्तरत्व याप्रमाणें संभवत नसल्यामुळें पूर्वोक्त दोन ब्राह्मणांतील वेद्याला एकत्व आहे व वेद्याच्या एकत्वामुळें विद्येला एकत्व आहे '**इति**०'-असें सिद्ध झालें ३५. [-'**अन्यथा**०' इत्यादि सूत्रानें पूर्वपक्षाच्या बीजाचा अनुवाद करून त्याला दूषित करितात-]

**सूत्रं—अन्यथा भेदानुपपत्तिरिति चेन्नोपदेशान्तरवत् ॥ ३६ ॥ (२२)**

**सूत्रार्थ**—अन्यथा-विद्याभेदाचा अंगीकार न केल्यास 'आम्नानभेदाची'-ब्राह्मणाच्या द्विरावृत्तीची 'अनुपपत्ति होते,' असें जर म्हणाल तर 'न'-तें बरोबर नाहीं. 'उपदेशान्तराप्रमाणें'-'तत्त्वमसि' इत्यादि उपदेशाची नऊ वेळां जरी आवृत्ति केली आहे तरी विद्याभेद होत नाहीं, तशीच या आवृत्तीची उपपत्ति लागते. ३६ (२२) सु. ब्र. ३५२. [-'अथ०' इत्यादि भाष्यानें सूत्रांतील अनुवादाचें व्याख्यान-]

**भाष्यं—अथ यदुक्तं अनभ्युपगम्यमाने विद्याभेदे आम्नानभेदानुपपत्तिरिति, तत्परिहर्तव्यम् । अत्रोच्यते-नायं दोषः । उपदेशान्तरवदुपपत्तेः । यथा तांडिनामुपनिषदि षष्ठे प्रपाठके-'स आत्मा तत्त्वमसि श्वेतकेतो' इति नवकृत्वोऽप्युपदेशे न विद्याभेदो भवति, एवमिहापि भविष्यति ॥**

**भाष्यार्थ**—आतां "विद्येचा भेद आहे, असा स्वीकार न केला गेल्यास आम्नानभेदाची अनुपपत्ति होते, दोनदा तेंच सर्वान्तर ब्रह्मकथन करणें अयोग्य होतें." असें जें वाद्यानें वर-पृ. ३९०-म्हटलें आहे त्याचा परिहार करणें उचित आहे. [-'अत्र०' इत्यादि भाष्यानें त्या परिहारालाच अवतरण देतात-]= याविषयीं असें सांगितलें जातें-[-'**नायं**०' इत्यादि भाष्यानें सूत्रांतील 'नञ्'चा अर्थ सांगून दृष्टान्तानें आम्नानभेदाची उपपत्ति हा सूत्रावयवाचा अर्थ-]= हा दोष येत नाहीं. कारण उपदेशान्तराप्रमाणें-दुसऱ्या उपदेशाप्रमाणें त्या आम्नानभेदाची उपपत्ति लागते. [-उपदेशभेदाचेंच विवरण-]='**यथा**०'-ज्याप्रमाणें तांडींच्या उपनिषदांत सहाव्या प्रपाठकामध्यें 'तो आत्मा, हे श्वेतकेतो, तें तूं आहेस'-छां. ६.८.७.-असा नऊ वेळां जरी उपदेश केला आहे तरी विद्याभेद होत नाहीं त्याप्रमाणें येथेंहि होईल. [-पण हा दृष्टान्तहि संमत नाहीं, अशी '**कथं**०' इत्यादि भाष्यानें शंका-]

**भाष्यं—कथं च नवकृत्वोऽप्युपदेशे विद्याभेदो न भवति। उपक्रमोपसंहाराभ्यां एकार्थतावगमात्। 'भूय एव मा भगवान्विज्ञापयतु' इति चैकस्यैवार्थस्य पुनः पुनः प्रतिपिपादयिषितव्यत्वेनोपक्षेपात्। आशंकान्तरनिराकरणेन च असकृदुपदेशोपपत्तेः॥**

**भाष्यार्थ**—अहोपण, नऊ वेळां उपदेश जरी केलेला असला तरी विद्याभेद कसा होत नाहीं? [—'**उपक्रम०**' इत्यादि भाष्यानें दृष्टान्तांतील विद्यैक्य साधितात—]=उपक्रम व उपसंहार यांच्यायोगानें एकार्थता अवगत होते—एकार्थतेचा अवगम—बोध होतो, त्यामुळें विद्याभेद नाहीं. [—एकार्थत्वाच्या सिद्धीविषयीं हेत्वन्तर—]="भगवान् मला पुनः याचेंच विशेषतः ज्ञान करून देवोत"—छां.६.५.४.—असा पुनः पुनः एकाच अर्थाचा प्रतिपिपादयिषितव्यत्वानें—प्रतिपादन करण्यास अभीष्ट या रूपानें—प्रतिपाद्यत्वानें उपन्यास केला आहे. [—"अहोपण, 'भूयः-'शब्दावरून एकालाच प्रतिपाद्यत्व आहे, असें म्हटल्यास पुनरुक्तिदोष येतो" अशी आशंका घेऊन आचार्य '**आशंकान्तर०**'—म्हणतात—]=आणि आशंकान्तराच्या निराकरणानें—दुसऱ्या दुसऱ्या आशंकेच्या निवारणानें **असकृत्**—वारंवार त्या एकाच प्रतिपाद्याचा उपदेश उपपन्न होतो. [—'**एवमिहापि०**' इत्यादि भाष्यानें दार्ष्टान्तिक सांगतात—]

**भाष्यं—एवमिहापि प्रश्नरूपाभेदात् 'अतोऽन्यदार्तम्' इति च परिसमाप्त्यविशेषादुपक्रमोपसंहारौ तावदेकार्थविषयौ दृश्येते। 'यदेव साक्षादपरोक्षाद्ब्रह्म' इति द्वितीये प्रश्ने एवकारं प्रयुंजानः पूर्वप्रश्नगतमेवार्थं उत्तरत्र अनुकृष्यमाणं दर्शयति। पूर्वस्मिंश्च ब्राह्मणे कार्यकरणव्यतिरिक्तस्यात्मनः सद्भावः कथ्यते। उत्तरस्मिंस्तु तस्यैव अशनायादिसंसारधर्मातीतत्वं कथ्यते। इत्येकार्थतोपपत्तिः। तस्मादेका विद्येति॥ ३६॥ (२२)**

**भाष्यार्थ**—या दृष्टान्ताप्रमाणेंच या ब्राह्मणद्वयांतहि प्रश्नरूपाचा अभेद असल्यामुळें—प्रश्नाचें स्वरूप एकसारखेंच असल्यामुळें व 'याहून दुसरें सर्व आर्त—विनाशी आहे'—बृ. ३.४. २, ३.५. २.—अशी परिसमाप्तिहि एकरूप असल्यामुळें अगोदर उपक्रम व उपसंहार तर एकार्थविषय दिसतात, त्यांचा विषय एकच पदार्थ आहे, असें प्रतीत होतें. [—'एव-'काराच्या सामर्थ्यावरूनहि विद्यैक्य आहे, असें '**यदेव०**' इत्यादि भाष्यानें सांगतात—]="जेंच साक्षात् अपरोक्ष ब्रह्म"—बृ.५.३.१—असा दुसऱ्या प्रश्नांत 'एव-'काराचा प्रयोग करणारा ऋषि [—"जें साक्षात् अपरोक्षच आहे, परोक्ष केव्हांहि नाहीं, असा हा 'एव-'कार योजिला जावो"

अशी आशंका घेऊन ‘ पण तो व्यवहित अन्वय होत असल्यामुळें–दूरान्वय होत असल्यामुळें असें म्हणतां येत नाहीं ’ अशा आशयानें आचार्य म्हणतात–]=पूर्वप्रश्नांतीलच प्रतिपाद्य उत्तरप्रश्नांत आकर्षण केलें जात असलेलें दाखवितो. [–“ तर मग आम्हीं ‘ पुनरुक्तीमुळें आनर्थक्यप्राप्ति ’ असा जो दोष दिला आहे. त्याचें समाधान कसें ? ” ‘ **पूर्वस्मिन्०**’ इत्यादि भाष्यानें उत्तर–]=आणि पूर्वीच्या ब्राह्मणामध्यें शरीरेंद्रियांहून व्यतिरिक्त–भिन्न असलेल्या आत्म्याचा सद्भाव सांगितला जातो. पण पुढच्या ब्राह्मणांत त्याच आत्म्याचें अशनायादि-संसारधर्मातीतत्व सांगितलें जातें. [–पहिल्या उषस्तप्रश्नांत आत्म्याचा शरीरेंद्रियाभाव साधिला जातो. कारण ‘ जो प्राणानें प्राणनव्यापार करितो ’ असा निर्देश केलेला आहे. पण दुसऱ्या कहोलप्रश्नांत अशनायादिकांचा अभाव साधिला जातो. कारण ‘ जो अशनाया, पिपासा, शोक, मोह जरा, मृत्यु यांचें अतिक्रमण करून जातो’ असें त्यांत उपलब्ध होतें. तेव्हां एकाच आत्म्याचें आकारभेदानें कथन केलेलें असल्यामुळें पौनरुक्त्य कोठून होणार, असें ‘ इत्येकार्थता० ’ इत्यादि भाष्यानें सांगतात–]=याप्रमाणें एकार्थतेची उपपत्ति लागते. [–याप्रमाणें ‘ ऐक्यार्थ्य सिद्ध झालें असतां आतां फलित सांगतात–]=‘ **तस्मात्** ’–म्हणून उषस्त व कहोल ब्राह्मणांत एक विद्या आहे, हें सिद्ध झालें. ३६ सु. ब्र. ३५३. ( २२ )

## ( २३. व्यतिहाराधिकरण. सू. ३७. )

—‘ तत्त्वमसि ’ या एकत्वोपदेशाचें उदाहरण ‘ उपदेशान्तरवत् ’ या पूर्वसूत्रावयवानें दिलेलें असल्यामुळें त्याच प्रसंगानें एकत्ववादि-वाक्यान्तरांचें तात्पर्य ‘ **व्यतिहारः०** ’ इत्यादि सूत्रानें सांगतात—

## सूत्रं—व्यतिहारो विशिंषन्ति हीतरवत् ॥ ३७ ॥ (२३)

**सूत्रार्थ**—‘ जो मी तो तूं व जो तूं तो मी’ इत्यादि ऐतरेयादिकांतील ‘व्यतिहार’ उपासनेसाठीं सांगितला जातो. सर्वात्मत्वादि ‘ इतर गुणांप्रमाणें ’ ‘ हि ’ –कारण ‘ विशिंषन्ति ’–समाम्नान–कथन करणारे ‘ त्वं अहं अस्मि ’ व ‘ अहं त्वं असि ’ असें दोहोंचें उच्चारण करून त्याला विशेषित करितात. ३७. (२३) –सु. ब्र. ३५४. [–‘ **यथा०** ’ इत्यादि भाष्यानें ऐतरेयवाक्य व जाबालवाक्य यांचें उदाहरण देतात–]

**भाष्यं—यथा-‘ यद्योऽहं सोऽसौ योऽसौ सोऽहम् ’ इत्यादित्यपुरुषं प्रकृत्य ऐतरेयिणः समामनन्ति । तथा जाबालाः–“ त्वं वा अहमस्मि भगवो देवतेऽहं**

**वै त्वमसि" इति । तत्र संशयः–किमिह व्यतिहारेणोभयरूपा मतिः कर्तव्या। उत एकरूपैवेति ॥**

**भाष्यार्थ**—ज्याप्रमाणें ऐतरेयिशाखाध्यायी ' **तत्** '–त्या सर्वात्मक प्राणदेवता-स्वरूपांत जो मी–उपासक शरीरवर्ती तोच आदित्यमण्डलस्थ पुरुष व 'जो तो, तो मी' –ऐ. आ. २. ४–असें आदित्यपुरुषाला उद्देशून–त्याला विषय करून समामनन –कथन करितात, त्याचप्रमाणें जाबाल 'हे भगवति देवते, तूंच मी आहें मीच तूं आहेस ' असें कथन करितात. [–या वाक्यद्वयाला विषय करून व्यतिहाराची–अन्योन्य विशेषण-विशेष्यत्वाची उपलब्धि होत असल्यामुळें व ' निकृष्टामध्यें केलेली उत्कृष्टदृष्टि फलवती आहे ' असा न्याय असल्यामुळें ' **तत्र०** ' इत्यादि भाष्यानें संशय सांगतात–]=त्याविषयीं ' काय, येथें व्यतिहारानें उभयरूप मति करावी कीं एकरूप? ' असा संशय येतो. [–उषस्त व कहोल या दोन ब्राह्मणांत विधैक्य जरी असलें तरी आदरासाठीं जसा अभ्यास आहे, तसाच हाहि आदरार्थ अभ्यास आहे, असें मानून '**एकरूपैव०**' इत्यादि भाष्यानें पूर्वपक्ष–]

**भाष्यं—एकरूपैवेति तावदाह । न ह्यत्रात्मनः ईश्वरेणैकत्वं मुक्त्वा अन्यत्किंचिच्चिंतयितव्यमस्ति । यदि चैवं चिंतयितव्यो विशेषः परिकल्प्येत संसारिणश्चेश्वरात्मत्वं ईश्वरस्य संसार्यात्मत्वमिति । तत्र संसारिणस्तावदीश्वरात्मत्वे उत्कर्षो भवेत्। ईश्वरस्य तु संसार्यात्मत्वे निकर्षः कृतः स्यात् । तस्मादैकरूप्यमेव मतेः । व्यतिहाराम्नायस्त्वेकत्वदृढीकारार्थ इति ॥**

**भाष्यार्थ**—अगोदर ' एकरूपाच मति करावी ' असें पूर्ववादी म्हणतो. [–' पण पदान्तरांना स्वभावतःच अर्थान्तरपरत्व असल्यामुळें मतीला एकरूपत्व कसें ?' वादी ' **न हि०** ' इत्यादि भाष्यानें याचें उत्तर सांगतो–]=कारण येथें –या व्यतिहारांत आत्म्याचें ईश्वराशीं जें एकत्व त्याला सोडून दुसरें कांहींहि चिन्तयितव्य नाहीं. [–' अहोपण, अन्योन्यात्मत्व हेंच अर्थान्तर आहे ' अशी आशंका घेऊन वादी म्हणतो–]='**यदि०**'–आणि जर असा म्ह० संसारी जीवाचें ईश्वरात्मत्व व ईश्वराचें संसारि-आत्मत्व असा चिंतयितव्यविशेष परिकल्पिला जाईल तर त्यांत अगोदर संसारी जीवाचें ईश्वरात्मत्व मानिल्यास जीवाचा उत्कर्ष होईल. पण ईश्वराचें संसारि-आत्मत्व मानिलें असतां ईश्वराचा निकर्ष–अपकर्ष केला आहे, असें होईल. [–याप्रमाणें संसारी व ईश्वर यांचें अन्योन्यात्मत्वानें चिंतन करणें अयुक्त आहे, असें झालें असतां फलित सांगतात–] =' **तस्मात्०** '–म्हणून मतीला एकरूपत्वच आहे. [–' तर मग व्यतिहाराम्नान

कशासाठीं आहे ? ' पूर्ववादी म्हणतो–]=पण ' तूंच मी व मीच तूं ' हा व्यति-हारपाठ एकत्वदृढीकरणार्थ आहे. ' इति '–असा पूर्वपक्ष प्राप्त होतो. [व्यति-हारपाठांत द्विरूपमतीला अनुष्ठेयत्व आहे, असें सांगून वाक्यार्थज्ञानाचें साधन अशा विवेक्योक्तीचेंच येथें चिंतन–विचार केलेला असल्यामुळें याच्या पादादि-संगति आहेत. पूर्वपक्षांत ' मतीच्या एकत्वामध्यें लाघव आहे' व सिद्धान्तांत ' त्या मतीला द्वैरूप्य आहे, असें झालें असतां ऐक्याचें दृढत्व सिद्ध होतें ' असें मानणारे आचार्य–' **एवं०** ' इत्यादि भाष्यानें सिद्धान्त सांगतात–]

**भाष्यं—एवं प्राप्ते प्रत्याह–व्यतिहारोऽयमाध्यानायाम्नायते, इतरवत् । यथेतरे गुणाः सर्वात्मत्वप्रभृतयः** आध्यानायाम्नायन्ते, तद्वत् । तथा हि विशि-**षन्ति समाम्नातारः उभयोच्चारणेन** ' त्वमहमस्म्यहं च त्वमसि ' इति । तच्चो-**भयरूपायां मतौ कर्तव्यायामर्थवद्भवति । अन्यथा हीदं विशेषेणोभयाम्नानमन-र्थकं स्यात् । एकेनैव कृतत्वात् ॥**

**भाष्यार्थ**—असा पूर्वपक्ष प्राप्त झाला असतां ' हा व्यतिहार म्ह० परस्पर विशेषण-विशेष्यत्व आध्यानासाठीं–उभयरूपमति करण्यासाठीं सांगितला जातो ' असें सूत्रकार त्याचें निरसन करितात. [–' हा प्रतिज्ञात अर्थ दृष्टान्तानें साधि-तात–]=' **इतरवत्** '–ज्याप्रमाणें सर्वात्मत्व इत्यादि इतर गुण आध्यानासाठीं –चिंतनासाठीं सांगितले जातात त्याप्रमाणें. [–सूत्रांतील दृष्टान्त-दार्ष्टान्तिक-भागांचें व्याख्यान करून ' **तथा हि०** ' इत्यादि भाष्यानें हेतूचें व्याख्यान करि-तात–]=कारण समाम्नाते–कथन करणारे ' तूं मी आहें व मी तूं आहेस ' अशा उभयोच्चारणानें त्याला तसें विशेषित–विशिष्ट करितात. [–" पण उभयरूप उच्चारण केलें असलें तरी प्रतिज्ञासिद्धि कशी होते ? " ' **तच्च०** ' इत्यादि उत्तर–]=आणि तें उभयरूप उच्चारण उभयरूप मति कर्तव्य असली तरच अर्थ-वत् होतें. [–'**अन्यथा०**' इत्यादि भाष्यानें हेंच व्यतिरेकानें विशद करितात–] =कारण तसें नसल्यास विशेषानें–विशेषेंकरून हें उभयाम्नान–उभयरूप उच्चा-रण अनर्थक–व्यर्थ होतें. कारण एका आम्नानानेंच–उच्चारणानेंच एकरूप मति सिद्ध झाली असती. [ जीवामध्यें एक ब्रह्मबुद्धिच जर कर्तव्य असती तर ' त्वं अहं '–तूं मी आहें, एवढ्या एका आम्नानानेंच त्याची सिद्धि होत असल्या-मुळें उभयोच्चारण व्यर्थ होतें, म्हणून त्या उभयरूप उच्चारणाची अन्यथा उप-पत्तिच लागत नसल्यामुळें उभयरूपच मति करावी, असा भावार्थ.–' **ननु०** ' इत्यादि भाष्यानें वादी पूर्वोक्ताचें स्मरण देतो–]

**भाष्यं—ननूभयाम्नानस्य अर्थविशेषे परिकल्प्यमाने देवतायाः संसार्यात्मत्वापत्तेर्निकर्षः प्रसज्येतेत्युक्तम् । नैष दोषः । ऐकात्म्यस्यैवानेन प्रकारेणानुचिंत्यमानत्वात् ॥**

**भाष्यार्थ**—अहोपण, या उभयाम्नानाचा अर्थविशेष कल्पिला गेल्यास देवतेला संसारि-आत्मत्व प्राप्त होत असल्यामुळें तिच्या अपकर्षाची प्राप्ति होते, असें आम्हीं वर सांगितलें आहे !–पृ.१९५–[–निर्गुणाच्या सगुणोक्तीप्रमाणें अन्योन्यात्मरूपानें येथें केवल ध्यानाचेंच विधान असल्यामुळें देवतेला निकृष्टता वस्तुतः प्राप्त होत नाहीं, असें सांगतात–]=' **नैषः०** '–हा दोष येत नाहीं. कारण या अन्योन्यात्मत्वप्रकारानें एकात्मत्वालाच अनुचिन्त्यमानत्व आहे–एकात्मतेचेंच अनुचिंतन केलें जातें. [ ईश्वराचे ठिकाणीं जीवाच्या तादात्म्याचा आरोप करून त्याला उपास्यत्व असल्यामुळें ईश्वराच्या उत्कर्षाची निवृत्ति होत नाहीं, असा भावार्थ.–पण वचनामुळें दोन्ही ठिकाणीं दोहोंचें अनुचिंतन करावें, असें झालें असतां मीं सांगितलेलेंच प्राप्त होतें, अशी '**ननु०**' इत्यादि भाष्यानें शंका–]

**भाष्यं—नन्वेवं सति स एवैकत्वदृढीकार आपद्येत । न वयमेकत्वदृढीकारं वारयामः । किं तर्हि, व्यतिहारेणेह द्विरूपा मतिः कर्तव्या वचनप्रामाण्यान्नैकरूपेत्येतावदुपपादयामः । फलतस्त्वेकत्वमपि दृढीभवति । यथा आध्यानार्थेऽपि सत्यकामादिगुणोपदेशे तद्गुण ईश्वरः प्रसिध्यति तद्वत् । तस्मादयमाध्यातव्यो व्यतिहारः समाने च विषये उपसंहर्तव्यो भवतीति ॥ ३७ ॥**

**भाष्यार्थ**—'अहोपण, असें झालें असतां तोच एकत्वाचा दृढीकार प्राप्त होतो !' [–" येथें त्या ध्यानाच्या साहचर्यानें आपोआपच एकत्वहि दृढ होतें, असें तुम्हांकडून सांगितलें जातें कीं ' तत्त्वमसि ' इत्यादि वाक्याप्रमाणें तेंच उपदेशिलें जातें ? " असा विकल्प करून त्यांतील पहिल्या कल्पाचें '**न०**' इत्यादि भाष्यानें निरसन–]=आम्ही एकत्वाच्या दृढीकाराचें निवारण करीत नाहीं. [ दुसरा कल्पहि संभवत नाहीं. कारण या वाक्याला ध्यानविधिपरत्व आहे, असें ' **किं तर्हि०** ' इत्यादि भाष्यानें म्हणतात–]=तर मग काय ?–येथें–या उदाहरणांत व्यतिहारानें –परस्पर विशेषण-विशेष्यभावानें द्विरूप मति वचनप्रामाण्यामुळें करावी, एकरूप मति करूं नये, असें हें एवढेंच उपपादन करितों. [–"पण येथें एकत्व-ज्ञानाचेंहि भान होत असल्यामुळें याला तत्परत्व कां नाहीं ? " '**फलतः०**' इत्यादि भाष्यानें उत्तर–]=पण फलतः म्ह० अर्थात् एकत्वहि दृढ होतें. [–" अहोपण, या वाक्याला जर उपासनापरत्व आहे तर अर्थतः तरी एकत्वदृढीकरण कसें होईल ?"

'**यथा०**' इत्यादि भाष्यानें उत्तर-]=ज्याप्रमाणें आध्यानासाठीं-चिंतनासाठीं -उपासनेसाठीं असलेल्याहि सत्यकामादि-गुणोपदेशांत त्या गुणांनीं युक्त असा ईश्वर प्र-सिद्ध होतो त्याप्रमाणें. [ अन्यपर असलेल्याहि वाक्याला दुसऱ्या प्रमाणाशीं विरोध येत नसल्यास त्या प्रमाणान्तरविरुद्ध अर्थी प्रमाणत्व आहे, असा भावार्थ.-'**तस्मात्०**' इत्यादि भाष्यानें उभयोच्चारणसामर्थ्यानें सिद्ध झालेल्या अर्थाचा उपसंहार-]=तस्मात् हा व्यतिहार आध्यान करण्यास-चिंतन करण्यास योग्य आहे, त्याचें ध्यान करावें. [-व्यतिहाराचें अनुचिंतन करावें, असें जें सांगितलें आहे त्याची पादसंगति सुचवितात-]='**समाने च०**'-आणि तो समान-विषयामध्यें म्ह० जेथें जेथें अहंग्रहानें उपासना सांगितलेली असते तेथें तेथें उप-संहार करण्यास योग्य आहे. '**इति**'-याप्रमाणें उभयरूप मति केली असतां एकत्व अर्थतः दृढ होतें. ३७.-सु. ब्र. ३५५. ( २३ )

( २४. सत्यविद्याधिकरण. सू. ३८. )

—जीव व ब्रह्म यांच्या अन्योन्यात्मत्वकथनाच्या भेदामुळें द्विरूप मति अनुष्ठेय आहे, असें सांगितलें. आतां 'या लोकांस जिंकतो व पापाचा नाश करितो' असा फलोक्तीचा भेद असल्यामुळें विद्याभेद आहे, अशी आशंका घेऊन '**सैव०**' इत्यादि सूत्र केलें आहे—

**सूत्रं—सैव हि सत्यादयः ॥ ३८ ॥ ( २४ )**

**सूत्रार्थ**—'महद्यक्षं०' इत्यादि वाक्याच्या पुढील 'तद्यत्तत्सत्यं०' इत्यादि वाक्योक्त विद्याहि 'तीच'-सत्य विद्या आहे. म्हणून 'सत्यादयः'-तिच्यामध्यें सत्यादि गुणांचा उपसंहार करावा. ३८ ( २४ )-सु. ब्र. ३५६. [-'**स यो ह०**' इत्यादि भाष्यानें सत्यविद्येला उदाहृत करितात-]

**भाष्यं—'स यो हैतं महद्यक्षं प्रथमजं वेद सत्यं ब्रह्म' इत्यादिना वाजसनेयके सत्यविद्यां सनामाक्षरोपासनां विधायानंतरमाम्नायते—'तद्यत्तत्सत्यमसौ स आदित्यो य एष एतस्मिन्मंडले पुरुषो यश्चायं दक्षिणेऽक्षन्पुरुषः' इत्यादि । तत्र संशयः-किं द्वे एते सत्यविद्ये किंवैकैवेति ॥**

**भाष्यार्थ**—"तो जो कोणी या महत्, पूज्य प्रथमजाला सत्य ब्रह्म असें जाणतो (तो या लोकांना जिंकितो)"-बृ. ५. ४. १ सु. उ. ७१२-इत्यादि वचनानें वाजसनेयकांत नामाक्षरांच्या उपासनेसह सत्यविद्येचें विधान करून त्यानंतर "तें जें तें सत्य तो हा आदित्य कीं जो हा या मंडलांत पुरुष आहे व जो हा दक्षिण नेत्रांत पुरुष आहे."-सु. उ. ७१३-इत्यादि सांगितलें जातें.

[ या वाक्यांतील ' तो जो ' या दोन सर्वनामांनीं अविशेषानें–सामान्यतः कोणीहि अधिकारी सांगितला आहे. ' ह एतं ' येथील 'ह' हा शब्द उपास्याच्या प्रसिद्धी-साठीं आहे. ' एतं ' यांतील ' एतत् ' या सर्वनामानें बुद्धिस्थ उपास्याचा परामर्श केला जातो. 'महत्' या विशेषणानें त्याचें व्यापकत्व सांगितलें आहे. 'यक्ष' म्ह० पूज्य, ' प्रथमज' म्ह० भौतिकांमध्यें प्रथम झालेलें 'सत् व त्यत्'–सत्य ब्रह्म –हिरण्यगर्भाख्य ब्रह्म त्याची जो उपासना करितो त्याचें लोकजय हें फल आहे, असा भावार्थ. ' तदेतदक्षरं सत्यं० ' अशा या वाक्यानें ' स ' असें हें एक अक्षर, इत्यादि प्रकारें ' सत्य ' या नांवानें विशिष्ट असें उपासन सांगितलें आहे, असें भाष्यांतील ' सनामाक्षर ' या पदानें म्हटलें आहे. ' तत् '–ब्रह्माचें हृदयात्मत्व सिद्ध झालें असतां ' यत् तत् '–तें जें हृदयाख्य सत्य ब्रह्म 'सः असौ आदित्यः' –तो हा आदित्य आहे, अशी दुसऱ्या वाक्याची योजना करावी. त्यांतील विशेष्य आदित्य असल्यामुळें त्याचा ' सः ' असा पुंलिंगानें निर्देश केला आहे. तो केवल मंडलमात्र असेल, असें कोणाला वाटेल म्हणून 'जो हा या मंडलांत पुरुष आहे' असें म्हणून आदित्यमंडलमात्राची व्यावृत्ति केली आहे. ' आणि जो हा दक्षिण-नेत्रांतील पुरुष ' या वाक्यानें त्याचेंच आध्यात्मिकत्व सांगितलें आहे.–याप्रमाणें या दोन वाक्यांत सांगितलेल्या सत्यविद्येला विषय करून 'फलाचा भेद' व 'प्रकृताचें आकर्षण ' या दोन कारणांनीं संशय सांगतात–]=' तत्र० '–त्याविषयीं ' ह्या काय दोन सत्य विद्या आहेत कीं एकच ' असा संशय येतो. [–या अधिकरणांत विद्याभेद व अभेद यांच्या विचारद्वारा वाक्यार्थज्ञानहेतूचेंच कथन केलेलें असल्यामुळें याच्या पादादिसंगति आहेत. पूर्वपक्षांत ' गुणांची त्या त्या विद्येंत व्यवस्था–नियम ' व सिद्धान्तांत 'त्यांची अव्यवस्था–अनियम' अशा अभिप्रायानें ' द्वे इति० ' इत्यादि भाष्यानें पूर्वपक्ष–]

**भाष्यं—द्वे इति तावत्प्राप्तम् । भेदेन हि फलसंयोगो भवति 'जयतीमाँल्लोकान्' इति पुरस्तात् । 'हन्ति पाप्मानं जहाति च' इत्युपरिष्टात् । प्रकृताकर्षणं तूपास्यैकत्वादिति ॥**

**भाष्यार्थ**–अगोदर त्या दोन विद्या आहेत, असें प्राप्त झालें. [ ' सत्य ' या नांवांतील अक्षरत्रयविशिष्टब्रह्माहून ' अहर्-अहं-'गुणविशिष्ट ब्रह्माला विलक्षणत्व आहे. म्हणून रूपभेदामुळें विद्याभेद, असा भावार्थ.–त्याविषयींच वादी फलसंयोगभेद हें हेत्वन्तर ' भेदेन० ' इत्यादि भाष्यानें सांगतो–]=आणि फलसंयोगहि भेदानें होतो, ' या लोकांस जिंकतो '–पृ.३९८–असें पूर्वीच्या उपासनेचें व

'पापाला मारितो व सोडतो '–सु. उ. पृ. ७१४–असें पुढील उपासनेचें फल सांगितलें आहे. [–"अहोपण, 'तत् यत्' असें पूर्वप्रकृताचेंच पुढें आकर्षण केलेलें आहे. म्हणून सत्यनामाक्षरविशिष्ट ब्रह्माचेंच पुढें स्थानगुणसंबंधकथन केलेलें असल्यामुळें दोहोंचें रूपैक्य आहे. तेव्हां विद्येला नानात्व कोठून असणार ?" 'प्रकृत०' इत्यादि भाष्यानें वादी समाधान सांगतो–]=पण उपास्याला एकत्व असल्यामुळें 'तत् यत्' या शब्दांनीं प्रकृताचें आकर्षण केलें आहे. 'इति'–असा पूर्वपक्ष प्राप्त होतो. [ फलाचा भेद सांगितला असल्यामुळें नित्य व काम्य दर्श-पूर्णमासांप्रमाणें अनुबंधाचा जरी अभेद असला तरी विद्येला नानात्व आहे, असा भावार्थ.–याप्रमाणें 'विद्येच्या भेदामुळें गुणांची व्यवस्था' या पक्षाचा 'एवं०' इत्यादि भाष्यानें अनुवाद करून 'सैव' या सूत्रावयवानें सिद्धान्त–]

**भाष्यं—एवं प्राप्ते ब्रूमः– एकैवेयं सत्यविद्येति । कुतः । 'तद्यत्तत्सत्यम्' इति प्रकृताकर्षणात् । ननु विद्याभेदेऽपि प्रकृताकर्षणं उपास्यैकत्वादुपपद्यत इत्युक्तम् । नैतदेवम् । यत्र तु विस्पष्टात्कारणान्तराद्विद्याभेदः प्रतीयते, तत्रैतदेवं स्यात् । अत्र तूभयथा संभवे 'तद्यत्तत्सत्यं' इति प्रकृताकर्षणात्पूर्वविद्यासंबद्धमेव सत्यमुत्तरत्राकृष्यत इत्येकविद्यात्वनिश्चयः ॥**

**भाष्यार्थ**—असा पूर्वपक्ष प्राप्त झाला असतां 'ही एकच सत्यविद्या आहे' असा सिद्धान्त आम्ही सांगतों. [–ह्याविषयीं सूत्रांतील 'हि'शब्दानें सुचविलेला हेतु प्रश्नपूर्वक सांगतात–]='कुतः०'–कोणत्या कारणानें ? 'तत् यत् तत् सत्यं' –'तें जें पूर्वोक्त हृदयाख्य सत्य ब्रह्म'–पृ. ३९८–असें प्रकृताचें आकर्षण केलें आहे. त्यामुळें ही एकच सत्य विद्या आहे. [–'खलु एतस्यैव अक्षरस्य उपव्याख्यानं'–"खरोखर याच अक्षराचें उपव्याख्यान, याप्रमाणें विद्याभेद जरी असला तरी प्रकृताकर्षण होईल," अशी शंका–]='ननु०' अहोपण विद्याभेद जरी असला तरी उपास्याच्या एकत्वामुळें प्रकृताकर्षण उपपन्न होतें, असें आम्हीं वर म्हटलें आहे. [–तेथें दुसऱ्या कारणामुळें अपवादानें विद्याभेद जरी असला, तरी प्रस्तुत उदाहरणांत तशा अपवादात्मक कारणाचा अभाव आहे. म्हणून 'तत्'-शब्दानें प्रकृताचें ग्रहण होऊन अभेदानें प्रत्यभिज्ञान होतें.त्यामुळें येथें विद्यैक्य आहे, असें समाधान–]='नैतद्०'–पण येथें तसें नाहीं. कारण 'खलु एतस्य०' इत्यादि जेथें अतिशय स्पष्ट फलभेदादि कारणान्तरामुळें विद्याभेद प्रतीत होतो तेथें हें –प्रकृताकर्षण असें विद्यैक्यव्यभिचारी होईल. 'अत्र तु०'–पण येथें–या सत्यविद्येंत उभयथा संभव–भेद व अभेद या दोन्ही प्रकारें उपपत्ति असतांना 'तद्यत्त-

स्सत्यं ' असें प्रकृताचें आकर्षण केलें असल्यामुळें पूर्वविद्यासंबद्धच सत्य पुढील वाक्यांत आकर्षण केलें जातें, असा एकविद्यात्वनिश्चय होतो. [–आतां या प्रकृत सत्यविद्येंतील फलसंयोगभेद भेदाचा उपपादक आहे, असें जें वाद्यानें वर –पृ. ४००–म्हटलें आहे त्याविषयीं ' यत्पुनः० '–इत्यादि भाष्यानें म्हणतात–]

**भाष्यं**—यत्पुनरुक्तं फलान्तरश्रवणाद्विद्यान्तरमिति । अत्रोच्यते–' तस्योपनिषदहरहं ' इति चांगान्तरोपदेशस्य स्तावकमिदं फलान्तरश्रवणमित्यदोषः । अपि चार्थवादादेव फले कल्पयितव्ये सति, विद्यैकत्वे चावयवेषु श्रूयमाणानि बहून्यपि फलान्यवयविन्यामेव विद्यायामुपसंहर्तव्यानि भवन्ति । तस्मात्सैवेयमेका सत्यविद्या तेन तेन विशेषणोपेताम्नाता । इत्यतः सर्वे एव सत्यादयो गुणा एकस्मिन्नेव प्रयोगे उपसंहर्तव्याः ॥

**भाष्यार्थ**—आतां ' फलान्तरश्रवणामुळें विद्यान्तर आहे ' असें जें वाद्यानें म्हटलें आहे, [–त्याला–फलान्तरश्रवणाला प्रशंसार्थवादत्व आहे, त्यामुळें त्याला फलविधित्व नाहीं, म्हणून फलसंयोगभेदाची सिद्धि होत नाहीं, असें ' अत्र० ' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=याविषयीं असें सांगितलें जातें–' त्याचें उपनिषद्–रहस्य नांव ' अहर् ' ' अहं ' आहे ' अशा या अंगान्तरोपदेशाचें फलान्तरश्रवण हें स्तावक–प्रशंसावचन आहे, त्यामुळें वरील दोष येत नाहीं. [–आणखीं याहि कारणानें येथें फलभेदामुळें विद्याभेद नाहीं, असें ' अपि च० ' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=शिवाय फलभेदामुळें येथें विद्याभेद नाहीं, याविषयीं आणखीहि एक कारण आहे. [–विधीच्या उद्देशांत फलान्तराचें श्रवण नाहीं. म्हणून रात्रिसत्राप्रमाणें फलाची कल्पना करणें युक्त आहे, असें झालें असतां अगृहीत विशेषत्वानें सर्वेहि फलाच्या तत्संबंधित्वाची कल्पना होते. म्हणून फलभेदामुळें विद्याभेदाची शंका संभवत नाहीं, असें '**अर्थवादादेव**०' इत्यादि भाष्यानें सांगतात–] =अर्थवादावरूनच फल कल्पयितव्य–कल्पना करण्यास योग्य आहे, असें झालें असतां आणि विद्येला एकत्व आहे, असें झालें असतां अवयवांमध्यें श्रुत असलेलीं अनेक फलेंहि अवयविनी–त्या अवयवांनीं युक्त असलेल्या विद्येमध्येंच उपसंहर्तव्य–उपसंहारास योग्य होतात. [–याप्रमाणें अपवादरहित हेतु सांगून प्रतिज्ञात विद्यैक्याचा उपसंहार करितात–]=' **तस्मात्**० '–म्हणून तीच ही एक सत्यविद्या त्या त्या विशेषणानें युक्त अशी सांगितलेली आहे. [–आतां अवशिष्ट सूत्रावयवाचें व्याख्यान करणारे भाष्यकार पूर्वापरवाक्यार्थविशेषणें एक करून ध्यान करावें, असें ' **इत्यतः** ० ' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=असें असल्यामुळें

सत्यादि सर्व गुण एकाच प्रयोगामध्यें उपसंहर्तव्य आहेत. [–'**केचित्०**' इत्यादि भाष्यानें परकीयांच्या व्याख्येला उत्थापित करितात–]

**भाष्यं—केचित्पुनरस्मिन्सूत्रे इदं च वाजसनेयकमक्ष्यादित्यपुरुषविषयं वाक्यं। छांदोग्ये च–'अथ य एषोऽन्तरादित्ये हिरण्मयः पुरुषो दृश्यते' 'य एषोऽक्षिणि पुरुषो दृश्यते' इत्युदाहृत्य। सैवेयमक्ष्यादित्यपुरुषविषया विद्योभयत्रैकैवेति कृत्वा सत्यादीन्गुणान्वाजसनेयिभ्यश्छंदोगानामुपसंहार्यान् मन्यन्ते ॥**

**भाष्यार्थ**—पण दुसरे कित्येक व्याख्याकार या सूत्रांत हें वाजसनेयकांतील अक्ष्यादित्यपुरुषविषय वाक्य व छांदोग्यांतील "आतां जो हा आदित्यांत हिरण्मय पुरुष दिसतो"–छां. १. ६. ६–"जो हा अक्षीमध्यें पुरुष दिसतो" –छां. ४.१५.१.–हें वाक्य उदाहृत करून तीच ही अक्षि-आदित्यपुरुषविषया विद्या दोन्ही ठिकाणीं एकच आहे, असें मानून वाजसनेयींपासून छंदोगांना सत्यादिगुण उपसंहार्य–उपसंहार करण्यास योग्य आहेत, असें मानितात.[–'**तन्न०**' इत्यादि भाष्यानें त्याला दूषित करितात–]

**भाष्यं—तन्न साधु लक्ष्यते। छांदोग्ये हि कर्मसंबंधिनीयमुद्गीथव्यपाश्रया विद्या विज्ञायते। तत्र ह्यादिमध्यावसानेषु कर्मसंबंधिचिह्नानि भवन्ति 'इयमेवर्गग्निः साम' इत्युपक्रमे। 'तस्यर्क्च साम च गेष्णौ तस्मादुद्गीथः' इति मध्ये।'य एवं विद्वान्साम गायति' इत्युपसंहारे। नैवं वाजसनेयके किंचित्कर्मसंबंधि चिह्नमस्ति। तत्र प्रक्रमभेदाद्विद्याभेदे सति गुणव्यवस्थैव युक्तेति ॥३८॥ (२४)**

**भाष्यार्थ**—पण तें साधु–निर्दोष आहे, असें दिसत नाहीं. कारण छांदोग्यांत कर्मसंबंधी म्ह० ज्योतिष्टोमांगभूत उद्गीथाचा विशेषेंकरून आश्रय केलेली विद्या विज्ञात होते. [–'कर्मसंबंधी येथील 'कर्म' म्ह० ज्योतिष्टोम, विद्येचें तदंगभूत–उद्गीथव्यपाश्रयत्वच विशद करितात–]='**तत्र हि०**'–कारण त्यांत आदि, मध्य व अंत, या तिन्ही स्थानीं कर्मसंबंधी चिह्नें आहेत. "ही पृथिवीच ऋक्, अग्नि साम"–छां. १.६.१–असें उपक्रमांत "त्याचे ऋक् व साम हे गेष्ण–बोटाचीं पेरें आहेत. [–उद्गीथशब्दवाच्य ऋक्सामगेष्णत्वामुळें परमात्मा उद्गीथशब्दवाच्य आहे, असें श्रुति सांगते–]='**तस्मात् उद्गीथः**'–त्यामुळें परमात्मा उद्गीथ आहे" –छां. १. ६. ८–असें मध्यें, "जा असें जाणणारा साम गातो"–छां. १. ७.९. –असें उपसंहारांत, अशीं कर्मसंबंधी चिह्नें आहेत. ['अथ य एषोऽन्तरादित्ये०' या उपासनेच्या आदि-मध्य-अवसानांत कर्मांगभूत पृथिव्यादि दृष्टिविशिष्ट ऋक् व

साम यांचें ध्येयत्व उपलब्ध होत असल्यामुळें आदित्य-अक्षिपुरुषविशिष्ट कर्मांग-भूत उद्गीथाचें ध्यान छांदोग्यांत अभीष्ट आहे, असा भावार्थ.–'वाजसनेयकांतहि कर्मांगावबद्धच ध्यान इष्ट आहे, त्यामुळें विद्यानानात्व नाहीं,' अशी आशंका घेऊन 'नैवं०' इत्यादि सांगतात–]=पण वाजसनेयकांत तसें कांहीं कर्मसंबंधी चिह्न नाहीं. [–नित्य व काम्य अग्निहोत्रांच्या धात्वर्थामध्यें भेद जरी नसला तरी साध्य भेदानें जसा भेद आहे त्याप्रमाणें उपास्याला ऐक्य जरी असलें तरी फलभेदानें त्या दोन विद्यांचा भेद आहे, असें झालें असतां गुणांचा उपसंहार नाहीं, असा उपसंहार करितात–]='तत्र०'–त्यांत प्रक्रमभेदामुळें–उपक्रमाच्या भेदामुळें विद्येचा भेद झाला असतां गुणांची त्या त्या विद्येंत व्यवस्थाच असणें युक्त आहे, असें सिद्ध झालें. ३८–सु. ब्र. ३५७. (२४)

## (२५. कामाद्यधिकरण. सू. ३९.)

—'तद्यत्तत्सत्यं' असें प्रकृताचें आकर्षण केलेलें असल्यामुळें, रूपाच्या अभे-दानें गुणांचा जर उपसंहार होत असेल तर कोठें आकाशाचें उपास्यत्व व कोठें त्याच्या आश्रयाचें ज्ञेयत्व, अशा रूपभेदामुळें गुणांचा अनुपसंहार होईल, अशी आशंका घेऊन सूत्रकार 'कामादि०'इत्यादि सूत्रानें समाधान सांगतात—

## सूत्रं—कामादीतरत्र तत्र चायतनादिभ्यः ॥ ३९ ॥ (२५)

**सूत्रार्थ—**छान्दोग्यांत 'दहरोऽस्मिन् अन्तराकाशः' व बृहदारण्यकांत 'य एषोऽन्तर्हृदय आकाशः' असें श्रुत आहे. त्यांतील छन्दोग्यस्थ सत्यकामादिगुण-जात इतरत्र–बृहदारण्यकांत घ्यावें व 'तत्र च'–बृहदारण्यकांतील सर्ववशित्वा-दिकांचा छान्दोग्यांत उपसंहार करावा. 'आयतनादिकांमुळें'–हृदयायतन, सेतुत्व-व्यपदेश इत्यादि हेतु समान असल्यामुळें. ३९. (२५)–सु.ब्र. ३५८–[–'अथ०' इत्यादि भाष्यानें सगुण-निर्गुणविद्याविषय वाक्य उदाहृत करितात–]

**भाष्यं—'अथ यदिदमस्मिन्ब्रह्मपुरे दहरं पुंडरीकं वेश्म दहरोऽस्मिन्नंतरा-काशः' इति प्रस्तुत्य छन्दोगा अधीयते–'एष आत्माऽपहतपाप्मा विजरो विमृत्युर्विशोको विजिघत्सोऽपिपासः सत्यकामः सत्यसंकल्पः' इत्यादि। तथा वाजसनेयिनः–'स वा एष महानज आत्मा योऽयं विज्ञानमयः प्राणेषु य एषोऽन्तर्हृदय आकाशस्तस्मिञ्छेते सर्वस्य वशी' इत्यादि। तत्र विद्यैकत्वं पर-स्परगुणयोगश्च किं वा नेति संशये विद्यैकत्वमिति ॥**

**भाष्यार्थ—**"नंतर हें जें या ब्रह्मपुरांत-शरीरांत सूक्ष्म कमलाकार स्थान आहे व त्यांत जो सूक्ष्म आकाश आहे," असा प्रस्ताव–आरंभ करून छंदोग

"हा आत्मा, अपहतपाप्मा-निष्पाप, विजर-जरारहित, विमृत्यु, विशोक, अशनायारहित, पिपासारहित, सत्यकाम सत्यसंकल्प"-छां. ८. १. ५.-इत्यादि पाठ करितात. त्याचप्रमाणें वाजसनेयिशाखाध्यायी "तोच हा महान् अज आत्मा, जो हा प्राणांतील विज्ञानमय, जो हा अन्तर्हृदयस्थ आकाश त्यांत शयन करितो-राहतो सर्वांचा वशी"-बृ. ४. ४. २२-इत्यादि पढतात. 'तत्र०'-त्यांतील विद्यांना एकत्व व परस्पर गुणांचा योग-संबंध-उपसंहार आहे कीं नाहीं, असा संशय आला असतां विद्यैकत्व हा पक्ष प्राप्त होतो. [या पर व अवर विद्येंतील वशित्वादि व सत्यकामादि गुण हे या अधिकरणाचे विषय आहेत. ते त्या दोन विद्यांमध्यें परस्पर उपसंहर्तव्य नाहींत कीं उपसंहार करण्यास योग्य आहेत, असा त्या दोन प्रकारच्या गुणांचा त्या दोन विद्यांमध्यें उपयोग आहे कीं नाहीं, या दोन कारणांनीं संशय आला असतां ध्यान व स्तुति यांच्या उपयोगित्वानें गुणांच्या परस्पर उपसंहारकथनानें वाक्यार्थज्ञान व त्याचा हेतु यांचें येथें चिंतन केलेलें असल्यामुळें याच्या पादादिसंगति आहेत. पूर्वपक्षांत 'कोठें आकाशाचें ध्येयत्व व क्वचित् त्याच्या आश्रयाचें ज्ञेयत्व, अशा विशेषाची सिद्धि' व सिद्धान्तांतहि 'ब्रह्मालाच आकाशशब्दत्व असल्यामुळें उक्त विशेषाची उपपत्ति' असा फलभेद स्वीकारून 'तत्र०' इत्यादि भाष्यानें सिद्धान्त-]

**भाष्यं—तत्रेदमुच्यते- कामादीति । सत्यकामादीत्यर्थः । यथा देवदत्तो दत्तः सत्यभामा भामेति । यदेतच्छांदोग्ये हृदयाकाशस्य सत्यकामत्वादिगुणजातमुपलभ्यते तदितरत्र वाजसनेयके 'स वा एष महानज आत्मा' इत्यत्र संबध्यते । यच्च वाजसनेयके वशित्वाद्युपलभ्यते तदपीतरत्र छांदोग्ये 'एष आत्माऽपहतपाप्मा' इत्यत्र संबध्यते । कुतः आयतनादिसामान्यात् । समानं ह्युभयत्रापि हृदयमायतनं, समानश्च वेद्य ईश्वरः, समानं च तस्य सेतुत्वं लोकासंभेदप्रयोजनमित्येवमादि बहु सामान्यं दृश्यते ॥**

**भाष्यार्थ**—असा पक्ष प्राप्त झाला असतां 'कामादि' असें हें सांगितलें जातें-कामादि म्ह० सत्यकामादि असा भावार्थ. [अवयववाचकशब्दानें अवयवीच्या ग्रहणाविषयीं दृष्टान्त-]='यथा०'-ज्याप्रमाणें 'देवदत्त' या शब्दाचा 'दत्त' असा व 'सत्यभामा' या शब्दाचा 'भामा' असा एकदेशानें निर्देश करितात त्याप्रमाणें 'सत्यकामादि' याचा सूत्रांत 'कामादि' असा अवयवानें निर्देश केला आहे. [-याप्रमाणें पदार्थ सांगून 'यदेतत्०' इत्यादि भाष्यानें वाक्यार्थ सांगतात-]=छांदोग्यांत हृदयाकाशाचें हें जें सत्यकामत्वादि गुणजात उपलब्ध

होतें तें 'इतरत्र'–वाजसनेयकांतील 'तोच हा महान् अज आत्मा' अशा यामध्यें संबद्ध होतें आणि वाजसनेयकांत जें वशित्वादि गुणजात उपलब्ध होतें तेंहि 'इतरत्र०'–छांदोग्यांतील 'हा आत्मा अपहतपाप्मा' अशा यामध्यें संबद्ध होतें. कोणत्या कारणानें? 'आयतनादि सामान्यामुळें' [–'समानं०' इत्यादि भाष्यानें उक्त हेतूचें विवरण–]=कारण दोन्ही ठिकाणीं हृदय हें आयतन समान आहे. वेद्य ईश्वरहि समान आहे. लोकांचा असंभेद–लोकमर्यादेचा भंग न होणें, हें ज्याचें प्रयोजन आहे, असें त्याचें सेतुत्वहि समान आहे, हें अशा प्रकारचें पुष्कळसें सादृश्य उपलब्ध होतें. [भाष्यांतील 'इत्येवमादि' येथील 'आदि-'शब्दानें आत्मत्वादिकांचें ग्रहण केलें जातें. बहुतर साम्य दिसत असल्यामुळें परस्पर गुणोपसंहार होतो, असा भावार्थ.–'ननु०' इत्यादि भाष्यानें या अधिकरणाचा पूर्वपक्ष सांगतात–]

**भाष्यं—ननु विशेषोऽपि दृश्यते छांदोग्ये हृदयाकाशस्य गुणयोगो, वाजसनेयके त्वाकाशाश्रयस्य ब्रह्मण इति। न। 'दहर उत्तरेभ्यः' इत्यत्र छांदोग्येऽप्याकाशशब्दं ब्रह्मैवेति प्रतिष्ठापितत्वात्॥**

**भाष्यार्थ**—अहोपण 'छांदोग्यांत हृदयाकाशाचा गुणयोग–गुणसंबंध, पण वाजसनेयकांत आकाशाश्रय ब्रह्माचा गुणयोग' असा विशेषहि उपलब्ध होतो. [–हा विशेष नाहीं. कारण छांदोग्यांतहि आकाशाला ब्रह्मत्व आहे, असें 'न०' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=नाहीं, तसा विशेष नाहीं. कारण 'दहर उत्तरेभ्यः' –पुढील हेतूंवरून दहर परमात्मा आहे.–ब्र. भा. १.३.१४ पृ.५१९–या सूत्रांत छांदोग्यांतहि दहरशब्द ब्रह्मच आहे, 'दहराकाश' या शब्दाचा अर्थ ब्रह्म आहे, असें प्रस्थापित केलेलें आहे.[–"अहोपण, सगुणत्व व निर्गुणत्व यांमुळें त्या विद्यांचा भेद आहे. म्हणून अपहतपाप्मत्वादि व वशित्वादि यांचा परस्परांत उपसंहार होत नाहीं," अशी आशंका घेऊन 'अयं तु०' इत्यादि भाष्यानें म्हणतात–]

**भाष्यं—अयं त्वत्र विद्यते विशेषः सगुणा हि ब्रह्मविद्या छांदोग्ये उपदिश्यते 'अथ य इहात्मानमनुविद्य व्रजन्त्येतांश्च सत्यान्कामान्' इत्यात्मवत्कामानामपि वेद्यत्वश्रवणात्। वाजसनेयके तु निर्गुणमेव परं ब्रह्मोपदिश्यमानं दृश्यते 'अत ऊर्ध्वं विमोक्षाय ब्रूहि' 'असंगो ह्ययं पुरुषः' इत्यादि प्रश्नप्रतिवचनसमन्वयात्। वशित्वादि तु स्तुत्यर्थमेव गुणजातं वाजसनेयके संकीर्त्यते। तथा चोपरिष्टात् 'स एष नेति नेत्यात्मा' इत्यादिना निर्गुणमेव ब्रह्मोप-**

**संहरति । गुणवतस्तु ब्रह्मण एकत्वाद्विभूतिप्रदर्शनायायं गुणोपसंहारः सूत्रितो नोपासनाय इति द्रष्टव्यम् ॥ ३९ ॥ (२५)**

**भाष्यार्थ**--पण त्यांत हा विशेष आहे. छांदोग्यांत सगुण ब्रह्मविद्येचाच उपदेश केला जातो. कारण "आतां जे येथें आत्म्याला जाणून शरीर सोडून जातात व जे या सत्य कामांस प्राप्त होऊन जातात"–छां. ८. १. ६–असें आत्म्याप्रमाणें कामांचेंहि वेद्यत्व श्रुत आहे. पण वाजसनेयकांत निर्गुणच ब्रह्म 'उपदिश्यमान'–उपदेश केलें जात आहे, असें दिसतें. कारण "या पुढें मोक्षाचें साधनच सांग" व "हा पुरुष असंग आहे"–बृ. ४. ३. १४-१९–इत्यादि प्रश्न-प्रतिवचनांचा निर्गुण ब्रह्मामध्यें समन्वय होतो. [–"अहो पण वाजसनेयकांतहि वशित्वादि गुणांचा उपदेश उपलब्ध होत असल्यामुळें ब्रह्म सगुणच आहे" अशी आशंका घेऊन सांगतात–]=' **वशित्वादि तु०**'–पण वाजसनेयकांत वशित्वादि गुणजात स्तुतीसाठींच सांगितलें जातें. [–'**तथा च०**' इत्यादि भाष्यानें त्याविषयीं निर्णायकत्वानें वाक्यशेष दाखवितात–]=आणि श्रुति पुढें तसाच 'तो हा नेति नेति आत्मा'–बृ. ३. ९. २६–इत्यादि वाक्यानें निर्गुणच ब्रह्माचा उपसंहार करिते. [–"तर मग गुणोपसंहार कसा सूत्रित केला आहे?" '**गुणवतस्तु०**' इत्यादि भाष्यानें उत्तर–]=पण गुणवान्–त्या गुणांनीं युक्त असलेल्या ब्रह्माला एकत्व असल्यामुळें त्याच्या विभूतींचें प्रदर्शन करण्यासाठीं हा गुणोपसंहार सूत्रकारांनीं सूत्रांत सांगितला आहे. उपासनेसाठीं तो सूत्रांत सूत्रित केलेला नाहीं, असें जाणावें. [ध्येय व स्तूयमान–स्तुति केल्या जाणाऱ्या ब्रह्माचें साम्य-बाहुल्य असल्यामुळें व परस्पर विद्यांमध्यें त्याचें सांनिध्य असल्यामुळें, कांहीं ठिकाणीं उपास्यत्वासाठीं व कांहीं ठिकाणीं स्तुतिपौष्कल्यासाठीं गुण आकांक्षित असल्यामुळें, ब्रह्मामध्यें त्या त्या गुणसंयोगाची योग्यता असल्यामुळें वशित्वादि व अपहतपाप्मत्वादि यांचा दोन्ही विद्यांमध्यें परस्पर उपसंहार होतो. कारण स्तुति दृष्ट या द्वारानेंच करणें शक्य आहे. त्यामुळें सगुणविद्यांमध्यें ध्येयत्वानें सांगितलेल्याहि गुणांचा निर्गुण-विद्येमध्यें स्तुत्यर्थत्वानें अन्वय होतो. पण ध्येयत्व केवळ अपूर्वविधीनेंच ज्ञात होणारें आहे. जेथें वशित्वादि गुण श्रुत आहेत तेथें त्यांचें ध्येयत्वानें विधान नाहीं. त्यामुळें अन्य विद्येंत उपसंहारानें प्राप्त झालेल्याहि त्यांना ध्येयत्व नाहीं. तर त्यांना स्तुत्यर्थत्व असेल.पण तें स्तुत्यर्थत्वहि शब्दतः तेथें त्यांच्या नयनाची–उपसंहाराची अपेक्षा करीत नाहीं. कारण सत्यकामत्वादि गुणांच्या सामर्थ्यानेंच सर्वेश्वर-

त्वादिकांची सिद्धि होते. यास्तव येथील उपसंहार म्हणजे केवल अन्तर्भाव आहे, असा याचा भावार्थ.–सु. ब्र. ३५९. ] ३९. ( ३९ )

( २६. आदराधिकरण. सू. ४०-४१. )

—उपासनेचा जरी लोप झाला तरी स्तुत्यर्थत्वानें गुणांचा जसा अलोप होतो त्याप्रमाणें ' पूर्वोऽतिथिभ्यः ' इत्यादि श्रुतीच्या उपपत्तीसाठीं भोजनाचा जरी लोप झाला तरी प्राणाग्निहोत्राचा अलोप होतो, असा'आदरात्०'इत्यादि सूत्रानें आक्षेप–

**सूत्रं—आदरादलोपः ॥ ४०**

**सूत्रार्थ**—भोजनाचा जरी लोप झाला तरी प्राणाग्निहोत्राचा ' अलोप ' होतो. कोणत्या कारणानें ? ' आदरामुळें '–'अतिथींच्या पूर्वी भोजन करावें ' या पूर्व-भोजनाच्या प्राथम्यरूप धर्माचा लोप सहन न करणाऱ्या जाबालश्रुतीनें प्राणाग्नि-होत्राविषयीं आदर दाखविला आहे. ४०.–सु. ब्र. ३६०. [–' छान्दोग्ये० ' इत्यादि भाष्यानें वैश्वानरविद्यागत प्राणाग्निहोत्राचा या अधिकरणाच्या विषयत्वानें उपन्यास करितात––]

**भाष्यं**—**छान्दोग्ये वैश्वानरविद्यां प्रकृत्य श्रूयते–' तद्यद्भक्तं प्रथममागच्छे-त्तद्धोमीयं स यां प्रथमामाहुतिं जुहुयात्तां जुहुयात्प्राणाय स्वाहा' इत्यादि । तत्र पंच प्राणाहुतयो विहिताः । तासु च परस्तादग्निहोत्रशब्दः प्रयुक्तः ' य एतदेवं विद्वानग्निहोत्रं जुहोति ' इति ' यथेह क्षुधिता बाला मातरं पर्युपासते । एवं सर्वाणि भूतान्यग्निहोत्रमुपासते ' इति च ॥**

**भाष्यार्थ**—छान्दोग्यांत वैश्वानरविद्येला आरंभ करून–त्या विद्येचें प्रकरण आरंभून " तें जें भक्त–अन्न प्रथम पुढें येईल त्याचा होम करावा. तो–वैश्वानर-विद्यावित् जी प्रथम आहुति देईल ती त्यानें ' प्राणाय स्वाहा' या मंत्रानें द्यावी" –छां. ५. १९. १. सु. उ. ३६०.–इत्यादि श्रुत आहे. [–' **तत्र०**' इत्यादि भाष्यानें श्रुतीच्या तात्पर्याचा संग्रह–]=त्यांत पांच प्राणाहुति विहित आहेत. [–' **तासु०** ' इत्यादि भाष्यानें पूर्वपक्षाचें बीज, असा संदेहासाठीं शब्दान्तरप्रयोग सांगतात–]=आणि त्या पांच आहुतींमध्यें पुढें अग्निहोत्रशब्दाचा प्रयोग केलेला आहे. " जो हें असें जाणणारा अग्निहोत्राचें हवन करितो (त्याला कांहीं पाप लागत नाहीं. ) "–छां. ५. २४. २–असा व " ज्याप्रमाणें व्यवहारांत क्षुधित अपत्यें मातेची उपासना करितात त्याप्रमाणें सर्वभूतें अग्निहोत्राची उपासना करि-तात "–छां. ५. २४. ५–असा अग्निहोत्रशब्दाचा पुढें प्रयोग केला आहे. [–या

प्राणाग्निहोत्राविषयीं ‘ यत्-’शब्द व ‘ अग्निहोत्र-’शब्द यांच्या योगानें ‘ **तत्र॰** ’ इत्यादि भाष्यानें संशय सांगतात-]

**भाष्यं—तत्रेदं विचार्यते-किं भोजनलोपे लोपः प्राणाग्निहोत्रस्य उतालोप इति । ‘ तद्यद्भक्तं ’ इति भक्तागमनसंयोगश्रवणाद्भक्तागमनस्य च भोजनार्थत्वाद्भोजनलोपे लोपः प्राणाग्निहोत्रस्येति ॥**

**भाष्यार्थ**-त्याविषयीं ‘ काय, भोजनाचा लोप झाला असतां प्राणाग्निहोत्राचा लोप होतो कीं त्याचा लोप होत नाहीं ’ असा विचार केला जातो. [ उपासनाविचाराच्या प्रस्तावानें त्यांतील प्रथमभोजनसंबंधी विचाराच्या द्वारा वाक्यार्थज्ञानहेतुविचारामध्यें प्रवेश होत असल्यामुळें याच्या पादादिसंगति आहेत. पूर्वपक्षांत ‘ प्रतिनिधिन्यायानें प्राणाग्निहोत्राच्या कर्तव्यतेचें नित्यत्व ’ व सिद्धान्तांत ‘ त्या न्यायाची येथें प्राप्तिच होत नसल्यामुळें प्राणाग्निहोत्राची अनावश्यकता ’ अशा आशयानें प्रस्तुत पूर्वपक्षसूत्रानें व्यावर्त्य अशी सिद्धान्ताची आशंका उत्थापित करितात-]=‘ **तद्यद्भक्तं॰** ’-‘ तें जें अन्न॰ ’ या वचनानें अन्नागमनाचा संयोग श्रुत असल्यामुळें व अन्नाचें आगमन भोजनार्थ असल्यामुळें भोजनाचा लोप झाला असतां प्राणाग्निहोत्राचा लोप होतो, असा पक्ष प्राप्त होतो. [प्राणाग्निहोत्राचा अन्नागमनाशीं संबंध असल्यामुळें व अन्नागमन भोजनार्थ असल्यामुळें भोजनाचा लोप झाला असतां प्राणाग्निहोत्राचा लोप होतो, असा संबंध. होमाला अन्नागमनाचें कारणत्व नाहीं. कारण होम भोजन या निमित्तानें आलेल्या अन्नावर निर्वाह करणारा आहे. त्यामुळें भोजनलोपपक्षीं त्याचाहि लोप होतो. अर्थात् येथें पूर्वपक्षाचा अभाव असल्यामुळें हें अधिकरण अनारम्य आहे, असा भावार्थ.-सूत्रानें पूर्वपक्षाचें ग्रहण करणारा वादी ‘**एवं॰**’ इत्यादि भाष्यानें अधिकरणारंभाचें उपपादन करितो-]

**भाष्यं—एवं प्राप्ते न लुप्येतेति तावदाह । कस्मात् । आदरात् । तथा हि वैश्वानरविद्यायामेव जाबालानां श्रुतिः-‘ पूर्वोऽतिथिभ्योऽश्नीयात् । यथा ह वै स्वयमहुत्वाग्निहोत्रं परस्य जुहुयादेवं तत्’ इत्यतिथिभोजनस्य प्राथम्यं निंदित्वा स्वामिभोजनं प्रथमं प्रापयन्ती प्राणाग्निहोत्रे आदरं करोति । या हि न प्राथम्यलोपं सहते नतरां सा प्राथम्यवतोऽग्निहोत्रस्य लोपं सहेतेति मन्यते ॥**

**भाष्यार्थ**--असा आक्षेप प्राप्त झाला असतां ‘ प्राणाग्निहोत्र भोजनाचा लोप झाला तरी लुप्त होत नाहीं, ’ असा पूर्वपक्ष वादी सिद्धान्तशंकेचें निरसन करून सांगतो. [ भाष्यांतील ‘ तावत् ’ हा शब्द सिद्धान्तशंकेच्या निरसनार्थ आहे.

पूर्वपक्षी '**कस्मात्०**' इत्यादि भाष्यानें प्रश्नपूर्वक आपल्या हेतूला अवतरण देतो–] =कोणत्या कारणानें? 'आदरामुळें' [–**तथा हि०**' इत्यादि भाष्यानें आदरच व्यक्त करितो–]=तो आदर कसा आहे तें पहा–"अतिथींच्या पूर्वी भोजन करावें" अशी वैश्वानरविद्येंतच जाबालांची श्रुति आहे. [–'**यथा ह०**' इत्यादि भाष्यानें विधीला अपेक्षित असलेला अर्थवाद दाखवितो–]="ज्याप्रमाणें स्वत: आपलें अग्निहोत्रहवन न करितां दुसऱ्याचें अग्निहोत्रहवन करावें, तसेंच तें–अतिथींच्या पूर्वी भोजन न करणें–आहे." अशी अतिथिभोजनाच्या प्राथम्याची निंदा करून स्वामिभोजन प्रथम प्राप्त करून देणारी ती श्रुति प्राणाग्निहोत्रामध्यें आदर करिते. [–"अहोपण, या अर्थवादांत स्वामिभोजनाच्या प्राथम्याच्या अभावाची निंदा केली जाते.पण तेवढ्यावरून भोजनाचा लोप झाला असतांहि प्राणाग्निहोत्र लुप्त होत नाहीं, हें कसें सिद्ध होतें?" '**या हि०**' इत्यादि भाष्यानें वादी उत्तर सांगतो–]=कारण जी श्रुति प्राथम्याचा लोप सहन करीत नाहीं ती प्राथम्यानें युक्त असलेल्या प्राणाग्निहोत्राचा लोप मुळींच सहन करणार नाहीं, असें वादी मानितो–समजतो. [अतिथीच्या भोजनोत्तरकालीं विहित असलेल्याहि स्वामिभोजनाचा निषेध करून अतिथिभोजनाच्या पूर्वीच प्राणाग्निहोत्रलक्षण स्वामिभोजनाचें प्रतिपादन करणारी जाबाल श्रुति त्याच्या प्राथम्य ह्या धर्माचा लोपहि सहन करीत नाहीं. तेव्हां त्या प्राथम्य धर्माचा धर्मी असें जें प्राणाग्निहोत्र त्याचा लोप सहन करणें तर दूरच राहिलें, असा भावार्थ.–'**ननु०**' इत्यादि भाष्यानें या पूर्वपक्षावरील आक्षेपाचें स्मरण–]

**भाष्यं––ननु भोजनार्थभक्तागमनसंयोगाद्भोजनलोपे लोप: प्रापित: । न । तस्य द्रव्यविशेषविधानार्थत्वात् । प्राकृते ह्यग्निहोत्रे पय:प्रभृतीनां द्रव्याणां नियतत्वादिहापि अग्निहोत्रशब्दात्कौण्डपायिनामयनवत्तद्धर्मप्राप्तौ सत्यां भक्तद्रव्यैकतागुणविशेषविधानार्थमिदं वाक्यं 'तद्यद्भक्तं' इति । अतो गुणलोपे न मुख्यस्येत्येवं प्राप्तम् । भोजनलोपेऽप्यद्भिर्वाऽन्येन वा द्रव्येणाविरुद्धेन प्रतिनिधानन्यायेन प्राणाग्निहोत्रस्यानुष्ठानमिति ॥ ४० ॥ अत उत्तरं पठति––**

**भाष्यार्थ**––अहोपण, भोजनासाठीं अन्नाचें जें आगमन त्याच्याशीं प्राणाग्निहोत्राचा संबंध असल्यामुळें भोजनाचा लोप झाला असतां त्याचा लोप आम्हीं वर प्राप्त करविला आहे, भोजनलोपपक्षीं प्राणाग्निहोत्राच्या लोपाची प्राप्ति आम्हीं वर दाखविली आहे. [–'तद्यद्भक्तं०' या वाक्याचा अर्थ निराळा असल्यामुळें भोजनलोप जरी झाला तरी प्राणाग्निहोत्राचा लोप होत नाहीं, असें दूषण वादी त्यावर देतो–]='**न०**' नाहीं, प्राणाग्निहोत्राच्या लोपाची प्राप्ति होत नाहीं.

कारण 'तद्यद्भक्तं०' या वाक्याला द्रव्यविशेषविधानार्थत्व आहे. म्ह० विशेष द्रव्याचें विधान करणें, हें त्या वाक्याचें प्रयोजन आहे. [-वादी 'प्राकृते०' इत्यादि भाष्यानें याचाच विस्तार करितो-]=कारण प्राकृत-प्रकृतिभूत अग्निहोत्रांत पयःप्रभृति-दुग्धादि द्रव्यांना नियतत्व आहे. म्हणून या प्राणाग्निहोत्रांतहि अग्निहोत्रशब्दामुळें कौंडपायींच्या अयनाप्रमाणें त्याच्या धर्मांची प्राप्ति झाली असतां भक्तद्रव्याचें एकत्व

---

१ न्यायनिर्णय—कौंडपायींच्या अयनाप्रमाणें, याविषयीं भेदलक्षणांत असें स्थित आहे-'प्रकरणान्तरे प्रयोजनान्यत्वं'-पू. मी. २. ३. २४- 'कुंडपायींच्या अयनांत एक मास अग्निहोत्र हवन करितो,' अशा या विधींत 'नित्याग्निहोत्रांत मासगुणाचें विधान केलें जातें कीं कर्मान्तराचें विधान केलें जातें ?' असा संदेह आला असतां "प्रदेशभेद जरी असला तरी नामानें नित्य अग्निहोत्राचें बुद्धीमध्यें संनिधान होत असल्यामुळें व अभिव्याहृत आख्याताला तत्संनिधापित अर्थपरत्व असल्यामुळें नित्य-अग्निहोत्राच्या अनुवादानें हा मासविधि आहे" असा पूर्वपक्ष प्राप्त होतो. पण "कालाला पुरुषानिष्पाद्यत्व नसल्यानें अग्राह्यत्व आहे. त्यामुळें 'जुहोति'-हवन करितो, या आख्यातानें होमानुवादानें मासविधीचा असंभव आहे. म्हणून त्याच्या उद्देशानें नित्य अग्निहोत्राचा त्याच्या असंनिधीमुळें असंभव आहे आणि सिद्धार्थाचा बोध करणाऱ्या नामानें पूर्वापरीभूतत्वानें आख्यातानें सांगितलेल्या अर्थाचें उपस्थान होत नाहीं, त्यामुळें प्रकरणभेद असतांना विधेयभावनाख्य प्रयोजनाला अन्यत्व आहे. म्हणून हा कर्मान्तरविधि आहे." अशी तद्धर्मांची प्राप्ति झाली असतां सप्तमाध्यांत असें स्थित आहे-'उक्तं क्रियाभिधानं तच्छ्रुतावन्यत्र विधिप्रदेशः स्यात्'-पू. मी. ७. ३. १-'एक मास अग्निहोत्र हवन करितो' या विधींतच अग्निहोत्रशब्द नित्य अग्निहोत्राच्या धर्मांचा येथें अतिदेश करितो किंवा करीत नाहीं, असा संदेह आला असतां "गौणत्वाचा अभाव असल्यामुळें, अग्निहोत्रशब्दाला 'जुहोति-'चें सामानाधिकरण्य समान असल्यामुळें, येथेंहि नामधेयत्व असल्यामुळें तो त्यांचा अतिदेश करणार नाहीं," असा पूर्वपक्ष प्राप्त होतो. पण "कर्मभेद सिद्ध झाला असतां अनेकार्थत्वाला अन्याय्यत्व आहे. एके ठिकाणीं अग्निहोत्रशब्दाला मुख्यत्व आहे. अन्यत्र गौणत्व आहे आणि नित्य अग्निहोत्रामध्यें नामप्रवृत्तीचें निमित्त असा जो अग्निदेवतासंबंध त्याचा भाव असल्यामुळें त्यांतच त्याला मुख्यत्व आहे. परशब्दाची परत्र सादृश्यामुळें प्रवृत्ति होते. त्यामुळें त्याच्या सिद्धीसाठीं तो शब्द नित्यधर्मांचा अतिदेश करितो" असा सिद्धान्त. सूत्राचा अर्थ-'क्रियायाः'-नित्य अग्निहोत्राचें 'अभिधानं'-नांव-अग्निहोत्र हें पद तत्प्रत्याधिकरणांत 'उक्तं'-सांगितलें आहे. 'अन्यत्र तच्छ्रुतौ'-अन्यत्र त्याचें श्रवण झालें

या गुणविशेषाच्या विधानासाठीं ' तद्यद्भक्तं० ' हें वाक्य आहे. [-" तथापि प्राणाग्निहोत्र भोजनार्थ प्राप्त झालेल्या अन्नावर उपजीविका करणारें असल्यामुळें भोजनाचा लोप झाला असतां त्याचा लोप होईल " अशी सिद्धान्ताशंका घेऊन वादी म्हणतो-]='अतः'-यास्तव [ अग्न्याधानांतील ' अग्नये पवमानाय पुरोडाशं अष्टाकपालं निर्वपति '-पवमान अग्नीला उद्देशून अष्टाकपाल पुरोडाशाचा निर्वाप करितो, इत्यादि पवमानेष्टींमध्यें प्रकृतींत ' अग्निहोत्रहवण्या हविर्निर्वपेत् '-अग्निहोत्रहवणीनें हवीचा निर्वाप करावा, असा विहित असलेला हविर्निर्वाप-हवीचा त्याग ' प्रकृतिवत् विकृतिः कार्या '-प्रकृतीप्रमाणें विकृति करावी, या अतिदेशानें प्राप्त होतो. पण आधानाचे वेळीं अग्निहोत्र नाहीं. तेव्हां अग्निहोत्रहवणी कोठची, कीं जिच्या योगानें अष्टाकपाल पुरोडाशाचा निर्वाप होईल ! अर्थात् तिचा लोप झाला असतां, पुरोडाशनिर्वापाचाहि लोप प्राप्त झाला असतां वादी मीमांसेच्या दहाव्या अध्यायांतील सिद्धान्त 'गुणलोपे०' इत्यादि भाष्यानें सांगतो-]=गुणाचा लोप झाला असतां मुख्याचा लोप होत नाहीं, असें हें प्राप्त झालें. भोजनाचा जरी लोप झाला तरी जलानें किंवा दुसऱ्या एखाद्या अविरुद्ध द्रव्यानें प्रतिनिधानन्यायानें-' मुख्यासारखा त्याचा प्रतिनिधि होतो ' या न्यायानें-मुख्याच्या अभावीं त्याच्या स्थानीं तत्सदृश अन्य पदार्थाची योजना करावी, या न्यायानें प्राणाग्निहोत्राचें अनुष्ठान करावें. [ विकृतीमध्यें कार्यद्वारा पदार्थ प्राप्त होतात. त्यामुळें हविःसंस्कारासाठीं असलेला निर्वाप प्रथम प्राप्त होतो व त्याच्या द्वारा त्याचें अंग -अग्निहोत्रहवणी मागून प्राप्त होतें. म्हणून अंगाचा म्ह० अग्निहोत्रहवणीचा लोप जरी झाला तरी मुख्याचा लोप होत नाहीं. याच न्यायानें प्रकृत प्राणाग्निहोत्रांत भोजनलोप जरी झाला तरी प्राणाग्निहोत्र लुप्त होत नाहीं, असा भावार्थ. 'प्रतिनिधिन्यायेन' याचा भावार्थ असा-अग्निहोत्रादि नित्य कर्मामध्यें घृत, व्रीहि इत्यादि द्रव्यांचा अलाभ झाला असतां कर्माचाच त्याग प्राप्त होतो. पण एकदा

---

असतां 'विधिप्रदेशः'-विधेयधर्मांचा अतिदेश होईल, असा या सूत्राचा अर्थ आहे. यास्तव ज्याप्रमाणें कुंडपायींचें अयनगत कर्म प्रकरणान्तरामुळें नित्य अग्निहोत्राहून भिन्नत्वानें सिद्ध झालें असतां नित्य अग्निहोत्रवाचक अग्निहोत्रशब्दप्रयोगामुळें तद्धर्मातिदेशरूप धर्मान्तराची प्राप्ति होते, त्याचप्रमाणें नित्य अग्निहोत्रांत दुग्ध-घृत इत्यादिकांना प्रसिद्धत्व असल्यामुळें आणि प्राणाग्निहोत्रामध्यें नित्य अग्निहोत्रवाची शब्द असल्यामुळें दुग्धादि तद्धर्मांची प्राप्ति झाली असतां भोजनांतील भक्तद्रव्यकृत अभिधानासाठीं 'तद्यद्भक्तं०' इत्यादि वाक्य आहे, असा भावार्थ.

आरंभ केलेल्या नित्य किंवा अनित्य कर्माचें अनुष्ठान करणें अत्यंत अवश्य असल्यामुळें प्रतिनिहित–त्यांच्या जागीं स्थापिलेल्या व श्रुत असलेल्या द्रव्यांनीं, क्रियमाण प्रयोगाचें अवशिष्टत्वानें प्रत्यभिज्ञान होत असल्यामुळें, प्रतिनिधान करून –घृतादिकांच्या स्थानीं त्यांचा स्थापना करूनहि कर्म करावें, असें अधिकाराध्यायांत सिद्ध झालें आहे. त्याचप्रमाणें भोजनाचा लोप जरी झाला तरी जलादि कोणत्याहि द्रव्यानें प्राणाग्निहोत्राचें अनुष्ठान करावें, असा भावार्थ. ] ४०. [–याप्रमाणें अंगाचा जरी लोप झाला तरी प्रधानाचा लोप होत नाहीं, असा पूर्वपक्ष प्राप्त झाला असतां '**अत:०**' इत्यादि भाष्यानें सिद्धान्ताला अवतरण देतात–] =म्हणून '**उपस्थिते०**' इत्यादि सूत्रानें उत्तर सांगतात—

## सूत्रं—उपस्थितेऽतस्तद्वचनात् ॥ ४१ ॥ (२६)

**सूत्रार्थ**—भोजन 'उपस्थित झालें असतां' 'त्या भोजनद्रव्यांतून' प्राणाग्निहोत्र करावें. भोजनच उपस्थित न झाल्यास त्याचा लोप करावा. कारण 'तद्वचन आहे'–जें अन्न प्रथम उपस्थित होईल त्याचा होम करावा, असें वचन आहे. ४१ (२६)–सु. ब्र. ३६०. [–'**उपस्थिते०**' इत्यादि भाष्यानें सिद्धान्तसूत्रांतील प्रतिज्ञेचा विभाग करितात–]

**भाष्यं—उपस्थिते भोजनेऽतस्तस्मादेव भोजनद्रव्यात्प्रथमोपनिपातितात्प्राणाग्निहोत्रं निर्वर्तयितव्यम् । कस्मात् । तद्वचनात् । तथा हि– 'तद्यद्भक्तं प्रथममागच्छेत्तद्धोमीयम्' इति सिद्धवद्भक्तोपनिपातपरामर्शेन परार्थद्रव्यसाध्यतां प्राणाहुतीनां विदधाति । ता: अप्रयोजकलक्षणापन्ना: आहुतय: सत्य: कथं भोजनलोपे द्रव्यान्तरं प्रतिनिधापयेयु: ॥**

**भाष्यार्थ**—भोजन उपस्थित झालें असतां 'अत:'–त्याच भोजन-द्रव्यापासून [ '**पूर्वोऽतिथिभ्योऽश्नीयात्**'–अतिथींच्या पूर्वी भोजन करावें, या श्रुतीनें त्याला '**प्रथम०**' इत्यादि विशेषणविशिष्ट करितात–]=प्रथम पात्रांत येऊन पडलेल्या भोजनद्रव्यापासून–त्या द्रव्यानें प्राणाग्निहोत्र करावें. [–"अहो पण, भोजनाच्या अभावीं, त्यासाठीं उपस्थित होणाऱ्या द्रव्याचा अभाव जरी असला तरी स्वतंत्रद्रव्यानें प्राणाग्निहोत्र करावें." अशी '**कस्मात्**' या पदानें शंका–]=कोणत्या कारणानें? [सूत्रांतील हेतु सांगतात–]='तद्वचनात्'–तद्वचनामुळें. [–'तत् होमीयं' यांतील प्रकृताची आकांक्षा करणाऱ्या 'तत्' या शब्दानें आपल्या उक्तीच्या पर्यवसानासाठीं 'यत् प्रथमं आगच्छेत्' असें संनिहित असलेल्या भोजनार्थ अन्नाचें अनुसंधान करणें उचित आहे. यास्तव प्राणाग्निहोत्रांत स्वतंत्रद्रव्याचा उपयोग

करूं नये. कारण तसें केल्यास वरील 'तत्' या शब्दाशीं विरोध येतो, असें **'तथा हि॰'** इत्यादि भाष्यानें त्या हेतूचें व्याख्यान करितात-]=तद्वचन कसें आहे तें पहा-" तें जें अन्न प्रथम उपस्थित होईल-पात्रांत येऊन पडेल त्याचा होम करावा."-पृ. ४१२-हें वचन सिद्ध म्ह॰ ज्ञात झालेल्या अनंतर-त्याच्या अगदीं मागेंच-जवळच प्रकृत असलेल्या अर्थाचा 'तत्' या शब्दानें जसा परामर्श करितें तसेंच भक्तोपनिपाताच्या परामर्शानें म्ह॰ भोजनाच्या निमित्तानें -भोजनासाटीं प्राप्त झालेल्या अन्नाचा तत्-शब्दानें परामर्श करून, त्या परामर्शानें परार्थ म्ह॰ भोजनार्थ जें अन्न-द्रव्य त्यानें प्राणाहुतींची साध्यता-कर्तव्यता सांगतें -तें वचन त्याच्या कर्तव्यतेचें विधान करितें [-भोजनार्थ प्राप्त झालेल्या 'अन्न' या द्रव्याच्या उद्देशानें 'तें होमावें' अशा आहुतिविधानांतील फलित **'ताः॰'** इत्यादि भाष्यानें सांगतात-]=त्या आहुत्या अप्रयोजकलक्षणापन्न होत्सात्या भोजनाचा लोप झाला असतां-भोजनलोपपक्षीं द्रव्यान्तराचें प्रतिनिधान कशा करवितील? [आहवनीय अग्नीच्या अभावीं होमाचा अभाव जसा होतो व आमिक्षेसाठीं दुधांत दहीं आणणें याच्या अभावी वाजिनाचा जसा अभाव होतो-पृ.२२९-त्याप्रमाणें उद्देशाच्या अभावीं उपादेयाची प्रवृत्तीच होत नसल्यामुळें भोजनार्थ द्रव्याचा लोप झाला असतां प्राणाग्निहोत्राचा लोपच होतो, असा भावार्थ.-आतां पूर्ववाद्यानें वर -पृ.४०९-' अग्निहोत्रशब्दावरून त्याच्या धर्मांची प्राप्ति झाली असतां भक्तद्रव्यैकतागुणाचें विधान करण्यासाठीं 'तद्यद्भक्तं॰' इत्यादि वाक्य आहे' असें जें म्हटलें आहे, त्याविषयीं आचार्य **'न च॰'** इत्यादि भाष्यानें म्हणतात-]

**भाष्यं— न चात्र प्राकृताग्निहोत्रधर्मप्राप्तिरस्ति। कुंडपायिनामयने हि 'मासमग्निहोत्रं जुहोति' इति विध्युद्देशगतोऽग्निहोत्रशब्दः तद्वद्भावं विधापयेदिति युक्ता तद्धर्मप्राप्तिः। इह पुनरर्थवादगतोऽग्निहोत्रशब्दो न तद्वद्भावं विधापयितुमर्हति तद्धर्मप्राप्तौ च अभ्युपगम्यमानायां अग्न्युद्धरणादयोऽपि प्राप्येरन्॥**

**भाष्यार्थ**—येथें प्राकृत अग्निहोत्राच्या धर्मांची प्राप्ति होत नाहीं. [अर्थवादस्थ अग्निहोत्रशब्दाचा किंचित् सादृश्य स्वीकारून स्तावकत्वानेंहि संभव असल्यामुळें त्या शब्दाच्या सामर्थ्यानें प्राणाग्निहोत्रांत नैयमिक-नियमप्राप्त अग्निहोत्राच्या धर्मांची प्राप्ति होत नाहीं, असा भावार्थ.-आतां वाद्यानें वर-पृ. ४१०- 'कौंडपायिनवत्' असें जें म्हटलें आहे त्याची विघटना करितात, त्या दृष्टान्ताचें असादृश्य **'कुंडपायिनां॰'** इत्यादि भाष्यानें दाखवितात-]=कुंडपायिनांच्या अयनांतील **'एकमास अग्निहोत्रहवन करितो'** या विधीच्या उद्देशांतील अग्निहोत्र-

शब्द तद्गद्भावाचें-त्याच्या सारख्या धर्मांचें विधान करवील, त्यामुळें त्यांत त्याच्या धर्मांची प्राप्त युक्त आहे. [-'इह पुनः०' इत्यादि भाष्यानें दार्ष्टान्तिकांतील पूर्वोक्त वैषम्यच विशद करितात-]=पण येथें-या प्राणाग्निहोत्रांत अर्थवादगत अग्निहोत्रशब्द तद्गद्भावाचें विधान करविण्यास समर्थ नाहीं. [-विपक्षीं दोष सांगतात-]=आणि अग्निहोत्राच्या धर्मांची प्राप्ति जर स्वीकारली जाऊं लागली तर त्याच्या अग्न्युद्धरणादिकांचीहि प्राप्ति होईल. [-"पण त्यांची प्राप्ति झाली तर त्यांत कोणती हानि आहे ?" 'न च०' इत्यादि भाष्यानें उत्तर-]

**भाष्यं—न चास्ति संभवः। अग्न्युद्धरणं तावद्धोमाधिकरणभावाय। न चायमग्नौ होमो भोजनार्थताव्याघातप्रसंगात्। भोजनार्थोपनीतद्रव्यसंबंधाच्च। आस्य एवैष होमः। तथा च जाबालश्रुतिः "पूर्वोऽतिथिभ्योऽश्नीयात्" इत्यास्याधारामेवेमां होमनिर्वृर्ति दर्शयति ॥**

**भाष्यार्थ**—पण त्यांचा येथें संभव नाहीं. [-'**अग्न्युद्धरणं०**' इत्यादि भाष्यानें त्यांचा असंभवच साधितात-]=कारण अगोदर अग्न्युद्धरण होमाधिकरणभावासाठीं आहे. [अग्न्याधार होमाच्या अभावामुळें-हा होम अग्नीमध्यें होणारा नसल्यामुळें प्राणाग्निहोत्रांत अग्न्युद्धरणाची सिद्धि होत नाहीं, असा भावार्थ.-"अहो पण प्रस्तुत प्राणाग्निहोत्रांतहि होमाधिकरणभावासाठींच अग्न्युद्धरण असूं दे." '**न च अयं०**' इत्यादि भाष्यानें उत्तर-]=आणि हा होम अग्नीमध्ये होत नाहीं. कारण तसें मानिल्यास त्याच्या भोजनार्थत्वाचा व्याघात होण्याचा प्रसंग येतो. [-आहुतींच्या अग्न्याधारत्वाभावाविषयीं युक्त्यन्तर-]='**भोजनार्थोपनीत०**'-आणि भोजनासाठीं पुढें आलेल्या द्रव्याशीं संबंध असल्यामुळेंहि प्राणाग्निहोत्रांतील आहुतींना अग्न्याधारत्व नाहीं. [-'तर मग येथील आहुतींचें अधिकरण काय ?' '**आस्ये०**' इत्यादि भाष्यानें उत्तर-]=हा होम तोंडांतच होतो. [-प्राणाग्निहोत्रांतील होमाचें अधिकरण मुखच आहे, याविषयीं '**तथा च०**' इत्यादि भाष्यानें श्रुत्यन्तर सांगतात-]=आणि तशीच "अतिथींच्या पूर्वी भोजन करावें" ही जाबालश्रुति प्रस्तुत होमनिर्वृति मुखाधारच दाखविते. [-याप्रमाणें आहुतींना मुखाधारत्व व प्राणाग्निहोत्रांत अग्निहोत्रशब्द आहे, एवढ्यावरूनच नैयमिक अग्निहोत्रधर्मांची प्राप्ति होत नाहीं, याविषयीं '**अत एव०**' इत्यादि भाष्यानें गमक सांगतात-]

**भाष्यं—अत एव चेहापि सांपादिकान्येवाग्निहोत्रांगानि दर्शयति-'उर एव वेदिर्लोमानि बर्हिर्हृदयं गार्हपत्यो मनोऽन्वाहार्यपचन आस्यमाहवनीयः'**

**इति । वेदिश्रुतिश्चात्र स्थंडिलमात्रोपलक्षणार्था द्रष्टव्या । मुख्याग्निहोत्रे वेद्यभावात् । तदंगानां चेह संपिपादयिषितत्वात् । भोजनेनैव च कृतकालेन संयोगान्न अग्निहोत्रकालावरोधसंभवः । एवमन्येऽप्युपस्थानादयो धर्माः केचित्कथंचिद्विरुध्यन्ते ॥**

**भाष्यार्थ**—म्हणूनच येथेंहि श्रुति सांपादिकच–कल्पनेनें संपादन केलेलींच अग्निहोत्राचीं अंगें " उरच वेदि, लोम दर्भ, हृदय गार्हपत्य, मन अन्वाहार्यपचन –दक्षिणाग्नि, आस्य–मुख आहवनीय "–छां. ५. १८. २. सु. उ. ४१६–या वचनानें दाखावतें. [ नैयमिक अग्निहोत्राच्या धर्मांची प्राप्ति जर झाली असती तर मुख्य अंगांचाच संभव असल्यामुळें हें संपादन व्यर्थ झालें असतें, असा भावार्थ. 'उर एव वेदिः '–उरच वेदि आहे, त्यांतील अवान्तर विशेष सांगतात–]=**'वेदिश्रुतिः०'**–आणि येथील–या प्राणाग्निहोत्रांतील वेदिश्रुति केवल स्थंडिलाच्या उपलक्षणार्थ आहे, असें जाणावें. [–"अहोपण, इतर अंगांप्रमाणें येथें वेदिकरणाचेंहि संपादनार्थच कथन कां असणार नाहीं?" **'मुख्य०'** इत्यादि भाष्यानें उत्तर–]= कारण मुख्य अग्निहोत्रामध्यें वेदीचा अभाव आहे. [–"दर्श-पूर्णमासाप्रमाणें मुख्य अग्निहोत्रामध्यें वेदिकरणाचा अभाव जरी असला तरी प्रस्तुत प्राणाग्निहोत्रांत ध्यानासाठीं वेदि सांगितली जावी," अशी आशंका घेऊन **' तदङ्गानां च० '** इत्यादि भाष्यानें सांगतात–]=व प्राणाग्निहोत्रामध्यें त्याच्या अंगांचें संपादन चिकीर्षित आहे, त्यामुळें येथें वेदिश्रुति स्थंडिलमात्रोपलक्षणार्थ आहे. [–याप्रमाणें प्राणाग्निहोत्रांत मुख्य अग्निहोत्राप्रमाणें अग्न्युद्धरण संभवत नाहीं, असें सांगून कालद्वयाचा अवरोधहि नाहीं, असें **' भोजनेन०'** इत्यादि भाष्यानें सांगतात–]= आणि भोजनानेंच केलेल्या कालाशीं याचा संयोग असल्यामुळें अग्निहोत्रकालावरोधाचा संभव नाहीं. [ भोजनानें प्राप्तकालाशींच या प्राणाग्निहोत्राचा संबंध आहे. त्यामुळें अग्निहोत्राच्या सायं-प्रातःकालांनीं त्याचा अवरोध संभवत नाहीं, असा भावार्थ.–**' एवं० '** इत्यादि भाष्यानें अग्न्युद्धरणादिकांमध्यें सांगितलेल्या न्यायाचा अतिदेश–]=त्याचप्रमाणें अग्नीचें उपस्थान इत्यादि दुसरेहि कित्येक धर्म कसे तरी विरुद्ध होतात. [ 'उपस्थानादि ' येथील 'आदि-'शब्दानें परिस्तरणादिकांचें ग्रहण केलें जातें.–**' तस्मात्० '**–इत्यादि भाष्यानें सिद्धान्तसूत्राचा उपसंहार–]

**भाष्यं—तस्माद्भोजनपक्ष एवैते मंत्रद्रव्यदेवतासंयोगात्पंच होमा निर्वर्तयितव्याः ॥**

**भाष्यार्थ**—म्हणून मंत्र, द्रव्य व देवता यांच्या संयोगामुळें भोजनपक्षींच हे पांच होम अनुष्ठान करण्यास योग्य आहेत. [—आतां "धर्माचा लोपहि सहन न करणारी श्रुति धर्मिलोप कधींच सहन करणार नाहीं," असें जें वाद्यानें म्हटलें आहे —पृ.४०९—त्याचा 'यत्तु०' इत्यादि भाष्यानें अनुवाद करून त्याला दूषित करितात—]

**भाष्यं**—**यत्त्वादरदर्शनवचनं तद्भोजनपक्षे प्राथम्यविधानार्थम् । न ह्यस्ति वचनस्यातिभारः । न त्वनेनास्य नित्यता शक्यते दर्शयितुम् । तस्माद्भोजनलोपे लोप एव प्राणाग्निहोत्रस्येति ॥ ४१ ॥** (२६)

**भाष्यार्थ**—पण जें आदरदर्शनवचन आहे तें भोजनपक्षीं प्राथम्याचें विधान करण्यासाठीं आहे. [ धर्माचा लोप न झाल्यास धर्मीहि लुप्त होत नाहीं, असें जरी असलें तरी तेवढ्यानें धर्मीला नित्यत्व प्राप्त होत नाहीं, असा भावार्थ.—" पण अतिथींच्या भोजनानंतर स्वामीनें भोजन करावें, हे श्रुति-स्मृतिसिद्ध आहे. तेव्हां त्याच्या प्राथम्याचें विधान कसें संभवतें ? " '**न हि०**' इत्यादि भाष्यानें उत्तर—]= कारण वचनाला अतिभार मुळींच नाहीं. [ स्वामीच्या भोजनाचें उत्तरकालत्वविधान प्राणाग्निहोत्रातिरिक्तविषय आहे, असा भावार्थ.—"पण प्राणाग्निहोत्राला जर प्राथम्य आहे, तर त्याला आगंतुकत्व कसें ?" '**न तु०**' इत्यादि भाष्यानें उत्तर—] =पण या प्राथम्यविधानानें प्राणाग्निहोत्राची नित्यता दाखवितां येणें शक्य नाहीं. [ कारण त्याच्या नित्यतेवांचूनहि प्राथम्याची सिद्धि होते, असें सांगितलें आहे, असा भावार्थ.—याप्रमाणें आदरोक्तीची अन्यथा सिद्धि झाली असतां फलित सांगतात—]=' **तस्मात्०** '—म्हणून भोजनाचा लोप झाला असतां प्राणाग्निहोत्राचा लोपच होतो, ' **इति०** '—त्यामुळें येथें पूर्वोक्त—पृ. ४११—प्रतिनिधिन्याय प्रवृत्त होत नाहीं. ४१.—[ सु. ब्र. ३६१. ] (२६)

( २७. **तन्निर्धारणाधिकरण. सू. ४२.** )

—वैश्वानरविद्यांगभूत प्राणाहुतींच्या अनित्यत्वोक्तिप्रसंगानें कर्मांगसंगी ज्ञानांचेंहि अनित्यत्व ' **तन्निर्धारण०** ' इत्यादि सूत्रानें सांगतात—

**सूत्रं—तन्निर्धारणानियमस्तद्दृष्टेः पृथग्घ्यप्रतिबंधः फलम् ॥४२॥(२७)**

**सूत्रार्थ**—' तन्निर्धारणानियमः '—कर्मांगभूत उद्गीथाचा आश्रय केलेलीं जीं प्राणाचीं उपासनें त्याचा अनियम आहे. कारण श्रुतींत त्या अनियमाची उपलब्धि होते. कारण कर्मफलाहून अगदीं पृथक् म्ह० अप्रतिबंध हें फल श्रुत आहे. ४२ (२७)—सु. ब्र. ३६२[—'**सन्ति०**' इत्यादि भाष्याने अंगावबद्धोपासनांचा या अधिकरणाच्या विषयत्वानें उपन्यास—]

**भाष्यं—सन्ति कर्मांगव्यपाश्रयाणि विज्ञानानि– 'ओमित्येतदक्षरमुद्गीथमुपासीत' इत्येवमादीनि । किं तानि नित्यान्येव स्युः कर्मसु पर्णमयीत्वादिवत्। उतानित्यानि गोदोहनादिवदिति विचारयामः । किं तावत्प्राप्तं । नित्यानीति । कुतः । प्रयोगवचनपरिग्रहात् । अनारभ्याधीतान्यपि ह्येतान्युद्गीथादिद्वारेण क्रतुसंबंधात्क्रतुप्रयोगवचनेनैव अंगान्तरवत्संस्पृश्यन्ते ॥**

**भाष्यार्थ—**'ॐ अशा या उद्गीथ अक्षराचें उपासन करावें'–छां. १.१.१.– इत्यादि कर्मांगाचा विशेष आश्रय करून राहणारीं उपासनें आहेत. [–दोन्ही प्रकारचे दृष्टान्त उपलब्ध होत असल्यामुळें '**किं तानि०**' इत्यादि भाष्यानें संशय–] =तीं कर्मांगव्यपाश्रयविज्ञानें कर्मांतील पर्णमयीत्वादिकांप्रमाणें नित्यच आहेत कीं गोदोहनादिकांप्रमाणें अनित्य आहेत, याचा आम्ही विचार करितों. [क्रत्वर्थ असलेल्या द्रव्यसंस्कारकर्मांमध्यें फलश्रुतीला अर्थवादत्व असल्यामुळें अगतीनें रात्रिसत्रांचा विपरिणाम जरी होत असला तरी प्रकृत कर्मांमध्यें क्रतूपकार सिद्ध आहे. म्हणून त्यांचा विपरिणाम संभवत नाहीं. यास्तव प्रयाजादिकांप्रमाणें त्यांत पर्णमयीत्व नित्य इष्ट आहे. तशींच हीं अंगाशीं संबंध ठेवणारीं उपासनें कर्मांमध्यें नित्यच आहेत, असा एक विकल्प. ज्याप्रमाणें प्राकृत–प्रकृतिसंबंधी अप्प्रणयनाश्रय गोदोहनसंबंध पशूंना उद्देशून विहित आहे किंवा प्राकृत अप्प्रणयनाश्रयच असलेला, ब्रह्मवर्चस हें फल देणारा कांस्यपात्रसंबंध सांगितला जातो किंवा अन्नाद्य–अन्न हें फल देणारा बैल्व–बेलाच्या काष्ठाचा यूपाश्रय दिसतो त्याप्रमाणें कर्मांमध्यें हीं उपासनें अनित्य आहेत, असा दुसरा विकल्प आहे. या अधिकरणांत कर्मांगाश्रित उपासनांचें क्रतूंमध्यें नित्यत्व व अनित्यत्व यांच्या निरूपणाच्या द्वारा वाक्यार्थज्ञानाच्या हेतूचेंच निरूपण केलेलें असल्यामुळें याच्या पादादिसंगति आहेत. पूर्वपक्षांत 'क्रतूमध्यें पर्णतादिकांप्रमाणें यथोक्त उपासनांना आवश्यकत्व आहे' व सिद्धान्तांत 'तद्राहित्य आहे' असें मानून '**किं०**' इत्यादि विमर्श करितात–]=मग त्यांतील प्रथम कोणता पक्ष प्राप्त झाला? [–अनित्य भोजनाश्रित प्राणाग्निहोत्राच्या अनित्यत्वाप्रमाणें नित्य कर्मांगाश्रित उपासनांना नित्यत्व आहे, असा पूर्वपक्ष–]='**नित्यानि इति**'–तीं नित्यकर्मांगाश्रित उपासनें नित्य आहेत, असें प्राप्त झालें. [–"पण क्रतुप्रकरणामध्यें उपासनांचा पाठ नसल्यामुळें व प्रयोगवचनानें त्यांचा परिग्रह केलेला नसल्यामुळें त्यांना क्रतूमध्यें नित्यता नाहीं," अशी '**कुतः०**' इत्यादि शंका–]=कोणत्या कारणानें तीं उपासनें क्रतूंमध्यें नित्य आहेत? [–अव्यभिचरित–नित्य क्रतुसंबद्ध जुहूच्या द्वारा

अशी पर्णता-पलाशत्व क्रतुसंबद्ध आहे, त्याप्रमाणें उद्गीथादिकांच्या द्वारा उपासनांचाहि क्रतूशीं संबंध असल्यामुळें व प्रयोगवचनानें त्यांचा स्वीकार केलेला असल्यामुळें उपासनांना क्रतूमध्यें नित्यत्व आहे, असें वादी 'प्रयोग०' इत्यादि भाष्यानें सांगतो-]=कारण त्यांचा प्रयोगवचनानें परिग्रह केलेला आहे. [-"पण क्रत्वंगता व प्रयोगवचनपरिग्रह यांना अन्योन्याश्रयत्व आहे व उपासनांना प्रकरणान्तरत्व आहे. त्यामुळें उपासनांचें प्रयोगवचनपरिग्रहत्व संभवत नाहीं," अशी आशंका घेऊन पूर्ववादी 'अनारभ्य०' इत्यादि भाष्यानें म्हणतो-]=कारण अनारभ्य अधीत असलेलींहि-क्रतूच्या प्रकरणाचा आरंभ करून विहित नसलेलींहि हीं उपासनें उद्गीथादिकांच्या द्वारा क्रतूशीं संबद्ध होत असल्यामुळें पर्णमयीत्वादि अंगान्तरांप्रमाणें क्रतुप्रयोगवचनानेंच क्रतूशीं संबद्ध होतात. [-"अहो-पण उपासनांचें फलान्तरश्रवण असल्यामुळें त्यांना स्वातंत्र्य आहे" अशी आशंका घेऊन वादी 'यत्तु०' इत्यादि भाष्यानें म्हणतो—]

**भाष्यं—यत्त्वेषां स्ववाक्येषु फलश्रवणम् 'आपयिता ह वै कामानां भवति' इत्यादि। तद्वर्तमानापदेशरूपत्वादर्थवादमात्रमेव। अपापश्लोकश्रवणादिवत्। न फलप्रधानम्। तस्माद्यथा "यस्य पर्णमयी जुहूर्भवति न स पापं श्लोकं शृणोति" इत्येवमादीनामप्रकरणपठितानामपि जुह्वादिद्वारेण क्रतुप्रवेशात्प्रकरणपठितवन्नित्यता। एवमुद्गीथाद्युपासनानामपीति ॥**

**भाष्यार्थ**—पण या उपासनांचें स्ववाक्यांमध्यें "कामांचा प्राप्त करविणारा होतो"-छां. १.१.७-इत्यादि जें फलश्रवण आहे, तें वर्तमानापदेशरूप-वर्तमानकाळी असल्यामुळें अपापश्लोकश्रवणादिकांप्रमाणें केवल अर्थवादमात्रच आहे. [-"अहोपण, क्रतूपकारद्वारा व्यवहित फलाचें-परंपरेनें प्राप्त होणाऱ्या फलाचें ग्रहण करण्यापेक्षां अव्यवहित-साक्षात् श्रुत असलेल्या फलाचा साध्यत्वविपरिणाम करणें, अधिक श्रेयस्कर आहे, त्यामुळें अपापश्लोकश्रवणालाहि फलविधित्वच आहे," अशी आशंका घेऊन वादी म्हणतो-]='न फलप्रधानं'-तें फलप्रधान नाहीं. [कांहीं ठिकाणीं दुसरी गतिच नसल्यामुळें तसा विपरिणाम -बदल जरी करावा लागत असला तरी प्रकृत उदाहरणांत कर्मांगत्व ही गति आहे. त्यामुळें येथें तशा विपरिणामाची सिद्धि होत नाहीं, असा भावार्थ.-यास्तव "अंगाश्रित उपासनें प्रयोगवचनानें क्रतूच्या अंगत्वानें ग्रहण करण्यास योग्य आहेत. कारण त्यांना साध्यफलोक्तिशून्यत्व असून क्रत्वंगसंबंधित्वानें विहितत्व आहे. म्ह० त्यांचें साध्य फल कांहीं सांगितलेलें नाहीं व क्रतूच्या अंगांशीं संबंध ठेव-

णारीं, या रूपानें त्यांचें विधान केलें आहे. पर्णमयीत्वादिकांप्रमाणें " असें मानून पूर्ववादी 'तस्मात्०' इत्यादि भाष्यानें उपसंहार करितो–]=म्हणून "ज्याची पर्णमयी–पलाशाची जुहू असते तो पाप श्लोक–आपली निंदा ऐकत नाहीं." या व अशाच प्रकारच्या दुसऱ्या अप्रकरणपठित–प्रकरणांत पठित नसलेल्याहि पर्णमयीत्वादिकांचा जुह्वादिकांच्या द्वारा क्रतूमध्यें प्रवेश होत असल्यामुळें प्रकरण-पठित असल्याप्रमाणेंच त्यांना जशी नित्यता आहे, तशीच उद्गीथादि-उपासनांनाहि क्रतूमध्यें नित्यता आहे, असें प्राप्त होतें. [भाष्यांतील 'एवमादीनां' येथील 'आदि-'शब्दानें 'तो जें अभ्यंजन करितो तें तो आपल्या शत्रूचा चक्षुच काढून घेतो–चक्षु फोडतो.' 'जे प्रयाजानुयाज केले जातात तें त्या यज्ञाचें कवचच केलें जातें' इत्यादिकांचें ग्रहण केलें जातें. 'जुह्वादिद्वारेण' येथील 'आदि-' पदानें कर्त्याचें ग्रहण करावें.–याप्रमाणें उद्गीथादि-उपासनांना कर्मामध्यें नित्यत्व असल्यामुळें अविद्वानाचें कर्म संभवत नाहीं, अशा प्राप्त झालेल्या पूर्वपक्षाचा '**एवं०**' इत्यादि भाष्यानें अनुवाद करून सिद्धान्त सांगतात–]

**भाष्यं—एवं प्राप्ते ब्रूमः–तन्निर्धारणानियम इति। यान्येतान्युद्गीथादिकर्म-गुणयाथात्म्यनिर्धारणानि रसतम आप्तिः समृद्धिर्मुख्यप्राण आदित्य इत्येवमादीनि। नैतानि नित्यवत्कर्मसु नियम्येरन्। कुतः। तद्दृष्टेः। तथा ह्यनित्यत्व-मेवंजातीयकानां दर्शयति श्रुतिः–'तेनोभौ कुरुतो यश्चैतदेवं वेद यश्च न वेद' इत्यविदुषोऽपि क्रियाभ्यनुज्ञानात्॥**

**भाष्यार्थ**—असा पूर्वपक्ष प्राप्त झाला असतां 'उपासनांच्या निर्धारणांचा अनियम आहे' असें आम्ही सांगतों. [–या प्रतिज्ञेचा विभाग–]='**यानि०**'–हीं जीं रसतम, आप्ति, समृद्धि, मुख्यप्राण, आदित्य इत्यादि उद्गीथादिकर्मगुणांचीं याथात्म्य निरूपणें तीं नित्याप्रमाणें म्ह० पर्णमयीत्वादिकांप्रमाणें कर्मामध्यें नियमित केलीं जाणार नाहींत. [–"अहोपण, आम्हीं अनुमानानें त्यांच्या नियमाचें निवेदन केलें असतांना अशी अनियमप्रतिज्ञा करितां येत नाहीं," अशी शंका–] =कोणत्या कारणानें? [–कारणविषय सूत्रपदाला अवतरण–]='**तद्दृष्टेः०**'–कारण त्या नियमाची उपलब्धि होते. ['तस्य–नियमस्य दृष्टेः' असें 'तद्-दृष्टेः' या हेतुपदाचें व्याख्यान करणारे भाष्यकार 'विद्यांचें अनंगत्व सिद्ध कर-णाऱ्या श्रौत लिंगांनीं अनुमान बाध्य आहे' असें '**तथा हि०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=त्या नियमाची उपलब्धि कशी होते ती पहा–अशा जातीच्या निर्धा-रणांची अनित्यता श्रुति दाखविते. कारण 'तेन'–'त्या ओंकाराख्य अक्षरानें

'एतत्'–या उद्गीथावयवभूत अक्षराला 'एवं'–रसतमादिगुणविशिष्ट 'यः वेद०'–जो जाणतो–उपासितो व जो जाणत नाहीं ते–ज्ञ व अज्ञ असे दोघेहि कर्म करितात" अशा या वचनानें अविद्वानालाहि क्रियेची अभ्यनुज्ञा दिलेली आहे. [–विद्येला कर्मांगत्वाचा नियम नाहीं, याविषयीं '**प्रस्तावादि०**' इत्यादि भाष्यानें लिंगान्तर–]

**भाष्यं—प्रस्तावादिदेवताविज्ञानविहीनानामपि प्रस्तोत्रादीनां याजनाध्यवसानदर्शनात् 'प्रस्तोतर्या देवता प्रस्तावमन्वायत्ता तां चेदविद्वान्प्रस्तोष्यसि' 'तां चेदविद्वानुद्गास्यसि' 'तां चेदविद्वान्प्रतिहरिष्यसि' इति च ॥**

**भाष्यार्थ—**आणि प्रस्तावादिकांच्या ज्या देवता त्यांच्या विज्ञानानें विहीन असलेल्याहि प्रस्तोत्यादिकांच्या–प्रस्तावादि कर्म करणाऱ्या ऋत्विजांच्या याजनाचें अध्यवसान–कर्मप्रयोग उपलब्ध होतो. त्यामुळेंहि उपासनांना अनित्यत्व आहे. "हे प्रस्तोत्या, जी देवता प्रस्तावभक्तीमध्यें अनुगत आहे तिला न जाणणारा असा होत्साता जर तूं प्रस्ताव करशील तर तुझा मूर्धपात होईल" "तिला न जाणणारा असा तूं जर उद्गान करशील" "तिला न जाणणारा असा तूं जर प्रतिहार करशील"–छां. १. १०. ९-११–असा चाक्रायणानें आक्षेप केलेला असल्यामुळें प्रस्तोत्यादिकांची अविद्वत्ता सिद्ध होते, असा भावार्थ.[–उद्गीथादि उपासनांचें पृथक् फलश्रवण असल्यामुळेंहि त्यांना कर्मांगत्व नाहीं, असें '**अपि च०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]

**भाष्यं—अपि चैवंजातीयकस्य कर्मव्यपाश्रयस्य विज्ञानस्य पृथगेव कर्मणः फलमुपलभ्यते कर्मफलसिद्ध्यप्रतिबंधः।तत्समृद्धिरतिशयविशेषः कश्चित्।'तेनेभौ कुरुतो यश्चैतदेवं वेद यश्च न वेद। नाना तु विद्या चाविद्या च यदेव विद्यया करोति श्रद्धयोपनिषदा तदेव वीर्यवत्तरं भवति' इति ॥**

**भाष्यार्थ—**शिवाय अशा जातीच्या कर्मव्यपाश्रय–कर्मांगभूत विज्ञानाचें–उपासनेचें कर्माच्या फलाहून कर्मफलसिद्धीचा अप्रतिबंध हें पृथक् फलच उपलब्ध होतें. [–" पण ज्ञानाच्या अभावीं कर्मफलाला प्रतिबंध होतो, असें झाल्यास ज्ञानाला कर्मांगत्व आहे, असें सिद्ध होतें" अशी आशंका घेऊन '**तत्समृद्धिः०**' इत्यादि भाष्यानें म्हणतात–]=कर्मफलसमृद्धि म्ह० एक प्रकारचा अतिशयविशेष. [ कर्मफलाचें वीर्यवत्तरत्व हें ज्ञानाचें–उपासनेचें फल आहे. पण त्या ज्ञानाच्या अभावीं वीर्यवत्च कर्म होतें, असा भावार्थ.–'**तेन०**' इत्यादि वाक्यानें फलभेदाविषयीं प्रमाण–]="त्या ओंकारानें जो या अक्षराची रसतमत्वादिरूपानें उपासना करितो व जो करीत नाहीं ते दोघेहि कर्म करितात." [–'**नाना तु०**'

इत्यादि वचनानें पूर्वपक्षाचा उपन्यास करून श्रुति स्वतःच 'तु-'शब्दानें त्याचें निरसन करिते-]=पण विद्या व अविद्या नाना-भिन्न भिन्न फल देणारी आहे. जें कर्म विद्येनें, श्रद्धेनें व उपासनेनें करितो तच वीर्यवत्तर-अधिक वीर्यवत् होतें." [ रत्नाचा विक्रय करितांना अज्ञ भिल्ल व रत्नपारखी वणिक् यांच्या अज्ञानाचें व ज्ञानाचें क्रमानें भिन्न भिन्न फल प्रतीतीला येतें. म्हणून जें कर्म विद्येनें-प्रकृत उद्गीथादि-शब्दांच्या अर्थज्ञानानें, आस्तिक्यबुद्धीनें व त्या त्या देवतेच्या ध्यानानें, असा भावार्थ.-'तत्र०' इत्यादि भाष्यानें या श्रुतीचें तात्पर्य सांगतात-]

**भाष्यं**—**तत्र नाना त्विति विद्वदविद्वत्प्रयोगयोः पृथक्करणाद्वीर्यवत्तरमिति च तरप्प्रत्ययप्रयोगाद्विद्याविहीनमपि कर्म वीर्यवदिति गम्यते । तच्चानित्यत्वे विद्याया उपपद्यते । नित्यत्वे तु कथं तद्विहीनं कर्म वीर्यवदित्यनुज्ञायेत । सर्वांगोपसंहारे हि वीर्यवत्कर्मेति स्थितिः ॥**

**भाष्यार्थ**—त्या श्रुतींतील 'नाना तु' अशा या शब्दांनीं विद्वानानें केलेला प्रयोग व अविद्वानानें केलेला प्रयोग यांना पृथक् केलेलें असल्यामुळें आणि '**वीर्यवत्तरं**' असा 'तरप'-'तर-'प्रत्ययाचा प्रयोग केलेला असल्यामुळें विद्याविहीनहि कर्म वीर्यवत् आहे, असें अनुमान होतें. [-" पण तेवढ्यानें तुमचें कोणतें अभीष्ट सिद्ध झालें ? " '**तच्च०**' इत्यादि भाष्यानें उत्तर-]-आणि तें विद्याविहीनाच्या कर्माचें वीर्यवत्त्व कर्मामध्यें विद्येला अनित्यत्व असलें तरच उपपन्न होतें. [-हेंच व्यतिरेकानें स्पष्ट करितात-]='**नित्यत्वे तु०**'-पण विद्येला जर कर्मामध्यें नित्यत्व असतें तर 'विद्याविहीन कर्म वीर्यवत् आहे' अशी अनुज्ञा श्रुतीनें कशी दिली असती ? [-" केवल अंगी कर्माचें फल वीर्यवत्त्व हें आहे, पण अंगांनीं युक्त असलेल्या त्या अंगीला वीर्यवत्तरत्व आहे, त्यामुळें श्रुतीच्या अनुज्ञेची उपपत्ति लागते " अशी आशंका घेऊन '**सर्वांग०**' इत्यादि भाष्यानें म्हणतात-]=कारण सर्व अंगांचा उपसंहार केल्यासच-सर्व अंगांसह अनुष्ठान केल्यासच कर्म वीर्यवत् होतें, असा शास्त्रसिद्धान्त आहे. [-विद्येचें फल कर्मसमृद्धीहून भिन्नहि श्रुत आहे. त्यामुळेंहि तिला कर्मांगता नाहीं, असें '**तथा०**' इत्यादि भाष्यानें सांगतात-]

**भाष्यं**—**तथा लोकसामादिषु प्रतिनियतानि प्रत्युपासनं फलानि शिष्यन्ते 'कल्पन्ते हास्मै लोका ऊर्ध्वाश्चावृताश्च' इत्येवमादीनि । न चेदं फलश्रवणमर्थवादमात्रं युक्तं प्रतिपत्तुम् । तथाहि गुणवाद आपद्येत । फलोपदेशे तु मुख्यवादोपपत्तिः । प्रयाजादिषु त्वितिकर्तव्यताकांक्षस्य क्रतोः प्रकृतत्वात्तादर्थ्ये सति युक्तं फलश्रुतेरर्थवादत्वम् ॥**

**भाष्यार्थ**—त्याचप्रमाणें लोकदृष्ट्या सामादि-उपासनांमध्यें "या उपासकाला ऊर्ध्व व आवृत म्ह० भूमीच्या वरचे व तिच्या खालचे लोक—भोगभूमि भोगाला समर्थ होतात."—छां. २. २. ३.—हीं अशा प्रकारचीं प्रतिनियत फलें प्रत्येक उपासनेंत सांगितलेलीं आहेत. [—पण 'कामांना प्राप्त करविणारा होतो' इत्यादिकाला अर्थवादत्व असल्यामुळें फलप्रधानता नाहीं, त्यामुळें उद्गीथादि-उपासनांना कर्मामध्यें नित्यत्व आहे, असें कथन केलें आहे, पृ.४१८—अशी आशंका घेऊन 'न च०' इत्यादि भाष्यानें म्हणतात—]=आणि हें फलश्रवण केवल अर्थवादमात्र आहे, असें समजणें युक्त नाहीं. [—फलश्रुतीला केवल अर्थवादमात्रत्व आहे, असें म्हटल्यास तिची विधेयप्राशस्त्यलक्षणेनें अत्यंत परोक्ष वृत्ति होईल. पण याच्या उलट फलश्रुतीला फलपरत्व आहे, असें मानिल्यास तिचा वर्तमानकालीन प्रयोग जरी असला तरी त्यांत साक्षात् फलप्रतीति होत असल्यामुळें त्याच्या मुख्य वादाची सिद्धि होते. त्यामुळें मुख्य वृत्ति संभवत असतांना लक्षणेचा आश्रय करणें अयुक्त आहे, असें 'तथा हि०' इत्यादि भाष्यानें सांगतात—]=कारण तो केवल अर्थवाद आहे, असें म्हटल्यास तो गुणवाद आहे, असें मानावें लागेल! पण फलोपदेशामध्यें मुख्यवादच उपपन्न होतो. [—"तर मग प्रयाजादिकांतीलहि फलश्रुतीला अर्थवादमात्रत्व नाहीं!" 'प्रयाजादिषु०' इत्यादि भाष्यानें उत्तर—] =पण प्रयाजादिकांमध्यें इति कर्तव्यतेची आकांक्षा करणाऱ्या क्रतूला प्रकृतत्व असल्यामुळें प्रयाजादिकांना क्रत्वर्थत्व आहे आणि त्यांना तादर्थ्य असल्यामुळें त्यांच्या फलश्रुतीचें अर्थवादत्व युक्त आहे. [प्रयाजादिक दर्श-पूर्णमासादिप्रकरणांत स्थित आहेत. त्यांना तत्प्रकरणस्थत्व असल्यामुळें त्यांचें अंगत्व आहे. म्हणून पृथक्फलत्व नाहीं. त्यामुळें त्यांच्या फलश्रुतीला अर्थवादत्व आहे, असा भावार्थ.—"तर मग पर्णमयीत्वादिकांमध्यें प्रकरणाचा अभाव असल्यामुळें पृथक्फलत्वाची सिद्धि होते. म्हणून फलश्रुतीला अर्थवादमात्रत्व नाहीं" '**तथा०**' इत्यादि भाष्यानें उत्तर—]

**भाष्यं—तथानारभ्याधीतेष्वपि पर्णमयीत्वादिषु । न हि पर्णमयीत्वादीनां अक्रियात्मकानां आश्रयमंतरेण फलसंबंधोऽवकल्पते । गोदोहनादीनां हि प्रकृतात्प्रणयनाद्याश्रयलाभादुपपन्नः फलविधिः । तथा बैल्वादीनामपि प्रकृतयूपाद्याश्रयलाभादुपपन्नः फलविधिः । न तु पर्णमयीत्वादिष्वेवंविधः कश्चिदाश्रयः प्रकृतोऽस्ति । वाक्येनैव तु जुह्वाद्याश्रयतां विवक्षित्वा फलेऽपि विधिं विवक्षतो वाक्यभेदः स्यात् ॥**

**भाष्यार्थ**–त्याचप्रमाणें अनारभ्य अधीत असलेल्या–प्रकरणांत पठित नसलेल्याहि पर्णमयीत्वादिकांमध्यें फलश्रुतीला अर्थवादत्व आहे. [–कारण त्यांना साक्षात्‌च फलवत्त्व आहे कीं क्रतूच्या द्वारा, असा विकल्प करून त्यांतील पहिल्या कल्पाचें निरसन–]=‘**न हि०**’–कारण अक्रियारूप असलेल्या पर्णमयीत्वादिकांचा फलसंबंध आश्रयावांचून संभवत नाहीं. [ ‘त्यांना क्रतूच्या द्वारा फलवत्त्व आहे’ या दुसऱ्या पक्षीं–क्रतूला द्रव्याची आकांक्षा असते, व पर्णमयीत्वाला पुरुषार्थत्वासाठीं क्रतुसंबंधापेक्षत्व असतें, जुहूप्रकृतिद्रव्यार्पकवाक्यावरून–जुहूच्या प्रकृतिभूत द्रव्याचें अर्पण करणाऱ्या वाक्यावरून क्रतुयोग झाला असतां पृथक् फलत्वाचा असंभव होतो. त्यामुळें उक्त फलश्रुतीला अर्थवादत्व आहे, असा भावार्थ. –“तर मग गोदोहनादिकांनाहि द्रव्यत्व असल्यामुळें पर्णमयीत्वादिकांप्रमाणें त्यांचा क्रतूशीं संबंध होतो. त्यामुळें त्यांनाहि पृथक्फलत्व नाहीं,” ‘**गोदोहनादीनां०**’ इत्यादि भाष्यानें उत्तर–]=पण गोदोहनादिकांच्या प्रकृत अप्प्रणयनादि आश्रयाचा लाभ होत असल्यामुळें त्यांचा फलविधि उपपन्न होतो.[‘त्यांत तूं बैस–रहा’–३३७–या मंत्रपदांना साकांक्षत्व जरी असलें तरी “हें मी तुझें गृह करितों’ इत्यादि पदांना आकांक्षा नसल्यामुळें त्यांच्या परस्पर संबंधाचा जसा अभाव आहे त्याप्रमाणें गोदोहन, कांस्य इत्यादिकांना साकांक्षत्व जरी असलें तरी प्रणयनादिकांच्या चमस-यूपादि आश्रयांचा लाभ होत असल्यामुळें आकांक्षेचा अभाव आहे. त्यामुळें वाक्यावरून सिद्ध होणाऱ्या क्रतुसंबंधाची असिद्धि होते. त्यामुळें क्रत्वर्थत्वानें त्यांना विधेयत्व नाहीं. म्हणून पृथक् फलाच्या उद्देशानेंच त्यांचें विधान युक्त आहे, असा भावार्थ.–‘ज्याला अन्नाची इच्छा असेल त्याचा यूप बिल्वकाष्ठाचा व ज्याला वीर्याची इच्छा असेल त्याचा खदिराचा करावा’ “इत्यादिकांमध्यें ‘फलेविधान’ आहे. तसेंच पर्णमयीत्वादिकांमध्येंहि तें असेल” अशी आशंका घेऊन ‘**तथा०**’ इत्यादि भाष्यानें म्हणतात–]=त्याचप्रमाणें बैल्व, खादिर, दधि इत्यादिकांचाहि ‘फलेविधि’ उपपन्न होतो. कारण त्यांत प्रकृत –क्रतुसंबंधी यूप-होमादि-आश्रयाचा लाभ होतो. [अर्थात् प्रत्यक्ष विधिश्रुति व साक्षात् कर्मवादयुक्त फलश्रुति यांमुळें त्यांचा ‘फलेविधि’ युक्त आहे, असा भावार्थ.–‘**न तु०**’ इत्यादि भाष्यानें पर्णमयीत्वादिकांतील वैषम्य सांगतात–] =पण पर्णमयीत्वादिकांमध्यें अशा प्रकारचा यूपादिकांसारखा एखादा आश्रय प्रकृत नाहीं. [कारण त्यांना अनारभ्य अधीतत्व आहे, असा भावार्थ.–“**अहोपण**, पर्णमयीत्वादिकांचा प्रकरणावांचून केवळ वाक्यावरूनच ‘फलेविधि’ असेल”

याचें ' न ' असें उत्तर '**वाक्येनैव तु०**' इत्यादि भाष्यानें देतात–]=पण पर्ण-मयीत्वादिकांची वाक्यानेंच जुह्वादि-आश्रयता सांगण्याची इच्छा करून फला-मध्येंहि विधि सांगण्याची इच्छा करणाऱ्या वाद्याच्या मतें वाक्यभेद होईल. [ पर्णतादिकांच्या जुह्वादिद्वारा क्रत्वाश्रयतेला वाक्यीयत्व असल्यामुळें त्यांत वाक्याचें तात्पर्य कल्पिणें व फलसंबंधप्रतिपादनांत त्याचें तात्पर्य कल्पिणें, यांत तात्पर्यभेदामुळें वाक्यभेद होण्याचा प्रसंग येतो. त्यामुळें त्यांत फलविधि युक्त नाहीं, असा भावार्थ.–याप्रमाणें पर्णमयीत्वादिकांमध्यें फलश्रुतीला अर्थवादत्व आहे, असें उपपादन करून उद्गीथादि-उपासनेमध्यें त्याहून वैषम्य आहे असें ' **उपासनानां तु०** ' इत्यादि भाष्यानें सांगतात–]

**भाष्यं—उपासनानां तु क्रियात्मकत्वाद्विशिष्टविधानोपपत्तेः उद्गीथाद्याश्रयाणां फले विधानं न विरुध्यते । तस्माद्यथा क्रत्वाश्रयाण्यपि गोदोहनादीनि फलसंयोगादनित्यानि एवमुद्गीथाद्युपासनानीत्यपि द्रष्टव्यम् । अत एव च कल्पसूत्रकारा नैवंजातीयकान्युपासनानि क्रतुषु कल्पयांचक्रुः ॥ ४२ ॥** ( २७ )

**भाष्यार्थ**—पण उद्गीथादि-उपासनांना क्रियात्मकत्व असल्यामुळें त्यांच्या विशिष्ट विधानाची उपपत्ति लागते. त्यामुळें उद्गीथाद्याश्रय-उपासनांच्या फलांतील विधान विरुद्ध होत नाहीं. [उद्गीथादि-उपसनांना व्यापाररूपत्व आहे. त्यामुळें अव्यापारात्मक पर्णतादिकांहून त्यांना वैलक्षण्य आहे. त्यांना फलवत्त्व असल्यामुळेंहि त्यांचें विधान सिद्ध होतें. म्हणून ' स्वर्गकामो यजेत ' इत्यादि वाक्याप्रमाणें वाक्यभेद होत नाहीं. त्यामुळें त्यांचें फलविधान युक्त आहे, असा भावार्थ.–प्रकरणादिकारणानें उद्गीथादि-उपासनांचें क्रत्वर्थाश्रितत्व सिद्ध आहे. त्यामुळें त्याच्या आश्रयानें गोदोहनादिकांप्रमाणें विशिष्ट फलोद्देशानें विधान संभवतें, असें ज्ञ[illegible] असतां '**तस्मात्०** ' इत्यादि भाष्यानें फलिताचा उपसंहार करितात–]=म्हणून ज्याप्रमाणें क्रत्वाश्रय असलेलींहि गोदोहनादिक फलसंयोगामुळें अनित्य आहेत त्याप्रमाणें उद्गीथादि उपासनें अनित्य आहेत, असेंहि जाणावें. [–उद्गीथादि विद्यांना पर्णतादिकांप्रमाणें कर्मांगत्व नाहीं, याविषयीं '**अत एव०**' इत्यादि भाष्यानें लिंगान्तर सांगतात–]=आणि त्यांना अंगत्वाभाव असल्यामुळेंच कल्पसूत्रकारांनीं अशा प्रकारच्या उपासनांची क्रतूमध्यें कल्पना केलेली नाहीं. [त्यामुळें विद्वानाप्रमाणें अविद्वानाचाहि कर्मामध्यें अधिकार आहे, असा भावार्थ.–सु. ब्र. ३६३. ] ४२ ( २७ )

## ( २८. प्रदानाधिकरण. सू. ४३ )

—' पृथक् अप्रतिबंध हें फल आहे '–पृ.४१६–या फलपृथक्त्वाप्रमाणें '**प्रदानवत्०** ' इत्यादि सूत्रानें उपगमनपृथक्त्व सांगतात––

## सूत्रं—प्रदानवदेव तदुक्तम् ॥४३॥ (२८)

**सूत्रार्थ**—'संसर्गविद्येंतील प्राण व वायु यांच्या प्रयोगाचें ऐक्य आहे कीं भेद?' अशी शंका आली असतां 'प्रदानाप्रमाणेंच' एका विद्येंतहि त्यांच्या प्रयोगाचा भेद आहे. जैमिनीनें 'नाना वा देवता०' इत्यादि सूत्रांत तसें सांगितलें आहे. ४३ (२८)–सु. ब्र. ३६४. [–बृहदारण्यकांत व छांदोग्यांत अधिदैव-अध्यात्मभेदानें सांगितलेले वायु व प्राण 'वाजसनेयके०' इत्यादि भाष्यानें उदाहृत करितात–]

**भाष्यं—वाजसनेयके 'वदिष्याम्येवाहमिति वाग्दध्रे' इत्यत्राध्यात्मं वागादीनां प्राणः श्रेष्ठोऽवधारितः। अधिदैवतमग्न्यादीनां वायुः। तथा छांदोग्ये 'वायुर्वाव संवर्गः' इत्यत्राधिदैवतं अग्न्यादीनां वायुः संवर्गोऽवधारितः 'प्राणो वाव संवर्गः' इत्यत्राध्यात्मं वागादीनां प्राणः। तत्र संशयः— किं पृथगेवेमौ वायुप्राणावुपगंतव्यौ स्यातां अपृथग्वेति ॥**

**भाष्यार्थ**—वाजसनेयकांत "मी सतत बोलेनच, असें व्रत वाक् धारण करिती झाली."–बृ. १.५.२१–अशा या ब्राह्मणांत अध्यात्म वागादिकांमध्यें प्राण श्रेष्ठ निश्चित केला आहे व अधिदैवत अग्न्यादिकांमध्यें वायु श्रेष्ठ निश्चित केला आहे. त्याचप्रमाणें छांदोग्यांत 'वायुच व प्राणच संवर्ग आहे'–छां. ४.३.१.–या खंडांत अधिदैवत अग्न्यादिकांतील वायु संवर्ग निश्चित केला आहे व अध्यात्म वागादिकांतील प्राण संवर्ग निश्चित केला आहे. [ श्रेष्ठत्व म्ह० अभग्नव्रतत्वामुळें उत्कृष्टत्व व सर्वांना आपल्यामध्यें उपसंहार करीत असल्यामुळें संवर्गत्व. –त्याविषयीं भेदाभेदवादिवाक्यांनीं संशय–]=' तत्र०'–त्याविषयीं 'हे दोघे वायु-प्राण पृथक्च उपगन्तव्य–ध्येय आहेत कीं अपृथक्' असा संशय येतो. [ या अधिकरणांत वायु व प्राण यांच्या उपगमन-विद्योक्तीनें वाक्यार्थज्ञानहेतूचेंच कथन केलेलें असल्यामुळें याच्या पादादिसंगति आहेत. पूर्वपक्षांत 'विद्यैक्यामुळें प्रवृत्तिभेदाची असिद्धि' आणि सिद्धान्तांत 'विद्यैक्य जरी असलें तरी गुणभेदामुळें प्रवृत्तिभेदाची सिद्धि' असा फलभेद सिद्धच आहे, असें मानून 'अपृथक् एव०' इत्यादि भाष्यानें पूर्वपक्ष–]

**भाष्यं—अपृथगेवेति तावत्प्राप्तं, तत्त्वाभेदात्। न ह्यभिन्ने तत्त्वे पृथगनुचिंतनं न्याय्यम्। दर्शयति च श्रुतिरध्यात्ममाधिदैवतं च तत्त्वाभेदम् 'अग्निर्वाग्भूत्वा मुखं प्राविशत्' इत्यारभ्य। तथा 'त एते सर्व एव समाः सर्वेऽनंताः' इत्याध्यात्मिकानां प्राणानामाधिदैविकीं विभूतिमात्मभूतां दर्शयति। तथान्यत्रापि तत्र तत्र अध्यात्ममधिदैवतं च बहुधा तत्त्वाभेददर्शनं भवति ॥**

**भाष्यार्थ**—ते अपृथकूच उपगंतव्य आहेत, असें अगोदर पूर्वपक्षानें प्राप्त झालें. कारण त्यांच्या स्वरूपाचा अभेद आहे. [ फलभेदामुळे कर्मांगें व तद्युक्त उपासना यांच्या नित्यत्वानित्यत्वरूप प्रयोगभेद प्रमाणें वायु व प्राण यांच्या तत्त्वाचा अभेद असल्यामुळें व त्यांची प्राप्ति होणें, हें फल एक असल्यामुळें उपासना-प्रयोगाला ऐक्य आहे, असा भावार्थ.–"अहोपण, तत्त्वाचा अभेद जरी असला तरी अपृथक् अनुचिंतन कसें ? " '**न हि०**' इत्यादि भाष्यानें उत्तर–]=कारण तत्त्व जर अभिन्न–एक आहे तर त्यांचें पृथक् अनुचिंतन करणें न्याय्य नाहीं. [ एका अग्निहोत्रांत प्रयोगभेद होत नाहीं, असा भावार्थ. –'**दर्शयति च०**' इत्यादि भाष्यानें तत्त्वाच्या अभेदाविषयीं प्रमाण–]=आणि श्रुति 'अग्नि वाक् होऊन मुखांत प्रविष्ट झाला.'–ऐ.२.४.–येथून आरंभ करून अध्यात्म व अधिदैव तत्त्वांचा अभेद दाखविते. [यांतील 'वायु प्राण होऊन दोन नासिकापुटांत प्रविष्ट झाला' ही श्रुति येथें उपयुक्त आहे.—आध्यात्मिक प्राणाचा आधिदैविक वायूशीं अभेद आहे, याविषयीं '**तथा०**' इत्यादि भाष्यानें वार्दा लिंग सांगतो–] =त्याचप्रमाणें 'ते हे सर्व सम, सर्व अनन्त'–बृ. १. ५. १३–हें श्रुतिवचन आध्यात्मिक प्राणांची आधिदैविक आत्मभूत विभूति दाखवितें. [–त्यांचा अध्यात्म व अधिदैव तत्त्वाभेद आहे, याविषयीं वार्दा '**तथा अन्यत्र०**' इत्यादि भाष्यानें सर्व श्रुतींची संमति दाखवितो–]=त्याचप्रमाणें दुसऱ्या सर्व श्रुतींतहि ठिकठिकाणीं अध्यात्म व अधिदैवत तत्त्वाभेदाचें दर्शन अनेक प्रकारें होतें. [–वायु व प्राण यांच्या तत्त्वाभेदाविषयीं वाक्यहि प्रमाण आहे, असें '**कचित् च०**' इत्यादि भाष्यानें सांगतो–]

**भाष्यं—कचिच्च 'यः प्राणः स वायुः' इति स्पष्टमेव वायुं प्राणं चैकं करोति । तथोदाहृतेऽपि वाजसनेयिब्राह्मणे 'यतश्चोदेति सूर्यः' इत्यस्मिन्नुप-संहारश्लोके 'प्राणाद्वा एष उदेति प्राणेऽस्तमेति इति प्राणेनैवोपसंहरन्नेकत्वं दर्शयति । 'तस्मादेकमेव व्रतं चरेत्प्राण्याच्चैवापान्याच्च' इति च प्राणव्रतेनैव एकेनोपसंहरन्नेतदेव द्रढयति ॥**

**भाष्यार्थ**—आणि कांहीं ठिकाणीं 'जो प्राण तो वायु' असें तत्त्वाभेद-दर्शन होतें. [–" पण जो हा मध्यम प्राण त्यालाच मृत्यूनें व्यापलें नाहीं."–बृ. १.५.२१. सु. उ. ५७२–असा उपक्रम करून 'प्राणापासूनच हा सूर्य उदय पावतो–'सु. उ. ५७४–असा उपसंहार केला असल्यामुळें त्यांचें ऐक्य आहे, असें '**तथा०**' इत्यादि भाष्यानें सांगतो–]=त्याचप्रमाणें वर उदाहृत

केलेल्याहि वाजसनेयिब्राह्मणांतील 'ज्याच्यापासून सूर्य उदय पावतो'– बृ. १.५.२३.–अशा या उपसंहारश्लोकांत 'प्राणापासूनच हा उदय पावतो व प्राणांत अस्त पावतो' असा प्राणानेंच उपसंहार करणारा वेद त्यांचें एकत्व दाखवितो. [–जर प्राण व वायु यांचें पृथक् अनुचिंतन विधित्सित–विधान करण्यास इष्ट असतें तर तदंगभूत व्रतोपदेशहि पृथकच केला असता. पण येथें 'प्राण्यात्' यानें प्राणनव्यापार प्राप्त झाला असतां 'अपान्यात्' असा अपानव्यापार सांगून त्याची प्राप्ति झाली असतां 'प्राण्यात्' या प्राणनवचनानें प्राणापानांचा निरोध करावा, असें एकच व्रत वेद दाखवितो, त्यामुळेंहि त्यांचें अपृथक् अनुचिंतन करावें, असें '**तस्मात्०**' इत्यादि वाक्यानें वादी सांगतो–]="म्हणून एकच व्रत करावें, प्राणन करावें व अपानन करावें" असा एका प्राणव्रतानें उपसंहार करणारा वेद हेंच दृढ करितो. [–छांदोग्याचें आलोचन केलें असतांहि त्यांच्या स्वरूपाभेदाचें ज्ञान होतें, असें '**तथा छांदोग्ये०**' इत्यादि भाष्यानें सांगतो–]

**भाष्यं–तथा छांदोग्येऽपि परस्तात् 'महात्मनश्चतुरो देव एकः कः स जगार भुवनस्य गोपाः' इत्येकमेव संवर्गं गमयति । न ब्रवीति एक एवैषां चतुर्णां संवर्गोऽपरोऽपरेषामिति । तस्मादपृथक्त्वमुपगमनस्येति ॥**

**भाष्यार्थ**—त्याचप्रमाणें छांदोग्यामध्येंहि पुढें "चार महात्म्यांस तो एक प्रजापति देव ग्रासता झाला व तो भुवनाचा गोप्ता–रक्षक आहे"–छां. ४.३.६– असा एकच संवर्ग श्रुति सुचवितें. [ श्रुति संवर्ग या गुणानें युक्त अशा वायूचा व प्राणाचा भेदानें उपक्रम करून पुढील उपसंहारवाक्यांत एकच संवर्ग सुचवितें. श्रुतींतील 'महात्मनः' हें द्वितीयाबहुवचन आहे. 'चतुरः'–अग्नि, सूर्य, उदक, चंद्र व वाक्, चक्षुः, श्रोत्र, मन अशा या चार महात्म्यांस एक–निरपेक्ष होत्साता प्रजापति देव ग्रासता झाला–त्यांचा उपसंहार करिता झाला, असा भावार्थ. –भेदाविषयीं कांहीं प्रमाण नसल्यामुळेंहि त्यांना ऐक्य आहे, असें वादी '**न ब्रवीति०**' इत्यादि भाष्यानें सांगतो–]=पण श्रुति 'या चौघांचा हा एकच संवर्ग आहे व दुसऱ्यांचा दुसरा आहे' असें सांगत नाहीं. [ अनेक श्रुतींच्या आलोचनानें वायु व प्राण यांच्या ऐक्याची सिद्धि होते व त्यांची उपासनाहि त्या ऐक्याच्या अधीन आहे. त्यामुळें तिचा अभेद आहे. अध्यात्म-अधिदैव गुणभेदामुळें उपासनेचा भेद आहे, असें म्हणतां येत नाहीं. कारण त्यांच्या अभेदोक्तीचा उत्पन्न झालेल्या उपासनेशीं संबंध आहे. त्यामुळें गुणभेदाला उपासनेचें भेदकत्व नाहीं. 'अग्निहोत्रं जुहोति'–अग्निहोत्राचें हवन करितो, या

वाक्यानें उत्पन्न झालेल्या अग्निहोत्राचा दधि-तडुंलादिभेदामुळें भेद होत नाहीं. कारण उत्पन्न केलें जाणारें जें कर्म त्याच्याशीं संबद्ध होणाऱ्या गुणभेदालाच भेदकत्व असतें. तस्मात् उत्पन्न झालेल्या उपासनेशीं गुणभेदाचा संबंध असल्यामुळें व उपासनेचा भेद नसल्यामुळें वायु व प्राण यांचें अपृथक् अनुचिंतन करावें, असा वादी पूर्वपक्षाचा उपसंहार करितो–]=' **तस्मात्०** '–म्हणून उपगमनाला–चिंतनाला–ध्यानाला अपृथक्त्व आहे. [वर सांगितलेल्या न्यायानें विद्येला ऐक्य जरी असलें तरी अध्यात्म-अधिदैवगुणभेदामुळें प्रवृत्तीचा भेद आहे. सायंप्रातःकाल या गुणभेदामुळें एकाहि अग्निहोत्रांत जसा प्रवृत्तिभेद होतो, त्याप्रमाणें, असा ' **एवं०** ' इत्यादि भाष्यानें सिद्धान्त सांगतात–]

**भाष्यं—एवं प्राप्ते ब्रूमः–पृथगेव वायुप्राणावुपगंतव्याविति । कस्मात्। पृथगुपदेशात् । आध्यानार्थो ह्ययं अध्यात्माधिदैवविभागोपदेशः । सोऽसत्याध्यानपृथक्त्वेऽनर्थक एव स्यात् । ननूक्तं न पृथगनुचिंतनं तत्त्वाभेदादिति । नैष दोषः । तत्त्वाभेदेऽप्यवस्थाभेदादुपदेशभेदवशेन अनुचिंतनभेदोपपत्तेः ॥**

**भाष्यार्थ**—असा पूर्वपक्ष प्राप्त झाला असतां ' वायु व प्राण हे पृथक्च उपगंतव्य–चिंतनीय आहेत' असें आम्ही सांगतों. [–"अहोपण, उपासनेच्या ऐक्यामुळें प्रयोगाचें ऐक्य वर कथन केलें आहे. त्यामुळें त्यांचें पृथक् अनुचिंतन नाहीं," अशी शंका–]=कोणत्या कारणानें ? [–अग्निहोत्राच्या दधि-तंडुलादिकांप्रमाणें प्रकृत उदाहरणांत ध्यानाचा भेदानें उपदेश केलेला असल्यामुळें पृथक् अनुचिंतनाची सिद्धि होते, असें ' **पृथक्०** ' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=पृथक् उपदेश केलेला असल्यामुळें. [–' **आध्यानार्थः०** ' इत्यादि भाष्यानें त्याचेंच विवरण–] =कारण हा अध्यात्म-अधिदैवविभागाचा उपदेश आध्यानासाठीं–अनुचिंतनासाठीं आहे. त्यामुळें आध्यानाचें पृथक्त्व जर नसेल तर तो अनर्थकच होईल. [–" तौ वा एतौ संवर्गौ "–तेच हे दोन संवर्ग,–पृ.४२५–या उपास्यगुणविशिष्ट भेदवाची वाक्याचें भेदानें अनुचिंतन करण्यांत तात्पर्य असल्यामुळें, वाक्यप्रामाण्यामुळें, भेदानेंच चिंतन करावें, असा भावार्थ.–' **ननु०** ' इत्यादि भाष्यानें पूर्वपक्षाच्या बीजाचा अनुवाद–]=अहोपण, तत्त्वाच्या अभेदामुळें पृथक् अनुचिंतन नाहीं, असें वर–पृ. ४२६–सांगितलें आहे ! [–उपास्यत्वानें प्रधानभूत संवर्गगुणविशिष्ट वायु-प्राणधर्मिभेदविषय वाक्यानें गुणभूत वायुस्वभावैक्यविषय वाक्य बाध्य आहे, अशा अभिप्रायानें ' **नैष दोषः०** ' इत्यादि सांगतात-]=हा दोष येत नाहीं. कारण तत्त्वाचा जरी अभेद असला तरी अवस्थांचा भेद असल्यामुळें

उपदेशभेदाच्या सामर्थ्यानें अनुचिंतनाच्या भेदाची उपपत्ति लागते, अनुचिंतन-भेद सिद्ध होतो. [–'ज्याच्यापासून सूर्य उदय पावतो'–पृ.४२६–इत्यादि श्लोकोक्ती-वरून वायु व प्राण यांच्या ऐक्याची सिद्धि होते. त्यामुळें त्यांच्या उपासनेलाहि ऐक्य आहे. म्हणून अपृथक् उपगति आहे, या शंकेचें निरसन–]

**भाष्यं—श्लोकोपन्यासस्य च तत्त्वाभेदाभिप्रायेणाप्युपपद्यमानस्य पूर्वोदित-ध्येयभेदनिराकरणसामर्थ्याभावात् । 'स यथैषां प्राणानां मध्यमः प्राण एव-मेतासां देवतानां वायुः' इति चोपमानोपमेयकरणात् ॥**

**भाष्यार्थ—'श्लोकोपन्यासस्य०'**–आणि तत्त्वाच्या अभेदाभिप्रायानेंहि उपपन्न होणाऱ्या श्लोकोपन्यासाला पूर्वोक्त ध्येयभेदाच्या निराकरणाचें सामर्थ्य नाहीं. [सूर्याचे उदयास्त वायूच्या अधीन असल्यामुळें त्याच्या अभेदबुद्धीनें प्राणापासून सूर्याचे उदयास्तमय सांगितले आहेत. यास्तव अध्यात्म-अधिदैव विभागानें सांगि-तलेल्या ध्येयभेदाचें निरसन करण्याचें सामर्थ्य श्लोकांत नाहीं, असा भावार्थ. –याहि कारणानें विशिष्ट ध्येयाचा भेद आहे, असें **'स यथा०'** इत्यादि भाष्यानें सांगतात–]="आणि तो जसा या प्राणांतील मध्यम प्राण तसा या देवतांतील वायु" –बृ.१.५.२२.–असें उपमान-उपमेय केल्यामुळें ध्येयाचा भेदच आहे. [–आतां 'प्राणव्रतानें उपसंहार केलेला असल्यामुळें ऐक्य व ऐक्य असल्यामुळें अपृथक् उपगमन' असें जें वर–पृ.४२७–म्हटलें आहे त्याविषयीं **'एतेन०'** इत्यादि म्हणतात–]

**भाष्यं—एतेन व्रतोपदेशो व्याख्यातः । 'एकमेव व्रतम्' इति चैवकारो वागादिव्रतनिवर्तनेन प्राणव्रतप्रतिपत्त्यर्थः । भग्नव्रतानि हि वागादीन्युक्तानि 'तानि मृत्युः श्रमो भूत्वोपयेमे' इति श्रुतेः । न वायुव्रतनिवृत्त्यर्थः 'अथातो व्रतमीमांसा' इति प्रस्तुत्य तुल्यवद्वायुप्राणयोः अभग्नव्रतत्वस्य निर्धारितत्वात् ॥**

**भाष्यार्थ**—या कथनानें व्रतोपदेशाचेंहि व्याख्यान झालें. [श्लोकाचा आशय स्वरूपैक्य आहे, या वादानें व्रतवचनहि तत्त्वाभेदाच्या अभिप्रायानें असणें युक्त आहे, असें सांगितलें, असा भावार्थ.–"अहोपण 'एव-'कारश्रुति असल्यामुळें येथें अपृथक् प्रवृत्ति भासते," अशी आशंका घेऊन म्हणतात–]=**'एकमेव व्रतं०'**–एकच व्रत आचरावें, असा 'एव-'कार वागादिव्रतांची निवृत्ति करून प्राणव्रताच्या प्रतिपत्तीसाठीं आहे. [–"पण वागादिव्रतांच्या निवृत्तीनें प्राणव्रत कशासाठीं साधिलें जात आहे?" **'भग्नव्रतानि०'** इत्यादि भाष्यानें उत्तर–] =कारण वागादिक भग्नव्रत झालेलीं म्हणून उक्त आहेत–वागादिकांचीं व्रतें भंग पावलीं, असें सांगितलें आहे. कारण "मृत्यु श्रमरूप होऊन त्या वागादिकांस

धारण करिता झाला. ”–बृ. १. ५. २१.–अशी श्रुति आहे. [–“ पण हें अवधारण वायुव्रताच्या निवृत्तीसाठींच कां नाहीं ? ” ‘ **न वायु०** ’ इत्यादि भाष्यानें उत्तर–]=तो ‘ एव-’कार वायुव्रताच्या निवृत्तीसाठीं नाहीं. कारण “ आतां म्हणून व्रतमीमांसा ” असा उपक्रम करून वायु व प्राण यांचे एकसारखेंच अभग्नव्रतत्व निश्चित केलें आहे, त्यामुळें ‘एव-’कार वायुव्रतनिवृत्त्यर्थ नाहीं. [–पण ‘प्राणालाच मृत्यूनें व्यापिलें नाहीं ’ असें अध्यात्म मुख्य प्राणाचें मृत्यूकडून अनाप्तत्व व अधिदैवत अग्न्यादिकांच्या ज्वलनादि व्रतांचा भंग सांगून वायूचें अभग्नव्रतत्व ‘ अन्य देवता अस्त पावतात, वायु अस्त पावत नाहीं ’ या वचनानें सांगितलें आहे. त्यामुळें वायुव्रतनिवृत्ति हाच ‘ एव-’काराचा अर्थ नाहीं असा भावार्थ. –फलोक्तीहि वायुव्रताच्या निवृत्तीचा अभाव दाखवितें असें ‘ **एकमेव०** ’ इत्यादि भाष्यानें सांगतात–]

**भाष्यं—‘ एकमेव व्रतं चरेत् ’ इति चोक्त्वा ‘ तेनो एतस्यै देवतायै सायुज्यं सलोकतां जयति ’ इति । वायुप्राप्तिं फलं ब्रुवन्वायुव्रतमनिवर्तितं दर्शयति । देवतेत्यत्र वायुः स्यादपरिच्छिन्नात्मकत्वस्य प्रेप्सितत्वात् । पुरस्तात्प्रयोगाच्च ‘ सैषाऽनस्तमिता देवता यद्वायुः ’ इति ॥**

**भाष्यार्थ**—आणि “ एकच व्रत आचरावें ”–पृ. ४२७–असें सांगून “ त्या व्रतानें या देवतेच्या सायुज्यास व सलोकतेसहि जिंकितो–प्राप्त होतो, ” असें वायुप्राप्ति हें फल सांगणारी श्रुति वायुव्रत अनिर्वर्तित–निवृत्त न झालेलें दाखविते. [ श्रुतिवचनांत ‘ तेन ’ याच्यापुढें असलेला जो ‘ उ ’ तो ‘ अपि-’शब्दाशीं समानार्थ असून त्याचा अन्वय ‘सायुज्यं’ व ‘सलोकतां’ यांच्या पुढें लावावा. या देवतेच्या सायुज्यास–समान देहत्वास व सालोक्यास–समान लोकतेसहि उपासनेच्या न्यूनाधिकतेप्रमाणें उपासक प्राप्त होतो, असा भावार्थ. अन्याच्या व्रताचें अनुष्ठान केल्यानें अन्याची प्राप्ति होणें शक्य नाहीं. पण येथें तर वायूच्या प्राप्तीचा निर्देश केला आहे. त्यामुळें त्याच्या व्रताची निवृत्ति होत नाहीं, असें श्रुतीचें तात्पर्य ‘ वायुप्राप्तिं फलं०’ इत्यादि भाष्यानें सांगितलें आहे.–“अहोपण, येथें देवताप्राप्तिच श्रुत आहे, वायुप्राप्ति श्रुत नाहीं, ” अशी आशंका घेऊन ‘ **देवता०** ’ इत्यादि भाष्यानें सांगतात–]=येथें ‘ देवता ’ म्हणजे वायुच आहे. कारण अपरिच्छिन्न-आत्मकत्वाला प्रेप्सितत्व आहे, अपरिच्छिन्नात्मकत्व प्राप्त करून घेण्यास अभीष्ट आहे. [–अग्न्यादिकांच्या अपेक्षेनें अनवच्छिन्न देव वायु आहे. पण अग्न्यादिक त्या वायूनेंच अवच्छिन्न झालेले आहेत. त्यामुळें संवर्ग-

गुणयुक्त वायु ही अनवच्छिन्न देवता आहे. तद्रूपत्व–तदात्मत्व येथें प्राप्त करून घेण्यास इष्ट आहे. यास्तव देवताप्राप्ति म्ह० वायुप्राप्तिच आहे, असा भावार्थ. –केवल प्रकरणाच्या आलोचनानेंच देवता वायु नाहीं, तर साक्षात् श्रुति असल्यामुळेंहि ती वायु आहे, असें '**पुरस्तात्०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=आणि "जो हा वायु ती ही अस्त न पावलेली देवता आहे."–बृ.१.५.२२.–असा पूर्वी प्रयोग केलेला असल्यामुळें वायु देवता आहे. [–आतां पृथक् उपदेशामुळें पृथक् उपगमन जें सांगितलें आहे त्याचें '**तथा०**' इत्यादि भाष्यानें विवरण–]

**भाष्यं—तथा 'तौ वा एतौ द्वौ संवर्गौ वायुरेव देवेषु प्राणः प्राणेषु' इति भेदेन व्यपदिशति । 'ते वा एते पंचान्ये पंचान्ये दश सन्तस्तत्कृतम्' इति च भेदेनैवोपसंहरति । तस्मात्पृथगेवोपगमनम् ॥**

**भाष्यार्थ**—त्याचप्रमाणें श्रुति "तेच हे दोन संवर्ग वायुच देवांतील संवर्ग व प्राण प्राणांतील"–छां.४.३.४–असा भेदानें व्यपदेश करिते. "ते हे वागादि पांच व अग्न्यादिक पांच मिळून दहा होऊन तें कृत होतें."–छां.४.३.८–असा भेदानेंच उपसंहार करिते. [अर्थात् संवर्गभेदानें जसा उपक्रम केला आहे तसाच भेदानें उपसंहार केलेला असल्यामुळेंहि त्यांचें पृथक् अनुचिंतन करावें.–'**तस्मात्०**' इत्यादि उपक्रमोपसंहारांच्या एकरूपतेच्या फलाचा उपसंहार–]=म्हणून प्राण व वायु यांचें पृथक्च उपगमन–अनुचिंतन करावें. [–त्याविषयीं 'प्रदानवत्' या सूत्रस्थ उदाहरणाला अवतरण देऊन '**प्रदानवत्०**' इत्यादि भाष्यानें त्याचें व्याख्यान–]

**भाष्यं—प्रदानवत् । यथा "इंद्राय राज्ञे पुरोडाशमेकादशकपालमिंद्रायाधिराजायेंद्राय स्वराज्ञे" इत्यस्यां त्रिपुरोडाशिन्यामिष्टौ, "सर्वेषामभिगमयन्नवद्यत्यछंवटकारं" इति । अतो वचनादिंद्राभेदाच्च, सहप्रदानाशंकायां राजादिगुणभेदाद्याज्यानुवाक्याव्यत्यासविधानाच्च यथान्यासमेव देवतापृथक्त्वात्प्रदानपृथक्त्वं भवति । एवं तत्त्वाभेदेऽपि आध्येयांशपृथक्त्वादाध्यानपृथक्त्वमित्यर्थः॥**

**भाष्यार्थ**—प्रदानाप्रमाणें. ज्याप्रमाणें [–जिच्यामध्यें तीन पुरोडाश आहेत ती त्रिपुरोडाशिनी, तिच्या विषयींचें उत्पत्तिवाक्य उदाहृत करितात–]="इंद्र राजाला एकादश कपाल पुरोडाश, इंद्र अधिराजाला व इंद्र स्वराजाला" अशा या त्रिपुरोडाशिनी इष्टींत [त्या इष्टींत पुरोडाशाचें सहप्रदान करावें, कीं भेदानें असा संदेह आला असतां 'सर्वेषां०' इत्यादि वाक्यानें पूर्वपक्ष–]="सर्व देवताविशेषांना प्राप्त करविणारा अपर्यायानेंच 'अछंवट्कारं'–अव्यर्थत्वासाठीं विभाग करितो." [खरोखर याज्ञिक या इष्टींत एकाच वेळीं अवदान करितात. त्या अवदानानें सर्व

देवताविशेषांना प्राप्त करणविणारा अक्रमानेंच–एकदमच पुरोडाशांचें अवदान करितो–त्याचा त्याचा भाग घेतो. 'अछंवट्कारं' म्ह० अव्यर्थत्वासाठीं, असा त्याविषयीं हेतु सांगितला आहे. कारण एकासाठीं सर्वतः अवदान केल्यास बाकी राहिलेला भाग यागाला अयोग्य होतो. पण एकाच वेळीं सर्वांसाठीं अवदान केलें असतां तो अयोग्य होत नाहीं. म्हणून एकाच वेळीं सर्व देवतांचा भाग घेतो. पण या उक्त वाक्यावरून 'सर्वांसाठीं सहावदानश्रुति असल्यामुळें व देवतेमध्यें भेदाचा अभाव असल्यामुळें त्यांच्या तिन्ही पुरोडाशांचें सहप्रदान प्राप्त झालें' असें '**अतः वचनात्**०' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=या वचनावरून व इंद्राचा अभेद असल्यामुळें सहप्रदानाची आशंका आली असतां [–सिद्धान्त सांगतात–]='**राजादि**०'–राजादि गुणांच्या भेदामुळें–उत्पत्तिवाक्यांतच राज-अधिराज-स्वराजगुणभेदामुळें आणि याज्या व अनुवाक्या यांच्या व्यत्यासविधानामुळें यथान्यासच म्ह० यथावचनच देवतापृथक्त्वामुळें प्रदानपृथक्त्व होतें. [पूर्वोक्त 'इंद्राय राज्ञे-अधिराजाय-स्वराज्ञे' या वाक्यांत जसें विधान आहे त्याप्रमाणें त्या त्या गुणानें विशिष्ट अशा देवतांचा भेद असल्यामुळें प्रदानाचा–प्रक्षेपाचाहि भेद आहे, असा भावार्थ. शिवाय "त्रिपुरोडाशिनी इष्टींतील 'प्रथम पुरोडाशप्रदानामध्यें जी याज्या ती पुनःप्रयोगांत अनुवाक्या व जी येथें पूर्वी अनुवाक्या ती मागून याज्या' असा व्यत्यास–परस्पर अदलाबदल सांगतो" असें जें या वाक्यानें विहित आहे तें प्रयोगभेदपक्षींच उपपन्न होतें. कारण एका ऋचेला एका प्रयोगांत याज्यात्व व अनुवाक्यात्व असणें विरुद्ध आहे, असें भाष्यांतील 'याज्यानुवाक्याव्यत्यासविधानाच्च' या पदानें सांगितलें आहे. अध्वर्यूनें 'यज' असा प्रैष केला असतां होत्याकडून प्रयोग केला जाणारा जो मंत्र ती याज्या व 'अनुब्रूहि' अशा प्रैषानंतर प्रयोग केला जाणारा जो मंत्र ती अनुवाक्या, असा त्यांचा भेद आहे. याप्रमाणें पूर्वोत्तरपक्षांनीं दृष्टान्ताचें व्याख्यान करून '**एवं**०' इत्यादि भाष्यानें दार्ष्टान्तिक सांगतात–]=याप्रमाणें तत्त्वाचा अभेद जरी असला तरी आध्येयांशाला–उपास्यांशाला पृथक्त्व असल्यामुळें आध्यानाला–उपासनेला–अनुचिंतनाला पृथक्त्व आहे, असा भावार्थ. [–या उक्त अर्थी देवताकांडस्थ प्रदानभेदविषय अधिकरणाचें उदाहरण '**तदुक्तं**०' इत्यादि सूत्रभागानें देतात–]

**भाष्यं—तदुक्तं संकर्षे 'नाना वा देवता पृथग्ज्ञानात्' इति । तत्र तु द्रव्यदेवताभेदाद्यागभेदो विद्यते । नैवमिह विद्याभेदोऽस्ति । उपक्रमोपसंहाराभ्यां अध्यात्माधिदैवोपदेशेषु एकविद्याविधानप्रतीतेः । विद्यैक्येऽपि त्वध्यात्माधिदैव-**

**भेदात्प्रवृत्तिभेदो भवति, अग्निहोत्र इव सायंप्रातःकालभेदात्। इत्येतावदभिप्रेत्य प्रदानवदित्युक्तम्॥ ॥ ४३ ॥ (२८)**

**भाष्यार्थ**—"नाना वा देवता पृथग्ज्ञानात्"–किंवा देवता पृथग्ज्ञानामुळें नाना आहे, असें संकर्षांत सांगितले आहे. [ कर्मकांडांतीलच अवशिष्ट कर्म 'संकृष्यते'–संक्षेपानें सांगितलें जातें म्हणून संकर्ष--देवताकांड, त्यांत असा भावार्थ. 'वा' हा शब्द देवतेच्या एकत्वाची शंका घालविण्यासाठीं आहे. 'पृथग्ज्ञानामुळें' हा देवतेच्या नानात्वाविषयीं हेतु सांगितला आहे. उत्पत्तिवाक्यांतच राजाधिराजादिगुणांचें पृथक् ज्ञान होत असल्यामुळें तत्तद्गुणविशिष्ट देवतांचेंहि पृथक्त्व असणें युक्त आहे, असा भावार्थ.–"दृष्टान्तांत देवता-द्रव्य-भेदामुळें जसा कर्मभेद होतो तसा येथें–दार्ष्टान्तिकांतहि वायु, प्राण अशा शब्दांमुळे, 'आदित्य चरु' 'सौर्य चरु' इत्यादिकांमध्यें आदित्य-सूर्यादिशब्दभेदामुळें जसा, तसाच देवताभेदानें विद्याभेद होईल" अशी आशंका घेऊन '**तत्र तु॰**' इत्यादि भाष्यानें म्हणतात–]=पण तेथें–दृष्टान्तांत द्रव्य-देवता-भेदामुळें यागभेद होतो, पण येथें–दार्ष्टान्तिकांत तसा विद्याभेद नाहीं. कारण उपक्रम व उपसंहार यांच्या योगानें अध्यात्म-अधिदैव उपदेशांमध्यें एकविद्या-विधानाची प्रतीति येते. [ जेथें उत्पत्तिवाक्यावरूनच नाना द्रव्य व देवता यांनीं युक्त असें कर्म दृष्ट असतें तेथें कर्मभेद होतो. वैश्वदेवी आमिक्षा इत्यादिकांप्रमाणें. पण जेथें उत्पत्तितःच कर्माचें ऐक्य असतें तेथें देवतादिभेद जरी असला तरी कर्मभेद नाहीं. तर अग्निहोत्रादिकांप्रमाणेंच विद्यैक्य असतें असा भावार्थ.–"तर मग 'प्रदानवत्' असें कोणत्या साम्यामुळें म्हटलें आहे?" '**विद्यैक्येऽपि॰**' इत्यादि भाष्यानें उत्तर–]=पण विद्येचें ऐक्य जरी असलें तरी अध्यात्म-अधिदैव-भेदामुळें प्रवृत्तिभेद होतो. सायं-प्रातःकालभेदामुळें अग्निहोत्रामध्यें प्रवृत्तिभेद जसा होतो त्याप्रमाणें, अशा या एवढ्याच आशयानें येथें–सूत्रांत 'प्रदानवत्' असें म्हटलें आहे. [–कारण अग्निहोत्रांत सायंकालीं अग्नि व प्रजापति देवता व प्रातःकालीं सूर्य व प्रजापति देवता, आणि दोन्हीं कालीं अनुष्ठानाचें पृथक्त्व, त्याचप्रमाणें येथेंहि ध्यानभेदाची सिद्धि होते, असा भावार्थ.–सु.ब्र.३६९–]४३.(२८)

(२९. **लिंगभूयस्त्वाधिकरण.** सू. ४४-५२.)

—वायुविद्योक्तीनंतर सांपादिक अग्निविद्येची मीमांसा '**लिंगभूयस्त्वात्॰**' इत्यादि सूत्रानें आरंभितात--

## सूत्रं—लिंगभूयस्त्वात्तद्धि बलीयस्तदपि ॥ ४४

**सूत्रार्थ**—वाजसनेयकांतील 'वाक्चितादि' अग्नि कर्मांगभूत आहेत कीं स्वतंत्र, असा संशय आला असतां 'लिगभूयस्त्वामुळें'–त्यांचें स्वातंत्र्य सुचविणारीं अनेक लिंगें असल्यामुळें ते स्वतंत्र आहेत. कारण 'तें लिग प्रकरणाहून अधिक बलवान् आहे' 'तेंहि "श्रुति-लिंग०"–पृ.३६६–इत्यादि पूर्वमीमांसासूत्रांत सांगितलें आहे. ४४.–सु. ब्र. ३६६–[–'**वाजसनेयिनः०**' इत्यादि भाष्यानें कर्मप्रकरणस्थ मनश्चिदादि सांपादिक अग्नींचा विषयत्वानें उपन्यास–]

**भाष्यं—वाजसनेयिनोऽग्निरहस्ये 'नैव वा इदमग्रे सदासीत्' इत्येतास्मिन्ब्राह्मणे मनोऽधिकृत्याधीयते 'तत्षट्त्रिंशतं सहस्राण्यपश्यदात्मनोऽग्नीनर्कान्मनोमयान्मनश्चितः' इत्यादि । तथैव 'वाक्चितः प्राणचितश्चक्षुश्चितः श्रोत्रचितः कर्मचितोऽग्निचितः' इति पृथगग्नीनामनन्ति सांपादिकान् ॥**

**भाष्यार्थ**—वाजसनेयिशाखाध्यायी अग्निरहस्यांत "उत्पत्तीच्या पूर्वी हें सर्व सत् नव्हतेंच" अशा या ब्राह्मणांत मनाला विषय करून असें पढतात–[ 'उत्पत्तीच्या पूर्वी हें सर्व सत् नव्हतेंच असत्हि नव्हतें' असा उपक्रम करून मनाचा प्रादुर्भाव सांगून 'तें आपल्यालाच पाहतें झालें' अशा ईक्षणपूर्वक 'तें मन आपल्या अग्नींना पाहतें झालें' असें मनाला विषय करून पढतात, असा भावार्थ. –पुरुषाच्या आयुष्ट्वानें कल्पिलेल्या शतवर्षांतील छत्तीस सहस्र अहोरात्रांनीं अवच्छिन्न झालेल्या मन-वाक्-प्राण-चक्षुः-श्रोत्र–त्वक्-कायवृत्तिसमूहांनीं–इष्टकात्वानें भावना केल्या जाणाऱ्या त्या वृत्तिसमूहांनीं सांपादिक अग्नि सांगतात असें '**तत्षट्त्रिशतं०**' इत्यादि भाष्यानें भाष्यकार म्हणतात–]="तें मन आपल्या अर्क–अर्चनीय, मनोवृत्तिभावित असल्यामुळें मनोमय मनश्चित् छत्तीस सहस्र अग्नींना पाहतें झालें" इत्यादि सांगतात. [–तें आपल्या वागादिकांस–इष्टकारूपानें भावित–भावना केलेल्या वागादिवृत्तींनीं 'चीयन्ते'–चयन केले जातात म्हणून वाक्चिदादि अग्नींस पाहतें झालें, असें '**तथैव०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–] =त्याचप्रमाणें "वाक्चित्, प्राणचित् चक्षुश्चित्, श्रोत्रचित्, कर्मचित्, अग्निचित्" अशा पृथक् सांपादिक अग्नींचें आमनन करितात. [–क्रत्वर्थत्व-पुरुषार्थत्वविनियोजक प्रमाणाच्या दृष्टीनें '**तेषु०**' इत्यादि भाष्यानें संशय सांगतात–]

**भाष्यं—तेषु संशयः– किमेते मनश्चिदादयः क्रियानुप्रवेशिनस्तच्छेषभूताः । उत स्वतंत्राः केवलविद्यात्मका इति ॥**

**भाष्यार्थ**—त्या अग्नींविषयीं 'काय, हे मनश्चिदादि-अग्नि कर्मामध्यें प्रवेश करणारे, कर्मशेषभूत–कर्मांगभूत आहेत कीं स्वतंत्र केवल विद्यात्मक आहेत?' असा संशय येतो. [ केवल विद्यात्मकत्व म्ह० कर्मानुप्रवेशावांचून भावनामयत्व. वायु व प्राण यांच्या एकप्रयोगाचा असंभव असल्यामुळें त्यांना प्रयोगभेदानें ध्येयत्व जरी असलें तरी मनश्चिदादिकांचें कर्मांगत्वानें एकप्रयोगत्व युक्त आहे, असें '**तत्र०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]

**भाष्यं—तत्र प्रकरणात्क्रियानुप्रवेशे प्राप्ते। स्वातंत्र्यं तावत्प्रतिजानीते। लिंगभूयस्त्वादिति। भूयांसि हि लिंगान्यस्मिन्ब्राह्मणे केवलविद्यात्मकत्वमेषामुपोद्बलयन्ति दृश्यन्ते। 'तद्यत्किंचेमानि भूतानि मनसा संकल्पयन्ति तेषामेव सा कृतिः' इति। 'तान्हैतानेवंविदे सर्वदा सर्वाणि भूतानि चिन्वन्त्यपि स्वपते' इति चैवंजातीयकानि ॥**

**भाष्यार्थ**—असा संशय येऊन प्रकरणामुळें त्यांचा क्रियानुप्रवेश प्राप्त झाला असतां [ सांपादिक अग्नींच्या केवल विद्यात्मत्वानें पुरुषार्थत्वसमर्थनद्वारा वाक्यार्थज्ञानहेतूचेंच येथें कथन केलें असल्यामुळें याच्या पादादिसंगति आहेत. पूर्वपक्षांत 'क्रियार्थ अग्नींना क्रियात्व' व सिद्धान्तांत 'पुरुषार्थ असलेल्या त्यांना केवलविद्यामयत्व,' असें मानून '**स्वातंत्र्यं०**' इत्यादि भाष्यानें सिद्धान्ताचा उपक्रम करितात–]=सूत्रकार 'लिंगभूयस्त्वामुळें' या पदानें त्यांच्या स्वातंत्र्याची प्रतिज्ञा करितात. [–'**भूयांसि०**' इत्यादि भाष्यानें सूत्राक्षरांची योजना करितात–]=कारण या ब्राह्मणामध्यें यांच्या केवल विद्यात्मकत्वाचेंच परिपोषण करणारीं–त्याला पुष्टि देणारीं पुष्कळ लिंगें उपलब्ध होतात. [–'हीं सर्वहि भूतें जें कांहीं मनानें संकल्पितात त्याच अग्नींची ती कृति–करण आहे' असें हें प्रकृत अग्नींच्या स्वातंत्र्यानें भावनामयत्वाविषयीं लिंग आहे. कारण कोणतेंहि कर्मांग यत्किंचित् करणामध्यें –कांहींहि करणें, यानें सिद्ध होत नाहीं. कारण तें केवल चोदनेनेंच लभ्य–प्राप्य आहे, असें '**तद्यत्०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]='हीं सर्व भूतें ज्या कशाचाहि संकल्प करितात ती त्यांचीच कृति आहे' अशीं पुष्कळ लिंगें यांच्या केवल विद्यात्मकत्वाला पुष्टि देत असलेलीं दिसतात. [ 'निजणाऱ्या व जागणाऱ्याहि या एवंवेत्त्यासाठीं सर्व भूतें त्याच्या अग्नींचें सर्वदा चयन करितात.' हें दुसरें लिंग आहे. कारण कोणतेंहि कर्मांग प्रत्येकाचा नियत देश, काल व निमित्त यांमध्यें विहित असल्यामुळें सर्वदा सर्वांकडून अनुष्ठिलें जात नाहीं, असें '**तान्०**' इत्यादि वाक्यानें सांगतात–]=आणि "अशी उपासना करणारा जरी जागत

असला किंवा निजलेला असला तरी त्याच्यासाठीं सर्व भूतें त्याच्या या अग्नींचें सर्वदा चयन करितात " हीं सर्व अशा जातींचीं लिंगें त्यांच्या विद्यांगत्वाला पुष्टि देत असलेलीं दिसतात. [सर्व भूतें छत्तीस सहस्र अहोरात्रांनीं अवच्छिन्न झालेल्या इष्टकात्वानें भावना केलेल्या या शरीरेंद्रियव्यापारांनीं त्याच्या अग्नींचें चयन–संपादन करितात, असा भावार्थ. त्यांतील इष्टका व अग्नि यांतील संख्याधिक्य हें अग्नींच्या केवल विद्यात्वाविषयीं लिंग आहे. कारण त्यांना कर्मांगत्व असल्यास प्रसिद्ध संख्यातिरेकाची सिद्धि होत नाहीं, असें मानून '**एवंजातीयकानि**' असें म्हटलें आहे.–" अहोपण, प्रकरणावरून त्या अग्नींचें क्रियांगत्व सिद्ध होतें व लिंगावरून स्वातंत्र्य सिद्ध होतें, त्यामुळें संशय येतो " अशी आशंका घेऊन '**तद्धि लिंगं०**' इत्यादि भाष्यानें म्हणतात–]

**भाष्यं—तद्धि लिंगं प्रकरणाद्बलीयः । तदप्युक्तं पूर्वस्मिन्कांडे— " श्रुतिलिंगवाक्यप्रकरणस्थानसमाख्यानां समवाये पारदौर्बल्यमर्थविप्रकर्षात्" इति४४**

**भाष्यार्थ**—कारण तें लिंग प्रकरणाहून अधिक बलवान् आहे. [–"अहोपण, त्या दोहोंनाहि प्रमाणत्व जर एकसारखेंच आहे तर बलाबलव्यवस्था कोणत्या कारणानें होते ? " '**तदप्युक्तं०**' इत्यादि भाष्यानें उत्तर–]=पूर्वकांडामध्यें 'श्रुति लिंग, वाक्य, प्रकरण, स्थान व समाख्या, यांचा समवाय म्ह० एकविषयत्वानें परस्पर विरोध आला असतां अर्थाच्या व्यवधानामुळें पुढील पुढील प्रमाणाला दुर्बलत्व आहे. ' असें ' तदपि'–तेंहि सांगितलें आहे.–पृ.३६६–४४. [–याप्रमाणें सिद्धान्तानें उपक्रम करून आतां ' **पूर्वविकल्पः०**' या सूत्रानें पूर्वपक्ष करितात–]

## सूत्रं—पूर्वविकल्पः प्रकरणात्स्यात्क्रिया मानसवत् ॥४५

**सूत्रार्थ**—हे संकल्पात्मक अग्नि स्वतंत्र नाहींत, तर ' पूर्वविकल्पः'–पूर्व क्रियामय अग्नीचा हा संकल्पात्मक अग्नि विकल्प आहे. ' कारण हें प्रकरण क्रियामय अग्नीचें आहे.' ' क्रिया स्यात् '–म्हणून तो क्रियामयच आहे. ' मानसग्रहाप्रमाणें' –द्वादशाह क्रतूंतील मानसग्रह दहाव्या दिवसाचें जसें अंग आहे त्याप्रमाणें. ४५–सु.ब्र.३६७.–[–पूर्वपक्षाचें विवरण करणारा वादी ' **नैतद्युक्तं०**' इत्यादि भाष्यानें उक्त सिद्धान्तप्रतिज्ञेचा निषेध करितो–]

**भाष्यं—नैतद्युक्तं स्वतंत्रा एतेऽग्नयोऽनन्यशेषभूता इति । पूर्वस्य क्रियामयस्याग्नेः प्रकरणात्तद्विषय एवायं विकल्पविशेषोपदेशः स्यान्न स्वतंत्रः । ननु प्रकरणाल्लिंगं बलीयः ॥**

**भाष्यार्थ**—'हे अग्नि स्वतंत्र आहेत, दुसऱ्या कर्माचे शेषभूत नाहींत,' असें जें म्हटलें आहे तें युक्त नाहीं. [आतां सहेतुक पूर्वपक्षाची प्रतिज्ञा–]=**'पूर्वस्य०'** –'पूर्वोविकल्पः'–पूर्वीच्या म्ह० क्रियामय अग्नीच्या प्रकरणामुळें–हें कर्ममय अग्नींचें प्रकरण असल्यामुळें तद्विषयच हा विकल्पविशेषोपदेश असणें युक्त आहे. स्वतंत्र नव्हे. [ 'इष्टकाभिरग्नींश्चिनुते'–इष्टकांनीं अग्नींचें चयन करितो, अशा या उक्त क्रियामय अग्नीच्या अधिकारांत–प्रकरणांत श्रवण असल्यामुळें हाहि सांपादिक अग्नीचा उपदेश तद्विषय–तत्संबंधी विकल्पोपदेश आहे. त्यामुळें जसा क्रियांग कर्ममय अग्नि तसा सांपादिक अग्निहि क्रियांग असेल, असा भावार्थ. विकल्पविशेष म्ह० प्रकारभेद.–'**ननु०**' इत्यादि भाष्यानें सिद्धान्त्यांच्या उक्त मताचा अनुवाद–]=अहोपण, प्रकरणापेक्षां लिंग अधिक बलवान् आहे. [त्यामुळें अग्नींचें प्रकरणप्राप्त क्रियाशेषत्व सोडून लिंगप्राप्त पुरुषार्थत्व मानावें, असा या वाक्याला शेष लावावा.–" पण विधीच्या उद्देशांतील लिंग प्रकरणाहून बलवान् आहे कीं अर्थवादस्थ लिंग प्रकरणाहून बलवान् आहे?" असा विकल्प करून वादी त्यांतील पहिल्या कल्पाचा '**सत्यमेव०**' या भाष्यानें अंगीकार करितो–]

**भाष्यं—सत्यमेवमेतत् । लिंगमपि त्वेवंजातीयकं न प्रकरणाद्बलीयो भवति। अन्यार्थदर्शनं ह्येतत् । सांपादिकाग्निप्रशंसारूपत्वात् । अन्यार्थदर्शनं च असत्यामन्यस्यां प्राप्तौ गुणवादेनाप्युपपद्यमानं न प्रकरणं बाधितुमुत्सहते । तस्मात्सांपादिका अप्येतेऽग्नयः प्रकरणात्क्रियानुप्रवेशिन एव स्युः ॥**

**भाष्यार्थ**—'**सत्यमेव०**'–विध्युद्देशस्थ लिंग प्रकरणाहून अधिक बलवान् असतें, हें खरें आहे. [दुसऱ्या कल्पाला दूषित करितो–]=पण अशा जातीचें म्ह० 'सर्वदा सर्व भूतें संपादन करितात ' इत्यादि अर्थवादस्थ लिंग प्रकरणाहून अधिक बलवान् असत नाहीं. [ तेंच साधितो–]='**अन्यार्थदर्शनं०**'–कारण हें अन्यार्थदर्शन आहे. कारण त्याला सांपादिक अग्नींचें प्रशंसारूपत्व आहे. [ हें साधनात्मक लिंग नाहीं. कारण विध्युद्देशक वाक्यत्वानें याला विधिपरत्व आहे. त्यामुळें हें स्वातंत्र्यानें प्रमापक नाहीं. कारण त्याला स्तुतिमात्रत्व आहे.–"अहोपण, अन्यार्थदर्शनांनाहि प्रमापकत्व असतें " अशी आशंका घेऊन ' मूल प्रमाण असतांना त्याला प्रमापकत्व जरी असलें तरी प्रकृत उदाहरणांत मूल प्रमाणाचा अभाव असल्यामुळें असें म्हणूं नको' असें वादी '**अन्यार्थदर्शनं०**' इत्यादि भाष्यानें सांगतो–]=आणि अन्य प्राप्ति नसतांना गुणवादानेंहि उपपन्न होणारें अन्यार्थदर्शन प्रकरणाचा बाध करण्यास समर्थ होत नाहीं. [–याप्रमाणें प्रकृत लिंगाला प्रकरणाचें

बाधकत्व नाहीं,असें सिद्ध झालें असतां '**तस्मात्०**' इत्यादि भाष्यानें फलित सांगतो-] =यास्तव सांपादिक असलेलेहि हे अग्नि प्रकरणामुळें कर्मामध्यें प्रवेश करणारेच असणें युक्त आहे.[यानें सूत्रांतील 'क्रिया' या पदाचें व्याख्यान केलें.-"अहोपण, अक्रियारूप असलेल्या यांना क्रियाशेषत्व कसें ?" '**मानसवत्**' असें उत्तर-]

**भाष्यं—मानसवत् । यथा द्वादशरात्रस्य दशमेऽहनि अविवाक्ये पृथिव्या पात्रेण समुद्रस्य सोमस्य प्रजापतये देवतायै गृह्यमाणस्य ग्रहणासादनहवनाहरणोपह्वानभक्षणानि मानसान्येवाम्नायन्ते । स च मानसोऽपि ग्रहकल्पः क्रियाप्रकरणात्क्रियाशेष एव भवति । एवमयमप्यग्निकल्प इत्यर्थः ॥ ४५ ॥**

**भाष्यार्थ**—'मानसाप्रमाणें.' [-द्वादशाहक्रतूंत 'अनया त्वा पात्रेण समुद्रं रसया प्राजापत्यं मनोग्रहं गृह्णाति' असें श्रुत आहे. अध्वर्यु या रसारूप-पृथ्वीरूप पात्रानें तुज समुद्राचें-प्राजापतीदेवताक मनोग्रहत्वानें ग्रहण करितो. ज्याचें ग्रहण केलें जातें तो ग्रह सोमरस, मनानें समुद्राचा रसत्वानें भावना करून त्याचे ग्रहण करितो, असा भावार्थ. 'त्यांतील मानस हा द्वादशाहाहून-बारा दिवसांहून भिन्न दिवस आहे कीं तो त्या द्वादशाहांतच अन्तर्भूत होणाऱ्या दहाव्या दिवसाचें अंग आहे!' असा संदेह आला असतां-'ही वाकच द्वादशाह आहे व मन मानस आहे' अशा भेदोक्तीनें मानसाचा द्वादशाहून भेद सिद्ध होतो व 'द्वादशाहाची गतरस अंगें मानसानेंच रसपूर्ण होतात' अशी मानसानें द्वादशाहाची स्तुति केली आहे.स्तुति व स्तुत्य या भावाला भेदाची आकांक्षा असते.'पत्नीसंयाजान्तानि अहानि संतिष्ठन्ते' -पत्नीसंयाजान्त दिवस संस्थित होतात, असें सांगून द्वादशाहान्तर्गत दिवसांचें पत्नीसंयाजान्तत्व दृष्ट आहे. 'पत्नीसंयाज्यमानसाय प्रसर्पन्ति' असें मानसाचें पत्नीसंयाजाच्या पुढेंच श्रवण आहे.'द्वादशाह'ही संज्ञा त्रयोदशहांतहि द्वादशाहाचें अस्तित्व असल्यामुळें उपचारानें उपपन्न होते. यास्तव-या सर्व कारणांमुळें मानस अहर् द्वादशाहाहून भिन्न आहे.-असा पूर्वपक्ष प्राप्त झाला असतां "मानसाच्या त्रयोदशाहत्वाविषयीं कांहीं प्रमाण नाहीं. त्यामुळें 'द्वादशाह' या संज्ञेची गौणवृत्तीनें व्यवस्था लाविणें अयुक्त आहे. अंगांगिभेदानें उक्तिभेद व स्तुति-स्तुत्यभाव यांची सिद्धि होते. दिवसांच्या पत्नीसंयाजान्ततेला औत्सार्गिकत्व असल्यामुळें विशेष उक्तीनें दहाव्या दिवसाच्या मानस ग्रहादिकांना पत्नीसंयाजाहून परत्व असणें ांत कांहीं विरोध नाहीं. 'एष वै दशमस्याह्नो विसर्गो यन्मानसं'-जें मानस तोच हा दहाव्या दिवसाचा विसर्ग आहे, अशी उक्ति आहे. अन्त जो विसर्ग त्याला अन्तवान् दिवसाचें धर्मत्व आहे. त्यामुळें त्याच्या दशमदिवसाच्या अंगतेचा बोध

होतो. ' दशमेऽहनि मानसाय प्रसर्पन्ति '–'दाहाव्या दिवशीं मानसासाठीं प्रसर्पण करितात ' अशी आधारत्वोक्ति आहे. वास्तव मानस हें दशमदिवसाचें अंगच आहे. भिन्न दिवस नव्हे" असा सिद्धान्त केला आहे. याप्रमाणें द्वादशाहसंबंधी दशमाह्नाचें मानस अंग आहे, असें कर्ममीमांसेंत सांगितलें आहे.–तथापि दशरात्राला द्वादशाहाचें विकृतित्व असल्यामुळे क्रमानें अतिदेश केलेल्या अहर्धर्मामध्यें दशरात्रगत दशमाहामध्येंहि द्वादशाहर्गतदशमाहरंगभूत मानसाची प्राप्ति आहे, अशा अभिप्रायानें वादी 'यथा०' इत्यादि भाष्यानें व्याख्यान करितो–]=ज्याप्रमाणें द्वादशरात्राच्या दशमाहांत–अविवाक्यांत पृथिवी या पात्रानें प्रजापति देवतेसाठीं ग्रहण केल्या जाणाऱ्या समुद्र या सोमाचें ग्रहण, आसादान, हवन, आहरण, उपह्वान व भक्षण हीं सर्व मानसच सांगितलीं जातात, [अविवाक्य हें दशमाहाचें नांव आहे. मानसत्वामुळें ज्या दिवशीं ऋत्विजांचीं विविध वाक्यें नसतात तें दशमाहर अविवाक्य होय, अशी त्याची व्युत्पत्ति आहे. त्या अविवाक्यांत–दशमाहांत ' अनया त्वा पात्रेण० ' असें हें वचन श्रुत आहे. ' तुज समुद्राला या पृथिवीपात्रानें प्रजापतिदेवताक ध्यानमय ग्रह संपादन करून अध्वर्यु त्याचें ग्रहण करितो' असा त्या वाक्याचा अर्थ आहे. भाष्यांतील ' पृथिव्या०' इत्यादि भागानें त्या अर्थाचाच सोपस्कार उपन्यास केला आहे. ग्रहण म्ह० सोमाधार पात्राचें उपादान, आसादन म्ह० ग्रहण केलेल्या त्या पात्राचें स्वस्थानीं स्थापन, त्यानंतर सोमाचा होम हेच हवन, हुतशेषाचें ग्रहण हें आहरण, त्यानंतर ऋत्विजांनीं त्याच्या भक्षणासाठीं परस्परांना अनुज्ञा देणें, हें उपह्वान, त्यानंतर अवशिष्ट सोमाचें भक्षण, अशीं हीं सर्व मानसच आहेत, असा भावार्थ.–" अहोपण, अन्यग्रहयोगी मानस कल्पनाभेदाला क्रियानुप्रवेशित्व कसें ? " वादी ' स च० ' इत्यादि भाष्यानें म्हणतो–]=आणि तो मानस असलेलाहि ग्रहकल्प क्रियाप्रकरणामुळें क्रियाशेषच आहे. [–या उक्त दृष्टान्तावरून अग्निसंबंधी कल्पनाभेदहि क्रियाधिकारामुळें क्रियानुप्रवेशीच आहे, असा दार्ष्टान्तिक वादी सांगतो–]=तसाच हाहि अग्निकल्प क्रियाप्रकरणामुळें क्रियानुप्रवेशी आहे, असा भावार्थ. ४५. [–मनश्चिदादि अग्नींच्या क्रियानुप्रवेशाविषयीं ' अतिदेशाच्च० ' या सूत्रानें वादी लिंगान्तर सांगतो–]

## सूत्रं—अतिदेशाच्च ॥ ४६

**सूत्रार्थ**—आणि पूर्वींच्या इष्टकाचित अग्नींशीं सांपादिक अग्नींच्या सादृश्याचा उपदेश केलेला असल्यामुळेंहि त्यांना कर्मशेषत्व आहे. ४६. सु. ब्र. ३६७.
[–' **अतिदेशश्च०**' इत्यादि भाष्यानें सूत्राचें व्याख्यान–]

**भाष्यं**—**अतिदेशश्चैषामग्नीनां क्रियानुप्रवेशमुपोद्बलयति–' षट्त्रिंशत्सहस्राण्यग्नयोऽर्कास्तेषामेकैक एव तावान्यावानसौ पूर्वः ' इति । सति हि सामान्येऽतिदेशः प्रवर्तते । ततश्च पूर्वेणेष्टकाचितेन क्रियानुप्रवेशिनाऽग्निना सांपादिकानग्नीनतिदिशन् क्रियानुप्रवेशमेवैषां द्योतयति ॥ ४६ ॥**

**भाष्यार्थ**—आणि " छत्तीस सहस्र अर्चनीय अग्नि. जेवढा हा पूर्वीचा अग्नि आहे तेवढाच त्यांतील एकेक आहे " असा हा अतिदेश या अग्नींच्या क्रियानुप्रवेशाला पुष्टि देतो. [–" **पण** तेवढ्यावरून त्यांना क्रत्वंगत्व कसें ? " '**सति०**' इत्यादि भाष्यानें उत्तर–]=कारण सामान्य–सादृश्य असलें तरच अतिदेश प्रवृत्त होतो. [–"अहोपण,क्रियानुप्रवेशावांचून दुसरेंच सादृश्य अतिदेशानें केलेलें असेल–या अतिदेशानें दुसरेंच साम्य सांगितलें असेल ! " अशी आशंका घेऊन ' पण तसल्या योग्य सादृश्याची प्रतीति येत नसल्यामुळें तसें मानितां येत नाहीं ' असें वादी '**ततश्च०**' इत्यादि भाष्यानें सांगतो–]=आणि त्यामुळें पूर्वीच्या इष्टकाचित् क्रियानुप्रवेशी–कर्मांगभूत अग्नीनें सांपादिक अग्नींचा अतिदेश करणारा वेद यांचा क्रियानुप्रवेश द्योतित करितो. ४६. [–'**विद्यैव०**' इत्यादि सूत्रानें सिद्धान्त–]

## सूत्रं—विद्यैव तु निर्धारणात् ॥४७

**सूत्रार्थ**—पण हे मनश्चिदादिक विद्यात्मकच आहेत. 'कारण तसें निर्धारण केलेलें आहे'–ते विद्याचितच आहेत, असा निर्धार–निश्चय केलेला आहे.४७.–सु. ब्र.३६७–[–'**तुशब्दः०**' इत्यादि भाष्यानें परपक्षाच्या निषेधाची प्रतिज्ञा करितात–]

**भाष्यं**—**तु-शब्दः पक्षं व्यावर्तयति । विद्यात्मका एवैते स्वतंत्रा मनश्चिदादयोऽग्नयः स्युर्न क्रियाशेषभूताः । तथा हि निर्धारयति–' ते हैते विद्याचित एव' इति । ' विद्यया हैवैत एवंविदश्चिता भवन्ति ' इति च ॥ ४७ ॥**

**भाष्यार्थ**—सूत्रांतील ' तु ' हा शब्द पूर्वपक्षाची व्यावृत्ति करितो. [–'**विद्यात्मकाः०**' इत्यादि भाष्यानें सिद्धान्ताची प्रतिज्ञा–]=हे मनश्चिदादि अग्नि विद्यात्मकच स्वतंत्र आहेत, क्रियाशेषभूत नाहींत. [–' निर्धारणात् ' या सूत्रोक्त हेतूचें '**तथा हि०**' इत्यादि भाष्यानें व्याख्यान–]=कारण श्रुति ' ते हे विद्याचितच आहेत ' असें निर्धारण–अवधारण करिते. [ ' विद्याचित एव ' येथील ' एव-' कारश्रुतीनें प्रकरण बाध्य आहे.–'मनश्चिदादि-अग्नींचें विद्यात्मत्वामध्यें श्रुतितात्पर्य सांगण्यासाठीं श्रुत्याभास दाखविणारे भाष्यकार '**विद्यया०**' इत्यादि भाष्यानें वाक्याचाहि समुच्चय करितात–]=आणि " अशा उपासकाचे हे अग्नि विद्येनेंच चित–सांपादित होतात " असेंहि श्रुति अवधारण करिते. ४७. [–केवल श्रुती-

नेंच प्रकरण बाध्य नाहीं तर लिंगामुळेंहि तें बाध्य-बाधनीय आहे, असें 'दर्श-नाच्च०' या सूत्रानें सांगतात-]

## सूत्रं--दर्शनाच्च ॥ ४८

**सूत्रार्थ**--आणि लिंगदर्शनामुळेंहि मनश्चिदादिकांना स्वातंत्र्य आहे. ४८. सु. ब्र. ३६७. [-'**दृश्यते च०**' इत्यादि भाष्यानें सूत्राचें विवरण-]

**भाष्यं--दृश्यते चैषां स्वातंत्र्ये लिंगम् । तत्पुरस्ताद्दर्शितम् 'लिंगभूयस्त्वात्' इत्यत्र॥४८॥ननु लिंगमप्यसत्यां अन्यस्यां प्राप्तावसाधकं कस्यचिदर्थस्येत्यपास्य तत्प्रकरणसामर्थ्यात्क्रियाशेषत्वमध्यवसितं । इत्यत उत्तरं पठति---**

**भाष्यार्थ**---आणि या अग्नींच्या स्वातंत्र्याविषयीं लिंग उपलब्ध होतें. [-'तें कोणतें ?' अशी आकांक्षा झाली असतां '**तत्पुरस्तात्०**' इत्यादि भाष्यानें सांगतात-]=तें लिंग पूर्वीं 'लिंगभूयस्त्वात्'-पृ. ४३३-येथें सांगितलें आहे. ४८. [-उत्तरसूत्रानें व्यावर्त्य अशा पूर्वोक्त आक्षेपाचें स्मरण देतात-]='**ननु०**' -"अहोपण अन्य प्राप्ति नसतांना लिंगहि कोणत्याहि अर्थाचें साधक होत नाहीं, असे मानून लिंगाचा त्याग करून प्रकरणसामर्थ्यामुळें क्रियाशेषत्व निश्चित केलें आहे."-पृ. ४३७-असें वादी म्हणेल, [-याचें उत्तरभूत सूत्र '**अत:०**' इत्यादि भाष्यानें प्रवृत्त करितात-]=म्हणून '**श्रुत्यादि०**' इत्यादि सूत्रानें उत्तर पढतात-

## सूत्रं--श्रुत्यादिबलीयस्त्वाच्च न बाधः ॥ ४९

**सूत्रार्थ**--आणि श्रुति, लिंग व वाक्य यांना अधिक बलवत्त्व असल्यामुळें दुर्बल कर्मप्रकरणानें त्यांचा बाध होत नाहीं. ४९.-सु. ब्र. ३६७-[-सूत्रांतील 'न बाध:' या भागाचें '**नैवं०**' इत्यादि भाष्यानें व्याख्यान-]

**भाष्यं--नैवं प्रकरणसामर्थ्यात्क्रियाशेषत्वमध्यवसाय स्वातंत्र्यपक्षो बाधितव्यः । श्रुत्यादेर्बलीयस्त्वात् । बलीयांसि हि प्रकरणात् श्रुतिलिंगवाक्यानीति स्थितं श्रुतिलिंगसूत्रे । तानि चेह स्वातंत्र्यपक्षं साधयन्ति दृश्यन्ते । कथम् । श्रुतिः तावत् 'ते हैते विद्याचित एव' इति । तथा लिंगम् 'सर्वदा सर्वाणि भूतानि चिन्वन्त्यपि स्वपते' इति । तथा वाक्यमपि 'विद्यया हैवैत एवंविदश्चिता भवन्ति' इति ॥**

**भाष्यार्थ**--पण याप्रमाणें प्रकरणाच्या सामर्थ्यामुळें मनश्चिदादि अग्नींच्या क्रियाशेषत्वाचा निश्चय करून स्वातंत्र्यपक्ष बाध्य-बाधित करण्यास योग्य नाहीं. [याविषयीं सूत्रोक्त हेतु घेऊन त्याचें व्याख्यान-]='**श्रुत्यादे:०**'-कारण श्रुत्या-

दिकांना बलीयस्त्व–प्रकरणाहून अधिक बलवत्त्व आहे. कारण श्रुति-लिंगसूत्रांत –पृ. ३६६–प्रकरणाहून श्रुति-लिंग-वाक्यें अधिक बलवान् आहेत, हें सिद्ध झालें आहे. [–"अहोपण, त्यांना प्रकरणाहून बलीयस्त्व जरी असलें तरी त्याचा प्रकृत विषयाशीं काय संबंध ?" '**तानि च०**' इत्यादि भाष्यानें उत्तर–]=आणि तीं श्रुत्यादि प्रमाणें येथें स्वातंत्र्यपक्ष साधीत असलेलीं दिसतात. [–स्वातंत्र्यसाधक श्रुत्यादिदृष्टीच प्रश्नद्वारा विशद करितात–]='**कथं०**'–तीं कशीं ? त्यांतील अगोदर श्रुति 'ते हे विद्याचितच आहेत.'–पृ.४४०–अशी आहे. तसेंच "सर्व भूतें तो जागा किंवा निजलेला असला तरी त्याच्या अग्नींचें सर्वदा संपादन करितात"–पृ. ४३९–हें लिंग आहे. त्याचप्रमाणें "विद्येनेंच एवंवेत्त्याचे हे अग्नि चित–संपादित होतात" असें वाक्यहि आहे. [–'**विद्याचित एव०**' इत्यादि भाष्यानें त्यांतील श्रुतीचें विवरण–]

**भाष्यं**—'**विद्याचित एव**' **इति हि सावधारणेयं श्रुतिः क्रियानुप्रवेशेऽमीषामभ्युपगम्यमाने पीडिता स्यात्। ननु अबाह्यसाधनत्वाभिप्रायमिदमवधारणं भविष्यति। नेत्युच्यते। तदभिप्रायतायां हि 'विद्याचित' इतीयता स्वरूपसंकीर्तनेनैव कृतत्वादनर्थकमवधारणं भवेत्। स्वरूपमेव ह्येषामबाह्यसाधनत्वमिति। अबाह्यसाधनत्वेऽपि तु मानसग्रहवत्क्रियानुप्रवेशशंकायां तन्निवृत्तिफलमवधारणमर्थवद्भविष्यति॥**

**भाष्यार्थ**—'विद्याचितच' अशी ही सावधारण श्रुति या अग्नींचा क्रियानुप्रवेश होतो–ते कर्मांगभूत आहेत असें मानिल्यास बाधित होईल. [–अवधारणश्रुतीच्या अन्यथासिद्धीची शंका–]='**ननु०**'–अहोपण, हें अवधारण अबाह्यसाधनत्वाच्या अभिप्रायानें असूं शकेल ! [याला दूषित करितात–]='**न०**'–नाहीं, ती श्रुति अबाह्यसाधनत्वाभिप्राय नाहीं. कारण त्यांचें बाह्य साधन नाहीं, तर आंतर मानस साधन आहे, असा जर तिचा अभिप्राय–आशय आहे असें मानिलें तर 'विद्याचितः'–विद्येनें संपादित, अशा या एवढ्याच स्वरूपकथनानें तें कार्य–त्यांचें अबाह्यसाधनत्व सिद्ध होत असल्यामुळें पुढील 'एव' हें अवधारण व्यर्थ होईल ! ['कृतत्वात्' म्ह० अभिप्रेत असलेलें अग्नींचें अबाह्यसाधनत्व ज्ञात झाल्यामुळें, असा भावार्थ.–स्वरूपसंकीर्तनानें कृतत्वच विशद करितात–]='**स्वरूप०**'–कारण अबाह्यसाधन हें या अग्नींचें स्वरूपच आहे. [–"अहोपण, विद्याशब्दानेंच जर त्यांच्या बाह्य साधनत्वाची व्यावृत्ति होत असेल तर तुझ्या मतींहि 'एव' हें अवधारण कशासाठीं आहे ?" '**अबाह्यसाधत्वेऽपि०**' इत्यादि

भाष्यानें उत्तर-]=पण त्या मनश्चिदादि-अग्नींना अबाह्यसाधनत्व जरी नसलें-तें बाह्य साधनांनीं साध्य होणारें जरी नसलें तरी 'मानसग्रहाप्रमाणें' त्यांच्या क्रियानुप्रवेशाची-कर्मांगत्वाची शंका आली असतां तिची निवृत्ति हें ज्याचें फल आहे असें अवधारण फलवत् होईल. [आतां अवधारणश्रुतीप्रमाणेंच '**तथा०**' इत्यादि भाष्यानें लिंग व्यक्त करितात-]

**भाष्यं—तथा 'स्वपते जाग्रते चैवंविदे सर्वदा सर्वाणि भूतान्येतानग्नींश्चिन्वन्ति' इति सातत्यदर्शनमेषां स्वातंत्र्येऽवकल्पते । यथा सांपादिके वाक्प्राणमयेऽग्निहोत्रे "प्राणं तदा वाचि जुहोति....वाचं तदा प्राणे जुहोति" इति चोक्त्वोच्यते--"एते अनंते अमृते आहुती जाग्रच्च स्वपंश्च सततं जुहोति" इति । तद्वत् । क्रियानुप्रवेशे तु क्रियाप्रयोगस्याल्पकालत्वेन न सातत्येनैषां प्रयोगः कल्पेत ॥**

**भाष्यार्थ**—त्याचप्रमाणें 'निजलेल्या व जागणाऱ्या अशा या अग्न्युपासकासाठीं सर्व भूतें या अग्नींचें सर्वदा चयन-संपादन करितात' हें सातत्यदर्शन-सर्वकाल सर्वपुरुषव्यापित्वज्ञान या अग्नींच्या स्वातंत्र्यपक्षींच उपपन्न होतें. [-सातत्य म्ह० सर्वकाल सर्वपुरुषव्यापित्व, या हेतूनें क्रियानुप्रवेशाच्या अभावाविषयीं दृष्टान्त-] ='**यथा०**'-ज्याप्रमाणें सांपादिक-संकल्पित वाक्प्राणमय अग्निहोत्रांत "त्यावेळीं -संपादनावस्थेंत प्राणाला वाक्-मध्यें होमितो व वाक्-ला प्राणामध्यें होमितो"-कौ. २. ५. सु. उ. ८४२-असें सांगून "या दोन अनन्त [-कारण त्यांना अक्षयफलत्वामुळें अनंतत्व आहे, असें सांगतात-]=अमृत आहुती [-त्यांच्याहि क्रियांगत्वशंकेची व्यावृत्ति-]=जागणारा व निजणारा असा तो सतत होमितो"-सु. उ. ८४३-असें सांगितलें जातें, [-या उक्त दृष्टान्तावरून प्रकृत अग्नींचें सातत्य -सर्वकालत्व उपलब्ध होत असल्यामुळें त्यांना क्रियानुप्रवेशिता-क्रियांगत्व नाहीं, असा दार्ष्टान्तिक सांगतात-]='**तद्वत्०**'-त्याप्रमाणें यांना क्रियांगत्व नाहीं. [-"अहोपण सातत्य प्रयोग जरी असला तरी अग्नींचा क्रियानुप्रवेश कां बरें होणार नाहीं?" '**क्रियानुप्रवेशे०**' इत्यादि भाष्यानें उत्तर-]=पण या अग्नींचा क्रियानुप्रवेश जर असता तर क्रियाप्रयोगाला अल्पकालत्व असल्यामुळें-कर्मानुष्ठानाचा काल अगदीं अल्प-थोडा असल्यामुळें यांचा सातत्यानें-सतत-एकसारखा प्रयोग संभवला नसता. [-आतां 'अर्थवादस्थ लिंग प्रकरणाचा बाध करीत नाहीं' असें जें म्हटलें आहे-पृ.४३७-त्याविषयीं '**न च०**' इत्यादि भाष्यानें म्हणतात-]

**भाष्यं—न चेदमर्थवादमात्रमिति न्याय्यम् । यत्र हि विस्पष्टो विधायको लिङादिरुपलभ्यते । युक्तं तत्र संकीर्तनमात्रस्यार्थवादत्वम् । इह तु विस्पष्ट-विध्यंतरानुपलब्धेः संकीर्तनादेवैषां विज्ञानविधानं कल्पनीयम् । तच्च यथासंकीर्तनमेव कल्पयितुं शक्यत इति सातत्यदर्शनात्तथाभूतमेव कल्प्यते । ततश्च सामर्थ्यादेषां स्वातंत्र्यसिद्धिः ॥**

**भाष्यार्थ**—हें केवल अर्थवादमात्र आहे, असें ह्मणणेंहि न्याय्य नाहीं. [–श्रुतिविध्युद्देशांतील इतर अन्यार्थदर्शनांना अप्रापकत्व जरी असलें तरी प्रकृता-मध्यें 'वचनानि तु अपूर्वत्वात्' या न्यायानें 'सर्वदा सर्व भूतें माझ्यासाठीं अग्नीचें चयन करितात, असें मानावें' अशा विधीची कल्पना केली जाते. अपूर्व-अर्थवादित्वानें भासणाऱ्या वाक्यांना केवळ द्योतकत्व आहे, असा अंगीकार करून गुणवादाचा आश्रय करणें अयुक्त आहे, असें समजून '**यत्र हि॰**' इत्यादि भाष्यानें म्हणतात–] कारण जेथें विधायक–विधान करणारा 'लिङ्-लोट्-'इत्यादि प्रत्यय अगदीं स्पष्टपणें उपलब्ध होतो तेथें संकीर्तनमात्राला–केवळ कथनाला अर्थवादत्व असणें युक्त आहे. पण येथें दुसरा विस्पष्ट विधि उपलब्ध होत नस-ल्यामुळें या अग्नींचें संकीर्तनावरूनच विज्ञानविधान कल्पनीय–कल्पना करण्यास योग्य आहे आणि तें जसें संकीर्तन केलें असेल तसेंच कल्पितां येणें शक्य आहे. यास्तव सातत्यदर्शनामुळें तें तशाच प्रकारचें कल्पिलें जातें आणि त्या सामर्थ्यानें या मनश्चिदादि अग्नींच्या स्वातंत्र्याची सिद्धि होते. [–'**एतेन॰**' इत्यादि भाष्यानें या उक्तन्यायाचाच दुसऱ्या वाक्यांमध्येंहि अतिदेश करितात–]

**भाष्यं—एतेन 'तद्यत्किंचेमानि भूतानि मनसा संकल्पयन्ति तेषामेव सा कृतिः' इत्यादि व्याख्यातम् । तथा वाक्यमपि 'एवंविदे' इति पुरुषविशेषसंबंधमेव एषामाचक्षाणं न क्रतुसंबंधं मृष्यते । तस्मात्स्वातंत्र्यपक्ष एव ज्यायानिति ॥**

**भाष्यार्थ**—या न्यायानें 'हीं भूतें तें जें कांहीं मनानें संकल्पितात त्यांचीच ती कृति–करण आहे'–पृ.४३५–इत्यादि वाक्यांचेंहि व्याख्यान झालें. [–याप्रमाणें श्रुति व लिंग यांचें विवेचन करून वाक्याचें विवेचन–]='**तथा वाक्यं॰**' त्याच-प्रमाणें 'एवंविदे॰'–पृ.४३६–हें यांचा पुरुषविशेषसंबंधच स्पष्टपणें सांगणारें वाक्यहि क्रतुसंबंध सहन करीत नाहीं. [–याप्रमाणें श्रुति, लिंग व वाक्य यांनीं प्रकरणाचा भंग सिद्ध झाला असतां फलित सांगतात–]='**तस्मात्॰**'–म्हणून येथें स्वातंत्र्यपक्षच श्रेष्ठ आहे, असें सिद्ध झालें. ४९. [–प्रस्तुत अग्नींच्या स्वातंत्र्या-विषयीं '**अनुबंधादिभ्यः॰**' इत्यादि सूत्रानें आणखीं हेतु सांगतात–]

**सूत्रं—अनुबन्धादिभ्यः प्रज्ञान्तरपृथक्त्ववद्दृष्टश्च तदुक्तम् ॥ ५०**

**सूत्रार्थ**—अनुबंधादिकांवरून–'मनानेंच आधान, चयन, ग्रहांचें ग्रहण केलें जातें' इत्यादि वाक्यानें मन-आदिवृत्तींमध्यें कर्मांगांचें संपादन केलेलें असल्यामुळें त्या अग्नींना स्वातंत्र्य आहे. 'प्रज्ञान्तरपृथक्त्वाप्रमाणें'–शांडिल्यादि विद्यांना जसें स्वातंत्र्य आहे तसेंच मनश्चिदादि अग्नींना स्वातंत्र्य आहे. असा उत्कर्ष 'दृष्टहि' आहे. पूर्वकांडांत तसें सांगितलें आहे. ५०.–सु. ब्र. ३६८. [–सूत्राचें हेत्वंतरोक्तींत तात्पर्य आहे, असें '**इतश्च०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]

**भाष्यं—इतश्च प्रकरणमुपमृद्य स्वातंत्र्यं मनश्चिदादीनां प्रतिपत्तव्यम्। यत्क्रियावयवान्मनआदिव्यापारेष्वनुबध्नाति "ते मनसैवाधीयन्त मनसाचीयन्त मनसैव ग्रहा अगृह्यन्त मनसाऽस्तुवन्मनसाऽशंसन्यत्किंच यज्ञे कर्म क्रियते यत्किंच यज्ञियं कर्म मनसैव तेषु तन्मनोमयेषु मनश्चित्सु मनोमयमेव क्रियते" इत्यादिना॥**

**भाष्यार्थ**—आणि याहि कारणांनीं प्रकरणाचा बाध करून मनश्चिदादिकांना स्वातंत्र्य आहे, असें जाणावें. [–त्या अनेक कारणांतील 'अनुबंध' या हेतूचें '**यत् क्रिया०**' इत्यादि भाष्यानें विवरण–]=कारण कीं श्रुति क्रियेच्या अवयवांना मन-आदिकांच्या व्यापारांमध्यें अनुबद्ध करिते. [श्रुतीनें कर्मांगांची मन-आदिकांच्या व्यापारांमध्यें जी योजना केली आहे तिची अन्यथा–दुसऱ्या प्रकारें उपपत्तिच लागत नसल्यामुळेंहि मनश्चिदादिकांना क्रियाशेषत्व आहे, असा भावार्थ.]= '**ते मनसा०**'–"विद्वानाकडून त्या अग्नीचें मनानेंच आधान केलें जातें. मनानेंच चयन केलें जातें–इष्टका रचिल्या जातात. मानस–मनश्चित्-अग्नींमध्यें विद्वानांकडून मनानेंच ग्रह–पात्रें ग्रहण केलीं जातात. उद्गातृप्रभृति ऋत्विज् मनानें स्तुति करितात. होत्रादिक मनानेंच शंसन करितात. यज्ञामध्यें पुरुषसंस्कारासाठीं दुसरेंहि जें कांहीं कर्म केलें जातें आणि त्यांत जें कांहीं यज्ञार्ह–क्रत्वर्थ कर्म अनुष्ठिलें जातें तें सर्व त्या मनोमय मनश्चिदादिकांमध्यें मनानेंच–मनोमयच केलें जातें." इत्यादि वाक्यानें श्रुति मन-आदिव्यापारांमध्यें क्रियावयव अनुबद्ध करिते. [छन्दामध्यें कालाचा नियम नसल्यामुळें येथें 'आधीयन्त, अगृह्यन्त, अस्तुवन्, अशंसन्' इत्यादि भूतकाली प्रयोग जरी केलेले असले तरी त्यांचें 'आधियन्ते, गृह्यन्ते, स्तुवन्ति, शंसन्ति,' इत्यादि वर्तमानकाली प्रयोग समजावे.–'पण हें अनुबंधकरण कशासाठीं आहे ?' '**संपत्फलः०**' इत्यादि भाष्यानें उत्तर–]

**भाष्यं—संपत्फलो ह्ययमनुबन्धः। न च प्रत्यक्षाः क्रियावयवाः सन्तः संपदा लिप्सितव्याः।न चात्रोद्गीथाद्युपासनवत्क्रियांगसंबंधात्तदनुप्रवेशित्वं आशंकितव्यं।**

**श्रुतिवैरूप्यात् । न ह्यत्र क्रियांगं किंचिदादाय तस्मिन्नदो नामाध्यसितव्यमिति वदति । षटत्रिंशत्सहस्राणि तु मनोवृत्तिभेदानादाय तेष्वग्नित्वं ग्रहादींश्च कल्पयति । पुरुषयज्ञादिवत् । संख्या चेयं पुरुषायुषस्याहःसु दृष्टा सती तत्संबंधिनीषु मनोवृत्तिष्वारोप्यत इति द्रष्टव्यम् । एवमनुबन्धात्स्वातंत्र्यं मनश्चिदादीनाम् ॥**

**भाष्यार्थ**--कारण हा अनुबंध संपत्फल आहे-त्या त्या अवयवाचें संपादन हें या अनुबंधाचें फल आहे. [-" अहोपण, हा अनुबंध उपासनेसाठीं जरी असला तरी त्यामुळें मनश्चिदादिकांना अक्रियांगत्व आहे, याविषयीं काय प्राप्त झालें ? " '**न च०**' इत्यादि भाष्यानें उत्तर-]=क्रियेचे अवयव प्रत्यक्ष असतांना ते संपत्तीनें-संकल्पानें प्राप्त करण्यास अभीष्ट नसतात-ते संकल्पानें मिळविण्याची इच्छा करण्यास योग्य होत नाहींत. [ त्यांना कर्मांगत्व जर असतें तर प्रत्यक्ष आधानादिकांचीच प्र-सिद्धि-आधिक्यानें सिद्धि होत असल्यामुळें त्यांविषयीं संपत् व्यर्थ आहे, असा भावार्थ.-" तर मग कर्मांगसंबंधामुळें उद्गीथादि-उपासनांप्रमाणें हेंहि क्रियागत उपासन असेल ! " '**न च अत्र०**' इत्यादि भाष्यानें याचें ' नाहीं ' असें उत्तर देतात-]=आणि येथें-या उपासनांत उद्गीथादि उपासनांप्रमाणें क्रियांगसंबंधामुळें क्रियानुप्रवेशित्व आहे, अशी आशंका घेणें उचित नाहीं. कारण येथें श्रुतिवैरूप्य आहे. [-उद्गीथादि-उपासनावृत्ति-श्रुति-विधीचें वैपरीत्यच प्रस्तुत उपासनाविधीमध्यें दाखवितात-]='**न हि०**'-कारण येथें एखादें क्रियांग घेऊन त्यांत या अमुकाचा अध्यास करावा, असें श्रुति सांगत नाहीं. [-" तर मग येथें विधान कसें आहे ? " '**षट०**' इत्यादि भाष्यानें उत्तर-] =तर श्रुति पुरुषयज्ञादिकांप्रमाणें-पृ. ३२२-छत्तीस सहस्र मनोवृत्तिभेदांचें ग्रहण करून त्यांमध्यें अग्नित्व व ग्रहादिक यांची कल्पना करिते. [ अग्नित्वादिरहित अशा मनोवृत्तिभेदांमध्यें त्यांची कल्पना करणें, याविषयीं ' पुरुषयज्ञवत् ' असा दृष्टान्त दिला आहे. -" पण मनोवृत्तींमध्यें छत्तीस सहस्र या संख्याभेदाचें ग्रहण कसें केलें आहे ? " '**संख्या च०**' इत्यादि भाष्यानें उत्तर-]=आणि छत्तीस सहस्र ही संख्या पुरुषाच्या आयुष्याच्या दिवसांत दृष्ट-प्रत्यक्ष अनुभूत, अशी होत्साती तत्संबंधी मनोवृत्तींमध्यें आरोपिली जाते असें जाणावें. [-'**एवं०**' इत्यादि भाष्यानें अनुबंधाच्या सामर्थ्यानें सिद्ध झालेल्या अर्थाचा उपसंहार-] =याप्रमाणें अनुबंधामुळें मनश्चिदादिकांना स्वातंत्र्य आहे. [-' **आदिशब्दात्०** ' इत्यादि भाष्यानें सूत्रांतील 'आदि-'शब्दाची योजना-]

**भाष्यं**—*आदिशब्दादतिदेशाद्यपि यथासंभवं योजयितव्यम् । तथा हि– "तेषामेकैक एव तावान्यावानसौ पूर्वः" इति क्रियामयस्याग्नेर्माहात्म्यं ज्ञानमयानामेकैकस्यातिदिशन्क्रियायामनादरं दर्शयति । न च सत्येव क्रियासंबंधे विकल्पः पूर्वेणोत्तरेषामिति शक्यं वक्तुम् । न हि येन व्यापारेणाहवनीयधारणादिना पूर्वः क्रियायामुपकरोति, तेनोत्तरे उपकर्तुं शक्नुवन्ति ॥**

**भाष्यार्थ**—'आदि-'शब्दामुळें त्यांत अतिदेशादिकांचाहि यथासंभव योजना करावी. [–त्यांतील मनश्चिदादिकांना स्वातंत्र्य प्राप्त करून देणाऱ्या अतिदेशाला '**तथा हि०**' इत्यादि भाष्यानें विशद करितात–]=अतिदेश कसा आहे तो पहा–"जेवढा हा पूर्व अग्नि आहे, तेवढा त्यांतील एकेकच अग्नि आहे,' –पृ.४४०–या वाक्यानें [ वाक्याचें तात्पर्य–]=क्रियामय–कर्ममय अग्नीचें माहात्म्य ज्ञानमय अग्नींतील एकेका अग्नीला आहे, असा अतिदेश करणारी श्रुति क्रियेमध्यें–क्रियेविषयीं अनादर दाखविते. [–"अहोपण या अतिदेशानें पूर्वीच्या इष्टकाचित अग्नीनें मनश्चिदादिक अग्नींचा विकल्प होईल,–४३७–असें वर सांगितलें आहे. त्यामुळें हा अतिदेश विकल्पासाठीं आहे, अनादरासाठीं नाहीं. इष्टकाचित अग्नीचा अनादर हा त्याचा अर्थ–प्रयोजन नाहीं." '**न च०**' इत्यादि भाष्यानें उत्तर–]=क्रियासंबंध असतांनाच पूर्व अग्नीनें या उत्तर अग्नींचा विकल्प होतो, असें म्हणतां येणें शक्य नाहीं. [–"अहोपण व्रीहींनीं जेवढें कार्य केलें जातें तेवढेंच यवांनींहि केलें जातें, त्यामुळें या पूर्वोत्तर अग्नींचा विकल्प युक्त आहे." 'पण प्रस्तुत उदाहरणांत मनश्चिदादिकांच्या प्रयोजनैक्याचा अभाव असल्यामुळें त्यांचा इष्टकाचित अग्नीनें विकल्प होत नाहीं,' असें '**न हि०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=कारण आहवनीयधारणादि ज्या व्यापारानें पूर्व अग्नि क्रियेमध्यें उपकार करितो त्या व्यापारानें पुढील अग्नि क्रियेमध्यें उपकार करूं शकत नाहींत. [–"अहोपण, अतिदेश पूर्वपक्षाला अनुरूप आहे, तेव्हां सूत्रांतील 'अनुबंधादि' येथील 'आदि-'शब्दानें त्याचें ग्रहण कसें होतें" अशी आशंका घेऊन '**यत्तु०**' इत्यादि भाष्यानें वाद्याच्या म्हणण्याचा अनुवाद–]

**भाष्यं--यत्तु पूर्वपक्षेऽप्यतिदेश उपोद्बलक इत्युक्तं सति हि सामान्येऽतिदेशः प्रवर्तत इति । तदस्मत्पक्षेऽप्यग्नित्वसामान्येन अतिदेशसंभवात्प्रत्युक्तम् । अस्ति हि सांपादिकानामप्यग्नीनामग्नित्वमिति । श्रुत्यादीनि च कारणानि दर्शितानि । एवमनुबंधादिभ्यः कारणेभ्यः स्वातंत्र्यं मनश्चिदादीनाम् ॥**

**भाष्यार्थ**—पण 'कारण सामान्य–सादृश्य जर असलें तरच अतिदेश प्रवृत्त होतो, म्हणून पूर्वपक्षांतहि अतिदेश उपोद्बलक–त्याला पुष्टि देणारा आहे' असें जें वाद्यानें म्हटलें आहे–पृ. ४४०–[–अग्नित्वसामान्यानेंहि अतिदेशाची सिद्धि होत असल्यामुळें पारिशेष्याचा संभव नाहीं, असा त्यावर दोष देतात–]=' **तदस्मत्पक्षे**० '–तें आमच्या पक्षींहि अग्नित्वसामान्यानें अतिदेशाचा संभव असल्यामुळें प्रत्याख्यात आहे, त्याचें प्रत्याख्यान झालें आहे. [–'**अस्ति हि**०' इत्यादि भाष्यानें अग्नित्वसाम्याचा संभव स्पष्ट करितात–]=कारण सांपादिक अग्नींनाहि अग्नित्व आहेच. [–'**श्रुत्यादीनि**०' इत्यादि भाष्यानें 'अनुबंधादिभ्यः' या बहुवचनाची योजना–]=आणि श्रुत्यादि कारणें प्रदर्शित केलीं आहेत. [–'**एवं**' इत्यादि भाष्यानें उक्त हेतूच्या फलाचें निगमन–]=याप्रमाणें अनुबंधादि कारणांमुळें मनश्चिदादिकांना स्वातंत्र्य आहे. [–'**प्रज्ञान्तर**०' इत्यादि भाष्यानें सूत्रोक्त दृष्टान्ताला अवतरण देऊन त्याचें व्याख्यान–]

**भाष्यं—प्रज्ञान्तरपृथक्त्ववत् । यथा प्रज्ञान्तराणि शांडिल्यविद्याप्रभृतीनि स्वेन स्वेनानुबंधेन अनुबध्यमानानि पृथगेव कर्मभ्यः प्रज्ञान्तरेभ्यश्च स्वतंत्राणि भवन्त्येवमिति । दृष्टश्च अवेष्टेः राजसूयप्रकरणपठितायाः प्रकरणादुत्कर्षो वर्णत्रयानुबंधाद्राजयज्ञत्वाच्च राजसूयस्य । तदुक्तं प्रथमे कांडे—" क्रत्वर्थायामिति चेन्न वर्णत्रयसंयोगात् " इति ॥ ५० ॥**

**भाष्यार्थ**—' प्रज्ञान्तरांच्या पृथक्त्वाप्रमाणें '–ज्याप्रमाणें शांडिल्यविद्याप्रभृति प्रज्ञान्तरें–दुसरीं प्रज्ञानें आपल्या आपल्या अनुबंधानें अनुबद्ध होत्सातीं कर्मांहून व दुसऱ्या प्रज्ञांहून स्वतंत्रच असतात, [ उक्त दृष्टान्ताच्या अनुसार अनुबंधादि उक्त हेतूंमुळें मनश्चिदादिकांनाहि स्वातंत्र्य आहे, असा दार्ष्टान्तिक '**एवं**' या पदानें सांगतात–]=त्याप्रमाणें मनश्चिदादिकांना स्वातंत्र्य आहे. 'इति' हा शब्द सूत्रविभागव्याख्यानाच्या समाप्तीसाठीं आहे. [–" अहो पण, मनश्चिदादिकांना जर स्वातंत्र्य असेल तर त्यांच्या क्रियाप्रकरणपाठाची असिद्धि होते " अशी आशंका घेऊन '**दृष्टश्च**०' इत्यादि भाष्यानें म्हणतात–]=आणि राजसूयप्रकरणांत पठित असलेल्या अवेष्टीचा प्रकरणापासून उत्कर्ष दृष्ट–प्रत्यक्ष अनुभूत आहे. [–उत्कर्षाविषयीं हेतु–]=' **वर्णत्रय**० '–कारण वर्णत्रयाच्या अनुबंधामुळें तिचा उत्कर्ष दृष्ट आहे. [–" तथापि त्या इष्टीच्या राजसूयांगत्वाचा असंभव असल्यामुळें तिच्या उत्कर्षाची असिद्धि आहे, " '**राजयज्ञ**-

**त्वाच्च०** ' इत्यादि भाष्यानें उत्तर-]=आणि राजसूयाला[1] राजयज्ञत्व असल्यामुळें तिचा उत्कर्ष दृष्ट आहे. ['स्वाराज्याची कामना असलेल्या राजानें राजसूयानें याग करावा ' असा आरंभ करून ' आग्नेय अष्टाकपाल पुरोडाश हिरण्य दक्षिणा ' इत्यादि भागानें ' अवेष्टि ' या नांवाची इष्टि पठित आहे. त्यांत ' जर ब्राह्मण याग

---

१ **रत्नप्रभा**—मीमांसेच्या अकराव्या अध्यायांत असा विचार केला आहे—'स्वाराज्यकाम राजानें राजसूय याग करावा' असें प्रकरण आरंभून ' आग्नेय—अग्निदेवताक अष्टाकपाल पुरोडाश हिरण्यदक्षिणा, बार्हस्पत्य चरु, शितिपृष्ठ दक्षिणा, ऐन्द्र एकादश कपाल पुरोडाश, ऋषभ दक्षिणा' अशी 'अवेष्टि' म्हणून एक इष्टि सांगितलेली आहे. त्या इष्टींत वर्णभेदानें ' जर ब्राह्मण याग करील तर बार्हस्पत्य चरु मध्यें ठेवून प्रत्येक आहुति देऊन अभिघार करावा. जर वैश्य याग करील तर त्यानें वैश्वदेव चरु मध्यें स्थापावा व जर क्षत्रिय याग करील तर त्यानें ऐन्द्र चरु मध्यें ठेवावा ' असा प्रयोगभेद श्रुत आहे. 'आग्नेय व ऐंद्र यांच्या पुरोडाशामध्यें बार्हस्पत्यादि चरु स्थापून' असा याचा भावार्थ. त्यांत आग्नेयादि चरूमध्यें अंगाचा तंत्रानें प्रयोग होतो, कारण ' मध्ये निधान ' हें त्याचें लिंग आहे. कारण प्रयोगभेदपक्षीं 'मध्ये-' निधानाचा असंभव आहे व या इष्टीनें ' अन्नाद्य कामाकडून याग करवावा ' असा एकवचनी प्रयोग आहे, आणि तो एकतंत्र प्रयोग राजसूयक्रतूहून बाह्य असलेल्या, अन्नाद्यकाम वर्णत्रयकर्तृकच अवेष्टींत जाणावा. क्रत्वर्थ अवेष्टींत तो एकतंत्र प्रयोग समजूं नये. 'पण याविषयीं नियामक काय ! क्रत्वर्थ अवेष्टींत तंत्रप्रयोग कां होणार नाहीं !' म्हणून म्हणाल तर तें बरोबर नाहीं. कारण वर्णत्रयसंयुक्त काम्य इष्टींतच अंगतंत्रैक्यसाधक 'मध्ये निधानादि' लिंग विद्यमान आहे. म्हणून लिंग व एकवचन यांच्या योगानें तंत्रैक्य सिद्ध झालें असतां हिरण्यादिकहि सर्व मिळून एकच दक्षिणा द्यावी, कारण त्यावांचून प्रयोगाच्या ऐक्याचा असंभव होतो, पण जिचा कर्ता केवल राजा आहे अशा क्रत्वन्तर्गत इष्टीमध्यें वर्णत्रयसंयोगाचा अभाव असल्यामुळें ' मध्ये निधानादि ' लिंग नाहीं आणि त्यामुळें तंत्रैक्यसाधकाच्या अभावामुळें दक्षिणाभेदानें तंत्रभेद होतो, म्हणून चरूमध्यें अंगांचीं आवृत्तीच होते,असा या सूत्राचा अर्थ आहे. यांत क्रत्वर्थ इष्टीमध्यें एकप्रयोगलिंगाचा असंभव, व काम्येष्टीमध्यें त्याचा संभव सांगणाऱ्या या सूत्रानें काम्येष्टीला क्रत्वर्थेष्टीहून विलक्षणत्व असल्यामुळें क्रतुप्रकरणापासून तिचा उत्कर्ष आहे असें सुचविलें आहे व तो उत्कर्ष युक्तच आहे. कारण राजमात्रकर्तृक राजसूय क्रतूंत वर्णत्रयकर्तृक इष्टीचा अंतर्भाव होऊं शकत नाहीं असें सिद्ध झालें आहे, तसाच मनश्चिदादिकांचा उत्कर्ष होतो. असा भावार्थ.

करील तर त्यानें बार्हस्पत्य चरु मध्यें करून आहुति आहुति होमून अभिघार करावा. जर वैश्य याग करील तर त्यानें मध्यें वैश्वदेव चरु करावा व जर क्षत्रिय याग करील तर त्यानें ऐंद्र चरु मध्यें करावा' असें श्रुत आहे. त्याविषयीं 'काय, राजसूयांत प्राप्त झालेल्या ब्राह्मणादिकांचें निमित्तार्थानें श्रवण आहे, कीं त्यांचाच हा याग विहित आहे?' असा संशय आला असतां "प्रजापालन व शत्रूंचें उद्धरण, इत्यादि हें राज्य आहे. त्याचा कर्ता राजा आहे, अशी आर्यांची प्रसिद्धि आहे. त्रैवर्णिकांच्याहि त्या राज्यकर्तृत्वाची प्रसिद्धि आहे. त्यामुळें त्यांना राजशब्दत्व आहे. म्ह० प्रजापालनादिरूप राज्य ब्राह्मणादि तिन्ही वर्णांचे लोक करूं शकतात. त्यामुळें त्यांना 'राजा' हा शब्द लावितां येतो. म्हणून त्या सर्वांना—त्रैवर्णिकांना राजसूयाचें अधिकारित्व आहे. यास्तव 'यदि ब्राह्मणो यजेत'—जर ब्राह्मण याग करील, इत्यादि श्रुति निमित्तार्थ आहेत. त्यामुळें अवेष्टीचा प्रकरणापासून उत्कर्ष होत नाहीं." असा पूर्वपक्ष प्राप्त होतो. पण 'गुणवचनब्राह्मणादिभ्यः कर्मणि च'—पा. सू. ५.१.१२४—"या सूत्रांत पाणिनीनें शुक्लादि गुणवचन-शब्दांच्या पुढें व ब्राह्मणादि-शब्दांच्या पुढें 'कर्म' या अर्थीं 'ष्यञ्'—'य' या प्रत्ययाचें विधान केलें आहे. यास्तव 'राजाचें जें कर्म तें राज्य' या विग्रहानें 'राजा' या कर्त्याचा संबंध असल्यामुळें 'राज्य' असा बोध होतो. तेव्हां असा तो राजकर्मकर्ता राजा कोण? अशी आकांक्षा झाली असतां आर्यांमध्यें त्याच्या प्रसिद्धीचा अभाव जरी असला तरी म्लेच्छ केवल क्षत्रिय या अर्थीं राजशब्दाचा प्रयोग करितात. त्यामुळें म्लेच्छप्रसिद्धीनें राजशब्दाच्या अर्थाचा निर्णय होतो व अब्राह्मणादि पालनकर्ता या अर्थीं राजशब्दाला गौणत्व आहे. म्हणून क्षत्रियाचाच राजसूयामध्यें अधिकार आहे. त्यामुळें ब्राह्मण व वैश्य यांमध्यें त्याची प्राप्ति नाहीं, असें झालें असतां राजसूयप्रकरण सोडून ब्राह्मणादिकर्तृक कर्मान्तरांचें विधान केलें जातें. त्यामुळें अवेष्टीचा राजसूयप्रकरणापासून उत्कर्ष होतो," असें दुसऱ्या अध्यायांत सिद्ध झालें आहे. असें असल्यामुळें ज्याप्रमाणें क्षत्रियकर्तृक राजसूयांत ब्राह्मणादिकांचा अनधिकार असल्या कारणानें अवेष्टीचा राजसूयप्रकरणापासून उत्कर्ष केला जातो त्याचप्रमाणें मनश्चिदादिकांचाहि क्रियाप्रकरणापासून लिंगादिकारणांनीं उत्कर्ष होतो, असा भावार्थ. मीमांसेच्या अकराव्या अध्यायांतहि याचा विचार केला आहे, असें 'तदुक्तं०' इत्यादि भाष्यानें सांगतात—]=प्रथमकांडामध्यें—पूर्वमीमांसेंत तें सांगितलें आहे. [ राजसूयप्रकरणांत 'अवेष्टि' या नांवाची इष्टि 'आग्नेयोऽष्टाकपालो हिरण्यं दक्षिणा बार्हस्पत्यं चरुं शितिपृष्ठः

दक्षिणा ' अशी पठित आहे. ' त्यांत आग्नेयादिहवींमध्यें अंगांचा तंत्रानें प्रयोग करावा कीं आवृत्तीनें?' असा संशय आला असतां 'अवेष्टौ त्वेकतन्त्रं स्यात् लिंगदर्शनात् '–पण लिंगदर्शनामुळें अवेष्टींत एकतंत्रप्रयोग आहे, असें हें पूर्वपक्षसूत्र आहे.–" बार्हस्पत्याला मध्यें स्थापून, अशा लिंगाची उपलब्धि होते. त्या इष्टीचा प्रयोगभेद–भिन्न भिन्न प्रयोग जर असता तर ' मध्ये निधानाचा ' असंभव झाला असता व ' एतया अन्नाद्यकामं '–या इष्टीनें अन्नाद्यकाम पुरुषाकडून याग करवावा, असें एकवचन आहे. त्यामुळें तिला एकतंत्रत्व आहे, आणि एका प्रयोगामध्यें लिंगांचा तंत्रानें भाव म्ह० सकृत्–एकदाच अनुष्ठान होतें." असा पूर्वपक्ष करून " अन्नाद्यकामप्रयोगामध्यें अवेष्टीचें हें लिंगदर्शनादि आहे. पण क्रत्वर्थप्रयोगामध्यें त्यांचा दक्षिणाभेदामुळें भेद होतो. त्यामुळें अंगांची आवृत्तिच होते, " असा सिद्धान्त केला असतां ' इष्टि क्रत्वर्थ जरी असली तरी लिंगदर्शनादि आहे. त्यामुळें अंगांची अनावृत्ति होते, ' अशा आशंकेचा **'क्रत्वर्थायां०'** इत्यादि सूत्रानें अनुवाद करून पूर्वमीमांसाकार तिला दूषित करितात–]='क्रत्वर्थ इष्टीमध्यें लिंगादिदर्शनामुळें अंगांची आवृत्ति होते,' असें जर म्हणाल तर तें बरोबर नाहीं. कारण वर्णत्रयसंयोग आहे. '–पू. मी. ११. ४. ७–असें प्रथमकांडांत सांगितलें आहे. [–काम्यइष्टीमध्यें ' यदि ब्राह्मणः '–पृ. ४४९–इत्यादि वाक्यानें वर्णत्रयसंयोगामुळें आणि तिच्यामध्यें ' मध्ये-'निधानादिकांची सिद्धि होत असल्यामुळें राजकर्तृक क्रत्वर्थ इष्टीमध्यें एकप्रयोगलिंगाची प्राप्ति नाहीं. म्हणून अंगांची आवृत्ति होते, असा भावार्थ. येथें एकप्रयोगलिंगाचा क्रत्वर्थ-इष्टीमध्यें असंभव व काम्येष्टीमध्यें संभव सांगणाऱ्या या सूत्रानें काम्येष्टीचें क्रत्वर्थ-इष्टीहून वैलक्षण्य सुचवून त्याच्या द्वारा अर्थात् प्रकरणापासून उत्कर्षहि सिद्ध होतो, असें सुचविलें आहे. त्यामुळें क्रियाप्रकरणापासून मनश्चिदादिकांचा उत्कर्ष होतो, या सिद्धान्ताला अनुरूप असेंच हें उदाहरण आहे, असें जाणावें. ] ५०. [–पूर्ववाद्यानें दिलेल्या उदाहरणाला **'न सामान्यात्०'** इत्यादि सूत्रानें दूषित करितात–]

**सूत्रं—न सामान्यादप्युपलब्धेर्मृत्युवन्न हि लोकापत्तिः ॥ ५१**

**सूत्रार्थ—**' न सामान्यात् अपि '–मानसग्रहसादृश्यामुळेंहि मनश्चिदादिकांना क्रियाशेषत्व नाहीं. कारण त्यांच्या केवल पुरुषार्थत्वाची 'उपलब्धि' होते. 'मृत्यूप्रमाणें '–आदित्य पुरुष मृत्यु, अग्निच मृत्यु, इत्यादि वचनांत मृत्युशब्दाचा प्रयोग जरी समान असला तरी त्यांना अत्यंत साम्यप्राप्ति नाहीं. ' द्युलोक हाच अग्नि त्याची आदित्य ही समित् ' येथें समिदादिसामान्यामुळें लोकाला अग्नि-

भावप्राप्ति होत नाहीं. ५१.–सु. ब्र. ३६९–[–' **यदुक्तं०** ' इत्यादि भाष्यानें परोक्ताचा अनुवाद करून त्याच्या उत्तरत्वानें सूत्राक्षरांचें व्याख्यान–]

**भाष्यं—यदुक्तं मानसवदिति । तत्प्रत्युच्यते । न मानसग्रहसामान्यादपि मनश्चिदादीनां क्रियाशेषत्वं कल्प्यम् । पूर्वोक्तेभ्यः श्रुत्यादिहेतुभ्यः केवलपुरुषार्थत्वोपलब्धेः । न हि किंचित्कस्यचित्केनचित्सामान्यं न संभवति । न च तावता यथास्वं वैषम्यं निवर्तते ॥**

**भाष्यार्थ**—' मानसवत् ' असें जें वाद्यानें म्हटलें आहे–पृ. ४३८–त्याचें प्रत्याख्यान केलें जातें–मानसग्रहाच्या सादृश्यामुळेंहि मनश्चिदादिकांचें कर्मशेषत्व कल्पिणें युक्त नाहीं. कारण पूर्वोक्त श्रुत्यादि-हेतूंवरून त्यांच्या केवल पुरुषार्थत्वाची उपलब्धि होते. [–"अहोपण, मनश्चिदादिकांचें मानसग्रहाशीं भावनामयत्व समान असतांना त्यांना श्रुत्यादिकांनीं सादृश्य कसें ? " ' **न हि०** ' इत्यादि भाष्यानें उत्तर–]=कारण एखाद्याचें एखाद्याशीं कांहीं थोडेंसें तरी साम्य संभवत नाहीं, असें होत नाहीं. [ वस्तूंचें परस्पर थोडेंसें तरी सादृश्य असतेंच. ]=**'न च तावता०'** –पण तेवढ्यावरून प्रत्येक वस्तूचें स्वाभाविक वैषम्य निवृत्त होत नाहीं. [–सादृश्य जरी असलें तरी त्या त्या वस्तूचें स्वाभाविक वैषम्य निवृत्त होत नाहीं, याविषयीं सूत्रांतील ' **मृत्युवत्०** ' या दृष्टान्ताचें ग्रहण करून त्याचें व्याख्यान–]

**भाष्यं—मृत्युवत् । यथा 'स वा एष एव मृत्युर्य एष एतस्मिन्मण्डले पुरुषः' इति । ' अग्निर्वै मृत्युः ' इति च अग्न्यादित्यपुरुषयोः समानेऽपि मृत्युशब्दप्रयोगे नात्यंतसाम्यापत्तिः । यथा च 'असौ वाव लोको गौतमाग्निस्तस्यादित्य एव समित्' इत्यत्र न समिदादिसामान्याल्लोकस्याग्निभावापत्तिः । तद्वत् ॥५१॥**

**भाष्यार्थ**—मृत्यूप्रमाणें. ' **यथा०** '–ज्याप्रमाणें ' तो हाच मृत्यु आहे कीं जो हा या मंडलांत पुरुष आहे ' असा व 'अग्निच मृत्यु आहे.'–बृ.३.२.१० –असा अग्नि व आदित्य पुरुष यांमध्यें 'मृत्यु-'शब्दाचा प्रयोग जरी समान असला तरी त्यांना अत्यंत साम्यापत्ति–साम्यप्राप्ति होत नाहीं. [–'न हि लोकापत्तिः ' या सूत्रभागाचें व्याख्यान–]=' **यथा च०** '–आणि ज्याप्रमाणें " हे गौतमा, हाच द्युलोक अग्नि आहे. त्याची आदित्य हीच समिध आहे. "–छां. ५.४.१.–या वचनांत समिदादि सामान्यामुळें लोकाला अग्निभावप्राप्ति होत नाहीं, [ या उक्त दृष्टान्ताच्या अनुरोधानें मानसग्रह व मनश्चिदादिक यांना भावनामयत्व जरी समान असलें तरी त्यांचें क्रमानें पारतंत्र्य व स्वातंत्र्य यांची सिद्धि होते, असें ' **तद्वत्०** ' या पदानें सांगतात–]=त्याप्रमाणें त्यांच्या वैषम्याची सिद्धि होते. ५१.

[–उदाहृत ब्राह्मणाच्या पूर्वीचें व पुढचें, अशा दोन्ही ब्राह्मणांना विद्याप्राधान्य असल्याचें दिसतें. त्यामुळें त्यांच्या मध्यवर्ती असलेल्या प्रस्तुत ब्राह्मणालाहि विद्याप्राधान्य आहे, असें ' **परेण च०** ' इत्यादि सूत्रानें सांगतात–]

**सूत्रं--परेण च शब्दस्य ताद्विध्यं भूयस्त्वात्त्वनुबंधः ॥५२॥(२९)**

**सूत्रार्थ**--त्या पुढील ब्राह्मणांत ' ताद्विध्य '–केवल विद्याविधित्व हें 'शब्दाचें' प्रयोजन ज्ञात होतें. ' च '–पूर्व ब्राह्मणांतहि विद्याप्रधानत्वच लक्षित होतें. 'तु' –पण मानस अग्नीमध्यें अग्नीचे पुष्कळ अवयव संपादन करण्यास योग्य असल्यामुळें अग्नीनें विद्या अनुबद्ध केली जाते. ५२ ( २९ )–सु.ब्र. ३७०. [–'संदिग्धाचा निर्णय वाक्यशेषावरून होतो' या न्यायानें सूत्रावयवाचें व्याख्यान करणारे भाष्यकार ' **परस्तात्०** ' इत्यादि भाष्यानें वाक्यशेषाचें अनुसंधान करितात–]

**भाष्यं—परस्तादपि ' अयं वाव लोक एषोऽग्निश्चितः ' इत्यस्मिन्ननंतरे ब्राह्मणे ताद्विध्यं केवलविद्याविधित्वं शब्दस्य प्रयोजनं लक्ष्यते । न शुद्धकर्मांगविधित्वम् । तत्र हि–" विद्यया तदारोहन्ति यत्र कामाः परागताः । न तत्र दक्षिणा यन्ति नाविद्वांसस्तपस्विनः " इत्यनेन श्लोकेन केवलं कर्म निंदन्विद्यां च प्रशंसन्निदं गमयति ॥**

**भाष्यार्थ**—पुढेंहि ' हाच लोक हा अग्नि चित–संपादित आहे ' अशा या अनन्तर ब्राह्मणांत ' ताद्विध्यं '–केवल विद्याविधित्व हें शब्दाचें प्रयोजन लक्षित होतें. त्याचें शुद्धकर्मांगविधित्व लक्षित होत नाहीं. [–उत्तर ब्राह्मणाच्या विद्याप्राधान्याविषयीं ' **तत्र०** ' इत्यादि **भाष्यानें** गमक–लिंग सांगतात–]=कारण त्या उत्तर ब्राह्मणांत " जेथें काम परागत–निवृत्त झालेले आहेत त्या स्थानावर विद्येनें आरोहण करितात. दक्षिणमार्गानें गमन करणारे त्या स्थानीं जात नाहींत. अविद्वान् तपस्वीहि तेथें जात नाहींत " अशा या श्लोकानें केवल कर्माची निंदा करणारा व विद्येची प्रशंसा करणारा वेद हें–या ब्राह्मणाचें विद्याप्राधान्य सुचवितो. [–'एका वाक्यांतील उपसंहारानें उपक्रमाच्या तंत्रानें असावें ' या न्यायानें सूत्रांतील ' च-'काराचें व्याख्यान करणारे आचार्य ' **तथा०** ' इत्यादि भाष्यानें पूर्वब्राह्मणाचेंहि अनुसंधान करितात–]

**भाष्यं—तथा पुरस्तादपि ' यदेतन्मंडलं तपति ' इत्यस्मिन्ब्राह्मणे विद्याप्रधानत्वमेव लक्ष्यते ' सोऽमृतो भवति मृत्युर्ह्यस्यात्मा भवति ' इति विद्याफलेनैवोपसंहारान्न कर्मप्रधानता । तत्सामान्यादिहापि तथात्वम् । भूयांसस्त्वग्न्य-**

**वयवाः संपादयितव्या विद्यायां इत्येतस्मात्कारणादग्निनानुबध्यते विद्या। न कर्मांगत्वात्। तस्मान्मनश्चिदादीनां केवलविद्यात्मकत्वसिद्धिः ॥ ५२ ॥ (२९)**

**भाष्यार्थ**—त्याचप्रमाणें पूर्वींहि " जें हें मंडल तापतें " अशा या ब्राह्मणांत विद्याप्रधानत्वच लक्षित होतें. [-त्याच्या विद्याप्राधान्याविषयीं '**सोऽमृतः०**' इत्यादि वाक्यानें लिंग सांगतात-]=" तो अमृत होतो. कारण मृत्यु ह्याचा आत्मा होतो" असा विद्याफलानेंच उपसंहार केलेला असल्यामुळें त्याला कर्मप्रधानता नाहीं. [-"अहोपण, पूर्वोत्तर ब्राह्मणांना असें विद्याप्राधान्य जरी असलें तरी प्रकृतब्राह्मणाला कर्मप्राधान्य असल्यास त्यांत काय हानि आहे?" '**तत्सामान्यात्०**' इत्यादि भाष्यानें उत्तर-]=त्या दोन पूर्वोत्तर ब्राह्मणांच्या सादृश्यामुळें येथेंहि या ब्राह्मणाला विद्याप्राधान्य आहे. [-"पण विद्येला जर स्वातंत्र्य आहे तर कर्माधिकारांत-कर्मप्रकरणांत तिचें समाम्नान कसें आहे?" अशी आशंका घेऊन सूत्रांतील '**भूयस्त्वात्**' इत्यादि भागाचें '**भूयांसः०**' इत्यादि भाष्यानें व्याख्यान करितात-]=पण विद्येमध्यें पुष्कळ अग्न्यवयव संपादन करण्यास योग्य आहेत. त्या कारणानें विद्या अग्नीनें अनुबद्ध-संबद्ध केली जाते, कर्मांगत्वामुळें नव्हे. [-याप्रमाणें श्रुति-लिंगादिकांनीं सिद्ध झालेल्या अर्थाचा उपसंहार-]='**तस्मात्०**'-म्हणून मनश्चिदादिकांच्या केवल विद्यात्मकत्वाची सिद्धि होते. ५२.-सु. ब्र. ३७१. (२९)

(३०. **ऐकात्म्याधिकरण. सू.** ५३-५४.)

—मनश्चिदादिकांना पुरुषार्थत्व नाहीं. कारण देहातिरिक्त पुरुषाचाच अभाव आहे, असा '**एक आत्मनः०**' इत्यादि सूत्रानें आक्षेप—

## सूत्रं—एक आत्मनः शरीरे भावात् ॥ ५३

**सूत्रार्थ**—'एके'-कोणी 'आत्मनः'-शरीरातिरिक्त आत्म्याचा अभाव आहे असें मानणारे लोकायतिक 'शरीरच आत्मा' असें म्हणतात. कारण शरीरांत तो आहे अशी उपलब्धि होते. 'शरीर असलें तर तो आहे असा प्रत्यय येतो.' शरीराच्या अभावीं त्याच्या अस्तित्वाचा प्रत्यय येत नाहीं. ५३.-सु.ब्र.३७२-[-'**इह०**' इत्यादि भाष्यानें अधिकरणाचें तात्पर्य सांगतात-]

**भाष्यं—इह देहव्यतिरिक्तस्यात्मनः सद्भावः समर्थ्यते बंधमोक्षाधिकारसिद्धये। न ह्यसति देहव्यतिरिक्त आत्मनि परलोकफलाश्चोदना उपपद्येरन्कस्य वा ब्रह्मात्मत्वमुपदिश्येत। ननु शास्त्रप्रमुख एव प्रथमे पादे शास्त्रफलोपभोगयोग्यस्य देहव्यतिरिक्तस्यात्मनोऽस्तित्वमुक्तम्। सत्यमुक्तं भाष्यकृता। न तु तत्रात्मास्तित्वे सूत्रमस्ति। इह तु स्वयमेव सूत्रकृता तदस्तित्वमाक्षेपपुरःसरं प्रतिष्ठापितम् ॥**

**भाष्यार्थ**—या अधिकरणांत देहव्यतिरिक्त आत्म्याचा सद्भाव–देहाहून पृथक् आत्म्याचें अस्तित्व समर्थिलें जातें–देहातिरिक्त आत्म्याच्या अस्तित्वाचें समर्थन केलें जातें. [–त्याच्या समर्थनाचें फल–]=' **बंध०** '–बंध व मोक्ष यांच्या अधिकाराची सिद्धि होण्यासाठीं त्याचें समर्थन केलें जातें. [–" अहोपण, साधनानुष्ठानाच्या सामर्थ्यामुळें देहाच्याच स्वर्ग-मोक्षाधिकारित्वाची सिद्धि झाली असतां आत्म्याच्या व्यतिरेकाची चिंता व्यर्थ आहे," अशी आशंका घेऊन ' **न हि०** ' इत्यादि भाष्यानें म्हणतात–]=कारण देहाहून भिन्न आत्मा नाहीं, असें झालें असतां परलोक हें ज्यांचें फल आहे, अशा चोदना–असे विधि उपपन्न होणार नाहींत. देहातिरिक्त आत्मा विद्यमान नसल्यास ब्रह्मात्मत्व कोणाचें उपदेशिलें जाईल? कोणाच्या ब्रह्मात्मत्वाचा उपदेश केला जाईल? [–"अहोपण, या व्यतिरेकविचाराला पूर्वतंत्रानें पौनरुक्त्य आहे " अशी '**ननु०**' इत्यादि भाष्यानें शंका–] =" अहोपण, शास्त्राच्या आरंभींच पहिल्या पादांत शास्त्रफलाच्या उपभोगास योग्य अशा देहातिरिक्त आत्म्याचें अस्तित्व सांगितलें आहे !" [–पण तेथें सूत्रकारांनीं –जैमिनि-आचार्यांनीं अतिरिक्त आत्म्याचें कथन केलेलें नसल्यामुळें पौनरुक्त्य नाहीं, असें ' **सत्यं०** ' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=खरें आहे, भाष्यकारानें तेथें देहातिरिक्त आत्म्याचें कथन केलें आहे, हें खरें; पण तेथें आत्म्याच्या अस्तित्वाविषयीं सूत्र नाहीं. [–पण प्रकृत विचारांत पूर्वमीमांसेहून विशेष सांगतात–] =' **इह तु०** '–परंतु येथें स्वतःच सूत्रकारांनीं देहातिरिक्त आत्म्याचें अस्तित्व आक्षेपपूर्वक प्रस्थापित केलें आहे. [–" तर मग प्रथम पादामध्यें आत्म्याचें अस्तित्व कसें प्रदर्शित केलें आहे ? कारण मूलभूत सूत्रावांचून भाष्य युक्त नाहीं!" ' **इत एव च०** ' इत्यादि भाष्यानें उत्तर–]

**भाष्यं—इत एव चाकृष्याचार्येण शबरस्वामिना प्रमाणलक्षणे वर्णितम् । अत एव च भगवतोपवर्षेण प्रथमे तंत्रे आत्मास्तित्वाभिधानप्रसक्तौ शारीरके वक्ष्याम इत्युद्धारः कृतः । इह चेदं चोदनालक्षणेषूपासनेषु विचार्यमाणेष्वात्मास्तित्वं विचार्यते कृत्स्नशास्त्रशेषत्वप्रदर्शनाय ॥**

**भाष्यार्थ**—आणि येथूनच आकर्षण करून आचार्य शबरस्वामीनें प्रमाणलक्षणांत देहभिन्न आत्म्याचें वर्णन केलें आहे. [ ' यज्ञायुधी यजमान स्वर्गलोकाला जातो ' या वाक्याला अतिरिक्त आत्म्याच्या अभावामुळें अप्रामाण्य प्राप्त झालें असतां त्याच्या परिहारानें प्रथमाध्यायाच्या उपयोगित्वानें आत्म्याचें अस्तित्व याच अधिकरणाच्या आधारानें सांगितलें आहे, असें ' प्रमाणलक्षणे '–प्रमाणाध्यायांत

या पदानें सुचविलें आहे. या अधिकरणापासूनच आकर्षण करून तेथें आत्मास्तित्व सांगितलें आहे, याविषयीं वृत्तिकारांचें वचन गमक-सूचक लिंग आहे, असें **'अत एव च०'** इत्यादि भाष्यानें सांगतात-]=आणि म्हणूनच-ज्याअर्थी सूत्रकार येथें त्याचें निरूपण करीत आहेत, त्याअर्थी भगवान् उपवर्षानें प्रथम तंत्रांत-पूर्वमीमांसेंत आत्म्याच्या अस्तित्वाचें कथन करण्याचा प्रसंग आला असतां ' आम्ही शारीरकांत तें सांगूं,' असा उद्धार केला आहे. [ या उत्तरकांडापासून पूर्वकांडामध्यें आत्म्याचें अस्तित्व नेणें, हा अपकर्ष आहे. त्याचा त्यांनीं उद्धार म्ह० निवृत्ति केली आहे, असा भावार्थ.-" पण या उत्तरकांडांतहि प्रथम सूत्रांतील 'अथ-' शब्दानें ग्रहण केलेल्या अधिकाऱ्याचा विचार केला आहे, तेव्हां पुनः त्याचें येथें निरूपण कसें केलें जात आहे ?" **'इह च०'** इत्यादि भाष्यानें उत्तर-]=आणि येथें चोदनालक्षण-विधि हेंच ज्याविषयीं प्रमाण आहे अशा उपासनांचा विचार केला जात असतांना आत्म्याच्या अस्तित्वाचा विचार केला जातो. [ या मीमांसेच्या प्रथमसूत्रांत लोकसिद्ध आत्म्याचें ग्रहण करून अधिकारी प्रदर्शित केला. पण त्याच्या विशेषाचा विचार केला नाहीं. पण या प्रकृत अधिकरणांत विधिप्रमाणक उपासनांचा विचार चालला असतां त्या प्रसंगानें त्याच्या अस्तित्वाचा विशेषतःविचार केला जातो, असा त्या दोन ठिकाणच्या विचारांत भेद आहे, असा भावार्थ.-याप्रमाणें या अधिकरणाची प्रासंगिक अध्यायसंगति व पादसंगति सांगून **'कृत्स्न०'** इत्यादि भाष्यानें श्रुति-शास्त्रसंगति सुचवितात-]=या अधिकरणाला सकल शास्त्राचें शेषत्व आहे, हें प्रदर्शित करण्यासाठीं आत्म्याच्या अस्तित्वाचा विचार केला जातो. [ सर्व वेद व तदर्थविचारात्मक शास्त्र यांचें शेषभूत असें हें अधिकरण आहे. कारण शरीराहून अतिरिक्त आत्म्याचा विचार न केल्यास हें सर्व दुर्घट होतें. म्हणून अतिरिक्त आत्म्याचें शेषत्व प्रदर्शित करण्यासाठीं हा विचार आहे, असा भावार्थ.-याप्रमाणें या अधिकरणाच्या चार संगति सांगून **' अपि च० '** इत्यादि भाष्यानें याची पूर्वोत्तराधिकरणसंगति सांगतात-]

**भाष्यं —अपि च पूर्वस्मिन्नधिकरणे प्रकरणोत्कर्षाभ्युपगमेन मनश्चिदादीनां पुरुषार्थत्वं वर्णितम् । कोऽसौ पुरुषो यदर्था एते मनश्चिदादय इत्यस्यां प्रसक्ताविदं देहव्यतिरिक्तस्यात्मनोऽस्तित्वमुच्यते । तदस्तित्वाक्षेपार्थं चेदमादिमं सूत्रम् । आक्षेपपूर्विका हि परिहारोक्तिर्विवक्षितेऽर्थे स्थूणानिखननन्यायेन दृढां बुद्धिमुत्पादयति ॥**

**भाष्यार्थ**--शिवाय पूर्वाधिकरणांत प्रकरणापासून उत्कर्षाचा अभ्युपगम-स्वीकार करून मनश्चिदादि-अग्नींचें पुरुषार्थत्व वर्णिलें. पण ज्याच्यासाठीं हे मनश्चिदादि अग्नि आहेत तो पुरुष कोण, अशी आकांक्षा झाली असतां हें-देहाहून व्यतिरिक्त आत्म्याचें अस्तित्व सांगितलें जातें. [ त्यामुळें हें अधिकरण येथें सुसंगत आहे, असा भावार्थ.-पण या सूत्रानें ' तें आत्म्याचें अस्तित्व सांगितलें जात नाहीं ' अशी आशंका घेऊन या अधिकरणाच्या पहिल्या सूत्राची अवांतर संगति ' **तदस्तित्वाक्षेपार्थं०**' या भाष्यानें सांगतात-]=त्या आत्म्याच्या अस्तित्वावर आक्षेप घेण्यासाठीं हें या अधिकरणाचें पहिलें सूत्र आहे. [-" अहोपण, देहातिरिक्त आत्म्याचें अस्तित्व जर साध्य आहे, तर त्याविषयीं आक्षेप कशाला? " ' **आक्षेपपूर्विका०** ' इत्यादि भाष्यानें उत्तर-]=कारण आक्षेप घेऊन सांगितलेला परिहार 'स्थूणानिखनन'-खुंटा हालवून घट्ट करणें या न्यायानें विवक्षित अर्थीं दृढबुद्धि उत्पन्न करितो. [त्यामुळें आक्षेपाला उपयुक्तता आहे, असा या वाक्याला शेष लावावा. मनश्चिदादि अग्नि ज्याच्यासाठीं आहेत तो पुरुष याचा विषय आहे. तो हा देहच आहे कीं देहाहून अतिरिक्त-भिन्न आहे, याविषयीं वाद्यांच्या मतभेदामुळें संशय आला असतां-'**अत्रैके०** ' इत्यादि भाष्यानें पूर्वपक्ष-]

**भाष्यं--अत्रैके देहमात्रात्मदर्शिनो लोकायतिका देहव्यतिरिक्तस्यात्मनोऽभावं मन्यमानाः समस्तव्यस्तेषु बाह्येषु पृथिव्यादिष्वदृष्टमपि चैतन्यं शरीराकारपरिणतेषु भूतेषु स्यादिति संभावयन्तस्तेभ्यश्चैतन्यं मदशक्तिवद्विज्ञानं चैतन्यविशिष्टः कायः पुरुष इति चाहुः ॥**

**भाष्यार्थ**--असा संशय आला असतां ' अत्र '-या परीक्षकांच्या व्यवहारभूमींत [ पूर्वपक्षांत ' देहात्मवादाची सिद्धि ' व सिद्धान्तांत ' वैदिक आत्म्याची सिद्धि ' असा या अधिकरणाच्या पूर्वोत्तरपक्षांमध्यें फलभेद आहे. स्वतंत्र किंवा अन्याधार किंवा चैतन्यमात्र व्यावृत्त होतें. ' मी देह आहें ' या देहाच्या 'अहं-' प्रत्ययाधारत्वाप्रमाणें अतिरिक्त आत्म्याच्या अस्तित्वाविषयीं प्रमाण नाहीं, असें मानून वादी म्हणतो-]='**एके देह०** '-कित्येक देहमात्र-आत्मदर्शी-केवल देहच आत्मा आहे, असें समजणारे लोकायतिक देहव्यतिरिक्त आत्म्याचा अभाव मानणारे असे होत्साते [ " पण चैतन्याच्या आधारालाच आत्मत्व आहे. तेव्हां भौतिक -भूतांचें कार्य-विकार म्हणून अचेतन अशा देहाला आत्मत्व कसें ? " अशी आशंका घेऊन ' **समस्तव्यस्तेषु०** ' इत्यादि भाष्यानें सांगतात-]=समस्त म्ह० एकत्र मिळालेल्या सर्व व व्यस्त-त्यांतील एकेका बाह्य पृथिव्यादि भूतांमध्यें उप-

लब्ध न झालेलेंहि तें चैतन्य शरीराकार परिणत झालेल्या भूतांमध्यें असेल, अशी त्या भूतांपासून चैतन्याची संभावना करणारे ते लोकायतिक म्हणतात. [ 'जरी समस्त- मिळालेल्या-संघात पावलेल्या पृथिव्यादि भूतांमध्यें चैतन्य दृष्ट नसलें, कारण तापलेल्या उदकुंभामध्यें ज्ञानाचा अभाव असतो, आणि व्यस्त म्ह० एकेका भूतामध्ये तर तें नसतेंच, तथापि देहात्मक भूतांमध्यें तें असेल, अशी त्या भूतांपासून चैतन्याची संभावना करणारे लोकायतिक,' अशी याची योजना करावी. पण एकेका भूतामध्यें नसलेलें तें भूतांच्या संघातांत कसें असेल, अशी आशंका घेऊन भाष्यांत ' तेभ्यः चैतन्यं ' असें म्हटलें आहे.-संघातविशेषामध्यें कार्यविशेषाच्या अस्तित्वाविषयीं दृष्टान्त-]=' **मदशक्तिवत्०** '-मदशक्तीप्रमाणें हें विज्ञान उत्पन्न होतें. [ ज्याप्रमाणें विड्याचें पान, सुपारी, चुना, कात इत्यादि प्रत्येक द्रव्यामध्यें न दिसलेलाहि लाल रंग किंवा तांबूलपत्रादि प्रत्येक मदद्रव्यामध्यें न दिसलेलीहि मदशक्ति त्यांच्या संघातांत दिसते, त्याप्रमाणें हें ज्ञान एकेका भूतामध्यें जरी अदृष्ट असलें तरी देहाकारपरिणत-संहत-संघात पावलेल्या भूतांत तें होतें. अशी याची योजना करावी.-"अहोपण, देहालाच जर भोक्तृत्व असेल तर मृतदेह मध्येंहि सुखदुःखभोग होईल," अशी आशंका घेऊन वादी ' **चैतन्यविशिष्ट.** ' इत्यादि भाष्यानें म्हणतो-]=व चैतन्यविशिष्ट देह पुरुष आहे असें कित्येक-लोकायतिक म्हणतात. [-" अहोपण, अग्नीच्या सांनिध्यामुळें लोखंडाच्या गोळ्यामध्यें जसें औष्ण्य प्रतीत होतें त्याप्रमाणें आत्म्याच्या सांनिध्यामुळें देहांत चैतन्य प्रतीत होतें. त्यामुळें स्वर्ग व मोक्ष यांच्याशीं संबद्ध होणाऱ्या देहातिरिक्त आत्म्याचें अस्तित्व सिद्ध होत असल्यामुळें देहाला चैतन्यवैशिष्ट्य नाहीं, " अशी आशंका घेऊन वादी ' **न०** ' इत्यादि म्हणतो-]

**भाष्यं—न स्वर्गगमनायापवर्गगमनाय वा समर्थो देहव्यतिरिक्त आत्मास्ति। यत्कृतं चैतन्यं देहे स्यात्। देह एव तु चेतनश्चात्मा चेति प्रतिजानते। हेतुं चाचक्षते शरीरे भावादिति ॥**

**भाष्यार्थ**—स्वर्गगमनासाठीं किंवा मोक्षगमनासाठीं देहाहून भिन्न आत्मा नाहीं, कीं ज्या आत्म्याच्या सांनिध्यामुळें देहामध्यें चैतन्य प्रतीत होईल! [-" तर मग आत्मा कोण आहे, " अशी आकांक्षा झाली असतां वादी '**देह एव०**' इत्यादि भाष्यानें सांगतो-]=पण देहच चेतन व आत्मा आहे, अशी ते लोकायतिक प्रतिज्ञा करितात व त्या प्रतिज्ञात अर्थाविषयीं 'शरीरे भावात्' असा हेतु सांगतात. [-सूत्र-

भागानें प्रतिज्ञात अर्थीं हेतूला अवतरण देऊन वादी ' **यद्धि०** ' इत्यादि भाष्यानें त्याचें व्याख्यान करितो–]

**भाष्यं—यद्धि यस्मिन्सति भवत्यसति च न भवति । तत्तद्धर्मत्वेनाध्यवसीयते यथाऽग्निधर्मावौष्ण्यप्रकाशौ । प्राणचेष्टाचैतन्यस्मृत्यादयश्च आत्मधर्मत्वेनाभिमता आत्मवादिनां तेऽप्यंतरेव देहे उपलभ्यमानाः बहिश्चानुपलभ्यमानाः । असिद्धे देहव्यतिरिक्ते धर्मिणि देहधर्मा एव भवितुमर्हन्ति। तस्मादव्यतिरेको देहादात्मन इति ॥ ५३ ॥ एवं प्राप्ते ब्रूमः—**

**भाष्यार्थ**—कारण जें विद्यमान असतांना जें होतें व जें विद्यमान नसतांना जें नसतें तें त्याच्या धर्मत्वानें निश्चित केलें जातें. जसें–औष्ण्य व प्रकाश हे दोन अग्नीचे धर्म, [ अग्नि विद्यमान असतांना असतात व त्याच्या अभावीं नसतात, म्हणून ते अग्नीचे धर्म आहेत. याप्रमाणें अन्वय-व्यतिरेकांनीं चैतन्याला देहधर्मत्वच आहे. त्यामुळें देहातिरिक्त आत्म्याची सिद्धि होत नाहीं, असा भावार्थ. –' प्राणचेष्टादिक साश्रय आहेत. कार्यत्वामुळें. उभयसंमत व्यापाराप्रमाणें. ' या अनुमानानें प्राणादिकांच्या आश्रयभूत अतिरिक्त आत्म्याची सिद्धि होते, अशी आशंका घेऊन ' अनुमानाला अगोदर प्रामाण्यच नाहीं व त्याला प्रामाण्य आहे, असें जरी म्हटले तरी त्याला सिद्धसाध्यत्व आहे, त्यामुळें असें म्हणूं नको, ' असें वादी '**प्राणचेष्टा०**' इत्यादि भाष्यानें म्हणतो–]=आत्मवाद्यांना आत्म्याच्या धर्मत्वानें अभिमत असलेले जे प्राणचेष्टा–हितप्राप्ति व अहितपरिहार यांसाठीं होणारा व्यापार, चैतन्य, स्मृति इत्यादि धर्म तेहि देहाच्या आंतच उपलब्ध होणारे व देहाच्या बाहेर उपलब्ध न होणारे,असे होत्साते,['स्मृत्यादयः'येथील'आदि-'शब्दानें इच्छा-द्वेषादिक सांगितले आहेत.–" देहाच्या धर्मत्वानें अदृष्ट–अननुभूत अशा त्यांना देहधर्मत्व कसें ?" अशी आशंका घेऊन वादी '**असिद्धे०**' इत्यादि भाष्यानें म्हणतो–]=देहव्यतिरिक्त धर्मी असिद्ध झाला असतां ते देहाचे धर्मच असणें युक्त आहे. [ प्रत्यक्षप्रमाणानें अतिरिक्त आत्म्याचा प्रत्यय येत नसल्यामुळें, प्रत्यक्षातिरिक्त प्रमाण संमत नसल्यामुळें व ' मी गोरा आहें, स्थूल आहें, ' असें देहाचेंच आत्मत्वानें प्रत्यक्ष ज्ञान होत असल्यामुळें प्राणादिकांना देहाधारत्वच आहे–प्राणादिकांचा आधार देहच आहे, असा भावार्थ.–देहात्मवादी ' **तस्मात्०**' इत्यादि भाष्यानें प्रत्यक्ष प्रतीतीच्या फलाचा उपसंहार करितो–]=तस्मात् देहाहून आत्म्याचा अव्यतिरेक आहे, तो अभिन्न आहे, असें सिद्ध होतें.५३[–'**एवं०**' इत्यादि भाष्यानें सिद्धान्तसूत्राला

अवतरण देतात–]=असा पूर्वपक्ष प्राप्त झाला असतां '**व्यतिरेकः०**' इत्यादि सूत्रानें आम्ही सिद्धान्त सांगतों–

**सूत्रं—व्यतिरेकस्तद्भावाभावित्वान्न तूपलब्धिवत् ॥ ५४ ॥ (३०)**

**सूत्रार्थ**–'न तु'–पण आत्म्याचा शरीरापासून अव्यतिरेक नाहीं, तर 'व्यतिरेक आहे' कारण त्याला 'तद्भावींहि अभावित्व आहे'–मरणावस्थेंत शरीराचें अस्तित्व जरी असलें तरी उपलब्धिरूप आत्म्याचें अस्तित्व नसतें. 'उपलब्धीप्रमाणें'–भूतांची उपलब्धि हा जसा भूतांचा धर्म नव्हे त्याप्रमाणें देहाची उपलब्धि हा देह-धर्म नव्हे. ५४. (३०)–सु. ब्र. ३७२–[–सूत्रांतील 'न तु' या शब्दांनीं पूर्व-पक्षनिषेधाच्या प्रतिज्ञेचा विभाग '**न त्वेतत्०**' इत्यादि भाष्यानें करितात–]

**भाष्यं—न त्वेतदस्ति यदुक्तमव्यतिरेको देहादात्मन इति । व्यतिरेक एवास्य देहाद्भवितुमर्हति । तद्भावाभावित्वात् । यदि देहभावे भावाद्देहधर्मत्वं आत्मधर्माणां मन्येत । ततो देहभावेऽप्यभावादतद्धर्मत्वमेवैषां किं न मन्येत । देहधर्मवैलक्ष-ण्यात् । ये हि देहधर्मा रूपादयस्ते यावद्देहं भवन्ति । प्राणचेष्टादयस्तु सत्यपि देहे मृतावस्थायां न भवन्ति । देहधर्माश्च रूपादयः परैरप्युपलभ्यन्ते न त्वात्म-धर्माश्चैतन्यस्मृत्यादयः ॥**

**भाष्यार्थ**—देहापासून आत्म्याचा अव्यतिरेक आहे, असें जें म्हटलें आहे तें बरोबर नाहीं. [–उत्तरपक्षप्रतिज्ञेचें व्याख्यान–]='**व्यतिरेकः एव०**'–या आत्म्याचा देहापासून व्यतिरेकच असणें युक्त आहे. [–त्याविषयींच्या सूत्रोक्त हेतूला अवतरण देऊन त्याचें व्याख्यान–]='**तद्भावाभावित्वात्**'–देहाचा भाव असतांना त्याचा अभाव होत असल्यामुळें–देह विद्यमान असतांना त्याचा अभाव होणें, हाहि त्याचा स्वभाव असल्यामुळें. '**यदि०**'–जर देहभाव असतांना –देह विद्यमान असतांना आत्म्याचा भाव–अस्तित्व असल्यामुळें आत्मधर्मांचें देह-धर्मत्व मानिलें जाईल तर देहाचा भाव असतांनाहि आत्म्याच्या चैतन्यादि धर्मांचा अभाव होत असल्यामुळें त्या धर्मांना देहधर्मत्व नाहीं, त्यांचें अतद्धर्मत्वच–अदेह-धर्मत्वच कां मानूं नये ? [–देहाचा भाव असला तरी मृतावस्थेंत प्राणादिकांचा अभाव स्वीकारणें युक्त आहे. चैतन्यादिक हे देहाचे विशेषगुण नव्हेत. कारण त्यांना तद्भाव–देहभाव असतांना अभावित्व आहे. देहाचे जे विशेषगुण आहेत ते देहभाव असतांना अभावी–नसणारे, असे नाहींत. जसे रूपादिक, असें '**देह-धर्म०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=कारण त्यांना देहधर्मांहून वैलक्षण्य आहे. [त्यांचें देहधर्मांहून वैलक्षण्यच विशद करणारे भाष्यकार दृष्टान्ताच्या व्यावृत्तीचें

निवारण करितात–]=‘ **ये हि०** ’–कारण जे रूपादिक देहधर्म ते देह विद्यमान असेपर्यंत असतात. [ हेतूच्या असिद्धीचें प्रत्याख्यान–]=‘ **प्राणचेष्टादयस्तु०** ’ –पण प्राणचेष्टादिक–प्राणाचा व्यापार–श्वासोच्छ्वासादि देह विद्यमान असतांनाहि मृतावस्थेंत नसतात. [ त्यांना विशेषगुणत्व जरी नसलें तरी देहमात्रप्रभवत्व–केवळ देहापासूनच होणें, हा भाव नाहीं. कारण मृतावस्थेंत त्यांची–प्राणव्यापारादिकांची उपलब्धि होत नाहीं. यास्तव त्यांचा अधिष्ठाता देहाहून अतिरिक्त–भिन्न आहे, असा याचा भावार्थ.–चैतन्यादिकांना देहधर्मत्व नाहीं, याविषयीं हेत्वंतर–] =‘ **देहधर्माश्च०** ’–आणि रूपादिक देहधर्म दुसऱ्यांकडूनहि जाणले जातात–इतरांनाहि त्यांची उपलब्धि होते. पण चैतन्य, स्मृति इत्यादि आत्मधर्म इतरांकडून जाणले जात नाहींत, इतरांना त्यांची उपलब्धि होत नाहीं. [‘विमत–चैतन्यादिक देहधर्म नव्हेत. कारण दुसऱ्यांकडून ते जाणले जात नाहींत. जे त्याचे धर्म असतात ते दुसऱ्याकडून जाणले जातात. जसे रूपादिक’ असा भावार्थ.–आणि याहि कारणानें त्यांना देहधर्मत्व नाहीं, असें ‘ **अपि च** ’ या भाष्यानें सांगतात–]

**भाष्यं--अपि च सति हि तावद्देहे जीवदवस्थायामेषां भावः शक्यते निश्चेतुं न त्वसत्यभावः । पतितेऽपि कदाचिदस्मिन्देहे देहान्तरसंचारेणात्मधर्मा अनुवर्तेरन् । संशयमात्रेणापि परपक्षः प्रतिषिध्यते ॥**

**भाष्यार्थ**—शिवाय आणखी याहि एका कारणानें त्यांना देहधर्मत्व नाहीं. [–नुसत्या अन्वयावरूनच धर्मधर्मित्व मानणें युक्त नाहीं. कारण तसें तें मानिल्यास अतिप्रसंग होतो. यास्तव त्यांचा व्यतिरेकहि सांगणें उचित आहे. पण तो येथें संदिग्ध आहे, त्यामुळें चैतन्यादिकांना देहधर्मत्व व देहाला त्यांचें धर्मित्व नाहीं, असें **‘सति हि०’** इत्यादि भाष्यानें सांगतात–]=कारण देह जेव्हां विद्यमान असतो तेव्हां म्ह० जीवदवस्थेंत त्यांच्या भावाचा–अस्तित्वाचा निश्चय करितां येणें शक्य आहे. पण देह जेव्हां विद्यमान नसतो तेव्हां त्यांच्या अभावाचा निश्चय करितां येणें शक्य नाहीं. [–व्यतिरेकाच्या संदेहाविषयीं हेतु सांगतात–]=**‘पतितेऽपि०’**–कदाचित् हा देह पडला असतांहि दुसऱ्या देहांतील संचारानें आत्मधर्म अनुवृत्त होतील, [–‘पण त्याविषयींहि कांहीं प्रमाण नाहीं,’ अशी आशंका घेऊन आचार्य म्हणतात–]=‘ **संशयमात्रेण०** ’–अशा नुसत्या संशयानेंहि परपक्षाचा प्रतिषेध केला जातो. [ तुझें अदर्शन तर आत्म्याच्या अभावाचा निश्चय करवूं शकत नाहीं. कारण तुला प्रत्यक्ष हेंच एक प्रमाण संमत आहे. पण मला अनुमान, शब्द इत्यादि दुसरीं प्रमाणेंहि संमत असल्यामुळें देहान्तरसंचारामुळें

त्याच्या धर्मांचें दर्शन होतें, म्हणून त्याविषयीं संदेह केला जातो. पण त्या तेवढ्या संदेहानेंच चैतन्यादिकांच्या देहधर्मत्वाची सिद्धि होत नाहीं. तूं व मी अशा आम्हां दोघांचाहि ' निश्चित अन्वयादिकांनाच साधकत्व आहे,' याविषयीं विवाद नाहीं, असा याचा भावार्थ.–सूत्रांतील 'उपलब्धिवत्' या पदाचें आक्षेपद्वारा व्याख्यान करण्यासाठीं ' **किमात्मकं०** ' इत्यादि भाष्यानें प्रश्न करितात–]

**भाष्यं—किमात्मकं च पुनरिदं चैतन्यं मन्यते । यस्य भूतेभ्य उत्पत्तिमिच्छतीति परः पर्यनुयोक्तव्यः । न हि भूतचतुष्टयव्यतिरेकेण लोकायतिकः किंचित्तत्त्वं प्रत्येति । यदनुभवनं भूतभौतिकानां तच्चैतन्यमिति चेत् । तर्हि विषयत्वात्तेषां न तद्धर्मत्वमश्नुवीत । स्वात्मनि क्रियाविरोधात् ॥**

**भाष्यार्थ—**पण वादी ज्याची भूतांपासून उत्पत्ति इच्छितो तें हें चैतन्य 'किमात्मक'–कोणत्या स्वरूपाचें आहे, असें तो मानतो, असा त्याला प्रश्न करावा. [ तें भूतचतुष्टयाहून अतिरिक्त आहे कीं नाहीं, हा येथील विमर्शाचा अर्थ आहे. 'पण अप्रकृत अर्थीं प्रश्न कसा संभवतो-' अशी आशंका घेऊन '**यस्य०**' ज्याची उत्पत्ति वादी भूतांपासून इच्छितो, असें म्हटलें आहे.–या विकल्पांतील पहिल्या म्हणजे चैतन्य भूतचतुष्टयातिरिक्त आहे, या पक्षीं ' सिद्धान्तविरोध ' हा दोष '**न हि०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=कारण लोकायतिक भूतचतुष्टयाहून भेदानें कोणतेंच तत्त्व मानीत नाहीं. [–' **यदनुभवनं०** ' इत्यादि भाष्यानें धर्म व धर्मी यांच्या तादात्म्यानें अभेदपक्षाचा अवलंब करितात–]=भूतें व भौतिक पदार्थ यांचें जें अनुभवन–अनुभव तेंच चैतन्य आहे, असें जर तो म्हणेल तर त्यांना विषयत्व असल्यामुळें [ चैतन्य तद्धर्मत्वाला प्राप्त होणार नाहीं, असा पुढें संबंध. चैतन्याला भूतपरिणामत्व–भूतकार्यत्व असल्यामुळें रूपादिकांप्रमाणें भूतांहून अर्थान्तरत्व नाहीं, म्हणून चैतन्याला भूतांहून अतिरेकाची–भेदाची प्राप्ति होत नाहीं, असा भावार्थ.–पण चैतन्याच्या भूतपरिणामत्वाचें प्रत्याख्यान रूपादिकांहून त्याच्या वैषम्यकथनानेंच केलें आहे, असें मानणारे आचार्य ' **तद्धर्मत्वं०** ' या भाष्यानें दोषान्तर सांगतात–]=चैतन्य भूतधर्मत्वाला प्राप्त होणार नाहीं. [ चैतन्य जर भूतपरिणामरूप असेल तर त्या भूत-भौतिकांना स्वात्म्याचें विषयत्व असल्यामुळें तें त्यांच्या धर्मत्वानें त्यांच्या अभेदास प्राप्त होणार नाहीं, याविषयीं ' **स्वात्मनि०** ' इत्यादि भाष्यानें हेतु सांगतात–]=कारण स्वात्म्यामध्यें क्रियेचा विरोध आहे. [ तरवारीची धार आपल्यालाच तोडिते, याप्रमाणें एकाच आश्रयांत विषय-विषयित्वाचा असंभव आहे, असा या हेतूचा अर्थ आहे.–शिवाय जो

ज्याचा धर्म असतो तो त्याचा साधक नसतो, तो त्याची सिद्धि करूं शकत नाहीं. जसें–रूपादिक. पण चैतन्याला भूत-भौतिकसाधकत्व आहे. त्यामुळें तें भूत-भौतिकांहून अतिरिक्त–भिन्न आहे, या सिद्धान्ताची सिद्धि होते, असें '**न हि०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]

**भाष्यं—न ह्यग्निरुष्णः सन्स्वात्मानं दहति । न हि नटः शिक्षितः सन्स्वस्कंधमधिरोक्ष्यति । न हि भूतभौतिकधर्मेण सता चैतन्येन भूतभौतिकानि विषयीक्रियेरन् । न हि रूपादिभिः स्वरूपं पररूपं वा विषयीक्रियते । विषयीक्रियन्ते तु बाह्याध्यात्मिकानि भूतभौतिकानि चैतन्येन । अतश्च यथैवास्या भूतभौतिकविषयाया उपलब्धेर्भावोऽभ्युपगम्यते । एवं व्यतिरेकोऽप्यस्याः तेभ्योऽभ्युपगंतव्यः ॥**

**भाष्यार्थ**—कारण अग्नि उष्ण असून आपल्यालाच जाळीत नाहीं. एखादा नट कितीहि जरी शिक्षित असला तरी आपल्याच खांद्यावर बसणार नाहीं. त्याचप्रमाणें भूतें व भौतिक पदार्थ यांचा धर्म असलेल्या चैतन्याकडून भूतें व भौतिक पदार्थ विषय केले जाणार नाहींत. [–'**न हि०**' इत्यादि भाष्यानें रूपादि-दृष्टान्त विशद करितात–]=रूपादिकांकडून स्वरूप किंवा पररूप विषय केलें जात नाहीं, हें प्रसिद्ध आहे. [–"तर मग चैतन्यालाहि साधकत्व नसूं दे" यावर आचार्य '**विषयीक्रियन्ते०**' इत्यादि भाष्यानें म्हणतात–]=पण बाह्य व आध्यात्मिक भूत-भौतिक पदार्थ चैतन्याकडून विषय केले जातात. [–'**अतश्च०**' इत्यादि भाष्यानें 'उपलब्धिवत्' या सूत्रावयवाची फलितपरत्वानें योजना–] =आणि असें असल्यामुळें ज्याप्रमाणें या भूत-भौतिकविषय उपलब्धीचा भाव स्वीकारला जातो त्याप्रमाणेंच तिचा भूत-भौतिकांहून व्यतिरेकहि अवश्य स्वीकारावा. [–"तर मग उपलब्धि भूतांहून अतिरिक्त व स्वतंत्र असूं दे. पण तेवढ्यानें आत्मसिद्धि कशी होते ?" '**उपलब्धिस्वरूपः०**' या भाष्यानें उत्तर–]

**भाष्यं—उपलब्धिस्वरूप एव च न आत्मेत्यात्मनो देहव्यतिरिक्तत्वम् । नित्यत्वं चोपलब्धेः ऐकरूप्यात् । अहमिदमद्राक्षमिति चावस्थान्तरयोगेऽप्युपलब्धृत्वेन प्रत्यभिज्ञानात् । स्मृत्याद्युपपत्तेश्च ॥**

**भाष्यार्थ**—आणि आमचा आत्मा उपलब्धिस्वरूपच आहे. म्हणून आत्म्याला देहातिरिक्तत्व आहे. [–"अहोपण, ती उपलब्धि क्षणिक आहे. त्यामुळें तिचें नित्यात्मस्वरूपत्व अयुक्त आहे," अशी आशंका घेऊन 'न जाणणाराला तिच्या भेदाचा अभाव आहे व विषयभानामुळेंच तिच्या भेदाचें भान होतें म्हणून विषयच अनित्य आहे. उपलब्धि अनित्य नाहीं, असें '**नित्यत्वं च०**' इत्यादि भाष्यानें

सांगतात–]–आणि एकरूपत्वामुळें उपलब्धीला नित्यत्व आहे. [–शिवाय स्थूल देहाभिमानानें रहित झालेल्या द्रष्ट्याचें स्वप्नांत प्रत्यभिज्ञान होत असल्यामुळें देहातिरिक्त आत्म्याची सिद्धि होते, असें ' अहं इदं० ' इत्यादि भाष्यानें सांगतात–] =' मीं स्वप्नांत हें पाहिलें ' असें प्रत्यभिज्ञान दुसऱ्या अवस्थेचा संबंध झाला तरी होतें, त्यामुळें व्यतिरिक्त आत्म्याची सिद्धि होते. [–" अहोपण, स्वप्नांतहि दुसऱ्या स्थूल देहालाच उपलब्धृत्व–ज्ञातृत्व आहे " अशी आशंका घेऊन आचार्य म्हणतात–]–' **स्मृत्याद्युपपत्तेश्च** '–आणि व्यतिरिक्त आत्मपक्षींच स्मृत्यादिकांची उपपत्ति लागत असल्यामुळेंहि देहभिन्न आत्म्याची सिद्धि होते. [ उपलब्धा–अनुभव घेणारा व स्मर्ता–त्या अनुभूत अर्थाला आठवणारा, यांचा जर भेद असेल तर एकानें अनुभव घेतलेल्याची स्मृति दुसऱ्याला होणार नाहीं. पण उपलब्ध्याला स्मृति होते, त्यामुळें त्यांचा भेद नाहीं, असा भावार्थ.–दूषित केलेल्याहि पक्षावर दुसरा दोष देण्यासाठीं ' यत्तु० ' इत्यादि भाष्यानें त्याचा अनुवाद–]

**भाष्यं—यत्तूक्तं शरीरे भावाच्छरीरधर्म उपलब्धिरिति । तद्वर्णितेन प्रकारेण प्रत्युक्तम् । अपि च सत्सु प्रदीपादिषूपकरणेषु उपलब्धिर्भवति असत्सु न भवतीति–न चैतावता प्रदीपादिधर्म एवोपलब्धिर्भवति । एवं सति देहे उपलब्धिर्भवत्यसति च न भवतीति । न देहधर्मो भवितुमर्हति । उपकरणत्वमात्रेणापि प्रदीपादिवद्देहोपयोगोपपत्तेः ॥**

**भाष्यार्थ—**पण आतां ' शरीर विद्यमान असतांनाच उपलब्धीचा भाव असल्यामुळें उपलब्धि हा शरीरधर्म आहे, ' असें जें पूर्ववाद्यानें वर म्हटलें आहे [–तद्भाव-अभावित्वाचें व्याख्यान करूनच याचें प्रत्याख्यान–निरसन पूर्वी–पृ.४६० –केलें आहे, असें पूर्वोक्ताचें स्मरण देतात–]=**'तद्वर्णितेन०'**–तें पूर्वी वर्णन केलेल्या प्रकारानें प्रत्युक्त–निरसन केलेलें आहे. [–त्यांतील आणखी अधिक दोष सांगतात–] =**' अपि च०'**–शिवाय देहात्मपक्षावर आणखी दोष येतो. [–अनन्यथासिद्ध असलेलेच अन्वय-व्यतिरेक सांगणें उचित आहे. पण देहाचे चैतन्याशीं असलेले अन्वय-व्यतिरेक अधिष्ठानविषयत्वानें अन्यथासिद्ध आहेत, असें सदृष्टान्त साधितात–]=' **सत्सु०** '–प्रदीपादिक उपकरणें विद्यमान असतांना घटादिकांची उपलब्धि होते. प्रदीपादि उपकरणें नसल्यास घटादि विषयांचा अनुभव येत नाहीं. पण तेवढ्यावरून उपलब्धि हा प्रदीपादिकांचा धर्म आहे, असें होत नाहीं. ' **एवं सति** '–याच न्यायानें देह विद्यमान असतांना उपलब्धि होते व तो विद्यमान नसतांना ती होत नाहीं, एवढ्यावरूनच उपलब्धि देहधर्म असणें युक्त

नाहीं. कारण केवळ उपकरणत्वानेंहि प्रदीपादिकांप्रमाणें देहाचा उपयोग संभवतो. [–पण उपलब्धीमध्यें देहाचें उपकरणत्वहि सिद्ध होत नाहीं, असें **'न च०'** इत्यादि भाष्यानें सांगतात–]

**भाष्यं—न चात्यन्तं देहस्योपलब्धावुपयोगोऽपि दृश्यते । निश्चेष्टेऽप्यस्मिन्देहे स्वप्ने नानाविधोपलब्धिदर्शनात् । तस्मादनवद्यं देहव्यतिरिक्तस्यात्मनोऽस्तित्वम् ॥ ५४ ॥ ( ३० )**

**भाष्यार्थ**—आणि देहाचा उपलब्धीमध्यें अत्यंत उपयोग असलेलाहि दिसत नाहीं. कारण हा देह निश्चेष्ट होऊन पडलेला असतांनाहि स्वप्नांत नाना प्रकारची उपलब्धि होत असलेली दिसते. [–' उपलब्धि देहापासून उत्पन्न होणारी नाहीं. कारण तो देह कोणताहि व्यापार करीत नसतांनाहि ती विद्यमान असते, दुसऱ्या पदार्थांप्रमाणें. ' पण जागरितांत देह विषयांना व्यक्त करणाऱ्या वृत्त्यादिकांना उत्पन्न करणारा असल्यामुळें त्याचा थोडा-बहुत उपयोग आहे, असें मानून भाष्यांत ' अत्यंत उपयोग ' असें म्हटलें आहे. स्वप्नांत द्रष्ट्याच्या ठिकाणीं ' मी पाहतों' इत्यादि अबाधित स्थूलदेहाकारशून्य जो प्रत्यक्ष अनुभव येतो त्याचा विषय देहातिरिक्त आत्मा असल्यामुळें देहात्मवादाची सिद्धि होत नाहीं, असा भावार्थ.–अनुमानादि प्रत्यक्षेतर प्रमाणांचें अप्रामाण्य तर केवळ प्रतिज्ञामात्र आहे, असें मानून उपसंहार--]=' **तस्मात्०** '–म्हणून देहातिरिक्त आत्म्याचें अस्तित्व निर्दोष आहे. ५४.–सु. ब्र. ३७३.–( ३० )

( ३१. **अंगावबद्धाधिकरण**. सू. ५५-५६. )

—देह विद्यमान असतांना असणाऱ्या चैतन्याचा देहभाव असतांनाहि जसा अभाव होतो त्याप्रमाणें उद्गीथादि भाव असतांना होणाऱ्या उपासनांचा तद्भाव असतांनाहि अभाव होईल, अशी आशंका घेऊन सूत्रकार ' **अंगावबद्धास्तु०** ' इत्यादि सूत्रानें म्हणतात—

**सूत्रं—अंगावबद्धास्तु न शाखासु हि प्रतिवेदम् ॥ ५५**

**सूत्रार्थ**—पण अंगावबद्ध असलेल्या उपासना ' न प्रतिवेदं '–प्रत्येक वेदांतील स्वशाखांमध्येंच व्यवस्थित होणार नाहींत, तर ' सर्व शाखांमध्यें ' अनुवृत्त होतील. कारण 'उद्गीथं उपासीत' इत्यादि विधिवचनांत उद्गीथादि-श्रुतिसामान्य आहे. ५५–सु. ब्र. पृ. ३७५. [–'**समाप्ता०**' इत्यादि भाष्यानें अवान्तरसंगति सांगतात–]

**भाष्यं—समाप्ता प्रासंगिकी कथा । संप्रति प्रकृतामेवानुवर्तामहे–'ओमित्येतदक्षरमुद्गीथमुपासीत ' ' लोकेषु पंचविधं सामोपासीत ' ' उक्थमुक्थ-**

**मिति वै प्रजा वदन्ति तादिदमेवोक्थम्' । 'इयमेव पृथिवी' । 'अयं वाव लोकः' 'एषोऽग्निश्चितः' इत्येवमाद्या य उद्गीथादिकर्मांगावबद्धाः प्रत्ययाः प्रतिवेदं शाखाभेदेषु विहिताः । ते तत्तच्छाखागतेष्वेवोद्गीथादिषु भवेयुः । अथवा सर्वशाखागतेष्विति विशयः । प्रतिशाखं च स्वरादिभेदादुद्गीथादिभेदानुपादायायमुपन्यासः ॥**

**भाष्यार्थ**—प्रासंगिकी कथा समाप्त झाली. आतां आम्ही प्रकृत कथेचेंच अनुवर्तन करितों. [ 'उद्गीथादि अंगाश्रित उपासनें' हा या अधिकरणाचा विषय आहे, असें त्या त्या वाक्यकथनानें **'ओमित्येतत्०'** इत्यादि ग्रंथानें दाखवितात–]="ॐ अशा या उद्गीथावयवभूत अक्षराची उपासना करावी. "–छां. १.१.१. [–उद्गीथावयवभूत ओंकारांत प्राणदृष्टि करावी, ]=" लोकांमध्यें पंचविध सामाची उपासना करावी. "–छां. २. २. १. [ हिंकारादि पंचविध सामामध्यें पृथिव्यादि लोकदृष्टि करावी, ]=" उक्थ उक्थ असेंच प्रजा बोलतात. तें हेंच उक्थ आहे हीच पृथिवी," –छां.१.१३.१. [उक्थाख्यशस्त्रांत पृथिवीदृष्टि करावी,]="हा चित–अग्नि हाच लोक आहे." [ इष्टकाचिताग्नींत लोकदृष्टि करावी, ]=हे व अशाच प्रकारचे दुसरे जे उद्गीथादि कर्मांगावबद्ध प्रत्यय प्रत्येक वेदांतील भिन्न शाखांमध्यें विहित आहेत ते त्या शाखांतीलच उद्गीथादिकांमध्यें आहेत कीं सर्वशाखांतील उद्गीथादिकांमध्यें आहेत असा संशय येतो. [ या वाक्यांतील पहिल्या ' ओमित्येतदक्षरं० ' या वाक्याचें ' व्याप्तेश्च० '–पृ.२९६–या अधिकरणांत व्याख्यान केलें आहे. पृथिव्यादि लोक या अर्थी असलेला ' लोक ' हा शब्द लोकालोकांमध्यें लाक्षणिक आहे. पृथिव्यादिदृष्टीनें पंचविध सामाची उपासना करावी, असा भावार्थ. पृथिवी हिंकार, अग्नि प्रस्ताव, अन्तरिक्ष उद्गीथ, आदित्य प्रतिहार, द्यौ निधन, असें उपासन करावें. उक्थ म्ह० कर्मांगशस्त्र, प्रजा उक्थ उक्थ असें द्विरुक्तीनें जें म्हणतात तें हेंच, कीं जी ही पृथिवी, असा उक्थामध्यें पृथिवीदृष्टीचा विधि आहे. चित म्ह० कर्मांगभूत अग्नि, त्यांत ' हा लोक ' अशी दृष्टि करावी, असा याचा भावार्थ.–या उक्त उक्थादिप्रत्ययांना विषय करून प्रकरण व उद्गीथादिशब्दांचें साम्य यांमुळें 'ते प्रत्यय त्या शाखांतील उद्गीथादिकांमध्येंच आहेत कीं सर्व शाखागत उद्गीथादिकांमध्यें' असा संशय सांगितला आहे.–" उद्गीथादिकांना सर्व शाखांमध्यें ऐक्य असल्यामुळें त्यांच्या उपासनांच्या व्यवस्थेची आशंकाच येत नाहीं. म्हणून हें अधिकरण अनारम्भ्य आहे," अशी आशंका घेऊन **' प्रतिशाखं च०'** इत्यादि भाष्यानें म्हणतात–]=आणि प्रत्येक शाखेमध्यें स्वरादिकांच्या भेदामुळें उद्गीथादिकांच्या भेदाचा स्वीकार करून हा उपन्यास आहे. [नीचैस्त्वादि स्वरांच्या

भेदामुळें व अध्ययनधर्मांच्या भेदामुळें उद्गीथादिकांचाहि भेद स्वीकारून हा विद्याविचार आहे, असा भावार्थ.–या अधिकरणांत श्रौतसामान्यानें प्रकरणप्राप्त विशेष नियमाचा बाध होतो. म्हणून सर्व शाखाविहित प्रधानकर्मांच्या अंगत्वानें प्राप्त झालेल्या सर्व उद्गीथादि विशेषांमध्यें तदाश्रय उपासनांच्या उपसंहारकथनानें सर्वशाखांना त्यांचें अनुष्ठेयत्व सांगितलेलें असल्यामुळें येथें वाक्यार्थज्ञानहेतूचेंच चिंतन केलें आहे. म्हणून याच्या पादादिसंगति आहेत. पूर्वपक्षांत 'अनुष्ठानाच्या व्यवस्थेची सिद्धि' सिद्धान्तांत 'त्याची अव्यवस्था' असा फलभेद मानून पूर्वपक्ष करण्यासाठीं '**किं तावत्**०' इत्यादि भाष्यानें विमर्श करितात–]

**भाष्यं—किं तावत्प्राप्तम्। स्वशाखागतेष्वेवोद्गीथादिषु विधीयेरन्निति। कुतः। संनिधानात्। 'उद्गीथमुपासीत' इति हि सामान्यविहितानां विशेषाकांक्षायां संनिकृष्टेनैव स्वशाखागतेन विशेषेणाकांक्षादिनिवृत्तेः। तदतिलंघनेन शाखान्तरविहितविशेषोपादाने कारणं नास्ति। तस्मात्प्रतिशाखं व्यवस्थेति॥**

**भाष्यार्थ**—पण अगोदर यांतील कोणता पक्ष प्राप्त झाला. [–देह व आत्मा यांचा भेद असल्यामुळें आत्मधर्म देहामध्यें जसे नसतात, त्याप्रमाणें एका शाखेंतील उद्गीथधर्मांची भिन्न शाखेंतील उद्गीथादिकांमध्यें प्राप्ति होत नाहीं, असा पूर्वपक्ष '**स्वशाखा**०' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=स्वशाखागतच उद्गीथादिकांमध्यें त्यांचें विधान केलें जातें, असें प्राप्त झालें. [–" अहोपण, 'विद्याचित एव' इत्यादि श्रुतीनें क्रियाप्रकरणाचा भंग करून मनश्चिदादिकांचें पुरुषार्थत्व जसें सिद्ध केलें आहे तसें येथेंहि उद्गीथादि-श्रुतीला अधिक बलवत्त्व आहे. म्हणून त्या श्रुतीनें प्रकरणाचा भंग होत असल्यामुळें त्यांच्या उपासनांची व्यवस्था नाहीं," असें सिद्धान्ती म्हणतात–]–'**कुतः**'–कोणत्या कारणानें स्वशाखागत उद्गीथादिकांतच त्यांचा उपसंहार होतो! [–उद्गीथादि सामान्यश्रुतीला प्रकरणानें प्राप्त झालेल्या विशेषाची आकांक्षा असल्यामुळें ती श्रुति त्याचा बाध करीत नाहीं. त्यामुळें उपासनेची व्यवस्था युक्त आहे, असें मानून पूर्ववादी '**संनिधानात्**' असें उत्तर सांगतो–]=संनिधानामुळें. [–'**उद्गीथं**०' इत्यादि ग्रंथानें प्रकरणाचें विवरण–]='उद्गीथाची उपासना करावी'–पृ.४६५–अशा सामान्यतः विहित असलेल्या उपासनांना त्याच्या विशेषाची आकांक्षा झाली असतां संनिकृष्ट–संनिध असलेल्या स्वशाखागत विशेषानेंच आकांक्षादिकांची निवृत्ति होत असल्यामुळें त्याचें अतिक्रमण करून शाखान्तरविहित विशेषाचें उपादान करण्यास कांहीं कारण नाहीं. [वेदत्रयोक्त प्रधानकर्मांमध्यें अंगत्वानें विहित असलेल्या व प्रत्ययाचीं आलंबनें–आधार

अशा उद्गीथोक्त चित्यामींचा प्रतिशाखेंत स्वरादिभेदानें भेद असल्यामुळें उद्गीथादि श्रुतींनीं सामान्यतः ग्रहण केलेल्या प्रत्ययालंबनभूत उद्गीथादिकांच्या विशेषाची आकांक्षा झाली असतां त्या त्या शाखेंतील प्रधानकर्मांगत्वानें प्रयुक्त असलेल्या उद्गीथादि विशेषांमध्यें 'उद्गीथमुपासीत' इत्यादि प्रत्यय प्रकरणावरून नियमित केले जातात, असा भावार्थ.–याप्रमाणें प्रकरणावरून व्यवस्था सिद्ध झाली असतां ज्या शाखेंतील जें उपासन असेल याचें अनुष्ठान त्या शाखियांनींच करावें, असा उपसंहार–]=**'तस्मात्०'**–म्हणून प्रत्ययांची प्रत्येक शाखेंत व्यवस्था आहे–त्या त्या शाखेंत ते ते प्रत्यय नियत आहेत. [–**'एवं०'** इत्यादि भाष्यानें पूर्वपक्षाचा अनुवाद करून सिद्धान्त सांगतात–]

**भाष्यं—एवं प्राप्ते ब्रवीति–अंगावबद्धास्त्विति। तु-शब्दः पक्षं व्यावर्तयति। नैते प्रतिवेदं स्वशाखास्वेव व्यवतिष्ठेरन्। अपि तु सर्वशाखास्वनुवर्तेरन्। कुतः। उद्गीथादिश्रुत्यविशेषात्॥**

**भाष्यार्थ—**असा पूर्वपक्ष प्राप्त झाला असतां बादरायणाचार्य 'अंगावबद्धास्तु' असें म्हणतात. [–**'तु-'शब्दः०'** इत्यादि भाष्यानें सूत्राक्षरांची योजना–]=सूत्रांतील 'तु' हा शब्द पूर्वपक्षाची व्यावृत्ति करितो. हे प्रत्यय प्रत्येक वेदांतील स्वशाखांमध्येंच व्यवस्थित होत नाहींत, तर सर्वशाखांमध्यें अनुवृत्त होतात. [–सूत्रांतील 'हि' या शब्दानें ग्रहण केलेला हेतु प्रश्नपूर्वक सांगतात–]=**'कुतः०'** –कोणत्या कारणानें? उद्गीथादिश्रुतिविशेषामुळें. [सामान्यतः प्रवृत्त झालेल्या श्रुतीला विशेषाची आकांक्षा झाली असतां प्रकरणावरून विशेषाचा नियम करणें युक्त आहे. पण प्रकृत विषयांत उद्गीथादि सामान्यामध्यें उपासना संभवत असल्यामुळें विशेषाकांक्षेच्या अभावीं श्रौतसामान्यानें प्रकरणप्राप्त विशेष नियमाचा बाध होतो. म्हणून सर्वशाखास्थ प्रधान कर्माच्या अंगत्वानें विनियोग केलेल्या उद्गीथादि विशेषांमध्यें तदालंबनज्ञानांचा उपसंहार होईल, असें हेतूचें विवरण **'स्वशाखा०'** इत्यादि भाष्यानें करितात–]

**भाष्यं—स्वशाखाव्यवस्थायां हि 'उद्गीथमुपासीत' इति सामान्यश्रुतिरविशेषप्रवृत्ता सती संनिधानवशेन विशेषे व्यवस्थाप्यमाना पीडिता स्यात्। न चैतन्न्याय्यम्। संनिधानात्तु श्रुतिर्बलीयसी। न च सामान्याश्रयः प्रत्ययो नोपपद्यते। तस्मात्स्वरादिभेदे सत्यपि उद्गीथत्वाद्यविशेषात्सर्वशाखागतेष्वेव उद्गीथादिष्वेवंजातीयकाः प्रत्ययाः स्युः॥ ५५॥**

**भाष्यार्थ**—स्वशाखाव्यवस्थेमध्यें 'उद्गीथाची उपासना करावी' अशी सामान्य-श्रुति अविशेषानें प्रवृत्त झालेली असतांना संनिधानविशेषानें व्यवस्थापित–नियत केली जाऊं लागल्यास ती पीडित–बाधित होईल ! पण तसें होणें न्याय्य नाहीं. [प्रकरणानें विशेष अर्थीं सामान्यश्रुतीचा बाध जरी न झाला तरी तिचा संकोच करण्यास कांहीं प्रमाण नसल्यामुळें सामान्यद्वारा सर्वविशेषांमध्यें प्रवृत्त होणाऱ्या श्रुतीचें एका विशेष अर्थी नियमन करणें ही त्या श्रुतीची पीडाच आहे, असें मानून भाष्यांत 'पीडिता स्यात्' असें म्हटलें आहे.–"पण तुझ्या पक्षीं श्रुतीनें प्रकरणाचा जसा बाध होतो त्याप्रमाणें माझ्या पक्षीं प्रकरणानें श्रुति बाधित केली जातो. कारण त्यांत विशेष कांहीं नाहीं," अशी आशंका घेऊन '**संनिधानात्०**' इत्यादि म्हणतात–] =पण संनिधानापेक्षां श्रुति अधिक बलवती आहे. [–"अहोपण, सामान्याचें उपास्यत्व संभवत नाहीं. त्यामुळें विशेषाची आकांक्षा झाली असतां विशेषाचें समर्पण करणें हें ज्याचें प्रयोजन आहे, असें प्रकरण श्रुतीनें बाध्य कसें असेल?" अशी आशंका घेऊन '**न च०**' इत्यादि म्हणतात–]=आणि सामान्याश्रय प्रत्यय –सामान्याचें उपासन उपपन्न होत नाहीं, असें नाहीं. [–"तथापि प्रत्येक वेदांत स्वरादिभेदानें उद्गीथादिकांचा भेद होत असल्यामुळें उपासनांची व्यवस्था आम्हीं वर सांगितली आहे" अशी आशंका घेऊन '**तस्मात्०**' इत्यादि भाष्यानें म्हणतात–] ='तस्मात्'–श्रुतीला प्राबल्य असल्यामुळें स्वरादिभेद जरी असला तरी उद्गीथत्वादिकांचा अभेद असल्यामुळें सर्वशाखांतीलच उद्गीथादिकांमध्यें अशा प्रकारचे प्रत्यय होतील. ५५. [–उद्गीथादिश्रुतींच्या आधारानें जेथें जेथें उद्गीथादि सांगितलेला असतो तेथें तेथें सर्वच ठिकाणीं क्वचित् उक्त असलेल्याहि प्रत्ययाची अनुवृत्ति होते, असें सांगितलें. आतां '**मंत्रादिवत्०**' इत्यादि सूत्रानें उदाहरणानेंहि या अर्थाचें समर्थन करितात–]

**सूत्रं—मंत्रादिवद्वाऽविरोधः ॥ ५६ ॥ ( ३१ )**

**सूत्रार्थ**–'मंत्रादिकांप्रमाणें'–एकत्र पठित असलेल्या '**कुटरुरसि**' या तंडुलपेषणार्थ अश्मग्रहणमंत्राची अन्यत्र प्राप्ति झाल्यास त्यांत जसा विरोध नाहीं, त्याप्रमाणें एकत्र विहित असलेल्या उद्गीथादिकांची अन्यशाखेंतील उद्गीथादिकांमध्यें प्राप्ति झाल्यास त्यांत विरोध नाहीं. 'वा-'शब्द दृष्टान्तप्रदर्शनरूप हेत्वन्तर सुचवितो. ५६ (३१). [–'**अथवा०**' इत्यादि भाष्यानें सूत्रस्थ 'वा-'शब्दाचा अर्थ सांगतात–]

**भाष्यं—अथवा नैवात्र विरोधः शंकितव्यः । कथमन्यशाखागतेषूद्गीथादिषु अन्यशाखाविहिताः प्रत्यया भवेयुरिति । मंत्रादिवदविरोधोपपत्तेः । तथा हि मंत्रा-**

**णां कर्मणां गुणानां च शाखान्तरोत्पन्नानामपि शाखान्तरे उपसंग्रहो दृश्यते। येषामपि हि शाखिनां "कुटरुरसि" इत्यश्मादानमंत्रो नाम्नातः। तेषामप्यसौ विनियोगो दृश्यते "कुक्कुटोऽसीत्यश्मानमादत्ते कुटरुरसीति वा" इति ॥**

**भाष्यार्थ**--किंवा अन्यशाखागत उद्गीथादिकांत अन्यशाखांमध्यें विहित असलेले प्रत्यय कसे होतील, अशी येथें विरोधाची शंका घेणेंच युक्त नाहीं. [-हेतूला अवतरण देऊन अक्षरार्थ सांगतात-]=' **मंत्रादिवत्०** '-कारण मंत्रादिकांप्रमाणें अविरोध उपपन्न होतो. ' **तथा हि०** '-कसा तो पहा-अन्यशाखांमध्यें सांगितलेलेहि मंत्र, कर्में व गुण, यांचा अन्यशाखांमध्यें उपसंग्रह-उपसंहार केलेला दिसतो. [-' **येषां०** ' इत्यादि भाष्यानें त्यांतील मंत्राचें उदाहरण दाखवितात-] =कारण ज्या शाखीयांचा ' कुटरुरसि० ' इत्यादि अश्मग्रहणमंत्र पठित नाहीं त्यांचाहि ' कुक्कुटोऽसि० ' या मंत्रानें अश्म्याचें-तांदुळ कुटण्याच्या पाषाणाचें ग्रहण करितो किंवा ' कुटरुरसि० ' या मंत्रानें त्याचें ग्रहण करितो, असा विनियोग दिसतो. [ तांदुळ वाटण्यासाठीं-त्यांचें पीठ करण्यासाठीं ' कुटरुरसि० ' हा अश्मग्रहणमंत्र ज्या शाखेच्या वेदभागांत पठित नसतो तर '**कुक्कुटोऽसि** मधुजिह्वः ' हाच मंत्र पठित असतो, त्याच्या प्रयोगसूत्रानें विनियोगामध्यें तोहि मंत्र सांगितलेला दिसतो. त्यावरून दुसऱ्या शाखेंत उत्पन्न झालेल्या मंत्राचा शाखान्तरांत संग्रह होतो, असें सिद्ध होतें, असा याचा भावार्थ.-' **येषामपि०**' इत्यादि भाष्यानें कर्माचें उदाहरण देतात-]

**भाष्यं—येषामपि समिदादयः प्रयाजा नाम्नातास्तेषामपि तेषु गुणविधिराम्नायते-" ऋतवो वै प्रयाजाः समानत्र होतव्याः " इति। तथा येषामपि " अजोऽग्नीषोमीयः " इति जातिविशेषोपदेशो नास्ति। तेषामपि तद्विषयो मंत्रवर्ण उपलभ्यते-" छागस्य वपाया मेदसोऽनुब्रूहि " इति ॥**

**भाष्यार्थ**—ज्या शाखियांच्या वेदभागांत समिदादि प्रयाज आम्नात-पठित नाहींत, त्यांच्याहि शाखेंत त्यांत 'ऋतुच प्रयाज आहेत. ते समानप्रदेशांत होतव्य आहेत ' असा गुणविधि सांगितला जातो. [ मैत्रायणीयांच्या शाखेंत ' समिधो यजति, तनूनपातं यजति, इडः यजति, बर्हिर्यजति, स्वाहाकारं यजति ' असे समिदादि प्रयाज पठित नाहींत. तथापि त्यांत संख्यादि गुणविधि पठित आहे. ' द्वादश मासाः पंचर्तवः ' येथें हेमंत व शिशिर यांच्या एकीकरणानें पांच ऋतु प्रसिद्ध आहेत. म्हणून ऋतूंप्रमाणें पंच संख्येनें युक्त असलेले प्रयाज समानदेशीं होतव्य-होम करण्यास योग्य आहेत, असा भावार्थ. तेथें शाखान्तरोत्पन्न कर्माचा

शाखान्तरामध्यें संग्रह उपलब्ध झालेला आहे. नाहीं तर त्यांत गुणविधि संभवत नाहीं, असा भावार्थ.—'**तथा०**' इत्यादि भाष्यानें गुणांचें उदाहरण—]=त्याचप्रमाणें ज्यांच्या शाखेंत 'अज अग्निषोमीय' असा जातिविशेषाचा उपदेश नाहीं त्यांच्याहि वेदभागांत 'छागस्य वपाया मेदसोऽनुब्रूहि'—छागाच्या, वपेच्या मेदाच्या होमासाठीं अनुवाक्य बोल, असा छागसंबंधी मंत्रवर्ण उपलब्ध होतो. [ 'अग्निषोमीय पशूचें आलभन करावें' असा यजुर्वेद्यांचा अग्निषोमीय पशु श्रुत आहे. पण 'अज-बकरा' असा जातिविशेष श्रुत नाहीं. म्हणून विशेषाच्या अश्रवणामुळें कोणताहि एखादा पशु आलंभनीय आहे, असें प्राप्त झालें असतां 'छागो वा मंत्रवर्णात्' या सूत्रानें 'हे होत्या, छागादिकांच्या होमासाठीं अनुवाक्य म्हण' अशा अध्वर्युप्रैषासाठीं नियमकारण लिंगाचा भाव असल्यामुळें छाग—बकरा हा अग्निषोमीय पशु आहे, असें सिद्ध केलें आहे. त्यामुळें गुणाचाहि प्रैषमंत्रलिंगामुळें उपसंग्रह दृष्ट आहे, असा भावार्थ.—'**तथा वेदान्तर०**' इत्यादि भाष्यानें मंत्रांचें दुसरें उदाहरण सांगतात—]

**भाष्यं—तथा वेदान्तरोत्पन्नानामपि "अग्नेर्वेर्होत्रं वेरध्वरम्" इत्येवमादिमंत्राणां वेदान्तरे परिग्रहो दृष्टः । तथा बह्वृचपठितस्य सूक्तस्य "यो जात एव प्रथमो मनस्वान्" इत्यस्य "अध्वर्यवे सजनीयं शस्यम्" इत्यत्र परिग्रहो दृष्टः । तस्माद्यथाश्रयाणां कर्मांगानां सर्वत्रानुवृत्तिः । एवमाश्रितानामपि प्रत्ययानामित्यविरोधः ॥ ५६ ॥ ( ३१ )**

**भाष्यार्थ**—त्याचप्रमाणें वेदान्तरोत्पन्न 'अग्नेर्वेर्होत्रं वेरध्वरम्' इत्यादि मंत्रांचाहि वेदान्तरांत परिग्रह केलेला उपलब्ध होतो. [ दोन वेदान्तरशब्दांनीं उद्गातृवेद—सामवेद व अध्वर्युवेद—यजुर्वेद सांगितले जातात.—त्याविषयींच आणखीं एक उदाहरण—]= '**तथा०**'—तसेंच, 'यो जात एव प्रथमो मनस्वान्'—जो बालच असून गुणांनीं श्रेष्ठ, विवेकवान् ['जनासः'—हे जनहो, तो इंद्र आहे, असा याचा पुढील भाग आहे. ]=या ऋग्वेदपठित सूक्ताचा 'अध्वर्यवे सजनीयं शस्यम्'—"अध्वर्युकर्तृक प्रयोगासाठीं 'सजनीय'—'स जनासः' यानें उपलक्षित होणारें सूक्त शंसनीय आहे," या ठिकाणीं परिग्रह केलेला उपलब्ध होतो. [—'**तस्मात्०**' इत्यादि भाष्यानें दृष्टान्ताच्या अनुवादानें दार्ष्टान्तिकाचें निगमन—]='तस्मात्'—शाखान्तरोत्पन्न मंत्रादिकांच्या शाखान्तरांतील संग्रहाचें बाहुल्य असल्यामुळें ज्याप्रमाणें आश्रय कर्मांगांची सर्वत्र अनुवृत्ति होते त्याप्रमाणें आश्रित प्रत्ययांचीहि सर्वत्र अनुवृत्ति होते, त्यामुळें त्यांत कांहीं विरोध नाहीं. ५६.—सु.ब्र. ३७५-७६. (३१)

( ३२. भूमज्ज्यायस्त्वाधिकरण. सू. ५७ )

—उद्गीथादि-उपासन तत्तदंगविशेषाचेंच आलंबन करणारें नाहीं, या कथनाच्या प्रसंगानें वैश्वनरोपासनांनाहि तत्तदंगविशेषालंबन नाहीं, असें '**भूम्नः०**' इत्यादि सूत्रानें साधितात—

**सूत्रं—भूम्नः क्रतुवज्ज्यायस्त्वं तथा हि दर्शयति ॥५७॥ (३२)**

**सूत्रार्थ**—'भूम्नः'–समस्त वैश्वानरोपासनेलाच 'ज्यायस्त्व'–प्राधान्यानें प्रतिपाद्यत्व आहे. 'क्रतूप्रमाणें'–दर्श-पूर्णमासादि सांगप्रधान एकाच क्रतूच्या प्रयोगाप्रमाणें. कारण श्रुति व्यस्तोपासनांची निंदा करून समस्त उपासनाच विवक्षित असल्याचें दाखविते. ५७ ( ३२ )–सु. ब्र. ३७६. [–'सैव हि'–पृ. ३९८–या सूत्रांत 'तद्यत्तत्सत्यं०' असा 'तत्' या शब्दानें प्रकृताचा परामर्श केलेला असल्यामुळें विद्यैक्य आहे, असें सांगितलें. पण येथें त्याचप्रमाणें अभेदाचा हेतु नसल्यामुळें या अधिकरणाला गतार्थत्व नाहीं, या अधिकरणाचा अर्थ पूर्वी होऊन गेलेला नाहीं, असें मानून व्यस्त व समस्त श्रौत वैश्वानरोपासनेचें उदाहरण '**प्राचीनशाल**:०' इत्यादि भाष्यानें देतात–त्याचा उल्लेख करितात–]

**भाष्यं**—**'प्राचीनशाल औपमन्यवः' इत्यस्यामाख्यायिकायां व्यस्तस्य समस्तस्य च वैश्वानरस्योपासनं श्रूयते । व्यस्तोपासनं तावत् 'औपमन्यव कं त्वमात्मानमुपास्स इति दिवमेव भगवो राजन्निति होवाचैष वै सुतेजा आत्मा वैश्वानरो यं त्वमात्मानमुपास्से' इत्यादि । तथा समस्तोपासनमपि 'तस्य ह वा एतस्यात्मनो वैश्वानरस्य मूर्धैव सुतेजाश्चक्षुर्विश्वरूपः प्राणः पृथग्वर्त्मात्मा संदेहो बहुलो बस्तिरेव रयिः पृथिव्येव पादौ' इत्यादि ॥**

**भाष्यार्थ**—'प्राचीनशाल औपमन्यवः'–छां. ५. ११. १–अशा या आख्यायिकेंत व्यस्त व समस्त वैश्वानराचें उपासन श्रुत आहे. [–'**व्यस्त०**' इत्यादि भाष्यानें त्यांतील प्रश्न-प्रतिवचनरूप वाक्यानें व्यस्तोपासनेचा उपन्यास करितात–]=त्यांतील प्रथम 'हे औपमन्यव, तूं कोणत्या आत्म्याला उपासितोस ?' असें केकय राजानें विचारिलें असतां 'हे पूज्य राजन्, द्युलोक याच वैश्वानराची मी उपासना करितों' असें औपमन्यव म्हणाला. तेव्हां केकयराजा म्हणतो–"ज्या आत्म्याला तूं उपासितोस हा सुतेजा म्हणून प्रसिद्ध आत्मा आहे."–छां.५.१२.१.–इत्यादि व्यस्तोपासन श्रुत आहे. [–वैश्वानराधिकरणांत–अ.१पृ.४४६–व्याख्यान केलेल्या वाक्याला अनुसरून '**तथा०**' इत्यादि भाष्यानें समस्तोपासना दाखवितात–]=त्याचप्रमाणें "त्याच या आत्म्याचा वैश्वानराचा मूर्धाच सुतेजा–द्युलोक

चक्षु विश्वरूप–सूर्य, प्राण वायु, देहमध्यभाग आकाश, बस्तिच रयि व पृथिवीच दोन पाय आहेत."–छां.५.१८.२.–इत्यादि समस्त उपासनाहि श्रुत आहे. [–या दोन प्रकारच्या उपासनेला विशद करून दोन्ही ठिकाणीं विधिश्रुति व फलश्रुति असल्यामुळें आणि एकवाक्यत्वाचाहि संभव असल्यामुळें ' तत्र० ' इत्यादि भाष्यानें संशय–]

**भाष्यं—तत्र संशयः–किमिह उभयथाप्युपासनं स्याद्व्यस्तस्य समस्तस्य च । उत समस्तस्यैवेति । किं तावत्प्राप्तम् । प्रत्यवयवं सुतेजःप्रभृतिषु उपास्स इति क्रियापदश्रवणात् ' तस्मात्तव सुतं प्रसुतमासुतं कुले दृश्यते ' इत्यादि-फलभेदश्रवणाच्च व्यस्तान्यप्युपासनानि स्युरिति प्राप्तम् ॥**

**भाष्यार्थ**—त्याविषयीं 'काय, येथें–या वैश्वानरवाक्यांत व्यस्ताचें व समस्ताचें, असें दोन्ही प्रकारें उपासन आहे कीं एक समस्त वैश्वानराचेंच,' असा संशय येतो. ['एकवाक्यतेच्या लाभानें समस्तच वैश्वानराची उपासना' अशा उक्तीनें वाक्यार्थ-ज्ञानाच्या हेतूचेंच येथेंहि चिंतन केलेलें असल्यामुळें याच्या पादादिसंगति आहेत. पूर्वपक्षांत ' वाक्यभेद ' व सिद्धान्तांत ' त्याचें ऐक्य ' असा फलभेद स्वीकारून पूर्वपक्षाच्या अर्थाचा विमर्श ' **किमिह०** ' इत्यादि भाष्यानें करितात–] =मग त्या दोन पक्षांतील कोणता पक्ष प्राप्त झाला? [–उद्गीथादि-श्रुतीनें संनिधीचा बाध करून उद्गीथादि-उपासनांचा सर्व शाखांमध्यें उपसंहार जसा सांगितला आहे त्याप्रमाणें येथेंहि व्यस्त उपासनेचा विधि व फल यांचें श्रवण असल्यामुळें समस्त-उपाधिसंनिधीनें प्राप्त झालेल्या स्तुत्यर्थत्वाचा बाध करून व्यस्तोपासनेला विधेयत्व आहे, असा पूर्वपक्ष '**प्रत्यवयवं०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=सुतेजः-प्रभृति अवयवांतील प्रत्येक अवयवामध्यें ' उपास्से '–तूं उपासितोस, असें क्रिया-पदाचें श्रवण असल्यामुळें व 'म्हणून तुझ्या कुलांत सुत, प्रसुत, आसुत दिसतें ' –छां. ५. १२. १.–असें फलभेदाचें श्रवण असल्यामुळें हीं व्यस्त–प्रत्येक अव-यवाचीं भिन्न भिन्न उपासनें आहेत, असें प्राप्त झालें. [ ' सुत ' म्ह० अभिषवाच्या –कंडनाच्या कर्मत्वास प्राप्त झालेलें सोमरूप, प्रसुत व आसुत हें अवस्थाविशे-षाच्या अपेक्षेनें त्याचेंच विशेषण आहे. तुझ्या कुलांत सोमयागकरणसंपत्ति दिसते, असा भावार्थ. 'आत्म्याचें वैश्वानराचें' इत्यादि वाक्य व प्रकरण यांनीं समस्त उपासनेच्या अंगत्वानें त्यांत व्यस्तोपासनांचा अन्तर्भाव जरी होत असला तरी ' **अन्न खातो,** प्रिय पाहतो ' इत्यादि वाक्यानें प्रत्येक अवयवांत विधि व फल **यांचें श्रवण अस-**ल्यामुळें स्वातंत्र्यानेंहि व्यस्तोपासनांचें विधान कल्पिणें उचित **आहे. म्हणून** वैश्वानराची उपासना दोन्ही प्रकारें करावी. यास्तव हीं सर्व भिन्न **भिन्नच वाक्यें**

आहेत, असा भावार्थ.–सिद्धान्तसूत्राला अवतरण देऊन 'भूम्नः ज्यायस्त्वं' या प्रतिज्ञेचें 'ततः०' इत्यादि भाष्यानें व्याख्यान–]

**भाष्यं—ततोऽभिधीयते–भूम्नः पदार्थोपचयात्मकस्य समस्तस्य वैश्वानरोपासनस्य ज्यायस्त्वं प्राधान्येन अस्मिन्वाक्ये विवक्षितं भवितुमर्हति। न प्रत्येकमवयवोपासनानामपि। क्रतुवत्। यथा क्रतुषु दर्शपूर्णमासप्रभृतिषु सामस्त्येन सांगप्रधानप्रयोग एवैको विवक्ष्यते। न व्यस्तानामपि प्रयोगः प्रयाजादीनाम्। नाप्येकदेशांगयुक्तस्य प्रधानस्य। तद्वत्॥**

**भाष्यार्थ**—असा पूर्वपक्ष प्राप्त झाल्यामुळें आतां सिद्धान्त सांगितला जातो– 'भूम्नः'–पदार्थोपचयरूप समस्त वैश्वानरोपासनेचें 'ज्यायस्त्व'–श्रेष्ठत्व या वाक्यांत प्राधान्यानें विवक्षित असणें युक्त आहे.[–"मग समस्तोपासनेप्रमाणें व्यस्तोपासनाहि येथें विवक्षित आहे, असें मानावें" '**न प्रत्येकं**०' इत्यादि भाष्यानें उत्तर–]=प्रत्येक अवयवाच्या उपासनांचेंहि श्रेष्ठत्व येथें प्राधान्यानें विवक्षित असणें युक्त नाहीं. [–त्याविषयीं सूत्रांतील दृष्टान्त घेऊन त्याचें व्याख्यान करितात–] ='**क्रतुवत्**०'–क्रतूप्रमाणें, ज्याप्रमाणें दर्श-पूर्णमासप्रभृति क्रतूंमध्यें सामस्त्यानें –समस्तत्वानें एक सांग प्रधानप्रयोगच विवक्षित आहे, व्यस्त प्रयाजादिकांचाहि प्रयोग विवक्षित नाहीं, ['सामस्त्येन' ही औत्सर्गिक उक्ति आहे, तें नित्यत्व कथन आहे.–"प्रयाजादिकांतील प्रत्येकाचा प्रयोग जरी होत नसला तरी किंचित् गुणवान्–कांहीं गुणांनीं युक्त असलेल्याहि नित्यादिकांचा प्रयोग होतो," अशी आशंका घेऊन 'पण काम्य कर्मांमध्यें तो होत नाहीं' असें '**नापि**०' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=एकदेशांगानें युक्त असलेल्याहि प्रधानाचा प्रयोग विवक्षित नाहीं, [–सर्वांगांनीं युक्त अशा काम्य क्रतूला जसें इष्टत्व आहे त्याप्रमाणें समस्तच वैश्वानरोपासनेलाहि प्राधान्यानें इष्टत्व आहे, असें '**तद्वत्**०' या पदानें सांगतात–] =त्याप्रमाणें समस्त वैश्वानरोपासनाच प्राधान्यानें विवक्षित आहे. अंगोपासना किंवा एकदेशांगयुक्त प्रधानोपासना विवक्षित नाहीं. [–'**कुतः एतत्**०' इत्यादि भाष्यानें प्रश्नपूर्वक हेतूचेंच व्याख्यान–]

**भाष्यं—कुतः एतत् भूमैव ज्यायानिति। तथा हि श्रुतिः भूम्नो ज्यायस्त्वं दर्शयति। एकवाक्यतावगमात्। एकं हीदं वाक्यं वैश्वानरविद्याविषयं पौर्वापर्यालोचनात्प्रतीयते॥**

**भाष्यार्थ**—हें कशावरून ज्ञात होतें! कारण भूमाच ज्यायान्–श्रेष्ठ आहे, त्यावरून. कारण श्रुति तसें भूमाचें ज्यायस्त्व दाखविते. [–"अहोपण, श्रुतीनें

त्याचें साक्षात् ज्यायस्त्व सांगितलेलें कोठें उपलब्ध होत नाहीं. " अशी आशंका घेऊन ' **एकवाक्यता०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=कारण एकवाक्यतेचा अवगम–बोध होतो. [–' **एकं हि०** ' इत्यादि भाष्यानें वाक्य व प्रकरण या दोन प्रमाणांनीं एकवाक्यत्व साधितात–]=कारण ग्रंथाच्या पूर्व व अपर भावांचा विचार केला असतां–पूर्वापरसंदर्भाचें आलोचन केल्यानें हें वैश्वानरविद्याविषय वाक्य एक आहे, असा प्रत्यय येतो. [–विहित असलेल्याहि व्यस्त उपासनांचा समस्तोपासनेमध्यें अन्तर्भाव होत असल्यामुळें पृथक् कार्यत्व–पृथक् अनुष्ठेयत्व नाहीं, असें मानून ' **तथा हि०** ' इत्यादि भाष्यानें आचार्य म्हणतात–]

**भाष्यं—तथाहि–प्राचीनशालप्रभृतय उद्दालकावसानाः षडृषयो वैश्वानरविद्यायां परिनिष्ठां अप्रतिपद्यमाना अश्वपतिं कैकेयं राजानमभ्याजग्मुरित्युपक्रम्य । एकैकस्यर्षेः उपास्यं द्युप्रभृतीनामेकैकं श्रावयित्वा 'मूर्धा त्वेष आत्मन इति होवाच ' इत्यादिना मूर्धादिभावं तेषां विदधाति । मूर्धा ते व्यपतिष्यद्यन्मां नागमिष्यः ' इत्यादिना च व्यस्तोपासनमपवदति ॥**

**भाष्यार्थ**––पौर्वापर्यालोचनानें हें वाक्य एक आहे, हें कसें अवगत होतें तें पहा–प्राचीनशालापासून उद्दालकापर्यंत सहा ऋषी वैश्वानरविद्येमध्यें परिनिष्ठेस प्राप्त न होणारे, असे होत्साते ' अश्वपति ' या नांवाच्या कैकेयराजापाशीं जिज्ञासु होऊन आले, असा उपक्रम करून त्यांतील एकेका ऋषीचें द्युप्रभृति अंगांतील एकेक अंग हें उपास्य ऐकवून ' पण हा त्या वैश्वानर आत्म्याचा मूर्धा आहे' असें राजा म्हणाला, इत्यादि वाक्यानें कैकेयराजा त्यांच्या मूर्धादिभावाचें विधान करितो. [–आणि व्यस्तोपासनेची अपवादश्रुति असल्यामुळें समस्तोपासनेलाच ज्यायस्त्व आहे, असें ' **मूर्धा ते०** ' इत्यादि वाक्यानें सांगतात–]=आणि " तूं माझ्यापाशीं जर आला नसतास तर तुझा मूर्धा–मस्तक गळून पडलें असतें" इत्यादि वचनानें राजा व्यस्तोपासनेचा अपवाद––निषेध करितो, व्यस्तोपासनेंत प्रत्यवायप्राप्तिरूप दोष सांगतो. [–" अहोपण, समस्तोपासनेंत कांहीं फल नसल्यामुळें तिला ज्यायस्त्व नाहीं " अशी आशंका घेऊन ' **पुनश्च०**' इत्यादि भाष्यानें निरसन–]

**भाष्यं––पुनश्च व्यस्तोपासनं व्यावर्त्य समस्तोपासनमेवानुवर्त्य ' स सर्वेषु लोकेषु सर्वेषु भूतेषु सर्वेष्वात्मस्वन्नमत्ति ' इति भूमाश्रयमेव फलं दर्शयति । यत्तु प्रत्येकं सुतेजःप्रभृतिषु फलभेदश्रवणं । तदेवं सति अंगफलानि प्रधान एवाभ्युपगतानीति द्रष्टव्यम् । तथा 'उपास्से ' इत्यपि प्रत्ययवमाख्यातश्रवणं परा-**

**भिप्रायानुवादार्थं । न व्यस्तोपासनविधानार्थम् । तस्मात्समस्तोपासनपक्ष एव श्रेयानिति ॥**

**भाष्यार्थ**--आणि पुनरपि व्यस्तोपासनेची व्यावृत्ति करून, समस्तोपासनेलाच अनुवृत्त करून " तो सर्व लोकांमध्यें, सर्व भूतांमध्यें व सर्व आत्म्यांमध्यें अन्न खातो "–छां. ५. १८. १.–असें भूमाश्रयच फल राजा दाखवितो. [–" अहो-पण, व्यस्तोपासनेमध्येंहि फलश्रवण आहे, असें आम्हीं वर-पृ. ४७२–म्हटलें आहे, " याचें '**यत्तु०**' इत्यादि भाष्यानें अनुवादपूर्वक निरसन–]=पण सुतेजः-प्रभृति अंगांतील प्रत्येक अंगांत जें फलभेदश्रवण आहे [ प्रकरण व वाक्य या दोन प्रामाणांनीं व्यस्तोपासनांचें समस्तोपासनान्तर्भावानें प्रयाज-दर्शपूर्णमासा-प्रमाणें एकप्रयोगत्व सिद्ध झालें असतां अर्थवादांतील प्रधान-तदंगफलांच्या एकी-करणानें समस्तोपासनाच ज्यायसी–श्रेष्ठ आहे, असें '**तदेवं सति०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=तें असें झालें असतां–व्यस्तोपासनांचें एकप्रयोगत्व सिद्ध झालें असतां अंगफलें प्रधानांतच स्वीकारलेलीं आहेत–त्यांचा त्यांतच अन्तर्भाव झाला आहे–त्यांचें त्याच्या फलाशींच एकीकरण झालें आहे, असें जाणावें. [–" अहोपण, प्रत्येक अवयवामध्यें उपासनाविधिश्रुति आहे. त्यामुळें त्यांतील व्यस्तोपासना प्रतीत होते, असें वाद्यानें म्हटलें आहे " अशी आशंका घेऊन '**तथा०**' इत्यादि भाष्यानें म्हणतात–]=त्याचप्रमाणें प्रत्येक अवयवामध्यें 'उपास्से' –तूं उपासितोस, असें जें आख्यातश्रवण–क्रियापदाचें श्रवण आहे तेंहि दुस-ऱ्यांच्या–प्राचीनशालादिकांच्या अभिप्रायाचा अनुवाद करण्यासाठीं आहे. व्यस्तो-पासनांचें विधान सांगण्यासाठीं नाहीं. [ औपमन्यवप्रभृति ऋषींना अवगत–ज्ञात झालेल्या रूपाच्या अनुवादानें समस्तोपासनाच येथें विधित्सित–विधान करण्यास अभिप्रेत आहे, असा भावार्थ.–'**तस्मात्०**' इत्यादि भाष्यानें स्वपक्षाचा उप-संहार–]=म्हणून समस्तोपासनापक्षच श्रेष्ठ आहे, असें सिद्ध झालें. [–'**केचित्तु०**' इत्यादि भाष्यानें एकदेशिमताचा अनुवाद करून त्याला दूषित करितात–]

**भाष्यं**—**केचित्त्वत्र समस्तोपासनपक्षं ज्यायांसं प्रतिष्ठाप्य । ज्यायस्त्ववच-नादेव किल व्यस्तोपासनपक्षमपि सूत्रकारोऽनुमन्यत इति कथयन्ति । तदयु-क्तम् । एकवाक्यतावगतौ सत्यां वाक्यभेदकल्पनस्यान्याय्यत्वात् । 'मूर्धा ते व्यपतिष्यत्' इति चैवमादिर्निंदावचनविरोधात् । स्पष्टे चोपसंहारस्थे सम-स्तोपासनावगमे तदभावस्य पूर्वपक्षे वक्तुमशक्यत्वात् । सौत्रस्य च ज्यायस्त्व-वचनस्य प्रमाणवत्त्वाभिप्रायेणाप्युपपद्यमानत्वात् ॥ ५७ ॥ ( ३२ )**

**भाष्यार्थ**—पण कित्येक वेदान्तैकदेशी व्याख्याकार "या अधिकरणांत समस्तोपासनपक्ष श्रेष्ठ आहे, असें प्रस्थापित करून सूत्रकार 'ज्यायस्त्व' या वचनानेंच-सूत्रांत 'ज्यायस्त्व' हा शब्द योजूनच 'किल'–इच्छा नसतांनाहि व्यस्तोपासनपक्षालाहि अनुमोदन देतात," असें सांगतात. पण तें अयुक्त आहे. कारण एकवाक्यता अवगत झाली असतां वाक्यभेदाची कल्पना करणें अन्याय आहे. [–"एकवाक्यतेचा भंग करून वाक्यभेद करून व्यस्तोपासनांचेंच पृथक् विधान केलें जावो" अशी आशंका घेऊन '**मूर्धा०**' इत्यादि म्हणतात–] =आणि 'तुझा मूर्धा पडला असता' या अशा प्रकारच्या निर्देशींहि विरोध येतो. त्यामुळें हें एकदेशी व्याख्यान युक्त नाहीं. [ आणि दोन्ही प्रकारची उपासना हा जर या अधिकरणाचा सिद्धान्त आहे तर केवळ व्यस्तोपासना हा येथील पूर्वपक्ष आहे कीं केवल समस्तोपासना हा पूर्वपक्ष आहे ? यांतील पहिला कल्प संभवत नाहीं, असें '**स्पष्टे च०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=आणि उपसंहारांतील समस्त उपासनेचा बोध स्पष्ट होत असतांना पूर्वपक्षामध्यें त्याचा अभाव सांगणें अशक्य आहे.' [ द्वितीय कल्प तुझ्यापक्षीं अयोग्य आहे. कारण वाक्याच्या उपक्रमांतील व्यस्तोपासनाज्ञानाशीं विरोध येतो. 'समस्तोपासनेच्या विधीसाठीं वाद्याच्या अभिप्रायाचा तो अनुवाद आहे, असें म्हटल्यास सिद्धान्ताहून त्यांत कांहीं विशेष नाहीं, असें होतें, असा भावार्थ.–"तर मग 'समस्तोपासनाच करावी, व्यस्तोपासना करूं नये' या पक्षीं सूत्रांतील 'ज्यायस्त्व' हें पद कशाच्या अपेक्षेनें आहे ?" '**सौत्रस्य०**' इत्यादि भाष्यानें उत्तर–]=आणि सूत्रांतील 'ज्यायस्त्व' या वचनाची प्रमाणवत्त्वाच्या अभिप्रायानेंहि उपपत्ति लागत असल्यामुळें समस्तोपासनाच करावी. [समस्तोपासनेला प्रमाणवत्त्व आहे. ती प्रमाणशून्य नाहीं, तर प्रमाणानें युक्त आहे, अशा कथनानें व्यस्तोपासनेला वाक्यतात्पर्यविषयत्व नाहीं, व्यस्तोपासना वाक्यतात्पर्याचा विषय होत नाहीं, म्हणून तिला अप्रामाणिकत्व आहे, असें द्योतित करण्यासाठीं सूत्रांत भूमाचें ज्यायस्त्व सांगितलें आहे. यास्तव समस्तोपासनाच करावी, अशी एकवाक्यता सिद्ध होते, असा भावार्थ.–सु. ब्र. ३७७-७८. ] ५७ (३२)

## ( ३३. शब्दादिभेदाधिकरण. सू. ५८. )

—"ज्यांच्या श्रुति भिन्न आहेत अशाहि सुतेजस्त्वप्रभृतीचें समस्तोपासन जर 'ज्यायः'–श्रेष्ठ असेल, तर ज्यांच्या श्रुति भिन्न आहेत अशा सर्व उपासनांचेंहि

समस्तोपासन श्रेष्ठ असेल " अशी आशंका घेऊन '**नाना०**' इत्यादि सूत्रानें सिद्धान्त सांगतात—

**सूत्रं—नाना शब्दादिभेदात् ॥ ५८ ॥ (३३)**

**सूत्रार्थ**—सगुणब्रह्मविषय शांडिल्यादिविद्या 'नाना'–भिन्न आहेत. 'शब्दादि-भेदामुळें '–' वेद, उपासीत, क्रतुं कुर्वीत, ' इत्यादि शब्दांच्या भेदामुळें व ' आदि-'शब्दानें उपास्यगुणांच्या भेदामुळें. ५८. (३३)–सु.ब्र. ३७९–[–दहर-विद्यादि ब्रह्मोपासनें व प्राणोपासनें वेद्याच्या अभावामुळें अभिन्न आहेत कीं शब्दादि-भेदामुळें भिन्न आहेत, असा संदेह आला असतां '**पूर्वस्मिन्०**' इत्यादि भाष्यानें पूर्वन्यायानें पूर्वपक्ष करितात–]

**भाष्यं—पूर्वस्मिन्नधिकरणे सत्यामपि सुतेजःप्रभृतीनां फलभेदश्रुतौ समस्योपासनं ज्याय इत्युक्तम् । अतः प्राप्ता बुद्धिः अन्यान्यपि भिन्नश्रुतीन्युपासनानि समस्योपासिष्यन्त इति । अपि च नैव वेद्याभेदे विद्याभेदो विज्ञातुं शक्यते । वेद्यं हि रूपं विद्यायाः । द्रव्यदैवतमिव यागस्य ॥**

**भाष्यार्थ**—पूर्वीच्या अधिकरणांत सुतेजःप्रभृतींची फलभेदश्रुति विद्यमान असतांनाहि समस्तोपासन श्रेष्ठ आहे, असें सांगितलें. यास्तव ज्यांच्या श्रुति भिन्न आहेत अशीं दुसरींहि उपासनें समास–संघात करून उपासिलीं जातील–त्यांचीहि समस्तोपासना केली जाईल, अशी बुद्धि प्राप्त होते. [–शांडिल्यविद्यादिकांच्या अभेदाविषयीं हेत्वंतर सांगतात-]='**अपि च०**'–शिवाय वेद्याचा अभेद असतांना विद्यांचा भेद आहे, असें विशेषतः ज्ञात होणें शक्य नाहीं.[–त्याविषयीं सदृष्टान्त हेतु–] ='**वेद्यं हि०**'–कारण यागाचें द्रव्य व देवता हें जसें रूप असतें तसें विद्येचें वेद्य हें रूप आहे. [–" अहोपण, श्रुतींमध्यें ठिकठिकाणीं सत्यसंकल्पादिगुण-विशिष्ट ब्रह्माचा भेद असल्यामुळें वेद्याचा अभेदहि नाहीं," अशी आशंका घेऊन वादी ' ब्रह्म सिद्ध असल्यामुळें, ब्रह्मोपाधींत त्याच्या गुणांचेंहि व्यवस्थापन असल्यामुळें–तदुपाधींत त्याचे गुणहि नियत असल्यामुळें वेद्याचें ऐक्य युक्त आहे,' असें '**वेद्यश्च०**' इत्यादि भाष्यानें सांगतो–]

**भाष्यं—वेद्यश्चैक एवेश्वरः श्रुतिनानात्वेऽप्यवगम्यते 'मनोमयः प्राणशरीरः' ' कं ब्रह्म खं ब्रह्म ' ' सत्यकामः सत्यसंकल्पः ' इत्येवमादिषु । तथा 'एक एव प्राणः ' ' प्राणो वाव संवर्गः ' ' प्राणो वाव ज्येष्ठश्च श्रेष्ठश्च ' ' प्राणो ह पिता प्राणो माता ' इत्येवमादिषु ॥**

**भाष्यार्थ**—आणि 'मनोमय प्राणशरीर'–छां. ४. १४. २.–'सुख ब्रह्म, आकाश ब्रह्म'–छां. ४. १०. ५–'सत्यकाम सत्यसंकल्प'–छां.८.१.५.–या व अशाच दुसऱ्याहि वचनांत श्रुतिनानात्व जरी असलें तरी वेद्य एकच ईश्वर अवगत होतो. [ 'श्रुतिनानात्वेऽपि'–ध्यान करण्यास योग्य–सर्वत: ध्येय, अशा गुणांच्या श्रुतींचा भेद जरी असला तरी, असा याचा भावार्थ.–"पण ब्रह्मोपासनांमध्यें असा वेद्याचा अभेद जरी असला तरी अब्रह्मोपासनांमध्यें तो कसा आहे ?" '**तथा०**' इत्यादि भाष्यानें उत्तर–]=त्याचप्रमाणें 'एकच प्राण आहे' 'प्राणच संवर्ग आहे'–छां. ४.३.३.–'प्राणच ज्येष्ठ व श्रेष्ठ आहे' 'प्राणच पिता, प्राणच माता'–छां. ७. १५.१.–इत्यादि वाक्यांमध्यें प्राणच एक वेद्य आहे. [–"त्याला जरी एकत्व असलें तरी विद्येला नानात्व–अनेकत्व कां नसेल ?" अशी आशंका घेऊन वादी 'रूपाच्या अभेदामुळें विद्यानानात्व नाहीं' असें '**वेद्यैकत्वाच्च०**' इत्यादि भाष्यानें सांगतो–]

**भाष्यं—वेद्यैकत्वाच्च विद्यैकत्वम् । श्रुतिनानात्वमप्यस्मिन्पक्षे गुणान्तरपरत्वान्नानर्थकम् । तस्मात्स्वपरशाखाविहितं एकवेद्यव्यपाश्रयं गुणजातमुपसंहर्तव्यं विद्याकार्त्स्न्यायेति ॥**

**भाष्यार्थ**—आणि वेद्याच्या एकत्वामुळें विद्येला एकत्व आहे. [–"अहोपण, विद्येला जर एकत्व असेल तर एके ठिकाणीं विहित असलेल्या तिचें अन्य ठिकाणीं विधान करणें अर्थवत् नाहीं, तें व्यर्थ आहे," '**श्रुतिनानात्वं०**' इत्यादि भाष्यानें उत्तर–]=यापक्षीं श्रुतिनानात्वहि व्यर्थ नाहीं. कारण त्याला गुणान्तरपरत्व आहे, –त्या विधानाचें तात्पर्य दुसऱ्या गुणांमध्यें आहे. [–ब्रह्मप्राप्ति या फलाचा संयोग, उपास्य ब्रह्मरूप प्रकृतार्थ व त्याची उपासना यांनीं अविच्छिन्न प्रत्ययासाठीं प्रयत्नाची चोदना–विधि आणि ब्रह्मविद्या ही समाख्या–संज्ञा, यांच्या ऐक्यामुळें विद्येचें ऐक्य आहे, असें सिद्ध झालें असतां वादी '**तस्मात्०**' इत्यादि भाष्यानें फलित सांगतो–]=म्हणून स्वशाखेंत व परकीय शाखेंत विहित असलेलें, एका वेद्याचा विशेष आश्रय करून राहणारें गुणजात विद्येच्या कार्त्स्न्यासाठीं–विद्येच्या समस्तत्वासाठीं उपसंहर्तव्य–सर्व विद्यांमध्यें उपसंहार करण्यास योग्य आहे; '**इति**'–असा पूर्वपक्ष प्राप्त झाला. [ शब्दादिभेदामुळें विद्याभेदाच्या कथनानें येथेंहि वाक्यार्थज्ञानाच्या हेतूचें चिंतन केलेलें असल्यामुळें याच्या पादादिसंगति आहेत. पूर्वपक्षांत 'पूर्वीप्रमाणेंच विद्येचें ऐक्य' व सिद्धान्तांत 'विद्येच्या ऐक्याचा असंभव असल्यामुळें विद्यानानात्व' असा फलभेद सिद्धच असल्याप्रमाणें मानून '**एवं०**' इत्यादि भाष्यानें सिद्धान्त सांगतात–]

**भाष्यं—एवं प्राप्ते प्रतिपद्यते नानेति । वेद्याभेदेऽप्येवंजातीयका विद्या भिन्ना भवितुमर्हति । कुतः । शब्दादिभेदात् । भवति हि शब्दभेदः ‘ वेद ’ ‘ उपासीत ’ ‘ स क्रतुं कुर्वीत ’ इत्येवमादिः । शब्दभेदश्च कर्मभेदहेतुः समधिगतः पुरस्तात् ‘ शब्दान्तरे कर्मभेदः कृतानुबंधत्वात् ’ इति । आदिग्रहणात् गुणादयोऽपि यथासंभवं भेदहेतवो योजयितव्याः ॥**

**भाष्यार्थ**—असा पूर्वपक्ष प्राप्त झाला असतां सूत्रकार **‘नाना०’** इत्यादि सूत्रानें सिद्धान्त स्वीकारतात. [–‘ **वेद्याभेदे०**’ इत्यादि भाष्यानें सूत्राक्षरांची योजना–]= वेद्याचा अभेद जरी असला तरी अशा जातीची विद्या भिन्नच असणें युक्त आहे. [–“ अहोपण रूपाच्या अभेदामुळें विद्येचा अभेद सांगितलेला असल्याकारणानें विद्येला नानात्व नाहीं. ” असें आक्षेपक म्हणतो–]=‘**कुतः**’–कोणत्या कारणानें ? [–सूत्रांतील हेतु घेऊन शब्दभेदाचा विभाग करितात–]=‘ **शब्दादिभेदात्** ’–शब्दादिभेदामुळें. ‘ **भवति हि०** ’–कारण शब्दभेद तर आहेच. ‘ वेद ’–जाणतो, ‘ उपासीत ’–उपासना करावी, ‘ स क्रतुं कुर्वीत ’–त्यानें क्रतु –संकल्प करावा, इत्यादि हा असा शब्दभेद आहे. [–“पण असा शब्दभेद जरी असला तरी उपासनांचा भेद नाहीं” अशी आशंका घेऊन ‘ **शब्दभेदश्च०** ’ इत्यादि म्हणतात–]=आणि शब्दभेद कर्मभेदाचा हेतु–निमित्त आहे, असें ‘ पुरस्तात् ’–पूर्वतंत्रांत–पूर्वमीमांसेंत “ शब्दान्तर असतांना कर्मभेद होतो. कारण त्याला कृतानुबंधत्व आहे. ” या सूत्रांत अवगत झालें आहे. [ भिन्न भावार्थविषय जो शब्द तें शब्दान्तर. जसें–‘ याग करितो, दान देतो, होम करितो ’ इत्यादि. तसें शब्दान्तर असलें कीं कर्मभेद होतो. ‘ कृतानुबंधत्वात्’– कारण धात्वर्थाच्या अवच्छेदांत भिन्नधात्वर्थावच्छिन्नत्वानें विधीचा भेद होतो, असा भावार्थ. पण सर्ववेदान्तप्रत्ययाधिकरणांत शब्दान्तराधिकरणाचें अनुक्रमण केलें आहे.–सूत्रांतील ‘ आदि-’पदाचें व्याख्यान–]=‘ **आदिग्रहणात्** ’–‘शब्दादि’ येथील ‘ आदि-’ग्रहणामुळें गुणादिकहि यथासंभव भेदहेतु योजण्यास योग्य आहेत. [ गुणादिकांचीहि भेदहेतुत्वानें यथासंभव योजना करावी. भाष्यांतील ‘ गुणादयः ’ येथील ‘आदि-’शब्दानें संयोग, रूप, समाख्या इत्यादिकांचें ग्रहण केलें जातें. त्या त्या–भिन्न भिन्न प्रकरणोक्त गुणजातविशिष्ट उपास्याच्या रूपाचा भेद असल्यामुळें, प्रत्येक विद्येंत फलाचा भेद असल्यामुळें, नांवाचा भेद असल्यामुळें व कौंडपायिनाप्रमाणें सर्वोपसंहाराला अशक्य-अनुष्ठेयत्व असल्यामुळें विद्येला नानात्व आहे, असा भावार्थ.–“ अहोपण, शब्दभेद जरी असला तरी

अनुबंधभेद नसल्यामुळें विद्या भिन्न नाहीं," असा 'शब्दभेद' या हेतूवर 'ननु०' इत्यादि भाष्यानें आक्षेप-]

**भाष्यं—ननु वेद इत्यादिषु शब्दभेद एवावगम्यते । न यजतीत्यादिवदर्थभेदः । सर्वेषामेवैषां मनोवृत्त्यर्थत्वाभेदात् । अर्थान्तरासंभवाच्च । तत्कथं शब्दभेदाद्विद्याभेद इति ॥**

**भाष्यार्थ—**" अहोपण, 'वेद, उपासीत' इत्यादि उदाहरणांत शब्दभेदच अवगत होतो, 'याग करितो, दान देतो' इत्यादिकांप्रमाणें अर्थभेद अवगत होत नाहीं. कारण 'वेद, उपासीत' इत्यादि या सर्वच शब्दांचें 'मनोवृत्ति' हें अर्थत्व अभिन्न आहे. [त्या सर्व शब्दांचा मनोवृत्ति हा एकच अर्थ आहे.-"पण 'वेद०' इत्यादि शब्दांचा अर्थ कोठें ज्ञान आहे, कोठें ध्यान आहे," अशा अर्थभेदाची शंका घेऊन 'पण ज्ञानाला अविधेयत्व असल्यामुळें विधान केलें जाणारें उपासन हाच त्याचा अर्थ आहे, त्या शब्दांनीं उपासनेचेंच विधान केलें जातें,' असें आक्षेपक म्हणतो-]='**अर्थान्तरासंभवाच्च**'-आणि त्यांच्या अर्थान्तराचा-दुसऱ्या ज्ञानादि-अर्थाचा असंभव असल्यामुळें मनोवृत्ति-ध्यान हाच एक अर्थ आहे. [-आक्षेपक '**तत्कथं०**' इत्यादि भाष्यानें अनुबंधभेदाच्या अभावीं फलित सांगतो-]="तेव्हां शब्दभेदामुळें विद्याभेद कसा होईल!" 'इति'-असा आक्षेप येतो. [-याग-दान-होम इत्यादि क्रियांना क्रियात्व जरी समान असलें तरी त्यांचा अवान्तर भेद जसा असतो त्याप्रमाणें 'वेद, उपासीत' इत्यादि शब्दांना मनोवृत्तित्व जरी समान असलें तरी त्या त्या प्रकरणांत उत्पत्तिशिष्ट तत्तद्गुणविशिष्ट वेद्यरूपाचा अभेद असल्यामुळें उपासनानुबंध भेद पावतो, असें '**नैष दोषः०**' इत्यादि भाष्यानें म्हणतात-]

**भाष्यं—नैष दोषः । मनोवृत्त्यर्थत्वाभेदेऽप्यनुबंधभेदाद्वेद्यभेदे सति विद्याभेदोपपत्तेः । एकस्यापीश्वरस्योपास्यस्य प्रतिप्रकरणं व्यावृत्ता गुणाः शिष्यन्ते । तथैकस्यापि प्राणस्य तत्र तत्रोपास्यस्य अभेदेऽप्यन्यादृग्गुणोऽन्यत्रोपासितव्योऽन्यादृग्गुणश्चान्यत्रेति । एवमनुबंधभेदाद्वेद्यभेदे सति विद्याभेदो विज्ञायते ॥**

**भाष्यार्थ—**हा दोष येत नाहीं. कारण 'मनोवृत्ति' या अर्थत्वाचा अभेद जरी असला-मनोवृत्ति हा त्या शब्दांचा अर्थ जरी अविशिष्ट असला तरी अनुबंध-भेदामुळें वेद्याचा भेद झाला असतां विद्याभेदाची उपपत्ति लागते-विद्येचा भेद संभवतो. [-" पण ब्रह्मोपाधींत गुणहि व्यवस्थित आहेत. त्यामुळें अनुबंध-भेद नाहीं." अशी आशंका घेऊन 'उपासनावाक्यांना वस्तुनिष्ठत्व नाहीं-तीं ब्रह्मस्वरूपनिष्ठ नाहींत. तर त्या त्या फलासाठीं कचित् कांहीं गुणानें विशिष्ट

अशा ब्रह्माच्या उपासनेचा विधि आहे. त्यामुळें अनुबंधभेद होतो, अशा अभिप्रायानें '**एकस्यापि०**' इत्यादि भाष्यानें म्हणतात-]=उपास्य असलेल्या एकाहि ईश्वराचे गुण प्रत्येक प्रकरणांत पृथक् सांगितले जातात. [-ब्रह्मामध्यें सांगितलेला न्याय प्राणामध्यें दाखवितात-]='**तथा०**'-त्याचप्रमाणें ठिकठिकाणीं उपास्य असलेल्या एकाहि प्राणाचा अभेद जरी असला तरी अन्य प्रकारच्या गुणांनीं युक्त असलेला प्राण अन्यत्र उपास्य आहे, अन्यप्रकारच्या गुणांनीं युक्त असलेला तो अन्यत्र उपासनीय आहे, असा [-प्रत्येक प्रकरणांत गुणभेदकथन सिद्ध झालें असतां त्याचें फलित-]='**एवं**'-या प्रकारें अनुबंधभेद असल्यामुळें विधिभेद झाला असतां विद्याभेद विज्ञात होतो. [-पण आतां 'श्रुतींचें नानात्व गुणान्तरपर आहे, असें जें वाद्याचें म्हणणें आहे त्याला '**न चात्रैक:०**'इत्यादि भाष्यानें दूषित करितात-]

**भाष्यं—न चात्रैको विद्याविधिरितरे गुणविधय इति शक्यं वक्तुम् । विनिगमनायां हेत्वभावात् । अनेकत्वाच्च प्रतिप्रकरणं गुणानां प्राप्तविद्यानुवादेन विधानानुपपत्तेः । न चास्मिन्पक्षे समानाः सन्तः सत्यकामादयो गुणा असकृच्छ्रावयितव्याः । प्रतिप्रकरणं च इदंकामेनेदमुपासितव्यं । इदंकामेन चेदं । इति नैराकांक्ष्यावगमान्नैकवाक्यतापत्तिः ॥**

**भाष्यार्थ**—आणि येथें एक विद्याविधि आहे व इतर गुणविधि आहेत, असें सांगणें शक्य नाहीं. कारण तशा विनिगमनेविषयीं-तशा व्यवस्थेविषयीं कांहीं कारण नाहीं. [-किंवा गुणान्तरविधिपरत्वपक्षीं अप्राप्त अनेक गुणपरत्वानें वाक्यभेद होत असल्यामुळें ही व्यवस्था युक्त नाहीं, असें दोषान्तर '**अनेकत्वाच्च०**' इत्यादि भाष्यानें सांगतात-]=आणि प्रत्येक प्रकरणांतील गुणांना अनेकत्व असल्यामुळें प्राप्तविद्येच्या अनुवादानें त्यांच्या विधानाची अनुपपत्ति आहे. [विद्येचें ऐक्य असतांना एकत्र सांगितलेल्या गुणांची अन्यत्र उक्ति अयुक्त आहे. कारण तिच्यावर पुनरुक्ति दोष येतो. पण विद्याभेद असतांना तसें होत नाहीं. कारण त्या विद्यान्तराच्याहि तद्गुणत्वासाठीं-त्या दुसऱ्या विद्येतहि त्या गुणांची प्राप्ति होण्यासाठीं पुनरुक्ति संभवते. त्यामुळेंहि विद्यानानात्व आहे, असें '**न चास्मिन्पक्षे०**' इत्यादि भाष्यानें सांगतात-]=आणि या पक्षीं समान असलेले सत्यकामादि गुण वारंवार श्रवण करविण्यास योग्य नाहींत. [-ह्याविषयींच हेत्वंतर-]='**प्रतिप्रकरणं च०**'-आणि प्रत्येक प्रकरणांत 'ज्याला या अमुक फलाची इच्छा असेल त्यानें या अमुक उपास्याची उपासना करावी व ज्याला या दुसऱ्या अमुक फलाची इच्छा असेल त्यानें हें दुसरें अमुक उपासन करावें' अशी त्या उपासनांची निरा-

कांक्षता अवगत होत असल्यामुळें त्यांना एकवाक्यतापत्ति होत नाहीं—त्या उपासना निरपेक्ष असल्यामुळें त्यांची एकवाक्यता होत नाहीं. [ ‘ सर्वलोकांमध्यें याचा यथेष्ट संचार होतो, सर्व आत्म्यामध्यें हा अन्न खातो. या लोकांस जिंकतो’ इत्यादि फलसंयोगाचा भेद असल्यामुळें त्या उपासनांना परस्परांची आकांक्षा नाहीं. म्हणून त्यांची एकवाक्यता संभवत नाहीं. वास्तव येथें विद्यानानात्व आहे, असा भावार्थ.—पण पूर्वन्यायानें समस्त उपासनेला ज्यायस्त्व—श्रेष्ठत्व आहे, असें जें वाद्यानें म्हटलें आहे—पृ. ४७८—त्याचें ‘**न चात्र०**’ इत्यादि भाष्यानें निरसन—]

**भाष्यं—न चात्र वैश्वानरविद्यायामिव समस्तचोदनापरास्ति । यद्बलेन प्रतिप्रकरणवर्तीन्यवयवोपासनानि भूत्वैकवाक्यतामीयुः । वेद्यैकत्वनिमित्ते च विद्यैकत्वे सर्वत्र निरंकुशे प्रतिज्ञायमाने समस्तगुणोपसंहारोऽशक्यः प्रतिज्ञायेत । तस्मात्सुष्ठूच्यते नाना शब्दादिभेदादिति । स्थिते चैतस्मिन्नधिकरणे सर्ववेदान्तप्रत्ययमित्यादि द्रष्टव्यम् ॥ ५८ ॥ ( ३३ )**

**भाष्यार्थ—**आणि वैश्वानरविद्येमध्यें जशी दुसरी समस्तचोदना आहे तशी येथें—या प्रकृत शांडिल्यादि उपासनेत दुसरी समस्तचोदना—समस्त उपासनाविधि नाहीं, कीं ज्या समस्तचोदनेच्या बलानें प्रत्येक प्रकरणांत असलेलीं अवयवोपासनें होऊन तीं सर्व एकवाक्यतेस प्राप्त होतील ! [—‘ वेद्याच्या एकत्वामुळें विद्येचें एकत्व’ असें जें वाद्याचें म्हणणें आहे—पृ.४७९—त्राविषयीं आचार्य ‘**वेद्यैकत्व०**’ इत्यादि म्हणतात—]=आणि वेद्याचें एकत्व या निमित्तानें विद्येचें एकत्व आहे, अशी सर्वत्र—सर्व विद्यांमध्यें निरंकुश—निष्प्रतिबंध प्रतिज्ञा केली जाऊं लागल्यास अशक्य असलेल्या समस्त गुणोपसंहाराचीहि प्रतिज्ञा केली जाईल—ती करावी लागेल ! [ सर्व गुणांचा उपसंहार करून प्रत्यय—ध्यान—उपासन करणाऱ्या अधिकाऱ्याचाच असंभव असल्यामुळें विद्यैक्य नाहीं, असा भावार्थ.—शब्दादिभेदकृत विद्याभेदाचा उपसंहार—]=‘**तस्मात्०**’—म्हणून ‘शब्दादिभेदामुळें शांडिल्यादि विद्या नाना आहे’ असें जें सूत्रकारांनीं म्हटलें आहे तें सर्वथा निर्दोषच म्हटलें आहे. [—“ अहोपण, याप्रमाणें शब्दादिभेदामुळें विद्याभेद सिद्ध झाला असतां सर्ववेदान्तप्रत्ययाधिकरणांत—पृ.२२०—विद्येचें ऐक्य कसें सांगितलें आहे ?” ‘ **स्थिते च०**’ इत्यादि भाष्यानें उत्तर—]=आणि हें अधिकरण प्रथम—आरंभींच स्थित झालें असतां मग त्याच्या मागून ‘ सर्ववेदान्तप्रत्ययं०’—इत्यादि अधिकरण आहे, असें जाणावें. [—“शब्दादिभेदामुळें विद्याभेद सिद्ध झाला असतां सर्वशाखांतील तें तें ब्रह्मज्ञान व प्राणज्ञान भिन्नच आहे ” अशी शंका आली असतां

'सर्ववेदान्तगत ब्रह्मविज्ञान एक आहे,' असें सांगितलें आहे. यास्तव या अधिकरणाची पादाच्या आरंभींच आर्थिकी संगति आहे. पण येथें प्रसंगानें तें सांगितलें आहे, असा भावार्थ.-सु. ब्र. ३७९. ] ५८ (३३)

( ३४. **विकल्पाधिकरण. सू. ५९.**)

—विद्याभेद सांगून तिच्या अनुष्ठानाचा भेद सांगणारे सूत्रकार प्रथम अहंग्रहोपासनांचा उपासनाप्रकार '**विकल्पः०**' इत्यादि सूत्रानें सांगतात—

**सूत्रं--विकल्पोऽविशिष्टफलत्वात् ॥ ५९ ॥ (३४)**

**सूत्रार्थ**--या सर्व विद्यांचा 'विकल्पच' आहे. कारण त्यांना अविशिष्टफलत्व –समानफलत्व आहे ५९. (३४)–सु.ब्र.३८०–[–अहंग्रहोपासना, तटस्थ–प्रतीक उपासना व अंगाश्रित उपासना, अशा त्रिविध उपासनांतील अहंग्रहोपासनांना विषय करून याथाकाम्य व विकल्प यांत विद्यानानात्वाला साम्य असल्यामुळें–यांत विद्येचें नानात्व समान असल्यामुळें अधिकरणसंगतिगर्भ संशय '**स्थिते विद्याभेदे०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]

**भाष्यं—स्थिते विद्याभेदे विचार्यते- किमासामिच्छया समुच्चयो विकल्पो वा स्यात् । अथवा विकल्प एव नियमेनेति । तत्र स्थितत्वात्तावद्विद्याभेदस्य न समुच्चयनियमे किंचित्कारणमस्ति । ननु भिन्नानामप्यग्निहोत्रदर्शपूर्णमासादीनां समुच्चयनियमो दृश्यते ॥**

**भाष्यार्थ**--याप्रमाणें विद्याभेद स्थित–सिद्ध झाला असतां या विद्यांचा उपासकाच्या इच्छेनें समुच्चय आहे कीं विकल्प, किंवा त्यांचा नियमानें विकल्पच आहे, याचा विचार केला जातो. [ –अहंग्रहोपासनांच्या विकल्पानें अनुष्ठानाचें कथन करून येथें वाक्यार्थज्ञानहेतूचेंच कथन केलेलें असल्यामुळें याच्या पादादिसंगति आहेत. पूर्वपक्षांत 'स्वेच्छेनें प्रवृत्ति होत असल्यामुळें अनुष्ठानाचा अनियम' व सिद्धान्तांत 'व्रीह्यादिकांप्रमाणें त्याचा नियम' असा फलभेद मानून 'याथाकाम्यानें अनुष्ठान' असा पूर्वपक्ष करणारा वादी प्रथम समुच्चयनियमाचें निरसन '**तत्र०**' इत्यादि भाष्यानें करितो–]=असा संशय–विचार प्राप्त झाला असतां अगोदर विद्येचा भेद स्थित–सिद्ध झालेला असल्यामुळें समुच्चयाच्या नियमाविषयीं कांहीं कारण नाहीं. [–"उपासनांना भिन्नत्व जरी असलें तरी समुच्चयाच्या नियमाविषयीं नियम करणें युक्त आहे. नित्य अग्निहोत्र-दर्श-पूर्णमास इत्यादिकांप्रमाणें." अशी '**ननु०**' इत्यादि भाष्यानें शंका–]="अहोपण, भिन्न असलेल्याहि अग्निहोत्र-दर्श-पूर्णमासादिकांचा

समुच्चयनियम उपलब्ध होतो. [–वादी 'पण उपासनांना काम्यत्व असल्यामुळें त्यांचा समुच्चयनियम नाहीं' असें '**नैष दोषः०**' इत्यादि भाष्यानें सांगतो–]

**भाष्यं—नैष दोषः । नित्यताश्रुतिर्हि तत्र कारणम् । नैवं विद्यानां काचिन्नित्यताश्रुतिरस्ति । तस्मान्न समुच्चयनियमः । नापि विकल्पनियमः । विद्यान्तराधिकृतस्य विद्यान्तराप्रतिषेधात् । पारिशेष्याद्याथाकाम्यमापद्यते ॥**

**भाष्यार्थ**—हा दोष येत नाहीं. कारण अग्निहोत्रादिकांच्या समुच्चयनियमाचें नित्यताश्रुति हें कारण आहे.पण तशी विद्यांची एखादिहि नित्यताश्रुति नाहीं. त्यामुळें त्यांच्या समुच्चयाचा नियम नाहीं. [–"तर मग त्यांच्या विकल्पनियमाचा आश्रय कां केला जात नाही?" '**नापि०**' इत्यादि भाष्यानें उत्तर–]=तसाच विकल्पनियमहि मानितां येत नाहीं. कारण विद्यान्तरामध्यें अधिकृत असलेल्या पुरुषाच्या विद्यान्तराचा प्रतिषेध केलेला नाहीं. [एका विद्येंत अधिकृत असलेला दुसऱ्या विद्येंत अधिकृत नसतो, असा निषेध केलेला नाहीं.–याप्रमाणें समुच्चय व विकल्प यांचा नियम अयुक्त असल्यामुळें इच्छेनें त्यांतील कोणता तरी एक पक्ष स्वीकारावा, असें वादी '**पारिशेष्यात्०**' इत्यादि भाष्यानें सांगतो–]=अर्थात् पारिशेष्यामुळें याथाकाम्य–स्वेच्छापक्ष प्राप्त होतो. [–ज्याप्रमाणें व्रीहींनींच पुरोडाश सिद्ध झाला असतां त्यांच्याशीं यवांचा समुच्चय केला जात नाहीं, कारण तसें केल्यास कृतकरणत्वाचा–केलेलेंच करण्याचा प्रसंग येतो, त्याप्रमाणें येथेंहि ब्रह्मप्राप्ति हें फल अविशिष्ट–तुल्य आहे. तें एकाच उपासनानें जर सिद्ध होत असेल तर समुच्चयाला अवकाश नाहीं, अशी '**ननु०**' इत्यादि भाष्यानें शंका–]

**भाष्यं—ननु अविशिष्टफलत्वादासां विकल्पो न्याय्यः । तथा हि–'मनोमयः प्राणशरीरः' 'कं ब्रह्म खं ब्रह्म' 'सत्यकामः सत्यसंकल्पः' इत्येवमाद्याः तुल्यवदीश्वरप्राप्तिफला लक्ष्यन्ते । नैष दोषः । समानफलेष्वपि स्वर्गादिसाधनेषु कर्मसु याथाकाम्यदर्शनात् ॥**

**भाष्यार्थ**—"अहोपण, अविशिष्टफलत्वामुळें–उपासनांचें समान फल असल्यामुळें त्यांचा विकल्प न्याय्य आहे. [–'**तथा हि०**' इत्यादि भाष्यानें अविशिष्टफलत्वच विशद करितात–]=त्यांचें तुल्यफलत्वच कसें आहे, तें पहा–'मनोमय प्राणशरीर' 'सुख ब्रह्म, आकाश ब्रह्म' 'सत्यकाम सत्यसंकल्प'–पृ.४७९––या व अशाच दुसऱ्याहि उपासना एकसारख्याच ईश्वरप्राप्ति हें ज्यांचें फल आहे, अशा प्रतीत होतात!" [–वादी 'काम्य दर्श, पूर्णमास, ज्योतिष्टोम इत्यादिकांप्रमाणें फलाच्या आधिक्याची इच्छा करणाराला त्यांचा समुच्चय प्राप्त होईल,'

असें '**नैष दोषः०**' इत्यादि भाष्यानें सांगतो-]=हा दोष येत नाहीं. कारण ज्यांचें फल समान आहे अशाहि स्वर्गादि साधनभूत कर्मांमध्यें याथाकाम्य-इच्छेनें समुच्चय प्रतीत होतो. [-'**तस्मात्०**' इत्यादि भाष्यानें विकल्पनियम व समुच्चय-नियम यांची निवृत्ति, या फलाचा उपसंहार करून सिद्धान्तसूत्राला अवतरण देऊन त्यांतील प्रतिज्ञेचा विभाग करितात-]

**भाष्यं—तस्माद्याथाकाम्यप्राप्तौ उच्यते-विकल्प एवासां भवितुमर्हति । न समुच्चयः । कस्मात् । अविशिष्टफलत्वात् । अविशिष्टं ह्यासां फलमुपास्यविषय-साक्षात्करणम् । एकेन चोपासनेन साक्षात्कृते उपास्ये विषये ईश्वरादौ द्वितीयमनर्थकम् ॥**

**भाष्यार्थ**—यास्तव याथाकाम्यपक्षाची प्राप्ति झाली असतां सिद्धान्त सांगितला जातो-या उपासनांचा विकल्पच असणें युक्त आहे. समुच्चय युक्त नाहीं. [-उक्त अर्थी प्रश्नपूर्वक सूत्रोक्त हेतु घेऊन त्याचें व्याख्यान-]='**कस्मात्०**'-कोणत्या कारणानें ? 'अविशिष्टफलत्वामुळें.'-उपास्य विषयाचें साक्षात्करण-त्यांना साक्षात् जाणणं हें या उपासनांचें अविशिष्ट-समान फल प्रसिद्ध आहे. [-" पण ध्येय विषयाच्या साक्षात्कारासाठींच समुच्चयाचा स्वीकार केल्यास त्यांत काय हानि आहे ? " '**एकेन०**' इत्यादि भाष्यानें उत्तर-]=आणि एका उपासनेनें ईश्वरादि उपास्य विषयाचा साक्षात्कार झाला असतां दुसरें उपासन अनर्थक-व्यर्थ आहे. [-समुच्चय अभीष्ट फलाला प्रतिबंध करणारा असल्यामुळें तो येथें संभवत नाहीं, असें '**अपि च०**' इत्यादि भाष्यानें सांगतात-]

**भाष्यं—अपि चासंभवः साक्षात्करणस्य समुच्चयपक्षे चित्तविक्षेप-हेतुत्वात् । साक्षात्करणसाध्यं च विद्याफलं दर्शयन्ति श्रुतयः-'यस्य स्यादद्धा न विचिकित्सास्ति' इति । 'देवो भूत्वा देवानप्येति' इति चैव-माद्याः । स्मृतयश्च " सदा तद्भावभावितः " इत्येवमाद्याः । तस्मादविशिष्ट-फलानां विद्यानामन्यतमामादाय तत्परः स्याद् यावदुपास्यविषयसाक्षात्करणेन तत्फलं प्राप्तमिति ॥ ५९॥ ( ३४ )**

**भाष्यार्थ**—शिवाय उपासनांमध्यें समुच्चयाचा असंभव आहे. कारण समुच्चय-पक्षीं साक्षात्काराला चित्तविक्षेपहेतुत्व आहे. कारण एका ध्येयाचा साक्षात्कार जरी झाला तरी दुसऱ्या ध्येयाचा न झाल्यामुळें तो उपासकाच्या चित्ताला विक्षेप करील. [-"अहोपण, उपासनेला यागादिकांप्रमाणें अदृष्टाच्या द्वारा फलाचें उपायत्व -साधनत्व असल्यामुळें उपास्याच्या साक्षात्काराची अपेक्षाच नाहीं." अशी आशंका

घेऊन 'अहंग्रहोपासनांचें साक्षात्कारसाध्य फल आहे. कारण तशी श्रुति आहे' असें **'साक्षात्करणसाध्यं०'** इत्यादि भाष्यानें सांगतात–]=आणि श्रुति विद्याफल साक्षात्कारानें साध्य होणारें आहे, असें सांगतात–" ज्या उपासकाला उपास्य साक्षात् ज्ञात झालेलें असतें व संशय नसतो."–छां. ३. १४. ४.–अशी श्रुति, त्याचप्रमाणें " देव होऊन देवांस प्राप्त होतो "–बृ. ४. १. २.–इत्यादि श्रुति साक्षात्करणसाध्य विद्याफल दाखवितात. [ज्याला उपास्याचा साक्षात्कार झालेला असून 'मला फल मिळेल कीं नाहीं' असा संशय नसतो त्याला ब्रह्मप्राप्ति होते, असा पहिल्या श्रुतिवचनाचा इत्यर्थ व देव होऊन म्ह० जिवंतपणींच साक्षात्कारानें देवभावाचा अनुभव घेऊन देह मृत झाल्यावर देवांस प्राप्त होतो, असा दुसऱ्या श्रुतिवचनाचा अर्थ आहे–]=**'स्मृतयश्च०'**–आणि " सदा तद्भावानें भावित–वासित झालेला "–भ. गी. ८. ६.–इत्यादि स्मृतिहि साक्षात्कारसाध्य विद्याफल दाखवितात. [–'अहोपण, उपासनांना अविशिष्टफलत्व जरी असलें तरी फलाधिक्याची इच्छा करणाराला समुच्चयानुष्ठान विहित आहे,' असेंहि म्हणतां येत नाहीं. कारण उपासनानुष्ठान उपास्याच्या साक्षात्काराचें निमित्त आहे व साक्षात्कार झाल्यावर त्यांत कांहीं विशेष रहात नाहीं, अशा आशयानें **'तस्मात्०'** इत्यादि भाष्यानें उपसंहार करितात–]=म्हणून ज्यांचें फल अविशिष्ट आहे अशा विद्यांतील कोणती तरी एक विद्या घेऊन उपास्य विषयाच्या साक्षात्कारानें तिचें फल प्राप्त होईपर्यंत तत्पर व्हावें, 'इति'–असें सिद्ध झालें. ५९–सु.ब्र.३८१.(३४)

## ( ३५. काम्याधिकरण. सू. ६०. )

––अहंग्रहोपासनांच्या अनुष्ठानाचा प्रकार सांगून प्रतीकोपासनांचा अनुष्ठानप्रकार **'काम्यास्तु०'** इत्यादि सूत्रानें सांगतात—

### सूत्रं–काम्यास्तु यथाकामं समुच्चीयेरन्न वा पूर्वहेत्वभावात् ॥६०॥ (३५)

**सूत्रार्थ**—पण काम्य उपासनांचा उपासकाच्या इच्छेप्रमाणें समुच्चय केला जाईल किंवा तो केला जाणार नाहीं. कारण त्यांत अविशिष्टफलत्व या पूर्वहेतूचा अभाव आहे. ६०. (३५)–सु.ब्र.३८२–[–अनहंग्रह उपासनें व अकर्मांगावबद्ध उपासनें, अर्थात् 'मन ब्रह्म आहे अशी उपासना करावी' इत्यादि, अभ्युदय हें फल देणारीं, उपासनें हा या अधिकरणाचा विषय आहे. 'त्यांत विकल्पाचा नियम आहे कीं याथाकाम्य आहे' असा, दोन्ही प्रकारांचा संभव असल्यामुळें, संशय येतो. 'पण प्रतीकोपासनांनाहि उपासनत्व असल्यामुळें अहंग्रहोपासनांप्रमाणें विकल्प-

नियम आहे, ' असें प्राप्त झालें असतां त्यांचें वैपरीत्य '**अविशिष्टफलत्वात्०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]

**भाष्यं—अविशिष्टफलत्वादित्यस्य प्रत्युदाहरणम् । यासु पुनः काम्यासु विद्यासु ' स य एतमेवं वायुं दिशां वत्सं वेद न पुत्ररोदं रोदिति ' 'स यो नाम ब्रह्मेत्युपास्ते यावन्नाम्नो गतं तत्रास्य यथाकामचारो भवति ' इति चैवमाद्यासु क्रियावददृष्टेनात्मना आत्मीयं फलं साधयन्तीषु साक्षात्करणापेक्षा नास्ति ता यथाकामं समुच्चीयेरन्न वा समुच्चीयेरन्पूर्वहेत्वभावात् । पूर्वस्याविशिष्टफलत्वादित्यस्य विकल्पहेतोरभावात् ॥ ६० ॥ ( ३५ )**

**भाष्यार्थ**—' अविशिष्ट फलत्वामुळें ' या पूर्वोक्त हेतूचें हें प्रत्युदाहरण आहे. [ येथें प्रतीकोपासनांमध्यें पूर्वसिद्धान्ताच्या वैपरीत्यानें, अनुष्ठानाच्या याथाकाम्योक्तीनें वाक्यार्थज्ञानहेतूचेंच कथन केलेलें असल्यामुळें याच्या पादादिसंगति आहेत. पूर्वपक्षामध्यें ' व्रीह्यादिकांमध्यें जशी, तशीच येथें अनुष्ठाननियमाची सिद्धि ' व सिद्धान्तांत ' फलवशात् त्याचा अनियम ' असा फलभेद स्वीकारून–'**यासु०**' इत्यादि भाष्यानें सूत्राक्षरांची योजना करितात–]=पण " तो जो कोणी या वायूला गोत्वानें कल्पिलेल्या दिशांचें वत्स जाणतो तो पुत्रमरणनिमित्त रोदनास प्राप्त होत नाहीं. " [ तर नित्य अवियुक्त-वत्सादिगुणोपासनामुळें जीवत्पुत्र होतो. असा भावार्थ. ]–छां. ३.१५.२.–" तो जो कोणी नाम ब्रह्म आहे अशी उपासना करितो त्याचा नामाच्या सर्व विषयांत यथाकाम संचार होतो."–छां.७.१.५. इत्यादि प्रकारच्या कर्माप्रमाणें अदृष्टरूपानें आपलें फल साधणाऱ्या ज्या उपासनांत साक्षात्करणाची अपेक्षा नाहीं त्या उपासनांचा आपल्या इच्छेप्रमाणें समुच्चय करावा किंवा करूं नये. [ अहंग्रहोपासनांमध्यें साक्षात्कारसाधनत्व ही उपाधि आहे, अशा आशयानें भाष्यांत ' साक्षात्करणापेक्षा नास्ति '–साक्षात्काराची ज्यांत अपेक्षा नाहीं, असें म्हटलें आहे.–त्याविषयीं हेतु–]='पूर्वहेत्वभावात्'–पूर्वहेतूच्या अभावामुळें–' अविशिष्टफलत्वात् '–समान फलत्वामुळें अशा या पूर्वीच्या –पूर्वोक्त विकल्पहेतूचा अभाव असल्यामुळें. [ ' विमत–उपासनें आपल्या इच्छेनें अनुष्ठेय आहेत. कारण त्यांना अविरुद्ध भिन्नफलत्व आहे. चित्रा-ज्योतिष्टोमादिकांप्रमाणें ' असा भावार्थ. –सु. ब्र. पृ.३८२-८३ ]. ६० ( ३५ )

**( ३६. यथाश्रयभावाधिकरण. सू. ६१-६६. )**

**—**प्रतीकोपासनांचा अनुष्ठानक्रम सांगून अंगावबद्धोपासनांच्या क्रमाचें निरूपण करणारे सूत्रकार ' **अंगेषु०** ' इत्यादि सूत्रानें पूर्वपक्ष सांगतात–

## सूत्रं--अंगेषु यथाश्रयभावः ॥ ६१

**सूत्रार्थ**--अंगावबद्ध उपासनांमध्यें यथाश्रयभाव आहे. म्ह० यज्ञांतील अंगांचें नियमानें समुच्चयानुष्ठान जसें होतें तसेंच अंगाश्रित उपासनांचें नियमानें समुच्चयानुष्ठान करावें. ६१.-सु. ब्र. ३८४.-[-अधिकरणाचा विषय सांगण्यासाठीं सूत्रांतील 'अंगेषु' या पदाचें '**कर्मांगेषु०**' इत्यादि भाष्यानें व्याख्यान-]

**भाष्यं--कर्मांगेषूद्गीथादिषु ये आश्रिताः प्रत्यया वेदत्रयविहिताः किं ते समुच्चीयेरन्किंवा यथाकामं स्युरिति संशये यथाश्रयभाव इत्याह। यथैवैषामाश्रयाः स्तोत्रादयः संभूय भवन्त्येवं प्रत्यया अपि। आश्रयतंत्रत्वात्प्रत्ययानाम्॥६१॥**

**भाष्यार्थ**--उद्गीथादि कर्मांगांमध्यें [-'ये०' इत्यादि भाष्यानें तदाश्रित उपासनें विषयत्वानें दाखवितात-]=जे वेदत्रयविहित आश्रित प्रत्यय आहेत, [-अंगद्वारा क्रतुसंबंधामुळें व फलाच्या संनिकर्षामुळें संशय येतो, असें '**किं ते०**' इत्यादि भाष्यानें सांगतात-]='त्यांचा काय, समुच्चय करावा कीं यथाकाम-इच्छेनें त्यांचें अनुष्ठान करावें ?' [तन्निर्धारणानियमाधिकरणांत-पृ.४१६-अंगोपासनांना पुरुषार्थत्व सांगितलें आहे. पण येथें-या अंगाश्रित उपासनांना पुरुषार्थत्व जरी असलें तरी त्यांच्या समुच्चयाविषयीं प्रमाण नाहीं, असें सांगितलें जातें.-अंगोपासनांना अंगांप्रमाणें समुच्चयनियम आहे कीं प्रतीकदृष्टीप्रमाणें याथाकाम्य-इच्छेनें अनुष्ठेयत्व आहे, अशा या संशयाचा अनुवाद करून पूर्वाधिकरणाप्रमाणें त्यांचें यथारुचि अनुष्ठान होत नाहीं, असा पूर्वपक्ष-]='**इति संशये०**'-असा संशय आला असतां 'यथाश्रयभावः' असें पूर्ववादी म्हणतो. [पण या अधिकरणांत अंगोपासनांमध्यें यथारुचि अनुष्ठानोक्तीनें वाक्यार्थज्ञानसाधनाचेंच चिंतन केलेलें असल्यामुळें याच्या पादादिसंगति आहेत. पूर्वपक्षांत 'समुच्चयानुष्ठानामुळें फलाधिक्याची सिद्धि' व सिद्धान्तांत 'समुच्चयाला अप्रामाणिकत्व असल्यामुळें समुच्चयानुष्ठानांत फलबाहुल्याचा असंभव, त्यामुळें यथारुचि अनुष्ठानांत प्रवृत्तिसौकर्य' असा फलभेद मानून-'**यथा०**' इत्यादि भाष्यानें पूर्वपक्षसूत्राची योजना करितात-]=ज्याप्रमाणें यांचे आश्रय स्तोत्रादिक समुच्चयानें होतात त्याचप्रमाणें प्रत्ययहि 'संभूय'-समुच्चयानें होतील. कारण प्रत्ययांना आश्रयाधीनत्व आहे. ['अंगाश्रित उपासनें क्रतूंत नियमानें समुच्चयानें अनुष्ठेय आहेत. कारण तीं नियमानें समुच्चय केल्या जाणाऱ्या अंगांचा आश्रय केलेलीं आहेत-तीं अंगाश्रित आहेत. त्यांचाच आश्रय केलेल्या उपांगांप्रमाणें,' असा भावार्थ.] ६१. [-याहि कारणानें अंगाश्रित उपासनांचें समुच्चयानें अनुष्ठान होतें, असें वादी '**शिष्टेश्च०**' या सूत्रानें सांगतो-]

## सूत्रं—शिष्टेश्च ॥ ६२

**सूत्रार्थ**—आणि विधानामुळें–आश्रयांप्रमाणें आश्रित प्रत्ययांचेंहि विधान असल्यामुळें त्यांचें समुच्चयानें अनुष्ठान होतें. ६२.–सु. ब्र. ३८४–[ शिष्टि म्ह० शासन–विधान. त्या शिष्टीचा अविशेष असल्यामुळें–अंगें व प्रत्यय यांचें विधान एकसारखेंच असल्यामुळें त्यांच्या समुच्चयाचा नियम आहे, असा भावार्थ. –'**यथा वा०**' इत्यादि भाष्यानें सूत्राक्षरापासून उत्पन्न झालेला अर्थ सांगतात–]

**भाष्यं—यथा वाश्रयाः स्तोत्रादयस्त्रिषु शिष्यन्ते एवमाश्रिता अपि प्रत्ययाः। नोपदेशकृतोऽपि कश्चिद्विशेषोऽगानां तदाश्रयाणां च प्रत्ययानामित्यर्थः ॥ ६२**

**भाष्यार्थ**—किंवा ज्याप्रमाणें स्तोत्रादि आश्रय तिन्ही वेदांमध्यें सांगितले–उपदेशिले जातात–त्यांचें विधान केलें जातें, त्याचप्रमाणें आश्रित प्रत्ययहि सांगितले जातात. [–'**न उपदेशकृतः०**' इत्यादि भाष्यानें त्याचाच तात्पर्यार्थ सांगतात–] =अंगें व त्यांचा आश्रय केलेले प्रत्यय यांचा उपदेशामुळेंहि कांहीं विशेष नाहीं, असा याचा भावार्थ. ६२. [–आणखी याहि कारणानें या उपासनांचें समुच्चयानें अनुष्ठान होईल, असें वादी '**समाहारात्०**' या सूत्रानें सांगतो–]

## सूत्रं—समाहारात् ॥ ६३

**सूत्रार्थ**—'समाहरण' म्ह० समताकरण, क्षताचें संधान, या लिंगावरूनहि प्रत्ययांचा समुच्चय अवगत होतो. ६३. सु. ब्र. ३८४. [–बह्वृचांचा जो प्रवण तो छंदोगांचा उद्गीथ, व त्यांचा जो उद्गीथ तो इतरांचा प्रणव, याप्रमाणें प्रणव व उद्गीथ यांना एकत्व असल्यामुळें उद्गात्यानें केलेलें जें उपासन त्याचें फल सांगणाऱ्या वाक्याचा अनुवाद सूत्राचें व्याख्यान करण्यासाठीं '**होतृषदनात्०**' इत्यादि भाष्यानें करितात–]

**भाष्यं—'होतृषदनाद्धैवापि दुरुद्गीतमनुसमाहरति' इति च प्रणवोद्गीथैकत्वविज्ञानमाहात्म्यादुद्गाता स्वकर्मण्युत्पन्नं क्षतं हौत्रात्कर्मणः प्रतिसमादधातीति ब्रुवन्वेदान्तरोदितस्य प्रत्ययस्य वेदान्तरोदितपदार्थसंबंधसामान्यात्सर्ववेदोदितप्रत्ययोपसंहारं चयतीति लिंगदर्शनम् ॥६३॥**

**भाष्यार्थ**—आणि 'होतृपदनात्'–"होत्याचें सदन–स्थान, होता जेथें स्थित होऊन शंसन करितो तें होतृषदन त्यावरून होत्याचें कर्म लक्षित होतें. चांगल्याप्रकारें अनुष्ठान केलेल्या त्या कर्मापासून 'दुरुद्गीतं'–उद्गात्यानें स्वर–व्यंजनादिप्रमादामुळें सदोष केलेलें जें उद्गान कर्म 'ह एव अपि'–तेंहि तो उद्गाता त्या ऐक्यविज्ञानानें 'अनुसमाहरति'–प्रतिसमाहित करितोच. वैद्य क्षताचें जसें

प्रतिसंधान करितो—त्याला भरून काढितो त्याप्रमाणें उद्गाता क्षताचें संधान करितो," असा भावार्थ.—छां. १.५.५.—असें [—'**प्रणव०**' इत्यादि भाष्यानें वादी **या वाक्याचा** अभीष्ट अर्थ सांगतो—]=प्रणव व उद्गीथ यांच्या एकत्वविज्ञानाच्या माहात्म्यानें उद्गाता आपल्या कर्मामध्यें उत्पन्न झालेलें क्षत होत्याच्या कर्मापासून प्रतिसमाहित करितो—भरून काढितो, [—' तथापि प्रकृत विषयांत त्यामुळें काय निष्पन्न झालें?' '**इति ब्रुवन्०**' इत्यादि भाष्यानें उत्तर—]=असें सांगणारा वेद दुसऱ्या वेदानें सांगितलेल्या प्रत्ययाचा वेदान्तरोदित—वेदान्तरोक्त पदार्थांशीं समान संबंध असल्यामुळें सर्व वेदोक्त प्रत्ययांचा उपसंहार सुचवितो, असें हें लिंगदर्शन आहे. [वेदद्वययुक्त प्रणव व उद्गीथ यांच्या ऐक्यज्ञानाचें असलें फल सांगणारा वेद सर्व वेदस्थ प्रत्ययांचा सर्वत्र उपसंहार—समुच्चय सुचवितो. कारण सर्व उपासनांमध्यें वेदान्तरोक्त प्रत्ययाचा वेदान्तरोक्त पदार्थांशीं असलेला जो संबंध त्याला समत्व आहे, अशी भाष्याची योजना करावी.]६३. [—उपास्य ओंकाराला साधारण्य असल्यामुळें—ध्येय ओंकार सर्ववेदसाधारण असल्यामुळें उपासनांनाहि साधारण्य आहे, त्यांचें समुच्चयानें अनुष्ठान होतें, असें हेत्वंतर '**गुणसाधारण्यश्रुतेश्च**' या सूत्रानें वादी सांगतो—]

## सूत्रं—गुणसाधारण्यश्रुतेश्च ॥ ६४

**सूत्रार्थ**—आणि ओंकाराच्या गुणसाधारण्याचें—सर्व विद्येंतील समान गुणत्वाचें श्रवण असल्यामुळें तदाश्रित उपासनांनाहि साधारण्य आहे. ६४.—सु.ब्र. ३८४—[—'**विद्यागुणं०**' इत्यादि भाष्यानें सूत्राचें व्याख्यान—]

**भाष्यं—विद्यागुणं च विद्याश्रयं सन्तमोंकारं वेदत्रयसाधारणं श्रावयति—' तेनेयं त्रयी विद्या वर्तत ओमित्याश्रावयत्योमिति शंसत्योमित्युद्गायति' इति च। ततश्चाश्रयसाधारण्यादाश्रितसाधारण्यमिति लिंगदर्शनमेव ॥**

**भाष्यार्थ**—आणि विद्यागुण म्ह० विद्याश्रय असलेल्या ओंकाराला श्रुति वेदत्रय साधारण सांगते, उद्गीथविद्येचा आश्रय करून असलेला जो ओंकार तो तिन्ही वेदांना साधारण—समान आहे असें श्रुत आहे. " त्या ओंकारानें ही त्रयी विद्या—वेदविहितकर्म प्रवृत्त होतें. 'ओं' असें म्हणूनच अध्वर्यु आश्रवण कर्म करितो. 'ओं' असा आरंभ करूनच होता शंसन कर्म करितो. 'ओं' असा आरंभ करूनच उद्गाता उद्गान करितो "—छां. १. १. ९.—असें ही श्रुति त्याचें वेदत्रयसाधारण्य सांगते. [—अन्वयमुखानें व्याख्येचा उपसंहार—]='**ततश्च०**'—आणि त्यामुळें आश्रयाच्या साधारण्यामुळें आश्रिताचें साधारण्य असें हें लिंगदर्शनच आहे. [' आश्रयसाधारण्य असतांना आश्रितसाधारण्य

असणें,' हा अन्वय आहे.–आतां त्यालाच 'आश्रयसाधारण्याच्या अभावीं आश्रित-साधारण्याचा अभाव' या स्वरूपाच्या व्यतिरेकव्याख्येनें दृढ करण्यासाठीं '**अथवा०**' इत्यादि भाष्यानें सूत्राचें ग्रहण करितात–]

**भाष्यं**––**अथवा गुणसाधारण्यश्रुतेश्चेति । यदीमे कर्मगुणा उद्गीथादयः सर्वे सर्वप्रयोगसाधारणा न स्युः न स्यात्ततस्तदाश्रयाणां प्रत्यायानां सहभावः । ते तूद्गीथादयः सर्वांगग्राहिणा प्रयोगवचनेन सर्वे सर्वप्रयोगसाधारणाः श्राव्यन्ते । ततश्चाश्रयसहभावात्प्रत्ययसहभाव इति ॥ ६४ ॥**

**भाष्यार्थ**—अथवा 'गुणसाधारण्यश्रुतेश्च' या सूत्राचें असें व्याख्यान करावें. [–'**यदीमे०**' इत्यादि भाष्यानें सूत्राची व्यतिरेकानें योजना–]=जर हे उद्गीथादि सर्व कर्मगुण सर्व प्रयोगांना साधारण–समान–एकसारखेच नसतील तर–त्यांचा आश्रय करून राहणाऱ्या प्रत्ययांचाहि सहभाव असणार नाहीं. [–'तर मग उद्गीथादिकांना साधारण्य नसो !' अशी आशंका घेऊन '**ते तु०**' इत्यादि भाष्यानें म्हणतो–]=पण ते उद्गीथादिक सर्व सर्वांगांचें ग्रहण करविणाऱ्या प्रयोगवचनाकडून सर्वप्रयोगसाधारण श्रवण करविले जातात.[–गुणासहवर्तमानच गुणी प्रत्ययाचें आगमन सुचविलें जातें, असें फलित '**ततश्च०**' इत्यादि भाष्यानें वादी सांगतो–]=आणि त्यामुळें आश्रयसहभावामुळें प्रत्ययसहभाव आहे, असा निर्णय होतो. ६४. [–ज्या उपासनेमध्यें ज्याची अभिरुचि असते तो तिचें अनुष्ठान करितो. पण सर्व उपासनांच्या समुच्चयामध्यें कांहीं प्रमाण नाहीं, असा सिद्धान्त '**न वा०**' इत्यादि सूत्रानें सांगतात–]

## सूत्रं—न वा तत्सहभावा तेः ॥ ६५

**सूत्रार्थ**—'वा'–पण 'न'–अंगांप्रमाणें अंगाश्रित उपासनांच्या समुच्चयाचा नियम नाहीं. कारण 'तत्सहभावाविषयीं श्रुति नाहीं.'–अंगांच्या सहभावाप्रमाणें उपासनांचा सहभाव श्रुत नाहीं. ६५.–सु. ब्र. ३८९–[–'**न वा०**' इत्यादि भाष्यानें सूत्रांतील 'वा-'काराचा अर्थ सांगतात–]

**भाष्यं**—**न वेति पक्षव्यावर्तनम् । न यथाश्रयभाव आश्रितानामुपासनानां भवितुमर्हति । कुतः । तत्सहभावाश्रुतेः । यथा हि त्रिवेदविहितानामंगानां स्तोत्रादीनां सहभावः श्रूयते— "ग्रहं वा गृहीत्वा चमसं वोन्नीय स्तोत्रमुपाकरोति स्तोत्रमनुशंसति प्रस्तोतः साम गाय होतरेतद्यज" इत्यादिना । नैवमुपासनानां सहभावश्रुतिरस्ति ॥**

**भाष्यार्थ**—'न ' या पदांनीं पक्षाची व्यावृत्ति केली जाते. [–'**न यथा०**' इत्यादि भाष्यानें 'नञ्' या पदाचें व्याख्यान–]=आश्रित उपासनांचा यथाश्रयभाव

असणें युक्त नाहीं. [–प्रश्नपूर्वक सूत्रांतील अवशिष्ट भाग घेऊन त्याचें व्याख्यान–]=' **कुतः०** '–कोणत्या कारणानें ? ' तत्सहभावाची अश्रुति–अश्रवण असल्यामुळें ' ' **यथा हि०** '–कारण ज्याप्रमाणें वेदत्रयविहित स्तोत्रादि अंगांचा सहभाव " ग्रहाचें–पात्रविशेषाचें ग्रहण करून किंवा चमस वर करून स्तोत्राचें उपाकरण–आरंभ करितो, स्तोत्राचें अनुशंसन करितो, हे प्रस्तोत्या, सामाचें गान कर, हे होत्या, याचा याग कर " इत्यादि वाक्यानें श्रुत आहे तशी उपासनांची सहभावश्रुति नाहीं. [–' नियमानें समुच्चय केल्या जाणाऱ्या अंगाचें आश्रयत्व असल्यामुळें ' असें सांगून अनुमानबुद्धीनें ' **ननु०** ' इत्यादि शंका–]

**भाष्यं—ननु प्रयोगवचनः एषां सहभावं प्रापयेत् । नेति ब्रूमः । पुरुषार्थत्वादुपासनानाम् । प्रयोगवचनो हि क्रत्वर्थानामुद्गीथादीनां सहभावं प्रापयेत् । उद्गीथाद्युपासनानि तु क्रत्वर्थाश्रयाण्यपि गोदोहनादिवत्पुरुषार्थानीत्यवोचाम ' पृथग्घ्यप्रतिबंधः फलम् ' इत्यत्र ॥**

**भाष्यार्थ**—" अहोपण, प्रयोगवचन–विधि यांचा सहभाव प्राप्त करून देईल!" [–'विमत–उपासनें क्रतूमध्यें समुच्चयानें अनुष्ठेय नाहींत. कारण त्यांना अंगाश्रितत्व असून भिन्नफलत्व आहे. गोदोहनादिकांप्रमाणें ' अशा आशयानें सिद्धान्ती ' **नेति ब्रूमः०** ' इत्यादि भाष्यानें म्हणतात–]=यांचें ' नाहीं ' असें आम्ही उत्तर सांगतों. कारण उपासनांना पुरुषार्थत्व आहे. [–' **प्रयोगवचनः**' इत्यादि भाष्यानें हा उक्त अर्थच व्यक्त करितात–]=कारण प्रयोगवचन–प्रयोगविधि क्रत्वर्थ असलेल्या उद्गीथादिकांचा सहभाव प्राप्त करवील. पण उद्गीथादि उपासनें क्रत्वर्थांचा आश्रय करणारीं जरी असलीं तरी तीं गोदोहनादिकांप्रमाणें पुरुषार्थ आहेत असें आम्हीं ' पृथक् हि अप्रतिबंधः फलं '–कारण अप्रतिबंध हें पृथक् फल आहे, –पृ. ४१६–या सूत्रांत सांगितलें आहे. [–आतां ' शिष्टेश्च'–उपदेशामुळें–पृ.४९० –असें जें वाद्यानें म्हटलें आहे त्याचें निरसन'**अयमेव०**' इत्यादि भाष्यानें करितात–]

**भाष्यं—अयमेव चोपदेशाश्रयो विशेषोऽगानां तदालंबनानां चोपासनानां यदेकेषां क्रत्वर्थत्वं एकेषां पुरुषार्थत्वमिति । परं च लिंगद्वयमकारणमुपासनसहभावस्य श्रुतिन्यायाभावात् ॥**

**भाष्यार्थ**—अंगें व तदाश्रित उपासनें, यांतील एकांना क्रत्वर्थत्व असणें व दुसऱ्यांना पुरुषार्थत्व असणें हाच अंगें व उपासनें यांचा उपदेशाश्रयविशेष आहे. [–' **परं च०** ' इत्यादि भाष्यानें ' समाहारात् ' व ' गुणसाधारण्यश्रुतेश्च ' या दोन सूत्रांनीं वाद्यानें सांगितलेल्या हेतूंचें निरसन–]=त्याच्या पुढें जें लिंगद्वय उक्त आहे तें उपासनाच्या सहभावाचें अकारण आहे. कारण त्याविषयीं श्रुति व न्याय

यांचा अभाव आहे. [ जें अर्थवादाचें सामर्थ्य तें अन्यतः–प्रमाणान्तरानें प्राप्त झालेल्याचें अवद्योतक आहे. येथें उपासनांच्या समुच्चयामध्यें प्रापक नाहीं, तें उपासनांच्या समुच्चयाची प्राप्ति करवीत नाहीं, असा याचा भावार्थ. ‘ गुणसाधारण्य० ’ इत्यादिकांतील व्यतिरेकव्याख्यानाचें ‘ न च० ’ इत्यादि भाष्यानें निरसन–]

**भाष्यं—न च प्रतिप्रयोगं आश्रयकार्त्स्न्योपसंहारादाश्रितानामपि तथात्वं विज्ञातुं शक्यम् । अतत्प्रयुक्तत्वादुपासनानाम् । आश्रयतंत्राण्यपि ह्युपासनानि काममाश्रयाभावे मा भूवन्न त्वाश्रयसहभावेन सहभावनियममर्हन्ति । तत्सहभावाश्रुतेरेव । तस्माद्यथाकाममेव उपासनान्यनुष्ठीयेरन् ॥ ६५ ॥**

**भाष्यार्थ**—प्रत्येक प्रयोगामध्यें आश्रयांचा संपूर्णपणें उपसंहार होत असल्यामुळें आश्रितांचाहि संपूर्णपणें उपसंहार होतो, असें जाणणें शक्य नाहीं. कारण उपासनांना अतत्प्रयुक्तत्व आहे म्ह० उपासना आश्रयाच्या उपसंहारानें प्राप्त झालेल्या नाहींत. [–“ अहोपण, उपासनांना आश्रयभाव जरी असला तरी सत्त्वाच्याच अभावीं त्यांना आश्रयतंत्रत्व कसें ? ” ‘ **आश्रयतंत्राणि०** ’ इत्यादि भाष्यानें उत्तर–]=कारण आश्रयतंत्र असलेलींहि उपासनें आश्रयाच्या अभावीं नसलीं तर खुशाल नसोत, परंतु तीं आश्रयाच्या सहभावानें सहभावनियमास पात्र होत नाहींत. कारण त्यांच्या सहभावाची अश्रुति आहे. त्यामुळेंच तीं सहभावनियमास पात्र नाहींत. [ आश्रय विद्यमान असतांनाच आश्रिताची वृत्ति–अस्तित्व असणें व तो विद्यमान नसतांना ती नसणें हेंच आश्रितांचें आश्रयतंत्रत्व आहे, आश्रयामध्यें आश्रितांची वृत्ति हेंच त्यांचें आश्रयतंत्रत्व आहे, आश्रयांत त्यांचें अवर्तन–अवृत्ति हें आश्रयतंत्रत्व नव्हे, असें नाहीं. त्यामुळें आश्रयामध्यें आश्रिताची नित्य वृत्तिच असते, अवृत्ति केव्हांहि नसते, असें म्हणतां येत नाहीं. कामांना अनित्यत्व आहे. त्यामुळें कामोपबद्ध उपासनांनाहि अनित्यत्व आहे. म्हणून त्यांच्या नित्यसंबंधाशीं विरोध येतो, अंगें व उपासना यांच्या नित्यसंयोगाचा असंभव आहे, असा भावार्थ.–याप्रमाणें अंगोपासनांचा अंगांप्रमाणें असमुच्चय सिद्ध झाला असतां प्रतीकदृष्टीप्रमाणें यथारुचि अनुष्ठानाचा उपसंहार करितात–]=‘ **तस्मात्०** ’–म्हणून यथाकामच–आपल्या इच्छेप्रमाणेंच उपासनांचें अनुष्ठान करावें. ६५. [–शिवाय विद्वान् ब्रह्माकडून अन्य ऋत्विजांना पाल्यत्व आहे, दुसरें ऋत्विज् ‘ ब्रह्मा ’ या ऋत्विजांकडून पालन केले जाण्यास योग्य आहेत, असें सांगितलेलें असल्यामुळेंहि सर्वविज्ञानांच्या उपसंहाराचें ज्ञान होत नाहीं, असें ‘ **दर्शनाच्च०** ’ या सूत्रानें सांगतात–]

## सूत्रं--दर्शनाच्च ॥ ६६ ॥ ( ३६ )

**सूत्रार्थ**—आणि 'एवंविद्र' इत्यादि श्रुतींत ' असें जाणणारा ब्रह्मा यज्ञ, यजमान, सर्व ऋत्विज यांचें रक्षण करितो ' असा अंगाश्रित उपासनांचा असमुच्चय दिसतो. त्यामुळेंहि अंगावबद्ध सर्व उपासनांचा समुच्चय ज्ञात होत नाहीं. ६६(३६) –सु. ब्र. ३८५. [–' दर्शयति च० ' इत्यादि भाष्यानें सूत्राचें व्याख्यान–]

**भाष्यं**--दर्शयति च श्रुतिरसहभावं प्रत्ययानाम्–' **एवंविद्ध वै ब्रह्मा यज्ञं यजमानं सर्वांश्चर्त्विजोऽभिरक्षति** ' इति । **सर्वप्रत्ययोपसंहारे हि सर्वे सर्वविदः इति न विज्ञानवता ब्रह्मणा परिपाल्यत्वमितरेषां संकीर्त्येत । तस्माद्यथाकाममुपासनानां समुच्चयो विकल्पो वेति** ॥ ६६ ॥

इति श्रीगोविंदभगवत्पूज्यपादशिष्यस्य श्रीमच्छंकरभगवतः कृतौ
शारीरकमीमांसाभाष्ये तृतीयाध्यायस्य तृतीयः पादः ॥

**भाष्यार्थ**—आणि " एवंविद् म्ह० ऋग्वेदादिविहित अंगांचा लोप झाला असतां व्याहृतिहोम-प्रायश्चित्तादिकांचें विज्ञान असलेलाच ब्रह्मा यज्ञ, यजमान व सर्व ऋत्विक् यांचें सर्वतः रक्षण करितो"–छां. ४. १७. १०–ही श्रुति प्रत्ययांचा असहभाव–असमुच्चय दाखविते. [–" अहोपण, ऋग्वेदादिविहित अंगाचा लोप झाला असतां व्याहृतिहोम-प्रायश्चित्तादिकांचें विज्ञान असणें हेंच ' ब्रह्मा ' या ऋत्विजाचें ' एवंवित्त्व ' अभीष्ट आहे. पण तेवढ्यावरून विवक्षित अनुपसंहार कसा सिद्ध होतो ?" ' **सर्वप्रत्यय०** ' इत्यादि भाष्यानें उत्तर–]=कारण सर्वप्रत्ययांचा उपसंहार जर इष्ट असता तर यजमान-ऋत्विजादि सर्वच सर्ववेत्ते–सर्वज्ञ असल्यामुळें विज्ञानवान् ब्रह्मा या ऋत्विजाकडून इतरांचें पाल्यत्व श्रुतीनें सांगितलें नसतें. [ पण त्या ब्रह्माकडून इतर ऋत्विजांचें पाल्यत्वकथन आहे. त्यावरून प्रत्ययांच्या अनुपसंहाराचें ज्ञान होतें, असा या भाष्याला शेष लावावा.–याप्रमाणें अनुमान व लिंग यांवरून सिद्ध झालेल्या अर्थाचा उपसंहार करितात–]=**'तस्मात्'** –म्हणून ' **यथाकामं** '–आपल्या इच्छेप्रमाणें उपासनांचा समुचय किंवा विकल्प आहे, असा निर्णय होतो. [ ' समुच्चय किंवा विकल्प ' हें ' याथाकाम्यं ' या शब्दाचें व्याख्यान आहे.–सु. ब्र. ३८५-८६ ] ६६ (३६).

इति श्रीशंकराचार्यभक्त विष्णुशर्मकृत ब्रह्मसूत्रशारीरभाष्यार्थाच्या साधनाख्य
तृतीयाध्यायाचा तिसरा सर्ववेदान्तप्रत्ययपाद समाप्त झाला.

॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

---

ॐतत्सत्

# साधनाख्यतृतीयाध्याये चतुर्थः पादः ।

( १. पुरुषार्थाधिकरण. सू. १-१७. )

—कर्मांगावबद्ध उपासनोक्तीच्या प्रसंगानें 'ब्रह्मज्ञानाला कर्माचें अंगत्व आहे,' अशी आशंका घेऊन **'पुरुषार्थः०'** इत्यादि सूत्रानें तिचा परिहार करितात—

**सूत्रं—पुरुषार्थोऽतः शब्दादिति बादरायणः ॥ १**

**सूत्रार्थ**—'अतः'—या वेदान्तविहित आत्मज्ञानापासून 'पुरुषार्थ'—मोक्ष सिद्ध होतो, असें बादरायण-आचार्य मानितो. कोणत्या कारणानें? 'आत्मवेत्ता शोकाला तरतो' इत्यादि शब्दामुळें. १.—सु. ब्र. ३८८. [ गुणोपसंहारोक्तीनें परब्रह्मविद्या व अपरब्रह्मविद्या यांच्या परिमाणाचें अवधारण करून आतां अवसर प्राप्त झाला असतां कर्मांची अपेक्षा न करणाऱ्याच त्या उपासनांच्या पुरुषार्थ-साधनत्वाचें निरूपण केलें जातें.—"पण कर्मांची अपेक्षा न करणाऱ्या या उपासनांची इतिकर्तव्यता काय आहे? कारण इतिकर्तव्यतेवांचून त्यांची कारणता संभवत नाहीं." अशी आशंका घेऊन या पादांत यज्ञादिक, श्रवणादिक व शम-दमादिक या विद्योत्पत्तीच्या उपयोगी अशा इतिकर्तव्यता निरूपिल्या जातात. त्यांच्या अभिप्रायानें भाष्यकार 'अथ०' इत्यादि भाष्यानें म्हणतात—]

**भाष्यं—अथेदानीमौपनिषदमात्मज्ञानं किमधिकारिद्वारेण कर्मण्येवानुप्रविशति, आहोस्वित्स्वतंत्रमेव पुरुषार्थसाधनं भवतीति मीमांसमानः सिद्धान्तेनैव तावदुपक्रमते पुरुषार्थोऽत इति । अस्माद्वेदान्तविहितादात्मज्ञानात्स्वतंत्रात्पुरुषार्थः सिध्यतीति बादरायण आचार्यो मन्यते । कुत एतदवगम्यते । शब्दादित्याह ॥**

**भाष्यार्थ**—त्यानंतर आतां [फळाचा भेद व अभेद यांवाचून विद्यांचा भेद व अभेद नाहीं, त्यावांचून गुणांचा उपसंहार व अनुपसंहार नाहीं, त्यामुळें विद्यांचें पुरुषार्थहेतुत्व पूर्वींच सिद्ध झालें असतां प्रथम औपनिषद आत्मज्ञानाला विषय करून वाद्यांच्या मत-भेदामुळें संशय सांगतात—]=**'औपनिषदं०'**—उपनिषद् या प्रमाणानें होणारें आत्म-ज्ञान अधिकारी पुरुषाच्या द्वारा कर्मामध्येंच प्रवेश करितें कीं तें स्वतंत्रच पुरुषार्थाचें

साधन आहे, असा पूज्य विचार करणारे सूत्रकार अगोदर 'पुरुषार्थोऽतः' असा सिद्धान्तानेंच उपक्रम करितात. ['औपनिषद' या आत्मज्ञानाच्या विशेषणानें शास्त्र-श्रुतिसंगति सांगितली जाते. याचें फलवत्त्व सिद्ध झालें असतां हें आत्मज्ञान स्वतंत्रच फलवान् आहे, असें येथें सिद्ध केलेलें असल्यामुळें याच्या अध्याय व पादसंगति आहेत. पूर्वपक्षांत 'ज्ञान-कर्मसमुच्चयपक्षाची सिद्धि' व सिद्धान्तांत 'केवल ज्ञानाला मोक्षसाधनत्व' असा फलभेद मानून पूर्वपक्ष पुढें दाखविणाऱ्या सूत्रकारांनीं प्रथम सिद्धान्त सांगण्यास आरंभ केला आहे.–'**अस्मात्०**' इत्यादि भाष्यानें सूत्रस्थ प्रतिज्ञेची योजना–]=या वेदान्तविहित स्वतंत्र आत्मज्ञानापासून पुरुषार्थ सिद्ध होतो, असें बादरायण आचार्य मानितात. [–वादी त्याविषयीं प्रमाण विचारितो–]='**कुतः**'–कशावरून–कोणत्या प्रमाणावरून हें सिद्ध होतें? [–सूत्रावयवानें उत्तर–]='**शब्दात्०**'–शब्द या प्रमाणावरून, असें सूत्रकार सांगतात. [–'**तथाहि०**' इत्यादि भाष्यानें प्रमाणाचें विवरण–]

**भाष्यं—तथाहि—'तरति शोकमात्मवित्' 'स यो ह वै तत्परमं ब्रह्म वेद ब्रह्मैव भवति' 'ब्रह्मविदाप्नोति परम्' 'आचार्यवान्पुरुषो वेद तस्य तावदेव चिरं यावन्न विमोक्षेऽथ संपत्स्ये' इति। 'य आत्माऽपहतपाप्मा' इत्युपक्रम्य 'स सर्वांश्च लोकानाप्नोति सर्वांश्च कामान्यस्तमात्मानमनुविद्य विजानाति' इति। 'आत्मा वा अरे द्रष्टव्यः' इत्युपक्रम्य 'एतावदरे खल्वमृतत्वम्' इत्येवंजातीयका श्रुतिः केवलाया विद्यायाः पुरुषार्थहेतुत्वं श्रावयति॥ १॥ अथात्र प्रत्यवतिष्ठते—**

**भाष्यार्थ**—शब्दप्रमाण कसें आहे तें पहा–'आत्मवेत्ता शोकाचें उल्लंघन करितो'–छां ७. १. ३.–'तो जो कोणी त्या परम ब्रह्माला जाणतो तो ब्रह्मच होतो' –मुं. ३. २. ९.–'ब्रह्मवेत्ता पर ब्रह्माला प्राप्त होतो'–तै. २. १. १.–'आचार्यवान् पुरुष जाणतो. त्याच्या सत्संपत्तीला देहाचा पात होईपर्यंतच अवकाश–उशीर–अवधि असतो. पण देहपात होतांच तो सत्संपन्न होतो.'–छां.६.१४.२. –असें याविषयीं शब्दप्रमाण आहे. [–सगुण ब्रह्मज्ञानालाहि स्वातंत्र्यानें पुरुषार्थहेतुत्व आहे, असें सांगण्यासाठीं तद्विषय श्रुति सांगतात–]='**य आत्मा०**'–'जो आत्मा पापशून्य आहे' असा उपक्रम करून "जो त्या आत्म्याला शास्त्र व आचार्य यांच्या उपदेशानुसार शोध करून जाणतो–मननपूर्वक त्याचा साक्षात्कार संपादन करितो तो सर्व लोकांस प्राप्त होतो व कामांस प्राप्त होतो."–छां.८.७.१.–असें शब्दप्रमाण आहे. [–'**आत्मा०**' इत्यादि निर्गुण विद्याविषय वाक्यान्तर–]='हे मैत्रेयि,

आत्माच द्रष्टव्य आहे ' असा उपक्रम करून ' हे मैत्रेयि, अमृतत्वसाधन खरोखर हें एवढेंच आहे '–बृ. ४. ५. ६ व १५–ही अशा प्रकारची श्रुति–शब्द [–'पण या उक्त श्रुतींमध्यें विद्या व फल यांचें साधन-साध्यत्व भासत नाहीं ' अशी आशंका घेऊन ' विद्या व फल यांच्या एक पुरुषसंबंधसामर्थ्यामुळेंच त्यांच्या साधन-साध्यत्वाचें ज्ञान होतें, अशा आशयानें ' **केवलाया:०** ' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=केवल विद्येचेंच पुरुषार्थहेतुत्व ऐकवितो–केवल–कर्मरहित ज्ञानाचेंच मोक्षसाधनत्व सांगतो. १–[–' **अथ०**' इत्यादि भाष्यानें पूर्वपक्षाला अवतरण देतात–]=' अथ '–सिद्धान्तकथनानंतर आत्मज्ञान या विषयांतील फलश्रुतीला उद्देशून मीमांसक ' **शेषत्वात्०** ' इत्यादि सूत्रानें आक्षेप घेतो–

**सूत्रं–शेषत्वात्पुरुषार्थवादो यथान्येष्विति जैमिनिः ॥ २**

**सूत्रार्थ**—आत्म्याला कर्तृत्वानें कर्माचें शेषत्व असल्यामुळें ' पुरुषार्थवाद ' –येथील पुरुषार्थवाद हा अर्थवाद आहे. ' ज्याप्रमाणें द्रव्य, संस्कार, कर्म यांतील अपापश्लोकश्रवणादि फलश्रुति हा अर्थवाद आहे ' त्याप्रमाणें पुरुषार्थश्रुति अर्थवाद आहे, असें जैमिनि-आचार्य मानितात २.–सु. ब्र. ३८८. [–'पुरुषार्थवाद' या शब्दांतील अर्थशब्दाचें तंत्रानें ग्रहण केलें आहे. त्यामुळें या सूत्रांतील 'पुरुषार्थवाद ' हा शब्द ' पुरुषार्थार्थवाद ' असा आहे, असें समजावें.–' तत्त्वज्ञान कर्मांगभूत कर्त्याच्या द्वारा प्रयोगविधीनें आदेय–ग्राह्य आहे. कारण ग्रहण केल्या जाणाऱ्या कर्मांगकर्त्याच्या आश्रयानें त्याला शास्त्रसिद्धत्व आहे. यजमानाचाच संस्कार, असें जें अंजनादि त्याप्रमाणें. ' असें मानून ' **शेषत्वात्०** ' या सूत्रस्थ पदाचें ' **कर्तृत्वेन०** ' इत्यादि भाष्यानें व्याख्यान–]

**भाष्यं--कर्तृत्वेनात्मनः कर्मशेषत्वात्तद्विज्ञानमपि व्रीहिप्रोक्षणादिवद्विषयद्वारेण कर्मसंबंध्येव इत्यतस्तस्मिन्नवगतप्रयोजने आत्मज्ञाने या फलश्रुतिः सा अर्थवाद इति जैमिनिराचार्यो मन्यते। यथान्येषु द्रव्यसंस्कारकर्मसु " यस्य पर्णमयी जुहूर्भवति न स पापं श्लोकं शृणोति। यदांक्ते चक्षुरेव भ्रातृव्यस्य वृंक्ते। यत्प्रयाजानुयाजा इज्यन्ते वर्म वा एतद्यज्ञस्य क्रियते वर्म यजमानस्य भ्रातृव्याभिभूत्यै " इत्यवंजातीयका फलश्रुतिरर्थवादः। तद्वत् ॥**

**भाष्यार्थ**—कर्तृत्वानें आत्म्याला कर्मशेषत्व असल्यामुळें त्या आत्म्याचें विज्ञानहि व्रीहिप्रोक्षणादिकांप्रमाणें विषयाच्या द्वारानें कर्मसंबंधीच आहे. [' तत्त्वज्ञान प्रयोजनविधीनें ग्राह्य आहे. कारण त्याला साध्यफलोक्तिशून्यत्व असून–त्यानें साध्य होणाऱ्या फलाच्या कथनाचा अभाव असून त्याला कर्मांगा-

श्रयत्व आहे. पर्णमयीत्वादिकांप्रमाणें' असा येथें अनुमानाचा प्रयोग करावा. —" अहोपण, ज्याचें फल स्वतंत्र आहे अशा तत्त्वज्ञानाला प्रोक्षणादिकांप्रमाणें कर्मांगता कशी?" अशी आशंका घेऊन वादी—मीमांसक 'पुरुषार्थवादः' या पदाचा अर्थ 'इत्यतः०' इत्यादि भाष्यानें सांगतो—]=असें असल्यामुळें ज्याचें प्रयोजन अवगत झालें आहे, अशा आत्मज्ञानामध्यें जी फलश्रुति आहे, ती अर्थवाद आहे. असें जैमिनि-आचार्य मानितो. [वेदार्थमीमांसेमध्यें तत्त्वनिर्णयासाठीं शिष्यानें आपला संशयादिप्रतिभास गुरूच्या पुढें प्रदर्शित करावा व गुरूनें त्या संशयादि-आभासांचें निरसन करून तत्त्वाचें आविष्करण करावें, असा हा शिष्टाचार प्रदर्शित करण्यासाठीं सूत्रांत 'जैमिनि-'ग्रहण केलें आहे. प्रतिपक्षरूपानें जैमिनीचें ग्रहण केलेलें नाहीं. कारण शिष्याचें प्रतिपक्षत्व संभवत नाहीं.—फलश्रुतीला अर्थवादत्व आहे, याविषयीं सूत्रित दृष्टान्ताचें 'यथा०' इत्यादि भाष्यानें व्याख्यान—] ='यथा अन्येषु'—ज्याप्रमाणें दुसऱ्या द्रव्य, संस्कार व कर्म यांतील फलश्रुतीला अर्थवादत्व असतें, त्याप्रमाणें. [—पर्णमयी जुहू हें द्रव्य, यजमानाचा अंजनादि-संस्कार व प्रयाजादि कर्म, यांतील फलश्रुति क्रमानें सांगतो—]=" ज्याची जुहू पर्णमयी—पलाशकाष्ठाची असते तो पाप श्लोक—आपली अपकीर्ति ऐकत नाहीं. यजमान जें नेत्रांत अंजन घालतो त्यानें शत्रूचें चक्षुच नाहींसें करितो—आपल्या अंजनसंस्कारानें शत्रूच्या चक्षूचा नाश करितो, जे प्रयाज व अनुयाज केले जातात तें यज्ञाचें कवचच केलें जातें. शत्रूच्या पराभवासाठीं यजमानाचें तें वर्म—कवच केलें जातें." ही अशा जातीची फलश्रुति हा अर्थवाद आहे. [आणि ही फलश्रुति फलपर असणें, तिचें तात्पर्य फलामध्यें असणें युक्त नाहीं. कारण फलवत् क्रत्वर्थत्व हें तिचें प्रयोजन आहे. त्यामुळें पर्णत्वादिकांचें फलशेषत्व उपपन्न होत नाहीं. म्हणून ती फलश्रुति हा अर्थवादच आहे, असें पूर्वमीमांसेच्या पर्णमयीत्वाधिकरणांत समर्थन केलें आहे.—त्याचप्रमाणें आत्मज्ञानांतीलहि फलश्रुति अर्थवादच आहे, असें 'तद्वत्०' या पदानें वादी सांगतो—]=त्याप्रमाणें आत्मज्ञानांतीलहि फलश्रुति अर्थवादच आहे. [—" पण विनियोजक प्रमाणाचा अभाव असल्यामुळें आत्मज्ञानाला कर्मांगत्व नाहीं, म्हणून तत्त्वज्ञानांतील फलश्रुति हा अर्थवाद नव्हे" अशी 'कथं पुनः०' इत्यादि भाष्यानें शंका—]

**भाष्यं—कथं पुनरस्य अनारभ्याधीतस्यात्मज्ञानस्य प्रकरणादीनामन्यतमेनापि हेतुना विना क्रतुप्रवेश आशंक्यते। कर्तृद्वारेण वाक्यात्तद्विज्ञानस्य क्रतुसंबंध इति चेत्। न। वाक्याद्विनियोगानुपपत्तेः। अव्यभिचारिणा हि केनचित्**

**द्वारेण अनारभ्याधीतानामपि वाक्यनिमित्तः क्रतुसंबंधोऽवकल्पते। कर्ता तु व्यभिचारि द्वारं लौकिकवैदिककर्मसाधारण्यात्। तस्मान्न तद्द्वारेणात्मज्ञानस्य क्रतुसंबंधसिद्धिः इति।**

**भाष्यार्थ**—"अहोपण, अनारभ्य अधीत असलेल्या म्ह० एखाद्या प्रकरणाचा आरंभ न करितां पठित असलेल्या आत्मज्ञानाचा प्रकरणादिकांतील एखाद्याहि हेतूवांचून क्रतूमध्यें प्रवेश कसा आशंकिला जात आहे" [–' प्रकरणादिकांच्या योगानें क्रतूशीं संबंध जरी नसला तरी जुहूच्या द्वारा पर्णमयीत्वाचा वाक्यामुळें क्रतूशीं जसा संबंध होतो त्याप्रमाणें आत्मज्ञानाचाहि कर्तृद्वारा वेदान्तवाक्यावरून क्रतूशीं संबंध होईल,' असें पूर्ववादी '**कर्तृद्वारेण०**' इत्यादि भाष्यानें उत्तर सांगतो–]=कर्त्याच्या द्वारा वाक्यावरून त्याच्या विज्ञानाचा क्रतूशीं संबंध आहे, असें जर म्हणशील तर [–सिद्धान्ती त्याला दूषित करितात–]='**न०**'–नाहीं, विज्ञानाचा कर्तृद्वारा क्रतुसंबंध संभवत नाहीं. कारण वाक्यावरून विनियोगाची सिद्धि होत नाहीं, वाक्य या प्रमाणामुळें विनियोग संभवत नाहीं. [–'**अव्यभिचारिणा०**' इत्यादि भाष्यानें या संक्षिप्त वाक्याचेंच विवरण–]=कारण अव्यभिचारी–नित्य संबद्ध अशा एखाद्या द्वारानें अनारभ्य–अप्रकरणांत अधीत असलेल्याहि पदार्थांचा वाक्य या निमित्तानें क्रतुसंबंध उपपन्न होतो. [–'आत्मज्ञानामध्यें जुहूप्रमाणें कर्ता हेंच अव्यभिचारी द्वार आहे' अशी आशंका घेऊन सिद्धान्ती म्हणतात–]='**कर्ता तु०**'–पण कर्ता हें व्यभिचारी द्वार आहे. कारण कर्ता लौकिक व वैदिक अशा दोन्ही प्रकारच्या कर्मांमध्यें साधारण आहे, त्याला लौकिक-वैदिककर्मसाधारण्य आहे. [–याप्रमाणें 'कर्ता' या द्वाराला व्यभिचारित्व आहे असें सिद्ध झालें असतां त्याचें फलित सांगतात–]='**तस्मात्०**'–म्हणून त्या कर्त्याच्या द्वारा आत्मज्ञानाच्या क्रतुसंबंधाची सिद्धि होत नाहीं. '**इति**'–असा आक्षेप प्राप्त होतो. [–'देहातिरिक्त आत्मज्ञानाच्या कर्मांगत्वाचें विनियोजक प्रमाणाच्या अभावामुळें निरसन केलें जात आहे कीं अपहतपाप्मत्वादिविशेषणांनीं विशिष्ट अशा असंसारी आत्म्याच्या औपनिषद ज्ञानाचें निरसन केलें जात आहे?' असा विकल्प करून पूर्ववादी '**न०**' इत्यादि भाष्यानें त्यांतील पहिल्या पक्षाला दूषित करितो–]

**भाष्यं—न व्यतिरेकविज्ञानस्य वैदिकेभ्यःकर्मभ्योऽन्यत्रानुपयोगात्। न हि देहव्यतिरिक्तात्मज्ञानं लौकिकेषु कर्मसूपयुज्यते। सर्वथा दृष्टार्थप्रवृत्त्युपपत्तेः। वैदिकेषु**

**तु देहपातोत्तरकालफलेषु देहव्यतिरिक्तात्मज्ञानमंतरेण प्रवृत्तिर्नोपपद्यते इत्युपयुज्यते व्यतिरेकविज्ञानम् ॥**

**भाष्यार्थ**--'नाहीं' असा आक्षेप संभवत नाहीं. कारण आत्म्याच्या देहव्यतिरेकविज्ञानाचा-आत्मा देहाहून पृथक्-भिन्न आहे, या विज्ञानाचा वैदिक कर्मांहून दुसऱ्या कोणत्याहि कर्मांमध्यें उपयोग नाहीं. [ त्या ज्ञानाचा विषयाच्या द्वारा वैदिक कर्मांमध्यें अनुप्रवेश होत असल्यामुळें त्याच्या कर्मांगत्वाचा निषेध करणें शक्य नाहीं, असा भावार्थ.-" तर मग लौकिक कर्मालाहि कर्मत्व असल्यामुळें वैदिक कर्माप्रमाणें कर्तृद्वारा अतिरिक्त ज्ञानाची अपेक्षा आहे, त्यामुळें कर्त्याला साधारण्य आहे-कर्ता लौकिक-वैदिक कर्मांमध्यें साधारण आहे." अशी आशंका घेऊन वादी म्हणतो-]='न हि०'-कारण देहव्यतिरिक्त आत्मज्ञान लौकिककर्मांमध्यें उपयुक्त नाहीं, लौकिक कर्मांमध्यें त्याचा कांहीं उपयोग नाहीं. कारण सर्वथा-आत्मा देहाहून भिन्न आहे असें ज्ञान असलें तरी व नसलें तरी ज्यांचें प्रयोजन दृष्ट-प्रत्यक्ष आहे अशा कर्मांमध्यें प्रवृत्ति संभवते. [-"तर मग वैदिककर्मांनाहि कर्मत्व असल्यामुळें लौकिककर्माप्रमाणें तीं व्यतिरेक ज्ञानाची अपेक्षा करणारीं नाहींत," अशी आशंका घेऊन वादी म्हणतो-]=पण देहपातानंतर -मरणोत्तरकालींच ज्यांचें फल मिळतें अशा वैदिककर्मांमध्यें देहव्यतिरिक्त आत्मज्ञानावांचून प्रवृत्ति होऊं शकत नाहीं. त्यामुळें मरणोत्तरकालीं फल देणाऱ्या वैदिककर्मांमध्यें देहव्यतिरिक्त आत्मज्ञान उपयुक्त आहे, त्यांत त्या ज्ञानाचा उपयोग आहे. [ कारीर्यादि दृष्टफल वैदिक कर्मांच्या निवृत्तीसाठीं भाष्यांत 'देहपातोत्तरकालफलेषु' असें कर्मांना विशेषण दिलें आहे.-'ननु०' इत्यादि भाष्यानें पूर्वोक्त विकल्पांतील दुसऱ्या कल्पाची शंका-]

**भाष्यं-नन्वपहतपाप्मत्वादिविशेषणादसंसार्यात्मविषयं औपनिषदं दर्शनं न प्रवृत्त्यंगं स्यात् । न । प्रियादिसंसूचितस्य संसारिण एवात्मनो द्रष्टव्यत्वोपदेशात् । अपहतपाप्मत्वादि विशेषणं तु स्तुत्यर्थं भविष्यति ।**

**भाष्यार्थ**—अहोपण, अपहतपाप्मत्वादि विशेषणामुळें असंसारि-आत्मविषय -असंसारी आत्म्याचें औपनिषद दर्शन-उपनिषद् या प्रमाणानें झालेलें ज्ञान प्रवृत्तीचें अंग होणार नाहीं. [ अनुपयोगित्वामुळें व विरोधित्वामुळें त्याला क्रतूचें अंगत्व नाहीं, असा भावार्थ.-पण क्रतूला अपेक्षित असलेल्या रूपाला सोडून बाकीचें आत्मज्ञान अविवक्षित आहे, असें वादी 'न०' इत्यादि भाष्यानें म्हणतो-] =नाहीं, असें होत नाहीं. कारण प्रियादिकांवरून संसूचित-चांगल्या प्रकारें सूचित

झालेल्या संसारी आत्म्याच्याच द्रष्टव्यत्वाचा उपदेश केलेला आहे. [जायादि विषय आत्म्यासाठीं–स्वतःसाठीं प्रिय होतात, ते विषयासाठीं स्वतःला प्रिय होत नाहींत, इत्यादि वचनानें भार्यादिकांचें आत्मार्थत्वानें प्रियत्व सांगून ' आत्मा द्रष्टव्य आहे' असें सांगणाऱ्या याज्ञवल्क्याकडून पत्न्यादि भोग्यानें सुचविलेल्या भोक्त्या संसारी आत्म्याचेंच द्रष्टव्यत्व इष्ट आहे, आणि भोक्त्याचें ज्ञान कर्मामध्यें उपयुक्त आहे. त्यामुळें भोक्त्याहून अतिरिक्त आत्मस्वरूप श्रौत नव्हे, असा भावार्थ.–" अहोपण, अपहतपाप्मत्वादि विशेषण भोक्त्यामध्यें अयुक्त आहे, त्यामुळें आत्मस्वरूप भोक्त्याहून अतिरिक्त–भिन्न आहे, असेंच मानावें " अशी आशंका घेऊन वादी '**अपहत०**' इत्यादि भाष्यानें म्हणतो–]=पण अपहतपाप्मत्वादि विशेषण स्तुत्यर्थ असूं शकेल ! [–" अहोपण, जन्मादिसूत्रापासून आरंभ करून ठिक-ठिकाणीं वेदान्तांचें अप्रपंच ब्रह्मात्मपरत्व सांगितलें आहे. तेव्हां अपहतपाप्मत्वादिकथनाला स्तुत्यर्थत्व कसें ?" अशी ' **ननु०**' इत्यादि भाष्यानें शंका–]

**भाष्यं—ननु तत्र तत्र प्रसाधितमेतदधिकमसंसारि ब्रह्म जगत्कारणं। तदेव च संसारिण आत्मनः पारमार्थिकं स्वरूपमुपनिषत्सूपदिश्यत इति। सत्यं प्रसाधितं। तस्यैव तु स्थूणानिखननवत्फलद्वारेणाक्षेपसमाधाने क्रियेते दाढ्र्याय ॥ २ ॥**

**भाष्यार्थ**—अहोपण, आम्हीं या मीमांसेंत ठिक-ठिकाणीं निरनिराळया अनेक सूत्रांत–भिन्न भिन्न प्रसंगीं अधिक असंसारी ब्रह्म जगत्कारण आहे, हें प्रसाधिलें आहे, याची उत्तमप्रकारें सिद्धि केली आहे. [–' अधिक ' या विशेषणावरून आशंकित द्वैताचें ' **तदेव०** ' इत्यादि भाष्यानें निरसन–]=आणि तेंच संसारी आत्म्याचें पारमार्थिक स्वरूप आहे. [' पारमार्थिकं ' या विशेषणानें ' संसारी जीवाचें असंसारी ईश्वर हें स्वरूप आहे' या व्याघाताचें निरसन केलें आहे.–त्यांच्या ऐक्याविषयीं पूर्वोक्त प्रमाण ' **उपनिषत्सु०** ' इत्यादि भाष्यानें सुचवितात–]=उपनिषदांमध्यें तेंच संसारी आत्म्याचें पारमार्थिक रूप उपदेशिलें जातें ' **इति** ' –अशी शंका येते. [–वादी ' **सत्यं०** ' इत्यादि भाष्यानें पूर्वपक्षावरील या आक्षेपाचें समाधान करितो–]=होय, तुम्हीं जगत्कारण ब्रह्माचें प्रसाधन केलें आहे, हें खरें; पण स्थूणानिखननाप्रमाणें–खुंट्याला हालवून हालवून दृढ करण्याप्रमाणें फलाच्या द्वारा त्यालाच दृढ करण्यासाठीं आक्षेप व समाधान हीं केलीं जातात. [ 'फलद्वारानें' म्ह० आत्मज्ञान हें वेदान्तांचें फल क्रत्वर्थ आहे कीं पुरुषार्थ आहे, या विचाराच्या द्वारा, असा भावार्थ. ' दाढर्याय '–दृढतेसाठीं, या पदानें पूर्वीं सिद्ध केलेलाच अर्थ आक्षेप-समाधानांनीं पुनः सिद्ध करण्याचें फल सांगितलें आहे.]२.

[-शिवाय जनकादिकांचें विद्येसह कर्माचरण उपलब्ध होत असल्यामुळें केवल विद्याच मोक्षाचें साधन नाहीं. यास्तव सहानुष्ठान-ज्ञान व कर्म यांचें समुच्चयानें अनुष्ठान हें विद्येच्या कर्मांगत्वाविषयीं लिंग आहे. कारण तिला स्वातंत्र्य नाहीं, असें वादी '**आचारदर्शनात्**' या सूत्रानें सांगतो-]

## सूत्रं-आचारदर्शनात् ॥ ३

**सूत्रार्थ**—'वैदेह जनकानें बहुदक्षिणायुक्त यज्ञ केला' इत्यादि वचनांत ब्रह्मज्ञ जनकादिकांचा विद्येसह कर्माचार-कर्मानुष्ठान दिसतें. त्यामुळें ज्ञानाला कर्मांगत्व आहे.३.-सु.ब्र.३८८.[-'**जनको ह०**' इत्यादि भाष्यानें सूत्राचें व्याख्यान करितात-]

**भाष्यं**—' जनको ह वैदेहो बहुदक्षिणेन यज्ञेनेजे ' '**यक्ष्यमाणो वै भगवन्तोऽहमस्मि**' **इत्येवमादीनि ब्रह्मविदामप्यन्यपरेषु वाक्येषु कर्मसंबंधदर्शनानि भवन्ति ।तथोद्दालकादीनामपि पुत्रानुशासनादिदर्शनाद् गार्हस्थ्यसंबंधोऽवगम्यते। केवलाच्चेज्ज्ञानात्पुरुषार्थसिद्धिः स्यात्किमर्थमनेकायाससमन्वितानि कर्माणि ते कुर्युः। " अर्के चेन्मधु विंदेत किमर्थं पर्वतं व्रजेत् " इति न्यायात ॥ ३ ॥**

**भाष्यार्थ**—' वैदेहः '-विदेह देशांचा अधिपति ' जनक ' या नांवाचा राजा बहुदक्षिणसंज्ञक यज्ञानें किंवा बहुदक्षिणायुक्त अश्वमेधयज्ञानें पूर्वी एकदा ' ईजे ' -याग करिता झाला."-बृ. ३. १. १. [-ब्रह्मज्ञ कैकेय राजाचें वाक्य-]=विद्यार्थी होऊन आलेल्या प्राचीनशालादि महाविद्वान् ब्राह्मणांना कैकेय राजा म्हणतो-'हे भगवन्तः० '-" अहो पूज्य ऋषीहो ! मी लवकरच ' यक्ष्यमाणः '-यज्ञ करणार आहें. यास्तव तुम्ही कांहीं दिवस येथें रहा. "-छां.५. ११. ५.-हीं अशा प्रकारचीं ज्ञानपर वाक्यांमध्यें ब्रह्मवेत्त्यांचींहि कर्मसंबंधदर्शनें आहेत. [ पण हीं उक्त वाक्यें ज्ञानार्थ आहेत कर्मार्थ नव्हेत, अशी आशंका घेऊन ' अन्यपरेषु वाक्येषु ' असें म्हटलें आहे. -याहि कारणानें ब्रह्मज्ञांचीहि कर्मसंगति आहे, असें '**तथा०**' इत्यादि भाष्यानें वादी सांगतो-]=त्याचप्रमाणें उद्दालकादिकांचेंहि पुत्रानुशासनादि -पुत्रोपदेशादि उपलब्ध होत असल्यामुळें त्यांचा गार्हस्थ्यसंबंध-गृहस्थाश्रमसंबंध अवगत होतो. [ ' उद्दालकादि ' येथील 'आदि-'शब्दानें व्यास-याज्ञवल्क्य इत्यादिकांचें व ' पुत्रानुशासनादि ' येथील ' आदि-'शब्दानें भार्यानुशासनादिकांचें ग्रहण करावें. -" पण कांहीं विद्वानांनींच कर्म केलें, एवढ्यावरूनच विद्याशक्तीचा अपह्नव करितां येत नाहीं, ती नाहीं, असें म्हणतां येत नाहीं. यास्तव केवल -कर्मनिरपेक्षच विद्या मुक्तीचें साधन आहे, " अशी आशंका घेऊन वादी '**केवलात्०**' इत्यादि भाष्यानें म्हणतो-]=केवल ज्ञानानेंच पुरुषार्थाची **सिद्धि** जर

झाली असती तर त्या विद्वानांनीं अनेक आयासांनीं युक्त अशीं कर्मं कशासाठीं केलीं असतीं ? [–ज्यांत आयास थोडे आहेत असा उपाय सोडून ज्यांत आयास फार आहेत अशा उपायाचा आदर कोणी करीत नाहीं, याविषयीं लौकिक न्याय **'अर्के चेत्०'** इत्यादि भाष्यानें सांगतात–]=" मध जर जवळ–घरांतल्या घरांत मिळेल तर त्यासाठीं पर्वतावर कोण जाईल !" असा न्याय असल्यामुळें [अल्पायास उपाय सोडून आयासबहुल उपाय कोणी करणार नाहीं, असा संबंध. ] ३. [–विद्येला केवल लिंगावरूनच कर्मांगत्व नाहीं. तर तृतीयाश्रुतीवरूनहि तिला कर्मांगत्व आहे, असें **' तच्छ्रुतेः '** या सूत्रानें वादी सांगतो–]

## सूत्रं–तच्छ्रुतेः ॥ ४

**सूत्रार्थ**––' यदेव विद्यया ' येथील ' विद्यया ' अशा तृतीयाश्रुतीनें ज्ञानाच्या कर्मशेषत्वाचें **श्रवण** होतें.४.–सु.ब्र. ३८८. [–**' यदेव०'** इत्यादि भाष्यानें सूत्रार्थाचें विवरण–]

**भाष्यं––' यदेव विद्यया करोति श्रद्धयोपनिषदा तदेव वीर्यवत्तरं भवति ' इति च कर्मशेषत्वश्रवणाद्विद्याया न केवलायाः पुरुषार्थहेतुत्वम ॥ ४ ॥**

**भाष्यार्थ**––' जें कर्म विद्येनें, श्रद्धेनें व भक्तीनें करितो तें वीर्यवत्तर होतें ' –पृ.४२०–असें विद्येचें कर्मांगत्वश्रवण असल्यामुळें केवल–कर्मरहित विद्येला पुरुपार्थसाधनत्व नाहीं. ४. [–आणि याहि कारणानें स्वतंत्र विद्या पुरुषार्थहेतु नाहीं, असें **' समन्वारंभणात्०'** या सूत्रानें सांगतात–]

## सूत्रं–समन्वारंभणात् ॥ ५

**सूत्रार्थ**––' तं विद्याकर्मणी समन्वारभेते ' या वचनांत विद्या व कर्म यांचें फलारंभांत सहकारित्व दिसतें, त्यामुळें विद्येला स्वातंत्र्य नाहीं. ५.–सु.ब्र.३८९– [–**'तं०'** इत्यादि भाष्यानें सूत्राचें विवरण–]

**भाष्यं–' तं विद्याकर्मणी समन्वारभेते ' इति च विद्याकर्मणोः फलारंभे सहकारित्वदर्शनान्न स्वातंत्र्यं विद्यायाः ॥ ५ ॥**

**भाष्यार्थ**—आणि 'तं०'–"परलोकास जाणाऱ्या त्याच्या मागून विद्या व कर्म जातात."–बृ. ४.४.२.–असें विद्या व कर्म यांचें फलारंभामध्यें सहकारित्व उपलब्ध होत असल्यामुळें विद्येला स्वातंत्र्य नाहीं. ५. [–विद्येच्या अस्वातंत्र्याविषयीं **' तद्वतः०'** इत्यादि सूत्रानें लिंगान्तर सांगतात–]

## सूत्रं–तद्वतो विधानात् ॥ ६

**सूत्रार्थ**—'अचार्यकुलात्' इत्यादि श्रुति 'तद्वानाला'–समस्त वेदार्थज्ञानवानालाच उद्देशून कर्माचें विधान करिते, त्यालाच कर्मांचा अधिकार आहे असें दाखविते. त्यामुळें विद्येला स्वातंत्र्य नाहीं. ६.–सु. ब्र. ३८९–[–'**आचार्य०**' इत्यादि भाष्यानें सूत्राचें व्याख्यान–]

**भाष्यं**—**'आचार्यकुलाद्वेदमधीत्य यथाविधानं गुरोः कर्मातिशेषेणाभिसमावृत्य कुटुंबे शुचौ देशे स्वाध्यायमधीयानः' इति चैवंजातीयका श्रुतिः समस्तवेदार्थविज्ञानवतः कर्माधिकारं दर्शयति । तस्मादपि न विज्ञानस्य स्वातंत्र्येण फलहेतुत्वम् । नन्वत्र अधीत्य इत्यध्ययनमात्रं वेदस्य श्रूयते नार्थविज्ञानम् । नैष दोषः । दृष्टार्थत्वाद्वेदाध्ययनं अर्थावबोधपर्यंतमिति स्थितम् ॥ ६ ॥**

**भाष्यार्थ**—आणि 'आचार्यकुलात्'–"आचार्यांचें कुल म्ह० गृह, उपनयन करून त्या आचार्यगृहास प्राप्त झाल्यानंतर 'गुरोः कर्मातिशेषेण'–गुरूची शुश्रूषा एतद्रूप कर्म करून अवशिष्ट राहिलेल्या कालानें 'यथाविधानं'–पवित्रपाणित्व, प्राङ्मुखत्व इत्यादि विधानाचें अतिक्रमण न करितां 'वेदं अधीत्य'–वेदाचें अध्ययन करून त्यानंतर 'अभिसमावृत्य'–अभिसमावर्तन–व्रतविसर्जन करून, स्त्रीपरिग्रह करून 'कुटुंबे'–गृहस्थाश्रमांत स्थित होऊन 'शुचौ देशे०'–पवित्रदेशामध्यें स्वाध्यायाचें–स्वशाखेचें अध्ययन करणारा (व दुसरींहि विहित कर्में यथाशक्ति करणारा ब्रह्मलोकास प्राप्त होतो, असा भावार्थ.)"–छां. ८. १५. १.–ही अशा जातीची श्रुति समस्त वेदाच्या अर्थाचें ज्ञान असणाऱ्या पुरुषाचाच कर्माधिकार दाखविते. त्यामुळेंहि विज्ञानाला स्वातंत्र्यानें फलहेतुत्व नाहीं. [–'अध्ययन-'शब्दाचा यथाश्रुत–प्रसिद्ध अर्थ स्वीकारून '**ननु०**' इत्यादि भाष्यानें शंका–]="अहोपण, येथें 'अधीत्य' अशा या पदानें वेदाचें नुस्तें अध्ययन–अक्षरग्रहण श्रुत आहे. अर्थविज्ञान श्रुत नाहीं." [–अवघातादिविधीप्रमाणें अध्ययनविधीला दृष्टार्थत्व असल्यामुळें अध्ययनाचा व्यापार अर्थावबोधापर्यंत आहे, असें प्रथमतंत्रांत–पूर्वमीमांसेंत समर्थन केलें आहे, असें वादी '**नैष दोषः०**' इत्यादि भाष्यानें सांगतो–]=हा दोष येत नाहीं. वेदाध्ययनाला दृष्टार्थत्व असल्यामुळें–त्याचें फल प्रत्यक्ष असल्यामुळें तें अर्थावबोधपर्यंत आहे. अध्ययन-शब्दाचा अर्थ अर्थज्ञानापर्यंत आहे, असें पूर्वतंत्रांत सिद्ध झालें आहे. ६. [–'**नियमाच्च०**' या सूत्रानें स्वतंत्र–केवल विद्या पुरुषार्थाचें साधन नाहीं, याविषयीं आणखी हेतु–]

## सूत्रं–नियमाच्च ॥ ७

**सूत्रार्थ**—'कुर्वन्नेव०' या श्रुतीनें यावज्जीव कर्म करण्याविषयीं नियम केलेला असल्यामुळें ब्रह्मविद्येला कर्मांगत्व आहे. ७.–सु. ब्र. ३८९–[–'**कुर्वन्**०' इत्यादि भाष्यानें नियमाचा विभाग करितात–]

**भाष्यं—'कुर्वन्नेवेह कर्माणि जिजीविषेच्छतं समाः । एवं त्वयि नान्यथेतोऽस्ति न कर्म लिप्यते नरे' इति । तथा "एतद्वै जरामर्यं सत्रं यदग्निहोत्रं जरया वा ह्येवास्मान्मुच्यते मृत्युना वा" इत्येवंजातीयकान्नियमादपि कर्मशेषत्वमेव विद्याया इति ॥ ७ ॥ एवं प्राप्ते प्रतिविधत्ते—**

**भाष्यार्थ**—पुरुष 'इह'–" या देहांत 'शतं समाः'–शंभर वर्षे 'जिजीविषेत्'–जर जिवंत राहण्याची इच्छा करील तर कर्म करीतच त्यानें जिवंत **राहण्याची** इच्छा करावी, [ असा हा नियमविधि आहे. ]=याप्रमाणें कर्म करीतच राहणाऱ्या मनुष्यत्वाभिमानी अशा तुझ्यामध्यें अशुभ कर्म लिप्त होणार नाहीं. त्या अशुभ कर्मानें तूं लिप्त होणार नाहींस. 'इतः न अन्यथा अस्ति'–ज्यामुळें कर्माचा लेप होणार नाहीं, असा या कर्माचरणप्रकाराहून दुसरा प्रकार नाहीं. "–ई.२. –[–'**तथा**०' इत्यादि भाष्यानें दुसरा नियम–]=त्याचप्रमाणें 'जें अग्निहोत्र तेंच हें 'जरामर्य' म्ह० जरा-मरणावधि सत्र आहे' [–'**जरया**०' इत्यादि भागानें तेंच विशद करितात–]='एक तर जरेनेंच याच्यापासून मुक्त होतो किंवा मरणानें' या अशा जातीच्या नियमामुळेंहि विद्येला कर्मशेषत्वच आहे. '**इति**'–याप्रमाणें श्रुत्यादि प्रमाणांनीं आत्मज्ञानाचें कर्मांगत्व सिद्ध झालें असतां कर्माच्या फलानेंच ज्ञानाला फलवत्त्व आहे, असें प्राप्त झालें. ७. [–'**एवं**०' इत्यादि भाष्यानें पूर्वपक्षाचा अनुवाद करून सिद्धान्त सांगतात–]=असा पूर्वपक्ष प्राप्त झाला असतां '**अधिकोपदेशात्तु**०' इत्यादि सूत्रानें त्याचें प्रतिविधान–प्रत्याख्यान करितात–

## सूत्रं—अधिकोपदेशात्तु बादरायणस्यैवं तद्दर्शनात् ॥ ८

**सूत्रार्थ**—जो कर्मकर्ता तोच कर्मांगभूत संसारी आहे. पण वेदान्तांमध्यें कर्त्या संसारी जीवाहून 'अधिक' म्ह० असंसारी चिन्मात्र आत्म्याचा 'उपदेश केला आहे.' म्हणून तत्त्वज्ञान चिन्मात्राश्रयच आहे. तत्त्वज्ञानाचें फल श्रुत असल्यामुळें त्याला अर्थवाद म्हणतां येत नाहीं. तस्मात् 'एवं'–असें जें बादरायणाचें मत आहे, तेंच बरोबर आहे. 'तद्दर्शनहि आहे'–'यः सर्वज्ञः सर्वविद्०' असें त्याच्या अधिकोपदेशाचें दर्शनहि होतें.८. [–'**तुशब्दात्**०' इत्यादि भाष्यानें सूत्राची योजना–]

**भाष्यं—तु-शब्दात्पक्षो विपरिवर्तते । यदुक्तम्–'शेषत्वात्पुरुषार्थवादः' इति । तन्नोपपद्यते । कस्मात् । अधिकोपदेशात् । यदि संसार्येवात्मा शारीरः कर्ता भोक्ता च शरीरमात्रव्यतिरेकेण वेदान्तेषूपादिष्टः स्यात्ततो वर्णितेन प्रकारेण फलश्रुतेरर्थवादत्वं स्यात् । अधिकस्तावच्छारीरादात्मनोऽसंसारीश्वरः कर्तृत्वादिसंसारिधर्मरहितोऽपहतपाप्मत्वादिविशेषणः परमात्मा वेद्यत्वेनोपादिश्यते वेदान्तेषु । न च तद्विज्ञानं कर्मणां प्रवर्तकं भवति ॥**

**भाष्यार्थ**—'तु' या शब्दानें पक्षाचें विपरिवर्तन होतें. [–'**यदुक्तं०**' इत्यादि भाष्यानें विपरिवर्तमान–परिवर्तन पावणारा पक्षच अनुवाद करून दाखवितात–]='ज्ञानाला कर्मशेषत्व असल्यामुळें पुरुषार्थ–मोक्ष हा अर्थवाद आहे,' असें जें पूर्ववाद्यानें म्हटलें आहे–पृ.४९८–तें उपपन्न होत नाहीं. [–'**कस्मात्०**' इत्यादि भाष्यानें प्रश्नपूर्वक अनुपपत्तीचा हेतु सांगतात–]=कोणत्या कारणानें ? 'अधिकोपदेशामुळें' [–'**यदि०**' इत्यादि भाष्यानें अधिकोपदेशाच व्यतिरेकतः दाखवितात–]=जर शारीर–शरीरांत राहणारा कर्ता व भोक्ता संसारी आत्माच केवळ शरीराहूनच भेदानें–व्यतिरेकानें वेदान्तांमध्यें उपदिष्ट–उपदेशिलेला असेल तर वर वर्णन केलेल्या प्रकारानें फलश्रुतीला अर्थवादत्व असेल.–'**अधिकस्तावत्०**'–पण वेदान्तांमध्यें तर शारीर आत्म्याहून अधिक असंसारी, ईश्वर, कर्तृत्वादि संसारधर्मरहित अपहतपाप्मत्वादि विशेषणांनीं युक्त असा परमात्मा वेद्यत्वानें उपदेशिला जातो. '**न च०**'–त्याचें विज्ञान कर्मांचें प्रवर्तक होत नाहीं. [जो कर्मांगभूत कर्ता तो वेदान्तवेद्य नाहीं. जें ब्रह्म तें वेद्य आहे, पण तें कर्मांगभूत नाहीं. तेव्हां त्याच्या ज्ञानाला कर्मांगता कोठची ? आणि कर्मांगताच जर नाहीं तर मग त्याच्या फलश्रुतीला अर्थवादत्व तरी कोठचें, असा भावार्थ.–'ब्रह्मात्मज्ञान क्रतुप्रयोगविधीनें उपादेय–ग्राह्य नाहीं. कारण त्याला तद्विरोधित्व आहे. ग्रहण केल्या जाणाऱ्या उदित होमाच्या विरोधी असलेल्या अनुदित होमाप्रमाणें' असें मानून '**प्रत्युत०**' इत्यादि म्हणतात–]

**भाष्यं—प्रत्युत कर्माण्युच्छिनत्तीति वक्ष्यति 'उपमर्दं च' इत्यत्र । तस्मात् 'पुरुषार्थोऽतः शब्दात्' इति यन्मतं भगवतो बादरायणस्य तत्तथैव तिष्ठति । न शेषत्वप्रभृतिभिर्हेत्वाभासैश्चालयितुं शक्यते ॥**

**भाष्यार्थ**—उलट तें ब्रह्मात्मविज्ञान कर्मांचा उच्छेद करितें असें बादरायणाचार्य '**उपमर्दं च**'–ब्र. सू. ३. ४. १६–या सूत्रांत सांगतील. [–**सूत्रांतील** 'बादरायणस्य०' इत्यादि भागाचें व्याख्यान–]='**तस्मात्०**'–उक्त आत्म-

ज्ञानाच्या क्रतुशेषत्वाचा असंभव असल्यामुळें 'ब्रह्मात्मज्ञानापासून मोक्ष प्राप्त होतो, कारण तसें सांगणारा शब्द आहे,'–पृ. ४९७ असें जें भगवान् बादरायणाचार्यांचें मत तें तसेंच स्थिर होतें, अबाधित राहतें. कर्मशेषत्वप्रभृति हेत्वाभासांनीं तें ढळवितां येणें शक्य नाहीं, त्याला अस्थिर–अदृढ–चंचल–बाधित करितां येत नाहीं. [–अधिकोपदेशाच्या असिद्धीची आशंका घेऊन ' तद्दर्शनात् ' या सूत्राव-यवाच्या व्याख्यानरूप ' **तथा हि०** ' इत्यादि भाष्यानें तिचें प्रत्याख्यान–]

**भाष्यं—तथाहि तमधिकं शारीरादीश्वरमात्मानं दर्शयन्ति श्रुतयः–'यः सर्वज्ञः सर्ववित्' 'भीषाऽस्माद्वातः पवते' 'महद्भयं वज्रमुद्यतम्' 'एतस्य वा अक्षरस्य प्रशासने गार्गि' 'तदैक्षत बहु स्यां प्रजायेयेति तत्तेजोऽसृजत ' इत्येवमाद्याः ॥**

**भाष्यार्थ—**कारण श्रुति तशा–त्या शारीरात्म्याहून अधिक ईश्वर-आत्म्याला दाखवितात–" जो सर्वज्ञ व सर्वविद् "–मुं.१.१.९–" या परमेश्वराच्या भयानें वायु वाहतो "–तै. २. ८. १.–" फार मोठें भय, उगारलेलें वज्रच "–का. २.३.२.–" हे गार्गि, याच अक्षराच्या प्रशासनांत–आज्ञेंत सूर्य-चंद्रादि सर्व जगत् –विशेषतः धारण केलेलें असें होऊन राहतें," –बृ.३.८.९.–" मी बहु व्हावें, प्रजारूपानें उत्पन्न व्हावें. असें ईक्षण करून तें सत् तेजाला उत्पन्न करितें झालें. "–छां.६.२.३.–या व अशाच दुसऱ्याहि श्रुति शारीराहून त्या अधिक ईश्वर आत्म्याला दाखवितात. [–' क्रतूला अपेक्षित असलेलें आत्मरूप सोडून इतर आत्मरूप अनिष्ट आहे '–पृ. ५०१–असें जें वाद्याचें म्हणणें आहे त्याचें '**यत्तु०**' इत्यादि भाष्यानें निरसन–]

**भाष्यं—यत्तु प्रियादिसंसूचितस्य संसारिण एवात्मनो वेद्यतयाऽनुकर्षणम् ' आत्मनस्तु कामाय सर्वं प्रियं भवति । आत्मा वा अरे द्रष्टव्यः ' ' यः प्राणेन प्राणिति स त आत्मा सर्वान्तरः ' ' य एषोऽक्षिणि पुरुषो दृश्यते ' इत्युपक्रम्य ' एतं त्वेव ते भूयोऽनुव्याख्यास्यामि ' इति चैवमादि । तदपि ॥**

**भाष्यार्थ—**पण प्रियादिसंसूचित संसारी आत्म्याचेंच वेद्यत्वानें जें अनुक-र्षण–" पण आत्म्याच्याच कामासाठीं सर्व प्रिय होतें. हे मैत्रेयि, आत्माच द्रष्टव्य आहे"–बृ. २. ४. ६.–" जो प्राणानें प्राणव्यापार करितो तो तुझा आत्मा सर्वान्तर आहे."–बृ.३.४.१.–'जो हा नेत्रामध्यें पुरुष दिसतो'–छां.८.७.४.–असा उपक्रम करून"याचेंच मी तुला पुनरपि अनुव्याख्यान करून सांगेन"–छां.८.९.३.–इत्यादि श्रुतींत केलें आहे तेंहि [ अभेदाभिप्रायानें आहे.–'आत्म्याच्या कामासाठीं सर्व प्रिय होतें' असा उपक्रम करून 'हा आत्माच द्रष्टव्य आहे' असें हें वाक्य ब्रह्माचा उपदेश

करण्याची इच्छा झाली असतांच ब्रह्मात्मैक्याच्या आशयानें आहे, याविषयीं ‘ अस्य० ’ इत्यादि वाक्यशेष सांगतात–]

**भाष्यं–‘ अस्य महतो भूतस्य निःश्वसितमेतद्यदृग्वेदः ’ ‘ योऽशनायापिपासे शोकं मोहं जरां मृत्युमत्येति ’ ‘ परं ज्योतिरुपसंपद्य स्वेन रूपेणाभिनिष्पद्यते स उत्तमः पुरुषः ’ इत्येवमादिभिर्वाक्यशेषैः सत्यामेव अधिकोपदिदिक्षायां अत्यंताभेदाभिप्रायमित्याविरोधः ।**

**भाष्यार्थ**—“ ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद, इत्यादि हें सर्व या महत् भूताचें निःश्वासित आहे. ”–बृ. २. ४. १०.–[–‘जो प्राणानें प्राणनव्यापार करितो ’ इत्यादि वाक्य ऐक्यपर आहे, याविषयीं वाक्यशेष–]=“ जो अशनाया-पिपासा–भूक-तहान, शोक-मोह, जरा-मृत्यु, यांचें उल्लंघन करितो ”–बृ. ३. ५. १. [–‘जो अक्षीमध्यें पुरुष दिसतो ’ इत्यादि वाक्यहि ऐक्यपर आहे, याविषयीं उपसंहाराचें आनुकूल्य दाखवितात–]=“ परं ज्योतीला प्राप्त होऊन स्वरूपानें अभिनिष्पन्न होतो, तो उत्तम पुरुष आहे. ”–छां.८.१२.३.–या व अशाच दुसऱ्याहि वाक्यशेषांनीं अधिकोपदेशाची इच्छा असतांना–संसारीहून जें अधिक ब्रह्म त्याचा उपदेश करण्याची इच्छा असतांनाच ब्रह्माहून जीवाचा अत्यंत भेदाभाव आहे–अभेद आहे या बुद्धीनें–या आशयानें तें द्रष्टव्यादि वाक्य आहे. त्यामुळें अविरोध आहे–वेदान्तामध्यें क्रतूला अपेक्षित नसलेलें आत्मरूप विवक्षित आहे, या अभ्युपगमांत–मतांत कांहीं विरोध नाहीं, असा भावार्थ. [–“ पण जीव व ब्रह्म यांचा परस्पर विरोध असल्यामुळें त्यांचें ऐक्य कसें संभवतें?” अशी आशंका घेऊन ‘त्यांचा तात्त्विक विरोध नाहीं,’ असें **‘पारमेश्वरमेव०’** इत्यादि भाष्यानें सांगतात–]

**भाष्यं—पारमेश्वरमेव हि शारीरस्य पारमार्थिकं स्वरूपम् । उपाधिकृतं तु शारीरत्वं ‘ तत्त्वमसि ’ ‘ नान्यदतोऽस्ति द्रष्टृ ’ इत्यादिश्रुतिभ्यः । सर्वं चैतद्विस्तरेण अस्माभिः पुरस्तात्तत्र तत्र वर्णितम् ॥ ८ ॥**

**भाष्यार्थ**—परमेश्वराचें जें रूप तेंच शारीराचें पारमार्थिक स्वरूप आहे. [–पण प्रातिभासिक विरोध तात्त्विक अभेदाच्या विरोधी नाहीं, असें मानून **‘उपाधि०’** इत्यादि भाष्यानें सांगतात–]=पण शारीरत्व उपाधिकृत आहे. [–जीवाचें तात्त्विक रूप ब्रह्मच आहे, याविषयीं श्रुतींचा संवाद–आनुकूल्य दाखवितात–]=**‘तत्त्वमसि०’** –तें सत् तूं आहेस ’–छां.६.८.७.–‘याहून अन्य द्रष्टृ नाहीं’–बृ.३.८.११.– इत्यादि श्रुतींवरून हें सिद्ध होतें. [–‘तत्त्वमादि-’वाक्य संपदादिविषय आहे. वस्तुविषय नाहीं, अशी आशंका घेऊन **‘सर्वं च०’** इत्यादि भाष्यानें म्हणतात–]=आणि

हें सर्व आम्हीं या पूर्वी ठिकठिकाणीं सविस्तर वर्णिलें आहे. ८. [–'**तुल्यं तु०**' इत्यादि सूत्रानें परोक्त–वाद्यानें सांगितलेल्या लिंगदर्शनाचें प्रत्याख्यान–]

**सूत्रं—तुल्यं तु दर्शनम् ॥ ९**

**सूत्रार्थ**—पण विद्येच्या अकर्मशेषत्वाविषयींहि आचारदर्शन तुल्य–समान आहे. ९.–सु. ब्र. ३८९–[–'**यत्तूक्तं**' इत्यादि भाष्यानें उक्ताचा अनुवाद करून सूत्राची उत्तरत्वानें योजना–]

**भाष्यं—यत्तूक्तं आचारदर्शनात्कर्मशेषो विद्येति । अत्र ब्रूमः–तुल्यं आचारदर्शनं अकर्मशेषत्वेऽपि विद्यायाः । तथाहि श्रुतिर्भवति—" एतद्ध स्म वै तद्विद्वांस आहुर्ऋषयः कावषेयाः किमर्था वयमध्येष्यामहे किमर्था वयं यक्ष्यामहे । एतद्ध स्म वै तत्पूर्वे विद्वांसोऽग्निहोत्रं न जुहवांचक्रिरे " ' एतं वै तमात्मानं विदित्वा ब्राह्मणाः पुत्रैषणायाश्च वित्तैषणायाश्च लोकैषणायाश्च व्युत्थायाथ भिक्षाचर्यं चरन्ति ' इत्येवंजातीयका ॥**

**भाष्यार्थ**—' आचारदर्शनामुळें विद्या कर्माचा शेष–अंग आहे. ' असें जें वाद्यानें वर–५०३–म्हटलें आहे त्याविषयीं आम्ही 'विद्येच्या अकर्मशेषत्वाविषयींहि तुल्य–समान आचारदर्शन आहे,' असें सांगतों. '**तथाहि०**'–त्याविषयीं तुल्यदर्शन कसें आहे तें पहा–" पूर्वी होऊन गेलेले विद्वान्–हें तत्त्व जाणणारे कावषेय ऋषि 'आम्ही अध्ययन कशासाठीं करणार, आम्ही यज्ञ कशासाठीं करणार,' असें म्हणत असत. " " या पूर्वोक्त वाक्-प्राणांच्या परस्पर होमात्मक अग्निहोत्राला जाणणारे प्राचीन विद्वान्–प्राणोपासक अग्निहोत्राहवन करीत नव्हते. "–कौ.२.५. –"याच त्या आत्म्याला जाणून ब्राह्मण पुत्रैषणा, वित्तैषणा व लोकैषणा यांपासून व्युत्थान करून भिक्षाचर्य करितात. "–बृ. ३. ५. १.–ही अशा प्रकारची श्रुति आहे. [–आणि याहि कारणानें विद्येला कर्मशेषत्व नाहीं, असें '**याज्ञवल्क्य०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]

**भाष्यं—याज्ञवल्क्यादीनामपि ब्रह्मविदामकर्मनिष्ठत्वं दृश्यते—' एतावदरे खल्वमृतत्वमिति होक्त्वा याज्ञवल्क्यो प्रवव्राज ' इत्यादिश्रुतिभ्यः ॥**

**भाष्यार्थ**—ब्रह्मज्ञ याज्ञवल्क्यादिकांचेंहि अकर्मनिष्ठत्व दिसतें. [–येथील'आदि-' शब्दानें शुकादिकांचें ग्रहण केलें जातें.–' त्यांचें अकर्मनिष्ठत्व कसें ? ' '**एताव-दरे०**' इत्यादि भाष्यानें उत्तर–]–" हे मैत्रेयि, अमृतत्वसाधन खरोखर एवढेंच आहे, असें बोलून याज्ञवल्क्य प्रव्रजन–संन्यास करिता झाला. "–बृ.४.५.१५.–इत्यादि श्रुतींवरून त्यांचें अकर्मनिष्ठत्व दिसतें. [–'**अपि च०**' या भाष्यानें

उभयथालिंगदर्शन होत असल्यामुळें संशयाची आशंका घेऊन परकीय लिंगाची अन्यथासिद्धि सांगण्यास आरंभ करितात–]

**भाष्यं—अपि च 'यक्ष्यमाणो वै भगवन्तोऽहमस्मि' इत्येतल्लिंगदर्शनं वैश्वानरविद्याविषयम् । संभवति च सोपाधिकायां ब्रह्मविद्यायां कर्मसाहित्यदर्शनम् । न त्वत्रापि कर्मांगत्वमस्ति । प्रकरणाद्यभावात् ॥ ९ ॥ यत्पुनरुक्तं—'तच्छ्रुतेः' इति । अत्र ब्रूमः—**

**भाष्यार्थ**—शिवाय दोन्ही प्रकारच्या लिंगदर्शनाविषयीं आशंका घेणेंहि उचित नाहीं. कारण वाद्यानें दाखविलेलें लिंग अन्यथासिद्ध आहे. [–त्यांतील 'यक्ष्यमाण' इत्यादि लिंगाची अन्यथासिद्धि '**यक्ष्यमाणः**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]="अहो पूज्यहो, मी यज्ञ करणार आहें"–पृ.५०३–असें हें लिंगदर्शन वैश्वानरविद्याविषय आहे, वैश्वानरविद्यासंबंधी आहे. [–"अहो पण, त्यांतहि विद्यात्व असल्यामुळें कर्मांचा सहभाव नाहीं. नाहींतर ब्रह्मविद्येमध्येंहि त्याचा प्रसंग येईल!" अशी आशंका घेऊन '**संभवति०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=आणि सोपाधिक ब्रह्मविद्येमध्यें कर्मांचें साहित्यदर्शन संभवतें. [–"तर मग वैश्वानरविद्येला स्वातंत्र्यानें फलवत्त्व नाहीं. कारण तिच्या कर्मांगत्वाचा अंगीकार केलेला आहे." '**न त्वत्रापि०**' इत्यादि भाष्यानें उत्तर–]=पण येथेंहि कर्मांगत्व नाहीं. कारण येथें कर्मप्रकरणादिकांचा अभाव आहे. [आणि ज्या ब्रह्मवेत्त्यांचेंहि कर्म दिसतें तें त्यांचें कर्म नव्हे. कारण जें चोदनालक्षण–विधिप्राप्त तेंच कर्म होय. पण ब्रह्मवेत्त्याच्या ठिकाणीं अहं-ममाभिमानाच्या अभावानें चोदनेचा अभाव असल्यामुळें तें यथाकथंचित्–बाधितानुवृत्तीनें जरी अनुवृत्त होत असलें तरी तें आभासमात्र आहे, असा भावार्थ.]९. [–परोक्तश्रुतीचा अनुवाद करून तिच्या उत्तरत्वानें सूत्राला प्रवृत्त करितात–]='**यत्पुनः०**'–पण 'तच्छ्रुतेः०'–पृ.५०४–असें जें म्हटलें आहे, त्याविषयीं आम्ही '**असार्वत्रिकी**' या सूत्रानें असें म्हणतों—

## सूत्रं–असार्वत्रिकी ॥ १०

**सूत्रार्थ**—'यदेव विद्यया करोति' ही श्रुति असार्वत्रिकी आहे. ती सर्वविद्यांना उद्देशून नाहीं, तर केवळ प्रकृत उद्गीथ विद्येला उद्देशून आहे.१०.–सु.ब्र.३९०.– [–'**यदेव०**' इत्यादि भाष्यानें सूत्राचा विभाग–]

**भाष्यं—'यदेव विद्यया करोति' इत्येषा श्रुतिर्न सर्वविद्याविषया । प्रकृतविद्याभिसंबंधात् प्रकृता चोद्गीथविद्या 'ओमित्येतदक्षरमुद्गीथमुपासीत' इत्यत्र** १०

**भाष्यार्थ**—' जें विद्येनें करितो '—छां. १. १. १०.–अशी ही श्रुति सर्वविद्याविषय नाहीं. [–' सामान्यविषय असलेल्या व विशेषाची आकांक्षा करणाऱ्या विद्याशब्दाला प्राकरणिक–प्रकरणप्राप्त विशेषानें चरितार्थत्व आहे ' असा हेतु ' **प्रकृत०** ' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=प्रकृतविद्येच्या अभिसंबंधामुळें ती श्रुति सार्वत्रिकी–सर्वविद्यासंबंधी नाहीं. [–' आत्मज्ञानालाच प्रकृतविद्यात्व आहे ' या आशंकेचें निरसन–]=आणि ' ओं, अशा या उद्गीथ अक्षराची उपासना करावी ' या वचनांत उद्गीथविद्या प्रकृत आहे. १०. [–' **विभागः०** ' इत्यादि सूत्रानें परकीय लिंगान्तराला दूषित करितात–]

**सूत्रं–विभागः शतवत् ॥ ११**

**सूत्रार्थ**—' विद्याकर्मणी०' या वाक्यांतील विद्या निराळ्या फलाचा आरंभ करिते व कर्म निराळ्या फलाचा आरंभ करितें, असा ' या दोघां विद्वानांना शंभर मोहरा द्या ' याप्रमाणें विभाग जाणावा. ११.–सु.ब्र.३९०.–[–'**यदपि०**' इत्यादि भाष्यानें चोद्याचा–आक्षेपाचा अनुवाद करून त्याच्या उत्तरत्वानें सूत्राचें व्याख्यान करितात–]

**भाष्यं—यदप्युक्तं ' तं विद्याकर्मणी समन्वारभेते ' इत्येतत्समन्वारंभवचनं अस्वातंत्र्ये विद्याया लिंगमिति तत्प्रत्युच्यते । विभागोऽत्र द्रष्टव्यो—विद्यान्यं पुरुषमन्वारभते कर्मान्यमिति । शतवत् । यथा शतमाभ्यां दीयतामित्युक्ते विभज्य दीयते पंचाशदेकस्मै पंचाशदपरस्मै तद्वत् ॥**

**भाष्यार्थ**—' विद्या व कर्म त्याच्याबरोबर जातात '–पृ. ५०४–असें हें समन्वारंभवचन विद्येच्या अस्वातंत्र्याविषयीं लिंग आहे, असेंहि जें म्हटलें आहे, त्याचें प्रत्याख्यान केलें जातें. विद्या अन्य पुरुषाच्या मागून जाते व कर्म अन्य पुरुषाच्या बरोबर जातें, असा येथें विभाग जाणावा. [–' पण सामान्यश्रुतीमध्यें असा विभाग कसा होऊं शकेल ? ' अशी आशंका घेऊन सदृष्टान्त समाधान सांगतात–]=' शतवत् '–शंभराप्रमाणें. जसें ' या दोघांना शंभर द्या ' असें म्हटलें असतां त्यांतील पन्नास एकाला व पन्नास दुसऱ्याला, असे विभागून दिले जातात त्याप्रमाणें. [–समन्वारंभवचनाचा विषय मुमुक्षु आहे, असें मानून कर्मसाहित्यानें –कर्मसहभावानें तें लिंग विभागानें जाणावें असें सांगितलें. आतां अमुमुक्षुविषयत्वामुळें अविभागांतहि कांहीं दोष नाहीं, असें ' **न च०** ' इत्यादि सांगतात–]

**भाष्यं—न चेदं समन्वारंभवचनं मुमुक्षुविषयम् ' इति नु कामयमानः ' इति संसारिविषयत्वोपसंहारात् । ' अथाकामयमानः ' इति च मुमुक्षोः पृथगुपक्रमात् । तत्र संसारिविषये विद्या विहिता प्रतिषिद्धा च परिगृह्यते । विशेषा-**

**भावात्। कर्मापि विहितं प्रतिषिद्धं च। यथाप्राप्तानुवादित्वात्। एवं सति अविभागेनापीदं समन्वारंभवचनं अवकल्पते ॥ ११ ॥ यच्चैतत् 'तद्वतो विधानात्' इत्यत उत्तरं पठति—**

**भाष्यार्थ**—आणि हें समन्वारंभवचन मुमुक्षुविषय नाहीं. कारण 'याप्रमाणेंच खरोखर कामयमान पुरुष संसार करितो'–बृ. ४. ४. ६.–असा संसारिविषयत्वाचा उपसंहार केलेला आहे. त्यामुळें हें वचन मुमुक्षुविषय नाहीं. [–'**अथ०**' इत्यादि भाष्यानें त्या वचनाच्या अमुमुक्षुविषयत्वाविषयीं हेत्वंतर सांगतात–]=आणि "आतां अकामयमानः०"–बृ. ४. ४. ६–असा मुमुक्षूचा पृथक् उपक्रम केलेला असल्यामुळेंहि तें वचन मुमुक्षूसाठीं नाहीं. [–आतां संसारिविषय असलेल्या 'तं विद्या०' इत्यादि वाक्यांतील विद्याशब्दाचा अर्थ '**तत्र०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=त्या संसारिविषय वाक्यांत उद्गीथादिविषय विहित विद्या व नग्न स्त्रीदर्शनादिरूप प्रतिषिद्ध विद्या ग्रहण केली जाते. कारण त्या विद्येच्या विशेषाचा अभाव आहे. [म्ह० तो विद्याशब्द सामान्यविद्यावाची आहे, विशेष विद्यावाची नाहीं.–विहित-प्रतिषिद्धरूप कर्माच्या साहचर्यामुळेंहि त्यांतील विद्या तसलीच –विहित-प्रतिषिद्धरूपच घेतली पाहिजे, असें '**कर्मापि०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=त्या समन्वारंभवाक्यांतील कर्महि विहित व प्रतिषिद्धच आहे. [–पण या प्रकृत वाक्यांतहि विद्या व कर्म यांचें अविशेषानें ग्रहण करण्याचें कारण '**यथा०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=कारण त्या वाक्याला यथाप्राप्तानुवादित्व आहे. [कर्म व विद्या हीं जशीं प्राप्त आहेत तसल्याच त्यांचा अनुवाद हें वाक्य करितें. त्यामुळें त्यांतील विद्या व कर्म यांचा विहित-निषिद्ध विद्या व विहित-निषिद्ध कर्म, असाच अर्थ जाणावा.–याप्रमाणें या उक्तार्थ वाक्याला संसारिविषयत्व आहे, असें सिद्ध झालें असतां '**एवं०**' इत्यादि भाष्यानें फलित सांगतात–]=असें असल्यामुळें हें समन्वारंभवचन अविभागानेंहि उपपन्न होतें. ११. [–'**यच्चैतत्०**' इत्यादि भाष्यानें लिंगान्तराचा अनुवाद करून सूत्राचें आदान–ग्रहण करितात–]='तद्वतो विधानात्'–विद्यावानाच्याच कर्माचें विधान केलेलें असल्यामुळें, असें जें वाद्यानें वर–पृ.५०५–म्हटलें आहे, त्याचें उत्तर '**अध्ययनमात्रवतः**' या सूत्रानें पढतात–

**सूत्रं—अध्ययनमात्रवतः ॥ १२**

**सूत्रार्थ**—'आचार्यकुलात्०' इत्यादि वाक्यांत केवळ वेदाध्ययन केलेल्या पुरुषासाठीं कर्माचें विधान केलें आहे. औपनिषद आत्मज्ञानी पुरुषासाठीं तें केलेलें नाहीं. १२–सु. ब्र. ३९०–[–'**आचार्य०**' इत्यादि भाष्यानें सूत्राचें विवरण—]

**भाष्यं**—'आचार्यकुलाद्वेदमधीत्य' इत्यत्र अध्ययनमात्रस्य श्रवणादध्ययनमात्रवत एव कर्मविधिरित्यध्यवस्यामः। नन्वेवं सति अविद्यत्वादनधिकारः कर्मसु प्रसज्यते। नैष दोषः। न वयमध्ययनप्रभवं कर्मावबोधनं अधिकारकारणं वारयामः। किं तर्ह्यौपनिषदमात्मज्ञानं स्वातंत्र्येणैव प्रयोजनवत्प्रतीयमानं न कर्माधिकारकारणतां प्रतिपद्यत इत्येतत्प्रतिपादयामः। यथा च न क्रत्वंतरज्ञानं क्रत्वंतराधिकारेणापेक्ष्यते, एवमेतदपि द्रष्टव्यमिति ॥ १२ ॥ यदप्युक्तं 'नियमाच्च' इत्यत्राभिधीयते—

**भाष्यार्थ**—'आचार्यकुलापासून वेदाचें अध्ययन करून'—पृ. ५०५—अशा या श्रुतींत केवल अध्ययनाचेंच श्रवण असल्यामुळें केवल अध्ययन केलेल्याच पुरुषाचा कर्मविधि—त्याच्यासाठींच कर्माचें विधान आहे, असा आम्ही निश्चय करितों. [—'अध्ययनमात्र' येथील 'मात्र-'शब्दग्रहणानें अर्थज्ञानमात्राचा—सर्वच अर्थज्ञानाचा व्यवच्छेद—व्यावृत्ति केली आहे, असें मानणारा पूर्ववादी '**ननु०**' इत्यादि भाष्यानें शंका घेतो—]=अहोपण, अध्ययनमात्रवानालाच उद्देशून कर्मविधि आहे, असें मानिल्यास अविद्यत्वामुळें—विद्याविहीनत्वामुळें त्याचा कर्मामध्यें अनधिकार प्राप्त होईल! [—पण येथील 'मात्र-'ग्रहण आत्मज्ञानाच्या अपेक्षेनें आहे. कर्मावबोधाच्या अपेक्षेनें नाहीं, असें '**नैष दोषः०**' इत्यादि भाष्यानें सांगतात—]=हा दोष येत नाहीं. आम्ही अध्ययनापासून होणाऱ्या अधिकारकारणभूत कर्मावबोधाचें निवारण करीत नाहीं. तर मग काय? स्वतंत्रपणेंच प्रयोजनवान्—सफल प्रतीत होणारें औपनिषद आत्मज्ञान कर्माधिकारकारणत्वास प्राप्त होत नाहीं, असें हें प्रतिपादन करितों.[—"अहोपण, आत्म्याला वेदार्थत्व असल्यामुळें कर्मावबोधाप्रमाणें आत्मज्ञानहि कर्माधिकारांत अपेक्षितव्य आहे," अशी आशंका घेऊन '**यथा च०**' इत्यादि भाष्यानें म्हणतात—]=ज्याप्रमाणें एका क्रतूचें ज्ञान दुसऱ्या क्रतूच्या अधिकाराकडून अपेक्षित नसतें—एका क्रतूच्या ज्ञानाची दुसऱ्या क्रतूच्या अधिकाराला अपेक्षा नसते तसेंच हेंहि जाणावें. ['इति-'शब्द पूर्वसूत्राच्या व्याख्येची समाप्ति सुचवितो.] १२. [—लिंगान्तराचा अनुवाद करून पुढील सूत्राचें ग्रहण—]='**यदप्युक्तं०**'—आणि 'नियम असल्यामुळें'—पृ. ५०६—असेंहि जें म्हटलें आहे त्याविषयीं '**नाविशेषात्०**' या सूत्रानें सांगितलें जातें—

## सूत्रं—नाविशेषात् ॥ १३

**सूत्रार्थ**—विद्वानानें कर्में करीतच शंभर वर्षें जिवंत राहण्याची इच्छा करावी, असा विशेष सांगितलेला नसल्यामुळें 'कुर्वन्नेव' हें वाक्य तत्त्ववेत्त्याला उद्देशून

नाहीं. १३. [–श्रुतींतील नियमविधान अविद्वाद्विषय आहे, असें ' **कुर्वन्नेव०** ' इत्यादि भाष्यानें सांगतात–]

**भाष्यं**—' **कुर्वन्नेवेह कर्माणि जिजीविषेत्** ' **इत्येवमादिषु नियमश्रवणेषु न विदुष इति विशेषोऽस्ति । अविशेषेण नियमविधानात् ॥ १३ ॥**

**भाष्यार्थ**—" कर्मं करीतच जिवंत राहण्याची इच्छा करावी "–पृ. ५०६– इत्यादि नियमश्रवणामध्यें ' **विदुषः** '–विद्वानाचा हा नियम आहे, असा विशेष नाहीं. कारण तशा विशेषावांचूनच त्या नियमाचें विधान केलेलें आहे. १३. [–आतां तें वाक्य विद्वद्विषय आहे, असें मानून ' **स्तुतये०** ' इत्यादि सूत्रानें दुसरा परिहार सांगतात–]

## सूत्रं—स्तुतयेऽनुमतिर्वा ॥ १४

**सूत्रार्थ**—किंवा ब्रह्मवेत्याला दिलेली ही कर्माची अनुज्ञा ब्रह्मविद्येच्या स्तुतीसाठीं आहे. १४.–सु. ब्र. ३९०. [–' तर मग प्रकरणाचा भंग झालेला नाहीं, ईशावास्योपनिषदांतहि कर्मप्रकरणच चालू आहे असें होतें' असें वादी म्हणेल, असें समजून सूत्राचें विवरण ' **कुर्वन्नेव०** ' इत्यादि भाष्यानें करितात–]

**भाष्यं**—' **कुर्वन्नेवेह कर्माणि** ' **इत्यत्रापरो विशेष आख्यायते । यद्यप्यत्र प्रकरणसामर्थ्याद्विद्वानेव कुर्वन्निति संबध्येत । तथापि विद्यास्तुतये कर्मानुज्ञानमेतद्द्रष्टव्यम् । 'न कर्म लिप्यते नरे' इति हि वक्ष्यति । एतदुक्तं भवति । यावज्जीवं कर्म कुर्वत्यपि विदुषि पुरुषे न कर्म लेपाय भवति विद्यासामर्थ्यादिति तदेवं विद्या स्तूयते ॥ १४ ॥**

**भाष्यार्थ**—आतां "कर्मं करीतच शंभर वर्षे जिवंत राहण्याची इच्छा करावी" अशा या श्रुतींतील आणखी एक विशेष सांगितला जातो. [–तो विशेषच विशद करितात–]=' **यद्यपि०** '–जरी येथें प्रकरणसामर्थ्यामुळें ' विद्वान्‌च कर्मं करीत ' असा संबंध लागेल तरी हें कर्माचें अनुज्ञान–ही कर्माची अनुज्ञा विद्येच्या स्तुतीसाठीं आहे, असें जाणावें. [–' स्तुतीसाठीं ही कर्माची अनुज्ञा आहे, याविषयीं वाक्यशेष अनुकूल करून दाखवितात–]=**'न कर्म०'**–कारण हें वचन ' पुरुषाचे ठिकाणीं कर्म लेप करीत नाहीं,'–पृ. ५०६ -असें पुढें सांगेल. [–" तथापि ही स्तुति कशी ? " ' **एतत्०** ' इत्यादि भाष्यानें उत्तर–]=यावरून हें उक्त आहे. यावज्जीव कर्म करणाऱ्याहि विद्वान् पुरुषामध्यें कर्म विद्यासामर्थ्यामुळें लेप करण्यास समर्थ होत नाहीं, अशी ही स्तुति आहे. [–'एवं'–असें कर्म करणाऱ्याहि ' त्वयि ' तुझ्या ठिकाणीं ' इतः '–या विद्यागम्य ब्रह्मभावामुळें 'न अन्यथा अस्ति'–संसार-

प्राप्ति होत नाहीं. कारण विद्वानाला ‘ कर्म न लिप्यते ’–कर्म लिप्त करीत नाहीं, अशी त्या श्रुतीची योजना मानून ‘ **तदेवं०** ’ इत्यादि भाष्यानें उपसंहार करितात–]=म्हणून अशी विद्या स्तविली जाते–विद्येची अशी स्तुति केली जाते. १४. [–याप्रमाणें पूर्वपक्षानें दिलेल्या हेतूंचें उन्मथन करून ‘ **कामकारेण०** ’ इत्यादि सूत्रानें स्वपक्षीं हेत्वन्तर सांगतात–]

## सूत्रं––कामकारेण चैके ॥ १५

**सूत्रार्थ**––‘ च एके ’–आणि ज्यांनीं तत्त्वज्ञानाचें फल प्रत्यक्ष अनुभविलें आहे असे विद्वान् परोक्ष फल देणाऱ्या प्रजादि धर्मसाधनांचा ‘ कामकारेण ’–स्वेच्छेनेंच त्याग करिते झाले, असें ‘ एतद्ध स्म वै०’ इत्यादि वचनानें श्रुत आहे. १५. –सु. ब्र. ३९०. [–याहि कारणानें विद्येला कर्मांगत्व नाहीं, असा ‘ **अपि च०** ’ या भाष्यानें सूत्रांतील ‘ **च**-’काराचा अर्थ सांगतात–]

**भाष्यं––अपि चैके विद्वांसः प्रत्यक्षीकृतविद्याफलाः सन्तः तदवष्टंभात्फलान्तरसाधनेषु प्रजादिषु प्रयोजनाभावं परामृशन्ति । कामकारेणेति श्रुतिर्भवति वाजसनेयिनाम् ‘ एतद्ध स्म वै तत्पूर्वे विद्वांसः प्रजां न कामयन्ते किं प्रजया करिष्यामो येषां नोऽयमात्माऽयं लोकः ’ इति ॥**

**भाष्यार्थ**––शिवाय आणखी याहि कारणानें विद्येला कर्मांगत्व नाहीं. [–‘आपल्या इच्छेनें कर्माचें साधन जें प्रजादि–पत्नी वगैरे त्याच्या त्यागलिंगावरूनहि विद्येला स्वातंत्र्य आहे,’ असें हेत्वंतरच विशद करितात–]=कित्येक विद्वान् ज्यांनीं विद्येचें फल प्रत्यक्ष अनुभविलें आहे असे होत्साते त्या विद्याफलाच्या आधारामुळें दुसऱ्या फलाचीं साधनें असे जे प्रजादिक त्यांमध्यें प्रयोजनाचा अभाव पाहतात. ते त्यांना व्यर्थ समजतात, त्यांतील प्रयोजनाच्या अभावाचा परामर्श करितात, “ ज्या आमचा हा–अपरोक्ष असलेला आत्मा हाच लोक–प्रत्यक्ष फल –पुरुषार्थ आहे ते आम्ही प्रजेला घेऊन काय करणार, असा निश्चय करून ते पूर्वीचे विद्वान्–आत्मज्ञ प्रजेची कामना करीत नव्हते, त्यांनीं अग्निहोत्रादिकर्म केलें नाहीं, असा याचा भावार्थ.”–पृ.५१०–अशी वाजसनेयिशाखियांची ‘ कामकारानें –स्वच्छेनें ’ अशी श्रुति आहे. [–“ अहोपण मोक्षाला अदृष्टफलत्व असल्यामुळें–मोक्ष हें दृष्ट–येथें मिळणारें साक्षात् फल नसल्यामुळें मुक्तत्वनिश्चयानें त्यांच्या प्रजादित्यागाची सिद्धि कशी होते ? ” अशी आशंका आली असतां ‘**अनुभव०**’ इत्यादि भाष्यानें तिचा परिहार सांगतात–]

**भाष्यं—अनुभवारूढमेव च विद्याफलं न क्रियाफलवत्कालान्तरभावीत्यसकृदवोचाम । अतोऽपि न विद्यायाः कर्मशेषत्वं नापि तद्विषयायाः फलश्रुतेरयथार्थत्वं शक्यमाश्रयितुम् ।। १५ ।।**

**भाष्यार्थ**—आणि अनुभवारूढच विद्येचें फल आहे, तें विद्याफल अनुभवानेंच सिद्ध झालेलें–प्रत्यक्ष आहे. विद्याफल क्रियेच्या–कर्माच्या फलाप्रमाणें कालान्तरीं प्राप्त होणारें नाहीं, असें आम्हीं वारंवार–अनेक वेळां सांगितलें आहे. [–तसेंच "ब्रह्मज्ञान क्रतुप्रयोगविधीनें ग्राह्य नाहीं. कारण त्याला क्रत्वंगसंबंधित्व जरी असलें तरी फलान्तरयोगित्व आहे. गोदोहनाप्रमाणें" असें मानून '**अतोऽपि०**' इत्यादि भाष्यानें म्हणतात–]=या कारणानेंहि विद्येला कर्मशेषत्व –कर्मांगत्व नाहीं. त्याचप्रमाणें विद्याविषय फलश्रुतीचें अयथार्थत्व आश्रय करितां येणेंहि शक्य नाहीं. १५. [–' अधिकोपदेशात् '–पृ.५०६–या सूत्रांत 'आत्मा अशनायादि-संसारधर्मांनीं रहित असल्यामुळें त्याचें ज्ञान कर्मांग नाहीं, असें सांगितलें. ' आतां त्याला अशेष क्रियादिविभागाचें उपमर्दकत्व असल्यामुळें–त्याला सर्वकर्मादि भेदांचें निवर्तकत्व असल्यामुळेंहि तें कर्मांग नव्हे, ' असें ' **उपमर्दं च०** ' या सूत्रानें सांगतात–]

## सूत्रं—उपमर्दं च ।। १६

**सूत्रार्थ**—आणि कर्माधिकारहेतूंच्या स्वरूपनाशाचें कथन केलें आहे. त्यामुळेंहि विद्या कर्मांग नव्हे. १६.–सु. ब्र. ३. [–' **अपि च०** ' इत्यादि भाष्यानें सूत्रांतील ' च-'काराचा अर्थ–]

**भाष्यं—अपि च कर्माधिकारहेतोः क्रियाकारकफललक्षणस्य समस्तस्य प्रपंचस्याविद्याकृतस्य विद्यासामर्थ्यात्स्वरूपोपमर्दमामनन्ति–' यत्र त्वस्य सर्वमात्मैवाभूत्तत्केन कं पश्येत्तत्केन कं जिघ्रेत् ' इत्यादिना । वेदान्तोदितात्मज्ञानपूर्विकां तु कर्माधिकारसिद्धिं प्रत्याशासानस्य कर्माधिकारोच्छित्तिरेव प्रसज्येत । तस्मादपि स्वातंत्र्यं विद्यायाः ।। १६ ।।**

**भाष्यार्थ**—शिवाय आणखी याहि कारणानें आत्मज्ञान कर्मांग नव्हे. [–'**कर्माधिकारहेतोः०** ' या भाष्यानें तें कारणान्तरच विशद करितात–]=**कर्माधिकार**-हेतुभूत क्रिया-कारक-फललक्षण समस्त अविद्याकृत प्रपंचाच्या **स्वरूपाचा** विद्यासामर्थ्यामुळें उपमर्द–नाश " पण ज्या विद्यावस्थेंत याचें सर्व आत्माच झालें त्या अवस्थेंत हा विद्वान् कोणत्या साधनानें कोणत्या विषयाला पाहणार, कोणत्या साधनानें कोणाचा वास घेणार ! "–बृ. २. ४. १४. इत्यादि वाक्यानें पठित

आहे. [ वाजसनेयिशाखाध्यायी विद्यासामर्थ्यामुळें अविद्याकृत कर्माधिकारहेतुभूत प्रपंचाचा उपमर्द प्रस्तुत वाक्यानें सांगतात, असा भावार्थ.—याप्रमाणें विद्यासामर्थ्यानें प्रपंचाचा उपमर्द—नाश—निवृत्ति—बाध होतो, असें झालें असतां फलित सांगतात—]=पण वेदान्तानें सांगितलेल्या आत्मज्ञानाची प्राप्ति झाल्यावर—वेदान्तोक्त आत्मज्ञानपूर्वक कर्मांच्या अधिकाराची सिद्धि होते, अशी आशा करणाऱ्या मीमांसकाच्या कर्माधिकाराचा उच्छेदच—नाशच प्राप्त होईल, कर्माधिकाराच्या निवृत्तीचाच प्रसंग येईल. [—याप्रमाणें आत्मज्ञान ग्रहण केल्या जाणाऱ्या क्रत्वंगाशीं विरोधी आहे, असें झालें असतां फलिताचें निगमन करितात—]=**'तस्मात्०'**—त्यामुळेंहि आत्मज्ञानाला स्वातंत्र्य आहे. १६. [—**'ऊर्ध्वरेतःसु च०'** इत्यादि सूत्रानें विद्येच्या स्वातंत्र्याविषयीं हेत्वन्तर—]

## सूत्रं—ऊर्ध्वरेतःसु च शब्दे हि ॥ १७ ॥ (१)

**सूत्रार्थ**—आणि 'ऊर्ध्वरेत्यांच्या आश्रमांमध्यें ' विद्या श्रुत आहे. कारण वैदिक शब्दांत त्यांचे आश्रम अवगत होतात. १७ ( १ )—सु. ब्र.३९१. [—' विद्या व कर्म अंगांगिभूत नाहींत. कारण त्यांना परस्पर व्यतिरेकित्व आहे. त्यांचा परस्पर भेद आहे. ऋतुगमन व नैष्ठिकव्रत यांप्रमाणें.' असें मानून **'ऊर्ध्वरेतःसु०'** इत्यादि भाष्यानें सूत्राची योजना करितात—]

**भाष्यं—ऊर्ध्वरेतःसु चाश्रमेषु विद्या श्रूयते । न च तत्र कर्मांगत्वं विद्याया उपपद्यते । कर्माभावात् । न ह्यग्निहोत्रादीनि वैदिकानि कर्माणि तेषां सन्ति ॥**

**भाष्यार्थ**—आणि ऊर्ध्वरेत्यांच्या—यतींच्या आश्रमांमध्यें विद्या श्रुत आहे. [—"तथापि विद्येच्या कर्मांगत्वाची निवृत्ति कशी केली जाते ?" **'न च तत्र०'** इत्यादि भाष्यानें उत्तर—]=त्या आश्रमांमध्यें विद्येचें कर्मांगत्व उपपन्न होत नाहीं. **'कर्माभावात्'**—कारण ऊर्ध्वरेत-आश्रमांत—पारिव्राज्यांत कर्मांचा अभाव आहे. [—'पण त्यांचें स्नानादि कर्म आहे ' **'न हि०'** इत्यादि भाष्यानें उत्तर—]=त्यांचीं वैदिक अग्निहोत्रादि कर्में नाहींत, हें प्रसिद्ध आहे. [ बाधितानुवृत्तीनें त्यांचीं स्नानादि कर्में जरी असलीं तरी वैदिक अग्निहोत्रादि कर्मांचा अभाव असल्यामुळें त्यांच्या ज्ञानाला कर्मांगत्व नाहीं, असा भावार्थ.—' शब्दे हि' या सूत्रावयवानें व्यावर्त्य असलेली शंका **'स्यादेतत्०'** इत्यादि भाष्यानें सांगतात—]

**भाष्यं—स्यादेतत् । ऊर्ध्वरेतस आश्रमा न श्रूयन्ते वेद इति । तदपि नास्ति । तेऽपि हि वैदिकेषु शब्देष्ववगम्यन्ते 'त्रयो धर्मस्कंधाः' 'ये चेमेऽरण्ये श्रद्धा तप इत्युपासते' 'तपःश्रद्धे ये ह्युपवसन्त्यरण्ये' 'एतमेव प्रव्राजिनो लोकमिच्छन्तः**

**प्रव्रजन्ति ' " ब्रह्मचर्यादेव प्रव्रजेत् " इत्येवमादिषु । प्रतिपन्नाप्रतिपन्नगार्हस्थ्यानां अपाकृतानपाकृतर्णत्रयाणां चोर्ध्वरेतस्त्वं श्रुतिस्मृतिप्रसिद्धम् । तस्मादपि स्वातंत्र्यं विद्याया इति** ॥ १७ ॥ (१)

**भाष्यार्थ**--यावर शंकाकार 'ऊर्ध्वरेत्यांचे-यतींचे आश्रम वेदामध्यें श्रुत नाहींत' अशी शंका घेईल. [-सूत्रावयवानें उत्तर-]=पण तेंहि नाहीं. कारण ऊर्ध्वरेत्यांचेहि आश्रम वैदिक शब्दांमध्यें अवगत-ज्ञात होतात. "तीन धर्मस्कंध -कर्मप्रधान आश्रम आहेत व चवथा ब्रह्मसंस्थ आहे. "-छां. २. २३.१- " जे हे अरण्यांत श्रद्धा, तप अशी उपासना करितात "-छां. ५. १०. १- " जे तप, श्रद्धा, यांची अरण्यांत उपासना करितात "-मुं. १.२. ११.-" याच लोकाची इच्छा करणारे त्यागशील विद्वान् संन्यास करितात "-बृ. ४. ४. २२- " ब्रह्मचर्यापासूनच प्रव्रजन करितात "-जा.४.१.-सु.उ.पृ.६७८-इत्यादि वैदिक शब्दांमध्यें ऊर्ध्वरेत्यांचे-संन्याश्यांचे आश्रमहि अवगत होतात. [-" हें पारिव्राज्य -हा संन्यास कर्मांचे अधिकारी नसलेले जे अंधादिक त्यांच्यासाठीं आहे" अशी आशंका घेऊन '**प्रतिपन्न०**' इत्यादि भाष्यानें म्हणतात-]=ज्यांनीं गृहस्थाश्रमाचा स्वीकार केला आहे व ज्यांनीं त्याचा स्वीकार केलेला नाहीं, आणि ज्यांनीं ऋणत्रयाचें अपाकरण केलें आहे व ज्यांनीं त्याचें अपाकरण केलेलें नाहीं अशा पुरुषांचें ऊर्ध्वरेतस्त्व-यतित्व श्रुति-स्मृतिप्रसिद्ध आहे. [ 'ब्रह्मचर्यापासूनच प्रव्रजन करावें' ही श्रुति वर दाखविली आहे. 'कित्येक त्याचा आश्रमविकल्प सांगतात. ज्या आश्रमाची इच्छा असेल त्यांत त्यानें रहावें' इत्यादि अर्थाच्या 'तस्याश्रमविकल्पमेके ब्रुवते' 'यमिच्छेत्तमावसेत्' या स्मृतींचें उदाहरण द्यावें. -याप्रमाणें ऊर्ध्वरेत्यांच्या आश्रमांमध्यें विद्येची सिद्धि झाली असतां फलित सांगतात-]='**तस्मात्०**'--म्हणूनहि-संन्यासनिष्ठत्वामुळेंहि विद्येला स्वातंत्र्य आहे.

---

१ **रत्नप्रभा**--'पुरुष ब्रह्मचर्यानें ऋषींच्या, यज्ञानें देवांच्या व प्रजेनें पितरांच्या ऋणांतून मुक्त होतो' अशा अर्थाची श्रुति व 'तीन ऋणांचें अपाकरण करून मन मोक्षामध्यें प्रविष्ट करावें. त्यांची निवृत्ति न करितां जो मोक्षमार्गाचें सेवन करितो त्याचा अधःपात होतो' अशा अर्थाची स्मृति असल्यामुळें 'ज्याला गार्हस्थ्य प्राप्त झालें आहे व ज्यानें या तीन ऋणांचें अपाकरण केलें आहे त्याचेंच पारिव्राज्य विहित आहे,' अशीहि शंका करूं नये. कारण 'ब्रह्मचर्यादेव प्रव्रजेत्' इत्यादि विधिश्रुति-स्मृतींच्या विरोधानें अर्थवादश्रुति-स्मृतींना अविरक्तविषयत्व आहे, असा बोध होतो, असें सांगतात-

[ तिला स्वातंत्र्य आहे, असें झालें असतां केवल विद्येची मुक्तिफलता सिद्ध झाली, असें सांगण्यासाठीं भाष्यांत शेवटीं 'इति' असें म्हटलें आहे.–सु.ब्र.३९२]१७.(१)

( २. परामर्शाधिकरण. सू. १८-२०. )

—पूर्वाधिकरणांतील एका अवान्तर सूत्राशीं या अधिकरणाची आक्षेपलक्षण-संगति सांगण्याची इच्छा करणारे सूत्रकार '**परामर्श०**' या सूत्रानें आक्षेप करितात–

**सूत्रं—परामर्शं जैमिनिरचोदना चापवदति हि ॥ १८**

**सूत्रार्थ**—जैमिनि-आचार्य संन्यासाश्रम नाहीं. त्याचा केवल परामर्श–अनुवाद **अवगत** होतो. विधि नाहीं, असें मानितो. 'त्रयो धर्मस्कंधाः' ही श्रुति 'अचोदना' –लिङादिरहित आहे. ती ब्रह्मसंस्थास्तुतिपर आहे. 'वीरहा०' इत्यादि श्रुति त्या **आश्रमाचा** अपवाद करिते. 'हि'–म्हणून यत्याश्रम नाहीं.१८.–सु. ब्र. ३९३– [–ऊर्ध्वरेतःसंज्ञक पारिव्राज्य–संन्यास **अनुष्ठेय** नाहीं कीं तें अनुष्ठेय–आचरण्यास **योग्य आहे**, असा त्याचें भ्रांतिमूलत्व व प्रमाणमूलत्व यांच्या योगानें संशय आला **असतां** '**त्रयोधर्मस्कंधाः०**' इत्यादि भाष्यानें पूर्वपक्ष करितात–]

**भाष्यं**—'**त्रयो धर्मस्कंधाः**' **इत्यादयो ये शब्दा ऊर्ध्वरेतसामाश्रमाणां सद्भावायोदाहृताः । न ते तत्प्रतिपादनाय प्रभवन्ति । यतः परामर्शमेषु शब्देष्वाश्रमान्तराणां जैमिनिराचार्यो मन्यते न विधिम् । कुतः । न ह्यत्र लिङादीनामन्यतमश्चोदनाशब्दोऽस्ति । अर्थान्तरपरत्वं चैषु प्रत्येकमुपलभ्यते ॥**

**भाष्यार्थ**—'तीन धर्मस्कंध–कर्मप्रधान आश्रम व चवथा ब्रह्मसंस्थ'–पृ.५१९– इत्यादि जे शब्द ऊर्ध्वरेत्यांच्या–यतींच्या आश्रमांच्या सद्भावाविषयीं वर उदाहृत **आहेत** ते त्यांचें प्रतिपादन करण्यास समर्थ नाहींत. कारण जैमिनि-आचार्य त्या शब्दांमध्यें दुसऱ्या आश्रमांचा परामर्श मानितो, विधि मानीत नाहीं. [या अधिकरणांत शास्त्रीय सम्यग्ज्ञानाच्या अन्तरंग साधनांच्या प्रसंगानें अनुष्ठेय सांगितलें जातें, त्यामुळें याच्या स्पष्ट पादादिसंगति आहेत. पूर्वपक्षांत 'पारिव्राजकांत विद्येची प्र-सिद्धि–आधिक्यानें सिद्धि होते, या म्हणण्याला विभ्रमत्व–भ्रामकत्व असल्यामुळें विद्येच्या स्वातंत्र्याची असिद्धि' व सिद्धान्तांत 'विद्येला पारिव्राजकांत प्रामाणिकत्व असल्यामुळें तिच्या स्वातंत्र्यची सिद्धि' असें मानून–'परामर्शं जैमिनिः' या सूत्रांशाचें व्याख्यान करून त्याविषयीं हेतूची आक्षांका झाली असतां 'अचोदना' या सूत्रावयाचें हेतुत्वानें व्याख्यान–]='**कुतः०**'–कोणत्या कारणानें ? **कारण** येथें लिङ्, लोट्, तव्य या चोदनाशब्दांतील एकहि चोदनाशब्द–विधिवाचक शब्द नाहीं. [–" अहोपण, 'पूषा प्रपिष्टभागः' याप्रमाणें येथें विधीची

कल्पना केली जावी" अशी आशंका घेऊन वादी 'या वाक्यजाताला ब्रह्मसंस्थतादिविधिपरत्व असल्यामुळें असें म्हणतां येत नाहीं' असा सूत्रांतील 'च-' शब्दाचा अर्थ '**अर्थान्तर०**' इत्यादि भाष्यानें सांगतो-]=आणि यांतील प्रत्येकामध्यें अर्थान्तरपरत्व उपलब्ध होतें. [-त्यांतील 'त्रयः' इत्यादि वाक्याचें ब्रह्मसंस्थतादिविधिपरत्व '**त्रयः०**' इत्यादि भाष्यानें साधितो-]

**भाष्यं—'त्रयो धर्मस्कंधाः' इत्यत्र तावत् 'यज्ञोऽध्ययनं दानमिति प्रथमस्तप एव द्वितीयो ब्रह्मचार्याचार्यकुलवासी तृतीयोऽत्यंतमात्मानमाचार्यकुलेऽवसादयन्सर्वे एते पुण्यलोका भवन्ति' इति परामर्शपूर्वकमाश्रमाणां अनात्यंतिकफलत्वं संकीर्त्य आत्यंतिकफलतया ब्रह्मसंस्थता स्तूयते-'ब्रह्मसंस्थोऽमृतत्वमेति' इति ॥**

**भाष्यार्थ**—अगोदर 'तीन धर्मस्कंध' या वाक्यांत 'यज्ञ, अध्ययन, दान, असा हा पहिला, तप हाच दुसरा, आचार्यकुलवासी ब्रह्मचारी, आपल्याला आचार्यकुलांत अत्यंत क्षीण करणारा तिसरा. हे सर्व पुण्यलोक होतात, या सर्वांना पुण्यलोकाची प्राप्ति होते.' अशा परामर्शपूर्वक आश्रमांचें अनित्यफलत्व सांगून 'ब्रह्मसंस्थ अमृतत्वास प्राप्त होतो'-छां.२.२३.१.सु.उ.३४३-अशी नित्यफलत्वानें ब्रह्मसंस्थतेची स्तुति केली जाते. [-'अहोपण, अन्यत्र विहित असलेल्याचा अन्यत्र परामर्श-अनुवाद केला जात असल्यामुळें अन्यत्र विधिकल्पना करण्यापेक्षां येथेंच विधिकल्पना करणें यांत लाघव आहे' अशी 'ननु०' इत्यादि भाष्यानें शंका-]

**भाष्यं-ननु परामर्शेऽप्याश्रमा गम्यन्त एव। सत्यं गम्यन्ते। स्मृत्याचाराभ्यां तु तेषां प्रसिद्धिर्न प्रत्यक्षश्रुतेः। अतश्च प्रत्यक्षश्रुतिविरोधे सत्यनादरणीयास्ते भविष्यन्ति। अनधिकृतविषया वा ॥**

**भाष्यार्थ**—"अहोपण, हा परामर्श आहे, असें जरी म्हटलें तरी आश्रम अवगत होतातच!" [-अनुवादसंज्ञक परामर्शाला पूर्ववादाची अपेक्षा असल्यामुळें म्ह० अनुवादाला पूर्ववादापेक्षत्व असल्यामुळें त्या पूर्ववादाच्या सामर्थ्यानें आश्रमांची प्रतीति होते, या म्हणण्याचा वादी '**सत्यं०**' इत्यादि भाष्यानें अंगीकार करितो-]=होय, अनुवादावरूनहि आश्रम अवगत होतात, हें खरें आहे; [-"तर मग तद्विषय श्रुतीला अन्यत्र आश्रितत्व असल्यामुळें-ती अन्य श्रुतीचा आश्रय करून राहिलेली असल्यामुळें गौरवदोष येतो" अशी आशंका घेऊन वादी '**स्मृत्याचाराभ्यां०**' इत्यादि भाष्यानें म्हणतो-]=पण स्मृति व आचार यांच्या योगानें त्यांची प्रसिद्धि आहे. प्रत्यक्ष श्रुतीवरून त्यांची प्रसिद्धि नाहीं. [-"पण स्मृति व आचार यांनाहि श्रुतिमूलत्व असल्यामुळें विधियुक्त दुसऱ्या श्रुतीची

कल्पना करण्यापेक्षां या श्रुतींत विधीची कल्पना करण्यांत लाघव आहे." अशी आशंका घेऊन वादी म्हणतो–]=' **अतश्च०**'–आणि असें असल्यामुळें प्रत्यक्ष श्रुतीशीं विरोध आला असतां ते–स्मृति-आचार अनादरणीय होतात. [–' यावज्जीव अग्निहोत्राचें हवन करावें ' इत्यादि ही प्रत्यक्ष श्रुति आहे. –किंवा वादी ' निरालंबनत्वापेक्षां कसें तरी सालंबनत्व युक्त आहे, ' असा कल्पान्तर सांगतो–] =' **अनधिकृत०**–' किंवा नित्यादिकर्मांमध्यें अनधिकृत असलेले जे अंधादिक तद्विषय आश्रमान्तरश्रुति व आचार आहेत. [–" अहोपण, ' तीन धर्मस्कंध ' हा आश्रमान्तरांचा परामर्श जरी असला तरी गार्हस्थ्याप्रमाणें त्यांच्या प्रामाण्याची सिद्धि होत असल्यामुळें त्यांना अनुष्ठेयत्व आहे " अशी ' **ननु गार्हस्थ्यं०** ' इत्यादि भाष्यानें शंका–]

**भाष्यं–ननु गार्हस्थ्यमपि सहैवोर्ध्वरेतोभिः परामृष्टं ' यज्ञोऽध्ययनं दानमिति प्रथमः ' इति । सत्यमेवं । तथापि तु गृहस्थं प्रत्येव अग्निहोत्रादीनां कर्मणां विधानाच्छ्रुतिप्रसिद्धमेव हि तदस्तित्वम् । तस्मात्स्तुत्यर्थं एवायं परामर्शो न चोदनार्थः ॥**

**भाष्यार्थ**—'अहोपण, यतींच्या बरोबरच यज्ञ, दान व अध्ययन हा एक आश्रम' असें गार्हस्थ्यहि परामृष्ट आहे, त्याचाहि परामर्श केला आहे. [–वादी परामर्शसाम्याचा अंगीकार करितो–]='**सत्यमेवं०**'–होय, तेंहि त्याच्याबरोबर परामृष्ट आहे, हें खरें; [–" तर मग त्या गार्हस्थ्याप्रमाणें आश्रमान्तरांनाहि प्रामाणिकत्व तुल्य–समान आहे " अशी आशंका घेऊन 'गार्हस्थ्याची केवल परामर्शावरूनच सिद्धि होत नाहीं तर प्रत्यक्ष श्रुतिविधानावरूनहि त्याची सिद्धि होते, ' असा विशेष वादी ' **तथापि०** ' इत्यादि भाष्यानें सांगतो–]=पण तसें परामर्शसाम्य जरी असलें तरी गृहस्थाला उद्देशूनच अग्निहोत्रादि कर्मांचें विधान केलेलें असल्यामुळें त्याचें अस्तित्व श्रुतिप्रसिद्धच आहे. [–एकटें गार्हस्थ्यच श्रौत–श्रुतिप्रसिद्ध आहे, असें सिद्ध झालें असतां ब्रह्मसंस्थतास्तुत्यर्थच ' त्रयो धर्मस्कंधाः० ' इत्यादि आश्रमान्तरवचन आहे, असा ' **तस्मात्०** ' इत्यादि भाष्यानें उपसंहार–]=म्हणून हा परामर्श स्तुत्यर्थच आहे, चोदनार्थ–विधानार्थ नाहीं.[–आणि निंदा केली जात असल्यामुळेंहि आश्रमान्तर अनुष्ठेय नाहीं,असें वादी'**अपि च०**'इत्यादि भाष्यानें सांगतो-]

**भाष्यं—अपि च अपवदति हि प्रत्यक्षा श्रुतिराश्रमान्तरं ' वीरहा वा एष देवानां योऽग्निमुद्वासयते ' । ' आचार्याय प्रियं धनमाहृत्य प्रजातंतुं मा व्यवच्छेत्सीः ' ' नापुत्रस्य लोकोऽस्तीति तत्सर्वे पशवो विदुः ' इत्येवमाद्या ॥**

**भाष्यार्थ**—शिवाय, याहि कारणानें आश्रमान्तर अननुष्ठेय आहे. [–' अपवदति हि ' या सूत्रावयवाची त्या अर्थी योजना–]=कारण ' जो अग्नीचें उद्वासन करितो–अग्नीचा विच्छेद करितो तो देवांचा वीरहा–पुत्रघाती आहे ' ' आचार्याला प्रिय असलेलें धन आणून देऊन तूं आपल्या प्रजातंतूचा विच्छेद करूं नकोस ' –तै. १.११.१.–'अपुत्राला लोक नाहीं.' 'म्हणून सर्व पशु समजतात' इत्यादि श्रुति आश्रमान्तराची निंदा करिते. [–याप्रमाणें 'त्रयो धर्मस्कंधाः' या वाक्याचें अन्यार्थत्व सांगून दुसऱ्या वाक्याचेंहि तसेंच अर्थांतरपरत्व 'तथा०'इत्यादि भाष्यानें सांगतो–]

**भाष्यं**—**तथा ' ये चेमेऽरण्ये श्रद्धा तप इत्युपासते ' 'तपःश्रद्धे ये ह्युपवसन्त्यरण्ये ' इति च देवयानोपदेशो नाश्रमान्तरोपदेशः । संदिग्धं चाश्रमान्तराभिधानं ' तप एव द्वितीयः ' इत्येवमादिषु । तथा ' एतमेव प्रव्राजिनो लोकमिच्छन्तः प्रव्रजन्ति ' इति लोकसंस्तवोऽयं न पारिव्राज्यविधिः । ननु ब्रह्मचर्यादेव प्रव्रजेदिति विस्पष्टमिदं प्रत्यक्षं पारिव्राज्यविधानं जाबालानाम् । सत्यमेवमेतत् । अनपेक्ष्य त्वेतां श्रुतिमयं विचार इति द्रष्टव्यम् ॥ १८**

**भाष्यार्थ**—त्याचप्रमाणें "आणि जे हे अरण्यांत श्रद्धा, तप अशी उपासना करितात. "–पृ. ५१९–व " जे अरण्यांत राहून तप–स्वाश्रमविहित कर्मं व श्रद्धा–देवताविषय उपासना यांचें सेवन करितात "–पृ. ५१९–असा हा देवयानाचा उपदेश आहे. आश्रमान्तराचा उपदेश नाहीं. [ ' ते अर्चीला प्राप्त होतात '–सु. उ. ४०५–व ' ते सर्वपापशून्य होऊन सूर्याच्या लोकास जातात ' –सु. उ. १४०–अशा या त्या दोन्ही वाक्यांच्या शेषवाक्यामुळें तें श्रुतिवचन देवयानकथनपर आहे, असा भावार्थ.–तसेंच आश्रमवाचक शब्दाच्या अभावामुळेंहि त्याला अर्थान्तरपरत्व आहे, असें ' **संदिग्धं च०** ' इत्यादि भाष्यानें सांगतो–] =आणि 'तप हाच दुसरा आश्रम आहे'–पृ. ५२१–इत्यादि वाक्यांमध्यें आश्रमान्तरकथन संदिग्ध आहे. [–"अहोपण, 'प्रव्रजन्ति'असा आश्रमवाची शब्द उपलब्ध होत असल्यामुळें पारिव्राज्य अनुष्ठेय आहे" अशी आशंका घेऊन '**तथा०**' इत्यादि भाष्यानें वादी म्हणतो–]=त्याचप्रमाणें "याच आत्मलोकाची इच्छा करणारे संन्यसनशील पुरुष संन्यास करितात"–बृ.४.४.२२–असा हा लोकसंस्तव–लोकाची स्तुति आहे, पारिव्राज्याचा विधि नाहीं. [–हा अशा प्रकारचा विशिष्ट आत्मलोक आहे कीं याला साक्षात् जाणण्याची इच्छा करणारे दुरनुष्ठेय–अनुष्ठान करण्यास अत्यंत कठिण असलेलाहि संन्यास करितात, अशी ही स्तुति आहे, हा संन्यासाविषयीं विधि नाहीं. कारण येथें वर्तमानापदेश–वर्तमानकाली निर्देश आहे,

असा भावार्थ.–‘ **ननु०** ’ इत्यादि भाष्यानें या पूर्वपक्षावर आक्षेप–]=अहोपण, ‘ ब्रह्मचर्यापासूनच प्रव्रजन करावें ’ असें हें जाबालांचें प्रत्यक्ष विस्पष्ट विधान आहे. [–‘**सत्यं०**’ इत्यादि भाष्यानें वादी प्रत्यक्ष विधानाचा अंगीकार करितो–] =होय, असें प्रत्यक्ष विधान आहे, हें खरें आहे. [–‘ तर मग या पूर्वपक्षाची असिद्धि होते ’ अशी आशंका घेऊन ‘पण हें विधान नाहीं, असें गृहीत धरून हा विचार आहे ’ असें ‘ **अनपेक्ष्य०** ’ इत्यादि भाष्यानें सांगतात–]=पण या श्रुतीची अपेक्षा न करितांच हा विचार आहे, असें जाणावें. १८ [–‘**अनुष्ठेयं०**’ इत्यादि सिद्धान्तसूत्राला अवतरण देऊन त्याचें व्याख्यान–]

## सूत्रं—अनुष्ठेयं बादरायणः साम्यश्रुतेः ॥ १९

**सूत्रार्थ**—पारिव्राज्य–संन्यास ‘ अनुष्ठेय ’ आहे, असें भगवान् ‘ बादरायण ’ मानितात. कोणत्या कारणानें ? ‘साम्यश्रुतेः’–‘त्रयो धर्मस्कंधाः ’ इत्यादि श्रुतींत, दुसऱ्या श्रुतींत विहित असलेल्या इतर आश्रमांचें या वाक्यांत अनुवाद केलेल्या गार्हस्थ्याशीं साम्य श्रुत आहे. १९.–सु. ब्र. ३९३. [–‘ **अनुष्ठेयं०** ’ इत्यादि भाष्यानें सूत्राचें व्याख्यान–]

**भाष्यं—अनुष्ठेयमाश्रमान्तरं बादरायण आचार्यो मन्यते । वेदेऽश्रवणात् । अग्निहोत्रादीनां चावश्यानुष्ठेयत्वात्तद्विरोधादनधिकृतानुष्ठेयमाश्रमान्तरं इतीमां मतिं निराकरोति । गार्हस्थ्यवदेवाश्रमान्तरमप्यनिच्छता प्रतिपत्तव्यमिति मन्यमानः । कुतः । साम्यश्रुतेः ॥**

**भाष्यार्थ**—बादरायण आचार्य आश्रमान्तर अनुष्ठेय आहे, असें मानितात. [–‘ **वेदे०** ’ इत्यादि भाष्यानें पूर्वपक्षाचा अनुवाद करून त्याच्या निरासाच्या प्रतिज्ञेचें विवरण–]=वेदामध्यें त्याचें अश्रवण असल्यामुळें व अग्निहोत्रादिकांना अवश्य अनुष्ठेयत्व असल्याकारणानें त्याच्याशीं विरोध येत असल्यामुळें आश्रमान्तर अंधादि-अनधिकृतांकडून अनुष्ठेय आहे, अशा या मतीचें ‘गार्हस्थ्याप्रमाणेंच आश्रमान्तर त्याची इच्छा न करणाऱ्या वाद्यानें स्वीकारावें, ’ असें मानणारे बादरायण निराकरण करितात. [–‘ **कुतः०** ’ इत्यादि भाष्यानें त्याविषयीं प्रश्नपूर्वक हेतु सांगतात–]=कोणत्या कारणानें? ‘साम्यश्रुतीमुळें’ [–‘साम्यश्रुतेः’ या सूत्रोक्त हेतूचा अक्षरार्थ सांगतात–]

**भाष्यं—समा हि गार्हस्थ्येनाश्रमान्तरस्य परामर्शश्रुतिर्दृश्यते ‘ त्रयो धर्मस्कंधाः ’ इत्याद्या । यथेह श्रुत्यन्तरविहितमेव गार्हस्थ्यं परामृष्टं । एवमाश्रमा-**

**न्तरमपीति प्रतिपत्तव्यम् । यथा च शास्त्रान्तरप्राप्तयोरेव निवीतप्राचीनावीतयोः परामर्श उपवीतविधिपरे वाक्ये । तस्मात्तुल्यमनुष्ठेयत्वं गार्हस्थ्येनाश्रमान्तरस्य॥**

**भाष्यार्थ**—कारण 'त्रयो धर्मस्कंधाः'–पृ. २१९–इत्यादि आश्रमान्तराची परामर्शश्रुति गार्हस्थ्याशीं सम–तुल्य आहे. ज्याप्रमाणें येथें श्रुत्यन्तरविहितच–गार्हस्थ्य परामृष्ट आहे, तसेंच आश्रमान्तरहि श्रुत्यन्तरविहितच परामृष्ट आहे, असें समजावें. [–'त्रयो धर्मस्कंधाः' या श्रुतिवचनांतील यतींचे आश्रम श्रुत्यन्तरप्रसिद्ध असेच परामृष्ट आहेत. कारण त्यांना एतद्वाक्यपरामृष्टत्व आहे, गार्हस्थ्याप्रमाणें, असा भावार्थ. –परामर्शाला विधिपूर्वकत्व असतें याविषयीं '**यथा च**०'इत्यादि भाष्यानें दृष्टान्त–] =आणि ज्याप्रमाणें शास्त्रान्तरानें प्राप्त असलेलेंच निवीत व प्राचीनावीत, यांचा परामर्श उपवीतविधिपर वाक्यांत आहे त्याप्रमाणें. [ "मनुष्यांचें निवीत, पितरांचें प्राचीनावीत, देवांचें उपवीत, जें उपवीत केलें जातें तें देवांचें चिह्नच केलें जातें " अशा अर्थाच्या ' निवीतं मनुष्याणां० ' इत्यादि उपवीतविधिपर वाक्यांत दुसऱ्या विधीनें सिद्ध झालेल्याच निवीत-प्राचीनावीतांचा परामर्श जसा केला आहे त्याप्रमाणें येथेंहि, असा याचा अक्षरार्थ आहे. 'निवीतं मनुष्याणां० ' इत्यादि पूर्वोक्त वाक्य दर्श-पूर्णमासामध्यें श्रुत आहे. त्यांत उपवीताचें तर विधानच केलें जातें. पण ' इतरांचा–निवीत व प्राचीनावीत यांचा तेथें विधि आहे कीं अर्थवाद ' असा संशय आला असतां ' अपूर्व अर्थाचा लाभ होत असल्यामुळें व मनुष्यशब्दाला मनुष्यप्राधान्यवाचित्व असल्यामुळें आतिथ्य कर्मामध्यें निवीत व पित्र्य कर्मामध्यें प्राचीनावीत ' असा पूर्वपक्ष प्राप्त झाला असतां 'मनुष्यांच्या कर्मामध्यें सौकर्यासाठीं कंठांत लोंबणारें वस्त्र धारण करणें किंवा देहार्धबंधन, या निवीताला प्राप्तत्व असल्यामुळें व प्राचीनावीताची पितृयज्ञांत दुसऱ्या वाक्यानें प्राप्ति होत असल्यामुळें त्यांच्या अनुवादानें ' निवीतं० ' इत्यादि वाक्य हा उपवीताची स्तुति करण्यासाठीं अर्थवाद आहे,' असें पूर्वमीमांसेंत सिद्ध झालें आहे. त्याचप्रमाणें ' त्रयो धर्मस्कंधाः० ' इत्यादि परामर्श श्रुतींतहि गार्हस्थ्याप्रमाणें दुसऱ्या ठिकाणीं विहित असलेल्याच आश्रमान्तराचा परामर्श केला जातो. कारण त्याला विध्यपेक्षत्व आहे, असा भावार्थ.–'**तस्मात्**० ' इत्यादि भाष्यानें साम्यश्रुतीचें फल सांगतात–]=म्हणून गार्हस्थ्याशीं आश्रमान्तराचें समान अनुष्ठेयत्व आहे, जसें गार्हस्थ्य अनुष्ठेय आहे, तसेंच आश्रमान्तरहि अनुष्ठेय आहे. [–' त्रयो धर्मस्कंधाः०' या वाक्यांत आश्रमान्तराची गार्हस्थ्याशीं

साम्यश्रुति सांगितली. आतां पारिव्राज्यवाक्यांतहि '**तथा०**' इत्यादि भाष्यानें साम्यश्रुति सांगतात-]

**भाष्यं--तथा 'एतमेव प्रव्राजिनो लोकमिच्छन्तःप्रव्रजन्ति' इत्यस्य वेदानुवचनादिभिः समभिव्याहारः। 'ये चेमेऽरण्ये श्रद्धा तप इत्युपासते' इत्यस्य च पंचाग्निविद्यया ॥**

**भाष्यार्थ**—त्याचप्रमाणें 'याच आत्मलोकाची इच्छा करणारे त्यागशील ब्राह्मण संन्यास करितात'–पृ.५२३–अशा या पारिव्राज्याचा वेदानुवचनादिकांबरोबर आभिव्याहार–कथन–उल्लेख केला आहे. [ विधेय वेदानुवचनादिकांच्या सहभावामुळें या पारिव्राज्यालाहि विधेयत्व आहे, असा भावार्थ.–'**ये च०**' इत्यादि भाष्यानें दुसऱ्या वाक्यांतील साम्यश्रुति सांगतात=]="आणि जे हे अरण्यांत श्रद्धा, तप, अशी उपासना करितात"–पृ.५१९–अशा या वानप्रस्थाचा पंचाग्निविद्येसह अभिव्याहार–संकीर्तन आहे. [ विधेय पंचाग्निविद्येसह त्याची उक्ति आहे, त्यामुळें पारिव्राज्याप्रमाणेंच वानप्रस्थहि अनुष्ठेय आहे, असा भावार्थ. –आतां '**यत्तु०**' इत्यादि भाष्यानें परोक्तीला उद्भावित–उत्थापित करून तिचें निरसन–]

**भाष्यं—यत्तूक्तं 'तप एव द्वितीयः' इत्यादिष्वाश्रमांतराभिधानं संदिग्धमिति। नैष दोषः। निश्चयकारणसद्भावात्। 'त्रयो धर्मस्कंधाः' इति हि धर्मस्कंधत्रित्वं प्रतिज्ञातम्। न च यज्ञादयो भूयांसो धर्मा उत्पत्तिभिन्नाः सन्तोऽन्यत्राश्रमसंबंधात्त्रित्वेऽन्तर्भावयितुं शक्यन्ते ॥**

**भाष्यार्थ**—पण 'तपच द्वितीय आश्रम आहे'–पृ. ५२१–इत्यादि वचनांत आश्रमान्तराचें विधान संदिग्ध आहे, असें जें म्हटलें आहे, तो दोष येत नाहीं. कारण त्यांत निश्चयाच्या कारणाचा सद्भाव–अस्तित्व आहे. [–"त्यांत निश्चयाचें कारण काय आहे?" '**त्रयः०**' इत्यादि उत्तर–]=कारण 'तीन धर्मस्कंध' असेंच धर्मस्कंधांचें त्रित्व तेथें प्रतिज्ञात आहे, त्यांत धर्मस्कंधांच्या त्रित्वाची प्रतिज्ञा केली आहे. [–"अहोपण, 'स्कंध' या शब्दाला समुदायवाचित्व असल्यामुळेंहि त्याच्या त्रित्वाची प्रतिज्ञा संभवेल," अशी आशंका घेऊन '**न च०**' इत्यादि भाष्यानें म्हणतात–]=आणि 'यजेत, दद्यात्'–याग करावा, दान द्यावें, इत्यादि विधिभिन्न असलेले यज्ञादि पुष्कळ धर्म आश्रमसंबंधावांचून त्रित्वामध्यें अन्तर्भूत करितां येणें शक्य नाहीं. [ स्कंध हा शब्द जर आश्रमपर नसेल तर यज्ञादिकांना त्रित्व संभवणार नाहीं.कारण त्या यज्ञादिकांना त्याहून अधिकत्व आहे. यास्तव येथें स्कंधशब्दाच्या 'समूह' या अर्थाचा असंभव आहे. म्हणून स्कंधांचें त्रित्वच आश्रमत्वाचें

निश्चायक–निश्चय करविणारें कारण आहे, असा याचा भावार्थ.–" तर मग त्या आश्रमांचा विभाग कसा आहे ?" 'तत्र०' इत्यादि भाष्यानें उत्तर–]

**भाष्यं—तत्र यज्ञादिलिंगो गृहाश्रम एको धर्मस्कंधो निर्दिष्टो ब्रह्मचारीति च स्पष्ट आश्रमनिर्देशः । तप इत्यपि कोऽन्यस्तपःप्रधानादाश्रमाद्धर्मस्कंधोऽभ्युपगम्येत । 'ये चेमेऽरण्ये' इति चारण्यलिंगाच्छ्रद्धातपोभ्यामाश्रमगृहीतिः । तस्मात्परामर्शेऽप्यनुष्ठेयमाश्रमान्तरम् ॥ १९ ॥**

**भाष्यार्थ**—त्यांत यज्ञादिलिंग गृहाश्रम हा एक धर्मस्कंध निर्दिष्ट आहे. '**ब्रह्मचारी**' असा हा तर स्पष्टच आश्रमनिर्देश आहे. 'तप' असाहि हा तपःप्रधान आश्रमाहून दुसरा कोणता धर्मस्कंध स्वीकारला जाणार! [–वाक्यान्तरांतीलहि निश्चायक दाखवितात–]='**ये चेमे०**'–'आणि जे हे अरण्यांत श्रद्धा व तप यांची उपासना करितात' अशा या अरण्यलिंगावरून म्ह० श्रद्धा व तप यांवरून आश्रमाचें ग्रहण होतें. [–याप्रमाणें परोक्ताचें निरसन करून स्वमताचा उपसंहार करितात–]= '**तस्मात्०**'–म्हणून हा परामर्श जरी असला तरी आश्रमान्तर अनुष्ठेय आहे. १९. [–याप्रमाणें परामर्शाचा स्वीकार करून आश्रमान्तरांचें अनुष्ठेयत्व सांगितलें. आतां हा विधिच आहे, असें '**विधिर्वा०**' इत्यादि सूत्रानें सांगतात–]

## सूत्रं—विधिर्वा धारणवत् ॥ २० ॥ (२)

**सूत्रार्थ**—किंवा हा आश्रमान्तराचा विधिच आहे, अनुवाद नव्हे. समिधेच्या अधस्तात् व उपरि धारणाप्रमाणें. २० (२)–सु. ब्र. ३९३–[–'**विधिर्वा०**' इत्यादि भाष्यानें प्रतिज्ञेचा विभाग करितात–]

**भाष्यं—विधिर्वाऽयमाश्रमान्तरस्य न परामर्शमात्रम् । ननु विधित्वाभ्युपगमे एकवाक्यताप्रतीतिरुपरुध्येत । प्रतीयते चात्रैकवाक्यता पुण्यलोकफलास्त्रयो धर्मस्कंधा ब्रह्मसंस्थता त्वमृतत्वफलेति। सत्यमेतत् । सतीमपि त्वेकवाक्यताप्रतीतिं परित्यज्य विधिरेवाभ्युपगंतव्योऽपूर्वत्वात् । विध्यंतरस्यादर्शनात् । विस्पष्टाच्चाश्रमान्तरप्रत्ययाद् गुणवादकल्पनयैकवाक्यत्वयोजनानुपपत्तेः ॥**

**भाष्यार्थ**—किंवा हा आश्रमान्तराचा विधि आहे. केवल परामर्श–अनुवाद नव्हे. [ आश्रमचतुष्टयामध्यें निविष्ट असलेल्या–निवेश केलेल्या स्मृतीला व आचाराला भ्रांतित्व संभवत नसल्यामुळें त्यांच्या मूळाची कल्पना करण्याची आवश्यकता प्राप्त झाली असतां विधियुक्त वाक्याची कल्पना करण्यापेक्षां 'त्रयो धर्मस्कंधाः' इत्यादिकांमध्यें आश्रमविधीची कल्पना करण्यांत अधिक लाघव आहे, असा भावार्थ.–" अहोपण, अल्पफलत्वानें आश्रमत्रयाची निंदा करून ब्रह्मसंस्थ-

तेची स्तुति केलेली असल्यामुळें याच्या एकवाक्यतेचा निश्चय होतो. म्हणून त्या एकवाक्यतेचा भंग करून येथें आश्रमाच्या विधीची कल्पना करणें अयुक्त आहे," अशी 'ननु०' इत्यादि भाष्यानें वादी शंका घेतो-]="अहोपण, विधित्वाचा अभ्युपगम केल्यास एकवाक्यताप्रतीति उपरुद्ध होईल! ['तीन धर्मस्कंध' इत्यादि वाक्यांत आश्रमांचा विधि मानिल्यास त्या वाक्याची प्रतीत होणारी एकवाक्यता बाधित होईल.-'पण येथें एकवाक्यताप्रतीति कशी येते?' 'प्रतीयते च०' इत्यादि भाष्यानें उत्तर-]=आणि या वाक्यांत एकवाक्यता प्रतीत होते. 'तीन धर्मस्कंध पुण्यलोक हें फल देणारे आहेत. पण ब्रह्मसंस्थता अमृतत्व हें फल देणारी आहे' अशी याची एकवाक्यता प्रतीत होते." [-'एकवाक्यतेचा संभव असतांना वाक्याचा भेद करणें युक्तियुक्त नाहीं, या म्हणण्याचा अंगीकार करितात-]='सत्यं एतत्'-होय, हें खरें आहे. [-पण आश्रमांच्या पूर्व सिद्धीचा अभाव असल्यामुळें त्यांच्या परामर्शानें स्तुतीचा असंभव आहे. म्हणून येथें एकवाक्यताच अयुक्त आहे, असें 'सतीमपि०' इयादि भाष्यानें सांगतात-] =पण येथें असलेल्याहि एकवाक्यताप्रतीतीचा परित्याग करून अपूर्वत्वामुळें विधिच स्वीकारणें अवश्य आहे. [-शिवाय विधियुक्त वाक्यान्तराची कल्पना केली असतां आश्रमान्तरांचें विहितत्व मानण्याचा प्रसंग येतो. त्यामुळें स्वपक्षाचा त्याग होतो. म्हणून विधियुक्त वाक्यान्तराची कल्पना करण्यापेक्षां येथेंच या प्रस्तुत अभीष्टवाक्यांत केवल विधीची कल्पना करणें युक्त आहे, असें 'विध्यन्तरस्य०' इत्यादि भाष्यानें सांगतात-]=कारण आश्रमांच्या दुसऱ्या विधीची उपलब्धि होत नाहीं. [-शिवाय मुख्य आश्रमान्तरप्रत्यय सोडून स्तुतिलक्षणेनें एकवाक्यत्वाची कल्पना करणें अयुक्त असल्यामुळें वाक्यभेदानें हा विधिच आहे, असें 'विस्पष्टाच्च०' इत्यादि भाष्यानें सांगतात-]=आणि आश्रमान्तराचा प्रत्यय अतिशय स्पष्ट असल्यामुळें (येथें) गुणवादकल्पनेनें एकवाक्यतेची योजना करणें अनुपपन्न आहे. [-एकवाक्यतेचें ज्ञान जरी होत असलें तरी त्याचा त्याग करून अपूर्वार्थविधीविषयीं 'धारणवत्०' हा दृष्टान्त देतात-]

**भाष्यं—धारणवत् । यथा "अधस्तात्समिधं धारयन्ननुद्रवेदुपरि हि देवेभ्यो धारयति" इत्यत्र सत्यामप्यधोधारणेनैकवाक्यताप्रतीतौ विधीयत एवोपरिधारणं । अपूर्वत्वात् । तथाचोक्तं शेषलक्षणे-"विधिस्तु धारणेऽपूर्वत्वात्" इति । तद्वदिहाप्याश्रमपरामर्शश्रुतिर्विधिरेवेति कल्प्यते ॥**

**भाष्यार्थ**—धारणाप्रमाणें. ज्याप्रमाणें [—महापितृयज्ञांत व मृत झालेल्या पुरुषाच्या अग्निहोत्रांत श्रुत असलेल्या वाक्याचें उदाहरण देतात—]=' **अधस्तात्०** ' --"हवीच्या खालीं समिध धारण करणाऱ्या ऋत्विजानें त्याचें अर्पण करावें. कारण देवांना हवि देतांना समिधा वर धारण करितो" असें वाक्य पठित आहे. [—या उदाहरणाच्या व्याख्योपयोगित्वानें वाक्याचा अभीष्ट अर्थ ' **अत्र०** ' इत्यादि भाष्यानें सांगतात -]=या वाक्यांत अधोधारणाशीं एकवाक्यतेची प्रतीति जरी येत असली तरी उपरिधारणाचें अपूर्वत्वामुळें विधान केलें जातेंच. [ प्रस्तुत कर्मविशेषामध्यें स्रुक् या पात्रांत असलेला हवि आहवनीय अग्नीकडे जेव्हां नेला जातो तेव्हां 'पित्र्य होमामध्यें त्या हवीच्या खालीं समिधा धारण करणारानें अनुद्रवण करावें' असें अधोधारणाला विहितत्व असल्यामुळें'उपरि हि'अशा तच्छेषानुवादत्वानें तदेकवाक्यत्वाची सिद्धि झाली असतां ' वर समिद्-धारण करणें ' याला अपूर्वत्व असल्यामुळें—अन्य प्रमाणानें त्याची सिद्धि झालेली नसल्यामुळें दैवहोमामध्यें वाक्यभेद करून त्याचें विधान केलें जातें, असा याचा भावार्थ.—या उक्त अर्थी मीमांसेच्या तिसऱ्या अध्यायांतील सूत्राचें उदाहरण ' **तथा च०** ' इत्यादि भाष्यानें देतात—]=आणि तसें शेषलक्षणांत " पण हा धारणाविषयीं विधि आहे. अपूर्वत्वामुळें " असें सांगितलें आहे. [—'कारण देवांच्या हवीसाठीं वर धारण करितो' या वाक्यांत 'उपरिधारणाचें विधान केलें जातें कीं नाहीं ' असा संदेह आला असतां ' धारयति ' —धारण करितो, असा वर्तमानकाली निर्देश केलेला असल्यामुळें व ' उपरि हि ' अशी ' हि 'शब्दश्रुति असल्यामुळें समिधेची उपरि—वर प्राप्ति होते आणि हवीला अभ्यर्हित-अभीष्टद्रव्यत्व असल्यामुळें दुसऱ्या कोणत्या तरी पदार्थानें आच्छादनाची प्राप्ति झाली असतां 'स्रुक्-पात्राच्या दंडावर समिधा धारण करून अनुद्रव करितो ' या वाक्यान्तरप्राप्त समिधेचा नियम केला आहे. त्यामुळें हा अनुवाद आहे, विधि नव्हे,' असा पूर्वपक्ष प्राप्त होतो. पण ' स्रुग्दंडावर समिधेचा उपसंग्रह करून ' असें हवीच्या प्राग्देशीं समिद्धारणाला प्राप्तत्व जरी असलें तरी त्याच्यावर धारण करणें, याची प्राप्ति होत नसल्यामुळें 'हि-'शब्दाचा भंग करून ' लेट् ' या पांचव्या लकारानें हा विधिच आहे,' असें 'विधिस्तु०' या मीमांसासूत्रानें सांगितलें आहे.—याप्रमाणें दृष्टान्त सांगून ' **तद्वत्०** ' इत्यादि भाष्यानें दार्ष्टान्तिक सांगतात--]=त्याचप्रमाणें येथेंहि ही आश्रमपरामर्शश्रुति विधिच आहे, अशी कल्पना केली जाते. [—आतां परामर्शपक्षाचाच अवलंब करून या श्रुतींत इतर आश्रमांचा जरी परामर्शच असला तरी तो पारिव्राज्याचा—संन्यासाचा विधिच

मानावा. कारण त्यावांचून त्याच्या स्तुतीचा असंभव आहे, असें '**यदापि०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]

**भाष्यं—यदापि परामर्श एवायमाश्रमान्तराणां तदापि ब्रह्मसंस्थता तावत्संस्तवसामर्थ्यादवश्यं विधेयाऽभ्युपगंतव्या। सा च किं चतुर्ष्वाश्रमेषु यस्य कस्यचिदाहोस्वित्परिव्राजकस्यैवेति विवेक्तव्यम्। यदि च ब्रह्मचर्यान्तेषु आश्रमेषु परामृश्यमानेषु परिव्राजकोऽपि परामृष्टः। ततश्चतुर्णामप्याश्रमाणां परामृष्टत्वाविशेषादनाश्रमित्वानुपपत्तेश्च यः कश्चिच्चतुर्ष्वाश्रमेषु ब्रह्मसंस्थो भविष्यति। अथ न परामृष्टः। ततः परिशिष्यमाणः परिव्राडेव ब्रह्मसंस्थ इति सेत्स्यति॥**

**भाष्यार्थ—**आणि हा इतर आश्रमांचा परामर्शच आहे, असेंहि जरी मानिलें तरी सुद्धां स्तुतीच्या सामर्थ्यावरून ब्रह्मसंस्थता तर अवश्य विधेयच आहे, असें मानणें उचित आहे. [–'ज्याची स्तुति केली जाते त्याचे विधान केलें जातें' या न्यायानें ब्रह्मसंस्थतेला विधेयत्व जरी असलें तरी त्यामुळें पारिव्राज्याचें विधेयत्व कसें सिद्ध होतें, अशी आशंका घेऊन '**सा च०**' इत्यादि भाष्यानें त्यासाठीं विचाराला प्रवृत्त करितात–]=आणि ती स्तुति काय, चार आश्रमांतील कोणत्या तरी एका आश्रमाची आहे कीं परिव्राजकाचीच आहे, याचें विवेचन केलें पाहिजे. [–"पण हे दोन्ही पक्ष निर्बीज असल्यामुळें ते विचार्य नाहींत," अशी आशंका घेऊन 'परामर्शश्रुतींत परिव्राजकहि परामृष्ट आहे कीं नाहीं' असा विकल्प करून त्यांतील पहिल्या पक्षाच्या अनुवादानें त्याची प्राप्ति '**यदि च०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=आणि 'त्रयो धर्मस्कंधाः' इत्यादि श्रुतींत परामर्श केल्या जाणाऱ्या ब्रह्मचर्यान्त आश्रमांमध्यें परिव्राजकहि जर परामृष्ट असेल तर चारी आश्रमांचें परामृष्टत्व समान असल्यामुळें–त्यांचा एकसारखाच परामर्श केलेला असल्यामुळें [–ब्रह्मसंस्थ हा त्या चार आश्रमांतील कोणता तरी एक आश्रम असेल असा पुढें संबंध.–"पण ब्रह्मसंस्थ हा अनाश्रमी कां नसेल?" अशी आशंका घेऊन 'अनाश्रमित्वाची निंदा केली जात असल्यामुळें' असें '**अनाश्रमित्व०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=आणि अनाश्रमित्वाची अनुपपत्ति असल्यामुळें ब्रह्मसंस्थ हा चार आश्रमांतील कोणता तरी एक आश्रम असेल. [–'**अथ न०**' इत्यादि भाष्यानें दुसऱ्या पक्षाचा अनुवाद करून त्याची प्राप्ति सांगतात–]=बरें, तो जर परामृष्ट नसेल तर अवशिष्ट राहणारा परिव्राड्च–संन्यासीच ब्रह्मसंस्थ आहे, असें सिद्ध होईल. [–याप्रमाणें दोन्ही पक्षांच्या संभावनेनें विचाराचा आरंभ सांगून '**तत्र०**' इत्यादि भाष्यानें पूर्वपक्ष सांगतात–]

**भाष्यं—तत्र तपःशब्देन वैखानसग्राहिणा परामृष्टः परिव्राडपीति केचित्। तदयुक्तम्। न हि सत्यां गतौ वानप्रस्थविशेषणेन परिव्राजको ग्रहणमर्हति। यथात्र ब्रह्मचारिगृहमेधिनौ असाधारणेनैव स्वेन स्वेन विशेषणेन विशेषितौ। एवं भिक्षुवैखानसावपीति युक्तम्॥**

**भाष्यार्थ**—त्या श्रुतींतील वैखानसग्राही—वैखानसांचें—वानप्रस्थांचें ग्रहण करविणाऱ्या 'तपः-'शब्दानें परिव्राट् सुद्धां परामृष्ट आहे, असें कित्येक म्हणतात. [कारण पारिव्राजकाच्याहि यम-नियमादितपाचा संभव आहे, असा याचा भावार्थ. —पण आश्रमांतील प्रत्येक आश्रमाच्या असाधारण धर्माचें रूप प्रदर्शित करण्यासाठीं उपक्रम केलेला असल्यामुळें व त्या उपक्रमाच्या अनुसारच उपसंहार असणें युक्त असल्यामुळें 'तपः-'शब्दानें वैखानस व परिव्राजक या दोन आश्रमांचें ग्रहण संभवत नाहीं, असें त्यावर '**तदयुक्तं०**' इत्यादि भाष्यानें दूषण देतात—] =तें अयुक्त आहे. कारण गति असतांना वानप्रस्थाच्या विशेषणानें परिव्राजक ग्रहण करण्यास योग्य होत नाहीं, वानप्रस्थाच्या विशेषणानें येथें संन्यासाश्रमाचें ग्रहण करणें युक्त नाहीं [—'तर मग काय युक्त आहे ?' '**यथात्र०**' इत्यादि भाष्यानें उत्तर—]=ज्याप्रमाणें येथें—'त्रयो धर्मस्कंधाः' या श्रुतींत ब्रह्मचारी व गृहमेधी—गृहस्थ हे दोघे आपापल्या असाधारण विशेषणानेंच विशेषित आहेत, त्याप्रमाणें भिक्षु व वैखानस हेहि आपापल्या असाधारण विशेषणानेंच विशेषित केलेले असणें युक्त आहे. [—'तर मग 'तपः-'शब्दाचा अर्थ काय ?' '**तपश्च०**' इत्यादि भाष्यानें उत्तर—]

**भाष्यं—तपश्चासाधारणो धर्मो वानप्रस्थानां कायक्लेशप्रधानत्वात्। तपःशब्दस्य तत्र रूढेः। भिक्षोस्तु धर्म इंद्रियसंयमादिलक्षणो नैव तपःशब्देनाभिलप्यते। चतुष्ट्वेन च प्रसिद्धा आश्रमास्त्रित्वेन परामृश्यन्त इत्यन्याय्यम्॥**

**भाष्यार्थ**—आणि तप हा वानप्रस्थांचा असाधारण धर्म आहे. कारण त्यांना शरीरक्लेशप्राधान्य आहे. [—"अहोपण, त्यांना तत्प्रधानत्व जरी असलें तरी तपःशब्दाला साधारण्य कां नसेल!" '**तपःशब्दस्य०**' इत्यादि भाष्यानें उत्तर—] =आणि 'तपः' हा शब्द कृच्छ्रादि तप या अर्थी रूढ असल्यामुळें [व अन्य अर्थी त्याची रूढि नसल्यामुळें त्या शब्दानें वानप्रस्थाचाच परामर्श केला जातो, असा भावार्थ.—"तर मग पारिव्राजकाच्या धर्मामध्येंहि 'तपः-'शब्दाचा प्रयोग कसा होतो ?" '**भिक्षोस्तु०**' इत्यादि भाष्यानें उत्तर—]=पण भिक्षूचा इंद्रियसंयमादिलक्षण धर्म 'तपः-'शब्दानें कधींच सांगितला जात नाहीं. [—आणि याहि कार-

णानें ' त्रयो धर्मस्कंधाः ' या वाक्यांत पूर्वी पारिव्राजक सांगितलेला नाहीं, असें **' चतुष्ट्वेन च० '** इत्यादि भाष्यानें सांगतात–]=आणि चतुष्ट्वानें प्रसिद्ध असलेले **आश्रम** त्रित्वानें परामर्श केले जातात, हें म्हणणें अन्याय्य आहे. [ कारण प्रसिद्ध संख्याभेदांतील संख्यान्तरकथन अयुक्त आहे, असा भावार्थ.–पृथक्कथन करणें, या सामर्थ्यावरूनहि ब्रह्मसंस्थ प्रकृत आश्रमत्रयाहून भिन्न आहे, असें **'अपि च०'** इत्यादि भाष्यानें सांगतात–]

**भाष्यं—अपि च भेदव्यपदेशोऽत्र भवति ' त्रय एते पुण्यलोकभाज एकोऽमृतत्वभाक् ' इति । पृथक्त्वे चैष भेदव्यपदेशोऽवकल्पते । न ह्येवं भवति देवदत्तयज्ञदत्तौ मंदप्रज्ञौ अन्यतरस्त्वनयोर्महाप्रज्ञ इति । भवति त्वेवं देवदत्तयज्ञदत्तौ मंदप्रज्ञौ विष्णुमित्रस्तु महाप्रज्ञ इति । तस्मात्पूर्वे त्रय आश्रमिणः पुण्यलोकभाजः । परिशिष्यमाणः परिव्राडेवामृतत्वभाक् ॥**

**सूत्रार्थ**—शिवाय ' हे तीन आश्रम पुण्यलोकभाक्–पुण्यलोकाला पात्र होणारे व एक अमृतत्वभाक् ' असा येथें भेदव्यपदेशहि आहे. [–"अहोपण, असा भेदनिर्देश जरी असला तरी त्याला पृथक्त्व कसें ?" **' पृथक्त्वे च० '** इत्यादि भाष्यानें उत्तर–]=आणि पृथक्त्व असलें तरच भेदनिर्देश उपपन्न होतो. [–' हे सर्व पुण्यलोक भाक् आहेत.' या वचनांत भिक्षूचाहि परामर्श जर केला असेल तर त्याच्या अब्रह्मसंस्थतेचा अभाव असल्यामुळें त्याला अमृतत्वच आहे, पुण्यलोकत्व नाहीं. कारण अमृतत्व व पुण्यलोकत्व यांचा विरोध आहे. 'तपःशब्दानें भिक्षूचेंहि ग्रहण केलें असतां त्याचें वर्जन युक्त आहे,' असेंहि म्हणतां येत नाहीं. कारण ' एते' **–हे**, असा प्रकृतांचा पूर्णपणें परामर्श केलेला आहे. म्हणून भेदोक्तीनें त्याला पृथक्त्वच आहे, असा भावार्थ.–त्यांना अपृथक्त्व असतें तर भेदोक्ति अयुक्त झाली असती, याविषयीं **' न हि० '** इत्यादि भाष्यानें दृष्टान्त सांगतात–]='देवदत्त व यज्ञदत्त हे दोघे मंदप्रज्ञ आहेत, पण त्या दोघांतील एक महाप्रज्ञ आहे ' असें हें कधींच म्हटलें जात नाहीं, हें प्रसिद्ध आहे. [–पण पृथक्त्वपक्षीं भेदोक्ति युक्त आहे, असें **' भवति० '** इत्यादि भाष्यानें सांगतात–]=पण देवदत्त व यज्ञदत्त मंदप्रज्ञ आहेत–पण विष्णुमित्र महाप्रज्ञ आहे, असें होतें, असें म्हणतां येतें. [–" अहोपण, अपृथक्त्व जरी असलें तरी अवस्थाभेदाच्या अपेक्षेनें दृष्टान्त व दार्ष्टान्तिक यांची सिद्धि होते, " असेंहि म्हणतां येत नाहीं. कारण कर्मित्व व मंदप्रज्ञत्व असतांना ब्रह्मसंस्थत्व व महाप्रज्ञत्व याचा असंभव आहे. त्यामुळें त्यांचें पृथक्त्व नियत आहे, असें मानून **' तस्मात्० '** इत्यादि भाष्यानें उपसंहार–]

=म्हणून पूर्वीच तीन आश्रम पुण्यलोकभाक् व अवशिष्ट राहणारा परिव्राट्-च अमृतत्वभाक् आहे. [-" पण हा ब्रह्मसंस्थशब्द यौगिक आहे कीं रूढ आहे ?" असा विकल्प करून पहिल्या पक्षीं त्या शब्दाला केवल परिव्राजकविषयता नाहीं, अशी 'कथं०' इत्यादि भाष्यानें शंका-]

**भाष्यं--कथं पुनर्ब्रह्मसंस्थशब्दो योगात्प्रवर्तमानः सर्वत्र संभवन्परिव्राजक एवावतिष्ठेत । रूढ्यभ्युपगमे चाश्रममात्रादमृतत्वप्राप्तेर्ज्ञानानर्थक्यप्रसंग इति ॥**

**भाष्यार्थ**--पण योगानें-अवयवशक्तीनें प्रवृत्त होणारा 'ब्रह्मसंस्थ-'शब्द सर्व आश्रमांमध्यें संभवत असतांना परिव्राजकामध्येंच अवस्थित कसा होईल! [**-रूढ्य-भ्युपगमे०**' इत्यादि भाष्यानें दुसऱ्या पक्षाचें निरसन-]=आणि रूढीचा अभ्युपगम-स्वीकार केल्यास केवल आश्रमामुळेंच अमृतत्व प्राप्त होत असल्यामुळें ज्ञानाच्या आनर्थक्याचा प्रसंग येतो, '**इति**'-अशी यावर वादी शंका घेतो. [-आचार्य त्या शब्दाचें यौगिकत्व स्वीकारून '**अत्र०**' इत्यादि भाष्यानें शंकेचा परिहार करितात-]

**भाष्यं--अत्रोच्यते-ब्रह्मसंस्थ इति हि ब्रह्मणि परिसमाप्तिरनन्यव्यापारतारूपं तन्निष्ठत्वमभिधीयते । तच्च त्रयाणामाश्रमाणां न संभवति । स्वाश्रमविहितकर्माननुष्ठाने प्रत्यवायश्रवणात् । परिव्राजकस्य तु सर्वकर्मसंन्यासात्प्रत्यवायो न संभवत्यननुष्ठाननिमित्तः ॥**

**भाष्यार्थ**--याचा परिहार असा सांगितला जातो-'**ब्रह्मसंस्थः**' या शब्दानें ब्रह्मामध्यें परिसमाप्ति, अनन्यव्यापारतारूप ब्रह्मनिष्ठत्व सांगितलें जातें. [-" पण हें उक्त ब्रह्मसंस्थत्व इतर आश्रमांचेंहि संभवतें." अशी आशंका घेऊन '**तच्च०**' इत्यादि भाष्यानें म्हणतात-]=आणि तें ब्रह्मसंस्थत्व तीन आश्रमांचें संभवत नाहीं. कारण आपल्या आश्रमाला विहित असलेल्या कर्माचें अनुष्ठान न केल्यास प्रत्यवायाचें श्रवण आहे. [-" पण स्वाश्रमविहित कर्माचें अनुष्ठान न केल्यास संन्याश्यालाहि प्रत्यवायित्व समान आहे. तेव्हां त्याला तरी ब्रह्मसंस्थत्व कोठचें ?" अशी आशंका घेऊन '**परिव्राजकस्य०**' इत्यादि भाष्यानें सांगतात-]=पण परिव्राजकाचा सर्वकर्मसंन्यासामुळें अनुष्ठान या निमित्तामुळें प्राप्त होणारा प्रत्यवाय संभवत नाहीं [-" अहोपण, त्यालाहि शम-दमादि अनुष्ठेय आहे, तेव्हां ब्रह्मसंस्थता कोठची ?" '**शम-दमादि०**' इत्यादि भाष्यानें उत्तर-]

**भाष्यं--शमदमादिस्तु तदीयो धर्मो ब्रह्मसंस्थताया उपोद्बलको न विरोधी । ब्रह्मनिष्ठत्वमेव हि तस्य शमदमाद्युपबृंहितं स्वाश्रमविहितं कर्म । यज्ञादीनि चेतरेषां । तद्व्यतिक्रमे च तस्य प्रत्यवायः ॥**

**भाष्यार्थ**—पण शम-दमादिक हा जो त्याचा धर्म आहे तो **ब्रह्मसंस्थतेचा** उपोद्बलक–परिपोषक आहे. तिचा विरोधी नाहीं. [ त्याविषयीं हेतु–]=‘ **ब्रह्मनिष्ठत्वमेव०**’–शम-दमादिकांनीं उपबृंहित–परिपुष्ट झालेलें ब्रह्मसंस्थत्वच त्याचें आश्रमविहित कर्म आहे. [ शमादिकाला ब्रह्मसंस्थतेचें अंगत्व असल्यामुळें तद्विरोधित्व नाहीं, असा भावार्थ.–“ अहोपण, गृहस्थादिकांचेंहि स्वाश्रमविहित कर्म ब्रह्मसंस्थितत्वाच्या अविरोधीच आहे. ” अशी आशंका घेऊन ‘**यज्ञादीनि०**’ इत्यादि भाष्यानें म्हणतात–]=व यज्ञादिक हें इतरांचें स्वाश्रमविहित कर्म आहे. [ यज्ञादि कर्में रागादिकांनीं आक्षिप्त–प्राप्त आहेत. पण रागादिकांनीं युक्त असलेल्या पुरुषाला ब्रह्मसंस्थता नाहीं, असा भावार्थ.–शम-दमादिकांनीं युक्त असें ब्रह्मनिष्ठत्वच संन्याश्याचें स्वाश्रमविहित कर्म आहे, असें सांगितलें. तें न केल्यास त्याला त्वंपदार्थविवेकासाठींच प्रत्यवायित्व आहे, अशी स्मृति आहे, असें ‘ **तद्व्यतिक्रमे च०**’ या भाष्यानें सांगतात–]=आणि त्या शमादि स्वाश्रमविहित कर्माचा व्यतिक्रम–उल्लंघन केल्यास संन्याश्याला प्रत्यवाय लागतो. [ येथील ‘ च-’कारामुळें इतरांनाहि त्या त्या आश्रमाला विहित असलेल्या कर्माचा व्यतिक्रम केल्यास प्रत्यवायित्व आहे, असें ‘ अकुर्वन् विहितं कर्म ’ इत्यादि स्मृतिहि सुचविते.–संन्याश्याचें सर्वकर्मत्यागानें ब्रह्मसंस्थत्वच स्वाश्रमविहित कर्म आहे, याविषयीं ‘ **तथा च** ’ इत्यादि भाष्यानें प्रमाण सांगतात–]

**भाष्यं—तथा च “ न्यास इति ब्रह्मा ब्रह्मा हि परः परो हि ब्रह्मा तानि वा एतान्यवराणि तपांसि न्यास एवात्यरेचयत ” ‘ वेदान्तविज्ञानसुनिश्चितार्थाः संन्यासयोगाद्यतयः शुद्धसत्त्वाः’ इत्याद्या श्रुतयः । स्मृतयश्च–“ तद्बुद्धयस्तदात्मानस्तन्निष्ठास्तत्परायणाः ” इत्याद्या ब्रह्मसंस्थस्य कर्माभावं दर्शयन्ति ॥**

**भाष्यार्थ**—आणि तसेंच, ‘ न्यास–संन्यास हा ब्रह्मा आहे. ’ [ अशी स्तुति केली जाते.–त्याविषयीं हेतु–]=‘ कारण ब्रह्मा–हिरण्यगर्भच श्रुति-स्मृतींमध्यें पर–श्रेष्ठ अभीष्ट आहे. ’ [–तथापि संन्यास हिरण्यगर्भात्मक कसा ? उत्तर–] =‘परो हि ब्रह्मा’–कारण संन्यास पर–श्रेष्ठ आहे. [–संन्यासाच्या परत्वाविषयीं हेतु–] =कारण तो ब्रह्मा आहे. [ ज्याअर्थीं ब्रह्मज्ञानहेतुत्वामुळें हा संन्यास पर आहे त्याअर्थीं तो ब्रह्मा आहे, असा भावार्थ.–‘ **तानि०** ’ इत्यादि वचनानें श्रुति त्याचें परत्व व्यक्त करिते–]=“ तीं पूर्वोक्त सत्यादि प्रसिद्ध साधनें ज्ञानाहून हीन–अवर तपें आहेत, आणि निकृष्टत्व या हेतूमुळें न्यास हाच त्या सर्वांहून अतिरिक्त--श्रेष्ठ आहे.”-सा.ना. पृ.७५–[कारण तो ब्रह्मसंस्थतेच्या द्वारा अमृतत्वाचें साधन आहे,

असा भावार्थ.–संन्याश्याला दुसऱ्या कर्मांचा अभाव आहे, याविषयीं वाक्यान्तर सांगतात–]=" वेदान्तजन्य विज्ञानाचा अर्थ जो परमात्मा तो ज्यांच्या चित्तांत अगदीं सुनिश्चित झालेला आहे, सर्वकर्मत्यागरूप संन्यासयोगामुळें यत्नशील व शुद्धचित्त झालेले "–मु.३.२.६. सार्थना.३६ कैवल्य३.–इत्यादि श्रुति व " जे तद्बुद्धि–परमात्म्यामध्येंच ज्यांची बुद्धि आहे, तदात्मे–तद्रूप झालेले, तन्निष्ठ, तत्परायण "- गी. ५.१७–इत्यादि स्मृति ब्रह्मसंस्थाचा कर्माभाव दाखवितात. [–शुद्धबुद्धि म्ह० विरक्त संन्यासयोगामुळें वेदान्तविज्ञानानें सुनिश्चितार्थ होत्साते मुक्त होतात, असें वचन असल्यामुळें संन्याश्याच्या कर्मान्तराचा अभाव भासतो, असा भावार्थ. ' न कर्मणा न प्रजया ' इत्यादि अनेक श्रुति या अर्थी आहेत, असें सांगण्यासाठीं ' आद्य ' हें पद आहे. त्या ब्रह्मामध्येंच ज्यांची बुद्धि–मन आहे, तेंच ब्रह्म ज्यांचा आत्मा स्वरूप आहे ते तदात्मे, त्या ब्रह्मामध्येंच ज्यांची निश्चयानें स्थिति आहे ते तन्निष्ठ, ' तत्परायणाः ' या पदानें त्यांच्या विषयान्तराधीनतेची व्यावृत्ति करितात. ' विहित कर्मांचाहि त्याग करून ' इत्यादि स्मृतीचा संग्रह करण्यासाठीं ' आद्य-'पद आहे. ' ब्रह्मसंस्थस्य० ' इत्यादि भाष्यानें उक्त श्रुति-स्मृतींचें तात्पर्य सांगितलें आहे. ' ब्रह्मसंस्थ-'शब्दाची ' परिव्राजक ' या अर्थी रूढि मानून ' **तस्मात्०** ' इत्यादि भाष्यानें उपसंहार करितात–]

**भाष्यं—तस्मात्परिव्राजकस्याश्रममात्रादमृतत्वप्राप्तेर्ज्ञानानर्थक्यप्रसंग इत्येषोऽपि दोषो नावतरति। तदेवं परामर्शेऽपीतरेषामाश्रमाणां पारिव्राज्यं तावद्ब्रह्मसंस्थतालक्षणं लभ्येतैव ॥**

**भाष्यार्थ**—म्हणून परिव्राजकाला केवल आश्रमामुळेंच अमृतत्वप्राप्ति होत असल्या कारणानें ज्ञानाच्या आनर्थक्याचा प्रसंग येतो, असा हा दोषहि प्राप्त होत नाहीं. [ गृहस्थशब्दाला यौगिकत्व असतांना अतिप्रसंगाचा परिहार करण्यासाठीं तो शब्द आश्रमविशेष या अर्थी जरी रूढ असला तरी नुसत्या गार्हस्थ्यानेंच जशी पुण्यलोकाची प्राप्ति होत नाहीं तर यथोक्त अग्निहोत्रादिकांच्या अनुष्ठानामुळेंच पुण्यलोकप्राप्ति होते त्याप्रमाणें ब्रह्मसंस्थ परिव्राजकालाहि वाक्यार्थाच्या साक्षात्कारद्वाराच मुख्य अमृतत्व आहे. तेव्हां ज्ञानाला आनर्थक्य कोणत्या कारणानें असणार, असा भावार्थ.–याप्रमाणें एकदेशिमताचें प्रत्याख्यान करून ब्रह्मसंस्थशब्दाला पारिव्राजकविषयत्व आहे, असें सिद्ध झालें असतां स्तुतिसामर्थ्यामुळें इतर आश्रमांचा परमर्श जरी केलेला असला तरी ब्रह्मसंस्थत्व हें पारिव्राज्य विधेय आहे असा ' **तदेवं०** ' इत्यादि भाष्यानें परम प्रकृताचा उपसंहार करितात–]=म्हणून

प्रस्तुत श्रुतींत याप्रमाणें इतर आश्रमांचा परामर्श जरी केलेला असला तरी ब्रह्म॰संस्थतालक्षण पारिव्राज्य तर प्राप्त होतेंच तें विधेयच आहे. [–याप्रमाणें शिष्याच्या बुद्धीचा विकास होण्यासाठीं परामर्शश्रुतीचा आश्रय करून कृत्वाचिंतेनें विचार केला. आतां '**अनपेक्ष्य एव०**' इत्यादि भाष्यानें त्या कृत्वाचिंतेचेंच उद्घाटन–]

**भाष्यं—अनपेक्ष्यैव जाबालश्रुतिमाश्रमान्तरविधायिनीमयमाचार्येण विचारः प्रवर्तितः । विद्यत एव त्वाश्रमान्तरविधिश्रुतिः प्रत्यक्षा । "ब्रह्मचर्यं समाप्य गृही भवेद्गृही भूत्वा वनी भवेद्वनी भूत्वा प्रव्रजेत् । यदि वेतरथा ब्रह्मचर्यादेव प्रव्रजेद्गृहाद्वा वनाद्वा" इति ॥**

**भाष्यार्थ**—आश्रमान्तराचें विधान करणाऱ्या जाबालश्रुतीची अपेक्षा न करितां बादरायणाचार्यांनीं हा विचार प्रवृत्त केला आहे. पण आश्रमान्तराची विधिश्रुति प्रत्यक्ष आहेच. 'ब्रह्मचर्य समाप्त करून गृही व्हावें, गृही होऊन वनी व्हावें, वनी होऊन प्रव्रजन करावें. '**यदि वा इतरथा**'–किंवा याच्या उलट–दुसऱ्या प्रकारें ब्रह्मचर्यामध्यें स्थित असलेल्याच अधिकाऱ्याला दैवयोगानें गार्हस्थ्याविषयीं वैराग्य व पारिव्राज्याची इच्छा जर होईल तर त्यानें ब्रह्मचर्यापासूनच प्रव्रजन करावें किंवा गृहापासून किंवा वनापासून प्रव्रजन करावें"–जा. ४.–अशी प्रत्यक्षच श्रुति आहे. [–आतां 'संन्यास हा अनधिकृत अंधादिविषय आहे' असें जें वाद्यानें म्हटलें आहे त्याविषयीं '**न चेयं०**' इत्यादि भाष्यानें म्हणतात–]

**भाष्यं—न चेयं श्रुतिरनधिकृतविषया शक्या वक्तुम् । अविशेषश्रवणात् । पृथग्विधनाच्चानधिकृतानाम् "अथ पुनर्व्रती वाऽव्रती वा स्नातको वाऽस्नातको वोत्सन्नाग्निरनग्निको वा" इत्यादिना ॥**

**भाष्यार्थ**—ही श्रुति अनधिकृतविषय आहे, असें म्हणणें शक्य नाहीं. कारण येथें अविशेष श्रवण– सामान्य श्रवण आहे. [अविशेष श्रुति बाधक नसतांना तिचा विशेषामध्यें संकोच होऊं शकत नाहीं, असा भावार्थ.–आणि याहि कारणानें हें वाक्य अनधिकृत विषय नाहीं, असें '**पृथक्०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=आणि अनधिकृतांच्या संन्यासाचें पृथग्विधान केलेलें असल्यामुळेंहि हें वाक्य अनधिकृतविषय नाहीं. "पण आतां एखादा व्रती–गोदानादि व्रतवान् असो कीं अव्रती असो; गुरुकुलनिवृत्तिरूप स्नानानन्तरहि गुरुशुश्रूषादिपरायण असलेला स्नातक असो कीं त्याच्या विपरीत अस्नातक असो; तो उत्सन्नाग्नि म्ह० ज्याची भार्या मृत झाली आहे असा असो कीं पूर्वीच अग्निपरिग्रहरहित–'अनग्नि' असो

त्यानें प्रव्रजन करावें "–जा. ४. सु. उ. ९८०–इत्यादि वचनानें अनधिकृतांच्या संन्यासाचें पृथक् विधान केलें आहे. [ यांत ' प्रव्रजेत् ' असें कर्माधिकारप्राप्तिहीन असलेल्याहि पुरुषांच्या संन्यासाचें पृथक् कथन केलेलें असल्यामुळें हें वाक्य अनधिकृतविषय नाहीं, असा भावार्थ.–संन्यासविधीला अनधिकृतविषयत्व नाहीं याविषयीं ' **ब्रह्मज्ञान०** ' इत्यादि भाष्यानें हेत्वंतर सांगतात–]

**भाष्यं—ब्रह्मज्ञानपरिपाकांगत्वाच्च पारिव्राज्यस्य नानधिकृतविषयत्वम् । तच्च दर्शयति–" अथ परिव्राडविवर्णवासा मुंडोऽपरिग्रहः शुचिरद्रोही भैक्षाणो ब्रह्मभूयाय भवति " इति । तस्मात्सिद्धा ऊर्ध्वरेतसामाश्रमाः । सिद्धं चोर्ध्वरेतःसु विधानाद्विद्यायाः स्वातंत्र्यमिति ॥ २० ॥ (२)**

**भाष्यार्थ**—आणि पारिव्राज्याला ब्रह्मज्ञानाच्या परिपाकाचें अंगत्व असल्यामुळें अनधिकृतविषयत्व नाहीं. [ श्रवणादिकांच्या द्वारा संन्यासाला ब्रह्मज्ञानदार्ढ्यार्थत्व आहे. म्ह० संन्यास श्रवणादिकांच्या द्वारा ब्रह्मज्ञान दृढ करण्यासाठीं आहे, असें प्रकरणादिप्रमाणांनीं सिद्ध झालेलें आहे. त्यामुळें श्रवणादि करण्यास समर्थ असलेल्याच त्यांत अधिकार आहे, असा भावार्थ.–पारिव्राज्याला ब्रह्मज्ञानदार्ढ्यार्थत्व आहे, याविषयीं ' **तच्च०** ' इत्यादि भाष्यानें श्रुतीचें प्रमाण देतात–]=आणि तेंच " आतां हा अधिकारी परमहंस, काषायवस्त्रें परिधान करणारा, मुंड–शिखारहित, कन्था-कौपीनादि अवश्य वस्तूंना सोडून दुसऱ्या कशाचाहि परिग्रह न करणारा, शुचि–अन्तर्बहिःशौचानें पवित्र, शरीरादिकांनीं भूतांचा द्रोह न करणारा, शरीरधारणार्थ यथाशास्त्र भिक्षाचर्य करणारा असा होत्साता ब्रह्मभावाला–ब्रह्मसाक्षात्काराला समर्थ होतो. "–जा. ५. सु. उ. ९८४.–असें हें श्रुतिवचन दाखवितें. [–' **तस्मात्०** ' इत्यादि भाष्यानें अन्तर्गर्भित अधिकरणार्थाचा उपसंहार करितात–]=याप्रमाणें संन्यासाला प्रमाणसिद्धत्व असल्यामुळें यतींचे आश्रम सिद्ध झाले. [–" त्यांना प्रामाणिकत्व असल्यामुळें अनुष्ठीयमानत्व जरी असलें तरी त्यामुळें प्रकृत विषयांत काय सिद्ध झालें ? " अशी आशंका घेऊन '**सिद्धं च०**' इत्यादि भाष्यानें प्रथमाधिकरणार्थाचें निगमन करितात–]=आणि ऊर्ध्वरेत्यांमध्यें –यतींमध्यें विधानामुळें विद्येला स्वातंत्र्य आहे, असें सिद्ध झालें. २० ( २ )

## ( ३. **स्तुतिमात्राधिकरण. सू. २१-२२.** )

–अनुष्ठेयाच्या साम्यश्रुतीमुळें आश्रमान्तर अनुष्ठेयत्वानें विधेय आहे, असें सांगितलें. आतां " रसतमत्वादिकांना अंगाश्रितत्वामुळें ' इयमेव जुहूः ' इत्यादि

श्रुतिसादृश्यानें स्तुत्यर्थत्व आहे " अशी आशंका ' **स्तुतिमात्रं०** ' इत्यादि सूत्रानें घेऊन तिचें निरसन करितात--

**सूत्रं--स्तुतिमात्रमुपादानादिति चेन्नापूर्वत्वात् ॥ २१**

**सूत्रार्थ**--' स एष रसानां रसतमः ' इत्यादि वाक्य ही कर्मांगोद्गीथाची केवल स्तुति आहे. कारण त्यांत कर्मांग उद्गीथादिकांचें उपादान-ग्रहण-श्रवण आहे, ' असें जर म्हणाल तर तें बरोबर नाही. कारण त्याला अपूर्वत्व आहे. ' कर्मांग-उद्गीथादिकांच्या उपासनांची व रसतमत्वादिगुणांची दुसऱ्या प्रमाणानें अप्राप्ति आहे. २१.-सु. ब्र. ३९७.[-अधिकरणाचा विषय सांगणारे भाष्यकार **'स एषः०'** इत्यादि भाष्यानें वाक्यें पठतात-]

**भाष्यं--' स एष रसानां रसतमः परमः परार्ध्योऽष्टमो यदुद्गीथः ' ' इयमेवर्गग्निः साम ' ' अयं वाव लोक एषोऽग्निश्चितः । तदिदमेवोक्थमियमेव पृथिवी ' इत्येवंजातीयकाः श्रुतयः किमुद्गीथादेः स्तुत्यर्था । आहोस्विदुपासनाविध्यर्था । इत्यस्मिन्संशये स्तुत्यर्था इति युक्तम् । उद्गीथादीनि कर्मांगान्युपादाय श्रवणात् । यथा- " इयमेव जुहूरादित्यः कूर्मः स्वर्गो लोक आहवनीयः" इत्याद्या जुह्वादिस्तुत्यर्थास्तद्वदिति चेत् ॥**

**भाष्यार्थ**--" जो उद्गीथ तो हा रसांचा रसतम, परम परार्ध्य अष्टम आहे. " -छां.१.१.३.-["या भूतांचा पृथिवी रस आहे, पृथिवीचा आप रस आहे, आपांचा ओषधि रस आहे, ओषधींचा पुरुष रस आहे, पुरुषाचा वाक् रस आहे, वाक्-चा ऋक् रस आहे, ऋक्-चा साम रस आहे, सामाचा उद्गीथ रस आहे" असा उपक्रम करून असें श्रुत आहे-भूतांमध्यें उत्तरोत्तर सारत्वानें सांगितलेल्या पृथिव्यादि सामान्य रसांतील अतिशय सार, म्हणून रसतम, परमात्म्याच्या प्रतीकत्वामुळें परम, ब्रह्माचें जें अर्ध-स्थान त्याला पात्र होतो म्हणून परार्ध्य म्ह० ब्रह्माप्रमाणें उपास्य, असा भावार्थ. पृथिव्यादिकांच्या अपेक्षेनें आठवा. तो कोण तर जो हा उद्गीथ-ओंकार,असा याचा इत्यर्थ.]='हीच पृथिवी ऋक् व अग्नि साम.'-छां.१.६.१. -"हाच लोक हा चित-संपादित अग्नि आहे." " तें हेंच उक्थ, हीच पृथिवी " या व अशाच जातीच्या श्रुति आहेत. [-उद्गीथादि अंगावबद्ध श्रुतींना विषय करून पर्णमयीत्वादिकांमध्यें अंगसंबंधांत विधीची उपलब्धि होत असल्यामुळें व तशा अंगसंबंधामध्येंहि ' स्वर्गः लोकः ' इत्यादि वचनांत स्तुतीची उपलब्धि होत असल्यामुळें ' **किं०** ' इत्यादि भाष्यानें संशय सांगतात-]='या पूर्वोक्त श्रुति काय, उद्गीथादिकांच्या स्तुतीसाठीं आहेत कीं उपासनेच्या विधीसाठीं आहेत, ' असा

हा संशय आला असतां [ अंगावबद्ध असलेल्याहि बुद्धींना स्तुतित्वाचा अभाव असल्यामुळें विधेयत्वानें स्वातंत्र्यानें पुरुषार्थहेतुत्व जर आहे तर उपनिषदांत उत्पन्न झालेल्या अनंग आत्मबुद्धीला स्वातंत्र्यानें फलवत्त्व आहे, हें काय सांगावें, असें येथें सांगितलेलें असल्यामुळें याच्या पादादिसंगति आहेत. पूर्वपक्षांत 'स्तुतित्वामुळें अंगमतीमध्यें अनुष्ठानाची असिद्धि' व सिद्धान्तांत 'विधेयत्वामुळें त्यांच्या अनुष्ठानाची सिद्धि' असा अंगीकार करून पूर्वपक्ष सांगतात–]=**'स्तुत्यर्थाः०'**–त्या श्रुति उद्गीथादिकांच्या स्तुतीसाठीं आहेत, असें मानणें युक्त आहे. कारण उद्गीथादि कर्मांगांचें 'उपादान'–ग्रहण करून त्यांचें श्रवण आहे.–"ही पृथिवीच जुहू आहे. आदित्य चयनगत कूर्म आहे. आहवनीय अग्नि स्वर्ग लोक आहे." इत्यादि श्रुति जशी जुह्वादिकांच्या स्तुत्यर्थ आहे, त्याचप्रमाणें या पूर्वोक्त श्रुति उद्गीथादिकांच्या स्तुत्यर्थ आहेत, असें जर म्हणाल तर [ 'न' असा पुढें संबंध. 'विमत–उद्गीथादिप्रत्यय या स्तुति आहेत. कारण त्यांना कर्मांमध्यें उत्कृष्ट पदार्थाध्यासप्रत्ययरूपत्व आहे. 'स्वर्ग लोक आहवनीय आहे' इत्यादि प्रत्ययाप्रमाणें' असा भावार्थ. 'जुहू हीच पृथिवी आहे,' अशी स्तुति केली जाते आणि कूर्म चयनांतील असतांना आदित्यगत म्हणून स्तविला जातो व 'आहवनीय स्वर्ग लोक' म्हणून स्तुति केला जातो, या स्तुतीप्रमाणें वरील श्रुतिवचनें ह्या सुद्धां स्तुतिच आहेत, असा भावार्थ. –पण अशी स्तुतिकल्पना करण्यापेक्षां विधिकल्पना करणेंच युक्त आहे. अनुष्ठानफलाच्या अभावामुळें, असा **'नेत्याह०'** इत्यादि परिहार–]

**भाष्यं—नेत्याह । न हि स्तुतिमात्रं आसां श्रुतीनां प्रयोजनं युक्तमपूर्वत्वात् । विध्यर्थतायां ह्यपूर्वोऽर्थो विहितो भवति । स्तुत्यर्थतायां त्वानर्थक्यमेव स्यात् । विधायकस्य हि शब्दस्य वाक्यशेषभावं प्रतिपद्यमाना स्तुतिरुपयुज्यत इत्युक्तम् 'विधिना त्वेकवाक्यत्वात्स्तुत्यर्थेन विधीनां स्युः' इत्यत्र ॥**

**भाष्यार्थ**—याचा 'न'–नाहीं, असा परिहार सांगतात–[–'विमत प्रत्यय कर्मांगस्तुति नव्हेत, अपूर्वत्वामुळें, क्रत्वंतराप्रमाणें' असें **'न हि०'** इत्यादि भाष्यानें सांगतात–]=कारण या श्रुतींचें केवल स्तुति हें प्रयोजन युक्त नाहीं. कारण त्यांना 'अपूर्वत्व' आहे. [–'विमत बुद्धि कर्मांगस्तुति नव्हेत, विशिष्टफलसंबंधित्वामुळें, उभयसंमत बुद्धीप्रमाणें' असें **'विध्यर्थतायां०'** इत्यादि भाष्यानें सांगतात–]=कारण त्यांना विध्यर्थत्व जर असलें तर अपूर्व अर्थ विहित आहे, असें होतें. पण स्तुत्यर्थत्व आहे, असें म्हटल्यास त्यांना आनर्थक्यच प्राप्त होतें. [–" अहोपण 'वायु ही वेगवती देवता आहे' इत्यादि वचनांप्रमाणें उद्गीथादि श्रुतींना स्तुत्यर्थत्व जरी असलें

तरी अर्थवत्त्व कां नाहीं ?" अशी आशंका घेऊन '**विधायकस्य०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=कारण विधान करणाऱ्या शब्दाच्या वाक्यशेषभावास प्राप्त होणारी स्तुति उपयुक्त होते, असें 'पण विधीशीं एकवाक्यत्वामुळें विधींच्या स्तुत्यर्थानें अर्थवादांना अर्थवत्त्व आहे.'–अ. १ पृ. १०१–या सूत्रांत सांगितलें आहे. [–'तर मग विधायकशब्दशेषत्वानेंच उद्गीथादिश्रुतींनाहि स्तावकत्वानें अर्थवादत्व असूं दे.' असें जर म्हणाल तर आतां–'उद्गीथादि प्रत्ययांनीं उद्गीथादिविधि स्तविला जातो कीं त्यांच्या उपासनेचा विधि स्तविला जातो?' तें सांगा. या विकल्पांतील पहिल्या पक्षाला '**प्रदेशान्तर०**' इत्यादि भाष्यानें दूषित कतितात–]

**भाष्यं--प्रदेशान्तरविहितानां तूद्गीथादीनामियं प्रदेशान्तरपठिता स्तुतिर्वाक्यशेषभावमप्रतिपद्यमाना अनर्थिकैव स्यात् । 'इयमेव जुहूः' इत्यादि तु विधिसंनिधौ एव आम्नातमिति वैषम्यम् । तस्माद्विध्यर्था एवैवंजातीयकाः श्रुतयः ॥ २१ ॥**

**भाष्यार्थ**—पण प्रदेशान्तरीं विहित असलेल्या उद्गीथादिकांची ही प्रदेशान्तरीं पठित असलेली स्तुति वाक्यशेषभावास न प्राप्त होणारी अशी होत्साती अनर्थिकाच–व्यर्थच होईल. [उद्गीथादिविधीला कर्मप्रकरणस्थत्वानें व्यवधान असल्यामुळें त्याच्याशीं उद्गीथादि-श्रुतींची एकवाक्यता नाहीं. 'विमत बुद्धि कर्मांगस्तुति नव्हेत. कारण त्या भिन्न प्रकरणांत स्थित आहेत. क्रत्वन्तराप्रमाणें.' असा भावार्थ.–'**इयमेव०**' इत्यादि भाष्यानें परोक्त दृष्टान्ताला दूषित करितात–]=पण 'ही पृथिवीच जुहू आहे' इत्यादि तर विधीच्या सांनिध्यांतच आम्नात–पठित आहे, असें त्यांत वैषम्य आहे.[–अनुमानत्रयाच्या फलाचें निगमन–]='**तस्मात्०**'–म्हणून अशा प्रकारच्या श्रुति विधीसाठींच आहेत, विधि हें त्यांचें प्रयोजन आहे.२१. [–आतां पूर्वोक्त विकल्पांतील दुसरा पक्षहि उपपन्न होत नाहीं. कारण उपास्यविषयाच्या अर्पणानें विधीचा संबंध संभवत असतांना लक्षणेनें स्तुत्यर्थत्व संभवत नाहीं, असें '**भावशब्दाच्च०**' या सूत्रानें सांगतात–]

## सूत्रं—भावशब्दाच्च ॥ २२ ॥ ( ३ )

**सूत्रार्थ**—आणि 'उद्गीथाची उपासना करावी,' इत्यादि विधिशब्दांवरून हें वाक्य गुणविधायक आहे, असा निश्चय होतो. २२. ( ३ )–सु. ब्र. ३९८.[संनिहित विधीच्या विषयार्पणानें रसतमादिवादांना अर्थवत्त्व संभवत असतांना त्यांचें स्तुतिपरत्वहि तेथें अयुक्त आहे. कारण स्तुतीच्या अपेक्षेनें विषयार्पणाला अन्त-

रंगत्व आहे. तेव्हां तेथें कर्मांगस्तुतिपरत्व नाहीं, हें काय सांगावें, असें मानणारे आचार्य '**उद्गीथं०**' इत्यादि भाष्यानें सूत्राचें व्याख्यान करितात-]

**भाष्यं—'उद्गीथमुपासीत' 'सामोपासीत' 'अहमुक्थमस्मीति विद्यात्' इत्यादयश्च विस्पष्टा विधिशब्दाः श्रूयन्ते। ते च स्तुतिमात्रप्रयोजनतायां व्याहन्येरन्। तथा च न्यायविदां स्मरणम्-"कुर्यात्क्रियेत कर्तव्यं भवेत्स्यादिति पंचमम्। एतत्स्यात्सर्ववेदेषु नियतं विधिलक्षणम्" इति। लिङाद्यर्थो विधिरिति मन्यमानास्त एवं स्मरन्ति ॥**

**भाष्यार्थ—**'उद्गीथाची उपासना करावी'-छां. १.१.१.-'सामाची उपासना करावी'-छां. २. २. १.-'मी उक्थ आहें असें जाणावें' इत्यादि अगदीं स्पष्ट विधिशब्द श्रुत आहेत आणि त्यांना केवळ स्तुतिमात्रप्रयोजनत्व असल्यास ते शब्द व्याहत-बाधित होतील [-"अहोपण, लिङादिकांचें निमंत्रणादिकांमध्येंहि स्मरण असल्यामुळें 'उपासीत' इत्यादि शब्दाला विधिपरत्व कसें?" अशी आशंका घेऊन '**तथा च०**' इत्यादि भाष्यानें म्हणतात-]=कारण न्यायवेत्त्यांचें तसें स्मरण आहे. [-धातूंना अनेकत्व जरी असलें तरी 'डुकृञ्-करणे' 'भू-सत्तायाम्' 'अस्-भुवि'-कृ-करणें, भू-असणें, अस्-असणें, या तीन भावनासामान्यवाची धातूंचेंच सर्वव्याप्तीसाठीं उदाहरण देतात-]='कुर्यात्'-करावें (ज्या भावनेचा कर्ता आक्षिप्त-सामर्थ्यानें प्राप्त असतो ती भावना 'कुर्यात्' या विध्यर्थी क्रियापदानें सांगितली आहे.)='क्रियेत'-करावें (जिचें कर्म आक्षिप्त आहे अशी तीच भावना 'क्रियेत' या पदानें सांगितली आहे.)='कर्तव्यं'-करावें (धात्वर्थविशेषणभूत तीच भावना 'कर्तव्यं' या पदानें सांगितली आहे, असा भेद आहे.)='भवेत्'-व्हावें [येथेंहि 'भूयेत' व 'भवितव्यं' असें उदाहरण द्यावें. -'भू' व 'अस्' यांचा अर्थ जरी एकच आहे तरी 'भू' या धातूचा प्राप्ति इत्यादि दुसरा अर्थहि आहे, असें पाहून 'अस्'धातूचें पृथक् उदाहरण देतात-] ='स्यात्'-व असावें, व्हावें, असें पांचवें, हें सर्व वेदांमध्यें नियत विधिलक्षण आहे. ['स्यात्' येथेंहि 'भूयेत' व 'भवितव्यं' यांचें उदाहरण जाणावें. मूलवचनांत पाठक्रमाच्या अनुरोधानें 'पांचवें' असें म्हटलें आहे. या तीन धातूंनीं अनुगत असलेल्या प्रत्ययांनीं सर्वभावनानुगत श्रेयःसाधनत्वरूप विधि सांगितला जातो. पण प्रत्येक धातूच्या प्रत्ययानें भावनाभेद होत नाहीं, असें मानून 'एतत्०' इत्यादि हा उत्तरार्ध आहे.-"तर मग 'विधि, निमंत्रण, आमंत्रण, संप्रश्न, प्रार्थना या अर्थी लिङ् विहित आहे' असें पाणिनीचें स्मरण कसें आहे?

कारण या स्मरणाचा व त्या स्मरणाचा परस्पर विरोध आहे," अशी आशंका घेऊन 'उत्सर्गतः—सामान्यतः वेदांत विधिपर असलेले लिङादिप्रत्यय अपवादा-मुळें अन्यथा होतात,' अशा अभिप्रायानें '**लिङादि०**' इत्यादि भाष्यानें म्हण-तात—]='लिङादिकांचा जो अर्थ तो विधि' असें मानणारे ते असें स्मर-तात—सांगतात. [—सूत्रांतील 'च-'कारानें सुचविलेलें उद्गीथादि श्रुतींच्या स्तुत्यर्थ-त्वाभावाविषयींचें हेत्वंतर '**प्रतिप्रकरणं च०**' इत्यादि भाष्यानें सांगतात—]

**भाष्यं—प्रतिप्रकरणं च फलानि श्राव्यन्ते—'आपयिता ह वै कामानां भवति' 'एष ह्येव कामागानस्येष्टे' 'कल्पन्ते हास्मै लोका ऊर्ध्वाश्चावृताश्च' इत्यादीनि। तस्मादप्युपासनविधानार्था उद्गीथादिश्रुतयः॥ २२॥** (३)

**भाष्यार्थ**—आणि प्रत्येक प्रकरणांत "आतिगुणयुक्त उद्गीथाक्षराची उपासना करणारा कामांची प्राप्ति करविणारा होतो"—छां.१.१.७—"कारण हा उद्गाता कामांचें आगान करण्यास समर्थ आहे"—छां. १.७.१—"या उपासकाला ऊर्ध्व व आवृत लोक समर्थ होतात"—छां. २.२.३.—इत्यादि फलें ऐकविलीं जातात. [—'**तस्मात्०**' इत्यादि भाष्यानें फलभेदश्रवणाचा उपसंहार करितात—]=त्या-मुळेंहि उपासनेच्या विधानार्थ उद्गीथादि श्रुति आहेत. [पूर्वोक्त अपूर्वादिकांच्या समुच्चयासाठीं भाष्यांतील 'तस्मात् अपि' येथील 'अपि' हा शब्द आहे.]२२ (३)

## ( ४. **पारिप्लवाधिकरण. सू. २३-२४** )

——उद्गीथादिश्रुतींचें उपासनाविषयार्पकत्व रसतमत्वादिकांहून श्रेष्ठ आहे, असें सांगितलें. आतां आख्यानांचेंहि पारिप्लवशेषत्व विद्येच्या स्तुतीपेक्षां अधिक श्रेष्ठ आहे. कारण त्यांचा अनुष्ठानाच्या समाप्तीशीं संबंध आहे, अशी आशंका '**पारि-प्लवार्थाः०**' इत्यादि सूत्रानें घेऊन तिचा परिहार करितात—

## **सूत्रं—पारिप्लवार्था इति चेन्न विशेषितत्वात्॥२३**

**सूत्रार्थ**—या आख्यानश्रुति पारिप्लवासाठीं आहेत, असें जर म्हणाल तर तें बरोबर नाहीं. कारण पारिप्लवार्थ आख्यायिकांचा विशेष सांगितलेला आहे. २३. —सु.ब्र.३९९. [—विषयकथनपूर्वक आख्यानत्व या धर्माचें साम्य व विद्येचें सांनिध्य अशा दोन कारणांनीं '**अथ ह०**' इत्यादि भाष्यानें संशय सांगतात—]

**भाष्यं—"अथ ह याज्ञवल्क्यस्य द्वे भार्ये बभूवतुर्मैत्रेयी च कात्यायनी च" "प्रतर्दनो ह वै दैवोदासिरिंद्रस्य प्रियं धामोपजगाम" "जानश्रुतिर्ह पौत्रा-यणः श्रद्धादेयो बहुदायी बहुपाक्य आस" इत्येवमादिषु वेदान्तपठितेष्वाख्या-**

**नेषु संशयः-किमिमानि पारिप्लवप्रयोगार्थानि आहोस्वित्संनिहितविद्याप्रतिपत्त्यर्थानीति ॥**

**भाष्यार्थ**—" आतां याज्ञवल्क्याच्या दोन भार्या होत्या. मैत्रेयी व कात्यायनी" –बृ. ४. ५. १.–" दिवोदासाचा पुत्र प्रतर्दन इंद्राच्या प्रियधामास–स्वर्गास गेला. "–कौ. ३. १.–" पौत्रायण जानश्रुति श्रद्धेनें देणारा, पुष्कळ देणारा व बहु पाक करणारा होता"–४.१.१.–इत्यादि वेदान्तांत पठित असलेल्या आख्यानांविषयीं ' काय, हीं आख्यानें पारिप्लवप्रयोगासाठीं आहेत कीं समीपवर्ती विद्येच्या प्रतिपत्तीसाठीं–ज्ञानासाठीं–स्तुतीसाठीं आहेत ? ' असा संशय येतो. [ ' अश्वमेधयज्ञामध्यें ' पुत्र व अमात्य यांनीं परिवेष्टित झालेल्या राजाला ' पारिप्लव सांगावा ' इत्यादि वचनानें नानाप्रकारच्या आख्यानांचें कथन विहित आहे, त्याला पारिप्लवप्रयोग असें म्हणतात. या अधिकरणांत उपनिषदांतील आख्यानांच्या पारिप्लवार्थत्वाचें निरसन करून त्या त्या उपनिषदांतील समीपवर्ती स्वतंत्र पुरुषार्थाचें साधन अशा विद्यार्थत्वाचें समर्थन केलेलें असल्यामुळें याच्या पादादिसंगति आहेत. पूर्वपक्षांत ' आख्यानांना प्रयोगशेषत्व असल्यामुळें वेदान्तांतील आख्यानांनाहि प्रयोगशेषत्व आहे. त्यामुळें त्यांच्या विद्याप्राधान्याची असिद्धि ' व सिद्धान्तांत 'विशेषणामुळें उपनिषदांतील आख्यानांची प्रयोगशेषत्वापासून व्यावृत्ति होते. म्हणून त्यांना प्रयोगशेषत्व नाहीं. त्यामुळें त्यांच्या विद्याप्राधान्याची सिद्धि' असा फलभेद मानून ' **पारिप्लवार्थाः०** ' इत्यादि भाष्यानें पूर्वपक्ष–]

**भाष्यं—पारिप्लवार्था इमा आख्यानश्रुतयः । आख्यानसामान्यात् । आख्यानप्रयोगस्य च पारिप्लवे चोदितत्वात् । ततश्च विद्याप्रधानत्वं वेदान्तानां न स्यात् । मंत्रवत्प्रयोगशेषत्वादिति चेत् ॥**

**भाष्यार्थ**—या आख्यानश्रुति पारिप्लवासाठीं आहेत. कारण त्यांना आख्यानसामान्य–आख्यानजातीयत्व आहे. [–'अहोपण, गुरु-शिष्यसमाचाराच्या–आचाराच्या प्रदर्शनानें व बुद्धिसौकर्याच्या द्वारानें यांचें विद्याशेषत्व सामर्थ्यलिंगामुळें सिद्ध आहे ' अशी आशंका घेऊन वादी 'पण पारिप्लवश्रुतिविरोध आला असतां लिंग अप्रयोजक आहे' असें **'आख्यान०'**इत्यादि भाष्यानें सांगतो–]=आणि आख्यानप्रयोगाला पारिप्लवामध्यें विहितत्व आहे. ["अहोपण 'ज्याचा आश्विन ग्रह शस्यमान असतांना सूर्य उदय पावेल त्यानें सर्वहि दाशतयी–ऋग्वेद म्हणावा–त्याचें पारायण करावें ' अशा सर्वश्रुतीनें सर्व ऋचांचा आश्विन-ग्रहशंसनांत विनियोग केलेल्याहि सर्व ऋचांच्या प्रातिस्विक विनियोगाप्रमाणें ' पारिप्लवं आचक्षीत ' या

वचनानें पारिप्लवांत विहित असलेल्या आख्यानांचा या लिंगानें किंवा संनिधी-मुळें विद्येमध्यें विनियोग होईल " अशी आशंका घेऊन 'प्रातिस्विकविनियोग व समुदायविनियोग यांना श्रौतत्वानें तुल्यत्व असल्यामुळें व प्रकृत पारिप्लवांत त्याचा अभाव असल्यामुळें असें म्हणूं नको,' असें '**ततश्च०**' इत्यादि भाष्यानें सांगतो-]=आणि त्यामुळें वेदान्तांचें विद्याप्रधानत्व नाहींसें होईल. [-"अहो-पण, आख्यानांना प्रयोगशेषत्व जरी असलें तरी सर्व वेदान्तांना प्रयोगशेषत्व नस-ल्यामुळें त्यांचें विद्याप्रधानत्व युक्त आहे." अशी आशंका घेऊन वादी '**मंत्रवत्०**' इत्यादि भाष्यानें म्हणतो-]=कारण त्यांना मंत्राप्रमाणें प्रयोगशेषत्व आहे, असें जर म्हणाल तर [-'**तन्न**'असा पुढें संबंध.'देवस्य त्वा०'इत्यादि मंत्रांतील एखाद्याच पदाचें संबद्धार्थत्वानें प्रयोगशेषत्व सिद्ध झालें असतां त्याच्या एकवाक्यतेनें पदान्तरांचेंहि प्रयोगशेषत्व इष्ट आहे. त्याचप्रमाणें आख्यानांना प्रयोगशेषत्व आहे, असें झालें अ-सतां तदेकवाक्यत्वानें सर्व उपनिषदांना तच्छेषत्व असल्यामुळें विद्याप्रधानत्व नाहीं, असा भावार्थ.-पण सामान्यश्रुतीला विशेषोक्तीनें अतत्परत्व असल्यामुळें त्या सामान्य-श्रुतीनें लिंगादिकांचा बाध होत नाहीं, असा '**तन्न०**' इत्यादि भाष्यानें सिद्धान्त-]

**भाष्यं--तन्न । कस्मात् । विशेषितत्वात् । 'पारिप्लवमाचक्षीत' इति हि प्रकृत्य 'मनुर्वैवस्वतो राजा' इत्येवमादीनि कानिचिदेवाख्यानानि तत्र विशे-ष्यन्ते । आख्यानसामान्याच्चेत्सर्वगृहीतिः स्यादनर्थकमेवेदं विशेषणं भवेत् । तस्मान्न पारिप्लवार्था एता आख्यानश्रुतयः ॥ २३ ॥**

**भाष्यार्थ**--तें बरोबर नाहीं. कोणत्या कारणानें ? ' विशेषितत्वामुळें. [अश्व-मेधांत पहिल्या दिवशीं 'मनुर्वैवस्वतो राजा०' असें सांगतो. दुसऱ्या दिवशीं 'यमो वैवस्वतः०' असें, तिसऱ्या दिवशीं 'वरुण आदित्यः' असें; याप्रमाणें आख्यानांचे विशेष वाक्यशेषांत श्रुत आहेत. त्यांच्या बलानें उपक्रमाचा संकोच युक्त आहे. 'पण उपक्रमांतील सर्वशब्दामुळें उपसंहारस्थ विशेषोक्ति उपलक्षणार्थ आहे' असेंहि म्हणतां येत नाहीं. कारण आरंभीं 'सर्व आख्यानें पारिप्लवांत सांगतो' असें सांगून व 'पारिप्लव सांगावें' असें विधान करून 'मनुर्वैवस्वतः' इत्यादि पठित आहे. त्यांतील पुनर्विधान वाक्यशेषस्थ आख्यानांच्या नियमासाठीं आहे. नाहीं तर त्याला व्यर्थत्व प्राप्त होतें. उपक्रमांतील सर्वशब्दहि वाक्यशेषस्थ उपा-ख्यांतील कांहीं आख्यानेंच सांगून होणारा जो उपरम-आख्यानकथनाची निवृत्ति त्याची व्यावृत्ति करण्यासाठीं आहे. त्यामुळें तो अर्थवान् आहे, व्यर्थ नाहीं, असें मानून सिद्धान्ताचें विवरण-]='**पारिप्लवं०**'-कारण "पारिप्लव

सांगावे " असा उपक्रम करून ' मनुर्वैवस्वतो राजा ' इत्यादि कांहीं थोडीशींच आख्यानें तेथें विशेषित केलीं जातात, त्यांचाच तेथें विशेष सांगितला जातो. [–आतां ' आख्यानसामान्यामुळें या श्रुति पारिप्लवार्थ आहेत ' असें वाद्यानें वर पृ.–५४३ म्हटलें आहे त्याविषयीं आचार्य म्हणतात–]=**'आख्यानसामान्यात्०'**–आख्यानत्व या एवढ्याच सामान्यामुळें–सादृश्यामुळें जर सर्व आख्यानांचें **ग्रहण** होतें, **असें** म्हटलें तर हें पूर्वोक्त विशेषण–पूर्वोक्त आख्यानविशेषांचा निर्देश व्यर्थच होईल. [–**' तस्मात्० '** इत्यादि भाष्यानें विशेषणाच्या फलाचें निगमन–]=त्यामुळें ह्या पूर्वोक्त आख्यानश्रुति पारिप्लवासाठीं नाहींत. [–" तर मग आख्यानें कशांत उपयुक्त आहेत ? " अशी आशंका घेऊन ' विशेषणश्रुतीनें सर्वश्रुतीचा भंग केला असतां निर्बाधसंनिधि विद्यांमध्येंच उपनिषदांतील आख्यानांचा विनियोग करील ' असें **' तथा च० '** इत्यादि सूत्रानें सांगतात–]

**सूत्रं—तथा चैकवाक्यतोपबन्धात् ॥ २४ ॥ (४)**

**सूत्रार्थ**—' तथा च '–आणि पूर्वोक्त युक्तीनें त्या आख्यायिकांना पारिप्लवार्थत्व नाहीं, असें झालें असतां त्या विद्यास्तुत्यर्थच असणें युक्त आहे. 'एकवाक्यतोपबंधामुळें'–कारण त्यांच्या समीप असलेल्या भिन्न भिन्न विद्यांशीं त्यांची एकवाक्यता प्रतीत होते. २४. (४)–सु.ब्र.४०० [–**' असति० '** इत्यादि भाष्यानें सूत्रार्थाचें विवरण–]

**भाष्यं—असति च पारिप्लवार्थत्वे आख्यानानां संनिहितविद्याप्रतिपादनोपयोगितैव न्याय्या । एकवाक्यतोपबंधात् । तथा हि तत्र तत्र संनिहिताभिः विद्याभिरेकवाक्यता दृश्यते प्ररोचनोपयोगात्प्रतिपत्तिसौकर्योपयोगाच्च । मैत्रेयीब्राह्मणे तावत्—' आत्मा वा अरे द्रष्टव्यः ' इत्याद्यया विद्ययैकवाक्यता दृश्यते । प्रातर्दनेऽपि " प्राणोऽस्मि प्रज्ञात्मा " इत्याद्यया । जानश्रुतिरित्यत्रापि ' वायुर्वाव संवर्गः ' इत्याद्यया ॥**

**भाष्यार्थ**—आणि आख्यानांना पारिप्लवार्थत्व नाहीं, असें झालें असतां संनिहित विद्येचें प्रतिपादनोपयोगित्वच न्याय्य आहे. म्ह० तीं समीपवर्ती विद्येचें प्रतिपादन करण्याच्याच उपयोगी असणें योग्य आहे ' एकवाक्यतोपबंधनामुळें ' –एकवाक्यतेच्या उपसंबंधामुळें. [–**' तथा हि० '** इत्यादि भाष्यानें एकवाक्यतोपसंबंधाचेंच **विवरण–**]=कारण त्या त्या संनिहित विद्यांशीं त्या त्या आख्यायिकांची प्ररोचनोपयोगामुळें व प्रतिपत्तिसौकर्याच्या उपयोगामुळें एकवाक्यता दिसते. [ प्ररोचन म्ह० अनुराग–प्रीति उत्पन्न करणें व प्रतिपत्तिसौकर्य म्ह० ज्ञानाचें सुकरत्व, यांसाठीं उपयोग असल्यामुळें आख्यानांची विद्यांशीं एक-

वाक्यता प्रतीत होते, असा भावार्थ.–संनिहित विद्यांशीं आख्यानांच्या एकवाक्यता-प्रतीतीचें उदाहरण देतात–]=त्यांतील अगोदर मैत्रेयी ब्राह्मणांत 'हे मैत्रेयि, आत्मा द्रष्टव्य आहे '–बृ. २. ४. ५.–इत्यादि विद्येशीं एकवाक्यता दिसते. प्रातर्दन ब्राह्मणांतहि 'मी प्रज्ञात्मा प्राण आहें'–कौ. ३.–इत्यादि विद्येशीं, 'जानश्रुतिः०' इत्यादि आख्यानांतहि ' वायुच संवर्ग आहे '–छां. ४ ३. १.–इत्यादि विद्येशीं –एकवाक्यता प्रतीत होते. [–आणि आख्यानत्व असतांनाहि पारिप्लवार्थत्वाचें अदर्शन असल्यामुळें प्रकृत आख्यानांना पारिप्लवार्थत्व नाहीं, असें '**यथा०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]

**भाष्यं—यथा 'स आत्मनो वपामुदखिदत्' इत्येवमादीनां कर्मश्रुतिगतानामाख्यानानां संनिहितविधिस्तुत्यर्थता। तद्वत्। तस्मान्न पारिप्लवार्थत्वम् ॥२४**

**भाष्यार्थ**—ज्याप्रमाणें ' तो प्रजापति आपली वपा होमासाठीं वर काढिता झाला ' इत्यादि कर्मश्रुतिगत आख्यानांना समीपवर्ती विधीचें स्तुत्यर्थत्व आहे, त्याप्रमाणें या आख्यांनाना संनिहितविद्यास्तुत्यर्थत्व आहे. [–याप्रमाणें श्रुति, लिंग व संनिधि यांनीं उक्त आख्यानांचें विद्यार्थत्व सिद्ध झालें असतां '**तस्मात्०**' इत्यादि भाष्यानें फलिताचा उपसंहार करितात–]=म्हणून पूर्वोक्त आख्यानांना पारिप्लवार्थत्व नाहीं.२४.–सु. ब्र. ४००-४०१. (४)

**(५. अग्नीन्धनाद्यधिकरण. सू. २५.)**

—याप्रमाणें कथांचें विद्याशेषत्व प्रदर्शित केलें असतां 'तरमग कर्मांनाहि विद्याशेषत्व नसलें तरी तें आहे, असें होईल,' अशी आशंका घेऊन, प्रासंगिक विचार संपवून पहिल्या पुरुषार्थाधिकरणाचें फल '**अत एव०**' इत्यादि सूत्रानें सांगतात–

**सूत्रं—अत एव चाग्नीन्धनाद्यनपेक्षा ॥ २५ ॥ ( ५ )**

**सूत्रार्थ**—ब्रह्मविद्येला स्वतंत्र पुरुषार्थत्व असल्यामुळें तिला अग्नीन्धनादिकर्मांची अपेक्षा नाहीं. २५ (५)–सु. ब्र. ४०१. [–ब्रह्मविद्या मोक्षामध्यें कर्मांची इतिकर्तव्यतेनें अपेक्षा करिते कीं नाहीं, याविषयीं वाद्यांचा मतभेद असल्यामुळें संदेह येतो. '**यज्ञेन०**'–बृ. ४. ४. २२–" यज्ञानें जाणण्याची इच्छा–विविदिषा करितात," इत्यादि वाक्यानें विविदिषेमध्यें विनियोग केलेल्या यज्ञादिकर्मांचा विषयसौंदर्यानें लभ्य असलेल्या त्या विविदिषेंत अन्वय होत नसल्यामुळें तद्विषयज्ञानानें साध्य होणाऱ्या मोक्षामध्येंच त्यांचा अन्वय होणें युक्त आहे. म्हणून ब्रह्मविद्या कर्मांची अपेक्षा करिते, " असा पूर्वपक्ष प्राप्त होतो. " पण 'काष्ठांनीं स्वयंपाक करितो ' या उदाहरणांत पाकाचें साधन ज्या ज्वाला त्यांचें कारण अशा काष्ठांना

पाकहेतुत्व असल्याचें दिसतें. त्यामुळें इच्छा-जनक जी अन्तःकरणाची शुद्धि तिच्या हेतुत्वानें यज्ञादिकांच्या ज्ञानेच्छाहेतुत्वाची सिद्धि होते आणि साक्षात्‌च मोक्षान्वयामध्यें ' यज्ञेन ' इत्यादि करणविभक्तीचा भंग होतो. त्यामुळें त्यांच्या पारंपर्याचाच स्वीकार करणें उचित आहे. म्हणून ब्रह्मविद्या मोक्षामध्यें कर्मांची अपेक्षा करीत नाहीं, " असा सिद्धान्त आहे. या अभिप्रायानें 'अतः' या शब्दानें परामर्श करण्यास योग्य अशा संनिहिताचा अभाव असल्यामुळें सूत्रांतील 'अतः' या शब्दाच्या अनुपपत्तीची आशंका घेऊन ' **पुरुषार्थः०**' इत्यादि भाष्यानें सूत्राक्षरांची योजना करितात-]

**भाष्यं—' पुरुषार्थोऽतः शब्दात् ' इत्येतद्व्यवहितमपि संभवाद् अत इति परामृश्यते । अत एव च विद्यायाः पुरुषार्थहेतुत्वादग्नींधनादीन्याश्रमकर्माणि विद्याया स्वार्थसिद्धौ नापेक्षितव्यानीत्याद्यस्यैवाधिकरणस्य फलमुपसंहरत्यधिकविवक्षया ॥** २५ ॥ ( ५ )

**भाष्यार्थ**—'या औपनिषद आत्मज्ञानापासून पुरुषार्थ प्राप्त होतो'-पृ. ४९६- असें हें पुरुषार्थाधिकरण व्यवहित-अन्तरित-दूर जरी असलें तरी संभवामुळें सूत्रांतील ' अतः ' या शब्दानें त्याचा परामर्श केला जातो. ' अत एव च ' -विद्येला पुरुषार्थहेतुत्व असल्यामुळेंच अग्नीन्धनादि आश्रमकर्में विद्येच्या स्वार्थसिद्धीमध्यें अपेक्षितव्य नाहींत, असा हा आद्य अधिकरणाच्याच फलाचा उपसंहार करितात. [या पादाच्या पहिल्या अधिकरणांत जसें विद्येला स्वातंत्र्यानें पुरुषार्थहेतुत्व सांगितलें आहे तसेंच तें येथें अनुवादिलें जातें, त्याचा तसाच येथें अनुवाद केला जातो, आणि असें असल्यामुळें ' आग्नेयादिकांमध्यें अदर्शनामुळें पुरुषार्थहेतुत्व कर्मापेक्षेच्या विरोधी नाहीं' या वाद्याच्या म्हणण्याचें निरसन झालें. याची पादादिसंगति निराळी सांगावयास नको. कारण प्रथमाधिकरणाच्याच फलभूत असलेल्या या अधिकरणाची पादादिसंगति सुगम आहे. पूर्वोत्तर पक्षांचें फलहि त्याच्या फलाप्रमाणेंच आहे, अशा अभिप्रायानें ' आद्यस्य ' इत्यादि म्हटलें आहे. -तथापि स्वार्थसिद्धीमध्येंच अनपेक्षा, स्वसिद्धीमध्यें अनपेक्षा नाहीं, स्वसिद्धीमध्यें त्यांची अपेक्षा आहे, असा पुढच्याच अधिकरणांत निर्देश करण्यासाठीं हा उपसंहार आहे, असें त्याचें फल सांगतात-]=' **अधिकाविवक्षया** '-त्याविषयीं अधिक असें कांहीं सांगण्याच्या इच्छेनें हा उपसंहार आहे. २५.-सु.ब्र.४०२.(५)

## ( ६. सर्वापेक्षाधिकरण. सू. २६-२७. )

—'ब्रह्मविद्या स्वफलासाठीं कर्मांची अपेक्षा करणारी नाहीं. प्रमात्वामुळें. उभयसंमत विद्येप्रमाणें, ' असें सांगितलें. तर मग " तिला स्वतःच्या उत्पत्तीसाठींहि

कर्मांची अपेक्षा नाहीं. प्रमात्वामुळें. पूर्वोदाहरणाप्रमाणें " अशी आशंका घेऊन सूत्रकार ' **सर्वापेक्षा०** ' या सूत्रानें म्हणतात—

**सूत्रं--सर्वापेक्षा च यज्ञादिश्रुतेरश्ववत् ।। २६**

**सूत्रार्थ**—विद्येला स्वोत्पत्तीसाठीं ' सर्वापेक्षा '–सर्व आश्रम-कर्मांची अपेक्षा आहे. ' यज्ञादिश्रुतीमुळें '–' विविदिषन्ति यज्ञेन० ' इत्यादि श्रुतीनें यज्ञादिकांना जिज्ञासेच्या द्वारा ज्ञानसाधनत्व सांगितलें आहे. 'अश्वाप्रमाणें'–योग्यतावशात् अश्व रथ ओढण्याच्या कार्यांतच योजिला जातो. २६–सु. ब्र. ४०३. [–' अधिकविवक्षया' असें जें वर म्हटलें आहे तें व्यक्त करणारे भाष्यकार ब्रह्मविद्येला विषय करून पूर्वाधिकरणन्यायानें व विविदिषाश्रुतीमुळें 'इदं०'इत्यादि भाष्यानें संशय सांगतात–]

**भाष्यं—इदमिदानीं चिन्त्यते–किं विद्याया अत्यन्तमेवानपेक्षा आश्रमकर्मणां उतास्ति काचिदपेक्षेति । तत्रात एवाग्नींधनादीन्याश्रमकर्माणि विद्याया स्वार्थसिद्धौ नापेक्ष्यन्ते । एवमत्यन्तमेवानपेक्षायां प्राप्तायामिदमुच्यते सर्वापेक्षा चेति । अपेक्षते च विद्या सर्वाण्याश्रमकर्माणि । नात्यन्तमनपेक्षैव ।।**

**भाष्यार्थ**—आतां ' विद्येला आश्रमकर्मांची अत्यंतच अनपेक्षा आहे कीं त्यांची कांहीं अपेक्षा आहे' याचा विचार केला जातो. [–आणि या अधिकरणांत स्वतंत्र पुरुषार्थसाधन असें जें औपनिषदात्मज्ञान त्याच्या उत्पत्तीमध्यें यज्ञादि व शमादिक यांच्या विविदिषावाक्यसंबंधी विनियोगाचें कथन केलेलें असल्यामुळें याची पादादिसंगति आहे. पूर्वपक्षांत ' यज्ञादिकांचा विज्ञानामध्यें अन्वय होत असल्यास त्याच्या फलामध्येंहि त्याच्या अन्वयाची प्रसक्ति होत असल्यामुळें ज्ञानकर्मसमुच्चयाची सिद्धि होते,' व सिद्धान्तांत ' परंपरेनें त्यांचा ज्ञानाशीं संबंध जरी असला तरी त्याच्या फलाशीं संबंध होण्याचें कांहीं कारण नसल्यामुळें ज्ञानकर्मसमुच्चयाच्या असिद्धीनें ज्ञानाच्याच मोक्षहेतुत्वाची सिद्धि होते.' असा फलभेद स्वीकारून ' **तत्रातः०** ' इत्यादि भाष्यानें पूर्वपक्ष करितात–]=असे दोन पक्ष प्राप्त झाले असतां म्हणूनच अग्नींधनादिक आश्रमकर्में विद्येला स्वार्थसिद्धीमध्यें अपेक्षित नाहींत, विद्या आपल्या मोक्षरूप प्रयोजनाच्या सिद्धीसाठीं आश्रमकर्मांची अपेक्षा करीत नाहीं. याप्रमाणें अत्यंतच अनपेक्षा प्राप्त झाली असतां [–' **इदं** उच्यते' असा पुढें संबंध.अपरोक्ष आत्मज्ञान केवल प्रमाणाधीन असल्यामुळें, प्रामाणिक ज्ञानाचा प्रमाणाचे हेतु असतांना कर्मादिकांच्या अभावानें अनुदय--अनुत्पत्ति उपलब्ध होत नसल्यामुळें म्ह० कर्मादिकांच्या अभावीं प्रमाणजन्य ज्ञान होत नाहीं, असा अनुभव येत नसल्यामुळें, केवल व्यतिरेकाच्या अभावीं यज्ञादिकांच्या हेतुत्व-

कल्पनेचा संभव नसल्यामुळें, विविदिषाश्रुति असल्यामुळें, आणि 'विविदिषन्ति' असा वर्तमानप्रयोग असल्याकारणानें त्याच्या विनियोजकत्वाचा असंभव असल्यामुळें ज्ञानाच्या फलवत्-उत्पत्तीमध्येंहि कर्मांचा अन्वय होत नाहीं, असा भावार्थ. पण विविदिषावाक्यांत वर्तमानप्रयोग जरी असला तरी 'ज्याची पर्णमयी जुहू असते '–पृ.४९८–इत्यादि उदाहरणांप्रमाणें अपूर्वत्वामुळें पांचव्या 'लेट्' या लकारानें 'ज्याला ब्रह्मानुभावाची इच्छा असेल त्यानें यज्ञादि करावे' अशा विधीचा स्वीकार केलेला असल्यामुळें, आगमाला केवल व्यतिरेकाची अपेक्षा नसल्यामुळें विषयसौन्दर्यानें प्राप्त होणाऱ्या इच्छेमध्यें त्यांचा साक्षात् अन्वय संभवत नसल्यामुळें, त्याचें फल जें ज्ञान त्यांत यज्ञादिकांच्या अन्वयाची सिद्धि होत असल्यामुळें व 'यज्ञेन०' इत्यादि करणश्रुतीनें त्यांना अभीष्ट असलेल्या अपरोक्ष ज्ञानाचें साधनत्व आहे, असें उपलब्ध होत असल्यामुळें आणि ज्ञानाला प्रमाणाधीनत्वानें साक्षात् यज्ञादिसाधनत्व जरी नसलें तरी चित्तशुद्धीनें प्रत्यक्-प्रवणता उत्पन्न करून त्यांचें अपरोक्ष ज्ञानांत पर्यवसान होत असल्यामुळें, परंपरेनेंहि 'काष्ठांनीं पाक करितो' याप्रमाणें करणविभक्ति संभवत असल्यामुळें ज्ञानाला उत्पत्तीमध्यें कर्मांची अपेक्षा आहे, असा सिद्धान्त '**इदं उच्यते०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=आश्रमकर्मांची विद्येला अत्यंतच अनपेक्षा आहे, असें प्राप्त झालें असतां 'आणि तिला सर्वांची अपेक्षा आहे' असें हें सांगितलें जातें. विद्या सर्व आश्रमकर्मांची अपेक्षा करिते, तिला त्यांची अत्यंतच अनपेक्षा नाहीं. [–'**ननु०**' इत्यादि भाष्यानें सामान्यतः पूर्वापरविरोधाच्या प्रतीतीची शंका–]

**भाष्यं—ननु विरुद्धमिदं वचनमपेक्षते चाश्रमकर्माणि विद्या नापेक्षते चेति। नेति ब्रूमः। उत्पन्ना हि विद्या फलसिद्धिं प्रति न किंचिदन्यदपेक्षते उत्पत्तिं प्रति त्वपेक्षते। कुतः। यज्ञादिश्रुतेः। तथाहि श्रुतिः–'तमेतं वेदानुवचनेन ब्राह्मणा विविदिषन्ति यज्ञेन दानेन तपसाऽनाशकेन' इति यज्ञादीनां विद्यासाधनभावं दर्शयति॥**

**भाष्यार्थ**—अहोपण 'विद्या आश्रमकर्मांची अपेक्षा करिते व ती त्यांची अपेक्षा करीत नाहीं,' असें हें वचन विरुद्ध सांगितलें जातें. [–'**नेति०**' इत्यादि भाष्यानें त्याच्या विभागकथनानें निरसन–]=याचें 'नाहीं'–हें विरुद्ध नाहीं, असें उत्तर आम्ही सांगतों. कारण उत्पन्न झालेली विद्या फलसिद्धीसाठीं दुसऱ्या कशाचीहि अपेक्षा करीत नाहीं, पण उत्पत्तीसाठीं कर्मांची अपेक्षा करिते. [–'**कुतः०**' इत्यादि भाष्यानें उक्त व्यवस्थेविषयीं प्रश्नपूर्वक हेतु सांगतात–]=कोणत्या कारणानें? 'यज्ञादिश्रुतीमुळें' [–'**तथा हि०**' इत्यादि भाष्यानें हेतूचें विवरण–]=कारण

तशी श्रुति आहे. “ त्या या आत्म्याला ब्राह्मण वेदाच्या नित्यस्वाध्यायानें, यज्ञानें, दानानें, निष्काम तपानें जाणण्याची इच्छा करितात ”–बृ. ४. ४. २२. सु. उ. पृ. ६९७–ही श्रुति यज्ञादिकांचा विद्यासाधनभाव दाखविते. [–“ **अहोपण, येथें यज्ञादिकांचा विविदिषासंयोग ज्ञात होतो. पण विषयाच्या सौंदर्यानें प्राप्य** असलेल्या विविदिषेमध्यें कर्मांचा अन्वय संभवत नसल्यामुळें अभीष्ट **असलेल्या** ज्ञानामध्यें जर त्यांचा अन्वय स्वीकारला जाईल तर ज्ञानाला प्रमाणाधीनत्व असल्यामुळें व कर्मांचा त्यांत अन्वय असिद्ध असल्यामुळें श्रुताचा त्याग करून त्याचें फल जो मोक्ष त्यांत त्यांचा अन्वय कशासाठीं मानिला जात नाहीं ? ” ‘ **विविदिषा०** ’ इत्यादि भाष्यानें सांगतात—]

**भाष्यं—विविदिषासंयोगाच्चैषां उत्पत्तिसाधनभावोऽवसीयते । ‘ अथ यद्यज्ञ इत्याचक्षते ब्रह्मचर्यमेव तत् ’ इत्यत्र विद्यासाधनभूतस्य ब्रह्मचर्यस्य यज्ञादिभिः संस्तवाद्यज्ञादीनामपि हि साधनभावः सूच्यते । ‘ सर्वे वेदा यत्पदमामनन्ति तपांसि सर्वाणि च यद्वदन्ति । यदिच्छन्तो ब्रह्मचर्यं चरन्ति तत्ते पदं संग्रहेण ब्रवीमि ’ इत्येवमाद्या च श्रुतिराश्रमकर्मणां विद्यासाधनभावं सूचयति ॥**

**भाष्यार्थ**—आणि विविदिषासंयोगामुळें कर्मांचा उत्पत्तिसाधनभाव निश्चित होतो, कर्में विविदिषेच्या उत्पत्तीचीं साधनें आहेत, असा निश्चय होतो. [–कर्मांच्या मोक्षहेतुत्वकल्पनेमध्यें ‘ या संसारांत अकृत–नित्य असें कांहीं नाहीं. तेव्हां मला कर्मानें काय करावयाचें आहे ? ’–मुं. १. २. १२. सु. उ. १४१–इत्यादि वचनाचा विरोध जरी येत असला तरी कर्मांना परंपरेनें हेतुत्व असणें, यांत कांहीं बाध नाहीं. म्हणून बुद्धिशुद्धीनें ज्ञानाच्या उत्पत्तीमध्येंच यज्ञादिकांचा अन्वय आहे, असा भावार्थ. ‘ यज्ञादिश्रुतेः ’ या सूत्रांतील हेतूनें वाक्यान्तरहि ग्रहण करण्यास योग्य आहे, असें ‘ **अथ०** ’ इत्यादि भाष्यानें सांगतात–]=“ नंतर लोकांत यज्ञ परम पुरुषार्थाचें साधन आहे, म्हणून जें सांगतात तें ब्रह्मचर्यच आहे. ”–छां. ८. ५. ३. सु. उ. ४७४–असेंहि दुसरें वाक्य आहे. [–या श्रुतींत यज्ञादिकांच्या ज्ञानसाधनत्वाविषयीं विज्ञात झालेलें लिंग ‘ **अत्र०** ’ इत्यादि भाष्यानें सांगतात–]=या श्रुतिवचनांत विद्यासाधनभूत ब्रह्मचर्याची यज्ञादिकांनीं स्तुति केलेली असल्यामुळें यज्ञादिकांचाहि साधनभाव सुचविला जातो. [–‘**सर्वे वेदाः०**’ इत्यादि वाक्यानें त्याविषयींच लिंगान्तर सांगतात–]=“ सर्व वेद–उपनिषदें जें पद–अविभागानें जाण्यास–एकरूपानें मिळण्यास योग्य स्थान आहे, असें सांगतात, सर्व तपें ज्याच्या प्राप्तीकरितां आहेत असें विद्वान् सांगतात, ज्याची इच्छा

करणारें गुरुकुलवासरूप ब्रह्मचर्य किंवा ब्रह्मप्राप्तीच्या उपयोगी असलेलें दुसरें एखादें व्रत करितात तें पद मी तुला संक्षेपतः सांगतों "–का. १.२.१५– ही अशा प्रकारची श्रुति आश्रमकर्मांचा विद्यासाधनभाव–त्यांचें विद्यासाधनत्व सुचविते. [–कर्मांना परंपरेनें ज्ञानहेतुत्व आहे, याविषयीं '**स्मृतिरपि०**' इत्यादि भाष्यानें स्मृतिहि सांगतात–]

**भाष्यं—स्मृतिरपि "कषायपक्तिः कर्माणि ज्ञानं तु परमा गतिः। कषाये कर्मभिः पक्वे ततो ज्ञानं प्रवर्तते" इत्येवमाद्या। अश्ववदिति योग्यतानिदर्शनम्। यथा च योग्यतावशेनाश्वो न लांगलाकर्षणे युज्यते रथचर्यायां तु युज्यते। एवमाश्रमकर्माणि विद्यया फलसिद्धौ नापेक्ष्यन्ते उत्पत्तौ चापेक्ष्यन्त इति ॥२६॥**

**भाष्यार्थ—**" कर्में राग-द्वेषादि मलांचा परिपाक–निवृत्ति करणारीं आहेत. पण ज्ञान ही परमा गति आहे. रागादिकषाय–मल कर्मांनीं पक्व झाला असतां त्यानंतर–त्यापासून ज्ञान प्रवृत्त होतें " इत्यादि स्मृतिहि हेंच सुचविते. [–"पण, उत्पत्तीमध्यें जशी, तशीच फलामध्येंहि ज्ञानाला कर्मांची अपेक्षा कां नसेल ? " '**अश्ववत्०**' इत्यादि भाष्यानें सूत्रोक्त 'अश्ववत्' हाच दृष्टान्त घेऊन त्याचें व्याख्यान करितात–]='अश्वाप्रमाणें' हें योग्यतेविषयीं निदर्शन–दृष्टान्त आहे, आणि ज्याप्रमाणें योग्यतावशात् अश्व नांगर ओढणें, या कार्यांत नियुक्त केला जात नाहीं, पण रथचर्येमध्यें नियुक्त केला जातो–तो रथाला जोडला जातो, त्याप्रमाणें विद्येकडून फलसिद्धीमध्यें आश्रमकर्में अपेक्षिलीं जात नाहींत, पण स्वतःच्या उत्पत्तीमध्यें तीं अपेक्षिलीं जातात, असें सिद्ध झालें. २६. [–याप्रमाणें ज्ञानोत्पत्तीमध्यें बहिरंग साधनें सांगून त्यांतीलच अन्तरंग साधनें '**शम-दमादि०**' इत्यादि सूत्रानें सांगतात–]

## सूत्रं—शमदमाद्युपेतः स्यात्तथापि तु तद्विधेस्तदंगतया तेषामवश्यानुष्ठेयत्वात् ॥ २७ ॥ (६)

**सूत्रार्थ—**'तथापि' ब्रह्मविद्यार्थ्यानें 'शम-दमादिकांनीं युक्त व्हावें' कारण 'तदंगत्वानें'–विद्येच्या अंगत्वानें 'तस्मादेवंविच्छान्तः०' इत्यादि श्रुतीनें त्यांचें विधान केलें आहे. म्हणून विहित असलेल्या 'त्यांना अवश्य अनुष्ठेयत्व आहे.' २७. ( ६ )–सु. ब्र. ४०४. [–'**यदि०**' इत्यादि भाष्यानें येथील व्यावर्त्य शंका सांगतात–]

**भाष्यं—यदि कश्चिन्मन्येत यज्ञादीनां विद्यासाधनभावो न न्याय्यो विध्यभावात्। 'यज्ञेन विविदिषन्ति' इत्येवंजातीयका हि श्रुतिरनुवादस्वरूपा विद्या-**

**भिष्टवपरा न यज्ञादिविधिपरा। इत्थं महाभागा विद्या यद्यज्ञादिभिः एतां अवाप्तुमिच्छन्तीति। तथापि तु शमदमाद्युपेतः स्याद्विद्यार्थी 'तस्मादेवंविच्छान्तो दान्त उपरतस्तितिक्षुः समाहितो भूत्वात्मन्येवात्मानं पश्यति' इति विद्यासाधनत्वेन शमदमादीनां विधानाद्विहितानां चावश्यानुष्ठेयत्वात्॥**

**भाष्यार्थ**—जर कोणी एखादा वादी असें समजेल कीं, यज्ञादिकांचा विद्यासाधनभाव न्याय्य नाहीं, कारण त्यांच्या विधीचा अभाव आहे, 'यज्ञानें जाणण्याची इच्छा करितात'–बृ. ४.४.२२–ही अशा जातीची श्रुति अनुवादस्वरूप आहे, ती विद्येच्या अभिष्टवपर–स्तुतिपर आहे, यज्ञादिविधिपर नाहीं. ही अशा प्रकारची महाभागा विद्या आहे, कीं तिला मुमुक्षु यज्ञादिकांच्या योगानें संपादन करण्याची इच्छा करितात, अशी ती श्रुति विद्यास्तुतिपर आहे. [ विद्यास्तावकत्वानेंहि तिचें अर्थवत्त्व संभवत असतांना वर्तमानतेच्या भंगानें विधिकल्पना करणें अयुक्त आहे. कारण वर्तमानप्रयोगाचा भंग करून त्या श्रुतींत विधीची कल्पना केल्यास वाक्यभेद होण्याचा प्रसंग येतो. म्हणून विद्या केवळ शब्दापासूनच लभ्य आहे, असा भावार्थ.–पण, असा जरी तुझा अभिप्राय असला तरी दुसरें साधन अवश्य अनुष्ठेय आहे. विद्या केवळ शब्दापासून प्राप्त होण्यासारखी नाहीं, असा सूत्राच्या योजनेनें परिहार करितात–] =' **तथापि०** '-पण असें जरी असलें तरी ब्रह्मविद्यार्थ्यानें शमादिकांनीं युक्त व्हावें. कारण "म्हणून असें आपाततः जाणणारा शान्त, दान्त, उपरत, तितिक्षु व समाहित होऊन स्वशरीरांतच आत्म्याला पाहतो "–बृ. ४.४.२३.सु.ब्र. ७०० –असें विद्यासाधनत्वानें शमादिकांचें विधान केलेलें आहे व विहित असलेल्या साधनांना अवश्य अनुष्ठेयत्व असतें. [–"अहोपण, विविदिषावाक्यासारखेंच हें शमादिवाक्य असल्यामुळें त्याला विधिपरत्व नाहीं," अशी '**ननु०**' इत्यादि शंका–]

**भाष्यं—नन्वत्रापि शमाद्युपेतो भूत्वा पश्यतीति वर्तमानापदेश उपलभ्यते न विधिः। नेति ब्रूमः। 'तस्मात्' इति प्रकृतप्रशंसापरिग्रहाद्विधित्वप्रतीतेः। 'पश्येत्' इति च माध्यंदिना विस्पष्टमेव विधिमधीयते। तस्माद्यज्ञाद्यनपेक्षायामपि शमादीन्यपेक्षितव्यानि। यज्ञादीन्यपि त्वपेक्षितव्यानीति यज्ञादिश्रुतेरेव॥**

**भाष्यार्थ**––"अहोपण, या शमादिवाक्यांतहि ' शमादिकांनीं युक्त होऊन पाहतो' असा वर्तमानकाळी प्रयोगच दिसतो. त्यांत विधि उपलब्ध होत नाहीं." [–ज्याअर्थी आत्म्याला असें जाणून पापकर्मानें लिप्त होत नाहीं, त्याअर्थी ब्रह्मविद्यार्थ्यानें शमादिकांनीं युक्त होऊन विचार करावा, असा विधि अवगत होतो, असें ' **नेति०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=यावर असें होत नाहीं,

असें आम्ही सांगतों. कारण '**तस्मात्०**' या श्रौत पदानें प्रकृताच्या प्रशंसेचा परिग्रह केलेला असल्यामुळें या वाक्यांत विधित्वाची प्रतीति येते. [—कारण विधीच्या अभावीं त्याच्या प्रशंसेला व्यर्थत्व प्राप्त होत असल्यामुळें उक्त विधीची सिद्धि होते, असा भावार्थ.—याप्रमाणें काण्वपाठांत विधि सांगून माध्यंदिन पाठांत तर विधीच्या अभावाची शंकाहि नाहीं, असें '**पश्येत्०**' इत्यादि भाष्यानें सांगतात—]= आणि माध्यंदिन तर 'पश्येत्'—पहावें, असा अगदीं स्पष्टच विधि पढतात. [—'**तस्मात्०**' इत्यादि भाष्यानें सिद्ध झालेल्या या विधीचें फल सांगतात—]=म्हणून—याप्रमाणें शमादिकांच्या विधीची सिद्धि होत असल्यामुळें विद्येला फलासाठीं यज्ञादिकांची अपेक्षा जरी नसली तरी शमादिक अपेक्षितव्य—अपेक्षा करण्यास योग्य आहेत. [—याप्रमाणें यज्ञादिकांच्या असाधनत्वाविषयींची शंका आपाततः स्वीकारून साधनान्तराची अपेक्षा सांगितली. आतां यज्ञादिकांच्या असाधनत्वाविषयींची शंकाहि युक्त नाहीं, असें '**यज्ञादीनि०**' इत्यादि भाष्यानें सांगतात—]=पण यज्ञादि श्रुति असल्यामुळेंच यज्ञादि आश्रमकर्मेंहि अपेक्षितव्य आहेत. [—'**ननु०**' इत्यादि भाष्यानें वाद्यानें सांगितलेल्या पक्षाचें स्मरण करवून त्याचा परिहार करितात—]

**भाष्यं—ननूक्तं यज्ञादिभिर्विविदिषन्तीत्यत्र न विधिरुपलभ्यत इति। सत्यमुक्तं। तथापि त्वपूर्वत्वात्संयोगस्य विधिः परिकल्प्यते। न ह्ययं यज्ञादीनां विविदिषासंयोगः पूर्वप्राप्तो येनानूद्येत। "तस्मात्पूषा प्रपिष्टभागोऽदंतको हि" इत्येवमादिषु चाश्रुतविधिकेष्वपि वाक्येष्वपूर्वत्वाद्विधिं परिकल्प्य "पौष्णं पेषणं विकृतौ प्रतीयेत" इत्यादिविचारः प्रथमे तन्त्रे प्रवर्तितः। तथा चोक्तम् 'विधिर्वा धारणवत्' इति॥**

**भाष्यार्थ**—"अहोपण, 'यज्ञादिकांनीं जाणण्याची इच्छा करितात'—पृ.५५२—येथें विधि उपलब्ध होत नाहीं, असें आम्हीं वर सांगितलें आहे!" होय, असें तुम्हीं सांगितलें आहे, हें खरें; तथापि विविदिषासंयोगाला अपूर्वत्व असल्यामुळें विधीची परिकल्पना केली जाते. [—'**न हि०**' इत्यादि भाष्यानें संयोगाचें अपूर्वत्वच स्पष्ट करितात—]=कारण हा यज्ञादिकांचा विविदिषासंयोग पूर्वीं अन्यप्रमाणानें प्राप्त झालेला नाहीं, कीं ज्यामुळें त्याचा येथें अनुवाद केला जाईल. [ महावाक्याचें ऐक्य जरी असलें तरी अवान्तरवाक्यानें अनुष्ठानयोग्य अपूर्व विधि केला जातो. तेथें वाक्यभेद हा दोष येत नाहीं.—याविषयीं '**तस्मात्०**' इत्यादि भाष्यानें पूर्वतंत्राची—मीमांसाशास्त्राची संमति दाखवितात—]=ज्यांत विधि

श्रुत नाहीं अशाहि ‘ तस्मात् पूषा प्रपिष्टभाग आहे. कारण तो दंतरहित आहे ’ इत्यादि वाक्यांमध्यें अपूर्वत्वामुळें विधीची कल्पना करून ‘ पौष्ण पेषण विकृतींत जाणावें ’ इत्यादि विचार पूर्वमीमांसेंत प्रवृत्त केला आहे. [ ‘ पूषा प्रपिष्टभागः ’ इत्यादि वाक्य दर्श-पूर्णमासांमध्यें श्रुत आहे. त्यांत सूर्याचा पिष्टद्रव्याशीं संबंध समासानें प्राप्त झाला आहे. पण दर्श व पूर्णमास यांमध्यें पूषा-सूर्य ही देवता नाहीं व पिष्टभाग हें द्रव्य नाहीं. त्यामुळें त्या दर्श-पूर्णमासवाक्याशीं याची एकवाक्यता होऊं शकत नाहीं. म्हणून त्रिकालीं अस्पृष्ट अशा द्रव्य-देवतासंबंधाला व्याप्तीमुळें यागविधीचें उत्थापकत्व असल्याकारणानें व्यवहारसिद्धी-साठीं विधिपदाचा अध्याहार करून प्रकरणापासून उत्कर्षानें ‘ पूषा ’ या देव-तेच्या उद्देशानें पिष्टभाग करावा असा विकृतीमध्यें संबंध ‘ पौष्णं पेषणं विकृतौ प्रतीयेत अचोदनात्प्रकृतौ ’–पू. मी. ३.३.३०.–या सूत्रांत विचारित आहे. “ पूषादेवतासंबंधी पेषण–पिष्टभाग विकृतीमध्यें जाणावा. कारण प्रकृतींत त्याचें विधान नाहीं ” अशा अर्थाच्या त्या सूत्रांत त्या संबंधाचा विचार केला आहे, असा याचा भावार्थ.–अवान्तरवाक्यभेदानें सूत्रकारांनींहि विधि स्वीकारला आहे. असें ‘ **तथा च०** ’ इत्यादि भाष्यानें सांगतात–]=आणि ‘ समिधेच्या धारणा-प्रमाणें विधिच आहे ’–पृ.५२८–अशा या सूत्रांत सूत्रकारांनीं तसेंच सांगितलें आहे. [–स्मृतीच्या अनुसारहि अवान्तरवाक्याचें विधायकत्व सांगणें उचित आहे, असें ‘ **स्मृतिषु०** ’ इत्यादि भाष्यानें सांगतात–]

**भाष्यं—स्मृतिष्वपि भगवद्गीताद्यास्वनभिसंधाय फलमनुष्ठितानि यज्ञादीनि मुमुक्षोर्ज्ञानसाधनानि भवन्तीति प्रपंचितम् । तस्माद्यज्ञादीनि शमदमादीनि च यथाश्रमं सर्वाण्येवाश्रमकर्माणि विद्योत्पत्तावपेक्षितव्यानि । तत्रापि एवंविदिति विद्यासंयोगात्प्रत्यासन्नानि विद्यासाधनानि शमादीनि । विविदिषासंयोगात्तु बाह्य-तराणि यज्ञादीनीति विवेक्तव्यम् ॥ २७ ॥** (६)

**भाष्यार्थ—**भगवद्गीतादि स्मृतींमध्येंहि ‘ फलाची इच्छा न धरितां केलेलीं यज्ञादि कर्में मुमुक्षूचीं ज्ञानसाधनें होतात ’ असें सविस्तर सांगितलेलें आहे. [–याप्रमाणें कर्मांचें ज्ञानोत्पत्तिहेतुत्व श्रुति-स्मृति-न्यायसिद्ध आहे, असें झालें असतां ‘ **तस्मात्०** ’ इत्यादि भाष्यानें फलित सांगतात–]=म्हणून यज्ञादिक व शम-दमादिक अशीं हीं सर्वच आश्रमकर्में त्या त्या आश्रमानुसार विद्योत्पत्तीमध्यें अपेक्षणीय आहेत. [–“ तर मग यज्ञादिकांनाहि श्रुति-स्मृति-न्यायांमुळें अनुष्ठेयत्व असल्यास शमादिकांहून त्यांत विशेष कांहींच नाहीं. यास्तव विद्येचा उदय

होईपर्यंत त्या दोन्ही साधनांचें एकसारखेंच अनुष्ठान होईल " अशी आशंका घेऊन '**तत्रापि०**' इत्यादि भाष्यानें आचार्य म्हणतात-]=त्यांतहि 'एवंविद्' अशा विद्यासंयोगामुळें शमादिक हीं प्रत्यासन्न-अंतरंग विद्यासाधनें आहेत. पण विविदिषासंयोगामुळें यज्ञादिक बाह्यतर-बहिरंग साधनें आहेत, असा विवेक करावा. २७.-सु. ब्र. ४०४-५ (६)

( ७. **सर्वान्नानुमत्यधिकरण.** सू. २८-३१. )

---विद्येच्या संनिध असलेल्या यज्ञादिकांना व शमादिकांना विद्याशेषत्व सांगितलें. त्या प्रसंगानें 'विद्येच्या संनिध-पठित असलेल्या सर्वान्नाच्या अनुज्ञेलाहि विद्याशेषत्व आहे,' अशी आशंका घेऊन '**सर्वान्नानुमतिश्च०**' इत्यादि सूत्रानें तिचें निरसन करितात--

**सूत्रं---सर्वान्नानुमतिश्च प्राणात्यये तद्दर्शनात् ॥२८**

**सूत्रार्थ**--प्राणाचा अत्यय-प्राण जाण्याचा प्रसंग आला असतां सुरावर्ज्य सर्वान्नाची अनुज्ञा दिली जाते. कारण तसें दर्शन-श्रुतिप्रमाण आहे. २८-सु.ब्र. ४०६-[-'प्राणोपासकाची सर्वान्नानुमति' हाच विषय सांगण्यासाठीं '**प्राणसंवादे०**' इत्यादि भाष्यानें दोन शाखांतील श्रुति सांगतात-]

**भाष्यं**---**प्राणसंवादे श्रूयते छंदोगानाम्---'न ह वा एवंविदि किंचनानन्नं भवति' इति । तथा वाजसनेयिनाम्---'न ह वा अस्यानन्नं जग्धं भवति नानन्नं प्रतिगृहीतम्' इति । सर्वमस्यादनीयमेव भवतीत्यर्थः ॥**

**भाष्यार्थ**---छंदोगांच्या प्राणसंवादांत " अशी प्राणोपासना करणारामध्यें अनन्न-त्याचें अन्न नव्हे, असें कांहींएक नाहीं."-छां.५.२.१.-असें श्रुत आहे. त्याचप्रमाणें वाजसनेयींच्या प्राणसंवादांत " या प्राणोपासकाचें अनन्न भक्षित होत नाहीं व याचें अनन्न प्रतिगृहीत होत नाहीं. " ( म्ह० त्यानें अभक्ष्य अन्न भक्षण केलें आहे किंवा त्याचा स्वीकार केला आहे असें होत नाहीं. )-बृ. ६.१.१४-असें श्रुत आहे. [-'**सर्वं०**' इत्यादि भाष्यानें या विषयवाक्यांच्या अर्थाचा संग्रह करितात-]=या प्राणोपासकांचें सर्व अन्न भक्षणीयच होतें, असा भावार्थ. [-अपूर्वत्वामुळें व विधिश्रुति नसल्यामुळें '**किमिदं०**' इत्यादि संशय-]

**भाष्यं---किमिदं सर्वान्नानुज्ञानं शमादिवद्विद्यांगं विधीयत उत स्तुत्यर्थं संकीर्त्यत इति संशये विधिरिति तावत्प्राप्तम् । तथा हि-प्रवृत्तिविशेषकर उपदेशो भवति। अतः प्राणविद्यासंनिधानात्तदंगत्वेनेयं नियमनिवृत्तिरुपदिश्यते ॥**

**भाष्यार्थ**—" काय, हें सर्व अन्नाचें अनुज्ञान शमादिकांप्रमाणें 'विद्येचें अंग' म्हणून विहित आहे कीं तें विद्येच्या स्तुतीसाठीं सांगतलें जातें ? " असा संशय आला असतां [–या अधिकरणांत स्वतंत्र पुरुषार्थाचा हेतु अशा वाक्यार्थ-ज्ञानोपयुक्त प्राणविद्येच्या स्तुत्यर्थ सर्वान्नाचें अनुज्ञान–संकीर्तन केलेलें असल्यामुळें याची पादादिसंगति आहे. पूर्वपक्षांत 'प्राणोपासकाच्या भक्ष्याभक्ष्यविभागाची असिद्धि' सिद्धान्तांत 'विद्वान् व अविद्वान् या दोघांच्याहि भक्ष्याभक्ष्यविभागाची अनापत्तींत सिद्धि' असा फलभेद मानणारे भाष्यकार '**विधिरिति०**' इत्यादि भाष्यानें संशयाचा अनुवाद करून पूर्वपक्ष सांगतात–]=' हा विधि आहे ' असा पूर्वपक्ष प्राप्त झाला. [–विधिपक्षीं 'अनुष्ठानविशेषलाभ' हा हेतु '**तथा हि०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=कारण तसा प्रवृत्तिविशेषकर–अनुष्ठानविशेष प्राप्त करून देणारा उपदेश आहे. [–' तर मग सर्वान्नाचें अनुज्ञान स्वतंत्रच विहित असूं दे. " अशी आशंका घेऊन '**अतः०**' इत्यादि भाष्यानें पूर्ववादी म्हणतो–] =म्हणून प्राणविद्येच्या संनिधानामुळें तिच्या अंगत्वानें ही नियमाची निवृत्ति उपदेशिली जाते. [–" अहोपण, सर्वान्नभक्षकत्व हें जर प्राणविद्येचें अंग असेल तर 'न कलंजं भक्षयेत्'–विषलिप्त बाणानें मारलेल्या मृगाचें मांस खाऊं नये, इत्यादि निषेध शास्त्र विरुद्ध होईल," अशी '**ननु०**' इत्यादि भाष्यानें शंका–]

**भाष्यं—नन्वेवं सति भक्ष्याभक्ष्यविभागशास्त्रव्याघातः स्यात् । नैष दोषः । सामान्यविशेषभावाद्बाधोपपत्तेः । यथा प्राणिहिंसाप्रतिषेधस्य पशुसंज्ञपनविधिना बाधः । यथा च 'न कांचन स्त्रियं परिहरेत्तद्व्रतम्' इत्यनेन वामदेव्यविद्याविषयेण सर्वस्त्र्यपरिहारवचनेन तत्सामान्यविषयं गम्यागम्यविभागशास्त्रं बाध्यते । एवमनेनापि प्राणविद्याविषयेण सर्वान्नभक्षणवचनेन भक्ष्याभक्ष्यविभागशास्त्रं बाध्येतेति ॥**

**भाष्यार्थ**—" अहोपण, प्राणोपासकाला सर्व अन्नभक्षण विहित आहे, असें म्हटल्यास भक्ष्याभक्ष्यविभाग करणाऱ्या शास्त्राचा व्याघात होईल, त्याच्याशीं विरोध येईल ! " [–त्या शास्त्राचा विषय प्राणोपासकाहून भिन्न पुरुष आहे, असें सांगून वादी '**नैषः०**' इत्यादि भाष्यानें शास्त्रविरोधाचा परिहार करितो–]=हा दोष येत नाहीं. कारण सामान्य-विशेषभावामुळें त्याच्या बाधाची उपपत्ति लागते, त्याचा बाध युक्त होतो. [–त्या उपपत्तीचेंच कर्मविषयदृष्टान्तानें उदाहरण–] =' **यथा०** '–ज्याप्रमाणें प्राणिहिंसाप्रतिषेधाचा पशुसंज्ञपनविधीनें बाध होतो, [–' **यथा च०** ' इत्यादि भाष्यानें त्याच अर्थी विद्याविषय दृष्टान्त–]=आणि ज्या-

प्रमाणें " कोणत्याहि स्त्रीचा परिहार करूं नये, तें व्रत आहे "-छां. २.१३.२ -या वचनानें वामदेव्यविद्याविषय-वामदेव्यविद्येतील सर्व स्त्रियांच्या अपरिहारवचनानें तत्संबंधी सामान्यविषय गम्यागम्यविभाग शास्त्राचा बाध केला जातो, [' जें उपमंत्रण करितो, तिच्याशीं जो संकेत करितो तो हिंकार '-सु. उ. पृ. ३३९- इत्यादि वचनानें ज्या विद्येंत ग्राम्यव्यापारांतील चेष्टांमध्यें हिंकारादि दृष्टि विहित आहे, ती वामदेव्यविद्या.-' एवं० ' इत्यादि भाष्यानें या दोन्ही दृष्टान्तांतील अर्थ दार्ष्टांतिकांत योजितात-]=त्याप्रमाणें याहि प्राणविद्याविषय सर्वान्नभक्षणवचनानें भक्ष्याभक्ष्यविभागाविषय शास्त्र बाधित होईल, ' इति '-असा पूर्वपक्ष प्राप्त होतो. [ विविदिषावाक्यांत वर्तमानापदेश जरी असला तरी अपूर्वत्वामुळें ' लेट् ' या पांचव्या लकाराच्या अंगीकारानें विधीची कल्पना जशी केली जाते, त्याप्रमाणें ' न ह० ' इत्यादि पूर्वोक्त वाक्यांत वर्तमानकाली प्रयोग जरी असला तरी अपूर्वत्वामुळें विधि आहे, या पूर्ववाद्याच्या मताचा ' एवं० ' इत्यादि भाष्यानें अनुवाद करून भाष्यकार सूत्राच्या बाहेरच सिद्धान्त सांगतात-]

**भाष्यं—एवं प्राप्ते ब्रूमः-नेदं सर्वान्नानुज्ञानं विधीयत इति । न ह्यत्र विधायकः शब्द उपलभ्यते 'न ह वा एवंविदि किंचनानन्नं भवति' इति वर्तमानापदेशात् । न चासत्यामपि विधिप्रतीतौ प्रवृत्तिविशेषकरत्वलोभेनैव विधिरभ्युपगंतुं शक्यते ॥**

**भाष्यार्थ**—असा पक्ष प्राप्त झाला असतां ' हें सर्वान्नाचें अनुज्ञान विहित नाहीं, त्याचें येथें विधान केलें जात नाहीं' असा सिद्धान्त आम्ही सांगतों. [-'न हि० ' इत्यादि भाष्यानें त्याविषयीं हेतु-]=कारण या वचनांत विधायक शब्द उपलब्ध होत नाहीं. " अशी प्राणोपासना करणारामध्यें अनन्न कांहीं नाहीं " -पृ. ५५५-असा वर्तमानकाली निर्देश आहे. [-"अहोपण, 'ज्याची पर्णमयी जुहू असते तो आपली अपकीर्ति ऐकत नाहीं ' इत्यादि वाक्यांत वर्तमानापदेश जरी असला तरी विधि जसा कल्पिला जातो त्याप्रमाणें येथेंहि वर्तमानापदेश जरी असला तरी विधि कल्प्य आहे." अशी आशंका घेऊन ' न च असत्यां० ' इत्यादि भाष्यानें सांगतात-]=आणि विधिप्रतीति होत नसतांनाहि प्रवृत्तिविशेषकरत्वाच्या लोभानेंच विधि स्वीकारतां येणें शक्य नाहीं. [ श्रुत असलेल्या विशेष विधीला सामान्यविधिबाधकत्व इष्ट आहे. म्ह० विशेषविधीनें सामान्यविधीचा बाध होणें, सर्वथा उचितच आहे. पण विशेष कल्पना सामान्यविधीनें बाध्य आहे. कारण

कल्पनेला विरोधाच्या अभावाची अपेक्षा असते, असा भावार्थ.–याहि कारणानें हें वचन स्तुत्यर्थच आहे, विधि नव्हे, असें '**अपि च०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]

**भाष्यं—अपि च श्वादिमर्यादं प्राणस्यान्नमित्युक्त्वेदमुच्यते 'नैवंविदः किंचिदनन्नं भवति' इति। न च श्वादिमर्यादमन्नं मानुषेण देहेनोपभोक्तुं शक्यते। शक्यते तु प्राणस्यान्नमिदं सर्वमिति विचिंतयितुम्। तस्मात्प्राणान्नविज्ञानप्रशंसार्थोऽयमर्थवादो न सर्वान्नानुज्ञानविधिः। तद्दर्शयति 'सर्वान्नानुमतिश्च प्राणात्यये' इति ॥**

**भाष्यार्थ**—शिवाय 'श्वादिमर्यादं'–कुत्र्यापर्यंत सर्व प्राण्यांचें अन्न हें प्राणाचें अन्न आहे, असें सांगून "असें जाणणाराला–असें ध्यान करणाराला अनन्न असें कांहींच नाहीं"–पृ. ९५५–असें हें सांगितलें जातें [–' कुत्र्यांपर्यंत, पक्ष्यांपर्यंत कीट-पतंगांपर्यंत जें अन्न आहे तें तुझें अन्न आहे,' असें श्रवण असल्यामुळें ज्याचा विषय अशक्य आहे, असा विधि संभवत नाहीं, असें '**न च०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=आणि कुत्र्यांपर्यंत प्राण्यांचें अन्न मनुष्याच्या शरीरानें खातां येणें शक्य नाही. [–"तर मग, हें वचन व्यर्थ आहे" अशी आशंका घेऊन 'सर्व प्राणाचें अन्न आहे, हें वचन ज्ञानाच्या स्तुतीसाठीं असल्यामुळें त्याला व्यर्थत्व नाहीं,' असें '**शक्यते तु०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=पण हें सर्व प्राणाचें अन्न आहे, असें विचिंतन–ध्यान करणें शक्य आहे. म्हणून प्राणान्नविज्ञानाच्या स्तुतीसाठीं–प्रशंसेसाठीं हा अर्थवाद आहे, सर्व प्राण्यांच्या अन्नभक्षणाला अनुज्ञा देणारा विधि नव्हे. [–या उक्त अर्थीं सूत्राचें ग्रहण करितात–] ='**तत्०**'–सूत्रकार आचार्य 'प्राण जाण्याचा प्रसंग आला असतां सर्वान्नाची अनुमति आहे' या सूत्रानें हेंच दाखवितात. [–या सूत्राच्या अक्षरांचें '**एतदुक्तं०**' इत्यादि भाष्यानें व्याख्यान करितात–]

**भाष्यं—एतदुक्तं भवति–प्राणात्यय एव हि परस्यामापदि सर्वमन्नमदनीयत्वेनाभ्यनुज्ञायते। तद्दर्शनात्। तथा हि श्रुतिश्चाक्रायणस्यर्षेः कष्टायामवस्थायामभक्ष्यभक्षणे प्रवृत्तिं दर्शयति–' मटचीहतेषु कुरुषु ' इत्यस्मिन्ब्राह्मणे ॥**

**भाष्यार्थ**—'यानें हें उक्त आहे'–या सूत्राचा अक्षरार्थ असा–परम आपत्तींत –प्राण जाण्याचा प्रसंग आला असतांच सर्व अन्न भक्षणीयत्वानें–भक्षण करावें, असें हें अभ्यनुज्ञात आहे. प्राणात्ययप्रसंगींच सर्वान्नभक्षाला अनुमोदन दिलें जातें. 'श्रुतींत तसें दर्शन असल्यामुळें'–कारण तशी श्रुति 'मटचीहतेषु कुरुषु०' इत्यादि ब्राह्मणांत चाक्रायण ऋषीची अत्यंत कष्टावस्थेमध्यें अभक्ष्य-

भक्षणामध्यें प्रवृत्ति दाखविते. [ मटची म्ह० अशनि, पाषाणवृष्टि, किंवा रक्तवर्ण क्षुद्र पक्षिविशेष–टोळ, त्यांनीं कुरुदेशांतील सर्व शेतें व झाडें नाहींशीं झालीं असतां, असा ' मटचीहतेषु ' याचा अर्थ आहे.–' **चाक्रायण:०**' इत्यादि भाष्यानें आख्यायिका सांगतात–]

**भाष्यं—चाक्रायण: किलर्षिरापद्गत: इभ्येन सामिखादितान्कुल्माषांश्चखाद। अनुपानं तु तदीयमुच्छिष्टदोषात्प्रत्याचचक्षे कारणं चात्रोवाच 'न वा अजीविष्यमिमानखादन्' इति। 'कामो म उदपानम्' इति च। पुनश्चोत्तरेद्युस्तानेव स्वपरोच्छिष्टान्पर्युषितान्कुल्माषान्भक्षयांबभूवेति ॥**

**भाष्यार्थ**—चाक्रायण म्हणून प्रसिद्ध ऋषि आपत्तींत पडला असतां त्यानें एका इभ्यानें अर्धेंच खाल्लेले कुल्माष खाल्ले. [ तो दुर्भिक्ष झालें असतां–दुष्काळ पडला असतां जिचें पयोधरादि-स्त्रीचिह्न व्यक्त झालेलें नाहीं, अशा आपल्या भार्येसह देशान्तरास जावयास निघाला. तो एकदा इभ्यग्रामांत राहत असतांना एका इभ्यानें अर्धें भक्षण केलेले कुत्सित माष खाता झाला. तेव्हां ' आतां तूं हें पाणी प्यावयास घे ' असें त्या इभ्यानें म्हटलें असतां 'हें तुझें पाणी प्याल्यास मीं उष्टें पाणी प्यालें असें होईल ' असें म्हणून त्यानें त्याच्या उच्छिष्ट जलाचा निषेध केला. तेव्हां ' तर मग हे कुल्माषहि उष्टे नव्हते कीं काय ? ' असें इभ्यानें विचारिलें असतां त्यानें अनुपानाच्या निषेधाचें कारण सांगितलें, असें ' **अनुपानं तु०** ' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=पण त्याचें अनुपान–भोजनोत्तर जलपान उच्छिष्टदोषानें प्रत्याख्यात केलें–त्याचा निषेध केला आणि 'मीं जर हे कुल्माष खाल्ले नसते तर जिवंत राहिलों नसतों. ' असें व ' मला जलपान करण्यास जलाशय वाटेल तेथें मिळण्यासारखा आहे '–छां. १. १०. ४.–असें त्याविषयीं कारण सांगितलें. [ हे कुल्माष जर मजकडून खाल्ले गेले नसते तर मी जिवंतच राहिलों नसतों, माझें जीवनच झालें नसतें. पण तडागादिकांमध्यें माझें उदकपान '**काम:**'–माझ्या इच्छेनें होऊं शकेल, असा याचा भावार्थ.–त्या ऋषीनें ते कुल्माष स्वत: खाऊन राहिलेले आपल्या भार्येसाठीं नेले. आपल्या भर्त्याचा स्वभाव जाणणाऱ्या तिनें ते तसेच ठेवून दिले होते. दुसऱ्या दिवशीं सकाळींच त्यानें ते खाल्ले, असें '**पुनश्च०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=आणि पुन: दुसऱ्या दिवशीं तेच स्व-पर-उच्छिष्ट व शिळे कुल्माष तो खाता झाला ' **इति** '–अशी आख्यायिका आहे. [–कुल्माषभक्षणश्रुतीचा अभिप्राय ' **तदेतत्०** ' इत्यादि भाष्यानें सांगतात–]

**भाष्यं—तदेतदुच्छिष्टोच्छिष्टपर्युषितभक्षणं दर्शयन्त्याः श्रुतेराशयातिशयो लक्ष्यते प्राणात्ययप्रसंगे प्राणसंधारणायाभक्ष्यमपि भक्षयितव्यमिति । स्वस्थावस्थायां तु तन्न कर्तव्यं विद्यावतापि इत्यनुपानप्रत्याख्यानाद्गम्यते । तस्मादर्थवादो 'न ह वा एवंविदि' इत्येवमादिः ॥२८॥**

**भाष्यार्थ**—तें हें परोच्छिष्ट, स्वोच्छिष्ट, पर्युषित–शिळया कुल्माषांचें भक्षण प्रदर्शित करणाऱ्या श्रुतीचा 'प्राण जाण्याचा प्रसंग आला असतां प्राणाचें संधारण–रक्षण करण्यासाठीं अभक्ष्यहि भक्षण करावें' असा आशयातिशय आहे. [–'**स्वस्थावस्थायां०**' इत्यादि भाष्यानें अनुपानाच्या निषेधश्रुतीचें तात्पर्य–] =पण स्वस्थावस्थेंत विद्यावानानेंहि तें करूं नये, असें अनुपानाच्या प्रत्याख्यानावरून अवगत होतें. [–याप्रमाणें सर्वान्नभक्षणाचा निरंकुशत्वाभाव सिद्ध झाला असतां त्याचें फलित सांगतात–]='**तस्मात्०**'–म्हणून 'न ह वा एवंविदि'–पृ.५५५–इत्यादि हा अर्थवाद आहे. २८. [–त्याच्या अर्थवादत्वाविषयीं '**अबाधाच्च०**' या सूत्रानें हेत्वंतर सांगतात–]

## सूत्रं—अबाधाच्च ॥ २९

**सूत्रार्थ**—आणि असें मानिल्यासच भक्ष्याभक्ष्यविवेकशास्त्राचा बाध होत नसल्यामुळें हें सर्वान्नानुज्ञान अर्थवादमात्र आहे. २९. –सु. ब्र. ४०६. [–सामान्यशास्त्राशीं विरोध येत असल्यामुळें विशेषविधि कल्प्य–कल्पना करण्यास योग्य नाहीं, असें सांगितलें. आतां सामान्यशास्त्र दाखविणारे भाष्यकार '**एवं च०**' इत्यादि भाष्यानें सूत्राची योजना करितात–]

**भाष्यं—एवं च सति 'आहारशुद्धौ सत्त्वशुद्धिः' इत्येवमादि भक्ष्याभक्ष्यविभागशास्त्रमबाधितं भविष्यति ॥२९॥**

**भाष्यार्थ**—आणि स्वस्थावस्थेंत भक्ष्याभक्ष्यभेद आहे, असें झालें असतां 'आहारशुद्धि झाली असतां सत्त्वशुद्धि–चित्तशुद्धि होते'–छां ७.२६.२.–इत्यादि भक्ष्याभक्ष्यविभागशास्त्र अबाधित होईल. २९. [–आपदवस्थेंत अभक्ष्यभक्षणाच्या अनुज्ञानामध्यें '**अपि च०**' इत्यादि सूत्रानें स्मृतीचा संवाद दाखवितात–]

## सूत्रं—अपि च स्मर्यते ॥३०

**सूत्रार्थ**—शिवाय 'जीवितात्ययमापन्नः०' इत्यादि स्मृतिवचनहि आहे. ३०. –सु. ब्र. ४०६.–[–'स्मृतिहि विद्वद्विषयच आहे' अशी आशंका घेऊन '**अपि च०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]

**भाष्यं—अपि चापदि सर्वान्नभक्षणमपि स्मर्यते विदुषोऽविदुषश्चाविशेषेण—"जीवितात्ययमापन्नो योऽन्नमत्ति यतस्ततः। लिप्यते न स पापेन पद्मपत्रमिवांभसा" इति। तथा "मद्यं नित्यं ब्राह्मणः" "सुरापस्य ब्राह्मणस्योष्णामासिंचेयुः सुरापाः कृमयो भवन्त्यभक्ष्यभक्षणात्" इति च स्मर्यते वर्जनमनन्नस्य ॥३०॥**

**भाष्यार्थ**—शिवाय विद्वान् व अविद्वान् अशा दोन्ही प्रकारच्या पुरुषांचें अविशेषानें—कांहीं विशेष—फरक—भेद न ठेवितां आपत्तींत सर्वान्नभक्षणहि स्मृत आहे. "जीविताच्या अत्ययास—क्षयास प्राप्त झालेला जो कोणी ज्या कोठें मिळेल तेथें अन्न खातो तो जलानें पद्मपत्र जसें लिप्त होत नाहीं, तसा पापानें लिप्त होत नाहीं," असें सर्वान्नभक्षण स्मृत आहे. [—पण सुरापान दोन्ही अवस्थांमध्यें करूं नये, असें '**तथा०**' इत्यादि भाष्यानें सांगतात—]=त्याचप्रमाणें 'ब्राह्मणानें मद्य नित्य वर्ज्य करावें.' [—'जीवितात्ययस्मृतीनें प्राणात्ययप्रसंगीं सुराहि प्राशन करावी' अशी आशंका घेऊन '**सुरापस्य०**' इत्यादि सांगतात—]='सुरापान करणाऱ्या ब्राह्मणाच्या मुखांत उष्ण सुरा ओतावी' [उष्ण म्ह० अग्नीनें तापविलेली. मरणान्तिक प्रायश्चित्त उपलब्ध होत असल्यामुळें मरणाचा प्रसंग जरी असला तरी ती प्राशन करूं नये, असा भावार्थ.—याहि कारणानें ती कधींच पिऊं नये, असें '**सुरापाः०**' इत्यादि भाष्यानें सांगतात—]=आणि "सुरापान करणारे अभक्ष्यभक्षणामुळें कृमि होतात" असें स्मृतिवचन आहे. [—'**मद्यं०**' इत्यादि स्मृतीचें तात्पर्य सांगतात—]=तात्पर्य अनन्नाचें वर्जन करावें—त्याला वर्ज करावें. ३०.

[—या स्मृतीच्या प्रामाण्यासाठीं तन्मूलक श्रुति '**शब्दश्च०**' इत्यादि सूत्रानें सांगतात—]

## सूत्रं—शब्दश्चातोऽकामकारे ॥३१॥ (७)

**सूत्रार्थ**—आणि अभक्ष्यभक्षणाचा निषेध करणारा शब्द 'अकामकारे'—स्वेच्छाकृत प्रवृत्तीच्या निरसनाविषयीं श्रुत आहे. 'अतः'—म्हणून प्राणवत्याचें सर्वान्नानुज्ञान अर्थवादमात्र आहे. ३१. (७)—सु. ब्र. ४०६. [—'**शब्दश्च०**' इत्यादि भाष्यानें सूत्राचें व्याख्यान—]

**भाष्यं—शब्दश्चानन्नस्य प्रतिषेधकः कामकारनिवृत्तिप्रयोजनः काठकानां संहितायां श्रूयते—"तस्माद्ब्राह्मणः सुरां न पिबेत्" इति। सोऽपि 'न ह वा एवंविदि' इत्यस्यार्थवादत्वादुपपन्नतरो भवति। तस्मादेवंजातीयका अर्थवादा न विधय इति ॥३१॥ (७)**

**भाष्यार्थ**—आणि कामकाराची—स्वेच्छाप्रवृत्तीची निवृत्ति हें ज्याचें प्रयोजन आहे असा अनन्नाचा प्रतिषेधक 'तस्मात्०'—"सुरापान करणाऱ्या ब्राह्मणाचें

मरणान्तिक प्रायश्चित्त श्रुत असल्यामुळें ब्राह्मणानें सुरापान करूं नये " असा शब्द काठकांच्या संहितेंत श्रुत आहे. [–या श्रौतनिषेधाचा प्रकृतोपयोग सांगतात–]=**'सः अपि०'**–तो शब्दहि 'न ह वा एवंविदि०' अशा या वाक्याला अर्थवादत्व असल्यामुळें उपपन्नतर–अतिशय युक्त होतो. [–श्रुतिस्मृतिसिद्ध अर्थाचा उपसंहार करणारे भाष्यकार सूत्रांतील ' **अतः** ' या शब्दाचा अर्थ ' **तस्मात्०**' इत्यादि भाष्यानें स्पष्ट करितात–]=म्हणून अशा जातीचे अर्थवाद हे विधि नव्हेत, असा हा सिद्धान्त होय. ३१. [ सु. ब्र. ४०७ ] (७).

**( ८. आश्रमकर्माधिकरण. सू. ३२-३५. )**

–"शास्त्रान्तरविरोध येत असल्यामुळें सर्वान्नत्वकथन ही स्तुति आहे, असें सांगितलें. त्याचप्रमाणें यज्ञांची विद्यार्थत्वोक्ति स्तुति आहे. कारण त्या उक्तीशीं यज्ञांच्या नित्यत्वकथनाचा विरोध आहे. " अशी आशंका घेऊन ' **विहितत्वाच्च०**' इत्यादि सूत्रानें सिद्धान्त सांगतात—

**सूत्रं—विहितत्वाच्चाश्रमकर्मापि ॥ ३२**

**सूत्रार्थ**—अमुमुक्षूनेंहि ' आश्रमकर्म ' अवश्य करावें. कारण त्याला 'यावज्जीव-'श्रुतीनें विहितत्व आहे. ३२.–सु. ब्र. ४०८. [–**'सर्वापेक्षा च०'** इत्यादि भाष्यानें या अधिकरणाचा व्यवहितसंबंध सांगतात–]

**भाष्यं—' सर्वापेक्षा च ' इत्यत्राश्रमकर्मणां विद्यासाधनत्वमवधारितम् । इदानीं तु किममुमुक्षोरप्याश्रममात्रनिष्ठस्य विद्यामकामयमानस्य तान्यनुष्ठेयान्युताहो नेति चिन्त्यते ॥**

**भाष्यार्थ**—' सर्वापेक्षा च '–पृ. ५४८–या सूत्रांत आश्रमकर्मांचें विद्यासाधनत्व निश्चित केलें. [–अग्निहोत्रादिकर्मांना विषय करून त्यांना विहितत्व असल्यामुळें व विनियुक्ताचा विनियोग संभवत नसल्यामुळें ' **इदानीं०**' इत्यादि भाष्यानें संशय सांगतात–]=पण आतां जो मुमुक्षु नाहीं अशा आश्रममात्रनिष्ठ, विद्येची कामना न करणाऱ्याहि पुरुषाला तीं अनुष्ठेय आहेत कीं नाहींत, याचा विचार केला जातो. [–येथें अग्निहोत्रादिकर्मांच्या उभयार्थत्वकथनानें स्वतंत्र पुरुषार्थहेतु शास्त्रोत्पन्न आत्मविद्योपायत्वाचें उपवर्णन केलेलें असल्यामुळें याच्या पादादिसंगति आहेत. पूर्वपक्षामध्यें ' विद्याहेतुत्वकथनाला स्तुतित्व असल्यामुळें विविदिषावाक्याच्या विवक्षितार्थाची असिद्धि' व सिद्धान्तांत 'संयोगपृथक्त्वन्यायानें कर्मांचें उभयत्व संभवत असल्यामुळें त्याची सिद्धि ' अशा आशयानें ' **तत्र०** ' इत्यादि भाष्यानें पूर्वपक्ष सांगतात–]

**भाष्यं**—तत्र ' तमेतं वेदानुवचनेन ब्राह्मणा विविदिषन्ति ' इत्यादिना आश्रमकर्मणां विद्यासाधनत्वेन विहितत्वाद्विद्यामनिच्छतः फलान्तरं कामयमानस्य नित्यान्यननुष्ठेयानि । अथ तस्याप्यनुष्ठेयानि न तर्ह्येषां विद्यासाधनत्वं । नित्यानित्यसंयोगविरोधादिति ॥

**भाष्यार्थ**—असा संशय आला असतां " त्या या आत्म्याला ब्राह्मण वेदानुवचनानें जाणण्याची इच्छा करितात "–पृ. ५९२–इत्यादि वचनानें आश्रमकर्मांना विद्यासाधनत्वानें विहितत्व असल्यामुळें– तीं विद्यासाधन या रूपानें विहित असल्यामुळें विद्येची इच्छा न करणाऱ्या व फलान्तराची कामना करणाऱ्या पुरुषाला नित्य कर्मे अननुष्ठेय आहेत, तीं अनुष्ठान करण्यास योग्य नाहींत. [–"अहो-पण, यावज्जीवश्रुति असल्यामुळें अमुमुक्षूलाहि नित्य कर्मे अनुष्ठेय आहेत" अशी आशंका घेऊन ' अथ० ' इत्यादि भाष्यानें म्हणतात–]=आतां तींहि जर अनुष्ठेय–अवश्य अनुष्ठानार्ह असतील तर त्यांना विद्यासाधनत्व नाहीं. [–"अहो-पण, विविदिषाश्रुति असल्यामुळें त्यांचा विद्यासंयोगहि अवश्यंभावी–अवश्य होणारा आहे " अशी आशंका घेऊन ' नित्यानित्य० ' इत्यादि भाष्यानें म्हणतात–]=कारण त्यांच्या नित्य व अनित्य संयोगाचा विरोध आहे. अर्थात् नित्यानित्यसंयोगविरोधामुळें त्यांना विद्यासाधनत्व नाहीं. [ आवश्यकत्वाच्या अभावामुळें विद्याकामनेच्या काम्यत्वानें कर्मांना अनावश्यकत्व आहे व नित्यत्वामुळें आवश्यकत्व आहे. त्यामुळें एकाच कर्मामध्यें आवश्यकत्व व अनावश्यकत्व परस्पर विरुद्ध होतील. यास्तव कर्मांची विद्योपायत्वोक्ति स्तुतिच आहे, असा भावार्थ.–'अस्यां प्राप्तौ०'इत्यादि भाष्यानें सिद्धान्तसूत्राला अवतरण देऊन त्याचें व्याख्यान करितात-]

**भाष्यं**—अस्यां प्राप्तौ पठति–आश्रममात्रनिष्ठस्याप्यमुमुक्षोः कर्तव्यान्येव नित्यानि कर्माणि " यावज्जीवमग्निहोत्रं जुहोति " इत्यादिना विहितत्वात् । न हि वचनस्यातिभारो नाम कश्चिदस्ति ॥ ३२ ॥ अथ यदुक्तं नैवं सति विद्यासाधनत्वमेषां स्यादित्यत उत्तरं पठति–

**भाष्यार्थ**—अशी प्राप्ति झाली असतां सूत्रकार असें पठतात. केवल आश्रममात्रनिष्ठ असलेल्याहि अमुमुक्षूला नित्य कर्मे अवश्य अनुष्ठेयच आहेत. कारण "यावज्जीव अग्निहोत्रहवन करावें" इत्यादि श्रुतिवचनानें तीं विहित आहेत. [–"पण नित्यत्वानें विहित असलेल्या कर्मांचें विद्योपायत्वानें विधान करणें, हें गौरवदोषामुळें अयुक्त आहे, " अशी आशंका घेऊन ' न हि० ' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=कारण वचनाला अतिभार म्हणून कांहींएक नाहींच.–पृ. ४१६–३२.

[-उक्ताचा अनुवाद करून त्याच्या उत्तरत्वानें ' **अथ०** ' इत्यादि भाष्यानें सूत्राला अवतरण देतात-]=पण आतां वाद्यानें वर " असें असल्यास कर्मांना विद्यासाधनत्व आहे, असें म्हणतां येणार नाहीं " असें जें म्हटलें आहे त्याचें उत्तर देण्यासाठीं सूत्रकार ' **सहकारित्वेन०**' इत्यादि सूत्र पढतात--

**सूत्रं—सहकारित्वेन च ॥ ३३**

**सूत्रार्थ**—आणि सहकारित्वानें-विद्येशीं संयुक्त होऊन चित्तशुद्धीच्या द्वारा तीं ब्रह्मविद्येला उत्पन्न करितात. ३३-सु. ब्र. ४०८. [-अग्निहोत्रादि कर्मांना नित्यत्व जरी असलें तरी विधिवशात् त्यांचें विद्यासंयुक्तत्व मानावें, असें ' **विद्यासहकारीणि०** ' इत्यादि भाष्यानें सूत्राचें व्याख्यान करितात-]

**भाष्यं—विद्यासहकारीणि चैतानि स्युर्विहितत्वादेव ' तमेतं वेदानुवचनेन ब्राह्मणा विविदिषन्ति ' इत्यादिना । तदुक्तम्-' सर्वापेक्षा च यज्ञादिश्रुतेरश्ववत् ' इति । न चेदं विद्यासहकारित्ववचनमाश्रमकर्मणां प्रयाजादिवद्विद्याफलविषयं मंतव्यम् । अविधिलक्षणत्वाद्विद्यायाः । असाध्यत्वाच्च विद्याफलस्य ॥**

**भाष्यार्थ**--" ब्राह्मण त्या या आत्म्याला वेदानुवचनानें जाणण्याची इच्छा करितात "-पृ. ९९२-इत्यादि वचनानें अग्निहोत्रादिकर्मांना विहितत्व असल्यामुळेंच तीं विद्यासहकारी-विद्यासंयुक्त आहेत. [-" अहोपण, या वचनांत कर्मांचा केवळ विविदिषासंयोग श्रुत आहे. तेव्हां त्यांना विद्यासंयुक्तत्व कसें ? " ' **तदुक्तं०** ' इत्यादि भाष्यानें उत्तर-]=' सर्वापेक्षा च० '-" विद्येला सर्वकर्मांची अपेक्षा आहे. कारण त्याविषयीं यज्ञादिश्रुति आहे. अश्वाप्रमाणें "-पृ.९४८-या सूत्रांत त्यांचें विद्यासंयुक्तत्व सांगितलें आहे. [-"अहोपण, सहकारित्वकथनानें त्यांचें फलोपकारित्वच आचार्यांना अभीष्ट आहे." अशी आशंका घेऊन ' **न चेदं०** ' इत्यादि भाष्यानें सांगतात-]=आणि हें आश्रमकर्मांचें विद्यासहकारित्ववचन प्रयाजादिकांप्रमाणें विद्याफलविषय आहे, विद्येचें फल हा त्याचा विषय आहे, असेंहि मानूं नये. [-उपकारकत्व दोन प्रकारचें असतें. एक शास्त्रीय व दुसरें अन्वय-व्यतिरेकांनीं सिद्ध होणारें. पण तें दोन्ही प्रकारचें उपकारकत्व येथें नाहीं, असें ' **अविधि०** ' इत्यादि भाष्यानें सांगतात-]=कारण विद्येला अविधिलक्षणत्व आहे. ['ब्रह्मविद्या आपल्या कार्यामध्यें-विहिताची अपेक्षा करणारी नाहीं. कारण तिला अविहितत्व आहे. मर्दनाप्रमाणें ' असा भावार्थ.-'ब्रह्मज्ञान स्वफलामध्यें इतिकर्तव्यतेची अपेक्षा करणारी नाहीं. कारण तिला स्वरूपतः असाध्यफलत्व आहे. कूपखननव्यापाराप्रमाणें ' असें '**असाध्यत्वाच्च०**' इत्यादि भाष्यानें

सांगतात-]=आणि तसेंच विद्येच्या फलाला असाध्यत्व म्ह० सिद्धत्व आहे. [-विद्येचें अविधिलक्षणत्व ' **विधिलक्षणं०** ' इत्यादि भाष्यानें व्यतिरेकोदाहरणानें प्रपंचित करितात-त्याचा विस्तार करितात-]

**भाष्यं—विधिलक्षणं हि साधनं दर्शपूर्णमासादि स्वर्गफलसिषाधयिषया सहकारिसाधनान्तरमपेक्षते । नैवं विद्या । तथा चोक्तम् ' अत एव चाग्नींधनाद्यनपेक्षा ' इति । तस्मादुत्पत्तिसाधनत्व एवैषां सहकारित्ववाचोयुक्तिः ॥**

**भाष्यार्थ**—कारण दर्श-पूर्णमासादि विधिलक्षण साधन स्वर्ग हें फल सिद्ध करण्याच्या इच्छेनें दुसऱ्या सहकारी साधनाची अपेक्षा करितें. पण विद्या तशी त्याची अपेक्षा करीत नाहीं. [ अंगभावाला ग्राहकग्रहणपूर्वकत्व असतें व विधीला ग्राहकत्व आहे. त्यामुळें विहित असलेलें दर्श-पूर्णमासादिक ग्राहकगृहीत-विधीनें ग्रहण केलेल्या प्रयाजादि अंगांनीं युक्त होतें. पण त्यांप्रमाणें अविहित असलेली विद्या अंगयुक्त होत नाहीं, असा भावार्थ.-" तथापि असाध्यफलत्वानें विद्येमध्यें कर्मांचें अन्वयराहित्य कसें ? " ' **तथा च०** ' इत्यादि भाष्यानें उत्तर-]=आणि तसें ' आणि म्हणूनच अग्नीन्धनादि कर्मांची विद्येला अपेक्षा नाहीं '-पृ. ५४६-असें सांगितलें आहे. [-" तर मग त्यांचें सहकारित्ववचन कसें ! " '**तस्मात्०** ' इत्यादि भाष्यानें उत्तर-]=म्हणून उत्पत्तिसाधनत्वामध्येंच कर्मांच्या सहकारित्व-वचनाची उपपत्ति लागते. [ ' गर्दभी पुत्रांसहवर्तमानच भार वाहते ' याप्रमाणें कर्में असतांनाच विद्या आपल्या कार्याला उद्युक्त-व्यापारयुक्त होते, अशा आशयानें कर्मांचें विद्यासहकारित्वकथन आहे, असा भावार्थ.-आतां '**न च०**' इत्यादि भाष्यानें परोक्ताला-वाद्याच्या पूर्वोक्त म्हणण्याला उत्थापित करून त्याचा परिहार-]

**भाष्यं—न चात्र नित्यानित्यसंयोगविरोध आशंक्यः । कर्माभेदेऽपि संयोगभेदात् । नित्यो ह्येकः संयोगो यावज्जीवादिवाक्यकल्पितो न तस्य विद्याफलत्वम् । अनित्यस्त्वपरः संयोगः ' तमेतं वेदानुवचनेन ' इत्यादिवाक्यकल्पितः तस्य विद्याफलत्वम् । यथैकस्यापि खादिरस्य नित्येन संयोगेन क्रत्वर्थत्वमनित्येन संयोगेन पुरुषार्थत्वं । तद्वत् ॥ ३३ ॥**

**भाष्यार्थ**—आणि येथें नित्यानित्यसंयोगविरोधहि आशंका घेण्यास योग्य नाहीं, त्याची आशंकाहि घेतां येत नाहीं. कारण कर्माचा जरी अभेद-ऐक्य असलें तरी संयोगाचा भेद आहे. [-' **नित्यो हि०**' इत्यादि भाष्यानें संयोगभेदच विशद करितात-]=कारण यावज्जीवादि-वाक्यानें कल्पिलेला एक संयोग नित्य आहे. त्याला विद्याफलत्व नाहीं. पण ' त्या या आत्म्याला वेदानुवचनानें ब्राह्मण

जाणण्याची इच्छा करितात '–पृ.५५२–इत्यादि वाक्यानें कल्पिलेला दुसरा संयोग अनित्य आहे. त्याला विद्याफलत्व आहे. [ समानबल असलेल्या श्रुतिद्वयानें पृथक्च संबंधविधि हाच संयोगभेद आहे. त्यामुळें कर्माचें उभयथात्व अविरुद्ध आहे, असा भावार्थ. 'एकस्य तूभयत्वे संयोगपृथक्त्वं '–पण एकाला उभयत्व असल्यास संयोगपृथक्त्व असतें '–पू. मी. ४. ३. ६.–या सूत्रांत याचा विचार केला आहे असें **'यथा०'** इत्यादि भाष्यानें उदाहरणानें दाखवितात–]=ज्याप्रमाणें एकाहि खादिर–खादिरकाष्ठाच्या यूपाला नित्य संयोगानें क्रत्वर्थत्व व अनित्य संयोगानें पुरुषार्थत्व आहे त्याप्रमाणें. [ 'बैल्व, खादिर किंवा पालाश ' हा एक नित्य संयोग, त्यानें खादिराला क्रत्वर्थत्व व 'खादिरं वीर्यकामस्य '–ज्याला वीर्याची इच्छा असेल त्यानें खादिर यूप करावा, हा दुसरा अनित्य संयोग, त्यानें त्याला पुरुषार्थत्व, असें एकाच खादिरत्वाला उभयार्थत्व असण्याचें कारण संयोगपृथक्त्व आहे. त्याचप्रमाणें कर्मामध्यें अभेद जरी असला तरी संयोगभेदामुळें उभयथात्व आहे, असा भावार्थ.] ३३. [–"अहो पण प्रकरणान्तरस्थ नित्यकर्मांहून भिन्न असलेलींच कर्में विविदिषावाक्यांत विद्यासंयुक्तत्वानें विहित आहेत. कारण प्रकरणभेदाला भेदकत्व आहे. तेव्हां नित्यकर्मांनाच उभयत्व कसें ?" **'सर्वथापि०'** इत्यादि सूत्रानें उत्तर–]

## सूत्रं––सर्वथापि त एवोभयलिंगात् ॥ ३४

**सूत्रार्थ**––' सर्वथाहि '–नित्यत्वानें व विद्यार्थत्वानें अशा सर्वप्रकारें अनुष्ठेय असलेले यज्ञादिक 'तेच' आहेत. त्यांहून भिन्न नाहींत. कारण त्याविषयीं उभयलिंग–श्रुति-स्मृतिलिंग आहे. ३४.–सु. ब्र. ४०९. [–**'सर्वथापि०'** इत्यादि भाष्यानें सूत्रोक्त प्रतिज्ञेचें व्याख्यान करितात–]

**भाष्यं––सर्वथाप्याश्रमकर्मत्वपक्षे विद्यासहकारित्वपक्षे च । त एवाग्निहोत्रादयो धर्मा अनुष्ठेयाः । त एवेत्यवधारयन्नाचार्यः किं निवर्तयति । कर्मभेदशंकां इति ब्रूमः । यथा कुंडपायिनामयने " मासमग्निहोत्रं जुह्वति " इत्यत्र नित्यादग्निहोत्रात्कर्मान्तरमुपदिश्यते । नैवमिह कर्मभेदोऽस्तीयर्थः । कुतः । उभयलिंगात् । श्रुतिलिंगात्स्मृतिलिंगाच्च ॥**

**भाष्यार्थ**––' सर्वथापि '–आश्रमकर्मत्वपक्षीं व विद्यासहकारित्वपक्षीं तेच अग्निहोत्रादिधर्म अनुष्ठेय आहेत. [–सूत्रांतील ' एव-'काराचें व्यावर्त्य शंकेनें दाखवितात–]=**' ते एव०'**–' तेच ' असें अवधारण करणारे आचार्य कशाची निवृत्ति करितात? कर्मभेदाच्या शंकेची निवृत्ति करितात, असें आम्ही सांगतों. [–**'यथा०'** इत्यादि भाष्यानें भेदशंकानिवृत्तिच व्यतिरेकदृष्टान्तानें स्पष्ट करितात–]=ज्याप्रमाणें

कुंडपायींच्या अयनामध्यें 'एक मास अग्निहोत्राचें हवन करितो' या वचनांत नित्य अग्निहोत्राहून कर्मान्तराचा उपदेश केला जातो त्याप्रमाणें येथें कर्मभेद नाहीं, असा याचा भावार्थ. [''कुंडपायींच्या अयनगत अग्निहोत्राला प्रकरणभेदामुळें प्रसिद्ध अग्निहोत्राहून जसें कर्मान्तरत्व आहे त्याप्रमाणें 'विविदिषन्ति' अशा विद्यासंयुक्तत्वानें विहित असलेल्याहि कर्मांना प्रकरणभेदामुळेंच कर्मान्तरत्व आहे," अशी आशंका आली असतां दृष्टान्तांत 'जुहोति' अशी होमविधिश्रुति असल्यामुळें व मासाख्य-कालाला अग्राह्यत्वानें अविधेयत्व असल्यामुळें आणि अग्निहोत्रशब्दाला आख्यात-पारतंत्र्य असल्यामुळें व 'जुहोति' या आख्याताला संनिहितरूपवत् कर्म सोडून व्यवहित नैयमिक अग्निहोत्रपरामर्शित्वाचा असंभव असल्यामुळें, आख्यातार्थवाची अग्निहोत्रशब्दालाहि कर्मान्तरविषयत्वच आहे, असें मानणें युक्त आहे. पण 'विविदिषा-'वाक्यांत विविदिषेमध्येंच विधीचें श्रवण असल्यामुळें प्रसिद्ध असलेल्याच यज्ञादिकांचा 'यज्ञादि-'शब्दांनीं अनुवाद केलेला असल्यामुळें, केवल विद्यासंयोगाचेंच विधान केलें जातें. म्हणून त्यांना कर्मान्तरत्व नाहीं, असा भावार्थ.—हा उक्तार्थच प्रश्नद्वारा हेतूला अवतरण देऊन 'कुतः०' इत्यादि भाष्यानें स्पष्ट करितात—]=कोणत्या कारणानें ? 'उभयलिंगामुळें'—श्रुतिलिंगामुळें व स्मृति-लिंगामुळें. [—'श्रुति०' इत्यादि भाष्यानें याचेंच विवरण—]

**भाष्यं—श्रुतिलिंगं तावत् 'तमेतं वेदानुवचनेन ब्राह्मणा विविदिषन्ति' इति सिद्धवदुत्पन्नरूपाण्येव यज्ञादीनि विविदिषायां विनियुंक्ते न तु जुहुतीत्या-दिवदपूर्वमेषां रूपमुत्पादयतीति । स्मृतिलिंगमपि "अनाश्रितः कर्मफलं कार्यं कर्म करोति यः" इति विज्ञानकर्तव्यताकमेव कर्म विद्योत्पत्त्यर्थं दर्शयति ॥ "यस्यैतेऽष्टाचत्वारिंशत्संस्काराः" इत्याद्या च संस्कारत्वप्रसिद्धिर्वैदिकेषु कर्मसु तत्संस्कृतस्य विद्योत्पत्तिमभिप्रेत्य स्मृतौ भवति । तस्मात्साध्विदं अभेदा-वधारणम् ॥ ३४ ॥**

**भाष्यार्थ**—त्यांतील अगोदर श्रुतिलिंग असें आहे—"ब्राह्मण त्या या आत्म्याला वेदानुवचनानें जाणण्याची इच्छा करितात"—पृ.९९२—असें हें वचन सिद्ध असल्याप्रमाणें ज्यांचें रूप उत्पन्न झालें आहे अशाच यज्ञादि कर्मांचा विविदिषेमध्यें विनियोग करितें. पण तें 'जुहुति' इत्यादि वचनाप्रमाणें त्यांचें अपूर्व रूप उत्पन्न करीत नाहीं, असें हें श्रुतिलिंग आहे. "कर्माच्या फलाचा आश्रय न करितां जो कर्तव्यकर्म करितो"—गी. भा. ६. १. पृ. ९४३.—असें हें स्मृतिलिंगहि ज्याची कर्तव्यता विज्ञात झाली आहे, असेंच कर्म

विद्योत्पत्तीसाठीं दाखवितें. [-चित्तमलाच्या निरसनानें ज्ञानोत्पत्तीमध्यें कर्मांच्या उपकारकत्वाचें ज्ञान करून देणारी प्रसिद्ध कर्मांतील संस्कारत्वप्रसिद्धीहि कर्मांचा अभेद सुचविते, असें '**अष्टाचत्वारिंशत्**०' इत्यादि भाष्यानें सांगतात-] =आणि "ज्याचे हे अठ्ठेचाळीस संस्कार आहेत" इत्यादि वैदिक कर्मांतील संस्कार-प्रसिद्धि त्यांनीं संस्कृत झालेल्या पुरुषाच्या विद्योत्पत्तीला उद्देशून स्मृतीमध्यें आहे. [ गर्भधानापासून सहधर्मचारिणीसंयोगापर्यंत चवदा, पंच महायज्ञ, सात सोमसंस्था, सात हविःसंस्था, व सात पाकसंस्था असे चाळीस संस्कार आणि अन्नभक्षण न करितां संहितेचें अध्ययन, प्रायण, कर्म, जप, शरीरांतून उत्क्रमण, भस्मसमूहन, अस्थिसंचयन व श्राद्धें, मिळून अठ्ठेचाळीस संस्कार.-याप्रमाणें कर्म-भेदाच्या शंकेचा असंभव आहे, असें झालें असतां फलित सांगतात-]='**तस्मात्**०' -म्हणून हें अभेदावधारण साधु-निर्दोष आहे. ३४ [-नित्य कर्मे स्वतः पुण्य-लोकप्राप्ति हें फल देणारीं जरी असलीं तरी ज्ञानेच्छूनें-जिज्ञासूनें अनुष्ठिलेलीं तीं ज्ञानोपकारक होतात, असें सांगितलें. आतां ब्रह्मचर्यादि आश्रमकर्मांना अविद्यादि क्लेशांच्या क्षपणानें विद्योत्पत्तीमध्यें हेतुत्व आहे, याविषयीं '**अनभि-भवं च**०' इत्यादि सूत्रानें लिंग सांगतात-]

## सूत्रं—अनभिभवं च दर्शयति ॥ ३५ ॥ (८)

**सूत्रार्थ**—आणि 'एष हि आत्मा' इत्यादि श्रुति ब्रह्मचर्यादि साधनांनीं संपन्न असलेल्या पुरुषाचा रागादि क्लेशांकडून अभिभव होत नाहीं, असें दाख-विते. ३५ (८)-सु. ब्र. ४०९-[-सूत्राच्या तात्पर्योक्तिपूर्वक '**सहकारित्वस्य**०' इत्यादि भाष्यानें त्याचा अक्षरार्थ सांगतात-]

**भाष्यं**—**सहकारित्वस्यैव एतदुपोद्बलकं लिंगदर्शनम् । अनभिभवं च दर्शयति श्रुतिः ब्रह्मचर्यादिसाधनसंपन्नस्य रागादिभिः क्लेशैः 'एष ह्यात्मा न नश्यति यं ब्रह्मचर्येणानुविंदते' इत्यादिना । तस्माद्यज्ञादीन्याश्रमकर्माणि च भवन्ति विद्यासहकारीणि चेति स्थितम् ॥ ३५ ॥** ( ८ )

**भाष्यार्थ**—कर्मांच्या विद्यासहकारित्वाचेंच हें उपोद्बलक लिंगदर्शन आहे. "ज्या आत्म्याला ब्रह्मचर्यानें प्राप्त होतो तो हा आत्मा नाश पावत नाहीं." -छां. ८. ५. ३.-इत्यादि-वचनानें श्रुति ब्रह्मचर्यादि साधनांनीं संपन्न अस-लेल्या अधिकाऱ्याचा रागादि क्लेशांनीं अनभिभव-अपराभव दाखविते.[-'**तस्मात्**०' इत्यादि भाष्यानें उभयविधींच्या अधीन असलेल्या अर्थाचा उपसंहार करितात-]

=म्हणून यज्ञादिक हीं आश्रमकर्मेंहि होतात व विद्येचीं सहकारीहि होतात, असें सिद्ध झालें ३९.–सु. ब्र. ४०९-१०–( ८ )

( ९. विधुराधिकरण. ३६-३९. )

—आश्रमकर्मांना विद्योपायत्व आहे, असें झालें असतां अनाश्रमकर्मांना विद्योपायत्व नाहीं, असें मानणाऱ्या वाद्याचें सूत्रकार '**अन्तरा०**' इत्यादि सूत्रानें निरसन करितात—

**सूत्रं—अन्तरा चापि तु तद्दृष्टेः ॥ ३६**

सूत्रार्थ—अनाश्रमी विधुरादिकांनाहि विद्यचा अधिकार आहे. कारण श्रुतिस्मृतींत रैक्व-विदुरादि अनाश्रमी पुरुषांच्या ब्रह्मविद्याधिकाराचें दर्शन होतें. ३६. –सु. ब्र. ४११.–[–अनाश्रमी विधुरादिकांना विषय करून त्यांची कर्मित्वप्रसिद्धि असल्यामुळें '**विधुरादीनां०**' इत्यादि भाष्यानें संशय सांगतात–]

**भाष्यं—विधुरादीनां द्रव्यादिसंपद्रहितानां च अन्यतमाश्रमप्रतिपत्तिहीनानां अंतरालवर्तिनां किं विद्यायामधिकारोऽस्ति किंवा नास्तीति संशये । नास्तीति तावत्प्राप्तम् । आश्रमकर्मणां विद्याहेतुत्वावधारणादाश्रमकर्मासंभवाच्चैतेषां इति ॥**

**भाष्यार्थ**—विधुरादिकांचा व द्रव्यादि संपत्तीनें रहित असलेल्या कोणत्याहि आश्रमाचा स्वीकार न केलेल्या अन्तरालवर्ती पुरुषांचा विद्येमध्यें अधिकार आहे कीं नाहीं, असा संशय आला असतां [ या अधिकरणांत अनाश्रम कर्मांच्या उक्त विद्याहेतुत्वाचें कथन केलेलें असल्यामुळें याच्या पादादिसंगति आहेत. पूर्वपक्षांत 'ज्याप्रमाणें विधुरांच्या कर्मांच्या विद्याहेतुत्वाची असिद्धि आहे तशीच आश्रमकर्मांच्याहि विद्याहेतुत्वाची असिद्धि आहे' पण सिद्धान्तांत 'आश्रमित्वाला ज्यायस्त्व –श्रेष्ठत्व असल्यामुळें त्यांच्या कर्मांच्या विद्याहेतुत्वाची फारच चांगल्याप्रकारें सिद्धि होते' असा फलभेद मानणारे आचार्य संशयाचा अनुवाद करून–'**नास्ति०**' इत्यादि भाष्यानें पूर्वपक्ष करितात–]=' नाहीं ' त्यांना विद्याधिकार नाहीं, असें अगोदर प्राप्त झालें. [–" विविदिषावाक्यांत यज्ञादिकांतील प्रत्येकाची करणविभक्ति श्रुत असल्यामुळें विधुरादि अनाश्रमी पुरुषांच्या आश्रमधर्मांचा जरी अभाव असला तरी दानादि वर्णमात्रधर्मांचा संभव असल्यामुळें त्यांनाहि विद्याधिकार असेल " अशी आशंका घेऊन 'केवळ वर्णधर्मांनाच विद्यासाधनत्व आहे, असें झाल्यास आश्रमकर्मांना व्यर्थत्व प्राप्त होतें. त्यामुळें अनाश्रमी पुरुषांचा विद्येमध्यें अधिकार नाहीं,' असें वादी '**आश्रमकर्मणां०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–] =कारण आश्रमकर्मांच्या विद्याहेतुत्वाचें अवधारण केलें आहे, आश्रमकर्में विद्येचीं

साधनें आहेत, असा निश्चय केला आहे आणि या विधुरादि **अनाश्रमी पुरुषांच्या** आश्रमकर्मांचा तर असंभव आहे, ‘ **इति** ’–असा पूर्वपक्ष प्राप्त होतो. [–‘ अनाश्रमकर्मांना विद्याहेतुत्व नाहीं, ’ या पूर्वपक्षाचा अनुवाद ‘ **एवं०** ’ इत्यादि भाष्यानें करून सिद्धान्त सांगतात–]

**भाष्यं—एवं प्राप्त इदमाह–अंतरा चापि त्वनाश्रमित्वेन वर्तमानोऽपि विद्यायामधिक्रियते । कुतः । तद्दृष्टेः । रैक्वावाचक्नवीप्रभृतीनामेवंभूतानामपि ब्रह्मवित्त्वश्रुत्युपलब्धेः ॥ ३६ ॥**

**भाष्यार्थ**—असा पूर्वपक्ष प्राप्त झाला असतां बादरायणाचार्य ‘ अन्तरा चापि तु ’ असें हें सांगतात. [–प्रतिज्ञेचें व्याख्यान करितात–]=‘ **अनाश्रमित्वेन०** ’ –अनाश्रमित्वानें–कोणताहि आश्रम न स्वीकारतां राहणाराहि विद्येमध्यें अधिकृत केला जातो. कोणत्या कारणानें ‘तद्दृष्टेः’–तशी श्रुति उपलब्ध होत असल्यामुळें [–तद्दृष्टीचेंच व्याख्यान–]=‘**रैक्व०**’–रैक्व, वाचक्नवी, गार्गी इत्यादि अनाश्रमी स्त्री-पुरुषांच्याहि ब्रह्मवित्वाची श्रुति उपलब्ध होत असल्यामुळें अनाश्रमीहि विद्याधिकारी आहे. ३६. [–याप्रमाणें श्रौती दृष्टि सांगून ‘ **अपि च०** ’ या सूत्रानें स्मार्ती दृष्टीहि दाखवितात–]

## सूत्रं—अपि च स्मर्यते ॥ ३७

**सूत्रार्थ**--शिवाय अनाश्रमी पुरुषांचेहि योगित्व स्मृत **आहे.**३७.–**सु.ब्र.**४११ [–‘ **संवर्तक०** ’ इत्यादि भाष्यानें सूत्राचें व्याख्यान–]

**भाष्यं--संवर्तकप्रभृतीनां च नग्नचर्यादियोगादनपेक्षिताश्रमकर्मणामपि महायोगित्वं स्मर्यत इतिहासे ॥ ३७ ॥ ननु लिंगमिदं श्रुतिस्मृतिदर्शनमुपन्यस्तं । का नु खलु प्राप्तिरिति साऽभिधीयते--**

**भाष्यार्थ**—नग्नचर्यादिसंबंधामुळें ज्यांच्याकडून आश्रमकर्में अनपेक्षित होतीं अशाहि संवर्तकप्रभृतींचें महायोगित्व इतिहासांत स्मृत आहे. ३७. [–याप्रमाणें श्रुति-स्मृतींनीं सिद्ध झालेल्या सिद्धान्तावर येणारा, पुढील सूत्रानें निरसनीय असा आक्षेप ‘ **ननु०** ’ इत्यादि भाष्यानें सांगतात–]=“ अहोपण, श्रुति-स्मृतिदर्शन या लिंगाचा तुम्हीं उपन्यास केला आहे, पण खरोखर त्याची प्राप्ति काय बरें आहे ?” [ जन्मान्तरीं केलेल्याहि कर्मांमुळें रैक्वादिकांच्या विद्येचा संभव असल्याकारणानें वर्णोपाधींत सांगितलेल्या कर्मांपासून विद्या प्राप्त होते, या अर्थीं श्रुति व स्मृति यांना अनियामकत्व असल्यामुळें दुसरें नियामक सांगणें उचित आहे, असा याचा भावार्थ. –आश्रमधर्मांचा जरी अभाव असला तरी वर्णधर्मविशेषांनीं अनुगृहीत झालेली

विद्या उदय पावेल, असें सूत्रानें समाधान–]=**'सा अभिधीयते'**–ती प्राप्ति **'विशेषानुग्रहश्च'** या सूत्रानें सांगितली जाते–

**सूत्रं—विशेषानुग्रहश्च ॥ ३८**

**सूत्रार्थ**—रैक्वादि-अनाश्रमी पुरुषांच्या जप उपवास-देवताराधनादि ज्ञानसाधनभूत विशेष कर्मांनीं विद्येवर अनुग्रह होतो. ३८.–सु. ब्र. ४११. [–**'तेषामपि०'** इत्यादि भाष्यानें सूत्राचें व्याख्यान–]

**भाष्यं—तेषामपि च विधुरादीनामविरुद्धैः पुरुषमात्रसंबंधिभिः जपोपवासदेवताराधनादिभिः धर्मविशेषैरनुग्रहो विद्यायाः संभवति । तथा च स्मृतिः– "जप्येनैव तु संसिध्येद्ब्राह्मणो नात्र संशयः । कुर्यादन्यन्न वा कुर्यान्मैत्रो ब्राह्मण उच्यते" इत्यसंभवदाश्रमकर्मणोऽपि जप्येऽधिकारं दर्शयति ॥**

**भाष्यार्थ**—आणि त्या विधुरादिकांच्याहि अविरुद्ध–अनाश्रमित्वाशीं विरोध न करणाऱ्या म्हणूनच पुरुषमात्रसंबंधी–कोणत्याहि मनुष्याशीं संबद्ध होणाऱ्या जप, उपवास, देवताराधन इत्यादि धर्मविशेषांनीं विद्येचा अनुग्रह संभवतो. [–"अहोपण, आश्रमधर्मशून्य असलेल्या पुरुषांचा शूद्रादिकांप्रमाणें जपामध्येंहि अधिकार नाहीं," अशी आशंका घेऊन **'तथा च०'** इत्यादि भाष्यानें म्हणतात–]=आणि तशीच स्मृतिहि "पण ब्राह्मण केवळ जप्यानेंच संसिद्ध होईल यांत कांहीं शंका नाहीं. तो दुसरें कांहीं करो कीं न करो. ब्राह्मण 'मैत्र:' –मित्रत्वांत राहणारा सर्वभूतांची हिंसा न करणारा दयावान् म्हटला जातो."–मनु. २.८७–या वचनानें ज्याचीं आश्रमकर्में संभवत नाहींत अशा पुरुषाचाहि जप्यामध्यें अधिकार दाखविते. [–शिवाय ज्यांचें फळ नियोगानें–विधीनें प्राप्त आहे अशा कर्मामध्यें फळाचें आनन्तर्य अविहित असल्यामुळें म्ह० विहित कर्मांचें फळ कर्म केलें कीं लागलेंच–उत्तरक्षणीं मिळतें, असें विधान नसल्यामुळें, त्याला अनियतकालत्व आहे, असें झालें असतां अनाश्रमी पुरुषांच्या विधिप्राप्त कर्मांचा अभाव जरी असला तरी पारलौकिक–पूर्वजन्मकृत कर्मांनींच त्यांची विद्या उत्पन्न होईल, असें सूत्राचें व्याख्यान **'जन्मान्तर०'** इत्यादि भाष्यानें करितात–]

**भाष्यं—जन्मान्तरानुष्ठितैरपि चाश्रमकर्मभिः संभवत्येव विद्यायां अनुग्रहः। तथा च स्मृतिः–"अनेकजन्मसंसिद्धस्ततो याति परां गतिम्" इति जन्मान्तरसंचितानपि संस्कारविशेषाननुगृहीतान्विद्यायां दर्शयति । दृष्टार्था च विद्या प्रतिषेधाभावमात्रेणाप्यर्थिनमधिकरोति श्रवणादिषु । तस्माद्विधुरादीनामप्यधिकारो न विरुध्यते ॥ ३८ ॥**

**भाष्यार्थ**—आणि जन्मान्तरीं–दुसऱ्या जन्मीं अनुष्ठान केलेल्या आश्रमकर्मांनीहि विद्येचा अनुग्रह संभवतोच. [–जन्मान्तरसंचित कर्मांच्या विद्यानुग्राहकत्वाविषयीं ‘ **तथा च॰** ’ इत्यादि भाष्यानें प्रमाण सांगतात–]=आणि तशीच “ अनेक जन्मांतील अभ्यासानं संसिद्ध झालेला योगी त्या योगसंसिद्धीमुळें मोक्षाख्य परम गतीला प्राप्त होतो. ”–भ. गी. ६. ४५.–ही स्मृति जन्मान्तरसंचित संस्कारविशेषांनाहि विद्येमध्यें अनुग्राहकत्व आहे असें दाखविते–त्यांचेंहि अनुग्रहीतृत्व सांगते. [ अनेक जन्मांमध्यें संचितसंस्कारांनीं सिद्ध–सम्यग्ज्ञानपरिपाकवान्, असा भावार्थ.–“ या जन्मामध्यें ज्यानें वेदाचें अध्ययन केलें आहे, असा पुरुष धर्मजिज्ञासेमध्यें जसा अधिकारी होतो तसा याच जन्मांतील आश्रमधर्मांनीं ज्याची विविदिषा उत्पन्न केली आहे, असाच तो विद्याधिकारी होतो.” अशी आशंका घेऊन ‘ **दृष्टार्थो॰** ’ इत्यादि भाष्यानें म्हणतात–]=आणि जिचा अर्थ–फल दृष्ट आहे अशी विद्या केवळ प्रतिषेधाच्या अभावानेंहि विद्यार्थ्याला श्रवणादिकांमध्यें अधिकारी करिते. [–अविद्यानिवृत्तीला दृष्टफलत्व असल्यामुळें नियमाच्या अपेक्षेचा अभाव आहे. म्हणून विघातक निषेधाच्या केवळ अभावानेंच विद्येमध्यें पुरुषाची प्रवृत्ति होईल, असा भावार्थ.–‘ **तस्मात्॰** ’ इत्यादि भाष्यानें श्रुति स्मृति-न्यायसिद्ध अर्थाचा उपसंहार करितात–]=त्यामुळें विधुरादिकांचाहि विद्येंतील अधिकार विरुद्ध होत नाहीं. ३८. [–“ अहोपण, वर्णोपाधीमध्यें उक्त धर्मामुळेंहि जर विद्या उत्पन्न होत असेल तर आश्रमित्व व्यर्थ आहे. ” अशी आशंका घेऊन ‘ **अतः तु॰** ’ इत्यादि सूत्रानें समाधान सांगतात–]

## सूत्रं—अतस्त्वितरज्ज्यायो लिंगाच्च ॥ ३९ ॥ (९)

**सूत्रार्थ**—पण या अनाश्रमित्वाहून ‘ इतर ’–आश्रमित्व श्रेष्ठ आहे. कारण तसें श्रौतलिंग आहे. ३९ ( ९ )–सु. ब्र. ४११–[–विद्येची उशीरानें–दीर्घकालानें अभिव्यक्ति होणें व त्वरित अभिव्यक्ति होणें, यांच्या कारणत्वानें आश्रमित्व व अनाश्रमित्व यांमध्यें विशेष असल्यामुळें आश्रमित्व व्यर्थ नाहीं, असें मानून ‘ **अतस्तु॰** ’ इत्यादि भाष्यानें सूत्राचें व्याख्यान करितात–]

**भाष्यं—अतस्तु अन्तरालवर्तित्वादितरदाश्रमवर्तित्वं ज्यायो विद्यासाधनम् । श्रुतिस्मृतिसंदृष्टत्वात् । श्रुतिलिंगाच्च ‘ तेनैति ब्रह्मवित्पुण्यकृत्तैजसश्च ’ इति । “ अनाश्रमी न तिष्ठेत दिनमेकमपि द्विजः । संवत्सरमनाश्रमी स्थित्वा कृच्छ्रमेकं चरेत् ” इति च स्मृतिलिंगात् ॥ ३९ ॥ (९)**

**भाष्यार्थ**—' **तु अतः** '–पण या अन्तरालवर्तित्वाहून–कोणताच आश्रम न स्वीकारतां मध्येंच अनाश्रमी राहणें याहून 'इतरत्'–आश्रमवर्तित्व अधिक श्रेष्ठ विद्यासाधन आहे. [ साधनाच्या उपचयामुळें–वृद्धीमुळें सत्वर विद्याहेतुत्व हेंच ज्यायस्त्व–श्रेष्ठत्व आहे.–आश्रमित्वाच्या ज्यायस्त्वाविषयीं श्रुति-स्मृति-अनुगृहीतत्व हा हेतु '**श्रुति०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=श्रुति-स्मृति-संदृष्टत्वामुळें.[–श्रुतींतील पुण्यकृत्त्व या विशेषणामुळें व लिंगामुळें आश्रमित्व श्रेष्ठ आहे, असें '**श्रुतिलिंगाच्च०** ' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=आणि ' तेन '–" त्या ज्ञानमार्गानें 'ब्रह्मविद् '–ब्रह्मवेत्ता 'एति'–जातो–ब्रह्माला प्राप्त होतो.'पुण्यकृत् च'–व तो पुण्य –स्वाश्रमोक्त कर्म करितो म्हणून पुण्यकृत् म्हटला जातो. ' तैजसः च '–तेजामध्यें –परमात्म्यामध्यें आत्मत्वानें राहतो, म्हणून तैजस."–बृ ४.४.९ सु. उ. १९३– –असें श्रुतिलिंग असल्यामुळें, [या श्रुतींतील पुण्यकृत्त्व या विशेषणामुळें आश्रमित्व ब्रह्मप्राप्तहेतुत्वानें श्रेष्ठ आहे,असें सिद्ध झालें, असा याचा भावार्थ.–आश्रमित्वाच्या श्रेष्ठत्वाविषयीं स्मार्तलिंगाचेंहि आनुकूल्य ' **अनाश्रमी०** ' इत्यादि वचनानें दाखवितात–]=व " द्विजानें एक दिवसहि अनाश्रमी–आश्रमावांचून राहूं नये. एक संवत्सर अनाश्रमी राहून त्यानें एक कृच्छ्र करावें " अशा स्मार्तलिंगामुळें, आश्रमित्व श्रेष्ठ आहे. [ सु. ब्र. ४१२ ] ३९. (९)

## ( १०. तद्भूताधिकरण. सू. ४०. )

––"अनाश्रमी पुरुषांचें कर्महि जर विद्याहेतु आहे तर आरूढपतित झालेल्या –स्वीकारलेल्या पुढील आश्रमापासून पतित होऊन पूर्वाश्रमांत आलेल्या–बुद्धिपूर्वक प्रच्युत झालेल्या पुरुषाचें कर्म विद्याहेतु आहे, हें कार्य सांगावें " अशी आशंका घेऊन ' **तद्भूतस्य तु०** ' इत्यादि सूत्रानें सिद्धान्त सांगतात––

**सूत्रं–तद्भूतस्य तु नातद्भावो जैमिनेरपि नियमातद्रूपाभावेभ्यः॥४०(१०)**

**सूत्रार्थ**—पण जो ' तद्भूत '–उत्तम आश्रमाला प्राप्त झाला आहे त्याचा ' अतद्भाव '–त्या आश्रमापासून प्रच्युति–भ्रंश होणें संभवत नाहीं. ' जैमिनि-' आचार्यालाहि हें संमत आहे. ' अरण्यांत जावें ' असा नियम, ' त्या उत्तमाश्रमांतून पूर्वाश्रमांत यावें ' असें श्रुतिवचन नसणें व शिष्टाचाराचा अभाव, अशा तीन कारणांमुळें ४०. ( १०. )–सु. ब्र. ४१३. [–' **सन्ति०** ' इत्यादि भाष्यानें गतार्थाच्या अनुवादानें अधिकरणाचा विषय सुचवितात–]

**भाष्यं–सन्त्यूर्ध्वरेतस आश्रमा इति स्थापितम् । तांस्तु प्राप्तस्य कथंचित्ततः प्रच्युतिरस्ति नास्ति वेति संशयः । पूर्वधर्मस्वनुष्ठानचिकीर्षया वा रागादिवशेन वा प्रच्युतोऽपि स्याद्विशेषाभावादिति ॥**

**भाष्यार्थ**--ऊर्ध्वरेत्याचे-संन्याश्याचे आश्रम आहेत, हें वर प्रस्थापित केलें. [-त्या आश्रमांस प्राप्त झालेल्या व त्यांपासून बुद्धिपूर्वक भ्रंश पावलेल्या पुरुषाचें कर्म हा या अधिकरणाचा विषय आहे. तें कर्म विद्याहेतु आहे कीं नाहीं, असा संशय सिद्धच आहे, असें मानून '**तांस्तु प्राप्तस्य०**' इत्यादि भाष्यानें त्याचा हेतु सांगतात-]=त्या आश्रमांस प्राप्त झालेल्या पुरुषाची त्यांपासून रागादि दोषांचा उद्रेक झाल्यामुळें प्रच्युति-भ्रंश आहे कीं नाहीं ? असा संशय येतो. [ती प्रच्युति प्रमाणानें युक्त आहे कीं नाहीं, असा या संशयाचा अर्थ आहे. बुद्धिपूर्वक प्रच्युत झालेल्या ऊर्ध्वरेत्यांचें-यतींचें कर्म ब्रह्मविद्येचा हेतु-उपाय नाहीं, अशा उक्तीनें याच्या पादादि संगति आहेत. पूर्वपक्षांत 'आश्रमित्वाच्या पूर्वोक्त श्रेष्ठत्वाची असिद्धि' व सिद्धान्तांत 'प्रच्युतीला अप्रामाणिकत्व असल्यामुळें त्याची -आश्रमित्वाच्या पूर्वोक्त श्रेष्ठत्वाची सिद्धि' असा फलभेद मानून '**पूर्वधर्म०**' इत्यादि भाष्यानें पूर्वपक्ष-]=पूर्व-आश्रमोक्त यागादि धर्म स्वनुष्ठेय-सुखानें अनुष्ठान करणें शक्य आहे, म्हणून त्याचें अनुष्ठान करण्याच्या इच्छेनें किंवा राग-द्वेषादिकांमुळें तो यति प्रच्युतहि होईल. कारण आरोह व अवरोह यांत विशेष कांहींच नाहीं, 'इति'-असा पूर्वपक्ष प्राप्त होतो. [गृहस्थाश्रमोक्त यागादि धर्म सुखानें अनुष्ठेय आहे, अशा भावनेनें पूर्वधर्मच करण्याच्या इच्छेनें व राग-द्वेषांच्या बलानें प्रत्यवरोह-आरूढपतितत्व प्रामाणिक आहे आणि तो-प्रत्यवरोह प्रमाणसिद्ध असल्यामुळें निंदित असलेलेंहि अनाश्रमिकर्म जसें विद्यासाधन सांगितलेलें आहे तसेंच प्रत्यवरोहण केलेल्याचेंहि कर्म विद्याहेतु आहे. कारण 'आश्रमापासून अवरोह करावा. कारण त्याला आश्रमारोह व अवरोह यांतील एकत्व आहे. आश्रमारोहाप्रमाणें,' असें अवरोहाला प्रामाणिकत्व आहे, असा भावार्थ.-'**एवं०**' इत्यादि भाष्यानें सिद्धान्तसूत्राला अवतरण देऊन त्याचें व्याख्यान करितात-]

**भाष्यं--एवं प्राप्त उच्यते-तद्भूतस्य तु प्रतिपन्नोर्ध्वरेतोभावस्य न कथंचिदप्यतद्भावो। न ततः प्रच्युतिः स्यात्। कुतः। नियमातद्रूपाभावेभ्यः। तथाहि- 'अत्यंतमात्मानमाचार्यकुलेऽवसादयन्' इति। 'अरण्यमियादिति पदं ततो न पुनरेयादित्युपनिषत्' इति। "आचार्येणाभ्यनुज्ञातश्चतुर्णामेकमाश्रमम्। आ विमोक्षाच्छरीरस्य सोऽनुतिष्ठेद्यथाविधि" इति चैवंजातीयको नियमः प्रच्युत्यभावं दर्शयति॥**

**भाष्यार्थ**—असा पूर्वपक्ष प्राप्त झाला असतां सिद्धान्त सांगितला जातो-'तद्भूतस्य तु'-जो ऊर्ध्वरेतोभावाला प्राप्त झाला आहे त्याचा कोणत्याहि कारणानें 'अतद्भाव'-त्या भावापासून प्रच्युति होणार नाहीं. [-पुढील आश्रमाला प्राप्त झालेल्या पुरुषाची पूर्वाश्रमप्राप्ति अप्रामाणिकी आहे, याविषयीं प्रश्नपूर्वक तीन हेतु सांगतात-]='**कुतः०**'-कोणत्या कारणानें? 'नियम, अतद्रूप व अभाव या तीन कारणांमुळें.' [-'**तथाहि०**' इत्यादि भाष्यानें त्यांतील 'नियम' या हेतूचें व्याख्यान-]=त्याविषयीं नियम कसा आहे तो पहा-"आचार्यकुलांत आपल्याला अत्यंत अवसन्न-क्षीण करणारा"-पृ. ५२१-असा व "अरण्यास -एकान्तोपलक्षित ऊर्ध्वरेतस्त्वास प्राप्त व्हावें, असें हें पद-शास्त्रमार्ग आहे. त्या अरण्यापासून पुनः परत येऊं नये, त्यापासून प्रत्यवरोह करूं नये, असें हें उपनिषद्-रहस्य आहे." असा [-'**आचार्येण०**' इत्यादि वचनानें स्मार्त नियमहि सांगतात-]=आणि "आचार्याकडून अभ्यनुज्ञा दिल्या गेलेल्या त्यानें शरीराचा विमोक्ष होईपर्यंत चार आश्रमांतील कोणत्या तरी एका आश्रमाचें यथाविधि अनुष्ठान करावें."[-'**इति एवंजातीयकः०**'इत्यादि भाष्यानें उक्त नियमाचें तात्पर्य सांगतात-]=हा अशा प्रकारचा नियम प्रच्युतीचा अभाव दाखवितो. [-'**यथा च०**' इत्यादि भाष्यानें अतद्रूपाचें-अप्रत्यवरोहाचें व्याख्यान करितात-]

**भाष्यं—यथा च "ब्रह्मचर्यं समाप्य गृही भवेत्" "ब्रह्मचर्यादेव प्रव्रजेत्" इति चैवमादीन्यारोहरूपाणि वचांस्युपलभ्यन्ते नैवं प्रत्यवरोहरूपाणि। न चैवमाचाराः शिष्टा विद्यन्ते। यत्तु पूर्वधर्मस्वनुष्ठानचिकीर्षया प्रत्यवरोहणमिति, तदसत् "श्रेयान्स्वधर्मो विगुणः परधर्मात्स्वनुष्ठितात्" इति स्मरणात्॥**

**भाष्यार्थ**—आणि "ब्रह्मचर्य समाप्त करून गृही व्हावें" "ब्रह्मचर्यापासूनच संन्यास करावा"-जा. ४.-हीं अशा प्रकारचीं आरोहरूप वचनें जशीं उपलब्ध होतात तशीं प्रत्यवरोहरूप वचनें उपलब्ध होत नाहींत. [-'**न च०**' इत्यादि भाष्यानें अभावाचें-शिष्टाचाराच्या अभावाचें व्याख्यान करितात-]=आणि असा प्रत्यवरोहरूप आचार करणारे शिष्ट विद्यमान नाहींत [-'**यत्तु०**' इत्यादि भाष्यानें वाद्यानें केलेल्या अनुमानाचा अनुवाद करून स्मृतिविरोधानें त्याला दूषित करितात-]=पण वाद्यानें 'पूर्वाश्रमाचा यागादि धर्म सु-अनुष्ठेय आहे-त्याचें अनुष्ठान अनायासानें होतें, यास्तव त्याचेंच अनुष्ठान करण्याच्या इच्छेनें प्रत्यवरोहण होईल' असें जें वर-पृ.५७४-म्हटलें आहे तें अयुक्त आहे. कारण "चांगल्या प्रकारें अनुष्ठान केल्या जाणाऱ्या परधर्मापेक्षां विगुण-गुणरहित असले-

लाहि स्वधर्म अधिक चांगला आहे "–भ. गी. ३.३५–असें स्मृतिवचन आहे. [–आणि याहि कारणानें अनुमान अयुक्त आहे, असें '**न्यायाच्च०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]

**भाष्यं—न्यायाच्च । यो हि यं प्रति विधीयते स तस्य धर्मो न तु यो येन स्वनुष्ठातुं शक्यते । चोदनालक्षणत्वाद्धर्मस्य । न च रागादिवशात्प्रच्युतिः । नियमशास्त्रस्य बलीयस्त्वात् । जैमिनेरपीत्यपिशब्देन जैमिनिबादरायणयोरत्र संप्रतिपत्तिं शास्ति प्रतिपत्तिदार्ढ्याय ॥ ४० ॥** (१०)

**भाष्यार्थ**—आणि न्यायामुळेंहि पूर्वोक्त अनुमान अयुक्त आहे. कारण जो ज्याच्यासाठीं विहित असतो तो त्याचा धर्म असतो. पण जो ज्याच्याकडून चांगल्या प्रकारें अनुष्ठान केला जाऊं शकतो तो त्याचा धर्म नसतो. कारण धर्माला चोदनालक्षणत्व आहे. [–आतां रागादिवशात् प्रत्यवरोहण होईल, असें जें म्हटलें आहे, त्याविषयीं '**न च०**' इत्यादि भाष्यानें म्हणतात–]=आणि रागद्वेषादिकारणानेंहि प्रच्युति होत नाहीं. कारण नियमशास्त्राला अधिक बलवत्त्व आहे. [त्या आश्रमापासून पुनः परत येऊं नये, हें नियमशास्त्र होय.–'**जैमिनेः०**' इत्यादि भाष्यानें 'जैमिनेरपि' या अवशिष्ट सूत्रावयवाचें व्याख्यान–]=' जैमिनेः अपि ' येथील ' अपि ' या शब्दानें जैमिनि व बादरायण या दोन्ही आचार्यांची या प्रामाणिक प्रच्युत्यभावोक्तीमध्यें संप्रतिपत्ति–ऐकमत्य–संमति सांगतात.[–उभयसंप्रतिपत्तीचें फल–]=ज्ञानाच्या दृढतेसाठीं त्यांचें ऐकमत्य सांगतात. [–ज्ञानाचें –सिद्धान्ताचें दृढत्व हें त्यांच्या ऐकमत्याचें फल आहे.–सु.ब्र.४१३-१४.] ४०.(१०)

## ( ११. आधिकारिकाधिकरण. सू. ४१-४२. )

—प्रत्यवरोहण अशास्त्रीय आहे, असें सांगितलें. आतां प्रमादानें प्रत्यवरोह झाल्यास प्रायश्चित्त आहे, असें सांगण्यासाठीं '**न च०**' इत्यादि सूत्रानें पूर्वपक्ष—

### सूत्रं—न चाधिकारिकमपि पतनानुमानात्तदयोगात् ॥ ४१

**सूत्रार्थ**—'आधिकारिक'–अधिकारलक्षणानें सिद्ध जें गर्दभालभनरूप प्रायश्चित्त तेंहि नैष्ठिक अवकीर्णी ब्रह्मचाऱ्याला नाहीं. कारण 'नैष्ठिक धर्मावर आरूढ होऊन त्यापासून पतन पावणाराला प्रायश्चित्त नाहीं,' अशा अर्थाचें स्मृतिवचन असल्यामुळें आरूढ पतिताचें प्रायश्चित्त संभवत नाहीं. ४१.–सु. ब्र. ४१५. [–'ऊर्ध्वरेत्याचें अबुद्धिपूर्वक च्युत झालेलें ब्रह्मचर्य' हा या अधिकरणाचा विषय आहे. प्रायश्चित्ताच्या अभावाची स्मृति व महापातकांमध्यें त्याचें अकथन या दोन कारणांनीं त्यांचें प्रायश्चित्त नाहीं कीं आहे असा '**यदि०**' इत्यादि भाष्यानें संशय–]

**भाष्यं—यदि नैष्ठिको ब्रह्मचारी प्रमादादवकीर्येत । किं तस्य 'ब्रह्मचार्यवकीर्णी नैर्ऋतं गर्दभमालभेत' इत्येतत्प्रायश्चित्तं स्यादुत नेति । उच्यते । यदप्यधिकारणलक्षणे निर्णीतं प्रायश्चितम् "अवकीर्णिपशुश्च तद्वदाधानस्याप्राप्तकालत्वात्" इति । तदपि न नैष्ठिकस्य भवितुमर्हति ॥**

**भाष्यार्थ**—जर नैष्ठिक ब्रह्मचारी प्रमादामुळें अवकीर्ण होईल–ब्रह्मचर्यव्रतापासून भ्रंश पावेल तर काय, त्याचें 'अवकीर्णी ब्रह्मचारी नैर्ऋत गर्दभाचें आलभन करील–त्यानें त्याचें आलभन करावें' असें हे प्रायश्चित्त होईल कीं नाहीं ? [भाष्यांतील 'प्रमादात्' हें पद ज्यांचें ब्रह्मचर्य अबुद्धिपूर्वक च्युत झालें आहे अशा ऊर्ध्वरेत्यांच्या प्रायश्चित्ताचा हा विचार आहे, असें सुचवितें. 'अवकीर्येत' म्ह० योनींत रेतःसेक करील. 'अवकीर्ण म्ह० ज्याचें रेत योनींत सिक्त आहे तो अवकीर्णी,' अशी याची व्युत्पत्ति आहे. प्रमादामुळें ब्रह्मचर्यापासून च्युत झालेल्या व प्रायश्चित्त केलेल्या ऊर्ध्वरेत्यांचें कर्म विद्यासाधन आहे, अशा उक्तीनें याच्या पादादि संगति आहेत. पूर्वपक्षांत 'प्रमाद करणाऱ्या ऊर्ध्वरेत्यांच्या आत्यंतिक अधःपातामुळें पुरुषार्थाची असिद्धि' व सिद्धान्तांत 'प्रायश्चित्तानें त्यांच्याहि पतनाचें समाधान–दोषनिवारण होत असल्यामुळें त्यांच्या पुरुषार्थाची सिद्धि' असा फलभेद मानून, '**उच्यते०**' इत्यादि भाष्यानें पूर्वपक्षसूत्राला अवतरण देऊन वादी त्याची योजना करितो–]=याचें उत्तर असें सांगितलें जातें. जें प्रायश्चित्त अधिकारलक्षणांत निर्णीत आहे, [–त्याच षष्ठाध्यायांत निश्चित केलेल्या प्रायश्चित्ताचा उल्लेख–]='**अवकीर्णिपशुश्च०**'–"ज्याप्रमाणें उपनयनकालीं लौकिक अग्नींत होम केला जातो 'तद्वत्'–त्याप्रमाणें अवकीर्णिपशु त्यांतच होतव्य आहे. कारण आधानाला अप्राप्तकालत्व आहे."–पू. मी. ६. ८. २१.–असें जें प्रायश्चित्त विहित आहे, तेंहि नैष्ठिकाचें होणें योग्य नाहीं. ['ब्रह्मचारी अवकीर्णि०' यांत 'पशुहोमासाठीं अग्नीचें आधान करावें कीं लौकिक अग्नींतच तें कर्म करावें' असा संदेह आला असतां पूर्वाधिकरणांत–'जें आहवनीय अग्नींत होमितो त्याच्या योगानें सूर्य याला अभीष्ट होतो–याच्यावर प्रसंग होतो,' असें आहवनीयाला सर्वहोमार्थत्व असल्यामुळें आहवनीयांत उपनयन होम करावे, असें अगोदर प्राप्त करवून 'ज्याला पुत्र झाला आहे त्यानें अग्नीचें आधान करावें' असें ज्यानें दारपरिग्रह केला आहे, त्याच्या अग्न्याधानाचें विधान केलेलें असल्यामुळें उपनयनाचे वेळीं पत्नीच्या अभावामुळें आधानाचा काल प्राप्त नाहीं. म्हणून आहवनीयाच्या अभावीं लौकिक अग्नींमध्यें उपनयनहोम करावे–असा सिद्धान्त

केला असतां " ब्रह्मचारी ज्या स्त्रीच्या योगानें अवकीर्णी झाला असेल तीच त्याची भार्या होईल व त्यामुळें अग्न्याधान," अशा या अधिक शंकेचें निरसन करण्यासाठीं 'अवकीर्णिपशुश्च०' हें अतिदेशाधिकरण आहे. " ज्याप्रमाणें उपनयनकालीं लौकिकाग्नींत होम केला जातो तसा अवकीर्णीचा पशु त्यांतच होमावा. कारण अग्न्याधानाला पत्नीपरिग्रहोत्तरकालत्व असल्यामुळें पूर्वी त्याच्या प्राप्तीचा अभाव आहे. परपरिग्रहभूत इतर स्त्रीचें भार्यात्व कल्पून आधान करण्यास कांहीं प्रमाण नाहीं," असा भावार्थ. याप्रमाणें अधिकारलक्षणांत निर्णीत केलेलें जें आधिकारिक प्रायश्चित्त तेंहि नैष्ठिकाचें होण्यास योग्य नाहीं, असा संबंध.—वादी '**किं कारणं०**' इत्यादि भाष्यानें त्याविषयीं प्रश्नपूर्वक हेतु सांगतो—]

**भाष्यं—किं कारणम् । " आरूढो नैष्ठिकं धर्मं यस्तु प्रच्यवते पुनः । प्रायश्चित्तं न पश्यामि येन शुध्येत्स आत्महा " इत्यप्रतिसमाधेयपतनस्मरणाच्छिन्नशिरस इव प्रतिक्रियानुपपत्तेः । उपकुर्वाणस्य तु तादृक्पतनस्मरणाभावादुपपद्यते तत्प्रायश्चित्तम् ॥ ४१ ॥**

**भाष्यार्थ**—त्याचें काय कारण आहे? "पण जो नैष्ठिक धर्मावर आरूढ झालेला पुरुष पुनः त्यापासून प्रच्युत होतो—भ्रंश पावतो तो आत्मघाती ज्यानें शुद्ध होईल असें प्रायश्चित्त मी पाहात नाहीं " असें अप्रतिसमाधेय—ज्याचें प्रतिसमाधान—निवारण करितां येणें शक्य नाहीं, अ.। पतन स्मृत असल्यामुळें, ज्याचें शिर तोडलें आहे अशा पुरुषाच्या प्रतिक्रियेप्रमाणें, त्याच्या प्रतिक्रियेची अनुपपत्ति आहे. [—" तर मग हें उक्त प्रायश्चित्त किंविषय आहे, त्याचा विषय—अधिकारी कोण ? कारण ब्रह्मचारित्व या धर्माच्या सादृश्यामुळें उपकुर्वाण ब्रह्मचाऱ्याच्याहि त्या प्रायश्चित्ताचा असंभव आहे. " अशी आशंका घेऊन वादी '**उपकुर्वाणस्य०**' इत्यादि भाष्यानें म्हणतो—]=पण उपकुर्वाणाच्या तसल्या—अप्रतिसमाधेय पतनाचें अस्मरण असल्यामुळें त्याचें तें प्रायश्चित्त उपपन्न होतें. ४१. [—'**उपपर्वं०**' इत्यादि सूत्रानें सिद्धान्त सांगतात—]

**सूत्रं—उपपूर्वमपि त्वेके भावमशनवत्तदुक्तम् ॥ ४२ ॥ (११)**

**सूत्रार्थ**—' अपि तु एके उपपूर्वं '—पण कांहीं आचार्य हें उपपूर्व पातक—उपपातक आहे, असें समजतात. यास्तव उपकुर्वाणाप्रमाणें नैष्ठिक ब्रह्मचाऱ्यालाहि त्या प्रायश्चित्ताचा ' भाव '—अस्तित्व आहे. 'अशनाप्रमाणें'—मधु-मांसादि भक्षण करणाऱ्या ब्रह्मचाऱ्याचा व्रतलोप व पुनःसंस्कार जसा होतो त्याप्रमाणें. प्रमाणलक्षणांत 'समा विप्रतिपत्तिः०' इत्यादि सूत्रांत तसें सांगितलें आहे. ४२(११)

–सु. ब्र. ४१९. [–ज्या पतनाचें ‘ उप ’ हें पूर्वपद आहे ते उपपूर्व, असें ‘**अपि तु०** ’ इत्यादि भाष्यानें त्याचें व्याख्यान करितात–]

**भाष्यं—अपि त्वेके आचार्या उपपातकमेवैतदिति मन्यन्ते। यन्नैष्ठिकस्य गुरुदारादिभ्योऽन्यत्र ब्रह्मचर्यं विशीर्येत। न तन्महापातकं भवति। गुरुतल्पादिषु महापातकेष्वपरिगणनात्। तस्मादुपकुर्वाणवन्नैष्ठिकस्यापि प्रायश्चित्तस्य भावमिच्छन्ति। ब्रह्मचारित्वाविशेषादवकीर्णित्वाविशेषाच्च। अशनवत्। यथा ब्रह्मचारिणो मधुमांसाशने व्रतलोपः पुनःसंस्कारश्च। एवमिति॥**

**भाष्यार्थ**—परंतु कांहीं आचार्य नैष्ठिक ब्रह्मचाऱ्याचें जें गुरुपत्न्यादिकांहून अन्य स्त्रीचे ठिकाणीं ब्रह्मचर्य विशीर्ण होतें तें उपपातकच आहे, असें समजतात. [ प्रायश्चित्ताच्या अभावाची व्यावृत्ति करण्यासाठीं सूत्रांत ‘ अपि ’ असें म्हटलें आहे.–भाष्यांतील ‘ एव-’काराचा अर्थ ‘**न तत्०**’ इत्यादि भाष्यानें सांगतात–] =तें महापातक नाहीं. कारण गुरुतल्पादि महापातकांमध्यें त्याची परिगणना केलेली नाहीं. [–“अहोपण, नैष्ठिकाच्या व्रतलोपाला उपपातकत्व जरी असलें तरी प्रायश्चित्ताच्या सत्त्वाविषयीं त्यामुळें काय निष्पन्न झालें ? ” अशी आशंका घेऊन ‘ उपपातकसामान्यप्रायश्चित्त होईल ’ असें सूत्रावयवाचें व्याख्यान करणारे आचार्य ‘ **तस्मात्०** ’ इत्यादि भाष्यानें म्हणतात–]=म्हणून उपकुर्वाणाप्रमाणें नैष्ठिकाच्याहि प्रायश्चित्ताचा भाव–अस्तित्व इच्छितात. कारण त्या दोघांचेंहि ब्रह्मचारित्व अविशेष–तुल्य आहे व अवकीर्णित्वहि समान आहे. [–हा उक्त अर्थ दृष्टान्ताला अवतरण देऊन स्पष्ट करितात–]=‘ **अशनवत्०** ’–अशनाप्रमाणें, ज्याप्रमाणें ब्रह्मचाऱ्याच्या मधु-मांसभक्षणामध्यें व्रतलोप व पुनःसंस्कार होतो त्याप्रमाणें. [–“अहोपण, ‘प्रायश्चित्तं न पश्यामि’– मी प्रायश्चित्त पहात नाहीं, असें वचन असल्यामुळें प्रायश्चित्तभावज्ञान कसें होतें ? ” ‘**ये हि०**’ इत्यादि भाष्यानें उत्तर–]

**भाष्यं—ये हि प्रायश्चित्तस्याभावमिच्छन्ति तेषां न मूलमुपलभ्यते। ये तु भावमिच्छन्ति तेषां “ ब्रह्मचार्यवकीर्णी ” इत्येतदविशेषश्रवणं मूलम्। तस्माद्भावो युक्ततरः॥**

**भाष्यार्थ**—कारण जे त्यांच्या प्रायश्चित्ताचा अभाव इच्छितात त्यांचें मूळ उपलब्ध होत नाहीं. [ ‘ प्रायश्चित्तं नास्ति’–प्रायश्चित्त नाहीं, अशा स्मृतिवचनाचा अभाव असल्यामुळें व ‘न पश्यामि’– मी पहात नाहीं, असें केवल दर्शनाभावाचें स्मरण असल्यामुळें, त्यांचें मूळ प्रमाण उपलब्ध होत नाहीं, असा भावार्थ.–“अहोपण, जे अवकीर्णीच्या प्रायश्चित्ताचे भाववादी आहेत त्यांच्याहि मूळांची अनुप-

लब्धि समान आहे," अशी आशंका घेऊन 'ये तु०' इत्यादि भाष्यानें म्हणतात–]=पण जे प्रायश्चित्ताचा भाव इच्छितात त्यांचें 'ब्रह्मचार्यवकीर्णी०'–पृ.५९७. –असें हें अविशेषश्रवण मूळ आहे. [–" अहोपण, 'प्रायश्चित्तं न पश्यामि' या स्मरणाचें–या स्मृतिवचनाचें प्रायश्चित्तनिषेधार्थत्व कल्पून–त्याचें अनुमान करून त्याच अर्थाच्या श्रुतीची कल्पना केल्यामुळें तिच्याशीं विरोध आला असतां सामान्यश्रुतीनें प्रायश्चित्ताची सत्ता स्वीकारली जात नाहीं" अशी आशंका घेऊन 'तस्मात्०' इत्यादि भाष्यानें म्हणतात–]=यास्तव त्याचा भाव युक्ततर–अधिक युक्त आहे, [ कारण दर्शनाभावस्मरणाचें प्रायश्चित्तनिषेधार्थत्व कल्पून त्या अर्थाच्या मूलश्रुतीचें अनुमान जोंवर केलें जात आहे तोंवर–त्यापूर्वीच अविशेष प्रवृत्त झालेली श्रुति प्रायश्चित्ताचें ज्ञान करून देते. त्यामुळें स्मृतीनें प्रायश्चित्ताभावज्ञान होत नाहीं, असा भावार्थ.–या उक्त अर्थी यव-वराहाधिकरणाची संमति 'तदुक्तं०' इत्यादि भाष्यानें त्याच सूत्रावयवाच्या व्याख्यानानें सांगतात–]

**भाष्यं—तदुक्तं प्रमाणलक्षणे–" समा विप्रतिपत्तिः स्यात्" "शास्त्रस्था वा तन्निमित्तत्वात्" इति । प्रायश्चित्ताभावस्मरणं त्वेवं सति यत्नगौरवोत्पादनार्थं इति व्याख्यातव्यम् ॥**

**भाष्यार्थ**—मीमांसेच्या प्रमाणलक्षणांत तें सांगितलें आहे. [ 'यवमयः चरुः वाराही उपानहौ'–" यवांचा चरु व वराहाच्या कातड्याचे जोडे" या वचनांतील 'यव' व 'वराह' या दोन शब्दांनीं प्रियंगु–राळे व कृष्णशकुनि–कावळा यांचें ग्रहण करावें कीं दीर्घशूक–यव व सूकर यांचें ग्रहण करावें, असा संदेह आला असतां 'समा०' इत्यादि सूत्रानें पूर्वपक्ष–]='समान विप्रतिपत्ति होते' 'पण शास्त्रस्थाच मति घ्यावी कारण तिला तन्निमित्तत्व आहे'–पू.मी.१.३.७-८.– असें पूर्वमीमांसेंत सांगितलें आहे. [कित्येक 'यव-'शब्द दीर्घशूक–जव या अर्थी योजितात व दुसरे प्रियंगु–राळे या अर्थी योजितात. तसाच 'वराह-'शब्दहि कित्येक सूकर–डुक्कर या अर्थी व कित्येक कृष्णशकुनि–कावळा या अर्थी योजितात. म्हणून प्रयोगसाम्यामुळें समा–तुल्य विकल्पानें प्रतिपत्ति होते, असा प्रथम सूत्राचा भावार्थ. 'शास्त्रस्था०' या सूत्रानें सिद्धान्त सांगितला आहे. सूत्रांतील 'वा' हा शब्द पूर्वपक्षाची व्यावृत्ति करण्यासाठीं आहे. जी शास्त्रमूल धी–ज्ञान तीच ग्राह्य आहे. कारण तद्धर्मादिज्ञानाला शास्त्रनिमित्तत्व आहे आणि 'जेव्हां दुसऱ्या ओषधि म्लान होतात–कोमेजतात तेव्हां हे यव टवटवीत होऊन राहतात.' व 'वराहाच्या मागून गाई धावतात' असें शास्त्र यव-वराहशब्दांचा दीर्घशूक व

सूकर हा **अर्थ** सांगणारें आहे. यास्तव ज्ञानसाम्याच्या अभावामुळें विकल्पाची सिद्धि होत नाहीं. म्हणून जी शास्त्रमूलप्रसिद्धि असते तीच ग्राह्य होय, असें पूर्वतंत्रांत सिद्ध केलें आहे. त्याचप्रमाणें येथेंहि प्रायश्चित्तभावप्रसिद्धीला शास्त्रमूलत्व असल्यामुळें त्याचें सत्त्व–अस्तित्व सांगितलें आहे, असा भावार्थ–"तर मग 'प्रायश्चित्तं न पश्यामि' या स्मृतीची काय वाट ?" '**प्रायश्चित्ताभाव०**' इत्यादि भाष्यानें उत्तर–]=पण प्रायश्चित्ताभावाचें स्मरण 'एवं सति'–सामान्यश्रुतीनें प्रायश्चित्ताचें अस्तित्व निश्चित झालें असतां यत्नगौरव उत्पन्न करण्यासाठीं आहे, असें व्याख्यान करावें. [जर कदाचित् नैष्ठिकाचें ब्रह्मचर्य लुप्त झालें तर त्याला प्रायश्चित्त दिसत नाहीं, म्हणून नैष्ठिकानें ब्रह्मचर्यपरिपालनाविषयीं यत्नवान् व्हावें असें त्याविषयींच्या यत्नाचें सर्वदा सावधान राहून कर्तव्यतारूप गौरव उत्पन्न करण्यासाठीं हें प्रायश्चित्ताभावस्मरण आहे, असा भावार्थ.–आतां '**एवं०**' इत्यादि भाष्यानें नैष्ठिकाविषयीं सांगितलेल्या या न्यायाचा भिक्षु व वानप्रस्थ यांच्या ठिकाणीं अतिदेश करितात–]

**भाष्यं—एवं भिक्षुवैखानसयोरपि "वानप्रस्थो दीक्षाभेदे कृच्छ्रं द्वादशरात्रं चरित्वा महाकक्षं वर्धयेत्" "भिक्षुर्वानप्रस्थवत्सोमवर्द्धिवर्जं स्वशास्त्रसंस्कारश्च" इत्येवमादिप्रायश्चित्तस्मरणमनुसर्तव्यम् ॥**

**भाष्यार्थ**––याच न्यायानें भिक्षु व वनस्थ–वैखानस यांच्याहि प्रायश्चित्ताचा भाव आहे. [–विशेषतःहि प्रायश्चित्तविधि असल्यामुळें त्या दोघांच्या प्रमादानें झालेल्या व्रतलोपांत प्रायश्चित्त आहे, असें '**वानप्रस्थः०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=वानप्रस्थानें दीक्षाभेद–व्रतलोप–प्रमादानें ब्रह्मचर्यभंग झाला असतां द्वादशरात्र कृच्छ्र करून महाकक्ष–बहुतृणकाष्ठयुक्त देश वाढवावा. ['द्वादशरात्रं' या पदानें कृच्छ्राला विशेषणयुक्त केलें आहे. तीन दिवस एकवार भोजन, तीन दिवस रात्रिभोजन, तीन दिवस अयाचित व तीन दिवस उपवास, एतद्रूप द्वादशरात्र कृच्छ्र करावें, असा भावार्थ.–परिव्राजकाच्याहि व्रताचा प्रमादानें लोप झाल्यास हेंच कृच्छ्रानुष्ठान करावें, असें '**भिक्षुः०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]= "भिक्षूनेंहि वानप्रस्थाप्रमाणें [–पण सोमाला यज्ञांगत्व असल्यामुळें त्याच्या अभिवृद्धीचा अनादर करून 'महाकक्षं वर्धयेत्' असें '**सोमवृद्धिवर्जं०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=सोमवृद्धिवर्ज महाकक्षवर्धन व स्वशास्त्रसंस्कार" इत्यादि प्रायश्चित्तस्मरणाचें

---

१––'सर्वपापप्रसक्तोऽपि ध्यायन्निमिषमच्युतम् । पुनः स पूतो भवति पंक्तिपावन एव च ॥'–सर्व पापामध्यें प्रसक्त असलेलाहि एक निमिष अच्युताचें ध्यान करणारा

अनुसरण करावें. [ ज्यांचें ब्रह्मचर्य प्रमादानें च्युत झालें आहे व ज्यांनीं प्रायश्चित्त केलें आहे अशा ऊर्ध्वरेत्यांचा विद्येमध्यें अधिकार आहे, असा भावार्थ.] ४२ (११)

( १२. बहिरधिकरण. सू. ४३. )

–' **बहिस्तु०** ' इत्यादि सूत्रानें प्रायश्चित्त केलेल्याहि त्यांचें शिष्टाव्यवहार्यत्व–

**सूत्रं—बहिस्तूभयथापि स्मृतेराचाराच्च ॥ ४३ ॥ ( १२ )**

**सूत्रार्थ**—ऊर्ध्वरेत्यांची आश्रमापासून प्रच्युति हें उपपातक असो कीं महापातक असो, 'उभयथाहि'–दोन्ही प्रकारें त्यांनीं प्रायश्चित्त केलें असलें तरी शिष्टांनीं त्यांना बहिष्कृत करावें. कारण तशी स्मृति आहे व आचारहि आहे. ४३ ( १२ ) –सु. ब्र. ४१८–[–ज्यांनीं प्रायश्चित्त केलें आहे अशा ऊर्ध्वरेत्यांशीं शिष्टाचाररूप कर्म हा याचा विषय. तें कर्म विद्यांग आहे कीं नाहीं, असा संशय आला असतां पूर्वोक्त प्रायश्चित्तानेंच त्यांची व्यवहारतासिद्धि होत असल्यामुळे तें विद्यांग आहे, असें प्राप्त झालें असतां ' **यदि०** ' इत्यादि भाष्यानें सिद्धान्त सांगतात–]

**भाष्यं—यदि ऊर्ध्वरेतसां स्वाश्रमेभ्यः प्रच्यवनं महापातकं । यदि वोपपातकं । उभयथापि शिष्टैस्ते बहिष्कर्तव्याः । " आरूढो नैष्ठिकं धर्मं यस्तु प्रच्यवते पुनः । प्रायश्चित्तं न पश्यामि येन शुध्येत्स आत्महा " इति । " आरूढपतितं विप्रं मंडलाच्च विनिःसृतम् । उद्बद्धं कृमिदष्टं च स्पृष्ट्वा चांद्रायणं चरेत्" इति चैवमादिनिंदातिशयस्मृतिभ्यः । शिष्टाचाराच्च । न हि यज्ञाध्ययनविवाहादीनि तैः सहाचरन्ति शिष्टाः ॥ ४३ ॥**

**भाष्यार्थ**—ऊर्ध्वरेत्यांचें स्वाश्रमापासून प्रच्यवन–स्खलन हें जरी महापातक असलें किंवा तें जरी उपपातक असलें तरी–उभयथाहि–दोन्ही पक्षीं शिष्टांनीं त्यांना बहिष्कृत करावें. [–याप्रमाणें प्रतिज्ञार्थ सांगून ' **आरूढः०** ' इत्यादि

---

पुरुष पुनः पवित्र व पंक्तिपावनच होतो. "मनोवाक्कायजान्दोषाञ्ज्ञानोत्थांश्च प्रमादजान् । सर्वान्दहति योगाग्निस्तूलराशिमिवानलः ॥ " —अग्नि जसा कापसाच्या ढिगाला जाळितो, त्याचप्रमाणें योगाग्नि बुद्धिपुरःसर व प्रमादानें घडलेल्या शारीर, वाचनिक व मानस सर्व दोषांना जाळतो. " उपपातकसंघेषु पातकेषु महत्सु च । प्रविश्य रजनीपादं ब्रह्मध्यानं समाचरेत् ॥ "—उपपातकांचे संघ व अनेक महापातकें घडलीं असतां रात्रीच्या शेवटच्या प्रहरांत प्रवेश करून ब्रह्माचें ध्यान करावें. रात्रीं कांहीं काल एकान्तांत बसून ब्रह्मचिंतन करावें. असा भावार्थ. " नित्यमेव तु कुर्वीत प्राणायामांस्तु षोडश । अपि भ्रूणहनं मासात्पुनंत्यहरहः कृताः ॥"—प्रत्येक दिवशीं सोळा प्राणायाम करावे.एक महिनाभर प्रत्यहीं केलेले प्राणायाम भ्रूणहत्या करणारालाहि पावन करितात.

वचनानें हेतुद्वयाचें व्याख्यान करितात-]=" पण जो नैष्ठिक धर्मावर आरूढ झालेला पुनरपि त्यापासून प्रच्युत होतो तो आत्मघाती ज्यानें शुद्ध होईल असें प्रायश्चित्त मी पहात नाहीं." असें व " आरूढ पतित झालेल्या विप्राला, व मंडलापासून बाहेर पडलेल्या, उद्बद्ध व कृमिदष्ट विप्राला स्पर्श करून चांद्रायण करावें " असें, इत्यादि निंदातिशयस्मृतिवचनांवरून त्यांना बहिष्कृत करावें व शिष्टाचारामुळेंहि ते बहिष्कार्य आहेत. कारण शिष्ट त्यांच्याबरोबर यज्ञ-अध्ययन-विवाह इत्यादि करीत नाहींत, हें प्रसिद्ध आहे. [ दुराचारामुळे झालेलें पाप कर्त्यामध्ये दोन्ही लोकांतील अशुद्धीचें आधान करितें. त्यांतील कोणाची दोन्ही लोकांतील अशुद्धि प्रायश्चित्तानें घालविली जाते, कोणाची पारलौकिकी अशुद्धि दूर केली जाते, पण इहलोकांतील अशुद्धि तशीच अनुवृत्त होते. कारण "बालघ्न[1] कृतघ्न, शरणागतांचा घात करणारे व स्त्रियांची हिंसा करणारे धर्मतः-प्रायश्चित्तानें जरी विशुद्ध झाले तरी त्यांच्याशीं संभाषणादि-व्यवहार करूं नये" असें म्हटलें आहे. त्याचप्रमाणें येथेंहि 'आरूढो नैष्ठिकं०' इत्यादि स्मृतिलिंगावरून व आचारावरून पारलौकिक अशुद्धि प्रायश्चित्तानें जरी दूर झालेली असली तरी अव्यवहार्यत्वाचा बोध होत असल्यामुळें त्यांच्याशीं व्यवहाररूप आचाराला विद्यांगत्व नाहीं. याप्रमाणें येथें उक्त आचाराचें उक्तविद्यानंगत्व सांगितलेलें असल्यामुळें याची पादादिसंगति आहे. पूर्वपक्षांत 'बालघ्नान्०' इत्यादि स्मृतीशीं विरोध व सिद्धान्तांत 'तिचें आनुकूल्य' असा याचा भावार्थ.-सु. ब्र.४१८.] ४३(१२)

## ( १३. स्वाम्यधिकरण. सू. ४४-४६ )

--एक पापकर्ता असून त्याच्याशीं व्यवहार केल्यामुळें दुसऱ्याला जसा अपकार होतो, त्याप्रमाणें एक उपासना कर्ता असून त्याच्याशीं व्यवहार केल्यामुळें अन्य यजमानाचा फललक्षण उपकार दाखविणारा वादी '**स्वामिनः०**' इत्यादि सूत्रानें पूर्वपक्ष करितो—

## सूत्रं—स्वामिनः फलश्रुतेरित्यात्रेयः ॥ ४४

**सूत्रार्थ**—' स्वामीचेंच '-यजमानाचेंच अंगाश्रित उपासनांमध्यें कर्तृत्व आहे, ' असें आत्रेय-आचार्य मानितो.' ' फलश्रुतीमुळें '-कारण कर्मांग पंचविध सामामध्यें वृष्ट्युपासकाचें ' वर्षति हास्मै० ' इत्यादि फल श्रुत आहे. यास्तव अंगाश्रित उपासना यजमानकर्तृकच आहेत. ४४.-सु. ब्र. ४१९. [-कर्मांगसंबद्ध

---

१—" बालघ्नांश्च, कृतघ्नांश्च, विशुद्धानपि धर्मतः । शरणागतहंतृंश्च, स्त्रीहंतृंश्च न संवदेत् ॥ "

उपासना हा या अधिकरणाचा विषय. त्यांविषयीं ‘ **अंगेषु०** ’ इत्यादि भाष्यानें उभयकर्तृकत्वबुद्धीनें संशय–]

**भाष्यं**—**अंगेषूपासनेषु संशयः। किं तानि यजमानकर्माण्याहोस्विदृत्विक्कर्माणीति। किं तावत्प्राप्तं। यजमानकर्माणीति। कुतः। फलश्रुतेः। फलं हि श्रूयते– ‘वर्षति हास्मै वर्षयति ह य एतदेवं विद्वान्वृष्टौ पंचविधं सामोपास्ते’ इत्यादि। तच्च स्वामिगामि न्याय्यम्। तस्य सांगे प्रयोगेऽधिकृतत्वात्। अधिकृताधिकारत्वाच्च एवंजातीयकस्य। फलं च कर्तर्युपासनानां श्रूयते–‘ वर्षत्यस्मै य उपास्ते ’ इत्यादि॥**

**भाष्यार्थ**—अंगसंबद्ध उपासनांविषयीं ‘ तीं काय यजमानाचीं कर्मे आहेत कीं ऋत्विक्कर्मे आहेत ’ असा संशय येतो. [–ज्यांचें फल स्वतंत्र आहे अशा शास्त्रीय अंगाश्रित उपासनांना ऋत्विक्कर्तृत्व जरी असलें तरी यजमानगामिफलत्वकथनामुळें याच्या पादादिसंगति आहेत. पूर्वपक्षांत ‘ कर्तृत्व व भोक्तृत्व यांच्या ऐकाधिकरण्याची असिद्धि ’ व सिद्धान्तांत ‘ प्रकृत कर्त्याला अस्वातंत्र्य असल्यामुळें, त्याला यजमानाधीनत्व असल्यामुळें त्याचें कर्तृत्वहि यजमानाधीन आहे. त्यामुळें ऐकाधिकरण्याला अविरुद्धत्व आहे ’ असा फलभेद गृहीत धरून प्रश्नपूर्वक पूर्वपक्ष–]=‘**किं तावत्०**’–मग त्यांतील प्रथम कोणता पक्ष प्राप्त झाला? तीं यजमानाचीं कर्मे आहेत, हा पक्ष प्राप्त झाला. [–‘ **कुतः०** ’ इत्यादि भाष्यानें वादी त्याविषयीं प्रश्नद्वारा हेतु सांगतो–]=कोणत्या कारणानें? फलश्रुतीमुळें. [–‘ **फलं हि०** ’ इत्यादि भाष्यानें तो फलश्रुतिच विशद करितो–]= कारण “ जो हे असें जाणणारा वृष्टीमध्यें पंचविध सामाची उपासना करितो त्याच्या इच्छेप्रमाणें वृष्टि होते. किंबहुना तो मेघांकडून वृष्टि करवितो ”–छां. २. ३. २.–इत्यादि फल श्रुत आहे. [–पण श्रुत असलेलेंहि हें फल ऋत्विग्गामी कां नसेल? ‘ **तच्च०** ’ इत्यादि भाष्यानें उत्तर–]=आणि तें फल स्वामिगामी असणें न्याय्य आहे. [–त्याविषयीं हेतु–]=‘ **तस्य०** ’–कारण त्या स्वामीला सांग प्रयोगांत अधिकृतत्व आहे. [–उद्गीथादि-उपासनाविधींना प्राप्ताचें उद्देशनत्व आहे. क्रत्वधिकाऱ्याचीच प्राप्ति आहे. त्यामुळें त्याच्याच उद्देशनाचा संभव आहे. म्हणून तदाश्रित उपासनांना गोदोहनाप्रमाणें अधिकृताधिकारत्व आहे. म्हणून गोदोहनाच्या फलाप्रमाणें क्रत्वधिकाऱ्याचीच विद्याफलाशीं संगति आहे, असें वादी ‘**अधिकृत०**’ इत्यादि भाष्यानें सांगतो–]=आणि अशा जातीच्या कर्मांना अधिकृताधिकारत्व असतें. [–“ तथापि उपासनांना याजमानत्व–यजमानकर्तृ-

कत्व कसें ? " '**फलं च०**'इत्यादि भाष्यानें उत्तर–]=आणि "जो उपासना करितो त्याच्या इच्छेप्रमाणें मेघ वृष्टि करितो"–इत्यादि उपासनांचें फल कर्त्यामध्यें श्रुत आहे. [यजमानाला जर अकर्तृत्व असेल तर फलत्वहि त्याला नाहीं असें होईल. कारण कर्तृत्व व भोक्तृत्व यांना ऐकाधिकरण्य असतें, असा भावार्थ.–'यजमानगामी फल' या अर्थी '**ननु०**' इत्यादि भाष्यानें व्यभिचाराची शंका–]

**भाष्यं—ननु ऋत्विजोऽपि फलं दृष्टम् 'आत्मने वा यजमानाय वा यं कामं कामयते तमागायति' इति। न। तस्य वाचनिकत्वात्। तस्मात्स्वामिन एव फलवत्सूपासनेषु कर्तृत्वमित्यात्रेय आचार्यो मन्यते॥ ४४॥**

**भाष्यार्थ**—अहोपण, "आपल्यासाठीं किंवा यजमानासाठीं ज्या फलाची कामना करितो तें संपादन करितो"–बृ.१.३.२८–असें ऋत्विजाचेंहि फल दृष्ट आहे! [–उत्सर्गतः–सामान्य नियमानें यजमानाचेंच फल आहे. पण वचनामुळें क्वचित् त्याचा अपवादहि होतो, असें वादी '**न०**' इत्यादि भाष्यानें सांगतो–]=नाहीं, त्या फलाला वाचनिकत्व आहे, तें वचनानें प्राप्त आहे. [–पण अशा वाचनिक अपवादाच्या अभावीं उत्सर्गाची सिद्धि होते, असा '**तस्मात्०**' इत्यादि भाष्यानें उपसंहार–]=यास्तव फलवत् उपासनांमध्यें स्वामीलाच कर्तृत्व आहे, असें आत्रेय आचार्य मानितो.४४.[–'अंगोपास्तींना याजमानत्व असल्यामुळें स्वतंत्रफलता नाहीं' असा पूर्वपक्ष प्राप्त झाला असतां '**आर्त्विज्यं०**' इत्यादि सूत्रानें सिद्धान्त–]

**सूत्रं—आर्त्विज्यमित्यौडुलोमिस्तस्मै हि परिक्रीयते॥ ४५**

**सूत्रार्थ**—अंगोपासना 'आर्त्विज्यं'–ऋत्विक्कर्तृकच आहे, असें औडुलोमि-आचार्य मानितो. कारण सांगकर्मासाठीं ऋत्विक् यजमानाकडून परिक्रीत असतो.४५. –सु.ब्र.४१९–[–'**नैतद्०**' इत्यादि भाष्यानें सूत्रांतील प्रतिज्ञेचा विभाग करितात–]

**भाष्यं—नैतदस्ति स्वामिकर्माण्युपासनानीति। ऋत्विक्कर्माण्येतानि स्युरित्यौडुलोमिराचार्यो मन्यते। किं कारणं। तस्मै हि सांगाय कर्मणे यजमानेनर्त्विक्परिक्रीयते। तत्प्रयोगान्तःपातीनि चोद्गीथाद्युपासनान्यधिकृताधिकारत्वात्। तस्माद्गोदोहनादिनियमवदेव ऋत्विग्भिर्निर्वर्त्येरन्॥**

**भाष्यार्थ**—उपासनें हीं स्वामिकर्में आहेत, हें म्हणणें बरोबर नाहीं. 'हीं ऋत्विक्कर्में आहेत,' असें औडुलोमि-आचार्य मानितो. [–" पण अन्याला कर्तृत्व असतांना अन्याला फल कसें मिळेल !" अशी शंका–]='**किं कारणं**'–त्याचें काय कारण आहे ? [–सूत्रावयवानें उत्तर–]='**तस्मै हि०**'–कारण त्या सांग कर्मासाठीं यजमानाकडून ऋत्विक् परिक्रीत असतो. [–क्रीत म्ह० वरणानें स्वीकृत.

यजमानाकडून ऋत्विक् स्वगामिफलासाठीं वरणाच्या द्वारा–त्याला वरणी देऊन आपलासा करून घेतलेला असतो. त्यामुळें ऋत्विक्-कृत कर्माचें फल यजमानगामी असणें, यांत अनुपपत्ति कांहीं नाहीं.–" अहोपण सांग कर्मासाठीं ऋत्विजाला क्रीतत्व जरी असलें तरी ध्यानासाठीं क्रीतत्व नसल्यामुळें उपासनांना ऋत्विक्कर्मत्व कसें ?" 'तत्०' इत्यादि भाष्यानें उत्तर–]=आणि उद्गीथादि उपासनें त्या कर्माच्या अन्तःपाती–त्यांत अंतर्भूत होणारीं आहेत. कारण त्यांना अधिकृताधिकारत्व आहे. [–याप्रमाणें अंगोपासनांना अधिकृताधिकारत्व आहे, असें झालें असतां 'तस्मात्०' इत्यादि भाष्यानें फलित सांगतात–]=म्हणून गोदोहनादि-नियमाप्रमाणेंच अंगावबद्धोपासना ऋत्विजांकडून केल्या जातील. [–'तथा०' इत्यादि भाष्यानें त्यांच्या ऋत्विक्कर्मत्वाविषयीं श्रौतलिंग सांगतात–]

**भाष्यं—तथा च 'तं ह बको दाल्भ्यो विदांचकार स ह नैमिशीयानामुद्गाता बभूव' इत्युद्गातृकर्तृकतां विज्ञानस्य दर्शयति । यत्तूक्तं कर्त्राश्रयं फलं श्रूयत इति । नैष दोषः । परार्थत्वादृत्विजोऽन्यत्र वचनात्फलसंबंधानुपपत्तेः ॥ ४५ ॥**

**भाष्यार्थ**—आणि तसेंच "त्या प्राणादिदृष्टिविशिष्ट उद्गीथाख्य प्रणवाला 'बक' या नांवाचा, दल्भाचें अपत्य दाल्भ्य जाणता झाला व त्याला जाणून नैमिशीय सत्रवानांचा उद्गाता झाला," असें हें श्रौतलिंग विज्ञानाचें उद्गातृकर्तृकत्व दाखवितें. [–'यत्तु०' इत्यादि भाष्यानें पूर्वपक्षाच्या बीजाचा अनुवाद करितात–]=पण 'कर्त्राश्रय फल श्रुत आहे' असें जें सांगितलें आहे [–उत्सर्गतः फलाला याजमानत्व जरी असलें तरी वचनामुळें त्याचा अपवाद होतो, पण जेथें तसें अपवादवचन नसतें तेथें उत्सर्गस्थिति होते, असें 'नैषः०' इत्यादि भाष्यानें सांगतात–] =हा दोष येत नाहीं. कारण ऋत्विजाला परार्थत्व असल्यामुळें–ऋत्विक् यजमानासाठीं कर्म करीत असल्यामुळें प्रत्यक्ष वचनावांचून त्याच्या फलसंबंधाची अनुपपत्ति आहे. ४५. [–आणि याहि कारणानें उपासनांना ऋत्विक्कर्तृत्व व यजमानगामिफलत्व आहे, असें 'श्रुतेश्च' या सूत्रानें सांगतात–]

## सूत्रं—श्रुतेश्च ॥ ४६ ॥ (१३)

**सूत्रार्थ**—'यां वै कांचन०' या श्रुतीवरूनहि ऋत्विक्कर्तृक उपासनेचें फल यजमानाला प्राप्त होतें, असें अवगत होतें. ४६ (१३)–सु. ब्र. ४१९–[–'यां वै कांचन०' इत्यादि भाष्यानें सूत्राचें व्याख्यान–]

**भाष्यं—'यां वै कांचन यज्ञ ऋत्विज आशिषमाशासत इति यजमानायैव तामाशासत इति होवाच' इति । 'तस्मादु हैवंविदुद्गाता ब्रूयात्कं ते काममा-**

**गायानि ' इति च । ऋत्विक्कर्तृकस्य विज्ञानस्य यजमानगामि फलं दर्शयति । तस्मादंगोपासनानामृत्विक्कर्मत्वासिद्धिः ॥ ४६ ॥ (१३)**

**भाष्यार्थ**--" यज्ञांत ऋत्विज ज्या आशेची-कामाची आशा करितात- ती ते यजमानासाठींच इच्छितात, असें तो म्हणाला." म्हणून असें जाणणाऱ्या उद्गात्यानें ' मी तुझ्या कोणत्या कामाचें आगान करूं' असें यजमानास म्हणावें"-छां. १. ७. ८.-अशी श्रुति आहे. हें श्रुतिवचन ऋत्विक्कर्तृक विज्ञानाचें यजमानगामी फल दाखवितें. [-उत्सर्गतः व श्रुतिलिंगांनीं सिद्ध झालेल्या अर्थाचा **'तस्मात्०'** इत्यादि भाष्यानें उपसंहार करितात-]=म्हणून अंगोपासनांच्या ऋत्विक्कर्मत्वाची सिद्धि झाली. [आणि उपासनांचें ऋत्विक्कर्मत्व सिद्ध झालें असतां त्याच्या निर्धारणाच्या अनियमन्यायानें स्वतंत्रफलत्वाची सिद्धि होते, असा भावार्थ.]४६(१३)

## ( १४. सहकार्यन्तरविध्यधिकरण. सू. ४७-४९. )

-विधुरप्रभृति मंदाधिकाऱ्यांच्या ज्ञानसाधनोक्तिप्रसंगानें अंगोपासन या अधमज्ञानसाधनाचेंच अवधारण करून पुनः ' **सहकार्यन्तरविधिः०** ' इत्यादि सूत्रानें उत्तमच ज्ञानसाधन सांगण्यास आरंभ करितात —

### सूत्रं—सहकार्यंतरविधिः पक्षेण तृतीयं तद्वतो विध्यादिवत् ॥४७

**सूत्रार्थ**—फलसाक्षात्कारांत श्रवणादिकांच्या अपेक्षेनें 'दुसऱ्या सहकारीचा म्ह० निदिध्यासनसंज्ञक मौनाचा विधि स्वीकारावा.' श्रवणादिकांच्या अपेक्षेनें 'तिसरें' निदिध्यासनच येथें 'मौन' म्हणून विधेय आहे. ' तद्वतः '-परोक्ष ज्ञानवान् संन्याश्याला उद्देशून हा मौनविधि आहे. ' पक्षेण '-भेददर्शनपक्षीं त्याची प्राप्ति नाहीं, म्हणून तो विधि आवश्यकच आहे. ' विध्यादिवत् '-प्रधानविधीप्रमाणें. ४७-सु. ब्र. ४२१.-[-' **तस्मात्०** ' इत्यादि विषयवाक्य उदाहृत करितात-]

**भाष्यं—'तस्माद्ब्राह्मणः पांडित्यं निर्विद्य बाल्येन तिष्ठासेद्बाल्यं च पांडित्यं च निर्विद्याथ मुनिरमौनं च मौनं च निर्विद्याथ ब्राह्मणः ' इति बृहदारण्यके श्रूयते । तत्र संशयः । मौनं विधीयते न वेति ॥**

**भाष्यार्थ**—' तस्मात् '-"ज्याअर्थीं पूर्वींचे ब्राह्मण आत्म्याला जाणून एषणांपासून व्युत्थान करून भिक्षाचर्य करिते झाले त्याअर्थीं ' ब्राह्मणः '-आधुनिक ब्राह्मणानेंहि ' पांडित्यं '-पंडा म्ह० अध्ययनजन्य ब्रह्मबुद्धि, तिनें युक्त असलेला तो पंडित, त्याचें जें कृत्य-कर्तव्य तें पांडित्य म्ह० श्रवण तें **'निर्विद्य'-निश्चयानें प्राप्त करून घेऊन, 'बाल्येन'**-ज्ञानबलभावानें-युक्तितः असंभावनानिरसनरूप मननानें किंवा शुद्धबुद्धित्वानें 'तिष्ठासेत्'-राहण्याची इच्छा करावी.[-उक्तार्थाच्या दार्ढ्या-

साठीं बाल्यादिकांचा अनुवाद–]=**'बाल्यं०'**–बाल्य व पांडित्य यांना निश्चयानें प्राप्त होऊन–' अथ '–श्रवण-मननानंतर त्यानें ' मुनिः '–मननशील–निदिध्यासनपर व्हावें. ' अमौनं च'–मौनाहून अन्य जें बाल्य व पांडित्य 'मौनं च'–आणि निदिध्यासन त्यांना ' निर्विद्य '-निश्चयानें प्राप्त होऊन 'अथ ब्राह्मणः'–नंतर या उक्त तीन साधनांना ब्रह्मज्ञानहेतुत्व असल्यामुळें ' मी ब्रह्म आहें ' असें जाणतो म्हणून ब्राह्मण–ज्यानें ब्रह्माला साक्षात् जाणलें आहे असा तो होतो. "–बृ. ३.५.१. सु. उ.६२४–असें बृहदारण्यकांत श्रुत आहे. [–या वचनांत श्रुत असलेल्या मौनाला विषय करून मौनशब्दाचा सिद्ध पारिव्राज्य व साध्य ज्ञानाभ्यास या अर्थी प्रयोग प्रसिद्ध असल्यामुळें ' तत्र०' इत्यादि भाष्यानें संशय सांगतात–]=त्याविषयीं ' मौनाचें विधान केलें जातें कीं नाहीं ' असा संशय येतो. [ येथें निरुपाधिविद्येचें अंतरंग साधन जें मौन त्याच्या विधीची सिद्धि केलेली असल्यामुळें याच्या पादादिसंगति आहेत. पूर्वपक्षांत ' मौनाच्या अनुष्ठेयत्वाची असिद्धि ' व 'सिद्धान्तांत त्याच्या अनुष्ठेयत्वाची सिद्धि ' असें मानून ' तं ह बकः '–पृ.५८६–इत्यादि वाक्यशेषावरून ' अंगोपासन हें ऋत्विक्कर्म आहे ' हें जसें सिद्ध केलें त्याप्रमाणें ' अथ ब्राह्मणः ' या विधिहीन वाक्यशेषावरून ' अथ मुनिः ' हाहि विधि नव्हे, असा ' **न विधीयते०** ' इत्यादि भाष्यानें पूर्वपक्ष करितात–]

**भाष्यं—न विधीयत इति तावत्प्राप्तम् । बाल्येन तिष्ठासेदित्यत्रैव विधेरवसितत्वात् । न ह्यथ मुनिरित्यत्र विधायिका विभक्तिरुपलभ्यते । तस्मादयमनुवादो युक्तः ॥**

**भाष्यार्थ**–मौनाचें विधान केलें जात नाहीं, असें अगोदर प्राप्त झालें. [–"अहो-पण, 'बाल्येन तिष्ठासेत्' या उपक्रमांत विधिश्रुति असल्यामुळें मौनामध्येंहि विधि असो " ' **बाल्येन०** ' इत्यादि भाष्यानें याचें ' नाहीं ' असें उत्तर–]='बाल्यानें –मननानें राहण्याची इच्छा करावी ' या वाक्यांतच विधि परिसमाप्त झालेला असल्यामुळें मौनामध्यें विधि नाहीं. [–' **न हि०** ' इत्यादि भाष्यानें त्याचेंच उपपादन–]=कारण ' अथ मुनिः ' अशा या वचनांत विधायिका–विधान करणारी विभक्ति उपलब्ध होत नाहीं. [–जर मौनालाहि विधेयत्व असतें तर बाल्याप्रमाणें त्यांतहि विधि श्रुत असता, पण तो श्रुत नाहीं. यास्तव श्रोतव्यत्व असतांनाहि अश्रवण असल्यामुळें विधीच्या अभावाची सिद्धि होते, असा भावार्थ.–' तर मग मौनवाक्याची काय वाट ? ' ' **तस्मात्०** ' इत्यादि भाष्यानें उत्तर–]=म्हणून हा अनुवाद असणेंच युक्त आहे. [–" पण दुसऱ्या प्रमाणानें अधिगत–ज्ञात न

झालेल्या मौनाचा हा अनुवाद संभवत नाहीं. दुसऱ्या ठिकाणीं याच्या विधीची उपलब्धि होत नसल्यामुळे हा विधिच आहे'' अशी 'कुतः०' या भाष्यानें शंका-]

**भाष्यं--कुतः प्राप्तिरिति चेत् । मुनिपंडितशब्दयोः ज्ञानार्थत्वात्पांडित्यं निर्विद्येत्येव प्राप्तं मौनम् । अपि च ' अमौनं च मौनं च निर्विद्याथ ब्राह्मणः ' इत्यत्र तावन्न ब्राह्मणत्वं विधीयते प्रागेव प्राप्तत्वात् । तस्मादथ ब्राह्मणः इति प्रशंसावादः । तथैवाथ मुनिरित्यपि भवितुमर्हति समाननिर्देशत्वादिति ॥**

**भाष्यार्थ**—'पण मौनाची प्राप्ति कोठून होते?' असें जर विचाराल तर [-पांडित्याच्या विधानानेंच मौनहि सिद्ध झालें. कारण त्यालाच मौनत्व आहे, असें **'मुनि०'** इत्यादि भाष्यानें सांगतो-]=मुनि व पंडित या शब्दांना ज्ञानार्थत्व असल्यामुळें -त्यांचा ज्ञान हा अर्थ असल्यामुळें 'पांडित्यं निर्विद्य'-पांडित्याला-ज्ञानाला निश्चयानें संपादन करून, अशा या वचनानेंच मौन प्राप्त झालें. [-मुनि या शब्दाचा भिक्षु हा अर्थ आहे, असें जरी मानिलें तरी त्याचें अन्यत्र विधान केलेलें असल्यामुळें येथें अनुवादच आहे,असें मानून **'अपि च०'**इत्यादि भाष्यानें मौनाच्या अविधेयत्वाविषयीं हेत्वंतर सांगतो-]=शिवाय 'अमौन व मौन यांना निश्चयानें संपादन करून नंतर ब्राह्मण होतो '-पृ.५८८-अशा या वचनांत तर ब्राह्मणत्वाचें विधान केलें जात नाहींच. कारण त्याला पूर्वीच प्राप्तत्व आहे. [ एकवाक्यतेच्या अनुरोधामुळें मौन-वाक्यांतहि विधि नाहीं, असा भावार्थ. जेव्हां पांडित्यानें मौनाची प्राप्ति होते तेव्हां विधीयमान-विधान केल्या जाणाऱ्या बाल्याची अशी प्रशंसा होते-पांडित्य हें स्वरूपानें ज्ञान नाहीं तर बाल्याचें अनुष्ठान केलें असतां त्यानंतर 'मनन' हा ज्याचा दुसरा पर्यायशब्द आहे, असें पांडित्य केलें आहे, असें होईल. त्यामुळें बाल्य प्रशस्त आहे. जेव्हां दुसऱ्या विधीनें प्राप्त झालेल्या मौन या उत्तम आश्रमाचा हा अनुवाद असतो, तेव्हां केवल बाल्याचेंच अनुष्ठान करणारा उत्तम आश्रमित्वानें स्तुति केला जातो. त्यामुळें ही स्तुति व्यक्त आहे, असें मानून वादी-**'तस्मात्०'**इत्यादि भाष्यानें म्हणतो-]=म्हणून 'अथ ब्राह्मणः' हा प्रशंसावाद,अर्थवाद आहे. त्याचप्रमाणें 'अथ मुनिः' हाहि अर्थवादच असणें युक्त आहे.कारण त्या दोहोंचाहि समान-एकसारखाच निर्देश केलेला आहे, ' इति '-असें प्राप्त झालें. [-याप्रमाणें बाल्य व पांडित्य यांहून अतिरिक्त-भिन्न असलेल्या मौनाला अविधेयत्व असल्यामुळें तें मुमुक्षूला अनुष्ठेय-अनुष्ठान करण्यास योग्य नाहीं, अशा प्राप्त पक्षाचा ' **एवं०** ' इत्यादि भाष्यानें अनुवाद करून सिद्धान्त सांगतात-]

**भाष्यं---एवं प्राप्ते ब्रूमः — सहकार्यंतरविधिरिति। विद्यासहकारिणो मौनस्य बाल्यपांडित्यवद्विधिरेव आश्रयितव्यो अपूर्वत्वात्। ननु पांडित्यशब्देनैव मौनस्यावगतत्वमुक्तम्। नैष दोषः। मुनिशब्दस्य ज्ञानातिशयार्थत्वात्। मननान्मुनिरिति च व्युत्पत्तिसंभवात्। "मुनीनामप्यहं व्यासः" इति च प्रयोगदर्शनात्॥**

**भाष्यार्थ**---असें प्राप्त झालें असतां आम्ही ' सहकार्यन्तरविधिः '–हा दुसऱ्या विद्यासहकारीचा विधि आहे, असें सांगतों. बाल्य व पांडित्य यांप्रमाणें विद्येचें सहकारी–उपकारक साधन असें जें मौन त्याचा विधिच आश्रयणीय आहे, त्याचा हा विधिच मानणें उचित आहे. कारण त्याला अपूर्वत्व आहे. [–' **ननु०**' इत्यादि भाष्यानें अपूर्वत्व असिद्ध आहे, अशी शंका–]=अहोपण ' पांडित्य ' या शब्दानेंच मौनाचें अवगतत्व–ज्ञातत्व आम्हीं वर–पृ.५८९–सांगितलें आहे! [–'पंडित' या शब्दाचा ' केवल ज्ञान ' हा अर्थ आहे व ' मुनि ' हा शब्द ' ज्ञानाचा अतिशय ' या अर्थी प्रवृत्त होतो. त्यामुळें त्यांचा अर्थभेद आहे. म्हणून ' पंडित-' शब्दानें ' मुनि-'शब्दाला प्राप्तार्थत्व नाहीं, असें ' **नैषः०** ' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=हा दोष येत नाहीं. कारण ' मुनि-'शब्दाला ज्ञानातिशयार्थत्व आहे आणि ' मननामुळें मुनि ' अशी त्या शब्दाची व्युत्पत्ति संभवत असल्यामुळेंहि ' पंडित-'शब्दानें मुनिशब्दाला प्राप्तार्थत्व आहे, हा दोष येत नाहीं. [–"अहोपण, वृद्धांच्या प्रयोगाभावीं मुनिशब्दाला मननार्थत्व कसें ?" ' **मुनीनां०** ' इत्यादि भाष्यानें उत्तर–]=आणि ' मुनींतीलहि मी व्यास आहें '–भ. गी. १०. ३७.– असा वृद्धांचा प्रयोग उपलब्ध होत असल्यामुळें त्याला तदर्थत्व आहे. [–"अहोपण, आश्रम या अर्थीहि त्या शब्दाचा प्रयोग दिसत असल्यामुळें त्याचें ज्ञानातिशयवाचित्व अनियत आहे व त्या आश्रमाचें दुसऱ्या ठिकाणीं विधान असल्यामुळें येथील मौनशब्दाला अनुवादत्वच आहे" अशी '**ननु०**' इत्यादि भाष्यानें शंका–]

**भाष्यं—ननु मुनिशब्द उत्तमाश्रमवचनोऽपि श्रूयते ' गार्हस्थ्यमाचार्यकुलं मौनं वानप्रस्थम्' इत्यत्र। न।'वाल्मीकिर्मुनिपुंगवः' इत्यादिषु व्यभिचारदर्शनात्। इतराश्रमसंनिधानात्तु पारिशेष्यात्तत्रोत्तमाश्रमोपादानं । ज्ञानप्रधानत्वादुत्तमाश्रमस्य। तस्माद्बाल्यपांडित्यापेक्षया तृतीयमिदं मौनं ज्ञानातिशयरूपं विधीयते॥**

**भाष्यार्थ**—अहोपण, ' मुनि ' हा शब्द उत्तम आश्रमाचा वाचक म्हणूनहि श्रुत आहे. ' गार्हस्थ्यं, आचार्यकुलं, मौनं, वानप्रस्थं ' या वचनांत ' मौन-' शब्द संन्यासाश्रम या अर्थी पठित आहे. [–' पण उत्तम **आश्रम** या अर्थी ' मुनि ' हा शब्द असाधारण आहे कीं साधारण ? ' असा विकल्प **करून**

त्यांतील पहिल्या पक्षाचें निरसन–]=**'न'**–नाहीं. तो उत्तमाश्रम या अर्थी असाधारण नाहीं. कारण 'वाल्मीकिः मुनिपुंगवः' इत्यादि प्रयोगांत त्या अर्थाचा व्यभिचार होतो. [–पण एका शब्दाच्या अनेकार्थत्वाचा असंभव असल्यामुळें 'मुनि-'शब्दाचें साधारणत्व अयुक्त आहे, अशा अभिप्रायानें प्रयोगाची अन्यथासिद्धि **'इतराश्रम०'** इत्यादि भाष्यानें सांगतात–]=पण इतर आश्रमांच्या संनिधानामुळें पारिशेष्यानें त्यांत उत्तम आश्रमाचें ग्रहण केलें आहे. कारण उत्तम आश्रमाला ज्ञानप्रधानत्व आहे [–याप्रमाणें मौनाच्या अपूर्वत्वाचें उपपादन करून सूत्रांतील 'तृतीयं' या पदाचें व्याख्यान करणारे आचार्य **'तस्मात्०'** इत्यादि भाष्यानें फलित सांगतात–]=म्हणून बाल्य व पांडित्य यांच्या अपेक्षेनें हें तिसरें ज्ञानातिशयरूप मौन विहित आहे–त्याचें विधान केलें जातें. [–वाद्यानें वर–पृ. ५८९–'वाक्यभेदाचा प्रसंग येत असल्यामुळें एका ठिकाणींच विधि आहे' असें जें म्हटलें आहे' त्याविषयीं **'यत्तु०'** इत्यादि भाष्यानें म्हणतात–]

**भाष्यं––यत्तु बाल्य एव विधेः पर्यवसानमिति । तथाप्यपूर्वत्वान्मुनित्वस्य विधेयत्वमाश्रीयते मुनिः स्यादिति । निर्वेदनीयत्वनिर्देशादपि मौनस्य बाल्यपांडित्यवद्विधेयत्वाश्रयणम् । तद्वतो विद्यावतः संन्यासिनः । कथं च विद्यावतः संन्यासिन इत्यवगम्यते । तदधिकारात् । 'आत्मानं विदित्वा पुत्राद्येषणाभ्यो व्युत्थायाथ भिक्षाचर्यं चरन्ति' इति ॥**

**भाष्यार्थ**––पण 'बाल्यांतच विधीचें पर्यवसान–परिसमाप्ति होते,' असें जें म्हटलें आहे तें तसेंच जरी असलें तरी मुनित्वाला अपूर्वत्व असल्यामुळें 'मुनि व्हावें' असा त्याच्या विधेयत्वाचा आश्रय केला जातो. [–'उपरिधारण-' विधीप्रमाणें–पृ.५२७–मौन वाक्यभेदानें विधेय आहे, याविषयीं **'निर्वेदनीयत्व०'** इत्यादि भाष्यानें हेत्वंतर सांगतात–]=निर्वेदनीयत्वाचा–निश्चयानें प्राप्यत्वाचा निर्देश केलेला असल्यामुळेंहि बाल्य व पांडित्य यांप्रमाणें मौनाच्या विधेयत्वाचा आश्रय केला आहे. [–पण "कोणाचें हें मौन विद्यासहकारित्वानें विहित आहे?" **'तद्वतः०'** इत्यादि भाष्यानें उत्तर–]='तद्वानाचें'–विद्यावान् संन्याश्याचें हें मौन विहित आहे, त्याच्या मौनाचें विधान केलें जातें. [–**'कथं०'** इत्यादि भाष्यानें वादी विशेषणाचें प्रापक विचारितो–]=पण 'संन्यास' या विशेषणानें विशिष्ट अशा विद्यावानाच्या मौनाचें विधान केलें जातें, हें कसें अवगत होतें ? [–प्रकरण विशेषणप्रापक–विशेषण प्राप्त करून देणारें आहे, असें **'तदधिकारात्०'** इत्यादि भाष्यानें सांगतात–]=कारण "आत्म्याला

परोक्ष जाणून पुत्रादि एषणांपासून व्युत्थान पावून नंतर भिक्षाचर्य आचरितात" -पृ.५८७-असें हें संन्यासाचें प्रकरण आहे. [-'पक्षेण' हें सूत्रोक्त पद शंकेच्या उत्तरत्वानें 'ननु०' इत्यादि भाष्यानें प्रवृत्त करितात-]

**भाष्यं—ननु सति विद्यावत्त्वे प्राप्नोत्येव तत्रातिशयः । किं मौनविधिना । इत्यत आह— पक्षेणेति । एतदुक्तं भवति— यस्मिन्पक्षे भेददर्शनप्राबल्यान्न प्राप्नोति । तस्मिन्नेष विधिरिति । विध्यादिवत् । यथा "दर्शपूर्णमासाभ्यां स्वर्गकामो यजेत" इत्येवं जातीयके विध्यादौ सहकारित्वेन अग्न्यन्वाधानादिकमंगजातं विधीयते । एवमविधिप्रधानेऽप्यस्मिन्विद्यावाक्ये मौनविधिरित्यर्थः ॥४७॥**

**भाष्यार्थ**—" अहोपण, विद्यावत्त्व असलें म्हणजे त्यांत अतिशय प्राप्त होतोच. मग त्यासाठीं मौनाचें विधान काय करावयाचें आहे," असें वादी म्हणेल म्हणून सूत्रकार 'पक्षेण' असें सांगतात. [-'ब्रह्मच प्रत्यक् अद्वय वस्तु आहे, सर्व द्वैत अविद्यामय आहे' असें शास्त्र व युक्ति यांनीं सिद्ध झालें असतां त्याच्या साक्षात्काराच्या साधनाभ्यासामध्ये पुरुषाचें आपोआपच औन्मुख्य होतें-तो त्यांत स्वभावतःच प्रवृत्त होतो. त्यामुळें त्याविषयींचा विधि अनर्थक-व्यर्थ आहे' असा आक्षेप आला असतां 'संन्यासाचें प्रकरण असल्यामुळे त्याचा धर्म असें जें श्रवणादि त्याच्या साक्षात्कारहेतुत्वाला अपूर्वत्व असल्यामुळें त्याच्या विधीची इच्छा करणें अवश्य आहे-त्याचा विधि एष्टव्य आहे' असें त्याचे समाधान आहे.-"अहोपण, विद्यवान्-अधिकारिविशेषासाठीं विधि व्यर्थ आहे." अशी आशंका घेऊन 'विद्यावतः' या पदानें 'विद्यातिशयानें युक्त असलेला पुरुष' सांगितला जात नाहीं, तर 'विद्येचा उदय होण्यासाठीं तिच्या उपायाभ्यासांत प्रवृत्त झालेला जिज्ञासु' सांगितला जातो. त्यामुळें एका पक्षीं कदाचित् भेददर्शनाची प्राप्ति होते. म्हणून विधीला अर्थवत्त्व आहे, असें सूत्रपदाचें **'एतत्०'** इत्यादि भाष्यानें विवरण-]='पक्षेण' या पदानें हें सांगितलें आहे, असें होतें, त्याचें तात्पर्य असें आहे-ज्या पक्षामध्यें भेददर्शनाच्या प्राबल्यामुळें मौन प्राप्त होत नाहीं त्यापक्षीं हा विधि आहे, असें 'पक्षेण' या पदानें सांगितलें आहे. [-तन्निष्ठ नसलेल्या वाक्याच्या तद्विधायकत्वाविषयीं सूत्रोक्त दृष्टान्त-]='विध्यादिकांप्रमाणें' [-'**यथा०**' इत्यादि भाष्यानें त्याचेंच व्याख्यान-]=ज्याप्रमाणें 'ज्याला स्वर्गाची इच्छा असेल त्यानें दर्श-पूर्णमासांनीं याग करावा' या अशा प्रकारच्या विधींच्या आदीमध्यें-मुख्यांत-प्रधानांत सहकारित्वानें अग्नीच्या अन्वाधानादि अंगजाताचें विधान केलें जातें, ['विध्यादि' येथील 'आदि' म्ह०

मुख्य, प्रधान; विधीचा जो आदि-मुख्य-प्रधान तो विध्यादि-दर्श-पूर्णमासविधि, पण ' समिदादि ' हा विधीचा अंत आहे, ज्यांत विधि श्रुत नाहीं अशाहि त्या विध्यादींत विधि स्वीकारावा, असा भावार्थ.-'एवं० ' इत्यादि भाष्यानें दृष्टान्तस्थ अर्थाची दार्ष्टान्तिकांत योजना करितात-]=त्याप्रमाणें अविधिप्रधान असलेल्याहि या विद्यावाक्यांत मौनविधि आहे, असा भावार्थ. ४७. [-' बाल्यादिप्रधान संन्यास जर अनुष्ठेय आहे तर श्रुति गार्हस्थ्यानें उपसंहार का करिते ? ' असें अनंतर-या पुढील सूत्राचें व्यावर्त्य 'एवं०' इत्यादि भाष्यानें वादी सांगतो—]

**भाष्यं—एवं बाल्यादिविशिष्टे कैवल्याश्रमे श्रुतिमति विद्यमाने कस्माच्छान्दोग्ये गृहिणोपसंहारः 'अभिसमावृत्य कुटुंबे ' इत्यत्र । तेन ह्युपसंहरंस्तद्विषयमादरं दर्शयतीति । अत उत्तरं पठति—**

**भाष्यार्थ**—याप्रमाणें बाल्यादिविशिष्ट श्रुतिमान् कैवल्याश्रम जर विद्यमान आहे तर छान्दोग्यांत ' अभिसमावृत्य कुटुंबे '-"अभिसमावर्तन करून कुटुंबांत-गृहस्थाश्रमांत अध्ययनादि धर्माचरण करीत रहावें "-छां. ८.१५.१.-या वाक्यामध्यें गृहस्थाश्रमानें उपसंहार का केला आहे ? [-"अहोपण, तेथें गृहस्थाश्रमानें जरी उपसंहार केला आहे तरी त्यामुळें कैवल्याश्रमाचें काय झालें" अशी आशंका घेऊन ' त्याला अनास्थाविषयत्व प्राप्त झालें' असें वादी 'तेन०' इत्यादि भाष्यानें सांगतो-]=कारण त्या गृहस्थाश्रमानें उपसंहार करणारा वेद त्याविषयीं आदर दाखवितो, असें प्राप्त झालें. [-पुष्कळ आयासानें साध्य असलेल्या धर्मांच्या बाहुल्यामुळें गृहस्थाश्रमानें तेथें उपसंहार केला आहे, त्या आश्रमानेंच अनुष्ठानाची परिसमाप्ति होते, म्हणून त्यानें उपसंहार केलेला नाहीं, असें ' अतः० ' इत्यादि भाष्यानें सांगतात-]=यास्तव ' कृत्स्नभावात्तु० ' इत्यादि सूत्रानें पढतात—

## सूत्रं—कृत्स्नभावात्तु गृहिणोपसंहारः ॥ ४८

**सूत्रार्थ**—पण गृहस्थाश्रमांत यज्ञादिकांच्या किंवा आश्रमान्तरविहित शमादिकांच्या 'कृत्स्नभावामुळें'-त्यांची त्यांत पूर्णता असल्यामुळें गृहस्थाश्रमानें उपसंहार केला आहे.४८.-सु.ब्र.४४८-[-'तुशब्दः०' इत्यादि भाष्यानें सूत्राचें व्याख्यान-]

**भाष्यं—तु-शब्दो विशेषणार्थः । कृत्स्नभावोऽस्य विशिष्यते । बहुलायासानि हि बहून्याश्रमकर्माणि यज्ञादीनि तं प्रति कर्तव्यतयोपदिष्टानि । आश्रमान्तरकर्माणि च यथासंभवमहिंसेंद्रियसंयमादीनि तस्य विद्यन्ते । तस्मात् गृहमेधिनोपसंहारो न विरुध्यते ॥ ४८ ॥**

**भाष्यार्थ**—सूत्रांतील ‘ तु ’ हा शब्द विशेषणासाठीं आहे. त्या शब्दानें गृहस्थाचा कृत्स्नभाव—पूर्णपणा विशेषणविशिष्ट केला जातो. त्या गृहस्थाला उद्देशून पुष्कळ आयासांनीं युक्त अशीं यज्ञादि पुष्कळ आश्रमकर्में कर्तव्यत्वानें सांगितलेलीं आहेत. [—“ अहोपण, जशीं गृहस्थाचीं यज्ञादि कर्में कर्तव्यत्वानें सांगितलेलीं आहेत तशींच आश्रमान्तरांचींहि इंद्रियनिग्रहादि कर्मान्तरें सांगितलीं जातात. तेव्हां या गृहस्थामध्येंच विशेष काय आहे ? ” **‘आश्रमान्तर०’** इत्यादि भाष्यानें उत्तर—]=आणि त्याचीं—गृहस्थाचीं अहिंसा-इंद्रियसंयमादि आश्रमान्तर कर्मेंहि यथासंभव विद्यमान आहेत. [—गृहस्थामध्यें अशा विशेषाची सिद्धि झाली असतां **‘तस्मात्०’** इत्यादि भाष्यानें फलित सांगतात—]=त्यामुळें गृहस्थाश्रमानें उपसंहार विरुद्ध होत नाहीं. ४८. [—मौन व गार्हस्थ्य अशा दोन आश्रमांच्या उक्तीमुळें इतर आश्रमांच्या अभावाची शंका कोणाला येईल, म्हणून तिच्या निरसनासाठीं सूत्रकार **‘ मौनवत्० ’** इत्यादि भाष्यानें म्हणतात—]

## सूत्रं—मौनवदितरेषामप्युपदेशात् ॥ ४९ ॥ (१४)

**सूत्रार्थ**—‘ मौनाप्रमाणें ’—मौन व गार्हस्थ्य यांना जसें श्रुतिमत्त्व आहे त्याप्रमाणें ‘ इतरांचाहि ’—ब्रह्मचर्य व वानप्रस्थ यांचाहि श्रुतीमध्यें उपदेश असल्यामुळें प्रसंगानें चार आश्रम सांगितले आहेत. ४९. (१४)—सु. ब्र. ४२२. [—**‘यथा०’** इत्यादि भाष्यानें सूत्राचें व्याख्यान—]

**भाष्यं—यथा मौनं गार्हस्थ्यं चैतावाश्रमौ श्रुतिमन्तौ। एवमितरावपि वानप्रस्थगुरुकुलवासौ। दर्शिता हि पुरस्तात् श्रुतिः— ‘तप एव द्वितीयो ब्रह्मचार्याचार्यकुलवासी तृतीयः’ इत्याद्या। तस्माच्चतुर्णामप्याश्रमाणां उपदेशाविशेषात्तुल्यवद्विकल्पसमुच्चयाभ्यां प्रतिपत्तिः। इतरेषामिति द्वयोराश्रमयोर्बहुवचनं वृत्तिभेदापेक्षयाऽनुष्ठातृभेदापेक्षया वेति द्रष्टव्यम् ॥ ४९ ॥ ( १४ )**

**भाष्यार्थ**—ज्याप्रमाणें मौन व गार्हस्थ्य हे दोन आश्रम श्रुतिमान्—श्रुतिप्रमाणानें सिद्ध आहेत तसेच इतर—वानप्रस्थ व गुरुकुलवास हे दोन आश्रमहि श्रुतिमान् आहेत. [—‘ त्यांना श्रुतिमत्त्व कसें आहे ? ’ **‘ दर्शिता० ’** इत्यादि भाष्यानें उत्तर—]=कारण “ तप हाच दुसरा आश्रम, ब्रह्मचारी—आचार्यकुलवासी हा तिसरा ”—पृ. ९२१—इत्यादि श्रुति पूर्वी प्रदर्शित केलीच आहे. [—याप्रमाणें श्रुतिमत्त्वाचा अविशेष आहे, असें झालें असतां **‘ तस्मात्० ’** इत्यादि भाष्यानें फलित सांगतात—]=यास्तव चारी आश्रमांचा उपदेश अविशेष—समान असल्यामुळें त्यांची समुच्चय व विकल्प यांच्या योगानें एकसारखीच प्रतिपत्ति—प्राप्ति होते.

[ ब्रह्मचर्यापासून गार्हस्थ्य, गार्हस्थ्यापासून वानप्रस्थ व वानप्रस्थापासून संन्यास हा आश्रमांचा समुच्चय व ब्रह्मचर्यापासून किंवा गृहस्थाश्रमापासून संन्यास हा विकल्प होय. –" अहोपण, सूत्रांत 'इतरेषां' असें बहुवचन असल्यामुळें गार्हस्थ्याचाहि परामर्श होतो. पण त्याचा सिद्धवत्–सिद्ध असल्याप्रमाणेंच उपन्यास केलेला नाहीं." अशी आशंका घेऊन 'इतरेषां०' इत्यादि भाष्यानें म्हणतात–]=दोन आश्रमांमध्यें 'इतरांचा' असें जें बहुवचन योजिलें आहे तें त्या दोन आश्रमांच्याच वृत्तिभेदाच्या अपेक्षेनें किंवा अनुष्ठातृभेदाच्या अपेक्षेनें आहे, असें समजावें. [ब्रह्मचारी, गृहस्थ, इत्यादि चार आश्रमांचे प्रत्येकीं चार चार असे त्यांच्या धर्मविशेषांनीं युक्त असलेले सोळा आश्रमभेद श्रुति-स्मृतिप्रसिद्ध आहेत. त्यामुळें ब्रह्मचारी व वानप्रस्थ

---

१ रत्नप्रभा—आश्रमांच्या अवान्तर भेदांच्या अपेक्षेनें 'आश्रमाणां' असें येथें बहुवचन योजिलें आहे. म्हणून काण्वायनस्मृतीचें येथें अनुक्रमण केलें जातें– " गायत्र, ब्राह्म, प्राजापत्य व बृहन् असा ब्रह्मचारी चार प्रकारचा आहे. त्यांतील जो उपनयनानंतर त्रिरात्र अक्षार-अलवणाशी गायत्रीचें अध्ययन करितो तो गायत्र; जो वेदाचें ग्रहण होईपर्यंत ब्रह्मचर्य आचरितो तो ब्राह्म; जो ऋतुकालीं स्वदारगामी व नित्य परस्त्रीविमुख तो प्राजापत्य; किंवा एक संवत्सर वेदव्रत करणारा बटु हा प्राजापत्य व मरणपर्यंत गुरुकुलवासी नैष्ठिक बृहन् म्हटला जातो. गृहस्थहि चार प्रकारचा आहे. वार्ताक, यायावर, शालीन व घोरसंन्यसिक. त्यांतील कृषि-गोरक्षादि वैश्यवृत्तीनें निर्वाह करून आपल्या नित्यादि कर्मामध्यें तत्पर असलेला जो गृहस्थ तो वार्ताकवृत्ति, जो अयाचितवृत्ति असून याजन-अध्यापन-प्रतिग्रहविमुख असतो तो यायावर; जो षट्कर्मामध्यें निरत असलेला, याजनादि वृत्ति करणारा व धनसंचय करणारा तो शालीन, व जो उद्धृत–परिपूत जलानें स्नानादिकार्यें करणारा प्रत्यहीं उञ्छवृत्तीवर निर्वाह करणारा ग्रामवासी गृहस्थ तो घोरसंन्यासिक म्हटला जातो. कारण तो हिंसाविमुख असतो. वानप्रस्थहि चार प्रकारचा आहे. वैखानस, औदुंबर, वालखिल्य व फेनप. त्यांतील जो गांवाच्या बाहेर झालेल्या अकृष्टपच्य औषधींनीं अग्निहोत्रादि करणारा तो वैखानस, जो सकाळीं उठून ज्या दिशेला पहातो, त्यांतील औदुंबर, बदरी, नीवार व श्यामाक यांनीं कर्मपर असतो तो औदुंबर; जो जटा-वल्कलधारी आठ महिने वृत्तीचें उपार्जन करून चातुर्मास्यांत संग्रह केलेल्या पुष्प-फलादिकांचा आहार करणारा, कार्तिकी पौर्णिमस संगृहीत पुष्प-फलांचा त्याग करणारा, तो वालखिल्य; गळून पडलेलीं पानें व फळें यांवर निर्वाह करून कोठेंहि राहून कर्मपरायण असलेला फेनप होय. तसेच संन्यासीहि चार प्रकारचे आहेत. कुटीचक, बहूदक, हंस व परमहंस.

यांतील अनुष्ठान करणारांचे भेद किंवा अनुष्ठानांचा भेद यांच्या अपेक्षेनें **'इतरेषां'** ही बहूक्ति आहे. ती गार्हस्थ्याच्या अपेक्षेनें नाहीं. कारण त्याचें पूर्वींच असंदिग्धत्वानें कथन केलेलें आहे, असा भावार्थ.–सु. ब्र. ४२२-२३ ] ४९ ( १४ )

**( १५. अनाविष्काराधिकरण. सू. ५०. )**

–बाल्याच्या विधेयत्वाचा स्वीकार करून अवान्तरवाक्यभेदानें मौनहि विधेयत्वामुळें मुमुक्षूनें करावें, असें सांगितलें. आतां तें बाल्य काय आहे, हें सांगण्याच्या इच्छेनें ' **अनाविष्कुर्वन्०** ' इत्यादि सूत्रानें म्हणतात—

**सूत्रं—अनाविष्कुर्वन्नन्वयात् ॥ ५० ॥ ( १५ )**

**सूत्रार्थ**—' अव्यक्तलिंगः० ' इत्यादि श्रुति असल्यामुळें ' आपले गुण प्रकट न करणें ' इत्यादिकांच्या द्वारा आपल्याला प्रख्यात न करितां भावशुद्ध व्हावें, एवढ्याचेंच विधान केलें जातें. कारण भावशुद्धीचाच प्रधान ज्ञानाभ्यासाशीं 'अन्वय' –संबंध होतो. ५० ( १५ )–सु. ब्र. ४२४. [–' **तस्मात्०** ' इत्यादि वाक्यानें अनुष्ठेयत्वानें श्रुत असलेल्या बाल्याचा विषयत्वानें उल्लेख करितात–]

**भाष्यं**—' **तस्माद्ब्राह्मणः पांडित्यं निर्विद्य बाल्येन तिष्ठासेत्** ' **इति बाल्यमनुष्ठेयतया श्रूयते । तत्र बालस्य भावः कर्म वा बाल्यमिति तद्धिते सति । बालभावस्य वयोविशेषस्येच्छया संपादयितुमशक्यत्वात् यथोपपादमूत्रपुरीषत्वादि बालचरितं । अंतर्गता वा भावविशुद्धिरप्ररूढेंद्रियत्वं दंभदर्पादिरहितत्वं वा बाल्यं स्यादिति संशयः ॥**

**भाष्यार्थ**—" तस्मात् ब्राह्मणानें पांडित्य निश्चयानें संपादन करून बाल्यानें राहण्याची इच्छा करावी "–पृ. ५८७–असें बाल्य अनुष्ठेयत्वानें श्रुत आहे. **'तत्र'** –त्यांतील बाल्याविषयीं असा संशय येतो. [–संशयाचें कारण–]=**'बालस्य भावः०'** –बालाचा भाव किंवा बालाचें कर्म हें बाल्य, असा तद्धित प्रत्यय केला असतां [–" तर मग बालभाव म्ह० वयोविशेषहि कल्पावा," अशी आशंका घेऊन त्याचें ग्रहण न करण्याविषयीं ' **बालभावस्य०** ' इत्यादि भाष्यानें हेतु सांगतात–]

---

त्यांतील जे स्वपुत्राच्या गृहांत भिक्षा करणारे ते कुटीचक,त्रिदंडी-शिक्य-जलपवित्र-पादुका-आसन-शिखा-यज्ञोपवीत-कौपीन-काषायवेषधर, तिर्थाटन करणारे, भैक्ष आचरणारे व आत्म्याची प्रार्थना करणारे ते बहुदक होत.एकदंडी,शिखावर्ज यज्ञोपवीत धारण करणारे, ज्यांच्या हातांत शिक्य व कमंडलु आहे असे, ग्रामांत एक रात्र वास करणारे कृच्छ्र-चांद्रायणपरायण ते हंस. एकदंडधर, मुंड, अयज्ञोपवीती, सर्वकर्मत्यागी व आत्मनिष्ठ परमहंस होत.

=कारण वयोविशेष-वयाचा एक भेद, या स्वरूपाचा बालभाव इच्छेनें संपादन करितां येणें अशक्य आहे. यास्तव [-'ताद्धित-'श्रुतीनें वयोविशेषातिरिक्त बाल्याचा आश्रय करून '**यथा०**' इत्यादि भाष्यानें संशयाचा अभिनय करितात-]=जसा उभा असेल तसाच-उभ्यानें मूत्र-पुरीषादिकांचा विसर्ग करणें इत्यादि बालचरित हें बाल्य आहे कीं अन्तर्गतभावशुद्धि, अप्ररूढइंद्रियत्व किंवा दंभादिरहितत्व हें बाल्य आहे, असा संशय येतो. [बाल्यशब्दाच्या अर्थाचें विवेचन करून स्वतंत्र पुरुषार्थहेतु विद्येच्या अंतरंगाचेंच येथेंहि निरूपण केलेलें असल्यामुळें याच्या पादादिसंगति आहेत. पूर्वपक्षांत 'विद्वानाचें तिष्ठन्मूत्रत्वादिहि अनुष्ठेय सिद्ध होतें.' व सिद्धान्तांत 'बाल्याला म्ह० अप्ररूढ-इंद्रियत्वादिरूप भावशुद्धीला अनुष्ठेयत्व असल्यामुळें विद्वानाच्या यथेष्टाचरणाची सिद्धि होत नाहीं' असा फलभेद मानून -'**किं तावत्०**' इत्यादि भाष्यानें प्रश्नपूर्वक पूर्वपक्ष सांगतात-]

**भाष्यं--किं तावत्प्राप्तं । कामचारवादभक्षणता यथोपपादमूत्रपुरीषत्वं च प्रसिद्धतरं लोके बाल्यमिति तद्ग्रहणं युक्तम् । ननु पतितत्वादिदोषप्राप्तेर्न युक्तं कामचारताद्याश्रयणम् । न । विद्यावतः संन्यासिनो वचनसामर्थ्याद्दोषनिवृत्तेः । पशुहिंसादिष्विवेति ॥**

**भाष्यार्थ**--तर मग अगोदर त्यांतील कोणता पक्ष प्राप्त झाला ? 'कामचार-वाद-भक्षता'-यथेष्ट आचरण, यथेष्ट भाषण, यथेष्ट भक्षण, यांचा भाव-कामचारत्व, कामवादत्व व कामभक्षत्व व 'यथोपपादमूत्रपुरीषत्वं'-यथासंभव, ज्या कोठेंहि मनांत येईल तसें व तेथें ज्याचें मूत्र-पुरीष होतें तो यथोपपादमूत्रपुरीष, त्याचा भाव-यथोपपादमूत्रपुरीषत्व [-त्याविषयीं लोकप्रसिद्धि हा हेतु सांगतात-] =हें व्यवहारांत अतिशय प्रसिद्ध बाल्य आहे. यास्तव येथें त्याचेंच ग्रहण करणें युक्त आहे. [-"अहोपण, शास्त्रान्तरविरोधामुळें या वर सांगितलेल्या प्रकारच्या बाल्याला अविधेयत्व आहे," अशी '**ननु०**' इत्यादि भाष्यानें शंका-]="अहो-पण, पतितत्वादिदोषप्राप्ति होत असल्यामुळें कामचारतादिकांचा आश्रय करणें युक्त नाहीं." ['पतितत्वादि' येथील 'आदि-'शब्दानें शिष्टांच्या निंदेचें ग्रहण केलें जातें. पण यावर वादी-'विशेषविधीमुळें त्या सामान्यशास्त्राचा संकोच होईल' असें '**न०**' इत्यादि भाष्यानें सांगतो-]=नाहीं, तसा दोष येत नाहीं. **कारण** वचनसामर्थ्यामुळें विद्यावान् संन्याश्याच्या दोषाची निवृत्ति होते. [-सामान्य-विधीचा विशेषविधीनें संकोच होतो, याविषयीं दृष्टान्त-]='**पशु०**'-विधिप्राप्त पशु-हिंसादिकांमध्यें सामान्यहिंसानिषेधाचा संकोच जसा होतो त्याप्रमाणें, 'इति' असा

पूर्वपक्ष प्राप्त होतो. [–विद्वानाच्या यथेष्ट आचरणांतहि दोष नाहीं, अशा प्राप्त पूर्वपक्षाचा ‘ **एवं०** ’ इत्यादि भाष्यानें अनुवाद करून सिद्धान्त सांगतात–]

**भाष्यं—एवं प्राप्तेऽभिधीयते–न । वचनस्य गत्यन्तरसंभवात् । अविरुद्धे ह्यन्यस्मिन्बाल्यशब्दाभिलप्ये लभ्यमाने न विध्यन्तरव्याघातकल्पना युक्ता । प्रधानोपकाराय चांगं विधीयते । ज्ञानाभ्यासश्च प्रधानमिह यतीनामनुष्ठेयम् । न च सकलायां बालचर्यायां अंगीक्रियमाणायां ज्ञानाभ्यासः संभाव्यते । तस्मादांतरो भावविशेषो बालस्य अप्ररूढेंद्रियत्वादिरिह बाल्यमाश्रीयते ॥**

**भाष्यार्थ**—असें प्राप्त झालें असतां सिद्धान्त सांगितला जातो. ‘ **न** ’ –विद्वानाची यथेष्ट चेष्टा शास्त्रान्तरविरोधामुळें विधेय नाहीं, [ अशी ही प्रतिज्ञा केली आहे.–“अहोपण, ‘बाल्येन तिष्ठासेत्’ या वाक्यामुळें सामान्यशास्त्राचा संकोच सांगितला आहे,” अशी आशंका घेऊन सिद्धान्ती म्हणतात–]=‘**वचनस्य०**’–कारण या वचनाचें गत्यन्तर संभवतें. [–सामान्यत: प्रवृत्त झालेल्या विधिशास्त्राचा अविरुद्ध अर्थ संभवत असतांना तद्विरुद्ध अर्थाची कल्पना संभवत नसल्यामुळें कामचारादि विधेय नाहीं, हें पूर्वोक्तच व्यक्त करितात–]=‘**अविरुद्धे०**’–कारण बाल्य या शब्दानें वाच्य असा दुसराच अविरुद्ध अर्थ प्राप्त होत असतांना विध्यन्तराची व्याघातकल्पना युक्त नाहीं. [–याहि कारणानें कामचारादि विधेय नाहीं, असें ‘**प्रधान०**’ इत्यादि भाष्यानें सांगतात–]=आणि प्रधानाच्या उपकारासाठीं अंगाचें विधान केलें जातें. [–‘ ज्याच्या अंगत्वानें बाल्यादिकांचें विधान केलें जातें तें प्रधान काय आहे ? ’ ‘ **ज्ञानाभ्यासश्च०** ’ इत्यादि भाष्यानें उत्तर–]=आणि ज्ञानाभ्यास हें येथें यतींचें प्रधान अनुष्ठेय आहे. [याप्रमाणें उक्त प्रधानोपकारित्वाचा अभाव असल्यामुळें कामचारादि विधेय नाहीं, असें सांगितलें. आतां–त्याच्या विरोधित्वामुळेंहि तें अविधेय आहे, असें ‘ **न च०** ’ इत्यादि भाष्यानें सांगतात–]=आणि सकल बालचर्येचा अंगीकार केला गेल्यास ज्ञानाभ्यासहि संभवत नाहीं. [–‘ तर मग येथें कोणतें बाल्य विधेय आहे ? ’ ‘ **तस्मात्०** ’ इत्यादि भाष्यानें उत्तर–] =वास्तव बालाचा आन्तर-चित्तांतील भावविशेष, अप्ररूढ-इंद्रियत्वादि ह्याच बाल्याचा या प्रकृत वाक्यांत आश्रय केला जातो. [–‘ **तदाह०** ’ इत्यादि भाष्यानें सूत्राचें ग्रहण करून उक्त अर्थी त्याची योजना करितात–]

**भाष्यं—तदाह–अनाविष्कुर्वन्निति । ज्ञानाध्ययनधार्मिकत्वादिभिः आत्मानमविख्यापयन्दंभदर्पादिरहितो भवेत् । यथा बालोऽप्ररूढेंद्रियतया न परेषामात्मानमाविष्कर्तुमीहते तद्वत् ॥**

**भाष्यार्थ**—' अनाविष्कुर्वन् अन्वयात्' या सूत्रानें तेंच सांगतात—ज्ञान, अध्ययन, धार्मिकत्व इत्यादिकांनीं स्वतःला विख्यापित न करणारा असा होत्साता दंभदर्पादिकांनीं रहित व्हावें. [—" अहोपण, या पूर्वोक्त अर्थीं बाल्यशब्दाचा प्रयोग कसा केला जातो ? " ' **यथा०** ' इत्यादि भाष्यानें उत्तर—]=ज्याप्रमाणें बाल अप्ररूढ-इंद्रियत्वामुळें दुसऱ्यांच्या समोर आपलें आविष्करण करण्याची इच्छा करीत नाहीं, त्याप्रमाणें या विद्वानानें इतरांपुढें आपलें आविष्करण करूं नये. [—'**एवं हि०**' इत्यादि भाष्यानें सूत्रांतील'अन्वयात्'या पदाचें व्याख्यान करितात-]

**भाष्यं—एवं ह्यस्य वाक्यस्य प्रधानोपकार्यर्थानुगम उपपद्यते । तथा चोक्तं स्मृतिकारैः-" यं न सन्तं न चासन्तं नाश्रुतं न बहुश्रुतम् । न सुवृत्तं न दुर्वृत्तं वेद कश्चित्स ब्राह्मणः । गूढधर्माश्रितो विद्वानज्ञातचरितं चरेत् । अंधवज्जडवच्चापि मूकवच्च महीं चरेत् " " अव्यक्तलिंगोऽव्यक्ताचारः " इति चैवमादि ॥ ५० ॥ ( १५ )**

**भाष्यार्थ**—कारण असें मानिल्यानेंच या वाक्याच्या प्रधानोपकारी अर्थाचा अनुगम—अन्वय उपपन्न होतो. [—अप्ररूढ-इंद्रियत्वादिरूप भावशुद्धिलक्षण बाल्याच्या प्रधानोपकारित्वाविषयीं '**तथा च०**' इत्यादि भाष्यानें प्रमाण सांगतात—]=आणि तसेंच स्मृतिकारांनीं सांगितलें आहे—"ज्याला कोणीहि सन्त समजत नाहीं व असंत समजत नाहीं,अश्रुत समजत नाहीं व बहुश्रुत समजत नाहीं, सुवृत्त जाणत नाहीं व दुर्वृत्त जाणत नाहीं, तो ब्राह्मण होय. " [ कुलीनत्वप्रकटन हेंच सत्त्व व अकुलीनत्व प्रकट करणें हें असत्त्व, शास्त्रार्थज्ञानराहित्य हेंच अश्रुतत्व व शास्त्रार्थयुक्तत्व हें बहुश्रुतत्व, सदाचारनिरतत्व हें सुवृत्तत्व व दुराचारनिष्ठत्व हें दुर्वृत्तत्व, असा यांचा भेद आहे.—"तर मग काय, आतां ब्रह्मज्ञानाला योग्य असलेल्या मुमुक्षूला कांहींच अनुष्ठेय नाहीं ? " ' **गूढ०** ' इत्यादि वचनानें उत्तर—]=गूढ धर्माचा आश्रय केलेल्या विद्वानानें अज्ञातचरित—कोणाच्या प्रत्ययास न येईल, असें आचरण करावें. अंधाप्रमाणें पृथ्वीवर संचार करावा. [ चक्षुरिंद्रियाच्या पारवश्याचें निरसन करण्यासाठीं ' अंधवत्'—अंधाप्रमाणें, असें म्हटलें आहे.—रसनादि पारवश्याचें निरसन—]=' जडवत् '—जडाप्रमाणें, [—ज्ञानेंद्रियपारवश्याचें निरसन करून कर्मेंद्रियपारवश्याचा परिहार करितात—]=व 'मूकवत्'—मुक्याप्रमाणें पृथ्वीवर संचार करावा आणि 'अव्यक्तलिंग, अव्यक्ताचार' इत्यादि उक्त आहे. [मी मोठा धार्मिक आहें, असें बाह्य वेषादिकांनीं प्रकट न करणें, हेंच अव्यक्तलिंगत्व आहे.

यास्तव याप्रमाणें ज्याचीं सर्व इंद्रियें उपरत झालीं आहेत अशा श्रवणादितत्पर मुमुक्षूचें मोक्षसाधन तत्त्वज्ञान अवश्यंभावी आहे, असा भावार्थ.]५०(१५).

( १६. ऐहिकाधिकरण. सू. ५१. )

—बाल्यापर्यंत उच्च-निच विद्यासाधनें सांगून त्यांच्या फलभूत विद्योत्पत्तीच्या कालाचें निरूपण 'ऐहिकं०' इत्यादि सूत्रानें करितात—

**सूत्रं—ऐहिकमप्यप्रस्तुतप्रतिबंधे तद्दर्शनात्** ॥ ५१ ॥ ( १६ )

**सूत्रार्थ**—'अप्रस्तुतप्रतिबंध असल्यास'–ज्याचें फल विद्येच्या विरुद्ध आहे, असें फलोन्मुख झालेलें कर्म हाच प्रस्तुत प्रतिबंध, तो विद्यमान नसल्यास 'याच जन्मींहि' श्रवणादिकांच्या योगानें विद्येची उत्पत्ति होते. पण प्रस्तुत प्रतिबंध असल्यास परलोकींहि ज्ञान होतें. कारण 'गर्भ एव०' इत्यादि श्रुतींत तशा नियमाचें दर्शन होतें.५१. (१६)–सु.ब्र.४२६–[–'उक्त हेतूंच्या अधीन असलेल्या ज्ञानाचा जन्म' हा विषय, त्याविषयीं कार्तियादिकांचें ऐहिक फल व चित्रादिकांचें पारलौकिक फल, असें दोन्ही प्रकारचें फल उपलब्ध होत असल्यामुळें **'सर्वापेक्षा च०'** इत्यादि भाष्यानें गतार्थानुवादपूर्वक संशय सांगतात–]

**भाष्यं—'सर्वापेक्षा च यज्ञादिश्रुतेरश्ववत्' इत्यत आरभ्य उच्चावचं विद्यासाधनमवधारितम् । तत्फलं विद्या सिध्यन्ती किमिहैव जन्मनि सिध्यत्युत कदाचिदमुत्रापीति चिंत्यते । किं तावत्प्राप्तम् । इहैवेति । किं कारणम् । श्रवणादिपूर्विका हि विद्या ॥**

**भाष्यार्थ**—'सर्वापेक्षा च यज्ञादिश्रुतेः अश्ववत्'–"विद्येला स्वोत्पत्तीसाठीं सर्व आश्रमकर्मांची अपेक्षा आहे. यज्ञादिश्रुति असल्यामुळें, अश्वाप्रमाणें"–पृ.५४८–या सर्वापेक्षाधिकरणापासून आरंभ करून उच्चावच–उत्तमाधम विद्यासाधनांचें अवधारण केलें. त्यांचें फल अशी जी सिद्ध होणारी विद्या ती काय याच जन्मीं सिद्ध होते कीं कदाचित् परलोकींहि सिद्ध होते, याचा विचार केला जातो. [प्रतिबंधशून्य श्रवणादि सामग्री ही विशिष्ट ज्ञानाची प्रसवभूमि–उत्पत्तिस्थान–साधन आहे, असें येथें सांगितलेलें असल्यामुळें याच्या पादादिसंगति आहेत. पूर्वपक्षांत 'श्रवणादिकांच्या विद्योपायत्वनियमाची असिद्धि' व सिद्धान्तांत 'प्रतिबंधाभावाच्या अपेक्षेनें त्यांच्या तन्नियमाची सिद्धि' असा फलभेद मानून **'किं तावत्०'** इत्यादि भाष्यानें प्रश्नपूर्वक ऐहिकत्वनियम हा पूर्वपक्ष सांगतात–]=मग अगोदर कोणता पक्ष प्राप्त झाला? 'येथेंच विद्यासिद्धि होते' असें प्राप्त झालें. [–'फलाच्या द्विविधत्वाची उपलब्धि होत असल्यामुळें ऐहिक विद्योत्पत्तीच्या नियमाविषयीं

कांहीं हेतु नाहीं' अशी शंका-]=पण अशा या नियमाचें कारण काय? [-'**श्रवणादि०**' इत्यादि भाष्यानें वादी त्याचें कारण सांगतो-]=कारण विद्या श्रवणादिपूर्विका आहे, श्रवणादिकारणांपासून ती उत्पन्न होते. [-"अहोपण, चित्रादिकांप्रमाणें श्रवणादिकाला पारलौकिक विद्याहेतुत्वहि असेल?" अशी आशंका घेऊन वादी '**न च०**' इत्यादि म्हणतो-]

**भाष्यं—न च कश्चिदमुत्र मे विद्या जायतां इत्यभिसंधाय श्रवणादिषु प्रवर्तते। समान एव तु जन्मनि विद्याजन्म अभिसंधायैतेषु प्रवर्तमानो दृश्यते। यज्ञादीन्यपि श्रवणादिद्वारेणैव विद्यां जनयन्ति। प्रमाणजन्यत्वाद्विद्यायाः। तस्मादैहिकमेव विद्याजन्मेति ॥**

**भाष्यार्थ**—आणि कोणीहि साधक 'परलोकीं मला ज्ञान व्हावें' असा संकल्प करून श्रवणादि-साधनांमध्यें प्रवृत्त होत नाहीं. [-"तर मग त्या साधनांमध्यें त्याची प्रवृत्ति कशी होते?" अशी आशंका घेऊन वादी श्रवणादिकांचें कारीर्यादितुल्यत्व सांगतो-]=पण समानच-याच जन्मांत आपल्याला ज्ञान व्हावें, अशा संकल्पानें तो त्यांमध्यें प्रवृत्त होत असलेला दिसतो. [श्रवणादिकांना चक्षुरादिकांप्रमाणें ज्ञानसाधनत्व असल्यामुळें कालांतरीं होणाऱ्या घटाच्या उपलब्धीसाठीं जसा कोणी आपला नेत्र उघडीत नाहीं, त्याप्रमाणें जन्मान्तरांत होणाऱ्या विद्येसाठीं श्रवणादिकांमध्यें प्रवृत्ति संभवत नाहीं. शिवाय प्रत्यक्ष अनुभवास येणाऱ्या संसारदुःखाच्या निवृत्तीसाठीं विद्येच्या श्रवणादिसाधनांचें ग्रहण केलें जात असल्यामुळें कारीर्यादिकांप्रमाणें याच जन्मांत विद्योपत्ति होते, असा भावार्थ. -"अहोपण, ज्यांचें फल जन्मांतरीं मिळतें अशा यज्ञादिकांना ज्ञानहेतुत्व आहे, हें विविदिषावाक्यानें सिद्ध होत असल्यामुळें जन्मान्तरीं ज्ञानोत्पत्ति होते" अशी आशंका घेऊन '**यज्ञादीनि०**' इत्यादि भाष्यानें वादी म्हणतो-]=यज्ञादिकहि श्रवणादिकांच्या द्वाराच विद्येला उत्पन्न करितात. कारण विद्येला प्रमाणजन्यत्व आहे. [त्यांना चित्तशुद्धीनें श्रवणादिघटकत्व असल्यामुळें श्रवणादिकांशीं संबद्ध झालेल्या त्यांच्या ठिकाणीं ज्ञानानें अवश्य झालें पाहिजे, त्यामुळें ज्ञानाच्या ऐहिकत्वाचा नियम आहे, असा भावार्थ.-याप्रमाणें श्रवणादिकांना कारीर्यादितुल्यत्व आहे, असें झालें असतां वादी '**तस्मात्०**' इत्यादि भाष्यानें फलित सांगतो-]=त्यामुळें या जन्मींच विद्येचा उदय होतो, असें प्राप्त झालें. [-श्रवणादिकांचें अनुष्ठान केलेलें असूनहि जर या जन्मीं विद्या उत्पन्न होत नसेल तर त्यांना विद्येचें उपायत्वच

नाहीं, अशा प्राप्त झालेल्या पक्षाचा 'एवं०' इत्यादि भाष्यानें अनुवाद करून 'तें चित्रेष्टीप्रमाणें अनियतफल ज्ञानाचें साधन आहे,' असा सिद्धान्त सांगतात–]

**भाष्यं—एवं प्राप्ते वदामः–ऐहिकं विद्याजन्म भवत्यसति प्रस्तुतप्रतिबंध इति। एतदुक्तं भवति—यदा प्रक्रान्तस्य विद्यासाधनस्य कश्चित्प्रतिबंधो न क्रियते उपस्थितविपाकेन कर्मान्तरेण। तदेहैव विद्योत्पद्यते। यदा तु खलु तत्प्रतिबंधः क्रियते तदामुत्रेति। उपस्थितविपाकत्वं च कर्मणो देशकालनिमित्तोपनिपाताद्भवति ॥**

**भाष्यार्थ**—असा पूर्वपक्ष प्राप्त झाला असतां "प्रस्तुत प्रतिबंध नसल्यास या जन्मीं विद्येचा उदय होतो" असें आम्ही सांगतों. [–"अहोपण, श्रवणादिकांचें अनुष्ठान केलेलें असूनहि जर याच जन्मीं विद्या उत्पन्न न झाली तर श्रवणादिकांना विद्यासाधनत्व नाहीं, असें होईल!" अशी आशंका घेऊन '**एतदुक्तं०**' इत्यादि भाष्यानें म्हणतात–]=यावरून हें सांगितलें आहे–याचा भावार्थ असा आहे–आरंभिलेल्या विद्यासाधनाला ज्याचा विपाक–परिणाम उपस्थित झाला आहे अशा कर्मान्तराकडून जर कोणत्याहि प्रकारचा प्रतिबंध केला जात नसेल तर याच जन्मीं विद्या उत्पन्न होईल. पण जेव्हां खरोखर त्या फलोन्मुख झालेल्या कर्माकडून उपक्रान्त विद्यासाधनाला प्रतिबंध केला जातो तेव्हां विद्या 'अमुत्र'–परलोकीं उत्पन्न होते, असें सिद्धान्ताचें तात्पर्य आहे. [श्रवणादिक केलेलें असूनहि जर याच जन्मीं विद्येचा उदय होत नसेल तर कारीर्यादिकांप्रमाणें कांहीं प्रबल प्रतिबंध किंवा श्रवणादिकांच्या बाहुल्याचा अभाव कल्पावा लागतो. कारण प्रतिबंधशून्य सामग्रीच कार्याचा हेतु होते. पण तेवढ्यानें त्यांच्या हेतुत्वाचीच हानि होत नाहीं, असा भावार्थ. –"अहोपण ज्याचा विपाक–परिणाम–फल उपस्थित–समीपवर्ती आहे, अशा श्रवणादिकांच्या योगानें कर्मालाच प्रतिबंध होतो" अशी आशंका घेऊन '**उपस्थितविपाकत्वं च०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=आणि कर्माचें उपस्थितविपाकत्व–फलोन्मुखत्व देश-काल-निमित्तांच्या उपनिपातामुळें–आनुकूल्यामुळें होतें.[–" अहोपण, त्याच देशादिकांकडून श्रवणादि कर्म विद्येसाठींच कां विपक्व केलें जात नाहीं, विद्येकरितांच तें फलोन्मुख कां केलें जात नाहीं?" '**यानि०**' इत्यादि भाष्यानें उत्तर–]

**भाष्यं—यानि चैकस्य कर्मणो विपाचकानि देशकालनिमित्तानि तान्येव अन्यस्यापीति न नियंतुं शक्यते। यतो विरुद्धफलान्यपि कर्माणि भवन्ति। शास्त्रमप्यस्य कर्मण इदं फलमित्येतावति पर्यवसितं। न देशकालनिमित्तवि-**

**शेषमपि संकीर्तयति । साधनवीर्यविशेषात्तु अतींद्रिया कस्यचिच्छक्तिराविर्भवति । तत्प्रतिबद्धा परस्य तिष्ठति ॥**

**भाष्यार्थ**--आणि जीं एका कर्माचा-विपाक करणारीं देश-काल-निमित्तें असतात तींच अन्य कर्माचींहि विपाचक असतात, असा नियम करितां येणें शक्य नाहीं. [-भोगार्थ कर्म व ज्ञानार्थ श्रवणादि यांचीं देश-काल-निमित्तें एकरूप नसतात, याविषयीं '**यतः०**' इत्यादि भाष्यानें हेतु सांगतात-]=कारण परस्पर विरुद्ध फल देणारींहि कर्मे असतात. [-" अहोपण, कर्माच्या योगानें श्रवणादिकांना प्रतिबंध झाला असतां 'त्यांपासून विद्योत्पत्ति होते,' असें सांगणारें शास्त्र व्याहत होईल " अशी आशंका घेऊन '**शास्त्रं अपि०**' इत्यादि भाष्यानें समाधान सांगतात-]=आणि शास्त्रहि 'या कर्माचें हें फल आहे' इतकें सांगण्यामध्यें पर्यवसित-परिसमाप्त होतें. तें देश-काल-निमित्तविशेषाचेंहि संकीर्तन -कथन करीत नाहीं. [-"तथापि कर्मालाच प्रतिबंधकत्व आहे, श्रवणादिकांना कर्मप्रतिबंधकत्व नाहीं, असा नियम कशावरून केला जातो ?" '**साधन०**' इत्यादि भाष्यानें उत्तर-]=पण साधनाच्या सामर्थ्यविशेषामुळें एखाद्याची एखादी अतींद्रिय शक्ति प्रकट होते व दुसऱ्याची ती प्रतिबद्ध होऊन राहते. [-'पण येथें विद्येचा उदय न झाल्यास कारीर्यादिकांप्रमाणें प्रतिबंधादिकांच्या अस्तित्वाची कल्पना करून ज्ञानाचें पारलौकिकत्व कल्पिणें अयुक्त आहे. कारण येथेंच मला ज्ञान व्हावें, अशी साधकाची अभिसंधि उपलब्ध होते' असें जें वर-पृ. ६०१-म्हटलें आहे, त्याविषयीं '**न च०**' इत्यादि भाष्यानें म्हणतात-]

**भाष्यं**--**न चाविशेषेण विद्यायामभिसंधिर्नोत्पद्यते इहामुत्र वा मे विद्या जायतामिति । अभिसंधेर्निरंकुशत्वात् । श्रवणादिद्वारेणापि विद्योत्पद्यमाना प्रतिबंधक्षयापेक्षयैवोत्पद्यते । तथा च श्रुतिर्दुर्बोधत्वमात्मनो दर्शयति-'श्रवणायापि बहुभिर्यो न लभ्यः शृण्वन्तोऽपि बहवो यं न विद्युः । आश्चर्यो वक्ता कुशलोऽस्य लब्धाश्चर्यो ज्ञाता कुशलानुशिष्टः' इति ॥**

**भाष्यार्थ**--'मला या लोकीं किंवा परलोकीं विद्या प्राप्त होवो' अशी अविशेषानें विद्येविषयीं अभिसंधि उत्पन्न होत नाहीं, असें नाहीं.[-कारण प्रत्यक्ष अनुभवास येणाऱ्या संसारदुःखाला अनेकजन्मगामित्व आहे, असें जाणणाऱ्या पुरुषाची आतांच किंवा पुढें केव्हांतरी अनर्थाची निवृत्ति व्हावी, अशी अभिसंधि साधनसामर्थ्याच्या अनुसार होणें शक्य आहे, असें '**अभिसंधेः०**' या भाष्यानें सांगतात-]=कारण अभिसंधीला निरंकुशत्व आहे, तिच्याविषयीं कांहीं विशेष

नियम नाहीं. [—आतां 'श्रवणादिसाधनांना चक्षुरादिसाधनांप्रमाणें दृष्टफलत्व आहे' असें जें म्हटलें आहे—पृ. ६०१.—त्याविषयीं 'श्रवणादि०' इत्यादि भाष्यानें सांगतात—]=श्रवणादिकांच्या द्वाराहि उत्पन्न होणारी विद्या प्रतिबंधक्षयाच्या अपेक्षेनेंच उत्पन्न होते. [त्यांचें विधान केलेलें असल्यामुळें अवघातादिकांप्रमाणें अदृष्टाच्या द्वाराहि त्यांचें साधनत्व अवगत झालें आहे व ज्यांच्या फलाचा काल अनियत आहे, अशा यज्ञादिकांच्या ज्ञानसाधनत्वाचा विधि असल्यामुळें विद्योत्पत्तीला अनियतत्व आहे, असा भावार्थ.—' पण यज्ञादिकांना घटकत्व असल्यामुळें घटित श्रवणादिकांमध्यें विद्या अवश्यंभाविनी आहे, ' असें जें म्हटलें आहे—पृ. ६०१.—त्याविषयीं 'प्रतिबंधाचें सत्त्व श्रौतलिंगसिद्ध असल्यामुळें श्रवणादिकांत विद्या अवश्यंभाविनी नाहीं, ' असें सांगतात—]=आणि त्याचप्रमाणें 'श्रवणायापि०' इत्यादि श्रुति आत्म्याचें दुर्बोधत्व सांगते. [—पुष्कळांना आत्म्याचें श्रवणहि दुष्कर आहे, असें ' **श्रवणाय०** ' इत्यादि अंशानें श्रुति सांगते—]="जो आत्मा पुष्कळांना नुस्ता श्रवण करावयासहि मिळण्यासारखा नाहीं. [—पण यथाकथंचित् श्रवण जरी झालें तरी त्याचें फल—ज्ञान दुर्लभ आहे, असें '**शृण्वन्तः०**' या भागानें सांगते—]=श्रवण करणारेहि पुष्कळ ज्या आत्म्याला जाणत नाहींत, [—' **आश्चर्यः०** ' इत्यादि भागानें त्याविषयीं हेतु—]=कारण या आत्म्याचा यथावत् वक्ता आश्चर्यकारक —एखाद्या अद्भुत पदार्थासारखाच आहे. उत्तम आचार्याची प्राप्ति जरी झाली तरी त्याच्यापासून आत्मश्रवण करून त्याला साक्षात् जाणणारा—त्याचा लब्धाहि आश्चर्यकारक आहे—साक्षात्कार राहूं दे, पण कुशल आचार्याकडून अनुशिष्ट—उपदेश केला गेलेला असा जरी एखादा असला तरी शास्त्रावरून आत्म्याला परोक्ष जाणणारा पुरुषहि आश्चर्यकारकच आहे." का. १.२.७.—[—आतां '**गर्भस्थः०**' इत्यादि भाष्यानें ज्ञानाच्या पारलौकिकत्वाविषयीं लिंग सांगतात—]

**भाष्यं—गर्भस्थ एव च वामदेवः प्रतिपेदे ब्रह्मभावमिति वदन्ती जन्मान्तरसंचितात्साधनाज्जन्मान्तरे विद्योत्पत्तिं दर्शयति । न हि गर्भस्थस्यैवैहिकं किंचित्साधनं संभाव्यते ॥**

**भाष्यार्थ**—'गर्भस्थच वामदेव ब्रह्मभावास प्राप्त झाला' असें सांगणारी श्रुति जन्मान्तरसंचित साधनापासून जन्मान्तरीं विद्योत्पत्ति दाखविते. [—"पण कोणत्या अनुपपत्तीमुळें श्रुति हाच अर्थ दाखविते ?" '**न हि०**' इत्यादि भाष्यानें उत्तर—] =कारण गर्भामध्यें स्थित असलेल्याच वामदेवाचें ऐहिक—या जन्मांतील कांहीं

साधन संभवत नाहीं. [–जन्मान्तरसंचित साधन जन्मान्तरींहि ज्ञान साधितें, याविषयीं ‘ **स्मृतावपि०** ’ इत्यादि भाष्यानें स्मृति सांगतात–]

**भाष्यं—स्मृतावपि– “ अप्राप्य योगसंसिद्धिं कां गतिं कृष्ण गच्छति ” इत्यर्जुनेन पृष्टो भगवान्वासुदेवः “न हि कल्याणकृत्कश्चिद्दुर्गतिं तात गच्छति” इत्युक्त्वा । पुनस्तस्य पुण्यलोकप्राप्तिं साधुकुले संभूतिं चाभिधाय, अनंतरं “तत्र तं बुद्धिसंयोगं लभते पौर्वदेहिकम् ” इत्यादिना “ अनेकजन्मसंसिद्धस्ततो याति परां गतिम् ” इत्यंतेन एतदेव दर्शयति । तस्मादैहिकमामुष्मिकं वा विद्याजन्म प्रतिबंधक्षयापेक्षयेति स्थितम् ॥५१॥ (१६)**

**भाष्यार्थ**––स्मृतींतहि “ हे कृष्णा, तो योगभ्रष्ट योगफलाला–ज्ञानसिद्धीला प्राप्त न होतां कोणत्या गतीला जातो ? ”–भ. गी. ६. ३७–असें अर्जुनाकडून विचारले गेलेले भगवान् वासुदेव, “ अरे बाबा, कोणीहि कल्याणाचरण करणारा दुर्गतीला प्राप्त होत नाहीं. ”–भ.गी.६.४०–असें सांगून पुनः त्याची पुण्यलोकप्राप्ति व साधुकुलांतील उत्पत्ति सांगून त्यानंतर लागलेंच “त्या जन्मांत तो योगभ्रष्ट पूर्वदेहांतील त्या बुद्धिसंयोगास प्राप्त होतो. ”–भ. गी. ६.४३–येथून आरंभ करून “याप्रमाणें अनेक जन्मांतील अभ्यासानें सिद्ध–ज्ञानी झालेला तो त्या योगसंसिद्धीमुळें मोक्षाख्य परागतीला प्राप्त होतो. ”–गी. भा. ५९९-६०७.–येथपर्यंतच्या ग्रंथानें हेंच दाखवितात. [–याप्रमाणें श्रवणादि-साधनांना पुष्कलत्व–आधिक्य जरी असलें तरी श्रुति-स्मृतिलिंगांवरून पश्वादि फल देणाऱ्या चित्रादि-इष्टीप्रमाणें त्यांच्या फलाचें अनियतकालत्व सिद्ध होत असल्यामुळें त्यांना व्यभिचारिफलत्व नाहीं, असा ‘**तस्मात्०**’ इत्यादि भाष्यानें उपसंहार–]=म्हणून प्रतिबंधक्षयाच्या अपेक्षेनें ऐहिक–या जन्मीं किंवा परलोकीं विद्येची उत्पत्ति होते, असे सिद्ध झालें.५१(१६)

( १७. **मुक्तिफलानियमाधिकरण. सू.** ५२. )

––विद्यारूप फलामध्यें कालोत्कर्ष व कालाचा अपकर्ष यांमुळें होणारा विशेष नियम प्रदर्शित केला. आतां ‘ **एवं०** ’ इत्यादि सूत्रानें विद्येचें फल जो मोक्ष त्यांत कोणत्याहि विशेष नियमाचा अभाव दाखवितात––

**सूत्रं––एवं मुक्तिफलानियमस्तदवस्थावधृतेस्तदवस्थावधृतेः॥५२॥(१७)**

**सूत्रार्थ**––‘ एवं ’–विद्येप्रमाणें ‘ मुक्तिरूप फलाचा अनियम आहे ’–तिच्या स्वरूपांत कांहीं विशेष नाहीं. ‘कारण सर्व श्रुतींत मुक्ति-अवस्थेचा निर्विशेष ब्रह्मस्वरूपत्वानें निश्चय केला आहे.’ ‘ तदवस्थावधृतेः ’ या पदाची आवृत्ति अध्यायसमाप्ति सुचविते. ५२ ( १७ )–सु.ब्र.४२७–[–‘विद्येचें फल मुक्ति’ हा या अधि-

करणाचा विषय आहे. ' फल दोन्ही प्रकारें दिसत असल्यामुळें ती मुक्ति विद्ये-प्रमाणें उत्कर्ष-अपकर्षकृत विशेषानें युक्त आहे कीं नाहीं, ' असा संशय आला असतां येथें प्रकृत विद्याफलाचें निरतिशयत्व प्रसंगानें सांगितलेलें असल्यामुळें याच्या पादादिसंगति आहेत. पूर्वपक्षांत ' मोक्ष कर्मसाध्य असल्यामुळें पुरुषार्था-धिकरणाची-पृ.४९६-असिद्धि ' व सिद्धान्तांत ' त्याला केवल ज्ञानानेंच साध्यत्व असल्यामुळें त्याची सिद्धि' अशा अभिप्रायानें '**यथा०**' इत्यादि भाष्यानें पूर्वपक्ष-]

**भाष्यं—यथा मुमुक्षोर्विद्यासाधनावलंबिनः साधनवीर्यविशेषाद्विद्यालक्षणे फले ऐहिकामुष्मिकफलत्वकृतो विशेषप्रतिनियमो दृष्टः। एवं मुक्तिलक्षणेऽप्युत्कर्षापकर्षकृतः कश्चिद्विशेषप्रतिनियमः स्यादित्याशंक्याह् । एवं मुक्तिफलानियम इति । न खलु मुक्तिफले कश्चिदेवंभूतो विशेषप्रतिनियम आशंकितव्यः ॥**

**भाष्यार्थ**—ज्याप्रमाणें विद्यासाधनाचा अवलंब-आश्रय करणाऱ्या मुमुक्षूचा साधनसामर्थ्याच्या विशेषामुळें विद्यालक्षण फलामध्यें ऐहिक-आमुष्मिक फलत्वकृत विशेषप्रतिनियम दृष्ट आहे, साधनसामर्थ्याच्या न्यूनाधिकतेमुळें विद्योत्पत्ति या जन्मीं होणें किंवा उत्तर जन्मीं होणें, या कारणानें प्रत्येकामध्यें विशेष नियम उपलब्ध झालेला आहे तसा मुक्तिलक्षण फलामध्येंहि उत्कर्ष व अपकर्ष, यांमुळें कांहीं विशेष प्रतिनियम असेल अशी आशंका घेऊन सूत्रकार ' मुक्तिफलाविषयीं तसा कांहीं नियम नाहीं' असें सांगतात. [-' मुक्ति उपचय-उत्कर्ष व अपचय -अपकर्ष यांनीं युक्त आहे. कारण तिला फलत्व आहे. विद्येप्रमाणें' असें अनुमान होत असल्यामुळें तिला कर्मसाध्यत्व आहे, ती कर्मानें साध्य होणारी आहे, असें अवगत होतें. त्यामुळें या पादाचें पहिलें पुरुषार्थाधिकरण अयुक्त आहे,-अशी आशंका घेऊन ' **न खलु०** ' इत्यादि भाष्यानें सिद्धान्ताला अवतरण देऊन सूत्रां-तील प्रतिज्ञेचा विभाग करितात-]=खरोखर 'मुक्ति' या फलांत अशा प्रकारच्या कोणत्याहि एखाद्या विशेष प्रतिनियमाची आशंका घेणें उचित नाहीं. [-" अहो-पण, वर सांगितलेलें अनुमान विद्यमान असतांना आशंका निरवकाश कशी? " अशी ' **कुतः०** ' इत्यादि भाष्यानें शंका-]

**भाष्यं—कुतः। तदवस्थावधृतेः। मुक्त्यवस्था हि सर्ववेदान्तेष्वेकरूपैवावधार्यते। ब्रह्मैव हि मुक्त्यवस्था। न च ब्रह्मणोऽनेकाकारयोगोऽस्ति। एकलिंगत्वावधारणात् ' अस्थूलमनणु ' ' स एष नेति नेत्यात्मा ' ' यत्र नान्यत्पश्यति ' ' ब्रह्मैवेदममृतं पुरस्तात् ' ' इदं सर्वं यदयमात्मा ' ' स वा एष महानज**

**आत्माजरोऽमरोऽमृतोऽभयो ब्रह्म ' ' यत्र त्वस्य सर्वमात्मैवाभूत्तत्केन कं पश्येत् ' इत्यादिश्रुतिभ्यः ॥**

**भाष्यार्थ**—कोणत्या कारणानें अशी आशंका करूं नये, म्हणून म्हणतां ? [–मुक्तिस्वरूप ब्रह्माच्या एकरूपत्वाचें अवधारण करणाऱ्या शास्त्राशीं विरोध येत असल्यामुळें वरील अनुमान होत नाहीं, असें मानून सूत्रावयवाचें ग्रहण करून त्याचें व्याख्यान–]=' **तदवस्थावधृतेः०** '–त्या अवस्थेचें अवधारण केलेलें असल्यामुळें, कारण मुक्ति ही अवस्था सर्व वेदान्तांमध्यें एकरूपच निश्चित केली जाते. [–"अहोपण, मुक्ति म्हणून जर एखादी अवस्था विद्यमान असेल तर अद्वितीयत्वाच्या विरोधामुळें, अवस्थात्व या कारणानें जाग्रदवस्थेप्रमाणें तीहि निवृत्तिमतीच असेल " अशी आशंका घेऊन ' **ब्रह्मैव०** ' इत्यादि भाष्यानें म्हणतात–]=कारण ब्रह्मच मुक्ति-अवस्था आहे. [–"पण तेवढ्यानें मुक्तीला उत्कर्ष-अपकर्षकृत विशेष-राहित्य कसें ? " ' **न च०**' इत्यादि उत्तर–]=आणि ब्रह्माच्या अनेक आकारांचा योग नाहीं, ब्रह्माला अनेकरूपत्व नाहीं. [–' न स्थानतोऽपि० '–पृ. १४०. –या अधिकरणांत ' **अस्थूलं०** ' इत्यादि श्रुतीनें ब्रह्माच्या निर्विशेषत्वाचें निरूपण केलें आहे, असें ' **एकलिंग०**' इत्यादि भाष्यानें स्मरण देतात–]=कारण ब्रह्माच्या एकलिंगत्वाचें अवधारण केलेलें आहे. " अस्थूल, अनणु०"–बृ. ३. ८.८.–"तो हा नेति नेति आत्मा "–बृ. ३. ९. २६.–" ज्या विद्यावस्थेंत अन्य कांहीं पहात नाहीं. "–छां. ७. २४. १–" हें अमृत ब्रह्मच पूर्वदिशेत आहे "–मुं. २.२.११. –" हें सर्व हा आत्माच आहे "–बृ. २. ४. ६.–" तो हा महान् अज आत्मा अजर, अमर, अमृत, अभय ब्रह्म आहे. "–बृ. ४. ४. २५.–" पण ज्या विद्यावस्थेंत सर्व याचा आत्माच झाला त्या अवस्थेंत तो कोणत्या साधनानें कोणता विषय पहाणार ? "–बृ. ४. ५. १५.–इत्यादि श्रुतींवरून ब्रह्माच्या एकलिंगत्वाचा निश्चय झालेला आहे. [–आणि याहि कारणानें मुक्तीला निरतिशयत्व आहे, असें ' **अपि च०** ' इत्यादि भाष्यानें सांगतात–]

**भाष्यं–अपि च विद्यासाधनं स्ववीर्यविशेषात्स्वफल एव विद्यायां कंचिदतिशयमासंजयेन्न विद्याफले मुक्तौ। तद्ध्यसाध्यं नित्यसिद्धस्वभावमेव। विद्ययाधिगम्यत इत्यसकृदवादिष्म। न च तस्यामप्युत्कर्षनिकर्षात्मकोऽतिशय उपपद्यते। निकृष्टाया विद्यात्वाभावात्। उत्कृष्टैव हि विद्या भवति। तस्मात्तस्यां चिराचिरोत्पत्तिरूपोऽतिशयो भवन्भवेत् ॥**

**भाष्यार्थ**—शिवाय विद्यासाधन स्ववीर्यविशेषामुळें आपलें फल जी विद्या तिच्यामध्येंच कांहीं अतिशय–आधिक्य आसक्त–उत्पन्न करील. [–"काष्ठांचा उपचय व अपचय यांच्या योगानें ज्वालांचा उपचय व अपचय झालेला दिसतो. त्याच न्यायानें विद्येच्या अन्तरंग-बहिरंग अभ्यासादि-साधनांच्या उपचयापचयांनीं विद्येंतील उपचयापचयांचा संभव असल्यामुळें विद्येचें फल जी मुक्ति तिच्यामध्यें ते–उपचयापचय होतील," अशी आशंका घेऊन **'न विद्याफले०'** इत्यादि भाष्यानें हेत्वंतर विशद करितात–]=विद्येचें फल जी मुक्ति तिच्यामध्यें तें कोणत्याहि प्रकारचा अतिशय आसक्त करणार नाहीं. [–"अहोपण, सातिशया विद्याच आपल्या साध्य फलामध्यें कांहीं अतिशयाचें आधान करील" अशी आशंका घेऊन **'तद्धि०'** इत्यादि भाष्यानें सांगतात–]=कारण तें विद्याफल असाध्य–नित्यसिद्धस्वभावच आहे. [–" तर मग विद्यार्थी मुमुक्षूंची त्यासाठीं प्रवृत्ति होणें व्यर्थ आहे !" **'विद्यया०'** इत्यादि भाष्यानें उत्तर–]=तें मोक्षरूप विद्येनें अधिगत केलें जातें, असें आम्हीं वारंवार–अनेकदा सांगितलें आहे. [–विद्येमध्यें अतिशय आहे, या पक्षाचा स्वीकार करून मुक्तीमध्यें अतिशय नाहीं, असें सांगितलें. आतां मोक्षहेतु तत्त्वसाक्षात्कारलक्षण विद्याहि सविशेष–सातिशया नाहीं, असें **' न च० '** इत्यादि भाष्यानें सांगतात–]=आणि त्या विद्येमध्येंहि उत्कर्ष-अपकर्षरूप अतिशय उपपन्न होत नाहीं. कारण निकृष्ट विद्येला मुख्य ब्रह्मविद्यात्व नसतें, तिच्या विद्यात्वाचाच अभाव आहे. कारण ब्रह्मविद्या उत्कृष्टच आहे. [–" तर मग पूर्वाधिकरणामध्यें विद्येचा विशेष कसा दाखविला आहे ? " **' तस्मात्० '** इत्यादि भाष्यानें उत्तर–]=यास्तव तिच्या मध्यें ' उशिरानें उत्पत्ति होणें व सत्वर उत्पत्ति होणें, ' हाच अतिशय झाला तर होईल ! [–"तर मग, मुक्तीमध्येंहि तशा प्रकारचा अतिशय असेल " अशी आशंका घेऊन **' न तु० '** इत्यादि भाष्यानें म्हणतात–]

**भाष्यं—न तु मुक्तौ कश्चिदतिशयसंभवोऽस्ति । विद्याभेदाभावादपि तत्फलभेदनियमाभावः कर्मफलवत् । न हि मुक्तिसाधनभूताया विद्यायाः कर्मणामिव भेदोऽस्तीति । सगुणासु तु विद्यासु 'मनोमयः प्राणशरीरः' इत्याद्यासु गुणावापोद्वापवशाद्भेदोपपत्तौ सत्यामुपपद्यते यथास्वं फलभेदनियमः । कर्मफलवत् ॥**

**भाष्यार्थ**—पण मुक्तीमध्यें कोणत्याहि अतिशयाचा संभव नाहीं. [ कारण विद्योत्पत्तीच्या साहचर्यानेंच–विद्योत्पत्ति होतांच अविद्यानिवृत्तिरूप मुक्ति अवश्यच आहे, ती अवश्य होणारच, असा भावार्थ.–मुक्तीच्या निर्विशेषत्वाविषयीं **' विद्याभेदाभावादपि०'** इत्यादि भाष्यानें हेत्वंतर सांगतात–]=विद्येच्या भेदाचा अभाव

असल्यामुळेंहि कर्मफलाप्रमाणें विद्येच्या फलभेदाच्या नियमाचा अभाव आहे. [ आत्म्याच्या एकरूपत्वामुळें आत्माकारविद्येमध्यें विशेषाचा अभाव आहे. म्हणून तिचें अनेकरूप फलोत्पादकत्व संभवत नाहीं. त्यामुळें तिच्या फलांतील विशेषाची असिद्धि होते, असा भावार्थ.–'न हि०' इत्यादि भाष्यानें विद्येतील भेदाच्या अभावाचा विस्तार करितात–]=कारण कर्मांच्या भेदाप्रमाणें मुक्तिसाधनभूत विद्येचा भेद नाहीं. [–" सगुणविद्येप्रमाणें निर्गुण ब्रह्मविद्येलाहि विद्यात्व असल्यामुळें आत्मविद्येचा भेद असेल, " अशी आशंका घेऊन 'विषयभेदामुळें सगुण विद्येमध्यें भेद जरी असला तरी आत्मविद्येंत भेद नाहीं ' असें 'सगुणासु तु० ' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=पण 'मनोमयः प्राणशरीरः'–छां. ३. १४. २.–इत्यादि सगुण विद्यांमध्यें गुणांचें ग्रहण व त्याग यांमुळें भेदाची उपपत्ति असतांना त्या त्या विद्येच्या योग्यतेप्रमाणें–तिच्या गुणांच्या अनुरोधानें कर्मफलाप्रमाणें फलभेदाचा नियम उपपन्न होतो. [–सगुण विद्यांतील फलभेदाविषयीं 'तथा च० ' इत्यादि भाष्यानें प्रमाण सांगतात–]

**भाष्यं––तथा च लिंगदर्शनम्–'तं यथा यथोपासते तदेव भवति ' इति । नैवं निर्गुणायां विद्यायाम् । गुणाभावात् । तथा च स्मृतिः––"न हि गतिरधिकास्ति कस्यचित्सति हि गुणे प्रवदन्त्यतुल्यताम् " इति । 'तदवस्थावधृतेः तदवस्थावधृतेः' इति पदाभ्यासोऽध्यायपरिसमाप्तिं द्योतयति ॥ ५२ ॥ (१७)**

इति श्रीमत्परमहंसपरिव्राजकाचार्यश्रीमच्छंकरभगवत्पादकृतौ शारीरकमीमांसाभाष्ये तृतीयाध्यायस्य चतुर्थः पादः ॥ समाप्तोऽयं तृतीयाध्यायः ॥

**भाष्यार्थ**––आणि त्याचप्रमाणें 'त्याची जशी जशी उपासना करितो तेंच होतो' असें लिंगदर्शन आहे. [–'नैवं०' इत्यादि भाष्यानें दार्ष्टान्तिकांतील विशेष सांगतात–]=निर्गुण विद्येमध्यें गुणांचा अभाव असल्यामुळें असा फलभेद नाहीं. [–तत्त्वविद्याविशेषामध्यें गुणांचा अभाव आहे, याविषयीं 'तथा च० ' इत्यादि भाष्यानें स्मृति सांगतात–]=आणि तशी 'कस्यचित् '–"कोणाहि निर्गुण विद्यावान् पुरुषाची गति–फल अधिक नाहीं. [–त्यांतील न्यूनाधिक भावाच्या अभावाविषयीं 'सति हि०' इत्यादि वाक्यानें हेतु सांगतात–]=कारण गुण विद्यमान असतांनाच फलाचें अतुल्यत्व सांगतात " ही स्मृति आहे. [–'तदवस्था०' इत्यादि भाष्यानें सूत्रांतील पुनरुक्तीचें अर्थवत्त्व सांगतात–]='तदवस्थावधृतेः तदवस्थाव-

धृते:' हा पदांचा अभ्यास अध्यायाची परिसमाप्ति द्योतित करितो, येथें तिसरा अध्याय समाप्त झाला, असें सुचवितो. [ यास्तव पूर्वोक्त प्रकारें मुक्तीला निरतिशयत्व असल्यामुळें कर्मसाध्यता नाहीं, ती कर्मांनीं साध्य होणारी नाहीं, त्यामुळें या पादाचें पहिलें पुरुषार्थाधिकरण युक्त आहे, असा भावार्थ. सु.ब्र.४२८.]५२.(१७)

इति श्रीशंकराचार्यभक्त विष्णुशर्मकृत ब्रह्मसूत्रशारीरभाष्यार्थाच्या साधनाख्य तृतीयाध्यायाचा चतुर्थ सर्ववेदान्तप्रत्ययपाद समाप्त झाला.

शारीरकमीमांसाभाष्यार्थाचा तिसरा अध्यायहि समाप्त झाला.

॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

ॐ तत्सत्

# ब्रह्मसूत्रशारीरभाष्यार्थ

[ मूळ सूत्र, सूत्रार्थ, शांकरभाष्य, अवतरणें, स्पष्टीकरण, व भामत्यादि टीकाकारांचा अधिक आशय व्यक्त करणाऱ्या टीपा, यांसह ]

## फलाख्यचतुर्थाध्याये प्रथमः पादः ।

( १. आवृत्त्यधिकरण. सू. १-२ )

—पूर्वाध्यायाच्या अंतिम अधिकरणांत मोक्षाविषयीं प्रतिनियमाचा अभाव प्रदर्शित केला. आतां मोक्षाच्या उपयोगी असलेल्या श्रवणादि विद्यासाधनांविषयीं त्यांच्या आवृत्तीनें अनुष्ठानाचा प्रतिनियम ' आवृत्तिः० ' या सूत्रानें दाखवितात—

**सूत्रं—आवृत्तिरसकृदुपदेशात् ॥ १ ॥**

**सूत्रार्थ**—आत्म्याचा साक्षात्कार आवृत्ति-विशिष्ट श्रवणादिकांनीं साध्य होणारा असल्यामुळें श्रवणादिकांची आवृत्तीच करावी. कारण श्रवणादिक व उपासनावाचक शब्द यांचा वारंवार उपदेश केलेला आहे.--सु.ब्र. पृ. ४२९.—
[—पूर्वोत्तर अध्यायांचा कार्यकारणभावसंबंध सांगण्यासाठीं तृतीयाध्याच्या अर्थाचा ' तृतीयेऽध्याये० ' इत्यादि भाष्यानें अनुवाद—]

**भाष्यं—तृतीयेऽध्याये परापरासु विद्यासु साधनाश्रयो विचारः प्रायेणात्यगात् । अथेह चतुर्थे फलाश्रय आगमिष्यति । प्रसंगागतं चान्यदपि किंचिच्चिंतयिष्यते । प्रथमं तावत्कतिभिश्चिदधिकरणैः साधनाश्रयविचारशेषमेवानुसरामः ॥**

**भाष्यार्थ**—तिसऱ्या अध्यायांत पर व अपर विद्यांतील साधनांविषयींचा विचार प्रायः होऊन गेला. [त्या साधन-विचाराचा थोडासा शेष राहिला आहे, हें द्योतित करण्यासाठीं ' प्रायेण ' असें म्हटलें आहे.—फलसिद्धि साधनाधीन असल्यामुळें त्यांच्या विचाराचेंहि पौर्वापर्य म्ह० साधनविचार पूर्वी व फलविचार त्यानंतर असा त्यांचा पूर्वापरभाव युक्तच आहे, अशा आशयानें युक्त असलेले भाष्यकार

' **अथ०** ' इत्यादि भाष्यानें म्हणतात–]=आतां या चौथ्या अध्यायांत फलसंबंधी विचार पुढें येईल. [–" तर मग येथें अर्चिरादि मार्गाचें कथन कसें केलें आहे?" अशी आशंका घेऊन ' फलकथनाच्या प्रसंगानें त्याचें कथनहि केलें जाईल' असें '**प्रसंगागतं च०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=आणि प्रसंगानें प्राप्त अशा दुसऱ्याहि मार्गादिकांचा विचार केला जाईल. [–याप्रमाणें अध्यायाचा संबंध सांगून तदधिगमाधिकरणापर्यंतच्या अधिकरणांचें तात्पर्य प्रदर्शित करणारे भाष्यकार ' **प्रथमं०** ' इत्यादि भाष्यानें अवान्तर संबंध सांगतात–]=आतां अगोदर कांहीं अधिकरणांनीं आम्ही साधनाश्रयविचाराच्या अवशिष्ट भागालाच अनुसरतों. [–साक्षात्च श्रुतीनें सांगितलेल्या साधनांचा विचार केला, आतां फलार्थापत्तीनें प्राप्त झालेल्या आवृत्त्यादिकांचा विचार केला जातो. तो विचार फलार्थापत्तीच्या अधीन असल्यामुळें या फलाध्यायांत तो सुसंगतच आहे असा भावार्थ.–'**आत्मा०**' इत्यादि वाक्यांनीं प्रथमाधिकरणाच्या विषयाचा अनुवाद करून संशय सांगतात–]

**भाष्यं**—' **आत्मा वा अरे द्रष्टव्यः श्रोतव्यो मंतव्यो निदिध्यासितव्यः**' ' **तमेव धीरो विज्ञाय प्रज्ञां कुर्वीत** ' ' **सोऽन्वेष्टव्यः स विजिज्ञासितव्यः** ' **इति चैवमादिश्रवणेषु संशयः–किं सकृत्प्रत्ययः कर्तव्यः । आहोस्विदावृत्त्येति । किं तावत्प्राप्तं । सकृत्प्रत्ययः स्यात्प्रयाजादिवत् । तावता शास्त्रस्य कृतार्थत्वात् । अश्रूयमाणायां ह्यावृत्तौ क्रियमाणायामशास्त्रार्थः कृतो भवेत् ॥**

**भाष्यार्थ**—" आत्माच द्रष्टव्य, श्रोतव्य, मन्तव्य व निदिध्यासितव्य आहे." –बृ. ४. ५. ६.–" बुद्धिवान् ब्राह्मणानें त्याच आत्म्याला शास्त्राचार्योपदेशद्वारा परोक्ष जाणून प्रज्ञा–साक्षात्काराच्या साधनांचें अनुष्ठान करावें."–बृ. ४.४.२१. सु. उ. ६९६–" त्याचेंच अन्वेषण करावें, त्याचीच विजिज्ञासा करावी. "–छां. ८. ७. १.–या व अशाच दुसऱ्याहि ( ठिकठिकाणच्या ) श्रवणाविषयीं 'एकदाच श्रवणादि प्रत्यय करावा कीं आवृत्तीनें ' असा संशय येतो. [ येथें साधनांचें एकेकदाच अनुष्ठान करणें व फलनिष्पत्ति होईपर्यंत त्यांची पुनः पुनः आवृत्ति करणें, असें उभयथात्व–दोन्ही प्रकार दिसत असल्यामुळें श्रवणादिसाधनांविषयीं संशय सांगून मुक्तीला कारण होणाऱ्या श्रौत आत्मज्ञानाचीं साधनें अशीं जीं श्रवणादिक त्यांच्या आवृत्तीनें अनुष्ठानाची सिद्धि केलेली असल्यामुळें या अधिकरणाच्या पादादिसंगति आहेत. पूर्वपक्षांत ' श्रवणादिकांना अदृष्टार्थत्व आहे' व सिद्धान्तांत 'त्यांना दृष्टार्थत्वच आहे' असा फलभेद मानून ' **किं तावत्०** ' इत्यादि भाष्यानें पूर्वपक्ष कारितात–]=तर मग अगोदर त्यांतील कोणता पक्ष प्राप्त झाला? प्रयाजादिकां-

प्रमाणें श्रवणादिकांचा सकृत्प्रत्यय होतो. [–ज्याप्रमाणें एकदाच अनुष्ठिलेले प्रयाजादिक दर्श व पूर्णमास यांच्या फलांवर उपकार करणारे–त्यांच्या फलोपयोगी होतात, त्याचप्रमाणें एकदाच अनुष्ठिलेला श्रवणादि प्रत्ययहि तत्त्वज्ञानोपयोगी –आत्मज्ञानाचें साधन होईल, त्यामुळें आवृत्तीला आनर्थक्य आहे–आवृत्तीची कांहीं आवश्यकता नाहीं, असा भावार्थ.–" अहोपण, तांदूळ होईपर्यंत व्रीहींच्या अवघाताची आवृत्ति जशी इष्ट आहे त्याप्रमाणें ज्ञान हें फल प्राप्त होईपर्यंत श्रवणादिकांच्या आवृत्तीनें अनुष्ठानाची आवश्यकता आहे" अशी आशंका घेऊन वादी 'तावता०' इत्यादि भाष्यानें म्हणतो–]=कारण एकदा अनुष्ठान केल्यानें शास्त्राला कृतार्थत्व प्राप्त होतें म्ह० शास्त्र कृतार्थ होतें. [–"अहोपण, शास्त्राला एकदाच केलेल्या अनुष्ठानानें जरी कृतार्थत्व असलें तरी त्याचें फलनिष्पत्तीपर्यंत अनुष्ठान कां होणार नाहीं ? " 'अश्रूयमाणायाम्०' इत्यादि भाष्यानें उत्तर–]=कारण आवृत्ति श्रुत नसतांना जर ती करूं लागलें तर अशास्त्रार्थ केला असें होईल. [–" दर्शनक्रियेच्या साधनाची आकांक्षा झाली असतां एकदाच साधनाच्या उपदेशानें निराकांक्षत्व संभवत असतांना साधनांच्या असकृत्–वारंवार केलेल्या उपदेशाच्या अनुपपत्तीनें त्या उपदेशाचें तात्पर्य आवृत्तींत कल्पिलें जातें आणि असें असल्यामुळें अशास्त्रार्थ केला आहे असें होत नाहीं " अशी 'ननु०' इत्यादि भाष्यानें शंका–]

**भाष्यं—नन्वसकृदुपदेशा उदाहृताः 'श्रोतव्यो मन्तव्यो निदिध्यासितव्यः' इत्येवमादयः । एवमपि यावच्छब्दमावर्तयेत्सकृच्छ्रवणं सकृन्मननं सकृन्निदिध्यासनं चेति ।नातिरिक्तम्। सकृदुपदेशेषु तु वेदोपासीतेत्येवमादिष्वनावृत्तिरिति॥**

**भाष्यार्थ**—" अहोपण, आत्मा श्रोतव्य, मन्तव्य, निदिध्यासितव्य आहे, इत्यादि असकृत् उपदेश वर उदाहृत केला आहे–त्याचा उल्लेख केला आहे." [–पण समुचित श्रवणादिकांच्या असकृत् उपदेशाची साधनत्वबुद्धीनेंहि उपपत्ति लागते, त्यामुळें त्यांत कांहीं विरोध नाहीं, अर्थात् त्या उपदेशाचें आवृत्तीमध्यें तात्पर्य नाहीं, असें वादी 'एवं०' इत्यादि भाष्यानें म्हणतो–]=असें जरी असलें तरी जितके शब्द आहेत तितकीच आवृत्ति करावी. एकदा श्रवण, एकदा मनन व एकदा निदिध्यासन, असें श्रवणादि एकेकदाच करावें. त्याहून अधिक करूं नये. [–याप्रमाणें निर्विशेष ब्रह्माचा साक्षात्कार हें ज्यांचें फल आहे अशा श्रवणादिकांतील आवृत्तीचें निरसन करून सविशेष ब्रह्माचा साक्षात्कार हें ज्यांचें फल आहे अशा अहंग्रहोपासनांतील आवृत्तीचें निरसन वादी 'सकृदुपदेशेषु०' इत्यादि

भाष्यानें करितो–]=पण 'वेद' 'उपासीत' इत्यादि सकृत् उपदेशांमध्यें तर अनावृत्ति आहे, ' इति '–असा पूर्वपक्ष प्राप्त होतो. [–श्रवणादि व अहंग्रहोपासना यांना प्रयाजादिकांप्रमाणें अनुष्ठानामुळें अदृष्टार्थत्व आहे म्ह० त्यांचें फल अदृष्ट आहे, अशा प्राप्त झालेल्या पूर्वपक्षाचा '**एवं०**' इत्यादि भाष्यानें अनुवाद करून भाष्यकार सिद्धान्त सांगतात–]

**भाष्यं—एवं प्राप्ते ब्रूमः– प्रत्ययावृत्तिः कर्तव्या ।कुतः। असकृदुपदेशात्। 'श्रोतव्यो मंतव्यो निदिध्यासितव्यः' इत्येवंजातीयको ह्यसकृदुपदेशः प्रत्ययावृत्तिं सूचयति। ननूक्तं यावच्छब्दमेव आवर्तयेन्नाधिकमिति। न। दर्शनपर्यवसानत्वादेषाम्। दर्शनपर्यवसानानि हि श्रवणादीन्यावर्त्यमानानि दृष्टार्थानि भवन्ति। यथावघातादीनि तंडुलादिनिष्पत्तिपर्यवसानानि। तद्वत्॥**

**भाष्यार्थ**—असा पूर्वपक्ष प्राप्त झाला असतां 'आवृत्तिः'–श्रवणादि-प्रत्ययांची आवृत्ति करावी, असा सिद्धान्त आम्ही सांगतों. [–" पण तशी आवृत्ति करण्यास कांहीं कारण नाहीं " अशी आशंका घेऊन, सूत्रोक्त हेतूला अवतरण देऊन त्याचें व्याख्यान–]= 'कुतः'–कोणत्या कारणानें ? ' असकृत् उपदेशामुळें '– कारण ' श्रवण करावें, मनन करावें, निदिध्यासन करावें ' हा अशा प्रकारचा अनेकदा केलेला उपदेश त्यांच्या प्रत्ययाची आवृत्ति सुचवितो. [–पूर्ववादी '**ननु०**' इत्यादि भाष्यानें पूर्वोक्ताचें स्मरण देतो–]=अहोपण, 'जितके शब्द आहेत तितकीच आवृत्ति करावी अधिक करूं नये' असें आम्हीं वर सांगितलें आहे. [–अविद्येच्या उच्छेदानें–नाशानें आत्म्याची स्वरूपावस्थानरूप मुक्ति श्रुति व अनुभव यांनीं सिद्ध असल्यामुळें, अविद्येचा उच्छेद विद्येनें आपोआपच होत असतो, असें रज्जुस्वरूपसाक्षात्कारामध्यें प्रत्यक्ष उपलब्ध होत असल्यामुळें व श्रवणादिकांना दृष्टफलत्व असल्यामुळें फलनिष्पत्ति होईपर्यंत अवघातादिकांप्रमाणें श्रवणादिकांची आवृत्ति करावी असें भाष्यकार ' न०' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=पण तें बरोबर नाहीं. कारण या श्रवणादिसाधनांना साक्षात्कारपर्यवसानत्व आहे–त्यांचें पर्यवसान साक्षात्कारांत होतें, त्यामुळें तुमचें वरील म्हणणें बरोबर नाहीं.[–हेंच अधिक स्पष्ट करितात–]='**दर्शनपर्यवसानानि०**'–कारण आत्मसाक्षात्कारांत पर्यवसान पावणारीं हीं आवृत्ति केलीं जाणारीं श्रवणादि साधनें दृष्टार्थ–दृष्टफल आहेत. ज्याप्रमाणें अवघातादि–भात कुटणें इत्यादि कर्में तण्डुलादिकांची निष्पत्ति झाली असतांच संपणारीं आहेत हें प्रसिद्ध आहे, त्याप्रमाणें श्रवणादि साधनें दृष्टफल असल्यामुळें साक्षात्कार झाला असतांच समाप्त

होणारीं आहेत. [–'एकदाच सांगितलेल्या अहंग्रहोपासनांमध्यें तर आवृत्तीची शंकाच नाहीं' असें जें वाद्यानें म्हटलें आहे–पृ.६११–त्याविषयीं आचार्य '**अपि च०**' या भाष्यानें सांगतात–]

**भाष्यं—अपि चोपासनं निदिध्यासनं चेति अंतर्णीतावृत्तिगुणैव क्रियाभिधीयते। तथा हि लोके गुरुमुपास्ते राजानमुपास्त इति च यस्तात्पर्येण गुर्वादीननुवर्तते स एवमुच्यते। तथा ध्यायति प्रोषितनाथा पतिमिति या निरंतरस्मरणा पतिं प्रति सोत्कंठा सैवमभिधीयते। विद्युपास्त्योश्च वेदान्तेष्वव्यतिरेकेण प्रयोगो दृश्यते। क्वचिद्विदिनोपक्रम्य उपासिनोपसंहरति॥**

**भाष्यार्थ**—शिवाय उपासन व निदिध्यासन ही क्रिया जिच्यामध्यें आवृत्ति हा गुण अंतर्भूत झालेला–गूढ आहे अशीच सांगितली जाते. [–'ज्याला संशय मुळींच नाहीं असा उपासक देव होऊन देवांस प्राप्त होतो–देवताभावास प्राप्त होतो.'–बृ.४.१.२.–अशा या लिंगावरून अहंग्रहोपासनांना उपास्याच्या साक्षात्कारद्वारा दृष्टफलत्व आहे, असें पुढें सांगावयाचें असल्यामुळें त्यामध्येंहि फलनिष्पत्ति होईपर्यंत त्यांच्या आवृत्तीचें अनुमान होतें व शब्दसामर्थ्यामुळेंहि त्या उपासनांत आवृत्तिच विवक्षित आहे, असा याचा भावार्थ.–ज्यामध्यें आवृत्ति हा गुण अंतर्भूत आहे असेंच उपासन आहे, याविषयीं '**तथा हि लोके०**' या भाष्यानें लोकसंमति सांगतात–]=कारण लोकव्यवहारांतहि 'गुरूची उपासना करितो. राजाची उपासना करितो' इत्यादि जो तत्परतेनें गुर्वादिकांचें अनुवर्तन करितो, तोच असें बोलला जातो–त्याविषयींच व्यवहारांत असा शब्दप्रयोग करितात. [–ध्यानहि तसेंच–आवृत्तिगुणविशिष्टच आहे, याविषयीं लोकसंमति दाखवितात–]='**तथा०**' –तसेंच, 'जिचा पति प्रवासांत गेला आहे अशी प्रोषितनाथा पतीचें ध्यान करिते' असें जी पतीविषयीं उत्कंठायुक्त होऊन त्याचेंच निरंतर स्मरण करिते तीच बोलली जाते–अशा स्त्रीविषयींच तसें म्हणतात. [–'उपासन-'शब्दश्रुतींतील आवृत्ति जरी अशी सिद्ध झाली तरी 'वेद' इत्यादि शब्दप्रयोगांत तिची सिद्धि कशी होते, अशी आशंका घेऊन आचार्य म्हणतात–]='**विद्युपास्त्योश्च०**' आणि 'विद्'व 'उपास्' या दोन क्रियापदांचा वेदान्तांमध्यें अभेदानें–एका अर्थीं प्रयोग केलेला दिसतो. श्रुति कांहीं ठिकाणीं 'विद्' या धातूनें उपक्रम करून 'उपास्' या धातूनें उपसंहार करिते. [–'विद्' या धातूनें उपक्रम व 'उपास्' यानें उपसंहार याविषयीं '**यथा०**' इत्यादि भाष्यानें संवर्गविद्येचें उदाहरण–]

**भाष्यं**—यथा –' **यस्तद्वेद यत्स वेद स मयैतदुक्तः** ' **इत्यत्र ' नु म एतां भगवो देवतां शाधि यां देवतामुपास्से ' इति । क्वचिच्चोपासिनोपक्रम्य विदिनोपसंहरति । यथा— ' मनो ब्रह्मेत्युपासीत ' इत्यत्र ' भाति च तपति च कीर्त्या यशसा ब्रह्मवर्चसेन य एवं वेद ' इति । तस्मात्सकृदुपदेशेष्वपि आवृत्तिसिद्धिः । असकृदुपदेशस्त्वावृत्तेः सूचकः ॥ १ ॥**

**भाष्यार्थ**—जसें ' सः '–तो रैक्व, ' यत् वेद '–जें जाणतो ' तत् '–तें प्राणतत्त्व दुसराहि जो कोणी जाणतो तो सर्व धर्मफलांस प्राप्त होतो, असें मजकडून तो बोलला गेला आहे–त्याविषयीं मी हें बोललों आहें–छां. ४. १. ४.–[ रैक्वाप्रमाणें दुसराहि जो कोणी रैक्वाचें वेद्य–उपास्य प्राणतत्त्व जाणतो त्यालाहि सर्व पुण्यफलांची प्राप्ति होते, असें म्हणून मी तो तशा प्रकारचा रैक्व तुला सांगितला आहे. श्रुतींतील ' एतत् ' हें क्रियाविशेषण आहे. ' अतिशय क्षुद्र असलेल्या जानश्रुतीला तूं रैक्वाप्रमाणें काय सांगत आहेस?' असें आकाशांतून जाणारा पुढील हंस मागील हंसाला म्हणतो. ]=' **इत्यत्र०** '–अशा या प्रकरणांत ' भगवः '–हे भगवन् रैक्व, ' यां देवतां उपास्से '–ज्या देवतेची तूं उपासना करितोस ' एतां देवतां मे शाधि '–त्या देवतेचा मला उपदेश कर, असें जानश्रुतीचें वचन आहे. [ यांत उपक्रम व उपसंहार यांच्या एकरूपत्वाची सिद्धि होण्यासाठीं ' विद् ' व ' उपास् ' यांचें एकार्थत्व कथन करणें उचित आहे.–आतां ' उपास् ' यानें आरंभ व ' विद् ' यानें उपसंहार याविषयीं ' **यथा०**' इत्यादि भाष्यानें दृष्टान्त सांगतात–] =जसें "मन ब्रह्म आहे अशी उपासना करावी"–छां.३.१८.१.–अशा या वाक्यांत "जो असें जाणतो तो कीर्ति,यश, ब्रह्मवर्चस यांनीं भासतो व तापतो" असा उपसंहार केला आहे. [याप्रमाणें 'विद्' व 'उपास्' यांचें ऐक्य आहे व उपासना आवृत्तिगुणविशिष्ट आहे, असें सिद्ध झालें असतां फलित–]='**तस्मात्०**'–म्हणून सकृत्–एकदा केलेल्या उपदेशांतहि आवृत्तीची सिद्धि होते. [–" अहोपण, श्रवणादिकांमध्यें तशी शब्दसामर्थ्यानें आवृत्ति प्राप्त होत नाहीं. तेव्हां श्रवणादिकांतील आवृत्तीची सिद्धि कशी होते?" उत्तर–]=' **असकृत्०** '–पण वारंवार केलेला उपदेश आवृत्तीचा सूचक आहे १. [–विषयांचा साक्षात्कार हें ज्यांचें फल आहे अशा प्रत्ययांतील आवृत्तीविषयीं ' **लिंगाच्च०** ' या सूत्रानें हेत्वंतर सांगतात–]

**सूत्रं—लिंगाच्च ॥ २ ॥ ( १ )**

**सूत्रार्थ**—लिंगावरूनहि साधनांच्या आवृत्तीची सिद्धि होते. २ ( १ )–सु. ब्र. पृ. ४२९. [–' **लिंगमपि०** ' इत्यादि भाष्यानें हेतूचेंच विवरण करितात–]

**भाष्यं--लिंगमपि प्रत्ययावृत्तिं प्रत्याययति । तथा हि–उद्गीथविज्ञानं प्रस्तुत्य 'आदित्य उद्गीथः' इत्येतदेकपुत्रतादोषेणापोद्य 'रश्मींस्त्वं पर्यावर्तयात्' इति रश्मिबहुत्वविज्ञानं बहुपुत्रतायै विदधत्सिद्धवत्प्रत्ययावृत्तिं दर्शयति। तत्सामान्यात्सर्वप्रत्ययेष्वावृत्तिसिद्धिः ॥**

**भाष्यार्थ**--लिंगहि प्रत्ययाच्या आवृत्तीचा प्रत्यय आणून देतें. कसें तें पहा–उद्गीथविज्ञानाचा 'आदित्य उद्गीथ आहे' असा आरंभ करून एकपुत्रतादोषानें त्याचा अपवाद करून–'हे पुत्रा, तूं सूर्याचे किरण व सूर्य यांचा भेदानें उपासना कर'–छां. १. ५. २.–असें बहुपुत्रत्वासाठीं रश्मिबहुत्वविज्ञानाचें विधान करणारें लिंग सिद्ध असल्याप्रमाणेंच प्रत्ययाची आवृत्ति दाखवितें. [–श्रुतींतील 'पर्यावर्तयात्' या शब्दप्रयोगांत एका 'त-'काराचा अंतर्भाव करून 'पर्यावर्तयतात्' असें हें मध्यम पुरुष एकवचन करून घ्यावें. कारण त्याचा त्वं–तूं हा कर्ता आहे. 'पर्यावर्तय–उपास्स्व'–उपासना कर, असा याचा भावार्थ. एकाच आदित्याचें उद्गीथामध्यें संपादन करून त्याची उपासना केल्यामुळें मला तूं एकच पुत्र झालास, पण तूं उद्गीथांत रश्मींचें संपादन करून प्रत्यावर्तन कर, म्हणजे तुला पुष्कळ पुत्र होतील. या विधिवाक्यांत प्रत्ययाची आवृत्ति सिद्ध असल्याप्रमाणें प्रदर्शित केली आहे. म्हणून हें आवृत्तीचें लिंग आहे, असा भावार्थ.–' पण त्या लिंगावरून उद्गीथाच्या प्रत्ययाची आवृत्ति जरी सिद्ध होत असली तरी अन्य प्रत्ययांमध्यें तिची सिद्धि कशी होते?' '**तत्**०' इत्यादि भाष्यानें उत्तर–]=त्या प्रकृत उद्गीथप्रत्ययाशीं सर्व प्रत्ययांचें साक्षात्कारफलत्वानें किंवा ध्यानत्वानें सादृश्य असल्यामुळें अहंग्रहोपासनादि व श्रवणादि या सर्व प्रत्ययांमध्यें आवृत्तीची सिद्धि होते. [–याप्रमाणें अधिकरणार्थ सांगून त्याच्या निर्गुण ब्रह्मविषयत्वावर '**अत्र**०' इत्यादि भाष्यानें आक्षेप–]

**भाष्यं–अत्राह– भवतु नाम साध्यफलेषु प्रत्ययेष्वावृत्तिः । तेष्वावृत्तिसाध्यस्यातिशयस्य संभवात् । यस्तु परब्रह्मविषयः प्रत्ययो नित्यशुद्धबुद्धमुक्तस्वभावमेवात्मभूतं परं ब्रह्म समर्पयति । तत्र किमर्था आवृत्तिरिति ॥**

**भाष्यार्थ**–यावर आक्षेपक असें म्हणतो–[–येथें सविशेष ब्रह्माचा साक्षात्कार हें ज्यांचें फल आहे अशा अहंग्रहोपासना व निर्विशेषब्रह्मसाक्षात्कार हें ज्यांचें फल आहे अशीं श्रवणादि साधनें यांचें उदाहरण दिलें आहे. वादी त्यांपैकीं अहंग्रहोपासनांतील आवृत्तीचा स्वीकार '**भवतु**०' इत्यादि भाष्यानें करितो–] **=ज्यांचें फल साध्य आहे अशा प्रत्ययांमध्यें आवृत्ति असूं दे. कारण त्यांत आवृत्तीनें** साध्य होणाऱ्या अतिशयाचा संभव आहे. [–पण '**यस्तु**०' इत्यादि

भाष्यानें तो श्रवणादिकांतील आवृत्तीचें निरसन करितो–]=पण जो परब्रह्मविषय प्रत्यय नित्यशुद्ध-बुद्ध-मुक्तस्वभावच आत्मभूत परब्रह्माचें समर्पण करितो त्यांत आवृत्ति कशासाठीं करावयाची ? '**इति०**' असें वादी म्हणतो. [–निर्गुण ब्रह्मां· तील अपरोक्षत्व हा अतिशय साध्य नाहीं म्ह० तो साधनांनीं साध्य होणारा नाहीं. कारण ब्रह्माला नित्य अपरोक्षत्वच आहे. त्यामुळें त्यांत श्रवणादिकांची आवृत्ति व्यर्थ आहे, असा भावार्थ.–"अहोपण, ब्रह्माला नित्य अपरोक्षत्व जरी असलें तरी तेवढ्यानें अविद्येचा नाश होत नाहीं. म्हणून अविद्येच्या ध्वंसासाठीं आगंतुक साक्षात्कार श्रवणादिकांच्या आवृत्तीनें साध्य आहे," अशी '**सकृत्०**' इत्यादि भाष्यानें वरील आक्षेपावर शंका–]

**भाष्यं—सकृच्छ्रुतौ च ब्रह्मात्मत्वप्रतीत्यनुपपत्तेरावृत्त्यभ्युपगम इति चेत् । न । आवृत्तावपि तदनुपपत्तेः । यदि हि 'तत्त्वमसि' इत्येवंजातीयकं वाक्यं सकृच्छ्रूयमाणं ब्रह्मात्मत्वप्रतीतिं नोत्पादयेत्ततस्तदेव आवर्त्यमानमुत्पादयिष्यतीति का प्रत्याशा स्यात् ॥**

**भाष्यार्थ**—"अहोपण, एकदाच श्रवण केल्यानें ब्रह्मात्मत्वप्रतीति उपपन्न होत नसल्यामुळें आवृत्तीचा स्वीकार केला जातो" असें जर म्हणाल तर [–'**न०**' इत्यादि भाष्यानें पूर्ववादी म्हणतो–]=तें बरोबर नाहीं. कारण श्रवणादिकांची आवृत्ति जरी केली तरी ब्रह्मात्मत्वप्रतीतीचा संभव नाहीं –श्रवणादिकांची आवृत्ति केली असतांहि त्याची अनुपपत्तीच होते. [–'**यदि०**' इत्यादि भाष्यानें वादी अनुपपत्तिच प्रकट करितो–]=कारण 'तत्त्वमसि' इत्यादि वाक्य एकदा श्रवण करून जर ब्रह्मात्मत्वप्रतीति उत्पन्न न करील तर त्याच वाक्याची पुनः पुनः आवृत्ति केली असतां तें त्या प्रतीतीला उत्पन्न करील याविषयीं काय आशा करावयाची आहे ! [–'ज्योतिष्टोमादि-'वाक्याप्रमाणें आवृत्तीनें युक्त असलेलेंहि 'तत्त्वमस्यादि-'वाक्य स्वार्थाविषयींच्या साक्षात्कारास समर्थ नाहीं, असा याचा भावार्थ.–आतां वादी "युक्ति व आवृत्ति यांनीं युक्त असलेलें वाक्य स्वार्थाविषयींच्या साक्षात्कारास उत्पन्न करील" या शंकाकाराच्या म्हणण्याचा अनुवाद '**अथोच्येत०**' इत्यादि भाष्यानें करितो–]

**भाष्यं—अथोच्येत–न केवलं वाक्यं कंचिदर्थं साक्षात्कर्तुं शक्नोति । अतो युक्त्यपेक्षं वाक्यमनुभावयिष्यति ब्रह्मात्मत्वमिति । तथाप्यावृत्त्यानर्थक्यमेव । सापि हि युक्तिः सकृत्प्रवृत्तैव स्वमर्थमनुभावयिष्यति ॥**

**भाष्यार्थ**—आतां ' केवल वाक्य कोणत्याच अर्थाला साक्षात्-प्रत्यक्ष करण्यास समर्थ नाहीं. म्ह० नुस्तें वाक्य अर्थाचें अपरोक्ष ज्ञान करून देण्यास समर्थ नसतें, म्हणून युक्तीची ज्याला अपेक्षा आहे असें वाक्य ब्रह्मात्मत्व अनुभवास आणून देईल' असें जर तुम्ही म्हणाल [–वादी युक्तिसाहित्याचा स्वीकार करून आवृत्तीचें प्रत्याख्यान करितो–]=' **तथापि०** '–तरी सुद्धां आवृत्तीला व्यर्थत्वच आहे, कारण एकदा प्रवृत्त झालेलीच ती युक्तीसुद्धां आपल्या अर्थाचा अनुभव करवील. [–यावर आवृत्तीच्या अर्थवत्त्वाचें समर्थन करणारा वेदान्तपक्षी **'अथापि०'** इत्यादि भाष्यानें आक्षेप घेतो–]

**भाष्यं—अथापि स्याद्युक्त्या वाक्येन च सामान्यविषयमेव विज्ञानं क्रियते। न विशेषविषयम् । यथा अस्ति मे हृदये शूलं इत्यतो वाक्याद्गात्रकंपादिलिंगाच्च शूलसद्भावसामान्यमेव परः प्रतिपद्यते । न विशेषमनुभवति। यथा स एव शूली। विशेषानुभवश्चाविद्याया निवर्तकः । ततस्तदर्था आवृत्तिरिति चेत् । न । असकृदपि तावन्मात्रे क्रियमाणे विशेषविज्ञानोत्पत्त्यसम्भवात् ॥**

**भाष्यार्थ**—आतां यावर 'युक्ति व वाक्य यांच्याकडून सामान्यविषयच विज्ञान केलें जातें. विशेषविषय विज्ञान केलें जात नाहीं, म्ह० युक्ति व वाक्य यांच्या योगानें विषयाचें सामान्य ज्ञान होतें, विशेष ज्ञान होत नाहीं, असेंहि आक्षेपक म्हणेल. [–वादी हेंच म्हणणें दृष्टान्तानें स्पष्ट करितो–]=**'यथा०'**–जसें ' माझ्या हृदयांत शूल आहे ' अशा या वाक्यावरून व शरीरकंपादि लिंगांवरून दुसरा–हें वाक्य ऐकणारा शूलाच्या अस्तित्वाचें सामान्यच जाणतो म्ह० त्याला त्या शूलाचें सामान्य ज्ञानच होतें. त्याच्या विशेषाचा अनुभव येत नाहीं. [–" अहोपण, शूलविशेषाला अनुभवाची योग्यताच नसल्यामुळें श्रोत्याला त्याचा अनुभव येत नाहीं," अशी आशंका घेऊन आक्षेपक **'यथा०'** इत्यादि म्हणतो–] =जसा तोच शूलवान् पुरुष त्या शूलविशेषाचा अनुभव घेतो तसा त्याचें वाक्य ऐकणारा तो शूलविशेष अनुभवीत नाहीं. [–' तर मग प्रस्तुत विषयांतहि आत्म्याचें सामान्य ज्ञानच असूं दे. विशेष ज्ञान कशाला पाहिजे ?' अशी आशंका घेऊन**'विशेषानुभवः०'**इत्यादि म्हणतो–]–आणि 'विशेषानुभव अविद्येचा निवर्तक आहे,म्हणून त्यासाठीं आवृत्ति,' असें म्हणाल तर['तो विशेषानुभव भावनाजन्य आहे कीं शास्त्र-युक्तिजन्य आहे?' यांतील पहिला पक्ष संभवत नाहीं, कारण भावनाजन्य विशेषानुभावाला अप्रमाणजन्यत्व असल्यामुळें अविद्यानाशकत्व संभवत नाहीं. असें मानून ' **न०** ' इत्यादि भाष्यानें दुसऱ्या कल्पाचें निरसन–]=तें बरोबर

नाहीं. कारण तें तेवढेंच श्रवणादि वारंवार जरी करीत राहिलें तरी विशेष विज्ञानाच्या उत्पत्तीचा संभव नाहीं. [ प्रत्यक्षावांचून दुसऱ्या कशालाहि साक्षात्काराचें हेतुत्व नाहीं, असा याचा भावार्थ.–' शिवाय युक्ति व वाक्य हीं साक्षात्काराला समर्थ आहेत कीं नाहींत ? ' समर्थ असतील तर आवृत्ति व्यर्थ आहे. ' **न हि०** ' इत्यादि भाष्यानें दुसऱ्या असमर्थपक्षाचें निरसन–]

**भाष्यं— न हि सकृत्प्रयुक्ताभ्यां शास्त्रयुक्तिभ्यामनवगतो विशेषः शतकृत्वोऽपि प्रयुज्यमानाभ्यामवगंतुं शक्यते । तस्माद्यदि शास्त्रयुक्तिभ्यां विशेषः प्रतिपद्येत । यदि वा सामान्यमेव । उभयथापि सकृत्प्रवृत्ते एव ते स्वकार्यं कुरुत इत्त्यावृत्त्यनुपयोगः ॥**

**भाष्यार्थ**—कारण एकदाच प्रयोग केलेलें शास्त्र व युक्ति यांच्या योगानें ज्ञात न झालेला विशेष शंभर वेळांहि प्रयोग केलेल्या शास्त्र-युक्तींनीं ज्ञात होणें शक्य नाहीं. [–याप्रमाणें शास्त्र-युक्तीचें सामर्थ्य व असामर्थ्य या दोन्ही पक्षीं आवृत्तीच्या व्यर्थत्वाचा उपसंहार–]=‘**तस्मात्**०’–म्हणून शास्त्र व युक्ति यांच्या योगानें विशेष ज्ञात होईल असें जरी म्हटलें किंवा त्यांच्या योगानें सामान्यच ज्ञात होतें, असेंहि जरी म्हटलें तरी दोन्ही प्रकारें एकदा प्रवृत्त झालेलेंच तें शास्त्र व ती युक्ति आपलें कार्य करतील, त्यामुळें आवृत्तीचा कांहीं उपयोग नाहीं. [–आतां शास्त्र व युक्ति यांना साक्षात्काराचें हेतुत्व आहे असें जरी मानलें तरी आवृत्ति व्यर्थ आहे, असें वादी ‘ **न च**०’ इत्यादि भाष्यानें सांगतो–]

**भाष्यं— न च सकृत्प्रयुक्ते शास्त्रयुक्ती कस्यचिदप्यनुभवं नोत्पादयत इति शक्यते नियंतुं । विचित्रप्रज्ञत्वात्प्रतिपत्तॄणाम् । अपि च अनेकांशोपेते लौकिके पदार्थे सामान्यविशेषवत्येकेनावधानेन एकमंशमवधारयति । अपरेणापरमिति स्यादप्यभ्यासोपयोगो । यथा दीर्घप्रपाठकग्रहणादिषु । न तु निर्विशेषे ब्रह्मणि सामान्यविशेषरहिते चैतन्यमात्रात्मके प्रमोत्पत्तावभ्यासापेक्षा युक्तेति ॥**

**भाष्यार्थ**––एकदा प्रयुक्त केलेलें शास्त्र व [यु]क्ति कशाचाहि अनुभव उत्पन्न करीत नाहींत, असाहि नियम करितां येत नाहीं. कारण अनुभव घेणाऱ्या पुरुषांची प्रज्ञा विचित्र असते. म्ह० ज्ञात्यांची बुद्धि निरनिराळ्या प्रकारची असते, सर्वांची ती एकसारखीच नसते. [–याप्रमाणें प्रमाणाच्या स्वभावानुसार आवृत्तीचें व्यर्थत्व सांगून वादी प्रमेयाच्या–विषयाच्या स्वभावालोचनानेंहि आवृत्तीचें व्यर्थत्व ‘ **अपि च**० ’ या भाष्यानें सांगतो–]=शिवाय ज्ञाता पुरुष अनेक अंशांनीं युक्त असलेल्या सामान्य-विशेषवान् लौकिक पदार्थांतील एका अवधानानें एका

अंशाचें अवधारण करितो व दुसऱ्या अवधानानें दुसऱ्या अंशाचा निश्चय करितो, त्यामुळें त्याच्या ज्ञानाला अभ्यासाचा उपयोगहि आहे. जसें–एखाद्या दीर्घ प्रपाठकाचें ग्रहण करणें इत्यादिकांत अभ्यासाचा उपयोग होतो. पण सामान्यविशेषरहित चैतन्यमात्ररूप निर्विशेषब्रह्मामध्यें प्रमेच्या उत्पत्तीसाठीं अभ्यासाची अपेक्षा युक्त नाहीं–निर्विशेष ब्रह्माच्या ज्ञानाला अभ्यासाची अपेक्षा नाहीं. **'इति'** –असा यावर आक्षेप येतो. [–'एखाद्याच अधिकाऱ्याला श्रवणादिकांच्या आवृत्तीचा उपयोग नाहीं असें तुमचें म्हणणें आहे कीं सर्वांनाच तिचा उपयोग नाहीं, असें तुमचें म्हणणें आहे!' असा 'अत्र०' इत्यादि भाष्यानें सिद्धान्ती विकल्प करितात–]

**भाष्यं—अत्रोच्यते–भवेदावृत्त्यानर्थक्यं तं प्रति । यस्तत्त्वमसीति सकृदुक्तं एव ब्रह्मात्मत्वमनुभवितुं शक्नुयात् । यस्तु न शक्नोति तं प्रत्युपयुज्यत एवावृत्तिः । तथा हि छांदोग्ये ' तत्त्वमसि श्वेतकेतो ' इत्युपदिश्य ' भूय एव मा भगवान्विज्ञापयतु ' इति पुनः पुनः परिचोद्यमानः तत्तदाशंकाकारणं निराकृत्य । तत्त्वमसीत्येवासकृदुपादिशति । तथा च ' श्रोतव्यो मंतव्यो निदिध्यासितव्यः ' इत्यादि दर्शितम् ॥**

**भाष्यार्थ**—याविषयीं असें सांगितलें जातें–[–' **भवेत्०** ' इत्यादि भाष्यानें वरील विकल्पांतील पहिल्या पक्षाचा अंगीकार करितात–]=जो ' तत्त्वमसि ' असें एकदा सांगितलेलेंच ब्रह्मात्मत्व साक्षात् अनुभविण्यास समर्थ होतो त्याच्यासाठीं आवृत्तीचें आनर्थक्य होईल म्ह० त्याला आवृत्तीचा कांहीं उपयोग नाहीं, हें खरें आहे; [–ब्रह्माला अपरोक्षत्व असल्यामुळें व वाक्य परोक्षज्ञानच करून देणारें आहे, याविषयीं कांहीं प्रमाण संभवत नसल्यामुळें चित्तविक्षेपादि प्रतिबंध नसल्यास तें अपरोक्ष ज्ञान **कराविणारच**, असा याचा भावार्थ.–' **यस्तु०** ' इत्यादि भाष्यानें दुसऱ्या पक्षाला दूषित करितात–]=पण जो एकदा सांगितलेलेंच ब्रह्मात्मत्व अनुभविण्यास समर्थ होत नाहीं त्याला आवृत्तीचा उपयोग आहेच. [–असंभावनादि प्रतिबंध असल्यास त्याच्या निवृत्तीसाठीं आवृत्ति उपयोगी आहे, असा याचा भावार्थ.–त्याविषयीं ' **तथा हि०** ' इत्यादि भाष्यानें श्रौतलिंगहि सांगतात–]=त्याविषयीं श्रौतलिंग असें आहे–छान्दोग्यांत ' हे श्वेतकेतो ! तूं तें सत् आहेस ' असा उपदेश करून ' भगवान् पुनरपि मला आणखी समजावून सांगोत,' अशी पुनः पुनः प्रार्थना केला जाणारा उद्दालक त्या त्या आशंकेच्या कारणाचें निराकरण करून ' तें तूं आहेस ' असें वारंवार उपदेशितो. [–सूत्रकारांनींहि लिंगाचा अंगीकार केला आहे, असें **'तथा च०'** इत्यादि भाष्यानें सांगतात–]=आणि तसेंच

'श्रवण करावें, मनन करावें, निदिध्यासन करावें'–पृ.६१२–इत्यादि वर प्रदर्शित केलें आहे. [–पूर्ववादी आपल्या म्हणण्याचें 'ननु०' इत्यादि भाष्यानें स्मरण देतो–]

**भाष्यं— ननूक्तं सकृच्छ्रुतं चेत्तत्त्वमसिवाक्यं स्वमर्थमनुभावयितुं न शक्नोति, तत आवर्त्यमानमपि नैव शक्ष्यतीति । नैष दोषः । न हि दृष्टेऽनुपपन्नं नाम । दृश्यन्ते हि सकृच्छ्रुताद्वाक्यान्मंदप्रतीतं वाक्यार्थमावर्तयन्तस्तत्तदाभासव्युदासेन सम्यक्प्रतिपद्यमानाः ॥**

**भाष्यार्थ**—" अहोपण, एकदा श्रवण केलेलें 'तत्त्वमसि' वाक्य जर आपला अर्थ प्रत्ययास आणून देण्यास समर्थ होत नसेल तर वारंवार आवृत्ति केलें जाणारेंहि तें वाक्य आपल्या अर्थाचा अनुभव करून देण्यास समर्थ होणार नाहींच, असें आम्हीं वर–पृ. ६१८–म्हटलें आहे." [–अनुभवानुसार याचा परिहार–]=' **नैषः०** ' हा दोष येत नाहीं. कारण अनुभव आल्यावर अनुपपन्न असें कांहींच नाहीं. [–' पण आवृत्तीचें अर्थवत्त्व अनुभूत कसें आहे कीं ज्यामुळें अनुपपत्ति नाहीं ? ' ' **दृश्यते हि०** ' इत्यादि भाष्यानें उत्तर–]=कारण एकदा ऐकलेल्या वाक्यावरून मंदप्रतीत–सामान्यतः प्रतीत झालेल्या वाक्यार्थाची आवृत्ति करणारे त्या त्या अर्थाभासाचें निरसन करून यथार्थ अर्थ जाणतात, असें प्रत्यक्ष दिसतें. [–वाक्यार्थज्ञानाला पदार्थज्ञानपूर्वकत्व असतें म्ह० सर्व वाक्याचा अर्थ त्यांतील प्रत्येक शब्दाचा निश्चित अर्थ कळल्यानेंच ज्ञात होतो. पण ' तत्त्वमसि ' या वाक्यांतील 'तत्' व ' त्वं ' या पदार्थांचें निश्चित ज्ञान विचारावांचून होत नाहीं. म्हणून आवृत्तीनें क्रमानेंच तें होतें, असा ' **अपि च०** ' या भाष्यानें दुसरा हेतु सांगतात–]

**भाष्यं— अपि च तत्त्वमसीत्येतद्वाक्यं त्वंपदार्थस्य तत्पदार्थभावमाचष्टे । तत्पदेन च प्रकृतं सद्ब्रह्मेक्षितृ जगतो जन्मादिकारणमभिधीयते ' सत्यं ज्ञानमनंतं ब्रह्म ' ' विज्ञानमानंदं ब्रह्म ' ' अदृष्टं द्रष्टृ ' ' अविज्ञातं विज्ञातृ ' ' अजमजरममरम् ' ' अस्थूलमनण्वह्रस्वमदीर्घम् ' इत्यादिशास्त्रप्रसिद्धम् ॥**

**भाष्यार्थ**—शिवाय ' तत्त्वमसि ' असें हें वाक्य ' त्वं-'पदार्थाचा तत्पदार्थभाव सांगतें [–त्यांतील तत्पदाचा वाच्य अर्थ सांगतात–]=' **तत्पदेन०** '–आणि ' तत् ' या पदानें प्रकृत ईक्षितृ–ईक्षण करणारें सत् ब्रह्म जगाच्या जन्मादिकांचें कारण सांगितलें जातें. [–त्याचाच लक्ष्य अर्थ सांगतात–]=' **सत्यं०** '–" सत्य ज्ञान अनंत ब्रह्म आहे "–तै. २. १. १.–' विज्ञान आनंद ब्रह्म '–बृ.३.९.२८.– ' अदृष्ट–कोणाकडूनहि न पाहिलेलें, द्रष्टृ, अविज्ञात, पण विज्ञातृ'–बृ.३.८.११.–

'अज अजर, अमर, '–नृ.२.–' अस्थूल, अनणु, अह्रस्व, अदीर्घ '–बृ.३.८.८– इत्यादि वाक्यांनीं शास्त्रप्रसिद्ध ब्रह्म सांगितलें जातें. [–' तत्र० ' इत्यादि भाष्यानें ' अजं० ' इत्यादि वाक्याचा अर्थ सांगतात–]

**भाष्यं—तत्र अजादिशब्दैर्जन्मादयो भावविकारा निवर्तिताः । अस्थूलादिशब्दैश्च स्थौल्यादयो द्रव्यधर्माः । विज्ञानादिशब्दैश्च चैतन्यप्रकाशात्मकत्वमुक्तम् । एष व्यावृत्तसर्वसंसारधर्मकोऽनुभवात्मको ब्रह्मसंज्ञकस्तत्पदार्थो वेदान्ताभियुक्तानां प्रसिद्धः ॥**

**भाष्यार्थ**—त्यांतील ' अजादि-'शब्दांनीं आत्म्याच्या जन्मादि भावविकारांची निवृत्ति केली आहे. अस्थूलादिशब्दांनीं स्थूलत्वादि द्रव्यधर्मांची निवृत्ति केली आहे. [–याप्रमाणें ' अस्थूलादि-'वाक्याचा अर्थ सांगून ' सत्य-ज्ञानादि-'वाक्याचा अपुनरुक्त अर्थ सांगतात–]=आणि विज्ञानादि-शब्दांनीं ब्रह्माचें चैतन्यप्रकाशरूपत्व सांगितलें आहे. [–' एषः० ' इत्यादि भाष्यानें या श्रुतिसिद्ध तत्पदार्थाविषयीं विद्वदनुभवाचाहि प्रमाणत्वानें उपन्यास करितात–]=ज्याच्यापासून सर्व संसारधर्म निवृत्त झाले आहेत असा हा अनुभवात्मक ब्रह्मसंज्ञक तत्पदाचा वाच्यार्थ व लक्ष्यार्थ वेदान्तविज्ञानवान् पुरुषांना अत्यंत प्रसिद्ध आहे [–याप्रमाणें तत्पदाचा वाच्य व लक्ष्य अर्थ सप्रमाण सांगून ' तथा० ' इत्यादि भाष्यानें ' त्वं-'पदार्थहि विभागून दाखवितात–]

**भाष्यं— तथा त्वंपदार्थोऽपि प्रत्यगात्मा श्रोता देहादारभ्य प्रत्यगात्मतया संभाव्यमानः चैतन्यपर्यंतत्वेनावधारितः । तत्र येषामेतौ पदार्थौ अज्ञानसंशयविपर्ययप्रतिबद्धौ । तेषां तत्त्वमसीत्येतद्वाक्यं स्वार्थे प्रमां नोत्पादयितुं शक्नोति । पदार्थज्ञानपूर्वकत्वाद्वाक्यार्थस्य । इत्यतः तान्प्रत्येष्टव्यः पदार्थविवेकप्रयोजनः शास्त्रयुक्त्यभ्यासः ॥**

**भाष्यार्थ**—त्याचप्रमाणें ' त्वं-'पदार्थहि प्रत्यगात्मा, श्रोता, देहापासून आरंभ करून प्रत्यगात्मत्वानें संभाव्यमान असलेला, चैतन्यावधित्वानें निश्चित केलेला आहे. [ जो श्रोता, मंता इत्यादि प्रत्यगात्मा तोच ' त्वं-'पदाचा वाच्य व लक्ष्य अर्थ आहे. देह, इंद्रियें, प्राण, मन, बुद्धि व अविद्याख्य अव्यक्त यांच्या अंतरात्मत्वानें संभवनीय आहे, अशा रीतीनें मानला जाणारा तो ' जो हा प्राणांतील विज्ञानमय, जो प्राणानें प्राणव्यापार करितो ' इत्यादि वाक्यानें निश्चित केला गेला आहे, असा याचा भावार्थ.–" अहोपण, वाच्य व लक्ष्य अशा द्विविध अर्थरूपानें हे दोन पदार्थ जरी असले तरी श्रवणादिकांच्या आवृत्तीला अर्थवत्त्व कसें ? " अशी

आशंका घेऊन ‘ तत्र० ’ इत्यादि भाष्यानें उत्तर-]=असें असल्यामुळें ज्यांचे हे दोन पदार्थ अज्ञान, संशय, विपर्यय यांनीं प्रतिबद्ध असतात त्यांचें ‘ तत्त्वमसि ’ असें हें वाक्य आपल्या मुख्यार्थाविषयींची प्रमा उत्पन्न करण्यास समर्थ होत नाहीं. कारण वाक्यार्थाचें ज्ञान पदार्थज्ञानपूर्वकच होत असतें. यास्तव तत्त्वमस्यादि वाक्य त्यांच्या स्वार्थ प्रमेला-तत्त्वज्ञानाला उत्पन्न करूं शकत नाहीं. म्हणून त्यांच्यासाठीं पदांच्या अर्थाचा विवेक हें ज्याचें प्रयोजन आहे अशा शास्त्र-युक्तींचा अभ्यास अत्यंत अपेक्षणीय आहे [-‘तत्’ व ‘त्वं’ या पदांचे वाच्य व लक्ष्य अर्थ अज्ञानादिदोषांनीं प्रतिबद्ध झाल्यामुळें महावाक्य ज्यांच्या सम्यक्वाक्यार्थज्ञानास उत्पन्न करूं शकत नाहीं, त्यांना पदार्थज्ञान-पूर्वक वाक्यार्थज्ञान होण्यासाठीं शास्त्र व युक्ति यांच्या अभ्यासाची अत्यंत अपेक्षा असते. कारण त्या अभ्यासानें पदार्थाचा विवेक हें प्रयोजन सिद्ध होतें.-आतां ‘ प्रमेय ब्रह्म अंशरहित असल्यामुळें आवृत्ति व्यर्थ आहे ’ असें जें वाद्यानें वर. -पृ. ६२१-म्हटलें आहे. त्याविषयीं ‘ यद्यपि० ’ इत्यादि भाष्यानें सांगतात-]

**भाष्यं— यद्यपि च प्रतिपत्तव्य आत्मा निरंशः । तथाप्यध्यारोपितं तस्मिन्बह्वंशत्वं देहेंद्रियमनोबुद्धिविषयवेदनादिलक्षणम् । तत्रैकेनावधानेन एकमंशमपोह्य परेणापरमिति युज्यते तत्र क्रमवती प्रतिपत्तिः । तत्तु पूर्वरूपमेवात्मप्रतिपत्तेः॥**

**भाष्यार्थ**—आणि जरी विज्ञेय आत्मा निरंश-निरवयव आहे तथापि त्याच्या ठिकाणीं देह, इंद्रियें, मन, बुद्धि, विषय, वेदना-सुखादिकांचा अनुभव, इत्यादि-रूप अनेकांशत्व आरोपिलेलें आहे. त्यांतील एका अवधानानें एका अंशाचें निरसन करितो व दुसऱ्या अवधानानें दुसऱ्या अंशाचें, अशी आत्म्याची क्रमयुक्त-क्रमानें होणारी प्रतिपत्ति-त्या आत्म्याचें ज्ञान संभवतें. [आरोपित निवर्तनीय अंशांना अने-कत्व असल्यामुळें ज्ञानाचें क्रमवत्त्व अर्थवत्-उपयोगी आहे, असा याचा भावार्थ. -“ अहोपण, ‘ तत्त्वमसि ’ या वाक्यापासून ‘मी ब्रह्म आहें’ असें वाक्यार्थज्ञान झालें असतां क्रमाची अपेक्षा कशी होते ? ” अशी आशंका घेऊन ‘ तत्तु० ’ इत्यादि भाष्यानें म्हणतात-]=पण तें क्रमानें झालेलें पूर्वज्ञान आत्मसाक्षात्काराच्या पूर्वी होणारेंच आहे. [ त्यामुळें असंभावनादिप्रतिबंधनिरसनपूर्वक वाक्यजन्य तत्त्वसाक्षात्कार झाला असतां मग आवृत्तीची अपेक्षाच नाहीं, असा याचा भावार्थ. -याप्रमाणें मंद व मध्यम अधिकाऱ्यांना साक्षात्कारापूर्वी श्रवणादिकांच्या आवृत्तीचा उपयोग आहे असें सांगितलें. आतां उत्तम अधिकाऱ्याला आवृत्तीची अपेक्षा नाहीं, असें जें वर सांगितलें आहे, त्याचेंच ‘ एषां० ’ इत्यादि भाष्यानें विवरण-]

**भाष्यं**— **येषां पुनर्निपुणमतीनां नाज्ञानसंशयविपर्ययलक्षणः पदार्थविषयः प्रतिबंधोऽस्ति । ते शक्नुवन्ति सकृदुक्तमेव तत्त्वमसिवाक्यार्थमनुभवितुमिति तान्प्रति आवृत्त्यानर्थक्यमिष्टमेव । सकृदुत्पन्नैव ह्यात्मप्रतिपत्तिरविद्यां निवर्तयतीति, नात्र कश्चिदपि क्रमोऽभ्युपगम्यते ॥**

**भाष्यार्थ**—पण याच्या उलट ज्या निपुणमति–सूक्ष्मबुद्धि पुरुषांना अज्ञान, संशय, विपरीत भावना इत्यादि स्वरूपाचा पदार्थविषय–पदार्थसंबंधी प्रतिबंध नसतो ते एकदाच सांगितलेल्या ‘तत्त्वमसि’ या वाक्याच्या अर्थाचा अनुभव घेण्यास समर्थ होतात. त्यामुळे त्यांच्या आवृत्तीचें आनर्थक्य–व्यर्थत्व इष्टच आहे. [–“अहोपण, उत्पन्न झालेलेंहि ज्ञान फलासाठीं आवृत्तीची अपेक्षा करील” अशी आशंका घेऊन ‘**सकृदुत्पन्ना०**’ इत्यादि भाष्यानें समाधान सांगतात–] =कारण एकदा उत्पन्न झालेलीच आत्मविद्या अविद्येची निवृत्ति करिते, त्यामुळें अशा प्रसंगीं कोणताहि क्रम स्वीकारला जात नाहीं [–ज्ञान उत्पन्न झाल्यावर आवृत्तीचें जें आनर्थक्य सांगितलें आहे त्याचा अंगीकार करणारा आक्षेपक ‘**सत्यं०**’ इत्यादि भाष्यानें सांगतो–]

**भाष्यं**—**सत्यमेवं युज्येत, यदि कस्यचिदेवं प्रतिपतिर्भवेत्। बलवती ह्यात्मनो दुःखित्वादिप्रतिपत्तिः । अतो न दुःखित्वाद्यभावं कश्चित्प्रतिपद्यत इति चेत् ॥**

**भाष्यार्थ**—होय, जर कोणा एखाद्याला असें ज्ञान होईल तर तुम्ही म्हणतां तसें आवृत्तीचें आनर्थक्य होऊं शकेल, हें खरें आहे. [–“अहोपण, वाक्यावरून अशा प्रकारचें ज्ञान होईल” अशी आशंका घेऊन आक्षेपक ‘पण प्रत्यक्षादि प्रमाणांशीं विरोध येत असल्यामुळें वाक्यावरून असें ज्ञान होऊं शकणार नाहीं,’ असें ‘**बलवती०**’ इत्यादि भाष्यानें म्हणतो–]=कारण आत्म्याचा दुःखित्वादि अनुभव फार बलवान् आहे [–“अहोपण, तो अनुभव वाक्यजन्य विद्येनें बाधित होणारा असल्यामुळें भ्रान्त आहे–तो यथार्थरूप नसून भ्रान्तिरूप आहे,” अशी आशंका घेऊन आक्षेपक ‘**अतः न०**’ इत्यादि भाष्यानें म्हणतो–]=म्हणून दुःखित्वादिकांच्या अभावाचा अनुभव कोणालाहि येत नाहीं, असें जर म्हणशील तर [तें बरोबर नाहीं, असा पुढें संबंध. सर्वांच्या ठिकाणीं सर्वदा उत्पन्न होणारा जो ‘मी दुःखी आहें,’ इत्यादि प्रत्यय तो बलवान् असल्यामुळें त्याचा विद्येनें उच्छेद होऊं शकत नाहीं. त्यामुळें त्याला भ्रांतित्व नाहीं, असा भावार्थ.–‘पण सर्वदा सर्वांच्या अनुभवास येणाऱ्याहि देहात्मानुभवाला भ्रांतित्व आहे, त्यामुळें

युक्तीनें बाधित झालेल्या दुःखित्वादि-अभिमानाच्याहि भ्रांतित्वाची सिद्धि होत असल्यामुळें हा आक्षेप संभवत नाहीं' असें 'न०' इत्यादि भाष्यानें सांगतात-]

**भाष्यं**-- **न । देहाद्यभिमानवद् दुःखित्वाद्यभिमानस्य मिथ्याभिमानत्वोपपत्तेः । प्रत्यक्षं हि देहे छिद्यमाने दह्यमाने वा अहं छिद्ये दह्ये इति च मिथ्याभिमानो दृष्टः । तथा बाह्यतरेष्वपि पुत्रमित्रादिषु संतप्यमानेषु अहमेव संतप्ये इत्यध्यारोपो दृष्टः । तथा दुःखित्वाद्यभिमानोऽपि स्यात् । देहादिवदेव चैतन्याद्बहिरुपलभ्यमानत्वात् । दुःखित्वादीनां सुषुप्तादिषु चाननुवृत्तेः ॥**

**भाष्यार्थ**—तें बरोबर नाहीं. कारण 'देहादिच मी' या अभिमानाप्रमाणें 'मी दुःखी' इत्यादि दुःखित्वादि-अभिमानाच्या मिथ्यात्वाभिमानाची उपपत्ति आहे म्ह० देहाद्यभिमानाप्रमाणें दुःखित्वाद्यभिमानालाहि मिथ्याभिमानत्व असणें युक्त आहे. [-'**प्रत्यक्षं हि**०' इत्यादि भाष्यानें उक्त दृष्टान्तच प्रत्यक्ष प्रमाण व दृष्टान्त यांनीं स्पष्ट करितात-]=**कारण** देह प्रत्यक्ष छिन्नभिन्न होऊं लागला असतां किंवा दग्ध होऊं लागला असतां मीच छिन्नभिन्न केला जात आहें किंवा दग्ध केला जात आहें, असा मिथ्याभिमान प्रत्यक्ष दृष्ट आहे. त्याचप्रमाणें अतिशय बाह्य असलेलेहि पुत्र-मित्रादिक संतप्त होऊं लागले असतां मीच संतप्त होत आहें, असा अध्यारोप दृष्ट -प्रत्यक्ष अनुभूत आहे.[-'दुःखादिक तत्त्वतः आत्मधर्म नाहींत. कारण त्यांना वेद्यत्व आहे, उभयसंमत रूपादि वेद्याप्रमाणें' असा दार्ष्टान्तिक '**तथा**०' इत्यादि भाष्यानें सांगतात-]=त्याचप्रमाणें दुःखित्वादि-अभिमानहि मिथ्याच आहे. कारण दुःखित्वादिकांना चैतन्याहून बाहेरच उपलभ्यमानत्व आहे म्ह० देहादि जसे चैतन्याहून बाहेर-भिन्न उपलब्ध होतात त्याप्रमाणें दुःखित्वादिकाहि चैतन्याहून बाहेर -भिन्न उपलब्ध होतात. [-'आणि दुःखित्वादिकांना रूपादिकांप्रमाणें व्यभिचारित्व असल्यामुळेंहि तत्त्वतः आत्मधर्मत्व नाहीं, असें '**सुषुप्तादिषु**०' इत्यादि भाष्यानें सांगतात-]=आणि सुषुप्तादिकांमध्यें दुःखित्वादिकांची अनुवृत्ति होत नसल्यामुळेंहि त्यांना तत्त्वतः आत्मधर्मत्व नाहीं [-'तर मग चैतन्यहि आत्मस्वरूप नव्हे, कारण तेंहि सुषुप्तादिकांत अनुवृत्त होत नाहीं. दुःखादिकांप्रमाणें,' अशी आशंका घेऊन '**चैतन्यस्य**०' इत्यादि भाष्यानें म्हणतात-]

**भाष्यं**-- **चैतन्यस्य तु सुषुप्तेऽप्यनुवृत्तिमामनन्ति 'यद्वै तन्न पश्यति पश्यन्वै तन्न पश्यति' इत्यादिना । तस्मात्सर्वदुःखविनिर्मुक्तैकचैतन्यात्मकोऽहमित्येष आत्मानुभवः ॥**

**भाष्यार्थ**—पण "द्रष्टा सुषुप्तींत जें कांहीं पहात नाहीं, तें तो सर्वांचा अभाव पहात असूनहि पहात नाहीं"—बृ.४.३.२३—इत्यादि वचनानें सुषुप्तांतहि चैतन्याची अनुवृत्ति सांगतात. [—याप्रमाणें दुःखित्वादि बुद्धि हा मिथ्याभिमान आहे, आणि चैतन्य हेंच आत्म्याचें अव्यभिचारी स्वरूप आहे असें सिद्ध झालें असतां '**तस्मात्**०' इत्यादि भाष्यानें फलित सांगतात—]=म्हणून सर्व दुःखशून्य एक चैतन्यात्मक मी आहें, असा हा आत्मानुभव आहे. [—"पण वाक्यावरून होणारा हा उक्त आत्मानुभव अविरुद्ध जरी असला तरी आवृत्ति कां इष्ट नाहीं?" **न च**०'इत्यादि भाष्यानें उत्तर—]

**भाष्यं— न चैवमात्मानमनुभवतः किंचिदन्यत्कृत्यमवशिष्यते । तथा च** श्रुतिः—'**किं प्रजया करिष्यामो येषां नोऽयमात्मायं लोकः**' इत्यात्मविदः **कर्त-व्याभावं दर्शयति । स्मृतिरपि— "यस्त्वात्मरतिरेव स्यादात्मतृप्तश्च मानवः । आत्मन्येव च संतुष्टस्तस्य कार्यं न विद्यते"** इति ॥

**भाष्यार्थ**—आणि याप्रमाणें आत्म्याचा अनुभव घेणाऱ्या पुरुषाचें दुसरें कांहीं-एक कर्तव्य अवशिष्ट रहात नाहीं. [—त्याच अनुभवापासून पुरुषाला कृतकृत्यता प्राप्त होते—त्याच अनुभवामुळें तो कृतकृत्य होतो, याविषयीं '**तथा च**०' इत्यादि भाष्यानें प्रमाण सांगतात—]=आणि तशी "ज्या आमचा हा आत्मा हा लोक आहे ते आम्ही प्रजेनें—संततीनें काय करणार"—बृ. ४. ४. २२.—ही श्रुति आत्मज्ञाचा कर्तव्याभाव दाखविते. 'जो आत्म्यामध्येंच रत—आसक्त असतो, जो मानव आ-त्म्यामध्यें तृप्त असतो, आणि आत्म्यामध्येंच संतुष्ट असतो, त्याला कांहीं कर्तव्य नसतें"—भ. गी. ३. १७.—अशी स्मृतिहि आहे. [रति म्ह० आसक्ति, तिचें फल तृप्ति व तृप्तीचेंहि फल संतोष, असा येथें अर्थभेद आहे.—आतां साक्षात्कार होण्यापूर्वी आवृत्तीचें अर्थवत्त्व जें सांगितलें आहे त्याचेंच अधिक विवक्षेनें '**यस्य तु**०' इत्यादि भाष्यानें निरसन—]

**भाष्यं— यस्य तु नैषोऽनुभवो द्रागिव जायते । तं प्रत्यनुभवार्थ एवावृत्त्य-भ्युपगमः । तत्रापि न तत्त्वमसिवाक्यार्थात्प्रच्याव्य आवृत्तौ प्रवर्तयेत् । न हि वरघाताय कन्यामुद्वाहयन्ति । नियुक्तस्य च अस्मिन्नधिकृतोऽहं कर्ता मयेदं कर्तव्यं—इत्यवश्यं ब्रह्मप्रत्ययाद्विपरीतप्रत्यय उत्पद्यते ॥**

**भाष्यार्थ**—पण ज्याचा हा अनुभव सत्वर—तात्काल—झटकन उत्पन्न होत नाहीं, त्याच्या आवृत्तीचा अनुभवासाठींच स्वीकार केलेला आहे. [—" अहोपण,

विधीच्या सामर्थ्यानें आवृत्तीमध्यें प्रवृत्ति होत असल्यामुळें नियोगासाठीं आवृत्ति आहे, अनुभवासाठीं नाहीं " अशी आशंका घेऊन **'तत्र०'** इत्यादि भाष्यानें म्हणतात–]=त्यांतहि 'तत्त्वमसि' या वाक्याच्या अर्थापासून म्ह० 'मी ब्रह्म आहें' या प्रत्ययापासून ढळवून नियोग पुरुषाला आवृत्तीमध्यें प्रवृत्त करणार नाहीं. [कारण त्यांत प्रधानविरोध हा दोष येतो. श्रवणादिविधि अकर्तृ-आत्मानुभवासाठीं आहे, नियोगासाठीं नाहीं, असा याचा भावार्थ.–प्रधानविरोध संभवत नाहीं, याविषयीं दृष्टान्त–]=**'न हि०'**–कारण वराचा घात करण्यासाठीं कन्येचा विवाह कोणी करवीत नाहींत, हें प्रसिद्ध आहे. [–" अहोपण, नियोगासाठीं आवृत्तीचा स्वीकार जरी केला तरी त्या नियोगापासूनच अकर्तृ-आत्मज्ञान सिद्ध होत असल्यामुळें त्याचा व्याघात होत नाहीं–प्रधानविरोध होत नाहीं " अशी आशंका घेऊन **'नियुक्तस्य०'** इत्यादि भाष्यानें सांगतात–]=आणि नियुक्त पुरुषाचा 'मी यामध्यें अधिकृत कर्ता आहें, मीं हें करावें' असा ब्रह्मप्रत्ययाहून विपरीतप्रत्यय अवश्य उत्पन्न होतो. [–" अहोपण, नियोगाचा स्वीकार जर न केला तर श्रोतव्यादि वाक्यांवरून श्रवणादिकांच्या आवृत्तीची सिद्धि कशी होईल ? " अशी आशंका घेऊन **'यस्तु०'** इत्यादि भाष्यानें तिचें समाधान सांगतात–]

**भाष्यं—यस्तु स्वयमेव मंदमतिरप्रतिभानात्तं वाक्यार्थं जिहासेत्तस्यैतस्मिन्नेव वाक्यार्थे स्थिरीकार आवृत्त्यादिवाचोयुक्त्या अभ्युपेयते। तस्मात्परब्रह्मविषयेऽपि प्रत्यये तदुपायोपदेशेष्वावृत्तिसिद्धिः** ॥२॥ (१)

**भाष्यार्थ**—पण जो स्वतःच मंदमति असलेला पुरुष अप्रतिभानामुळें म्ह० असंभावनादि-प्रतिबंधामुळें त्या वाक्यार्थाचा त्याग करील, त्याचा याच वाक्यार्थात स्थिरीकार आवृत्त्यादि वाचोयुक्तीनें स्वीकारिला जातो. [–स्थिरीकार म्ह० असंभावनादिकांच्या निरसनानें बोधाचें दृढत्व, 'वेद' 'उपासीत' इत्यादि शब्दांची आवृत्ति हीच वाचोयुक्ति, आवृत्त्यादि येथील 'आदि-'शब्दानें श्रोतव्यादि वाक्यांचें ग्रहण केलें जातें.–सगुण ब्रह्माचा साक्षात्कार हें ज्यांचें फल आहे अशा अहंग्रहोपासनांमध्यें आणि निर्गुण ब्रह्मसाक्षात्कार हें ज्यांचें फल आहे, अशा श्रवणादिकांमध्यें आवृत्तीनें अनुष्ठान करावें, अशा या अधिकरणार्थाचा **'तस्मात्०'** इत्यादि भाष्यानें उपसंहार–]=म्हणून अपर ब्रह्मविषयप्रत्ययामध्यें जशी स्वरूपाची आवृत्ति करणें अवश्य आहे, त्याचप्रमाणें पर ब्रह्मविषय प्रत्ययांमध्येंहि तदुपायोपदेशांतील आवृत्तीची सिद्धि होते. २.–सु. ब्र. पृ.४७७(१)

( २. आत्मत्वोपासनाधिकरण. सू. ३. )

—श्रवण-मनन-निदिध्यासनादि साधनें आवृत्तीनें अनुष्ठावीं–त्यांचा अभ्यास करावा, त्यांची आवृत्ति करावी, असें सांगितलें. पण त्यांतील निदिध्यासनाचे वेळीं प्रत्ययावृत्ति कशी करावी, तें 'आत्मेति तु०' या सूत्रानें सांगतात—

**सूत्रं—आत्मेति तूपगच्छन्ति ग्राहयन्ति च ॥ ३ ॥ (२)**

**सूत्रार्थ**—'पण तें ब्रह्म आत्मा आहे' असें ब्रह्माचें ध्यान करावें. कारण जाबाल आत्मत्वानें ब्रह्माचा अंगीकार 'त्वं वा अहं अस्मि' इत्यादि श्रुतीनें करितात व 'तत्त्वमसि' इत्यादि वाक्यें ब्रह्माचें आत्मत्वानें ग्रहण करवितात. ३.(२) –सु. ब्र. ४३१. [–यद्यपि 'शब्दादेव प्रमितः'–ब्र. भा. अ. १ पृ.५७१–इत्यादि अधिकरणामध्यें श्रुतिप्रमाणांनीं जीव-ब्रह्मैक्य सांगितलें आहे, तथापि त्या श्रुतींच्याच विरुद्धार्थत्वामुळें उपचरितविषयत्वाची आशंका घेऊन या अधिकरणांत तिचें समाधान केलें जातें. विरोधसमाधानाची अविरोधाध्यायामध्येंच जरी संगति असली तरी महावाक्यार्थाच्या विरोधाचें समाधान समाधीमध्यें अंतरंगसाधनभूत असल्यामुळें या फलाध्यायांत त्या विरोधसमाधानाची संगति आहे, असें मानून भाष्यकार '**यः शास्त्रोक्तविशेषणः०**' इत्यादि भाष्यानें विषयोक्तिपूर्वक उभयथा प्रसिद्धीमुळें संशय सांगतात–]

**भाष्यं—यः शास्त्रोक्तविशेषणः परमात्मा स किमहमिति ग्रहीतव्यः किंवा मदन्य इत्येतद्विचारयति । कथं पुनरात्मशब्दे प्रत्यगात्मविषये श्रूयमाणे संशय इति । उच्यते–अयमात्मशब्दो मुख्यः शक्यतेऽभ्युपगंतुं । सति जीवेश्वरयोरभेदसंभवे । इतरथा तु गौणोऽयमभ्युपगंतव्यः इति मन्यते ॥**

**भाष्यार्थ**—जो शास्त्रोक्तविशेषणानें विशिष्ट असलेला परमात्मा 'तो मी' असें येथें ग्रहण करावें कीं 'तो मद्भिन्न आहे–माझ्याहून निराळा आहे' असें ग्रहण करावें, याचा सूत्रकार विचार करितात. [–पण अशा संशयाच्या अभावामुळें या अधिकरणावर '**कथं०**' इत्यादि भाष्यानें आक्षेप–]=' अहोपण, प्रत्यगात्मा या अर्थी आत्मशब्द येथें श्रुत असतांना त्याविषयीं संशय कसा येतो' '**इति**'– असा आक्षेपक आक्षेप घेतो. [–आत्मशब्दाला मुख्यार्थत्व असलें तर अभेदसिद्धि होते व अभेदसिद्धि असली तर मुख्यार्थत्वाची सिद्धि होते, असा अन्योन्याश्रय दोष येत असल्यामुळें आणि प्रत्यक्षादि दुसऱ्या प्रमाणांशींहि विरोध येत असल्यामुळें आत्म्याच्या मुख्यार्थत्वाची असिद्धि होते, म्हणून त्याच्या आश्रयानें संशयावर आक्षेप येत नाहीं, त्यामुळें हें अधिकरण आरंभणीय आहे असें '**उच्यते०**'

इत्यादि भाष्यानें सांगतात–]=याचें समाधान सांगितलें जातें–जीव व ईश्वर यांच्या अभेदाचा संभव असतांना हा 'आत्म-'शब्द मुख्य आहे असें मानितां येणें शक्य नाहीं. पण उलटपक्षीं हा गौण आहे असें मानावें लागेल, असें सूत्रकार समजतात. [आणि येथें विरोध व परिहार यांचीं फलें समाधीच्या उपयोगित्वानें प्रासंगिक आहेत. ध्यानावस्थेंत प्रत्यग्रूपानें ब्रह्माचें चिंतन करावें अशा कथनामुळें याच्या पादादिसंगति आहेत. –पूर्वपक्षांत 'ऐक्यविषयश्रुतींना गौणार्थत्व आहे' व सिद्धान्तांत 'त्यांना मुख्यार्थत्व आहे' अशा आशयानें भाष्यकार '**किं०**' इत्यादि भाष्यानें पूर्वपक्षाचें ग्रहण करितात–]

**भाष्यं––किं तावत्प्राप्तं । नाहमिति ग्राह्यः । न हि अपहतपाप्मत्वादिगुणो विपरीतगुणत्वेन शक्यते ग्रहीतुं विपरीतगुणो वा अपहतपाप्मत्वादिगुणत्वेन । अपहतपाप्मत्वादिगुणश्च परमेश्वरः तद्विपरीतगुणस्तु शारीरः । ईश्वरस्य च संसार्यात्मत्वे ईश्वराभावप्रसंगः । ततः शास्त्रानर्थक्यम् ॥**

**भाष्यार्थ**––'त्यांतील अगोदर कोणता पक्ष प्राप्त झाला ?' 'तो मी' असें ग्रहण करण्यास तो योग्य नाहीं, असें प्राप्त झालें [–'द्वा सुपर्णा०' इत्यादि भेदश्रुति असल्यामुळें जीव व ईश्वर यांचा भेद उपास्य-उपासकादिभावरूप भेदलिंगांनीं युक्त आहे, असा याचा भावार्थ.–पूर्ववादी '**न हि०**' इत्यादि भाष्यानें युक्तितःहि भेद सांगतो–]=कारण अपहतपाप्मत्वादि-गुणांनीं युक्त असलेला परमात्मा विपरीतगुणत्वानें ग्रहण करणें शक्य नाहीं, किंवा विपरीत गुणांनीं म्हणजे पाप, जरा, मरण इत्यादिकांनीं युक्त असलेला जीव अपहतपाप्मत्वादि गुणत्वानें ग्रहण करणें शक्य नाहीं [–'जीव व ईश्वर यांचें विपरीतगुणत्व असिद्ध आहे' अशी आशंका घेऊन '**अपहतपाप्मत्वादिगुणः०**' इत्यादि भाष्यानें वादी म्हणतो–]=आणि परमेश्वर अपहतपाप्मत्वादि-गुणांनीं विशिष्ट आहे, पण शारीर आत्मा त्याहून विपरीतगुणांनीं युक्त आहे. [–'शिवाय त्यांचा अभेद जरी असला तरी ईश्वराला जीवात्मत्व आहे कीं जीवाला ईश्वरात्मत्व आहे' असा विकल्प करून वादी त्यांतील पहिल्या पक्षाला '**ईश्वरस्य०**' या भाष्यानें दूषित करितो–]=आणि ईश्वराला संसार्यात्मत्व–संसारिरूपत्व असल्यास ईश्वराचा अभाव होण्याचा प्रसंग येतो, त्यामुळें शास्त्राला आनर्थक्य प्राप्त होतें. [–पूर्वोक्त विकल्पांतील दुसऱ्या कल्पाचें '**संसारिणोऽपि०**' इत्यादि भाष्यानें निरसन–]

**भाष्यं––संसारिणोऽपीश्वरात्मत्वे अधिकार्यभावाच्छास्त्रानर्थक्यमेव । प्रत्यक्षादिविरोधश्च । अन्यत्वेऽपि तादात्म्यदर्शनं शास्त्रात्कर्तव्यं प्रतिमादिष्विव**

**विष्णवादिदर्शनमिति चेत्काममेवं भवतु । न तु संसारिणो मुख्य आत्मेश्वर इत्येतन्नः प्रापयितव्यम् ॥**

**भाष्यार्थ**--संसारी जीवालाहि ईश्वरात्मत्व आहे असें मानिल्यास अधिकाऱ्याचा अभाव होत असल्यामुळें शास्त्रानर्थक्यच प्राप्त होतें. [-'मी सुखी' इत्यादि अनुभवानें व 'विरुद्धस्वभावत्वामुळें अग्नि-हिमांप्रमाणें जीवेश्वरांचा भेद आहे' या अनुमानानें विरोध सिद्ध होत असल्यामुळें त्यांचें ऐक्य नाहीं, असें '**प्रत्यक्षादि०**' इत्यादि भाष्यानें सांगतो-]=आणि प्रत्यक्षादिविरोध हा दोषहि या अभेदपक्षावर येतो [-'तर मग एकत्व-उपदेशाची काय गति?' अशी आशंका घेऊन वादी '**अन्यत्वेऽपि०**' इत्यादि भाष्यानें व्याजानें त्याची गति सांगतो-]=जीवेश्वरांना अन्यत्व जरी असलें तरी प्रतिमादिकांतील विष्णवादिदर्शनाप्रमाणें शास्त्रप्रामाण्यामुळें तादात्म्यदर्शन करावें, असें जर म्हणत असाल तर तसें खुशाल असो; [-'तर मग तादात्म्यदर्शनाचा अंगीकार करण्यामध्यें तुमचा मतविरोध नाहीं, असें झालें' अशी आशंका घेऊन वादी '**न तु०**' इत्यादि भाष्यानें म्हणतो-]=पण संसारी जीवाचा मुख्य आत्मा ईश्वर नाहीं हें एवढेंच आम्हांला येथें प्राप्त करवावयाचें आहे. [-याप्रमाणें एकत्वश्रुतींना प्राप्त झालेल्या गौणार्थत्वाचा अनुवाद करून '**एवं०** इत्यादि भाष्यानें सिद्धान्त सांगतात-]

**भाष्यं**-- **एवं प्राप्ते ब्रूमः—आत्मेत्येव परमेश्वरः प्रतिपत्तव्यः । तथा हि परमेश्वरप्रक्रियायां जाबाला आत्मत्वेनैव एतमुपगच्छन्ति— "त्वं वा अहमस्मि भगवो देवतेऽहं वै त्वमसि भगवो देवते" इति । तथान्येऽपि 'अहं ब्रह्मास्मि' इत्येवमादयः आत्मत्वोपगमा द्रष्टव्याः । ग्राहयन्ति चात्मत्वेनैवेश्वरं वेदान्तवाक्यानि 'एष त आत्मा सर्वान्तरः' 'एष त आत्माऽन्तर्याम्यमृतः' 'तत्सत्यं स आत्मा तत्त्वमसि' इत्येवमादीनि ॥**

**भाष्यार्थ**—असा पूर्वपक्ष प्राप्त झाला असतां आम्ही त्याचा सिद्धान्त सांगतों- [-'**आत्मा०**' इत्यादि भाष्यानें सिद्धान्तसूत्राची योजना-]='आत्मा' असाच तो परमेश्वर जाणावा. [-'**तथा हि०**' इत्यादि भाष्यानें त्याविषयीं प्रमाण-] =कारण जाबाल परमेश्वरप्रकरणांत 'हे पूज्य देवते! तूंच मी आहें, व मीच तूं आहेस' असें आत्मत्वानेंच या परमेश्वराला जाणतात. [-'**तथा०**' इत्यादि भाष्यानें दुसरें आत्मत्वोपगम दाखवितात-]=तसेंच 'मी ब्रह्म आहें' इत्यादि हें दुसरेंहि आत्मत्वोपगम जाणावें ['आदि-'शब्दानें 'म्हणून जो मी तो हा व जो हा तो मी' इत्यादि आत्मत्वोपगम घ्यावे.-'**ग्राहयन्ति०**' इत्यादि भाष्यानें अवशिष्ट सूत्रावयवाचें

व्याख्यान-]=आणि 'हा तुझा आत्मा सर्वान्तर आहे'-बृ.३. ४. १.-'हा तुझा आत्मा अंतर्यामी अमृत आहे'-बृ. ३. ७. ३.-'तें सत्य, तो आत्मा व तें तूं आहेस' हीं अशा प्रकारचीं वेदान्तवाक्यें ईश्वराचें आत्मत्वानेंच ग्रहण करवितात. [-'**यदुक्तं०**' इत्यादि भाष्यानें परोक्ताचा अनुवाद करून त्याला दूषित करितात-]

**भाष्यं**-- **यदुक्तं प्रतीकदर्शनमिदं विष्णुप्रतिमान्यायेन भविष्यतीति, तदयुक्तम् । गौणत्वप्रसंगात् । वाक्यवैरूप्याच्च । यत्र हि प्रतीकदृष्टिरभिप्रेयते, सकृदेव तत्र वचनं भवति । यथा 'मनो ब्रह्म' 'आदित्यो ब्रह्म' इत्यादि । इह पुनः 'त्वमहमस्म्यहं च त्वमसि' इत्याह । अतः प्रतीकश्रुतिवैरूप्यादभेदप्रतिपत्तिः ॥**

**भाष्यार्थ**—आतां वाद्यानें 'विष्णुप्रतिमान्यायानें हें प्रतीकदर्शन असेल' असें जें म्हटलें आहे-पृ.६२१-तें अयुक्त आहे, कारण तसें मानिल्यास गौणत्वप्रसंग येतो. [ एकत्वश्रुतींच्या तात्पर्याची म्ह० एकत्वपरत्वाची सिद्धि त्यांचें अपूर्वार्थत्व व फलवत्त्व यांनीं सिद्ध होतें आणि मुख्य वृत्ति संभवत असतांना त्यांच्या गौणत्वाचा असंभव आहे. तसेंच द्वैतश्रुति व द्वैतलिंगें यांना अद्वैताहून विपरीतत्व असल्यामुळें कल्पित भेदालंबनत्व आहे म्ह० कल्पित भेद हा त्यांचा आधार आहे. म्हणून जीव व ब्रह्म यांचें मुख्यच ऐक्य आहे ,असा भावार्थ.-आणि याहि कारणानें हें प्रतीकदर्शन नव्हे, असें '**वाक्यवैरूप्यात्०**' इत्यादि भाष्यानें सांगतात-]= आणि वाक्याच्या वैरूप्यामुळेंहि येथें प्रतीकदृष्टि अभीष्ट नाहीं. कारण जेथें प्रतीकदृष्टि अभिप्रेत असते तेथें एकदाच वचन असतें. जसें 'मन ब्रह्म आहे' -छां. ३. १८. १.-'आदित्य ब्रह्म आहे'-छां. ३. १९. १.-इत्यादि एकेकदाच वचन आहे. पण येथें 'तूं मी आहें व मी तूं आहेस' असें श्रुति सांगते. यास्तव प्रतीकश्रुतिवैरूप्यामुळें अभेदप्रतिपत्ति-अद्वैतज्ञान होतें. [-'**भेददृष्ट्यपवादात्०**' इत्यादि भाष्यानें भेदाची निंदा केलेली असल्यामुळेंहि अभेदालाच प्रतिपाद्यत्व आहे असें सांगतात-]

**भाष्यं**-- **भेददृष्ट्यपवादाच्च । तथाहि- 'अथ योऽन्यां देवतामुपास्तेऽन्योऽसावन्योऽहमस्मीति न स वेद' 'मृत्योः स मृत्युमाप्नोति य इह नानेव पश्यति' 'सर्वं तं परादाद्योऽन्यत्रात्मनः सर्वं वेद' इत्येवमाद्या भूयसी श्रुति भेददर्शनमपवदति ॥**

**भाष्यार्थ**—आणि भेददृष्टीचा अपवाद केलेला असल्यामुळेंहि अभेदच प्रतिपाद्य आहे. भेददृष्टीचा अपवाद कसा केला आहे तो पहा-"आतां जो उपासक मी भिन्न व हें माझें उपास्य भिन्न आहे असें मानून अन्यदेवतेची उपासना

करितो तो तत्त्वाला जाणत नाहीं "–बृ. १. ४. १०.–" जो या तत्त्वामध्यें अणुकाय भेद पहातो तो मृत्यूपासून मृत्यूस–मृत्युपरंपरेस प्राप्त होतो "–बृ. ४. ४. १९. का. २. १. १०. आत्मप्र. १.–" जो सर्व आत्म्याहून भिन्न समजतो त्याला तें सर्व पुरुषार्थापासून दूर सारतें."–बृ. ४. ५. ७.–ही व अशा प्रकारची पुष्कळ श्रुति भेददर्शनाचा अपवाद–निंदा करिते. [–' यत्तु० ' इत्यादि भाष्यानें ' जीवब्रह्मांचा विरुद्धस्वभावत्वामुळें भेद आहे ' असें जें वाद्यानें–पृ. ६३०–म्हटलें आहे त्याचा अनुवाद करून निरसन करितात–]

**भाष्यं— यत्तूक्तं न विरुद्धगुणयोः अन्योन्यात्मत्वसंभव इति । नायं दोषः । विरुद्धगुणताया मिथ्यात्वोपपत्तेः । यत्पुनरुक्तं ईश्वराभावप्रसंग इति । तदसत् । शास्त्रप्रामाण्याद् अनभ्युपगमाच्च । न हीश्वरस्य संसार्यात्मत्वं प्रतिपाद्यते इत्यभ्युपगच्छामः । किं तर्हि संसारिणः संसारित्वापोहेनेश्वरात्मत्वं प्रतिपिपादयिषितमिति । एवं च सति अद्वैतेश्वरस्य अपहतपाप्मत्वादिगुणता विपरीतगुणता त्वितरस्य मिथ्येति व्यवतिष्ठते ॥**

**भाष्यार्थ**—पण 'विरुद्ध गुणांनी युक्त असलेल्या जीव-ब्रह्मांच्या अन्योन्यात्मत्वाचा –ऐक्याचा संभव नाहीं' असें जें म्हटलें आहे तो दोष येत नाहीं. कारण त्यांच्या विरुद्धगुणत्वाचें मिथ्यात्व उपपन्न होतें. [ बिंब-प्रतिबिंबांप्रमाणें विरुद्धधर्माध्यास अविद्याकृत आहे, तो तात्त्विक–वास्तव नव्हे, म्हणून त्यांचें तात्त्विक ऐक्य आहे, असा भावार्थ.–आतां जीवेश्वरांचा अभेद जरी असला तरी 'ईश्वराला संसाऱ्यात्मत्व –जीवरूपत्व आहे कीं संसारी जीवाला ईश्वरात्मत्व आहे ' असा विकल्प करून वाद्यानें त्यांतील पहिल्या पक्षीं जें दूषण दिलें आहे त्याचा अनुवाद करून त्याला दूषित करितात–]=' **यत् पुनः०** '–परंतु ईश्वराचा अभाव होण्याचा प्रसंग येतो. –पृ.६३१–असें जें वाद्यानें म्हटलें आहे तें अनुपपन्न आहे. शास्त्रप्रामाण्यामुळें व अनभ्युपगमामुळें.[–अनभ्युपगमाचेंच '**न हि०**' इत्यादि भाष्यानें विवरण–]=कारण ईश्वराचें संसाऱ्यात्मत्व प्रतिपादिलें जातें असें आम्ही मानीतच नाहीं. [–'**किं तर्हि०**' इत्यादि भाष्यानें प्रश्नपूर्वक विकल्पांतील दुसऱ्या कल्पाचा अंगीकार–]=तर मग काय, संसारी जीवाच्या संसारित्वाचें निरसन करून त्याचें ईश्वरात्मत्व प्रतिपिपादयिषित–विवक्षित आहे, असें आम्ही मानितों [–विरुद्धांशाच्या त्यागानें जीवाचें ब्रह्मत्व प्रतिपाद्य आहे असें आमचें मत असल्यामुळें वाद्यानें सांगितलेलें जीवेश्वरांचें विरुद्धधर्मत्व असिद्धच आहे, असें फलित ' **एवं च०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=आणि असें असल्यामुळें अद्वैत ईश्वराला अपहतपाप्मत्वादिगुणत्व

आहे, पण जीवाचें विपरीतगुणत्व मिथ्या आहे, असें निश्चित होतें. [–संसारी जीवाच्या संसारित्वाचें निरसन करून त्याचें ब्रह्मत्व साध्य आहे, याविषयीं वाद्यानें जें म्हटलें आहे त्याचा 'यदपि०' इत्यादि भाष्यानें अनुवाद करून निरसन करितात–]

**भाष्यं— यदप्युक्तं अधिकार्यभावः । प्रत्यक्षादिविरोधश्चेति । तदप्यसत् । प्राक्प्रबोधात्संसारित्वाभ्युपगमात् । तद्विषयत्वाच्च प्रत्यक्षादिव्यवहारस्य । 'यत्र त्वस्य सर्वमात्मैवाभूत्तत्केन कं पश्येत्' इत्यादिना हि प्रबोधे प्रत्यक्षाद्यभावं दर्शयति ॥**

**भाष्यार्थ**—वाद्यानें 'अद्वैतपक्षीं अधिकाऱ्याचा अभाव होतो व प्रत्यक्षादि प्रमाणांशीं विरोध येतो' असेंहि जें म्हटलें आहे तें सुद्धां अनुपपन्न आहे. [–'अधिकाऱ्याचा अभाव, प्रत्यक्षादि-विरोध इत्यादि दोष एकत्वज्ञानाच्या पूर्वी येतात कीं त्यानंतर' असा विकल्प करून त्यांतील पहिल्या पक्षाचें '**प्राक्०**' इत्यादि भाष्यानें निरसन–]=कारण एकत्वबोध होण्यापूर्वी जीवाच्या संसारित्वाचा आम्हीं स्वीकार केलेला आहे व प्रत्यक्षादिव्यवहाराला तद्विषयत्व आहे म्ह० प्राक्-प्रबोधावस्था हा व्यवहाराचा विषय आहे. [–'**यत्र तु०**' इत्यादि भाष्यानें दुसऱ्या कल्पाचा अंगीकार करितात–]=" पण ज्या विद्यावस्थेंत या विद्वानाचा आत्माच सर्व होतें त्या अवस्थेंत तो कोणत्या साधनानें कोणता विषय पहाणार ? "–बृ.२ ४. १४.–इत्यादि वचनानें प्रबोध झाला असतां श्रुति प्रत्यक्षादिकांचा अभाव दाखविते. [–आतां वादी श्रुतिश्रद्धालुत्वानें '**प्रत्यक्षाद्यभावे०**' इत्यादि भाष्यानें शंका घेतो–]

**भाष्यं—प्रत्यक्षाद्यभावे श्रुतेरप्यभावप्रसंग इति चेत् । न । इष्टत्वात् । अत्र 'पिताऽपिता भवति' इत्युपक्रम्य 'वेदा अवेदाः' इति वचनाद् इष्यत एवास्माभिः श्रुतेरप्यभावः प्रबोधे ॥**

**भाष्यार्थ**—'अहोपण, प्रत्यक्षादिकांचा अभाव झाला असतां श्रुतीचाहिं अभाव होण्याचा प्रसंग येतो' असें जर म्हणाल तर [–तत्त्वज्ञान झाल्यानंतर श्रुतीचा अभाव आम्हांस इष्टच आहे, त्यामुळें अनिष्टापत्ति हा दोष येत नाहीं, असें '**न०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=तें बरोबर नाहीं. कारण तत्त्वज्ञानोत्तरकालीं श्रुत्यभाव आम्हांला इष्ट आहे. [–तेंच '**अत्र पिता०**' इत्यादि श्रुतीनें स्पष्ट करितात–]=' या अद्वैतावस्थेंत पिता अपिता होतो ' असा उपक्रम करून ' वेद अवेद होतात '–बृ. ४. ३. २२.–असें वचन असल्यामुळें प्रबोधावस्थेंत

श्रुतीचाहि अभाव आम्हांकडून इच्छिला जातोच म्ह० तो आम्हांला इष्टच आहे. [-वादी मनांत गूढ अभिप्राय धरून '**कस्य०**' इत्यादि भाष्यानें प्रश्न करितो-]

**भाष्यं—कस्य पुनरयमप्रबोध इति चेत् । यस्त्वं पृच्छसि तस्य ते, इति वदामः। नन्वहमीश्वर एवोक्तः श्रुत्या । यद्येवं प्रतिबुद्धोऽसि । नास्ति कस्यचिदप्रबोधः । योऽपि दोषश्चोद्यते कैश्चिदविद्यया किलात्मनः सद्वितीयत्वाद् अद्वैतानुपपत्तिरिति । सोऽप्येतेन प्रत्युक्तः । तस्मादात्मेत्येवेश्वरे मनो दधीत ॥ ३ ॥** (२)

**भाष्यार्थ**—' पण ह्या तत्त्वाचा अप्रबोध-अज्ञान कोणाचें आहे ?-त्या अप्रबोधाचा धर्मी कोण ? ' असें जर विचारशील तर [-' **यस्त्वं०** ' इत्यादि भाष्यानें ज्याची भ्रांति त्याचेंच अज्ञान असें सांगतात-]=जो तूं 'हा अप्रबोध कोणाचा ?' असें विचारीत आहेस, त्या तुझाच तो धर्म आहे, असें आम्ही सांगतों. [-आतां पूर्ववादी '**ननु०**' इत्यादि भाष्यानें आपला अभिप्राय सांगतो-]=अहोपण, श्रुतीकडून मी ईश्वरच सांगितला गेलों आहें-श्रुतीनें मी ईश्वरच आहें असें सांगितलें आहे. [-अविद्या व तज्जन्य भ्रांति यांना अनिर्वाच्यत्व असल्यामुळें आत्मबोध झाला असतां त्यांचा अभाव होतो म्हणून त्यांना आश्रयाची अपेक्षा नाहीं असें '**यद्येवं०**' इत्यादि भाष्यानें सांगतात-]=जर श्रुतीकडून तूं ईश्वरच सांगितला गेला आहेस तर तूं प्रतिबुद्ध म्हणजे तूं ज्ञानीच झाला आहेस, त्यामुळें अप्रबोध-अज्ञान कोणाचेंच नाहीं. [-अविद्येला अनिर्वाच्यत्व असल्यामुळें दुसऱ्या आक्षेपाचेंहि निरसन झालें आहे असें ' **योऽपि०**' इत्यादि भाष्यानें सांगतात-]=कित्येकांकडून 'खरोखर अविद्येनें आत्म्याला सद्वितीयत्व असल्यामुळें अद्वैताची अनुपपत्ति-असंभव आहे ' असाहि जो दोष उद्भावित केला जातो-अद्वैतवादावर कित्येकांकडून असाहि जो आक्षेप केला जातो तोहि या कथनानें प्रत्युक्त आहे-त्याचेंहि निरसन झालें आहे. [-याप्रमाणें अभेदश्रुतींचें मुख्यार्थत्व सिद्ध झालें असतां ' **तस्मात्०** ' इत्यादि भाष्यानें फलिताचा उपसंहार करितात-]=म्हणून 'आत्मा' असेंच ईश्वरामध्यें मन धारण करावें- हीच भावना दृढ करावी-असेंच चिंतन करावें. ३.-सु.ब्र.४३१.(२)

( ३. **प्रतीकाधिकरण. सू. ४.** )

--ईश्वरामध्यें आत्मत्वबुद्धि करावी असें सांगितलें, आतां प्रतीकाचें विशेषण अशाहि ईश्वराला आत्मत्व असल्यामुळें त्याच्याद्वारा प्रतीकामध्यें आत्मत्वबुद्धि करावी, असें प्राप्त झालें असतां '**न प्रतीके०**' इत्यादि सूत्रानें सिद्धान्त सांगतात-

**सूत्रं--न प्रतीके न हि सः ॥ ४ ॥ (३)**

**सूत्रार्थ**--प्रतीकामध्यें आत्मबुद्धि-अहंग्रह करूं नये. कारण उपासक आत्मत्वानें प्रतीकाचा अनुभव घेत नाहीं. ४. (३)-सु. ब्र. पृ. ४३२. [-' **मनः०** '

इत्यादि भाष्यानें प्रतीकोपासनांचा उल्लेख करून उपासनामध्यें दोन्ही प्रकारची दृष्टि उपलब्ध होत असल्यामुळें संशय सांगतात–]

**भाष्यं— 'मनो ब्रह्मेत्युपासीतेत्यध्यात्ममथाधिदैवतमाकाशो ब्रह्मेति' तथा 'आदित्यो ब्रह्मेत्यादेशः' 'स यो नाम ब्रह्मेत्युपास्ते' इत्येवमादिषु प्रतीकोपासनेषु संशयः— किं तेष्वप्यात्मग्रहः कर्तव्यो न वेति। किं तावत्प्राप्तम्। तेष्वप्यात्मग्रह एव युक्तः। कस्मात्। ब्रह्मणः श्रुतिष्वात्मत्वेन प्रसिद्धत्वात्। प्रतीकानामपि ब्रह्मविकारत्वाद्ब्रह्मत्वे सत्यात्मत्वोपपत्तेरिति॥**

**भाष्यार्थ—**" मन ब्रह्म आहे, अशी उपासना करावी असें हें अध्यात्म, व आकाश ब्रह्म आहे, असें अधिदैवत "–छां.३.१८.१.–त्याचप्रमाणें "आदित्य ब्रह्म असा हा आदेश आहे."–छां.३.१९.१.–"तो जो नाम ब्रह्म अशी उपासना करितो"–छां. ७. १. ५.–या व अशाच दुसऱ्याहि प्रतीकोपासनांविषयीं 'काय, त्यांमध्येंहि आत्मग्रह करावा कीं करूं नये' असा संशय येतो. [–पूर्वोक्त जीव व ब्रह्म यांच्या अभेदाच्या बलावर ब्रह्मदृष्टीला पात्र असलेल्या प्रतीकांमध्यें 'मी' अशी ब्रह्माभिन्न जीवदृष्टि करावी असा पूर्वपक्ष '**किं तावत्०**' इत्यादि भाष्यानें प्रश्नपूर्वक सांगतात–]=तेव्हां अगोदर त्यांतील कोणता पक्ष प्राप्त झाला? त्या प्रतीकांमध्येंहि आत्मग्रह–अहंग्रहच युक्त आहे. [–येथें प्रासंगिक अहंग्रहाच्या निरसनानें प्रतीकोपासनांमध्यें प्रयोगभेद सांगितलेला असल्यामुळें याच्या पादादिसंगति आहेत. पूर्वपक्षांत 'प्रतीकोपासनांचा अहंग्रहोपासनांशीं अविशेष–साम्य आहे' व सिद्धान्तांत 'विशेष सिद्ध होतो,' असें स्वीकारून पूर्वपक्षाविषयीं हेतु विचारतात–] =कोणत्या कारणानें? [–वादी प्रतीकामध्यें आत्मत्वग्रहण करण्याविषयीं त्यांच्या आत्मत्वोपपत्तीचा हेतु सांगतो–]='**ब्रह्मणः०**'–श्रुतींमध्यें ब्रह्माला आत्मत्वानें प्रसिद्धत्व आहे–उपनिषदांत ब्रह्म आत्मत्वानें प्रसिद्ध आहे. [–"अहोपण, ब्रह्माला जरी आत्मत्व असलें तरी प्रतीकांना आत्मत्व कसें?" वादी '**प्रतीकानां०**' इत्यादि भाष्यानें याचें उत्तर देतो–]=प्रतीकांनाहि ब्रह्मविकारत्व असल्यामुळें ब्रह्मत्व आहे, आणि त्यांना ब्रह्मत्व आहे असें सिद्ध झालें असतां त्यांच्या आत्मत्वाची उपपत्ति लागते, त्यांचें आत्मत्व संभवतें, म्हणून प्रतीकांमध्येंहि आत्मग्रहच युक्त आहे. ['ब्रह्मबुद्धीनें युक्त असलेल्या प्रतीकांचेंहि 'अहं' असेंच ग्रहण करणें युक्त आहे. कारण प्रतीकांना ब्रह्माभिन्नत्व आहे, अहंप्रमाणें,' असा याचा भावार्थ. –याप्रमाणें दोन प्रकारच्या उपासनांमध्यें असा अविशेष प्राप्त झाला असतां '**एवं०**' इत्यादि भाष्यानें सिद्धान्त सांगतात–]

**भाष्यं— एवं प्राप्ते ब्रूमः— न प्रतीकेष्वात्ममतिं बध्नीयात् । न हि स उपासकः प्रतीकानि व्यस्तान्यात्मत्वेनाकलयेत् । यत्पुनर्ब्रह्मविकारत्वात्प्रतीकानां ब्रह्मत्वं ततश्चात्मत्वमिति । तदसत् । प्रतीकाभावप्रसंगात् । विकारस्वरूपोपमर्देन हि नामादिजातस्य ब्रह्मत्वमेवाश्रितं भवति । स्वरूपोपमर्दे च नामादीनां कुतः प्रतीकत्वमात्मग्रहो वा ॥**

**भाष्यार्थ**—असा पूर्वपक्ष प्राप्त झाला असतां 'प्रतीकांमध्यें आत्ममति करूं नये' असें आम्ही सांगतों. [ ' प्रतीकांमध्यें आत्ममति करूं नये, कारण त्यांच्या ऐक्यविधीचा अभाव असून त्यांना स्वतःहून भिन्नत्व आहे, उद्गीथादिकांप्रमाणें ' असें अनुमान ' न प्रतीकेषु० ' इत्यादि भाष्यानें सांगितलें आहे. –पण ' प्रतीकांना ब्रह्मरूपत्व असल्यामुळें तीं ' अहं ' अशा प्रत्ययानें ग्राह्य आहेत ' असें जें वाद्यानें वर म्हटलें आहे त्याविषयीं ' त्यांचा आत्मानुभव येत असल्यामुळें तीं आत्मत्वानें ग्राह्य आहेत कीं त्यांचें आत्मत्व दुसऱ्या प्रमाणानें सिद्ध असल्यामुळें तीं आत्मत्वानें ग्राह्य आहेत ' असा विकल्प करून त्यांतील पहिला पक्ष संभवत नाहीं, असें **' न हि० '** इत्यादि भाष्यानें सांगतात–]=कारण तो उपासक व्यस्त प्रतीकांचें म्ह० अनेक प्रतीकांतील प्रत्येक प्रतीकाचें आत्मत्वानें ग्रहण करूं शकणार नाहीं. त्याला प्रत्येक प्रतीक मीच आहें असा अनुभव येत नाहीं. [–**'यत् पुनः०'** इत्यादि भाष्यानें दुसऱ्या पक्षाचा अनुवाद करून त्याला दूषित करितात–]=पण 'ब्रह्मविकारत्वामुळें प्रतीकांना ब्रह्मत्व आहे आणि त्यांना ब्रह्मत्व असल्यामुळें आत्मत्व आहे' असें जें वाद्यानें वर म्हटलें आहे तें अनुपपन्न आहे. कारण या पक्षीं प्रतीकाचा अभाव होण्याचा प्रसंग येतो. [–**' विकार०'** इत्यादि भाष्यानें तो प्रसंगच प्रकट करितात–]=कारण विकाराच्या स्वरूपाचा नाश करून नामादिजाताचें ब्रह्मत्वच स्वीकारिलेलें आहे असें होतें. [–" विकारस्वरूपाच्या नाशानें नामादि सर्व प्रतीकांच्या ब्रह्मत्वाचाच आश्रय केलेला आहे असें जरी झालें तरी त्यांत काय दोष आहे ? " **' स्वरूपोपमर्दे०'** इत्यादि भाष्यानें उत्तर–]=आणि नामादिकांच्या स्वरूपाचाच नाश झाला असतां त्यांना प्रतीकत्व कोठचें व आत्मग्रह तरी कोठचा! [नामादिकांच्या स्वाभाविक विकाररूपानें ब्रह्मत्वाचा असंभव आहे. त्यामुळें जीवत्वाच्या लयानें जीवाचें ब्रह्मत्वकथन जसें केलें आहे तसेंच प्रतीकत्वलयानें त्यांचेंहि ब्रह्मत्व कथन केल्यास उपासनेच्या आलंबनाचा अभाव होत असल्यामुळें उपासना विहित होणार नाहीं असा याचा भावार्थ.–आतां ' ब्रह्मत्व असून आत्मत्व असल्यामुळें' असें जें वाद्यानें म्हटलें आहे त्याचें **'न च०'** इत्यादि भाष्यानें निरसन–]

**भाष्यं— न च ब्रह्मणः आत्मत्वाद्ब्रह्मदृष्ट्युपदेशेष्वात्मदृष्टिः कल्प्या । कर्तृत्वाद्यनिराकरणात् । कर्तृत्वादिसर्वसंसारधर्मनिराकरणेन हि ब्रह्मणः आत्मत्वोपदेशः । तदनिराकरणेन चोपासनविधानम् । अतश्चोपासकस्य प्रतीकैः समत्वादात्मग्रहो नोपपद्यते । न हि रुचकस्वस्तिकयोः इतरेतरात्मत्वमस्ति । सुवर्णात्मत्वेनेव तु ब्रह्मात्मत्वेनैकत्वे प्रतीकाभावप्रसंगमवोचाम । अतो न प्रतीकेष्वात्मदृष्टिः क्रियते ॥ ४ ॥ ( ३ )**

**भाष्यार्थ**—आणि ब्रह्माला आत्मत्व असल्यामुळें ब्रह्मदृष्टि-उपदेशांमध्यें आत्मदृष्टि कल्पिणें उचित नाहीं. कारण त्यांत कर्तृत्वादिकांचें निराकरण झालेलें नसतें. [—"अहोपण,प्रतीकोपदेशांमध्यें कर्तृत्वादिकांचें अनिराकरण कसें?" '**कर्तृत्वादि०**'—इत्यादि भाष्यानें उत्तर—]=कारण कर्तृत्वादि सर्व संसारधर्मांच्या निराकरणानेंच ब्रह्माच्या आत्मत्वाचा उपदेश व त्याच्या अनिराकरणानेंच उपासनेचें विधान केलें जातें. [कारण त्याचें निराकरण केल्यास त्याचा विधिच संभवणार नाहीं, असा याचा भावार्थ.—प्रतीकें व जीव यांचें परिच्छिन्नतेनें साम्य मानून—परिच्छिन्नत्वानें त्यांच्या साम्याचें ग्रहण करून '**अतश्च०**' इत्यादि भाष्यानें फलित सांगतात—]=म्हणून उपासकाचें प्रतीकांशीं साम्य असल्यामुळें प्रतीकोपासनांमध्यें आत्मग्रह उपपन्न होत नाहीं. [—" अहोपण, त्यांना असें तुल्यत्व जरी असलें तरी त्यांच्या ठिकाणीं विधीच्या सामर्थ्यानें जीवाचा अहंग्रह कां होणार नाहीं!"—' **न हि०**' इत्यादि भाष्यानें उत्तर—]=कारण रुचक व स्वस्तिक यांना इतरेतरात्मत्व—परस्पर एकरूपत्व नाहीं. [—"अहोपण, स्वरूपानें त्यांच्या ऐक्याचा अभाव जरी असला तरी रुचक व स्वस्तिक यांचें सुवर्णरूपानें जसें ऐक्य असतें तसेंच येथेंहि ब्रह्मरूपानें प्रतीक व आत्मा यांचें ऐक्य असल्यामुळें अहंग्रह संभवेल " अशी आशंका घेऊन ' **सुवर्ण०** ' इत्यादि भाष्यानें म्हणतात—]=पण ' त्यांचें सुवर्णरूपानें जसें एकत्व आहे तसें ब्रह्मरूपत्वानें जीव व प्रतीक यांना एकत्व असल्यास प्रतीकाचा अभाव होण्याचा प्रसंग येतो ' असें आम्हीं वर सांगितलें आहे. [ विकाररूपाच्या तिरस्कारानेंच त्यांचें ऐक्य मानिल्यास मन, आदित्य इत्यादिकांना प्रतीकत्व नाहीं,असें आम्हीं सांगितलें आहे, असा याचा भावार्थ. —परस्पर व्यावृत्तस्वरूप असलेल्या रुचक-स्वस्तिकांचेंहि ऐक्य त्यांत अनुवृत्त होणाऱ्या सुवर्णादिरूपत्वाची कल्पना केल्यावांचून सिद्ध होत नाहीं, हें प्रसिद्धच आहे, असें मानून ' **अतः०**' इत्यादि भाष्यानें उपसंहार—]=म्हणून प्रतीकांमध्यें आत्मदृष्टि केली जात नाहीं. ४.—सु. ब्र. ४३३. ( ३ ).

(४. **ब्रह्मदृष्ट्यधिकरण. सू. ५.**)

--' अहंग्रहोपासनांमध्यें जसें, तसें प्रतीकोपासनांमध्यें अहंग्रहानें अनुष्ठान होत नाहीं ' असें सांगितलें. आतां ' प्रतीकोपासनांतच कोणामध्यें कोणाच्या दृष्टीच्या अध्यास करावा ' असा संदेह करणाऱ्या वाद्याला उद्देशून सूत्रकार '**ब्रह्म-दृष्टिः०** ' इत्यादि सूत्रानें सांगतात--

**सूत्रं--ब्रह्मदृष्टिरुत्कर्षात्** ॥ ५ ॥ ( ४ )

**सूत्रार्थ**--प्रतीकांत ब्रह्मदृष्टि करावी. कारण ब्रह्माचा उत्कर्ष आहे. निकृष्टामध्यें उत्कृष्टाची दृष्टि केली असतां निकृष्टाची उत्कृष्टता होते ५.(४.)-सु. ब्र. ४३४. [-एकविषयत्वानें पूर्वोत्तर अधिकरणांची संगति मानणारे भाष्यकार ' **तेषु एव०** ' इत्यादि भाष्यानें विषय व संशय दाखवितात-]

भाष्यं-- **तेष्वेवोदाहरणेष्वन्यः संशयः-- किमादित्यादिदृष्टयो ब्रह्मण्यध्य-सितव्याः । किंवा ब्रह्मदृष्टिरादित्यादिष्विति । कुतः संशयः । सामानाधिकरण्ये कारणानवधारणात् । अत्र हि ब्रह्मशब्दस्यादित्यादिशब्दैः सामानाधिकरण्यं उपलभ्यते । ' आदित्यो ब्रह्म ' 'प्राणो ब्रह्म' 'विद्युद्ब्रह्म' इत्यादिसमानविभक्ति-निर्देशात्** ॥

**भाष्यार्थ**--त्याच उदाहरणांमध्यें 'काय आदित्यादि-दृष्टींचा ब्रह्मामध्यें अध्यास करावा कीं ब्रह्मदृष्टि आदित्यादिकांमध्यें अध्यसित करावी ? ' असा दुसरा संशय येतो. [-' **कुतः०** ' इत्यादि भाष्यानें प्रश्नपूर्वक संशयाचें बीज सांगतात-]= पण असा हा संशय कोणत्या कारणानें येतो ? कारण सामानाधिकरण्यांत कार-णाचें अनवधारण आहे. [-हेंच व्यक्त करण्यासाठीं ' **अत्र०** ' इत्यादि भाष्यानें अगोदर सामानाधिकरण्यज्ञान दाखवितात-]=कारण येथें ब्रह्मशब्दाचें आदित्यादि-शब्दांशीं सामानाधिकरण्य-एकविभक्तित्व उपलब्ध होतें, कारण ' आदित्य ब्रह्म आहे, प्राण ब्रह्म आहे, विद्युत् ब्रह्म आहे ' इत्यादि उपासनाविधींमध्यें आदित्यादि व ब्रह्म यांचा समानविभक्तीनें निर्देश केला आहे. [-" अहोपण, या सामाना-धिकरण्याचा ' यथाकथंचित् '-गौणादिवृत्तीनें संभव असतांना संशयाची सिद्धि कोणत्या कारणानें होते?" अशी आशंका घेऊन 'तो हा' याप्रमाणें येथें एकत्वनिमित्त सामानाधिकरण्य आहे कीं तें प्रकृतिविकारत्वनिमित्त आहे, कीं समारोपकृत आहे,असा विकल्प करून '**न च०**' इत्यादि भाष्यानें त्यांतील पहिल्या पक्षाला दूषित करितात-]

भाष्यं-- **न चात्रांजसं सामानाधिकरण्यमवकल्पते । अर्थान्तरवचनत्वाद्ब्र-ह्मादित्यादिशब्दानाम् । न हि भवति गौरश्व इति सामानाधिकरण्यम्** ॥

**भाष्यार्थ**--या उदाहरणांत साक्षात् एकत्वनिमित्त सामानाधिकरण्य उपपन्न होत नाहीं, कारण ब्रह्म व आदित्यादि, या शब्दांना अर्थान्तरवाचकत्व आहे. [-ज्यांचा अर्थ भिन्न आहे अशा शब्दांमध्यें सामानाधिकरण्याच्या अभावाचें उदाहरण देतात-]=' **न हि०** '-कारण ' बैल, घोडा ' असें हें सामानाधिकरण्य होत नाहीं. [-' **ननु०** ' इत्यादि भाष्यानें विकल्पांतील दुसरा कल्प घेतात-]

**भाष्यं— ननु प्रकृतिविकारभावाद्ब्रह्मादित्यादीनां मृच्छरावादिवत्सामानाधिकरण्यं स्यात् । नेत्युच्यते । विकारप्रविलयो ह्येवं प्रकृतिसामानाधिकरण्यात्स्यात् । ततश्च प्रतीकाभावप्रसंगमवोचाम । परमात्मवाक्यं चेदं तदानीं स्यात्ततश्चोपासनाधिकारो बाध्येत । परिमितविकारोपादानं च व्यर्थम् । तस्मात् ' ब्राह्मणोऽग्निर्वैश्वानरः ' इत्यादिवदन्यत्रान्यदृष्ट्यध्यासे सति क किंदृष्टिरध्यस्यतामिति संशयः ॥**

**भाष्यार्थ**--"अहोपण, ब्रह्म व आदित्यादि यांचें मृत्-शरावादिकांप्रमाणें प्रकृतिविकारभावामुळें सामानाधिकरण्य संभवेल." [-पण उपासनाविरोधामुळें तें संभवत नाहीं, असें ' **न०** ' इत्यादि भाष्यानें सांगतात-]=प्रकृतिविकारभावामुळें ब्रह्म व आदित्य यांचें सामानाधिकरण्य संभवत नाहीं, असें आम्हांकडून सांगितलें जातें. कारण असें मानिल्यास प्रकृतीच्या सामानाधिकरण्यामुळें विकाराचा प्रविलय-सर्वथा विलयच होईल, आणि त्यामुळें प्रतीकाच्या अभावाचा प्रसंग आम्हीं सांगितला आहे. -पृ.६३८-[-"अहोपण, हें वाक्य प्रविलयपरच आहे, उपासनापर नाहीं" अशी आशंका घेऊन ' उपासीत ' या श्रुतीशीं विरोध येत असल्यामुळें वाक्य प्रविलयपर नाहीं, असें '**परमात्मवाक्यं०**' इत्यादि भाष्यानें सांगतात-]=आणि तसें मानिल्यास हें परमात्मवाक्य आहे असें होईल व त्यामुळें उपासनाधिकार-उपासनाप्रकरण बाधित होईल. [-प्रपंचप्रविलयद्वारा वाक्याला परमात्मपरत्व असल्यास आदित्यादि कांहीं थोड्याशाच पदार्थांचें ग्रहण करणें व्यर्थ होईल. ' आदित्यादिकांचें ग्रहण सर्व प्रपंचाच्या उपलक्षणार्थ आहे ' असेंहि म्हणतां येत नाहीं. कारण मुख्याचा संभव असतांना लक्षणा करणें अयोग्य आहे, असें '**परिमित०**'इत्यादि भाष्यानें सांगतात-]=आणि परिमित विकारांचें ग्रहण व्यर्थ होतें. [-याप्रमाणें पहिल्या दोन पक्षांचा असंभव असल्यामुळें अवशिष्ट राहिलेल्या तिसऱ्या पक्षाविषयीं पूर्वोक्त संशय संभवतो असा '**तस्मात्०**' इत्यादि भाष्यानें उपसंहार-] =म्हणून ' ब्राह्मण अग्नि वैश्वानर आहे ' इत्यादिकांप्रमाणें एकामध्यें दुसऱ्याच्या दृष्टीचा अध्यास प्राप्त झाला असतां ' कोणामध्यें कोणाच्या दृष्टीचा आरोप कराव

असा संशय येतो. [–स्वतंत्र पुरुषार्थहेतुभूत प्रासंगिक प्रकृत प्रतीकोपासनांमध्यें ब्रह्मदृष्टीनें अनुष्ठानाचें कथन केल्यानें याच्या पादादिसंगति आहेत. पूर्वपक्षांत 'लौकिकन्यायविरोध' व सिद्धान्तांत 'त्याचा अविरोध सिद्ध होतो' अशा अभिप्रायानें 'तत्र०' इत्यादि भाष्यानें पूर्वपक्ष–]

**भाष्यं— तत्रानियमो नियमकारिणः शास्त्रस्याभावादित्येवं प्राप्तम् । अथवा आदित्यादिदृष्टय एव ब्रह्मणि कर्तव्या इत्येवं प्राप्तम् । एवं ह्यादित्यादिदृष्टिभिर्ब्रह्मोपासितं भवति । ब्रह्मोपासनं च फलवदिति शास्त्रमर्यादा । तस्मान्न ब्रह्मदृष्टिरादित्यादिष्विति ॥**

**भाष्यार्थ—**त्याविषयीं कांहीं नियम नाहीं, कारण नियम करणाऱ्या शास्त्राचा अभाव आहे, असा हा पूर्वपक्ष प्राप्त झाला. [ज्याप्रमाणें आत्यंतिक भेद हा नामादिकांतील अहंग्रहाच्या अभावाविषयीं हेतु सांगितलेला आहे, त्याप्रमाणें त्यांमध्येंच ब्रह्मबुद्धीचें नियामक असें कांहीं एक उपलब्ध झालेलें नाहीं, त्यामुळें अनियम आहे, असा भावार्थ.–'उत्कृष्ट व निकृष्ट यांतील उत्कृष्टच उपास्य आहे. कारण त्याला फलविशेषवत्त्व आहे. राजादिकांप्रमाणें' अशी आशंका घेऊन वादी '**अथवा०**' इत्यादि भाष्यानें साक्षात् पूर्वपक्ष सांगतो–]=किंवा आदित्यादिदृष्टिच ब्रह्मामध्यें कराव्या असें हें प्राप्त झालें, कारण असें मानिल्यानेंच आदित्यादिदृष्टींनीं ब्रह्म उपासित होतें. [–प्रथम श्रुत असलेल्या आदित्यादि-शब्दांच्या अनुरोधानें शेवटीं श्रुत असलेलें ब्रह्मपद न्यावें–त्याचा निर्णय करावा, असें म्हणाल तर तें बरोबर नाहीं, कारण तसें केल्यास फलाच्या अभावाचा प्रसंग येतो, असें '**ब्रह्मोपासनं०**' या भाष्यानें वादी सांगतो–]=आणि ब्रह्मोपासन फलवत्–फलांनीं युक्त आहे अशी शास्त्रमर्यादा आहे. [–वादी '**तस्मात्०**' इत्यादि भाष्यानें या दोन्ही पक्षीं फलित सांगतो–]=म्हणून आदित्यादिकांमध्यें ब्रह्मदृष्टि नाहीं, असें प्राप्त झालें. [–'आदित्यादिदृष्टीनें ब्रह्माची उपासना करावी' असा पूर्वपक्ष प्राप्त झाला असतां '**एवं०**' इत्यादि भाष्यानें सिद्धान्त सांगतात–]

**भाष्यं— एवं प्राप्ते ब्रूमः– ब्रह्मदृष्टिरेवादित्यादिषु स्यादिति । कस्मात् । उत्कर्षात् । एवमुत्कर्षेणादित्यादयो दृष्टा भवन्ति । उत्कृष्टदृष्टेः तेष्वध्यासात् । तथा च लौकिको न्यायोऽनुगतो भवति । उत्कृष्टदृष्टिर्हि निकृष्टेऽध्यसितव्येति लौकिको न्यायः । यथा राजदृष्टिः क्षत्तरि । स चानुसर्तव्यः । विपर्यये प्रत्यवायप्रसंगात् । न हि क्षत्तृदृष्टिपरिगृहीतो राजा निकर्षं नीयमानः श्रेयसे स्यात् ॥**

**भाष्यार्थ**—असें प्राप्त झालें असतां ' ब्रह्मदृष्टि: '–आदित्यादिकांमध्यें ब्रह्मदृष्टिच होते, असें आम्ही सांगतों. [–प्रश्नपूर्वक नियमहेतु सांगतात–]=कोणत्या कारणानें? ' उत्कर्षात् '–उत्कर्षामुळें. [–' **एवं**० ' इत्यादि भाष्यानें हेत्वर्थाचें विवरण–]=असें केल्यानें आदित्यादिक उत्कर्षानें पाहिले गेले आहेत असें होतें. कारण त्यांच्या ठिकाणीं उत्कृष्टाच्या दृष्टीचा अध्यास केलेला आहे. [–उत्कृष्ट व निकृष्ट यांतील उत्कृष्टालाच द्रष्टव्यत्व असल्यामुळें आदित्यादि-दृष्टीनें ब्रह्मच उपास्य आहे असें जे वाद्यानें म्हटलें आहे त्याची आशंका घेऊन ' **तथा च**० ' इत्यादि भाष्यानें म्हणतात–]=आणि तसें केल्यानें लौकिक न्याय अनुसरला आहे, असें होतें. कारण उत्कृष्टाच्या दृष्टीचा निकृष्टामध्यें अध्यास करावा असा लौकिक न्याय आहे.जशी क्षत्त्यामध्यें–राजाच्या समीप राहणाऱ्या भृत्यामध्यें–सारथ्यामध्यें राजदृष्टि. [–" त्याचें अनुसरण करून काय करावयाचें आहे ? " ' **स च**० ' इत्यादि भाष्यानें उत्तर–]=आणि तो लौकिकन्याय अनुसरणें उचित आहे, कारण त्याच्या उलटपक्षीं प्रत्यवायप्रसंग येतो. [–' **न हि**० ' इत्यादि भाष्यानें प्रत्यवायप्रसंगच दृष्टान्तानें स्पष्ट करितात–]=कारण क्षत्तृदृष्टीनें–राजभृत्याच्या दृष्टीनें स्वीकारलेला व निकर्षास–हीनतेस पोंचविला जाणारा राजा केव्हांहि श्रेयस्कर होणार नाहीं. [–' फलमत:० '–या न्यायानें–पृ. २११–ब्रह्माच्याच फलदातृत्व असल्यामुळें त्यालाच आदित्यादिदृष्टींनीं उपास्यत्व आहे, अशी '**ननु**०' इत्यादि भाष्यानें शंका–]

**भाष्यं—ननु शास्त्रप्रामाण्यादनाशंकनीयोऽत्र प्रत्यवायप्रसंगो न च लौकिकेन न्यायेन शास्त्रीया दृष्टिर्नियंतुं युक्तेति । अत्रोच्यते—निर्धारिते शास्त्रार्थे एतदेवं स्यात् । संदिग्धे तु तस्मिंस्तन्निर्णयं प्रति लौकिकोऽपि न्याय आश्रीयमाणो न विरुध्यते । तेन चोत्कृष्टदृष्ट्यध्यासे शास्त्रार्थेऽवधार्यमाणे निकृष्टदृष्टिमध्यस्यन्प्रत्यवेयादिति श्लिष्यते ॥**

**भाष्यार्थ**—अहोपण, शास्त्रप्रामाण्यामुळें येथें प्रत्यवायप्रसंग अनाशंकनीय आहे, शंका घेण्यास योग्य नाहीं. [–शिवाय शास्त्राला स्वत:च–निरपेक्ष प्रामाण्य असल्यामुळें त्याला लौकिकन्यायाची अपेक्षा नाहीं, असें '**न च**०' इत्यादि भाष्यानें आक्षेपक म्हणतो–]=आणि लौकिकन्यायानें शास्त्रीयदृष्टि नियमित करणें युक्त नाहीं, त्यामुळें प्रत्यवायप्रसंग अनाशंकनीय आहे. [–'ब्रह्मालाच जरी फलदातृत्व असलें तरी शास्त्र आदित्यादि प्रतीक ब्रह्मबुद्धीनें ध्येय असतां तें फलद आहे असें सांगतें कीं आदित्यादिबुद्धीनें ब्रह्म उपास्य असतां तें फलद आहे असें सांगतें ? ' असा शास्त्रार्थाविषयीं संदेह आला असतां लौकिकन्यायाच्या अनुसार

निर्धारण करावें, असें 'अत्र०' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=या शंकेचें समाधान असें सांगितलें जातें–शास्त्रार्थ निश्चित झाला असतां ' लौकिकन्यायानें शास्त्रदृष्टि नियमित करणें युक्त नाहीं ' असें हें म्हणणें उपपन्न होईल; पण शास्त्रार्थ संदिग्ध असतांना त्याच्या निर्णयासाटीं आश्रय केला जाणारा लौकिकन्यायहि विरुद्ध होत नाहीं. [–याप्रमाणें लौकिकन्यायाला निश्चयहेतुत्व असतांना उलट-पक्षीं ' तेन च० ' इत्यादि भाष्यानें दोष सांगतात–]=आणि त्यामुळें उत्कृष्ट-दृष्टीचा अध्यास हा शास्त्रार्थ निश्चित केला जात असतांना निकृष्टदृष्टीचा अध्यास करणारा प्रत्यवायी होईल हेंच समंजस–युक्त आहे. [–केवल लौकिकन्यायच निश्चा-यक नाहीं, तर प्रथमश्रुतत्वामुळें आदित्यादि-शब्दांना मुख्यार्थत्वहि आहे, असें ' प्राथम्यात्० ' इत्यादि भाष्यानें सांगतात–]

**भाष्यं—प्राथम्याच्च आदित्यादिशब्दानां मुख्यार्थत्वमविरोधाद् ग्रहीतव्यम्। तैः स्वार्थवृत्तिभिरवरुद्धायां बुद्धौ पश्चादवतरतो ब्रह्मशब्दस्य मुख्यया वृत्त्या सामानाधिकरण्यासंभवाद् ब्रह्मदृष्टिविधानार्थतैवावतिष्ठते। इतिपरत्वादपि ब्रह्म-शब्दस्यैष एवार्थो न्याय्यः ॥**

भाष्यार्थ—आणि आदित्यादि-शब्दांचें अविरोधामुळें मुख्यार्थत्व स्वीकारणें उचित आहे. ज्यांची वृत्ति स्वार्थी म्ह० मुख्य अर्थी आहे अशा त्या शब्दांनीं अवरुद्ध झालेल्या बुद्धींत मागून प्रवेश करणाऱ्या ब्रह्मशब्दाचें मुख्यवृत्तीनें सामा-नाधिकरण्य संभवत नसल्यामुळें त्या वाक्याचें ब्रह्मदृष्टिविधानार्थत्वच अवस्थित होतें. [–ब्रह्मशब्दाला दृष्टिपरत्व आहे याविषयीं युक्त्यन्तर–]='**इतिपरत्वात्०** '–ब्रह्मशब्दाला इतिपरत्व असल्यामुळेंहि–ब्रह्मशब्दापुढें 'इति-'शब्द असल्यामुळेंहि हाच अर्थ न्याय्य आहे. [–ब्रह्मशब्दाचें इतिपरत्वच '**तथा हि०**' इत्यादि भाष्यानें स्पष्ट करितात––]

**भाष्यं––तथाहि 'ब्रह्मेत्यादेशः' 'ब्रह्मेत्युपासीत' 'ब्रह्मेत्युपास्ते' इति च सर्व-त्रेतिपरं ब्रह्मशब्दमुच्चारयति । शुद्धांस्त्वादित्यादिशब्दान् । ततश्च यथा शुक्तिकां रजतमिति प्रत्येतीत्यत्र शुक्तिवचन एव शुक्तिकाशब्दो रजतशब्दस्तु रजतप्रतीतिलक्षणार्थः । प्रत्येत्येव हि केवलं रजतमिति । न तु तत्र रजतमस्ति । एवमत्राप्यादित्यादीन्ब्रह्मेति प्रतीयादिति गम्यते ॥**

भाष्यार्थ––जसें–' ब्रह्म इति आदेशः '–ब्रह्म असा आदेश, ' ब्रह्म इति उपा-सीत '–ब्रह्म अशी उपासना करावी, ' ब्रह्म इति उपास्ते '–ब्रह्म अशी उपासना करितो, असा सर्वत्र 'इति-'पर ब्रह्मशब्द श्रुति उच्चारिते, [–'**शुद्धान्०**' इत्यादि

भाष्यानें आदित्यादिशब्दांतील वैलक्षण्य सांगतात–]=पण आदित्यादिशब्दांचा शुद्ध–इतिशब्दावांचून उच्चार करिते. [–"ब्रह्मशब्दाला इतिपरत्व व आदित्यादिशब्दांना शुद्धत्व असूं दे, तथापि दृष्टिपरत्व व अर्थपरत्व ही व्यवस्था कशी होते?" अशी आशंका घेऊन '**ततश्च०**' इत्यादि भाष्यानें म्हणतात–]=आणि त्यामुळें ज्याप्रमाणें 'शुक्तिकेला रजत असें समजतो' या उदाहरणांत शुक्तिकाशब्द शुक्तिवाचकच–शिंप या अर्थाचाच आहे, पण रजत हा शब्द रजतप्रतीतीच्या लक्षणेसाठीं आहे, [ रजतशब्दालाहि शुक्तिशब्दाप्रमाणें अर्थपरत्व जर असेल तर 'इति-'शब्दसंबंध व्यर्थ होईल असा याचा भावार्थ.–" अहोपण, प्रतीति जर असेल तर तिच्या निराधारत्वाचा असंभव असल्यामुळें रजतहि आहे " अशी आशंका घेऊन '**प्रत्येत्येव०**' इत्यादि भाष्यानें म्हणतात–]=कारण केवल 'रजत' असा नुस्ता प्रत्ययच येतो, पण तेथें रजत नसतें. [ त्या प्रतीतीला आभासत्व असल्यामुळें तिचें योग्य आलंबन–आधार नाहीं, असा भावार्थ.–'**एवं०**' इत्यादि भाष्यानें हा लोकसिद्ध अर्थ प्रकृत दार्ष्टान्तिकांत योजितात–]=याप्रमाणें प्रकृत उदाहरणांतहि आदित्यादिकांना 'ब्रह्म' असें जाणावें–त्यांची ब्रह्मदृष्टीनें उपासना करावी, असें अवगत होतें. [–शिवाय आदित्यादिकांच्या द्वितीयाश्रुतींवरून उपासनाकर्मत्वानें प्राधान्याची सिद्धि होत असल्यामुळें 'ब्रह्म-'शब्दाला दृष्टिपरत्वच आहे, असें '**वाक्यशेषः०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]

**भाष्यं—वाक्यशेषोऽपि च द्वितीयानिर्देशेन आदित्यादीनेव उपास्तिक्रियया व्याप्यमानान्दर्शयति—'स य एतदेवं विद्वानादित्यं ब्रह्मेत्युपास्ते'। 'यो वाचं ब्रह्मेत्युपास्ते' 'यः संकल्पं ब्रह्मेत्युपास्ते' इति च ॥**

**भाष्यार्थ**—आणि वाक्यशेषहि द्वितीयानिर्देशानें 'उपासनाक्रियेनें आदित्यादिकच व्यापिले जाणार आहेत,' असें दाखवितो. 'तो जो विद्वान् याप्रमाणें आदित्याला ब्रह्म असें उपासितो'–छां. ३. १९.४.–'जो वाक्-ला ब्रह्म असें उपासितो'–छां. ७. २. २.–'जो संकल्पाला ब्रह्म असें उपासितो'–छां. १७.४.३.– असा त्या त्या वाक्यांतील वाक्यशेष आदित्यादिकांचें उपासनाक्रियेनें व्याप्यमानत्व दाखवितो. [–'उत्कृष्ट व निकृष्ट यांतील उत्कृष्टच उपास्य आहे. कारण त्याला फलविशेषपरत्व आहे. राजादिकांप्रमाणें' असें जें वाद्यानें वर–पृ.६४१–म्हटलें आहे त्याचा '**यत्तु०**' इत्यादि भाष्यानें अनुवाद–]

**भाष्यं—यत्तूक्तं ब्रह्मोपासनमेवात्रादरणीयं फलवत्त्वायेति । तदयुक्तम् । उक्तेन न्यायेन आदित्यादीनामेवोपास्यत्वावगमात् । फलं त्वतिथ्याद्युपासन इव**

**आदित्याद्युपासनेऽपि ब्रह्मैव दास्यति । सर्वाध्यक्षत्वात् । वर्णितं चैतत् 'फलमत उपपत्तेः' इत्यत्र । ईदृशं चात्र ब्रह्मण उपास्यत्वं यत्प्रतीकेषु तद्दृष्ट्यध्यारोपणं प्रतिमादिष्विव विष्णवादीनाम् ॥ ५ ॥ ( ४ )**

**भाष्यार्थ**--पण येथें 'ब्रह्मोपासनाच फलवत्त्वासाठीं आदरणीय आहे' असें जें वाद्यानें म्हटलें आहे [-आदित्यादिकांच्याच उपास्यत्वाचें अर्पण करणाऱ्या द्वितीयाश्रुतीच्या विरुद्ध हें अनुमान आहे, असें '**तदयुक्तं०**' इत्यादि भाष्यानें सांगतात-]=तें अयुक्त आहे. कारण पूर्वोक्त न्यायानें आदित्यादिकांच्याच उपास्यत्वाचा अवगम होतो. [-' तर मग फलसिद्धि कशी होते ?' अशी आशंका घेऊन '**फलं तु०**' इत्यादि भाष्यानें हेतूची अन्यथासिद्धि सांगतात-]=पण अतिथि इत्यादिकांच्या उपासनांमध्यें जसें, तसेंच आदित्यादिकांच्या उपासनेंतहि ब्रह्मच फल देईल. कारण त्या ब्रह्माला सर्वाध्यक्षत्व आहे. [-' अहोपण, धर्मालाच फलदत्व असल्यामुळें तें ब्रह्माला कोठून असणार ?' '**वर्णितं च०**' इत्यादि भाष्यानें उत्तर-]=आणि हें ब्रह्माचेंच फलप्रदत्व "फल ब्रह्मापासूनच प्राप्त होतें, कारण तशी उपपत्ति आहे"-ब्र. भा. ३. २. ३८. पृ. २११-या सूत्रांत वर्णिलें आहे. [ 'उत्कृष्ट दृष्टीनें निकृष्ट उपास्य आहे' या न्यायानें अनुगृहीत असलेल्या-'द्वितीया' व 'इति-'शब्द-या दोन श्रुतींनीं उक्त अनुमानाचा भंग होत असल्यामुळें असंजातविरोधित्वानें प्रथम श्रुत असलेले आदित्यादिकच ध्येय आहेत. पण ते कसे ? तर चरमश्रुतत्वानें संजातविरोधामुळें प्रत्ययमात्रपर ब्रह्मशब्दानें अर्पिलेल्या ब्रह्मदृष्टीनें विशिष्ट व विशेषणत्वानें उपास्य ब्रह्मसामर्थ्यानें ज्यांना फलविशेष प्राप्त झाला आहे असे ते ध्येय आहेत, असा याचा भावार्थ.-"तर मग हें ब्रह्मोपासन आहे ही प्रसिद्धि कशी ?" '**ईदृशं च०**' इत्यादि भाष्यानें उत्तर-]=आणि येथें प्रतिमादिकांतील विष्णवादिकांच्या अध्यारोपाप्रमाणें प्रतीकांमध्यें ब्रह्मदृष्टीचें जें अध्यारोपण तेंच हें अशा प्रकारचें येथें ब्रह्माचें उपास्यत्व आहे.५.-सु.ब्र.४३४-३५. (४).

## ( ५. आदित्यादिमत्यधिकरण. सू. ६. )

—पूर्वीप्रमाणें उत्कर्षरूप विशेषाच्या अनवधारणामुळें-गीतीत्वानें क्रियारूप असलेल्या उद्गीथादिकांचा फलसंनिकर्षानें उत्कर्ष असल्यामुळें आदित्यादिकांमध्यें त्यांची दृष्टि करावी किंवा प्रथम निर्दिष्ट आदित्यादिकांतील ब्रह्मदृष्टीप्रमाणें प्राथमिक आदित्यादिकांमध्यें उद्गीथादि दृष्टि करावी, असें प्राप्त झालें असतां '**आदित्यादि०**' या सूत्रानें त्याचें निरसन करितात-

**सूत्रं—आदित्यादिमतयश्चांग उपपत्तेः ॥ ६ ॥ ( ५ )**

**सूत्रार्थ**—उद्गीथादि अंगांमध्यें आदित्यादि मतीच कराव्या. 'उपपत्तीमुळें' —कर्मसमृद्धिरूप फल उपपन्न होत असल्यामुळें.६. (५)–सु. भ. ४३९. [–'**य एव०**' इत्यादि भाष्यानें अंगाश्रित उपासनें उदाहृत करून त्यांच्या विशेषाची उपलब्धि होत नसल्यामुळें संशय सांगतात–]

**भाष्यं—'य एवासौ तपति तमुद्गीथमुपासीत' । 'लोकेषु पंचविधं सामोपासीत' । 'वाचि सप्तविधं सामोपासीत' । 'इयमेवर्गग्निः साम' इत्येवमादिषु अंगावबद्धेषूपासनेषु संशयः—किमादित्यादिपूद्गीथादिदृष्टयो विधीयन्ते । किंवोद्गीथादिष्वेवादित्यादिदृष्टय इति ॥**

**भाष्यार्थ**—'जो हा ताप देतो त्या सूर्याच्या दृष्टीनें उद्गीथाची उपासना करावी' –छां. १. ३. १.–' लोकदृष्टया पंचविध सामाची उपासना करावी '–छां. २.२.१. –' वाग्-दृष्टया सप्तविध सामाची उपासना करावी '–छां. २. ८. १.–' ही पृथ्वीच ऋक् व अग्नि साम आहे. '–छां. १. ६. १.–या व अशाच दुसऱ्याहि अंगावबद्ध–कर्मांगसंबद्ध उपासनांविषयीं ' काय, आदित्यादिकांमध्यें उद्गीथादि-दृष्टींचें विधान केलें जातें किंवा उद्गीथादिकांतच आदित्यादिकांच्या दृष्टीचें विधान केलें जातें ?' असा संशय येतो. [ पृथिवी, अग्नि, अंतरिक्ष, आदित्य व द्यु, या नांवाच्या लोकांमध्यें हिंकार, प्रस्ताव, उद्गीथ, पतिहार व निधनरूप पांच प्रकारचें साम उपास्य आहे. म्ह० लोकालोकदृष्टीनें तें उपासना करण्यास योग्य आहे, असा भावार्थ.–' वाचि सप्तविधं० '–हिंकार, प्रस्ताव, ओंकार, उद्गीथ, प्रतिहार, उपद्रव व निधन, एतद्रूप सात प्रकारचें साम वाग्दृष्टया उपास्य आहे, असा भावार्थ.– स्वतंत्र फलानें युक्त असलेल्या प्रासंगिक अंगावबद्धोपासनांतील कर्मांगभूत नसलेल्या पदार्थांच्या दृष्टीनें अनुष्ठानाचें येथें निरूपण केलेलें असल्यामुळें याच्या पादादिसंगति आहेत. पूर्वपक्षांत ' दृष्टिकरणाला फलवत्त्व आहे ' व सिद्धान्तांतहि ' तें फलवत्त्व अविरुद्ध सिद्ध होतें ' असें मानून ' तत्र० ' इत्यादि भाष्यानें पूर्वपक्ष सांगतात–]

**भाष्यं—तत्रानियमो नियमकारणाभावादिति प्राप्तम् । न ह्यत्र ब्रह्मण इव कस्यचिदुत्कर्षविशेषोऽवधार्यते । ब्रह्म हि समस्तजगत्कारणत्वादपहतपाप्मत्वादिगुणयोगाच्च आदित्यादिभ्य उत्कृष्टमिति शक्यमवधारयितुम् । न त्वादित्योद्गीथादीनां विकारत्वाविशेषात्किंचिदुत्कर्षविशेषावधारणे कारणमस्ति ॥**

**भाष्यार्थ**—असा संशय आला असतां त्याविषयीं कांहीं नियम नाहीं, कारण त्याच्या नियमकारणाचा अभाव आहे, असें प्राप्त झालें. [–त्याविषयीं नियम

करणाच्या शास्त्राच्या अभावामुळें,असें जें म्हटलें आहे तेंच वादी **'न हि०'** इत्यादि भाष्यानें व्यक्त करितो–]=कारण या उदाहरणांत ब्रह्माप्रमाणें कोणाचाहि उत्कर्ष-विशेष निश्चित केला जात नाहीं. [–**'ब्रह्म हि०'** इत्यादि भाष्यानें वैधर्म्यदृष्टान्त स्पष्ट करितात–]=कारण ब्रह्म समस्त जगत्कारणत्वामुळें व अपहतपाप्मत्वादि गुणसंबंधामुळें आदित्यादिकांहून उत्कृष्ट आहे, असें अवधारण करणें शक्य आहे. [–'अंग व अनंग म्ह० उद्गीथादि व सूर्यादि यांतीलहि कोणाचा तरी विशेष अवगत होऊं दे' अशी आशंका घेऊन **'न तु०'** इत्यादि भाष्यानें वादी म्हणतो–]=पण, आदित्यादि व उद्गीथादि या दोहोंनाहि विकारत्व एकसारखेंच असल्यामुळें त्यांच्या उत्कर्षविशेषाचा निश्चय करण्यास कांहीं एक कारण नाहीं. [–आतां कर्मरूप उद्गीथादिकांचे उत्कर्षमान मानून **'अथवा०'** इत्यादि भाष्यानें साक्षात् पूर्वपक्ष सांगतात–]

**भाष्यं—अथवा नियमेनैव उद्गीथादिमतय आदित्यादिष्वध्यस्येरन् । कस्मात् । कर्मात्मकत्वादुद्गीथादीनाम् । कर्मणश्च फलप्राप्तिप्रसिद्धेः । उद्गीथादिमतिभिरुपास्यमाना आदित्यादयः कर्मात्मकाः सन्तः फलहेतवो भविष्यन्ति ॥**

**भाष्यार्थ**—किंवा नियमानेंच आदित्यादिकांमध्यें उद्गीथादिमतींचा–दृष्टींचा अध्यास करावा. [–या नियमाविषयीं हेतु विचारितात–]=कोणत्या कारणानें ? [–उद्गीथादि कर्मांगांचा क्रियेशीं नित्यसंबंध असल्यामुळें फलसाधनत्वामुळें त्यांना उत्कृष्टत्व आहे, असा हेतु **'कर्मात्मकत्वात्०'** इत्यादि भाष्यानें वादी सांगतो–] =कारण उद्गीथादिकांना कर्मात्मकत्व आहे आणि कर्मापासून फलप्राप्तीची प्रसिद्धि होते. [–शिवाय उद्गीथादिक भिन्नरूप आदित्यादिरूपानें जर पाहिले गेले तर फलहेतु होणार नाहींत. पण त्याच्या उलट आदित्यादिक उद्गीथादिदृष्टया जर पाहिले गेले तर त्यांनाहि फलहेतुत्व संभवेल, असें **'उद्गीथादि०'** इत्यादि भाष्यानें वादी सांगतो–]=उद्गीथादिदृष्टींनी उपासना केले जाणारे आदित्यादिक कर्मात्मक होत्साते फलहेतु होतील. [–कर्माचें अंग नसलेल्या पदार्थांमध्येंच अंगदृष्टि करावी असें पृथ्वी व अग्नि यांमध्यें ऋक व साम या शब्दांच्या प्रयोगावरूनहि भासतें असें **'तथा च०'** इत्यादि भाष्यानें सांगतो–]

**भाष्यं—तथा च 'इयमेवर्गग्निः साम' इत्यत्र 'तदेतदेतस्यामृच्यध्यूढं साम' इति ऋक्शब्देन पृथिवीं निर्दिशति । सामशब्देनाग्निम् । तच्च पृथिव्यग्न्योः ऋक्सामदृष्टिचिकीर्षायामवकल्पते, न ऋक्सामयोः पृथिव्यग्निदृष्टिचिकीर्षायाम् । क्षत्तरि हि राजदृष्टिकरणाद्राजशब्द उपचर्यते, न राजनि क्षत्तृशब्दः ॥**

**भाष्यार्थ**—आणि तसें ' हीच ऋक् व अग्नि साम' या वचनांत 'तें हें अग्न्याख्य साम या पृथ्वीलक्षण ऋक्मध्यें अध्यूढ–उपरिस्थित आहे.–छां. १. ६. १.– असा श्रुति ऋक्-शब्दानें पृथ्वीचा व साम-शब्दानें अग्नीचा निर्देश करिते. पण हें तिचें करणें पृथ्वी व अग्नि यांमध्यें ऋक् व साम यांची दृष्टि करण्याची इच्छा असल्यासच उपपन्न होतें. ऋक् व साम यांमध्यें पृथ्वी व अग्नि यांची दृष्टि करण्याची इच्छा असल्यास तें उपपन्न होत नाहीं. [–वादी '**क्षत्तरि०**' इत्यादि भाष्यानें हेंच दृष्टान्तानें स्पष्ट करितो–]=कारण क्षत्त्याच्या ठिकाणीं राजदृष्टि करण्यानें राजशब्द उपचरित होतो–राजशब्दाचा उपचार केला जातो, पण त्याच्या उलट राजाच्या ठिकाणीं क्षत्तृशब्दाचा उपचार केला जात नाहीं. [ऋक्मध्यें पृथ्वीदृष्टि व सामामध्यें अग्निदृष्टि जर इष्ट असती तर प्रयोगाचें वैपरित्य झालें असतें–याच्या विपरीत प्रयोग झाला असता. तस्मात्–पृथ्वी व अग्नि यांमध्यें ऋक् व साम या शब्दांचा प्रयोग अनुपपन्न होत असल्यामुळें पृथ्वी व अग्नि यांतील कर्मांगभूत ऋक्-सामांच्या अध्यासाची सिद्धि होते असा भावार्थ.–' **अपि च०** ' इत्यादि भाष्यानें अनंगांमध्यें अंगमति करावी, याविषयीं आणखी हेतु–]

**भाष्यं— अपि च ' लोकेषु पंचविधं सामोपासीत ' इत्यधिकरणनिर्देशाल्लोकेषु सामाध्यसितव्यमिति प्रतीयते । ' एतद्गायत्रं प्राणेषु प्रोतम् ' इति चैतदेव दर्शयति । प्रथमनिर्दिष्टेषु चादित्यादिषु चरमनिर्दिष्टं ब्रह्माध्यस्तं 'आदित्यो ब्रह्मेत्यादेशः' इत्यादिषु । प्रथमनिर्दिष्टाश्च पृथिव्यादयः । चरमनिर्दिष्टा हिंकारादयः 'पृथिवी हिंकारः' इत्यादिश्रुतिषु । अतोऽनंगेष्वादित्यादिष्वंगमतिक्षेप इति ॥**

**भाष्यार्थ**—शिवाय 'लोकांमध्यें पंचविध सामाची उपासना करावी'–पृ.६४६–असा येथें सप्तमीविभक्तीनें लोकांचा सामधीविषयत्वानें–सामदृष्टीच्या विषयत्वानें अधिकरण-निर्देश केलेला असल्यामुळें लोकांमध्यें सामाचा अध्यास करावा असें प्रतीत होतें. [–दुसऱ्या श्रुतिवचनांतहि सप्तमीश्रुतीमुळें अनंगांमध्यें अंगदृष्टि प्रतीत होते, असें **'एतत्०'** इत्यादि भाष्यानें सांगितलें जातें–]=आणि " हे गायत्र प्राणांमध्यें प्रोत आहे "–छां.२.११.१–ही श्रुति हेंच दाखविते. [–पूर्वाधिकरणसिद्धान्तन्यायानेंहि अनंगांमध्यें अंगदृष्टिच उपदिष्ट आहे असें ' **प्रथमनिर्दिष्टेषु०** ' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=आणि ' आदित्य ब्रह्म असा आदेश आहे'–पृ.६४४–इत्यादि उपदेशांत पूर्वी निर्देश केलेल्या आदित्यादिकांमध्यें मागून निर्देश केलेलें ब्रह्म अध्यस्त आहे, आणि 'पृथिवी हिंकार' इत्यादि श्रुतींमध्यें पृथिव्यादि प्रथम निर्दिष्ट व हिंकारादिक चरम निर्दिष्ट आहेत. यास्तव कर्माचीं अंगें नसलेल्या आदित्यादिकांमध्यें

अंगदृष्टीचा क्षेप–अध्यास करावा. ‘ इति० ’–असा पूर्वपक्ष प्राप्त होतो. [–आदित्यादिकांमध्यें उद्गीथादिदृष्टि केल्यानें त्याच्या फलवत्त्वाची सिद्धि होते, अशा प्राप्त पूर्वपक्षाचा ‘ एवं० ’ इत्यादि भाष्यानें अनुवाद करून सिद्धान्त सांगतात–]

**भाष्यं— एवं प्राप्ते ब्रूमः—आदित्यादिमतय एवांगेषूद्गीथादिषु क्षिप्येरन् । कुतः । उपपत्तेः । उपपद्यते ह्येवं अपूर्वसंनिकर्षादादित्यादिमतिभिः संस्क्रियमाणेषूद्गीथादिषु कर्मसमृद्धिः । ‘ यदेव विद्यया करोति श्रद्धयोपनिषदा तदेव वीर्यवत्तरं भवति ’ इति च विद्यायाः कर्मसमृद्धिहेतुत्वं दर्शयति ॥**

**भाष्यार्थ**––असा पूर्वपक्ष प्राप्त झाला असतां आम्ही सिद्धान्त सांगतों. उद्गीथादि अंगांमध्यें आदित्यादि दृष्टिच आरोपित केल्या जातील. [–‘अहोपण, अनंगांमध्यें अंगदृष्टि आम्हीं सांगितली आहे, यास्तव त्याच्या विपरीत नियम करणें, त्याच्या निर्बीजत्वामुळे, अयुक्त आहे,’ अशी शंका–]=कोणत्या कारणानें ? [–सूत्रोक्त नियमहेतूला अवतरण देऊन त्याचें व्याख्यान–]=‘ उपपत्तेः०’–उपपत्तीमुळें, कारण असें उपपन्न होतें. अपूर्व संनिकर्षामुळे आदित्यादिमतींनीं उद्गीथादिक संस्कृत केले गेले असतां कर्मसमृद्धि संभवते. [–ज्याप्रमाणें प्रोक्षणादिकानें व्रीह्यादिकांना संस्कारयुक्त केलें असतां कर्मापूर्व उत्पन्न होतें, त्याप्रमाणें उद्गीथादिकांच्या प्रकृत कर्मापूर्वसांनिध्यामुळें आदित्यादिमतींनीं ते उद्गीथादिक संस्कारयुक्त केले गेले असतां कर्मसमृद्धि उपपन्न होते, यास्तव कर्मसमृद्धि या फलाच्या उपपत्तीमुळें अंगांमध्यें अनंगमतीचा क्षेप–अध्यास होतो, असा याचा भावार्थ. –“अहोपण, कर्मसमृद्धि हें उपासनेचें फल आहे, हेंच अगोदर असिद्ध आहे” अशी आशंका घेऊन ‘ यदेव०’ इत्यादि वाक्यानें आचार्य समाधान करितात–]= आणि “जें कर्म विद्येनें, श्रद्धेनें व ध्यानानें–भक्तीनें करितो तेंच वीर्यवत्तर होतें. ” –छां. १.१.१०.–या वचनानें श्रुति विद्येचें कर्मसमृद्धिहेतुत्व दाखविते. [–जेथें कर्मसमृद्धि हें फल श्रुत असतें तेथें अंगांमध्यें अनंगमतीचा क्षेप असो; कारण आदित्यादिमतींनीं संस्कृत केलेल्या अंगांना कर्मातिशयहेतुत्व आहे. पण ज्यांचीं फलें स्वतंत्र आहेत अशा उपासनांमध्यें मतिक्षेप कसा होतो, त्याचा विवेक होत नाहीं, अशी ‘ भवतु० ’ इत्यादि भाष्यानें शंका–]

**भाष्यं— भवतु कर्मसमृद्धिफलेष्वेवं । स्वतंत्रफलेषु तु कथं ‘ य एतदेवं विद्वाल्ँलोकेषु पंचविधं सामोपास्ते ’ इत्यादिषु । तेष्वप्यधिकृताधिकारात्प्रकृतापूर्वसंनिकर्षेणैव फलकल्पना युक्ता । गोदोहनादिनियमवत् । फलात्मकत्वाच्चा-**

**दित्यादीनां उद्गीथादिभ्यः कर्मात्मकेभ्यः उत्कर्षोपपत्तिः। आदित्यादिप्राप्तिलक्षणं हि कर्मफलं शिष्यते श्रुतिषु ॥**

**भाष्यार्थ**—कर्मसमृद्धि हें ज्यांचें फल आहे अशा उपासनांमध्यें अनंगदृष्टींचा अध्यास होवो, पण 'जो हें असें जाणणारा विद्वान् लोकांमध्यें पंचविधसामाची उपासना करितो' इत्यादि स्वतंत्रफल–ज्यांचें फल स्वतंत्र आहे, अशा उपासनांमध्यें अंगांतील अनंगमतींचा अध्यास कसा होईल? [–ज्यांचें फल स्वतंत्र आहे अशाहि उपासनांमध्यें प्रकृत कर्मांगव्यपाश्रयानें अंगांमध्येंच दृष्टीचा आरोप केल्यानें फलकल्पना युक्त आहे, कारण कर्माधिकाऱ्याचाच तदंगसंबद्ध उपासनांमध्यें अधिकार आहे. ज्याप्रमाणें स्वतंत्र फल देणाऱ्याहि गोदोहनादि-अधिकृताधिकारांमध्यें कर्मांगाधारानेंच फल इष्ट आहे तसेंच तें येथेंहि इष्ट आहे असा '**तेषु०**' इत्यादि भाष्यानें परिहार करितात–]=त्या तसल्या उपासनांमध्येंहि अधिकृत-अधिकारामुळें प्रकृत अपूर्व संनिकर्षानेंच गोदोहनादिनियमाप्रमाणें फलकल्पना युक्त आहे. [–आतां 'आदित्यादि व उद्गीथादि यांच्या उत्कर्षविशेषाचें अवधारण होत नाहीं' असें जें वाद्यानें वर म्हटलें आहे त्याविषयीं '**फलात्मकत्वाच्च०**' या भाष्यानें म्हणतात–]=आणि आदित्यादिकांना फलरूपत्व असल्यामुळें कर्मात्मक उद्गीथादिकांहून त्यांच्या उत्कर्षाचा संभव–उपपत्ति आहे. [–'**आदित्यादि०**' इत्यादि भाष्यानें हेंच स्पष्ट करितात–]=कारण श्रुतींमध्यें आदित्यादि-प्राप्तिरूपच कर्मफल सांगितलें जातें. [–'**अपि च०**' इत्यादि भाष्यानें उपक्रमानुसारामुळेंहि उद्गीथादिकांमध्यें आदित्यादिदृष्टि करावी, असें सांगतात–]

**भाष्यं—अपि च 'ओमित्येतदक्षरमुद्गीथमुपासीत' 'खल्वेतस्यैवाक्षरस्योपव्याख्यानं भवति' इति चोद्गीथमेवोपास्यत्वेनोपक्रम्य। आदित्यादिमतीर्विदधाति। यत्तूक्तं उद्गीथादिमतिभिरुपास्यमाना आदित्यादयः कर्मभूयं भूत्वा फलं करिष्यन्तीति। तदयुक्तम्। स्वयमेवोपासनस्य कर्मत्वात्फलवत्त्वोपपत्तेः। आदित्यादिभावेनापि च दृश्यमानानामुद्गीथादीनां कर्मात्मकत्वानपायात् ॥**

**भाष्यार्थ**–शिवाय 'ओं अशा या उद्गीथावयवभूत अक्षराचें उपासन करावें'–छां. १.१.१.–असा व "खरोखर याच अक्षराचें उपव्याख्यान आहे."–छां. १.१.१० असा श्रुति उद्गीथाचाच उपास्यत्वानें उपक्रम करून आदित्यादिमतींचें विधान करिते. [–'**यत्तूक्तं०**' इत्यादि भाष्यानें पूर्वपक्षाच्या दुसऱ्या उपपत्तीचा अनुवाद करून तिला दूषित करितात–]=आतां "उद्गीथादि मतींनीं उपासना केले जाणारे आदित्यादिक कर्मभावाचा अनुभव घेऊन फल उत्पन्न करतील." असें जें म्हटलें

आहे तें अयुक्त आहे. कारण स्वत: उपासनेलाच कर्मत्व असल्यामुळें तिचेंच फलवत्त्व युक्त–उपपन्न आहे–उपासनेलाच फलवत्त्व असणें युक्त आहे. [–'अहो-पण, अध्यास केलेल्या सिद्धरूप आदित्यादिकांकडून कर्माचें साध्यरूपत्व पराभूत होईल' अशी आशंका घेऊन ' **आदित्यादिभावेन०**' इत्यादि भाष्यानें तिचें समाधान सांगतात–]=आणि आदित्यादिभावानेंहि पाहिल्या जाणाऱ्या उद्गीथादिकांचें कर्मात्मकत्व निवृत्त होत नाहीं. त्यामुळें अंगांमध्यें अनंगदृष्टि संभवते. [बटूंतील अग्निबुद्धीप्रमाणें उद्गीथादिकांतील आदित्यादिबुद्धींना गौणत्व असल्यामुळें कर्माचा अभिभव–निवृत्ति होत नाहीं. त्यामुळें अंगांतील अनंगदृष्टि अविरुद्ध आहे, असा भावार्थ.–आतां ' पृथ्वी व अग्नि यांमध्यें ऋक् व साम या शब्दांच्या प्रयोगाची अनुपपत्ति होत असल्यामुळें पृथिव्यादिकांमध्यें ऋगादिदृष्टि करावी. ' असें जें वाद्यानें वर म्हटलें आहे त्याचें ' **तदेतत्०** ' इत्यादि भाष्यानें निरसन–]

**भाष्यं**–– **' तदेतदेतस्यामृच्यध्यूढं साम ' इति तु लाक्षणिक एव पृथिव्यग्न्योर्ऋक्सामशब्दप्रयोगः । लक्षणा च यथासंभवं संनिकृष्टेन विप्रकृष्टेन वा स्वार्थसंबंधेन प्रवर्तते । तत्र यद्यपि ऋक्सामयोः पृथिव्यग्निदृष्टिचिकीर्षा । तथापि प्रसिद्धयोः ऋक्सामयोः भेदेनानुकीर्तनात्पृथिव्यग्न्योश्च संनिधानात्तयोरेवैष ऋक्सामशब्दप्रयोग ऋक्सामसंबंधादिति निश्चीयते ॥**

**भाष्यार्थ**––पण " तें हें साम या ऋक्मध्यें अध्यूढ आहे."–पृ.६४८–असा हा पृथ्वी व अग्नि यांमध्यें ऋक्-सामशब्दप्रयोग लाक्षणिकच आहे. [ तद्दृष्टी-वांचूनहि लक्षणा उपपन्न होत असतांना पृथिव्यादिकांमध्यें ऋगादिकांच्या अध्यासाची कल्पना करणें योग्य नाहीं, असा याचा भावार्थ. –" अहोपण, संबंधाच्या अभावीं लक्षणा कशी संभवेल ?" अशी आशंका घेऊन ' **लक्षणा च०** ' या भाष्यानें सांगतात–]=आणि लक्षणा यथासंभव संनिकृष्ट किंवा विप्रकृष्ट अशा स्वार्थसंबंधानें प्रवृत्त होते. [ 'शोण धांवतो' या वाक्यांत गुणवाची शोणशब्दानें गुणी अश्व लक्षित होतो, म्हणून ही संनिकृष्ट लक्षणा व ' अग्नि अनुवाकाचा पाठ करितो ' या वाक्यांत अग्निशब्द तीव्रत्वादि गुणाला लक्षित करून अध्ययन करणाऱ्या बटूला लक्षित करितो, म्हणून ही विप्रकृष्ट लक्षणा आहे. कारण अग्नि-शब्दाच्या अर्थाचा बटुसंबंध साक्षात्च नसतो, असा याचा भावार्थ.–संनिकृष्ट –समीप किंवा साक्षात् व विप्रकृष्ट–दूरची किंवा परंपरेनें.–"अहोपण, असें लक्षणेचें द्विविधत्व जरी असलें तरी प्रकृत अर्थीं त्यापासून काय निष्पन्न झालें ?" '**तत्र यद्यपि०**' इत्यादि भाष्यानें उत्तर–]=असें असल्यामुळें ऋक् व साम यांच्या

ठिकाणीं पृथ्वी व अग्नि यांची दृष्टि करण्याची इच्छा जरी असली तरी पृथ्वी व अग्नि यांमध्यें हा ' **तदेतदस्यामृच्यध्यूढं साम** ' असा ऋक्-सामशब्दप्रयोग ऋक्-सामसंबंधामुळें होतो, असा निश्चय केला जातो. [ ऋक् व साम आणि पृथ्वी व अग्नि यांचा संनिकृष्ट वास्तव संबंध जरी नसला तरी विप्रकृष्ट पृथ्वी-अग्नि-बुद्धीसंबंधानें त्या दोहोंचा संबंध होत असल्यामुळें त्या दोन शब्दांनीं त्यांची लक्षणा युक्त आहे, असा भावार्थ.–' **प्रसिद्धयोः०** ' इत्यादि भाष्यानें मुख्यार्थाच्या असंभवाविषयीं हेतु सांगतात–]=कारण प्रसिद्ध असलेल्या ऋक्-सामांचें भेदानें अनुकीर्तन–कथन केलें आहे आणि पृथ्वी व अग्नि यांचें संनिधान–सांनिध्य आहे. [ त्यामुळें ऋक्-सामांमध्यें पृथिवी-अग्निदृष्टिचिकीर्षा जरी असली तरी पृथ्वी व अग्नि यांमध्येंच हा ऋक्-सामशब्दप्रयोग ऋक्-सामसंबंधामुळें केलेला आहे, असा संबंध. ' ऋचि अध्यूढं हि साम ' असें प्रसिद्ध असलेल्याच ऋक् व साम यांचें पृथक् कथन केलेलें असल्यामुळें, ' तदेतत् अस्यां ' येथेंहि पुनः त्यांचेंच कथन केल्यास पौनरुक्त्य होत असल्यामुळें आणि पृथ्वी व अग्नि यांचें अध्यस्त ऋक्-सामाशीं सांनिध्य असल्यामुळें ऋक् व साम या शब्दांना लक्षणेनें पृथ्वी-अग्नि-अर्थत्व आहे, असा याचा भावार्थ. –ऋक्-मध्यें पृथ्वीबुद्धि आणि सामामध्यें अग्निबुद्धि अशा या एवढ्याच संबंधानें पृथ्वी व अग्नि यांतील ऋक्साम-शब्दप्रयोग लाक्षणिक होऊं शकत नाहीं.कारण क्षत्त्यामध्यें राजबुद्धि जरी होत असली तरी राजाच्या ठिकाणीं क्षत्तृशब्दप्रयोग होत असलेला दिसत नाहीं, असें आम्हीं वर सांगितलें आहे, अशी आशंका घेऊन '**क्षत्तृशब्दोपि०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]

**भाष्यं— क्षत्तृशब्दोऽपि हि कुतश्चित्कारणाद्राजानमुपसर्पन्न निवारयितुं पार्यते । ' इयमेवर्क् ' इति च यथाक्षरन्यासमृच एव पृथिवीत्वमवधारयति । पृथिव्या हि ऋक्त्वेऽवधार्यमाणे इयमृगेवेत्यक्षरन्यासः स्यात् ॥**

**भाष्यार्थ**—कारण क्षत्तृशब्दहि कांहीं कारणानें राजाच्या समीप जाणारा असा होत्साता त्याचें निवारण करितां येत नाहीं. [ जेव्हां राजासुद्धां क्षत्त्याचें–सूताचें रथ हांकणें इत्यादि कर्म करितो, तेव्हां त्या क्षत्तृशब्दाचा राजामध्यें लक्षणेनें प्रयोग होतोच आणि निमित्त असतांना प्रयोगाची आवश्यकताहि नाहीं. कारण पंक-जादिशब्दामध्यें त्याचा व्यभिचार होतो, असा याचा भावार्थ.–ऋगादिकांमध्येंच पृथि-व्यादिबुद्धि करावी याविषयीं हेत्वन्तर–]=' **इयमेव ऋक्०**'–या वाक्यांत अक्ष-रांचा जसा न्यास–रचना केली आहे त्याप्रमाणें पाहिल्यासहि ऋक्-च्याच पृथि-वीत्वाचें श्रुति अवधारण करिते. [–हेंच व्यतिरेकानें स्पष्ट–विशद करितात–]

=' पृथिव्याः०'–कारण पृथ्वीचें ऋक्त्व जर अवधारण केलें जाणारें असतें तर ' इयं ऋगेव '–ही ऋक्‌च असा अक्षरांचा विन्यास केला असता. [' हीच ऋक्' असा अक्षरोपन्यास केला नसता. ऋक्‌च्या अनुवादानें पृथ्वीत्व विधेय आहे असें 'एव' या अवधारणाच्या सामर्थ्यानें अवगत होतें, असा याचा भावार्थ.–आणि याहि कारणानें अंगांमध्यें अनंगबुद्धि करावी असें 'य एवं०' इत्यादि सांगतात–]

**भाष्यं— ' य एवं विद्वान्साम गायति ' इति च अंगाश्रयमेव विज्ञानमुपसंहरति। न पृथिव्याद्याश्रयम्। तथा ' लोकेषु पंचविधं सामोपासीत ' इति यद्यपि सप्तमीनिर्दिष्टा लोकाः। तथापि साम्न्येव तेऽध्यस्येरन्द्वितीयानिर्देशेन साम्न उपास्यत्वावगमात्। सामनि हि लोकेष्वध्यस्यमानेषु साम लोकात्मनोपासितं भवति। अन्यथा पुनर्लोकाः सामात्मनोपासिताः स्युः। एतेन ' एतद्गायत्रं प्राणेषु प्रोतम् ' इत्यादि व्याख्यातम्॥**

**भाष्यार्थ—**" आणि जो असें जाणणारा सामगान करितो "–छां. १.७.७.– अशी ही श्रुति अंगाश्रयच विज्ञानाचा उपसंहार करिते. पृथिव्याद्याश्रय विज्ञानाचा उपसंहार करीत नाहीं. [–आतां ' अधिकरणनिर्देशामुळें लोकांना उपासनाविषयत्व आहे ' असें जें म्हटलें आहे.–पृ. ६४८–त्याविषयीं ' **तथा०** ' इत्यादि भाष्यानें म्हणतात–]=त्याचप्रमाणें ' लोकांमध्यें पंचविधसामाची उपासना करावी' असे लोक जरी सप्तमीविभक्तीनें निर्दिष्ट आहेत तथापि सामामध्येंच त्यांचा अध्यास केला जावा हें उचित होय. कारण द्वितीयानिर्देशानें सामाच्या उपास्यत्वाचा बोध होतो. कारण सामामध्यें लोकांचा अध्यास केला जाऊं लागला असतां साम लोकरूपानें उपासित–उपासना केलेलें असें होतें. पण याच्या उलट लोकांमध्यें सामाचा अध्यास केल्यास लोक सामरूपानें उपासित होतील. [जर सामदृष्टि लोकांमध्यें आरोपिली जाईल तर ' साम्ना ' अशी तृतीया-अर्थी द्वितीयाश्रुति परिणत करावी लागेल आणि ' लोकेषु ' ही सप्तमी श्रुति द्वितीया अर्थी कशी तरी न्यावी लागेल. त्यामुळें दोन्ही प्रकारें सप्तमी विभक्तीचा अर्थ कल्पावा लागेल. म्हणून कल्पनालाघवासाठीं यथाश्रुत द्वितीयेच्या अर्थाला अनुसरून सप्तमी विभक्ति तृतीया-अर्थी कल्पावी, तिचें तृतीया विभक्तीच्या अर्थानें व्याख्यान करावें. तसें केल्यानें पृथिव्यादि लोकालोकबुद्धीनें हिंकारादि साम उपास्य होतें. अर्थात् पूर्वपक्षांत सप्तमी द्वितीया-अर्थी व सिद्धान्तांत ती तृतीया-अर्थी परिणत करावी लागते. पण पूर्वपक्षामध्यें सामांतील द्वितीयाविभक्तीचा भंग अधिक करावा लागतो, असा भावार्थ.–पृथिव्यादिरूपानें हिंकारादिकांच्या उपास्यत्वाच्या या उपदेशानें गायत्राचेंहि

प्राणरूपानें उपास्यत्व सांगितलें आहे, असा ‘ **एतेन०** ’ इत्यादि भाष्यानें अतिदेश करितात–]=या कथनानें ‘ हें गायत्र प्राणामध्यें प्रोत आहे ’–पृ. ६४८–इत्यादि-काचेंहि व्याख्यान झालें आहे. [–जेथें द्वितीया व सप्तमी अशा दोन विभक्ति आहेत तेथें श्रुतिद्वयभंगामुळें होणाऱ्या गौरवाच्या परिहारासाठीं अंगांमध्यें अनंग-बुद्धि असो. ‘ पण जेथें दोन्हीं ठिकाणीं द्वितीया विभक्ति श्रुत असते तेथें त्यांतील कोणत्या तरी एकाच श्रुतीचा भंग पूर्वपक्ष व सिद्धान्त या दोहोंमध्यें एकसारखाच होत असल्यामुळें तेथें अशा नियमाची सिद्धि कशी होते ? ’ अशी आशंका घेऊन ‘ **यत्रापि०** ’ इत्यादि भाष्यानें सांगतात–]

**भाष्यं—यत्रापि तुल्यो द्वितीयानिर्देशः ‘ अथ खल्वमुमादित्यं सप्तविधं सामोपासीत’ इति । तत्रापि ‘समस्तस्य खलु साम्न उपासनं साधु ’ ‘ इति तु पंचविधस्य ’ ‘अथ सप्तविधस्य ’ इति च साम्न एवोपास्यत्वोपक्रमात्तस्मिन्नेव आदित्याद्यध्यासः ॥**

**भाष्यार्थ**—जेथें द्वितीया विभक्तीचा निर्देश ‘ आतां खरोखर या आदित्याच्या दृष्टीनें सप्तविध सामाची उपासना करावी. ’–छां. २. ९. १.–असा एकसारखाच असतो, तेथेंहि ‘खरोखर समस्त सामाचें उपासन साधु आहे ’ ‘असें हें पंचविध सामाचें उपासन आहे ’–छां. २. ७. २.–‘ आतां सप्तविध सामाचें उपासन ’ –छां. २. ८. १.–असा सामाच्याच उपास्यत्वाचा उपक्रम केलेला असल्यामुळें त्याच्या ठिकाणींच आदित्यादिकांचा अध्यास होतो. [ कारण छांदोग्यांत ‘ समस्त सप्तविध व पंचविध सामाचें ध्यान साधुगुणयुक्त आहे. ’ असा उपक्रम करून ‘ लोकांमध्यें पंचविध सामाची उपासना करावी ’ ‘पृथ्वी हिंकार, अग्नि प्रस्ताव, अंतरिक्ष उद्गीथ, आदित्य प्रतिहार आणि द्यौ निधन’ इत्यादि वाक्यांनीं पंचविध सामाचें ध्यान सांगून ‘ असें हें पंचविध सामाचें उपासन आहे ’ असा उपसंहार करून ‘पण आतां सप्तविध सामाचें उपासन सांगितलें जातें’ असा पुनः उपक्रम करून ‘ वाक्मध्यें सप्तविध सामाची उपासना करावी ’ इत्यादि वाक्यानें सप्तविध सामाचेंहि उपासन सांगितलें आणि याप्रमाणें ‘ सप्तविध सामांचें उपासन साधु आहे ’ अशी सामाच्याच उपास्यत्वाची श्रुति असल्यामुळें व ‘ असें पंचविध सामाचें उपासन साधु आहे’ अशी पंचविध सामाचीहि उपास्यत्वश्रुति असल्यामुळें सामांमध्येंच आदित्यादिकांचा अध्यास सिद्ध होतो, असा भावार्थ.–‘पण पूर्वाधिकरण-न्यायानें प्रथमश्रुत आदित्यादिकांमध्यें चरमश्रुत उद्गीथादिकांचा अध्यास केला जातो ’ असें जें वाद्यानें म्हटलें आहे त्याविषयीं ‘**एतस्मादेव०**’ इत्यादि भाष्यानें सांगतात–]

**भाष्यं**--एतस्मादेव च साम्न उपास्यत्वावगमात् 'पृथिवी हिंकारः' इत्यादिनिर्देशविपर्ययेऽपि हिंकारादिष्वेव पृथिव्यादिदृष्टिः । तस्मादनंगाश्रया आदित्यादिमतयः अंगेषूद्गीथादिषु क्षिप्येरन्निति सिद्धम् ॥ ६ ॥ (५)

**भाष्यार्थ**—आणि याच सामाच्या उपास्यत्वबोधावरून 'पृथ्वी हिंकार आहे' –पृ.६४८–इत्यादि निर्देशाचा विपर्यय जरी होत असला तरी हिंकारादिकांमध्येंच पृथिव्यादिदृष्टि करावी. [हिंकाराच्या उद्देशानें पृथिवीत्वाचें विधान करावयाचें असतां 'हिंकारः पृथ्वी' असा निर्देश करणें युक्त होतें. पण त्याचा 'पृथ्वी हिंकार' असा उलट निर्देश जरी केला आहे तरी सामाच्या प्रकरणामुळें, सामालाच ध्येयत्व आहे असा बोध होत असल्यामुळें हिंकारादि अंगांमध्येंच कर्मांगभूत नसलेल्या पृथिव्यादिकांची दृष्टि करावी, असा याचा भावार्थ.–प्रथम श्रुताच्या अनुरोधानें चरमश्रुताचा निर्णय करावा, हा न्यायहि द्वितीयाश्रुतीनें बाध्य आहे; कारण त्याला दुर्बलत्व आहे. असें मानून '**तस्मात्**०' इत्यादि भाष्यानें अधिकरणार्थाचा उपसंहार करितात–] =म्हणून अनंगाश्रय आदित्यादि मति उद्गीथादि अंगांमध्यें आरोपिल्या जातात असें सिद्ध झालें. ६.–सु. ब्र. ४३६. (५).

## (६. आसीनाधिकरण. सू. ७-१०).

--"अंगाश्रित उपासनांमध्यें आसीनकर्मत्वाचा म्ह० बसूनच ती उपासना करावी याविषयीं जसा नियम नाहीं त्याप्रमाणें इतर उपासनांमध्येंहि आसीनकर्मतेचा नियम नाहीं" अशी आशंका घेऊन सूत्रकार '**आसीनः**०' इत्यादि सूत्रानें तिचा परिहार करितात—

## सूत्रं--आसीनः संभवात् ॥ ७

**सूत्रार्थ**–बसूनच उपासना कराव्या.कारण त्या बसूनच निर्विघ्नपणें होण्याचा संभव आहे.७.–सु.ब्र.४३७[–'**कर्मांग**०'इत्यादि भाष्यानें विशेषाचा परिशेष दाखवितात–]

**भाष्यं**— कर्मांगसंबद्धेषु तावदुपासनेषु कर्मतंत्रत्वान्नासनादिचिंता । नापि सम्यग्दर्शने । वस्तुतंत्रत्वाद्विज्ञानस्य । इतरेषु तूपासनेषु किमनियमेन तिष्ठन्नासीनः शयानो वा प्रवर्तेत । उत नियमेनासीन एवेति चिंतयति । तत्र मानसत्वादुपासनस्यानियमः शरीरस्थितेरिति ॥

**भाष्यार्थ**—कर्मांगसंबद्ध उपासनांमध्यें तर आसनादिकांच्या विचाराचें कारणच नाहीं. कारण त्या उपासना कर्मांच्या अधीन असतात. सम्यग्दर्शनामध्येंहि आसनादिकांची चिंता व्यर्थ आहे. कारण विज्ञानाला वस्तुतंत्रत्व असतें. [ 'आसनादि' येथील 'आदि-'पदानें स्थिति व शयन यांचें ग्रहण केलें जातें. 'सम्यग्दर्शन-'

शब्दानें श्रवणादिकांच्या अभ्यासानें सुसंस्कृत झालेल्या मनाचें ज्याला साह्य आहे, असा वाक्यजन्य साक्षात्कार सांगितला जातो. अंगोपासना व सम्यग्दर्शन यांहून अतिरिक्त उपासनांना विषय करून त्यांचें अनेक प्रकारें अनुष्ठान उपलब्ध होत असल्यामुळें '**इतरेषु तु०**' इत्यादि भाष्यानें संशय सांगतात–]=पण इतर उपासनांविषयीं 'काय अनियमानें–उभें राहून, बसून, किंवा निजून पुरुषानें उपासना करण्यास प्रवृत्त व्हावें कीं नियमानें आसनावर बसूनच उपासना करावी' याचा विचार करितात. [–शास्त्रीय प्रस्तुत उपासनांतील अनुष्ठानविशेषाचा विचार येथें केलेला असल्यामुळें याच्या पादादिसंगति आहेत. पूर्वपक्षांत 'कर्मांगांचा आश्रय न केलेल्या उपासनांमध्यें देहसंबंधी नियमाची असिद्धि' आणि सिद्धान्तांत 'ध्यानाला मनोव्यापारत्व जरी असलें तरी देहाचें स्थिर अवस्थान नसल्यास मनाचेंहि अनवस्थान होत असल्यामुळें त्या उपासनांमध्यें दैहिक नियमाची सिद्धि' असें मानून '**तत्र०**' इत्यादि भाष्यानें पूर्वपक्ष–]=असा संशय आला असतां उपासनेला मानसत्व असल्यामुळें शरीरस्थितीचा अनियम आहे, असा पक्ष प्राप्त होतो. [–मन व देह यांना भिन्नत्व असल्यामुळें, मनोव्यापारभूत उपासनेला देहव्यापाराचें उपकारित्व नसल्यामुळें, आसनावर बसलेल्या किंवा उभ्या राहिलेल्या उपासकानें प्रकृत उपासनांचें आपल्या इच्छेप्रमाणें कसेंहि अनुष्ठान करावें, असा याचा भावार्थ.–'**एवं०**' इत्यादि भाष्यानें 'अनंगाश्रित उपासनांचें कसेंहि अनुष्ठान करावें' या पक्षाचा अनुवाद करून सिद्धान्त सांगतात–]

**भाष्यं—एवं प्राप्ते ब्रवीति–आसीन एवोपासीतेति । कुतः । संभवात् । उपासनं नाम समानप्रत्ययप्रवाहकरणम् । न च तद्गच्छतो धावतो वा संभवति । गत्यादीनां चित्तविक्षेपकत्वात् । तिष्ठतोऽपि देहधारणे व्यापृतं मनो न सूक्ष्मवस्तुनिरीक्षणक्षमं भवति । शयानस्याप्यकस्मादेव निद्रयाभिभूयेत । आसीनस्य त्वेवंजातीयको भूयान्दोषः सुपरिहर इति संभवति तस्योपासनम् ॥ ७ ॥**

**भाष्यार्थ**—असा पूर्वपक्ष प्राप्त झाला असतां सूत्रकार उपासकानें आसनावर बसूनच उपासना करावी असा सिद्धान्त सांगतात–[–'**कुतः०**' इत्यादि भाष्यानें प्रश्नपूर्वक त्याचा नियामक हेतु सांगतात–]=कोणत्या कारणानें ? 'संभवामुळें' [–'**उपासनं०**' इत्यादि भाष्यानें संभव सांगण्यासाठींच उपासनशब्दाचा अर्थ सांगतात–]=उपासन म्ह० समानप्रत्ययाचा प्रवाह करणें–एकच अविच्छिन्न प्रत्यय चालू ठेवणें. [–तथापि 'तें समानप्रत्ययप्रवाहकरण बसलेल्या उपासकाचेंच संभवतें' असा नियम कसा केला जातो ? '**न च०**' इत्यादि भाष्यानें

उत्तर–]=अशा प्रकारचें तें उपासन गमन करणाऱ्या किंवा धांवणाऱ्या पुरुषाचें संभवत नाहीं. कारण गत्यादिकांना चित्तविक्षेपकत्व आहे–गति, धांवणें, इत्यादिकांमुळें चित्ताला विक्षेप होतो. [–'तर मग उभ्या राहिलेल्या पुरुषाचें उपासन होईल, कारण त्यानें चित्ताला विक्षेप होत नाहीं!' '**तिष्ठतोऽपि०**' या भाष्यानें उत्तर–]=उभ्या राहिलेल्या पुरुषाचेंहि देहधारणामध्यें व्यापारयुक्त–व्यासक्त झालेलें मन सूक्ष्म वस्तूचें निरीक्षण करण्यास समर्थ होत नाहीं.[–'तर मग शयन करणाऱ्या पुरुषाचें उपासन संभवेल, कारण निजलेल्या मनुष्याच्या देहधारण-व्यापाराचा अभाव असतो!' याचें '**शयानस्य०**' इत्यादि भाष्यानें 'नाहीं' असें उत्तर–]=शय्येवर शयन करणाऱ्या पुरुषाचेंहि मन अकस्मात्च निद्रेनें अभिभूत होतें–त्याला झोंप येते. [–याप्रमाणें देह अनवस्थित असतांना मन अनवस्थित होतें, ही गोष्ट प्रत्यक्ष प्रमाणानें सिद्ध असल्यामुळें आसनावर बसलेल्याच पुरुषाचें उपासन अनुष्ठेय आहे, असा परिशेषसिद्ध अर्थ '**आसीनस्य तु०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=पण बसलेल्या पुरुषाचा अशा प्रकारचा पुष्कळसा दोष सुपरिहर–अनायासानें परिहार करितां येण्यासारखा आहे. म्हणून त्याचें उपासन संभवतें. ७.[–'आणि याहि कारणानें उपासन हें आसीनकर्म आहे' असें '**ध्यानाच्च०**' या सूत्रानें सांगतात–]

## सूत्र—ध्यानाच्च ॥ ८

**सूत्रार्थ**—आणि उपासनांना 'ध्यायति-'क्रियेचा अर्थ जें ध्यान तद्रूपत्व आहे. त्यामुळें योग्यानें बसूनच उपासना करावी.८.–सु.ब्र.४३७–[–'**अपि च०**' इत्यादि भाष्यानें सूत्राचें विवरण–]

**भाष्यं— अपि च ध्यायत्यर्थ एषः । यत्समानप्रत्ययप्रवाहकरणम् । ध्यायतिश्च प्रशिथिलांगचेष्टेषु प्रतिष्ठितदृष्टिषु एकविषयाक्षिप्तचित्तेषूपचर्यमाणो दृश्यते ध्यायति बको ध्यायति प्रोषितबंधुरिति । आसीनश्चानायासो भवति । तस्मादप्यासीनकर्मोपासनम् ॥ ८ ॥**

**भाष्यार्थ**—शिवाय जें समान प्रत्ययाचें प्रवाहकरण तोच 'ध्यायति' या शब्दाचा अर्थ आहे. [–'उपास्ति व ध्यायति'–उपासना व ध्यान यांना एकार्थत्व जरी असलें तरी प्रकृत विषयांत यापासून काय निष्पन्न होतें? '**ध्यायतिश्च०**' इत्यादि भाष्यानें उत्तर–]=आणि 'ध्यायति' हा शब्द ज्यांची अंगचेष्टा अगदीं शिथिल झाली आहे, ज्यांची दृष्टि प्रतिष्ठित–स्थिर आहे, व ज्यांचें चित्त एकाच विषयामध्यें आसक्त झालेलें आहे, अशा जीवांच्या ठिकाणीं उपचारानें योजिला

जात असलेला दिसतो. जसें–बक ध्यान करितो. ज्याचा कोणी आप्त प्रवासास गेला आहे असा तो ध्यान करीत बसतो. [–"अहोपण, ज्या अवस्थेंत 'ध्यायति-' शब्दाचा प्रयोग केला जातो ती अवस्था उभ्या राहिलेल्या जीवाचीहि संभवते" '**आसीनश्च०**' इत्यादि भाष्यानें उत्तर–]=आणि आसनांवर बसलेला पुरुष आयासशून्य होतो. [–'**तस्मात्०**' इत्यादि भाष्यानें या लौकिकलिंगाचा उपसंहार–]=त्यामुळेंहि उपासना हें आसीनकर्म आहे. ८. [–'**अचलत्वं च०**' या सूत्रानें त्याविषयींच वैदिकलिंग सांगतात–]

## सूत्रं––अचलत्वं चापेक्ष्य ॥ ९

**सूत्रार्थ**––'पृथ्वी जणुंकाय ध्यान करिते,' या वैदिक प्रयोगांत पृथ्वीच्या अचलत्व या धर्माच्या अपेक्षेनें तिच्या ठिकाणीं ध्यानाचा प्रयोग केलेला दिसतो. ९. –सु.ब्र.४३७.–[–'**अपि च०**' इत्यादि भाष्यानें सूत्राचें विवरण–]

**भाष्यं**— **अपि च ' ध्यायतीव पृथिवी ' इत्यत्र पृथिव्यादिषु अचलत्वमेवापेक्ष्य ध्यायतिवादो भवति । तच्च लिंगमुपासनस्यासीनकर्मत्वे ॥ ९ ॥**

**भाष्यार्थ**––' शिवाय पृथ्वी जणुंकाय ध्यान करिते ' –छां.७.६.१–या श्रुतींत पृथ्व्यादिकांतील अचलत्वाच्याच अपेक्षेनें ध्यायतिवाद–ध्यायतिशब्दप्रयोग होतो, आणि तें उपासनेच्या आसीनकर्मत्वाविषयीं लिंग आहे ९. [–' **आसनाचें** जें विधान केलेलें आहे त्याच्या अन्यथा-अनुपपत्तीनेंहि उपासनेला आसीनकर्मत्व आहे असें ' **स्मरन्ति च०**' इत्यादि सूत्रानें सांगतात–]

## सूत्रं––स्मरन्ति च ॥ १० ॥ ( ६ )

**सूत्रार्थ**––आणि 'शुचौ देशे०' इत्यादि स्मृतींत शिष्ट उपासनेसाठीं आसन सांगतात. १०. (६.) सु.ब्र.४३७ [–'**स्मरन्त्यपि०**' इत्यादि भाष्यानें बाह्य आसनविषयत्वानें सूत्राची योजना करितात–]

**भाष्यं––स्मरन्त्यपि च शिष्टा उपासनांगत्वेनासनं— " शुचौ देशे प्रतिष्ठाप्य स्थिरमासनमात्मनः " इत्यादिना । अतएव पद्मकादीनामासनविशेषाणां उपदेशो योगशास्त्रे** ॥ १० ॥ ( ६ )

**भाष्यार्थ––आणि** ' पवित्र प्रदेशांत आपलें स्थिर आसन स्थापून '–भ. गी. ६. ११.–इत्यादि स्मृति वचनानें शिष्ट उपासनेच्या अंगत्वानें आसनाचें विधानहि करितात. [–शारीरासनाच्या विधानविषयत्वानेंहि त्याच सूत्राची योजना–]='**अतः एव०** '–उपासनेला आसीनकर्मत्व असल्यामुळेंच योगशास्त्रांत पद्मकादि आसनविशेषांचा उपदेश केलेला आहे. १०.–सु. ब्र. पृ. ४३८. (६)

(७. एकाग्रताधिकरण. सू. ११.)

—अनंगाश्रित उपासनांमध्यें आसनाचा जसा नियम आहे तसाच पूर्वादि दिशांचाहि नियम असेल अशी आशंका घेऊन 'यत्रैकाग्रता०' इत्यादि सूत्रानें सिद्धान्त सांगतात—

**सूत्रं—यत्रैकाग्रता तत्राविशेषात् ॥ ११ ॥ (७)**

**सूत्रार्थ**—ज्या दिक्-काल-प्रदेशीं चित्ताची एकाग्रता होते, तेथें बसून उपासना करावी. कारण त्या दिगादिकांचा विशेष श्रुत नाहीं. ११. (७)-सु. ब्र ४३९. [-अनंगाश्रित उपासनें हा या अधिकरणाचा विषय आहे. त्यांमध्यें दिगादिकांचा नियम आहे कीं नाहीं, असा विहित उपासनांमध्यें दोन प्रकारच्या दृष्टीनें 'दिग्देश-कालेषु०' इत्यादि भाष्यानें संशय सांगतात-]

**भाष्यं—दिग्देशकालेषु संशयः-किमस्ति कश्चिन्नियमो नास्ति वेति । प्रायेण वैदिकेष्वारंभेषु दिगादिनियमदर्शनात्स्यादिहापि कश्चिन्नियम इति यस्य मतिः तं प्रत्याह दिग्देशकालेष्वर्थलक्षण एव नियमः ॥**

**भाष्यार्थ**—दिक्, देश व काल यांविषयीं कांहीं नियम आहे कीं नाहीं ? असा संशय येतो. [ येथें अंगोपासनातिरिक्त शास्त्रोक्तच उपासनांमध्यें दिगादि-नियमावांचून अनुष्ठानक्रमाचा विचार केलेला असल्यामुळें याच्या पादादिसंगति आहेत. पूर्वपक्षांत 'दिगादिकांचा नियम असल्यामुळें या उपासनांमध्यें चित्तै-काग्र्यावांचून अनुष्ठान' व सिद्धान्तांत 'दिगादिकांविषयींच्या आस्थेचा अभाव जरी असला तरी प्रधानाच्या आनुकूल्यामुळें अनुष्ठान' अशा फलभेदाचा अंगीकार करून-'अनंगोपासनें नियत दिक्-देश-कालांनीं युक्त आहेत. कारण त्यांना चोदनालक्षणत्व आहे. वैश्वदेवाप्रमाणें,' अशा आशयानें 'प्रायेण०' इत्यादि भाष्यानें पूर्वपक्ष करितात-]=प्रायः वैदिकारंभामध्यें दिगादिकांचा नियम उप-लब्ध होत असल्यामुळें येथेंहि कांहीं नियम असेल, अशी ज्याची मति आहे, [-'प्रदोषादि कालीं, प्राच्यादि दिशेंत, तीर्थादि प्रदेशीं प्रकृत उपासनांचें अनुष्ठान करावें असें प्राप्त झालें असतां 'तं०' इत्यादि भाष्यानें सिद्धान्त सांगतात-] =त्याचें प्रत्याख्यान करितात. दिक्, देश व काल यांमध्यें अर्थलक्षणच नियम आहे. [-विधिवशानें उक्त उपासनांमध्यें देशादिनियम नाहीं. तर उपास्यामध्यें चित्तैकाग्र्यलक्षण अर्थाक्षिप्तच-अर्थ-प्राप्तच त्यांचा नियम आहे, असें जें सांगि-तलें आहे त्याचेंच 'यत्र०' इत्यादि भाष्यानें विवरण-]

**भाष्यं—यत्रैवास्य दिशि देशे काले वा मनसः सौकर्येणैकाग्रता भवति तत्रैवोपासीत प्राचीदिक्पूर्वाह्णप्राचीनप्रवणादिवद्विशेषाश्रवणात् । एकाग्रताया इष्टायाः सर्वत्राविशेषात् ॥**

**भाष्यार्थ**—ज्याच दिशेमध्यें, देशामध्यें, किंवा कालामध्यें याच्या मनाची सौकर्यानें एकाग्रता होते त्याच दिगादिकांमध्यें उपासना करावी, कारण पूर्व दिशा, पूर्वाह्ण काल व प्राचीनप्रवणादि प्रदेश यांप्रमाणें उपासनांमध्यें दिगादिकांच्या विशेषाचें श्रवण नाहीं. [-पण 'विधिलक्षणत्वामुळें' इत्यादि जें वर अनुमान केलें आहे, त्यांत 'श्रुतदेशादिमत्त्व' ही उपाधि आहे, असें सांगणारे भाष्यकार '**प्राचीन-प्रवणादिवत्**०' इत्यादि भाष्यानें 'अविशेषात्' या सूत्रावयवाचें व्याख्यान करितात-]=प्राचीनप्रवण म्हणजे ज्याचा पूर्वदेश निम्न-सखल आहे, अशा प्रदेशीं वैश्वदेव या नांवाचा यागविशेष करावा, इत्यादिकांप्रमाणें येथें विशेष श्रुत नाहीं. [चित्ताचें ऐकाग्र्य हेंच ध्यानाचें अंतरंग आहे. तें ऐकाग्र्य मध्याह्नादि कालींहि संभवत असतांना प्रदोषादिकालाची अपेक्षा केल्यास त्याचें शेषी जें ध्यान त्याचा बाध होत असल्यामुळें ध्यानांत दिगादिकांचा अनियम आहे, असा याचा भावार्थ. -"अहोपण, ध्यानाचें अंतरंग जें ऐकाग्र्य त्याला नियत दिगादिकांची अपेक्षा आहे" अशी आशंका घेऊन '**एकाग्रतायाः**०' इत्यादि भाष्यानें सूत्रांतील 'अविशेषात्०' या हेतूचें अर्थान्तर सांगतात-]=कारण इष्ट असलेल्या एकाग्रतेचा सर्वत्र अविशेष-साम्य आहे.[-'ननु०' इत्यादि भाष्यानें 'विशेषाचें अश्रवण असिद्ध आहे' अशी शंका-]

**भाष्यं—ननु विशेषमपि केचिदामनन्ति--"समे शुचौ शर्करावह्निवालुकाविवर्जिते शब्दजलाश्रयादिभिः । मनोनुकूले न तु चक्षुपीडने गुहानिवाताश्रयणे प्रयोजयेत्" इति यथेति । उच्यते— सत्यमस्त्येवंजातीयको नियमः । सति त्वेतस्मिंस्तद्गतेषु विशेषेष्वनियम इति सुहृद्भूत्वाचार्य आचष्टे । "मनोनुकूले" इति चैषा श्रुतिर्यत्रैकाग्रता तत्रैव इत्येतदेव दर्शयति ॥ ११ ॥ (७)**

**भाष्यार्थ**—"अहोपण, कित्येक त्यांचा विशेषहि सांगतात,"जसें-'उंच-सखल नसलेल्या, केश, अस्थि इत्यादि अशुद्ध द्रव्यांनीं अशुद्ध न झालेल्या, बारीक खडे, अग्नि, वाळू यांनीं रहित, कलहादि किंवा दुसरे वर्णरूप व ध्वनिरूपशब्द, जलाशय, व्याघ्र-सिंहादिकांचा आश्रय यांनीं रहित, मनाला रम्य वाटणारा, चक्षूला पिडा देणाऱ्या मशकादिकांनीं रहित अशा दर्शनीय व मनःस्वास्थ्यकर गुहेसारख्या एकान्त व निर्वात आश्रयस्थानीं बसून अष्टांगयोगाभ्यास करावा. किंवा चित्ताला परमा-

त्म्यामध्यें स्थिर करावें.–श्वे. २. १०. सु. उ. ९२७. –असा देशविशेष श्रुत आहे. –'यथेति'–जसा हा श्रुतिसिद्धविशेष आहे तसाच दुसराहि कालादिविशेष ध्यानामध्यें असेल असा भावार्थ. [–'पण असा वचनसिद्ध नियम असतांनाच या दिगादिनियमांचें निरसन केलें जातें' असें 'उच्यते०' इत्यादि भाष्यानें सांगतात–] =या शंकेचें समाधान सांगितलें जातें–अशा प्रकारचा नियम श्रुतीमध्यें आहे हें खरें, पण असा नियम असतांना सुद्धां त्या देशादिकांतील विशेषाविषयीं नियम नाहीं, असें सूत्रकार आचार्य सर्व मुमुक्षूंचे सुहृद्–निरपेक्ष उपकार करणारे होऊन सांगतात. ['तद्गतेषु०' येथील 'तत्-'शब्दानें श्रौत विशिष्ट देशाचें ग्रहण केलें जातें. त्यांतील विशेष म्हणजे पूर्वोक्त प्राचीन प्रवणादिदेश, त्याचा नियम असल्यास कदाचित् एकाग्रतेच्या असंभवामुळें उपासनेचाहि असंभव होऊन प्रधानाशींच विरोध येतो. म्हणून त्याचा अनियम अधिक श्रेयस्कर आहे, असा भावार्थ. शेषी उपासनेच्या अनुकूलतेमुळें नियमापेक्षां अनियम युक्त आहे, याविषयीं 'असें सुहृद् होऊन आचार्य सांगतात' या भाष्यानें भाष्यकार सूत्रकारांची संमति सांगतात.–शिवाय ही उक्त श्रुतिहि आम्हांला अनुकूलच आहे असें '**मनोनुकूले०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=आणि मनोनुकूले अशी ही श्रुति जेथें चित्ताची एकाग्रता होईल तेथेंच बसून उपासना करावी, हेंच दाखविते. ११.–सु. ब्र. ४४०. (७).

(८. **आप्रायणाधिकरण**. सू. १२.)

––"देशादिकांच्या अविधानामुळें त्यांची जशी अपेक्षा नाहीं, त्याचप्रमाणें अहंग्रहोपासनांमध्यें देहपात होईपर्यंत त्या उपासनांची आवृत्ति करावी असें विधान नसल्यामुळें त्या उपासनांना आवृत्तीची अनपेक्षा आहे" अशी आशंका घेऊन सूत्रकार '**आप्रायणात्०**' इत्यादि सूत्रानें तिचें निरसन करितात––

## सूत्रं––आ प्रायणात्तत्रापि हि दृष्टम् ॥ १२ ॥ (८)

**सूत्रार्थ**––मरणापर्यंत उपासना करावी. कारण मरणसमयींहि उपास्यप्रत्ययाची अनुवृत्ति दृष्ट आहे. १२ (८.) [–'**आवृत्तिः०**' इत्यादि भाष्यानें या अधिकरणाचा व्यवहित–दूरच्या अधिकरणाशीं संबंध आहे हें सांगण्यासाठीं गतार्थाचा अनुवाद–]

**भाष्यं––आवृत्तिः सर्वोपासनेष्वादर्तव्येति स्थितमाद्येऽधिकरणे । तत्र यानि तावत्सम्यग्दर्शनार्थान्युपासनानि तान्यवघातादिवत्कार्यपर्यवसानानीति ज्ञातमेवैषामावृत्तिपरिमाणम् । न हि सम्यग्दर्शने कार्ये निष्पन्ने यत्नान्तरं किंचिच्छासितुं शक्यम् । अनियोज्यब्रह्मात्मत्वप्रतिपत्तेः शास्त्रस्याविषयत्वात् ॥**

**भाष्यार्थ**—सर्व उपासनांमध्यें आवृत्ति आदरणीय आहे, असें पहिल्या अधिकरणांत सिद्ध झालें. [–आतां संबंध सांगणारे आचार्य ' **तत्र०** ' इत्यादि भाष्यानें विषयाचें विवेचन करितात–]=त्यांत अगोदर सम्यग्-दर्शनासाठीं जीं उपासनें आहेत तीं अवघातादिकांप्रमाणें कार्यामध्यें पर्यवसान पावणारीं आहेत. त्यामुळें त्यांच्या आवृत्तीचें परिमाण ज्ञात झालेंच आहे. [–' अहोपण, सम्यग्ज्ञान जरी झालें तरी मुक्तीसाठीं मरेपर्यंत आवृत्ति करावी ' अशी आशंका घेऊन ' **न हि०** ' इत्यादि भाष्यानें म्हणतात–]=कारण सम्यग्दर्शन–आत्मसाक्षात्कार हें कार्य निष्पन्न झालें असतां दुसऱ्या कोणत्याहि यत्नाचें अनुशासन करणें शक्य नाहीं. कारण अनियोज्यब्रह्मात्मत्वप्रतिपत्तीला शास्त्राचें अविषयत्व आहे. [नियोगाला–विधीला पात्र असलेला जो अधिकारी त्याचा अभाव असल्यामुळें आणि मुक्ति व सम्यग्ज्ञान यांचें साहचर्य असल्यामुळें आवृत्ति व्यर्थ आहे, असा भावार्थ. विधीचा विषय न होणाऱ्या पुरुषाचें ब्रह्मात्मत्वज्ञान हा शास्त्राचा विषय नव्हे, असा या भाष्याचा अक्षरार्थ आहे.–आतां उक्त हेतूच्या अभावामुळें अनुष्ठान दोन्ही प्रकारें उपलब्ध होत असल्यामुळें अहंग्रहोपासनांविषयीं ' **यानि०** ' इत्यादि भाष्यानें संशय सांगतात–]

**भाष्यं—यानि पुनरभ्युदयफलानि तेष्वेषा चिंता किं कियन्तंचित्कालं प्रत्ययमावर्त्योपरमेद् उत यावज्जीवमावर्तयेदिति । किं तावत्प्राप्तम् । कियन्तंचित्कालं प्रत्ययमभ्यस्योत्सृजेद् आवृत्तिविशिष्टस्योपासनशब्दार्थस्य कृतत्वादिति ॥**

**भाष्यार्थ**—पण अभ्युदय म्ह० ब्रह्मलोक, हें ज्यांचें फल आहे अशा उपासनांविषयीं " काय, कांहीं काल प्रत्ययाची आवृत्ति करून शांत व्हावें म्ह० उपासना सोडावी कीं, यावज्जीव–मरेपर्यंत तिची आवृत्ति करावी " असा हा विचार प्राप्त होतो, असा संशय येतो. [स्वतंत्र फलाला कारण होणाऱ्या शास्त्रीय अहंग्रहोपासनांमध्यें यावज्जीव अनुष्ठान करावें, असें येथें चिंतन केलेलें असल्यामुळें याच्या पादादिसंगति आहेत. –पूर्वपक्षांत ' सर्व उपासनांमध्यें आवृत्तीचा अविशेष –साम्य ' व सिद्धान्तांत ' प्रस्तुत अहंग्रहोपासनांमध्यें विशेष आहे ' असें मानून ' **किं तावत्०** ' इत्यादि भाष्यानें विमर्शपूर्वक पूर्वपक्ष करितात–]=प्रथम यांतील कोणता पक्ष प्राप्त झाला ? कांहीं कालपर्यंत प्रत्ययाचा अभ्यास करून पुढें तो सोडून द्यावा, कारण आवृत्तिविशिष्ट उपासनाशब्दाचा अर्थ तेवढ्यानें केला आहे, असें होतें–कांहीं काल आवृत्ति केल्यानें उपासना या शब्दाच्या आवृत्तियुक्त अर्थाचें अनुष्ठान केलें आहे, असें होतें. [–सर्व उपासनांतील आवृत्तींत कांहीं विशेष

नाहीं, असें पूर्वपक्षानें प्राप्त झालें असतां प्रकृत उपासनांमध्यें मरणापर्यंत आवृत्ति करावी असा ' एवं० ' इत्यादि भाष्यानें सिद्धान्त सांगतात-]

**भाष्यं— एवं प्राप्ते ब्रूमः-आ प्रायणादेवावर्तयेत्प्रत्ययम् । अंत्यप्रत्ययवशाददृष्टफलप्राप्तेः । कर्माण्यपि हि जन्मान्तरोपभोग्यं फलमारभमाणानि तदनुरूपं भावनाविज्ञानं प्रायणकाले आक्षिपन्ति । ' सविज्ञानो भवति सविज्ञानमेवान्ववक्रामति ' ' यच्चित्तस्तेनैष प्राणमायाति । प्राणस्तेजसा युक्तः सहात्मना यथासंकल्पितं लोकं नयति ' इति चैवमादिश्रुतिभ्यः ॥**

**भाष्यार्थ**—असा पूर्वपक्ष प्राप्त झाला असतां 'मरेपर्यंतच प्रत्ययाची आवृत्ति करावी' असा सिद्धान्त आम्ही सांगतों. [ उपास्याचें अपरोक्षत्व हें दृष्टफल सिद्ध झालें असतां त्याच्या द्वारा अदृष्ट फलाचीहि सिद्धि होत असल्यामुळें अवघातादिकांप्रमाणें मरण येईपर्यंत अनुष्ठान करावें, असें ' **अन्त्य०**' इत्यादि भाष्यानें सांगतात-]=कारण ' अन्त्य-'प्रत्ययाच्या सामर्थ्यानें अदृष्टफलाची प्राप्ति होत असते. [-' अहोपण, अन्त्यप्रत्ययावांचूनच उपासनांची फलप्राप्ति संभवत असल्यामुळें त्यासाठी आवृत्तीची आवश्यकता नाहीं ' अशी आशंका घेऊन ' **कर्माणि०** ' इत्यादि भाष्यानें सांगतात-]=कारण जन्मांतरीं उपभोग घेण्यास योग्य असलेल्या फलाचा आरंभ करणारीं कर्मेंहि मरणकालीं तदनुरूप भावनाविज्ञानाची अपेक्षा करितात. [-याविषयीं प्रमाण-]=' **सविज्ञानः०**'-"म्रियमाण भोक्ता भोक्तव्य फलाच्या भावनामय विज्ञानानें युक्त-सविज्ञान होतो आणि त्या विज्ञानासहितच फलाला अनुलक्षून शरीर सोडून जातो.-बृ.४.४.२-व '**यच्चित्तः०**'-ज्याचें चित्त ज्या विषयामध्यें असतें तो यच्चित्त, हृदयांत अभिव्यक्त झालेल्या त्या विषयासह हा भोक्ता आत्मा तेजाला-तेजोदेवतारूप असलेल्या उदानाला प्राप्त होतो. '**प्राणस्तेजसा०** '-तेजानें युक्त झालेला तो प्राण आत्म्यासह यथासंकल्पित लोकाला नेतो. "-प्र.३.२.६-इत्यादि अनेक श्रुति याविषयीं प्रमाण आहेत. [-म्रियमाण भोक्त्याच्या ज्ञानवत्त्वाविषयीं दृष्टान्तश्रुतिहि प्रमाण आहे, असें ' **तृण०**' इत्यादि भाष्यानें सांगतात-]

**भाष्यं— तृणजलूकानिदर्शनाच्च । प्रत्ययास्त्वेते स्वरूपानुवृत्तिं मुक्त्वा किमन्यत्प्रायणकालभावि भावनाविज्ञानमपेक्षेरन् । तस्माद्ये प्रतिपत्तव्यफलभावनात्मकाः प्रत्ययाः । तेष्वा प्रायणादावृत्तिः । तथा च श्रुतिः— ' स यावत्क्रतुरयमस्माल्लोकात्प्रैति ' इति प्रायणकालेऽपि प्रत्ययानुवृत्तिं दर्शयति ॥**

**भाष्यार्थ**—आणि तृणजलूच्या दृष्टान्तावरूनहि म्रियमाण भोक्ता सविज्ञान होतो, असें सिद्ध होतें. [ जेथें अप्रत्ययरूप कर्मांनाहि अन्त्यप्रत्ययाच्या अपेक्षेनें फलजनकत्व असतें तेथें प्रत्ययात्मक उपासनांच्या अन्त्यप्रत्ययाविषयीं काय सांगावें, असा याचा भावार्थ.—"तर मग कर्मांप्रमाणें उपासनांनाहि अदृष्टद्वारा अन्त्यप्रत्ययाची अपेक्षा असेल" अशी आशंका घेऊन '**प्रत्ययास्तु०**' इत्यादि भाष्यानें तिचें 'नाहीं' असें उत्तर सांगतात—]=पण हे प्रत्यय स्वरूपानुवृत्तीला सोडून मरणकालीं होणाऱ्या अशा दुसऱ्या कोणत्या भावनाविज्ञानाची अपेक्षा करणार ? [ त्यांना धारावाहिकत्व असल्यामुळें दृष्टद्वारा त्यांच्या प्रापक हेतूचा संभव असतांना अदृष्ट कल्पना करणें युक्त नाहीं, असा याचा भावार्थ.—सर्व भावनांना आपल्या अवान्तर जातीयांचें निरपेक्षत्व असल्यामुळें भावनात्मक उपासनांना भावनान्तराची अपेक्षा नसते, तर स्वरूपसंनिधानानेंच अदृष्टफलोपयोगित्व असतें असें मानून '**तस्मात्०**' इत्यादि भाष्यानें उपसंहार—]=म्हणून जे प्राप्तव्य फलाच्या भावनात्मक प्रत्यय असतात त्यांमध्यें 'आप्रायण'—मरणपर्यंत आवृत्ति होते. [—'**तथा च०**' इत्यादि भाष्यानें 'तत्रापि दृष्टं' या सूत्रावयवाचें व्याख्यान करितात—]= आणि त्याचप्रमाणें 'सः'—"तो उपासक 'यावत् क्रतुः'— जेवढ्या संकल्पानें 'अस्मात् लोकात्'—या अभिमानानें ग्रहण केलेल्या देहांतून 'प्रैति'—निघून जातो" अशी ही श्रुति प्रयाणकालींहि प्रत्ययाची अनुवृत्ति दाखविते. [—स्मार्तदर्शनाचा आश्रय करूनहि '**स्मृतिरपि०**' इत्यादि भाष्यानें सूत्रावयवाची योजना—]

**भाष्यं — स्मृतिरपि— " यं यं वाऽपि स्मरन्भावं त्यजत्यन्ते कलेवरम् । तं तमेवैति कौन्तेय सदा तद्भावभावितः " इति । " प्रयाणकाले मनसाऽचलेन " इति च । 'सोऽन्तवेलायामेतत्त्रयं प्रतिपद्येत' इति च मरणवेलायामपि कर्तव्यशेषं श्रावयति ॥ १२ ॥ (८)**

**भाष्यार्थ**—'हे अर्जुना, हा पुरुष मरणसमयीं ज्या ज्या पदार्थाचें स्मरण करीत या शरीराला सोडतो, त्या त्याच पदार्थाला सदा त्याच्याच भावनेनें भावनायुक्त होऊन प्राप्त होतो.'— गी. ८. ६.—असें व 'प्रयाणसमयीं अचल मनानें०'—गी.८.१०.— असे स्मृतिवचनहि आहे. [—त्याविषयींच दुसरें एक श्रौत दर्शन सांगतात—]= 'सः'—"तो उपासक 'अक्षितं असि, अच्युतं असि, प्राणसंशितमसि' या मंत्रत्रयाचें स्मरण करो " ही श्रुति मरणसमयींहि कर्तव्यशेष ऐकविते. ['उपासकानें या मंत्रत्रयाचें स्मरण करावें' असें मरणकालींहि अनुष्ठेय दाखविणारी श्रुति विज्ञानाची आवृत्ति सुचविते, असा याचा भावार्थ.] १२.—सु.ब्र.४४१-४४२ (८)

( ९. तदधिगमाधिकरण. सू. १३. )

---ज्याप्रमाणें उपासनेमध्यें अन्तकालीं कर्तव्य आहे त्याप्रमाणें ब्रह्मविद्येमध्यें कांहींहि कर्तव्य नाहीं. कारण तिच्या नुस्त्या उत्पत्तीनेंच सर्व पापांचा क्षय होतो, असें ' **तदधिगमे०** ' इत्यादि सूत्रानें सांगतात—

**सूत्रं---तदधिगम उत्तरपूर्वाघयोरश्लेषविनाशौ तद्व्यपदेशात् ॥१३॥ (९)**

**सूत्रार्थ**---ब्रह्माचा अधिगम–साक्षात्कार झाला असतां ज्ञानानंतर शरीरेंद्रियादिकांनीं घडणारें जें पाप तें उत्तराघ व ज्ञानापूर्वी–या किंवा पूर्व अनेक जन्मांमध्यें संचित होऊन राहिलेलें जें पाप तें पूर्वाघ, अशा दोन्ही उत्तर व पूर्व अघांचा क्रमानें अश्लेष–असंबंध व विनाश होतो. कारण ' तद्यथा पुष्करपलाशे० ' या श्रुतिवचनांत त्यांचा निर्देश केला आहे. १३. (९.)–सु. ब्र. ४४२. [–साधनानुष्ठानाविषयीं यत्नाधिक्य करावें, यासाठीं या फलाध्यायांतहि साधनसंबद्ध अनुष्ठानक्रमाचा विचार करून फलाध्यायस्थ फलविचाराला ' **गतः०** ' इत्यादि भाष्यानें प्रवृत्त करितात–]

**भाष्यं---गतस्तृतीयशेषः । अथेदानीं ब्रह्मविद्याफलं प्रति चिंता प्रतायते । ब्रह्माधिगमे सति तद्विपरीतफलं दुरितं क्षीयते न क्षीयते वेति संशयः । किं तावत्प्राप्तम् । फलार्थत्वात्कर्मणः फलमदत्त्वा न संभाव्यते क्षयः । फलदायिनी ह्यस्य शक्तिः श्रुत्या समधिगता । यदि तदंतरेणैव फलोपभोगमपवृज्येत श्रुतिः कदर्थिता स्यात् । स्मरन्ति च " न हि कर्म क्षीयते " इति ॥**

**भाष्यार्थ**---तृतीयाध्यायाचा शेष होऊन गेला; आतां यापुढें ब्रह्मविद्येच्या फलाचा विचार विस्तारिला–आरंभिला जातो. [–पापाला विषय करून फलभोगानेंच त्याच्या क्षयाची प्रतीति येत असल्यामुळें व ज्ञानानेंहि त्याच्या क्षयाची प्रतीति येत असल्यामुळें ' **ब्रह्माधिगमे०**' इत्यादि भाष्यानें संशय सांगतात–] =ब्रह्माचा साक्षात्कार झाला असतां ज्याचें फल त्याच्या विपरीत म्ह० बंधसाधन आहे, असें दुरित–पाप क्षय पावतें किंवा नाहीं, असा संशय येतो. [–या अधिकरणांत साक्षात्च श्रौत ब्रह्मात्मज्ञानाचें दुरितक्षय हें फल सांगितलेलें असल्यामुळें याच्या पादादिसंगति आहेत. पूर्वपक्षांत 'पापफलभोगाच्या अपेक्षेनें ब्रह्मज्ञानाला मोक्षहेतुत्व' आणि सिद्धान्तांत 'ज्ञानाची उत्पत्ति व पापक्षय यांचें साहचर्य असल्यामुळें ज्ञानाला मोक्षहेतुत्व' असें मानून प्रश्नपूर्वक पूर्वपक्ष–] ='**किं तावत्०**'–मग यांतील प्रथम कोणता पक्ष प्राप्त झाला? कर्म फलार्थच असल्यामुळें फल दिल्यावांचून त्याचा क्षय संभवत नाहीं. [ अदृष्ट फलानेंच

नाश पावणारें असल्यामुळें फलदानावांचून त्याचा नाश होत नाहीं, असा याचा भावार्थ.—"अहोपण, त्याचें फलार्थत्व कसें सिद्ध झालें आहे ?" '**फलदायिनी०**' इत्यादि भाष्यानें उत्तर—]=कारण या अदृष्टाख्य कर्मांची फलदायिनी शक्ति श्रुतिप्रमाणानें चांगल्याप्रकारें ज्ञात झाली आहे. [—'ब्राह्मणाला मारूं नये' 'कलंज—सविष बाणानें मारलेल्या हरिणाचें मांस खाऊं नये' इत्यादि निषेधांच्या अनुपपत्तीनें दुरिताचें अनिष्टफलत्व सिद्ध आहे, असा याचा भावार्थ.—वादी '**यदि०**' इत्यादि भाष्यानें हेंच अधिक स्पष्ट करितो—]=जर फलोपभोगावांचूनच अदृष्ट कर्म क्षीण होईल तर श्रुति बाधित होईल. [—'कल्पकोटि शतांनींहि न भोगिलेलें कर्म क्षय पावत नाहीं' अशी स्मृति असल्यामुळेंहि फलभोगावांचून दुरिताचा नाश होत नाहीं, असें '**स्मरन्ति च०**' इत्यादि भाष्यानें सांगतात—]='कर्म क्षीण होत नाहीं' असें स्मृतिवचनहि आहे. [—भोगावांचून जर कर्म क्षीण होत नसेल तर प्रायश्चित्तविधि व्यर्थ होईल, अशी '**ननु०**' इत्यादि भाष्यानें शंका—]

**भाष्यं— नन्वेवं सति प्रायश्चित्तोपदेशोऽनर्थकः प्राप्नोति । नैष दोषः। प्रायश्चित्तानां नैमित्तिकत्वोपपत्तेर्गृहदाहेष्ट्यादिवत् । अपि च प्रायश्चित्तानां दोषसंयोगेन विधानाद्भवेदपि दोषक्षपणार्थता । न त्वेवं ब्रह्मविद्यायां विधानमस्ति ॥**

**भाष्यार्थ**—"अहोपण, असें झालें असतां प्रायश्चित्ताचा उपदेश व्यर्थ होण्याचा प्रसंग येतो" [—'कर्मविधींना दोषनिरसनार्थत्व नसल्यामुळें असें होत नाहीं' असें '**नैषः०**' इत्यादि भाष्यानें वादी सांगतो—]=हा दोष येत नाहीं. गृहदाहेष्ट्यादिकांप्रमाणें प्रायश्चित्तादिकांचें नैमित्तिकत्व उपपन्न होतें. त्यामुळें प्रायश्चित्तोपदेश व्यर्थ होत नाहीं. ['ज्या आहिताग्नि पुरुषाचें गृह अग्नि जाळील' या वाक्यानें प्राप्त झालेला जो गृहदाहवान् आहिताग्नि, त्या अधिकाऱ्यांमध्यें 'क्षामवान् अग्नीला उद्देशून अष्टाकपाल पुरोडाशाचा निर्वाप करावा' अशा क्षामवती इष्टीचें विधान जसें केलें जातें, तसेंच पापसंबंधी पुरुष प्राप्त झाला असतां 'ब्राह्मणाची हिंसा करणाऱ्या पुरुषानें द्वादशवार्षिक व्रत आचरावें,' इत्यादि प्रायश्चित्ताचें विधान केलें जातें. म्हणून 'ब्रह्महा'—ब्राह्मणाची हिंसा करणारा इत्यादि विशेषण अधिकारिव्यावृत्तिपर आहे, फलपर नाहीं, असा याचा भावार्थ.—भाष्यांतील '**गृहदाहेष्ट्यादिवत्**' यांतील आदिपदानें 'भिन्ने जुहोति, स्कन्ने जुहोति' इत्यादि नैमित्तिकांचें ग्रहण करणें युक्त आहे.—"अहोपण, गृहदाहादि हें निमित्त पूर्वीच होऊन गेलेलें असल्यामुळें तें निष्पादन करणें अशक्य आहे, म्हणून त्याला अधिकारिव्यावृत्त्यर्थत्व आहे, पण दुरितनिवृत्ति करतां येण्यासारखी आहे. म्हणून

इष्टसाधनत्वबोधी प्रायश्चित्तविधी दुरितनिवृत्तिफल देणारा असूं शकेल," अशी आशंका घेऊन प्रायश्चित्तांना दोषनिवृत्तिफलत्व आहे, ही गोष्ट मान्य करून वादी ' अपि च० ' या भाष्यानें सांगतो–]=शिवाय दोषसंयोगानें प्रायश्चित्ताचें विधान केलेलें असल्यामुळें त्यांना दोषक्षयार्थत्व असेलहि. पण ब्रह्मविद्येमध्यें असें दोषसंयोगानें विधान नाहीं. [–' पण मोक्षशास्त्राच्या प्रामाण्याच्या अनुपपत्तीनें विद्येनें दुरितनिवृत्ति होते असें मानावें ' अशी 'ननु०' इत्यादि भाष्यानें शंका–]

**भाष्यं—नन्वनभ्युपगम्यमाने ब्रह्मविदः कर्मक्षये तत्फलस्यावश्यभोक्तव्यत्वादनिर्मोक्षः स्यात् । नेत्युच्यते । देशकालनिमित्तापेक्षो मोक्षः कर्मफलवद्भविष्यति । तस्मान्न ब्रह्माधिगमे दुरितनिवृत्तिरिति ॥**

**भाष्यार्थ**—'अहोपण, ब्रह्मवेत्त्याच्या कर्माचा क्षय जर न मानिला तर त्याचें फल अवश्य भोक्तव्य असल्यामुळें अनिर्मोक्षप्रसंग येईल.' [–दुरितफलभोगानंतर शास्त्रप्रामाण्यामुळेंच मोक्षसिद्धि होत असल्यामुळें मोक्षशास्त्राशीं विरोध येत नाहीं, असें वादी ' न० ' इत्यादि भाष्यानें सांगतो–]=याचें 'नाहीं, अनिर्मोक्षप्रसंग येत नाहीं,' असें उत्तर सांगितलें जातें. देश, काल व निमित्त यांच्या अपेक्षेनें मोक्ष कर्मफलाप्रमाणें होईल. [–याप्रमाणें ब्रह्मज्ञानाला प्रायश्चित्ताहून वैषम्य आहे असें झालें असतां, त्याला दुरितनिवर्तकत्व जरी नसलें तरी मोक्षशास्त्राशीं अविरोध आहे, असें झालें असतां ' **तस्मात्**० ' इत्यादि भाष्यानें फलित सांगतो–]=म्हणून ब्रह्मसाक्षात्कार झाला असतां दुरितनिवृत्ति होत नाहीं, असें प्राप्त होतें. [–' **एवं**०' इत्यादि भाष्यानें ' ब्रह्मविद्या पापक्षयहेतु नाहीं ' अशा प्राप्त झालेल्या पूर्वपक्षाचा अनुवाद करून व सिद्धान्तसूत्राला अवतरण देऊन प्रतिज्ञेचें व्याख्यान करितात–]

**भाष्यं—एवं प्राप्ते ब्रूमः–तदधिगमे ब्रह्माधिगमे सति उत्तरपूर्वयोरघयोः अश्लेषविनाशौ भवतः । उत्तरस्याश्लेषः पूर्वस्य विनाशः । कस्मात् । तद्व्यपदेशात् । तथाहि ब्रह्मविद्याप्रक्रियायां संभाव्यमानसंबंधस्य आगामिनो दुरितस्यानभिसंबंधं विदुषो व्यपदिशति–'यथा पुष्करपलाश आपो न श्लिष्यन्त एवमेवंविदि पापं कर्म न श्लिष्यते ' इति ॥**

**भाष्यार्थ**—असा पूर्वपक्ष प्राप्त झाला असतां आम्ही सिद्धान्त सांगतों–' तदधिगमे '–ब्रह्माचा साक्षात्कार झाला असतां उत्तर व पूर्व अशा दोन्ही पापांचा क्रमानें अश्लेष व विनाश होतो. उत्तर पापाचा अश्लेष–असंबंध व पूर्व पापाचा विनाश. [–प्रश्नपूर्वक त्या विभागाच्या हेतूचें ग्रहण करितात–]=कोणत्या कारणानें? 'तद्व्यपदेशामुळें.' [–उत्तरपापाच्या अश्लेषविषयत्वानें हेतूचें व्याख्यान–]='तथा हि०'

–तद्व्यपदेश कसा आहे तो पहा–ब्रह्मविद्याप्रकरणामध्यें [–पण ज्ञानी निषिद्धाचें आचरणच करीत नसल्यामुळें दुरिताचें अश्लेषवचन व्यर्थ आहे, या शंकेचें निरसन करण्यासाठीं 'संभाव्यमानसंबंधस्य' असें आगामि-दुरिताला विशेषण देतात–] =विद्वानाच्या ज्याचा संबंध संभाव्यमान आहे, अशा आगामी–ज्ञानोत्तरकालीन दुरिताचा असंबंध श्रुति सांगते. 'ज्याप्रमाणें कमलपत्रामध्यें जलाचा संश्लेश होत नाहीं, त्याप्रमाणें ब्रह्मवेत्यामध्यें पापकर्म संश्लिष्ट होत नाहीं.' ही श्रुति पापाच्या असंबंधाचा व्यपदेश करिते. [–पूर्वकर्माच्या नाशाविषयींहि '**तथा०**' इत्यादि भाष्यानें हेतु–]

**भाष्यं—तथा विनाशमपि पूर्वोपचितस्य दुरितस्य व्यपदिशति– ' तद्यथेषीकातूलमग्नौ प्रोतं प्रदूयेतैवं हास्य सर्वे पाप्मानः प्रदूयन्ते ' इति । अयमपरः कर्मक्षयव्यपदेशो भवति– ' भिद्यते हृदयग्रंथिश्छिद्यन्ते सर्वसंशयाः । क्षीयन्ते चास्य कर्माणि तस्मिन्दृष्टे परावरे ' इति ॥**

**भाष्यार्थ**—त्याचप्रमाणें पूर्वोपचित–पूर्वी संपादन केलेल्या पापाच्या विनाशाचाहि व्यपदेश–निर्देश करिते. याविषयीं दृष्टान्त–"ज्याप्रमाणें काडीचें अग्र अग्नींत घातलें असतां सर्वथा दग्ध होऊन जातें, त्याचप्रमाणें याचें सर्व पाप दग्ध होतें."–छां. ५. २४. ३.–या वचनानें श्रुति तसा निर्देश करिते. [–सगुणविद्येंतील अश्लेष व विनाश यांच्या वचनाचा निर्देश करून निर्गुणविद्येंतील अश्लेष-विनाशवचनाचें ' **अयं०** ' इत्यादि भाष्यानें उदाहरण–]="त्या परावर परमात्म्याला साक्षात् जाणलें असतां हृदयग्रंथीचा भेद होतो, सर्व संशयांचा छेद होतो व त्याच्या सर्व कर्मांचा क्षय होतो."–मुं. २. २. ८.–असा हा कर्मक्षयाचा दुसरा निर्देश आहे. [ कर्माच्या क्षयाचें वचन त्याच्या असंबंधाचेंहि उपलक्षण आहे.–याप्रमाणें सिद्धान्ताचें उपपादन करून '**यदुक्तं०**' इत्यादि भाष्यानें परोक्ताचा अनुवाद—]

**भाष्यं—यदुक्तं अनुपभुक्तफलस्य कर्मणः क्षयकल्पनायां शास्त्रं कदर्थितं स्यादिति । नैष दोषः । न हि वयं कर्मणः फलदायिनीं शक्तिमवजानीमहे । विद्यत एव सा । सा तु विद्यादिना कारणान्तरेण प्रतिबध्यत इति वदामः । शक्तिसद्भावमात्रे च शास्त्रं व्याप्रियते । न प्रतिबंधाप्रतिबंधयोरपि ॥**

**भाष्यार्थ**—' ज्याच्या फलाचा उपभोग घेतलेला नाहीं अशा कर्माचा क्षय होतो, अशी कल्पना केल्यास शास्त्र बाधित होईल ' असें जें वाद्यानें वर म्हटलें आहे [–ज्ञानामुळें कर्मदाहादि होतो यापक्षीं ' **न एषः०**' इत्यादि भाष्यानें शास्त्रविरोधाचा परिहार करितात–]=तो दोष येत नाहीं. [–'कर्माची फलदानामध्यें शक्ति नाहीं–कर्माला फलदानाचें सामर्थ्य नाहीं, असें सिद्ध करूं लागल्यास शास्त्रविरोध

हा दोष येतो कीं कर्मांची फलदानशक्ति विद्यमान असतांनाच भोगावांचून कर्मांची निवृत्ति होते, असें सिद्ध करूं लागल्यास तो दोष येतो,' असा विकल्प करून त्यांतील पहिल्या पक्षाला ' न हि० ' इत्यादि भाष्यानें दूषित करितात–]=कारण आम्ही कर्मांच्या फलदायिनी शक्तीची अवज्ञा करीत नाहीं. कर्मांमध्यें फलदायिनी शक्ति तर आहेच. [–' सा तु० ' इत्यादि भाष्यानें दुसऱ्या पक्षाचा परिहार–] =पण ती शक्ति विद्यादि कारणान्तरानें प्रतिबद्ध होते असें आम्ही सांगतों. [–'तर मग शास्त्रविरोधाचें समाधान कसें ? ' 'शक्ति०' इत्यादि भाष्यानें त्याचें उत्तर–] =आणि कर्मांमध्यें फलदानाची शक्ति आहे एवढेंच सांगण्यामध्यें शास्त्र प्रवृत्त होतें –त्याच अर्थी तें व्यापृत–व्यापारयुक्त आहे, प्रतिबंध व अप्रतिबंध यांमध्येंहि तें व्यापृत होत नाहीं. [–आतां ' कर्म फलभोगावांचून कधींच क्षीण होत नाहीं ' इत्यादि स्मृति असल्यामुळें भोगावांचून कर्मक्षय होत नाहीं, असें जें म्हटलें आहे त्याविषयीं 'न हि०' इत्यादि भाष्यानें म्हणतात–]

**भाष्यं**—" न हि कर्म क्षीयते " इत्येतदपि स्मरणं औत्सर्गिकम् । न भोगादृते कर्म क्षीयते तदर्थत्वादिति । इष्यत एव तु प्रायश्चित्तादिना तस्य क्षयः ' सर्वं पाप्मानं तरति ' " तरति ब्रह्महत्यां योऽश्वमेधेन यजते य उ चैनमेवं वेद " इत्यादि श्रुतिस्मृतिभ्यः ॥

**भाष्यार्थ**—'कारण कर्म क्षय पावत नाहीं,' हेंहि स्मरण–स्मृतिवचन औत्सर्गिक –सामान्य नियमरूप आहे. कारण नाहीं, भोगावांचून कर्माचा क्षय होत नाहीं, एवढाच त्याचा अर्थ आहे. [–'तर मग त्या उत्सर्गाचा अपवाद कशानें होईल? ' ' इष्यते०' इत्यादि भाष्यानें उत्तर–]=पण प्रायश्चित्तादिकांच्या योगानें त्या कर्मांचा क्षय इच्छिला जातोच. "सर्व पापाला तरून जातो" "ब्रह्महत्येला तरून जातो, जो अश्वमेधानें याग करितो व जो याला असें जाणतो " इत्यादि श्रुति-स्मृतिवचन-प्रामाण्यामुळें प्रायश्चित्तादिकांच्या योगानें कर्मांचा क्षय इष्टच आहे. [–' प्राय-श्चित्तादि' येथील 'आदि-'शब्दानें पूर्वी सांगितलेल्या प्रायश्चित्ताप्रमाणेंच येथें विद्या सांगितली जाते. 'ज्ञान्याचीं सर्व पापें क्षीण होतात यांत कांहीं संशय नाहीं. नानाप्रकारच्या पापांनींहि क्रीडा करणारासुद्धां तो लिप्त होत नाहीं' इत्यादि स्मृति येथें जाणाव्या. 'प्रायश्चित्तांना पापक्षयहेतुत्व नाहीं, कारण गृहदाहेष्ट्यादिकां-प्रमाणें त्यांनाहि नैमित्तिकत्व असल्यामुळें त्यांच्या फलांतराचा असंभव आहे' असें जें वाद्यानें वर–११६–म्हटलें आहे त्याचा ' यत्तु० ' इत्यादि भाष्यानें अनुवाद–]

**भाष्यं—यत्तूक्तं नैमित्तिकानि प्रायश्चित्तानि भविष्यन्तीति। तदसत्। दोषसंयोगेन चोद्यमानानां एषां दोषनिर्घातफलसंभवे फलान्तरकल्पनानुपपत्तेः॥**

**भाष्यार्थ**—आतां प्रायश्चित्तें नैमित्तिक होतील असें जें वाद्यानें वर म्हटलें आहे [–जसें मलिनानें स्नान करावें, असें म्हटलें असतां मलनिवृत्ति हें स्नानाचें फल आहे असें अवगत होतें त्याप्रमाणें 'ब्रह्महत्या करणारानें द्वादश वार्षिक व्रत आचरावें' असें म्हटलें असतां ब्रह्महत्यानिवृत्ति हें व्रताचें फल आहे, असें प्रतीत होतें. म्हणून दृष्टत्यागानें अदृष्ट कल्पना युक्त नाहीं, असें '**तदसत्०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=तें अयुक्त आहे, कारण दोषाच्या संयोगानें विधान केलेल्या जाणाऱ्या प्रायश्चित्तांचें दोषनिवृत्ति हें फल संभवत असतांना फलान्तराची कल्पना अनुपपन्न आहे. [–'अहोपण, प्रायश्चित्तांना पापनिवृत्तिफलत्व जरी असलें तरी विद्येला पापनिवृत्तिफलत्व नाहीं, कारण प्रायश्चित्तांप्रमाणें पापनिवृत्तीच्या उद्देशानें विद्येच्या विधीचा अभाव आहे', असें जें वर म्हटलें आहे त्याचा '**यत्पुनः०**' इत्यादि भाष्यानें अनुवाद–]

**भाष्यं—यत्पुनरेतदुक्तं न प्रायश्चित्तवद्दोषक्षयोद्देशेन विद्याविधानमस्तीति। अत्र ब्रूमः— सगुणासु तावद्विद्यासु विद्यत एव विधानम्। तासु च वाक्यशेषे ऐश्वर्यप्राप्तिः पापनिवृत्तिश्च विद्यावत उच्यते। तयोश्चाविवक्षाकारणं नास्तीत्यतः पाप्मप्रहाणपूर्वकैश्वर्यप्राप्तिस्तासां फलमिति निश्चीयते॥**

**भाष्यार्थ**—'परंतु प्रायश्चित्ताप्रमाणें दोषनिवृत्तीच्या उद्देशानें विद्येचें विधान नाहीं,' असें जें वाद्यानें वर म्हटलें आहे [–'दोषक्षयोद्देशानें सगुण विद्यांमध्यें विधीचा अभाव आहे कीं निर्गुण विद्येमध्यें' असा विकल्प करितात–]='**अत्र०**'–याविषयीं आम्ही 'सगुण विद्यांमध्यें तशा विधीचा अभाव आहे कीं निर्गुणविद्येमध्यें,' असा विकल्प करून त्यांतील प्रत्येक–पक्षीं असें म्हणतों–[–यांतील पहिल्या पक्षाचें निरसन–]='**सगुणासु०**'–त्यांतील अगोदर सगुण विद्यांमध्यें तर विधान आहेच. [–"अहोपण, ऐश्वर्य हें सगुण विद्यांचें फल असल्यामुळें पापक्षयाच्या उद्देशानें त्यांचा विधि नाहीं" अशी आशंका घेऊन '**तासु०**' इत्यादि भाष्यानें म्हणतात–] =आणि त्या सगुणविद्यांमध्यें वाक्यशेषांत विद्यावानाची ऐश्वर्यप्राप्ति व पापनिवृत्ति सांगितली जाते. [–"अहोपण, पापादिनिवृत्तिश्रुति ही विधान करावयास इष्ट असलेल्या-विधित्सित विद्येची स्तुतिच आहे" अशी आशंका घेऊन '**तयोश्च०**' इत्यादि भाष्यानें आचार्य म्हणतात–]=आणि त्या दोहोंच्या अविवक्षेचें कांहीं कारण नाहीं. ['उभयसंयोगित्वानें विद्याविधि संभवत असल्यामुळें त्यांच्या अवि-

वक्षेचें कारण नाहीं ' असा याचा भावार्थ.-पापदाहादिश्रुतीवरून त्याच्या स्तुत्यर्थत्वाचा अभाव आहे, असें झालें असतां 'अतः०' इत्यादि भाष्यानें फलित सांगतात-]= यास्तव पापप्रणाशपूर्वक ऐश्वर्यप्राप्ति हें सगुणविद्यांचें फल आहे, असा निश्चय केला जातो. [-आतां पूर्वोक्त विकल्पांतील दुसऱ्या पक्षीं विधीच्या अभावाचा अंगीकार करून विद्यास्वभावामुळेंच पापक्षयफलत्व 'निर्गुणायां०'इत्यादि भाष्यानें सांगतात-]

**भाष्यं**--**निर्गुणायां तु विद्यायां यद्यपि विधानं नास्ति । तथाप्यकर्त्रात्मत्वबोधात्कर्मप्रदाहसिद्धिः । अश्लेष इति चागामिषु कर्मसु कर्तृत्वमेव न प्रतिपद्यते ब्रह्मविदिति दर्शयति ॥**

**भाष्यार्थ**—पण निर्गुणविद्येमध्यें विधान जरी नाहीं, तरी अकर्तृ-आत्मत्वबोधामुळें कर्माच्या प्रदाहाची-सर्वथा क्षयाची सिद्धि होते. ['विमत आत्मज्ञान आत्म्यांतील सर्व पापांचें निवर्तक आहे, त्याला दुरित-कर्तृत्वादिकांचें बाधकत्व असल्यामुळें, स्वप्नांतील दुरितकर्तृत्वादिकांच्या बाधकत्वानें स्वप्नकालीन दुरितबाधक जाग्रद्बोधाप्रमाणें' असा याचा भावार्थ.-"अहोपण सर्वच ठिकाणीं दुरितनिवर्तकाला तुल्यत्व असल्यामुळें--दुरितनिवर्तक ज्ञान सर्वच कर्मांना समान असल्यामुळें त्यांतील कांहीं कर्मांचा दाह व कांहीं कर्मांचा अश्लेष-असंबंध ही विभागोक्ति अयुक्त आहे," अशी आशंका घेऊन ' **अश्लेष०** ' इत्यादि भाष्यानें अश्लेषोक्तीची गति सांगतात-] =आणि अश्लेष हा शब्द 'आगामी कर्मांमध्यें ब्रह्मवेत्ता कर्तृत्वालाच प्राप्त होत नाहीं' असें दाखवितो. [ सर्वहि व्यापार शरीरेंद्रियसंघाताच्या आश्रयानें राहणारा आहे, असें पाहणारा अविक्रिय ब्रह्मात्मदर्शी स्वतःचें कर्तृत्वच मानीत नाहीं आणि ज्याचा कर्ता पर-स्वतःहून भिन्न शरीरादि आहे, त्या पापानें तो स्वतः लिप्त होत नाहीं, असा भावार्थ.-'विद्योत्पत्ति झाल्यानंतर कर्तृत्वाभिमानाचा जरी अभाव होत असला तरी त्यापूर्वी त्याचा भाव असल्यामुळें कर्मनिवृत्ति कशी ' अशी आशंका घेऊन ' **अतिक्रान्तेषु०** ' इत्यादि भाष्यानें दाहोक्तीचें उपपादन करितात-]

**भाष्यं**—**अतिक्रान्तेषु तु यद्यपि मिथ्याज्ञानात्कर्तृत्वं प्रतिपेद इव । तथापि विद्यासामर्थ्यान्मिथ्याज्ञाननिवृत्तेः तान्यपि प्रविलीयन्त इत्याह विनाश इति । पूर्वसिद्धकर्तृत्वभोक्तृत्वविपरीतं हि त्रिष्वपि कालेष्वकर्तृत्वाभोक्तृत्वस्वरूपं ब्रह्माहमस्मि । नेतः पूर्वमपि कर्ता भोक्ता वाहमासं । नेदानीं । नापि भविष्यत्काले इति ब्रह्मविदवगच्छति । एवमेव च मोक्ष उपपद्यते ॥**

**भाष्यार्थ**—पण अतिक्रान्त-प्राचीन कर्मांमध्यें यद्यपि मिथ्याज्ञानामुळें तो कर्तृत्वास जणुंकाय प्राप्त झाला होता, तथापि विद्यासामर्थ्यामुळें मिथ्याज्ञानाची निवृत्ति

झाली असतां तीं अतिक्रान्त पूर्व संचित कर्मेंहि प्रलीन होतात' असें 'विनाश' या शब्दानें सांगतात. [-विद्येच्या अधीन असलेल्या कर्मनाशाचें विद्यावानाच्या अनुभवानुरोधानें विवरण-]='**पूर्वसिद्ध०**'-"पूर्वींच सिद्ध असलेल्या कर्तृत्व-भोक्तृत्वाच्या विपरीत तिन्हीं काळीं अकर्तृत्व-अभोक्तृत्वस्वरूप ब्रह्म मी आहें, हें ज्ञान होण्यापूर्वींहि मी कर्ता किंवा भोक्ता नव्हतों, आतां वर्तमानसमयीं नाहीं व भविष्यत्कालींहि नसेन" असें ब्रह्मवेत्ता जाणतो. [-मोक्षशास्त्राच्या अनुपपत्तीनेंहि पापाचा विनाश विद्येच्या अधीन आहे, असें '**एवं एव०**' इत्यादि भाष्यानें सांगतात-]=आणि अशा ज्ञानानेंच मोक्ष उपपन्न होतो. [-"अहोपण, योगाच्या प्रभावामुळें एकाच वेळीं अनेक देह उत्पन्न करून एकाच वेळीं सर्व कर्मांच्या फलाचा उपभोग घेतला असतां मुक्ति होणें योग्य आहे," अशी आशंका घेऊन '**अन्यथा०**' इत्यादि भाष्यानें सांगतात-]

**भाष्यं**—**अन्यथा ह्यनादिकालप्रवृत्तानां कर्मणां क्षयाभावे मोक्षाभावः स्यात्। न च देशकालनिमित्तापेक्षो मोक्षः कर्मफलवद्भवितुमर्हति। अनित्यत्वप्रसंगात्। परोक्षत्वानुपपत्तेश्च ज्ञानफलस्य। तस्माद्ब्रह्माधिगमे दुरितक्षय इति स्थितम्॥१३**

**भाष्यार्थ**—कारण असें जर नसेल तर अनादिकालापासून प्रवृत्त झालेल्या कर्मांच्या क्षयाचा अभाव झाला असतां मोक्षाचा अभाव होईल. [कर्मांचा विपाक नियत कालीं होत असतो, त्यामुळें एकाच वेळीं त्या सर्वांच्या फलाचा उपभोग संभवत नाहीं आणि उपभोगाचाहि कर्मान्तराच्या संचयावांचून असंभव आहे. यास्तव शेंकडो कल्पांचा काल निघून गेल्यावर उपभोग घेण्यास योग्य असलेल्या कर्मफलाचा भोग आतांच घेतां येणें शक्य नाहीं आणि ज्यांचें फल दीर्घकाल भोगावयाचें आहे, त्यांची परिमितकालीं घेतलेल्या भोगानेंच निवृत्ति होणें शक्य नाहीं. यास्तव विद्येवांचून कर्मांची निःशेष निवृत्ति होत नाहीं. असा भावार्थ.-"अहोपण, दुसरीं कर्में जरी असलीं तरी मोक्षाला कारण होणाऱ्या कर्मामुळें मोक्षाचा अनुभव घेऊन त्यानंतर दुसऱ्या कर्मांचीं फलेंहि भोगिलीं जातील" अशी आशंका घेऊन '**न च०**' इत्यादि भाष्यानें सांगतात-]=आणि मोक्ष कर्मफलांप्रमाणें देश, काल व निमित्त यांच्या अपेक्षेनें होण्यास योग्य नाहीं. कारण तो देश-काल-निमित्तापेक्ष असल्यास त्याच्या अनित्यत्वाचा प्रसंग येतो. [-शिवाय विद्येला दृष्टफलत्व असल्यामुळेंहि तिच्या फलाला कालान्तराची अपेक्षा नाहीं, कीं ज्यामुळें ज्याला विद्या प्राप्त झाली आहे असाहि ज्ञानी कर्मफलांचा अनुभव घेऊन त्यानंतर मुक्त होईल, असें '**परोक्षत्व०**' इत्यादि भाष्यानें सांगतात-]=आणि ज्ञानफलाच्या परोक्षत्वाची

अनुपपत्ति असल्यामुळेंहि मोक्ष कर्मफलाप्रमाणें देश-काल-निमित्तापेक्ष असणें योग्य नाहीं. [–' **तस्मात्**० ' इत्यादि भाष्यानें श्रुति-स्मृति-न्यायसिद्ध अर्थाचा उपसंहार करितात–]=म्हणून ब्रह्माचा साक्षात्कार झाला असतां पापाचा क्षय होतो, असें सिद्ध झालें. १३.–सु. ब्र. ४४३-४४. (९)

( १०. **इतरासंश्लेषाधिकरण. सू. १४.** )

––ज्ञानामुळें पापाची निवृत्ति सांगून त्यामुळेंच पुण्यनिवृत्तीचा अतिदेश '**इतरस्य**० ' इत्यादि सूत्रानें करितात––

**सूत्रं—इतरस्याप्येवमसंश्लेषः पाते तु ॥ १४ ॥ ( १० )**

**सूत्रार्थ**––अकर्तृ-आत्मबोधसामर्थ्यानें इतराचाहि–ज्ञानोत्तर व ज्ञानपूर्व पुण्याचाहि ' असाच '–पापाप्रमाणेंच 'असंश्लेष'–असंबंध–अश्लेष व विनाश होतात. त्यामुळें देहपात होतांच तो मुक्त होतो. १४. ( १० )–सु. ब्र. ४४४. [–या अधिकरणाचें अपूर्वविषयत्व सांगण्यासाठीं ' **पूर्वस्मिन्**० ' इत्यादि भाष्यानें गतार्थाचा अनुवाद–]

**भाष्यं**––**पूर्वस्मिन्नधिकरणे बंधहेतोरघस्य स्वाभाविकस्याश्लेषविनाशौ ज्ञाननिमित्तौ शास्त्रव्यपदेशान्निरूपितौ । धर्मस्य पुनः शास्त्रीयत्वाच्छास्त्रीयेण ज्ञानेनाविरोधः । इत्याशंक्य तन्निराकरणाय पूर्वाधिकरणन्यायातिदेशः क्रियते ॥**

**भाष्यार्थ**––पूर्वाधिकरणांत बंधाला कारण होणाऱ्या स्वाभाविक पापाचे ज्ञाननिमित्त अश्लेष-विनाश शास्त्रव्यपदेशामुळें निरूपिले–त्यांचें निरूपण केलें. [पुण्यकर्म हा या अधिकरणाचा विषय आहे. तें पुण्यकर्म ब्रह्मज्ञानानें क्षीण होत नाहीं कीं क्षीण होतें, पूर्वीप्रमाणेंच कर्मांची फलान्तत्वप्रतीति व ज्ञानानें दाहप्रतीति, यांवरून संशय आला असतां अतिदेशामध्यें पादादिसंगति पृथक् सांगावयास नको, असें मानणारे आचार्य–'**धर्मस्य**०' इत्यादि भाष्यानें येथील अधिक शंका सांगतात–]=पण धर्माला शास्त्रीयत्व असल्यामुळें शास्त्रीय ज्ञानाशीं त्याचा विरोध नाहीं. [ ' पुण्य व ज्ञान हीं बाध्य-बाधकभूत नाहींत, कारण त्यांना चोदनालक्षणत्व आहे, अग्निहोत्र-दर्श-पूर्णमासांप्रमाणें' 'क्षीयन्ते च अस्य कर्माणि'–६६८ इत्यादि श्रुतीशीं विरोधहि येत नाहीं, कारण सामान्योपाधीमध्यें प्रवृत्त झालेल्या त्या वचनाचा 'सर्वे पाप्मानः०'–याऱ्यापासून सर्व पापें निवृत्त होतात, या विशेष वचनाच्या अनुसार पापकर्मामध्यें संकोच होतो. 'पुण्य-पापे विधूय' पुण्य-पापांचा त्याग करून या वचनानें पुण्य फलोपभोगानें व पाप ज्ञानानें घालवून असा नियम संभवतो, यास्तव विद्यावानाचा सुकृताधीन संसार होईल–ज्ञानी पुरुषालाहि पुण्यामुळें

संसाराची प्राप्ति होईल, असा याचा भावार्थ.–'इत्याशंक्य०' इत्यादि भाष्यानें अधिक आशंकेचा अनुवाद करून सिद्धान्त सांगतात–]=अशी आशंका घेऊन तिचें निराकरण करण्यासाठीं पूर्वाधिकरणन्यायाचा अतिदेश केला जातो. [–'इतरस्यापि०'इत्यादि भाष्यानें या अतिदेशसूत्रांतील पदांचें व्याख्यान करितात-]

भाष्यं—इतरस्यापि पुण्यस्य कर्मण: एवमघवदसंश्लेषो विनाशश्च ज्ञानवतो भवत: । कुत: । तस्यापि स्वफलहेतुत्वेन ज्ञानफलप्रतिबंधित्वप्रसंगात् । 'उभे उ हैवैष एते तरति' इत्यादि श्रुतिषु च दुष्कृतवत्सुकृतस्यापि प्रणाशव्यपदेशात् । अकर्त्रात्मत्वबोधनिमित्तस्य च कर्मक्षयस्य सुकृतदुष्कृतयोस्तुल्यत्वात् 'क्षीयन्ते चास्य कर्माणि' इति चाविशेषश्रुते: ॥

भाष्यार्थ—ज्ञानवानाच्या 'इतराचेहि'–पुण्यकर्माचेहि 'असेच'–पापाप्रमाणें अश्लेष व विनाश होतात. [–"अहोपण, ज्ञान व पुण्य या दोहोंनाहि शास्त्रीयत्व असल्यामुळें त्यांचा परस्पर विरोध नाहीं असें आम्हीं वर–पृ. ६७३–सांगितलें आहे" अशी शंका–]=कोणत्या कारणानें ? [–अग्निहोत्र व दर्श-पूर्णमास यांना अविरुद्धफलत्व असल्यामुळें निवर्त्य-निवर्तकभाव नाहीं. शास्त्रीयत्वामुळें त्यांच्यामध्यें तो भाव नाहीं असें नाहीं, अशा अभिप्रायानें हेतूचें अप्रयोजकत्व सांगतात–]='तस्यापि०'–कारण पापाप्रमाणें त्या पुण्यालाहि स्वफलाच्या हेतुत्वानें ज्ञानफलाच्या प्रतिबंधित्वाचा प्रसंग येतो. [म्ह० पापाप्रमाणेंच पुण्यहि आपल्या फलाचें निमित्त आहे, त्यामुळें तें ज्ञानाच्या फलाला प्रतिबंध करणारें आहे, असें होत असल्यामुळें ज्ञानवानाच्या पुण्यकर्माचेहि अश्लेष-विनाश होतात. –वरील अनुमान बाधित होत असल्यामुळें तें संभवत नाहीं असें 'उभे०' इत्यादि भाष्यानें सांगतात–]= 'आणि हा ज्ञानी पुण्य व पाप या दोहोंनाहि तरून जातो'–बृ.४.४.२२.–इत्यादि श्रुतींमध्यें दुष्कृताप्रमाणें सुकृताच्याहि प्रणाशाचा निर्देश केलेला आहे. त्यामुळें पुण्याचेहि अश्लेष-विनाश होतात. [–'विमत पुण्य तत्त्वज्ञानानें निवृत्त होण्यास योग्य आहे. कारण तें त्याच्या विरुद्ध आहे, पापाप्रमाणें' अशा प्रत्यनुमानाशीं विरोध येत असल्यामुळेंहि बाधाचें अनुमान अयुक्त आहे असें 'अकर्त्रात्मत्व०' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=आणि अकर्तृ-आत्मत्वबोध हें ज्याचें निमित्त आहे, अशा कर्मक्षयाला सुकृत व दुष्कृत या दोहोंमध्यें तुल्यत्व आहे. म्ह० आत्मबोधानें होणारा कर्मक्षय दोन्ही ठिकाणीं तुल्य आहे. [–आणि सामान्य श्रुतीशीं विरोध येत असल्यामुळेंहि अनुमानाची सिद्धि होत नाहीं, असें 'क्षीयन्ते च०' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=आणि 'याचीं सर्व कर्में क्षीण होतात.'–पृ.१८८–

अशी अविशेष श्रुति असल्यामुळेंहि पूर्वोक्त अनुमान सिद्ध होत नाहीं. [–पण आतां, " सामान्य शास्त्राचा ' सर्व पापें निवृत्त होतात ' या विशेष श्रुतीनें पाप कर्मांमध्यें संकोच होईल " असें जें वर–पृ. ६७३–म्हटलें आहे त्याविषयीं 'यत्रापि०' इत्यादि भाष्यानें सांगतात–]

**भाष्यं—यत्रापि केवल एव पाप्मशब्दो पठ्यते । तत्रापि तेनैव पुण्यमप्याकलितमिति द्रष्टव्यम् । ज्ञानापेक्षया निकृष्टफलत्वात् । अस्ति च श्रुतौ पुण्येऽपि पाप्मशब्दः ' नैनं सेतुमहोरात्रे तरतः' इत्यत्र । सह दुष्कृतेन सुकृतमप्यनुक्रम्य ' सर्वे पाप्मानोऽतो निवर्तन्ते ' इत्यविशेषेणैव प्रकृते पुण्ये पाप्मशब्दप्रयोगात् ॥**

**भाष्यार्थ**—आणि जेथें केवल पाप्मशब्दच पठित आहे तेथेंहि त्याच शब्दानें पुण्याचेंहि आकलन–ग्रहण केलें आहे असें जाणावें. [–"अहोपण, ' पाप्म ' या शब्दाचा निकृष्ट फल देणारें कर्म हा विषय असल्यामुळें त्या शब्दानें उत्कृष्ट फल देणारें पुण्यकर्म कसें ग्रहण केलें जाईल ? " ' **ज्ञानापेक्षया०** ' इत्यादि भाष्यानें उत्तर–]=ज्ञानाच्या अपेक्षेनें पुण्यालाहि निकृष्टफलत्व आहे. त्यामुळें पाप्मशब्दानें त्याचें ग्रहण संभवतें. [–" अहोपण, वृद्धांच्या प्रयोगाच्या अभावीं–रूढीच्या अभावीं उपचारानेंहि पाप्मशब्द सुकृत या अर्थी कसा प्रवृत्त होईल?" '**अस्ति०**' इत्यादि भाष्यानें उत्तर–]=आणि श्रुतीमध्येंहि पुण्य या अर्थी पाप्मशब्द 'या सेतुरूप आत्म्यास अहोरात्र परिच्छिन्न करीत नाहींत. '–छां. ८. ४. १. सु. ब्र. ४७३–या वचनांत योजिलेला आहे. [–" अहोपण, त्या वचनांतहि पाप्मशब्दाचें सुकृतविषयत्व असिद्ध आहे, " अशी आशंका घेऊन '**सह०**' इत्यादि भाष्यानें प्रकरणाला अनुसरून आचार्य म्हणतात–]=कारण या वाक्यांत दुष्कृतासह सुकृताचाहि उपक्रम करून ' याच्यापासून सर्व पापें निवृत्त होतात' असा अविशेषानेंच प्रकृत 'पुण्य' या अर्थी 'पाप्म-'शब्दाचा प्रयोग केलेला आहे. [–आतां ' पुण्यपापे विधूय ' येथें पुण्य फलभोगानें व पाप विज्ञानानें घालवून, असा जो वाद्यानें विभाग केला आहे तो बरोबर नाहीं, कारण अशी अश्रुत कल्पना करण्यास कांहीं कारण नाहीं, असें मानून ज्ञानसामर्थ्यामुळें अशेषकर्मांचा क्षय व त्याचा अश्लेष सिद्ध झाला असतां सूत्रावयवाला अवतरण देऊन फलितार्थाचें व्याख्यान करणारे आचार्य '**पाते तु०**' इत्यादि भाष्यानें म्हणतात–]

**भाष्यं—' पाते तु ' इति तुशब्दोऽवधारणार्थः । एवं धर्माधर्मयोर्बंधहेत्वोर्विद्यासामर्थ्यादश्लेषविनाशसिद्धेः अवश्यंभाविनी विदुषः शरीरपाते मुक्तिरित्यवधारयति ॥ १४ ॥ ( १० )**

**भाष्यार्थ**—'पाते तु'–या सूत्रावयवांतील 'तु-'शब्द अवधारण–निर्धार –निश्चय या अर्थी आहे. याप्रमाणें बंधाचे हेतु असे जे धर्माधर्म त्या दोहोंचाहि विद्येच्या सामर्थ्यानें अश्लेष व विनाश सिद्ध होत असल्यामुळें विद्वानाचा शरीर-पात झाल्यावर मुक्ति अवश्यंभाविनी आहे, असें अवधारण करितात. [या कथ-नानें दोन्ही अधिकरणांचें फल सांगितलें आहे.] १४.–सु. ब्र. ४४५. (१०)

( ११. अनारब्धाधिकरण. सू. १५. )

——तत्त्वज्ञानानें सर्व कर्मांचा औत्सर्गिक लय सांगितला. आतां '**अनारब्ध०**' इत्यादि सूत्रानें आरब्धकर्माविषयीं त्याचा अपवाद दाखवितात—

**सूत्रं—अनारब्धकार्ये एव तु पूर्वे तदवधेः** ॥ १५ ॥ (११)

**सूत्रार्थ**—ज्यांचें फल प्रवृत्त झालेलें नाहीं अशा या अनादि संसारपरंपरेंत ज्ञानोत्पत्तीपर्यंत संचित झालेल्या पुण्य-पापांचाच ज्ञानानें नाश होतो. कारण ज्ञान्याच्या विदेहमुक्तीचा श्रुतीनें देहपातावधि सांगितला आहे. १५.(११)–सु. ब्र. ४४५. [–गतार्थाचें संकीर्तन करणारे आचार्य '**पूर्वयोः०**' इत्यादि भाष्यानें या अधिकरणाचा विषय सांगतात–]

**भाष्यं—पूर्वयोरधिकरणयोः ज्ञाननिमित्तः सुकृतदुष्कृतयोर्विनाशोऽवधारितः । स किमविशेषेण आरब्धकार्ययोरनारब्धकार्ययोश्च भवति । उत विशेषेणानारब्धकार्ययोरेवेति विचार्यते । तत्र 'उभे उ हैवैष एते तरति' इत्येवमादिश्रुतिषु अविशेषश्रवणादविशेषेणैव** क्षय इति ॥

**भाष्यार्थ**—या पूर्वीच्या दोन अधिकरणांमध्यें ज्ञान या निमित्तानें होणारा सुकृत व दुष्कृत यांचा विनाश निश्चित केला. [ज्ञानाधीन असलेल्या कर्मक्षयाला विषय करून '**क्षीयन्ते च०**'–याचीं सर्व कर्में क्षीण होतात,–पृ.६८८– अशी अविशेष श्रुति व '**तस्य तावदेव०**'–'त्याच्या सत्संपत्तीला देहपात होई-तोंच अवकाश असतो' अशी श्रुति असल्यामुळें '**स किं०**' इत्यादि भाष्यानें संशय सांगतात–]=तो सुकृत-दुष्कृतांचा विनाश ज्याच्या कार्याला आरंभ झाला आहे व ज्याच्या कार्याला आरंभ झालेला नाहीं, अशा आरब्धकार्य व अनारब्धकार्य पुण्य-पापांचा अविशेषानें होतो कीं ज्यांच्या कार्याला आरंभ झालेला नाहीं, अशाच पुण्य-पापांचा विशेषानें होतो, याचा आतां विचार केला जातो. [येथें अप्रतिबद्धच औपनिषद ब्रह्मज्ञान मोक्षफल देणारें आहे, असें कथन केलेलें असल्यामुळें याच्या पादादिसंगति आहेत. पूर्वपक्षांत 'क्षेमप्राप्तीच्या अवधिकरणाची असिद्धि' व सिद्धान्तांत 'विद्वानाचेंहि प्रारब्धकर्मानें कांहीं काल अवस्थान होत असल्या-

मुळें क्षेमप्राप्तीच्या अवधिकरणाची सिद्धि' असा फलभेद स्वीकारून पूर्वाधिकरण-न्यायानें 'तत्र०' इत्यादि भाष्यानें पूर्वपक्ष करितात-]=असा संशय आला असतां " हा विद्वान् पुण्य व पाप या दोहोंनाहि तरून जातो."-पृ.६७४-या व अशाच दुसऱ्याहि श्रुतींमध्यें अविशेषश्रवण असल्यामुळें आरब्धकार्य व अनारब्धकार्य अशा दोन्ही प्रकारच्या पुण्य-पापांचा अविशेषानेंच क्षय होतो, असा पूर्वपक्ष प्राप्त होतो.[-'एवं०'इत्यादि भाष्यानें सिद्धान्तसूत्राला अवतरण देऊन त्याचें व्याख्यान-]

**भाष्यं—एवं प्राप्ते प्रत्याह— अनारब्धकार्ये एव त्विति । अप्रवृत्तफले एव पूर्वे जन्मान्तरसंचिते । अस्मिन्नपि च जन्मनि प्राग्ज्ञानोत्पत्तेः संचिते । सुकृत-दुष्कृते ज्ञानाधिगमात्क्षीयेते । न त्वारब्धकार्ये सामिभुक्तफले । याभ्यामेतद्ब्रह्म-ज्ञानायतनं जन्म निर्मितम् ॥**

**भाष्यार्थ**—असा पूर्वपक्ष प्राप्त झाला असतां ' पण, ज्यांच्या कार्याला आरंभ झालेला नाहीं, अशाच पुण्य-पापांचा क्षय होतो ' अशा अर्थाच्या सूत्रावयवानें सूत्रकार त्याचें निरसन करितात. ' पूर्वे '-जन्मान्तरसंचित व या जन्मामध्येंहि ज्ञानोत्पत्ति होण्याच्या पूर्वी संचित, असें 'अनारब्धकार्य'-ज्याच्या फलाला आरंभ झालेला नाहीं, असेंच सुकृत व दुष्कृत हीं दोन्हीं ज्ञानाच्या प्राप्तीनें क्षय पावतात. [-सूत्रांतील 'एव' या अवधारणाचा अर्थ 'न तु०' इत्यादि भाष्यानें सांगतात-]= पण ज्याच्या कार्याचा-फलाचा आरंभ झालेला नाहीं व ज्याचें फल अर्धेंच भोगिलें आहे, अशा सुकृत-दुष्कृतांचा ज्ञानप्राप्तीमुळें क्षय होत नाहीं. [-'ज्यांचें फल अर्धेंच भोगिलें आहे ' अशा पुण्य-पापकर्मांचा ' याभ्यां० ' इत्यादि भाष्यानें कार्यद्वारा विशेष सांगतात-]=ज्या पुण्य-पापांनीं हें ब्रह्मज्ञानाचें अधिष्ठानभूत जन्म निर्माण केलें आहे, तें अनारब्धकार्य व अर्धभुक्तफल पुण्य-पाप क्षीण होत नाहीं. [-' अहो-पण, विद्याशक्तीनें अनुगृहीत अशा अविशेषश्रुतीमुळें विद्वद्देहारंभक पुण्य-पाप-कर्मांचाहि नाश होईल, असा 'कुतः०' इत्यादि भाष्यानें आक्षेप-]

**भाष्यं—कुत एतत् । 'तस्य तावदेव चिरं यावन्न विमोक्ष्येऽथ संपत्स्ये ।' इति शरीरपातावधिकरणात्क्षेमप्राप्तेः । इतरथा हि ज्ञानादशेषकर्मक्षये सति स्थिति-हेत्वभावाज्ज्ञानप्राप्त्यनंतरमेव क्षेममश्नुवीत । तत्र शरीरपातप्रतीक्षां नाचक्षीत ॥**

**भाष्यार्थ**—हें तुम्ही कशावरून म्हणतां ? [-' तस्य० ' इत्यादि श्रुतीनें उत्तर सांगतात-]=" या विद्वानाचा जोंवर देहपात होत नाहीं, तोंवरच त्याच्या विदेह-मुक्तीला अवधि असतो. देहपात होतांच तो सत्संपन्न होतो. "-छां. ६.१४.२. -असें विद्वानाच्या क्षेमप्राप्तीला शरीरपाताचें अवधिकरण केलेलें आहे, त्यावरून

आम्ही असा सिद्धान्त सांगतों. [–पण तेवढ्यावरून कर्मशेषाची सिद्धि कशी होते ? 'इतरथा०' इत्यादि भाष्यानें उत्तर–]=कारण असें जर नसतें तर ज्ञानामुळें सर्व कर्मांचा क्षय झाला असतां शरीरस्थितीच्या कारणाचाच अभाव झाल्यामुळें ज्ञानप्राप्तीच्या अनंतरच–तत्क्षणींच विद्वानानें क्षेमाचा अनुभव घेतला असता. त्याच्या क्षेमप्राप्तिमध्यें श्रुतीनें शरीरपाताची प्रतीक्षा सांगितली नसती. [ज्याक्षणीं ज्ञान होतें त्याच क्षणीं सर्व कर्मक्षयामुळें मोक्षप्राप्ति जर झाली असती तर ज्ञानच क्षेमप्राप्तीची अवधि आहे, असें झालें असतें व श्रुतीनें देहपात–मरण ही त्याची अवधि सांगितली नसती. अर्थात् श्रुतींत दुसरी अवधि सांगणें या लिंगावरून 'ज्ञान झाल्यावरहि अनुवृत्त होणारें शरीर कर्मशेषाचें अनुमान करवितें. कारण कर्मशेषाच्या अभावीं शरीरानुवृत्तीची अनुपपत्ति आहे, असा भावार्थ.–"अहोपण, विद्येला दृष्टसामर्थ्यानेंच कर्मक्षयहेतुत्व असल्यामुळें शास्त्रानें त्याचें निराकरण होऊं शकत नाहीं. कारण प्रत्यक्ष अनुभवाच्या विरोधी असलेल्या त्या शास्त्राला 'पाषाण तरंगतात' असें सांगणाऱ्या श्रुतीप्रमाणें अप्रामाण्य आहे" अशी 'ननु०' इत्यादि शंका–]

**भाष्यं—ननु वस्तुबलेनैव अयमकर्त्रात्मावबोधः कर्माणि क्षपयन्कथं कानिचित्क्षपयेत्कानिचिच्चोपेक्षेत । न हि समानेऽग्निबीजसंपर्के केषांचिद्बीजशक्तिः क्षीयते केषांचिन्न क्षीयत इति शक्यमंगीकर्तुमिति ॥**

**भाष्यार्थ**—हा अकर्तृ-आत्म्याचा साक्षात्कार वस्तुसामर्थ्यानेंच कर्मांचा क्षय करीत होत्साता कांहीं कर्मांचाच क्षय व कांहींची उपेक्षा कशी करील ? [–दाहक अग्नीचें सांनिध्य एकसारखेंच असतांना 'तो कांहीं दाह्य पदार्थांचा दाह व कांहींचा अदाह करितो' अशी व्यवस्था सिद्ध होत नाहीं, असा याविषयीं दृष्टान्त सांगतात–]='न हि०'–कारण अग्नि व बीज यांचा संपर्क समान असतांना त्यांतील कांहींची बीजशक्ति क्षीण केली जाते व कांहींची बीजशक्ति क्षीण केली जात नाहीं, असें मानितां येणें शक्य नाहीं. [–'त्याच्या क्षेमप्राप्तीला मरणापर्यंतच अवधि असतो' असें विद्वानाच्या देहपाताचें अवधिकरण हें लिंग, उद्दालकादि तत्त्ववेत्त्यांच्याच देहधारणविषय श्रुति-स्मृति-लिंगांनीं व तत्त्ववेत्त्या गुरूशींहि शिष्यांच्या संबंधाच्या अन्यथा अनुपपत्तीनें अनुगृहीत होत्सातें मंत्रादिकांनीं प्रतिबद्ध झालेल्या अग्नीच्या अदाहकत्वाप्रमाणें सर्व कर्मांचा क्षय करण्यास समर्थ असलेल्याहि ज्ञानाच्या आरब्धकर्मनिवृत्तींतील प्रतिबंधाची कल्पना करवितें, असें 'उच्यते०' इत्यादि भाष्यानें सांगतात–]

**भाष्यं—उच्यते– न तावदनाश्रित्यारब्धकार्यं कर्माशयं ज्ञानोत्पत्तिरुपपद्यते आश्रिते च तस्मिन्कुलालचक्रवत्प्रवृत्तवेगस्य अंतराले प्रतिबंधासंभवाद्भवति वेगक्षयप्रतिपालनम्। अकर्त्रात्मबोधोऽपि हि मिथ्याज्ञानबाधनेन कर्माण्युच्छिनत्ति। बाधितमपि तु मिथ्याज्ञानं द्विचंद्रज्ञानवत्संस्कारवशात्कंचित्कालमनुवर्तत एव ॥**

**भाष्यार्थ—**याचें उत्तर सांगितलें जातें–[–शिवाय 'ज्ञानार्थ कर्म स्वतःच देहाचा आरंभ करून त्यांत ज्ञान करितें कीं कर्मान्तरानें आरब्ध झालेल्या देहांत' असा विकल्प करून त्यांतील पहिल्या कल्पाला '**न तावत्०**' इत्यादि भाष्यानें दूषित करितात–] =अगोदर ज्याच्या कार्याला आरंभ झाला आहे अशा कर्माशयाचा आश्रय केल्यावांचून ज्ञानोत्पत्ति उपपन्न होत नाहीं. [–कारण ज्ञानार्थ जें कर्म त्याचें देहारंभकत्व गौरवदोषामुळें कल्पितां येत नाहीं, म्हणून दुसऱ्या कर्मानें आरंभिलेल्या देहामध्येंच ज्ञानोत्पत्ति होते, असा याचा भावार्थ.–पण दुसरा कल्पहि संभवत नाहीं, कारण 'कर्मान्तरारब्ध देहामध्यें ज्ञानार्थ कर्म ज्ञान उत्पन्न करितें' असें म्हटल्यास ज्ञानाला आपल्या उपजीव्य कर्माचें बाधकत्व संभवत नाहीं, असें '**आश्रिते च०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=आणि त्या आरब्धकार्य कर्माशयाचा आश्रय केला असतां कुलालचक्राप्रमाणें प्रवृत्त झालेल्या वेगाचा मध्येंच प्रतिबंध संभवत नसल्यामुळें वेगक्षयाचें प्रतिपालन करणें म्ह० त्या वेगाच्या क्षयाची वाट पाहणें अवश्य होतें. [–"पण अकर्तृ-आत्मज्ञान कर्माचें आदिकारण जें अज्ञान त्याची निवृत्ति करितें. तेव्हां उपादानाच्या अभावीं कर्माची अनुवृत्ति कशी होईल?" '**अकर्तृ०**' इत्यादि भाष्यानें उत्तर–]=कारण अकर्तृ-आत्मबोधहि मिथ्याज्ञानाचा बाध करून कर्मांचा उच्छेद–नाश करितो. [–"अहोपण, कर्में आपल्या अज्ञान या उपादानासह जर उच्छिन्न झालीं आहेत तर आरब्धकर्मांची अनुवृत्ति कशी होणार?" '**बाधितं अपि०**' इत्यादि भाष्यानें उत्तर–]=पण बाधित झालेलेंहि मिथ्याज्ञान द्विचंद्रज्ञानाप्रमाणें संस्काराच्या बलानें कांहींकाल अनुवृत्त होतेंच. [–संस्काराला स्मृतिहेतुत्व जरी असलें तरी अविद्येप्रमाणें त्याला चैतन्यदोषत्व आहे, त्यामुळें अपरोक्ष भ्रमाचें हेतुत्व आहे, अशा अभिप्रायानें भाष्यांत 'संस्कारवशात्' असें म्हटलें आहे. –याप्रमाणें जीवन्मुक्तीविषयीं ज्यांचा मतभेद आहे अशा वाद्यांना उद्देशून जीवन्मुक्ति सांगून '**अपि च०**' इत्यादि भाष्यानें शिष्याला उद्देशून ती सांगतात–]

**भाष्यं—अपि च नैवात्र विवदितव्यं ब्रह्मविदा कंचित्कालं शरीरं ध्रियते न वा ध्रियत इति। कथं ह्येकस्य स्वहृदयप्रत्ययं ब्रह्मवेदनं देहधारणं चापरेण प्रति-**

**क्षेप्तुं शक्येत । श्रुतिस्मृतिषु च स्थितप्रज्ञलक्षणनिर्देशेन एतदेव निरुच्यते । तस्मादनारब्धकार्ययोरेव सुकृतदुष्कृतयोर्विद्यासामर्थ्यात्क्षय इति निर्णयः ॥१५॥**

**भाष्यार्थ**—शिवाय या जीवन्मुक्तीविषयीं ' ब्रह्मवेत्त्याकडून कांहीं काल शरीर-धारण केलें जातें किंवा तें केलें जात नाहीं ' असा विवाद करणेंच उचित नाहीं. [–' **कथं हि०** ' इत्यादि भाष्यानें त्या विवादाच्या अयुक्ततेविषयीं हेतु सांगतात–]=कारण एकाचें स्वहृदयप्रत्यय–स्वतःच्या अंतःकरणालाच ज्याचा प्रत्यय येणें शक्य आहे असें ब्रह्मज्ञान व देहधारण यांविषयीं दुसऱ्याकडून आक्षेप करितां येणें, कसें शक्य आहे ? [–प्रमाणवत्त्वामुळेंहि जीवन्मुक्तीचा स्वीकार करावा असें '**श्रुति०** ' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=आणि श्रुति-स्मृतींमध्यें स्थित-प्रज्ञलक्षणाच्या निर्देशानें याचेंच निर्वचन–व्युत्पादन केलें जातें. [–' **तस्मात्०**' इत्यादि भाष्यानें उक्त उत्सर्गापवादांचा उपसंहार करितात–]=म्हणून ज्यांच्या कार्याचा आरंभ झालेला नाहीं, अशाच सुकृत-दुष्कृतांचा विद्यासामर्थ्यामुळें क्षय होतो, असा निर्णय झाला. १५.–सु. ब्र. ४४६-४७. ( ११ ).

**( १२. अग्निहोत्राद्यधिकरण. सू. १६-१७. )**

—विद्याजन्य कर्मक्षयाचा आरब्ध कर्मामध्यें अपवाद सांगून कांहीं अनारब्ध कर्मामध्येंहि त्याचा अपवाद ' **अग्निहोत्रादि०** ' या सूत्रानें सांगतात—

**सूत्रं—अग्निहोत्रादि तु तत्कार्यायैव तद्दर्शनात् ॥ १६**

**सूत्रार्थ**—पण अग्निहोत्रादि कर्मजात चित्तशुद्ध्यादिद्वारा तत्कार्यासाठींच–ज्ञानकार्य जी मुक्ति तिच्यासाठींच आहे. कारण यज्ञादिश्रुतींत त्यांच्या ज्ञानहेतु-त्वाचें दर्शन–उपलब्धि होते. १६.–सु. ब्र. ४४८. [–' **पुण्यस्य०** ' इत्यादि भाष्यानें गतार्थकथनपूर्वक अधिकरणाचें तात्पर्य सांगतात–]

**भाष्यं—पुण्यस्याप्यश्लेषविनाशयोरघन्यायोऽतिदिष्टः । सोऽतिदेशः सर्वपुण्य-विषय इत्याशंक्य प्रतिवक्ति- अग्निहोत्रादि त्विति । तुशब्द आशंकामपनुदति । यन्नित्यं कर्म वैदिकमग्निहोत्रादि, तत्तत्कार्यायैव भवति । ज्ञानस्य यत्कार्यं तदेवास्यापि कार्यमित्यर्थः । कुतः । ' तमेतं वेदानुवचनेन ब्राह्मणा विविदिषन्ति यज्ञेन दानेन ' इत्यादिदर्शनात् ॥**

**भाष्यार्थ**—पुण्याच्याहि अश्लेष-विनाशांमध्यें अघन्यायाचा अतिदेश केला. तो अतिदेश सर्व पुण्याला विषय करितो, [–अग्निहोत्रादि नित्य-नैमित्तिक कर्में हा याचा विषय, त्या कर्मांचेहि पुण्य-पापांप्रमाणें ज्ञानानें अश्लेष व विनाश होतात, किंवा नाहीं, असा साधारण श्रुति व विविदिषा श्रुति यांमुळें संशय आला असतां

"सुकृतशब्दाला सर्व पुण्यविषयत्व असल्यामुळें अग्निहोत्रादिकांनाहि इतर पुण्याप्रमाणें विनाश्यत्व आहे. म्हणून पंकप्रक्षालनन्यायाची–पृ. ९८९–प्राप्ति होत असल्यामुळें मोक्षारूढ होण्याची इच्छा करणारानेंहि त्यांचें अनुष्ठान करणें युक्त नाहीं," अशी 'इति आशंक्य०' इत्यादि भाष्यानें पूर्वपक्षाची प्राप्ति करून सिद्धान्त सांगतात–] =अशी आशंका घेऊन 'अग्निहोत्रादि तु०' इत्यादि सूत्रानें तिचें प्रत्याख्यान करितात–[–येथें ब्रह्मविद्यासामर्थ्यानें नित्य-नैमित्तिकांची निवृत्ति होत नाहीं. कारण तीं ब्रह्मज्ञानाच्या उत्पत्तीसाठीं आहेत, अशी आपवादिकी पादादिसंगति आहे. पूर्वपक्षांत 'लौकिक न्यायानें आरुरुक्षूलाहि नित्यादिकांचें अननुष्ठान' व सिद्धान्तांत 'त्या न्यायाची प्राप्ति होत नसल्यामुळें ज्ञानोत्पत्तीच्या पूर्वी त्यांच्या अनुष्ठानाचा नियम' अशा अभिप्रायानें सूत्राचें व्याख्यान करितात–]=' तु-शब्दः०' –सूत्रांतील 'तु-'शब्द आशंकेचा परिहार करितो. [–ज्ञानानें नाश पावणाऱ्याहि कर्मांच्या अनुष्ठानाला विद्योत्पत्त्यर्थत्व असल्यामुळें पंकप्रक्षालनन्यायाला त्यांत अवकाश मिळत नाहीं. म्हणून ज्ञानाच्या पूर्वी अग्निहोत्रादि कर्में अनुष्ठान करण्यास योग्य आहेत, या सिद्धान्तप्रतिज्ञेचें 'यन्नित्यं०' इत्यादि भाष्यानें विवरण करितात–]=जें नित्य वैदिक अग्निहोत्रादि कर्म तें 'तत्कार्यासाठींच' आहे–ज्ञानाचें जें कार्य तेंच याचेंहि कार्य आहे, असा याचा भावार्थ.–' कुतः०'–अग्निहोत्रादि कर्मांच्या अनुष्ठानाला विद्योत्पत्त्यर्थत्व आहे, याविषयीं प्रमाण काय? [–' विविदिषावाक्यच ' त्याविषयीं प्रमाण देतात–]=' तमेतं०'–" ब्राह्मण त्या या आत्म्याला वेदाध्ययन, यज्ञ, दान इत्यादिकांनीं जाणण्याची इच्छा करितात." –पृ. ९९२–इत्यादि दर्शनामुळें त्या कर्मांचें अनुष्ठान विद्योत्पत्त्यर्थच आहे. [–" अहोपण, कर्मांना विद्योत्पत्त्यर्थत्व जरी असलें तरी विद्येशीं त्यांचें एककार्यत्व नाहीं" अशी ' ननु०' इत्यादि भाष्यानें शंका–]

**भाष्यं**—ननु ज्ञानकर्मणोर्विलक्षणकार्यत्वात्कार्यैकत्वानुपपत्तिः। नैष दोषः। ज्वरमरणकार्ययोरपि दधिविषयोः गुडमंत्रसंयुक्तयोः तृप्तिपुष्टिकार्यदर्शनात्। तद्वत्कर्मणोऽपि ज्ञानसंयुक्तस्य मोक्षकार्योपपत्तेः॥

**भाष्यार्थ**—" अहोपण, ज्ञान व कर्म यांना परस्पर विलक्षणकार्यत्व असल्यामुळें त्यांच्या कार्यैकत्वाची अनुपपत्ति आहे." [–'न०' इत्यादि भाष्यानें परमतानें याचा परिहार–]=नाहीं, कार्यैकत्वाची अनुपपत्ति हा दोष येत नाहीं, कारण ज्वर व मरण हीं ज्यांचीं कार्यें आहेत अशींहि दहीं व विष, हीं गुड व मंत्र यांनीं संयुक्त झालीं असतां त्यांचें तृप्ति व पुष्टि हें कार्य अनुभवास येतें. त्याचप्रमाणें ज्ञान-

संयुक्त कर्माचेंहि मोक्ष हें कार्य संभवतें. [-आतां स्वमत दाखविण्यासाठीं 'ननु०' इत्यादि भाष्यानें पुनः शंका-]

**भाष्यं—नन्वनारभ्यो मोक्षः। कथमस्य कर्मकार्यत्वमुच्यते । नैष दोषः। आरादुपकारकत्वात्कर्मणः। ज्ञानस्यैव हि प्रापकं सत्कर्म प्रणाड्या मोक्षकारणमित्युपचर्यते। अतएव च अतिक्रान्तविषयमेतत्कार्यैकत्वाभिधानम्। न हि ब्रह्मविद आगाम्यग्निहोत्रादि संभवति।अनियोज्यब्रह्मात्मत्वप्रतिपत्तेः शास्त्रस्याविषयत्वात्॥**

**भाष्यार्थ**—"अहोपण, मोक्ष अनारभ्य आहे-म्हणजे कोणत्याहि साधनांनीं साध्य नाहीं, तो नित्य आहे, तेव्हां त्याचें कर्मकार्यत्व कसें सांगितलें जात आहे?" [-'न०' इत्यादि भाष्यानें स्वमतानें समाधान-]= 'अनारभ्य मोक्ष कर्माचें कार्य होऊं शकत नाहीं' हा दोष येत नाहीं, कारण कर्माला आरात्-उपकारकत्व आहे. [-'ज्ञानस्य०' इत्यादि भाष्यानें त्याचें आरात्-उपकारकत्व स्पष्ट करितात-] =कारण ज्ञानाचेंच प्रापक-प्राप्त करविणारें होत्सातें कर्म परंपरेनें मोक्षाचें कारण आहे, असा उपचार केला जातो. [-'तर मग, हें कार्यैकत्ववचन किं-विषय आहे?' 'अत एव०' इत्यादि भाष्यानें उत्तर-]=ज्याअर्थी विद्याकालीं किंवा विद्येनंतर कर्म नाहीं तर विद्योत्पत्तीच्या पूर्वींच त्याचें अस्तित्व आहे; त्याअर्थींच हें कार्यैकत्वकथन भूतविषय आहे. [-ज्ञानकालीं किंवा ज्ञानोत्तर कालीं कर्माचें असत्त्व-अभाव 'न हि०' इत्यादि भाष्यानें स्पष्ट करितात-]=कारण ब्रह्मवेत्त्याचें आगामी-ज्ञानोत्तरकालीन अग्निहोत्रादि कर्म संभवत नाहीं. अनियोज्यब्रह्मात्मत्व-ज्ञानाला शास्त्राचें अविषयत्व आहे, विधीचा विषय न होणारें ब्रह्मात्मत्वज्ञान शास्त्राचा विषय होत नाहीं, त्यामुळें ज्ञानोत्तर कर्माचा असंभव आहे. [-सूत्राला निर्गुणविद्याविषयत्व आहे, असें मानून नांगर व भोजन यांच्या जीवनहेतुत्वाप्रमाणें ज्ञान व कर्म यांचें साक्षात् व परंपरेनें मोक्षहेतुत्व सांगितलें. आतां सगुणविद्याविषयत्वामध्यें सूत्राचें सामंजस्य आहे, अशा अभिप्रायानें 'सगुणासु०' इत्यादि भाष्यानें सांगतात-]

**भाष्यं—सगुणासु तु विद्यासु कर्तृत्वानतिवृत्तेः संभवत्यागाम्यप्यग्निहोत्रादि। तस्यापि निरभिसंधिनः कार्यान्तराभावाद्विद्यासंगत्युपपत्तिः॥ १६॥ किंविषयं पुनरिदं अश्लेषविनाशवचनं। किंविषयं वाऽदो विनियोगवचनमेकेषां शाखिनाम् 'तस्य पुत्रा दायमुपयन्ति सुहृदः साधुकृत्यां द्विषन्तः पापकृत्याम्' इति। अत उत्तरं पठति—**

**भाष्यार्थ**–पण सगुणविद्यांमध्यें कर्तृत्वाची अतिवृत्ति–निवृत्ति होत नसल्यामुळें सगुणज्ञानानंतरहि अग्निहोत्रादि कर्म संभवतें. [–" तथापि त्याची विद्यासंगति कशी ? " 'तस्यापि०' इत्यादि भाष्यानें उत्तर–]=फलेच्छारहित असलेल्या त्या कर्मांचेंहि कार्यान्तर–फलान्तर नसल्यामुळें त्याची विद्यासंगति उपपन्न होते. [ सगुणविद्याफलामध्यें नित्य कर्मांचा साक्षात् उपयोग आहे, अशा अभिप्रायाचें हें सूत्र आहे, असा याचा भावार्थ.] १६. [–सूत्रान्तराला अवतरण देण्यासाठीं 'किं०' इत्यादि भाष्यानें वादी प्रश्न करितो–]=तर मग हे पूर्वोक्त कर्मांचें अश्लेष-विनाशवचन किंविषय आहे ? किंवा 'त्याचे पुत्र धन घेतात, सुहृद् पुण्यकर्म घेतात, द्वेष करणारे पापकर्म घेतात.'–पृ.३४२–असें जें एका शाखीयांचें विनियोगवचन आहे तें किंविषय आहे ? [–तीं दोन्ही वचनें काम्यकर्मविषय आहेत, अशा आशयानें 'अतः०' इत्यादि भाष्यानें सूत्राला अवतरण–]=असा प्रश्न आल्यामुळें 'अतोऽन्यापि०' इत्यादि सूत्रानें उत्तर पढतात–

**सूत्रं—अतोऽन्यापि ह्येकेषामुभयोः ॥ १७ ॥ ( १२ )**

**सूत्रार्थ**—या अग्निहोत्रादिरूप कर्मांहून दुसरीहि काम्यरूप साधुकृत्या व पापकृत्या आहे. एका वेदाध्यायी लोकांच्या शाखेंत त्यांचाच हा विनियोग सांगितला आहे. जैमिनि व बादरायण या दोन्ही आचार्यांचें 'काम्य-निषिद्ध कर्मांना विद्यांगत्व नाहीं' याविषयीं एकमत आहे. १७. ( १२ ) सु. ब्र. ४४८. [ 'अतः०' इत्यादि भाष्यानें सूत्राक्षरांचें व्याख्यान–]

**भाष्यं—अतोऽग्निहोत्रादेर्नित्यात्कर्मणोऽन्यापि ह्यस्ति साधुकृत्या, या फलमभिसंधाय क्रियते, तस्या एव विनियोग उक्त एकेषां शाखिनाम् 'सुहृदः साधुकृत्यामुपयन्ति' इति। तस्य एव चेदं अघवदश्लेषविनाशनिरूपणं 'इतरस्याप्येवमश्लेषः' इति। तथाजातीयकस्य काम्यस्य कर्मणो विद्यां प्रत्यनुपकारकत्वे संप्रतिपत्तिरुभयोरपि जैमिनिबादरायणयोराचार्ययोः ॥ १७ ॥ ( १२ )**

**भाष्यार्थ**—'अतः'–या अग्निहोत्रादि नित्य कर्मांहून 'अन्यापि'–दुसरीहि साधुकृत्या–पुण्यकर्म आहे कीं जी फलाची इच्छा धरून केली जाते तिचा 'सुहृद् साधुकृत्येला प्राप्त होतात' असा हा एका शाखीयांचा विनियोग सांगितलेला आहे. आणि त्या साधुकृत्येचेंच 'इतरस्यापि एवं असंश्लेषः'–पृ.६७३–असें हें पापाप्रमाणें अश्लेष-विनाशनिरूपण आहे. [–या उक्त अर्थाच्या दृढत्वासाठीं दुसऱ्या आचार्यांचा संवाद दाखवितात–]=विद्येप्रत तशा प्रकारच्या –काम्य कर्मांच्या अनुपकारित्वाविषयीं जैमिनि व बादरायण या दोन्ही आचार्यांची

संप्रतिपत्ति आहे. काम्य कर्में विद्येच्या उपयोगी नाहींत, याविषयीं दोन्ही आचार्यांचें ऐकमत्य आहे. १७.–सु. ब्र. ४४९. ( १२ ).

(१३. विद्याज्ञानसाधनत्वाधिकरण. सू. १८. )

—'यदेव०' इत्यादि सूत्रानें पूर्वोक्त अग्निहोत्रादि कर्मामध्येंच अंगावबद्धोपासनांच्या साहित्याच्या अनियमाचें निरूपण करितात—

**सूत्रं—यदेव विद्ययेति हि ॥ १८ ॥ ( १३ )**

**सूत्रार्थ**—'यदेव विद्यया०'–' जें कर्म विद्येसह करितो तें वीर्यवत्तर होतें ' अशी ही श्रुति विद्याहीन कर्माचें जें वीर्यवत्त्व दाखविते, तें केवळ कर्माला ज्ञानहेतुत्व असल्यामुळेंच उपपन्न होतें. १८ ( १३ )–सु. ब्र. ४५०. [–' समधिगतं० ' इत्यादि भाष्यानें गतार्थ सांगतात–]

**भाष्यं—समधिगतमेतदनंतराधिकरणे नित्यमग्निहोत्रादिकं कर्म मुमुक्षुणा मोक्षप्रयोजनोद्देशेन कृतमुपात्तदुरितक्षयहेतुद्वारेण सत्त्वशुद्धिकारणतां प्रतिपद्यमानं मोक्षप्रयोजनब्रह्माधिगमनिमित्तत्वेन ब्रह्मविद्यया सहैककार्यं भवतीति । तत्राग्निहोत्रादि कर्मांगव्यपाश्रयविद्यासंयुक्तं केवलं चास्ति । ' य एवं विद्वान्यजति ' ' य एवं विद्वाञ्जुहोति' ' य एवं विद्वाञ्शंसति ' ' य एवं विद्वान्गायति ' ' तस्मादेवंविदमेव ब्रह्माणं कुर्वीत नानेवंविदं ' ' तेनोभौ कुरुतो यश्चैतदेवं वेद यश्च न वेद ' इत्यादिवचनेभ्यो विद्यासंयुक्तमस्ति केवलमप्यस्ति ॥**

**भाष्यार्थ**—मागच्याच अधिकरणांत ' मुमुक्षूनें मोक्ष या प्रयोजनाच्या उद्देशानें केलेलें नित्य अग्निहोत्रादि कर्म संचित पापाच्या क्षयहेतुद्वारा चित्तशुद्धीच्या कारणतेस प्राप्त होत्सातें मोक्ष हें ज्याचें प्रयोजन आहे अशा ब्रह्मसाक्षात्काराच्या निमित्तत्वानें ब्रह्मविद्येसह एककार्य होतें ' असें हें चांगल्या प्रकारें ज्ञात झालें. [–' तत्र० ' इत्यादि भाष्यानें विचाराचा विषय सांगतात–]=तसें ज्ञात झालें असतां अग्निहोत्रादिकर्म कर्मांगव्यपाश्रय विद्येनें संयुक्त व केवल–कर्मांगावबद्ध उपासनाशून्य असें दोन प्रकारचें आहे. [–कर्मांगसंबद्ध विद्यासंयुक्त कर्माविषयीं 'य एवं०' इत्यादि भाष्यानें प्रमाण सांगतात–]='जो असें जाणणारा याग करितो' ' जो असें जाणणारा होम करितो' 'जो असें जाणणारा शंसन करितो ' ' जो असें जाणणारा उद्गान करितो ' ' म्हणून अशा विद्वानालाच ब्रह्मा करावें, अविद्वानाला करूं नये' 'त्या प्रणवानें जो असें जाणतो व जो जाणत नाहीं असे दोघेहि कर्म करितात ' इत्यादि वचनांवरून विद्यासंयुक्तहि कर्म आहे व केवल कर्महि आहे. [–नित्य अग्निहोत्रादि कर्माला विषय करून 'तत्र इदं०' इत्यादि भाष्यानें संशय–]

**भाष्यं**—तत्रेदं विचार्यते— किं विद्यासंयुक्तमेव अग्निहोत्रादिकं कर्म मुमुक्षोर्विद्याहेतुत्वेन तया सहैककार्यत्वं प्रतिपद्यते न केवलं। उत विद्यासंयुक्तं केवलं चाविशेषेणेति। कुतः संशयः। 'तमेतमात्मानं यज्ञेन विविदिषन्ति' इति यज्ञादीनामविशेषेण आत्मवेदनांगत्वेन श्रवणात्। विद्यासंयुक्तस्य चाग्निहोत्रादेर्विशिष्टत्वावगमात्॥

**भाष्यार्थ**—त्याविषयीं 'काय, मुमुक्षूचें विद्यासंयुक्तच अग्निहोत्रादि कर्म विद्याहेतुत्वानें त्या विद्येसह एककार्यत्वाला प्राप्त होतें, केवल कर्म होत नाहीं, कीं विद्येशीं संयुक्त झालेलें व केवल कर्म अविशेषानें—एकसारखेंच विद्येशीं एककार्यत्वाला प्राप्त होतें' असा याचा विचार केला जातो. [–'कुतः०' इत्यादि भाष्यानें प्रश्नपूर्वक संशयाचें कारण सांगतात–]=पण असा संशय कोणत्या कारणानें येतो? 'त्या या आत्म्याला यज्ञानें जाणण्याची इच्छा करितात' असें यज्ञादिकांचें आत्मज्ञानाच्या अंगत्वानें अविशेषानें—समान श्रवण असल्यामुळें व विद्यासंयुक्त अग्निहोत्रादिकांचें विशिष्टत्व अवगत होत असल्यामुळें असा संशय येतो. [श्रौत ब्रह्मज्ञानाच्या हेतुत्वानें प्रकृत नित्यकर्मांमध्यें अंगाश्रित विद्यासंयोगाचा अनियम सांगितलेला असल्यामुळें येथें प्रासंगिकी पादादिसंगति आहे. पूर्वपक्षांत 'केवल कर्मांच्या मोक्षान्वयाची असिद्धि' व सिद्धान्तांत 'त्या केवल कर्मांचीहि परंपरेनें मोक्षान्वयसिद्धि होते' असें मानून–'किं तावत्०' इत्यादि भाष्यानें विमर्शपूर्वक पूर्वपक्ष सांगतात–]

**भाष्यं**—किं तावत्प्राप्तं विद्यासंयुक्तमेव कर्माग्निहोत्रादि आत्मविद्याशेषत्वं प्रतिपद्यते न विद्याहीनम्। विद्योपेतस्य विशिष्टत्वावगमाद्विद्याविहीनात्। 'यदहरेव जुहोति तदहः पुनर्मृत्युमपजयत्येवंविद्वान्' इत्यादिश्रुतिभ्यः। "बुद्ध्या युक्तो यया पार्थ कर्मबंधं प्रहास्यसि" "दूरेण ह्यवरं कर्म बुद्धियोगाद्धनंजय" इत्यादिस्मृतिभ्यश्चेति॥

**भाष्यार्थ**—तर मग त्यांतील कोणता पक्ष प्राप्त झाला? "विद्यासंयुक्तच अग्निहोत्रादि कर्म आत्मविद्येच्या अंगत्वास प्राप्त होतें." [–"अहोपण, 'यज्ञेन०' इत्यादि अविशेष—सामान्य श्रुतीमुळें दोन्ही प्रकारच्या कर्माला विद्यांगत्व आहे" अशी आशंका घेऊन 'ब्राह्मणाला द्यावें' असें म्हटलें असतां 'विद्वानाला द्यावें, विद्याहीनाला देऊं नये' या विशेषाचा लाभ जसा होतो त्याचप्रमाणें येथेंहि विशेषलाभ होतो, असें 'न०' इत्यादि भाष्यानें वादी म्हणतो–]=विद्याहीन कर्म ब्रह्मज्ञानाच्या अंगत्वास प्राप्त होत नाहीं. कारण विद्याविहीन कर्माहून विद्येनें युक्त

असलेल्या कर्माचें विशिष्टत्व अवगत झालेलें आहे. [–विद्यासहित कर्माच्या वैशिष्ट्याविषयीं ‘यदहरेव०’ इत्यादि वाक्यानें प्रमाण सांगतो–]=‘असें जाणणारा ज्या दिवशींच होम करितो त्या दिवशींच अपपुनर्मृत्यूला जिंकतो’ इत्यादि श्रुतींवरून विद्यासहित कर्माचें वैशिष्ट्य सिद्ध होतें. [–या श्रौत अर्थी वादी स्मृतीचें आनुकूल्य दाखवितो–]=‘बुद्ध्या० ’–“हे पार्था, ज्या बुद्धीनें युक्त होत्साता तूं कर्मबंधाचा परित्याग करशील”–भ. गी. २. ३९–‘हे धनंजया, बुद्धीयोगाहून कर्म अतिशयच निकृष्ट आहे ’–भ. गी. २. ३९–इत्यादि स्मृतिवचनांवरूनहि हेंच सिद्ध होतें. [–केवल अग्निहोत्रादिकर्माला ब्रह्मज्ञानहेतुत्व नसल्यामुळें त्याचा मोक्षाशीं अन्वय होत नाहीं ’ या प्राप्त पूर्वपक्षाचा अनुवाद करून ‘एवं०’ इत्यादि भाष्यानें सिद्धान्त सांगतात––]

**भाष्यं**––एवं प्राप्ते प्रतिपद्यते– यदेव विद्ययेति हि। सत्यमेतत्। विद्यासंयुक्तं कर्माग्निहोत्रादिकं विद्याविहीनात्कर्मणोऽग्निहोत्राद्विशिष्टं विद्वानिव ब्राह्मणो विद्याविहीनाद्ब्राह्मणात्। तथापि नात्यंतमनपेक्षं विद्याविहीनं कर्माग्निहोत्रादिकम्। कस्मात्। ‘तमेतमात्मानं यज्ञेन विविदिषन्ति’ इत्यविशेषेणाग्निहोत्रादेः विद्याहेतुत्वेन श्रुतत्वात्॥

**भाष्यार्थ**––असा पूर्वपक्ष प्राप्त झाला असतां सूत्रकार ‘यदेव विद्ययेति हि’ असा सिद्धान्त करितात–[–‘विद्यासंयुक्त कर्माला विद्याविहीन कर्माहून अंतरंगत्व सांगितलें जातें कीं, केवल कर्म विद्येचा हेतुच नाहीं, असें सांगितलें जातें ?’–असा विकल्प करून त्यांतील पहिल्या पक्षाचा ‘सत्यं०’ इत्यादि भाष्यानें स्वीकार करितात–] =होय, विद्वान् ब्राह्मण विद्याविहीन ब्राह्मणाहून जसा विशिष्ट आहे त्याप्रमाणें विद्यासंयुक्त अग्निहोत्रादि कर्म विद्याविहीन अग्निहोत्रादि कर्माहून विशिष्ट आहे हें खरें आहे. [–‘तथापि०’ इत्यादि भाष्यानें दुसऱ्या कल्पाला दूषित करितात–] =तथापि विद्याविहीन अग्निहोत्रादि कर्म अत्यंत अनपेक्ष आहे, त्याची मुळींच गरज नाहीं, असें मात्र नाहीं. [–त्याविषयीं ‘कस्मात्०’ इत्यादि भाष्यानें प्रश्नपूर्वक श्रुतिविरोध हा हेतु सांगतात–]=कोणत्या कारणानें ? ‘त्या या आत्म्याला यज्ञानें जाणण्याची इच्छा करितात’ असें अविशेषानें अग्निहोत्रादिकाला विद्याहेतुत्वानें श्रुतत्व आहे. म्ह० विद्यासाहित्य किंवा विद्याराहित्य असा कांहीं विशेष न सांगतां सामान्यतः त्याचें विद्याहेतुत्व श्रुत आहे. [–‘ननु०’ इत्यादि भाष्यानें उक्त अर्थ आक्षेप-समाधानांनीं साधितात–]

**भाष्यं—ननु विद्यासंयुक्तस्य अग्निहोत्रादेः विद्याविहीनाद्विशिष्टत्वावगमाद्विद्याविहीनमग्निहोत्रादि आत्मविद्याहेतुत्वेनानपेक्षमेवेति युक्तम् । नैतदेवम् । विद्यासहायस्याग्निहोत्रादेः विद्यानिमित्तेन सामर्थ्यातिशयेन योगादात्मज्ञानं प्रति कश्चित्कारणत्वातिशयो भविष्यति । न तथा विद्याविहीनस्य । इति युक्तं कल्पयितुम् । न तु 'यज्ञेन विविदिषन्ति' इत्यत्राविशेषेणात्मज्ञानांगत्वेन श्रुतस्याग्निहोत्रादेरनंगत्वं शक्यमभ्युपगंतुम् ॥**

**भाष्यार्थ**—अहोपण, विद्यासंयुक्त अग्निहोत्रादिकांचें विद्याविहीन अग्निहोत्रादिकांहून विशिष्टत्व अवगत होत असल्यामुळें विद्याविहीन अग्निहोत्रादि आत्मविद्याहेतुत्वानें अनपेक्षच आहे, असें समजणें युक्त आहे. [समाधान-]='नैतदेवं०'-नाहीं, हें असें नाहीं; विद्येला साह्य करणाऱ्या अग्निहोत्रादिकांचा विद्यानिमित्त सामर्थ्यातिशयाशीं संबंध होत असल्यामुळें त्याचा आत्मज्ञानाप्रत कांहीं एक कारणत्वातिशय होईल, विद्याविहीन कर्मांचा तसा होणार नाहीं, अशी कल्पना करणें युक्त आहे. [-पण केवल कर्माला विद्येचें अनंगत्वच कां नाहीं? 'न तु०' इत्यादि भाष्यानें उत्तर-]=पण 'यज्ञानें जाणण्याची इच्छा करितात' या वाक्यांत अविशेषानें-सामान्यतः आत्मज्ञानाच्या अंगत्वानें श्रुत असलेल्या अग्निहोत्रादि कर्मांचें अनंगत्व मानितां येणें शक्य नाहीं. [-'यज्ञानें जाणण्याची इच्छा करितात, असें जरी अविशेष श्रवण आहे तरी विद्यासहित यज्ञादिकांमध्यें त्याचा उपसंहार करावा' अशी आशंका घेऊन 'श्रुतीनें केवल कर्मांच्याहि वीर्यवत्त्वाला मान्यता दाखविलेली असल्यामुळें-त्याचा स्वीकार केलेला असल्यामुळें तसा उपसंहार करितां येत नाहीं,' असें 'तथा०' इत्यादि भाष्यानें सूत्रव्याख्यानपूर्वक सांगतात-]

**भाष्यं—तथा हि श्रुतिः- 'यदेव विद्यया करोति श्रद्धयोपनिषदा तदेव वीर्यवत्तरं भवति' इति विद्यासंयुक्तस्य कर्मणोऽग्निहोत्रादेः वीर्यवत्तरत्वाभिधानेन स्वकार्यं प्रति कंचिदतिशयं ब्रुवाणा विद्याविहीनस्य तस्यैव तत्प्रयोजनं प्रति वीर्यवत्त्वं दर्शयति । कर्मणश्च वीर्यवत्त्वं तद्यत्स्वप्रयोजनसाधनसहत्वम् ॥**

**भाष्यार्थ**—कारण 'जें कर्म विद्येनें, श्रद्धेनें व ध्यानानें करितो, तेंच वीर्यवत्तर होतें'-पृ. ६४९-अशी ही श्रुति विद्यासंयुक्त अग्निहोत्रादि कर्मांच्या वीर्यवत्तरत्वकथनानें आपल्या कार्याप्रत त्यांचा कांहीं एक अतिशय सांगणारी अशी होत्साती विद्याविहीन असलेल्या त्याच अग्निहोत्रादि कर्मांचें आपल्या कार्याप्रत वीर्यवत्त्व दाखविते. [-"अहोपण, त्या केवल कर्मांचें वीर्यवत्त्व जरी प्रतीत होतें असलें तरी त्याला विद्यासाधनत्व कोणत्या कारणानें आहे!" अशी आशंका घेऊन

'जें अकिंचित्कर–कांहींच प्रयोजन निष्पन्न न करणारें असतें त्याच्या वीर्यवत्त्वाचा असंभव असतो, त्यामुळें' असें समाधान '**कर्मणश्च०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=आणि जें आपलें प्रयोजन सिद्ध करण्याचें सामर्थ्य असणें, आपल्या कार्याचें साधनक्षमत्व तेंच कर्माचें वीर्यवत्त्व होय. [–'**तस्मात्०**' इत्यादि भाष्यानें कर्मांचा परंपरासंबंधानें मोक्षाशीं अन्वय दाखविण्यासाठीं उपसंहार करितात–]

**भाष्यं—तस्माद्विद्यासंयुक्तं नित्यमग्निहोत्रादि विद्याविहीनं चोभयमपि मुमुक्षुणा मोक्षप्रयोजनोद्देशेनेह जन्मनि जन्मान्तरे च प्राग्ज्ञानोत्पत्तेः कृतं यत्तद्यथासामर्थ्यं ब्रह्माधिगमप्रतिबंधकारणोपात्तदुरितक्षयहेतुत्वद्वारेण ब्रह्माधिगमकारणत्वं प्रतिपद्यमानं श्रवणमननश्रद्धातात्पर्याद्यंतरंगकारणापेक्षं ब्रह्मविद्यया सहैककार्यं भवतीति स्थितम् ॥ १८ ॥ ( १३ )**

**भाष्यार्थ**—म्हणून विद्यासंयुक्त व विद्याविहीन असें दोन्ही प्रकारचें जें नित्य अग्निहोत्रादि कर्म मोक्ष या फलाच्या उद्देशानें मुमुक्षूनें ज्ञानोत्पत्तीच्या पूर्वी या जन्मीं किंवा जन्मांतरीं केलेलें असतें, तें आपल्या सामर्थ्याप्रमाणें ब्रह्मसाक्षात्काराला प्रतिबंध करणाऱ्या संचित दुरितक्षयहेतुत्वाच्या द्वारा ब्रह्मसाक्षात्काराच्या कारणत्वास प्राप्त होत्सातें श्रवण, मनन, श्रद्धा, तत्परता इत्यादि अंतरंग कारणांच्या अपेक्षेनें ब्रह्मविद्येशीं एककार्य होतें, म्हणजे जें ब्रह्मविद्येचें कार्य तेंच परंपरेनें याचेंहि कार्य होतें, असें सिद्ध झालें. [–विधुरादिकांना आश्रमकर्मांमध्यें अधिकार नसल्यामुळें त्यांचें जप्यादि विद्यासाधन आहे, असें 'अंतरा चापि'–पृ. ५६९–इत्यादि सूत्रानें सांगितलें, पण 'येथें विद्येनें युक्त असलेल्या कर्मांमध्यें समर्थ असलेल्या पुरुषानें त्याचा त्याग करून केवळ कर्मानुष्ठान केल्यास त्याची विद्या सिद्ध होणार नाहीं' अशी आशंका घेऊन तिचें समाधान केलें आहे, असें जाणावें.–सु.ब्र.४५०]१८(१३)

( १४. **इतरक्षपणाधिकरण. सू. १९.** )

—ज्यांच्या कार्याला आरंभ झालेला नाहीं असें विद्यायुक्त व केवळ अग्निहोत्रादिकर्म ज्ञानाचें हेतुभूत असल्यामुळें ज्ञानानें क्षय पावत नाहीं, असें सांगितलें. आतां ज्यांच्या कार्याला आरंभ झालेला आहे व ज्ञानानें ज्यांची निवृत्ति झालेली नाहीं अशा शुभाशुभ कर्मांच्या निवृत्तीचा प्रकार '**भोगेन तु०**' इत्यादि सूत्रानें सांगतात–

**सूत्रं—भोगेन त्वितरे क्षपयित्वा संपद्यते ॥ १९ ॥ (१४)**

**सूत्रार्थ**—पण, 'इतर'–प्रारब्ध पुण्य-पापांचा 'भोगानें क्षय करून' विद्वान् 'ब्रह्मसंपन्न होतो.' १९. (१४)–सु. ब्र. ४५१. [–निर्गुण ब्रह्मज्ञानी हा या अधिकरणाचा विषय आहे, 'तो देहपातानंतरहि संसारवान् होतो कीं नाहीं,' असा हा

निमित्ताचा भाव व अभाव या दोन कारणांनीं संदेह आला असतां पूर्वपक्ष पुढें दाखविणारे भाष्यकार अगोदर 'अनारब्ध०' इत्यादि भाष्यानें गतार्थाच्या अनुवादानें सूत्रतात्पर्य सांगतात-]

**भाष्यं—अनारब्धकार्ययोः पुण्यपापयोर्विद्यासामर्थ्यात्क्षयः उक्तः। इतरे तु आरब्धकार्ये पुण्यपापे उपभोगेन क्षपयित्वा ब्रह्म संपद्यते 'तस्य तावदेव चिरं यावन्न विमोक्ष्येऽथ संपत्स्ये' इति 'ब्रह्मैव सन्ब्रह्माप्येति' इति चैवमादिश्रुतिभ्यः॥**

**भाष्यार्थ**—ज्यांच्या कार्याला आरंभ झालेला नाहीं, अशा संचित पुण्य-पापांचा विद्यासामर्थ्यामुळें क्षय सांगितला. पण 'इतर'—आरब्धकार्ये—ज्यांच्या कार्याला आरंभ झालेला आहे अशा पुण्य-पापांचा उपभोगानें क्षय करून ज्ञानी ब्रह्मरूप होतो. 'जोंवर त्याचा देहपात होत नाहीं तोंवरच त्याच्या विदेह कैवल्यास अवकाश असतो, देहपात होतांच तो ब्रह्मसंपन्न होतो. '—पृ.६७७—या व 'तो ब्रह्मच होऊन ब्रह्माला प्राप्त होतो ' या आणि अशाच दुसऱ्याहि अनेक श्रुतींवरून त्याचें विदेह कैवल्य सिद्ध होतें. [ येथें 'श्रौत ब्रह्मज्ञान्याचा ब्रह्मभाव भोगानें प्रारब्धकर्माची निवृत्ति झाली असतां अवश्यंभावी आहे ' असें कथन केलेलें असल्यामुळें याच्या पादादि-संगति आहेत. पूर्वपक्षांत 'ब्रह्मवेत्त्यालाहि मुक्ति नाहीं' व सिद्धान्तांत 'त्याची मुक्ति अवश्यंभावीनी आहे. कारण 'सामग्री असली कीं कार्य अवश्य होतें' असा नियम आहे.' 'अनारब्धकार्ये एव'—पृ. ६७६—या सूत्रांत 'नकारानें आरब्धकर्मनिवृत्ती-पासून व्यावृत्त केलेलें. त्याचें भोगानें क्षयलक्षण फल दाखवितात,' असें सांगितलें. आतां 'निर्गुण ब्रह्मज्ञानी आरब्धकर्माचा क्षय झाल्यानंतरहि संसारी आहे. कारण त्याला संसारसंबंधाची योग्यता आहे. पूर्वकालीन ब्रह्मज्ञान्याप्रमाणें.' या अनुमा-नानें 'ननु०' इत्यादि भाष्यानें पूर्वपक्ष सांगतात-]

**भाष्यं—ननु सत्यपि सम्यग्दर्शने यथा प्राग्देहपाताद्भेददर्शनं द्विचंद्रदर्शन-न्यायेनानुवृत्तं। एवं पश्चादप्यनुवर्तेत। न। निमित्ताभावात्। उपभोगशेषक्षपणं हि तत्रानुवृत्तिनिमित्तं न च तादृशमत्र किंचिदस्ति॥**

**भाष्यार्थ**—"अहोपण, सम्यग्दर्शन जरी असलें तरी देहपात होण्यापूर्वी भेददर्शन द्विचंद्रदर्शनन्यायानें जसें अनुवृत्त होतें तसेंच तें देहपातानंतरहि अनुवृत्त होईल!" [—'पण या अनुमानांत 'भोगनिमित्त कर्मांनीं युक्त असणें' ही उपाधि आहे' असा परिहार 'न०' इत्यादि भाष्यानें करितात—]='न हि०'—देह-पातानंतर भेददर्शन अनुवृत्त होणार नाहीं, कारण त्याच्या निमित्ताचा अभाव आहे. [—'उपभोग०' इत्यादि भाष्यानें तेंच स्पष्ट करितात—]=कारण उपभोग-शेषाचें क्षपण—भोक्तव्य प्रारब्धशेषाचा क्षय, हें देहपातपूर्वकालीन ब्रह्मवेत्त्यांमध्यें

भेददर्शनाच्या अनुवृत्तीचें निमित्त आहे. [–'तर मग देहपातोत्तरकालीन ब्रह्मवेत्त्यामध्येंहि कांहीं भोगनिमित्त असेल' अशा साधनव्याप्तीची आशंका घेऊन 'न च०' इत्यादि भाष्यानें म्हणतात–]=पण देहपातोत्तरकालीन ब्रह्मवेत्त्यामध्यें तशा प्रकारचें कांहींएक अनुवृत्तिनिमित्त नसतें. [–"अहोपण अनारब्ध कर्म जन्मान्तराचें आरंभक आहे, तेव्हां साधनाव्याप्ति कोठची?" अशी 'ननु०' इत्यादि शंका–]

**भाष्यं—नन्वपरः कर्माशयोऽभिनवमुपभोगमारप्स्यते । न । तस्य दग्धबीजत्वात् । मिथ्याज्ञानावष्टंभं हि कर्मान्तरं देहपात उपभोगान्तरमारभेत तच्च मिथ्याज्ञानं सम्यग्ज्ञानेन दग्धमित्यतः साध्वेतदारब्धकार्यक्षये विदुषःकैवल्यमवश्यं भवतीति ॥ १९ ॥ ( १४ )**

इति श्रीमच्छंकरभगवतः कृतौ शारीरकमीमांसाभाष्ये चतुर्थाध्यायस्य प्रथमः पादः ॥१॥

**भाष्यार्थ**—"अहोपण, दुसरा कर्माशय अगदीं नवीनच उपभोगाचा आरंभ करील!" [–"पण ज्ञानानें त्याची शक्ति प्रतिबद्ध झालेली असल्यामुळें अभिनव उपभोगाचा आरंभ संभवत नाहीं" असें 'न तस्य०' इत्यादि भाष्यानें सांगतात–] =नाहीं, दुसरा कर्माशय नूतन उपभोगाचा आरंभ करणार नाहीं. कारण त्याला दग्धबीजत्व आहे, त्यांतील बीजशक्ति ज्ञानानें दग्ध झालेली असते. [–'कर्माशयाचें बीज काय आहे?' 'मिथ्या०' इत्यादि भाष्यानें उत्तर–]=मिथ्याज्ञान हा ज्याचा आधार आहे असेंच कर्मांतर देहपात झाला असतां दुसऱ्या उपभोगाचा आरंभ करील. [–'तर मग त्याचा दाह कशानें होतो?' 'तच्च०' इत्यादि भाष्यानें उत्तर–]=आणि तें मिथ्याज्ञान सम्यग्ज्ञानानें दग्ध झालेलें असतें. [ 'अथ संपत्स्ये' –देहपात होतांच ब्रह्मरूप होतो, इत्यादि श्रुतीचा बाध होत असल्यामुळें व बीजाचा अभाव विद्वानाच्या अनुभवानें सिद्ध असल्यामुळें पूर्वकर्माचें अनुमान होऊं शकत नाहीं, असा याचा भावार्थ.–प्रारब्धकर्मफलाचा भोग घेतल्यावर मोक्षामध्येंहि तत्कर्मजन्य अनेक देहांचा संभव असल्यामुळें व त्यांत विद्येचा बाध उपपन्न होत असल्यामुळें तत्कृत कर्मांच्या अश्लेष-अभावानें मुक्तीच्या अभावाची आशंका घेऊन अधिकाऱ्यांच्या देहान्तरांतील ज्ञानाच्या अबाधाला आगमिकत्व–आगमसिद्धत्व असल्यामुळें व आमच्या सारख्यांच्या ज्ञानाचा अविनाश 'अथ संपत्स्ये' इत्यादि श्रुतींनीं सिद्ध असल्यामुळें, आरब्धभोगानंतर मुक्ति अवश्यंभाविनी आहे, अशा अधिकरणार्थाचा 'इत्यतः०' इत्यादि भाष्यानें उपसंहार करितात–]=असें असल्यामुळें प्रारब्धकर्माचा क्षय झाला असतां विद्वानाचें कैवल्य अवश्य होतें, असें हें वेदान्तमत सर्वथा निर्दोष आहे. 'इति०'–याप्रमाणें या पादांत साधनाच्या अनुष्ठानांचा क्रम व निर्गुणविद्येचें फल सांगितलें १९.–सु.ब्र.४९२.(१४)

इति श्रीब्रह्मसूत्रशारीरभाष्यार्थाच्या चवथ्या अध्यायाचा पहिला पाद समाप्त झाला.

*

ॐतत्सत्

# फलाख्यचतुर्थाध्याये द्वितीयः पादः ।

( १. वागाधिकरण. सू. १-२ )

--पूर्वपादाच्या अंतिमाधिकरणांत निर्गुणब्रह्मसंपत्ति सांगितली. आतां सगुण-ब्रह्मप्राप्तीचें निरूपण करणारे सूत्रकार 'वाङ्मनसि०' इत्यादि सूत्रानें उत्क्रांतींत वागादिकांचा मनांत वृत्तिलय दाखवितात—

**सूत्रं--वाङ्मनसि दर्शनाच्छब्दाच्च ॥ १**

**सूत्रार्थ**--वाक्-वृत्ति मनोवृत्तींत लीन होते. कारण व्यवहारांत मनोवृत्ति असतांनाच वाक्-वृत्तीचा लय होत असलेला दिसतो आणि 'वाक्-'शब्द वृत्ति व वृत्तिमान् यांच्या अभेद-उपचारानें किंवा भावव्युत्पत्तीनें वाक्-वृत्तिपर स्वीकार-लेला आहे. १.-सु.ब्र. ४९३. [-ब्रह्मलोकसंबंधी अर्चिरादिगतीनें प्राप्त होणाऱ्या सगुणविद्याफलाची प्राप्ति उत्क्रान्तीवांचून होणें शक्य नसल्यामुळें त्याच्या प्राप्ती-साठीं व 'व्यापिब्रह्मात्मभाव' या निर्गुणविद्येच्या फलामध्यें त्या उत्क्रांतीचा निषेध करण्यासाठीं हें उत्क्रांतीचें निरूपण आहे, अशा अभिप्रायानें 'अथ०' इत्यादि भाष्यानें या पादाची अध्यायसंगति सांगतात-]

**भाष्यं—अथापरासु विद्यासु फलप्राप्तये देवयानं पंथानमवतारयिष्यन्प्रथमं तावद् यथाशास्त्रमुत्क्रान्तिक्रममन्वाचष्टे । समाना हि विद्वदविदुषोः उत्क्रान्ति-रिति वक्ष्यति । अस्ति प्रायणविषया श्रुतिः 'अस्य सोम्य पुरुषस्य प्रयतो वाङ्म-नसि संपद्यते मनः प्राणे प्राणस्तेजसि तेजः परस्यां देवतायाम्' इति ॥**

**भाष्यार्थ**--आतां-निर्गुणज्ञानाच्या फलोक्तीनंतर अपरविद्यांमध्यें फलप्राप्ती-साठीं देवयानमार्गाची प्रवृत्ति करविणारे सूत्रकार अगोदर यथाशास्त्र उत्क्रान्तीचा क्रम श्रुतीला अनुसरून सविस्तर सांगतात-[-"विद्वानाचे प्राण शरीराला सोडून जात नाहींत, तर ते येथेंच आपापल्या कारणांत लीन होतात"-बृ. ४.४.६. -अशी श्रुति असल्यामुळें येथें उत्क्रान्तीच्या विचाराचा काय उपयोग ! अशी आशंका घेऊन 'समाना०' इत्यादि भाष्यानें म्हणतात-]=कारण विद्वान् व अविद्वान् या दोघांचीहि उत्क्रान्ति एकसारखीच होते, असें पुढें सांगतील. [ येथें विद्वान् म्हणजे अपर ब्रह्मवेत्ता-सगुणब्रह्मज्ञानी. -'अस्ति०' इत्यादि भाष्यानें

पादार्थांचा संक्षेप करून आद्य अधिकरणाचा विषय सांगतात–]=' हे प्रियदर्शन, या प्रयाण करणाऱ्या–उत्क्रमण करण्याची इच्छा करणाऱ्या पुरुषाची वाक् मनामध्यें संपन्न होते, मन प्राणामध्यें, प्राण तेजामध्यें व तेज परा देवतेमध्यें संपन्न होतें. '–छां. ६. ८. ६.–अशी प्रायणविषया–प्रायणाला–मरणाला उद्देशून श्रुति आहे. [–'वाक् मनामध्यें संपन्न होते' या वाक्यांतील 'वाक्' या शब्दाला विषय करून करणव्युत्पत्तीनें स्वरूपसंपत्ति व भावव्युत्पत्तीनें स्ववृत्तिसंपत्ति प्रतीत होत असल्यामुळें ' किं इह० ' इत्यादि भाष्यानें संशय सांगतात—]

**भाष्यं—किमिह वाच एव वृत्तिमत्या मनसि संपत्तिरुच्यते उत वाग्वृत्तेरिति विशयः। तत्र वागेव तावन्मनसि संपद्यत इति प्राप्तम्। तथा हि श्रुतिरनुगृहीता भवति। इतरथा लक्षणा स्यात्। श्रुतिलक्षणाविशये च श्रुतिर्न्याय्या न लक्षणा। तस्माद्वाच एवायं मनसि प्रलय इति ॥**

**भाष्यार्थ**—या वाक्यांत वृत्तीनें युक्त असलेल्या वाक्-चीच मनामध्यें संपत्ति सांगितली जाते कीं वाग्वृत्तीची, असा संशय येतो. [येथें श्रौत सगुण ब्रह्मज्ञानाच्या फलासाठीं जी गति तिच्या उपयोगी असलेल्या उत्क्रांतीच्या एकदेशाचें निरूपण केलेलें असल्यामुळें याची पादादिसंगति आहे. पूर्वपक्षांत 'कारणांत कार्यांचा लय होतो या नियमाची असिद्धि' व सिद्धान्तांत 'लौकिक परीक्षकांना अभीष्ट असलेल्या नियमाची सिद्धि' असें मानून–'तत्र०' इत्यादि भाष्यानें पूर्वपक्ष–]=असा संशय आला असतां अगोदर मनामध्यें वाक्च संपन्न होते, असें प्राप्त झालें. [–त्याविषयीं वादी 'वाक्' या शब्दाच्या श्रवणाला हेतु करितो–]='तथा हि०'–कारण तसें मानिल्यानें श्रुति अनुगृहीत होते. [–'वृत्तिमत्-'वाचक शब्दाच्या म्ह० वृत्तींनीं युक्त असलेल्या 'वाक्' या इंद्रियाचा वाचक जो 'वाक्' हा शब्द तो केवल वृत्ति या अर्थी आहे, असें मानिल्यास कोणता दोष येतो, तें वादी 'इतरथा०' इत्यादि भाष्यानें सांगतो–]=' वाक्-'शब्दानें वृत्तिमती वाक् न घेतां तिची वृत्तिच घेतल्यास त्या शब्दाची लक्षणा होईल [–"अहोपण, लक्षणेलाहि शब्दवृत्तित्व असल्यामुळें ती अविरुद्ध आहे" अशी आशंका घेऊन वादी 'श्रुति०' इत्यादि भाष्यानें समाधान सांगतो–]=आणि श्रुति व लक्षणा यांविषयीं संशय आला असतां श्रुतीच न्याय्य आहे, लक्षणा नाहीं. [–'तस्मात्०' इत्यादि भाष्यानें श्रुत्यनुसारी अर्थाचा उपसंहार–]=म्हणून 'वृत्तिमती वाक्-चाच हा मनामध्यें प्रलय आहे' असें प्राप्त होतें. [–'प्रकृतींतच

विकाराचा लय होतो, असा कांहीं नियम नाहीं.' या प्राप्त पूर्वपक्षाचा 'एवं०' इत्यादि भाष्यानें अनुवाद करून सिद्धान्त पूर्ण करून पढतात-]

**भाष्यं—एवं प्राप्ते ब्रूमः-वाग्वृत्तिर्मनसि संपद्यत इति । कथं वाग्वृत्तिरिति व्याख्यायते यावता वाङ्मनसीत्येवाचार्यः पठति । सत्यमेतत् । पठिष्यति तु परस्तात् 'अविभागो वचनात्' इति । तस्मादत्र वृत्त्युपशममात्रं विवक्षितमिति गम्यते । तत्त्वप्रलयविवक्षायां तु सर्वत्रैवाविभागसाम्यात्किं परत्रैव विशिंष्याद-विभाग इति । तस्मादत्र वृत्त्युपसंहारविवक्षा ॥**

**भाष्यार्थ**—असा पूर्वपक्ष प्राप्त झाला असतां 'वाक्-'वृत्ति मनामध्यें संपन्न-लीन होते, असें आम्ही सांगतों. [-पण या अध्याहाराला सहन न करणारा वादी '**कथं०**' इत्यादि भाष्यानें शंका घेतो-]="अहोपण, बादरायणाचार्य 'वाङ्म-नसि' इतकाच जर सूत्राचा पाठ करीत आहेत, तर तुम्हांकडून त्याचें 'वाग्वृत्ति' असें व्याख्यान कसें केलें जातें ?" [-पुढील अधिकरणाच्या आलोचनानें '**सत्यं०**' इत्यादि भाष्यानें विवक्षित अध्याहार साधितात-]=सूत्रकार येथें 'वाङ्मनसि' असाच सूत्रपाठ करितात, हें खरें आहे. परंतु पुढें ते 'अविभागो वचनात्' -सू. ४. २. १७-असें पढतील. [-"अहोपण, वृत्तिमत् इंद्रियादिकांचा लय पुढें जरी सांगावयाचा असला तरी या प्रकृत अधिकरणांत त्याचा काय संबंध ?" '**तस्मात्०**' इत्यादि भाष्यानें उत्तर-]=त्यावरून येथें केवल वृत्तीचा उपशमच त्यांना विवक्षित आहे, असें अवगत होतें. [-'**तत्त्व०**' इत्यादि भाष्यानें उलटपक्षीं दोष सांगतात-]=पण तत्त्वप्रलयाची विवक्षा असतांना सर्वच ठिकाणीं अविभा-गाचें साम्य असल्यामुळें पुढेंच तेवढें 'अविभाग' असें विशेषण कां देतील? कारण सर्वत्र अविभाग असतांना पुढेंच तेवढें असें विशेषण देणें युक्त नाहीं. [ तत्त्वाचा -धर्मी वाक्-चाच प्रलय जर येथें विवक्षित असता तर येथें व तेथें अविभागाचें साम्य असल्यामुळें पुढेंच 'अविभाग' हें विशेषण अयुक्त झालें असतें, असा भावार्थ.-विशेषणसामर्थ्यानें सिद्ध झालेल्या अर्थाचा '**तस्मात्०**' इत्यादि भाष्यानें उपसंहार-]=म्हणून येथें वृत्तीच्या उपसंहाराची विवक्षा आहे. [-आतां सूत्राच्या अभीष्ट अर्थाचा '**वाक्-वृत्तिः०**' इत्यादि भाष्यानें संक्षेप करितात-]

**भाष्यं—वाग्वृत्तिः पूर्वमुपसंह्रियते मनोवृत्ताववस्थितायामित्यर्थः । कस्मात् । दर्शनात् । दृश्यते हि वाग्वृत्तेः पूर्वोपसंहारो मनोवृत्तौ विद्यमानायाम् । न तु वाच एव वृत्तिमत्या मनस्युपसंहारः केनचिदपि द्रष्टुं शक्यते । ननु श्रुतिसाम-र्थ्याद्वाच एवायं मनस्यप्ययो युक्त इत्युक्तम् । नेत्याह । अतत्प्रकृतित्वात् । यस्य**

**हि यत उत्पत्तिस्तस्य तत्र प्रलयो न्याय्यो मृदीव शरावस्य । न च मनसो वागुत्पद्यत इति किंचन प्रमाणमस्ति ॥**

**भाष्यार्थ**—मनोवृत्ति अवस्थित असतानांच वाग्वृत्ति तिच्यामध्यें पूर्वी उपसंहृत केली जाते, लीन न झालेल्या मनोवृत्तींत अगोदर वाग्वृत्तीचा लय होतो, असा याचा भावार्थ. [–' **कस्मात्०** ' इत्यादि भाष्यानें प्रश्नपूर्वक सिद्धान्ताच्या हेतूला अवतरण देऊन त्याचें व्याख्यान करितात–]=कोणत्या कारणानें ? ' दर्शनामुळें ' –कारण विद्यमान असलेल्या मनोवृत्तींत वाक्वृत्तीचा पूर्वोपसंहार प्रत्यक्ष अनुभवास येतो. [–" अहोपण, वृत्तिमत् इंद्रियांच्या उपसंहाराविषयींहि समान दर्शन आहे–वृत्तिमानाचा उपसंहारहि तसाच दिसतो " अशी आशंका घेऊन ' तें वृत्तिमदुपसंहाराचें तुल्यदर्शन लौकिक आहे कीं, आगमिक आहे ' असा विकल्प करून ' न तु० ' इत्यादि भाष्यानें त्यांतील पहिल्या कल्पाचें निरसन–]=पण वृत्तीनें युक्त असलेल्या 'वाक्-'चाच मनामध्यें उपसंहार होतो, असा अनुभव कोणालाहि येणें शक्य नाहीं. [–' **ननु०** ' इत्यादि भाष्यानें द्वितीय पक्षाचा अवलंब करितात–]=" अहोपण, श्रुतिसामर्थ्यामुळें हा वाक्चाच मनामध्यें लय युक्त आहे, " असें आम्हीं–पृ. १९२–वर सांगितलें आहे. [दृष्टानुसारामुळें आगमालाहि प्रकृतींत विकारलयोक्तिपरत्व आहे–लौकिक अनुभवाच्या अनुसार प्रकृतीमध्यें विकाराचा लय होतो, हेंच सांगण्यामध्यें आगमाचेंहि तात्पर्य आहे, आणि वाक्-इंद्रियाला मनोविकारत्व नाहीं, त्यामुळें वाक्चा मनामध्यें लय संभवत नाहीं, म्हणून वृत्ति व वृत्तिमान् यांच्या अभेद-बुद्धीनें येथील ' वाक्-' शब्द ' वृत्ति ' या अर्थीच आहे, असें ' **नेत्याह०** ' इत्यादि भाष्यानें सांगतात–] =नाहीं, वाक्चाच मनामध्यें लय होणें युक्त नाहीं, असें सूत्रकार सांगतात. कारण त्या वाक्ला अतत्प्रकृतित्व आहे, म्हणजे मन ही वाक्ची प्रकृति नाहीं. [–'**यस्य०**' इत्यादि भाष्यानें त्याचेंच विवरण–]=कारण ज्याच्यापासून ज्याची उत्पत्ति होते, त्यांतच त्याचा प्रलय होणें न्याय्य आहे, जसा मृत्प्रकृतिक शरावाचा मृत्तिकेमध्यें लय होतो, [–' तर मग वाक्हि मनाचा विकार असूं दे' पण 'प्रमाणाच्या अभावीं ती मनाचा विकार नव्हे ' असें ' **न च०** ' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=आणि मनापासून वाक् उत्पन्न होते याविषयीं कांहीं प्रमाण नाहीं. [–"अहोपण, वाक्च्या वृत्तीलाहि मनःप्रकृतित्व नाहीं. तेव्हां तिचा मनामध्यें लय कोठून होणार ? " ' **वृत्ति०** ' इत्यादि भाष्यानें उत्तर–]

**भाष्यं—वृत्त्युद्भवाभिभवौ स्वप्रकृतिसमाश्रयावपि दृश्येते । पार्थिवेभ्यो हींधनेभ्यस्तैजसस्याग्नेर्वृत्तिरुद्भवत्यप्सु चोपशाम्यति । कथं तर्ह्यस्मिन्पक्षे शब्दो 'वाङ्मनसि संपद्यते' इति । अत आह शब्दाच्चेति । शब्दोऽप्यस्मिन्पक्षेऽवकल्पते वृत्तिवृत्तिमतोरभेदोपचारादित्यर्थः ॥१॥**

**भाष्यार्थ**—पण वृत्तीचा उद्भव व अभिनव अप्रकृतीच्या आश्रयानेंहि होत असलेले दिसतात. [–'**पार्थिवेभ्यः०**' इत्यादि भाष्यानें तें दर्शनच विशद करितात–]=कारण पार्थिव इंधनांपासून तैजस अग्नीची वृत्ति उद्भवते व ती आपांमध्यें शांत होते. [–"अहो पण, श्रुति व लक्षणा यांविषयीं संशय आला असतां श्रुतीच न्याय्य आहे" असें जें वाद्यानें वर म्हटलें आहे त्याचें स्मरण देतात–] ='**कथं०**'–तर मग, यापक्षीं 'वाक् मनामध्यें संपन्न होते'–पृ.६९१–असा शब्द कसा आहे ? [–उक्त अर्थाच्या संभवामुळें उपचाराची सिद्धि होते असें 'शब्दाच्च' या सूत्रावयवाचें ग्रहण करून व्याख्यान करितात–]='**अतः०**'–म्हणूनच सूत्रकार 'शब्दाच्च' असें म्हणतात. या पक्षीं शब्दहि उपपन्न होतो. कारण वृत्ति व वृत्तिमान् यांचा अभेद-उपचार होतो, असा याचा भावार्थ.१. [–वाक्मध्यें दाखलेल्या न्यायाचा 'अतः एव०' इत्यादि सूत्रानें चक्षुरादिकांमध्यें अतिदेश करितात–]

**सूत्रं—अत एव च सर्वाण्यनु ॥२॥(१)**

**सूत्रार्थ**—पूर्वोक्त दर्शनादि हेतूंमुळेंच चक्षुरादि सर्व इंद्रियेंहि वृत्तियुक्त मनामध्यें केवल वृत्तिलयानें अनुवृत्त होतात–केवल वृत्तिरूपानें लय पावतात.२.(१) –सु.ब्र.४५४–[ज्याअर्थी मन व वाक् यांच्या प्रकृतिविकारभावाचा अभाव असल्यामुळें 'वाक्-'चाहि स्वरूपलय होत नाहीं तर वृत्तिलयच होतो, त्याअर्थी मन सवृत्तिक असतांनाच सर्व इंद्रियें त्याचें अनुवर्तन करितात, त्यांत स्वरूपानें लीन होत नाहींत, असा भावार्थ.–'**तस्मात्०**' इत्यादि वाक्यानें सूत्राक्षराचें व्याख्यान—]

**भाष्यं—'तस्मादुपशान्ततेजाः । पुनर्भवमिंद्रियैर्मनसि संपद्यमानैः' इत्यत्राविशेषेण सर्वेषामेवेंद्रियाणां मनसि संपत्तिः श्रूयते । तत्राप्यत एव वाच इव चक्षुरादीनामपि सवृत्तिके मनस्यवस्थिते वृत्तिलोपदर्शनात्तत्त्वप्रलयासंभवाच्छब्दोपपत्तेश्च वृत्तिद्वारेणैव सर्वाणींद्रियाणि मनोऽनुवर्तन्ते । सर्वेषां करणानां मनस्युपसंहाराविशेषे सति वाचः पृथग्ग्रहणं 'वाङ्मनसि संपद्यते' इत्युदाहरणानुरोधेन॥२॥**

**भाष्यार्थ**—'उत्क्रमणानंतर औष्ण्य हें ज्याचें लिंग आहे असें तेज ज्याचें शांत झालें आहे तो उपशांततेज झालेला जीव मनामध्यें लीन होणाऱ्या इंद्रियांनीं पुनर्जन्मास प्राप्त होतो.'–प्र. ३. ९.–अशा या वाक्यांत अविशेषानें–

सामान्यतः सर्वच इंद्रियांची मनामध्यें संपत्ति श्रुत आहे, म्हणूनच त्यांतहि सर्व इंद्रियें वृत्तिद्वाराच अनुवर्तन करितात. [–' अतः एव '–म्हणूनच असा जो सूत्रोक्त हेतु आहे तोच ' **वाच इव०** ' इत्यादि भाष्यानें सदृष्टान्त स्पष्ट करितात–]=वाक्प्रमाणें चक्षुरादिकांचाहि सवृत्तिक मन अवस्थित असतांना त्यांत वृत्तिलोप उपलब्ध होत असल्यामुळें, स्वरूपप्रलयाचा असंभव असल्यामुळें व शब्दहि उपपन्न होत असल्यामुळें वृत्तींच्या द्वाराच सर्व इंद्रियें मनाचें अनुवर्तन करितात. [–" अहोपण, येथें अविशेषानें सर्व इंद्रियांचा मनामध्यें वृत्त्युपसंहार जर विवक्षित आहे तर मग प्रथम सूत्रांत वाक्चें पृथक् ग्रहण कशासाठीं केलें आहे ? " ' **सर्वेषां०** ' इत्यादि भाष्यानें उत्तर–]=सर्व इंद्रियांचा मनामध्यें एकसारखाच उपसंहार होत असतांना वाक्चें जें पृथक् ग्रहण केलें आहे तें ' वाक् मनामध्यें संपन्न होते. '–पृ. १९१–या उदाहरणाच्या अनुरोधानें आहे ! २. (१)

( २. **मनोऽधिकरण. सू. ३.** )

—' तन्मनः० ' इत्यादि सूत्रानें इंद्रियवृत्तींच्या लयाचा आधार असें जें मन त्याच्या लयाच्या आधाराचें निरूपण करितात—

**सूत्रं—तन्मनः प्राण उत्तरात् ॥३॥(२)**

**सूत्रार्थ**—तें सर्व इंद्रियवृत्तिलयाधारभूत मनहि प्राणांत स्ववृत्तिलयानेंच लीन होतें, स्वरूपानें लीन होत नाहीं, असें ' मनः प्राणे ' या उत्तरवाक्यावरून जाणावें. ३. ( २ )–सु. ब्र. ४५९–[–' **समाधिगतं०** ' इत्यादि भाष्यानें गतार्थाचा अनुवाद करून अधिकरणाचा विषय सांगतात–]

**भाष्यं—समधिगतमेतत् ' वाङ्मनसि संपद्यते ' इत्यत्र वृत्तिसंपत्तिविवक्षेति। अथ यदुत्तरवाक्यम् ' मनः प्राणे ' इति । किमत्रापि वृत्तिसंपत्तिरेव विवक्ष्यत उत वृत्तिमत्संपत्तिरिति विचिकित्सायां वृत्तिमत्संपत्तिरेवात्रेति प्राप्तम् । श्रुत्यनुग्रहात् । तत्प्रकृतिकत्वोपपत्तेश्च ॥१॥**

**भाष्यार्थ**—' वाक् मनामध्यें संपन्न होते. ' या पूर्वोदाहृत वाक्यांत वृत्तिसंपत्तीची विवक्षा आहे असें हें चांगल्या प्रकारें ज्ञात झालें. त्यानंतर ' मन प्राणांत संपन्न होतें. '–पृ.१९२–असें जें त्या पुढील–उत्तरवाक्य आहे [–त्या वाक्यांतहि सवृत्तिक मनाला विषय करून व्युत्पत्तीच्या द्विविधत्वसिद्धीनें ' **किं अत्रापि०** ' इत्यादि भाष्यानें संशय सांगतात–]=' काय ? त्या वाक्यांतहि वृत्तिसंपत्तिच विवक्षित आहे कीं वृत्तिमान् मनाची संपत्ति विवक्षित आहे ' असा संशय आला असतां [ पूर्ववाक्याचा दृष्टान्त देण्यासाठीं येथें ' अपि-'शब्द योजिला आहे.

येथेंहि पूर्वीप्रमाणेंच पादादिसंगति आहे. पूर्वपक्षामध्यें 'श्रुत्यर्थाची सिद्धि' पण सिद्धान्तांत 'त्याचा असंभव असल्यामुळें लक्षणेचा स्वीकार' असें मानणारे भाष्यकार मनःशब्दश्रुतीनें 'वृत्तिमत्०' इत्यादि भाष्यानें पूर्वपक्ष करितात-]=येथें वृत्तीनें युक्त अशा मनाची प्राणामध्यें संपत्तिच होते, असें प्राप्त झालें. श्रुत्यनुग्रहामुळें. [ 'वाक्-'शब्दाप्रमाणें मनःशब्दाच्या औपचारिकत्वाची शंका घेऊन 'बाधकाच्या अभावामुळें येथें मुख्यार्थत्वच आहे' असें वादी 'तत्प्रकृतिक०' इत्यादि भाष्यानें सांगतो-]=आणि मनाच्या प्राणप्रकृतिकत्वाची उपपत्तिहि आहे म्ह० मनाची प्रकृति प्राण आहे-मनाला प्राणप्रकृतिकत्व आहे, असेंहि संभवतें. [-"अहोपण, मनाच्या प्राणप्रकृतिकत्वाविषयीं-मनाची प्रकृति प्राण आहे याविषयीं कांहीं प्रमाण नाहीं" अशी आशंका घेऊन वादी 'तथा हि०' इत्यादि सांगतो--]

**भाष्यं—तथा हि- 'अन्नमयं हि सोम्य मन आपोमयः प्राणः' इत्यन्नयोनि मन आमनन्त्यब्योनिं च प्राणम्। 'आपश्चान्नमसृजन्त' इति श्रुतिः। अतश्च यन्मनः प्राणे प्रलीयतेऽन्नमेव तदप्सु प्रलीयते। अन्नं हि मन आपश्च प्राणः प्रकृतिविकाराभेदादिति ॥**

**भाष्यार्थ**—मनाला प्राणप्रकृतिकत्व कसें आहे, तें पहा-' हे प्रियदर्शन श्वेतकेतो ! मन अन्नमय-अन्नाचा विकार आहे, प्राण आपोमय-जलविकार आहे.' -छां. ६. ५. ४.-असें मन अन्नयोनि आहे म्ह० मनाचें कारण अन्न आहे व प्राण जलयोनि-जलकारणक आहे, असें आमनन-कथन करितात. [-"अहोपण, अन्न व मन आणि आप व प्राण यांना प्रकृति-विकृतिभाव जरी असला तरी प्राण व मन यांचें प्रकृति-विकृतित्व कसें ?" 'आपश्च०' इत्यादि भाष्यानें उत्तर-] =आणि 'आप अन्नाला उत्पन्न करित्या झाल्या' अशी श्रुति आहे. [-आप व अन्न यांना प्रकृति-विकृतिभाव असल्यामुळें त्यांचीं कार्यें असा जो प्राण व मन त्यांच्या प्रकृतितादात्म्यद्वारा प्रकृति-विकृतिभावाची सिद्धि होऊन प्राणांत वृत्तिमान् मनाचा लय होतो असें फलित वादी 'अतश्च०' इत्यादि भाष्यानें सांगतो-] =आणि असें असल्यामुळें जें मन प्राणांत प्रलीन होतें तें अन्नच आपांमध्यें प्रलीन होतें. कारण अन्नच मन आहे व आप प्राण आहे. कारण कीं प्रकृति व विकार यांचा अभेद आहे, असें प्राप्त होतें. [-याप्रमाणें मन आपल्या वृत्तींसह प्राणांत लीन होतें, या प्राप्त झालेल्या पक्षाचा 'एवं०' इत्यादि भाष्यानें अनुवाद करून सिद्धान्तसूत्राला अवतरण देऊन त्याचें व्याख्यान करितात-]

**भाष्यं—एवं प्राप्ते ब्रूमः–तदप्यागृहीतबाह्येंद्रियवृत्ति मनो वृत्तिद्वारेणैव प्राणे प्रलीयते इत्युत्तराद्वाक्यादवगंतव्यम् । तथा हि सुषुप्सोर्मुमूर्षोश्च प्राणवृत्तौ परिस्पंदात्मिकायामवस्थितायां मनोवृत्तीनामुपशमो दृश्यते । न च मनसः स्वरूपाप्ययः प्राणे संभवति । अतत्प्रकृतित्वात् ॥**

**भाष्यार्थ**—असा पूर्वपक्ष प्राप्त झाला असतां आम्ही सिद्धान्त सांगतों–ज्यानें बाह्य इंद्रियांच्या वृत्ति स्वतःमध्यें सर्वतः उपसंहृत केल्या आहेत–आकर्षण करून घेतल्या आहेत असें तें मनहि वृत्तिद्वाराच प्राणामध्यें प्रलीन होतें, असें पुढील वाक्यावरून जाणावें. [–'**तथा हि०**' इत्यादि भाष्यानें 'दर्शनात्' या पूर्वोक्त-सूत्र १.पृ.६९४–युक्तीचा येथें हेतुत्वानें संग्रह करितात–]=कारण सुषुप्सु व मुमूर्षु म्हणजे निद्रोन्मुख व मरणोन्मुख झालेल्या पुरुषाची परिस्पंदात्मक–चलनात्मक प्राण-वृत्ति अवस्थित असतांना मनोवृत्तींचा उपशम प्रत्यक्ष अनुभवास येतो. [–"अहो-पण, '**मनः-**'शब्दश्रुतीनें मनःस्वरूपसंपत्तीच कां होणार नाहीं?" अशी आशंका घेऊन '**न च०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=आणि मनाचा प्राणांत स्वरूपानें प्रलय संभवत नाहीं. कारण मनाला प्राणप्रकृतित्व नाहीं. [–'**ननु०**' इत्यादि भाष्यानें वाद्याच्या पूर्वोक्ताचें–६९७–स्मरण करवून त्याचें निरसन–]

**भाष्यं—ननु दर्शितं मनसः प्राणप्रकृतित्वम् । नैतत्सारम् । न हीदृशेन प्राणाडिकेन तत्प्रकृतित्वेन मनः प्राणे संपत्तुमर्हति । एवमपि ह्यन्ने मनः संप-द्येताप्सु चान्नमप्स्वेव च प्राणः । न ह्येतस्मिन्नपि पक्षे प्राणभावपरिणताभ्योऽद्भ्यो मनो जायत इति किंचन प्रमाणमस्ति । तस्मान्न मनसः प्राणे स्वरूपाप्ययः । वृत्त्यप्ययेऽपि तु शब्दोऽवकल्पते । वृत्तिवृत्तिमतोरभेदोपचारादिति दर्शितम् ॥३॥**

**भाष्यार्थ**—"अहोपण मनाचें प्राणप्रकृतित्व आम्हीं वर दाखविलें आहे." पण त्यांत कांहीं सार नाहीं. [–स्वकारणद्वारा दोन विकारांचें परस्पर प्रकृतिविकारत्व जर असेल तर घटादिकांनाहि शरावादिकांचें प्रकृतित्व आहे असें म्हणावें लागेल, असें वाद्याच्या म्हणण्याचें असारत्वच '**न हि०**' इत्यादि भाष्यानें स्पष्ट करितात–]= कारण अशा प्रकारच्या प्राणाडिक–परंपराप्राप्त मनःप्रकृतित्वानें मन प्राणामध्यें संपन्न होऊं शकत नाहीं. [–प्राणाडिक कार्य-कारणतेचा जरी स्वीकार केला तरी जो ज्याचा साक्षात् विकार, त्यांतच त्याचा लय होणें युक्त आहे, असें '**एवं अपि०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=कारण असा प्राणाडिक कार्यकारणसंबंध जरी मानला तरी अन्नामध्यें मन संपन्न होईल व आपांमध्यें अन्न लीन होईल आणि आपांमध्येंच प्राणहि लीन होईल. [–'प्राणाच्या आकारानें परिणत झालेल्या

आपांचा मन:संस्थित अन्नाकारानें परिणाम होत असल्यामुळें प्राण व मन यांनाहि साक्षात् प्रकृति-विकृतित्व आहे' अशी आशंका घेऊन 'न हि०' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=कारण या पक्षींहि प्राणभावानें परिणत झालेल्या–विकार पावलेल्या आपांपासून मन उत्पन्न होतें, याविषयीं कांहीं प्रमाण नाहीं. [–याप्रमाणें प्राण व मन यांना साक्षात् प्रकृतिविकृतित्व नाहीं, असें सिद्ध झालें असतां 'तस्मात्०' इत्यादि भाष्यानें फलित सांगतात–]=म्हणून प्राणामध्यें मनाचा स्वरूपानें लय होत नाहीं. [–"तर मग 'मनः प्राणे' या श्रुतींतील 'मनः-'शब्दाची उपपत्ति कशी लागते?" 'वृत्त्यप्ययेऽपि०' इत्यादि भाष्यानें उत्तर–]=पण वृत्तीचा लय होतो. या पक्षींहि तो शब्द उपपन्न होतो. कारण वृत्ति व वृत्तिमान् यांचा अभेद-उपचार होतो, हें आम्हीं वर–६९५–दाखविलें आहे. ३–सु.ब्र.४९६ (२)

( ३. अध्यक्षाधिकरण. सू. ४-६. )

—ज्या प्राणामध्यें मनाचा वृत्तिलय होतो त्या प्राणाच्याहि वृत्तिलयाच्या आधाराचें निरूपण 'सोऽध्यक्षे०' इत्यादि सूत्रानें करितात—

**सूत्रं—सोऽध्यक्षे तदुपगमादिभ्यः ॥ ४**

**सूत्रार्थ**—तो प्राण अध्यक्षामध्यें–जीवामध्यें वृत्तिरहित होऊन रहातो. कशावरून? प्राणाचें जीवापाशीं गमन, त्याच्या मागून गमन व त्यांतच अवस्थित होणें, अशा तीन कारणांवरून. ४. सु. ब्र. ४९७.–[–पुढें सांगितल्या जाणाऱ्या पूर्वपक्षाच्या उपयोगित्वानें 'स्थितं०' इत्यादि भाष्यानें गतार्थाचें संकीर्तन–]

**भाष्यं—स्थितमेतद्यस्य यतो नोत्पत्तिस्तस्य तस्मिन्वृत्तिलयो न स्वरूपप्रलय इति । इदमिदानीं 'प्राणस्तेजसि' इत्यत्र चिंत्यते– किं यथाश्रुति प्राणस्य तेजस्येव वृत्त्युपसंहारः । किंवा देहेंद्रियपंजराध्यक्षे जीव इति । तत्र श्रुतेरनतिशंक्यत्वात्प्राणस्य तेजस्येव संपत्तिः स्यादश्रुतकल्पनाया अन्याय्यत्वादिति ॥**

**भाष्यार्थ**—ज्याची ज्याच्यापासून उत्पत्ति होत नाहीं, त्याचा त्यांत वृत्तिलय होतो, स्वरूपलय होत नाहीं, असें हें वर सिद्ध झालें. [–आतां विषयकथनपूर्वक दोन प्रकारच्या श्रुतींची उपलब्धि होत असल्यामुळें संशय सांगतात–]= 'इदं इदानीं०'–आतां 'प्राणस्तेजसि' या श्रुतीविषयीं हा असा विचार केला जातो– 'काय, जशी श्रुति आहे त्याप्रमाणें प्राणाचा तेजामध्येंच वृत्त्युपसंहार होतो कीं देहेंद्रियपंजराचा अध्यक्ष जो जीव त्यांत त्याच्या वृत्तीचा उपसंहार होतो?' असा विचार केला जातो. [–या अधिकरणाच्या पादादिसंगति पूर्वीप्रमाणेंच जाणाव्या. फलभेदाहि पूर्वीप्रमाणेंच स्वीकारून 'तत्र०' इत्यादि भाष्यानें पूर्वपक्ष–]=असा विचार

प्राप्त झाला असतां श्रुतीला अनतिशंकनीयत्व असल्यामुळें–श्रुतीविषयीं अतिशंका घेणें उचित नसल्यामुळें प्राणाची तेजामध्येंच संपत्ति–लय होईल. कारण अश्रुत कल्पनेला अन्याय्यत्व आहे, असें प्राप्त होतें. [ प्राणाला तेजःप्रकृतिकत्व जरी नसलें तरी तेजामध्यें त्याच्या वृत्तीचा लय होतो, अशी पूर्वोक्त न्यायानें शंका येणें शक्य असल्यामुळें व भूतविशेषाचा वाचक असा जो 'तेजः-'शब्द त्याची जीव या अर्थी प्रसिद्धि नसल्यामुळें प्राणाचें जीवात्म्यामध्यें उपगमन, अनुगमन व अवस्थान सांगणाऱ्या श्रुतींची–तेजोद्वाराहि जीवामध्यें उपगमनादिकांच्या संभवामुळें –उपपत्ति लागत असल्याकारणानें तेजामध्येंच प्राणवृत्तीचा लय होतो, असा भावार्थ. –'**एवं०**' इत्यादि भाष्यानें सिद्धान्तसूत्राचें ग्रहण करून त्याची योजना करितात–]

**भाष्यं—एवं प्राप्ते प्रतिपद्यते–सोऽध्यक्ष इति । स प्रकृतः प्राणोऽध्यक्षेऽविद्याकर्मपूर्वप्रज्ञोपाधिके विज्ञानात्मन्यवतिष्ठते । तत्प्रधाना प्राणवृत्तिर्भवतीत्यर्थः। कुतः । तदुपगमादिभ्यः । 'एवमेवेममात्मानमंतकाले सर्वे प्राणा अभिसमायन्ति यत्रैतदूर्ध्वोच्छ्वासी भवति' इति हि श्रुत्यंतरमध्यक्षोपगामिनः सर्वान्प्राणानविशेषेण दर्शयति ॥**

**भाष्यार्थ**—असा पूर्वपक्ष प्राप्त झाला असतां 'सोऽध्यक्षे' असा सिद्धान्त स्वीकारला जातो. तो प्रकृत प्राण अध्यक्षामध्यें [–'**अविद्या०**' इत्यादि भाष्यानें परिशुद्ध चिद्धातूची व्यावृत्ति करितात–]=अविद्या, कर्म, पूर्वप्रज्ञा ही ज्याची उपाधि आहे अशा विज्ञानात्म्यामध्यें अवस्थित होतो. [–'**तत्प्रधाना०**' इत्यादि भाष्यानें पूर्वोक्त न्यायानें स्वरूपलयाचा व्यवच्छेद–व्यावृत्ति करितात–]=प्राणवृत्ति अध्यक्षप्रधान होते, असा याचा भावार्थ. [–'**कुतः०**' इत्यादि भाष्यानें प्रश्नपूर्वक हेतूला अवतरण देतात–]=कोणत्या कारणामुळें ? तदुपगमादिकांमुळें. [–'**एवमेव०**' इत्यादि भाष्यानें त्यांतील उपगमन श्रुतितः व्यक्त करितात–]="ज्याप्रमाणें राजाच्या केवल प्रयाणाभिप्रायानेंच त्याचे सर्व भृत्य राजाच्या अभिमुख होऊन त्याच्या समीप येतात, त्याप्रमाणें ज्यावेळीं हा आत्मा ऊर्ध्वोच्छ्वासी होतो, त्या अंतकालीं सर्व प्राण आत्म्याच्या अभिमुख होऊन त्याच्यापाशीं येतात"–बृ. ४. ३. ३८. सु. उ. ६८७.–असें हें श्रुत्यन्तर अध्यक्षाच्या समीप गमन–उपगमन करणाऱ्या सर्व प्राणांचें अविशेषानें प्रदर्शन करितें–हें श्रुत्यन्तर अध्यक्षोपगामी सर्व प्राण अविशेषानें दाखवितें. [–आदिशब्दानें ग्रहण केलेलें अनुगमन '**विशेषेण०**' या भाष्यानें श्रुतीनें विशद करितात–]

**भाष्यं—विशेषेण च ' तमुत्क्रामन्तं प्राणोऽनूत्क्रामति ' इति पंचवृत्तेः प्राणस्याध्यक्षानुगामितां दर्शयति । तदनुवृत्तितां चेतरेषां ' प्राणमनूत्क्रामन्तं सर्वे प्राणा अनूत्क्रामन्ति ' इति । ' सविज्ञानो भवति ' इति चाध्यक्षस्य अंतर्विज्ञानवत्त्वप्रदर्शनेन तस्मिन्नपीतकरणग्रामस्य प्राणस्यावस्थानं गमयति ॥**

**भाष्यार्थ**—आणि श्रुति विशेषानें ' उत्क्रमण करणाऱ्या त्याच्या मागून प्राण उत्क्रमण करितो '-बृ. ४. ४. २.-असें पंचवृत्ति प्राणाचें अध्यक्षानुगामित्व दाखविते आणि ' प्राण जीवाच्या मागून उत्क्रमण करूं लागला असतां त्याच्या मागून सर्व प्राण उत्क्रमण करितात ' अशी इतर प्राणांची प्राणानुवृत्तिता दाखविते. [—सूत्रांतील ' आदि-'शब्दानें ग्रहण केलेल्या अवस्थानाचेंहि '**सविज्ञान०**' इत्यादि श्रुतीनें व्याख्यान करितात-]=आणि " तो सविज्ञान होतो " असें अध्यक्षाच्या अंतर्विज्ञानवत्त्वाचें प्रदर्शन करून, ज्यामध्यें इंद्रियसमूह लीन झाला आहे अशा प्राणाचें त्या अध्यक्षांतील अवस्थान श्रुति सुचविते. [ ज्याच्या योगानें जाणलें जातें तें विज्ञान म्ह० इंद्रियजात, पंचवृत्ति प्राणासहवर्तमान असलेल्या त्या इंद्रियजातानें युक्त होऊन तो राहतो, असा भावार्थ.-पण वादी '**ननु०**' इत्यादि भाष्यानें अव्यवधानानें-साक्षात् तेजःप्राप्तिश्रुतीशीं याच्या विरोधाची शंका घेतो-]

**भाष्यं—ननु ' प्राणस्तेजसि ' इति श्रूयते । कथं प्राणोऽध्यक्षे इत्यधिकावापः क्रियते । नैष दोषः । अध्यक्षप्रधानत्वादुत्क्रमणादिव्यवहारस्य । श्रुत्यंतरगतस्यापि च विशेषस्यापेक्षणीयत्वात् ॥ ४ ॥ कथं तर्हि ' प्राणस्तेजसि ' इति श्रुतिरित्यत आह—**

**भाष्यार्थ**—"अहोपण, प्राण तेजामध्यें लीन होतो असें श्रुत आहे, तेव्हां ' प्राण अध्यक्षामध्यें लीन होतो ' असें अधिक तत्त्वाचें ग्रहण कसें केलें जात आहे ?" [ ' त्या दोन्ही श्रुतींच्या अनुग्रहासाठीं अगोदर प्राण जीवांत लीन होतो आणि मग त्या जीवासह प्राणाचा तेजामध्यें लय होईल ' असें ' **नैष दोषः०** ' इत्यादि भाष्यानें सांगतात—]=अधिकग्रहणाचा हा दोष येत नाहीं. कारण उत्क्रमणादि-व्यवहाराला अध्यक्षप्रधानत्व आहे व श्रुत्यन्तरगत विशेषालाहि अपेक्षणीयत्व आहे. ४. [—' **कथं०** ' इत्यादि भाष्यानें आकांक्षापूर्वक पुढील सूत्राला उत्थापित करितात—]=तर मग " प्राण तेजामध्यें लीन होतो " ही श्रुति कशी आहे ? असें आक्षेपक विचारील म्हणून सूत्रकार '**भूतेषु तच्छ्रुतेः**' असें म्हणतात—

**सूत्रं—भूतेषु तच्छ्रुतेः ॥ ५**

**सूत्रार्थ—**" प्राणस्तेजसि " अशी श्रुति असल्यामुळें ' भूतांमध्यें '–तेजासह उत्तरदेहारंभक पंचभूतांमध्यें उपहितत्वानें विद्यमान असलेल्या जीवांत प्राणाच्या वृत्तींचा लय होतो. ९.–सु. ब्र. ४९७–[–प्राणाची जीवद्वारा तेजःसंपत्ति होते, असें ' सः० ' इत्यादि भाष्यानें सूत्रयोजनेनें दाखवितात–]

**भाष्यं—स प्राणसंपृक्तोऽध्यक्षः तेजःसहचरितेषु भूतेषु देहबीजभूतेषु सूक्ष्मेष्ववतिष्ठत इत्यवगंतव्यम् । प्राणस्तेजसीति श्रुतेः । ननु चेयं श्रुतिः प्राणस्य तेजसि स्थितिं दर्शयति । न प्राणसंपृक्तस्याध्यक्षस्य । नैष दोषः । सोऽध्यक्षे इत्यध्यक्षस्याप्यंतरालेऽप्युपसंख्यातत्वात् ॥**

**भाष्यार्थ**—तो प्राणानें संयुक्त झालेला अध्यक्ष [–प्राणाची तेजाच्या द्वारा जीवसंपत्ति होत नाहीं. कारण तेजाची संपत्ति भूतद्वयाच्या द्वारा परमात्म्यामध्येंच इष्ट आहे. तेजोग्रहणानें उपलक्षित होणाऱ्या भूतांमध्यें प्राणासह जीवाचा लय होईल, अशा अभिप्रायानें ' **तेजःसहचरितेषु०** ' इत्यादि म्हणतात–]=तेजःसहचरित, देहबीजभूत, सूक्ष्मभूतांमध्यें अवस्थित होतो, असें जाणावें. कारण 'प्राण तेजामध्यें लीन होतो ' अशी श्रुति आहे. [–"अहोपण, तेजःशब्दानें भूतें उपलक्षित होऊं शकतात. कारण त्यांचें साहचर्य आहे, पण त्या शब्दानें जीव उपलक्षित होऊं शकत नाहीं. कारण त्यांचें साहचर्य नाहीं, म्हणून प्राणाचा जीवामध्यें लय होत नाहीं, " अशी ' ननु० ' इत्यादि भाष्यानें शंका–]="अहोपण, ही श्रुति प्राणाची तेजामध्यें स्थिति दाखविते. प्राणसंयुक्त अध्यक्षाची तेजांतील स्थिति दाखवीत नाहीं." [–प्रमाणान्तरांच्या आलोचनानें जीवाचा उपसंग्रह केला जातो, ' तेजः-'शब्दानें त्याचें ग्रहण केलें जात नाहीं, असा ' **नैष दोषः०** ' इत्यादि भाष्यानें परिहार–]=हा दोष येत नाहीं. कारण तो ' अध्यक्षामध्यें लीन होतो ' अशी प्राण व तेज यांच्यामध्यें अध्यक्षाचीहि परिगणना केलेली आहे. त्यामुळें हा दोष येत नाहीं. [–जेव्हां प्राण, मध्यें जीवाला प्राप्त होऊन पुनः तेजःसंपन्न होतो तेव्हांहि 'प्राणस्तेजसि' ही श्रुति उपपन्न होते, असें ' **योऽपि हि०** ' इत्यादि भाष्यानें दृष्टान्तानें सांगतात–]

**भाष्यं—योऽपि हि स्रुघ्नान्मथुरां गत्वा मथुरायाः पाटलिपुत्रं व्रजति । सोऽपि स्रुघ्नात्पाटलिपुत्रं यातीति शक्यते वदितुम् । तस्मात्प्राणस्तेजसीति प्राणसंपृक्तस्याध्यक्षस्यैव एतत्तेजःसहचरितेषु भूतेष्ववस्थानम् ॥५॥ कथं तेजःसहचरितेषु भूतेष्वित्युच्यते । यावतैकमेव तेजः श्रूयते'प्राणस्तेजसि'इति । अत आह–**

**भाष्यार्थ**—कारण जो स्रुघ्नापासून मथुरेला जाऊन मथुरेपासून पाटलिपुत्राला जातो तोहि स्रुघ्नापासून पाटलिपुत्राला जातो, असें म्हणतां येणें शक्य आहे. [–'**तस्मात्०**' इत्यादि भाष्यानें उक्त सूत्रार्थाचा उपसंहार–]=म्हणून '**प्राणस्तेजसि**' असें हें प्राणसंयुक्त अध्यक्षाचेंच तेजःसहचरित भूतांमध्यें अवस्थान आहे. ५. [–' **कथं०** ' इत्यादि भाष्यानें सूत्रान्तराला अवतरण देण्यासाठीं प्रश्न करितात–] =तेजःसहचरित–तेजाबरोबर साहचर्यानें रहाणाऱ्या भूतांमध्यें, असें कसें म्हणतां? कारण ' प्राणस्तेजसि ' असें एकच तेज श्रुत आहे. [ लक्षणेनें भूतान्तरांचा आश्रय करणें अयुक्त आहे, कारण तसें करण्यास कोणत्याहि प्रकारची युक्ति नाहीं, असा याचा भावार्थ.–' **अतः०** ' इत्यादि भाष्यानें युक्तिपर सूत्राला अवतरण देतात–]=म्हणून सूत्रकार ' **नैकस्मिन्०** ' इत्यादि म्हणतात–

**सूत्रं--नैकस्मिन्दर्शयतो हि ॥ ६ ॥ ( ३ )**

**सूत्रार्थ**—उत्क्रांतिसमयीं जीव एकाच तेजामध्यें अवस्थित होत नाहीं. कारण पुढील देह पांचभौतिक असल्यामुळें त्याचें अवस्थान पंचभूतांतच होणें युक्त आहे. कारण ' रंहति-'अधिकरणांत–पृ. १.–सांगितलेला प्रश्न व त्याचें उत्तर हाच अर्थ दाखवितात, हें प्रसिद्ध आहे. ६. ( ३ )–सु. ब्र. ४५८. [–' **नैक-स्मिन्०** ' इत्यादि भाष्यानें सूत्रांतील प्रतिज्ञेचा विभाग करितात–]

**भाष्यं---नैकस्मिन्नेव तेजसि शरीरान्तरप्रेप्सावेलायां जीवोऽवतिष्ठते। कार्यस्य शरीरस्यानेकात्मकत्वदर्शनात्। दर्शयतश्चैतमर्थं प्रश्नप्रतिवचने ' आपः पुरुष-वचसः ' इति। तद्व्याख्यातम् ' त्र्यात्मकत्वात्तु भूयस्त्वात् ' इत्यत्र ॥**

**भाष्यार्थ**—शरीरान्तराच्या प्राप्तीची इच्छा करण्याच्या वेळीं–जीव विद्यमान शरीर सोडून दुसरें अपूर्व शरीर धारण करण्याची जेव्हां इच्छा करितो तेव्हां तो एकाच तेजामध्यें अवस्थित होत नाहीं. [–स्थूलदेह पंचभूतात्मक आहे हें प्रत्यक्ष सिद्ध असल्यामुळें त्याचें कारण सूक्ष्मशरीरहि पंचात्मक आहे, असेंच अनु-मान करणें उचित आहे, अशी उक्त अर्थी युक्ति सांगतात–]='**कार्यस्य०**'–कारण कार्य जें शरीर त्याचें अनेकात्मकत्व दृष्ट आहे. [–सूक्ष्मशरीराच्या पंचभूतात्मकत्वा-विषयीं प्रमाण सांगणारे भाष्यकार ' **दर्शयतश्च०** ' इत्यादि भाष्यानें सूत्रावय-वाचें व्याख्यान करितात–]=' आप पुरुषवचस कशा होतात ? ' आणि ' या-प्रमाणें पांचवी आहुति दिली असतां आप पुरुषवचस--पुरुष या शब्दास पात्र –पुरुषाकार होतात '–पृ.७–अशा अर्थाचा प्रश्न व त्याचें प्रतिवचन हाच अर्थ दाखवितात. [–" अहोपण, देहान्तरप्राप्तीच्या वेळीं जीवाचें आपांनींच परिवेष्टि-

तत्त्व प्रश्न-प्रतिवचनांवरून अवगत होतें. भूतसूक्ष्मपंचकपरिवेष्टितत्व अवगत होत नाहीं " ' तद्व्याख्यातं० ' इत्यादि भाष्यानें उत्तर–]=' त्र्यात्मकत्वात्तु० ' –"आपाला त्र्यात्मकत्व–भूतत्रयरूपत्व आहे, पण शरीरांत आपांचें आधिक्य असल्यामुळें श्रुतींत 'आप्-'शब्दच योजिला आहे"–प्र. १०–अशा या सूत्रांत त्याचें व्याख्यान केलें आहे. [–' दर्शयतः '–याच सूत्रावयवाचें ' श्रुतिस्मृती० ' इत्यादि भाष्यानें अर्थान्तर सांगतात–]

**भाष्यं**––श्रुतिस्मृती चैतमर्थं दर्शयतः । श्रुतिः ' पृथ्वीमय आपोमयो वायुमय आकाशमयस्तेजोमयः ' इत्याद्या । स्मृतिरपि " अण्व्यो मात्राऽविनाशिन्यो दशार्धानां तु याः स्मृताः । ताभिः सार्धमिदं सर्वं संभवत्यनुपूर्वशः " इत्याद्या । ननु चोपसंहृतेषु वागादिषु करणेषु शरीरान्तरप्रेप्सावेलायां ' क्वायं तदा पुरुषो भवति ' इत्युपक्रम्य श्रुत्यंतरं कर्माश्रयतां निरूपयति–' तौ ह यदूचतुः कर्म हैव तदूचतुरथ ह यत्प्रशशंसतुः कर्म हैव तत्प्रशशंसतुः ' इति॥

**भाष्यार्थ**—आणि श्रुति व स्मृति हाच अर्थ दाखवितात. "पृथिवीमय, आपोमय, वायुमय, आकाशमय, तेजोमय," इत्यादि श्रुति व " पांच भूतांच्या ज्या अणु, मोक्ष होईपर्यंत अविनाशी, परिच्छेद करितात म्हणून मात्रा, त्यांसह हें सर्व अनुक्रमानें उत्पन्न होतें "–मनु १. २१.–इत्यादि स्मृतिहि हाच अर्थ दाखवितात. [–"अहोपण, जीवाचें भूताश्रयत्व श्रुत्यन्तरविरुद्ध आहे" अशी ' ननु० ' इत्यादि भाष्यानें शंका–]="अहोपण, वागादि इंद्रियांचा उपसंहार झाला असतां शरीरान्तरग्रहणसमयीं श्रुत्यंतर ' त्या वेळीं हा पुरुष कोठें असतो '–बृ. ३.२.१३.– असा उपक्रम करून 'ते दोघे–याज्ञवल्क्य व आर्तभाग जें बोलले तें कर्मच बोलले. त्यांनीं ज्याची प्रशंसा केली ती कर्माचीच केली' असें त्याच्या कर्माश्रयतेचें निरूपण करितें!" [– जीवाधारभूत कर्मांचें बंधप्रयोजकत्वानें आश्रयत्व व भूतांचें देहोपादानत्वानें आश्रयत्व, असा अविरोध ' अत्र० ' इत्यादि भाष्यानें सांगतात–]

**भाष्यं**—अत्रोच्यते —तत्र कर्मप्रयुक्तस्य ग्रहातिग्रहसंज्ञकस्येंद्रियविषयात्मकस्य बंधनस्य प्रवृत्तिरिति कर्माश्रयतोक्ता । इह पुनर्भूतोपादानाद्देहान्तरोत्पत्तिरिति भूताश्रयत्वमुक्तम् । प्रशंसाशब्दादपि तत्र प्राधान्यमात्रं कर्मणः प्रदर्शितं न त्वाश्रयान्तरं निवारितम् । तस्मादविरोधः ॥ ६ ॥ ( ३ )

**भाष्यार्थ**—या शंकेचें समाधान सांगितलें जातें–त्या श्रुत्यंतरांत कर्मप्रेरित ग्रहातिग्रहसंज्ञक इंद्रियविषयात्मक बंधनाची प्रवृत्ति होते, म्हणून कर्माश्रयता सांगितली आहे. पण येथें भूतोपादानापासून देहान्तराची उत्पत्ति होते, म्हणून

भूताश्रयत्व सांगितलें आहे. [-" अहोपण, श्रुत्यन्तरांतील 'कर्म हैव' या अवधारणश्रुतीनें जीवाच्या आश्रयान्तराचें निवारण केलें आहे" अशी आशंका घेऊन '**प्रशंसा०**' इत्यादि भाष्यानें सांगतात-]=त्या श्रुत्यन्तरांत प्रशंसाशब्दामुळेंहि कर्माचें केवल प्राधान्य प्रदर्शित केलें आहे, पण आश्रयान्तराचें निवारण केलेलें नाहीं. [ तो प्रशंसाशब्दहि कर्माचें प्रकृष्टाश्रयत्व सांगणारा असा होत्साता निकृष्ट आश्रयान्तराचें अस्तित्व सुचवितो, असा याचा भावार्थ.-याप्रमाणें कर्में व भूतें यांच्या आश्रयत्वाचा संभव आहे, असें झालें असतां फलित सांगतात-]= '**तस्मात् अविरोधः०**'-त्यामुळें श्रुतींचा परस्पर विरोध नाहीं.६. सु.ब्र.४५८.(३)

**(४. आसृत्युपक्रमाधिकरण. सू. ७.)**

—पूर्वोक्त उत्क्रांतीचा अपरविद्यान्वय '**समाना च०**' या सूत्रानें सांगतात—

## सूत्रं—समाना चासृत्युपक्रमादमृतत्वं चानुपोष्य ॥ ७ ॥ (४)

**सूत्रार्थ**—देवयानमार्गाचा उपक्रम होईपर्यंत ही उत्क्रांति विद्वान् व अविद्वान् या दोघांचीहि समान आहे आणि अविद्यादि क्लेशसमूहाला न जाळितां प्राप्त होणारें जें अमृतत्व तें आपेक्षिक आहे. ७. (४)-सु.ब्र. ४५९. [-'उत्क्रांति' हा या अधिकरणाचा विषय आहे. त्याविषयीं "विद्येनें अमृतत्वाचा अनुभव घेतो" अशी व "हे सोम्य ! उत्क्रमण करणाऱ्या या पुरुषाची वाक् मनामध्यें लीन होते" अशी श्रुति असल्यामुळें '**सेयम्०**' इत्यादि भाष्यानें संशय सांगतात-]

**भाष्यं—सेयमुत्क्रान्तिः किं विद्वदविदुषोः समाना किंवा विशेषवतीति विशयानानां विशेषवतीति तावत्प्राप्तम्। भूताश्रयविशिष्टा ह्येषा। पुनर्भवाय च भूतान्याश्रीयन्ते। न च विदुषः पुनर्भवः संभवति। 'अमृतत्वं हि विद्वानश्नुते' इति स्थितिः। तस्मादविदुष एवैषोत्क्रान्तिः॥**

**भाष्यार्थ**—ती ही उत्क्रांति विद्वान् व अविद्वान् या दोघांची समान आहे कीं ती विशेषवती-कांहीं विशेषानें युक्त आहे ? असा संदेह करणारांच्या मतीं ती विशेषवती आहे असा पूर्वपक्ष प्राप्त होतो. [ येथें श्रौत अपरविद्यांमध्यें फलप्राप्तीच्या उपयोगित्वानें उत्क्रांतीचा संबंध सांगितलेला असल्यामुळें याच्या पादादिसंगति आहेत. पूर्वपक्षांत 'देहापासून उत्क्रमण न केलेल्या विद्वानाची मोक्षसिद्धि' व सिद्धान्तांत 'अविद्वानाप्रमाणें त्या विद्वानाचीहि शरीरापासून उत्क्रांति होत असल्यामुळें अप्रतिबंधानें मोक्षसिद्धि' असा फलभेद स्वीकारून 'विद्येनें अमृतत्वास प्राप्त होतो' असा सगुणोपासकांच्याहि अमृतत्वफलाचा बोध होत असल्यामुळें सगुण ब्रह्मज्ञाची उत्क्रांति होतच नाहीं, असा पूर्वपक्ष '**विशेषवती०**' इत्यादि

भाष्यानें सांगितला आहे.–वादी 'अविद्वानाचीच उत्क्रांति' असें विशेषत्वच 'भूता-श्रयत्वं०' इत्यादि भाष्यानें दाखवितो–]=कारण ही उत्क्रांति भूताश्रयविशिष्ट आहे आणि पुनर्जन्मासाठीं भूतांचा आश्रय केला जातो. विद्वानाचा पुनर्जन्म संभवत नाहीं. कारण विद्वान् अमृतत्वाचा अनुभव घेतो, अशी स्थिति–शास्त्र-मर्यादा आहे. म्हणून अविद्वानाचीच ही उत्क्रांति आहे. [–'ननु०' इत्यादि भाष्यानें या पूर्वपक्षावर आक्षेप घेतात–]

**भाष्यं—ननु विद्याप्रकरणे समाम्नानाद्विदुष एवैषा भवेत् । न । स्वापादिवद्यथाप्राप्तानुकीर्तनात् । यथा हि ' यत्रैतत्पुरुषः स्वपिति नाम ' ' अशिशिषति नाम ' ' पिपासति नाम ' इति च सर्वप्राणिसाधारणा एव स्वापादयोऽनुकीर्त्यन्ते विद्याप्रकरणेऽपि प्रतिपिपादयिषितवस्तुप्रतिपादनानुगुण्येन । न तु विदुषो विशेषतो विधित्स्यन्ते ॥**

**भाष्यार्थ—**" अहोपण, विद्याप्रकरणांत कथन केलेलें असल्यामुळें विद्वानाचीच ही उत्क्रांति आहे. " [–पण येथें वस्तुतत्त्वप्रतिपादनार्थ लोकसिद्ध धर्मांचा अनुवाद केला जात असल्यामुळें हें प्रकरण विद्वद्विषय नाहीं, असें 'न०' इत्यादि भाष्यानें वादी समाधान सांगतो–]=नाहीं, ही उत्क्रांति विद्वानाचीच् नाहीं, कारण स्वापादिकांप्रमाणें येथें यथाप्राप्ताचेंच अनुकीर्तन केलें आहे. [–'यथा हि०' इत्यादि भाष्यानें दृष्टान्ताचें विवरण–]=कारण ज्याप्रमाणें " ज्यावेळीं हा पुरुष झोंप घेतो, भक्षण करण्याची इच्छा करितो, जलप्राशनाची इच्छा करितो " –छां. ६. ८.–असे सर्वप्राणिसाधारणच असलेले स्वापादिक भाव विद्याप्रकरणामध्येंहि प्रतिपादन करण्यास इष्ट असलेल्या वस्तूच्या प्रतिपादनानुकूल्यानें सांगितले जातात. पण ते विद्वानासाठीं विशेषतः विधित्सित–विधान करण्यास अभीष्ट नसतात, [–'एवं०' इत्यादि भाष्यानें दार्ष्टांतिकाचें विवरण–]

**भाष्यं—एवं इयमप्युत्क्रान्तिः महाजनगतैवानुकीर्त्यते यस्यां परस्यां देवतायां पुरुषस्य प्रयतस्तेजः संपद्यते स आत्मा तत्त्वमसीत्येतत्प्रतिपादयितुम् । प्रतिषिद्धा चैषा विदुषः ' न तस्य प्राणा उत्क्रामन्ति ' इति । तस्मादविदुष एवैषेति ॥**

**भाष्यार्थ—**त्याचप्रमाणें 'ज्या परा देवतेमध्यें प्रयाण करणाऱ्या पुरुषाचें तेज लीन होतें, तो आत्मा, तें तूं आहेस' असें हें प्रतिपादन करण्यासाठीं ही उत्क्रांतिहि महाजनगतच सांगितली जाते, त्या महाजनगत उत्क्रांतीचेंच प्रतिपादन केलें जातें. [–उत्क्रांतीला विद्वद्विषयत्व नाहीं, याविषयीं 'प्रतिषिद्धा च०' इत्यादि भाष्यानें वादी हेत्वंतर सांगतो–]=आणि " त्याचे प्राण उत्क्रमण करीत नाहींत "

–बृ. ४.४.६–अशी विद्वानाची ही उत्क्रांति प्रतिषिद्ध आहे. [–याप्रमाणें सांगितलेल्या उत्क्रांतीच्या विशेषत्वाचा ‘ तस्मात्० ’ इत्यादि भाष्यानें उपसंहार–] =म्हणून ही उत्क्रांति अविद्वानाचीच आहे, असें प्राप्त होतें. [–मार्गाचा उपक्रम होण्यापूर्वी कर्मी व सगुण उपासक यांची उत्क्रांति एकसारखीच असते, असा ‘ एवं० ’ इत्यादि भाष्यानें सिद्धान्त सांगतात–]

**भाष्यं—एवं प्राप्ते ब्रूमः—समाना चैषोत्क्रान्तिर्वाङ्मनसीत्याद्या विद्वदविदुषोरासृत्युपक्रमाद्भवितुमर्हति । अविशेषश्रवणात् । अविद्वान्देहबीजभूतानि भूतसूक्ष्माण्याश्रित्य कर्मप्रयुक्तो देहग्रहणमनुभवन् संसरति । विद्वांस्तु ज्ञानप्रकाशितं मोक्षनाडीद्वारमाश्रयते । तदेतदासृत्युपक्रमादित्युक्तम् ॥**

**भाष्यार्थ**—असा पूर्वपक्ष प्राप्त झाला असतां आम्ही सिद्धान्त सांगतों–‘वाङ्मनसि ’–वाक् मनामध्यें लीन होते, इत्यादि ही विद्वान् व अविद्वान् या दोघांचीहि उत्क्रांति दक्षिण किंवा उत्तर मार्गाच्या आरंभापर्यंत ‘समान ’–एकसारखीच असणें युक्त आहे. कारण श्रुतीमध्यें तिचें अविशेष श्रवण आहे. [–‘ अस्य सोम्य० ’ इत्यादि अविशेष श्रुतीमुळें विद्वान् व अविद्वान् यांची उत्क्रांति जर साधारण असेल तर त्या दोघांमध्यें कांहींच विशेष नसल्यामुळें विद्येला व्यर्थत्व प्राप्त होईल ! ‘ अविद्वान्० ’ इत्यादि भाष्यानें समाधान -]=अविद्वान् देहबीजभूत भूतसूक्ष्मांचा आश्रय करून कर्मांनीं प्रेरित होत्साता देहग्रहणाचा अनुभव घेत संसार करितो. पण विद्वान् ज्ञानानें प्रकाशित केलेल्या मोक्षनाडीद्वाराचा आश्रय करितो. [ अविद्वान् अधोमुख नाड्यांच्या द्वारा आपल्या कर्मानुसार पितृलोकाला किंवा लोकांतराला प्राप्त होतो. पण विद्वान् मूर्धन्य नाडीनें ब्रह्मलोकास जातो, असा त्या दोघांमध्यें विशेष आहे, असा याचा भावार्थ.–सृति म्हणजे सरण–देवयान मार्ग, त्याचा आरंभ होईपर्यंत उत्क्रांति समान आहे, या उक्त अर्थी ‘ तदेतत्० ’ इत्यादि भाष्यानें सूत्रावयव प्रवृत्त करितात–]=तेंच हें सूत्रांतील ‘ आसृत्युपक्रमात् ’ या सूत्रावयवानें सांगितलें आहे. [–‘ ननु० ’ इत्यादि भाष्यानें अवशिष्ट सूत्रावयवानें निरसनीय असलेली शंका सांगतात–]

**भाष्यं—नन्वमृतत्वं हि विदुषा प्राप्तव्यं न च तद्देशान्तरायत्तं तत्र कुतो भूताश्रयत्वं सृत्युपक्रमो वेति । अत्रोच्यते—अनुपोष्य चेदम् । अदग्ध्वाऽत्यंतमविद्यादीन्क्लेशानपरविद्यासामर्थ्यादापेक्षिकममृतत्वं प्रेप्सते संभवति तत्र सृत्युपक्रमो भूताश्रयत्वं च । न हि निराश्रयाणां प्राणानां गतिरुपपद्यते । तस्माददोषः॥७**

**भाष्यार्थ**—" अहोपण, विद्वानाकडून अमृतत्व प्राप्तव्य आहे, म्हणजे त्याला **अमृतत्व प्राप्त करून** घ्यावयाचें आहे, पण तें देशांतराधीन नाहीं. तेव्हां भूताश्रयत्व किंवा सृत्युपक्रम कोणत्या कारणानें सांगितला जात आहे?"[–'**अत्र०**' इत्यादि भाष्यानें '**अमृतत्वं च अनुपोष्य**' या सूत्रावयवाला शंकेच्या उत्तरत्वानें अवतरण देऊन त्याचें व्याख्यान करितात–]=याचें उत्तर सांगितलें जातें–आणि उपासक अविद्यादि क्लेशांना '**अनुपोष्य**'–अत्यंत दग्ध न करून अपरविद्येच्या सामर्थ्यामुळें आपेक्षिक **अमृतत्व प्राप्त करून** घेण्याची इच्छा करितो. त्या अवस्थेंत सृतीचा उपक्रम व भूताश्रयत्व संभवतें.[–'मनानें या कामांना पहात रममाण होतो,' 'तो एकधा होतो'–छां.७.२६.२–इत्यादि श्रुति असल्यामुळें अर्चिरादि-मार्गगमनानें सेंद्रिय उपासकाच्या फलभोगाचें प्रतिपादन केलें आहे, आणि आश्रयरहित इंद्रियांचें गमन संभवत नाहीं, म्हणून इंद्रियाश्रय भूतांचा आश्रय केलेल्या जीवाचीहि गति अवगत होते, असें '**न हि०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=कारण आश्रयरहित प्राणांची गति उपपन्न होत नाहीं. [–अपर विद्यांतील अमृतत्व आपेक्षिक आहे, असें सिद्ध झालें असतां त्यांत उत्क्रांतीचा अन्वय होणें युक्त आहे, असा '**तस्मात्०**' इत्यादि भाष्यानें उपसंहार–]=त्यामुळें हा सिद्धान्त निर्दोष आहे. ७.–सु. ब्र. ४६० (४)

( ५. **संसारव्यपदेशाधिकरण. सू.** ८-१०. )

—वर सांगितलेल्या उत्क्रांतिसमयीं जी सत्संपत्ति होते तिचें स्वरूप '**तदापितेः०**' या सूत्रानें निरूपितात—

## सूत्रं—तदाऽपीतेः संसारव्यपदेशात् ॥ ८

**सूत्रार्थ**—'तत्'–हें वर सांगितलेलें साध्यक्ष भूतान्तरसहित तेज '**आ अपितेः**' –मोक्षापर्यंत अवस्थित होतें. कारण 'योनिमन्ये०' इत्यादि वाक्यानें संसाराचा निर्देश केला आहे.८–सु.ब्र.४६१. [–'तेजः०' इत्यादि भाष्यानें उदाहरणवाक्याचा अर्थ सांगून अधिकरणाचा विषय दाखवितात–]

**भाष्यं—'तेजः परस्यां देवतायाम्' इत्यत्र प्रकरणसामर्थ्यात्तद्यथाप्रकृतं तेजः साध्यक्षं सप्राणं सकरणग्रामं भूतान्तरसहितं प्रयतः पुंसः परस्यां देवतायां संपद्यत इत्येतदुक्तं भवति । कीदृशी पुनरियं संपत्तिः स्यादिति चिंत्यते । तत्रात्यंतिक एव तावत्स्वरूपप्रविलय इति प्राप्तम् । तत्प्रकृतित्वोपपत्तेः । सर्वस्य हि जनिमतो वस्तुजातस्य प्रकृतिः परा देवतेति प्रतिष्ठापितम् । तस्मादात्यंतिकीयमविभागापत्तिरिति ॥**

**भाष्यार्थ**—'तेज परा देवतेमध्यें'–६९१–अशा या वाक्यांत प्रकरणसामर्थ्यामुळें अध्यक्षासह, प्राणासह, इंद्रियसमूहासह, भूतान्तरांसह, प्रयाण करणाऱ्या पुरुषाचें तें यथाप्रकृत तेज परादेवतेमध्यें लीन होतें, हें सांगितलें आहे, असें होतें. [–जिच्यामध्यें बीजभाव अवशिष्ट राहिला आहे अशी सत्संपत्ति सिद्धवत् मानून–गृहीत धरून विद्वानाचीहि उत्क्रांति सांगितली. आतां संपत्तीची दोन्हीप्रकारें उपलब्धि होत असल्यामुळें सत्संपत्ति आत्यंतिकी–नित्य आहे कीं अनात्यंतिकी–अनित्य आहे, असा '**कीदृशी**०' इत्यादि भाष्यानें संशय–]=पण ही संपत्ति कशाप्रकारची असेल बरें, याचा विचार केला जातो.[–येथें श्रुत असलेल्या उत्क्रांतिकालीन सत्संपत्तीचें सावशेषत्व सिद्ध केलेलें असल्यामुळें याच्या पादादिसंगति आहेत. पूर्वपक्षांत 'देहापासून उत्क्रमण केलेल्याची अपुनरावृत्ति' व सिद्धान्तांत 'देहापासून उत्क्रण केलेल्याहि ज्ञानहीनाची पुनरावृत्ति' अशा विवक्षेनें '**तत्र**०' इत्यादि भाष्यानें पूर्वपक्ष–]=असा संशय प्राप्त झाला असतां अगोदर हा स्वरूपप्रविलय आत्यंतिकच आहे असा पक्ष प्राप्त झाला. [–त्याविषयीं वादी पूर्वोक्त'अतत्प्रकृतित्व-'हेतूचा–पृ. ६९४–अभाव हाच हेतु सांगतो–]='**तत्प्रकृतित्वोपपत्तेः**' –कारण त्या परा देवतेला त्या तेजाचें प्रकृतित्व संभवतें. [–'**सर्वस्य**०' इत्यादि भाष्यानें उपपत्तिच दाखवितात–]=कारण उत्पन्न होणाऱ्या सर्व वस्तुजाताची प्रकृति परा देवता आहे, असें प्रस्थापित केलें आहे. [–'ही विमत सत्संपत्ति आत्यंतिकी आहे. कारण तिला अंतकालीन सत्संपत्तित्व आहे. ब्रह्मज्ञाच्या सत्संपत्तीप्रमाणें' असा '**तस्मात्**०' इत्यादि भाष्यानें उपसंहार–]=म्हणून ही अविभागप्राप्ति आत्यंतिकी आहे. [–सिद्धान्तसूत्राचें ग्रहण करून त्याचें व्याख्यान करणारे भाष्यकार '**एवं**०' इत्यादि भाष्यानें उक्त अनुमानाचा श्रुतिविरोध सांगतात–]

**भाष्यं—एवं प्राप्ते ब्रूमः—तत्तेजआदि भूतसूक्ष्मं श्रोत्रादिकरणाश्रयभूतं आऽपीतेरा संसारमोक्षात्सम्यग्ज्ञाननिमित्तादवतिष्ठते । 'योनिमन्ये प्रपद्यन्ते शरीरत्वाय देहिनः । स्थाणुमन्येऽनुसंयन्ति यथाकर्म यथाश्रुतम्' इत्यादिसंसारव्यपदेशात् ॥**

**भाष्यार्थ**—असा पूर्वपक्ष प्राप्त झाला असतां 'तत्'–तें तेज-आदि श्रोत्रादि इंद्रियाश्रयभूत भूतसूक्ष्म 'आ अपितेः'–सम्यग्ज्ञान या निमित्तानें होणाऱ्या संसारमोक्षापर्यंत अवस्थित होतें. 'दुसरे देही शरीर धारण करण्यासाठीं यथाकर्म यथाश्रुत योनीस प्राप्त होतात व दुसरे कांहीं देही आपापल्या ज्ञानकर्मांप्रमाणें स्थावरभावास प्राप्त होतात.'–का. १.२.७.–इत्यादि संसारव्यपदेशामुळें [ मोक्षापर्यंत तें

तेज अवस्थित होतें.–उत्क्रांतिकालीन सत्संपत्तीच्या आत्यंतिकत्वपक्षीं '**अन्यथा०**' इत्यादि भाष्यानें दोषान्तर सांगतात–]

**भाष्यं—अन्यथा हि सर्वः प्रायणसमय एवोपाधिप्रत्यस्तमयादत्यंतं ब्रह्म संपद्येत। तत्र विधिशास्त्रमनर्थकं स्याद्विद्याशास्त्रं च। मिथ्याज्ञाननिमित्तश्च बंधो न सम्यग्ज्ञानादृते विस्रंसितुमर्हति। तस्मात्तत्प्रकृतित्वेऽपि सुषुप्तप्रलयवद्बीजभावावशेषैवैषा सत्संपत्तिरिति ॥ ८ ॥**

**भाष्यार्थ**—कारण मोक्षापर्यंत तें तेज अवस्थित होतें असें न मानिल्यास सर्व जीव मरणसमयींच उपाधीच्या प्रलयामुळें नित्य ब्रह्मसंपन्न होईल. [–'ती तर इष्टापत्तीच आहे,' अशी आशंका घेऊन 'देहान्तरभोगासाठीं कर्मविधीची अनुपपत्ति' हें पूर्वोक्त अनुमानाचें बाधकान्तर '**तत्र०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=आणि मरणसमयींच अत्यंत ब्रह्मप्राप्ति होत असल्यास विधिशास्त्र व्यर्थ होईल. [–'ज्ञानविधीच्या अनुपपत्तीमुळेंहि वाद्याचें पूर्वोक्त अनुमान बाधित होतें, असें मानून '**विद्याशास्त्रं च**' असें म्हणतात–]=आणि विद्याशास्त्रहि अनर्थक होईल. [–युक्तितःहि तें अनुमान बाधित होतें, असें '**मिथ्या०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=आणि मिथ्या अज्ञान याच निमित्तानें होणारा बंध सम्यग्ज्ञानावांचून निवृत्त होण्यास योग्य नाहीं. [निदानाच्या–आद्य कारणाच्या नाशावांचून निदानीचा –आद्य कार्याचा नाश आत्यंतिक होणें युक्त नाहीं, असा याचा भावार्थ.–आतां 'तत्प्रकृतित्वोपपत्तेः' असें जें वाद्यानें वर म्हटलें आहे त्याविषयीं '**तस्मात्०**' इत्यादि भाष्यानें म्हणतात–]='तस्मात्'–श्रुतार्थापत्ति व युक्ति यांच्याशीं अनुमानाचा विरोध असल्यामुळें सर्व वस्तुजाताला देवताप्रकृतित्व जरी असलें–परादेवता ही त्याची प्रकृति जरी असली तरी सुषुप्त व प्रलय–मूर्च्छा–मरण या अवस्थांप्रमाणें ही सत्संपत्ति बीजभावावशेषाच–जिच्यामध्यें बीजभावाचा अवशेष आहे, अशीच आहे, 'इति'–असें सिद्ध झालें. ८. [–'अहोपण, संसारापासून विमोक्ष होईपर्यंत पूर्वोक्त लक्षण तेजादि भूतसूक्ष्म जर अवस्थित होतें तर तें देहांतून निघून जात असतांना आम्हांला दिसत कां नाहीं? किंवा दुसऱ्या मूर्त साकार पदार्थाकडून तें प्रतिहत कां होत नाहीं?' '**सूक्ष्मं०**' इत्यादि सूत्रानें उत्तर–]

**सूत्रं— क्ष्मं प्रमाणतश्च थोपलब्धेः ॥ ९**

**सूत्रार्थ**—तें पूर्वोक्त तेज प्रमाणतः व स्वरूपतः सूक्ष्म आहे. कारण नाडीनिष्क्रमणश्रुतीवरून त्याच्या सूक्ष्मत्वाची उपलब्धि होते. ९.–सु.ब्र.४६१.[–स्वरूप-

सौक्ष्म्याच्या समुच्चयासाठीं सूत्रांतील 'च-'कार आहे, असें मानून '**तच्च०**' इत्यादि भाष्यानें सूत्राचें व्याख्यान करितात-]

**भाष्यं--तच्चेतरभूतसहितं तेजो जीवस्यास्माच्छरीरात्प्रवसत आश्रयभूतं स्वरूपतः परिमाणतश्च सूक्ष्मं भवितुमर्हति । तथाहि नाडीनिष्क्रमणश्रवणादिभ्योऽस्य सौक्ष्म्यमुपलभ्यते । तत्र तनुत्वात्संचारोपपत्तिः । स्वच्छत्वाच्च अप्रतिघातोपपत्तिः । अत एव च देहान्निर्गच्छत्पार्श्वस्थैर्नोपलभ्यते ॥ ९ ॥**

**भाष्यार्थ**—आणि तें या शरीरांतून निघून जाणाऱ्या जीवाचें आश्रयभूत इतर भूतसहित तेज स्वरूपतः व प्रमाणतः सूक्ष्म असण्यासच योग्य आहे. [-'**तथा हि०**' इत्यादि भाष्यानें सूत्रांतील 'उपलब्धेः०' या पदाचें व्याख्यान-]=कारण नाडीनिष्क्रमणश्रवणादिकांवरून या तेजाचें सौक्ष्म्य उपलब्ध होतें. [-परिमाणतः सौक्ष्म्याचा अंगीकार करण्यांत कोणता लाभ आहे, तें '**तत्र०**' इत्यादि भाष्यानें सांगतात-]=स्वरूपतः व प्रमाणतः सूक्ष्मत्वांतील प्रमाणतः सूक्ष्मत्वामुळें त्याच्या संचाराची उपपत्ति लागते-नाड्यांतील त्याचा संचार संभवतो. [-'**स्वच्छत्वात्०**' इत्यादि भाष्यानें स्वरूपतः सौक्ष्म्यांगीकारांतील लाभ सांगतात-]=आणि स्वच्छत्वामुळें त्याच्या अप्रतिहतत्वाचीहि उपपत्ति लागते-इतर मूर्त द्रव्यांनीं त्याचा अप्रतिबंधहि संभवतो. [-आणि याप्रमाणें त्याला उभयविधत्व असल्यामुळेंच त्याची अनुपलब्धीहि सिद्ध झाली, असें '**अतः एव०**' इत्यादि भाष्यानें सांगतात-]=आणि याप्रमाणें त्याला स्वरूपतः व प्रमाणतः सूक्ष्मत्व असल्यामुळेंच देहांतून निघून जात असलेलें तें मुमूर्षूच्या समीप बसलेल्या लोकांना दिसतनाहीं.९. [-'**नोपमर्देन०**' या सूत्रानें त्याच्या सूक्ष्मत्वामुळेंच होणारा आणखी एक लाभ-]

## सूत्रं--नोपमर्देनातः ॥ १०

**सूत्रार्थ**—सूक्ष्मत्वामुळेंच शरीराच्या नाशानें त्याचा नाश होत नाहीं. १०.-सु. ब्र. ४६१ [-'**अतः एव०**' इत्यादि भाष्यानें सूत्राचें व्याख्यान-]

**भाष्यं—अत एव सूक्ष्मत्वान्नास्य स्थूलस्य शरीरस्योपमर्देन दाहादिनिमित्तेनेतरत्सूक्ष्मं शरीरमुपमृद्यते ॥ १० ॥**

**भाष्यार्थ**—आणि त्या तेजाच्या सूक्ष्मत्वामुळेंच या स्थूल शरीराच्या दाहादिनिमित्तानें होणाऱ्या नाशानें दुसरें सूक्ष्म शरीर नाश पावत नाहीं. १०. [-'**औष्ण्य**' या लिंगावरून होणारें अनुमानहि प्रस्तुत 'तेज-'आख्य सूक्ष्म देहाच्या अस्तित्वाविषयीं प्रमाण आहे, असें '**अस्यैव०**' या सूत्रानें सांगतात-]

**सूत्रं—अस्यैव चोपपत्तेरेष ऊष्मा ॥ ११ ॥ ( ५ )**

**सूत्रार्थ**—स्थूल देहांत उपलब्ध होणारा हा ऊष्मा या सूक्ष्म देहाचाच धर्म आहे. कारण त्याविषयीं ' सूक्ष्म शरीर असलें तरच शरीरांत ऊष्म्याची उपलब्धि होणें व मृत-देहांत त्याच्या अभावीं त्याची उपलब्धि न होणें ' अशी उपपत्ति-युक्ति आहे. ११. ( ५ ).–सु. ब्र. ४६१. [–सूत्राचें विवरण करणारे भाष्यकार ' **अस्यैव०** ' इत्यादि भाष्यानें अनुमानच स्पष्ट करितात–]

**भाष्यं--अस्यैव च सूक्ष्मस्य शरीरस्यैष ऊष्मा यमेतस्मिञ्शरीरे संस्पर्शेनोष्माणं विजानन्ति। तथाहि मृतावस्थायामवस्थितेऽपि देहे विद्यमानेष्वपि च रूपादिषु देहगुणेषु नोष्मोपलभ्यते जीवदवस्थायामेव तूपलभ्यते, इत्यत उपपद्यते प्रसिद्धशरीरव्यतिरिक्तव्यपाश्रय एवैष ऊष्मेति। तथा च श्रुतिः–" उष्ण एव जीविष्यञ्शीतो मरिष्यन् " इति ॥ ११ ॥ ( ५ )**

**भाष्यार्थ**–आणि याच सूक्ष्म शरीराचा हा ऊष्मा आहे कीं ज्या ऊष्म्याला लोक या शरीरांत हस्तादिस्पर्शानें विशेषतः जाणतात.[–सूक्ष्म देहांत औष्म्याच्या व्यभिचाराची आशंका घेऊन सूत्रांतील ' उपपत्तेः०' या पदाची योजना '**तथा हि०**' इत्यादि भाष्यानें करितात–]=हा ऊष्मा सूक्ष्म शरीराचाच धर्म कसा आहे, तें पहा–मृतावस्थेंत देह जरी विद्यमान असला आणि रूपादिं देहगुण जरी विद्यमान असले तरी हा ऊष्मा उपलब्ध होत नाहीं. पण तो जीवदवस्थेमध्येंच उपलब्ध होतो. त्यामुळें हा ऊष्मा प्रसिद्ध शरीराहून भिन्न, सूक्ष्म शरीराच्याच आश्रयानें राहणारा आहे–तो प्रसिद्ध शरीरव्यतिरिक्तव्यपाश्रयच आहे, हें उपपन्न होतें. [ अन्वय-व्यतिरेकांनीं ऊष्मा स्थूल-शरीरातिरिक्त स्वाश्रय सुचवितो, असें सांगितलें. –आतां आगमहि याचें सूक्ष्म देहधर्मत्व सुचवितो, असें ' **तथा च०** ' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=आणि " जिवंत असणारा देह उष्णच व मरण पावणारा शीत होतो " अशी ही श्रुति आहे. ११.–सु. ब्र. ४६२. ( ५ )

( ६. **प्रतिषेधाधिकरण. सू.** १२-१४. )

—उत्क्रांतिकालीन सत्संपत्तीचें सावशेषत्व सांगितलें. आतां निर्गुण ब्रह्मवेत्त्यांमध्यें उत्क्रांतीचा अभाव ' **प्रतिषेधात्०** ' इत्यादि सूत्रानें सांगतात—

**सूत्रं--प्रतिषेधादिति चेन्न शारीरात् ॥ १२**

**सूत्रार्थ**—निर्गुण ब्रह्मवेत्त्याच्या शरीरापासून प्राणोत्क्रमणाचा प्रतिषेध केला आहे. म्हणून त्याची उत्क्रांति नाहीं, असें म्हणशील तर तें बरोबर नाहीं, कारण ' न तस्य प्राणाः०' हा शारीरजीवापासून उत्क्रांतीचा प्रतिषेध आहे. शरीरापासून

नव्हे, असा हा पूर्वपक्ष आहे.१२.–सु.ब्र.४६३. [–या अधिकरणाचा व्यवहितसंबंध दाखविणारे भाष्यकार अधिकरणाचें तात्पर्य 'अमृतत्वं०' इत्यादि भाष्यानें सांगतात–]

**भाष्यं**—'अमृतत्वं चानुपोष्य' इत्यतो विशेषणादात्यंतिकेऽमृतत्वे गत्युत्क्रान्त्योरभावोऽभ्युपगतः। तत्रापि केनचित्कारणेनोत्क्रान्तिमाशंक्य प्रतिषेधति– 'अथाकामयमानो योऽकामो निष्काम आप्तकाम आत्मकामो भवति न तस्य प्राणा उत्क्रामन्ति ब्रह्मैव सन्ब्रह्माप्येति' इति। अतः परविद्याविषयात्प्रतिषेधान्न परब्रह्मविदो देहात्प्राणानामुत्क्रान्तिरस्तीति चेत्॥

**भाष्यार्थ**—आणि 'अविद्यादिक्लेशसमूहाला अत्यंत दग्ध न करितां प्राप्त होणारें जें अमृतत्व तें आपेक्षिक आहे.'–पृ. ७०९–अशा या विशेषणामुळें आत्यंतिक –नित्य अमृतत्वामध्यें गति व उत्क्रान्ति यांचा अभाव स्वीकारिलेला आहे. पण त्यांतहि कांहीं कारणानें उत्क्रान्तीची आशंका घेऊन सूत्रकार तिचा येथें प्रतिषेध करितात. [–'**अथाकामयमानः०**' इत्यादि भाष्यानें परब्रह्मवेत्त्याला विषयत्वानें उदाहृत करितात–]='अथ'–"आतां मुक्तिप्रकरणाचा आरंभ झाला असतां जो अकामयमान, अकाम–बाह्यविषयांविषयीं विरक्त, निष्काम–आन्तरकामवासनारहित, आप्तकाम–ज्याला परमानंद प्राप्त झाला आहे असा व आत्मकाम–सर्वात्मैकत्वदर्शी होतो, त्याचे प्राण उत्क्रमण करीत नाहींत, तर तो ब्रह्मच होऊन ब्रह्मरूपामध्यें तादात्म्य पावतो."–बृ. ४. ४. ७.–अशा या परविद्याविषय प्रतिषेधामुळें परब्रह्मवेत्त्याच्या देहापासून प्राणांची उत्क्रांति होत नाहीं, असें जर म्हणाल तर ['तें बरोबर नाहीं,' असा पुढें संबंध. येथील अकाम, निष्काम इत्यादि पुढील पुढील विशेषण पूर्व पूर्व विशेषणाचें निमित्त आहे. याप्रमाणें अकामयमान ब्रह्मवेत्ता येथें श्रुत आहे, असा याचा भावार्थ.–'त्याची उत्क्रान्ति आहे कीं नाहीं' असा 'तस्मात् व तस्य' अशा पंचमी व षष्ठीश्रुतीमुळें संदेह आला असतां येथें परब्रह्मवेत्त्याच्या मुख्य अमृतत्वामध्यें गति व उत्क्रान्ति यांचा अभाव सांगितलेला असल्यामुळें याची प्रासंगिकी पादादिसंगति आहे. पूर्वपक्षांत 'निषेधाला अन्यविषयत्व असल्यामुळें विद्वान् व अविद्वान् यांचा अविशेष आहे' आणि सिद्धान्तांत 'दोन्ही शाखांमध्यें देहापादान उत्क्रान्तीचा –देहापासून उत्क्रान्तीचा निषेध केलेला असल्यामुळें त्यांच्या विशेषाची सिद्धि' असा याचा फलभेद आहे.–पूर्वपक्षी 'न०' इत्यादि भाष्यानें सिद्धान्त्यांच्या मताचें निराकरण करून स्वमत सांगतो–]

**भाष्यं—नेत्युच्यते । यतः शारीरादात्मन एष उत्क्रान्तिप्रतिषेधः प्राणानां न शरीरात् । कथमवगम्यते । ' न तस्मात्प्राणा उत्क्रामन्ति ' इति शाखान्तरे पचमीप्रयोगात् । संबंधसामान्यविषया हि षष्ठी शाखान्तरगतया पंचम्या संबंधविशेषे व्यवस्थाप्यते । तस्मादिति च प्राधान्यादभ्युदयनिःश्रेयसाधिकृतो देही संबध्यते न देहः । न तस्मादुच्चिक्रमिषोर्जीवात्प्राणा अपक्रामन्ति सहैव तेन भवन्तीत्यर्थः ॥ १२ ॥ सप्राणस्य च प्रवसतो भवत्युत्क्रान्तिर्देहादित्येवं प्राप्ते प्रत्युच्यते—**

**भाष्यार्थ—**त्याचें 'तें बरोबर नाहीं' असें उत्तर सांगितलें जातें. कारण शारीर आत्म्यापासून हा प्राणांच्या उत्क्रान्तीचा प्रतिषेध आहे. शरीरापासून त्यांच्या उत्क्रान्तीचा तो प्रतिषेध नाहीं. [–"अहोपण, 'त्याचे प्राण उत्क्रमण करीत नाहींत' असा हा विद्वानाच्या शरीरापासूनच उत्क्रान्तीचा निषेध केला जातो, शारीरापासून नव्हे" अशी शंका–]='**कथं अवगम्यते** '–पण हें कसें अवगत होतें ? [–'**न तस्मात्०**' इत्यादि माध्यंदिन श्रुतीनें वादी या आक्षेपाचें निरसन करितो–]='त्याच्यापासून प्राण उत्क्रमण करीत नाहींत' असा शाखान्तरांत–माध्यंदिनशाखेंत पंचमीचा प्रयोग केलेला आहे. त्यामुळें हें असें अवगत होतें. [–"अहोपण, शारीरापासून जर उत्क्रान्तीचा निषेध केला असेल तर पूर्वोक्त षष्ठीश्रुतीची वाट काय ?" अशी आशंका घेऊन ' पंचम्यन्त माध्यंदिनश्रुतीनें संबंधसामान्यविषय षष्ठन्त काण्वश्रुति अपादानरूप संबंधविशेषामध्यें व्यवस्थापित करावी, असें वादी '**संबंध०**' इत्यादि भाष्यानें सांगतो–]=कारण ' संबंधसामान्यविषया'–संबंधसामान्य हा जिचा विषय आहे अशी षष्ठी शाखान्तरांतील पंचमीकडून संबंधविशेषामध्यें व्यवस्थापित केली जाते. [–" अहोपण, माध्यंदिनश्रुतीमध्येंहि 'तस्मात्' या पंचमीश्रुतीनें शरीराचाच परामर्श केला जावो " अशी आशंका घेऊन वादी '**तस्मात्०** ' इत्यादि भाष्यानें म्हणतो–]=आणि ' तस्मात् ' या पंचमीशीं प्राधान्यामुळें अभ्युदय व निश्रेयस यांमध्यें अधिकृत असलेला देही संबद्ध होतो. देह संबद्ध होत नाहीं. [–' तर मग या वाक्याचा अर्थ काय ? ' अशी आकांक्षा झाली असतां वादी '**न तस्मात्०** ' इत्यादि भाष्यानें वाक्यार्थ सांगतो–]=उत्क्रमण करण्याची इच्छा करणाऱ्या त्या जीवापासून प्राण अपक्रमण करीत नाहींत, तर ते त्याच्या बरोबरच असतात, असा याचा भावार्थ. १२. [–' तरी पण त्यामुळें प्रकृत संदेहाचा निर्णय काय झाला ? ' अशी आशंका घेऊन वादी ' प्राणसहित क्षेत्रज्ञाची शरीरापासून उत्क्रान्ति सिद्ध झाली' असें '**सप्राणस्य०**' इत्यादि भाष्यानें

सांगतो-]=आणि प्राणसहित प्रवास करणाऱ्या-निघून जाणाऱ्या जीवाची देहा-पासून उत्क्रान्ति होते असा निर्णय झाला. [-'परब्रह्मवेत्त्याचीहि गति व उत्क्रांति होते' अशा प्राप्त पूर्वपक्षाचा अनुवाद करून 'एवं०' इत्यादि भाष्यानें सिद्धान्त सांगतात-]=असा पूर्वपक्ष प्राप्त झाला असतां 'स्पष्टो ह्येकेषां०' या सूत्रानें त्याचा परिहार सांगितला जातो—

## सूत्रं—स्पष्टो ह्येकेषाम् ॥ १३

**सूत्रार्थ**—काण्वांच्या शाखेंत ब्रह्मवेत्त्याच्या शरीरापासून प्राणांची उत्क्रान्ति होत नाहीं, असा स्पष्ट प्रतिषेध आहे. त्यामुळें त्यांची उत्क्रान्ति होत नाहीं. १३ –सु. ब्र. ४६३. [-सूत्राचें हेतुत्वानें व्याख्यान करण्यासाठीं प्रथम सूत्राच्या बाहे-रच 'नैतत्०' इत्यादि भाष्यानें प्रतिज्ञा सांगतात-]

**भाष्यं—नैतदस्ति यदुक्तं परब्रह्मविदोऽपि देहादस्त्युत्क्रान्तिरुत्क्रान्तिप्रतिषेधस्य देह्यपादानत्वादिति । यतो देहापादान एवोत्क्रान्तिप्रतिषेध एकेषां समाम्नातॄणां स्पष्ट उपलभ्यते ॥**

**भाष्यार्थ**—पण वाद्यानें 'परब्रह्मज्ञाचीहि देहापासून उत्क्रांति होते, कारण उत्क्रांतीच्या प्रतिषेधाचें देहीला-शारीराला अपादानत्व आहे. शारीरापासून विद्वा-नाच्या प्राणाचें उत्क्रमण होत नाहीं, असें श्रुतींतील 'तस्मात्' या पदानें सांगितलें आहे' असें जें वर म्हटलें आहे, तें तसें नाहीं. [-त्याविषयीं हेतुत्वानें सूत्राची योजना करितात-]='यतः०'-कारण एका समाम्नात्यांच्या शाखेंत देहापादानच-देहापासूनच उत्क्रांतीचा प्रतिषेध स्पष्ट उपलब्ध होतो. [-'तथा हि०' इत्यादि भाष्यानें त्या उपालंभाचाच अभिनय करितात-]

**भाष्यं—तथाहि-आर्तभागप्रश्ने 'यत्रायं पुरुषो म्रियत उदस्मात्प्राणाः उत्क्रामन्त्याहो नेति' इत्यत्र 'नेति होवाच याज्ञवल्क्यः' इत्यनुत्क्रान्तिपक्षं परिगृह्य, न तर्ह्ययमनुत्क्रान्तेषु प्राणेषु मृत इत्यस्यामाशंकायां 'अत्रैव सम-वनीयन्त' इति प्रविलयं प्राणानां प्रतिज्ञाय तत्सिद्धये 'स उच्छ्वयत्याध्मा-यत्याध्मातो मृतः शेते' इति स-शब्दपरामृष्टस्य प्रकृतस्योत्क्रान्त्यवधेः उच्छ्वयनादीनि समामनन्ति ॥**

**भाष्यार्थ**—कसा तो पहा-'जेव्हां हा पुरुष मरतो तेव्हां याच्यापासून प्राण उत्क्रांत होतात कीं नाहीं?' अशा या आर्तभाग ऋषीच्या प्रश्नांत "याज्ञवल्क्य 'नाहीं, ते त्याच्यापासून उत्क्रमण करीत नाहींत' असें म्हणाले"-बृ.३.२.११.- अशा अनुत्क्रांतिपक्षाचा स्वीकार करून 'तर मग प्राण उत्क्रांत झालेले नसल्यास

–त्याच्यापासून निघून गेलेले नसल्यास तो मृत झालेला नाहीं ' अशी ही आशंका आली असतां ' ते येथेंच सर्वथा लीन होऊन जातात ' अशी प्राणांच्या प्रविलयाची प्रतिज्ञा करून तिच्या सिद्धीसाठीं ' तो फुगतो, त्यामध्यें वायु भरतो आणि वायूनें भरलेला तो मृत होऊन शयन करितो'–बृ.३.२.११.–अशा 'सः' या शब्दानें परामर्श केलेल्या प्रकृत उत्क्रांत्यवधीचीं उच्छ्वयनादि–फुगणें इत्यादि कार्यें सांगतात. [ 'याच्यापासून प्राण वर निघून जातात कीं नाहींत' या वाक्यांत 'अस्मात्' या पदानें सांगितलेल्या उत्क्रांति-अवधिमत्त्वाचा 'सः' या शब्दानें परामर्श करून उच्छ्वयनादि धर्म सांगितलेले असल्यामुळें उच्छ्वयन व आध्मान हे ज्याचे धर्म आहेत त्याच देहाला उत्क्रांति-अवधित्व आहे असा याचा भावार्थ. –'अहोपण,हें उच्छ्वयनादि धर्मजात शारीराचेंच असूं दे,म्हणजे त्यालाच उत्क्रांतीचें अवधित्व आहे असें होईल' याचें 'देहस्य०' इत्यादि भाष्यानें 'नाहीं' असें उत्तर–]

**भाष्यं**—देहस्य चैतानि स्युर्न देहिनः। तत्सामान्यात् ' न तस्मात्प्राणा उत्क्रामन्त्यत्रैव समवनीयन्ते ' इत्यत्राप्यभेदोपचारेण देहापादानस्यैवोत्क्रमणस्य प्रतिषेधः। यद्यपि प्राधान्यं देहिन इति व्याख्येयं येषां पंचमीपाठः। येषां तु षष्ठी पाठः तेषां विद्वत्संबंधिन्युत्क्रान्तिः प्रतिषिध्यत इति प्राप्तोत्क्रान्तिप्रतिषेधार्थत्वादस्य वाक्यस्य देहापादानैव सा प्रतिषिद्धा भवति। देहादुत्क्रान्तिः प्राप्ता न देहिनः॥

**भाष्यार्थ**—आणि हीं उच्छ्वयनादि कार्यें देहाचींच आहेत, देहीचीं–शारीराचीं नव्हेत. [–काण्व श्रुतीमध्यें निषेध केल्या जाणाऱ्या उत्क्रांतीला देहापादानत्व जरी असलें तरी माध्यंदिन श्रुतीमध्यें देही शारीरालाच उत्क्रांतीचें अपादानत्व आहे, कारण त्यालाच प्राधान्य आहे, अशी आशंका घेऊन 'तत्सामान्यात्०' इत्यादि भाष्यानें म्हणतात–]=विद्याप्रकरणत्वाच्या सादृश्यामुळें 'त्याच्यापासून प्राण उत्क्रांत होत नाहींत, तर ते येथेंच पूर्णपणें तद्रूप होतात ' अशा या माध्यंदिन श्रुतींतहि अभेदोपचारानें देहापादान-उत्क्रमणाचाच प्रतिषेध आहे. [ विद्याप्रकरणत्वसामान्यामुळें ब्रह्मवेत्त्याच्या देहापादान उत्क्रांतीचा निषेध दोन्ही शाखांमध्यें समान आहे, असा याचा भावार्थ. –" अहोपण 'तत्' या सर्वनामानें देहीचाच प्रधानत्वानें परामर्श केलेला असल्यामुळें येथें देहाचें ज्ञान कोठून होणार " अशी आशंका घेऊन भाष्यांत 'अभेदोपचारानें' असें म्हटलें आहे.] ='यद्यपि०'–जरी देहीला प्राधान्य आहे तरी ज्यांचा पंचमीपाठ आहे त्यांचा अभेदोपचारानें देहोपादान-उत्क्रमणाचाच प्रतिषेध आहे, असें व्याख्यान करावें. [ प्राधान्यामुळें देहीला ' तत्-'शब्दार्हत्व जरी असलें तरी देह व देही यांच्या अभेदोपचारामुळें देहीचा परामर्श करणाऱ्या सर्वनामानें देहाचाच परामर्श होतो.

त्यामुळें त्या देहापासूनच उत्क्रांतीचा येथें निषेध केला आहे, असें पंचमीपाठ-पक्षीं व्याख्यान करावें, असा याचा भावार्थ.–याप्रमाणें माध्यंदिन पाठाचें सिद्धान्तानुकूल्य सांगून काण्व पाठाचेंहि सिद्धान्तानुगुण्य 'येषां तु०' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=पण ज्यांचा षष्ठीपाठ आहे त्यांच्या विद्वत्संबंधिनी उत्क्रांतीचा प्रतिषेध केला जातो. म्हणून या वाक्याला प्राप्त उत्क्रांतिप्रतिषेधार्थत्व असल्यामुळें म्ह० प्राप्त उत्क्रांतीचा प्रतिषेध करणें हा त्याचा उपयोग असल्यामुळें देहापादानच उत्क्रांति प्रतिषिद्ध आहे. कारण देहापासून उत्क्रांति प्राप्त आहे, देहीपासून नाहीं. [–'न तस्य'–'त्याचे प्राण उत्क्रांत होत नाहींत' इत्यादि वाक्यांत अपादानाची अपेक्षा झाली असतां 'चक्षूपासून किंवा मूर्धेपासून' याप्रमाणें उत्क्रांति-अपादानत्वानें प्रकृत असलेल्या देहांशांचा येथें संबंध असल्यामुळें व या वाक्याला प्राप्त-उत्क्रांतिनिषेधपरत्वरूप असल्यामुळें 'त्याचे प्राण देहांशांपासून उत्क्रमण करीत नाहींत' असा वाक्याचा विपरिणाम होतो किंवा दुसऱ्या प्रकारें अप्राप्त निषेधाची प्राप्ति होत असल्यामुळें व संबंधसामान्य हा जिचा अर्थ आहे अशा षष्ठीचें 'प्राणानें या हीन शरीराचें रक्षण करणारा' 'प्राणमय' इत्यादि कर्तृ-करण-उपाधि-उपहितत्वरूप प्रकृतसंबंधविशेषामध्यें पर्यवसान होत असल्यामुळें, अन्य शाखास्थ अपादानसंबंधविशेषाची अपेक्षा नसल्यामुळें त्याचे इंद्रियोपाधिभूत प्राण देहावयवांपासून उत्क्रमण करीत नाहींत, असा वाक्यार्थ होईल, असा याचा भावार्थ.–आणि याहि कारणानें हें वाक्य विद्वदुत्क्रांतिनिषेधपर आहे, असें 'अपि च०' इत्यादि भाष्यानें सांगतात–]

**भाष्यं**—**अपि च 'चक्षुष्टो वा मूर्ध्नो वाऽन्येभ्यो वा शरीरदेशेभ्यस्तमुत्क्रामन्तं प्राणोऽनूत्क्रामति प्राणमनूत्क्रामन्तं सर्वे प्राणा अनूत्क्रामन्ति' इत्येवमविद्वद्विषयं सप्रपंचमुत्क्रमणं संसारगमनं च दर्शयित्वा 'इति नु कामयमानः' इत्युपसंहृत्याविद्वत्कथाम् 'अथाकामयमानः' इति व्यपदिश्य विद्वांसं यदि तद्विषयेऽप्युत्क्रान्तिमेव प्रापयेदसमंजस एव व्यपदेशः स्यात्। तस्मादविद्वविषये प्राप्तयोर्गत्युत्क्रान्त्योर्विद्वद्विषये प्रतिषेध इत्येवमेव व्याख्येयं व्यपदेशार्थवत्त्वाय ॥**

**भाष्यार्थ**—शिवाय 'चक्षूपासून किंवा मूर्धेपासून किंवा दुसऱ्या शरीरदेशापासून उत्क्रमण करणाऱ्या त्या जीवाच्या मागोमाग प्राण उत्क्रमण करितो. उत्क्रमण करणाऱ्या प्राणाबरोबर इतर सर्व प्राण उत्क्रमण करितात'–पृ.७०१ –असें हें अविद्वद्विषय–अविद्वानाचें सप्रपंच उत्क्रमण व संसारगमन दाखवून

" याप्रमाणें कामयमान–सकाम पुरुष संसार करितो. "–बृ. ४. ४. ६. सु. उ. पृ. ६९२.–असा अविद्वानाच्या कथेचा उपसंहार करून 'आतां अकामयमान'–सु. उ. ६९२.–असा विद्वानाचा निर्देश करून त्या विद्वद्विषयामध्येंहि श्रुति जर उत्क्रांतिच प्राप्त करवील–त्याची उत्क्रांतिच सांगेल तर हा निर्देश असमंजसच–अयुक्तच होईल. [–व्यपदेशसामर्थ्यानें सिद्ध झालेल्या अर्थाचा **'तस्मात्०'** इत्यादि भाष्यानें उपसंहार–]=म्हणून अविद्वद्विषयामध्यें प्राप्त असलेल्या गति-उत्क्रांतींचा विद्वद्विषयामध्यें प्रतिषेध आहे, असेंच याचें व्याख्यान व्यपदेशाच्या अर्थवत्त्वासाठीं–पूर्वोक्त निर्देश उपयुक्त होण्यासाठीं करावें. [–केवल प्रमाणाच्या अभावामुळेंच गति व उत्क्रांति यांचा अभाव नाहीं, तर युक्तीच्या अभावामुळेंहि तो आहे असें ' **न च०** ' इत्यादि भाष्यानें सांगतात–]

**भाष्यं—न च ब्रह्मविदः सर्वगतब्रह्मात्मभूतस्य प्रक्षीणकामकर्मणः उत्क्रान्तिर्गतिर्वोपपद्यते, निमित्ताभावात् । ' अत्र ब्रह्म समश्नुते ' इति चैवंजातीयकाः श्रुतयो गत्युत्क्रान्त्योः अभावं सूचयन्ति ॥ १३ ॥**

**भाष्यार्थ**—आणि सर्वगत, ब्रह्मात्मभूत, ज्याचे काम व कर्मं प्रक्षीण झालीं आहेत, अशा ब्रह्मवेत्त्याची उत्क्रांति किंवा गति उपपन्न होत नाहीं. [–उपपत्तीच्या अभावाविषयीं हेतु–]=**'निमित्ताभावात्'**–कारण त्याच्या गत्युत्क्रांतींचें कांहीं निमित्त नाहीं. [ म्हणजे गमनाच्या कर्म-करणादि कारकांचा असंभव असल्यामुळें ब्रह्मवेत्त्याची गति संभवत नाहीं, असा भावार्थ.–विद्वानाची गति व उत्क्रांति यांच्या अस्तित्वाविषयीं प्रमाण नाहीं, असें सांगितलें. आतां **' अत्र०'** इत्यादि भाष्यानें त्यांच्या असत्त्वाविषयीं प्रमाण आहे, असें सांगतात–]=आणि ' तो विद्वान् येथें –या शरीरांतच ब्रह्माला प्राप्त होतो ' या अशा प्रकारच्या श्रुति विद्वानाच्या गत्युत्क्रांतींचा अभाव सुचवितात. १३. [–'नोत्क्रामन्ति मुनेः प्राणा व्यापी सर्वगतो हि सः । तेन व्याप्तमिदं सर्वं कुत उत्क्रम्य यास्यति ॥'–" मुनीचे प्राण शरीरापासून उत्क्रमण करीत नाहींत, कारण तो व्यापी, सर्वगत आहे, त्याच्याकडून हें सर्व व्याप्त आहे, तेव्हां तो उत्क्रमण करून कोठें जाणार?" अशी स्मृति असल्यामुळेंहि ब्रह्मवेत्त्याची उत्क्रांति किंवा गति नाहीं, असें **' स्मर्यते च० '** या सूत्रानें सांगतात–]

## सूत्रं—स्मर्यते च ॥ १४ ॥ ( ६ )

**सूत्रार्थ**—आणि महाभारतांत 'विद्वानाच्या पदांचा शोध करणारे देवहि त्याच्या मार्गांत मोहित होतात' असा विद्वानाच्या उत्क्रांतीचा अभाव सांगितला आहे. १४. (६)–सु.ब्र.४६३.–[–**'स्मर्यतेऽपि०'** इत्यादि भाष्यानें सूत्राचें व्याख्यान–]

**भाष्यं—स्मर्यतेऽपि च महाभारते गत्युत्क्रान्त्योरभावः–"सर्वभूतात्मभूतस्य सम्यग्भूतानि पश्यतः। देवा अपि मार्गे मुह्यन्त्यपदस्य पदैषिणः" इति। ननु गतिरपि ब्रह्मविदः सर्वगतब्रह्मात्मभूतस्य स्मर्यते "शुकः किल वैयासकिर्मुमुक्षुरादित्यमंडलमभिप्रतस्थे पित्रा चानुगम्याहूतो भो इति प्रतिशुश्राव" इति॥**

**भाष्यार्थ**—आणि महाभारतांत "सर्वभूतांचा आत्मभूत आणि भूतांना तत्त्वदृष्टीनें पहाणारा अशा 'अपद'–प्राप्यपदशून्य ब्रह्मवेत्त्याच्या पदाची इच्छा करणारे देवहि मार्गाविषयीं मोहित होतात–त्याच्या मार्गाचा अभाव असल्यामुळें देव त्याला जाणत नाहींत" असा विद्वानाच्या गत्युत्क्रांतींचा अभाव स्मृतहि आहे. [–'**ननु०**' इत्यादि भाष्यानें वादी स्मृत्यंतरविरोधाची शंका घेतो–]="अहोपण, 'प्रसिद्ध मुमुक्षु व्यासपुत्र शुक आदित्यमंडलास जावयास निघाला आणि पित्यानें त्याच्या मागून गमन करून त्याला हाक मारिली असतां तो 'भोः' असें प्रतिवचन देता झाला' अशी सर्वगत ब्रह्मात्मभूत ब्रह्मवेत्त्याची गतिहि स्मृत आहे!" [–पण ही गति अपर विद्याबलानें आहे, असें '**न०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]

**भाष्यं—न। सशरीरस्यैवायं योगबलेन विशिष्टदेशप्राप्तिपूर्वकः शरीरोत्सर्ग इति द्रष्टव्यम्। सर्वभूतदृश्यत्वाद्युपन्यासात्। न ह्यशरीरं गच्छन्तं सर्वभूतानि द्रष्टुं शक्नुयुः। तथा च तत्रैवोपसंहृतम्–"शुकस्तु मारुताच्छीघ्रां गतिं कृत्वाऽन्तरिक्षगः। दर्शयित्वा प्रभावं स्वं सर्वभूतगतोऽभवत्" इति। तस्मादभावः परब्रह्मविदो गत्युत्क्रान्त्योः। गतिश्रुतीनां तु विषयमुपरिष्टाद्व्याख्यास्यामः॥**

**भाष्यार्थ**—नाहीं, ती ब्रह्मवेत्त्याची गतिस्मृति नव्हे, तर सशरीर असलेल्या शुकाचाच योगबलानें विशिष्टदेशप्राप्तिपूर्वक हा शरीरत्याग आहे, असें जाणावें. [–त्याविषयीं '**सर्वभूत०**' इत्यादि भाष्यानें नियामक हेतु सांगतात–]=कारण त्याच्या सर्वभूतदृश्यत्वादिकांचा उपन्यास केला आहे. [येथील 'आदि-'शब्दानें सर्वभूतांच्या अनुगमनादिकांचें ग्रहण केलें जातें.–'तरीपण सशरीरच शुकाची गति कशी?' '**न हि०**' इत्यादि भाष्यानें उत्तर–]=कारण शरीररहित होऊन गमन करणाऱ्या त्याला पहाण्यास सर्व भूतें समर्थ झालीं नसतीं. [–'**तथा च०**' इत्यादि भाष्यानें उक्त अर्थीं वाक्यशेषाचें आनुकूल्य दाखवितात–]=आणि तसा तेथेंच 'पण शुक वायूहून शीघ्र गति करून अंतरिक्षामध्यें जाऊन आपला प्रभाव दाखवून सर्वभूतगत झाला' असा उपसंहार केला आहे. [–'**तस्मात्०**' इत्यादि भाष्यानें स्मृतीच्या अनुग्रहानें प्राप्त झालेल्या अर्थाचा उपसंहार करितात–]=म्हणून परब्रह्मवेत्त्याच्या गतीचा व उत्क्रान्तीचा अभाव आहे. [–"तर मग 'सुषुम्नानाडीनें

वर जाणारा अमृतत्वास प्राप्त होतो ' ' तो अमानव पुरुष या उपासकांना ब्रह्माला नेऊन पोंचवितो' इत्यादि गतिश्रुतींची काय वाट ?" **'गतिश्रुतीनाम्०'** इत्यादि भाष्यानें उत्तर-]=पण गतिश्रुतींचा विषय आम्ही पुढें-तिसऱ्या पादांत अगदीं स्पष्टपणें सांगूं. १४.-सु. ब्र. ४६४.( ६ )

**( ७. वागादिलयाधिकरण. सू. १५. )**

—' परब्रह्मवेत्याच्या प्राणांचा प्रलय परब्रह्मामध्यें दाखविला, पण तो अयुक्त आहे. कारण पृथिव्यादिकांमध्यें त्यांचा लय श्रुत आहे ' अशी आशंका घेऊन ' **तानि०** ' इत्यादि सूत्रानें सिद्धान्त सांगतात—

**सूत्रं—तानि परे तथा ह्याह ॥ १५ ॥ ( ७ )**

**सूत्रार्थ**—तीं प्राणाख्य इंद्रियें परब्रह्मामध्यें लीन होतात. कारण 'एवमेवास्य०' इत्यादि श्रुति तसें सांगते. १५. -सु. ब्र. ४६५. [-विद्वानांच्या कलांचा प्रविलय हा या अधिकरणाचा विषय आहे. 'तो काय पृथिव्यादिकांमध्यें होतो कीं परमात्म्यामध्यें?' असा श्रुतिद्वयोपलब्धीमुळें संदेह आला असतां 'श्रौतविद्येचा फलभूत कलाविलय ब्रह्मामध्येंच होतो,' असें येथें सांगितलेलें असल्यामुळें याची पादादिसंगति आहे. पूर्वपक्षांत ' प्रकृतींतच विकृतीच्या लयाची सिद्धि' व सिद्धान्तांत ' व्यवहारतः जरी तसें असलें तरी तत्त्वतः ब्रह्मामध्यें कलाविलयाची उपपत्ति ' असें मानणारे भाष्यकार-'**तानि०**' इत्यादि भाष्यानें सिद्धान्त सांगतात-]

**भाष्यं—तानि पुनः प्राणशब्दोदितानींद्रियाणि भूतानि च परब्रह्मविदः तस्मिन्नेव परस्मिन्नात्मनि प्रलीयन्ते । कस्मात् । तथाह्याह श्रुतिः ' एवमेवास्य परिद्रष्टुरिमाः षोडश कलाः पुरुषायणाः पुरुषं प्राप्यास्तं गच्छन्ति ' इति ॥**

**भाष्यार्थ**—पण तीं ब्रह्मवेत्त्याचीं प्राणशब्दानें सांगितलेलीं इंद्रियें व भूतें त्याच परमात्म्यामध्यें प्रलीन होतात. [-' **कस्मात्०** ' इत्यादि भाष्यानें उक्त अर्थी प्रश्नपूर्वक हेतु सांगतात-]=कोणत्या कारणानें ? कारण " ज्याप्रमाणें नद्या समुद्राला प्राप्त होऊन प्रलीन होतात, ' एवमेव '-त्याचप्रमाणें ' अस्य परिद्रष्टुः '-सर्वतः अनवच्छिन्न प्रत्यग्ब्रह्म पहाणाऱ्या या जीवाच्या 'इमाः०'-या स्वानुभवगम्य प्राणश्रद्धादि पुरुषाश्रय सोळा कला ' पुरुषं प्राप्य '-त्याच पुरुषाला प्राप्त होऊन बाह्य विषयसंगत्यागानें त्यामध्यें अवस्थित होऊन ' अस्तं गच्छन्ति '-विलयास प्राप्त होतात."-प्र.६.५.-असें श्रुति सांगते. [-'**ननु०**' इत्यादि भाष्यानें पूर्वपक्ष-]

**भाष्यं—ननु 'गताः कलाः पंचदश प्रतिष्ठाः' इति विद्वद्विषयैवापरा श्रुतिः परस्मादात्मनोऽन्यत्रापि कलानां प्रलयमाह स्म । न । सा खलु व्यवहारापेक्षा ।**

**पार्थिवाद्याः कलाः पृथिव्यादीरेव स्वप्रकृतीरपियन्तीति । इतरा तु विद्वत्प्रतिपत्त्यपेक्षा। कृत्स्नं कलाजातं परब्रह्मविदो ब्रह्मैव संपद्यत इति । तस्माददोषः ॥ १५**

**भाष्यार्थ**—"अहोपण, पंधरा कला आपापल्या प्रतिष्ठेस प्राप्त झाल्या." –मुं. ३. २. ७.–अशी विद्वद्विषयच असलेली दुसरी श्रुति अन्यत्र–अन्य प्रकृतींतहि कलांचा प्रलय सांगत आहे. [ 'मन व प्राण यांच्या एकीकरणानें येथें कलांना पंचदशत्व आहे. 'प्रतिष्ठा-'शब्दानें कलांचीं कारणें अशीं जीं पृथिव्यादि तत्त्वें तीं सांगितलीं जातात. त्यामुळें 'प्रकृतींतच विकाराचा लय' या न्यायानें अनुगृहीत असलेल्या श्रुतीनें भूतांमध्यें विद्वानांच्या कलांचा विलय होतो, असा भावार्थ.–'वस्तुस्थितीनें परमात्म्यामध्यें कलांचा लय जरी होत असला तरी व्यवहारदृष्ट्या पृथिव्यादिकांमध्यें त्याचें कथन अविरुद्ध आहे. कारण अगोदर त्या पृथिव्यादिकांमध्येंच त्यांचा विलय होऊन नंतर त्यांसह परमात्म्यामध्यें कलांच्या विलयाची सिद्धि होते. म्हणून पूर्वोक्त दोन्ही श्रुति अविरुद्ध आहेत' असें '**न सा०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=हा पूर्वपक्ष बरोबर नाहीं, कारण 'पार्थिवादि कला पृथिव्यादि स्वप्रकृतींमध्येंच लीन होतात' ही श्रुति खरोखर व्यवहारापेक्ष आहे म्ह० पार्थिव विकार पृथिव्यादि स्वप्रकृतींमध्येंच लय पावतात, असें हें श्रुतीनें व्यवहाराच्या दृष्टीनें सांगितलें आहे. पण 'परब्रह्मवेत्त्याचें सर्व कलाजात ब्रह्मच होतें' अशी ही दुसरी श्रुति विद्वानाच्या ब्रह्मप्राप्तीच्या अपेक्षेनें आहे. म्हणून ती विद्वद्दृष्टीनें आहे. [–याप्रमाणें विद्वद्-अविद्वद्-दृष्ट्या श्रुतिद्वय प्रवृत्त झालें आहे, असें सिद्ध झालें असतां फलित सांगतात–]='**तस्माददोषः०**'–तस्मात् या सिद्धान्तावर श्रुतिविरोध हा दोष येत नाहीं. १५.–सु. ब्र. ४६६. (७).

( ८. अविभागाधिकरण. सू. १६. )

—पृथिव्यादिद्वारा ब्रह्मामध्यें सांगितलेल्या विद्वत्कलाविलयाचें निर्विशेषत्व '**अविभागः०**' इत्यादि सूत्रानें सांगतात—

## सूत्रं—अविभागो वचनात् ॥१६॥(८)

**सूत्रार्थ**—विद्वानाच्या कलांचा ब्रह्माशीं अत्यंत 'अविभागच' आहे. कारण 'भिद्येते तासां नामरूपे' या वचनानें कलांच्या शक्तिरूप नाम-रूपांचा पुरुषामध्यें लय सांगून 'तो हा विद्वान् अकल, अमृत होतो' असें वचन आहे.१६. (८)–सु.ब्र.४६७.[–प्रकृत विद्वत्कलाविलयालाच विषय करून लयाचा दोन्ही प्रकारें अनुभव येत असल्यामुळें 'स पुनः०' इत्यादि भाष्यानें संशय सांगतात—]

**भाष्य**—स पुनर्विदुषः कलाप्रलयः किमितरेषामिव सावशेषो भवति। आहो-स्विन्निरवशेष इति। तत्र प्रलयसामान्याच्छक्त्यवशेषताप्रसक्तौ ब्रवीति—अवि-भागापत्तिरेवेति। कुतः। वचनात्। तथा हि कलाप्रलयमुक्त्वा वक्ति-'भिद्येते तासां नामरूपे पुरुष इत्येवं प्रोच्यते स एषोऽकलोऽमृतो भवति' इति। अवि-द्यानिमित्तानां च कलानां न विद्यानिमित्ते प्रलये सावशेषत्वोपपत्तिः। तस्माद-विभाग एवेति ॥१६॥(८)

**भाष्यार्थ**—पण, 'तो विद्वानाचा कलाप्रलय इतर अविद्वानांच्या कलाप्रलया-प्रमाणें सावशेष होतो कीं निरवशेष होतो ?' असा संशय येतो. [–येथें श्रौत-ज्ञानफलभूत विद्वत्कलाविलयाच्या निरवशेषत्वाचें प्रतिपादन केलेलें असल्यामुळें याची पादादिसंगति आहे. पूर्वपक्षांत 'मोक्षाची असिद्धि' व सिद्धान्तांत 'त्याची सिद्धि' असा फलभेद मानून 'तत्र०' इत्यादि भाष्यानें पूर्वपक्ष करितात–] =असा संशय आला असतां व प्रलयसादृश्यामुळें शक्तीच्या अवशेषत्वाची प्राप्ति झाली असतां [ 'विद्वानाचा ब्रह्मांतील कलाविलय सावशेष आहे, ब्रह्मांतील कला-विलयत्वामुळें, उत्क्रांतिकालीन कलाविलयाप्रमाणें' असा याचा भावार्थ.–पण, 'हें अनुमान श्रुति-युक्तिविरुद्ध आहे' असा 'ब्रवीति०' इत्यादि भाष्यानें सिद्धान्त सांगतात–]=सूत्रकार 'त्यांची अविभागापत्तिच आहे' असें सांगतात. [–त्याविषयीं 'कुतः०' इत्यादि भाष्यानें प्रश्नद्वारा श्रुतिविरोध दाखवितात–]=कोणत्या कार-णानें ? 'वचनामुळें.' कारण श्रुति कलाप्रलय सांगून "आणि त्या कलांचें नामरूप भेद पावतें, पुरुष असेंच म्हटलें जातें, तो हा विद्वान् अकल, अमृत होतो."–प्र. ६.५.–असें सांगते. [ नदी-समुद्रन्यायानें पुरुषामध्यें कला विलीन होतात आणि त्या कलांचें शक्त्यात्मक नाम-रूप भेद पावतें–विदीर्ण होतें, पुरुष-मात्र अवशिष्ट रहातें आणि तो विद्वान् अकल–कलाविरहित होत्साता अमृत होतो, पूर्वरूपानें अवस्थित होतो, असा याचा भावार्थ.–याप्रमाणें अनुमानाचा श्रुतीशीं विरोध सांगून 'अविद्या०' इत्यादि भाष्यानें युक्तिविरोध सांगतात–] =आणि अविद्या हें ज्यांचें निमित्त आहे अशा कलांचा विद्यानिमित्तानें प्रलय झाला असतां त्यांचें सावशेषत्व उपपन्न होत नाहीं. [–'तस्मात्०' इत्यादि भाष्यानें अनुमाननिरासाच्या फलाचा उपसंहार करितात–]=त्यामुळें कलांचा अविभागच आहे, असें सिद्ध झालें. १६.–सु. ब्र. ४६८. (८)

### (९. तदोकोऽधिकरण. सू. १७.)

—"विद्वत्कलांच्या अविभागाची प्राप्ति वचनामुळें जशी होते त्याप्रमाणें अपरब्रह्मवेत्त्यांचेंहि 'चक्षूपासून किंवा मूर्धेपासून' इत्यादि अविशेष वचनामुळें

कोणत्या तरी एखाद्या नाडीनें प्राणनिष्क्रमण होतें'' असा संशय प्राप्त झाला असतां 'तदोकोग्रज्वलनं॰ इत्यादि सूत्रानें त्याचें निरसन करितात—

**सूत्रं—तदोकोग्रज्वलनं तत्प्रकाशितद्वारो विद्यासामर्थ्यात्तच्छेषगत्यनुस्मृतियोगाच्च हार्दानुगृहीतः शताधिकया ॥१७॥(९)**

**सूत्रार्थ**—ज्याच्या इंद्रियसमूहवृत्ति लीन झाल्या आहेत अशा उत्क्रमण करणाऱ्या जीवाच्या हृदयाग्राचें ज्वलन–प्रद्योतन या नांवाचें प्राप्तव्यज्ञानरूप प्रकाशन प्रथम होतें. त्या प्रद्योतानें ज्याचें गमनद्वार प्रकाशित केलें आहे असा तो विद्वान् किंवा अविद्वान् मुमूर्षु जीव होतो. अविद्वान् दुसऱ्या स्थानांतून व विद्वान् विद्यासामर्थ्यामुळें मूर्धस्थानांतूनच बाहेर पडतो, कारण सगुणविद्येच्या शेषभूत मूर्धन्यनाडीगतीची जी अनुस्मृति–चिंतन तिच्या योगानें त्याचें त्याच मार्गानें गमन होणें उचित आहे, म्हणून हृदयस्थ ब्रह्माकडून अनुगृहीत झालेला विद्वान् शताधिक–मूर्धन्यनाडीनेंच निष्क्रमण करितो. १७. ( ९ )–सु. ब्र.४६९.
[–'समाप्ता॰' इत्यादि भाष्यानें गतार्थानुवादपूर्वक पुढील अधिकरणाचें तात्पर्य–]

**भाष्यं—समाप्ता प्रासंगिकी परविद्यागता चिंता । संप्रति त्वपरविद्याविषयामेव चिंतामनुवर्तयति । समाना चासृत्युपक्रमाद्विद्वदविदुषोः उत्क्रान्तिः इत्युक्तम् । तामिदानीं सृत्युपक्रमं दर्शयति । तस्योपसंहृतवागादिकलापस्य उच्चिक्रमिषवो विज्ञानात्मनः ओक आयतनं हृदयम् । 'स एतास्तेजोमात्राः समभ्याददानो हृदयमेवान्ववक्रामति ' इति श्रुतेः ॥**

**भाष्यार्थ**—प्रसंगप्राप्त परविद्येविषयींचा विचार समाप्त झाला, आतां सूत्रकार अपरविद्याविषयच विचाराला पुढें अनुवृत्त करितात. [–आतां '**समाना च॰**' इत्यादि भाष्यानें गतार्थाचा अनुवाद करून या अधिकरणाचें तात्पर्य सांगतात–] ='मार्गाच्या आरंभापर्यंत विद्वान् व अविद्वान् यांची उत्क्रान्ति समान आहे,' असें सांगितलें.–पृ. ७०५–आतां तोच गतीचा उपक्रम दाखवितात. [–सूत्रभागाच्या व्याख्यानाच्या द्वारा अधिकरणाचा विषय सांगतात–]=' तत् '–ज्यानें आपल्या वागादि इंद्रियसमूहाचा उपसंहार केला आहे, अशा उत्क्रमण करण्याची इच्छा करणाऱ्या विज्ञानात्म्याचें ' ओकः '–आयतन हृदय आहे. [–हृदय हें त्याचें आयतन–स्थान आहे, याविषयीं ' स एताः॰ ' इत्यादि भाष्यानें प्रमाण सांगतात–] =कारण तो जीवात्मा या तेजोमात्रांचें–इंद्रियांचें ग्रहण–उपसंहार करणारा असा होत्साता हृदयस्थानासच प्राप्त होतो, अशी श्रुति याविषयीं प्रमाण आहे. [–'हृदय

हें जीवाचें आलंबन असूं दे, तरी पण त्यापासून काय सिद्ध झालें ' अशी आशंका घेऊन ' तदग्र० ' इत्यादि भाष्यानें म्हणतात–]

**भाष्यं—तदग्रप्रज्वलनपूर्विका चक्षुरादिस्थानापादाना चोत्क्रान्तिः श्रूयते— ' तस्य हैतस्य हृदयस्याग्रं प्रद्योतते तेन प्रद्योतेनैष आत्मा निष्क्रामति चक्षुष्टो वा मूर्ध्नो वान्येभ्यो वा शरीरदेशेभ्यः ' इति ॥**

**भाष्यार्थ**—त्या हृदयाच्या अग्राचें प्रज्वलन होतें. त्या हृदयाग्रप्रज्वलनपूर्वक चक्षुरादिस्थानापासून त्याची उत्क्रान्ति "त्याच या हृदयाचें अग्र प्रकाशित होतें, त्या प्रद्योतानें हा आत्मा चक्षूपासून किंवा मूर्धेपासून किंवा दुसऱ्या शरीरप्रदेशापासून निष्क्रमण करितो "–बृ. ४. ४. २.–अशी श्रुति आहे. [ ' अदृष्टानें प्राप्त झालेल्या प्राप्तव्य स्थानाचें ज्ञान ' हाच प्रद्योत–प्रकाश आहे.–' चक्षुष्टो वा '– अशी द्वाराच्या अनियमाची श्रुति असल्यामुळें व त्या मूर्धन्यनाडीनें वर गमन करणारा अमृतत्वास प्राप्त होतो, अशी विशेष श्रुति असल्यामुळें **' सा किं० '** इत्यादि भाष्यानें संशय सांगतात–]

**भाष्यं—सा किमनियमेनैव विद्वदविदुषोर्भवति । अथास्ति कश्चिद्विदुषो विशेषनियम इति विचिकित्सायां श्रुत्यविशेषादनियमप्राप्तावाचष्टे–समानेऽपि हि विद्वदविदुषोर्हृदयाग्रप्रद्योतने तत्प्रकाशितद्वारवत्त्वे च मूर्धस्थानादेव विद्वान्निष्क्रामति । स्थानान्तरेभ्यस्त्वितरे ॥**

**भाष्यार्थ**—'विद्वान् व अविद्वान् यांची ती उत्क्रांति काय अनियमानेंच होते कीं विद्वानाच्या उत्क्रांतीविषयीं कांहीं विशेष नियम आहे ' असा संशय आला असतां [ " उपासक व अनुपासक यांची उत्क्रांति कांहीं नियमावांचून कोणत्याहि एखाद्या द्वारानें होते किंवा उपासकांच्या द्वाराचा कांहीं नियम आहे?" असा या विमर्शाचा–विचाराचा अर्थ आहे. येथें अपरब्रह्मोपासकांच्या फलासाठीं उत्क्रांतीच्या द्वाराचा नियम सांगितलेला असल्यामुळें याच्या पादादिसंगति आहेत. पूर्वपक्षांत 'ध्यानकृत अतिशयाचें शून्यत्व' व सिद्धान्तांत 'ध्यानामुळें प्राप्त होणाऱ्या अतिशयाची सिद्धि,' असा फलभेद गृहीत धरून–' **श्रुति०**' इत्यादि भाष्यानें पूर्वपक्ष सांगतात–]= श्रुतीच्या अविशेषामुळें अनियमाची प्राप्ति झाली असतां [–' चक्षुष्टो वा ' अशी अविशेष श्रुति असल्यामुळें ' तो विज्ञानात्मा शरीराच्या कोणत्याहि अंगापासून उत्क्रमण करितो ' अशा या प्राप्त झालेल्या पूर्वपक्षाचा अनुवाद करून सिद्धान्त सांगतात–]=' **आचष्टे** '–असा पूर्वपक्ष प्राप्त झाला असतां सूत्रकार सिद्धान्त सांगतात. यद्यपि विद्वान् व अविद्वान् यांच्या हृदयाग्राचें

प्रद्योतन व त्या प्रद्योतानें प्रकाशित झालेलें उत्क्रांतीचें द्वारवत्त्व हीं दोन्हीं समान असलीं तरी विद्वान् मूर्धस्थानापासूनच निष्क्रमण करितो. पण इतर अविद्वान् स्थानांतरांपासून उत्क्रमण करितात. [–उत्क्रमण करण्याची इच्छा करणाऱ्या त्या विद्वानाचें व अविद्वानाचें जें 'ओकः'–हृदय–आयनत–स्थान, त्याचें प्रद्योतसंज्ञक प्रज्वलन प्रथम होतें. त्या प्रद्योतानें ज्याचें द्वार प्रकाशित केलें आहे, असा विद्वान् व अविद्वान् उत्क्रांत होतो असें जरी मानिलेलें आहे तरी त्या दोघांच्या उत्क्रांतीच्या अपादानव्यवस्थेविषयीं वादी 'कुतः०' इत्यादि भाष्यानें हेतु विचारितो–]

**भाष्यं—कुतः । विद्यासामर्थ्यात् । यदि विद्वानपीतरवद् यतःकुतश्चिद्देहदेशादुत्क्रामेद् नैवोत्कृष्टं लोकं लभेत । तत्र अनर्थिकैव विद्या स्यात् । तच्छेषगत्यनुस्मृतियोगाच्च । विद्याशेषभूता च मूर्धन्यनाडीसंबद्धा गतिरनुशीलयितव्या विद्याविशेषेषु विहिता । तामभ्यस्यंस्तयैव प्रतिष्ठत इति युक्तम् ॥**

**भाष्यार्थ—**कोणत्या कारणानें ? [–'**विद्यासामर्थ्यात्०**' इत्यादि भाष्यानें सूत्रोक्त हेतूला अवतरण देऊन व्यतिरेकद्वारा त्याचें विवरण करितात–]=विद्यासामर्थ्यामुळें, जर विद्वान्हि अविद्वानाप्रमाणें कोणत्याहि एखाद्या शरीरप्रदेशापासून उत्क्रमण करील तर तो उत्कृष्ट लोकाला प्राप्त होणारच नाहीं, आणि असें झालें असतां विद्या अनार्थिका–व्यर्थच होईल. [–" अहोपण, स्थानांतरापासूनहि उत्क्रमण करणारा उत्कृष्ट फलास प्राप्त होईल ? " अशी आशंका घेऊन '**तच्छेष०**' इत्यादि सूत्रावयवाचें व्याख्यान करितात–]=' आणि तच्छेष गतीच्या अनुस्मृतियोगामुळें'–आणि विद्याशेषभूत–विद्यांगभूत, मूर्धन्य नाडीशीं संबंध ठेवणारी गति अनुशीलयितव्य–चिंतनीय म्हणून विद्याविशेषांमध्यें विहित आहे. तिचा अभ्यास करणारा–त्या विद्यांगभूत गतीचें सतत अनुचिंतन करणारा उपासक त्याच गतीनें प्रतिष्ठित होतो–गमन करितो, असेंच समजणें युक्त आहे. [–स्थानान्तरापासून निघून जाणाऱ्या अविद्वानांनाहि विशिष्ट लोकप्राप्ति होते, असें झाल्यास विशिष्ट गतीच्या चिंतनाचें विधान व्यर्थ होईल, असा याचा भावार्थ.–'**तस्मात्०**' इत्यादि भाष्यानें अवशिष्ट सूत्रभागाचें फलोक्तिपरत्वानें व्याख्यान करितात–]

**भाष्यं—तस्मात् हृदयालयेन ब्रह्मणा सूपासितेनानुगृहीतस्तद्भावं समापन्नो विद्वान्मूर्धन्यैव शताधिकया शतादतिरिक्तया एकशततम्या नाड्या निष्क्रामति । इतराभिरितरे । तथा हि हार्दविद्यां प्रकृत्य समामनन्ति– 'शतं चैका च हृदयस्य नाड्यस्तासां मूर्धानमभिनिःसृतैका । तयोर्ध्वमायन्नमृतत्वमेति विष्वङ्ङन्या उत्क्रमणे भवन्ति' इति ॥ १७ ॥ (९)**

**भाष्यार्थ**---म्हणून चांगल्याप्रकारें उपासना केलेल्या हृदय हें ज्याचें आलय-स्थान आहे, अशा ब्रह्माकडून अनुगृहीत झालेला म्ह० तद्भावास प्राप्त झालेला विद्वान् मूर्धन्य,'शताधिक'-शतनाडीहून अतिरिक्त अशा एकशें एकाव्या नाडीनें शरीरांतून बाहेर जातो व इतर-अविद्वान् इतर नाड्यांनीं निष्क्रमण करितात. [-'**तथा हि०**' इत्यादि भाष्यानें उक्त व्यवस्थेविषयीं श्रुति सांगतात-]=आणि तसें हार्दविद्येचें -हृदयस्थ ब्रह्मोपासनेचें प्रकरण आरंभून छंदोग " हृदयाच्या शंभर व एक अशा एकशेंएक नाड्या आहेत. त्यांतील एक नाडी मूर्धस्थानाकडे प्रवृत्त झाली आहे. त्या नाडीनें वर जाणारा अमृतत्वास प्राप्त होतो. बाकीच्या तिरकस पसरलेल्या नाड्या उत्क्रमणासच कारण होतात, संसारगमनद्वार भूत होतात"-छां. ८.६.६. असें समामनन-कथन करितात. १७.-सु. ब्र. ४७०-७१. ( ९ ).

( १०. रश्म्यधिकरण. सू. १८-१९. )

--नाडीच्या द्वारा बाहेर पडलेल्या जीवाचें हें जें रश्म्यनुसारित्व तें रात्रींहि तुल्य आहे असें '**रश्म्यनुसारी**' या सूत्रानें सांगतात--

**सूत्रं---रश्म्यनुसारी** ॥ १८

**सूत्रार्थ**---दिवसा किंवा रात्रीं मृत झालेला जीव रश्म्यनुसारी होतो १८.-सु. ब्र. ४७२. [-'**अस्ति०**' इत्यादि भाष्यानें प्रकरणशोधनपूर्वक विषय सांगतात-]

**भाष्यं---अस्ति हार्दविद्या-'अथ यदिदमस्मिन्ब्रह्मपुरे दहरं पुंडरीकं वेश्म' इत्युपक्रम्य विहिता । तत्प्रक्रियायां 'अथ या एता हृदयस्य नाड्यः' इत्युपक्रम्य सप्रपंचं नाडीरश्मिसंबंधमुक्त्वोक्तं 'अथ यत्रैतदस्माच्छरीरादुत्क्रामत्यथैतैरेव रश्मिभिरूर्ध्वमाक्रमते' इति । पुनश्चोक्तम् 'तयोर्ध्वमायन्नमृतत्वमेति' इति । तस्माच्छताधिकया नाड्या निष्क्रामन्रश्म्यनुसारी निष्क्रामतीति गम्यते ॥**

**भाष्यार्थ**---"आतां हें जें या ब्रह्मपुरांत अल्प कमलगृह आहे "-छां.८.१.१.-असा उपक्रम करून हार्दविद्या-हृदयस्थ ब्रह्माची उपासना विहीत आहे. ' तिच्या प्रकरणामध्यें 'आतां या ज्या हृदयाच्या नाड्या आहेत'-छां.८.६.१.-असा उपक्रम करून नाड्या व रश्मि यांचा संबंध सविस्तर सांगून ' प्रारब्ध कर्मवासनेनंतर जेव्हां हा जीव असें उत्क्रमण करितो, तेव्हां याच रश्मींनीं-किरणांनीं वर आक्रमण करितो' असें सांगितलें आहे.-छां.८.६.५-आणि पुनरपि 'त्या मूर्धन्य नाडीनें वर जाणारा अमृतत्वास प्राप्त होतो.'-छां.८.६.६-असें सांगितलें आहे. [पहिल्या श्रुतींतील ' अथ-'शब्द दहरविद्येच्या उपक्रमार्थ आहे. दुसऱ्या श्रुतींतील ' अथ-' शब्द रश्मि व नाडी यांच्या संबंधप्रदर्शनाच्या प्रारंभार्थ आहे. तिसऱ्या श्रुतींतील

'अथ-'शब्द आरब्धकर्मवासनेच्या आनंतर्यासाठीं आहे. त्यांतीलच 'एतत्' हें क्रियाविशेषण आहे व दुसरा 'अथ' हा शब्द 'तेव्हां' या अर्थी आहे. कारण याच श्रुतीत पूर्वी 'यत्र' या शब्दानें काल सांगितला आहे.-याप्रमाणें प्रकरणशुद्धीनें प्राप्त झालेल्या अर्थाचें निगमन 'तस्मात्०' इत्यादि भाष्यानें करितात-]=म्हणून शंभर नाड्यांहून अधिक असलेली जी मूर्धन्यनाडी तिनें शरीरांतून निष्क्रमण करणारा रश्म्यनुसारी होऊन निष्क्रमण करितो, असें अवगत होतें. [-'मूर्धन्यनाडीनें शरीरांतून निघणाऱ्या ब्रह्मवेत्त्याचें हें रश्म्यनुसारित्व काय दिवसाच आहे कीं, दिवसा व रात्रीं आहे.' असा रश्मि व नाडी यांच्या संबंधाचा कालविशेष श्रुत नसल्यामुळें व रात्रीं किरणांचा अभाव अवगत होत असल्यामुळें, 'तत् किं०' इत्यादि भाष्यानें संशय सांगतात-]

**भाष्यं—तत्किमविशेषेणैवाहनि रात्रौ वा म्रियमाणस्य रश्म्यनुसारित्वं। आहोस्विदहन्येव। इति संशये सति। अविशेषश्रवणादविशेषेणैव तावद्रश्म्यनुसारीति प्रतिज्ञायते ॥ १८ ॥**

**भाष्यार्थ**—'तें रश्म्यनुसारित्व अविशेषानेंच दिवसा किंवा रात्रीं मरण पावणाऱ्या जीवाचें आहे किंवा दिवसा मरण पावणाऱ्याचेंच आहे!' असा संशय आला असतां [-येथें फलप्राप्तीसाठीं ब्रह्मनाडीनें गमन करणाऱ्या अपरब्रह्मोपासकाच्या रश्म्यनुसारित्वाचा अविशेष सांगितलेला असल्यामुळें याची पादादिसंगति आहे. पूर्वपक्षांत 'रात्रीं मृत झालेल्यांची दिवसाच्या आगमनाच्या अपेक्षेनें फलप्राप्ति,' व सिद्धान्तांत 'जेवढ्या वेळांत मन आदित्यास जाऊन पोचतें तेवढ्या वेळांत तो आदित्यलोकीं जातो, अशी त्वराश्रुति असल्यामुळें त्याला त्याचवेळीं फलप्राप्ति होते,' असें मानून 'अविशेष०' इत्यादि भाष्यानें सिद्धान्ताची प्रतिज्ञा करितात-]=अविशेषश्रवणामुळें 'दिवसा व रात्रीं मृत झालेला अपरब्रह्मोपासक अविशेषानेंच-एकसारखाच रश्म्यनुसारी होतो' अशी प्रतिज्ञा केली जाते. १८. [-सूत्रावयवानें पूर्वपक्ष करून सूत्रावयवानेंच त्याचा परिहार 'निशि नेति चेन्न०' इत्यादि सूत्रानें करितात-]

**सूत्रं-निशि नेति चेन्न संबंधस्य यावद्देहभावित्वाद्दर्शयति च ॥ १९॥१०**

**सूत्रार्थ**—'रात्रीं मृत झालेला रश्म्यनुसारी होत नाहीं. कारण त्यावेळीं सूर्यकिरण नसतात' असें म्हणाल तर तें बरोबर नाहीं. कारण नाड्या व रश्मि यांचा संबंध देह जिवंत असेपर्यंत असतो आणि 'अमुष्मादादित्यात्०' ही श्रुति तसें दाखविते. १९ (१०)-[-'अस्ति०' इत्यादि भाष्यानें त्यांतील पूर्वपक्षाचें विवरण-]

**भाष्यं—अस्त्यहनि नाडीरश्मिसंबंध इत्यहनि मृतस्य स्याद्रश्म्यनुसारित्वम्। रात्रौ तु प्रेतस्य न स्यात्। नाडीरश्मिसंबंधविच्छेदात्। इति चेन्न। नाडीरश्मिसंबंधस्य यावद्देहभावित्वात्। यावद्देहभावी हि शिराकिरणसंपर्कः। दर्शयति चैतमर्थं श्रुतिः–' अमुष्मादादित्यात्प्रतायन्ते ता आसु नाडीषु सृप्ता आभ्यो नाडीभ्यः प्रतायन्ते तेऽमुष्मिन्नादित्ये सृप्ताः ' इति ॥**

**भाष्यार्थ**—'दिवसा नाड्या व रश्मि यांचा संबंध असतो, त्यामुळें दिवसा मृत झालेल्याचें रश्म्यनुसारित्व होईल, पण रात्रीं मृत झालेल्याचें होणार नाहीं. कारण रात्रीं नाडी व रश्मि यांच्या संबंधाचा विच्छेद होतो, ' असें जर म्हणाल तर [–' **न०** ' इत्यादि भाष्यानें सिद्धान्ताला अवतरण देऊन त्याचें व्याख्यान–] =नाहीं, रात्रीं नाडी-रश्मिसंबंधविच्छेद होत नाहीं. कारण नाडी व रश्मि यांच्या संबंधाला यावद्देहभावित्व आहे. देह असेपर्यंत हा शिरा-किरणसंपर्क असतो–शिरा व सूर्यकिरण यांचा संबंध देह असेपर्यंत रहाणारा आहे. [–शिरा म्ह० नाड्या व रश्मि यांच्या संबंधाला यावद्देहभावित्व आहे, याविषयीं प्रमाणोक्तिपर सूत्रभाग घेऊन त्याचें ' **दर्शयति०** ' इत्यादि भाष्यानें व्याख्यान–]=आणि श्रुति ' त्या आदित्यलोकापासून जे किरण अविच्छिन्न पसरलेले असतात, ते या नाड्यांमध्यें गेलेले असतात आणि जे या नाड्यांपासून निघतात ते त्या आदित्यांत गेलेले आहेत. '–छां. ८. ६. २.–असा हाच अर्थ दाखविते. [–" नाडी-रश्मिसंबंधाला श्रौतत्व जरी असलें तरी यावद्देहभावित्व–देह असेपर्यंत असणें कसें ?" अशी आशंका घेऊन ' **निदाघसमये०** ' इत्यादि भाष्यानें युक्ति दाखवितात–]

**भाष्यं—निदाघसमये च निशास्वपि किरणानुवृत्तिरुपलभ्यते, प्रतापादिकार्यदर्शनात्। स्तोकानुवृत्तेस्तु दुर्लक्ष्यत्वं ऋत्वंतररजनीषु शैशिरेष्विव दुर्दिनेषु। ' अहरेवैतद्रात्रौ दधाति ' इति चैतदेव दर्शयति। यदि च रात्रौ प्रेतो विनैव रश्म्यनुसारेणोर्ध्वमाक्रमेत, रश्म्यनुसारानर्थक्यं भवेत्। न ह्येतद्विशिष्याधीयते, यो दिवा प्रैति स रश्मीनपेक्ष्योर्ध्वमाक्रमते यस्तु रात्रौ सोऽनपेक्ष्यैवेति ॥**

**भाष्यार्थ**—आणि ग्रीष्मसमयीं रात्रींहि किरणांची अनुवृत्ति उपलब्ध होते. कारण त्यांचें प्रतापादि कार्य प्रत्यक्ष अनुभवास येतें. [ चंद्रांतील प्रकाशाचा सूर्यकिरणांवाचून असंभव असल्यामुळें रात्रीं सूर्यकिरण असतात, हें सांगण्यासाठीं 'प्रतापादि' येथील 'आदि-'पद आहे. कारण चंद्राचा प्रकाश हा चंद्राचाच प्रकाश नव्हे, कारण त्याला अम्मयत्व आहे. त्यामुळें त्याच्या स्वाभाविक प्रकाशाचा असंभव आहे.–' तर मग शिशिरादि ऋतूंतहि रात्रीं किरणांची अनुवृत्ति उपलब्ध होईल'

अशी आशंका घेऊन '**स्तोकानुवृत्तेः०**' इत्यादि भाष्यानें म्हणतात–]=पण शिशिरऋतूंतील दुर्दिनांमध्यें–मेघाच्छादित झालेल्या दिवसांमध्यें किरणांच्या अल्पानुवृत्तीमुळें जशी त्यांची उपलब्धि होत नाहीं, तसेंच इतर ऋतूंतील रात्रीं अल्पानुवृत्तीमुळें त्यांना दुर्लक्ष्यत्व आहे. [–' रात्रीं जो ताप अनुभवास येतो, तो सूर्यच रात्रीं धारण करितो, ' असें धारणकथन अल्परश्म्यनुवृत्तीच्या अभिप्रायानें आहे, या उक्त अर्थी श्रुत्यंतर सांगतात–]=' **अहरेव०** '–सूर्यच हा ताप रात्रीं धारण करितो, अशी ही श्रुति हेंच दाखविते. [–' जितक्या अवकाशांत मन आदित्याला जाऊन पोंचतें तेवढ्याच अवकाशांत तो सूर्याला जाऊन पोंचतो ' अशी ' नैरपेक्ष्यश्रुति ' असल्यामुळें ' रात्रीं मृत झालेल्या जीवाला रश्मीची अपेक्षा नाहीं ' अशी आशंका घेऊन ' **यदि०** ' इत्यादि भाष्यानें आचार्य म्हणतात–]=आणि जर रात्रीं मृत झालेला रश्म्यनुसारावांचूनच वर आक्रमण करील तर रश्म्यनुसारकथनाला आनर्थक्य प्राप्त होईल. [–' तें रश्म्यनुसार-कथन दिवामरणाला उद्देशून आहे, ' अशी आशंका घेऊन ' **न हि०**' इत्यादि भाष्यानें म्हणतात–]=कारण 'जो दिवसा मरण पावतो तो रश्मींची अपेक्षा करून वर गमन करितो. पण जो रात्रीं मरण पावतो तो त्यांची अपेक्षा न करितां ऊर्ध्व गमन करितो ' असें हें विशेषकथन श्रुति करीत नाहीं. [–' तर मग रश्म्यनु-सारित्वश्रुतीच्या अर्थवत्त्वासाठीं रात्रीं मरण पावलेल्या विद्वानाचा फलसंबंध नाहीं ' अशी आशंका घेऊन ' **अथ तु०** ' इत्यादि भाष्यानें सांगतात–]

**भाष्यं––अथ तु विद्वानपि रात्रिप्रायणापराधमात्रेण नोर्ध्वमाक्रमेत। पाक्षि-कफला विद्येत्यप्रवृत्तिरेव तस्यां स्यात्। मृत्युकालानियमात्। अथापि रात्रावु-परतोऽहरागममुदीक्षेत। अहरागमेऽप्यस्य कदाचिदरश्मिसंबंधार्हं शरीरं स्यात्पा-वकादिसंपर्कात्। ' स यावत्क्षिप्येन्मनस्तावदादित्यं गच्छति ' इति च श्रुति-रनुदीक्षां दर्शयति। तस्माद् अविशेषेणैवेदं रात्रिंदिवं रश्म्यनुसारित्वम्॥१९(१०)**

**भाष्यार्थ**—पण, आतां विद्वान्हि ' रात्रीं मरण येणें ' या एवढ्याच अपराधा-मुळें जर ऊर्ध्व गमन करणार नाहीं तर विद्या 'पाक्षिकफला'–विकल्पानें फल देणारी आहे, असें होईल आणि त्यामुळें तिच्यामध्यें कोणाचीच प्रवृत्ति होणार नाहीं. [ नित्यवत् फलसंबंधित्वानें विद्येचें विधान केलेलें असल्यामुळें तिला पाक्षिक-फलत्व नाहीं, असा याचा भावार्थ.–' तर मग, विद्वानाला दिवसाच मरण येतें, असा नियम असल्यामुळें उक्त दोषाची निवृत्ति होते ! ' असें वादी म्हणेल म्हणून आचार्य म्हणतात–]=' **मृत्युकालानियमात्** '–मृत्युकालाचा कांहीं नियम

नाहीं–' विद्वान् दिवसाच मरतो ' असा कांहीं नियम नाहीं. [–" तर मग रात्रीं मरण पावलेलाहि विद्वान् रश्मिद्वारा ऊर्ध्व गमनासाठीं सूर्योदय होईपर्यंत वाट पहात राहील " अशी आशंका घेऊन '**अथापि०**' इत्यादि भाष्यानें म्हणतात–] =आतां 'रात्रीं मरण पावलेला अहरागमाची–सूर्योदयाची उदीक्षा–प्रतीक्षा करील' असेंहि वादी म्हणेल. पण कदाचित् सूर्योदय झाला असतांहि त्याचें शरीर अग्न्यादिकांच्या संपर्कामुळें रश्मिसंबंधाला योग्य होणार नाहीं. [ अग्न्यादि येथील ' आदि-'शब्दानें गर्तादिकांचें ग्रहण केलें जातें.–' यावत् ' व ' तावत् ' या अनुबंधांमुळें व नैरपेक्ष्यश्रुतीशीं विरोध येत असल्यामुळें ही प्रतीक्षाकल्पना योग्य नाहीं, असें ' **स यावत्०** ' इत्यादि वाक्यानें सांगतात–]=आणि ' जेवढ्या वेळांत मन आदित्याला जाऊन पोंचतें तितक्याच वेळांत तो आदित्याला जाऊन पोंचतो' –छा. ८. ६. ५.–ही श्रुति अनुदीक्षा–अप्रतीक्षा दाखविते. [–'**तस्मात्०**'इत्यादि भाष्यानें अपरब्रह्मवेत्त्याच्या रश्म्यनुसारित्वाच्या अविशेषाचा उपसंहार करितात–] =म्हणून तें हें रात्रीं व दिवसा अविशेषानेंच रश्म्यनुसारित्व आहे. १९ (१०)

( ११. **दक्षिणायनाधिकरण.** सू. २०-२१. )

––' पूर्वोक्त युक्तींनींच रात्रीप्रमाणेंच दक्षिणायनांतहि मृत झालेल्या सगुणब्रह्मवेत्त्याची फलप्राप्ति अविशिष्ट–समान आहे ' असें ' **अतश्च०** ' इत्यादि सूत्रानें सांगतात––

## सूत्र—अतश्चायनेऽपि दक्षिणे ॥ २०

**सूत्रार्थ**––आणि कालान्तराची अपेक्षा करणें अनुपपन्न असल्यामुळें व विद्येचा नित्यवत् फलसंबंध श्रुत असल्यामुळें दक्षिणायनांतहि मृत झालेला विद्वान् फलास प्राप्त होतोच. [ दक्षिणायनांत मृत झालेला विद्वान् हा या अधिकरणाचा विषय आहे. ' तो काय, विद्याफलाला प्राप्त होत नाहीं कीं प्राप्त होतो ?' असा उत्तरायणमरणाच्या प्राशस्त्याची प्रसिद्धि व नित्यवत्फलसंबंधानें विद्येचें विधान या दोन कारणांनीं संदेह आला असतां विद्याफलाला अवश्यंभावित्व आहे, असें येथें सिद्ध केलेलें असल्यामुळें याच्या पादादिसंगति आहेत. पूर्वपक्षांत ' दक्षिणायनामध्यें मृत झालेल्या विद्वानाच्या फलाचा अभाव असल्यामुळें उत्तरायणमरणासाठीं यत्न करावा ' व सिद्धान्तांत ' फलाभाव या हेतूच्या असिद्धीमुळें उत्तरायणमरणार्थ केलेला प्रयत्न फारसा उपयोगी पडत नाहीं ' अशा अभिप्रायानें–' **अत एव०** ' इत्यादि भाष्यानें सिद्धान्त सांगतात–]

**भाष्यं—अत एव चोदीक्षानुपपत्तेः अपाक्षिकफलत्वाच्च विद्यायाः । अनियत-कालत्वाच्च मृत्योः । दक्षिणायनेऽपि म्रियमाणो विद्वान्प्राप्नोत्येव विद्याफलम् । उत्तरायणमरणप्राशस्त्यप्रसिद्धेः भीष्मस्य च प्रतीक्षादर्शनात् ' आपूर्यमाणपक्षा-द्यान्षडुदङ्ङेति मासांस्तान् ' इति च श्रुतेः अपेक्षितव्यमुत्तरायणं । इती-मामाशंकामनेन सूत्रेणापनुदति ॥**

**भाष्यार्थ**—' अतः च '– म्हणूनच–कालाच्या प्रतीक्षेची अनुपपत्ति असल्या-मुळें, विद्येला अपाक्षिकफलत्व असल्यामुळें आणि मृत्यूला अनियतकालत्व अस-ल्यामुळें दक्षिणायनामध्येंहि मरण पावणारा विद्वान् विद्याफलाला प्राप्त होतोच. [–याप्रमाणें पूर्वाधिकरणन्यायानें सिद्धान्त सांगून ' **उत्तरायण०** ' इत्यादि भाष्यानें पूर्वपक्ष सांगतात–]=" अहोपण, उत्तरायणांतील मरणाच्या प्रशस्तत्वाची प्रसिद्धि असल्यामुळें, आणि भीष्माची उत्तरायणप्रतीक्षा महाभारतांत उपलब्ध होत असल्यामुळें, आणि ' शुक्लपक्षापासून ज्या सहा महिन्यांत आदित्य उत्तरेस जातो त्या मासांस '–छां.४.१५.५.–अशी श्रुति असल्यामुळें विद्वानाच्या फलप्राप्तीस उत्तरायण अपेक्षितव्य आहे, त्याची अपेक्षा करणें अत्यंत अवश्य आहे." [–'श्रुति, स्मृति व लोकप्रसिद्धि यांवरून दक्षिणायनामध्यें मृत झालेल्या विद्वानाला फलप्राप्ति होत नाहीं,' अशा या पूर्वपक्षाचा अनुवाद करून ' **इतीमां०** ' इत्यादि भाष्यानें सिद्धान्त सांगतात–]=अशा या शंकेचा या सूत्रानें परिहार करितात. [–' **प्राश-स्त्य०** ' इत्यादि भाष्यानें त्या परिहाराचा प्रकार दाखवितात–]

**भाष्यं—प्राशस्त्यप्रसिद्धिरविद्वद्विषया । भीष्मस्य प्रतिपालनमाचारपरिपा-लनार्थं पितृप्रसादलब्धस्वच्छंदमृत्युताख्यापनार्थं च । श्रुतेस्त्वर्थं वक्ष्यति ' आति-वाहिकास्तल्लिंगात् ' इति ॥ २० ॥ ननु च– " यत्र काले त्वनावृत्तिमावृत्तिं चैव योगिनः । प्रयाता यान्ति तं कालं वक्ष्यामि भरतर्षभ " इति कालप्राधा-न्येनोपक्रम्य अहरादिकालविशेषः स्मृतावनावृत्तये नियतः । कथं रात्रौ दक्षिणायने वा प्रयातोऽनावृत्तिं यायादिति । अत्रोच्यते—**

**भाष्यार्थ**—उत्तरायणाच्या प्राशस्त्याची प्रसिद्धि अविद्वद्विषय आहे. म्ह० तिचा विषय अविद्वान् आहे. [–आतां ' भीष्माच्या प्रतीक्षादर्शनामुळें ' असें जें पूर्वपक्षांत म्हटलें आहे त्याविषयीं ' **भीष्मस्य०** ' इत्यादि भाष्यानें म्हणतात–] =भीष्माचें उत्तरायणप्रतिपालन आचाराच्या प्रतिपालनासाठीं आहे. [ ' **उत्तरायण मरण प्रशस्त आहे** ' असा हा अविद्वानांचा अभिज्ञा-अभिवदनरूप व्यवहार आहे. ' त्याच्या प्रतिपालनद्वारा त्यांना सदाचारामध्यें प्रवृत्त करण्यासाठीं भीष्माचें

हें कालप्रतीक्षण आहे' असा याचा भावार्थ.--भीष्माच्या कालप्रतीक्षेचें मतांतर सांगतात-]='पितृप्रसाद०'-व पित्याच्या प्रसादामुळें प्राप्त झालेल्या स्वच्छंद मरणाचें प्रख्यापन करण्यासाठीं भीष्माचें हें कालप्रतीक्षण आहे.[-"अहोपण, उत्तरायणाचें मार्गपर्वत्वानें अपेक्षणीयत्व श्रुत आहे, असें सांगितलें आहे, तेव्हां दक्षिणायनामध्यें मृत झालेला विद्वान् विद्याफलाला कोठून प्राप्त होणार ?" अशी आशंका घेऊन 'श्रुतेस्तु०' इत्यादि भाष्यानें सांगतात-]=पण त्या श्रुतीचा अर्थ 'आतिवाहिकास्तल्लिंगात्'-ब्र.सू.४.३.४-या सूत्रांत पुढें सांगतील. [-ती श्रुति कालवादिनी नाहीं, तर आतिवाहिकी देवता हा तिचा अर्थ आहे, असा या सूत्राचा भावार्थ आहे.] २०. [-"अहोपण, या श्रुतींत प्राधान्यानें कालच सांगितला जातो. आतिवाहिकी देवता सांगितल्या जात नाहींत" अशी स्मृतीचा आश्रय करून 'ननु०' इत्यादि भाष्यानें शंका-]="अहोपण,'ज्या कालीं मरण पावलेले योगी अनावृत्तीला व आवृत्तीला प्राप्त होतात तो काल, हे अर्जुना, मी तुला सांगेन.'-गी. भा. ८. २३. पृ. ६७१-असा कालप्राधान्यानें उपक्रम करून दिवस, शुक्लपक्ष इत्यादि कालविशेष स्मृतीमध्यें अनावृत्तीसाठीं-अपुनर्जन्मासाठीं नियत केला आहे. तेव्हां रात्रीं किंवा दक्षिणायनांत मृत झालेला योगी अनावृत्तीला कसा प्राप्त होईल?" असा यावर आक्षेप येतो. [-त्याच्या उत्तरत्वानें सूत्राला अवतरण देतात-]= 'अत्रोच्यते०'-या शंकेचें उत्तर 'योगिनः०' इत्यादि सूत्रानें दिलें जातें.

**सूत्रं--योगिनः प्रति च स्मर्यते स्मार्ते चैते ॥ २१ ॥ ( ११ )**

**सूत्रार्थ**—स्मार्त विद्योपासकांना-योग्यांना उद्देशून हा 'अहः शुक्लपक्ष' इत्यादि कालविशेषच स्मृत आहे. कारण हे सांख्य-योग स्मार्तच आहेत, श्रौत नव्हेत. २१. ( ११ )-सु. ब्र. ४७४-[-स्मृत्युक्त उपासनेमध्यें हा कालभेदाचा विनियोग स्मार्त मानिला जातो. कारण त्याला स्मृतिसांनिध्य आहे, असें सूत्राचें व्याख्यान 'योगिनः० ' इत्यादि भाष्यानें करितात-]

**भाष्यं—योगिनः प्रति चायं अहरादिकालविनियोगोऽनावृत्तये स्मर्यते । स्मार्ते चैते योगसांख्ये । न श्रौते । अतो विषयभेदात्प्रमाणविशेषाच्च नास्य स्मार्तस्य कालविनियोगस्य श्रौतेषु विज्ञानेष्ववतारः ॥**

**भाष्यार्थ**—आणि हा अहरादि-कालाचा विनियोग योग्याच्या अनावृत्तीसाठीं स्मृत आहे. [-"अहोपण, हा योगी दहरादि उपासकच कां नव्हे ?" 'स्मार्ते च० ' इत्यादि भाष्यानें उत्तर-]=आणि ते सांख्य-योग स्मार्त आहेत, श्रौत नव्हेत,

[-अग्निहोत्रादि नित्यकर्म ईश्वराराधनरूपानें जें अनुष्ठिलें जातें तो योग. कारण कीं, ' कर्मफलाचा आश्रय न करितां जो कर्तव्य कर्म करितो तो संन्यासी व योगी आहे '-भ. गी. ६. १.-अशी स्मृति आहे. ' इंद्रियें विषयांमध्यें प्रवृत्त होतात, आत्मा नाहीं. '-भ. गी. ५. ९.-अशा धारणापूर्वक अकर्तृत्वाचा अनुभव हेंच सांख्य; असा सांख्य व योग यांतील भेद आहे.-याप्रमाणें श्रौत दहरादि उपासनांना स्मृतिविषयत्व नाहीं, असें झालें असतां ' अतः० ' इत्यादि भाष्यानें फलित सांगतात-]=यास्तव विषयभेदामुळें व प्रमाणविशेषामुळें या स्मार्त कालविनियोगाची श्रौत उपासनांमध्यें प्राप्ति होत नाहीं. [-" अहोपण, श्रुति व स्मृति यांचें भिन्नार्थत्व प्रत्यभिज्ञेच्या विरुद्ध आहे" अशी 'ननु०' इत्यादि भाष्यानें शंका-]

**भाष्यं—ननु " अग्निर्ज्योतिरहः शुक्लः षण्मासा उत्तरायणम् " । " धूमो रात्रिस्तथा कृष्णः षण्मासा दक्षिणायनम् " इति च श्रौतावेतौ देवयानपितृयाणौ प्रत्यभिज्ञायेते स्मृतावपीति । उच्यते— " तं कालं वक्ष्यामि " इति स्मृतौ कालप्रतिज्ञानाद्विरोधमाशंक्य परिहार उक्तः । यदा पुनः स्मृतावप्यग्न्याद्या देवता एवातिवाहिक्यो गृह्यन्ते । तदा न कश्चिद्विरोध इति ॥ २१ ॥ ( ११ )**

इति श्रीमत्परमहंसपरिव्राजकाचार्यश्रीमच्छंकरभगवतः कृतौ शारीरकमीमांसाभाष्ये चतुर्थाध्यायस्य द्वितीयः पादः ॥

**भाष्यार्थ**—"अहोपण, 'अग्नि, ज्योति, अहः-दिवस, शुक्लपक्ष व उत्तरायणाचे सहा महिने,' त्याचप्रमाणें 'धूम, रात्री, कृष्णपक्ष, दक्षिणायनाचे सहा महिने' असे हे दोन श्रौतच देवयान व पितृयाण मार्ग स्मृतीमध्येंहि प्रत्यभिज्ञात होतात" **'इति'** -असा यावर आक्षेप येतो. [-स्मृतीचें कालभेदविधिपरत्व स्वीकारून विषयव्यवस्था सांगितली. 'आतां प्रत्यभिज्ञानानें कालाच्या कथनद्वारा देवतोक्तीमध्यें श्रुतिस्मृतींना एकार्थत्वच आहे. तेव्हां विरोधाशंका कोठची ' असें ' **उच्यते०** ' इत्यादि भाष्यानें सांगतात-]=या आक्षेपाचें समाधान असें सांगितलें जातें.-'तो काल मी सांगेन ' या स्मृतीमध्यें कालाची प्रतिज्ञा केलेली असल्यामुळें विरोधाची आशंका घेऊन परिहार सांगितला, पण जेव्हां स्मृतीमध्येंहि अग्न्यादि आतिवाहिकी देवताच ग्रहण केल्या जातात, तेव्हां तर कांहींच विरोध नाहीं **'इति'** -असें सिद्ध होतें. [ याप्रमाणें दक्षिणायनामध्यें मृत झालेल्याहि विद्वानाचें विद्याफल अवश्य प्राप्त होणारें आहे, अशा या अधिकरणार्थाचा उपसंहार करण्यासाठीं भाष्यांत शेवटीं ' इति ' असें म्हटलें आहे.-सु. ब्र. ४७९.] २१. ( ११ ).

इति श्रीशंकराचार्यभक्त विष्णुशर्मकृत ब्रह्मसूत्रशारीरभाष्यार्थाच्या चवथ्या फलाध्यायाचा दुसरा वाक्पाद समाप्त झाला.

॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

*

ॐ तत्सत्

# फलाख्यचतुर्थाध्याये तृतीयः पादः ।

(१. अर्चिराद्यधिकरण. सू. १.)

—अपर विद्याफलासाठीं देवयानमार्गाला प्रवृत्त करण्याच्या उद्देशानें तदंगभूत उत्क्रांतीचा विचार केला. आतां अंगी जो देवयानमार्ग तो सांगण्यासाठीं पादान्तराचा आरंभ केला जातो. त्यांतील पूर्वाधिकरणांत म्ह० दुसऱ्या पादाच्या शेवटच्या दक्षिणायनाधिकरणांत मरणाच्या कालाचा अनियम असल्यामुळें आणि विद्येच्या फलाला आवश्यकत्व असल्यामुळें व भीष्माप्रमाणें प्रत्येकाला कालाची प्रतीक्षा करणें अशक्य असल्यामुळें दक्षिणायनामध्येंहि मृत झालेल्या विद्वानाला विद्याफलाची प्राप्ति होते, असें सांगितलें. आतां 'मरणकालाप्रमाणें शरीर सोडून जाणाऱ्या उपासकाची गतिहि अनियत आहे' अशी आशंका घेऊन **'अर्चिरादिना०'** इत्यादि सूत्रानें तिचा परिहार करितात--

**सूत्रं--अर्चिरादिना तत्प्रथितेः ॥ १ ॥ ( १ )**

**सूत्रार्थ**--ब्रह्मलोकाला प्राप्त होण्याची इच्छा करणारा अर्चिरादि एकाच मार्गानें जाण्यास योग्य आहे. कारण श्रुतींत सगुणोपासकांच्याहि तन्मार्गत्वाची प्रथिति -प्रसिद्धि आहे. १. ( १ )-सु. ब्र. ४७६-[-**'आसृति०'** इत्यादि भाष्यानें गतार्थाचा अनुवाद करून प्रकृत उत्तरमार्गाचें अधिकरणाच्या विषयत्वानें उदाहरण देतात-]

**भाष्यं--आसृत्युपक्रमात्समानोत्क्रान्तिरित्युक्तम्। सृतिस्तु श्रुत्यंतरेष्वनेकधा श्रूयते । नाडीरश्मिसंबंधेनैका 'अथैतैरेव रश्मिभिरूर्ध्व आक्रमते' इति । आर्चिरादिकैका 'तेऽर्चिषमभिसंभवन्त्यर्चिषोऽहः' इति । "स एतं देवयानं पंथानमापद्याग्निलोकमागच्छति" इत्यन्या । 'यदा वै पुरुषोऽस्माल्लोकात्प्रैति स वायुमागच्छति' इत्यपरा । 'सूर्यद्वारेण ते विरजाः प्रयान्ति' इति चापरा ॥**

**भाष्यार्थ**—गतीचा आरंभ-उपक्रम होईपर्यंत विद्वान् व अविद्वान् या दोघांचीहि उत्क्रांति-उत्क्रमण-शरीरत्यागाचा प्रकार समान आहे, असें सांगितलें. पण ती गति श्रुत्यंतरांमध्यें-भिन्न भिन्न श्रुतींमध्यें अनेक प्रकारें श्रुत आहे. "उत्क्रांतीच्या नंतर याच रश्मींनीं-किरणांनीं तो ऊर्ध्व-वर आक्रमण करितो"-छां. ८. ६. ५. -अशी नाडी व रश्मि यांच्या संबंधानें एक, "ते अर्चीला प्राप्त होतात, अर्ची-

पासून अहरभिमानिनी देवतेला"–बृ ६. २. १५.–अशी अर्चिरादिका दुसरी, "तो या देवयानमार्गास प्राप्त होऊन अग्निलोकास प्राप्त होतो"–कौ. १. ३.–अशी तिसरी, "ज्यावेळीं हा पुरुष या लोकापासून–या शरीराला सोडून जातो तेव्हां तो वायूला प्राप्त होतो"–बृ. ५. १०. १.–अशी आणखी एक, व "ते 'विरजा:' –'रजः-'संज्ञक ब्रह्मलोकप्राप्तीच्या विरुद्ध असलेल्या मलानें रहित होत्साते सूर्यद्वारानें जातात"–मुं. १. २. ११.–अशी आणखी, याप्रमाणें अनेकधा सृति –गति श्रुत आहे. [–संशयाचें कारण अशी जी श्रुतिविप्रतिपत्ति ती सांगण्यासाठीं भाष्यांत 'अनेकधा' असें म्हटलें आहे.–या उक्त देवयानमार्गाला विषय करून व या सूचित–सुचविलेल्या श्रुतिविप्रतिपत्तीला हेतु करून 'तत्र०' इत्यादि भाष्यानें संशय सांगतात–]

भाष्यं—तत्र संशयः– **किं परस्परं भिन्ना एताः सृतयः। किं वैकैव अनेकविशेषणेति। तत्र प्राप्तं तावद्भिन्ना एताः सृतय इति। भिन्नप्रकरणत्वात्। भिन्नोपासनशेषत्वाच्च। अपि च 'अथैतैरेव रश्मिभिः' इत्यवधारणं अर्चिराद्यपेक्षायामुपरुध्येत। त्वरावचनं च पीड्येत 'स यावत्क्षिप्येन्मनस्तावदादित्यं गच्छति' इति। तस्मादन्योन्यभिन्ना एवैते पंथान इति॥**

**भाष्यार्थ**—त्याविषयीं 'काय, ह्या परस्पर अगदीं भिन्न अशा सृति–गति आहेत कीं एकच गति अनेक विशेषणांनीं विशिष्ट आहे' असा संशय येतो. [–येथें अपर विद्येच्या फलप्राप्तीचा हेतु अशा मार्गाच्या ऐक्योक्तीमुळें याच्या पादादिसंगति आहेत. पूर्वपक्षांत 'मार्गबहुत्वामुळें विकल्प' व सिद्धान्तांत 'मार्गाच्या ऐक्यामुळें विकल्पाची शंकाच नाहीं' असें मानून '**तत्र प्राप्तं०**' इत्यादि भाष्यानें पूर्वपक्ष–]=त्या दोन पक्षांतील 'या सृति भिन्न आहेत' हा पक्ष प्रथम प्राप्त झाला. [–मार्गांच्या परस्पर भिन्नत्वाविषयीं हेतु–]='**भिन्नप्रकरणत्वात्**' –कारण त्यांना भिन्नप्रकरणत्व आहे. [–"अहोपण, त्या गतींना नानाप्रकरणस्थत्व जरी असलें तरी विद्येप्रमाणें एकत्व कां नसेल?" '**भिन्नोपासन०**' इत्यादि भाष्यानें उत्तर–]=आणि त्या गतींना भिन्न भिन्न उपासनांचें शेषत्व–अंगत्व असल्यामुळेंहि भिन्नत्व आहे. [प्रत्येक प्रकरणांतील विद्याभेदामुळें त्यांच्या गुणत्वानें चिंतन करण्यास योग्य असलेल्या गतिभेदांचाहि गुणिभेदामुळें भेद होईल, असा भावार्थ.–'**अपि च०**' इत्यादि भाष्यानें गतिभेदाविषयीं हेत्वंतर सांगतात–] =शिवाय '**याच रश्मींनीं–याच किरणांच्या द्वारा**'–पृ. ७१४–असें हें अवधारण आर्चिरादिकांची अपेक्षा करूं लागल्यास अवरुद्ध–बाधित होतें. [–शिवाय वक्र-

मार्गानें जी गति तिच्या अपेक्षेनें अवक्रगति त्वरेनें युक्त संभवते. पण एकत्वपक्षीं कशाच्या अपेक्षेनें त्वरा संभवणार? त्यामुळेंहि गतीचा भेद सिद्ध होतो, असें वादी '**त्वरावचनं च०**' इत्यादि भाष्यानें सांगतो–]="जेवढ्या कालांत मन जातें तेवढ्या कालांत तो आदित्यास जाऊन पोंचतो."–छां. ८. ६. ५.–असें जें त्वरावचन आहे तेंहि पीडित होतें. [–"तर मग मार्गभेद असतांना कोणत्या मार्गानें ब्रह्मलोकाची प्राप्ति होते?" अशी आशंका घेऊन 'समुच्चयाच्या असंभवामुळें व्रीहि-यवादिकांप्रमाणें विकल्प होईल' असें मानून वादी '**तस्मात्०**' इत्यादि भाष्यानें म्हणतो–]=वास्तव हे मार्ग परस्पर भिन्नच आहेत, असें प्राप्त होतें. [–उपासनांच्या भेदामध्यें उपास्य ब्रह्माला जसें एकत्व असतें त्याप्रमाणें गुणभूत गतीचें ऐक्य सिद्ध होत असल्यामुळें अर्चिरादि एकच गति आहे, असा सिद्धान्त '**एवं०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]

भाष्यं––**एवं प्राप्तेऽभिदध्महे– अर्चिरादिनेति । सर्वो ब्रह्म प्रेप्सुः अर्चिरादिनैवाध्वना रंहतीति प्रतिजानीमहे । कुतः । तत्प्रथितेः । प्रथितो ह्येष मार्गः सर्वेषां विदुषाम् । तथाहि पंचाग्निविद्याप्रकरणे 'ये चामी अरण्ये श्रद्धां सत्यमुपासते' इति विद्यान्तरशीलिनामप्यर्चिरादिका सृतिः श्राव्यते ॥**

**भाष्यार्थ**––असा पूर्वपक्ष प्राप्त झाला असतां 'अर्चिरादिना०' इत्यादि आम्ही सांगतों. [–'**सर्वः ब्रह्म०**'इत्यादि भाष्यानें सूत्रांतील प्रतिज्ञेचा विभाग–] =ब्रह्माला प्राप्त होण्याची इच्छा करणारा सर्व–प्रत्येक उपासक अर्चिरादिमार्गानेंच जातो, अशी आम्ही प्रतिज्ञा करितों. [–"अहोपण, नानाविध मार्ग श्रुत असतांना त्यांतील एकाच मार्गाचें अवधारण करण्याचें कारण काय?" असा प्रश्न–] =कोणत्या कारणानें तुम्ही अशी प्रतिज्ञा करितां? [–सूत्रांतील हेतूला अवतरण देऊन त्याचें '**तत्०**' इत्यादि व्याख्यान–]='त्याच्या प्रथितीमुळें–प्रसिद्धीमुळें.' कारण सर्व विद्वानांचा हा मार्ग प्रथित–प्रसिद्ध आहे.[–"अहोपण, पंचाग्निवेत्त्यांचीच –पंचाग्न्युपासकांचीच ही गति 'ते अर्चीला प्राप्त होतात,'–पृ. ७३४–अशी श्रुत असल्यामुळें 'सर्व विद्वानांची' असें विशेषण कोणत्या कारणानें देतां?" '**तथा हि०**' इत्यादि भाष्यानें उत्तर–]=सर्व उपासकांचा तो मार्ग कसा प्रसिद्ध आहे तें पहा–पंचाग्निविद्याप्रकरणांत 'जे हे अरण्यांत श्रद्धा, सत्य, अशी उपासना करितात'–बृ.६.२.१५–अशी दुसऱ्या विद्येचा अभ्यास करणारांचीहि अर्चिरादिगति श्रवण करविली जाते. [–"साधारणश्रुतीला ज्याची गति श्रुत नाहीं अशा ज्ञानाचें विषयत्व असल्यामुळें स्वप्रकरणस्थ गतीनें निरपेक्ष असलेल्या विद्यान्तरांची अर्चिरादिगतिसंगति नाहीं," अशी '**स्यादेतत्०**' इत्यादि भाष्यानें शंका–]

**भाष्यं**—स्यादेतत् । यासु विद्यासु न काचिद्गतिरुच्यते तास्वियमर्चिरादिकोपतिष्ठतां । यासु त्वन्या श्राव्यते तासु किमित्यर्चिराद्याश्रयणमिति । अत्रोच्यते– भवेदेतदेवं यद्यत्यन्तभिन्ना एवैताः सृतयः स्युः । एकैव त्वेषा सृतिरनेकविशेषणा ब्रह्मलोकप्रपदनी क्वचित्केनचिद्विशेषणेनोपलक्षितेति वदामः । सर्वत्रैकदेशप्रत्यभिज्ञानाद् इतरेतरविशेषणविशेष्यभावोपपत्तेः ॥

**भाष्यार्थ**—पण यावर वादी "ज्या विद्यांमध्यें कोणतीच गति सांगितली जात नाहीं, त्यांमध्यें ही अर्चिरादिक गति उपस्थित होवो, पण ज्या विद्यांमध्यें अन्य गति श्रवण करविली जाते त्यांमध्यें अर्चिरादि गतीचा आश्रय कोणत्या कारणानें केला जाईल ?"–असें विचारील ! [–मार्गाला जरी एकत्वच असलें तरी त्याचें अनेक पर्वयुक्तत्व संभवत असल्यामुळें गतीचाच भेद होत नाहीं. कारण गतिभेद मानिल्यास गौरव हा दोष येतो, असें 'अत्र०' इत्यादि भाष्यानें सांगतात–] =याविषयीं असें समाधान सांगितलें जातें–जर या गति अत्यंत भिन्नच असत्या तर हें असें झालें असतें. परंतु ही एकच अनेक विशेषणांनीं युक्त असलेली, ब्रह्मलोकाला पोंचणारी गति क्वचित् कोणत्या एखाद्या विशेषणानें उपलक्षित होणारी आहे, असें आम्ही सांगतों. [–एकदेशाच्या प्रत्यभिज्ञानामुळेंहि गतीचें सर्वत्र ऐक्य आहे, असें 'सर्वत्र०' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=कारण सर्वत्र –सर्वगतिश्रुतींत तिच्या एकदेशाच्या–कांहीं भागाच्या प्रत्यभिज्ञानामुळें परस्पर गतींच्या विशेषण-विशेष्यभावाची उपपत्ति लागते–तो भाव संभवतो. [–आतां 'भिन्नप्रकरणत्वामुळें गति भिन्न आहेत' असें जें वाद्यानें वर–७३९–म्हटलें आहे त्याविषयीं 'केवल प्रकरणभेदामुळेंच गतिभेद आहे कीं विद्याभेदामुळें?'असा विकल्प करून त्यांतील पहिला पक्ष संभवत नाहीं,असें'प्रकरण०'इत्यादि भाष्यानें सांगतात-]

**भाष्यं**—प्रकरणभेदेऽपि हि विद्यैकत्वे भवतीतरेतरविशेषणोपसंहारवद्गतिविशेषणानामप्युपसंहारः । विद्याभेदेऽपि तु गत्येकदेशप्रत्यभिज्ञानाद्गत्यभेदाच्च गत्यभेद एव । तथाहि 'ते तेषु ब्रह्मलोकेषु पराः परावतो वसन्ति' 'तस्मिन्वसति शाश्वतीः समाः' "सा या ब्रह्मणो जितिर्या व्युष्टिस्तां जितिं जयति तां व्युष्टिं व्यश्नुते" 'तद्य एवैतं ब्रह्मलोकं ब्रह्मचर्येणानुविंदन्ति' इति च तत्र तत्र तदेवैकं फलं ब्रह्मलोकप्राप्तिलक्षणं प्रदर्श्यते ॥

**भाष्यार्थ**—कारण प्रकरणभेद जरी असला तरी विद्येला एकत्व असल्यास परस्पर विशेषणांचा जसा उपसंहार होतो तसाच गतीच्या विशेषणांचाहि परस्पर उपसंहार होतो. [–दुसरा पक्षहि संभवत नाहीं, असें 'विद्याभेदेऽपि०' इत्यादि

भाष्यानें सांगतात–]=पण विद्येचा भेद जरी असला तरीसुद्धां गतीच्या एक-देशाचें प्रत्यभिज्ञान होत असल्यामुळें व गन्तव्य–प्राप्तव्य लोकाचा अभेद असल्यामुळें गतीचा अभेदच आहे. [ विद्येचा भेद जरी असला तरी वेद्य ब्रह्माचें जसें ऐक्य असतें त्याप्रमाणें विद्याभेदपक्षींहि गुणभूत गतीचें ऐक्य अविरुद्ध आहे, असा भावार्थ.–'तथाहि०' इत्यादि भाष्यानें गन्तव्याच्या अभेदाचें–ऐक्याचें विवरण–]=गंतव्य ब्रह्मलोकाचा अभेद कसा आहे तो पहा–"ते ब्रह्मवेत्ते त्या नानाभोगप्रदेशांनीं युक्त असलेल्या ब्रह्मलोकांत 'परावत:'–हिरण्यगर्भाख्य ब्रह्माच्या 'परा:'- असंख्य संवत्सरपर्यंत राहतात."–बृ.६.२.१५.–[ जोंवर त्या हिरण्यगर्भाचें आयुष्य असतें तोंवर ते तेथें राहतात, असा याचा भावार्थ.]='तस्मिन्०'– "त्या ब्रह्मलोकांत असंख्य संवत्सर–नित्य राहतो"–बृ.५.१०.१–'सा या ब्रह्मण:०' –ती जी हिरण्यगर्भाची जिति–सर्वलोकजय, त्याची जी व्युष्टि–व्याप्ति त्या जितीला जिंकतो, त्या व्युष्टीला व्यापितो "–कौ.१.६. सु.उ.८३२–[ हिरण्यगर्भाच्या समान देहत्वास प्राप्त होऊन त्याच्या सर्व लोकजयाला व व्याप्तीला प्राप्त होतो, असा भावार्थ.–पण हें फल कोणाला प्राप्त होतें तें 'तद्य०' इत्यादि वाक्यानें सांगतात–]=आणि 'तत्'–त्या अधिकाऱ्यांमध्यें जे कोणी ब्रह्मचर्यादि साधनानें ब्रह्माची उपासना करितात ते पुन: ब्रह्माकडून अधिष्ठित अशा या ब्रह्मलोकास प्राप्त होतात."–छां.८.४.३.–असें [–'तत्र तत्र०' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=ठिकाठिकाणीं तेंच एक ब्रह्मलोकप्राप्तिलक्षणफल प्रदर्शित केलें जातें. [–'यत्तु०' इत्यादि भाष्यानें परोक्ताचा अनुवाद–]

**भाष्यं––यत्त्वेतैरेवेत्यवधारणं अर्चिराद्याश्रयणे न स्यादिति । नैष दोष: । रश्मिप्राप्तिपरत्वादस्य । न ह्येक एव शब्दो रश्मींश्च प्रापयितुमर्हति अर्चिरादींश्च व्यावर्तयितुम् । तस्माद्रश्मिसंबंध एवायमवधार्यत इति द्रष्टव्यम् । त्वरावचनं त्वर्चिराद्यपेक्षायामपि गंतव्यान्तरापेक्षया क्षेप्यार्थत्वान्नोपरुध्यते । यथा निमिषमात्रेणात्रागम्यत इति ॥**

**भाष्यार्थ**–पण 'एतै: एव'-याच रश्मींनीं–पृ.७३५–असें हें अवधारण अर्चिरादिकांचा आश्रय केल्यास उपपन्न होत नाहीं, असें जें वाद्यानें म्हटलें आहे, तो दोष येत नाहीं. कारण त्या वचनाला रश्मिप्राप्तिपरत्व आहे. [ रात्रीं स्पष्ट रश्मींची उपलब्धि होत नसल्यामुळें रात्रीं मृत झालेल्यांच्या रश्म्यनुसारित्वाचा अभाव प्राप्त झाला असतां ' तोहि याच रश्मींनीं ' अशा अयोगव्यवच्छेदासाठीं हें अवधारण आहे, अन्ययोगाच्या व्यवच्छेदासाठीं नाहीं, असा भावार्थ.–" पण त्या

वचनाला अन्ययोगव्यवच्छेदकत्वहि कां नाहीं ? " 'न हि०' इत्यादि भाष्यानें उत्तर –]=कारण एकच शब्द रश्मींना प्राप्त करविण्यास व अर्चिरादिकांची व्यावृत्ति करविण्यास योग्य नाहीं, तो तीं दोन्हीं कार्यें करूं शकत नाहीं. [ एका वाक्याचें अप्राप्तमार्गप्रापकत्व व त्याचें निरपेक्षप्रतिपादकत्व अयुक्त आहे. कारण तसें मानिल्यास वाक्यभेदाचा प्रसंग येतो, असा भावार्थ.–याप्रमाणें 'एव' या अवधारणाचें उभयार्थत्व अशक्य झालें असतां त्याचें फलित '**तस्मात्०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=त्यामुळें त्याचा हा रश्मिसंबंधच निश्चित केला जातो, असें जाणावें. [ हा 'एव-'कार विधिसामर्थ्यानें प्राप्त झालेल्या अयोग-व्यवच्छेदाचाच अनुवाद करितो, असा भावार्थ.–आतां वाद्यानें 'त्वरावचन बाधित होईल' असें जें म्हटलें आहे–पृ.७३६–त्याविषयीं '**त्वरावचनं०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=पण त्वरावचन अर्चिरादिकांची अपेक्षा असतांनाहि इतर गन्त-व्याच्या अपेक्षेनें सत्वरत्वासाठीं असल्यामुळें उपरुद्ध–बाधित होत नाहीं. जसें 'एका निमिषांत मी येथें येतों' हें वचन सत्वरत्वासाठीं आहे त्याप्रमाणें तें आहे. [ अर्चिरादि देवयानमार्गाला एकत्व जरी असलें तरी दुसऱ्या कोणत्याहि गन्तव्या-हून या उपायानें सत्यलोकाला झटकन् जातो, असें हें वचन गन्तव्यभेदाच्या अपेक्षेनें युक्त आहे, असा भावार्थ.–देवयानमार्गाच्या एकत्वाविषयीं '**अपि च०**' इत्यादि भाष्यानें हेत्वंतर सांगतात–]

**भाष्यं—अपि च " अथैतयोः पथोर्न कतरेणचन " इति मार्गद्वयभ्रष्टानां कष्टं तृतीयं स्थानमाचक्षाणा पितृयाणव्यतिरिक्तमेकमेव देवयानमर्चिरादिपर्वाणं पंथानं प्रथयति । भूयांस्यर्चिरादिस्मृतौ मार्गपर्वाण्यल्पीयांसि त्वन्यत्र । भूयसां चानुगुण्येनाल्पीयसां नयनं न्याय्यमित्यतोऽप्यर्चिरादिना तत्प्रथितेरित्युक्तम् ॥ १**

**भाष्यार्थ**—शिवाय " आतां या दोन मार्गांतील कोणत्याहि मार्गानें ते जात नाहींत."–छां.५.१०.८. सु.उ.४०८–असें मार्गद्वयापासून भ्रष्ट झालेल्यांचें कष्टकर तृतीय स्थान सांगणारी श्रुति पितृयाणमार्गाहून भिन्न, अर्चिरादिक हीं ज्यांतील पर्वें–विभाग आहेत असा एकच देवयान मार्ग व्यक्त–प्रथित–प्रकट करिते.[मार्गभेद असल्यास स्थानान्तराचाहि संभव असल्यामुळें तृतीयस्थानोक्ति उपपन्न होणार नाहीं, असा भावार्थ.–" अहोपण, पितृयाणातिरिक्त मार्गाला एकत्व जरी असलें तरी सूत्रांत 'अर्चिरादिना' असें विशेषण कशाकारितां दिलें आहे ? " '**भूयांसि०**' इत्यादि भाष्यानें उत्तर–]=अर्चिरादि मार्गांत पुष्कळ–अधिक मार्गपर्वें आहेत. पण अन्यमार्गांत त्यांपेक्षां कमी मार्गपर्वें आहेत आणि अधिकांच्या अनुरोधानें

न्यूनांचा निर्णय करणें न्याय्य आहे. त्यामुळेंहि 'अर्चिरादिना तत्प्रथितेः' असें म्हटलें आहे. [ज्यांतील पर्वे-विभाग थोडे आहेत अशा मार्गानें प्राप्तव्य प्रदेशाची प्राप्ति संभवत असतांना बहुपर्वमार्गाचा उपदेश व्यर्थ होतो. कारण त्या मार्गानें बुद्धिमानांची प्रवृत्ति होणार नाहीं. यास्तव पुष्कळ पर्वांच्या अनुरोधानें थोड्या पर्वांचा त्यांत अनुप्रवेश करणेंच युक्त आहे. कारण पुष्कळांच्या अनुग्रहाला न्याय्यत्व आहे, पुष्कळांचा संग्रह करणें उचित आहे, असा भावार्थ. मार्गैक्य-पक्षीं पूर्वपक्षांतील शेवटच्या विकल्पाची शंकाहि येऊं शकत नाहीं, असें सांगण्या-साठीं भाष्यांत 'अपि' असें म्हटलें आहे.-सु. ब्र. ४७७.]१.(१)

(२. वाय्वधिकरण. सू. २.)

—सर्वत्र अर्चिरादि मार्गपर्वांचें प्रत्यभिज्ञान होत असल्यामुळें त्या गतीचें एकत्व सांगितलें. आतां–'या देवयानमार्गाला प्राप्त होऊन अग्निलोकास प्राप्त होतो. तो वायुलोकास प्राप्त होतो'असें वायूचें अर्चिरात्मक-अग्न्यानन्तर्य म्ह० वायु-लोक अग्निलोकाच्या अनंतर आहे, असें प्रत्यभिज्ञान होत असल्यामुळें वायूचा विनिवेश अग्नीच्या पुढें करावा, अशी आशंका घेऊन सूत्रकार 'वायुं०' इत्यादि सूत्रानें म्हणतात—

**सूत्रं—वायुमब्दादविशेषविशेषाभ्याम् ॥ २ ॥ (२)**

**सूत्रार्थ**—वायूचा संनिवेश अब्दानंतर–संवत्सराच्या पुढें व आदित्याच्या पूर्वी करावा. कारण कौषीतकि व बृहदारण्यक यांवरून त्याचा अविशेष व विशेष अवगत होतो. त्या अविशेष-विशेषांवरून तसा संनिवेश करावा. २. (२)–सु.ब्र.४७८.–[–परस्पर विशेषण-विशेष्यत्वानें अर्चिरादिकांचा उपसंहार सांगितला. पण तो कशा प्रकारचा आहे, त्याचा 'केन०' इत्यादि भाष्यानें विचार करितात–]

**भाष्यं–केन पुनः संनिवेशविशेषेण गतिविशेषणानां इतरेतरविशेषणविशेष्य-भाव इति तदेतत्सुहृद्भूत्वाचार्यो ग्रथयति । "स एतं देवयानं पंथानमापद्या-ग्निलोकमागच्छति स वायुलोकं स वरुणलोकं स इंद्रलोकं स प्रजापतिलोकं स ब्रह्मलोकम्" इति कौषीतकिनां देवयानः पंथाः पठ्यते ॥**

**भाष्यार्थ**—परंतु कोणत्या संनिवेशविशेषानें गतिविशेषणांचा इतरेतर विशे-षण-विशेष्यभाव आहे, असें हें सुहृद् होऊन आचार्य ग्रथित करितात. ["मार्ग-पर्वांचें विशेषणविशेष्यत्व सिद्ध झालें असतां योग्यत्वानें स्वतःच–आपोआपच संनिवेशविशेषाची सिद्धि होत असल्यामुळें हें निरूपण व्यर्थ आहे," अशी आशंका घेऊन 'सुहृद् होऊन आचार्य सांगतात' असें म्हटलें आहे. संनिवेशविशेषण-

विशिष्ट विशेषणविशेष्यत्व भाष्यांतील 'तदेतत्' या पदांनीं सांगितलें आहे. याप्रमाणें संक्षेपतः अधिकरणाचें तात्पर्य सांगून 'स एतं०' इत्यादि वाक्यानें त्याचा विषय सांगतात–]="तो या देवयानमार्गाला प्राप्त होऊन अग्निलोकास प्राप्त होतो. तो वायुलोकास,तो वरुणलोकास,तो इंद्रलोकास, तो प्रजापतिलोकास, तो ब्रह्मलोकास प्राप्त होतो."–कौ. १.३.–असा कौषीतकींच्या उपनिषदांत देवयानमार्ग पठित आहे. [–"त्यांत प्रथम श्रुत असलेल्या अग्निलोकाचें अतिक्रमण करून वायूच्या संनिवेशाचा विचार कां केला जात आहे?" 'तत्र०' इत्यादि भाष्यानें उत्तर–]

**भाष्यं—तत्रार्चिरग्निलोकशब्दौ तावदेकार्थौ ज्वलनवचनत्वादिति नात्र संनिवेशक्रमः कश्चिदन्वेष्यः। वायुस्त्वर्चिरादौ वर्त्मनि न श्रुतः कतमस्मिन् स्थाने निवेशयितव्य इति ॥**

**भाष्यार्थ—**त्यांतील अर्चि व अग्निलोक हे दोन शब्द तर एकाच अर्थाचे वाचक आहेत. कारण त्यांना अग्निवचनत्व–अग्निवाचकत्व आहे. त्यामुळें त्यांत संनिवेशाचा क्रम कोठेंच व केव्हांच अन्वेषणीय–विचार करण्यास योग्य नाहीं, त्याच्या संनिवेशाचा विचार करण्याची आवश्यकता नाहीं. [–याप्रमाणें असंदिग्ध अंश सांगून '**वायुस्तु०**' इत्यादि भाष्यानें संदिग्ध अंश सांगतात–] =पण वायु अर्चिरादि मार्गामध्यें श्रुत नाहीं. तेव्हां त्याचा निवेश त्यांतील कोणत्या स्थानीं करावा, असा विचार प्राप्त होतो. ['अर्चीच्या अनंतर' अग्निलोकास, वायुलोकास, अशा या पाठक्रमाच्या बलानें वायूचा संनिवेश करावा कीं पुढें सांगितल्या जाणाऱ्या न्यायानें संवत्सर व देवलोक यांच्यापुढें व आदित्याच्या पूर्वीं त्याचा संनिवेश करावा,' असा संशय येत असल्यामुळें तोच विचाराचा विषय आहे, असा भावार्थ. या अधिकरणांत अपरविद्येच्या फलासाठीं मार्गपर्वांच्या संनिवेशविशेषाचें चिंतन केलेलें असल्यामुळें याची पादादिसंगति आहे. पूर्वपक्षांत 'पाठानुक्रमाचें अनुसरण' पण सिद्धान्तांत 'अर्थक्रमामुळें पाठक्रमाचा बाध' असा फलभेद मानणारे आचार्य 'आदित्याहून अव्यवहित पूर्वत्वानें वायूचा संनिवेश' हा सिद्धान्त–'**उच्यते०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]

**भाष्यं—उच्यते– 'तेऽर्चिषमेवाभिसंभवन्त्यर्चिषोऽहरह्न आपूर्यमाणपक्षमापूर्यमाणपक्षाद्यान्षडुदङ्ङेति मासांस्तान् मासेभ्यः संवत्सरं संवत्सरादादित्यम्' इत्यत्र संवत्सरात्पराचमादित्यादर्वाचं वायुमभिसंभवन्ति। कस्मात्? अविशेषविशेषाभ्याम् ॥**

**भाष्यार्थ**—याचा सिद्धान्त सांगितला जातो—" ते अर्चीलाच प्राप्त होतात. अर्चीपासून अहर्-अभिमानिनी देवतेस, तेथून शुक्लपक्षाभिमानिनी देवतेस, तेथून उत्तरायणाच्या सहा मासांच्या अभिमानिनी देवतेस, मासाभिमानिनी देवतेपासून संवत्सरास, संवत्सरापासून आदित्यास "—छां.५.१०.१.—या वाक्यांत संवत्सराच्या पुढें व आदित्याच्या पूर्वीं वायूस प्राप्त होतात.[—पण पाठक्रमाच्या अनुसार अग्नीच्या अनंतर वायु संनिवेश करण्यास योग्य आहे, अशी शंका—]=पाठक्रमाला सोडून त्याचा असा संनिवेश कोणत्या कारणानें केला जातो ? [—सूत्रपदानें उत्तर—] ='अविशेष व विशेष यांच्या योगानें' [—विशेषदर्शनालाच स्थानविशेषसंनिवेश-हेतुत्व जरी असलें तरी वायूच्या अर्चिरादि मार्गांतील सामान्यप्राप्तीविषयीं अविशेष-उक्तीहि हेतु आहे असें मानून त्या सूत्रपदाचें 'तथाहि०' इत्यादि भाष्यानें व्याख्यान—]

**भाष्यं**—तथाहि—"स वायुलोकम्" इत्यत्राविशेषोपदिष्टस्य वायोः श्रुत्यंतरे **विशेषोपदेशो दृश्यते 'यदा वै पुरुषोऽस्माल्लोकात्प्रैति स वायुमागच्छति तस्मै स तत्र विजिहीते यथा रथचक्रस्य खं तेन स ऊर्ध्वमाक्रमते स आदित्यमागच्छति' इति। एतस्मादादित्याद्वायोः पूर्वत्वदर्शनाद्विशेषादब्दादित्ययोरंतराले वायुर्निवेशयितव्यः ॥**

**भाष्यार्थ**—अविशेष व विशेष कसे तें पहा—'तो वायुलोकास'—कौ. १. ३.—या वचनांत अविशेषानें उपदेशिलेल्या वायूचा श्रुत्यन्तरांत असा विशेषोपदेश दिसतो—" जेव्हां हा ध्याता पुरुष या देहापासून निघून जातो तेव्हां तो वायूला प्राप्त होतो. तो वायु आपल्यामध्यें आलेल्या त्याला आपल्यामधून मार्ग देतो. [ कौषीतकिश्रुतीचें वाजसनेयिश्रुति हें श्रुत्यन्तर आहे. वायूस प्राप्त झालेल्या त्या उपासकाला वायु 'तत्र'—स्वात्म्यामध्यें द्वार देतो.—वायूनें दिलेल्या द्वाराचें परिमाण दृष्टान्तानें स्पष्ट करितात—]='यथा०'—जसें रथचक्राचें छिद्र असतें तेवढें छिद्र करितो. त्यांतून तो वर जातो. तो आदित्यास प्राप्त होतो."—बृ.५.१०.१ —असा विशेषोपदेश दिसतो. [—'**एतस्मात्०**' इत्यादि भाष्यानें विशेषोक्तीच्या फलाचें निगमन—]=या, आदित्यापासून वायूच्या पूर्वत्वाचें दर्शन, याच विशेषामुळें अब्द—संवत्सर व आदित्य यांच्या अन्तरालीं—मध्यें वायूचा संनिवेश करावा. [—याप्रमाणें सिद्धान्तानें उपक्रम करून '**कस्मात्०**' इत्यादि भाष्यानें पूर्वपक्ष सांगतात—]

**भाष्यं**—**कस्मात्पुनरग्नेः परत्वदर्शनाद्विशेषादर्चिषोऽनंतरं वायुर्न निवेश्यते। नैषोऽस्ति विशेष इति वदामः। ननूदाहृता श्रुतिः—" स एतं देवयानं पंथानमापद्याग्निलोकमागच्छति स वायुलोकं स वरुणलोकम् " इति ॥**

**भाष्यार्थ**—पण, याच्या उलट अग्नीहून परत्वदर्शन या विशेषापुळें अर्चीच्या अनंतर वायु संनिविष्ट कां केला जात नाहीं, अर्चीच्या पुढें वायूचा संनिवेश कोणत्या कारणानें केला जात नाहीं ? [पाठक्रमाच्या अनुरोधानें अर्चीच्या अनंतर वायूचा संनिवेश करावा, असा भावार्थ.–'वायूनें दिलेल्या मार्गानेंच ऊर्ध्व आक्रमण करून आदित्यास प्राप्त होतो' अशा या ऊर्ध्वत्वश्रुतीला द्विवचनत्व जरी असलें तरी अर्थक्रमद्योतित्व असल्यामुळें आणि 'तेन' या वचनानें वायुदत्त रथचक्रपरिमित अवकाशाला ऊर्ध्वक्रमणाचें हेतुत्व आहे, असें सिद्ध होत असल्यामुळें वायूलाहि तन्निमितत्व आहे, असें प्रत्यक्ष प्रतीत होतें. म्हणून ऊर्ध्वशब्दश्रुतिसिद्ध अर्थ-क्रमानें पाठक्रम बाधित होतो,असें'**नैष:०**'इत्यादि भाष्यानें सांगतात–]=हा विशेष नाहीं, असें आम्ही सांगतों. [–या उक्त संक्षिप्त अर्थाचेंच विवरण करणारे भाष्य-कार '**ननु०**' इत्यादि भाष्यानें शंका घेतात–]=" अहोपण, आम्हीं वर 'तो या देवयानमार्गास प्राप्त होऊन अग्निलोकास प्राप्त होतो, तो वायुलोकास, तो वरुण लोकास,'–पृ.७४०–अशी श्रुति उदाहृत केली आहे ! " [–सिद्धान्ती त्या श्रुतींतील आपला अभिप्राय '**उच्यते०**' या भाष्यानें सांगतो–]

**भाष्यं**--**उच्यते–केवलोऽत्र पाठः पौर्वापर्येणावस्थितो नात्र क्रमवचनः कश्चिच्छब्दोऽस्ति । पदार्थोपदर्शनमात्रं ह्यत्र क्रियते एतमेतं चागच्छतीति । इतरत्र पुनर्वायुप्रत्तेन रथचक्रमात्रेण च्छिद्रेणोर्ध्वमाक्रम्य आदित्यमागच्छती-त्यवगम्यते क्रमः । तस्मात्सूक्तमविशेषविशेषाभ्यामिति ॥**

**भाष्यार्थ**—'**उच्यते०**'–त्या श्रुतीचा आशय सांगितला जातो. यांत केवल पूर्व-अपरभावानें पाठ अवस्थित आहे. पण येथें क्रमवाचक–त्यांचा क्रम सांगणारा असा एकहि शब्द नाहीं. [–" तर मग त्या वाक्याला व्यर्थत्व आहे." '**पदार्थ०**' इत्यादि भाष्यानें याचें 'नाहीं' असें उत्तर–]=कारण येथें 'याला याला प्राप्त होतो' असें केवल पदार्थोपदर्शन केलें जातें. [हें वचन स्वरूपविधिपर आहे, क्रमपर नाहीं, असा भावार्थ.–" अहोपण, वाजसनेयिश्रुतींतहि क्रमवाचिशब्द नाहीं " अशी आशंका घेऊन '**इतरत्र०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=पण इतरत्र–वाजसनेयिश्रुतींत वायूनें दिलेल्या रथचक्राच्या मार्गानें–छिद्रानें ऊर्ध्व आक्र-मण करून–वर चढून आदित्याला प्राप्त होतो, असा क्रम अवगत होतो. [कौषी-तकिवाक्योक्त वायूचा छांदोग्योपदिष्ट अर्चिरादि मार्गांत सांगितलेल्या निवेशाचा '**तस्मात्०**' इत्यादि भाष्यानें उपसंहार करितात–]=म्हणून '**अविशेष-विशेषांनीं**' असें जें सूत्रांत म्हटलें आहे तें निर्दोष आहे. [–" अहोपण, वाजसनेयींच्या

बृहदारण्यकांत संवत्सराचें अश्रवण असल्यामुळें 'वायुं अब्दात्' असें सूत्र कसें केलें आहे ?" 'वाजसनेयिनस्तु०' इत्यादि भाष्यानें उत्तर-]

**भाष्यं—वाजसनेयिनस्तु 'मासेभ्यो देवलोकं देवलोकादादित्यम्' इति समामनन्ति। तत्रादित्यानंतर्याय देवलोकाद्वायुमभिसंभवेयुः। वायुमब्दादिति तु छंदोगश्रुत्यपेक्षयोक्तम्। छांदोग्यवाजसनेयकयोस्त्वेकत्र देवलोको न विद्यते परत्र संवत्सरः। तत्र श्रुतिद्वयप्रत्ययादुभावप्युभयत्र ग्रथयितव्यौ। तत्रापि माससंबंधात्संवत्सरः पूर्वः पश्चिमो देवलोक इति विवेक्तव्यम्॥ २॥ (२)**

**भाष्यार्थ**—पण वाजसनेयिशाखाध्यायी 'मासांपासून देवलोकास, देवलोकापासून आदित्यास'-बृ. ६. २. १५.-असें समामनन-कथन करितात. त्यांतील आदित्याच्या आनंतर्यासाठीं देवलोकापासून वायूला प्राप्त होतील. [-"तर मग सूत्रांत,देवलोकापासून वायुलोकास,' असें म्हणावयास पाहिजे होतें" अशी आशंका घेऊन 'छांदोग्याच्या अभिप्रायानें हें सांगितलें आहे' असें '**वायुं०**' इत्यादि भाष्यानें सांगतात-]=पण 'वायूपासून अब्दास-संवत्सरास' असें छंदोगश्रुतीच्या अपेक्षेनें सांगितलें आहे.[-"तर मग त्यांचा क्रम कसा संभवतो?" अशी आशंका घेऊन दोन्ही श्रुतींच्या आलोचनानें क्रम दाखवितात-]='**छान्दोग्य०**'-छांदोग्य व वाजसनेयक या दोन श्रुतींतील एका श्रुतींत देवलोक विद्यमान नाहीं व दुसऱ्या श्रुतींत संवत्सर विद्यमान नाहीं. [-'तर त्यांची एकवाक्यता कशी ?' '**तत्र०**' इत्यादि भाष्यानें उत्तर-]=त्यांत श्रुतिद्वयाचा प्रत्यय येत असल्यामुळें ते दोन्ही-देवलोक व संवत्सर दोन्ही श्रुतींत ग्रथित करावे. [-"तर मग देवलोकाचें प्राथम्य-प्रथमत्व व संवत्सराचें पाश्चात्य-अनंतरत्व कां नसेल ?" '**तत्रापि०**' इत्यादि भाष्यानें याचें उत्तर-]=त्या दोहोंतहि मासांच्या संबंधामुळें संवत्सर पूर्व व देवलोक पश्चिम-मागून, असा विवेक करावा. [संवत्सराला मासारभ्यत्व आहे, त्याचा आरंभ मासांनीं होतो. त्यामुळें त्याचें मासानंतर्य स्थित झालें असतां देवलोक संवत्सराच्या पुढें-अनंतर होतो आणि आदित्याचें आनंतर्य सिद्ध होण्यासाठीं देवलोकाच्याहि पुढें-पलीकडे वायु जाणावा. पण सूत्रांत संवत्सरापासून देवलोकास प्राप्त होऊन वायूला प्राप्त होतो, असें विवक्षित आहे. कारण वायुशब्दाला देवलोकोपलक्षणार्थत्व आहे, त्यावरून देवलोक उपलक्षित होतो. यास्तव तीन श्रुतींच्या सामर्थ्यानें देवलोकासह वायूला संवत्सर व आदित्य यांचें अंतरालवर्तित्व आहे, असा भावार्थ.-सु. ब्र. ४७९-८०-] २. (२).

( ३. तडिदधिकरण. सू. ३. )

—वायूचा संनिवेश प्रदर्शित केला असतां त्यानंतर पठित असलेल्या वरुणादिकांचा संनिवेश '**तडितोऽधि०**' इत्यादि सूत्रानें दाखवितात—

**सूत्रं—तडितोऽधि वरुणः संबंधात्** ॥ ३ ॥ (३)

**सूत्रार्थ**—विद्युल्लोकाच्या वर वरुणलोक संबद्ध होतो. कारण वरुणाचा अब्द्वारा—जलाच्या द्वारा विद्युत्-शीं संबंध होतो. ३. (३)–सु. ब्र.४८०–[–'स वरुणलोकं'–तो वरुणलोकास प्राप्त होतो, इत्यादि वचनानें श्रुत असलेला वरुणलोक हा या अधिकरणाचा विषय आहे. 'तो काय, अर्चिरादि मार्गाच्या पर्वत्वानें संबद्ध होत नाहीं कीं होतो?' असा त्या मार्गांत त्याच्या संनिवेशस्थानाचा असंभव व संभव यांमुळें संदेह आला असतां 'तो वायुलोकास, तो वरुणलोकास' अशा वरुणादिकांच्या पाठक्रमानें वायूच्या पुढें व आदित्याच्या पूर्वीं ऊर्ध्वश्रुतिसिद्ध अर्थक्रमाच्या विरोधानें निवेशाची असिद्धि होते आणि विद्युत्-च्या पुढें व अमानव पुरुषाचेंच नेतृत्वश्रवण आहे, वरुणादिकांचा कांहीं उपयोगहि नाहीं, व त्यांच्या संनिवेशस्थानान्तराची उपलब्धि होत नाहीं. त्यामुळें त्यांचा मार्गपर्वत्वानें संबंध नाहीं, अशी पूर्वपक्षाची प्राप्ति झाली असतां '**आदित्यात्०**' इत्यादि भाष्यानें सिद्धान्त–]

**भाष्यं—'आदित्याच्चंद्रमसं चंद्रमसो विद्युतम्' इत्यस्या विद्युत उपरिष्टात्स वरुणलोकमित्ययं वरुणः संबध्येत । अस्ति हि संबंधो विद्युद्वरुणयोः । यदा हि विशाला विद्युतः तीव्रस्तनितनिर्घोषा जीमूतोदरेषु प्रनृत्यन्त्यथापः प्रपतन्ति । 'विद्योतते स्तनयति वर्षिष्यति वा' इति च ब्राह्मणम्** ॥

**भाष्यार्थ**—"आदित्यापासून चंद्रमाला, चंद्रापासून विद्युत्-ला"–छां. ४. १५. ४.–अशा या विद्युत्-च्या पुढें–तिच्या पलीकडे '**तो वरुणलोकास**' असा हा वरुण संबद्ध होतो. [–विद्युल्लोकाच्या अनन्तर वरुणाचा संनिवेश करण्याविषयीं सूत्रोक्त हेतु '**अस्ति हि०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=कारण विद्युत् व वरुण यांचा संबंध आहे. [–'**यदा०**' इत्यादि भाष्यानें त्याविषयीं लोकप्रसिद्धीचें आनुकूल्य दाखवितात–]=कारण जेव्हां विशाल–मोठमोठया विद्युत् तीव्र मेघगर्जनांच्या निर्घोषांसह मेघांच्या उदरांत अतिशय चमकूं लागतात–मेघांच्या गडगडाटांसह नृत्य करूं लागतात तेव्हां जलाचा अतिशय वर्षाव होतो. [विजांच्या चमकण्यानंतर वृष्टीची उपलब्धि होत असल्यामुळें विद्युत् व वृष्टि यांचा कारण-कार्यभाव आहे, असा भावार्थ.–'**विद्योतते०**' इत्यादि वाक्यानें त्याविषयीं श्रुतिसंवाद दाखवितात–]="विज चमकते, मेघांची गर्जना होते,

वृष्टि होईल, असें लोक म्हणतात. ”–छां. ७. ११. १.–असें ब्राह्मण आहे. [–“अहोपण, आपांचा विद्युत्-शीं असा योग जरी असला तरी त्यामुळें वरुणाचा संबंध कसा सिद्ध होतो ?” अशी आशंका घेऊन ‘अपां च०’इत्यादि सांगतात–]

**भाष्यं--अपां चाधिपतिर्वरुण इति श्रुतिस्मृतिप्रसिद्धिः। वरुणादधि इंद्रप्रजापती स्थानान्तराभावात्पाठसामर्थ्याच्च । आगंतुकत्वादपि वरुणादीनामंते एव निवेशो वैशेषिकस्थानाभावत् । विद्युच्चान्त्या अर्चिरादौ वर्त्मनि ॥३॥ (३)**

**भाष्यार्थ**--आणि आपांचा अधिपति वरुण आहे, अशी श्रुति-स्मृतिप्रसिद्धि आहे.[–“वायूच्या अनंतर अधीत असलेल्या वरुणाच्या विद्युदानंतर्याप्रमाणें वरुणाच्या अनंतर अधीत असलेल्या इंद्र-प्रजापतींचेंहि स्थानान्तर सांगणें उचित आहे,” अशी आशंका घेऊन ‘**वरुणादधि**०’ इत्यादि भाष्यानें सांगतात–]=वरुणाच्या अनंतर–पुढे इंद्र व प्रजापति जाणावे. कारण त्यांच्या दुसऱ्या स्थानाचा अभाव आहे. [–“तर मग त्यांची मार्गपर्वत्वानें संगतिच नसूं दे, अर्चिरादिमार्गाचीं पर्वें या रूपानें त्या दोन स्थानांचा देवयानमार्गात संबंधच नसूं दे” अशी आशंका घेऊन आचार्य म्हणतात–]आणि पाठसामर्थ्यामुळेंहि ते वरुणाच्या अनंतर जाणावे. [–‘आगंतुकांचा शेवटीं संनिवेश करावा’ या न्यायानें असाधारण स्थानहीन असलेल्या वरुणादिकांचें तडित्-हून आनंतर्य सांगितलें आहे, असें ‘**आगंतुकत्वात्**०’ इत्यादि भाष्यानें सांगतात–]=आणि त्या दोघांना आगंतुकत्व असल्यामुळेंहि वरुणादिकांच्या शेवटीं त्यांचा निवेश करावा. कारण त्यांच्या वैशेषिक–विशिष्ट–असाधारण स्थानाचा अभाव आहे. [ज्याप्रमाणें दर्श-पूर्णमासाची विकृति अशी जी नक्षत्रेष्टि तिच्यांतील “ तो यांत ‘अग्नये स्वाहा कृत्तिकाभ्यः स्वाहा’ असे होम करितो” इत्यादि उपहोमांच्या प्रयोगाचें प्रधानशब्दगृहीत प्रकृत नारिष्ठ होमाच्या शेवटीं निरूपण केलें आहे त्याचप्रमाणें अर्चिरादि मार्गांतहि स्थानाच्या अभावानें आगंतुकांचा शेवटीं निवेश होईल असा भावार्थ.–“पण विद्युत्ला अंत्यत्व कसें? कारण तिचें अंत्यत्व सांगणारा शब्द नाहीं ” अशी आशंका घेऊन ‘विद्युत्च्या अनंतर दुसऱ्या पर्वाचें कथन केलेलें नसल्यामुळें तिला अंत्यत्व आहे,’असें ‘**विद्युच्च**०’ इत्यादि भाष्यानें सांगतात–]=आणि अर्चिरादि मार्गामध्यें विद्युत अन्त्या–शेवटीं सांगितलेली आहे. [ पण अमानवासह वरुणादिकांचें नेतृत्व संभवत असल्यामुळें त्यांचा उपयोग आहे, असें पुढें सांगितलें जाईल. येथें विद्याफलासाठीं असलेल्या मार्गामध्यें वरुणादिकांच्या संनिवेशाचें कथन केलेलें असल्यामुळें याच्या पादादिसंगति आहेत. पूर्वपक्षांत ‘वरुणादिपाठाचें अदृष्टार्थत्व’

व सिद्धांतांत 'वरुणादिकांच्या स्थानान्तराचा अभाव जरी असला तरी आगंतुकांचा अन्तीं–शेवटीं संनिवेश केला जात असल्यामुळें त्यांच्या पाठाला दृष्टार्थत्वच आहे' असा फलभेद जाणावा. सु.ब्र.४८१. ] ३. ( ३ )

( ४. आतिवाहिकाधिकरण. सू. ४-६. )

—याप्रमाणें अर्चिरादिकांच्या क्रमाचें निरूपण करून 'आतिवाहिकाः०' इत्यादि सूत्रानें त्यांच्या स्वरूपाचें निरूपण करितात—

**सूत्रं—आतिवाहिकास्तल्लिंगात् ॥ ४**

**सूत्रार्थ**—'अर्चिरादिक' या 'आतिवाहिक'–ब्रह्मलोकाला गमन करणाऱ्या जीवांना पोंचविणाऱ्या देवता आहेत. 'तल्लिंगामुळें'–कारण 'तत्पुरुषोऽमानवः०' या वचनांत अमानव पुरुष विद्युल्लोकाला प्राप्त झालेल्या उपासकांना पोंचविणारा आहे, असें श्रुत आहे. तेंच अर्चिरादिकांच्या मानवत्वाचें लिंग आहे ४. सु.ब्र.४८२–[–विषयकथनपूर्वक उक्तिसाम्य, लोकशब्द व अतिनेतृत्वलिंग यांवरून '**तेष्वेव**०' इत्यादि भाष्यानें संशय सांगतात–]

**भाष्यं—तेष्वेवार्चिरादिषु संशयः–किमेतानि मार्गचिह्नान्युत भोगभूमयोऽथवा नेतारो गंतॄणामिति । तत्र मार्गलक्षणभूता अर्चिरादय इति तावत्प्राप्तम् । तत्स्वरूपत्वादुपदेशस्य । यथाहि लोके कश्चिद्ग्रामं नगरं वा प्रतिष्ठासमानोऽनुशिष्यते, गच्छेतस्त्वममुं गिरिं ततो न्यग्रोधं ततो नदीं ततो ग्रामं ततो नगरं वा प्राप्स्यसीति, एवमिहापि 'अर्चिषोऽहरह्न आपूर्यमाणपक्षं' इत्याद्याह ॥**

**भाष्यार्थ**—त्याच अर्चिरादिकांविषयीं 'काय, हीं मार्गचिह्नें आहेत, कीं भोगभूमि आहेत, कीं ब्रह्मलोकीं जाणारांचे ते नेते–त्यांना नेणारे आहेत?' असा संशय येतो. [–या अधिकरणांत विद्याफलप्राप्त्यर्थ अर्चिरादिमार्गांत प्रवृत्त झालेल्या उपासकांच्या गमयितृत्वाचा विचार केलेला असल्यामुळें याची पादादिसंगति आहे. पूर्वपक्षांत 'निर्देशाला किंवा लोकश्रुतीला मुख्यत्व' व सिद्धान्तांत 'न्याययुक्त लिंगाला मुख्यत्व' असा फलभेद मानून '**तत्र**०' इत्यादि भाष्यानें पूर्वपक्ष–]=असा संशय आला असतां 'अर्चिरादिक मार्गलक्षणभूत आहेत' असा पक्ष प्राप्त झाला. [–या उक्त अर्थी निर्देशाचें साम्य हा हेतु वादी '**तत्स्वरूपत्वात्**०' इत्यादि भाष्यानें सांगतो–]=कारण 'उपदेशाला तत्स्वरूपत्व आहे' [–'**यथा हि**०' इत्यादि भाष्यानें उक्त हेतुच दृष्टान्तानें स्पष्ट करितात–]=कारण ज्याप्रमाणें व्यवहारांत कोणी एखादा ग्रामाला किंवा नगराला जाण्याची इच्छा करणारा 'तं येथून या अमुक पर्वताला जा, तेथून न्यग्रोध–वट वृक्षाला, तेथून नदीला, तेथून पुढें ग्रामाला व त्या ग्रामापासून नगराला

जाऊन पोंचशील ' असें उपदेशिला जातो-अनुशासन केला जातो, त्याचप्रमाणें येथेंहि 'अर्चीपासून, अहर्-ला, अहर्-पासून शुक्ल पक्षाला' असें श्रुति सांगते. [-'अथवा०' इत्यादि भाष्यानें दुसरा पूर्वपक्ष-]

**भाष्यं—अथवा भोगभूमय इति प्राप्तम् । तथाहि-लोकशब्देनाग्न्यादीननुबध्नाति "अग्निलोकमागच्छति" इत्यादि । लोकशब्दश्च प्राणिनां भोगायतनेषु भाष्यते-' मनुष्यलोकः पितृलोको देवलोकः ' इति च । तथा च ब्राह्मणम्- "अहोरात्रेषु ते लोकेषु सज्जन्ते" इत्यादि । तस्मान्नातिवाहिका अर्चिरादयः । अचेतनत्वादप्येषां आतिवाहिकत्वानुपपत्तिः । चेतना हि लोके राजनियुक्ताः पुरुषा दुर्गेषु मार्गेष्वतिवाह्यानतिवाहयन्तीति ॥**

**भाष्यार्थ**—किंवा त्या भोगभूमि-भोगस्थानें आहेत, असें प्राप्त झालें. कसें तें पहा-' अग्निलोकाला प्राप्त होतो '-पृ.७४०-इत्यादि श्रुतिवचन अग्न्यादिकांना लोकशब्दानें अनुबद्ध करितें. [-तें अग्न्यादिकांबरोबर लोकशब्दाचा प्रयोग करितें. -"अहोपण, असा लोकशब्दाचा प्रयोग जरी केलेला असला तरी अर्चिरादिकांना भोगभूमित्व कसें ?" '**लोकशब्दश्च०**' इत्यादि भाष्यानें उत्तर-]=आणि 'लोक' हा शब्द प्राण्यांच्या भोगायतनांमध्यें-भोगस्थानांमध्यें ' मनुष्यलोक, पितृलोक, देवलोक '-बृ.१.५.१६.-असा पठित आहे.[-वादी मार्गपर्वांच्या भोगभूमित्वाविषयीं '**तथा च०**' इत्यादि भाष्यानें श्रुतिहि दाखवितो-]=आणि तसें "ते-कर्मी व ज्ञानी अहोरात्रादि लोकशब्दित भोगभूमींमध्यें 'सज्जन्ते'-भोगाचा अनुभव घेतात" इत्यादि ब्राह्मणहि आहे. [-'**तस्मात्०**' इत्यादि भाष्यानें वादी दोन्ही पक्षीं फलित सांगतो-]=म्हणून अर्चिरादि आतिवाहिक देवता नव्हेत. [-अर्चिरादि-शब्द अचेतन अग्न्यादिकांमध्यें रूढ असल्यामुळेंहि त्यांना आतिवाहिकत्व नाहीं, असें '**अचेतनत्वादपि०**' इत्यादि भाष्यानें वादी सांगतो-]=अचेतनत्वामुळेंहि अर्चिरादिकांच्या आतिवाहिकत्वाची अनुपपत्ति आहे. [-'**चेतना हि०**' इत्यादि भाष्यानें वादी तेंच व्यतिरेकदृष्टान्तानें स्पष्ट करितो-]=कारण व्यवहारांत राजानें नियुक्त केलेले-नेमलेले चेतन पुरुषच दुर्गम मार्गांतून वाहून नेण्यास योग्य असलेल्या लोकांना उचलून घेऊन पलीकडे पोंचवितात, हें प्रसिद्ध आहे, असा पूर्वपक्ष प्राप्त होतो. [-'**एवं०**' इत्यादि भाष्यानें सूत्राचें ग्रहण करून त्यांतील प्रतिज्ञेचा विभाग करितात-]

**भाष्यं—एवं प्राप्ते ब्रूमः- आतिवाहिका एवैते भवितुमर्हन्ति । कुतः । तल्लिंगात् । तथाहि 'चंद्रमसो विद्युतं तत्पुरुषोऽमानवः स एतान्ब्रह्म गमयति' इति**

**सिद्धवद्गमयितृत्वं दर्शयति । तद्वचनं तद्विषयमेवोपक्षीणमिति चेत् । न । प्राप्तमानवत्वनिवृत्तिपरत्वाद्विशेषणस्य । यद्यर्चिरादिषु पुरुषा गमयितारः प्राप्तास्ते च मानवाः ततो युक्तं तन्निवृत्त्यर्थं पुरुषविशेषणममानव इति ॥ ४ ॥ ननु तल्लिंगमात्रमगमकं न्यायाभावात् । नैष दोषः--**

**भाष्यार्थ**--असा पूर्वपक्ष प्राप्त झाला असतां आम्ही ' हे अर्चिरादिक आतिवाहिकच असण्यास योग्य आहेत, ते आतिवाहिकच आहेत ' असें सांगतों. [-त्याविषयीं प्रश्नपूर्वक हेतूचें ग्रहण करून त्याचें व्याख्यान करितात-]=कोणत्या कारणानें ? ' तल्लिंगामुळें '-त्याचें लिंग कसें आहे तें पहा-" चंद्रापासून विद्युत्-ला-विद्युत्-अभिमानिनी देवतेला प्राप्त होतात. तेथील अमानव पुरुष त्यांना ब्रह्मलोकास पोंचवितो."-छां. ४.१५.५. सु.उ. ३८९-असें हें वचन सिद्ध असल्याप्रमाणें गमयितृत्व दाखवितें. [ विद्युदादिकांमध्यें अमानव पुरुषाला आतिवाहिकत्व असलेलें उपलब्ध होत असल्यामुळें अर्चिरादिकांचेंहि तें-आतिवाहिकत्व जाणणें उचित आहे, असा भावार्थ.-" अहोपण, 'यावद्वचनं वाचनिकं'- जेवढें वचन असतें तेवढेंच वाचानिक-वचनानें प्राप्त होतें, असा न्याय असल्यामुळें हें वचन त्यांचें आतिवाहिकत्वसाधक नाहीं," अशी 'तद्वचनं०' इत्यादि भाष्यानें शंका-]="अहोपण, तद्वचन तद्विषयच उपक्षीण झालें आहे म्ह० अर्चिरादिवचन अग्न्यादिपदार्थांचें कथन करूनच कृतकार्य झालें आहे." [ कारण त्याला उभयपरत्व आहे, असें म्हटल्यास वाक्यभेद होईल, असा भावार्थ.-पण या वाक्याला प्राप्त झालेल्या गमन करविणाऱ्या-पोंचविणाऱ्या मानव पुरुषाच्या अनुवादानें अप्राप्त अमानवत्ववादित्व असल्यामुळें त्याला उभयपरत्व आहे, असें होऊन त्यामुळें वाक्यभेदाचा प्रसंग येतो. म्हणून पूर्वींच्या आर्चिरादिकांनाहि मानवपुरुषत्वानें गमयितृत्व, आहे, असें ग्रहण करणें उचित आहे, असें ' न० ' इत्यादि भाष्यानें सांगतात-] =नाहीं, तें वचन तद्विषयत्वानेंच उपक्षीण होत नाहीं. कारण ' अमानव ' या विशेषणाला प्राप्त मानवत्व-निवृत्तिपरत्व आहे, तें प्राप्त मानवत्वाची निवृत्ति करितें. [-' यदि० ' इत्यादि भाष्यानें याचाच विस्तार करितात-]=जर आर्चिरादिकांमध्यें पुरुष गमन करविणारे-पोंचविणारे म्हणून प्राप्त असले व ते मानव असले तर त्यांच्या निवृत्तीसाठींच ' अमानव ' हें विशेषण युक्त होतें. ४. [-" अहोपण, अनुग्राहक न्यायाच्या अभावीं लिंगाच्या गमकत्वाची असिद्धि होते" अशी 'ननु०' इत्यादि भाष्यानें शंका-]=" अहोपण, तें केवल लिंग न्यायाच्या अभावीं अगमक

–असूचक आहे !" [–'**नैष दोषः**' या भाष्यानें न्यायोक्तिपर सूत्राला अवतरण देतात–]=हा दोष येत नाहीं—

**सूत्रं—उभयव्यामोहात्तत्सिद्धेः ॥५**

**सूत्रार्थ**—' उभयव्यामोहामुळें '–मार्ग व त्यानें गमन करणारे या दोहोंनाहि व्यामोह–अज्ञत्व असल्यामुळें'तत्सिद्धि'–अर्चिरादिकांच्या नेतृत्वाची सिद्धि होते.५. –सु. ब्र. ४८३–[–यत्नहीन चेतनाची ऊर्ध्वगति दुसऱ्या चेतनाच्या अधीन असते, या लौकिकन्यायानें यत्नहीनगमनकर्त्यांचे गमन करविणारे अर्चिरादिक चेतन असले पाहिजेत,असें '**ये तावत्**०' इत्यादि भाष्यानें सूत्रयोजनेनें सांगतात–]

**भाष्यं—ये तावदर्चिरादिमार्गाः ते देहवियोगात्संपिंडितकरणग्रामा इत्यस्वतंत्रा अर्चिरादीनामप्यचेतनत्वादस्वातंत्र्यं इत्यतोऽर्चिराद्यभिमानिनश्चेतना देवताविशेषा अतियात्रायां नियुक्ता इति गम्यते। लोकेऽपि हि मत्तमूर्च्छितादयः संपिंडितकरणाः परप्रयुक्तवर्त्मानो भवन्ति ॥**

**भाष्यार्थ**—अगोदर अर्चिरादि हा ज्यांचा मार्ग आहे असे जे उपासक ते देहवियोगामुळें–देहाच्या अभावामुळें संपिंडितकरणग्राम–ज्यांचा इंद्रियसमूह एकरूप-एकाकार झाला आहे, असे असतात. त्यामुळें ते अस्वतंत्र असतात. अर्चिरादिकांनाहि अचेतनत्वामुळें अस्वातंत्र्य आहे, असें असल्यामुळें अर्चिरादिकांच्या अभिमानिनी चेतनदेवताविशेष अतियात्रेमध्यें–अतिगमनामध्यें नियुक्त आहेत, असें अवगत होतें. [–मार्ग व त्यानें जाणारे या 'दोघांच्याहि व्यामोहामुळें'–अज्ञत्वामुळें 'तत्सिद्धेः'–गमन करविणारांची सिद्धि होत असल्याकारणानें हें लिंग न्यायशून्य नाहीं, असें सांगून '**लोकेऽपि**०' इत्यादि भाष्यानें तो न्यायच स्पष्ट करितात–]=व्यवहारांतहि ज्यांचीं इंद्रियें संपिंडित–एकाकार–प्रलीन झालीं आहेत असे मत्त, मूर्च्छित इत्यादि जीव ज्यांचा मार्ग दुसऱ्यांकडून प्रयुक्त आहे, असे असतात, अशा जीवांना दुसरे लोक उचलून नेत असतात, हें प्रसिद्ध आहे. [–पूर्वपक्षद्वयाच्या असंभवाविषयीं'**अनवस्थितत्वात्**०' इत्यादि भाष्यानें दुसरा हेतु–]

**भाष्यं—अनवस्थितत्वादप्यर्चिरादीनां न मार्गलक्षणत्वोपपत्तिः। न हि रात्रौ प्रेतस्य अहःस्वरूपाभिसंभव उपपद्यते। न च प्रतिपालनमस्तीत्युक्तं पुरस्तात्। ध्रुवत्वात्तु देवतात्मनां नायं दोषो भवति। अर्चिरादिशब्दता चैषां अर्चिराद्यभिमानादुपपद्यते ॥**

**भाष्यार्थ**—अर्चिरादिकांना अनवस्थितत्व–अनियतत्व–अस्थिरत्व असल्यामुळें त्यांच्या मार्गलक्षणत्वाची उपपत्ति लागत नाहीं–त्यांचें मार्गलक्षणत्व संभवत नाहीं.

[-अहर्, शुक्लपक्ष व उत्तरायण यांचें कालान्तरीं मार्गचिह्नत्व व भोगभूमित्व संभवत नाहीं. कारण रात्र, कृष्णपक्ष व दक्षिणायन या कालांतरीं त्यांचा अभाव असतो, असा हा हेतु 'न हि०' इत्यादि भाष्यानें साधितात-]=कारण रात्रीं मरण पावलेल्या जीवाचा अहःस्वरूपाभिसंभव उपपन्न होत नाहीं. [-"तर मग रात्र, कृष्णपक्ष व दक्षिणायन या कालीं मृत झालेला दिवस, शुक्लपक्ष व उत्तरायण, या कालीं गमनाची प्रतीक्षा करून मग जाईल!" 'न च०' इत्यादि भाष्यानें उत्तर-]=आणि रात्र्यादि अनिष्ट कालीं मृत झालेल्यांचें अहरादि इष्ट-काल-प्रतिपालन संभवत नाहीं, असें पूर्वी-पृ.७३०-सांगितलें आहे. [-"अहोपण, अनवस्थितत्वाचा-अस्थिरत्वाचा अविशेष-साम्य असल्यामुळें अर्चिरादिकांना आतिवाहिकत्व तरी कोठून असणार?" 'ध्रुवत्वात्०' इत्यादि भाष्यानें उत्तर-] =पण अर्चिरादिदेवतात्म्यांना ध्रुवत्व-नित्यत्व असल्यामुळें हा दोष येत नाहीं. [-'अर्चिरादि-'शब्दांची अचेतन पदार्थांमध्यें रूढि असल्यामुळें त्यांना देवता-वाचित्व नाहीं, अशी आशंका घेऊन 'अर्चिरादिशब्दता०' इत्यादि भाष्यानें सांगतात-]=आणि यांची अर्चिरादिशब्दता अर्चिरादि-अभिमानामुळें उपपन्न होते. [ आणि अभिमतव्याहारादिदेहाच्या अभावीं-इष्ट अर्चिरादिदेहाच्या अभावीं त्यांच्या अभिमानिदेवतांचें अनवस्थान आहे, असें म्हणतां येत नाहीं. कारण ऐश्वर्ययोगामुळें त्यांचें अनेक शरीरग्रहण संभवतें. यास्तव देवदत्तादि-शब्दांप्रमाणें अर्थतः चेतनांमध्यें-चेतन या अर्थी त्या शब्दांना मुख्यत्व आहे, असा भावार्थ.-" जाड्यामुळें-अज्ञानामुळें बद्ध झाला, इत्यादि प्रयोगांत गुणवाचक जाड्यादि शब्दांमध्यें पंचमीचा प्रयोग केलेला दिसत असल्यामुळें, अर्चिरा-दिकांना गुणवचनत्व नसल्यामुळें, 'वहन'-वाहून नेणें, या क्रियेमध्यें अर्चिरा-दिकांचें हेतुत्व अवगत होत नसल्यामुळें व 'अर्चिषः' या पंचमीप्रयोगावरून अर्चीच्या अपादानत्वाची प्रतीति येत असल्यामुळें त्यांच्या आतिवाहिकत्वाची सिद्धि होत नाहीं" अशी आशंका घेऊन 'अर्चिषः०' इत्यादि म्हणतात-]

**भाष्यं**—**'अर्चिषोऽहः' इत्यादिनिर्देशस्तु आतिवाहिकत्वेऽपि न विरुध्यते । अर्चिषा हेतुनाऽहरभिसंभवति । अह्ना हेतुना आपूर्यमाणपक्षमिति । तथा च लोके प्रसिद्धेष्वप्यातिवाहिकेषु एवंजातीयक उपदेशो दृश्यते । गच्छ त्वमितो बलवर्माणं ततो जयसिंहं ततः कृष्णगुप्तमिति ॥**

**भाष्यार्थ**—पण 'अर्चीपासून अहर्'-छां. ४. १५. ५, ५. १०. १.-इत्यादि निर्देश अर्चिरादिकांच्या आतिवाहिकत्वपक्षींहि विरुद्ध होत नाहीं. अर्चि

या हेतूनें अहर् होतो–त्याला अभिसंपन्न–प्राप्त होतो. अहर् या हेतूनें आपूर्यमाण-पक्षास प्राप्त होतो, असें त्यांचें आतिवाहिकत्व विरुद्ध नाहीं. [ तार्किकांच्या प्रक्रियेनें सिद्ध, अशा गुणत्वाचा अभाव जरी असला तरी आश्रितत्वानें त्याची सिद्धि होत असल्यामुळें 'हेतु' या अर्थी ही पंचमी आहे, असा भावार्थ.–'**तथा च०**' इत्यादि भाष्यानें उक्त अर्थी लौकिक व्यपदेश दाखवितात–]=आणि तसा व्यवहारांत प्रसिद्ध आतिवाहिकांत अशा जातीचा उपदेश प्रत्यक्ष अनुभवास येतो. 'तूं येथून बलवर्म्याकडे जा. तेथून जयसिंहाकडे, त्यानंतर कृष्णगुप्ताकडे' अशा प्रकारचा उपदेश प्रतीत होतो. [–याहि कारणानें अर्चिरादिशब्दांना गमयितृत्व-विषयता आहे–त्यांचा पोंचविणारे हा अर्थ आहे,असें'**अपि च०**'इत्यादि सांगतात–]

**भाष्यं–अपि चोपक्रमे 'तेऽर्चिराभिसंभवन्ति' इति संबंधमात्रमुक्तं । न संबंधविशेषः कश्चित् । उपसंहारे तु 'स एतान्ब्रह्म गमयति' इति संबंधविशेषोऽतिवाह्यातिवाहकत्वलक्षण उक्तः । तेन स एवोपक्रमेऽपीति निर्धार्यते ॥**

**भाष्यार्थ**––शिवाय उपक्रमामध्यें 'ते अर्चीला प्राप्त होतात'–पृ.७४२–असा केवल संबंध सांगितला आहे. कोणताहि संबंधविशेष सांगितलेला नाहीं. पण उपसंहारामध्यें 'तो यांना ब्रह्माला पोंचवितो.'–पृ. ७४९–असा अतिवाह्य-अतिवाहकलक्षण संबंधविशेष सांगितला आहे. त्यामुळें तोच संबंधविशेष उपक्रमामध्येंहि आहे, असा निर्धार–निर्णय केला जातो. [–'विशेषाची अपेक्षा करणारा सामान्यवचन–सामान्य अर्थ सांगणारा शब्द उपलब्ध झाला असतां विशेष-शब्दानें त्या सामान्याचें नियमन–अर्थनिर्णय करावा,' अशा या न्यायानें अतिवाह्य-अतिवाहकसंबंधाची सिद्धि होते, असें हेत्वंतरच 'उपक्रमेऽपि इति निर्धार्यते' या भाष्यानें स्पष्ट केलें आहे.–आतां अर्चिरादिकांचें भोगभूमित्व जें सांगितलें आहे त्याला '**संपिंडित०**' इत्यादि भाष्यानें दूषित करितात–]

**भाष्यं––संपिंडितकरणत्वादेव च गंतॄणां न तत्रोपभोगसंभवः । लोकशब्दस्त्वनुपभुंजानेष्वपि गंतृषु गमयितुं शक्यते । अन्येषां तल्लोकवासिनां भोगभूमित्वात् । अतोऽग्निस्वामिकं लोकं प्राप्तोऽग्निनाऽतिवाह्यते । वायुस्वामिकं प्राप्तो वायुनेति योजयितव्यम् ॥ ५ ॥**

**भाष्यार्थ**––आणि संपिंडितकरणत्वामुळेंच–इंद्रियें एकाकार झालेलीं असल्यामुळेंच गमन करणारांचा अर्चिरादिस्थानीं उपभोग संभवत नाहीं. [–**लोक**-शब्दामुळें अर्चिरादिकांचें भोगभूमित्व जें सांगितलें आहे, त्याचें '**लोकशब्दस्तु०**' इत्यादि भाष्यानें प्रत्याख्यान–]=पण लोक हा शब्द गमन करणारे तेथें उपभोग

जरी घेत नसले तरी आर्चिरादिकांमध्यें योजितां येणें शक्य आहे. त्या त्या लोकीं राहणाऱ्या अन्य जीवांचें त्यांना भोगभूमित्व आहे. [-गमन करणारांच्या भोक्तृत्वाभावींहि वाक्याचा निर्णय करितां येणें शक्य आहे, असें फलित '**अतः०**' इत्यादि भाष्यानें सांगतात-]=यास्तव अग्नि ज्याचा स्वामी आहे अशा लोकास प्राप्त झालेला मृत जीव अग्नीकडून पुढें पोंचविला जातो, वायुस्वामिक लोकाला प्राप्त झालेला वायूकडून नेला जातो, अशी वाक्याची योजना करावी. ५. [-सूत्रान्तराला अवतरण देण्यासाठीं '**कथं०**' इत्यादि भाष्यानें शंका-]

**भाष्यं—कथं पुनरातिवाहिकत्वपक्षे वरुणादिषु तत्संभवः। विद्युतो ह्यधि वरुणादय उपक्षिप्ता विद्युतस्त्वनंतरमा ब्रह्मप्राप्तेः अमानवस्यैव पुरुषस्य गमयितृत्वं श्रुतमिति। अत उत्तरं पठति—**

**भाष्यार्थ—**"अहोपण, या आतिवाहिकत्वपक्षीं वरुणादिकांमध्यें त्याचा-आतिवाहिकत्वाचा संभव कसा आहे? [-'त्यांत कोणती अनुपपत्ति आहे?' '**विद्युतः हि०**' इत्यादि उत्तर-]=कारण विद्युत्-लोकाच्या पुढें वरुणादिकांचा उपक्षेप -संनिवेश केलेला आहे. पण विद्युत्-च्या पुढें ब्रह्मप्राप्ति होईपर्यंत अमानव पुरुषाचेंच गमयितृत्व श्रुत आहे, '**इति**'-तेव्हां वरुणादिकांच्या गमयितृत्वाचा संभव कसा?" [-याप्रमाणें आर्चिरादिकांचें आतिवाहिकत्वहि नियत नाहीं, असें आक्षेपकानें म्हटलें असतां '**अतः०**' इत्यादि भाष्यानें त्याचें निरसन करितात-] =म्हणून '**वैद्युतेनैव०**' इत्यादि सूत्रानें उत्तर पढतात-

## सूत्रं—वैद्युतेनैव ततस्तच्छ्रुतेः ॥६॥ (४)

**सूत्रार्थ**—विद्युल्लोकास प्राप्त झालेल्या त्या 'वैद्युत'-अमानव पुरुषाकडूनच विद्युल्लोकप्राप्तीनंतर नेले जाणारे उपासक कार्यब्रह्माला प्राप्त होतात. कारण त्या अमानव पुरुषाचेंच गमयितृत्व 'अमानवः स एत्य०' इत्यादि श्रुतींत श्रुत आहे. ६. (४)-सु. ब्र. ४८३.-[-वरुणादिकांमध्यें वचनामुळें अपवादाचा अंगीकार करून 'ततः०' इत्यादि भाष्यानें सूत्राचा विभाग करितात-]

**भाष्यं—ततो विद्युदभिसंभवनादूर्ध्वं विद्युदनंतरवर्तिनैव अमानवेन पुरुषेण वरुणलोकादिष्वतिवाह्यमाना ब्रह्मलोकं गच्छन्तीत्यवगंतव्यम्। 'तान्वैद्युतान्पुरुषोऽमानवः स एत्य ब्रह्मलोकं गमयति' इति तस्यैव गमयितृत्वश्रुतेः। वरुणादयस्तु तस्यैवाप्रतिबंधकरणेन साहाय्यानुष्ठानेन वा केनचिदनुग्राहका इत्यवगंतव्यम्। तस्मात्साधूक्तं आतिवाहिका देवतात्मानोऽर्चिरादय इति॥**

**भाष्यार्थ**—' ततः '–त्यानंतर–विद्युदभिसंभवनानंतर–विद्युल्लोकाला जाऊन पोंचल्यानंतर 'विद्युत्-च्या अनंतरवर्ती अमानव पुरुषाकडूनच' वरुणादि लोकांतून गमन करविले जाणारे–उचलून नेले जाणारे मृत उपासक ब्रह्मलोकास जातात, असें जाणावें. कारण " विद्युल्लोकास प्राप्त झालेल्या त्या उपासकांस तो अमानव पुरुष येऊन ब्रह्मलोकाला पोंचवितो–घेऊन जातो. "–पृ. ७४९–असे त्याचेंच गमयितृत्व श्रुत आहे. [–" तर मग अर्चिरादिमार्गांतील वरुणादिकांचा काय उपयोग ? " ' **वरुणादयस्तु०**' इत्यादि भाष्यानें उत्तर–]=पण वरुणादिक त्याच्याच अप्रतिबंधकरणानें–त्याला प्रतिबंध न करून किंवा कांहीं साहाय्यानुष्ठानानें–कांहीं साह्य करून, अनुग्राहक होतात असें जाणावें. [–त्यांना स्वतः साक्षात् वाहकत्व जरी नसलें तरी त्यांना साह्यकरणानें परंपरेनें वाहकत्व असल्यामुळें 'अर्चिरादि-'शब्दांना गमयितृविषयत्व आहे, असा ' **तस्मात्०** ' इत्यादि भाष्यानें उपसंहार–]=म्हणून अर्चिरादिक हे देवतारूप आतिवाहिक आहेत, असें जें म्हटलें आहे तें अगदीं युक्त आहे, असें सिद्ध झालें. ६–सु. ब्र. ४८४–( ४ )

**( ५ कार्याधिकरण. सू. ७-१४. )**

—गतीच्या निरूपणानंतर'**कार्यं०**'इत्यादि सूत्राने गंतव्याचें निरूपण करितात–

## सूत्रं—कार्यं बादरिरस्य गत्युपपत्तेः ॥ ७

**सूत्रार्थ**—कार्य–अपर ब्रह्मच गंतव्य आहे, असें बादरिआचार्य मानितो. कारण या कार्य ब्रह्माच्या गतीची–गन्तव्यत्वाची उपपत्ति आहे. ७.–सु.ब्र.४८५. [–ब्रह्माला विषय करून ' **स एनान्०**' इत्यादि भाष्यानें संशय सांगतात–]

**भाष्यं**—' **स एनान्ब्रह्म गमयति** ' **इत्यत्र विचिकित्स्यते–किं कार्यमपरं ब्रह्म गमयत्याहोस्वित्परमेवाविकृतं मुख्यं ब्रह्मेति । कुतः संशयः । ब्रह्मशब्दप्रयोगाद्गतिश्रुतेश्च ॥**

**भाष्यार्थ**—" तो अमानव पुरुष ह्या उपासकांना ब्रह्माला पोंचवितो " असें जें श्रुत आहे त्याविषयीं " तो काय, कार्य–अपर ब्रह्माला पोंचवितो कीं, अविकृत मुख्य पर ब्रह्मालाच पोंचवितो " असा संदेह केला जातो. [–प्रश्नपूर्वक हेतूला अवतरण–]=पण असा संशय कोणत्या कारणानें येतो ? '**ब्रह्मशब्द०**' –'**ब्रह्म** ' या शब्दाचा प्रयोग केलेला असल्यामुळें व गतिश्रुति असल्यामुळें. [–यांतील पहिला हेतु पूर्वपक्षाला व दुसरा हेतु उत्तरपक्षाला अनुगुण–अनुकूल आहे. येथें प्रकृत अर्चिरादिगतीनें गंतव्य विद्याफलभूत ब्रह्माचें निरूपण केलेलें असल्यामुळें याच्या पादादिसंगति आहेत. पूर्वपक्षांत ' पर ब्रह्मज्ञाचीहि गति व

उत्क्रांति सिद्ध होते ' आणि सिद्धान्तांत ' त्या परब्रह्माहून अन्याचीच-अपर ब्रह्माचीच गति व उत्क्रांति नियत आहे ' असें मानणारे आचार्य सूत्राची योजना करणारे असे होत्साते प्रथम ' तत्र० ' इत्यादि भाष्यानें सिद्धान्त सांगतात-]

**भाष्यं**—**तत्र कार्यमेव सगुणमपरं ब्रह्मैनान्गमयत्यमानवः पुरुष इति बादरिराचार्यो मन्यते। कुतः। अस्य गत्युपपत्तेः। अस्य हि कार्यब्रह्मणो गंतव्यत्वमुपपद्यते प्रदेशवत्त्वात्। न तु परस्मिन्ब्रह्मणि गंतृत्वं गंतव्यत्वं गतिर्वाऽवकल्पते। सर्वगतत्वात्प्रत्यगात्मत्वाच्च गंतॄणाम्॥ ७॥**

**भाष्यार्थ**—असा संशय आला असतां अमानव पुरुष या उपासकांना 'कार्यालाच'-सगुण अपर ब्रह्मालाच नेऊन पोंचवितो,असें बादरि-आचार्य मानितो. [-" अहोपण, ब्रह्मशब्द सगुण-निर्गुणब्रह्मसाधारण असतांना गतीचें कार्यविषयत्व अहेतुक आहे म्ह० गति कार्यब्रह्मविषय आहे, असें म्हणण्यास कांहीं कारण नाहीं," अशी शंका-]=कोणत्या कारणानें बादरि-आचार्य असें मानितो? [-'**अस्य गत्युपपत्तेः०** ' या हेतूला अवतरण देऊन त्याचें व्याख्यान करितात-]=याच्या गतीची उपपत्ति असल्यामुळें, या कार्यब्रह्माचेंच गन्तव्यत्व-प्राप्यत्व उपपन्न होतें. कारण त्याला प्रदेशवत्त्व आहे. पण परब्रह्मामध्यें गन्तृत्व, गन्तव्यत्व किंवा गति संभवत नाहीं. कारण त्याला सर्वगतत्व आहे. [-" अहोपण, त्याला सर्वगतत्व जरी असलें तरी दुसऱ्या प्रदेशीं-स्वभिन्न प्रदेशीं असलेल्या त्याला आकाशाप्रमाणें गन्तव्यत्व असेल ? " अशी आशंका घेऊन ' **प्रत्यक्०** ' इत्यादि भाष्यानें म्हणतात-]=आणि त्या परब्रह्माला गमन करणारांचें प्रत्यगात्मत्व आहे, त्यामुळें त्याच्या ठिकाणीं गन्तृत्वादि संभवत नाहीं. ७.[-कार्य ब्रह्म गन्तव्य आहे, याविषयीं '**विशेषितत्वाच्च०**' या सूत्रानें हेत्वंतर सांगतात-]

## सूत्रं—विशेषितत्वाच्च॥ ८

**सूत्रार्थ**—आणि ' ब्रह्मलोकांना पोंचवितो ' या श्रुत्यन्तरांत गंतव्य ब्रह्माला बहुवचनानें विशेषित केलें आहे, त्यामुळें कार्य ब्रह्म गंतव्य आहे.८.-सु.ब्र.४८९. [-'**ब्रह्मलोकान्०**' इत्यादि भाष्यानें सूत्राचें व्याख्यान करितात-]

**भाष्यं**—**'ब्रह्मलोकान्गमयति ते तेषु ब्रह्मलोकेषु पराः परावतो वसन्ति' इति च श्रुत्यंतरे विशेषितत्वात्कार्यब्रह्मविषयैव गतिरिति गम्यते। न हि बहुवचनेन विशेषणं परस्मिन्ब्रह्मण्यवकल्पते। कार्ये त्ववस्थाभेदोपपत्तेः संभवति बहुवचनम्॥**

**भाष्यार्थ**—आणि " तो त्या उपासकांना ब्रह्मलोकांस नेऊन पोंचवितो. ते त्या ब्रह्मलोकांमध्यें अनंत संवत्सर राहतात. "-बृ. ६. २. १५.-असें श्रुत्यन्तरांत

त्याला विशेषित–त्याला विशेषणविशिष्ट केलेलें असल्यामुळें गति कार्यब्रह्मविषयच आहे, असें अवगत होतें. [–"अहोपण, बहुवचनानें गंतव्य ब्रह्माला विशेषितत्व जरी असलें तरी परब्रह्माच्या गंतव्यत्वाचें निरसन कसें होतें ?" '**न हि०**' इत्यादि भाष्यानें उत्तर–]=कारण परब्रह्मामध्यें बहुवचनानें विशेषण उपपन्न होत नाहीं. [–" तर मग कार्यब्रह्मालाहि ऐक्य असल्यामुळें तद्विषय बहुवचनोक्तिहि अयुक्त आहे," अशी आशंका घेऊन '**कार्ये तु०**' इत्यादि भाष्यानें म्हणतात–]=परंतु कार्यब्रह्मामध्यें अवस्थाभेदाचा संभव असल्यामुळें बहुवचन उपपन्न होतें.[–सूत्रांतील '**च**'शब्दानें सुचविलेलें युक्त्यन्तर '**लोकश्रुतिः०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]

**भाष्यं—लोकश्रुतिरपि विकारगोचरायामेव संनिवेशविशिष्टायां भोगभूमावांजसी । गौणी त्वन्यत्र ' ब्रह्मैव लोक एष सम्राट् ' इत्यादिषु । अधिकरणाधिकर्तव्यनिर्देशोऽपि परस्मिन्ब्रह्मण्यनांजसः स्यात् । तस्मात्कार्यविषयमेवेदं नयनम् ॥ ८ ॥ ननु कार्यविषयेऽपि ब्रह्मशब्दो नोपपद्यते । समन्वये हि समस्तस्य जगतो जन्मादिकारणं ब्रह्मेति स्थापितमिति । अत्रोच्यते––**

**भाष्यार्थ**—' ब्रह्मलोक ' अशी लोकश्रुतिहि विकारविषयच रचनाविशिष्ट भोगभूमीमध्यें मुख्य आहे. [–" पण कांहीं ठिकाणीं परब्रह्मामध्येंहि लोकश्रुति उपलब्ध होते " अशी आशंका घेऊन '**गौणी०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–] =पण " हे सार्वभौम राजा, ब्रह्मच हा लोक आहे " इत्यादि अन्य स्थानीं लोकश्रुति गौणी आहे. [–' ब्रह्मलोकेषु ' अशा या अधिकरण सप्तमीचाहि परब्रह्मामध्यें असंभव असल्यामुळें गति कार्यविषयच आहे, असें हेत्वंतर '**अधिकरण०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=अधिकरण-अधिकर्तव्यनिर्देशहि परब्रह्मामध्यें अनुपपन्न होईल. [–सूत्रोक्त हेतूच्या फलिताचें निगमन–]='**तस्मात्०**'–म्हणून हें उपासकांचें नयन–नेणें कार्यब्रह्मविषयच आहे. ८. [–'**ननु०**' इत्यादि भाष्यानें ब्रह्मशब्दश्रुतिविरोधाची शंका–]="अहोपण, 'ब्रह्म' हा शब्द कार्यब्रह्म या अर्थींहि उपपन्न होत नाहीं. कारण समन्वयामध्यें 'समस्त जगाचें जन्मादिकारण ब्रह्म आहे,' असें प्रस्थापित केलें आहे." [ "वृद्धव्यवहारांत प्रयोग व प्रत्यय यांच्या योगानें ब्रह्मशब्दाचें पर व अपर ब्रह्म या अर्थीं शाब्द मुख्यत्व तुल्य आहे" अशी आशंका घेऊन ' पण अनवच्छिन्नत्वानें अर्थतः मुख्यत्व परब्रह्माचेंच आहे,' असें '**समस्तस्य०**' इत्यादि भाष्यानें सांगितलें आहे.–'**अत्रोच्यते०**' या भाष्यानें सूत्रानें परिहार–] =या शंकेचा परिहार '**सामीप्यात् तु०**' इत्यादि सूत्रानें केला जातो–]

## सूत्रं--सामीप्यात्तु तद्व्यपदेशः ॥ ९

**सूत्रार्थ**—पण कार्यब्रह्माला परब्रह्माचें सामीप्य असल्यामुळें त्याचा ब्रह्मशब्दानें व्यपदेश–लक्षणेनें प्रयोग होतो. ९.–सु. ब्र.४८५.–[–मुख्यार्थाचा असंभव झाला असतां यौगिकत्वानेंहि ब्रह्मपदाचा निर्णय करावा, असें मानून '**तुशब्दः०**' इत्यादि भाष्यानें सूत्राचें व्याख्यान करितात–]

**भाष्यं—तुशब्द आशंकाव्यावृत्त्यर्थः । परब्रह्मसामीप्यादपरस्य ब्रह्मणस्तस्मिन्नपि ब्रह्मशब्दप्रयोगो न विरुध्यते । परमेव हि ब्रह्म विशुद्धोपाधिसंबंधं कचित्कैश्चिद्विकारधर्मैः मनोमयत्वादिभिः उपासनायोपदिश्यमानमपरमितिस्थितिः॥ ९**

**भाष्यार्थ**—सूत्रांतील 'तु-'शब्द आशंकेच्या व्यावृत्तीसाठीं आहे. अपर ब्रह्माला परब्रह्माचें सामीप्य असल्यामुळें 'अपर ब्रह्म' या अर्थी हिब्रह्मशब्दाचा प्रयोग विरुद्ध नाहीं. [–'**परमेव०**' इत्यादि भाष्यानें अविरोधच साधितात–]=कारण विशुद्ध उपाधिसंबंध–सात्त्विक उपाधिविशिष्ट परब्रह्मच कचित् कांहीं मयोमयत्वादि विकारधर्मांनीं उपासनेसाठीं उपदेश केलें जाणारें असें होत्सातें अपर ब्रह्म आहे, अशी वस्तुस्थिति आहे. ९. [–"ब्रह्मशब्दाच्या मुख्यार्थाचा परिग्रह केला असतां बहुतर कार्यलिंगाचा भंग जसा होतो त्याप्रमाणें कार्याचें ग्रहण केलें असतांहि अनावृत्तिश्रुतीची अनुपपत्ति तुल्य–समान आहे" अशी '**ननु०**' इत्यादि शंका–]

**भाष्यं---ननु कार्यप्राप्तावनावृत्तिश्रवणं न घटते । न हि परस्माद्ब्रह्मणोऽन्यत्र कचिन्नित्यता संभवति । दर्शयति च देवयानेन पथा प्रस्थितानामनावृत्तिं 'एतेन प्रतिपद्यमाना इमं मानवमावर्तं नावर्तन्ते' इति 'तेषामिह न पुनरावृत्तिरस्ति' 'तयोर्ध्वमायन्नमृतत्वमेति' इति चेत् । अत्र ब्रूमः—**

**भाष्यार्थ**—अहोपण उपासकाला कार्यब्रह्माची प्राप्ति होते, असें म्हटलें असतांहि अनावृत्तिश्रुति उपपन्न होत नाहीं. [–त्याविषयीं हेतु–]='**न हि०**'–कारण परब्रह्माहून दुसऱ्या कोणत्याहि पदार्थामध्यें नित्यत्व संभवत नाहीं. [–"अहोपण अर्चिरादि मार्गानें गमन करणाऱ्या उपासकांची अनावृत्ति–मोक्ष होत नाहीं, कारण त्यांची केवळ ब्रह्मलोकप्राप्ति श्रुत आहे" अशी आशंका घेऊन वादी '**दर्शयति०**' इत्यादि म्हणतो–]=देवयानमार्गानें प्रस्थित झालेल्या उपासकांची अनावृत्ति–अपुनर्जन्म "या मार्गानें गमन करणारे या मानव आवर्तामध्यें–या मन्वंतरांत परत येत नाहींत"–छां.४.१५.सु.उ.३८९.–ही श्रुति,त्याचप्रमाणें"त्यांची येथें पुनरावृत्ति होत नाहीं" "त्या मूर्धन्य नाडीनें ऊर्ध्व गमन करणारा उपासक अमृतत्वास प्राप्त होतो"–का. २. ३. १६–ही श्रुति दाखविते, असें जर म्हणाल

तर [-हें अनावृत्तिश्रवण क्रममुक्तीच्या अभिप्रायानें आहे, असा सूत्रानें परिहार-] ='अत्र'०-याविषयीं आम्ही 'कार्यात्यये०' इत्यादि सांगतों-

**सूत्रं--कार्यात्यये तदध्यक्षेण सहातः परमभिधानात् ॥ १०**

**सूत्रार्थ**--कार्यब्रह्मलोकाचा विनाश झाला असतां त्या लोकाचा अध्यक्ष-स्वामी जो हिरण्यगर्भ त्याच्या बरोबर 'अतः परं'-त्या कार्यब्रह्माहून श्रेष्ठ असलेल्या ब्रह्माला ते प्राप्त होतात, असें 'अभिधानामुळें'-अनावृत्ति-श्रुतीच्या कथनावरून जाणावें. १०. -सु. ब्र. ४८५-[-'कार्य०' इत्यादि भाष्यानें सूत्राक्षरांची योजना करितात-]

**भाष्यं--कार्यब्रह्मलोकप्रलयप्रत्युपस्थाने सति तत्रैवोत्पन्नसम्यग्दर्शनाः सन्तः तदध्यक्षेण हिरण्यगर्भेण सहातः परं परिशुद्धं विष्णोः परमं पदं प्रतिपद्यन्त इति । इत्थं क्रममुक्तिः अनावृत्त्यादिश्रुत्याभिधानेभ्योऽभ्युपगंतव्या । न ह्यंजसैव गतिपूर्विका परप्राप्तिः संभवतीत्युपपादितम् ॥ १० ॥**

**भाष्यार्थ**--कार्य ब्रह्मलोकांच्या प्रलयाचें प्रत्युपस्थान झालें असतां-तो प्राप्त झाला असतां त्या ब्रह्मलोकींच ज्यांचें सम्यग्दर्शन उत्पन्न झालें आहे, असे होत्साते ते उपासक 'तदध्यक्षेण सह'-त्या ब्रह्मलोकाचा अध्यक्ष-स्वामी जो हिरण्यगर्भ त्यासह-त्याच्याबरोबर 'अतःपरं'-त्याहून पर परिशुद्ध व्यापक ईश्वराच्या परम पदाला प्राप्त होतात, अशी ही क्रममुक्ति अनावृत्त्यादि-श्रुतिकथनांवरून स्वीकारावी. [-"अहोपण साक्षात्च ब्रह्मप्राप्तीनें अनावृत्ति सिद्ध होत असतांना असें परंपराश्रयण-परंपरेनें ब्रह्मप्राप्तीचा स्वीकार कोणत्या कारणानें केला जात आहे?" 'न हि०' इत्यादि भाष्यानें उत्तर-]=कारण साक्षात्च गतिपूर्विका परब्रह्माची प्राप्ति संभवत नाहीं, असें आम्हीं उपपादन केलें आहे. १०. [-'स्मृतेश्च' या सूत्रानें क्रममुक्तीविषयीं स्मृतीचें प्रमाण देतात-]

**सूत्रं--स्मृतेश्च ॥ ११**

**सूत्रार्थ**-आणि 'ब्रह्मणा सह०' इत्यादि स्मृति असल्यामुळें ब्रह्मलोकास प्राप्त झालेले क्रमानें मुक्त होतात. ११. सु. ब्र. ४८६. [-'स्मृतिरपि०' इत्यादि भाष्यानें त्या स्मृतीचाच उल्लेख करितात-]

**भाष्यं--स्मृतिरप्येतमर्थमनुजानाति-"ब्रह्मणा सह ते सर्वे संप्राप्ते प्रतिसंचरे । परस्यान्ते कृतात्मानः प्रविशन्ति परं पदम्" इति । तस्मात्कार्यब्रह्मविषया एव गतिश्रुतयः इति सिद्धान्तः ॥ ११ ॥ कं पुनः पूर्वपक्षमाशंक्यायं सिद्धान्तः प्रतिष्ठापितः 'कार्यं बादरिः' इत्यादिनेति । स इदानीं सूत्रैरेवोपप्रदर्श्यते-**

**भाष्यार्थ**—'प्रतिसंचरे संप्राप्ते-" महाप्रलय प्राप्त झाला असतां 'परस्य अन्ते'-हिरण्यगर्भाच्या अन्तसमयीं- त्याच्या अधिकाराची परिसमाप्ति झाली असतां 'कृतात्मानः'-शुद्धचित्त झालेले ब्रह्मलोकनिवासी, त्यांत ज्यांना सम्यग्ज्ञान झालें आहे, असे ते सर्व, 'ब्रह्मणा सह'-मुक्त होणाऱ्या हिरण्यगर्भासह 'परं पदं प्रविशन्ति'-परम पदांत प्रवेश करितात" अशी ही स्मृतिहि या अर्थाला-क्रममुक्तीला अनुज्ञा देते. [-'**तस्मात्**०' इत्यादि भाष्यानें सिद्धान्ताचा उपसंहार करितात-]=म्हणून कार्यब्रह्मविषयच गतिश्रुति आहेत,असा हा सिद्धान्त आहे. ११. [-'**कं पुनः**०' इत्यादि भाष्यानें आकांक्षापूर्वक पूर्वपक्षसूत्रांना अवतरण देतात-] =" अहोपण तुम्हीं कोणत्या पूर्वपक्षाची आशंका घेऊन 'कार्यं बादरिः'-पृ.७५४-इत्यादि सूत्रसमूहानें हा सिद्धान्त प्रस्थापित केला आहे ?" '**इति**'-अशी आकांक्षा झाली असतां तो पूर्वपक्ष आतां तीन सूत्रांनींच उपप्रदर्शित केला जातो-[-'ब्रह्म-'शब्दाच्या मुख्यार्थत्वाचा आश्रय करून वादी '**परं**०' इत्यादि सूत्रानें परब्रह्माचेंच गंतव्यत्व सांगतो-]

### सूत्रं—परं जैमिनिर्मुख्यत्वात् ॥ १२

**सूत्रार्थ**—नपुंसकलिंगी 'ब्रह्म-'शब्दाला 'परब्रह्म' या अर्थीच मुख्यत्व असल्यामुळें अमानव पुरुष परब्रह्मालाच नेऊन पोंचवितो, असें जैमिनि-आचार्य मानितो. १२.सु.ब्र. ४८६-[-'**जैमिनिः**०' इत्यादि भाष्यानें सूत्रांतील प्रतिज्ञेचें विवरण-]

**भाष्यं—जैमिनिस्त्वाचार्यः 'स एतान्ब्रह्म गमयति' इत्यत्र परमेव ब्रह्म प्रापयतीति मन्यते। कुतः। मुख्यत्वात्। परं हि ब्रह्म ब्रह्मशब्दस्य मुख्यमालंबनं, गौणमपरं, मुख्यगौणयोश्च मुख्ये संप्रत्ययो भवति ॥ १२ ॥**

**भाष्यार्थ**—परंतु जैमिनि-आचार्य 'तो अमानव पुरुष त्यांना ब्रह्माला पोंचवितो.'-पृ.७४९-अशा या श्रुतिवचनांत परब्रह्मालाच पोंचवितो, असें मानितो. [-" अहोपण, जें युक्तियुक्त असतें त्यालाच ग्राह्यत्व असल्यामुळें जैमिनीसारख्या वक्त्याचा गौरव आकिंचित्कर आहे," अशी शंका-]=कोणत्या कारणानें ? [-सूत्रोक्त हेतु-]='**मुख्यत्वात्**'-' मुख्यत्वामुळें.' कारण परब्रह्मच 'ब्रह्म-'शब्दाचें मुख्य आलंबन-आधार-विषय आहे, अपर ब्रह्म गौण आलंबन आहे. [-"अहोपण, गौणाचेंहि मुख्याप्रमाणें ब्रह्म-शब्द-आलंबनत्व इष्ट आहे. कारण त्यांचा अविशेष आहे" अशी आशंका घेऊन '**मुख्यगौणयोः**०' इत्यादि भाष्यानें सांगतो-]=आणि मुख्य व गौण यांतील मुख्यामध्यें संप्रत्यय होतो. १२. [-याहि कारणानें मुख्यच ब्रह्म गंतव्य आहे, असें '**दर्शनाच्च**०' या सूत्रानें पूर्ववादी सांगतो-]

## सूत्रं—दर्शनाच्च ॥ १३

**सूत्रार्थ**–'त्या मूर्धन्य नाडीनें वर जाणारा अमृतत्वास प्राप्त होतो' ही श्रुति अमृतत्व गतिपूर्वक दाखविते. १३.–सु.ब्र.४८६–[–'तया०' इत्यादि श्रुतीनें दर्शनविवरण–]

**भाष्यं—' तयोर्ध्वमायन्नमृतत्वमेति ' इति च गतिपूर्वकममृतत्वं दर्शयति। अमृतत्वं च परस्मिन्ब्रह्मण्युपपद्यते न कार्ये, विनाशित्वात्कार्यस्य। ' अथ यत्रान्यत्पश्यति तदल्पं तन्मर्त्यम् ' इति प्रवचनात्। परविषयैव चैषा गतिः कठवल्लीषु पठ्यते। न हि तत्र विद्यान्तरप्रक्रमोऽस्ति 'अन्यत्र धर्मादन्यत्राधर्मात्' इति परस्यैव ब्रह्मणः प्रक्रान्तत्वात् ॥ १३ ॥**

**भाष्यार्थ**—आणि 'त्या मूर्धन्य नाडीनें ऊर्ध्व गमन करणारा अमृतत्वास प्राप्त होतो '–पृ. ७२६–असें हें श्रुतिवचन गतिपूर्वक अमृतत्व दाखवितें. [–"अहो-पण, आपेक्षिक असलेलें तें अमृतत्व पक्षान्तरींहि संभवतें" अशी आशंका घेऊन ' पण मुख्य अमृतत्व संभवत असतांना आपेक्षिक अमृतत्व स्वीकारणें युक्त नाहीं' असें पूर्ववादी ' **अमृतत्वं च०** ' इत्यादि भाष्यानें सांगतो–]=आणि अमृतत्व पर ब्रह्मामध्यें उपपन्न होतें, कार्यब्रह्मामध्यें तें संभवत नाहीं. कारण कार्याला विना-शित्व आहे. [–' **अथ यत्र०** ' इत्यादि वाक्यानें कार्याच्या विनाशित्वाविषयीं प्रमाण–]=" पण ज्या अवस्थेंत अन्य वस्तु पाहतो तें अल्प तें मर्त्य–विनाशी " –छां. ७. २४. १.–असें प्रवचन–स्पष्ट वचन असल्यामुळें कार्याला विनाशित्व आहे. [–"अहोपण, परब्रह्मामध्यें गति युक्त नाहीं, असें आम्हीं सांगितलें आहे " अशी आशंका घेऊन ' **परविषया०** ' इत्यादि भाष्यानें वादी सांगतो–]=आणि कठवल्लींमध्यें ही गति पर ब्रह्मविषयच पठित आहे. [–" पण हें तुम्हांला ज्ञात कसें झालें ? " अशी आशंका घेऊन ' प्रकरणसामर्थ्यामुळें ' असें ' **न हि०** ' इत्यादि भाष्यानें वादी सांगतो–]=कारण तेथें विद्यान्तराचा प्रक्रम–अपरविद्येचें प्रकरण नाहीं. कारण " धर्माहून अन्य–विलक्षण, अधर्माहून अन्य–विलक्षण " –का. १. २. ४.–असें परब्रह्मालाच प्रक्रान्तत्व आहे, परब्रह्माचेंच प्रकरण आरंभिलेलें आहे. १३. [ब्रह्मश्रुति, अमृतत्वश्रुतिलिंग व ' त्या मूर्धन्यनाडीनें ऊर्ध्व गमन करणारा ' असें प्रकरण, अशा या तीन प्रमाणांनीं गति परब्रह्मविषय आहे, असें सांगितलें.–आतां ' मी प्रजापतीच्या सभेला–गृहाला प्राप्त होतों ' असा मरणसमयीं जो प्राप्तीविषयींचा संकल्प तो कार्यविषयच आहे, त्यामुळें त्यालाच गंतव्यत्व आहे, अशी आशंका घेऊन ' **न च०** ' इत्यादि सूत्रानें वादी म्हणतो–]

## सूत्रं—न च कार्ये प्रतिपत्त्यभिसंधिः ॥ १४ ॥ ( ५ )

**सूत्रार्थ—**स्थानप्राप्तीचा अभिसंधि–संकल्प कार्यब्रह्माविषयीं नाहीं, तर परब्रह्माविषयींच आहे. १४. (५)–सु.ब्र. ४८६.–[–' **अपि च०**'–इत्यादि भाष्यानें सूत्राचें व्याख्यान–]

**भाष्यं—अपि च ' प्रजापतेः सभां वेश्म प्रपद्ये ' इति नायं कार्यविषयः प्रतिपत्त्यभिसंधिः ' नामरूपयोर्निर्वहिता ते यदंतरा तद्ब्रह्म ' इति कार्यविलक्षणस्य परस्यैव ब्रह्मणः प्रकृतत्वात् । ' यशोऽहं भवामि ब्राह्मणानाम् ' इति च सर्वात्मत्वेनोपक्रमणात् । " न तस्य प्रतिमा अस्ति यस्य नाम महद्यशः" इति च परस्यैव ब्रह्मणो यशोनामत्वप्रसिद्धेः ॥**

**भाष्यार्थ—**शिवाय 'चतुर्मुखाच्या सभेस त्या प्रभुविमित–प्रभुनिर्मित गृहास मी प्राप्त होतों '–छां. ८.१४.१.–असा हा कार्य ब्रह्मविषय प्राप्तिसंकल्प नाहीं. कारण "आकाश म्हणून श्रुति-स्मृतिप्रसिद्ध आत्मा नाम व रूप यांचा निर्वाहक–त्यांना व्यक्त करणारा आहे. तें नाम-रूप ज्याच्या आंत आहे किंवा जें नाम-रूपरहित आहे तें ब्रह्म " अशा कार्यविलक्षण पर ब्रह्मालाच येथें प्रकृतत्व आहे–त्याचेंच प्रकरण आरंभिलेलें आहे. [–पर ब्रह्मालाच गंतव्यत्व आहे, याविषयीं ' **यशोऽहं०**' इत्यादि वाक्यानें हेत्वंतर–]=आणि " मी ब्राह्मणांचें यश–आत्मा होतों, ( क्षत्रियांचा आत्मा, वैश्यांचा आत्मा होतों ) " असा सर्वात्मत्वानें उपक्रम केला आहे. [येथील ' यशः ' या शब्दाचा अर्थ आत्मा आहे. ' ब्राह्मणादिकांचा आत्मा ' असें सर्वात्मत्वकथन केलेलें असल्यामुळेंहि विद्वानाला परिच्छिन्न कार्याची प्राप्ति होत नाहीं, असा भावार्थ.–" अहोपण, 'यशः-'शब्दानें येथें विश्रुतत्व सांगितलें आहे, आत्मा सांगितलेला नाहीं " अशी आशंका घेऊन वादी ' **न तस्य०**' इत्यादि वचनानें तिचें निरसन करितो–]=आणि "त्या अखंड आत्म्याला उपमा नाहीं. ज्याचें नांव महद्यश आहे "–श्वे. ४.१९. सु.उ. ९४८–अशी पर ब्रह्माच्याच यशोनामत्वाची प्रसिद्धि आहे. [–" ब्रह्माच्या अधिकारामुळें–प्रकरणामुळें गृहप्राप्त्यादिसंकल्प ब्रह्मविषयच असू दे. तथापि ती प्राप्ति गतिपूर्वक कशी ? कारण गृहप्राप्तीला स्तुतिमात्रत्व आहे " अशी आशंका घेऊन वादी ' **सा च०**' इत्यादि म्हणतो–]

**भाष्यं—सा चेयं वेश्मप्रतिपत्तिर्गतिपूर्विका हार्दविद्यायामुदिता ' तदपराजिता पूर्ब्रह्मणः प्रभुविमितं हिरण्मयम् ' इत्यत्र । पदेरपि च गत्यर्थत्वान्मार्गापेक्षताऽवसीयते । तस्मात्परब्रह्मविषया गतिश्रुतय इति पक्षान्तरम् ॥**

**भाष्यार्थ**—आणि ‘ तत् ’–“ त्या ब्रह्मलोकांत ब्रह्मचर्यादि साधनानें रहित असलेल्या कोणाकडूनहि पराजित न झालेली म्हणून ‘ अपराजिता ’–‘ ब्रह्मणः पूः’–या ब्रह्माची–हिरण्यगर्भाची नगरी आहे. ‘प्रभुविमितं’–त्याच प्रभूनें निर्मिलेलें हिरण्मय वेश्म–गृह आहे. त्याला विद्वान् प्राप्त होतो”–छां.८.५.३.–अशी या वचनांत ती ही वेश्मप्रतिपत्ति हार्दविद्येंत–दहरविद्येंत गतिपूर्वक सांगितली आहे. [ पर ब्रह्मामध्येंहि वेश्मप्राप्तीचें साम्य असल्यामुळें तिचें गतिपूर्वकत्व त्यावरूनच सिद्ध होतें, असा भावार्थ.–शिवाय ‘पद् गतौ’–पद म्ह० गमन करणें, अशी स्मृति–पाणिनीचा धातुपाठ असल्यामुळेंहि वेश्मप्राप्तीला मार्गाची अपेक्षा भासते, असें **‘पदेरपि०’** इत्यादि भाष्यानें सांगतो–]=‘पद्’ या धातूलाहि गत्यर्थत्व असल्यामुळें –त्याचा ‘गति’ हा अर्थ असल्यामुळें मार्गाची अपेक्षता आहे, गतीला मार्गाची अपेक्षा आहे, असें प्राप्त होतें. [–‘ **तस्मात्०**’ इत्यादि भाष्यानें पूर्वपक्षाचा उपसंहार–] =म्हणून परब्रह्माविषय गतिश्रुति आहेत, गतिश्रुतींचा विषय परब्रह्म आहे, असें हें पक्षान्तर आहे. [–‘परं जैमिनिः०’इत्यादि तीन सूत्रें हीं सिद्धान्तसूत्रें आहेत, कारण त्यांना उत्तरसूत्रत्व आहे–तीं या अधिकरणांतील पुढील सूत्रें आहेत आणि पूर्वसूत्रें हीं पूर्वपक्षसूत्रें आहेत, अशी आशंका घेऊन त्यांची व्यवस्था लावण्यासाठीं **‘तौ एतौ०’** इत्यादि भाष्यानें भूमिका करितात—]

**भाष्यं—तावेतौ द्वौ पक्षावाचार्येण सूत्रितौ गत्युपपत्त्यादिभिरेको मुख्यत्वादिभिरपरः। तत्र गत्युपपत्त्यादयः प्रभवन्ति मुख्यत्वादीनाभासयितुं न तु मुख्यत्वादयो गत्युपपत्त्यादीनित्याद्य एव सिद्धान्तो व्याख्यातो द्वितीयः पूर्वपक्षः। न ह्यसत्यपि संभवे मुख्यस्यैवार्थस्य ग्रहणमिति कश्चिदाज्ञापयिता विद्यते ॥**

**भाष्यार्थ**—बादरायणाचार्यांनीं ते हे दोन पक्ष येथें सूत्रित केले आहेत. गत्युपपत्त्यादि हेतूंनीं एक व मुख्यत्वादि हेतूंनीं दुसरा. [–“ तथापि त्यांची व्यवस्था कशी ? ” **‘तत्र०’** इत्यादि भाष्यानें उत्तर–]=त्यांतील गत्युपपत्त्यादि हेतु मुख्यत्वादिकांना आभासरूप करण्यास समर्थ आहेत. पण तसे मुख्यत्वादि हेतु गत्युपपत्त्यादि हेतूंना आभासरूप करण्यास समर्थ नाहींत. म्हणून या दोन पक्षांतील आद्य–पहिला पक्षच सिद्धान्त सांगितला, त्याचें सिद्धान्तरूपानें व्याख्यान केलें आणि दुसरा पूर्वपक्ष सांगितला. [–“ पण दुसऱ्या पक्षांत ब्रह्मशब्दाच्या मुख्यार्थाचा लाभ होत असल्यामुळें त्यालाच उत्तरपक्षत्व आहे ” अशी आशंका घेऊन **‘ न हि०’** इत्यादि भाष्यानें सांगतात–]=कारण संभव नसतांनाहि मुख्याचेंच ग्रहण करावें, अशी आज्ञा करणारा कोणी विद्यमान नाहीं. [–‘ पण प्रकरण-

सामर्थ्यामुळें गतीला परब्रह्मविषयत्व आहे' असें जें वाद्याचें म्हणणें आहे, त्याविषयीं '**परविद्या०**' इत्यादि भाष्यानें म्हणतात-]

**भाष्यं—परविद्याप्रकरणेऽपि च तत्स्तुत्यर्थं विद्यान्तराश्रयगत्यनुकीर्तनमुपपद्यते 'विष्वङ्ङन्या उत्क्रमणे भवन्ति' इतिवत्। 'प्रजापतेः सभां वेश्म प्रपद्ये' इति तु पूर्ववाक्यविच्छेदेन कार्येऽपि प्रतिपत्त्यभिसंधिर्न विरुध्यते। सगुणेऽपि च ब्रह्मणि सर्वात्मत्वसंकीर्तनं 'सर्वकर्मा' 'सर्वकामः' इत्यादिवदवकल्पते। तस्मादपराविषया एव गतिश्रुतयः॥**

**भाष्यार्थ**—आणि परविद्याप्रकरणांतहि तिच्या स्तुतीसाठीं विद्यान्तराश्रय-अपर विद्येचा आश्रय केलेल्या गतीचें अनुकीर्तन उपपन्न होतें. "बाकीच्या तिरकस पसरलेल्या नाड्या उत्क्रमणासच कारण होतात."—छां. ८. ६. ६.—या अनुकीर्तनाप्रमाणें. [सुषुम्नाख्य ब्रह्मनाडीनें होणारी जी गति तिच्या प्रशंसेसाठीं ज्यांचा विद्येशीं मुळींच संसर्ग नाहीं, अशा इतर नाड्यांचेंहि ब्रह्मगतिप्रकरणांत जसें अनुकीर्तन केलें जातें, त्याप्रमाणें परविद्याधिकारांतहि दहरादिविद्याश्रयगतिनिमित्त फलाचें अनुकीर्तन उपपन्न होतें. कारण पर विद्येला गतिराहित्य जरी असलें तरी गतिपूर्वक प्राप्त होणारें जें फल तें त्या विद्येमुळेंच सिद्ध होतें. म्हणून ही विद्या फार मोठी आहे. कारण तिला निरतिशय ऐश्वर्याचें हेतुत्व आहे, असा स्तुतिप्रकर्ष-स्तुतीचें आधिक्य संभवतें, असा भावार्थ.—पण 'कार्यब्रह्माच्या प्राप्तीविषयीं उपासकाचा संकल्प नसतो'—पृ. ७६१—असें जें पूर्ववाद्याचें म्हणणें आहे, त्याविषयीं '**प्रजापतेः०**' इत्यादि म्हणतात-]=पण 'प्रजापतीच्या सभेला, वेश्माला प्राप्त होतों' असा जो प्राप्तिसंकल्प आहे तो पूर्ववाक्याच्या विच्छेदानें—परब्रह्मप्रकरणाचा विच्छेद करून कार्यब्रह्माविषयींहि असूं शकेल, पूर्वप्रकरणाच्या विच्छेदानें कार्यब्रह्मामध्येंहि तसा प्रतिपत्तिसंकल्प विरुद्ध होत नाहीं. [श्रुति व वाक्य या दोन प्रमाणांनीं प्रकरण हेय—त्याज्य आहे, असा भावार्थ.—आतां 'सर्वात्मत्वानुक्रमणामुळें प्रतिपत्त्यभिसंधीला परब्रह्मविषयत्व आहे,' असें जें वाद्याचें म्हणणें आहे त्याविषयीं '**सगुणेऽपि०**'इत्यादि म्हणतात-]=आणि सगुण ब्रह्मामध्येंहि 'सर्वकर्मा सर्वकामः०' इत्यादिकांप्रमाणें सर्वात्मत्वसंकीर्तन संभवतें. [प्रशंसेसाठीं किंवा उपासनेसाठीं तें संकीर्तन आहे, असा भावार्थ.—याप्रमाणें परब्रह्मविषयगतीचा असंभव आहे, असें झालें असतां '**तस्मात्०**' इत्यादि भाष्यानें त्याचें फलित सांगतात-]=म्हणून गतिश्रुति अपरब्रह्मविषयच आहेत. [—'**केचित्तु०**' इत्यादि भाष्यानें पक्षान्तराचा अनुवाद करून त्याला दूषितें करितात-]

**भाष्यं**—**केचित्पुनः पूर्वाणि पूर्वपक्षसूत्राणि भवन्त्युत्तराणि सिद्धान्तसूत्राणीत्येतां व्यवस्थामनुरुध्यमानाः परविषया एव गतिश्रुतीः प्रतिष्ठापयन्ति । तदनुपपन्नम् । गंतव्यत्वानुपपत्तेर्ब्रह्मणः । यत्सर्वगतं सर्वान्तरं सर्वात्मकं च परं ब्रह्म " आकाशवत्सर्वगतश्च नित्यः " । ' यत्साक्षादपरोक्षाद्ब्रह्म ' ' य आत्मा सर्वान्तरः ' ' आत्मैवेदं सर्वम् ' ' ब्रह्मैवेदं विश्वमिदं वरिष्ठम् ' इत्यादिश्रुतिनिर्धारितविशेषं, तस्य गंतव्यता न कदाचिदप्युपपद्यते । न हि गतमेव गम्यते । अन्यो ह्यन्यद्गच्छतीति प्रसिद्धं लोके ॥**

**भाष्यार्थ**—पण दुसरे कित्येक पूर्वींचीं ( ७-११ ) सूत्रें हीं पूर्वपक्षाचीं सूत्रें आहेत व पुढचीं ( ११-१४ ) सूत्रें हीं सिद्धान्तसूत्रें आहेत, अशा या व्यवस्थेचें अनुवर्तन करणारे असे होत्साते गतिश्रुति परब्रह्मविषयच आहेत, असें प्रस्थापित करितात. पण तें अनुपपन्न आहे. कारण परब्रह्माच्या गन्तव्यत्वाची अनुपपत्ति आहे [–' **यत्सर्वगतं०** ' इत्यादि भाष्यानें ब्रह्माच्या गन्तव्यत्वाच्या अनुपपत्तीचेंच उपपादन करितात–]=जें सर्वगत, सर्वान्तर व सर्वात्मक परब्रह्म [ या उक्त विशेषणविशिष्ट परब्रह्माला केंव्हांहि गंतव्यता नाहीं, असा पुढें संबंध.–त्याच्या सर्वगतत्वाविषयीं प्रमाण–]=' आकाशाप्रमाणें सर्वगत व नित्य' [–सर्वान्तरत्वाविषयींहि श्रुति–]='जें साक्षात् अपरोक्ष ब्रह्म'–पृ. ३८९–'जो आत्मा सर्वान्तर'–पृ. ३८९–[–सर्वात्मकत्वाविषयीं श्रुति–]='आत्माच हें सर्व आहे'–छां. ७.२५.२–' हें सर्व जगत् हें वरिष्ठ ब्रह्मच आहे '–मुं. २. २. ११.–इत्यादि श्रुतींनीं ज्याच्या विशेषाचें निर्धारण केलें आहे, त्याचें गन्तव्यत्व केंव्हांहि उपपन्न होत नाहीं. [–'**न हि०** ' इत्यादि भाष्यानें ती अनुपपत्तिच विशद करितात–]=कारण गत–पूर्वीच जें प्राप्त असतें तेंच प्राप्त केलें जात नाहीं. [–कारण प्राप्त वस्तूविषयींची गति आकिंचित्कर –व्यर्थ आहे–प्राप्त वस्तूंतील 'प्राप्ति' हेंच फल देणारी गति अयुक्त आहे, हेंच '**अन्यो हि०** ' इत्यादि भाष्यानें स्पष्ट करितात–]=कारण अन्य पुरुषच अन्य वस्तूकडे जातो, हें व्यवहारांत प्रसिद्ध आहे. [–" अहोपण स्वरूपानें प्राप्त असलेल्याहि ब्रह्माच्या विकारापत्तित्वानें गन्तव्यत्वाची सिद्धि होते," अशी '**ननु०** ' इत्यादि भाष्यानें दृष्टान्तानें शंका–]

**भाष्यं**—**ननु लोके गतस्यापि गंतव्यता देशान्तरविशिष्टस्य दृष्टा । यथा पृथिवीस्थ एव पृथिवीं देशान्तरद्वारेण गच्छति । तथानन्यत्वेऽपि बालस्य कालान्तरविशिष्टं वार्धकं स्वात्मभूतमेव गंतव्यं दृष्टम् । तद्वद्ब्रह्मणोऽपि सर्वशक्त्युपेतत्वात्कथंचिद्गंतव्यता स्यादिति ॥**

**भाष्यार्थ**—अहोपण, व्यवहारांत प्राप्ताचीहि देशान्तरविशिष्ट गन्तव्यता प्रत्यक्ष अनुभवास येते. जसा पृथ्वीवर असलेलाच पुरुष देशान्तराच्या द्वारा पृथिवीला जातो–प्राप्त होतो. [–' सर्वगत ब्रह्माची गन्तव्यता अयुक्त आहे ' असें जें सिद्धान्त्यांनीं वर–पृ. ७६४–म्हटलें आहे त्याचें ' **तथा०** ' इत्यादि भाष्यानें निरसन–] =त्याचप्रमाणें अनन्य–एकच असलेल्याहि बालाचें कालान्तरानें विशिष्ट असें वार्धक्य दृष्ट आहे. [ अनन्यत्व म्ह० साधन-साध्यत्वावांचून प्राप्तत्व.–पण प्रत्यगात्मत्वामुळें ब्रह्माला गन्तव्यत्व नाहीं, असें जें सिद्धान्त्यांनीं म्हटलें आहे त्याविषयीं वादी ' **स्वात्मभूतमेव०** ' इत्यादि म्हणतो–]=बालाचें तें कालान्तरविशिष्ट वार्धक्य हें स्वात्मभूतच गन्तव्य प्रत्यक्ष दृष्ट–अनुभूत आहे. त्याचप्रमाणें ब्रह्माचीहि [ गन्तव्यता संभवेल, असा संबंध.–एकाच ब्रह्माचें गन्तृत्व व गन्तव्यत्व सिद्ध होतें, याविषयीं हेतु–]=' **सर्वशक्ति०** '–त्याला सर्वशक्तिसंपन्नत्व असल्यामुळें–तें सर्वशक्तींनीं युक्त असल्यामुळें, [–'तथापि त्याला ग्रामादिकांप्रमाणें गंतव्यता नाहीं' अशी आशंका घेऊन शंकाकार म्हणतो–]=' **कथंचित्०**'–कशी तरी–गौणवृत्तीनें गंतव्यता असेल, ' **इति०**'–अशी शंका येते. [–दृष्टान्तांतील वैषम्य दाखविणारे भाष्यकार ' **न०** ' इत्यादि भाष्यानें म्हणतात–]

**भाष्यं**—**न । प्रतिषिद्धसर्वविशेषत्वाद्ब्रह्मणः । " निष्कलं निष्क्रियं शान्तं निरवद्यं निरंजनम् " ' अस्थूलमनण्वह्रस्वमदीर्घम् ' ' सबाह्याभ्यंतरो ह्यजः' ' स वा एष महानज आत्माऽजरोऽमरोऽमृतोऽभयो ब्रह्म ' ' स एष नेति नेत्यात्मा ' इत्यादिश्रुतिस्मृतिन्यायेभ्यो न देशकालादिविशेषयोगः परमात्मनि कल्पयितुं शक्यते । येन भूप्रदेशवयोवस्थान्यायेनास्य गंतव्यता स्यात् । भूवयसोस्तु प्रदेशावस्थादिविशेषयोगादुपपद्यते देशकालविशिष्टा गंतव्यता ॥**

**भाष्यार्थ**—नाहीं, ब्रह्माला गौणवृत्तीनेंहि गंतव्यता नाहीं. कारण त्याच्या सर्व विशेषांचा प्रतिषेध केलेला आहे, ब्रह्माला प्रतिषिद्धसर्वविशेषत्व असल्यामुळें–तें सर्व विशेषशून्य असल्यामुळें त्याला यथाकथंचित् गन्तव्यत्वहि नाहीं. [–ब्रह्माच्या निर्विशेषत्वाविषयीं ' **निष्कलं०**' इत्यादि प्रमाण–] " निष्कल, निष्क्रिय, शांत, निरवद्य, निरंजन "–श्वे. ६.१९–"अस्थूल, अनणु, अह्रस्व, अदीर्घ"–बृ.३.८.८.–" सबाह्य-अभ्यंतर, अज"–मुं.२.१.२–" तोच हा महान् अज आत्मा अजर, अमर, अमृत, अभय ब्रह्म आहे "–बृ. ४. ४. २५.—" तो हा नेति नेति आत्मा'–बृ.३.२.२६.–इत्यादि श्रुति-स्मृति-न्याय असल्यामुळें परमात्म्यामध्यें देश-कालादि विशेषांचा योग–संबंध कल्पितां येणें शक्य नाहीं, [–' **अना**-

दिमत् परं ब्रह्म'–भ. गी. १३.१२–इत्यादि स्मृति, आणि न्याय असा–विशेषांच्या तद्द्रष्टृनिविष्टत्वानें–त्यांचा त्यांच्या द्रष्टयामध्यें संनिवेश होत असल्यामुळें त्यांच्या दृश्यत्वाची असिद्धि होते. कारण त्यांना दृश्यत्व आहे असें म्हटल्यास अंशतः स्वदृश्यत्व प्राप्त होतें. पण त्या विशेषांना जडत्व असल्यामुळें द्रष्टृ-दृश्यत्वावांचून त्यांची सिद्धि होत नाहीं आणि त्यांना स्वतःसिद्धत्व आहे असें म्हटल्यास आत्म्याहून अभेद होतो. त्यामुळें ब्रह्माला निर्विशेषत्व आहे. भाष्यांतील 'देश-कालादि' येथील 'आदि-'शब्दानें अवस्था, अवयव इत्यादिकांचें ग्रहण केलें जातें.–याप्रमाणें ब्रह्माला निर्विशेषत्व आहे, यापक्षीं फलित सांगतात–] ='येन०'–ज्या सविशेषत्वानें भूप्रदेशादि दृष्टान्तांनीं ब्रह्माची गंतव्यता सिद्ध होईल [ तसें त्याला सविशेषत्व नाहीं, अशी या वाक्याची योजना करावी. –"तर मग दृष्टान्तामध्यें तरी प्राप्तालाच प्राप्तव्यता कशी?" अशी आशंका घेऊन 'भूवयसोस्तु०' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=पण भूमि व बालाचें वय यांचा प्रदेश, अवस्था इत्यादि विशेषांशीं संबंध असल्यामुळें त्यांची देश-कालविशिष्ट गन्तव्यता उपपन्न होते. [ 'अवस्थादि' येथील 'आदि-'शब्दानें अवयव-परिणामादिकांचें ग्रहण केलें जातें.–'पण सर्वशक्तित्वामुळें ब्रह्माचें विशेषवत्त्वानें गन्तव्यत्व युक्त आहे, असें जें वाद्यानें वर–पृ.७६४–म्हटलें आहे, त्याचें 'जगदुत्पत्ति०' इत्यादि भाष्यानें स्मरण देतात–]

**भाष्यं**–**जगदुत्पत्तिस्थितिप्रलयहेतुत्वश्रुतेः अनेकशक्तित्वं ब्रह्मण इति चेत्। न। विशेषनिराकरणश्रुतीनां अनन्यार्थत्वात्। उत्पत्त्यादिश्रुतीनामपि समानमनन्यार्थत्वमिति चेत्। न। तासामेकत्वप्रतिपादनपरत्वात्। मृदादिदृष्टान्तैर्हि सतो ब्रह्मण एकस्य सत्यत्वं विकारस्य चानृतत्वं प्रतिपादयच्छास्त्रं नोत्पत्त्यादिपरं भवितुमर्हति ॥**

**भाष्यार्थ**––पण ब्रह्माला जगाच्या उत्पत्ति-स्थिति-लयांचें हेतुत्व आहे, असें श्रुत असल्यामुळें त्याला अनेकशक्तित्व आहे, असें जर म्हणाल तर [ 'न०' असा पुढें संबंध. अपरिणामी वस्तूला अकारकत्व असल्यामुळें कारणत्वासाठीं ब्रह्माला परिणामित्व व कार्यप्रतियोगिशक्तिमत्त्व आहे, तेव्हां त्याच्या गंतव्यत्वाची असिद्धि कोणत्या कारणानें होणार, असा भावार्थ.–पण विशेषाच्या निराकरणाचें निःशेषशोकादिकांची निवृत्ति हें फल असल्यामुळें आणि उत्पत्त्यादि-विधानाला अफलत्व असल्यामुळें व 'फलवान् कर्मादिकांच्या संनिधींत असलेलें अफल कर्मादिक त्याचें अंग असतें' असा न्याय असल्यामुळें ब्रह्माला सविशेषत्व नाहीं,

असें 'न०' इत्यादि भाष्यानें समाधान सांगतात-]=नाहीं, जगदुत्पत्ति-स्थिति-प्रलयहेतुत्वश्रुति असल्यामुळें ब्रह्माला अनेकशक्तित्व नाहीं. कारण ब्रह्माच्या विशेषांचें निराकरण करणाऱ्या श्रुतींना अनन्यार्थत्व आहे, त्यांचें विशेषनिराकरणावांचून अन्य कांहीं प्रयोजन-फल नाहीं. [-हा उक्त अर्थच आक्षेप व समाधान यांच्या योगानें अधिक विशद करणारे भाष्यकार '**उत्पत्त्यादि०**' इत्यादि भाष्यानें आक्षेप दाखवितात-]="अहोपण, उत्पत्त्यादिश्रुतींनाहि अनन्यार्थत्व समान आहे." असें जर म्हणाल तर [-त्यांचें अनन्यार्थत्व असिद्ध आहे, असें '**न तासां०**' इत्यादि भाष्यानें सांगतात-]=नाहीं, त्यांना अनन्यार्थत्व नाहीं. त्यांना एकत्व-प्रतिपादनपरत्व आहे. [-'**मृदादि०**' इत्यादि भाष्यानें त्यांच्या एकत्वपरत्वाचेंच उपपादन करितात-]=कारण मृदादि-दृष्टान्तांनीं सत्-संज्ञक एका ब्रह्माचें सत्यत्व व विकाराचें अनृतत्व-मिथ्यात्व प्रतिपादन करणारें शास्त्र जगदुत्पत्यादिपर असणें युक्त नाहीं, त्याचें तात्पर्य जगदुत्पत्त्यादिकांत असणें योग्य नाहीं. [-त्या दोन वाक्यांच्या शेष-शेषित्वाविषयीं नियामकाचा-हेतूचा अभाव स्वीकारून '**कस्मात्०**' इत्यादि भाष्यानें वादी शंका घेतो-]

**भाष्यं—कस्मात्पुनः उत्पत्त्यादिश्रुतीनां विशेषनिराकरणश्रुतिशेषत्वं। न पुनरितरशेषत्वमितरासामिति। उच्यते-विशेषनिराकरणश्रुतीनां निराकांक्षार्थत्वात्। न ह्यात्मन एकत्वनित्यत्वशुद्धत्वाद्यवगतौ सत्यां भूयः काचिदाकांक्षोपजायते। पुरुषार्थसमाप्तिबुद्ध्युपपत्तेः। 'तत्र को मोहः कः शोक एकत्वमनुपश्यतः' 'अभयं वै जनक प्राप्तोऽसि' 'विद्वान्न बिभेति कुतश्चन। एतं ह वाव न तपति किमहं साधु नाकरवं किमहं पापमकरवम्' इत्यादिश्रुतिभ्यः॥**

**भाष्यार्थ**—"अहोपण, उत्पत्त्यादिश्रुतींना विशेषनिराकरणश्रुतींचें शेषत्व आहे आणि त्याच्या उलट विशेषनिराकरणश्रुतींना उत्पत्त्यादिश्रुतींचें शेषत्व नाहीं, असें तुम्ही कोणत्या कारणानें मानितां?" [-'**उच्यते०**' इत्यादि भाष्यानें नियामक दाखवितात-]=त्याचें कारण सांगितलें जातें-विशेषनिराकरणश्रुतींना निराकांक्षार्थत्व आहे, त्यांना कोणत्याहि अर्थाची आकांक्षा नाहीं. [-फलवत्त्वामुळें त्यांचें निराकांक्षत्वच '**न हि०**' इत्यादि भाष्यानें विशद करितात-]=कारण आत्म्याचें एकत्व, नित्यत्व, शुद्धत्व इत्यादि अवगत झालें असतां त्यानंतर पुनः कोणत्याहि प्रकारची आकांक्षा उत्पन्न होत नाहीं. कारण तें एकत्वादि अवगत झालें असतां पुरुषार्थाची समाप्ति झाली, अशी बुद्धि उपपन्न होते. [-एकत्वज्ञान झालें असतां सर्व आकांक्षेची शांति होते, याविषयीं '**तत्र०**' इत्यादि श्रुति सांगतात-]

="त्यावेळीं किंवा त्या ज्ञानावस्थेंत शास्त्राचार्योपदेशानुसार एकत्व पाहणाराला मोह कोणता, शोक कोणता-कशाचा होणार ? "-ई. ७.-"हे जनका, तूं अभयाला प्राप्त झाला आहेस. "-बृ. ४.२.४.-" विद्वान् कोणत्याहि कारणानें भीत नाहीं " " मीं पुण्याचरण कां केलें नाहीं, पापाचरण कां केलें, असा हा पश्चात्ताप त्याला संताप करीत नाहीं. "-तै. २. ९. १.-इत्यादि श्रुतींवरून ज्ञानाची निराकांक्षता सिद्ध होते. [-' **तथैव०** ' इत्यादि भाष्यानें या श्रौत विद्याफलामध्यें विद्वदनुभवाचें आनुकूल्य दाखवितात-]

**भाष्यं—तथैव च विदुषां तुष्ट्यनुभवादिदर्शनात् । विकारानृताभिसंध्यपवादाच्च ' मृत्योः स मृत्युमाप्नोति य इह नानेव पश्यति ' इति । अतो न विशेषनिराकरणश्रुतीनां अन्यशेषत्वमवगंतुं शक्यम् ॥**

**भाष्यार्थ**—आणि त्याचप्रमाणें विद्वानांच्या संतोषानुभवादिकांचें दर्शन-उपलब्धि होते. [-द्वैताची निंदा केली जात असल्यामुळेंहि त्याला प्रतिपाद्यत्व नाहीं, असें ' **विकार०** ' इत्यादि भाष्यानें सांगतात-]=आणि " जो या ब्रह्मामध्यें द्वैतसें पाहतो-द्वैतदृष्टि ठेवितो तो मृत्यूच्या परंपरेंत पडतो. "-का. २. १. १०. बृ. ४. ४. १९.-असा विकारानृताभिसंधीचा अपवाद-केलेला असल्यामुळें-मिथ्या विकारविषयक संकल्पाची निंदा केली जात असल्यामुळें द्वैताला प्रतिपाद्यत्व नाहीं. [-याप्रमाणें विशेषनिषेधश्रुतींना निराकांक्षज्ञानोत्पादकत्व आहे, असें सिद्ध झालें असतां ' **अतो न०** ' इत्यादि भाष्यानें फलित सांगतात-]=यास्तव विशेष निराकरणश्रुतींचें अन्यशेषत्व अवगत होणें शक्य नाहीं. [-" अहोपण, उत्पत्त्यादिश्रुतींनाहि निराकांक्षज्ञानोत्पादकत्व तुल्य आहे " अशी आशंका घेऊन ' **नैवं०** ' इत्यादि भाष्यानें समाधान करितात-]

**भाष्यं—नैवमुत्पत्त्यादिश्रुतीनां निराकांक्षार्थप्रतिपादनसामर्थ्यमस्ति । प्रत्यक्षं तु तासामन्यार्थत्वं समनुगम्यते । तथा हि ' तत्रैतच्छुंगमुत्पतितं सोम्य विजानीहि नेदममूलं भविष्यति ' इत्युपन्यस्योदर्के सत एवैकस्य जगन्मूलस्य विज्ञेयत्वं दर्शयति । "यतो वा इमानि भूतानि जायन्ते । येन जातानि जीवन्ति । यत्प्रयन्त्यभिसंविशन्ति । तद्विजिज्ञासस्व । तद्ब्रह्मेति" इति च । एवमुत्पत्त्यादिश्रुतीनां ऐकात्म्यावगमपरत्वान्नानेकशक्तियोगो ब्रह्मणः ॥**

**भाष्यार्थ**—पण या विशेषनिराकरणश्रुतींप्रमाणें उत्पत्त्यादि-श्रुतींना निराकांक्ष अर्थप्रतिपादनाचें सामर्थ्य नाहीं. [-केवल युक्तीनेंच उत्पत्त्यादि-श्रुतींना अन्यार्थत्व आहे,असें नाहीं तर श्रुतिसामर्थ्यामुळेंहि त्यांना अन्यार्थत्व आहे,असें '**प्रत्यक्षं तु०**'

इत्यादि भाष्यानें सांगतात–]=त्यांचें अन्यार्थत्व तर प्रत्यक्ष-श्रुतीवरून उत्तम प्रकारें अवगत होतें. [–त्या श्रुतींतील छांदोग्यश्रुतीनें त्याचें स्पष्टीकरण करितात–] –तें श्रुतीवरून कसें अवगत होतें, तें पहा–'तत्र'–"त्या मूल कारणामध्यें ' एतत् शुंगं '–हें जगदात्मक कार्य ' उत्पतितं '–उत्पन्न झालें आहे, असें हे सोम्य, तूं जाण. हें कार्य अमूल-मूलरहित होणार नाहीं "–छां. ६.८.३.–असा उपन्यास –प्रतिपादनास आरंभ करून श्रुति शेवटीं–उपसंहारांत एका सत्-संज्ञक जगन्मूलाचेंच विज्ञेयत्व दाखविते. [–' हे सोम्य, ' तेज ' या कार्यानें ' सत् ' या मूळाला तूं जाण.–'छां.६.८.४. सु. उ. ४३२–असें पुढें सत्-चेंच कार्यलिंगानें ज्ञेयत्व सांगितलेलें असल्यामुळें ' तें सत् तेजाला उत्पन्न करितें झालें '–छां.६.२.३–इत्यादि उत्पत्त्यादि श्रुतींचें तच्छेषत्व सिद्ध होतें, असा भावार्थ.–तैत्तिरीयश्रुतीनेंहि जन्मादि श्रुतींना ऐक्यज्ञानशेषत्व आहे, असें ' यतः० ' इत्यादि वाक्यानें सांगतात–] =आणि "ज्याच्यापासून हीं भूतें उत्पन्न होतात, उत्पन्न झालेलीं तीं ज्याच्या योगानें जिवंत राहतात, आणि प्रलीन होतांना तीं ज्याच्यामध्यें प्रवेश करितात त्याला तूं साक्षात् जाणण्याची इच्छा कर, तें ब्रह्म आहे"–तै.३.१.१.–ही श्रुतिहि जगत्कारण ब्रह्माचें विज्ञेयत्व दाखविते. [–याप्रमाणें उत्पत्त्यादिश्रुतींना अन्यपरत्व आहे, असें सिद्ध झालें असतां फलित सांगतात–]=' एवं०'–याप्रमाणें उत्पत्त्यादि श्रुतींना ऐकात्म्यबोधपरत्व असल्यामुळें ब्रह्माचा अनेक शक्तियोग संभवत नाहीं. [–"अहोपण, ब्रह्माला अनेक शक्तिमत्त्व जरी नसलें तरी गति परब्रह्मविषय नाहीं, या अर्थीं काय सिद्ध झालें ! " ' अतश्च० ' इत्यादि भाष्यानें उत्तर–]

**भाष्यं—अतश्च गंतव्यत्वानुपपत्तिः । ' न तस्य प्राणा उत्क्रामन्ति ब्रह्मैव सन्ब्रह्माप्येति ' इति च परस्मिन्ब्रह्मणि गतिं निवारयति । तद्व्याख्यातं ' स्पष्टो ह्येकेषाम् ' इत्यत्र ॥**

**भाष्यार्थ—**आणि असें असल्यामुळें पर ब्रह्माच्या गन्तव्यत्वाची अनुपपत्ति आहे. [–आणि याहि कारणानें परविषयामध्यें गति नाहीं, असें '**न तस्य०**' इत्यादि वाक्यानें सांगतात–]=आणि " त्याचे प्राण शरीरापासून उत्क्रान्त होत नाहींत. तर तो ब्रह्मच होऊन ब्रह्माला प्राप्त होतो–तद्रूप होतो"–बृ. ४. ४. ६–ही श्रुति परब्रह्मांतील गतीचें निवारण करिते. [ ' न तस्मात्०' इत्यादि माध्यंदिनश्रुतीनें निषेधाच्या अन्यार्थत्वाची आशंका घेऊन पूर्वीं जें सांगितलें आहे त्याचें स्मरण देतात–]=' **तद्व्याख्यातं**०'–" काण्वांच्या शाखेंत ' प्राणांची ब्रह्मवेत्याच्या शरीरापासून उत्क्रांति होत नाहीं ' असा स्पष्ट प्रतिषेध आहे " अशा अर्थाच्या '**स्पष्टो**

ह्येकेषां'-७१९-या सूत्रांत आम्हीं त्याचें व्याख्यान केलें आहे. [-याप्रमाणें गंतव्य रूपाच्या आलोचनानें गति अयुक्त आहे,असें सांगितलें. आतां गन्त्याच्या-गमन-कर्त्याच्या रूपाचें आलोचन केलें असतांहि ती युक्त नाहीं, असें सांगण्यासाठीं '**गतिकल्पनायां च०**' इत्यादि भाष्यानें विकल्प करितात-]

**भाष्यं—गतिकल्पनायां च गंता जीवो गंतव्यस्य ब्रह्मणोऽवयवो विकारो वान्यो वा ततः स्यात् । अत्यंततादात्म्ये गमनानुपपत्तेः । यद्येवं ततः किं स्यात् । अतः उच्यते-यद्येकदेशः तेनैकदेशिनो नित्यप्राप्तत्वान्न पुनर्ब्रह्मगमनं उपपद्यते । एकदेशैकदेशित्वकल्पना च ब्रह्मण्यनुपपन्ना । निरवयवत्वप्रसिद्धेः ॥**

**भाष्यार्थ**—आणि गतीच्या कल्पनेंत गमन करणारा जीव गंतव्य ब्रह्माचा अवयव, विकार किंवा त्या ब्रह्माहून भिन्न असेल! [ अन्यानन्यत्वाचा-भेदाभेदपक्षाचा आश्रय करून या विकल्पांतील पाहिले दोन पक्ष आहेत व अत्यंत भेदाचा आश्रय करून शेवटचा कल्प आहे.-" तर मग त्याबरोबरच आत्यंतिक अनन्यत्वाचाहि विकल्प कां केला जात नाहीं ? " '**अत्यंत०**' इत्यादि भाष्यानें उत्तर-]=अत्यंत तादात्म्यपक्षीं गमनाचीच अनुपपत्ति असल्यामुळें तसा चवथा कल्प संभवत नाहीं. [ म्हणून असे तीनच पक्ष विकल्पिले आहेत.-तिन्ही कल्पांतील दोष जाणण्याच्या इच्छेनें '**यद्येवं०**' इत्यादि भाष्यानें प्रश्न-]=असें जरी असलें तरी त्यामुळें काय होईल ? '**अतः उच्यते०**'-असा प्रश्न उद्भवत असल्यामुळें या तिन्ही पक्षीं दोष सांगितला जातो-[-'**यद्येकदेशः०**' इत्यादि भाष्यानें त्यांतील पहिल्या पक्षाचा अनुवाद करून त्याचें प्रत्याख्यान करितात-]=जर गन्ता-गमन करणारा जीव हा ब्रह्माचा एकदेश-अवयव असेल तर त्या एकदेशानें एकदेशीला नित्यप्राप्तत्व असल्यामुळें-ता [illegible]शी-अवयव आपल्या एकदेशीला-अवयवीला नित्यप्राप्तच असल्यामुळें त्याचें पुनरपि ब्रह्मगमन उपपन्न होत नाहीं. [-पण या प्रथम पक्षाचें उत्थानच संभवत नाहीं, असें '**एकदेश०**' इत्यादि भाष्यानें सांगतात-] =पण ब्रह्मामध्यें एकदेश-एकदेशित्वकल्पनाच उपपन्न होत नाहीं. कारण त्याच्या निरवयवत्वाची प्रसिद्धि आहे. [-उक्तदोषाच्या साम्यामुळें '**विकारपक्षेऽपि०**' इत्यादि भाष्यानें दुसऱ्या पक्षाचें निरसन-]

**भाष्यं—विकारपक्षेऽप्येतत्तुल्यं । विकारेणापि विकारिणो नित्यप्राप्तत्वात् । न हि घटो मृदात्मतां परित्यज्यावतिष्ठते । परित्यागे वाऽभावप्राप्तेः । विकारावयवपक्षयोश्च तद्वतः स्थिरत्वाद्ब्रह्मणः संसारगमनमप्यनवक्लृप्तम् ॥**

**भाष्यार्थ**—विकारपक्षींहि हें दूषण तुल्य–समान आहे. कारण विकारानेंहि विकारीला नित्यप्राप्तत्व आहे, विकार आपल्या विकारी द्रव्याला नित्य प्राप्त आहे. [–नित्यप्राप्तत्व दृष्टान्तानें स्पष्ट करितात–]=‘**न हि०**’–कारण घट आपल्या मृदात्मतेला सोडून रहात नाहीं. [–विपक्षीं दोष सांगतात–]=‘**परित्यागे०**’ –किंवा त्यानें जर आपल्या मृद्रूपत्वाचा परित्याग केला तर त्याचा अभाव होण्याचाच प्रसंग येईल? [–आतां दोन्ही पक्षीं दोषान्तर सांगतात–]=‘**विकारावयव०**’ –आणि विकारपक्ष व अवयवपक्ष या दोन्हीं पक्षीं विकारवान् व अवयववान् ब्रह्माला स्थिरत्व असल्यामुळें जीवांचें संसारगमनहि अनुपपन्न आहे. [ कारण ब्रह्म सविकार व सावयव इष्ट आहे. त्याला विकार व अवयव यांसह निश्चलत्व असल्यामुळें जीवांचें संसारगमनरूप चलन कोणत्या कारणानें होणार? कारण स्थिरात्म्यांचें अस्थिरत्व युक्त नाहीं. आणि अन्यानन्यत्व–भेदाभेदपक्ष विरुद्धत्वामुळेंच मानितां येणें शक्य नाहीं असा भावार्थ.–‘**अथ०**’ इत्यादि भाष्यानें तृतीयपक्षाचा अनुवाद–]

**भाष्यं**––**अथान्य एव जीवो ब्रह्मणः । सोऽणुर्व्यापी मध्यमपरिमाणो वा भवितुमर्हति । व्यापित्वे गमनानुपपत्तिः । मध्यमपरिमाणत्वे चानित्यत्वप्रसंगः । अणुत्वे कृत्स्नशरीरवेदनानुपपत्तिः । प्रतिषिद्धे चाणुत्वमध्यमपरिमाणत्वे विस्तरेण पुरस्तात् ॥**

**भाष्यार्थ**––आतां ब्रह्माहून जीव अन्यच आहे, हा पक्ष घेतल्यास [–तीन प्रकारें विकल्प करून त्याला दूषित करितात–]=‘**सोऽणुः०**’–तो अणु असणें युक्त आहे कीं व्यापी कीं मध्यमपरिणाम ? त्याला व्यापित्व असेल तर त्याच्या गमनाची अनुपपत्ति–असंभव होतो आणि त्याला मध्यम परिमाणत्व असेल तर अनित्यत्व प्रसंग येतो व त्याला अणुत्व असेल तर सर्व शरीरव्यापिनी वेदनेची अनुपपत्ति होते. [घटादि मध्यमपरिमाणपदार्थांमध्यें अनित्यत्व दिसत असल्यामुळें मध्यमपरिमाणजीवांच्या अनित्यत्वाचा प्रसंग येतो, असा या वाक्याला शेष लावून त्याची योजना करावी.–तर्कपादांत व वियत्पादांत सांगितलेल्या या पक्षद्वयाच्या अनुपपत्तीची आठवण देतात–]=‘**प्रतिषिद्धे च०**’–आणि अणुत्व व मध्यम परिमाणांचें पूर्वी विस्तारानें निरसन केलें आहे, तीं दोन्ही परिमाणें पूर्वी सविस्तर प्रतिषिद्ध केलेलीं आहेत.–अ.२.पृ.३७९-८२,९११–[–अन्यत्वपक्षीं श्रुतिविरोध हें दोषान्तर ‘**परस्माच्च०**’ इत्यादि भाष्यानें सांगतात–]

**भाष्यं**––**परस्माच्चान्यत्वे जीवस्य ‘ तत्त्वमसि ’ इत्यादिशास्त्रबाधप्रसंगः । विकारावयवपक्षयोरपि समानोऽयं दोषः । विकारावयवयोस्तद्वतोऽनन्यत्वाद्-**

**दोष इति चेत् । न । मुख्यैकत्वानुपपत्तेः । सर्वेषु चैतेषु पक्षेष्वनिर्मोक्षप्रसंगः । संसार्यात्मत्वानिवृत्तेः । निवृत्तौ वा स्वरूपनाशप्रसंगः । ब्रह्मात्मत्वानभ्युपगमाच्च ॥**

**भाष्यार्थ**—आणि जीवाला परमात्म्याहून अन्यत्व-पृथक्त्व असल्यास 'तें तूं आहेस '-छां.६.७.८.-इत्यादि शास्त्राचा बाध होण्याचा प्रसंग येतो. [-पूर्वोक्त दोन पक्षांतहि श्रुतिविरोध तुल्य आहे, असें सांगतात-]='**विकारावयवपक्षयोः०**' -विकारपक्ष व अवयवपक्ष या दोन पक्षींहि हा दोष समान आहे. [-"अहोपण,विकार व अवयव यांना तद्वान् ब्रह्माहून जसें अन्यत्व आहे तसेंच अनन्यत्वहि असल्यामुळें त्या पक्षीं प्रस्तुत दोष येत नाहीं," अशी शंका-]='**विकारावयवयोः०** '-"अहोपण, विकार व अवयव यांना तद्वान् ब्रह्माहून अनन्यत्व-अभिन्नत्व असल्यामुळें हा दोष येत नाहीं, " असें जर म्हणाल तर [ 'न' असा पुढें संबंध. -"विरोधी भेद व अभेद यांचा एकत्र असंभव आहे व बुद्धि-व्यपदेशभेद-शब्द-प्रत्ययभेद आहे, त्यामुळें विकार व अवयव यांचा तद्वानाहून भेद आहे, असें झालें असतां अयुतसिद्धत्वामुळें उपचारानें त्यांची अभेदोक्ति आहे.म्हणून जीवाचें ब्रह्मैक्य अमुख्य आहे," असें वादी म्हणेल म्हणून म्हणतात-]='न०'नाहीं,त्यांना ब्रह्माभिन्नत्व नाहीं. कारण तसें त्यांचें औपचारिक ऐक्य मानिल्यास मुख्य एकत्वाची अनुपपत्ति होते. [-शिवाय या तिन्हीं पक्षीं संसारित्वाला तात्त्विकत्व असल्यामुळें त्याचा अत्यंत नाश झाला असतां जीवरूपाचाच नाश होत असल्यामुळें हें पक्षत्रय अयुक्त आहे, असें सांगतात-]='**सर्वेषु०**'-आणि या सर्व पक्षांमध्यें अनिर्मोक्षप्रसंग येतो. कारण संसारि-आत्मत्वाची निवृत्ति होत नाहीं किंवा त्या संसारिरूपत्वाची निवृत्ति झाल्यास स्वरूपनाशाचा प्रसंग येतो. [-" अहोपण, संसारित्व निवृत्त जरी झालें तरी सिद्धान्ताप्रमाणें जीवरूपाच्या नाशाचा प्रसंग येत नाहीं" अशी आशंका घेऊन आचार्य म्हणतात-]='**ब्रह्मात्मत्व०**'-आणि सिद्धान्ताप्रमाणें जीवाच्या ब्रह्मात्मत्वाचा स्वीकार केलेला नाहीं, त्यामुळें त्याच्या नाशाचा प्रसंग येतो. [-पण संसाराला कर्मनिमित्तत्व आहे. त्यामुळें कर्माच्या अभावीं संसाराचा अभाव होतो आणि तो झाला असतां मुक्ति अनायासानें सिद्ध होते, हें मत '**यत्तु कैश्चित्०**' इत्यादि भाष्यानें सांगतात-]

**भाष्यं—यत्तु कैश्चिज्जल्प्यते--नित्यानि नैमित्तिकानि कर्माण्यनुष्ठीयन्ते प्रत्यवायानुत्पत्तये । काम्यानि प्रतिषिद्धानि च परिह्रियन्ते स्वर्गनरकानवाप्तये । सांप्रतदेहोपभोग्यानि च कर्माण्युपभोगेनैव क्षिप्यन्ते इत्यतो वर्तमानदेहपातादूर्ध्वं देहान्तरप्रतिसंधानकारणाभावात्स्वरूपावस्थानलक्षणं कैवल्यं विनापि ब्रह्मात्मतयैवंवृत्तस्य सेत्स्यतीति ॥**

**भाष्यार्थ**—पण प्रत्यवायाची उत्पत्ति होऊं नये म्हणून नित्य व नैमित्तिक कर्मांचें अनुष्ठान केलें जातें, स्वर्ग व नरक यांची प्राप्ति न व्हावी म्हणून काम्य व प्रतिषिद्ध कर्मांचा परिहार केला जातो आणि वर्तमान देहानें उपभोग्य असलेलीं कर्में फलोपभोगानेंच क्षीण केलीं जातात, असें असल्यामुळें वर्तमानदेहाचा पात झाला असतां–हें शरीर मृत झालें असतां–त्यानंतर देहान्तराच्या प्रतिसंधानाचें–प्राप्तीचें कांहीं कारणच नसल्यामुळें 'एवंवृत्तस्य'–नित्यादि अनुष्ठान करणाऱ्या पूर्वोक्त प्रकारच्या मुमुक्षूचें स्वरूपावस्थानरूप कैवल्य ब्रह्मात्मतेवांचूनच सिद्ध होईल, असें जें कित्येकांकडून म्हटलें जातें–वृथा बडबड केली जाते, [ देहान्तरप्रतिसंधान म्ह० दुसऱ्या देहाशीं जो संबंध, त्याचें ग्रहण, असा भावार्थ.–पण तो शास्त्रामुळेंच मुक्त होतो कीं केवल तर्कामुळें –त्याच्या मुक्तीला प्रमाण काय ? शास्त्र कीं तर्क ? असा विकल्प करून 'तदसत्०' इत्यादि भाष्यानें त्यांतील पहिल्या पक्षाचें निरसन करितात–]

**भाष्यं—तदसत् । प्रमाणाभावात् । न ह्येतच्छास्त्रेण केनचित्प्रतिपादितं मोक्षार्थीत्थं समाचरेदिति । स्वमनीषया त्वेतत्तर्कितं–यस्मात्कर्मनिमित्तः संसारः तस्मान्निमित्ताभावान्न भविष्यतीति । न चैतत्तर्कयितुमपि शक्यते । निमित्ताभावस्य दुर्ज्ञानत्वात् ।**

**भाष्यार्थ**—तें असत्–प्रमाणशून्य आहे. कारण त्याविषयीं कांहीं शास्त्रप्रमाण नाहीं. [–प्रमाणाभावच प्रकट करितात–]=' **न हि०**'–कारण कोणत्याहि शास्त्रानें ' मोक्षार्थी पुरुषानें असें आचरण करावें ' असें हें प्रतिपादिलेलें नाहीं. [–दुसऱ्या पक्षाचा अनुवाद–]=' **स्वमनीषया०**'–तर 'ज्याअर्थीं संसार कर्मनिमित्त –कर्म या निमित्तानें झालेला आहे,त्याअर्थीं कर्म या निमित्ताच्या अभावीं तो नाहींसा होईल–त्याचा अभाव होईल, ' असें हें केवल आपल्या कल्पनाशक्तीनें तर्किलेलें आहे. [–" अहोपण, तें स्वकल्पनेनें कल्पिलेलें जरी असलें तरी युक्त असल्यामुळें स्वीकारण्यास योग्य आहे" या पक्षाचें निरसन–]='**न च०** '–निमित्ताच्या अभावाचें ज्ञान होणें फारच कठिण असल्यामुळें हें तर्कितां येणें शक्य नाहीं. [–निमित्ताभावाचें दुर्ज्ञानत्वच ' **बहूनि हि०** ' इत्यादि भाष्यानें प्रपंचितात–]

**भाष्यं—बहूनि हि कर्माणि जात्यंतरसंचितानि इष्टानिष्टविपाकान्येकैकस्य जंतोः संभाव्यन्ते । तेषां विरुद्धफलानां युगपदुपभोगासंभवात्कानिचिल्लब्धावसराणीदं जन्म निर्मिमते।कानिचित्तु देशकालनिमित्तप्रतीक्षाण्यासते।इत्यतस्तेषामवशिष्टानां सांप्रतेनोपभोगेन क्षपणासंभवान्न यथावर्णितचरितस्यापि वर्तमानदेहपाते**

**देहान्तरनिमित्ताभावः शक्यते निश्चेतुम् । कर्मशेषसद्भावसिद्धिश्च ' तद्य इह रमणीयचरणाः ' " ततः शेषेण " इत्यादिश्रुतिस्मृतिभ्यः ॥**

**भाष्यार्थ**—कारण एकेका जंतूचीं जन्मान्तरसंचित इष्टानिष्ट फल देणारीं असंख्य कर्मे संभवतात, ज्यांचा विपाक–परिणाम–फल इष्ट व अनिष्ट असा परस्पर विरुद्ध आहे, अशीं प्रत्येक प्राण्याचीं पूर्व अनेक जन्मार्जित कर्मे अनेक असतात. [–' पण मुमुक्षूंच्या देहांत तीं सर्वच भोगानें क्षीण झालीं आहेत, ' अशी आशंका घेऊन म्हणतात–]=' **तेषां विरुद्धफलानां**० '–ज्यांचीं फलें परस्पर विरुद्ध आहेत अशा त्या सर्व कर्मांचा एकाच वेळीं क्षय संभवत नसल्यामुळें त्यांतील ज्यांना फलोन्मुख होण्यास अवसर मिळाला आहे, अशीं कांहीं कर्मे हा जन्म निर्माण करितात. पण ज्यांना देश, काल व निमित्तें यांचीं प्रतीक्षाच करणें उचित आहे अशीं कांहीं–देशादिकांची प्रतीक्षा करीत राहतात. [–वास्तव अनुपभुक्त कर्मांचें देहान्तर हें फल संभवत असल्यामुळें–अभुक्त कर्मांच्या उपभोगासाठीं दुसऱ्या देहाची उत्पत्ति होणें अवश्य असल्यामुळें नित्यादिकांचें अनुष्ठानादि करणारांच्याहि मोक्षाची तत्त्वज्ञानावांचून आशा नाहीं, असें फलित सांगतात–]= '**इत्यतः**०'–म्हणून त्या अवशिष्ट राहिलेल्या कर्मांचा वर्तमानकालीन उपभोगानें क्षय होण्याचा संभव नसल्यामुळें ज्याच्या आचरणाचें वर वर्णन केलें आहे, अशा नित्यादि कर्मांचें अनुष्ठान करणाऱ्याहि पुरुषाच्या वर्तमान देहाचा पात झाला असतां दुसऱ्या देहाच्या निमित्ताचा अभाव होतो, असा निश्चय करितां येणें शक्य नाहीं. [–"अहोपण कर्माशयाला ऐकभविकत्व असल्यामुळें वर्तमानभोगानें त्याचा क्षय संभवतो. त्यामुळें मोक्षसिद्धि होते" अशी आशंका घेऊन 'कृतात्ययेऽनुशयवान् '–ब्र. भा. ३.१.८. पृ. ३०-४७–या सूत्रांत ऐकभविकत्वाला दूषित केलें आहे, असें मानून ' **कर्मशेष**०' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=आणि ' त्यांत जे जेथें शुभ आचरण करणारे असतात ते रमणीय–शुभ योनीला प्राप्त होतात '–छां. ५.१०.७–व ' भोगिलेल्या कर्मांहून अन्य अवशिष्ट कर्मानें ते विशिष्ट जन्म घेतात '–अ.३.पृ. ३६–इत्यादि श्रुति-स्मृतींवरून कर्मशेषाच्या सद्भावाची सिद्धि होते. [–"अनारब्धफल–संचित कर्मांचीहि नित्य-नैमित्तिक कर्मांनीं निवृत्ति होत असल्यामुळें पूर्वोक्त प्रकारें आचरण करणाराची मुक्ति होते" अशी ' **स्यादेतत्**० ' इत्यादि भाष्यानें शंका–]

**भाष्यं—स्यादेतत् । नित्यनैमित्तिकानि तेषां क्षेपकाणि भविष्यन्तीति । तन्न । विरोधाभावात् । सति हि विरोधे क्षेप्यक्षेपकभावो भवति । न च**

**जन्मान्तरसंचितानां सुकृतानां नित्यनैमित्तिकैरस्ति विरोधः । शुद्धिरूपत्वाविशेषात् । दुरितानां त्वशुद्धिरूपत्वात्सति विरोधे भवतु क्षपणं । न तु तावता देहान्तरनिमित्ताभावसिद्धिः । सुकृतनिमित्तत्वोपपत्तेः । दुश्चरितस्याप्यशेषक्षपणानवगमात् ॥**

**भाष्यार्थ**--यावर वादी 'नित्य-नैमित्तिक कर्मैं त्या संचित कर्माचा क्षय करणारीं होतील' अशी शंका घेईल, [-'पण तीं नित्यादि कर्मैं पुण्याचींहि क्षेपक-निवर्तक होतात कीं केवल पापाचींच' असा विकल्प करून त्यांतील पहिल्या पक्षाला दूषित करितात-]=**'तन्न०'**-पण नित्यादि कर्मैं संचित पुण्य कर्मांचीं क्षेपक होणार नाहींत. कारण त्यांच्यामध्यें विरोधाचा अभाव आहे. [-त्या नित्यादि कर्मांना सुकृतविरोधित्व आहे, असें म्हटल्यास काम्य कर्मांच्या उपदेशाला वैयर्थ्य प्राप्त होतें, कारण नित्यादि कर्मांनीं त्यांचाहि विनाश होईल, असें मानणारे आचार्य **'सति हि०'** इत्यादि भाष्यानें विरोधाचें विवरण करितात-] =कारण जर परस्पर विरोध असला तरच त्यांचा परस्पर क्षेप्य-क्षेपकभाव असतो. पण जन्मान्तरसंचित सुकृतांचा नित्य-नैमित्तिक कर्मांशीं विरोध नाहीं. कारण त्या दोन्ही प्रकारच्या कर्मांचें शुद्धिरूपत्व अविशिष्ट-समान आहे. [ संचित सुकृत कर्मैं व नित्य-नैमित्तिक कर्मैं, हीं दोन्हीं प्रकारचीं कर्मैं एक सारखींच शुद्ध आहेत, त्यामुळें त्यांचा परस्पर विरोध नाहीं. -**'दुरितानां तु०'** इत्यादि भाष्यानें विकल्पांतील दुसऱ्या पक्षाचा अंगीकार करितात-]=पण दुरितांना-पापांना अशुद्धिरूपत्व असल्यामुळें विरोध आहे म्हणून त्यांचा क्षय होवो. [-"तर मग दुरित क्षय झाला असतां तेवढ्यानेंच देहान्तराचा अभाव होतो त्यामुळें मुक्ति सिद्ध होते. म्हणून ऐक्यज्ञानाला व्यर्थत्व आहे !" याचें **'न तु०'** इत्यादि भाष्यानें उत्तर-]=पण तेवढ्यानें देहान्तरनिमित्ताच्या अभावाची सिद्धि होत नाहीं. कारण सुकृत या निमित्तत्वाचा संभव आहे. [-" अहोपण, केवळ सुकृतानेंच -पुण्यानेंच ज्याचा आरंभ केला आहे, असें शरीर नाहीं. कारण त्यांत अप्रियरूप दुःख या दुरितफलाचा साक्षात् अनुभव येत असतो," अशी आशंका घेऊन **'दुश्चरितस्य०'** इत्यादि भाष्यानें म्हणतात-]=आणि दुश्चरिताच्याहि अशेषक्षपणाचा-सर्व पापाच्या क्षयाचा अवगम होत नाहीं. [-शिवाय मुमुक्षूंनीं अनुष्ठिलेल्या नित्य-नैमित्तिक कर्मांमुळेंहि देहान्तरसंभव-दुसऱ्या जन्माचा संभव असल्यामुळें पूर्वोक्त प्रकारें आचरण करणाऱ्या त्याच्या मुक्तीची आशा नाहीं, असें **'न च०'** इत्यादि भाष्यानें सांगतात-]

**भाष्यं—न च नित्यनैमित्तिकानुष्ठानात्प्रत्यवायानुत्पत्तिमात्रं । न पुनः फलान्तरोत्पत्तिरिति प्रमाणमस्ति । फलान्तरस्याप्यनुनिष्पादिनः संभवात् । स्मरति ह्यापस्तंबः–" तद्यथाम्रे फलार्थे निर्मिते छायागंधावनूत्पद्येते एवं धर्मं चर्यमाणमार्था अनूत्पद्यन्ते " इति ॥**

**भाष्यार्थ**—नित्य व नैमित्तिक कर्माचें अनुष्ठान केल्यानें केवल प्रत्यवायाचीच अनुत्पत्ति होते, पण त्यावांचून दुसऱ्या कोणत्याहि फलाची उत्पत्ति होत नाहीं, याविषयीं कांहीं प्रमाण नाहीं. कारण त्या अनुष्ठानापासून उत्पन्न होणाऱ्या आनुषंगिक फलान्तराचाहि संभव आहे. [–" अहोपण, त्यांचें आनुषंगिक फल जरी संभवनीय वाटत असलें तरी तें प्रमाणानें सिद्ध झालेलें नाहीं " अशी आशंका घेऊन ' **स्मरति हि०** ' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=कारण आपस्तंब–" त्याविषयीं दृष्टान्त–ज्याप्रमाणें फलासाठीं आम्रवृक्ष लाविला असतां त्याच्यापासून छाया व गंध अनुषंगानेंच उत्पन्न होतात त्याप्रमाणें आचरण केल्या जाणाऱ्या धर्मापासून अर्थ अनुषंगानेंच उत्पन्न होतात " असें स्मरतो–त्याची अशी स्मृति आहे. [–शिवाय काम्य व निषिद्ध कर्मांचा शेष असल्यामुळेंहि देहान्तराची सिद्धि होते. त्यामुळें पूर्वोक्त प्रकारें आचरण करणाऱ्या मुमुक्षूची मुक्ति संभवत नाहीं, असें ' **न च०** ' इत्यादि भाष्यानें सांगतात–]

**भाष्यं—न चासति सम्यग्दर्शने सर्वात्मना काम्यप्रतिषिद्धवर्जनं जन्मप्रायणान्तराले केनचित्प्रतिज्ञातुं शक्यम् । सुनिपुणानामपि सूक्ष्मापराधदर्शनात् । संशयितव्यं तु भवति । तथापि निमित्ताभावस्य दुर्ज्ञानत्वमेव ॥**

**भाष्यार्थ**—आणि सम्यग्दर्शन झालेलें नसतांना जन्म व मरण यांच्या अंतरालीं–जीवदवस्थेंत कोणाकडूनहि सर्वरूपानें–पूर्णपणें काम्य-निषिद्धवर्जन संभवतें, अशी प्रतिज्ञा करणें शक्य नाहीं [–"अहोपण, आमच्या सारख्या स्थूलबुद्धि पुरुषांचें सम्यग्ज्ञानावांचून पूर्णपणें काम्यादिवर्जन जरी शक्य नसलें तरी ज्ञानामुळें सर्व काम्यादिवर्जनाची सिद्धि होते" अशी आशंका घेऊन '**सुनिपुणानामपि०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=कारण अत्यंत निपुणांच्याहि सूक्ष्म अपराधाची उपलब्धि होते. [–" अहोपण, प्रत्येकाकडून प्रमाद होतोच असा नियम नसल्यामुळें जन्मान्तरप्राप्ति होत नाहीं " अशी आशंका घेऊन ' **संशयितव्यं तु०** ' इत्यादि म्हणतात–]=पण तें संशय येण्यास योग्य मात्र आहे. [–" अहोपण, निमित्त विद्यमान असतांनाहि निश्चयाचा अभाव झाल्यास जन्मान्तर अनिश्चितच–असिद्धच होईल" अशी आशंका घेऊन '**तथापि०**' इत्यादि भाष्यानें म्हणतात–]

=पण तसें असलें तरी निमित्ताभावाला दुर्ज्ञानत्वच आहे. [–निमित्ताचा अभाव दुर्ज्ञान–ज्ञात होणें अशक्य आहे, असें झालें असतां जन्मान्तराचा अभावहि दुर्ज्ञान होत असल्यामुळें तुझ्या पक्षाची असिद्धि होते, असा भावार्थ.–शिवाय 'आत्म्यामध्यें कर्तृत्वादि स्वाभाविक आहे कीं आरोपित आहे?' यांतील पहिल्या स्वाभाविक पक्षींहि स्वभाव हें त्याचें कार्य आहे कीं शक्ति आहे, त्यांतील पहिल्या पक्षीं तो कार्यरूप स्वभाव निवृत्त झाला असतां मुक्ति होते कीं तो स्थित असतांनाच मुक्ति होते, यांतील पहिला पक्ष संभवत नाहीं. कारण स्वभावाला निवृत्त करितां येणें शक्य नाहीं व व्याघात हा दोष येत असल्यामुळें दुसरा कल्पहि संभवत नाहीं, असें 'न च०' इत्यादि भाष्यानें सांगतात–]

**भाष्यं––न चानभ्युपगम्यमाने ज्ञानगम्ये ब्रह्मात्मत्वे कर्तृत्वभोक्तृत्वस्वभावस्यात्मनः कैवल्यमाकांक्षितुं शक्यम्। अग्न्यौष्ण्यवत्स्वभावस्यापरिहार्यत्वात्। स्यादेतत्। कर्तृत्वभोक्तृत्वकार्यमनर्थो न तच्छक्तिः। तेन शक्त्यवस्थानेऽपि कार्यपरिहारादुपपन्नो मोक्ष इति। तच्च न। शक्तिसद्भावे कार्यप्रसवस्य दुर्निवारत्वात्॥**

**भाष्यार्थ**––आणि ज्ञानगम्य ब्रह्मात्मत्व न स्वीकारल्यास कर्तृत्व-भोक्तृत्वस्वभाव आत्म्याच्या कैवल्याची आकांक्षा करणें शक्य नाहीं. कारण अग्नीच्या औष्ण्याप्रमाणें स्वभावाला अपरिहार्यत्व असतें, त्याचा परिहार करितां येत नाहीं. [–'स्यादेतत्०' इत्यादि भाष्यानें पूर्वोक्त विकल्पांतील दुसऱ्या पक्षाची शंका–]=यावर 'कर्तृत्व-भोक्तृत्वाचें कार्य हा अनर्थ आहे, त्यांची शक्ति हा अनर्थ नव्हे. त्यामुळें शक्तीचें अवस्थान जरी असलें तरी कार्याचा परिहार होत असल्यामुळें मोक्ष उपपन्न होतो' असें वादी म्हणेल! [–पण शक्तीला कार्यारंभकत्व आहे कीं नाहीं? आणि कार्यारंभकत्व जर असेल तर ती दुसऱ्या कशाचीहि अपेक्षा न करितां कार्याचा आरंभ करिते, कीं सहकारीची अपेक्षा करून कार्यारंभ करिते.? यांतील पहिला कल्प संभवत नाहीं, असें 'तच्च न०' इत्यादि भाष्यानें सांगतात–] =आणि निरपेक्ष शक्तीच्या कार्याचा आरंभ संभवत नाहीं, असें नाहीं. कारण शक्ति विद्यमान असतांना कार्याच्या उत्पत्तीचें निवारण करितां येत नाहीं. [–'अथापि०' इत्यादि भाष्यानें दुसऱ्या कल्पाला उत्थापित करितात–]

**भाष्यं––अथापि स्यात्––न केवला शक्तिः कार्यमारभतेऽनपेक्ष्यान्यानि निमित्तानि। अत एकाकिनी सा स्थितापि नापराध्यतीति। तच्च न। निमित्तानामपि शक्तिलक्षणेन संबंधेन नित्यसंबद्धत्वात्। तस्मात्कर्तृत्वभोक्तृत्वस्वभावे**

**सति आत्मनि । असत्यां विद्यागम्यायां ब्रह्मात्मतायां । न कथंचन मोक्षं प्रत्याशास्ति । श्रुतिश्च "नान्यः पंथा विद्यतेऽयनाय" इति ज्ञानादन्यं मोक्षमार्गं वारयति॥**

**भाष्यार्थ**—आतां यावर वादी 'अन्य निमित्तांची अपेक्षा न करितां केवल शक्ति कार्याचा आरंभ करीत नाहीं. त्यामुळें एकाकिनी–असहाय असलेली ती शक्ति जरी स्थित असली तरी कांहीं अपराध–अनर्थ करीत नाहीं' असेंहि म्हणेल. [अदृष्टादि निमित्तांचा अभाव असल्यामुळें उपभोगलक्षण अनर्थ नाहीं, असा याचा भावार्थ.–कर्तृत्व व भोक्तृत्व यांच्या निमित्तसंबंधाला व आत्म्याच्या अदृष्टादि निमित्ताशीं होणाऱ्या संबंधाला शक्तीच्या द्वारा नित्यत्व असल्यामुळें कदाचित् तिच्या भोगारंभकत्वाचा संभव आहे, म्हणून मुक्ति नाहीं, असें '**तच्च न०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=पण तें म्हणणेंहि युक्त नाहीं. कारण निमित्तांनाहि शक्तिलक्षण संबंधानें नित्यसंबद्धत्व आहे. [–आणि ती जर कार्याचा आरंभ करीत नसेल तर तिचें असत्त्वच–अभावच आहे. कारण ती केवल कार्यावरूनच ज्ञात होणारी आहे, असें मानून शक्तीच्या किंवा कार्याच्या स्वाभाविकत्वपक्षाच्या निरसनाचा '**तस्मात्०**' इत्यादि भाष्यानें उपसंहार करितात–]=तस्मात् कर्तृत्वभोक्तृत्वस्वभाव आत्मा विद्यमान असतांना व विद्यागम्य ब्रह्मात्मता नसतांना मोक्षाची कोणत्याच प्रकारें आशा नाहीं. [–पण याच्या उलट आत्म्यामध्यें कर्तृत्वादिक आरोपित आहे, असें मानिल्यास ज्ञानानेंच त्याची निवृत्ति होते. त्यामुळें मुक्ति कर्मसाध्य–कर्मानें साध्य होणारी नाहीं, असें मानून ती केवल ज्ञानाच्या अधीन आहे, याविषयीं प्रमाण सांगतात–]='**श्रुतिश्च०**'–आणि "मोक्षगमनासाठीं ज्ञानाहून दुसरा मार्ग नाहीं."–श्वे. ३. ८.–ही श्रुति ज्ञानाहून अन्य मोक्षमार्गाचें निवारण करिते. [–याप्रमाणें प्रासंगिक परमताचें निराकरण केलें असतां 'मोक्षसिद्धीसाठीं जीवाचें ब्रह्मात्मत्व जरी मानलें तरी त्यांतहि अनुपपत्ति तुल्य आहे' अशी '**परस्मात्०**' इत्यादि भाष्यानें शंका–]

**भाष्यं—परस्मादनन्यत्वेऽपि जीवस्य सर्वव्यवहारलोपप्रसंगः । प्रत्यक्षादिप्रमाणाप्रवृत्तेरिति चेत् । न । प्राक्प्रबोधात्स्वप्नव्यवहारवत्तदुपपत्तेः । शास्त्रं च "यत्र हि द्वैतमिव भवति तदितर इतरं पश्यति" । इत्यादिनाऽप्रबुद्धविषये प्रत्यक्षादिव्यवहारमुक्त्वा पुनः प्रबुद्धविषये 'यत्र त्वस्य सर्वमात्मैवाभूत्तत्केन कं पश्येत्' इत्यादिना तदभावं दर्शयति । तदेवं परब्रह्मविदो गंतव्यादिविज्ञानस्य बाधितत्वान्न कथंचन गतिरुपपादयितुं शक्या ॥**

**भाष्यार्थ**—"जीवाला परमात्म्याहून अनन्यत्व-एकत्व जरी असलें तरी त्या पक्षीं सर्वव्यवहाराच्या लोपाचा प्रसंग येतो. कारण त्या पक्षीं प्रत्यक्षादि प्रमाणांची प्रवृत्तीच होत नाहीं" असें जर म्हणाल तर [-"तत्त्वज्ञानाच्या पूर्वी व्यवहाराचा अभाव होतो कीं तें झाल्यावर त्याचा अभाव होतो?" यांतील पहिला पक्ष संभवत नाहीं. कारण तत्त्वज्ञाच्या पूर्वी स्वप्नाप्रमाणें सर्व व्यवहाराचा संभव आहे, असें '**न प्राक् प्रबोधात्०**' इत्यादि भाष्यानें सांगतात-]=तें बरोबर नाहीं. कारण तत्त्वाचा प्रबोध-साक्षात्कार होण्यापूर्वी स्वप्नव्यवहाराप्रमाणें लौकिक सर्व व्यवहाराचा संभव आहे. [-त्याच अर्थी शास्त्राची अनुमति-]='**शास्त्रं च०**' आणि शास्त्र 'ज्या अविद्यावस्थेंत द्वैतसें होतें तेव्हां इतर द्रष्टा इतर दृश्य पाहतो' -बृ.२.४.१४ सु.उ. ५९९; ४.५. १५ सु.उ. ७०७-इत्यादि वचनानें अप्रबुद्धाच्या-अज्ञाच्या विषयांत प्रत्यक्षादि व्यवहार सांगून [-दुसऱ्या पक्षीं प्रसंगाचें इष्टत्व शास्त्राधारानें सांगतात-]=पुनः-पुनरपि प्रबुद्धाच्या विषयांत 'पण ज्या विद्यावस्थेंत याचा आत्माच सर्व झाला त्या अवस्थेंत तो कोणत्या साधनानें काय पहाणार?'-सु.उ.५९९;७०६.-इत्यादि वचनानें त्याचा अभाव दाखवितें. [-प्रासंगिकदोषाचा परिहार करून '**तदेवं०**' इत्यादि भाष्यानें प्रकृताचें निगमन करितात-]=वास्तव वर वर्णन केल्याप्रमाणें परब्रह्मज्ञाच्या गंतव्यादिविज्ञानाचा बाध झाल्यामुळें त्याच्या गतीचें कोणत्याहि प्रकारें उपपादन करितां येणें शक्य नाहीं. [-याप्रमाणें परमताचें निराकरण करून '**किंविषयाः०**' इत्यादि भाष्यानें पूर्वोक्त स्वमताचें प्रश्नपूर्वक विवरण करितात-]

**भाष्यं**--**किंविषयाः पुनर्गतिश्रुतय इति। उच्यते—सगुणविद्याविषया भविष्यन्ति। तथाहि क्वचित्पंचाग्निविद्यां प्रकृत्य गतिरुच्यते। क्वचित्पर्यंकविद्यां क्वचिद्वैश्वानरविद्याम्। यत्रापि ब्रह्म प्रकृत्य गतिरुच्यते यथा 'प्राणो ब्रह्म कं ब्रह्म खं ब्रह्म' इति। 'अथ यदिदमस्मिन्ब्रह्मपुरे दहरं पुंडरीकं वेश्म' इति च तत्रापि वामनीत्वादिभिः सत्यकामादिभिश्च गुणैः सगुणस्यैवोपास्यत्वात्संभवति गतिः॥**

**भाष्यार्थ**—'पण मग गतिश्रुति किंविषय आहेत? त्यांचा विषय काय आहे?' त्यांचा विषय काय आहे तें सांगितलें जातें-त्या सगुणविद्याविषय आहेत. [-गतिश्रुतींचें सगुणविद्याविषयत्व विशद करितात-]='**तथाहि०**'-कसें तें पहा-क्वचित्-छांदोग्यादिकांत पंचाग्निविद्येच्या प्रकरणास आरंभ करून गति सांगितली जाते, क्वचित्-कौषीतकिब्राह्मणोपनिषदांत पर्यंकस्थ सगुणब्रह्मविद्येला व क्वचित्

वैश्वानरविद्येला आरंभ करून ती सांगितली जाते, [–"अहोपण, ब्रह्मप्रकरणास आरंभ करूनहि गति सांगितलेली असल्यामुळें तिचें परब्रह्मविषयत्व युक्त आहे," अशी आशंका घेऊन '**यत्रापि०**' इत्यादि भाष्यानें म्हणतात–]=जेथें 'प्राण ब्रह्म आहे, सुख ब्रह्म आहे, आकाश ब्रह्म आहे'–छां. ४. १०. ५–अशी व 'आतां जें हें या ब्रह्मपुरांत अल्प पुंडरीक गृह आहे' अशी ब्रह्माच्या प्रकरणास आरंभ करून गति सांगितली जाते, तेथेंहि वामनीत्वादि व सत्यकामादि गुणांनीं सगुण असलेल्याच ब्रह्माला उपास्यत्व असल्यामुळें गति संभवते. [–याप्रमाणें सगुण-विद्याविषयांत गतिश्रुति सांगून परविद्याविषयांत तिचा अभाव '**न क्वचित्०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]

**भाष्यं—न क्वचित्परब्रह्मविषया गतिः श्राव्यते। यथा गतिप्रतिषेधः श्रावितः 'न तस्य प्राणा उत्क्रामन्ति' इति। 'ब्रह्मविदाप्नोति परम्' इत्यादिषु तु सत्यप्याप्नोतेर्गत्यर्थत्वे वर्णितेन न्यायेन देशान्तरप्राप्त्यसंभवात्स्वरूपप्रतिपत्तिरेवेयं अविद्याध्यारोपितनामरूपप्रविलयापेक्षयाऽभिधीयते 'ब्रह्मैव सन्ब्रह्माप्येति' इत्यादिवदिति द्रष्टव्यम् ॥**

**भाष्यार्थ**—कोठेंहि परब्रह्मविषय गति सांगितली जात नाहीं. [–'पण ब्रह्मत्वाचा अविशेष असल्यामुळें परब्रह्मविषयांतहि हीच गति आहे' अशी आशंका घेऊन '**यथा०**' इत्यादि भाष्यानें म्हणतात–]='त्याचे प्राण उत्क्रमण करीत नाहींत'–पृ. ७१३–असा गतीचा प्रतिषेध जसा श्रवण करविला आहे [तशी परब्रह्मविषय गति कोठेंहि श्रवण करविलेली नाहीं. –अहोपण, 'आप्' या धातूला गत्यर्थत्व असल्यामुळें–'गति' हा त्याचा अर्थ असल्यामुळें परविद्याप्रकरणांतहि गतिश्रुति आहे' अशी आशंका घेऊन '**ब्रह्मविद्०**' इत्यादि भाष्यानें म्हणतात–]=पण 'ब्रह्मविद् पर ब्रह्माला प्राप्त होतो' –तै. २. १. १.–इत्यादि वाक्यांत 'आप्' या धातूला गत्यर्थत्व जरी असलें तरी 'सर्वगतत्व, सर्वान्तरत्व, सर्वात्मत्व' इत्यादि वर वर्णन केलेल्या न्यायानें–पृ. ७६४–ब्रह्माच्या देशान्तरप्राप्तीचा असंभव असल्यामुळें [–"तर मग परविषयांत 'आप्' या धातूचा प्रयोग कसा केला आहे?" अशी आशंका घेऊन '**स्वरूपप्रतिपत्तिः०**' इत्यादि भाष्यानें म्हणतात–]=अविद्याध्यारोपित–अविद्याकल्पित नामरूपप्रविलयाच्या अपेक्षेनें ही स्वरूपप्राप्तिच 'ब्रह्मच होऊन ब्रह्मामध्यें लीन होतो' –बृ.४.४.६.–इत्यादि वचनाप्रमाणें सांगितली जाते, असें जाणावें. [–आणि याहि कारणानें परब्रह्मविषयांत गति नाहीं, असें '**अपि च०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]

**भाष्यं**—**अपि च परविषया गतिर्व्याख्यायमाना प्ररोचनाय वा स्यादनुचिंतनाय वा । तत्र प्ररोचनं तावद्ब्रह्मविदो न गत्युक्त्या क्रियते । स्वसंवेद्येनैवाव्यवहितेन विद्यासमर्पितेन स्वास्थ्येन तत्सिद्धेः । न च नित्यसिद्धनिःश्रेयसनिवेदनस्यासाध्यफलस्य विज्ञानस्य गत्यनुचिंतने काचिदपेक्षोपपद्यते । तस्मादपरब्रह्मविषया गतिः । तत्र परापरब्रह्मविवेकानवधारणेन अपरस्मिन्ब्रह्मणि वर्तमाना गतिश्रुतयः परस्मिन्नध्यारोप्यन्ते ॥**

**भाष्यार्थ**—शिवाय गति पर ब्रह्मविषय नाहीं, याविषयीं आणखींहि एक कारण आहे. [—तेंच दाखविण्यासाठीं '**परविषया०**' इत्यादि भाष्यानें विकल्प करितात—]= पर ब्रह्मविषय व्याख्यान केली जाणारी गति प्ररोचनासाठीं—मुमुक्षूंच्या मनांत रुचि उत्पन्न करण्यासाठीं आहे कीं अनुचिंतनासाठीं—ध्यानासाठीं आहे ? [—'**तत्र०**' इत्यादि भाष्यानें त्यांतील प्ररोचनपक्षाचें निरसन—]=पण अगोदर त्यांतील गतीच्या उक्तीनें ब्रह्मवेत्याचें प्ररोचन केलें जात नाहीं. कारण विद्येनें समर्पण केलेल्या अव्यवहित—साक्षात् स्वसंवेद्यच स्वास्थ्यानें त्याची सिद्धि होते. [ब्रह्मज्ञानाचें प्ररोचन विद्येनें प्राप्त होणाऱ्या स्वानुभवसिद्ध साक्षात् स्वास्थ्यानेंच होतें. अव्यवहित म्ह० साक्षात्, हा स्वास्थ्याच्या स्वसंवेद्यत्वाविषयीं हेतु आहे. स्वापादिकांची व्यावृत्ति करण्यासाठीं 'विद्यासमर्पित' हें विशेषण आहे.—'**न च०**' इत्यादि भाष्यानें अनुचिंतनपक्षाचा परिहार—]=नित्यसिद्ध निःश्रेयसाचें निवेदन —नित्य मोक्षाचा अनुभव हें ज्याचें स्वरूप आहे व त्यामुळें ज्याचें फल असाध्य आहे, अशा विज्ञानाला गतीच्या अनुचिंतनाविषयीं कोणत्याहि प्रकारची अपेक्षा उपपन्न होत नाहीं, त्याला गतीच्या ध्यानाची मुळींच अपेक्षा नाहीं. [—'**तस्मात्०**' इत्यादि भाष्यानें या दोन्ही पक्षांच्या निरसनाचें फल सांगतात—]=म्हणून गति अपर ब्रह्मविषय आहे, सगुण ब्रह्म हा तिचा विषय आहे. [—"तर मग, कांहीं आचार्यांनीं गतीच्या पर ब्रह्मविषयत्वाचा स्वीकार कसा केला आहे ?" अशी आशंका घेऊन 'सूक्ष्मदृष्टिशून्यत्वामुळें' असें समाधान '**तत्र०**' इत्यादि भाष्यानें सांगतात—]=पण असें असतांना पर ब्रह्म व अपर ब्रह्म यांच्या विवेकाचें अनवधारण झाल्यानें, यांच्या भेदाचा निश्चय न झाल्यामुळें अपर ब्रह्मामध्यें असणाऱ्या गतिश्रुति पर ब्रह्मामध्यें आरोपिल्या जातात.[—'**किं द्वे०**'इत्यादि भाष्यानें अपसिद्धान्तशंका—]

**भाष्यं**—**किं द्वे ब्रह्मणी परमपरं चेति । बाढं द्वे । 'एतद्वै सत्यकाम परं चापरं च ब्रह्म यदोंकारः' इत्यादिदर्शनात् । किं पुनः परं ब्रह्म किमपरमिति । उच्यते—यत्राविद्याकृतनामरूपादिविशेषप्रतिषेधादस्थूलादिशब्दैः ब्रह्मोपदिश्यते**

**तत्परम् । तदेव यत्र नामरूपादिविशेषेण केनचिद्विशिष्टं उपासनायोपदिश्यते 'मनोमयः प्राणशरीरो भारूपः' इत्यादिशब्दैः । तदपरम् ॥**

**भाष्यार्थ**—"तर मग काय, पर व अपर अशीं दोन ब्रह्में आहेत?" [–ब्रह्माच्या सोपाधिक-निरुपाधिकत्वानें भेदश्रुतिवैरूप्य आहे. त्यामुळें अपसिद्धान्तापत्ति होत नाहीं, असें 'बाढं०' इत्यादि भाष्यानें समाधान सांगतात–]=होय. ब्रह्में दोन आहेत.कारण 'हे सत्यकाम, पर व अपर ब्रह्म आहे, कीं जो हा ओंकार.'–प्र.५.२.–इत्यादि श्रुतिदर्शन होतें. [–'**किं पुनः०**' इत्यादि भाष्यानें हा परापरविभागच प्रश्नपूर्वक विशद करितात–]='पण पर ब्रह्म कोणतें व अपर ब्रह्म काय आहे?' असें विचाराल तर सांगतों–ज्या श्रुतींत अविद्याकृत नाम-रूपादि विशेषांच्या प्रतिषेधामुळें–त्यांचा अभाव असल्यामुळें अस्थूलादिशब्दांनीं ब्रह्माचा उपदेश केला जातो तें पर ब्रह्म, पण तेंच ब्रह्म ज्या श्रुतींत नाम-रूपादि कांहीं विशेषानें विशिष्ट, असें उपासनेसाठीं 'मनोमय, प्राणशरीर, भारूप'–छां. ३. १४. २; मैत्रे. २. ६.–इत्यादि शब्दांनीं उपदेशिलें जातें तें अपर. [–'**ननु०**' इत्यादि भाष्यानें या उक्त अपसिद्धान्तपरिहारालाच आक्षेपद्वारा अधिक विशद करितात–]

**भाष्यं—नन्वेवमाद्वितीयश्रुतिरुपरुध्येत । न । अविद्याकृतनामरूपोपाधिकतया परिहृतत्वात् । तस्य चापरब्रह्मोपासनस्य तत्संनिधौ श्रूयमाणं 'स यदि पितृलोककामो भवति' इत्यादि जगदैश्वर्यलक्षणं संसारगोचरमेव फलं भवति । अनिवर्तितत्वादविद्यायाः । तस्य च देशविशेषावबद्धत्वात्तत्प्राप्त्यर्थं गमनमविरुद्धम् ॥**

**भाष्यार्थ**—"अहोपण, असें म्हटल्यास अद्वैत श्रुति बाधित होईल?" नाहीं, ती बाधित होत नाहीं. कारण अविद्याकृत–अविद्याकल्पित नाम-रूपोपाधिकत्वानें त्याचा परिहार केलेला आहे. [–"पण परापरविभागाला मिथ्यात्व आहे, असें जरी सिद्ध झालें तरी त्यामुळें प्रकृत अर्थी कोणता लाभ होतो?" अशी आशंका घेऊन अपर ब्रह्माच्या गन्तव्यत्वासाठीं त्याच्या उपासनेचें फल '**तस्य०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=आणि त्या अपर ब्रह्माच्या उपासनेचें तिच्या सांनिध्यांत श्रुत असलेलें 'तो जर पितृलोककाम झाला तर त्याचे पितर संकल्पानेंच उत्पन्न होतात'–छां. ८. २. १.–इत्यादि जगदैश्वर्यरूप संसारविषयच फल होतें. कारण अविद्येला अनिवर्तितत्व आहे, तिची विद्येनें निवृत्ति झालेली नसते, त्यामुळें अपर ब्रह्मोपासनेचें तसलें संसारगतच फल मिळतें. [–"अहोपण, अपर ब्रह्मोपासनेला उक्तफलत्व जरी असलें तरी अपर ब्रह्मामध्यें गति कशी संभवते?"

' तस्य च० ' इत्यादि भाष्यानें उत्तर-]=आणि त्या अपर ब्रह्माला देशविशेषाव-बद्धत्व-विशेषदेशावच्छिन्नत्व असल्यामुळें त्याच्या प्राप्तीसाठीं गमन अविरुद्ध आहे. [-" अहोपण, विशेष देशानें परिच्छिन्न झालेल्या अपर ब्रह्माला गन्तव्यत्व जरी असलें तरी विभुत्वामुळें आत्म्याचें गंतृत्व अयुक्त आहे, " अशी आशंका घेऊन ' सर्वगतत्वेऽपि० ' इत्यादि भाष्यानें सांगतात-]

**भाष्यं—सर्वगतत्वेऽपि चात्मन आकाशस्येव घटादिगमने बुद्ध्याद्युपाधिगमने गमनप्रसिद्धिरित्यवादिष्म ' तद्गुणसारत्वात् ' इत्यत्र । तस्मात् ' कार्यं बादरिः ' इत्येष एव स्थितः पक्षः । ' परं जैमिनिः ' इति तु पक्षान्तरप्रतिभानमात्रप्रदर्शनं प्रज्ञाविकासनायेति द्रष्टव्यम् ॥ १४ ॥ ( ५ )**

**भाष्यार्थ**—आणि आत्म्याला सर्वगतत्व जरी असलें तरी घटादिकांच्या गमनामध्यें आकाशाच्या गमनाची प्र-सिद्धि जशी होते तशी बुद्ध्यादि-उपाधींचें गमन होऊं लागलें असतां आत्म्याच्या गमनाची प्र-सिद्धि होते, असें आम्हीं 'तद्गुणसारत्वात्'-त्या बुद्धीचे जे अणुत्वादि गुण तेंच जीवाचें सार, तेंच त्याचें प्रधान स्वरूप असल्यामुळें जीवाच्या अणुत्वादिकांचा व्यपदेश होतो, अशा अर्थाच्या सूत्रांत -ब्र.भा.२.३.२९.पृ.५२८सांगितलें आहे.[-अनिर्वचनीय गति अनिर्वचनीय सगुण ब्रह्मविषयच असणें उचित आहे, असा भावार्थ.-याप्रमाणें परब्रह्मामध्यें गतीचा अभाव व अपरब्रह्मामध्यें तिचा संभव असल्यामुळें आम्हीं सांगितलेलीच पूर्वोत्तरपक्षांची व्यवस्था युक्त आहे, असा उपसंहार-]=' तस्मात्० '-म्हणून 'कार्यं बादरिः '-कार्यब्रह्मच गन्तव्य आहे, असें त्यांतील गतीच्या संभवामुळें बादरि-आचार्य मानितात.-पृ. ७५४-इत्यादि हाच पक्ष सिद्ध झाला. पण 'परं जैमिनिः' -जैमिनि-आचार्य ' अमानव पुरुष मुख्य परब्रह्मालाच नेऊन पोंचवितो ' असें मानितात.-पृ.७५९-हें केवल पक्षान्तराच्या प्रतिभानाचें प्रदर्शन बुद्धीचा विकास करण्यासाठीं आहे, असें जाणावें. १४. [-सु. ब्र. ४८७-] ( ५ )

( ६. अप्रतीकालंबनाधिकरण. सू. १५-१६ )

—गन्तव्यविशेषाच्या उक्तीनंतर गंतृविशेषोक्तीसाठीं सूत्रकार ' अप्रतीकालंबनान्० ' इत्यादि म्हणतात—

**सूत्रं—अप्रतीकालंबनान्नयतीति बादरायण उभयथाऽदोषात्तत्क्रतुश्च॥१५**

**सूत्रार्थ**—प्रतीकोपासना करणाऱ्या उपासकांना सोडून तद्भिन्न उपासकांना -' अप्रतीकालंबनांना तो अमानव पुरुष नेतो, असें बादरायण आचार्य मानितात. ' कारण कांहीं उपासकांना नेतो व कांहीं उपासकांना नेत नाहीं, असें

' उभयथा '–दोन्ही प्रकारें मानिल्यास दोष येत नाहीं. पूर्वोक्त ' अनियम-'न्यायाशीं विरोध येत नाहीं, आणि उपासक ' तत्क्रतु ' असतो, त्यानें कार्यब्रह्माचा क्रतु–संकल्प–ध्यान केलेलें असतें. म्हणून त्यालाच त्याची प्राप्ति होते. १९.– सु.ब्र.४८८.–[–पूर्वोत्तर अधिकरणांचा संबंध सांगण्यासाठीं **'स्थितं एतत्०'** इत्यादि भाष्यानें गतार्थाचें संकीर्तन करितात–]

**भाष्यं––स्थितमेतत्कार्यविषया गतिर्न परविषयेति । इदमिदानीं संदिह्यते–किं सर्वान्विकारालंबनानविशेषेणैवामानवः पुरुषः प्रापयति ब्रह्मलोकमुत कांश्चिदेवेति । किं तावत्प्राप्तं । सर्वेषामेवैषां विदुषामन्यत्र परस्माद्ब्रह्मणो गतिः स्यात् । तथाहि– ' अनियमः सर्वासाम्' इत्यत्राविशेषेणैवैषा विद्यान्तरेष्ववतारितेति॥**

**भाष्यार्थ**—' गति कार्यब्रह्मविषया आहे, परब्रह्मविषया नाहीं ' हें पूर्वाधिकरणांत सिद्ध झालें. [–आतां अमानव पुरुषाला विषय करून अविशेष श्रुति व अतत्क्रतुत्वानें अगमनाचें भान यांमुळें **'इदं०'** इत्यादि भाष्यानें संशय सांगतात–] =आतां ' काय, विकारांचा अवलंब करणाऱ्या सर्व उपासकांना अविशेषानेंच तो अमानव पुरुष ब्रह्मलोकाला नेऊन पोंचवितो कीं कांहीं उपासकांनाच?' असा हा संदेश केला जातो. [–विद्याफलासाठीं असलेल्या देवयानमार्गांतील गन्तृविशेषाच्या उक्तीनें याची पादादिसंगति आहे. पूर्वपक्षामध्यें ' अनियमन्यायानें विकारालंबन उपासनांमध्यें विशेषाची असिद्धि ' व सिद्धान्तांत ' प्रतीकोपासनातिरिक्त उपासनांमध्यें तत्क्रतुन्यायानें विशेषाची सिद्धि ' असें मानून **'किं तावत्०'** इत्यादि भाष्यानें विमर्शपूर्वक पूर्वपक्ष करितात–]=मग त्यांतील प्रथम कोणता पक्ष प्राप्त झाला ? या सर्वच विद्वानांची–उपासकांची परब्रह्माहून अन्यत्र म्हणजे कार्यब्रह्मामध्यें गति होईल. [–त्याविषयीं वादी गुणोपसंहारस्थ अनियमाधिकरणन्यायाचें हेतुत्वानें स्मरण करून देतो–]=**' तथाहि० '**–कशी ती पहा–' अनियमः सर्वासाम् '–सर्व सगुणोपासनांच्या मार्गाचा अनियम आहे.–ब्र. भा. ३. ३. ३१.–पृ.३६४–या सूत्रांत अविशेषानेंच–सामान्यतःच ही गति विद्यान्तरांमध्यें प्रवृत्त केली आहे, **' इति '**–असा पक्ष प्राप्त होतो. [–प्रतीकांचें आलंबन करणाऱ्या उपासकांचें पितृयाण व तृतीयस्थान यांच्याशीं संबंधित्व नसल्यामुळें, त्यांनीं प्रतीकविशेषत्वानें ब्रह्माचेंहि ध्यान केलेलें असल्यामुळें 'ये वै के च०'–अ.३. ८.५३–इत्यादि वाक्यानें त्यांचें ग्रहण केलेलें असल्यामुळें ' एतान् ब्रह्म गमयति '–त्यांना ब्रह्माला पोंचवितो,–पृ.७४९–या वाक्यांतील 'एतत्-'शब्दानें त्यांच्याहि परामर्शाची सिद्धि होत असल्यामुळें आणि विद्यान्तरांमध्यें गतीला प्रवृत्त केलेलें असल्यामुळें अमानव

पुरुष या सर्वच विकारालंबन करणाऱ्या उपासकांना ब्रह्मलोकाला नेतो, असें प्राप्त झालें, असा याचा भावार्थ.—' एवं० ' इत्यादि भाष्यानें पूर्वपक्षाचा अनुवाद करून सिद्धान्तप्रतिज्ञेला अवतरण देऊन तिचें व्याख्यान करितात—]

**भाष्यं—एवं प्राप्ते प्रत्याह—अप्रतीकालंबनानिति । प्रतीकालंबनान्वर्जयित्वा सर्वानन्यान्विकारालंबनान्नयति ब्रह्मलोकं इति बादरायण आचार्यो मन्यते । न ह्येवमुभयथाभावाभ्युपगमे कश्चिद्दोषोऽस्ति । अनियमन्यायस्य प्रतीकव्यतिरिक्तेष्वप्युपासनेषूपपत्तेः ॥**

**भाष्यार्थ**—असा पूर्वपक्ष प्राप्त झाला असतां सूत्रकार 'अप्रतीकालंबनान्' असा त्याचा परिहार सांगतात—उपासनेमध्यें ज्यांनीं प्रतीकांचें आलंबन—आश्रय केला आहे, अशा प्रतीकालंबनांना वर्ज करून बाकीच्या सर्व विकारांचा आश्रय करून उपासना करणारांना तो अमानव पुरुष ब्रह्मलोकाला नेतो, असें बादरायण आचार्य मानितो. [ आश्रयान्तरप्रत्ययाचा आश्रयान्तरामध्यें प्रक्षेप —आरोप—दृष्टि करणें हा प्रतीक होय. जसें 'नाम ब्रह्म आहे'—छां.७.१.५.—इत्यादि उपासनांत नामादिकांमध्यें ब्रह्माश्रयप्रत्ययाचा प्रक्षेप. त्याचें जे आलंबन करणारे ते प्रतीकालंबन, त्यांना सोडून विकारांचें आलंबन करणाऱ्या दुसऱ्या सर्व सगुणविद्यावानांना, असा 'अप्रतीकालंबनान्' याचा अर्थ आहे.—पण वाद्यानें 'अनियमन्यायानें अविशेषानें सर्व विकारालंबनांची ही गति आहे' असें जें म्हटलें आहे, त्याला दूषित करणारे आचार्य 'उभयथादोषात्' या सूत्रावयवाचें व्याख्यान 'न हि०' इत्यादि भाष्यानें करितात—]=कारण याप्रमाणें उभयथाभावाचा अभ्युपगम—स्वीकार केला असतां कांहीं दोष येत नाहीं. कारण 'अनिमय-'न्यायाची प्रतीकव्यतिरिक्त उपासनांमध्येंहि उपपत्ति लागते. [—प्रतीकालंबनांना तो नेत नाहीं, तर विकारालंबनांना नेतो, असा उभयथात्वाचा स्वीकार केला असतां 'अनियमः सर्वासां' या न्यायाचा कांहीं दोष येत नाहीं, त्याच्याशीं विरोध येत नाहीं. कारण सर्वशब्दाला प्रतीकालंबनातिरिक्तविषयत्व आहे, असा भावार्थ.—सूत्रांतील 'तत्क्रतुश्च' ह्या पदाचें पदान्तराचा अध्याहार करून 'तत्क्रतुश्चास्य०' इत्यादि भाष्यानें व्याख्यान करितात—]

**भाष्यं—तत्क्रतुश्चास्योभयथाभावस्य समर्थको हेतुर्द्रष्टव्यः । यो हि ब्रह्मक्रतुः स ब्राह्ममैश्वर्यमासीदेदिति श्लिष्यते 'तं यथा यथोपासते तदेव भवति' इति श्रुतेः । न तु प्रतीकेषु ब्रह्मक्रतुत्वमस्ति । प्रतीकप्रधानत्वादुपासनस्य ॥**

**भाष्यार्थ**—'तत्क्रतुश्च' हा या उभयथाभावाचा समर्थक हेतु आहे, असें जाणावें. [–'**यो हि०**' इत्यादि भाष्यानें त्याचें हेतुत्व साधितात–]=कारण जो ब्रह्मक्रतु असतो–ब्रह्माचा संकल्प–चिंतन–उपासन करणारा असतो तो ब्रह्माच्या ऐश्वर्याला प्राप्त होईल, हें उपपन्न होतें. [–त्याविषयीं '**तं यथा०**' इत्यादि प्रमाण–]=कारण 'त्याची जशी जशी उपासना करितो तेंच तो होतो' अशी श्रुति आहे. [–"अहोपण, प्रतीकालंबनांनीं सुद्धां त्याच्या विशेषणत्वानें ब्रह्माचें ध्यान केलेलें असतें" अशी आशंका घेऊन '**न तु०**' इत्यादि भाष्यानें म्हणतात–]=पण प्रतीकांमध्यें ब्रह्मक्रतुत्व नाहीं. कारण त्या उपासनेला प्रतीकप्रधानत्व असतें. [ब्रह्मदृष्टीनें नामादि प्रतीकांचेंच प्राधान्यानें अनुचिंतन केलें जात असल्यामुळें प्रतीकालंबनांना ब्रह्मक्रतुत्व नाहीं, असा भावार्थ.–'जो तत्क्रतु असतो तो तें होतो' या न्यायाच्या व्यभिचाराची '**ननु०**' इत्यादि भाष्यानें शंका–]

**भाष्यं—नन्वब्रह्मक्रतुरपि ब्रह्म गच्छतीति श्रूयते। यथा पंचाग्निविद्यायां 'स एनान्ब्रह्म गमयति' इति। भवतु यत्रैवमाहत्यवाद उपलभ्यते। तदभावे त्वौत्सर्गिकेण तत्क्रतुन्यायेन ब्रह्मक्रतूनामेव तत्प्राप्तिर्नेतरेषामिति गम्यते ॥१५॥**

**भाष्यार्थ**—अहोपण, "अब्रह्मक्रतुहि ब्रह्माला प्राप्त होतो" असें श्रुत आहे. जसें–पंचाग्निविद्येमध्यें 'तो अमानव या पंचाग्न्युपासकांना ब्रह्माला पोंचवितो' –छां.४.१५.५.–असें सांगितलें आहे. [–न्यायाला जरी औत्सर्गिकत्व असलें तरी विशेषवचनामुळें त्यांत अपवाद आहे, असें '**भवतु०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–] =जेथें असा साक्षात् अपवाद उपलब्ध होतो तेथें अब्रह्मक्रतुहि ब्रह्माला प्राप्त होवो, पण जेथें त्याचा असा साक्षात् अपवाद नसतो तेथें औत्सर्गिक–नियत 'तत्क्रतु-'न्यायानें ब्रह्मक्रतूंनाच ब्रह्माची प्राप्ति होते, इतरांना त्याची प्राप्ति होत नाहीं, असें अवगत होतें १५. [–याहि कारणानें प्रतीकोपासना करणारांची ब्रह्मगति नाहीं, असें '**विशेषं च०**' इत्यादि सूत्रानें सांगतात–]

## सूत्रं—विशेषं च दर्शयति ॥१६॥(६)

**सूत्रार्थ**—आणि श्रुति प्रतीकोपासनांमध्यें फलाचा विशेष दाखविते. १६ (६) सु.ब्र.४८८–[–त्यांच्या फलाला उत्कर्ष-अपकर्षवत्त्व असल्यामुळें प्रतीकोपासना करणारांना एकरूप ब्रह्मक्रतुत्व किंवा त्याची प्राप्ति नाहीं. कारण हेतूच्या उत्कर्षापकर्षांवांचून फलाच्या उत्कर्षापकर्षांचा संभव नाहीं, असें '**नामादिषु०**' इत्यादि भाष्यानें सूत्राचें व्याख्यान–]

**भाष्यं**——नामादिषु प्रतीकोपासनेषु पूर्वस्मात्पूर्वस्मात्फलविशेषं उत्तरस्मिन्नुत्तरस्मिन्नुपासने दर्शयति—'यावन्नाम्नो गतं तत्रास्य यथाकामचारो भवति' 'वाग्वाव नाम्नो भूयसी' 'यावद्वाचो गतं तत्रास्य यथाकामचारो भवति' 'मनो वाव वाचो भूयः' इत्यादिना । स चायं फलविशेषः प्रतीकतंत्रत्वादुपासनानामुपपद्यते । ब्रह्मतंत्रत्वे तु ब्रह्मणोऽविशिष्टत्वात्कथं फलविशेषः स्यात् । तस्मान्न प्रतीकालंबनानां इतरैस्तुल्यफलत्वमिति ॥१६॥ (६)

इति श्रीगोविंदभगवत्पूज्यपादशिष्यश्रीशंकरभगवत्पादकृतौ शारीरक-
मीमांसाभाष्ये चतुर्थाध्यायस्य तृतीयः पादः ॥

**भाष्यार्थ**——नामादि प्रतीकोपासनांमध्यें पूर्व पूर्व उपासनेहून उत्तर-उत्तर उपासनेंत श्रुति " जेवढा नामाचा विषय आहे त्यांत याचा यथाकाम—इच्छेप्रमाणें संचार होतो. " " वाक्च नामाहून अधिक आहे. " " जेवढा वाक्-चा विषय आहे त्यांत याचा यथेष्ट संचार होतो. " " मनच वाक्-हून अधिक आहे. " —छां. ७.१.५;२. २;३.२.—इत्यादि वचनानें फलविशेष दाखविते. [—"अहो-पण, असा फलविशेषाचा उपलंभ जरी होत असला तरी उपासनांना प्रतीकतंत्रत्व कशासाठीं आहे ? " ' स च० ' इत्यादि भाष्यानें उत्तर—]=आणि हा फलविशेष उपासनांच्या प्रतीकतंत्रत्वामुळें उपपन्न होतो. [ कारण प्रतीकांना उत्कर्ष-निकर्षवत्त्व आहे, असा भावार्थ.—पण उलटपक्षीं या फलविशेषदृष्टीचें अयुक्तत्व सांगतात—]=पण उपासनांना ब्रह्मतंत्रत्व जर असेल तर ब्रह्माला अविशिष्टत्व असल्यामुळें फलामध्यें विशेष कसा संभवेल ? [—याप्रमाणें प्रतीकालंबनातिरिक्त विकारालंबनांची ब्रह्मगति सिद्ध झाली असतां फलिताचा उपसंहार—]='तस्मात्०' —यास्तव प्रतीकालंबनांचें इतरांशीं-विकारालंबनांशीं तुल्यफलत्व नाहीं, असें सिद्ध झालें. १६.—सु. ब्र. ४८९—( ६ )

इति श्रीशंकराचार्यभक्त विष्णुशर्मकृत ब्रह्मसूत्रशारीरभाष्यार्थाच्या चवथ्या
फलाध्यायाचा तिसरा अर्चिरादिपाद समाप्त झाला.

॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

*

*

ॐ तत्सत्

# फलाख्यचतुर्थाध्याये चतुर्थः पादः ।

( १. संपद्याविर्भावाधिकरण. सू. १-३. )

—या अध्यायाच्या पहिल्या पादामध्यें निर्गुणविद्येच्या फलाचा एकदेश—बंध-निवृत्ति सांगितली. दुसऱ्या पादांत सगुण-निर्गुणफलप्राप्तीच्या शेषत्वानें सगुण-निर्गुणवेत्त्यांच्या उत्क्रांति-अनुत्क्रांतींचा विचार केला. तिसऱ्या पादांत सगुणविद्या-फलाच्या उपयोगित्वानें गति, गंतव्य व गंता यांच्या विशेषांचें निरूपण केलें. आतां या चवथ्या पादांत ब्रह्मविद्येच्या फलाचा एकदेश—ब्रह्मभावाचा आविर्भाव आणि सगुणविद्येचें फल—सर्वेश्वरतुल्यभोगत्व यांचें अवधारण—निश्चय केला जाईल. पूर्वपादांत अपरविद्याप्राप्य सांगून येथें परविद्याप्राप्य 'संपद्य०' इत्यादि सूत्रानें सांगतात—

**सूत्रं—संपद्याविर्भावः स्वेनशब्दात् ॥ १**

**सूत्रार्थ**—स्वप्रकाश आत्म्याचा साक्षात् अनुभव घेऊन त्याच आत्ममात्ररूपानें आविर्भाव होतो. कारण श्रुतींत 'स्वेन रूपेण' असा 'स्व-'शब्द आहे!—सु. ब्र. ४९१-[-निर्गुणविद्येच्या फलाचें उदाहरण देण्यासाठीं 'एवं०' इत्यादि भाष्यानें तद्विषयवाक्याचा उल्लेख करितात-]

**भाष्यं**—'एवमेवैष संप्रसादोऽस्माच्छरीरात्समुत्थाय परं ज्योतिरुपसंपद्य स्वेन रूपेणाभिनिष्पद्यते इति श्रूयते । तत्र संशयः—किं देवलोकाद्युपभोग-स्थानेष्विवागंतुकेन केनचिद्विशेषेणाभिनिष्पद्यते । आहोस्विदात्ममात्रेणेति ॥**

**भाष्यार्थ**—"याप्रमाणें हा संप्रसाद या शरीरापासून समुत्थान पावून परं-ज्योतीस उपसंपन्न होऊन आपल्या रूपानें अभिनिष्पन्न होतो."—छां. ८. १२. ३ सु. उ. ४८८—असें श्रुत आहे. [-'स्व' या शब्दाचा 'स्वकीय-स्वसंबंधी' असा अर्थ असल्यामुळें आगंतुकत्वाचें भान होतें व 'स्वरूप' असा अर्थ असल्यामुळें अनागंतुकत्वाची प्रतीति येते, त्यामुळें 'तत्र०' इत्यादि भाष्यानें संशय सांगतात-] =त्याविषयीं 'काय, देवलोकादि उपभोगस्थानांमध्यें जसा, त्याचप्रमाणें कांहीं आगं-तुक—अनित्य विशेषानें तो अभिनिष्पन्न होतो कीं आत्ममात्ररूपानें' असा संशय येतो. [या अधिकरणांत निर्गुणविद्याफलरूप ब्रह्मभावाविर्भावाचें नित्यसिद्धत्व

कथन केलेलें असल्यामुळें याची पादादिसंगति आहे. पूर्वपक्षांत ' मोक्षाचा स्वर्गाहून कांहीं विशेष नाहीं ' व सिद्धान्तांत ' त्याचा त्याहून विशेष आहे ' असें मानून–' **किं तावत्०** ' इत्यादि भाष्यानें विमर्शपूर्वक पूर्वपक्ष सांगतात–]

**भाष्यं—किं तावत्प्राप्तम् । स्थानान्तरेष्विवागंतुकेन केनचिद्रूपेणाभिनिष्पत्तिः स्यात् । मोक्षस्यापि फलत्वप्रसिद्धेः । अभिनिष्पद्यत इति चोत्पत्तिपर्यायत्वात् । स्वरूपमात्रेण चेदाभिनिष्पत्तिः पूर्वास्वप्यवस्थासु स्वरूपानपायाद्विभाव्येत । तस्माद्विशेषेण केनचिदभिनिष्पद्यत इति ॥**

**भाष्यार्थ**—मग त्यांतील प्रथम कोणता पक्ष प्राप्त झाला ? स्थानान्तरांमध्यें जशी, तशीच कांहीं आगंतुकरूपानें अभिनिष्पत्ति होईल. [–'विमत स्वरूपाभिनिष्पत्ति आगंतुक–अनित्य–अस्वाभाविक आहे, फलत्वामुळें, स्वर्गाप्रमाणें ' असें मानून ' **मोक्षस्यापि०** ' इत्यादि भाष्यानें वादी त्याविषयीं हेतु सांगतो–]=कारण मोक्षाच्याहि फलत्वाची प्रसिद्धि आहे. [–' अभिनिष्पत्ति-'शब्दावरूनहि पूर्वी नसलेल्याची निष्पत्ति सिद्ध होते, असें हेत्वंतर सांगतो–]=आणि ' अभिनिष्पन्न होतो ' या शब्दाला उत्पत्तिपर्यायत्व आहे. [ तो शब्द उत्पत्ति या अर्थी आहे, अभिनिष्पत्ति व उत्पत्ति हे परस्पर पर्याय शब्द आहेत, असा भावार्थ.–" अहोपण, सिद्धान्तांतहि अभिनिष्पत्ति औपचारिकी असेल ? " अशी आशंका घेऊन ' **स्वरूपमात्रेण०**' इत्यादि भाष्यानें वादी म्हणतो–]=स्वरूपमात्रानेंच जर अभिनिष्पत्ति होत असेल तर पूर्व अवस्थांमध्येंहि स्वरूपाला अपाय होत नसल्यामुळें ती प्रतीतीला येईल. [–उक्त अनुमानामुळें व ' अभिनिष्पत्ति ' या शब्दामुळें सिद्ध झालेल्या अर्थाचें निगमन वादी ' **तस्मात्०**' इत्यादि भाष्यानें करितो–]=म्हणून विद्वान् एखाद्या विशेषानें अभिनिष्पन्न होतो, असें प्राप्त होतें. [–' **एवं०**' इत्यादि भाष्यानें मुक्तीच्या आगंतुकत्वाचा अनुवाद करून सिद्धान्त सांगतात–]

**भाष्यं—एवं प्राप्ते ब्रूमः—केवलेनैवात्मनाविर्भवति न धर्मान्तरेणेति । कुतः । 'स्वेन रूपेणाभिनिष्पद्यते' इति स्वशब्दात् । अन्यथा हि स्वशब्देनेति विशेषणमनवक्लृप्तं स्यात् ॥**

**भाष्यार्थ**—असा पूर्वपक्ष प्राप्त झाला असतां ' केवल आत्मरूपानेंच तो आविर्भूत होतो, धर्मान्तरानें नाहीं ' असें आम्ही सांगतों. [–" अहोपण, आम्हीं सांगितलेलें अनुमान जिवंत–अबाधित असतांना मुक्तीला अनागंतुकत्व कसें ? " असा आक्षेप–]=कोणत्या कारणानें ? [–अनुमान विशेषणश्रुतीनें बाध्य आहे, असें ' **स्वेन रूपेण०** ' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=' स्वतःच्या रूपानें अभिनि-

ष्पन्न होतो ' असा स्वशब्द असल्यामुळें अनुमान बाधित होतें. [-'ज्योतिः-' शब्दित-'ज्योतिः' असें ज्याला म्हटलें आहे अशा पर ब्रह्माला 'उपसंपद्य' -साक्षात् अनुभवून त्याच स्वतःच्या रूपानें आविर्भाव-अवस्थान न मानणाऱ्या वाद्याचें निरसन 'अन्यथा०' इत्यादि भाष्यानें करितात-]=कारण तसें जर न मानिलें तर 'स्व' या शब्दानें विशेषण अयोग्य-अनुपपन्न होईल. ['स्वेन रूपेण' असें जें स्वशब्दानें रूपाला विशेषित केलें आहे, तें अयोग्य होईल.-वादी 'ननु०' इत्यादि भाष्यानें दुसऱ्या प्रकारें स्वशब्दाच्या अर्थवत्त्वाची शंका घेतो-]

**भाष्यं—नन्वात्मीयाभिप्रायः स्वशब्दो भविष्यति । न । तस्यावचनीयत्वात् । येनैव हि केनचिद्रूपेणाभिनिष्पद्यते तस्यैवात्मीयत्वोपपत्तेः स्वेनेति विशेषणं अनर्थकं स्यात् । आत्मवचनतायां त्वर्थवत् । केवलेनैवात्मरूपेणाभिनिष्पद्यते । नागंतुकेनापररूपेणापीति ॥ १ ॥ कः पुनर्विशेषः पूर्वास्ववस्थास्विह च स्वरूपानपायसाम्ये सतीत्यत आह—**

**भाष्यार्थ—**" अहोपण, '**स्व**' हा शब्द आत्मीय-स्वसंबंधी या अर्थाचा असेल, त्याचा 'आत्मीय' असा अभिप्राय असेल." [-पण त्याचें अज्ञातज्ञापकत्व संभवत असतांना अनुवादकत्व संभवत नाहीं, त्यामुळें त्याचा 'आत्मीय' हा आशय नाहीं, असें सिद्धान्ती '**न तस्य०**' इत्यादि भाष्यानें सांगतात-]=नाहीं, त्या शब्दाचा आत्मीय-आत्मसंबंधी हा अर्थ नाहीं. कारण त्याला अवचनीयत्व आहे. [-'**येनैव०**' इत्यादि भाष्यानें तेंच अवचनीयत्व साधितात-]=कारण ज्या कोणत्याहि रूपानें तो अभिनिष्पन्न होतो त्याचेंच आत्मीयत्व संभवत असल्यामुळें 'स्वेन' हें विशेषण अनर्थक-व्यर्थ होतें. [-याप्रमाणें परपक्षामध्यें विशेषणाचें आनर्थक्य सांगून स्वपक्षीं त्याचें अर्थवत्त्व सांगतात-]=पण स्वशब्दाला आत्मवचनता आहे-स्वशब्दाचा आत्मा हा अर्थ आहे, असें म्हटल्यास तें विशेषण अर्थवत्-सार्थ-उपयुक्त होतें. [-'**केवलेन०**' इत्यादि भाष्यानें त्याचें अर्थवत्त्वच विशद करितात-]=केवलच-निरुपाधिकच-परच आत्मरूपानें अभिनिष्पन्न होतो, आगंतुक अपररूपानेंहि निष्पन्न होत नाहीं, असें 'स्वेन' हें विशेषण अर्थवत् होतें. १. [-'**कः पुनः०**' इत्यादि भाष्यानें आकांक्षाद्वारा सूत्रान्तराला अवतरण देतात-]="तर मग पूर्व अवस्थांमध्यें व या अवस्थेमध्यें स्वरूपाचा अनपाय-अबाध जर एकसारखाच आहे-स्वरूपानपायाला जर साम्य आहे तर म्ह० स्वरूपानपायाला साम्य असतांना त्याच्यामध्यें विशेष कोणता आहे ?" असें वादी विचारील म्हणून सूत्रकार '**मुक्तः०**' इत्यादि भाष्यानें म्हणतात-

## सूत्रं—मुक्तः प्रतिज्ञानात् ॥२

**सूत्रार्थ**—पूर्वी अवस्थात्रयानें कलुषित व जणुंकाय संसारीच असणाराहि तो सर्व संसार-अनर्थापासून 'मुक्त' होत्साता स्वयंप्रकाश पूर्णानंदरूपानें अवस्थित होतो. कोणत्या कारणानें ? 'प्रतिज्ञानामुळें' २.–सु. ब्र. ४९१.–[–'योऽत्र०' इत्यादि भाष्यानें सूत्रस्थ मुक्तशब्दाची योजना कारितात–]

**भाष्यं—योऽत्राभिनिष्पद्यते इत्युक्तः स सर्वबंधविनिर्मुक्तः शुद्धेनैवात्मनाऽवतिष्ठते । पूर्वत्र त्वंधो भवत्यपि रोदितीव विनाशमेवापीतो भवतीति चावस्थात्रयकलुषितेनात्मना । इत्ययं विशेषः ॥**

**भाष्यार्थ**—जो येथें 'अभिनिष्पन्न होतो' असें सांगितला गेलेला तो सर्वबंधविनिर्मुक्त–सर्व संसारबंधापासून सर्वथा मुक्त होत्साता शुद्धच आत्मरूपानें अवस्थित होतो. [–"अहोपण, पूर्वत्रहि वस्तुतः याला एवंभूतत्व असल्यामुळें विशेषसिद्धि होत नाहीं" अशी आशंका घेऊन पूर्वींच्या अवस्थात्रयांतहि क्रमानें व्यावहारिक रूपानें असदृशत्व सांगतात–]='पूर्वत्र०' पण पूर्वावस्थांमध्यें 'अंध होतो' 'जणुकाय रोदनहि करितो' 'विनाशालाच प्राप्त होतो' अशा अवस्थात्रयकलुषित रूपानें अवस्थित होतो,'इति०'–असा हा विशेष आहे. [–जागरितावस्थेंत पुत्रादिकांमध्यें अहं-ममाभिमानामुळें अंधाप्रमाणें परवश होतो. स्वप्नांत त्या पुत्रादिकांच्या नाशदर्शनानें वासनामय रोदनादिकांचा अनुभव घेतो. सुषुप्तांत विशेष ज्ञानशून्य झालेला चिद्धातु–चिदात्मा अज्ञानमात्रपरवश होऊन राहतो, अशा बंधसंज्ञक कालुष्यानें दूषित झालेलें जें आत्मरूप त्यानें आत्मा संसारदशेंत अवस्थित होतो. पण मोक्षामध्यें तो सर्व दुःखसंबंधरहित स्वप्रकाश परिशुद्ध परमानंदरूपानें अवस्थित होतो, असा हा विशेष आहे, असा भावार्थ.–'कथं पुनः०' इत्यादि भाष्यानें शंकापूर्वक 'प्रतिज्ञानात्' या सूत्रावयवाचें ग्रहण करितात–]

**भाष्यं—कथं पुनरवगम्यते मुक्तोऽयमिदानीं भवतीति । प्रतिज्ञानादित्याह । तथाहि 'एतं त्वेव ते भूयोऽनुव्याख्यास्यामि' इत्यवस्थात्रयदोषविहीनं आत्मानं व्याख्येयत्वेन प्रतिज्ञाय 'अशरीरं वाव सन्तं न प्रियाप्रिये स्पृशतः' इति चोपन्यस्य 'स्वेन रूपेणाभिनिष्पद्यते स उत्तमः पुरुषः' इति चोपसंहरति ॥**

**भाष्यार्थ**—'पण आतां–विद्यावस्थेंत हा मुक्त होतो, हें कसें बरें अवगत होतें?' अशी वादी शंका विचारील म्हणून सूत्रकार 'प्रतिज्ञानात्' असें म्हणतात. [–प्रतिज्ञानच प्रकट करितात–]='तथाहि०'–प्रतिज्ञान कसें आहे तें पहा–प्रजापति–"पण या आत्म्याचेंच मी तुला पुनरपि अनुव्याख्यान करून सांगेन"

–छां.८.९.३;८.१०.४;८.११.३.–अशी अवस्थात्रयदोषशून्य आत्म्याची व्याख्ये-यत्वानें प्रतिज्ञा करून आणि " अशरीरच–शरीराभिमानशून्यच असलेल्या या आत्म्याला प्रिय व अप्रिय स्पर्श करीत नाहींत "–छां. ८. १२. १.–असा उप-न्यास करून " स्वरूपानें–आपल्या स्वाभाविक रूपानें अभिनिष्पन्न होतो, तो उत्तम पुरुष आहे "–छां. ८. ३. ४.–असा उपसंहार करितो. [–प्रकृतोपयोगी प्रतिज्ञान्तर ' **तथा०** ' इत्यादि भाष्यानें सांगतात–]

**भाष्यं—तथाख्यायिकोपक्रमेऽपि 'य आत्माऽपहतपाप्मा' इत्यादि मुक्तात्म-विषयमेव प्रतिज्ञानम् । फलत्वप्रसिद्धिरपि मोक्षस्य बंधनिवृत्तिमात्रापेक्षा । नापूर्वोपजननापेक्षा । यदप्यभिनिष्पद्यत इत्युत्पत्तिपर्यायत्वं तदपि पूर्वावस्थापेक्षं । यथा रोगनिवृत्तावरोगोऽभिनिष्पद्यत इति तद्वत् । तस्माददोषः ॥२॥**

**भाष्यार्थ**—त्याचप्रमाणें आख्यायिकेच्या उपक्रमामध्येंहि ' जो आत्मा अपहत-पाप्मा० '–छां. ८. ७. १.–इत्यादि मुक्त आत्मविषयच प्रतिज्ञान आहे. [–वाद्यानें फलत्वामुळें मुक्तीला आगंतुकत्व सांगितलें आहे, त्याविषयीं सिद्धान्ती ' **फलत्व०** ' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=मोक्षाची फलत्वप्रसिद्धिहि केवल बंधनिवृत्तीच्याच अपे-क्षेनें आहे, अपूर्व उपजननाच्या अपेक्षेनें नाहीं. [बंधाची निवृत्ति होणें,याच निमित्तानें मोक्षाला फल म्हणतात तो नवीनच उत्पन्न होतो, म्हणून नव्हे, असा भावार्थ. –आतां शब्दसामर्थ्यानें त्याचें आगंतुकत्व जें सांगितलें आहे त्याचा '**यदपि०**' इत्यादि भाष्यानें अनुवाद करून त्याला दूषित करितात–]='अभिनिष्पन्न होतो' असें वाद्यानें जें उत्पत्तिपर्यायत्व सांगितलें आहे, तेंहि पूर्व अवस्थेच्या अपेक्षेनें आहे. –'**यथा०**'–ज्याप्रमाणें रोगाची निवृत्ति झाली असतां 'हा अरोग–रोगरहित होतो' असें म्हणतात त्याप्रमाणें. [–याप्रमाणें हेतूला अन्यथासिद्धत्व आहे व शब्दाला औपचारिकत्व आहे असें झालें असतां मुक्तीचें अनागंतुकत्व युक्त आहे, असा उपसंहार–]=' **तस्मात्०** '–म्हणून 'मुक्ति नित्य आहे, ' या सिद्धान्तांत कांहीं दोष नाहीं. २. [–ज्योतीला उपसंपन्न झालेल्याचें मुक्तत्व असंभवनीय आहे, अशी आशंका घेऊन ' **आत्मा०** ' या सूत्रानें तिचा परिहार–]

## सूत्रं—आत्मा प्रकरणात् ॥३॥(१)

**सूत्रार्थ**—येथील आत्माच ज्योति आहे. कारण 'य आत्मा०' इत्यादि प्रक-रण आत्म्याचें आहे. ३.(१)–सु.ब्र. ४९२. [–' **कथं०** ' इत्यादि भाष्यानें सूत्रानें व्यावर्त्य असलेली शंका सांगतात–]

**भाष्यं**—**कथं पुनर्मुक्त इत्युच्यते यावता 'परं ज्योतिरुपसंपद्य' इति कार्य-गोचरमेवैनं श्रावयति । ज्योतिःशब्दस्य भौतिके ज्योतिषि रूढत्वात् । न चानतिवृत्तो विकारविषयात्कश्चिन्मुक्तो भवितुमर्हति । विकारस्यार्तत्वप्रसिद्धेरिति ॥**

**भाष्यार्थ**—अहोपण, 'तो मुक्त' असें कसें सांगितलें जातें ? कारण 'परंज्योतीला उपसंपन्न होऊन'–छां.८.३.४.मैत्रे.२.२.–ही श्रुति याला कार्यगोचरच–कार्यविषयच ऐकवितें. [–कार्यगोचरत्वाविषयीं हेतु–]=कारण'ज्योतिः' या शब्दाला भौतिक ज्योति या अर्थी रूढत्व आहे, अग्नि या अर्थी 'ज्योतिः' हा शब्द रूढ आहे. [–'ज्योतीला उपसंपन्न–प्राप्त होऊन स्वरूपानें अभिनिष्पन्न होतो' अशा पौर्वापर्यश्रुतीमुळें मुक्तीहून भिन्न ज्योतिःसंपत्ति आहे, अशी आशंका घेऊन 'त्याला उपसंपन्न होतो' असें सांगून 'स्वरूपानें अभिनिष्पत्ति होते' असें श्रवण नसल्यामुळें व तसा अध्याहार केल्यास 'ज्योतीला उपसंपन्न होऊन' हें कथन व्यर्थ होत असल्यामुळें व ज्योतीला भूतत्वानें कार्यत्व असल्यामुळें तिचा त्याग केलेला नसतांना मुक्ति कोठची ? असें शंकाकार 'न च०' इत्यादि भाष्यानें सांगतो–]=आणि विकार-विषयापासून अतिवृत्त न झालेला–त्याचें उल्लंघन न केलेला कोणीहि मुक्त होण्यास योग्य होत नाहीं. [–'विकारगोचर असलेल्या आत्म्यालाहि मुक्तत्व आहे,' अशी आशंका घेऊन वादी 'आतां जें अल्प असतें तें मर्त्य असतें'–७.२४.१.–इत्यादि श्रुतीच्या आधारानें '**विकारस्य०**' इत्यादि भाष्यानें समाधान सांगतो–] =कारण विकाराच्या आर्तत्वाची–विनाशित्वाची प्रसिद्धि आहे, '**इति**' असा आक्षेप येतो. [–'**नैष दोषः०**' इत्यादि भाष्यानें या आक्षेपाच्या उत्तरत्वानें सूत्राची योजना करितात–]

**भाष्यं**—**नैष दोषः । यत आत्मैवात्र ज्योतिःशब्देनावेद्यते प्रकरणात् । 'य आत्माऽपहतपाप्मा विजरो विमृत्युः' इति हि प्रकृते परस्मिन्नात्मनि नाकस्माद्भौतिकं ज्योतिः शक्यं ग्रहीतुम् । प्रकृतहानाप्रकृतप्रक्रियाप्रसंगात् । ज्योतिः-शब्दस्त्वात्मन्यपि दृश्यते 'तद्देवा ज्योतिषां ज्योतिः' इति । प्रपंचितं चैतत् 'ज्योतिर्दर्शनात्' इत्यत्र ॥ ३ ॥ ( १ )**

**भाष्यार्थ**—हा दोष येत नाहीं, कारण येथें–या वाक्यांत 'आत्माच' ज्योतिः-शब्दानें निवेदन केला जातो. '**प्रकरणात्**'–कारण हें आत्म्याचें प्रकरण आहे. [–'**य आत्मा०**'–इत्यादि वाक्यानें प्रकरणच दाखवितात–]="जो आत्मा अपहतपाप्मा, विजर, विमृत्यु"–छां.८.७.१.–असा परमात्मा प्रकृत असतांना अकस्मात्–कांहीं कारणावांचून–प्रकरणाच्या विच्छेदावांचून भौतिक ज्योतीचें ग्रहण

करणें शक्य नाहीं. कारण तसें केल्यास प्रकृत आत्म्याचा त्याग व अप्रकृत अग्नीची प्रक्रिया–ग्रहण यांचा प्रसंग येतो. [–" अहोपण, प्रकरण जरी आत्म्याचें असलें तरी रूढीच्या अभावीं 'ज्योतिः' हा शब्द आत्मा या अर्थी कसा योजितां येईल? " 'ज्योतिःशब्दः' इत्यादि भाष्यानें उत्तर -]=पण 'ज्योतिः' हा शब्द "त्या आदित्यादि ज्योतींचीहि अमृत ज्योति, अशा ब्रह्माची देव 'आयुः' अशा भावनेनें उपासना करितात."–बृ.४.४.१६. सु.उ. ६९५–असा आत्मा या अर्थीहि योजिलेला दिसतो. [–येथें अपेक्षित असलेल्या पूर्वोक्त न्यायाची सूचना करणारे भाष्यकार पुनरुक्तीचा परिहार करितात–]='प्रपंचितं च०'–आणि 'ज्योतिर्दर्शनात्'–ब्र. भा. १.३.४० पृ. ६६६–'परं ज्योतिः'–येथील ज्योति परमात्मा आहे. कारण या वाक्यांत परमात्म्याचीच प्रतिपाद्यरूपानें अनुवृत्ति होत असल्याचें दिसतें, या सूत्रांत याचा सविस्तर विचार केला आहे. ३. (१)

( २. अविभागेन दृष्टत्वाधिकरण. सू. ४. )

—'स्वरूपांत अवस्थित झालेल्याहि विद्वानाला वैशेषिकादिकांप्रमाणें ब्रह्माहून अन्यत्व आहे,' अशी आशंका घेऊन 'अविभागेन०' इत्यादि सूत्रानें सांगतात–

**सूत्रं—अविभागेन दृष्टत्वात् ॥ ४ ॥ ( २ )**

**सूत्रार्थ**—तो विद्वान् अविभागानेंच–निरतिशय ब्रह्मात्मत्वानेंच अवस्थित होतो. कारण त्या अभेदालाच श्रुतींत दृष्टत्व आहे. ४ ( २ )–सु. ब्र. ४९३. [–'परं ज्योतिः'इत्यादि भाष्यानें विषयोक्तिपूर्वक वाद्यांच्या विप्रतिपत्तीमुळें संशय सांगतात–]

**भाष्यं—परं ज्योतिरुपसंपद्य स्वेन रूपेणाभिनिष्पद्यते यः स किं परस्मादात्मनः पृथगेव भवति। उताविभागेनैवावतिष्ठत इति वीक्षायां 'स तत्र पर्येति' इत्यधिकरणाधिकर्तव्यानिर्देशात् । 'ज्योतिरुपसंपद्य' इति च कर्तृकर्मनिर्देशाद्भेदेनैवावस्थानमिति यस्य मतिः, तं व्युत्पादयत्यविभक्त एव परेणात्मना मुक्तोऽवतिष्ठते । कुतः । दृष्टत्वात् ॥**

**भाष्यार्थ**—जो 'परं ज्योतीला उपसंपन्न होऊन स्वरूपानें अभिनिष्पन्न होतो' तो काय परमात्म्याहून पृथक्च असतो कीं अविभागानेंच–अभेदानेंच अवस्थित होतो? [–येथें मुक्ताचा ब्रह्माशीं अत्यंत अभेद सांगितलेला असल्यामुळें याची पादादिसंगति आहे. पूर्वपक्षांत 'जीवेश्वरांचें आत्यंतिक अन्यत्व' व सिद्धान्तांत 'त्यांचें आत्यंतिक अभिन्नत्व' स्वीकारून 'इति वीक्षायां०' इत्यादि भाष्यानें पूर्वपक्ष करितात–]=अशी वीक्षा–असा विचार करूं लागलें असतां 'तो तेथें परितः संचार करितो'–छां. ८. १२. ३.–असा अधिकरण व अधिकर्तव्य

यांचा निर्देश केलेला असल्यामुळें आणि ' ज्योतीला उपसंपन्न होऊन ' असा कर्तृ-कर्मनिर्देश असल्यामुळें त्याचें त्यांत भेदानेंच अवस्थान होतें. [–' **इति यस्य०** ' इत्यादि भाष्यानें सिद्धान्तसूत्राला अवतरण देऊन त्याचें व्याख्यान करितात–]=अशी ज्याची मति–समजूत असते त्याला उद्देशून ' मुक्त परमात्म्याशीं अविभक्तच अवस्थित होतो ' असें व्युत्पादन–उपपादन केलें जातें. कोणत्या कारणानें मुक्त अविभागानेंच अवस्थित होतो ? ' दृष्टत्वामुळें ' [–' **तथाहि०** ' इत्यादि भाष्यानें दृष्टत्वच स्पष्ट करितात–]

**भाष्यं—तथाहि ' तत्त्वमसि ' ' अहं ब्रह्मास्मि ' ' यत्र नान्यत्पश्यति ' ' न तु तद्द्वितीयमस्ति ततोऽन्यद्विभक्तं यत्पश्येत् ' इत्येवमादीनि वाक्यान्यविभागेनैव परमात्मानं दर्शयन्ति । यथादर्शनमेव च फलं युक्तं । तत्क्रतुन्यायात् ॥**

**भाष्यार्थ**—दृष्टत्व कसें आहे तें पहा–' तें सत् तूं आहेस ' ' मी ब्रह्म आहें ' ' ज्या विद्यावस्थेंत आत्मभिन्न कांहीं पहात नाहीं. '–छां. ७. २४. १.–" त्या द्रष्ट्याहून भिन्न असें दुसरें कांहीं नाहीं कीं जें तो पाहील. "–बृ. ४. ३. २३. –हीं व अशींच दुसरींहि वाक्यें अविभागानेंच परमात्म्याला दाखवितात. [–परमात्म्यामध्यें ऐक्यानें दृष्टत्व आहे, असें झालें असतां फलित सांगतात–]=' **यथादर्शनं एव०** '–आणि ' तत्क्रतु-'न्यायानें यथादर्शनच–चिंतनाप्रमाणेंच–संकल्पाप्रमाणेंच फल मिळणें युक्त आहे. [–फलावस्थेचें कथन करणाऱ्या वाक्यांमध्यें अविभागाला दृष्टत्व असल्यामुळेंहि–त्या वाक्यांत अभेद उपलब्ध होत असल्यामुळेंहि मुक्ताचें परमात्म्याहून आत्यंतिक ऐक्य आहे, असें सूत्राचें व्याख्यान्तर ' **यथोदकं०** ' इत्यादि वाक्यानें सांगतात–]

**भाष्यं—' यथोदकं शुद्धे शुद्धमासिक्तं तादृगेव भवति । एवं मुनेर्विजानत आत्मा भवति गौतम ' इति चैवमादीनि मुक्तस्वरूपनिरूपणपराणि वाक्यान्यविभागमेव दर्शयन्ति । नदीसमुद्रादिनिदर्शनानि च । भेदनिर्देशस्त्वभेदेऽप्युपचर्येते । 'स भगवः कस्मिन्प्रतिष्ठित' इति 'स्वे महिम्नि' इति । ' आत्मरतिरात्मक्रीडः ' इति चैवमादिदर्शनात् ॥ ४ ॥** ( २ )

**भाष्यार्थ**—आणि "ज्याप्रमाणें शुद्ध उदकांत टाकिलेलें शुद्ध उदक तसेंच–शुद्ध उदकच होतें, त्याप्रमाणें हे नचिकेता, विद्वान् मुनीचा आत्मा–पर आत्माच होतो" –का. ३. १. १५.– हीं अशा प्रकारचीं मुक्तस्वरूपनिरूपणपर वाक्यें अविभागच दाखवितात, आणि नदी-समुद्रादिदृष्टान्तहि–मुं. ३.२.८.–अविभागच दाखवितात. [–' तर मग भेदनिर्देशाची काय वाट ? ' ' **भेदनिर्देशस्तु०** ' इत्यादि भाष्यानें

उत्तर- ]=पण भेदनिर्देश अभेदामध्येंहि उपचारानें केला जातो. [–उपचार ही त्या निर्देशाची गति आहे, याविषयीं ' तसें अन्यत्र दृष्टत्व' हा हेतु '**स भगवः०** ' इत्यादि वाक्यानें सांगतात–]=" हे भगवन्, तो आत्मा कशामध्यें प्रतिष्ठित आहे ? "–छां. ७. २४. १.–असें, "स्वतःच्या स्वरूपभूत महिम्यांत" असें आणि 'आत्मरति आत्मक्रीड'–छां.७.२५.२.असें, इत्यादि दर्शन असल्यामुळें उपचार हीच भेदनिर्देशाची गति आहे. ४. [ सु. ब्र. ४९४. ] ( २ )

( ३. **ब्राह्माधिकरण. सू.** ५-७. )

—ब्रह्मात्मत्वाला प्राप्त झालेल्याहि विद्वानाच्या सप्रपंचत्वाविषयीं '**ब्राह्मेण०** ' इत्यादि सूत्रानें आक्षेप—

**सूत्रं—ब्राह्मेण जैमिनिरुपन्यासादिभ्यः ॥ ५**

**सूत्रार्थ**—सत्य सर्वज्ञत्वादिकानें युक्त होऊन तो अवस्थित होतो, असें जैमिनि-आचार्य मानितो. 'उपन्यासादिकांमुळें'–उपन्यास, विधि व व्यपदेश यांमुळें ५. –सु. ब्र. ४९५. [–' **स्थितमेतत्०** ' इत्यादि भाष्यानें गतार्थाचें संकीर्तन–]

**भाष्यं—स्थितमेतत् ' स्वेन रूपेण ' इत्यत्र आत्ममात्ररूपेणाभिनिष्पद्यते नागंतुकेनापररूपेणेति । अधुना तु तद्विशेषबुभुत्सायामभिधीयते स्वमस्य रूपं ब्राह्मं अपहतपाप्मत्वादिसत्यसंकल्पत्वावसानं तथा सर्वज्ञत्वं सर्वेश्वरत्वं च । तेन स्वरूपेणाभिनिष्पद्यत इति जैमिनिराचार्यो मन्यते । कुतः । उपन्यासादिभ्यस्तथात्वावगमात् ॥**

**भाष्यार्थ**—'स्वेन रूपेण'–स्व-रूपानें,–पृ.७८८–या वाक्यांत आत्ममात्ररूपानें अभिनिष्पन्न होतो, आगंतुक अपररूपानें अभिनिष्पन्न होत नाहीं, असें हें पूर्वाधिकरणांत सिद्ध झालें.[–'**अधुना०**' इत्यादि भाष्यानें अधिकरणाचा विषय व संशय दाखवितात–]=पण आतां त्याचा विशेष जाणण्याची इच्छा झाली असतां [–आणि ज्या ब्रह्मरूपानें मुक्ताचें अवस्थान होतें तें काय सप्रपंच आहे कीं निष्प्रपंचच किंवा तें सप्रपंच व निष्प्रपंच असें उभयरूप आहे, असा मतभेदामुळें संशय आला असतां मुक्तांना उपसृप्य–गमनीय–प्राप्य असलेल्या ब्रह्माच्या दृष्टिद्वयाचा आश्रय करून येथें उभयरूपत्व सांगितलेलें असल्यामुळें याच्या पादादिसंगति आहेत. पूर्वपक्षांत 'सप्रपंचत्वश्रुतींच्या किंवा निष्प्रपंचत्वश्रुतींच्या मुख्यार्थत्वाची सिद्धि' व सिद्धान्तांत 'द्विविध श्रुतींच्या दृष्टिद्वयाच्या आश्रयानें मुख्यार्थत्वाची उपपत्ति–त्यांच्या मुख्यार्थत्वाचा संभव ' असा फलभेद मानून '**अभिधीयते०**' इत्यादि भाष्यानें पूर्वपक्ष करितात–]=असा पूर्वपक्ष सांगितला जातो–याचें स्वं-रूप–स्वरूप ब्राह्म–ब्रह्मसंबंधी

–अपहतपाप्मत्वादि-सत्यसंकल्पत्वान्त, तसेंच सर्वज्ञत्व व सर्वेश्वरत्व; त्या स्वरूपानें मुक्त अभिनिष्पन्न होतो, असें जैमिनि-आचार्य मानितो. कोणत्या कारणानें? उपन्यासादिकांवरून त्याच्या तथात्वाचा–तसल्या स्वरूपत्वाचा अवगम होतो. [–'**तथाहि०**' इत्यादि भाष्यानें उपन्यासानें ब्रह्माच्या सप्रपंचत्वाच्या सिद्धीचें विवरण–]

**भाष्यं—तथाहि— 'य आत्माऽपहतपाप्मा' इत्यादिना 'सत्यकामः सत्यसंकल्पः' इत्येवमंतेनोपन्यासेन एवमात्मकतामात्मनो बोधयति। तथा 'स तत्र पर्येति जक्षत्क्रीडन्रममाणः' इत्यैश्वर्यरूपमावेदयति। 'तस्य सर्वेषु लोकेषु कामचारो भवति' इति च। 'सर्वज्ञः सर्वेश्वरः' इत्यादिव्यपदेशाश्चैवमुपपन्ना भविष्यन्तीति ॥ ५ ॥**

**भाष्यार्थ**—कसा तो पहा–"जो आत्मा अपहतपाप्मा–निष्पाप०"–पृ.७९३–येथून आरंभ करून "सत्यकाम, सत्यसंकल्प" येथपर्यंतच्या उपन्यासानें, श्रुति आत्म्याच्या अशा स्वरूपत्वाचा बोध करिते. [उपन्यास म्ह० उद्देश, व तो उद्देश म्ह० अन्यत्र ज्ञात झालेल्याचा अन्य विधानासाठीं अनुवाद.–'**तथा०**' इत्यादि भाष्यानें वादी आदिशब्दाचा अर्थ–विधि दाखवितो–]=त्याचप्रमाणें "तो तेथें हंसणारा, क्रीडा करणारा, रममाण होणारा"–छां.८.१२.३–असें त्याच्या ऐश्वर्यरूपाचें आवेदन–निवेदन करिते व "त्याचा सर्व लोकांमध्यें कामचार–यथेष्ट संचार होतो."–छां. ७. २५. २.–असें श्रुति आवेदन करिते. [अज्ञाताचें ज्ञान करून देणें हा विधि आहे.–'**सर्वज्ञः०**' इत्यादि भाष्यानें आदिशब्दानें सांगितलेला व्यपदेश सांगतात–]=आणि 'सर्वज्ञ, सर्वेश्वर' इत्यादि व्यपदेश–निर्देश उपपन्न होतील, असें जैमिनि-आचार्य मानितो. [विधेयान्तरराहित्यानें उद्देश्य नसलेल्याचें व अप्रतिपाद्यत्वानें अविधेय असलेल्याचें सिद्ध असल्याप्रमाणेंच कथन करणें हा व्यपदेश होय.] ५. [–'**चितितन्मात्रेण०**' इत्यादि सूत्रानें पूर्वपक्षान्तर सांगतात–]

### सूत्रं—चितितन्मात्रेण तदात्मकत्वादित्यौडुलोमिः ॥ ६

**सूत्रार्थ**—तदात्मकत्वामुळें–जीवात्म्याला चैतन्यात्मकत्व असल्यामुळें चैतन्यरूपानें अवस्थित असलेल्या मुक्त ब्रह्मामध्यें सर्वज्ञत्वादिशब्द निरर्थकच योजिले जातात, असें औडुलोमि-आचार्य मानितो. ६.–सु. ब्र. ४९९.–[–"उपन्यास, विधि व व्यपदेश यांनीं नानारसत्व प्रदर्शित केलें असतांना चिदेकरसत्व कसें?" अशी आशंका घेऊन '**यद्यपि०**' इत्यादि भाष्यानें वादी सांगतो–]

**भाष्यं—यद्यप्यपहतपाप्मत्वादयो भेदेनैव धर्मा निर्दिश्यन्ते। तथापि शब्दविकल्पजा एवैते। पाप्मादिनिवृत्तिमात्रं हि तत्र गम्यते। चैतन्यमेव स्वरूप-**

**त्मनः स्वरूपमिति तन्मात्रेण स्वरूपेणाभिनिष्पत्तिर्युक्ता । तथा च श्रुतिः–' एवं वा अरेऽयमात्मानंतरोऽबाह्यः कृत्स्नः प्रज्ञानघन एव ' इत्येवंजातीयका अनुगृहीता भविष्यति ॥**

**भाष्यार्थ**—यद्यपि अपहतपाप्मत्वादि धर्म भेदानेंच सांगितले जातात, त्यांचा भेदानेंच निर्देश केला जातो तथापि ते धर्म शब्दविकल्पजन्यच आहेत. [–"अहो-पण, त्यांना विकल्पमात्रत्व कसें ?" अशी आशंका घेऊन ' पाप्मादिकांना काल्पनिकत्व असल्यामुळें तन्निवृत्तिरूप अपहतपाप्मत्वादिकांचेंहि ' राहूचें शिर ' याप्रमाणें काल्पनिकत्वच उपपन्न होतें ' असें ' **पाप्मादिनिवृत्तिमात्रं०** ' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=कारण त्या निर्देशांत केवळ पाप्मादिनिवृत्तिच अवगत होते. [–" तर मग त्याचें वास्तव रूप काय आहे ? " ' **चैतस्यमेव०**' इत्यादि भाष्यानें उत्तर–]=पण केवळ चैतन्य हेंच आत्म्याचें स्वरूप आहे.त्यामुळें'तन्मात्रेण'–चैतन्यमात्रानें स्वरूपानें अभिनिष्पत्ति होणें युक्त आहे. [–'**तथा च०**'इत्यादि भाष्यानें त्याविषयीं प्रमाण–]=आणि असें असल्यामुळेंच "याप्रमाणेंच हे मैत्रेयि, हा आत्मा अनन्तर, अबाह्य, कृत्स्न, प्रज्ञानघनच आहे "–बृ. ४. ५. १३.–ही अशा जातीची श्रुति अनुगृहीत होईल. [–" पण सत्यकामत्वादि धर्मांची अपहतपाप्मत्वादिकांप्रमाणें व्यवस्था लावितां येणें शक्य नसल्यामुळें ब्रह्माला चैतन्यमात्रता कोठून असणार ?" अशी आशंका घेऊन ' **सत्यकामत्वादयस्तु०**' इत्यादि भाष्यानें उत्तर–]

**भाष्यं**—**सत्यकामत्वादयस्तु यद्यपि वस्तुस्वरूपेणैव धर्मा उच्यन्ते सत्याः कामा अस्येति । तथाप्युपाधिसंबंधाधीनत्वात्तेषां न चैतन्यवत्स्वरूपत्वसंभवः । अनेकाकारत्वप्रतिषेधात् । प्रतिषिद्धं हि ब्रह्मणोऽनेकाकारत्वं ' न स्थानतोऽपि परस्योभयलिंगम्' इत्यत्र ॥**

**भाष्यार्थ**—पण ' ज्याचे काम सत्य आहेत तो सत्यकाम ' अशा व्युत्पत्तीनें सत्यकामत्वादि धर्म यद्यपि वस्तुस्वरूपानेंच सांगितले जातात तथापि त्यांना उपाधिसंबंधाधीनत्व असल्यामुळें चैतन्याप्रमाणें त्यांच्या स्वरूपत्वाचा संभव नाहीं. [–" अहोपण, उपाधि हाहि त्याचाच भेद असल्यामुळें त्यांना वास्तवच धर्मत्व आहे " अशी आशंका घेऊन ' **अनेक०** ' इत्यादि म्हणतात–]=कारण ब्रह्माच्या -आत्म्याच्या अनेकाकारत्वाचा प्रतिषेध केलेला आहे. "परमात्म्याचें उपाधितःहि उभयलिंग नाहीं."–ब्र. भा. ३.२.११. पृ. १४०.–या सूत्रांत ब्रह्माच्या अनेकाकारत्वाचा प्रतिषेध केला आहे, हें प्रसिद्ध आहे. [–उपन्यासाप्रमाणेंच विधि व व्यपदेश यांची गति ' **अत एव च०** ' इत्यादि भाष्यानें सांगतात–]

**भाष्यं**—अतएव च जक्षणादिसंकीर्तनमपि दुःखाभावमात्राभिप्रायं स्तुत्यर्थं 'आत्मरतिः' इत्यादिवत्। न हि मुख्यान्येव रतिक्रीडामिथुनान्यात्मनि निमित्तानि शक्यन्ते वर्णयितुं द्वितीयविषयत्वात्तेषाम्। तस्मान्निरस्ताशेषप्रपंचेन प्रसन्नेनाव्यपदेश्येन बोधात्मनाऽभिनिष्पद्यत इत्यौडुलोमिराचार्यो मन्यते ॥ ६ ॥

**भाष्यार्थ**—आणि अनेकाकारत्वाचा निषेध केलेला असल्यामुळेंच हंसणें, क्रीडा करणें इत्यादि धर्मांचें संकीर्तनहि केवल दुःखाभाव सांगणें, याच अभिप्रायानें स्तुतीसाठीं आहे. 'आत्मरतिः०' इत्यादि संकीर्तनाप्रमाणें. [–पण दृष्टान्तांतीलहि 'आत्मरति' इत्यादि मुख्यच आहे, अशी आशंका घेऊन **'न हि०'** इत्यादि म्हणतात–]=कारण आत्म्यामध्यें रति, क्रीडा, मिथुन, हीं निमित्तें मुख्यच आहेत, असें वर्णन करितां येणें शक्य नाहीं. कारण त्यांना द्वितीयविषयत्व आहे, त्यांचा विषय स्वतःहून भिन्न–दुसरा असतो. [–याप्रमाणें उपन्यासादिकांना अन्यथासिद्धत्व आहे, असें झालें असतां श्रुतिसिद्ध अर्थाचा उपसंहार–]=**'तस्मात्०'** –म्हणून ज्यांतील निःशेष प्रपंचाचें निरसन केलें आहे, अशा प्रसन्न, अनिर्देश्य, बोधरूपानें तो अभिनिष्पन्न होतो, असें औडुलोमि-आचार्य मानितो. ६. [–**'एवं०'** इत्यादि सूत्रानें सिद्धान्त सांगतात–]

**सूत्रं--एवमप्युपन्यासात्पूर्वभावादविरोधं बादरायणः ॥ ७ ॥ (३)**

**सूत्रार्थ**--अशा पारमार्थिक चैतन्यमात्र स्वरूपाचा स्वीकार जरी केला तरी पूर्वोक्त उपन्यासादिकांवरून 'पूर्वभावामुळें'–पूर्वे ब्रह्मस्वरूपाच्या व्यावहारिक सर्वज्ञत्वादिकांचें अस्तित्व असल्यामुळें 'अविरोध' आहे–मुक्तात्म्या ब्रह्माच्या सप्रपंचत्व-निष्प्रपंचत्वाचा विरोध नाहीं, असें बादरायण आचार्य मानितात. ७(३) –सु. ब्र. ४९५–[–चिन्मात्र असलेल्याहि ब्रह्माच्या तत्त्वातत्त्वविभागामुळें द्विधात्वाची सिद्धि होते, अशा या सूत्रार्थाचें **'एवमपि०'** इत्यादि भाष्यानें विवरण–]

**भाष्यं**—एवमपि पारमार्थिकचैतन्यमात्रस्वरूपाभ्युपगमेऽपि व्यवहारापेक्षया पूर्वस्यापि उपन्यासादिभ्योऽवगतस्य ब्राह्मस्यैश्वर्यरूपस्य अप्रत्याख्यानादविरोधं बादरायण आचार्यो मन्यते ॥ ७ ॥ ( ३ )

**भाष्यार्थ**--'एवं अपि'–पारमार्थिक चैतन्यमात्र स्वरूपाचा अभ्युपगम–स्वीकार जरी केला तरी व्यवहाराच्या अपेक्षेनें उपन्यासादिकांवरून अवगत झालेल्या पूर्वीच्याहि ब्रह्माच्या ऐश्वर्यरूपाचें प्रत्याख्यान होत नसल्यामुळें बादरायण-आचार्य अविरोध मानितात. ७.–सु. ब्र. ४९६-९७. ( ३ )

( ४. संकल्पाधिकरण. सू. ८-९. )

—या पूर्वीच्या तीन अधिकरणांत परविद्येचें फल सांगून आतां अपरविद्येच्या फलाचा विस्तार करण्यास ' संकल्पादेव० ' इत्यादि सूत्रानें आरंभ करितात—

**सूत्रं—संकल्पादेव तु तच्छ्रुतेः ॥ ८**

**सूत्रार्थ**—पण केवल संकल्पानेंच या विद्वानाला पित्रादिविभूतीची प्राप्ति होते. कारण ' संकल्पादेव०' इत्यादि तसें सांगणारी श्रुति आहे. ८—सु.ब्र.४९८. [—विषय सांगण्यासाठीं 'हार्दविद्यायां०' इत्यादि भाष्यानें वाक्य उदाहृत करितात—]

**भाष्यं—हार्दविद्यायां श्रूयते— ' स यदि पितृलोककामो भवति संकल्पादेवास्य पितरः समुत्तिष्ठन्ति ' इत्यादि । तत्र संशयः— किं संकल्प एव केवलः पित्रादिसमुत्थाने हेतुरुत निमित्तान्तरसहित इति । तत्र सत्यपि संकल्पादेवेति श्रवणे लोकवन्निमित्तान्तरापेक्षता युक्ता ॥**

**भाष्यार्थ**—हार्दविद्येमध्यें "तो जर पितृलोककाम—पितृलोकाची इच्छा करणारा झाला तर याच्या नुस्त्या संकल्पामुळेंच याचे पितर याच्याशीं संबद्ध होतात" —छां. ८.२.१.—इत्यादि श्रुत आहे. [—' एव-'काराला अयोग-अन्ययोगव्यवच्छेद-साधारणत्व असल्यामुळें म्ह० तो त्या दोन्ही व्यवच्छेदांना साधारण असल्यामुळें संकल्पाला विषय करून—त्याविषयीं संदेह सांगतात—]=त्याविषयीं ' केवल संकल्पच त्याच्या पित्रादिकांच्या समुत्थानाचा हेतु आहे कीं दुसऱ्या कांहीं निमित्तासह तो त्याचा हेतु आहे ' असा संशय येतो. [—या अधिकरणांत ब्रह्मभूत सगुणब्रह्मज्ञाच्या विभूतिनिर्माणाच्या साधनाचें निरूपण केलेलें असल्यामुळें याची पादादिसंगति आहे. पूर्वपक्षांत ' लोकवृत्तानुसारी आचरण ' व सिद्धान्तांत ' श्रुतिवृत्तानुसारी आचरण ' अशा आशयानें ' अवधारणश्रुतीवरून संकल्पाचें निरपेक्षत्व सिद्ध होत असल्यामुळें पूर्वपक्षाचें उत्थानच होत नाहीं,' अशी आशंका घेऊन 'तत्र०' इत्यादि भाष्यानें म्हणतात—] =त्या श्रुतींत ' संकल्पात् एव '—संकल्पापासूनच, असें श्रवण जरी असलें तरी लोकाप्रमाणें त्याला दुसऱ्या निमित्ताची अपेक्षता असणें युक्त आहे. [—' लोकवत् ' असें जें भाष्यांत म्हटलें आहे, त्याचें ' यथा लोके०' इत्यादि भाष्यानें विवरण—]

**भाष्यं—यथा लोकेऽस्मदादीनां संकल्पाद्गमनादिभ्यश्च हेतुभ्यः पित्रादिसंपत्तिर्भवत्येवं मुक्तस्यापि स्यात् । एवं दृष्टविपरीतं न कल्पितं भविष्यति ॥**

**भाष्यार्थ**—ज्याप्रमाणें व्यवहारांत आमच्या सारख्यांना संकल्पामुळें व गमनादि हेतूंमुळें पित्रादिकांची संपत्ति—प्राप्ति होते, [—' मुक्ताची पित्रादिभोगहेतुसंपत्ति

संकल्पाहून भिन्न यत्नादिकांची अपेक्षा करणारी आहे. कारण तिला भोगहेतुसंपत्तित्व आहे. आमच्या सारख्यांच्या भोगहेतुसंपत्तीप्रमाणें' असें अनुमान मानून वादी '**एवं०**' इत्यादि भाष्यानें दार्ष्टान्तिक सांगतो-]=त्याचप्रमाणें मुक्ताचीहि पित्रादिसंपत्ति संकल्प व गमनादि इतर हेतु, यांमुळें होईल. [-'**एवं दृष्ट०**' इत्यादि भाष्यानें अनुमानाचें फल सांगतो-]=कारण असें मानिल्यानें दृष्टविपरीत-अनुभवाच्या विरुद्ध कल्पना केली नाहीं, असें होईल. [-"अहोपण, लोकवृत्ताच्या अनुसार श्रुतीचें अर्थवत्त्व सिद्ध झालें असतां मग त्याच्या विपरीत कल्पना करणें योग्य नाहीं, हें म्हणणें बरोबर आहे. पण येथें लोकवृत्ताचें अनुसरण केल्यास अवधारणाला अर्थवत्त्वच नाहीं, असें होईल, 'एव-'कार व्यर्थ होईल" अशी आशंका घेऊन वादी '**संकल्पादेव०**' इत्यादि भाष्यानें म्हणतो-]

**भाष्यं—संकल्पादेवेति तु राज्ञ इव संकल्पितार्थसिद्धिकरीं साधनान्तरसामग्रीं सुलभामपेक्ष्योच्यते । न च संकल्पमात्रसमुत्थानाः पित्रादयो मनोरथविजृंभितवच्चंचलत्वात्पुष्कलं भोगं समर्पयितुं पर्याप्ताः स्युरिति ॥**

**भाष्यार्थ**—पण 'संकल्पापासूनच' असें जें म्हटलें आहे तेंहि राजाच्या संकल्पित अर्थाची सिद्धि करणारी दुसऱ्या साधनांची सामग्री जशी सुलभ असते तशाच याच्याहि सुलभ सामग्रीच्या अपेक्षेनें म्हटलें जातें. [-शिवाय पित्रादिकांना संकल्पमात्रजन्यत्व आहे, असें जर म्हटलें तर मनोरथानें निर्माण केलेल्या स्त्रीपुत्रादिकांप्रमाणें त्यांना अर्थक्रियासामर्थ्य-कार्यसामर्थ्य नसल्यामुळेंहि संकल्पातिरिक्त साधनांची अपेक्षा असते, असें म्हणणें उचित आहे, असें '**न च०**' इत्यादि भाष्यानें सांगतो-]=आणि 'केवल संकल्पापासूनच' ज्यांचें समुत्थान-उद्भव होतें असे पित्रादिक मनोरथानें कल्पिलेल्या स्त्री-पुत्रादि पदार्थांप्रमाणें चंचलत्वामुळें-ते चंचल-क्षणिक असल्यामुळें [-"अहोपण, मनोरथानें उत्पन्न केलेल्या भोग्यपदार्थांपासूनहि हर्षादिकार्य उपलब्ध होतें," अशी आशंका घेऊन 'त्यांचें ज्ञानमात्रसाध्य-केवल ज्ञानानें साध्य असलेलें हर्षादि कार्य जरी असलें तरी ज्ञेयवस्तूनें साध्य होणारें कार्य त्यांत नाहीं,' असें '**पुष्कलं०**' इत्यादि भाष्यानें वादी म्हणतो-]-पुष्कल भोग समर्पण करण्यास पुरेसे होत नाहींत, ते संकल्पमात्रानें झालेले पित्रादिक पूर्ण भोग देण्यास समर्थ नसतात, असा पूर्वपक्ष प्राप्त होतो. [-यत्नादिकांची ज्याला अपेक्षा आहे, अशा संकल्पालाच पित्रादिनिर्माण-हेतुत्व आहे, अशा या पूर्वपक्षाचा '**एवं०**' इत्यादि भाष्यानें अनुवाद करून सिद्धान्तसूत्राला अवतरण देऊन त्याचें व्याख्यान करितात—]

**भाष्यं—एवं प्राप्ते ब्रूमः—संकल्पादेव तु केवलात्पित्रादिसमुत्थानमिति। कुतः। तच्छ्रुतेः। 'संकल्पादेवास्य पितरः समुत्तिष्ठन्ति' इत्यादिका हि श्रुतिर्निमित्तान्तरापेक्षायां पीड्येत। निमित्तान्तरमपि तु यदि संकल्पानुविधाय्येव स्याद्भवतु। न तु प्रयत्नान्तरसंपाद्यं निमित्तान्तरमितीष्यते। प्राक्तत्संपत्तेः वंध्यसंकल्पत्वप्रसंगात्॥**

**भाष्यार्थ**—असा पूर्वपक्ष प्राप्त झाला असतां 'केवल संकल्पापासूनच पित्रादिकांचें समुत्थान होतें' असें आम्ही सांगतों. [—"अहोपण, संकल्पाला यत्नसापेक्षत्व असतें अशाविषयीं अनुमान सांगितलेलें असल्यामुळें केवल संकल्पाला पित्रादिकांच्या उद्भवाचें हेतुत्व नाहीं" अशी शंका—]=कोणत्या कारणानें? [श्रुति-विरुद्धत्वामुळें अनुमानाला कालात्ययापदिष्टत्व—बाधितत्व आहे असें सांगतात—]='**तच्छ्रुतेः०**'—कारण तशी श्रुति आहे. 'संकल्पापासूनच याचे पितर उत्थान पावतात'—पृ.८००—इत्यादि श्रुति संकल्पाला निमित्तान्तराची अपेक्षा आहे, असें म्हटल्यास बाधित होईल. [—"शिवाय निमित्तान्तरहि संकल्पाधीन आहे कीं यत्नान्तरसाध्य आहे" असा विकल्प करून त्यांतील पहिल्या पक्षाचा स्वीकार करून दुसऱ्या पक्षाला दूषित करितात—]='**निमित्ता०**'—पण तें निमित्तान्तरहि जर संकल्पाच्या अधीनच असेल तर तें असूं दे. पण दुसऱ्या प्रयत्नानें संपाद्य असें त्याचें दुसरें निमित्त असतें, असें मानिलें जात नाहीं, तें इष्ट नाहीं. [कारण यत्नादिकांची ज्याला अपेक्षा आहे, अशा निमितान्तराची उत्पत्ति संकल्पाच्या अपेक्षेनें विलंबानें—उशीरानें होणारी असल्यामुळें त्या निमित्तान्तराच्या उत्पत्तीच्या पूर्वी विद्वानाला मोघसंकल्पत्व आहे, त्याचा संकल्प व्यर्थ—निष्फल आहे, असें होईल. त्यामुळें विकल्पांतील दुसरा पक्ष अयोग्य आहे, असें सांगतात—]='**प्राक्तत्०**'—कारण त्या निमित्तान्तराच्या संपत्तीच्या—प्राप्तीच्या पूर्वी विद्वानाच्या संकल्पाला वंध्यसंकल्पत्व आहे, असें होतें—त्याचा संकल्प व्यर्थ आहे, असें म्हणण्याचा प्रसंग येतो, वंध्यसंकल्पत्वप्रसंग येतो. [—आतां 'लोकाप्रमाणें संकल्पाला निमित्तान्तराची अपेक्षा असते' असें जें वाद्यानें वर म्हटलें आहे, त्याविषयीं '**न च०**' इत्यादि भाष्यानें म्हणतात—]

**भाष्यं—न च श्रुत्यवगम्येऽर्थे लोकवदिति सामान्यतो दृष्टं क्रमते। संकल्पबलादेव चैषां यावत्प्रयोजनं स्थैर्योपपत्तिः। प्राकृतसंकल्पविलक्षणत्वान्मुक्तसंकल्पस्य॥८॥**

**भाष्यार्थ**—आणि श्रुतीनेंच अवगम्य–ज्ञात होण्यास योग्य असलेल्या अर्थी 'लोकवत्' असें सामान्यतोदृष्ट अनुमान प्रवृत्त होऊं शकत नाहीं. [–तसेंच, 'मनोरथनिर्मित पदार्थांप्रमाणें संकल्पापासून उत्पन्न झालेल्या पित्रादिकांना अति-चंचलत्वामुळें भोगसाधनत्व नाहीं' असें जें वर म्हटलें आहे, त्याविषयीं आचार्य म्हणतात–] आणि संकल्पबलामुळेंच यांचें यावत्प्रयोजन–संकल्पकर्त्याचें कार्य निष्पन्न होईपर्यंत स्थैर्य उपपन्न होतें. [–"पण आमच्या सारख्यांच्या संकल्पा-मध्यें प्रतीत न होणारें स्थैर्य मुक्ताच्या संकल्पामध्यें कसें संभवेल?" '**प्राकृत०**' इत्यादि भाष्यानें उत्तर–]=कारण मुक्ताच्या संकल्पाला प्राकृतांच्या संकल्पाहून विलक्षणत्व असतें–मुक्तांचा संकल्प प्राकृत पुरुषांच्या संकल्पाहून विलक्षण असतो, त्यामुळें त्यांचें स्थैर्य संभवतें. ८. [–'**अत एव०**' इत्यादि सूत्रानें विद्वानाच्या सत्यसंकल्पामध्यें लाभान्तर सांगतात–]

## सूत्रं—अत एव चानन्याधिपतिः॥९॥(४)

**सूत्रार्थ**—विद्वान् सत्यसंकल्प असल्यामुळेंच तो 'अनन्याधिपति'–ज्याचा दुसरा कोणी अधिपति नाहीं, असा असतो. ९ (४)–सु.ब्र. ४९८–[–"उपा-सकाचा भोग ईश्वराधीन असतो, तो केवळ संकल्पापासूनच होऊं शकत नाहीं" अशी आशंका घेऊन '**अत एव०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]

**भाष्यं—अत एव च अवंध्यसंकल्पत्वादनन्याधिपतिर्विद्वान्भवति नास्या-न्योऽधिपतिर्भवतीत्यर्थः । न हि प्राकृतोऽपि संकल्पयन्नन्यस्वामिकत्वमात्मनः सत्यां गतौ संकल्पयति । श्रुतिश्चैतद्दर्शयति—'अथ य इहात्मानमनुविद्य व्रज-न्त्येतांश्च सत्यान्कामांस्तेषां सर्वेषु लोकेषु कामचारो भवति' इति ॥९॥ (४)**

**भाष्यार्थ**—'अत एव च' म्हणूनच–अवंध्यसंकल्पत्व–सत्यसंकल्पत्व अस-ल्यामुळेंच विद्वान् 'अनन्याधिपति' असतो. त्याचा दुसरा अधिपति नसतो, असा भावार्थ. [–"अहोपण, विद्वानाला सत्यसंकल्पत्व जरी असलें तरी त्याचें ईश्वराधीनत्व कसें मानिलें जात नाहीं?" **न हि०**' इत्यादि भाष्यानें उत्तर–]=कारण संकल्प कर-णारा प्राकृतहि आपलें अन्यस्वामिकत्व–आपला स्वामी दुसरा कोणी असावा, असें इच्छीत नाहीं. [–"अहोपण, ईश्वराच्या प्रसादामुळें मला भोग मिळावा, अशी इच्छा करणारे लोक दिसतात!" '**सत्यां गतौ०**' इत्यादि भाष्यानें उत्तर–]=अन्य गति असतांना कोणीहि संकल्पकर्ता तसा संकल्प करीत नाहीं. [–विद्वानाचें अनन्याधीन ऐश्वर्य आहे, याविषयीं प्रमाण–]='**श्रुतिश्च०**'–आणि श्रुति "पण जे येथें आत्म्याला

व या सत्य कामांना जाणून शरीर सोडून जातात त्यांचा सर्व लोकांमध्यें कामचार –यथेष्ट संचार होतो"–छां. ८.१.६.सु.उ.४६९–असें हें दाखविते. ९ (४)

( ५. अभावाधिकरण. सू. १०-१४ )

—ब्रह्मीभूत विद्वानाच्या सप्रपंचत्व-निष्प्रपंचत्वांचीच क्रमानें व्यावहारिक-तात्त्विकत्वांनीं व्यवस्था सांगून संकल्पातिरिक्त साधनांचा भाव व अभाव यांचा एका उपाधींत सामान्यतः विरोध असल्यामुळें लोकसिद्ध पद-पदार्थांची अपेक्षा करणाऱ्या श्रुतीचा लौकिक अनुमानानें बाध होतो, असा पूर्वपक्ष करून केवळ पद-पदार्थज्ञानासाठीं श्रुतीला लोकसिद्ध पद-पदार्थांची अपेक्षा जरी असली तरी वाक्यार्थज्ञानामध्यें तिची अपेक्षा नसल्यामुळें, 'विमत–भोग यत्नादिकांची अपेक्षा न करणाऱ्या संकल्पापासूनच उत्पन्न होणारा आहे, योगजन्यसामर्थ्यदृष्टत्वामुळें, अगस्त्यानें केलेल्या समुद्रपानाप्रमाणें' या अनुमानानें अनुगृहीत श्रुतीनें बाधाचें अनुमान बाधित होत असल्यामुळें संकल्पमात्रसिद्धीनें विद्वानाच्या भोगहेतूंची सिद्धि होते, असें सांगितलें. आतां 'एव' अशा अवधारणामुळें अन्ययोगव्यवच्छेदानें केवळ संकल्पालाच पित्रादिसाधनत्व जसें आहे, त्याचप्रमाणें येथेंहि 'मनसा' या विशेषणाला अन्ययोगव्यवच्छेदकत्वानें अवधारणार्थत्व असल्यामुळें विद्वानाच्या देहादिकांचा अभाव आहे, असा 'अभावं०' इत्यादि सूत्रानें पूर्वपक्ष–

**सूत्रं—अभावं बादरिराह ह्येवम् ॥१०**

**सूत्रार्थ**—बादरि-आचार्य विद्वानाच्या शरीरेंद्रियांचा अभाव मानितो. कारण 'मनसा०' इत्यादि श्रुति त्यांचा अभाव सांगते. १०–सु. ब्र. ५००. [–"तर मग विद्वानाच्या मनाच्या अस्तित्वाचाहि विचार कां बरें केला जात नाहीं?" '**संकल्पादेव०**' इत्यादि भाष्यानें उत्तर–]

**भाष्यं—'संकल्पादेवास्य पितरः समुत्तिष्ठन्ति' इत्यतः श्रुतेर्मनस्त्वावत्संकल्पसाधनं सिद्धम् । शरीरेंद्रियाणि पुनः प्राप्तैश्वर्यस्य विदुषः सन्ति न वा सन्तीति समीक्ष्यते ॥**

**भाष्यार्थ**—"संकल्पापासूनच याचे पितर समुत्थान पावतात."–पृ. ८०० –या अशा श्रुतीवरून संकल्पाचें साधन मन पूर्वींच सिद्ध झालें आहे. [–शरीरेंद्रियें हा या अधिकरणाचा विषय आहे. तीं विद्यावान् मुक्ताचीं आहेत कीं नाहींत, तशींच तीं आहेत व नाहींतहि, असा वाद्यांचा मतभेद असल्यामुळें '**शरीरेन्द्रियाणि०**' इत्यादि भाष्यानें संशय सांगतात–]=परंतु ऐश्वर्याला प्राप्त झालेल्या विद्वानाचीं शरीरेंद्रियें आहेत कीं नाहींत, याचें समीक्षण–आलोचन केलें जातें.

[-या अधिकरणांत सगुणब्रह्मवेत्याच्या संकल्पापासूनच देहादिकांचा भाव व अभाव यांच्या कथनानें ब्रह्मज्ञानफलभूत विभूतीचें कथन केलेलें असल्यामुळें याची पादादिसंगति आहे. पूर्वपक्षांत ' विशेषणश्रुतीच्या किंवा अनेकधाभावश्रुतीच्या मुख्यार्थत्वाची असिद्धि ' व सिद्धान्तांत ' विद्वानाच्या सत्यसंकल्पत्वामुळेंच त्या दोन्ही श्रुतींच्या मुख्यार्थत्वाची उपपत्ति ' असा फलभेद स्वीकारून 'तत्र०'इत्यादि भाष्यानें पूर्वपक्षसूत्राची योजना करितात-]

**भाष्यं —तत्र बादरिस्तावदाचार्यः शरीरस्येंद्रियाणां चाभावं महीयमानस्य विदुषो मन्यते । कस्मात् । एवं ह्याहाम्नायः 'मनसैतान्कामान्पश्यन्रमते' 'य एते ब्रह्मलोके' इति । यदि मनसा शरीरेंद्रियैश्च विहरेन्मनसेति विशेषणं न स्यात् । तस्मादभावः शरीरेंद्रियाणां मोक्षे ॥१०॥**

**भाष्यार्थ**—असा संशय आला असतां प्रथम बादरि-आचार्य महत्त्वास प्राप्त केल्या जाणाऱ्या विद्वानाच्या शरीराचा व इंद्रियांचा अभाव मानितो. [-"पण वाद्यांचा मतभेद असल्यामुळें अभावनियमाची असिद्धि होते " अशी शंका-]= कोणत्या कारणानें? [-विशेषणश्रुतीनें तिचा परिहार-]='एवं०'-कारण आम्नाय -वेद " मनानें या कामास पहाणारा असा होत्साता तो रममाण होतो "-छां. ८. १२. ५.-" जे हे काम ब्रह्मलोकांत आहेत "-छां. ८. १३. १-असें हेंच सांगतो. [-"अहोपण, पक्षान्तरींहि विशेषण अयोगव्यवच्छेदकत्वानें उपपन्न होतें" अशी आशंका घेऊन बादरि-आचार्य म्हणतो-]='यदि०'-कारण जर तो विद्वान् मनानें व शरीरेंद्रियांनीं विहार करीत असता तर ' मनसा ' असें हें विशेषण वेदानें योजिलें नसतें. [ अन्ययोगव्यवच्छेदासाठीं ' मनसा '-मनानें, हें विशेषण असल्यामुळें ' डाव्या डोळयानें पाहतो ' याप्रमाणें इतरव्यावृत्ति अवगत होते. पण अयोगव्यवच्छेदपक्षीं विशेषण तसें अर्थवत् होत नाहीं, असा भावार्थ. -'तस्मात्०' इत्यादि भाष्यानें विशेषणाच्या फलाचा उपसंहार करितात-]=म्हणून मोक्षांत शरीरेंद्रियांचा अभाव आहे. १०. [-'भावं०' इत्यादि सूत्रानें पक्षान्तर-]

## सूत्रं—भावं जैमिनिर्विकल्पामननात् ॥११

**सूत्रार्थ**—जैमिनि-आचार्य मनाप्रमाणेंच शरीरादिकांचा भाव-अस्तित्व मानितो. कारण ' तो एकधा होतो, बहुधा होतो ' अशा विकल्पाचें आमनन-कथन केलें आहे. शरीरभेदावांचून असा बहुभाव संभवत नाहीं. ११.-सु.ब्र.५००. [-'जैमिनिस्तु० ' इत्यादि भाष्यानें सूत्राक्षरांची योजना करितात-]

**भाष्यं**—जैमिनिस्त्वाचार्यो मनोवच्छरीरस्यापि सेंद्रियस्य भावं मुक्तं प्रति मन्यते। यतः 'स एकधा भवति त्रिधा भवति' इत्यादिनाऽनेकधाभावविकल्पमामनन्ति। न ह्यनेकविधता विना शरीरभेदेनांजसी स्यात्। यद्यपि निर्गुणायां भूमविद्यायां अयमनेकधाभावविकल्पः पठ्यते। तथापि विद्यमानमेवेदं सगुणावस्थायामैश्वर्यं भूमविद्यास्तुतये संकीर्त्यत इत्यतः सगुणविद्याफलभावेनोपतिष्ठत इति ॥ ११ ॥ उच्यते—

**भाष्यार्थ**—पण जैमिनि-आचार्य मुक्ताप्रत–मुक्ताच्या मनाप्रमाणेंच इंद्रियांसह शरीराचाहि भाव–अस्तित्व मानितो. कारण "तो एकधा–एकप्रकारचा होतो, बहुप्रकारचा होतो."–छां. ७. २६. २.–इत्यादि वचनानें अनेकधाभावाच्या–अनेक प्रकारच्या विकल्पाचें आमनन करितात. [–"अहोपण, तें विकल्पकथन मनाच्या भेदामुळेंच कां असणार नाहीं?" 'न हि॰' इत्यादि भाष्यानें उत्तर–] =कारण शरीराच्या भेदावांचून साक्षात्–मुख्य अनेकविधता–अनेकप्रकारत्व उपपन्न होणार नाहीं. [–देहभेदाच्या अभावीं मनोभेद सांगतां येणें शक्य नसल्यामुळें मनोभेदकृत विकल्पकथन नाहीं, असा भावार्थ.–"अहोपण, या अनेकधाभावाचा पाठ निर्गुणविद्याप्रकरणांत असल्यामुळें विकल्पामनन ही स्तुतिच आहे," अशी आशंका घेऊन जैमिनि-आचार्य म्हणतो–]=' यद्यपि॰ '–जरी निर्गुणभूमविद्येमध्यें हा अनेकधाभावविकल्प पठित आहे, तथापि सगुणविद्यावस्थेंत विद्यमान असलेलेंच हें ऐश्वर्य भूमविद्येच्या स्तुतीसाठीं त्या विद्येंत सांगितलें जातें –त्याचें संकीर्तन केलें जातें. त्यामुळें तें सगुणविद्येच्या फलभावानें उपस्थित होतें, 'इति'–असा दुसरा पक्ष प्राप्त होतो. [–प्रियादिभोगहीन देहांत निर्गुणज्ञानामध्यें स्तुतित्वानें अनेकधाभावाचा अन्वय जरी होत असला तरी विशिष्टभोगसंसर्गास योग्य असलेल्या दहरादि-उपासनेंत त्याचा फलत्वानें अन्वय होतो, असा भावार्थ. 'मनसा'–मनानें, हें अन्ययोगव्यावर्तक विशेषण देहादिकांचा व्यवच्छेद करितें, असें म्हणणें युक्त नाहीं. कारण 'चैत्र धनुर्धर आहे' याप्रमाणें अयोगव्यवच्छेदानेंहि त्याचा संभव आहे, असा भावार्थ.] ११. [–सिद्धान्ताला प्रवृत्त करितात–] =' उच्यते '–' द्वादशाहवत् '–या सूत्रानें सिद्धान्त सांगितला जातो—

## सूत्रं—द्वादशाहवदुभयविधं बादरायणोऽतः ॥ १२

**सूत्रार्थ**—' अतः '–' मनसा ' असें विशेषण व अनेकधाभावविकल्पाचें कथन, असें लिंगद्वय असल्यामुळें बादरायण-आचार्य– जेव्हां शरीरादिकांचा संकल्प करितो तेव्हां शरीरेंद्रियवत्त्व व जेव्हां त्यांचा संकल्प करीत नाहीं तेव्हां

त्याचा अभाव, असें विद्वानाचें उभयविध–दोन्ही प्रकारचें ऐश्वर्य मानितो. 'द्वाद-शाहाप्रमाणें '–द्वादशाहक्रतूला सत्रत्व व अहीनत्व असें उभयविधत्व जसें आहे त्याप्रमाणें १२.–सु. ब्र. ५००.–[–' बादरायणः० ' इत्यादि भाष्यानें सूत्राचें व्याख्यान करितात—]

**भाष्यं**—**बादरायणः पुनराचार्योऽत एवोभयलिंगश्रुतिदर्शनादुभयविधत्वं साधु मन्यते यदा सशरीरतां संकल्पयति तदा सशरीरो भवति । यदा त्वश-रीरतां तदाऽशरीर इति । सत्यसंकल्पत्वात् । संकल्पवैचित्र्याच्च । द्वादशाह-वत् । यथा द्वादशाहः सत्रं अहीनश्च भवति । उभयलिंगश्रुतिदर्शनात् । एवमि-दमपीति ॥ १२ ॥**

**भाष्यार्थ**—पण बादरायण-आचार्य 'अत एव'–म्हणूनच [–' मनसा ' या विशेषणाच्या सामर्थ्यामुळें व ' एकधा भवति त्रिधा भवति '–पृ. ८०६–इत्यादि विकल्पामननसामर्थ्यामुळें असा सूत्रांतील ' अतः ' या शब्दाचा अर्थ ' उभय-लिंग० ' इत्यादि भाष्यानें विशद करितात–]=उभयलिंगश्रुतिदर्शनामुळें उभय-विधित्व साधु–निर्दोष मानितो. [–" अहोपण, एकाचेंच सशरीरत्व व अशरीरत्व विरुद्ध आहे" अशी आशंका घेऊन कालभेदामुळें अविरोध दाखवितात–]='**यदा०**' –जेव्हां सशरीरतेचा संकल्प करितो तेव्हां सशरीर होतो, पण जेव्हां अशरीरतेचा संकल्प करितो तेव्हां अशरीर होतो, ' इति '–असें उभयाविधत्व साधु आहे. [–विद्वानाच्या संकल्पानुसार कार्य होतें, याविषयीं हेतु–]=' **सत्यसंकल्पत्वात्** ' –सत्यसंकल्पत्वामुळें, विद्वानाला सत्यसंकल्पत्व असल्यामुळें त्याच्या संकल्पाप्रमाणें कार्य होतें. [–कार्यवैचित्र्याविषयीं हेतु–]='**संकल्पवैचित्र्याच्च**'–आणि संकल्पाच्या वैचित्र्यामुळें कार्याचें वैचित्र्य होतें. [–" धनुर्धरत्वादिविशेषण पाक्षिकप्राप्त विशेष-पदाच्या योगाचें व्यवच्छेदक होणें युक्त आहे. कारण चैत्र सर्वदा धनुष्य धारण करणारा असा होऊनच रहात नाहीं, हें प्रसिद्ध आहे. पण ' मनसा एतान् ' इत्यादि प्रकृत उदाहरणांत कामभोगांमध्यें मनाला नित्य-प्राप्तत्व असल्यामुळें त्याच्या अनुवादानें अन्ययोगनिवृत्त्यर्थत्व आहे " अशी आशंका घेऊन सूत्रोक्त दृष्टान्ताला अवतरण देऊन त्याचें व्याख्यान करितात–]=' **द्वादशाहवत्०** '–द्वादशाहाप्रमाणें, जसा द्वादशाह क्रतु सत्रहि आहे व अहीनहि आहे त्याप्रमाणें.[–त्याला बहुकर्तृक-त्वानें सत्रत्व व नियतकर्तृकत्वानें अहीनत्व आहे, याविषयीं हेतु–]='**उभयलिंग०**' –उभयलिंगश्रुतीच्या दर्शनामुळें त्याला उभयरूपत्व आहे. '**एवं०**'–तसेंच विद्वानाचें हेंहि उभयविधत्व आहे, '**इति**'–असें सिद्ध होतें. [ कारण द्वादशाह यजमानांच्या

बहुत्वामुळें व आसन-उपायनाच्या उपदेशामुळें सत्र आहे. 'जे असें जाणणारे सत्राचें उपायन–सत्रग्रहण करितात–सत्रासमीप जातात' अशी उपायनचोदना –समीपगमनविधि व 'कमींत कमी सतरा व अधिकांत अधिक चोवीस इतक्या पुरुषांनीं सत्रांत बसावें' अशी आसनचोदना, अशा या दोन्ही उपायन-आसनचोदना द्वादशाहाधिकारांत उपलब्ध होत असल्यामुळें आणि आसनचोदना व उपायनचोदना यांतील कोणत्याहि एका चोदनेला सत्राचें लक्षणत्व असल्यामुळें त्याला सत्रत्व आहे व 'द्वादशाहानें प्रजाकामाकडून याग करवावा' अशी 'यजति-' चोदना उपलब्ध होत असल्यामुळें, त्याच्या नियतकर्तृकत्वाचा बोध होत असल्यामुळें त्याला द्विरात्राप्रमाणें अहीनत्व आहे, असें अवगत होतें. या दृष्टान्ताप्रमाणें विद्वानाचें हें सशरीरत्व व अशरीरत्वहि द्विविधश्रुतिसिद्ध आहे. विचित्रसंकल्प हें त्याचें कारण आहे. त्यामुळें तें अविरुद्ध आहे, असा भावार्थ.–सु.ब्र.५००–]१२.
[–'विद्वानाचें देहादि-असत्त्व अयुक्त आहे. कारण त्याच्या देहादिकांचा अभाव आहे, असें म्हटल्यास त्याच्या भोगांचाहि अभाव होण्याचा प्रसंग येतो' अशी आशंका घेऊन 'तन्वभावे०' इत्यादि सूत्रानें म्हणतात–]

**सूत्रं—तन्वभावे संध्यवदुपपत्तेः ॥ १३**

**सूत्रार्थ**—इंद्रियांसह शरीराच्या अभावकालीं विद्वानाला 'संध्यवत्'–स्वप्नाप्रमाणें मानसिक विषयभोग प्राप्त होतो. कारण 'मनसा०' इत्यादि श्रुति आहे.१३.
[स्वप्नामध्यें देहाचा अभाव जरी असला तरी त्यांत संनिकर्षाची ज्ञानहेतुता मनःस्थितिमात्रहेतुत्वानें अन्यथासिद्ध असल्यामुळें व योग्याचें विद्यासामर्थ्यामुळेंच मनोवस्थान होत असल्यामुळें, असें मानून सूत्रांत 'संध्यवत्'–स्वप्नाप्रमाणें असें म्हटलें आहे.–'यदा०' इत्यादि भाष्यानें सूत्राक्षरांचें व्याख्यान–]

**भाष्यं—यदा तनोः सेंद्रियस्य शरीरस्याभावः। तदा यथा संध्ये स्थाने शरीरेंद्रियविषयेष्वविद्यमानेष्वपि उपलब्धिमात्रा एव पित्रादिकामा भवन्ति। एवं मोक्षेऽपि स्युः। एवं ह्येतदुपपद्यते ॥ १३ ॥**

**भाष्यार्थ**—जेव्हां 'तनोः'–तनूचा–इंद्रियांसह शरीराचा अभाव असतो तेव्हां 'संध्य-'स्थानामध्यें शरीर, इंद्रियें व विषय हीं विद्यमान नसतांहि केवल उपलब्धिमात्रच पित्रादिकाम असतात. [–विद्वानाच्या देहादिकांच्या अभावाविषयीं 'मनसा' या विशेषणाच्या उपपत्तीलाच हेतु करितात–]='एवं०'–त्याचप्रमाणेंमोक्षामध्येंहि विद्वानाच्या शरीरेंद्रियादिकांच्या अभावीं केवल अनुभवात्मक भोग होतील. 'एवं हि०'–कारण हें अशाप्रकारेंच उपपन्न होतें. १३. [–"तर मग त्यांच्या

देहादिकांचें ग्रहण व्यर्थ आहे" अशी आशंका घेऊन सूत्रकार 'भावे०' इत्यादि सूत्रानें तिचा परिहार करितात-]

**सूत्रं—भावे जाग्रद्वत् ॥ १४ ॥ (५)**

**सूत्रार्थ**—देहादिकांच्या भावसमयीं-त्यांचें जेव्हां अस्तित्व असतें तेव्हां जसा जाग्रद्भोग होतो तसाच त्यांना भोग होतो. १४ (५)–सु. ब्र. ५०१.–[–'पुष्कळ भोगसिद्धिसाठीं देहादिकांचें ग्रहण,' असें मानणारे आचार्य '**भावे पुनः०**' इत्यादि भाष्यानें सूत्राची योजना करितात–]

**भाष्यं—भावे पुनस्तनोर्यथा जागरिते विद्यमाना एव पित्रादिकामा भवन्ति। एवं मुक्तस्याप्युपपद्यते ॥ १४ ॥ (५)**

**भाष्यार्थ**—पण शरीराचा भाव-अस्तित्व असतांना, ज्याप्रमाणें जागरितांत विद्यमानच पित्रादिकाम असतात तसेंच मुक्ताचेंहि तें सर्व उपपन्न होतें-त्याचेहि पित्रादिभोग विद्यमानच असतात. [–सु. ब्र. ५०१.] १४. (५).

**( ६. प्रदीपाधिकरण. सू. १५-१६. )**

—"अहोपण, संकल्पाधीन असलेलें अनेक देहांचें निर्माण व्यर्थ आहे. कारण निरात्मक-आत्मशून्य देहभेदांमध्यें भोगाचा संभव नाहीं" अशी आशंका घेऊन सूत्रकार '**प्रदीपवत्०**' इत्यादि म्हणतात—

**सूत्रं—प्रदीपवदावेशस्तथा हि दर्शयति ॥ १५**

**सूत्रार्थ**—विद्वानानें संकल्पानें उत्पन्न केलेल्या त्या अनेक शरीरांमध्यें आत्म्याचा 'आवेश'–अभिव्यक्ति विद्यासामर्थ्यामुळें उपपन्न होते. 'प्रदीपाप्रमाणें'–ज्याप्रमाणें प्रदीप अनेक वातींमध्यें प्रवेश करितो त्याप्रमाणें विद्वान् अनेक अंतःकरणांच्या द्वारा त्या संकल्पोत्पादित देहांत प्रवेश करितो. कारण 'तो एकधा होतो, बहुधा होतो' इत्यादि श्रुति तसें दाखविते. १५.–सु. ब्र. ५०२.–[–'**भावं जैमिनिः०**' इत्यादि भाष्यानें गतार्थानुवादपूर्वक मुक्ताच्या उक्त सांकल्पिक शरीरांना विषय करून, दोन्ही प्रकारें उपलब्धि होत असल्यामुळें, संदेह सांगतात–]

**भाष्यं—'भावं जैमिनिर्विकल्पामननात्' इत्यत्र सशरीरत्वं मुक्तस्योक्तम्। तत्र त्रिधाभावादिष्वनेकशरीरसर्गे किं निरात्मकानि शरीराणि दारुयंत्रवत् सृज्यन्ते। किंवा सात्मकान्यस्मदादिशरीरवदिति भवति वीक्षा। तत्र चात्ममनसोः भेदानुपपत्तेरेकेन शरीरेण योगादितराणि शरीराणि निरात्मकानीति ॥**

**भाष्यार्थ**—'जैमिनि-आचार्य मुक्ताच्या देहाचा भाव मानितो, कारण श्रुतींत त्याच्या विकल्पाचें कथन केलें आहे'–ब्र. भा. ४. ४. ११. पृ. ८०५.–अशा या सूत्रांत

मुक्ताचें सशरीरत्व सांगितलें. त्या मुक्तामध्यें त्रिधाभावादिकांतील अनेकशरीरांच्या सृष्टींत काष्ठाच्या यंत्रांप्रमाणें–बाहुल्यांप्रमाणें निरात्मक–आत्मशून्य शरीरें उत्पन्न केलीं जातात कीं आमच्या-तुमच्या सारख्या जीवांच्या शरीरांप्रमाणें तीं सात्मक–आत्मयुक्त असतात, अशी 'वीक्षा'–विचार प्राप्त होतो. [–येथें अपरविद्याफलभूत मुक्ताच्या सांकल्पिक शरीरांमध्यें प्रवेशाचा प्रकार सांगितलेला असल्यामुळें याची पादादिसंगति आहे. पूर्वपक्षांत 'भोक्त्याला एकत्व असल्यामुळें एकाच शरीरांत भोगाची सिद्धि' व सिद्धान्तांत 'भोक्त्याला एकत्व असलें तरी स्वेच्छेनें त्याच्या अनेक शरीरांतील भोगाची उपपत्ति' असें मानून 'तत्र०' इत्यादि भाष्यानें पूर्वपक्ष करितात–]=आणि असा विचार प्राप्त झाला असतां 'आत्मा व मन यांच्या भेदाची अनुपपत्ति आहे, यास्तव त्यांचा एका शरीराशीं संबंध असल्यामुळें इतर शरीरें निरात्मक असतात,' असा पूर्वपक्ष प्राप्त होतो. [आत्म्याला विभुत्व जरी असलें तरी मनामध्येंच चैतन्याची अभिव्यक्ति होत असल्यामुळें तदवच्छेदक–त्याचा अवच्छेद करणाऱ्या एका देहांत स्थित असलेल्या त्याचा–आत्म्याचा देहान्तरांत प्रवेश संभवत नाहीं. तो दुसऱ्या अन्तःकरणाचें ग्रहण करितो, असें जरी मानिलें तरी अनादि अन्तःकरणानें अवच्छिन्न झालेल्या त्याचा पुनः आगंतुक अन्तःकरणानें अवच्छेद संभवत नाहीं, आणि तो जरी संभवतो असें म्हटलें तरी जीवभेदामुळें भोगाच्या अननुसंधानाचा प्रसंग येतो. यास्तव एका शरीराहून इतर शरीरें निरात्मक आहेत, असें प्राप्त झालें, असा भावार्थ. –'एवं०' इत्यादि भाष्यानें पूर्वपक्षाचा अनुवाद करून सूत्राला प्रवृत्त करितात–]

**भाष्यं—एवं प्राप्ते प्रतिपद्यते— प्रदीपवदावेश इति। यथा प्रदीप एकोऽनेकप्रदीपभावमापद्यते। विकारशक्तियोगात्। एवमेकोऽपि सन्विद्वानैश्वर्ययोगादनेकभावमापद्य सर्वाणि शरीराण्याविशति। कुतः। तथा हि दर्शयति शास्त्रमेकस्यानेकभावं–'स एकधा भवति त्रिधा भवति पंचधा सप्तधा नवधा' इत्यादि। नैतद्दारुयंत्रोपमाभ्युपगमेऽवकल्पते। नापि जीवान्तरावेशे। न च निरात्मकानां शरीराणां प्रवृत्तिः संभवति॥**

**भाष्यार्थ**—असा पूर्वपक्ष प्राप्त झाला असतां 'प्रदीपाप्रमाणें आवेश होतो' असा सिद्धान्त सांगतात. [–सूत्रोक्त दृष्टान्ताचें 'यथा०' इत्यादि भाष्यानें व्याख्यान–]=जसा एक प्रदीप विकारशक्तियोगामुळें अनेक प्रदीपभावास प्राप्त होतो [–दीपादिकांना भिन्नत्व जरी असलें तरी दीपत्वाच्या एकत्वाचा 'एकवर्तिवर्ती'–एका वातींत राहणाऱ्या अनेक दीपांमध्यें उपचार करून 'भिन्नवर्तिवर्ती'

-भिन्न वातींमध्यें राहणाऱ्या दीपांना भिन्नत्व आहे, असा दृष्टान्त सांगून आवेश-संज्ञक दार्ष्टान्तिक सांगतात-]=' एवं० '-या दृष्टान्ताप्रमाणें एकहि असलेला विद्वान् ऐश्वर्ययोगामुळें अनेकभावास प्राप्त होऊन सर्व शरीरांत प्रवेश करितो. कोणत्या कारणानें ? [-त्याविषयीं हेतुत्वानें अवशिष्ट सूत्रावयवाचें व्याख्यान करितात-]=' तथा हि दर्शयति० '-कारण तसें-' तो एकधा होतो, त्रिधा होतो पंचधा, सप्तधा, नवधा होतो '-छां. ७. २६. २.-इत्यादि शास्त्र एकाचा अनेक-भाव-अनेकत्व दाखवितें. [-"ज्याप्रमाणें काष्ठमय यंत्र चैतन्यशून्य जरी असलें तरी चेतनाच्या इच्छेचें अनुवर्तन करितें त्याप्रमाणें निर्माण केलेलीं शरीरें सेंद्रिय असतात, असें कोणत्या कारणानें मानिलें जात नाहीं ! त्यामुळें दुसऱ्या शरीरांना निरात्मकत्वच आहे " अशी आशंका घेऊन 'नैतत्०' इत्यादि भाष्यानें सांगतात-] =पण हें शास्त्रानें दाखविलेलें एकाचें अनेकत्व काष्ठयंत्राची उपमा स्वीकारल्यास उपपन्न होत नाहीं. [ कारण आपल्याहून भिन्न यंत्रें निर्माण करून त्यांच्याकडून क्रिया करविणाऱ्याहि यंत्रवाहकाचा नानात्वानें व्यपदेश-निर्देश होत नाहीं. पण विद्वानाचा तसा नानात्वानें व्यपदेश होतो. त्यामुळें तत्तद्देहोपाधि-अवच्छेद-त्या त्या देहोपाधीनें झालेला अवच्छेद भासतो, असा भावार्थ.-" तर मग, निर्माण केलेल्या देहांमध्यें विद्वान् दुसऱ्या आत्म्याला उत्पन्न करितो, असें मानावें" अशी आशंका घेऊन ' नापि० ' इत्यादि भाष्यानें सांगतात-]=दुसऱ्या जीवांचा त्यांत प्रवेश होतो, असें जरी मानिलें तरी हें श्रुतिदर्शन उपपन्न होत नाहीं. [-कारण एकाच्या अनेकधाभावश्रुतीशीं विरोध येतो व इतर जीवांच्या भोगांच्या अननुसंधानाचा-अननुभवाचा प्रसंग येतो, असा भावार्थ.-शरीरान्तरांच्या निरात्मकत्वाचा अभाव आहे, याविषयीं ' न च०' इत्यादि भाष्यानें हेत्वंतर सांगतात-] =आणि निरात्मक शरीरांची प्रवृत्तिहि संभवत नाहीं. [ आत्म्याकडून अनधिष्ठित अशा अचेतनांची प्रवृत्ति संभवत नसल्यामुळें व भोगाच्या अभावाचा प्रसंग येत असल्यामुळें शरीरान्तरांमध्यें निरात्मकत्व नाहीं, असा भावार्थ.-' यत्तु० ' इत्यादि भाष्यानें पूर्वपक्षाच्या बीजाचा अनुवाद करितात-]

**भाष्यं--यत्तु आत्ममनसोर्भेदानुपपत्तेः अनेकशरीरयोगासंभव इति । नैष दोषः । एकमनोनुवर्तीनि समनस्कान्येवापराणि शरीराणि सत्यसंकल्पत्वात्स्र-क्ष्यति । सृष्टेषु च तेषूपाधिभेदादात्मनोऽपि भेदेनाधिष्ठातृत्वं योक्ष्यते । एषैव च योगशास्त्रेषु योगिनामनेकशरीरयोगप्रक्रिया ॥ १५ ॥**

**भाष्यार्थ**—पण आतां 'आत्मा व मन यांच्या भेदाची अनुपपत्ति असल्यामुळें आत्म्याच्या अनेकशरीरयोगाचा असंभव आहे' असें जें वाद्यानें वर म्हटलें आहे, [—स्वतंत्र अनादि मनाचा भेद असतांनाच—तो असला तरच जीवाचा भेद होतो, पण एका मनाच्या संकल्पापासून उत्पन्न झाल्यामुळें त्याच्या अधीन असलेल्या मनांचा भेद जरी असला तरी जीवाच्या भेदाचा अभाव असल्यामुळें त्या त्या उपाधींत ज्याचें चैतन्य व्यक्त झालें आहे असा विद्वान् ऐश्वर्याला पात्र आहे, असा स्वीकार केला असतां त्यांत कोणत्याहि प्रकारचा दोष नाहीं, असा 'नैष दोषः०' इत्यादि भाष्यानें त्याचा परिहार करितात—]=तो दोष—आत्मा व मन यांच्या भेदाच्या अनुपपत्तीमुळें अनेकशरीरयोगाचा असंभव हा दोष—येत नाहीं. कारण विद्वान् सत्यसंकल्पत्वामुळें एका मनाचें अनुवर्तन करणारीं अशींच समनस्क—मनोयुक्त दुसरीं शरीरें उत्पन्न करील आणि उत्पन्न केलेल्या त्या शरीरांमध्यें उपाधिभेदामुळें आत्म्याचेंहि भेदानें अधिष्ठातृत्व योजील. [एका मनाचें अनुवर्तन म्ह० त्याच्या अभिप्रायाच्या विरोधी नसणें.—या उक्त अर्थी योगशास्त्राची संमति सांगतात—]='एषैव०'—योगशास्त्रामध्यें योग्यांच्या अनेक शरीरयोगाची जी प्रक्रिया आहे ती हीच होय. ['निर्माणचित्तानि अस्मितामात्रात्' 'प्रवृत्तिभेदप्रयोजकं चित्तमेकं अनेकेषां'—यो.पा.४.सू.४,५.—"पण योगी जेव्हां अनेक शरीरें उत्पन्न करितो तेव्हां तीं अनेक मनांनीं युक्त असतात कीं एकमनस्क असतात?" अशी आशंका घेऊन योगसूत्रकार म्हणतात—अस्मितामात्र चित्तकारणाचें ग्रहण करून तो निर्माणचित्तें—निर्माण केलेल्या शरीरांतील चित्तें करितो. त्यामुळें ती सचित्त होतात. ४. पण अनेक चित्तांची एकचित्ताभिप्रायपुरःसर प्रवृत्ति कशी होईल? म्हणून तो सर्वचित्तांचें प्रयोजक एक चित्त निर्माण करितो. त्यामुळें प्रवृत्तीचा भेद होतो. ५. अशी योगशास्त्रांत हीच प्रक्रिया सांगितली आहे.] १५. [—"अहोपण मुक्ताचें हें यथोक्त ऐश्वर्य विशेषज्ञानाचा निषेध करणाऱ्या श्रुतीच्या विरुद्ध आहे, अशी 'कथं०' इत्यादि भाष्यानें शंका—]

**भाष्यं**—कथं पुनर्मुक्तस्य अनेकशरीरावेशादिलक्षणमैश्वर्यमभ्युपगम्यते। यावता 'तत्केन कं विजानीयात्' 'न तु तद्द्वितीयमस्ति ततोऽन्यद्विभक्तं यद्विजानीयात्' 'सलिल एको द्रष्टाऽद्वैतो भवति' इति चैवंजातीयका श्रुतिर्विशेषविज्ञानं वारयति। इत्यत उत्तरं पठति—

**भाष्यार्थ**—"अहोपण, मुक्ताचें हें अनेक शरीरांत प्रवेश करणें इत्यादि स्वरूपाचें ऐश्वर्य कसें स्वीकारलें जात आहे? कारण "त्या मुक्तावस्थेंत ज्ञानी कोणत्या

साधनानें कोणत्या विषयाला पाहणार?"–बृ.४.५.१५.–"पण ज्याला तो जाणील अशी त्याहून भिन्न–द्वितीय वस्तु नाहीं "–बृ. ४. ३. ३०.–व 'जलांत एक द्रष्टा अद्वैत होतो'–बृ. ४. ३. ३२.–ही अशा जातीची श्रुति विशेष विज्ञानाचें निवारण करिते" 'इति'–अशी आशंका येते. [–'अतः०' इत्यादि भाष्यानें या शंकेच्या उत्तरत्वानें सूत्राला अवतरण देतात–]=म्हणून 'स्वाप्यय०' इत्यादि सूत्रानें उत्तर–

**सूत्रं—स्वाप्ययसंपत्त्योरन्यतरापेक्षमाविष्कृतं हि ॥ १६ ॥ (६)**

**सूत्रार्थ—**'स्वाप्यय'–सुषुप्ति व 'संपत्ति'–परम मुक्ति या दोन अवस्थांतील कोणत्या तरी एका अवस्थेच्या अपेक्षेनें तें विशेषविज्ञानाचें अभावकथन आहे. कारण प्रकरणावरूनच हें स्पष्ट झालें आहे. १६. (६)–सु. ब्र. ५०२–

[–'**स्वाप्यय०**' इत्यादि भाष्यानें सूत्रांतील प्रतिज्ञेचें व्याख्यान–]

**भाष्यं—स्वाप्ययः सुषुप्तं 'स्वमपीतो भवति तस्मादेनं स्वपितीत्याचक्षते' इति श्रुतेः । संपत्तिः कैवल्यं । 'ब्रह्मैव सन्ब्रह्माप्येति' इति श्रुतेः । तयोरन्यतरामवस्थामपेक्ष्य एतद्विशेषसंज्ञाभाववचनम् । क्वचित्सुषुप्तावस्थामपेक्ष्योच्यते । क्वचित्कैवल्यावस्थाम् ॥**

**भाष्यार्थ—**स्वाप्यय म्ह० सुषुप्त. कारण "स्वरूपाला प्राप्त होतो–स्वरूपांत लय पावतो. म्हणून याला 'स्वपिति' असें म्हणतात."–छां. ६. ८. १.–अशी श्रुति त्याविषयीं प्रमाण आहे. संपत्ति म्ह० कैवल्य–आत्म्याचा केवल निरुपाधिकभाव. कारण त्याविषयीं 'ब्रह्मच होऊन ब्रह्माशीं तादात्म्य पावतो' अशी श्रुति आहे. त्या दोन अवस्थांतील कोणत्या तरी एका अवस्थेच्या अपेक्षेनें हें विशेषसंज्ञाभाववचन–विशेषविज्ञानाचें अभावकथन आहे. [–हा उक्तार्थच व्यक्त करण्यासाठीं '**क्वचित्०**' इत्यादि भाष्यानें विभाग करितात–]=क्वचित्–'तत्केन कं पश्येत्' इत्यादि वाक्यांत सुषुप्त-अवस्थेच्या अपेक्षेनें तो विशेष विज्ञानाचा अभाव सांगितला जातो व क्वचित्–सलिलादि वाक्यांत कैवल्यावस्थेला उद्देशून तो सांगितला जातो. [–'आविष्कृतं हि०' या सूत्रांतील हेतुभागाचें '**कथं०**' इत्यादि भाष्यानें आकांक्षाद्वारा व्याख्यान करितात–]

**भाष्यं—कथमवगम्यते । यतस्तत्रैवैतदधिकारवशादाविष्कृतम् 'एतेभ्यो भूतेभ्यः समुत्थाय तान्येवानु विनश्यति न प्रेत्य संज्ञाऽस्तीति' 'यत्र त्वस्य सर्वमात्मैवाभूत्' 'यत्र सुप्तो न कंचन कामं कामयते न कंचन स्वप्नं पश्यति' इत्यादिश्रुतिभ्यः । सगुणविद्याविपाकावस्थानं तु एतत्स्वर्गादिवदवस्थान्तरं यत्रैतदैश्वर्यमुपवर्ण्यते । तस्माददोषः ॥१६॥ (६)**

**भाष्यार्थ**—पण हें कशावरून अवगत होतें ? कारण कीं, तेथेंच–त्याच उक्त वाक्यांत सुषुप्ति व मोक्ष यांतील एकाच्या अधिकारवशात्–प्रकरणसामर्थ्यामुळें हें–उक्त वाक्यांचें अन्यतरविषयत्व आविष्कृत–व्यक्त केलें आहे. "या भूतांपासून समुत्थान पावून त्यांच्याच मागोमाग विनाश पावतो. विनाशानंतर विशेष संज्ञा–भान राहत नाहीं"–बृ.२.४.१२–"पण ज्या विद्यावस्थेंत याचा आत्माच सर्व झाला"–बृ. २.४.१४.–"ज्यावेळीं हा सुप्त–निजलेला पुरुष कोणत्याहि विषयाची इच्छा करीत नाहीं व कोणतेंहि स्वप्न पहात नाहीं"–बृ.४.३.१९. मांडू.५.–नृ.पू.ता.४.१. नृ.उ. ता.१. रामोत्तरता.३–इत्यादि श्रुतींवरून हें व्यक्त होतें. [ या वचनांतील पहिलें व तिसरें वाक्य स्वापाधिकारविषय आहे व दुसरें वाक्य मोक्षाधिकारविषय आहे, असा त्या वाक्यांचा विवेक भेद जाणावा.–याप्रमाणें विशेषविज्ञानाच्या अभावाचें कथन सुषुप्ति व मुक्ति यांतील कोणत्या तरी एका अवस्थेच्या आशयानें आहे, असें सांगितलें. आतां 'ऐश्वर्यकथनाला सगुणविद्याविषयत्व असल्यामुळें भिन्नविषयत्व आहे' त्यामुळें विरोधाची शंका नाहीं, असें 'सगुण०' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=पण जेथें या ऐश्वर्याचें उपवर्णन केलें जातें तें सगुणविद्येच्या विपाकाचें–फलाचें स्थान स्वर्गादिकांप्रमाणें अवस्थान्तर आहे. [–" तर मग सगुण विद्याफलामध्यें 'मुक्ति' या शब्दाची प्रवृत्ति कशी होते ?" अशी आशंका घेऊन 'संध्यासमय' या अर्थी सामीप्यामुळें 'दिवस' या शब्दाची प्रवृत्ति जशी होते तशी सगुणविद्याफलभूत अवस्थान्तरामध्यें मुक्तिशब्दप्रवृत्ति केवल प्रत्यासत्तीनें होते, असें मानून आचार्य म्हणतात–]=' **तस्मात्** '–त्यामुळें त्यांत कांहीं दोष नाहीं. [–सु.ब्र.५०३–] १६ ( ६ )

( ७. जगद्व्यापाराधिकरण. सू. १७–२२. )

——मन-देह इत्यादिकांच्या सृष्ट्यादिकांमध्यें सामान्यतः उपासकाचें जें ऐश्वर्य सांगितलें आहे त्याचा अपवाद, जगत्सर्गाविषयीं कांहीं प्रमाण नसल्यामुळें, 'जगद्व्यापारवर्जं०' इत्यादि सूत्रानें सांगतात—

**सूत्रं—जगद्व्यापारवर्जं प्रकरणादसंनिहितत्वाच्च ॥ १७**

**सूत्रार्थ**—त्याचें ऐश्वर्य जगाला उत्पन्न करणें इत्यादि व्यापाररहित आहे. कारण जगद्व्यापार हें परमेश्वराचेंच कार्य आहे. कारण सृष्टिवाक्यामध्यें सर्वत्र प्रकरणवशात् परमेश्वरच प्रकृत आहे व विद्वान् तेथें संनिहित नाहीं. १७.–सु.ब्र.५०४–[–अपर ब्रह्माशीं सायुज्यास प्राप्त झालेल्या विद्वानांच्या ऐश्वर्याला विषय करून त्याच्या उभयथादृष्टीमुळें ' ये सगुण०' इत्यादि भाष्यानें संशय सांगतात–]

**भाष्यं**—ये सगुणब्रह्मोपासनात्सहैव मनसेश्वरसायुज्यं व्रजन्ति । किं तेषां निरवग्रहमैश्वर्यं भवत्याहोस्वित्सावग्रहमिति संशयः । किं तावत्प्राप्तम् । निरंकुशमेवैषामैश्वर्यं भवितुमर्हति ‘आप्नोति स्वाराज्यम्’ ‘सर्वेऽस्मै देवा बलिमावहन्ति’ ‘तेषां सर्वेषु लोकेषु कामचारो भवति’ इत्यादिश्रुतिभ्य इति ॥

**भाष्यार्थ**—‘जे सगुण ब्रह्माच्या उपासनेमुळें मनासहवर्तमानच-समनस्कच ईश्वरसायुज्यास प्राप्त होतात त्यांचें ऐश्वर्य काय, निरवग्रह–निष्प्रतिबंध असतें किंवा सावग्रह–सप्रतिबंध असतें,’ असा संशय येतो. [–येथें सगुणब्रह्मविद्याफलभूत ऐश्वर्याच्या निरतिशयत्वाचें निवारण केलेलें असल्यामुळें याची पादादिसंगति आहे. पूर्वपक्षांत ‘विद्वानाच्या ऐश्वर्याला निरंकुशत्व असल्यामुळें व ईश्वराच्या भेदामुळें अनेकमतीनें जगदुत्पत्त्यादिव्यवस्थेची असिद्धि’ व सिद्धान्तांत ‘ईश्वराच्या भेदाचा अभाव असल्यामुळें परमेश्वराधीनत्वानें जगदुदयादिव्यवस्थेची उपपत्ति’ अशा अभिप्रायानें ‘किं तावत्०’ इत्यादि भाष्यानें प्रश्नपूर्वक पूर्वपक्ष करितात–]=मग अगोदर त्यांतील कोणता पक्ष प्राप्त झाला? “स्वाराज्यास प्राप्त होतो”–तै. १.६.२.–“सर्व देव याला बलि घेऊन येतात– आणून देतात”–तै.१.५.३.– “त्यांचा सर्वलोकांमध्यें कामसंचार होतो”–छां.७.२५.२;८.१.६. –इत्यादि श्रुतींवरून यांचें ऐश्वर्य निरंकुशच असणें युक्त आहे, ‘इति’–असा पक्ष प्राप्त होतो. [–श्रुतींच्या श्रुत अर्थाचें ग्रहण करून, असा पूर्वपक्ष करून ‘एवं०’ इत्यादि भाष्यानें सिद्धान्त सांगतात–]

**भाष्यं**—एवं प्राप्ते पठति— जगद्व्यापारवर्जमिति । जगदुत्पत्त्यादिव्यापारं वर्जयित्वाऽन्यदणिमाद्यात्मकमैश्वर्यं मुक्तानां भवितुमर्हति । जगद्व्यापारस्तु नित्यसिद्धस्यैवेश्वरस्य । कुतः । तस्य तत्र प्रकृतत्वात् । असंनिहितत्वाच्चेतरेषाम् । पर एव हीश्वरो जगद्व्यापारेऽधिकृतः । तमेव प्रकृत्योत्पत्त्याद्युपदेशात् । नित्यशब्दनिबंधनत्वाच्च ॥

**भाष्यार्थ**—असा पूर्वपक्ष प्राप्त झाला असतां ‘जगद्व्यापारवर्जं’ असें बादरायणाचार्य पढतात. जगदुत्पत्त्यादि व्यापाराला वर्ज करून इतर अणिमादिरूप ऐश्वर्य मुक्तांना प्राप्त होणें उचित आहे. पण जगद्व्यापार नित्यसिद्ध ईश्वराचाच आहे. [–‘कुतः०’ इत्यादि भाष्यानें सूत्रांतील हेतुद्वय प्रश्नपूर्वक सांगतात–] =कोणत्या कारणानें? त्या ईश्वराला त्यांत प्रकृतत्व आहे व इतर मुक्तांना असंनिहितत्व आहे. [–नित्यसिद्ध ईश्वराचाच जगदुत्पत्त्यादि व्यापार आहे, याविषयीं ‘प्रकरणात्’ या सूत्रोक्त हेतूचें विवरण–]=‘पर एव०’–कारण पर ईश्वरच

जगद्व्यापारामध्यें अधिकृत आहे. [–' प्रलयापासून उत्थानसमयीं सर्व जगाचा जो कर्ता त्याचेंच स्थित्यादि-समयींहि कर्तृत्व सांगितलेलें असल्यामुळें व आदि सर्गीमध्यें दुसऱ्या कोणाच्या कर्तृत्वाचा अभाव असल्यामुळें जगद्व्यापारांत ईश्वराचेंच सांनिध्य आहे ' असें ' तमेव० ' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=कारण त्या ईश्वरालाच उद्देशून–त्यालाच विषय करून उत्पत्त्यादिकांचा उपदेश केला आहे. [–शिवाय परमात्म्यालाच नित्यत्व असल्यामुळें आपल्या हेतूच्या अनपेक्षणाला क्लृप्तशक्तित्व आहे म्ह० नित्य ईश्वरामध्यें जगदुत्पत्तीचें निरपेक्ष सामर्थ्य सिद्ध आहे, आणि विद्वानांचें जगत्सर्जनसामर्थ्य कल्प्य आहे. यास्तव जगत्सृष्टि ईश्वरविषयच मानावी. शिवाय पौर्वापर्याचा विचार केला असतां ईश्वराचाच जगत्सर्ग शब्दावरून अवगत होतो. ' जन्मादि० ' सूत्रापासून–अ. १. पृ. ७९–याचेंच उपपादन केलें आहे, त्यामुळें अद्वितीय प्रतिज्ञा सिद्धच आहे, असें ' नित्यशब्द० ' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=आणि नित्यशब्दाच्या निबंधनामुळेंहि–प्रयोगामुळेंहि ईश्वरच जगद्व्यापाराचा अधिकारी आहे. [–याप्रमाणें जगद्व्यापारांत ईश्वराचेंच सांनिध्य सांगून आद्यप्रतिज्ञेच्या सिद्धीसाठीं विद्वानांच्या त्यांतील असांनिध्याचें समर्थन ' तदन्वेषण० ' इत्यादि भाष्यानें करितात–]

**भाष्यं—तदन्वेषणविजिज्ञासनपूर्वकं त्वितरेषामणिमाद्यैश्वर्यं श्रूयते। तेनासंनिहितास्ते जगद्व्यापारे। समनस्कत्वादेव चैतेषामनैकमत्ये कस्यचित्स्थित्यभिप्रायः कस्यचित्संहाराभिप्राय इत्येवं विरोधोऽपि कदाचित्स्यात्। अथ कस्यचित्संकल्पमन्वन्यस्य संकल्प इत्यविरोधः समर्थ्येत। ततः परमेश्वराकूततंत्रत्वमेव इतरेषामिति व्यवतिष्ठते ॥ १७ ॥**

**भाष्यार्थ**—पण इतरांचें अणिमादि-ऐश्वर्य त्या ईश्वराचें अन्वेषण, विजिज्ञासन, एतत्पूर्वक श्रुत आहे, ' ईश्वराचें चिंतन, ज्ञान, इत्यादि उपायांनीं उपासकांना ऐश्वर्य प्राप्त होतें ' असें ' त्यांचा सर्वलोकांमध्यें कामचार होतो ' इत्यादि वाक्यांत श्रुत आहे. त्यामुळें ते उपासक जगद्व्यापारामध्यें असंनिहित आहेत. [–उपासक सृष्ट्युत्तरकालीं होणारे असल्यामुळें सृष्टिकालीं त्यांचें अस्तित्वच नसतें व पूर्वकल्पांतील सिद्ध प्रलयकालीं मुक्त झालेले असतात, त्यामुळें त्यांचें स्रष्टृत्वादि संभवत नाहीं, असा याचा भावार्थ.–आणि याहि कारणानें विद्वानांना निरंकुश ऐश्वर्य नाहीं, असें ' समनस्कत्वात्० ' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=आणि या सिद्धांना समनस्कत्व असल्यामुळेंच त्यांचें अनेकमत्य आहे, असें झालें असतां त्यांतील कोणाचा ' जगाच्या स्थितीविषयीं आशय असेल ' व कोणाचा ' त्याचा

संहार व्हावा ' असा अभिप्राय असेल, याप्रमाणें कदाचित् विरोधहि संभवेल. [विद्वानांना समप्राधान्य आहे कीं गुणप्राधान्य आहे ? म्ह० त्या सर्वांचें प्राधान्य एकसारखेंच आहे कीं न्यूनाधिक आहे ? यांतील पहिल्या पक्षीं समप्रधान असलेल्यांचें नियमानें ऐकमत्य अनुभवास येत नसल्यामुळें त्यांतील एकाला सृष्टि उत्पन्न करण्याची इच्छा व दुसऱ्याला तिचा संहार करण्याची इच्छा होण्याचा संभव असल्यामुळें एकाच वेळीं सृष्टि व संहार होण्याचा प्रसंग येईल. नाहीं तर कार्यविघातामुळें दोघांनाहि ईश्वरत्व नाहीं असें होईल, असा याचा अभिप्राय. —' अथ० ' इत्यादि भाष्यानें दुसऱ्या गुणप्रधानभावाचा अनुवाद करून त्याला दूषित करितात—]=बरें ' त्यांतील कोणा एखाद्याच्या संकल्पानुसार दुसऱ्याचा संकल्प असतो, त्यामुळें विरोध येत नाहीं, ' असें समर्थन केलें जाईल, तर 'इतरांना परमेश्वराभिप्रायतंत्रत्वच आहे ' असें सिद्ध होतें. [' ज्यांना आगंतुक ऐश्वर्य प्राप्त झालें आहे अशा ईश्वरेतर सिद्धांना एकाभिप्रायानुवर्तित्व आहे ' असें झालें असतां त्यांतील विशेषत्वाचें ग्रहण होत नसल्यामुळें त्यांपैकीं कोणा एखाद्याच्याच प्राधान्याचा असंभव होतो. म्हणून ज्याचें ऐश्वर्य नित्यसिद्ध आहे, अशा परमेश्वराचेंच अनुवर्तित्व त्या सर्वांना आहे' असें मानावें, असा याचा भावार्थ.]१७. [—' प्रत्यक्षोपदेशात्० ' इत्यादि सूत्रानें पूर्वपक्षाच्या बीजाचा अनुवाद करून त्याला दूषित करितात—]

**सूत्रं—प्रत्यक्षोपदेशादिति चेन्नाधिकारिकमंडलस्थोक्तेः ॥ १८**

**सूत्रार्थ**—' आप्नोति स्वाराज्यं ' या प्रत्यक्ष श्रुतीनें त्याच्या ऐश्वर्याचा उपदेश केलेला असल्यामुळें विद्वानांचें ऐश्वर्य निरंकुश आहे, म्हणून म्हणाल तर तें बरोबर नाहीं. कारण आधिकारिक जो सूर्यमंडलस्थ परमात्मा त्याचें पुढील वाक्यांत प्राप्यत्वानें कथन केलें आहे. त्यामुळें विद्वानाचें ऐश्वर्य सातिशय आहे. १८—सु. ब्र. ९०४.

[—' अथ यदुक्तं० ' इत्यादि भाष्यानें सूत्रांतील अनुवादभागाचें व्याख्यान—]

**भाष्यं—अथ यदुक्तं ' आप्नोति स्वाराज्यम् ' इत्यादिप्रत्यक्षोपदेशाभिरवग्रहमैश्वर्यं विदुषां न्याय्यमिति तत्परिहर्तव्यम् । अत्रोच्यते— नायं दोषः आधिकारिकमंडलस्थोक्तेः । आधिकारिको यः सवितृमंडलादिषु विशेषायतनेष्ववस्थितः पर ईश्वरः । तदायत्तैवेयं स्वाराज्यप्राप्तिरुच्यते । यत्कारणमनंतरं ' आप्नोति मनसस्पतिम् ' इत्याह ॥**

**भाष्यार्थ**—आतां ' आप्नोति स्वाराज्यं '—तै. १.६.२.—इत्यादि प्रत्यक्ष उपदेशामुळें विद्वानांचें निरवग्रह ऐश्वर्य असणेंच न्याय्य आहे, असें जें वर म्हटलें

आहे, तें परिहार करण्यास योग्य आहे. [–' अत्र० ' इत्यादि भाष्यानें सूत्रांतील परिहाराला प्राप्त करवितात –]=या पूर्वपक्षबीजाचा परिहार सांगितला जातो– [–सूत्रांतील ' न ' या निपाताचा अर्थ सांगून सूत्रोक्त हेतूला अवतरण देऊन ' **नायं दोषः०** ' इत्यादि भाष्यानें त्याचें व्याख्यान करितात–]=हा दोष येत नाहीं. कारण ही आधिकारिक मंडलस्थाची उक्ति आहे. म्ह० जो सवितृमंडलादि विशेष आयतनांमध्यें अवस्थित असलेला आधिकारिक–आदित्यादिकांना त्यांच्या अधिकारांत नियुक्त करणारा परमेश्वर त्याच्या अधीन असलेलीच ही स्वाराज्यप्राप्ति सांगितली जाते. [ आदित्यादिकांना त्यांच्या त्यांच्या अधिकारांत जो प्रेरित करितो तो आधिकारिक.–याविषयीं ' **यत्कारणं०** ' इत्यादि भाष्यानें हेतु सांगतात–]=कारण कीं, त्या वाक्याच्या पुढेंच ' मनाच्या पतीला प्राप्त होतो. '–तै. १. ६. २.–असें श्रुति सांगते. [ ज्या कारणास्तव श्रुति स्वाराज्यप्राप्तीच्या अनंतर मनसस्पतीला प्राप्त होतो असें सांगते, त्याअर्थीं स्वाराज्य हें निरंकुश ऐश्वर्य नव्हे. कारण, पूर्वींच जर निरंकुश स्वाराज्य सांगितलेलें असतें तर मागून ईश्वरप्राप्तिवचन सांगितलें नसतें. यास्तव तें त्यांचें भोगांतील स्वाराज्य आहे, जगाच्या स्रष्टृत्वादिकांतील नव्हे, असा याचा भावार्थ.–विवक्षित अर्थाच्या सिद्धीसाठीं ' **यो हि०** ' इत्यादि भाष्यानें वाक्यार्थ सांगतात–]

**भाष्यं—यो हि सर्वमनसां पतिः पूर्वसिद्ध ईश्वरस्तं प्राप्नोतीत्येतदुक्तं भवति । तदनुसारेणैव चानन्तरं 'वाक्पतिश्चक्षुष्पतिः श्रोत्रपतिर्विज्ञानपतिश्च भवति' इत्याह । एवमन्यत्रापि यथासंभवं नित्यसिद्धेश्वरायत्तमेव इतरेषामैश्वर्यं योजयितव्यम् ॥ १८ ॥**

**भाष्यार्थ**—कारण जो सर्व मनांचा पति पूर्वसिद्ध ईश्वर त्याला प्राप्त होतो, असें हें या वाक्यानें सांगितलेलें आहे. [–विद्वानांचें ईश्वराधीन ऐश्वर्य हेंच स्वाराज्य आहे, याविषयीं '**तदनुसारेणैव०**' इत्यादि भाष्यानें वाक्यशेषाचें आनुकूल्य दाखवितात–]=आणि त्या वाक्यार्थाच्या अनुसारच लागलेंच त्याच्यापुढें श्रुति ' वाक्पति, चक्षुष्पति, श्रोत्रपति व विज्ञानपति होतो '–तै. १. ६. २.–असें सांगते. [–परमेश्वराधीन असलेलें अणिमादिरूप ऐश्वर्य हेंच विद्वानाचें स्वाराज्य आहे, जगाचें स्रष्टृत्वादि हें स्वाराज्य नव्हे. या उक्त अर्थाला 'त्यांचा सर्वलोकांमध्यें कामचार होतो ' इत्यादि वाक्यांमध्यें '**एवं०**' इत्यादि भाष्यानें संचारित करितात–]=याच न्यायानें इतर वाक्यांमध्येंहि यथासंभव नित्यसिद्ध ईश्वराधीनच इतरांचें ऐश्वर्य आहे, अशी योजना करावी. १८. [–" निरतिशय ऐश्वर्यवान् ईश्वराची उपासना

करणारे तदात्मतेला प्राप्त होत्साते सातिशय ऐश्वर्यवान् होतात, हें म्हणणें अयुक्त आहे. कारण त्याचा ईश्वरात्मत्वाशीं विरोध आहे" अशी आशंका घेऊन 'ब्रह्माला जरी ऐक्य असलें तरी सगुणप्राप्तांना निर्गुणप्राप्तीचा जसा अभाव आहे, त्याप्रमाणेंच हेंहि युक्त आहे, असें सांगण्यासाठीं '**विकारावर्ति०**' या सूत्रानें ब्रह्माचें द्वैरूप्य सांगतात–]

## सूत्रं—विकारावर्ति च तथाहि स्थितिमाह ॥ १९

**सूत्रार्थ**—सगुण ब्रह्मामध्यें विकारावर्ती–निर्गुणस्वरूप आहे, कारण 'तावानस्य महिमा' इत्यादि श्रुति ब्रह्मांतील सगुणत्व-निर्गुणत्वाची स्थिति सांगते. १९. –सु. ब्र. ९०९–[–'**विकारावर्त्यपि०**' इत्यादि भाष्यानें सूत्रांतील प्रतिज्ञाभागाचें व्याख्यान करितात–]

**भाष्यं—विकारावर्त्यपि च नित्यमुक्तं पारमेश्वरं रूपं, न केवलं विकारमात्रगोचरं सवितृमंडलाद्यधिष्ठानम्। तथा ह्यस्य द्विरूपां स्थितिमाहाम्नायः–'तावानस्य महिमा ततो ज्यायांश्च पूरुषः। पादोऽस्य सर्वा भूतानि त्रिपादस्यामृतं दिवि' इत्येवमादिः॥**

**भाष्यार्थ**—आणि विकारामध्यें न रहाणारें असेंहि नित्यमुक्त पारमेश्वर–परमेश्वराचें स्वरूप आहे. [–सूत्रांतील 'च-'कारानें सुचविलेला अर्थ '**न केवलं०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]=तें केवल विकारमात्रगोचर सवितृमंडलादि-अधिष्ठानच नाहीं. [नित्यमुक्त पारमेश्वर रूप सवितृमंडलादि हें ज्याचें अधिष्ठान आहे असें केवल विकारमात्रगोचरच नाहीं, असा याचा भावार्थ.–'**तथा ह्यस्य०**' इत्यादि भाष्यानें सूत्रांतील हेतुभागाचें व्याख्यान–]=कारण "तेवढा याचा महिमा–विभूतिविस्तार आहे आणि पुरुष त्याहून फारच मोठा आहे. सर्व भूतें याचा पाद आहे व याचें त्रिपाद्–अमृत स्वात्म्यामध्यें अवस्थित आहे."–छां.३.१२.६.–हा अशा प्रकारचा आम्नाय–वेद याची तशी द्विरूपस्थिति सांगतो. [त्यांतील पहिल्या व तिसऱ्या पादांनीं विकारवर्ती–विकारांत राहणारें रूप सांगितलें जातें आणि दुसऱ्या व चवथ्या पादांनीं विकारावर्तिब्रह्मरूप सांगितलें आहे, असा यांतील भेद जाणावा.–'ब्रह्माचें विकारावर्तिरूप असूं दे, तरी पण त्यामुळें काय झालें?' '**न च०**' इत्यादि भाष्यानें उत्तर–]

**भाष्यं—न च तन्निर्विकाररूपं इतरालंबनाः प्राप्नुवन्तीति शक्यं वक्तुम्। अतत्क्रतुत्वात्तेषाम्। अतश्च यथैव द्विरूपे परमेश्वरे निर्गुणं रूपमनवाप्य सगुण**

**एवावतिष्ठन्त एवं सगुणेऽपि निरवग्रहमैश्वर्यमनवाप्य सावग्रह एवावतिष्ठन्त इति द्रष्टव्यम् ॥ १९ ॥**

**भाष्यार्थ**—आणि इतर—सविकाररूपाचें आलंबन करणारे उपासक त्या निर्विकार रूपाला प्राप्त होतात, असें म्हणतां येणें शक्य नाहीं. कारण त्यांना अतत्क्रतुत्व आहे—त्यांनीं निर्विकाररूपाचा संकल्पच केलेला नसतो—त्याचें चिंतनच कधीं केलेलें नसतें. [—वस्तुतः ब्रह्म जरी निर्विकार आहे तरी उपासनेच्या अनुसारच त्याच्या स्वरूपाची प्राप्ति होत असते आणि उपासन विधीच्या अधीन असतें. निरातिशय महत्त्वादि धर्मांनीं युक्त असलेलें ब्रह्म उपासनेचा विषय होत नाहीं —निर्गुण ब्रह्माला उपासनाविषयत्व नाहीं. त्यामुळें उपासना न केलेल्या त्याची प्राप्ति होत नाहीं, असें याचें फलित ' अतः च० ' इत्यादि भाष्यानें सांगतात—] =आणि त्यामुळें ज्याप्रमाणें द्विरूप परमेश्वरांतील निर्गुणरूपाला प्राप्त न होतां सगुणरूपामध्येंच सगुणोपासक अवस्थित होतात त्याप्रमाणें सगुणब्रह्मामध्येंहि निरवग्रह—निरातिशय ऐश्वर्यास प्राप्त न होतां सावग्रह—सातिशय ऐश्वर्यांतच ते अवस्थित होतात, असें जाणावें. १९. [—विकारावर्तिरूप आहे याविषयीं 'दर्शयतश्च० ' इत्यादि सूत्रानें श्रुति-स्मृतींचें प्रमाण देतात—]

## सूत्रं—दर्शयतश्चैवं प्रत्यक्षानुमाने ॥ २०

**सूत्रार्थ**—आणि श्रुति-स्मृति ब्रह्माचें निर्गुणत्व दाखवितात. २०.—सु.ब्र.५०९ [—सूत्रांतील प्रत्यक्ष व अनुमान या शब्दांच्या प्रसिद्ध—रूढ अर्थांचें प्रत्याख्यान करणारे भाष्यकार 'दर्शयतश्च०' इत्यादि भाष्यानें सूत्राक्षरांची योजना करितात—]

**भाष्यं**—**दर्शयतश्च विकारावर्तित्वं परस्य ज्योतिषः श्रुतिस्मृती। ' न तत्र सूर्यो भाति न चंद्रतारकं नेमा विद्युतो भान्ति कुतोऽयमग्निः ' इति। " न तद्भासयते सूर्यो न शशांको न पावकः " इति च। तदेवं विकारावर्तित्वं परस्य ज्योतिषः प्रसिद्धमित्यभिप्रायः ॥ २० ॥**

**भाष्यार्थ**—आणि प्रत्यक्ष—श्रुति व अनुमान—स्मृति त्या परम ज्योतींचें विकारावर्तित्व दाखवितात. ' त्या परब्रह्मामध्यें सूर्य भासत नाहीं—त्याला प्रकाशित करीत नाहीं. चंद्र व नक्षत्रें भासत नाहींत, या विद्युत्-हि त्याच्या ठिकाणीं प्रकाशमान होत नाहींत. मग हा प्रत्यक्ष अग्नि त्याला कोठून प्रकाशित करणार ? ' —का. २. २. ५. श्वे. ६. १४. मुं. २. २. १०.—अशी श्रुति व ' त्याला सूर्य प्रकाशित करीत नाहीं, चंद्र प्रकाशित करीत नाहीं व अग्नि प्रकाशित करीत नाहीं. '—भ. गी. १५. ६.—अशी स्मृति त्याचें विकारावर्तित्व दाखविते. [—उक्त

अर्थी श्रुति-स्मृतिवचनें सुलभ आहेत असें मानणारे भाष्यकार 'तदेवं०' इत्यादि भाष्यानें वाक्यार्थ सांगतात–]=म्हणून परज्योतीचें विकारावर्तित्व असें प्रसिद्ध आहे, असा याचा अभिप्राय. २०. [–अपरब्रह्मवेत्त्यांच्या जगत्स्रष्टृत्वादिकांच्या अभावाविषयीं ' भोगमात्र० ' इत्यादि सूत्रानें हेत्वन्तर सांगतात–]

## सूत्रं—भोगमात्रसाम्यलिंगाच्च ॥ २१

**सूत्रार्थ**—' तमाह० ' इत्यादि श्रुतींत उपासकाचें उपास्यदेवतेशीं भोगमात्र-साम्य श्रुत आहे. जगद्व्यापाराचें साम्य श्रुत नाहीं. म्हणून या साम्य लिंगावरून विद्वानाचें ऐश्वर्य सातिशय आहे, असें अवगत होतें. २१.–सु.ब्र. ९०५. [ स्वाराज्याला परमेश्वराधीनत्व असल्यामुळेंच केवळ विद्वानांना जगद्व्यापारराहित्य नाहीं, तर त्याच्याशीं त्यांचें भोगमात्रसाम्यकथन या लिंगावरूनहि त्यांना जगद्व्यापार-राहित्य आहे, असा सूत्राचा भावार्थ.–' इतश्च० ' इत्यादि भाष्यानें सूत्रांतील 'च-'काराचा अर्थ सांगतात–]

**भाष्यं**—इतश्च न निरंकुशं विकारालंबनानामैश्वर्यं यस्माद्भोगमात्रमेवैषां अनादिसिद्धेनेश्वरेण समानमिति श्रूयते– ' तमाहापो वै खलु मीयन्ते लोकोऽसौ ' इति ' स यथैतां देवतां सर्वाणि भूतान्यवन्त्येवं हैवंविदं सर्वाणि भूतान्यवन्ति ' ' तेनो एतस्यै देवतायै सायुज्यं सलोकतां जयति ' इत्यादि-भेदव्यपदेशलिंगेभ्यः ॥ २१ ॥

**भाष्यार्थ**—आणि याहि कारणानें विकाररूपाची उपासना कारणरांचें ऐश्वर्य निरंकुश नाहीं. [–अवशिष्ट सूत्राक्षरांच्या योजनेनें हेत्वंतरच स्पष्ट करितात–] =' यस्मात्० '–ज्याअर्थी या उपासकांचें अनादिसिद्ध ईश्वराशीं केवळ भोग-मात्रच समान आहे असें ' तं '–" त्या ब्रह्मलोकीं गेलेल्या उपासकाला हिरण्यगर्भ सांत्वनपूर्वक ' आह '–म्हणतो–ब्रह्मलोकांतील अधिष्ठाता हिरण्यगर्भ स्वसमीप आलेल्या त्या ब्रह्मोपासकाला मोठ्या आदरानें म्हणतो–' आपो वै खलु मीयन्ते ' –मजकडून खरोखर या अमृतमयी आपच पाहिल्या–भोगिल्या जातात. ' असौ लोकः '–तुलाहि हा अमृतरूप उदकलक्षण लोक–भोग्य असो, तूं त्याचा यथेच्छ भोग घे "–कौ. १. ६. सु. उ. ८३२.–या वचनानें श्रुत आहे. [–उपासकाचें उपास्य देवतेशीं भोगमात्र साम्य आहे, याविषयीं ' स यथा० ' इत्यादि श्रुत्यन्तर सांगतात–]=' त्याविषयीं दृष्टान्त–ज्याप्रमाणें या देवतेला सर्व भूतें भजतात, त्या-प्रमाणेंच अशी उपासना करणाराला सर्व भूतें भजतात. ' [–त्याविषयीं ' तेनो० ' इत्यादि वाक्यांतर सांगतात–]=' त्या व्रताच्या योगानें पुरुष या देवतेच्या सायु-

ज्यास व सलोकतेसहि प्राप्त होतो '-बृ. १. ५. २३.-इत्यादि भेदनिर्देशलिंगा-वरूनहि उपासकाचें उपास्य देवतेशीं भोगमात्रसाम्य आहे, असें सिद्ध होतें. [ उपासक प्रकृत उपासनेनें उपास्यदेवतेच्या सायुज्यास-समानदेहत्वास व समान-लोकत्वास भावनाविशेषामुळें प्राप्त होतो, असा याचा भावार्थ. ] २१. [-' ननु०' इत्यादि भाष्यानें विद्वानांच्या निरंकुश ऐश्वर्याभावपक्षीं दोषाची आशंका-]

**भाष्यं—नन्वेवं सति सातिशयत्वादंतवत्त्वमैश्वर्यस्य स्यात्ततश्चैषामावृत्तिः प्रसज्येत इति । अतः उत्तरं भगवान्बादरायण आचार्यः पठति—**

**भाष्यार्थ**—अहोपण, उपासकांचें ऐश्वर्य निरंकुश नाहीं, असें म्हटल्यास त्यांच्या ऐश्वर्याला सातिशयत्व असल्यामुळें अन्तवत्त्व-विनाशित्व आहे, असें होईल ! [ परमेश्वराच्या अतिशय-अधिक ऐश्वर्यासह जें असतें तें विद्वानाचें ऐश्वर्य सातिशय. तें सातिशय असल्यामुळें परमेश्वराच्या अधीन आहे. परमेश्वराच्या अधीन असल्यामुळें लौकिक ऐश्वर्याप्रमाणें तें कार्य आहे व कार्य असल्यामुळें अन्तवत्-विनाशी, असा भावार्थ.-" अहोपण विद्वानांच्या ऐश्वर्याला अंतवत्त्व असलें तरी त्यांत काय हानि आहे " अशी आशंका घेऊन ' विद्वानाला मुक्तत्व प्राप्त होणार नाहीं ' असें '**ततश्च०**' इत्यादि भाष्यानें शंकाकार म्हणतो-]=आणि त्यामुळें यांची आवृत्ति होण्याचा प्रसंग येईल, '**इति**'-अशी आशंका येते. [-सूत्रकाराची पूजा करीत होत्साते आचार्य या शंकेच्या उत्तरत्वानें उत्तर सूत्राला अवतरण देतात-]='**अतः उत्तरं०**'-म्हणून भगवान् बादरायण-आचार्य '**अनावृत्तिः०**' इत्यादि सूत्रानें उत्तर पढतात. [ ' भगवान् ' अशा या शब्दानें सर्वज्ञत्वादिसंपत्ति सांगितली आहे. ' आचार्य ' या शब्दानें शास्त्रार्थाचें बहुली-करण-त्याची वृद्धि करणें, शिष्यांना सदाचारामध्यें स्थापिणें व स्वतः त्याचें आच-रण करणें, यांतील नैपुण्य सांगितलें आहे, असा त्या शब्दांचा अर्थभेद जाणावा. -पण ' सातिशयत्वामुळें कार्यत्व व कार्यत्वामुळें अंतवत्त्व ' असें जें शंकाकारानें वर अनुमान केलें आहे ' त्यांत काय, ऐश्वर्याचें केवळ अंतवत्त्व साध्य आहे कीं विद्वानांच्या मुक्तीचा अभाव साध्य आहे ' असा विकल्प करून पहिल्या पक्षीं सिद्धसाध्यत्व मानून दुसऱ्या पक्षीं क्रममुक्ति सांगणाऱ्या श्रुतीशीं विरोध ' **अना-वृत्तिः०** ' या सूत्रानें सांगतात-]

**सूत्रं—अनावृत्तिः शब्दादनावृत्तिः शब्दात् ॥ २२ ॥ (७)**

**सूत्रार्थ**—अर्चिरादि-मार्गानें ब्रह्मलोकाला प्राप्त झालेल्या विद्वानांची अनावृत्तिच -मुक्तिच होते. कारण ' न च पुनरावर्तते ' इत्यादि क्रममुक्ति सांगणारा शब्द आहे,

त्यावरून सूत्राची आवृत्ति शास्त्राची समाप्ति सुचविते.२२. (७)–सु. ब्र. ५०५.–
[–'नाडीरश्मि०' इत्यादि भाष्यानें सूत्रस्थ प्रतिज्ञापदाचें व्याख्यान करितात–]

**भाष्यं**—**नाडीरश्मिसमन्वितेनार्चिरादिपर्वणा देवयानेन पथा ये ब्रह्मलोकं शास्त्रोक्तविशेषणं गच्छन्ति । यस्मिन्नरश्च ह वै ण्यश्चार्णवौ ब्रह्मलोके तृतीयस्यामितो दिवि यस्मिन्नैरं मदीयं सरो यस्मिन्नश्वत्थः सोमसवनो यस्मिन्नपराजिता पूर्ब्रह्मणो यस्मिंश्च प्रभुविमितं हिरण्मयं वेश्म यश्चानेकधा मंत्रार्थवादादिप्रदेशेषु प्रपंच्यते । ते तं प्राप्य न चंद्रलोकादिव भुक्तभोगा आवर्तन्ते ॥**

**भाष्यार्थ**—जे उपासक अर्चिरादि हीं ज्याचीं पर्वें–पेरें–भाग आहेत अशा नाडीरश्मियुक्त देवयानमार्गानें शास्त्रोक्त विशेषणांनीं विशिष्ट अशा ब्रह्मलोकाला जातात, [अर्चिरादिपदोक्त देवयानमार्गाचें स्मरण करविण्यासाठीं भाष्यांत त्याला दोन विशेषणें दिलीं आहेत. जे ब्रह्मलोकाला जातात ते त्याला प्राप्त होऊन ज्यांनीं तेथील भोग भोगिले आहेत असे होत्साते त्या लोकापासून संसारमार्गांत परत येत नाहींत, असा संबंध.–"पण तीं शास्त्रोक्त विशेषणें कोणतीं?" अशी आकांक्षा झाली असतां किंवा असा कोणी प्रश्न केला असतां '**यस्मिन्०**' इत्यादि भाष्यानें यथाशास्त्र त्यांचा अनुक्रम सांगतात–]= 'यस्मिन् इतः तृतीयस्यां दिवि ब्रह्मलोके'–"या पृथिवीसंज्ञक लोकापासून तिसऱ्या द्युलोकांत जो ब्रह्मलोक आहे त्या ब्रह्मलोकांत 'अर' व 'ण्य' या नांवांचे दोन अर्णव–समुद्र आहेत, ज्या ब्रह्मलोकांतच 'ऐरं मदीयं'–हर्षकर सरोवर आहे, ज्यांत सोमसवन अश्वत्थ आहे (येथील 'सोम' हा शब्द 'अमृत' या अर्थी आहे, सोमाचा–अमृताचा स्राव करणारा अश्वत्थ आहे, असा भावार्थ)=ज्यांत ब्रह्माची–हिरण्यगर्भाची अपराजिता –कर्म-ज्ञानशून्यांना दुष्प्राप अशी पुरी आहे, ज्यांत प्रभूनें–हिरण्यगर्भानें विशेषतः निर्माण केलेला सोन्याचा मंडप आहे" [–या उक्त ब्रह्मलोकाविषयीं '**यश्च०**' इत्यादि भाष्यानें प्रमाण सांगतात–] आणि जो ब्रह्मलोक मंत्र-अर्थवाद इत्यादि प्रदेशांमध्यें सविस्तर सांगितला जातो त्याला ते प्राप्त होऊन चंद्रलोकापासून कधीं संसारांत जसे परत येतात तसे भोग भोगून–भुक्तभोग होत्साते आवृत्त होत नाहींत–पुनरपि संसारांत परत येत नाहींत. ['चंद्रलोकापासून जसे, तसे' हें वैधर्म्य उदाहरण आहे.–याप्रमाणें प्रतिज्ञेचें व्याख्यान करून '**कुतः०**' इत्यादि भाष्यानें आकांक्षापूर्वक मोक्षहेतूचें व्याख्यान करितात–]

**भाष्यं**—**कुतः 'तयोर्ध्वमायन्नमृतत्वमेति' 'तेषां न पुनरावृत्तिः' 'एतेन प्रतिपद्यमाना इमं मानवमावर्तं नावर्तन्ते' 'ब्रह्मलोकमभिसंपद्यन्ते' 'न च पुनरावर्तते'**

**इत्यादिशब्देभ्यः । अंतवत्त्वेऽपि त्वैश्वर्यस्य यथाऽनावृत्तिः तथा वर्णितं 'कार्यात्यये तदध्यक्षेण सहातःपरम्' इत्यत्र ॥**

**भाष्यार्थ**—" त्या मूर्धन्य नाडीनें वर जाणारा अमृतत्वास प्राप्त होतो "–पृ.७२६–" त्यांची पुनरावृत्ति–पुनर्जन्म होत नाहीं "–बृ. ६. २. १५.–" या मार्गानें जाणारे या मनूष्या आवर्तांत–या मन्वंतरांत पुनरावर्तन करीत नाहींत–ते परत येत नाहींत "–छां.४.१५.५.–" ब्रह्मलोकास प्राप्त होतात " " पुनरावर्तन करीत नाहींत "–छां.८.१५.१.–इत्यादि शब्दांवरून ज्यांनीं ब्रह्मलोकांतील भोग भोगिले आहेत असे ते पुनरावृत्तीस प्राप्त होत नाहींत. [–" अहोपण, या प्रदर्शित केलेल्या अनावृत्तिश्रुतींना अर्थवादत्व आहे, त्यामुळें त्यांना अविरोधामध्यें प्रामाण्य आहे. म्हणून त्यांना पूर्वोक्त अनुमानाचा बाध करण्याचें सामर्थ्य नाहीं. आणि ' इमं '–या मानव आवर्तांत, व ' इह ' येथें, असें विशेषण असल्यामुळें कल्पान्तरामध्यें त्यांची आवृत्ति होते " अशी आशंका घेऊन '**अन्तवत्त्वेऽपि०**' इत्यादि भाष्यानें म्हणतात–]=पण त्यांच्या ऐश्वर्याला अंतवत्त्व जरी असलें तरी त्यांची ज्याप्रकारें अनावृत्ति होते त्याप्रकारें " कार्याचा–कार्यब्रह्मलोकाचा नाश झाला असतां त्या लोकाचा स्वामी जो हिरण्यगर्भ त्याच्याबरोबर ते त्याहून श्रेष्ठ असलेल्या ब्रह्मलोकास प्राप्त होतात "–ब्र. भा. ४. ३. १० पृ. ७५८–या सूत्रांत वर्णन केलें आहे. [ पण जे स्वाश्रममात्रनिष्ठ असलेले ऊर्ध्वरेते–यति ब्रह्मचर्यानें ब्रह्मलोकावर आरूढ झालेले असतात त्यांच्या ऐश्वर्याला कल्पमात्रस्थायित्व जरी असलें तरी क्रममुक्तीच्या विवक्षेनें त्यांची अनावृत्ति अविरुद्ध आहे, असा याचा भावार्थ.– " अहोपण, तुम्हांकडून येथें सगुण ब्रह्मवेत्त्यांचीच अनावृत्ति प्रतिपादिली जात आहे, निर्गुण ब्रह्मवेत्त्यांची नाहीं, त्याचें काय कारण ?" अशी आशंका घेऊन 'त्यांच्या आवृत्तीच्या शंकेचाच अभाव असल्यामुळें तिचें प्रतिपादन केलें जात नाहीं,' असें '**सम्यग्दर्शन०**' इत्यादि भाष्यानें सांगतात–]

**भाष्यं—सम्यग्दर्शनविध्वस्ततमसां तु नित्यसिद्धनिर्वाणपरायणानां सिद्धैवानावृत्तिः । तदाश्रयणेनैव हि सगुणशरणानामप्यनावृत्तिसिद्धिरिति । अनावृत्तिः शब्दादनावृत्तिः शब्दादिति सूत्राभ्यासः शास्त्रपरिसमाप्तिं द्योतयति ॥ २२ ॥ (७)**

इति श्रीमद्-गोविंदभगवत्पूज्यपादशिष्यश्रीशंकरभगवत्पादकृतौ
शारीरकमीमांसाभाष्ये चतुर्थाध्यायस्य चतुर्थः पादः ॥

**॥ इति समाप्तमिदं ब्रह्ममीमांसाशास्त्रम् ॥**

**भाष्यार्थ**—पण ज्यांचें तम–अज्ञान सम्यग्दर्शनानें विध्वस्त आहे–तत्त्वज्ञानानें ज्यांच्या अविद्यातमाची निवृत्ति झाली आहे त्या नित्यसिद्ध निर्वाणपरायण झालेल्या आत्मसाक्षात्कारवानांची अनावृत्ति–मुक्ति सिद्धच आहे. [–"ब्रह्मलोकास गेलेल्या सगुणब्रह्मवेत्त्यांचीहि मुक्ति ब्रह्मलोकीं उत्पन्न झालेल्या सम्यग्दर्शनाच्या प्रसादापासूनच होते, असें सिद्ध झालें असतां सम्यग्दर्शी आत्मज्ञानी पुरुषाची अनावृत्ति आपोआपच सर्वथा सिद्ध होते, असा कैमुतिकन्याय **'तदाश्रयणेन०'** इत्यादि भाष्यानें सांगतात–]=कारण सगुणब्रह्माचा आश्रय केलेल्या उपासकांचीहि अनावृत्तिसिद्धि सम्यग्दर्शनाचा आश्रय केल्यानेंच होते, त्यामुळें तत्त्वज्ञांची अनावृत्ति सिद्धच आहे. [ब्रह्मलोकीं गेलेल्या उपासकांची अनावृत्तिसिद्धिहि जर तत्त्वसाक्षात्कारानेंच होते तर येथेंच ब्रह्मसाक्षात्कार संपादन केलेल्या विद्वानाच्या अनावृत्तिसिद्धीविषयीं काय सांगावें, तिच्याविषयीं शंकाच काय आहे? उपासकांचें ईश्वराधीन असलेलें ऐश्वर्य निरतिशय नाहीं, असा अधिकरणार्थाचा उपसंहार करण्यासाठीं भाष्यांत शेवटीं 'इति' असें म्हटलें आहे.–**'अनावृत्तिः०'** इत्यादि भाष्यानें सूत्राच्या अभ्यासाचें प्रयोजन सांगतात–]='अनावृत्तिः शब्दात् अनावृत्तिः शब्दात्' असा सूत्राचा अभ्यास शास्त्राची समाप्ति द्योतित करितो. [जेथें अध्यायाचीच परिसमाप्ति झाली तेथें पदाचाच अभ्यास–आवृत्ति केलेली दिसते. पण येथें सूत्राचाच अभ्यास केलेला असल्यामुळें चतुर्लक्षण–चतुरध्यायात्मक वेदान्तमीमांसाशास्त्राचे समन्वय, अविरोध, साधन व फल हे चार विषय पूर्णपणें सांगितलेले असल्यामुळें, आतां वक्तव्य–सांगण्यासारखें असें कांहींच अवशिष्ट राहिलेलें नसल्यामुळें त्याची परिसमाप्ति करणें उचितच आहे, असा याचा भावार्थ. सु. ब्र. ५०६.] २२ (७).

इति श्रीशंकराचार्यभक्त विष्णुशर्मकृत ब्रह्मसूत्रशारीरभाष्यार्थाच्या चवथ्या फलाध्यायाचा चवथा संपद्याविर्भावपाद समाप्त झाला.

इति श्रीब्रह्मसूत्रशारीरभाष्यार्थ समाप्त झाला.

॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

